## भाग तिसरा

# झ ते न्हीव

संपादक:

यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए., एल्एल्. बी.

चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.

संपादक— ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश,
शास्त्रीय परिभाषाकोश, इत्यादि

१ जानेवारी १९५०

किंमत २५ रुपये

# वि श्व वि का स

## ३

## प्राचीन संस्कृति-विकास

### पूर्वावलोकन—

विश्वविकासाच्या पहिल्या दोन खंडांमध्यें या विश्वाची उत्पत्ति कशी झाली व या विश्वामध्यें निरनिराळ्या प्रकारची सृष्टि कशी विकास पावली व पाण्यापासून वनस्पती व नंतर निरनिराळ्या प्रकारचे प्राणी व त्यानंतर सर्वोत्तम असा मानवप्राणी कसा विकास पावला याचें प्रथम थोडक्यात विवरण केलें. त्यानंतर या भूगोलावर निरनिराळे हवामानाचे व वनस्पतीचे प्रदेश कसकसे पसरलेले आहेत व तेथील हवामानास अनुसरून निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पती व प्राणी त्या त्या ठिकाणीं कसे तयार होतात व त्यांच्या हवामानास अनुसरून तेथील मानवप्राणीहि आकार, रंग व रूप यांच्या बाबतींत कसे भिन्न भिन्न प्रकारचे असतात त्यांचें वर्णन केलें. यापुढें या निरनिराळ्या प्रदेशांत मानवाचा एकंदर सांस्कृतिक विकास कसकसा होत गेला याचें विवरण करण्याचा विचार आहे.

### मानवाची प्रथम उत्पत्ति—

या एकंदर भूपृष्ठावर मानवप्राण्याची उत्पत्ति प्रथम कोठें झाली असावी याबद्दल निरनिराळ्या शास्त्रज्ञांमध्यें निरनिराळीं मतें प्रचलित आहेत. तसेंच पृथ्वीवरील सर्व मानवप्राणी एकाच मानववंशाचे व एकाच मानवप्राण्यापासून विकास पावलेले आहेत किंवा भिन्न भिन्न मानववंशापासून उत्पन्न झालेले आहेत याबद्दलहि मतभेद आहेत. तथापि यासंबंधीं शास्त्रज्ञांचें मत सामान्यतः असें आढळतें कीं, मानवप्राण्याचा प्रथम विकास युरेशिया म्हणजे आशिया व युरोप मिळून होणाऱ्या या मोठ्या भूप्रदेशावर झाला. प्रसिद्ध विकासशास्त्रज्ञ डार्विन याचें मत असें होतें कीं, मानवप्राण्याची प्रथम उत्पत्ति आफ्रिका खंडांत झाली असावी. कारण मानवाचा जर मर्कटापासून विकास झाला असेल तर मर्कट हे ज्या अर्थी वृक्षांचा आश्रय करून राहतात त्या अर्थी जेथें घनदाट अरण्यें आहेत अशा प्रदेशांत मानवाचा विकास झाला असला पाहिजे. याच्या उलट हक्स्ले याचें मत असें होतें कीं, इतर सस्तन प्राण्यांप्रमाणेंच मानव हा एक सस्तन प्राणी असल्यामुळें तो इतर सस्तन प्राण्यांप्रमाणें भूपृष्ठावरील निरनिराळ्या अनेक प्रदेशांत विकास पावला असला पाहिजे. डार्विनच्या विकाससिद्धान्ताचा एक पुरस्कर्ता व त्याचा सहकारी डॉ. ए. आर्. वॉलेस याचें असें म्हणणें होतें कीं, डार्विनच्या सिद्धान्ताचा एकंदर विचार करतां व एकंदर भूपृष्ठाच्या रचनेचा व हवामानाचा विचार करतां असें दिसून येतें कीं, मानवप्राण्याची प्रथम उत्पत्ति समशीतोष्ण कटिबंधांत व सखल प्रदेशांत अथवा उंच पठारावर झाली असणें अधिक संभवनीय आहे व त्याचा विकास क्रमानें शिकार, फांसेपारध, मत्स्यभोजन, पशुपालन व नंतर कृषिजीवन यांप्रमाणें झाला असावा. अर्थात् या सर्व गोष्टी घडून येण्यास आफ्रिकेपेक्षां युरेशियामधील इराणपासून तिबेट व सैबेरिया आणि मांचूरियापर्यंत पसरलेलें पठारच मानवप्राण्याचा उद्भव व विकास होण्यास योग्य क्षेत्र असावें असें वाटतें; कारण त्या ठिकाणची परिस्थिति मानवविकासाच्या दृष्टीनें सर्व प्रकारें योग्य अशी आढळून येते. ज्या वेळीं प्रथम मानवाचा विकास झाला त्या वेळीं भरतखंड व आफ्रिका खंड हीं दोन्हीहि भूखंडें एका मोठ्या समुद्रामुळें युरेशिया या उत्तरेच्या खंडापासून अलग होतीं. या गोष्टीचें प्रत्यंतर म्हणजे हिमालय हा पर्वत अगदीं नवीन व अलीकडे उत्पन्न झालेला असून त्या भूप्रदेशावर एकदां समुद्राचें पाणी खेळत होतें ही गोष्ट आपणांस हिमालयांतील शिवालिक नांवाच्या टेंकड्यांवर अद्यापि शिंपा वगैरे जलचर प्राण्यांचे अवशेप सांपडतात, तसेंच सिसिली बेटातील पर्वतावरहि चलचर प्राण्यांचे अवशेप आढळून येतात, यामुळें सहज प्रत्ययास येते.

क्यूव्हिए या शास्त्रज्ञानें प्रथम मानवांचे तीन वर्ग अथवा वंश होते असें प्रतिपादन केलें आहे. ते म्हणजे पीतवंश, श्वेतवंश व कृष्णवंश हे होत. सध्यां पृथ्वीतलावर अंदाजानें श्वेत अथवा कॉकेशिअन वंशाचे लोक साठ-सत्तर कोटी, पीत वंशाचे लोक साठ कोटी व कृष्ण वर्णाचे लोक वीस कोटी इतके असावेत.

### श्वेतवर्णी कॉकेशिअन वंशी मानव—

यापैकीं श्वेतवर्णी लोकांचे वंशज आज आपणांस आर्यन् या नांवाखालीं इराण, भारत, ग्रीस, इटाली या देशांत व केल्ट, जर्मन,

स्लाव्ह, इत्यादि लोकांत आढळतात. या लोकांच्या भाषांचा अभ्यास केल्यास आपणांस असें आढळून येतें कीं, यांच्या भाषेंतील म्हणी अथवा वाक्संप्रदाय, लोककथा, पौराणिक व अद्भुतकथा, वगैरे वाङ्मयप्रकारांत फारच साम्य आढळून येतें. तसेंच यांच्या भाषेंतील निरनिराळीं नातींगोतीं व व्यवहारांतील सामान्य व्यापारविषयक शब्दांमध्यें पुष्कळच साम्य आढळून येतें. अशा तऱ्हेनें एकवंशीय लोकांची वस्ती आपणांस भारत, इराण, स्कँडिनेव्हिया (स्कंधदेश-स्वीडन व नॉर्वे आणि डेन्मार्क), जर्मनी व आइस्लंड या प्रदेशांत आढळते. यांस इंडो-युरोपीय असें नाव देण्यांत येतें. यांचें मूलगृह कोणी कोणी युरोपांत असावें असें म्हणतात; परंतु अलीकडे बहुतेक शास्त्रज्ञांची प्रवृत्ति इंडो-युरोपीय लोकांचें मूलगृहीन स्थान आशिया खंडांत हिन्दुकुश पर्वताच्या उत्तरेकडे कोठें तरी असावें असें मानण्याकडे होत आहे. आपल्या प्राचीन ग्रंथांमध्येंहि मेरु पर्वत म्हणजे बहुधा पामीरचें पठार हा सर्व पृथ्वीचें केंद्र असावा व त्यासभोंवतीं पृथ्वी पसरलेली असून तेथेंच मूळ मानवांची वस्ती असावी असें वर्णन आढळतें; व ही आपल्या पूर्वजांची स्मृति अर्वाचीन शास्त्रज्ञांच्या सिद्धान्तांशीं जुळती आहे असें दिसून येतें. या इंडो-युरोपीय लोकांची एक शाखा आर्यन या नांवाची असून ती कांहीं कालानें पूर्वेकडे इराण व भारतवर्ष या देशाकडे भ्रमण करीत गेली व त्या त्या देशांत स्थायिक झाली. दुसरी शाखा ग्रीस, इटाली, वगैरे देशांत जाऊन ग्रीक व रोमन लोक या नांवानें व त्यापलीकडे केल्ट, जर्मन, स्लाव्ह, वगैरे नांवांनीं वसाहती करून राहिली.

### सेमाइट शाखा—

या श्वेतवर्णी लोकांची दक्षिणेकडील एक शाखा सेमाइट या नांवानें ओळखली जाते; यांसच सीरो-अरेबिक अशीहि संज्ञा आहे. हे लोक अरबस्तान, सीरिया, इथिओपिया, अबीसीनिया, वगैरे देशांत वसति करून राहिले. सेमाइट हें नांव शेम या नांवावरून पडलें. यास बायबलाच्या सेप्चुयाजिंट (सतति संहिता) या नांवाच्या प्रतींत नोहाचा पुत्र व अब्राहामचा पूर्वज असें म्हटलें आहे. खिस्तपूर्व चार हजार वर्षांपूर्वी अरबस्तानांत हे लोक भ्रमण करीत होते. ते पुढें खाल्डिया प्रांतांत वसति करून राहिले. तेथें त्यांच्यापूर्वीच अक्कड व तुराणी किंवा उत्तर कॉकेशिअन लोकांनीं वसति केली होती; त्यांमध्यें हे सेमिटिक लोक मिसळून गेले. ईजिप्त देशावर स्वारी करणारे हिक्सॉस लोक हे सेमिटिक असून त्यांस अरब असेंहि नांव दिलेलें आढळतें (जुना करार. जॉब. १३-२६; ३१-३५). यांच्यापैकीं मोआबाइट, इडूमाइट, वगैरे लोक होते व त्यांचे हिब्रू व फिनिशिअन लोकांशीं साम्य आढळतें. इडुमिया या शब्दाचाच जुडिया हा अपभ्रंश असून त्यावरून ज्यू अथवा यहुदी हा शब्द बनलेला आहे.

### मंगोल व पीतवर्णी मानव—

मानववंशाचें मूलस्थान जें मध्य आशियाचें पठार त्यामधूनच मानवांची एक शाखा पूर्वेकडे गेली व त्यांनीं मंगोलिया, तुराण, चीन, वगैरे देशांत वसति केली व तेथेंच आपल्या संस्कृतीची स्वतंत्र रीतीनें वाढ केली. यापैकींच तुराणी लोकांची एक शाखा अक्कड, वगैरे लोकांसह मेसापोटेमियामध्यें स्थायिक झाली असावी व तिनें असुरी बाबिलोनी संस्कृतीचा पाया घातला असावा.

श्वेत लोकांपैकींच कांहीं लोक ईजिप्तमध्यें व त्यानंतर आफ्रिकेच्या दक्षिण भागांत फार प्राचीन काळीं जाऊन वास्तव्य करून राहिले असावे व तेथें हवामानामुळें त्यांच्या शरीरावर व वाढीवर परिणाम होऊन ते कृष्णवर्ण बनले असावे असें एक मत आहे. प्रो. रॉलिन्सन यांचें असें मत आहे कीं, आफ्रिकेंतील कृष्णवर्णी लोक हे श्वेत लोकांपासूनच ऱ्हास पावून बनलेले असावे.

हवामानाचा मनुष्याच्या वर्णावर, ठेवणीवर व अवयवांवर परिणाम होतो ही गोष्ट आजहि आपल्या प्रत्ययास येते. चीन, सयाम किंवा जपानमध्यें इकडील लोक जाऊन स्थायिक झाल्यास त्यांचीं जीं मुलें तेथें जन्मून वाढतात त्यांचा चेहरा व विशेषतः डोळे हे चिनी-जपानी लोकांप्रमाणें बनतात ही गोष्ट आजहि नजरेस येते. असो.

याप्रमाणें मानववंशाची प्रथम मध्य आशियाच्या पठारावर उत्पत्ति होऊन त्याचा प्रसार सर्व जगभर झाला व त्याचा आयुष्यक्रम भौगोलिक रचनेप्रमाणें व हवामानाप्रमाणें विकास पावला ही गोष्ट आपल्या दृष्टीस पडते व त्याप्रमाणें आज भूभागावर कोठें व कोणत्या प्रकारचे लोक आहेत व तेथील हवामान कसें आहे याचें आपण पूर्वींच अवलोकन केलें आहे.

### भिन्न प्रदेशांतील मानवप्रगतीच्या भिन्न अवस्था—

या जगाचें आपण स्थूल अवलोकन केलें तर आपणांस असें दिसून येतें कीं, जगाच्या निरनिराळ्या भागांत भिन्न भिन्न सांस्कृतिक अवस्थेंतील लोक एकाच वेळीं वस्ती करून राहिलेले दिसतात. एका बाजूला संस्कृतीची पुष्कळच प्रगति झालेली आणि नवीन नवीन उपयुक्त कला व शास्त्रें यांची पुष्कळच वाढ झालेली असून तिचा उपयोग पूर्णपणें करून आपले आयुष्यक्रम विविध प्रकारांनीं गुंतागुंतींचे व अनेक उलाढालींनीं युक्त असे करून घेतलेले कांहीं लोक आढळतात. तर याच्या उलट कांहीं

लोक संस्कृतीच्या अगदींच प्राथमिक अवस्थेमध्यें असून त्यानीं कोणत्याहि उपयुक्त कलांमध्यें मुळींच प्रगति केलेली आढळून येत नाहीं. अशा तऱ्हेच्या संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंतील लोक आपणांस दक्षिण हिंदुस्थानांतील जंगलांत, अमेरिका व दक्षिण आफ्रिका यांतील अरण्यांत अद्यापहि दृष्टीस पडतात. ऑस्ट्रेलियामधील लोक तर यापेक्षांहि प्राथमिक अवस्थेमध्यें असलेले दृष्टीस पडतात. या दोन निरनिराळ्या टोंकांकडील भिन्न सांस्कृतिक अवस्थांच्या दरम्यान बाकीचे अनेक लोक निरनिराळ्या अवस्थांमध्यें असलेले आपणांस दिसून येतात.

## अन्न-उत्पादक व अन्न-संग्राहक वर्ग—

संस्कृतीच्या वाढीसंबंधीं विचार करतांना आपणांस मुख्यतः ही गोष्ट आढळून येते कीं, प्रथम मनुष्याची आपली सांस्कृतिक उन्नति करून घेण्याकडे जी प्रवृत्ति झाली तिचें मूळ भक्ष्याचा शोध करणें या नैसर्गिक प्रवृत्तींमध्यें आढळतें. माध्यान्हकाळीं क्षुधा शमविणें ही गोष्ट प्रत्येक मनुष्यमात्रास अवश्य आहे व याच प्रेरणेनें प्रथम मनुष्य कार्यप्रवृत्त झाला असला पाहिजे. या दृष्टीनें विचार करूं गेलें असतां आपणांस या जगांतील सर्व मानवजातीचें दोन समूहांमध्यें वर्गीकरण करतां येईल. एक अन्न उत्पादन करणारे व दुसरे अन्न गोळा करणारे. पहिल्या समाजाची सांस्कृतिक प्रगति होत गेली व दुसरा समाज अप्रगत राहिला. आज पृथ्वीच्या पाठीवर अन्न उत्पादन करण्याचे विविध प्रकार आपल्या दृष्टीस पडत असतांना अद्यापहि भूपृष्ठावर असे अनेक समाज आढळून येतात कीं, जे सर्व अन्न उत्पादन करण्याच्या पद्धतींबद्दल पूर्णपणें अज्ञानांत असून फक्त आयतें भक्ष्य गोळा करणें हेंच त्यांस माहीत आहे. अशा तऱ्हेचे गाढ अज्ञानावस्थेंतील समाज आपणांस पृथ्वीवरील सर्व खंडांमध्यें आढळून येतात. यांची गणती करावयाची म्हणजे पुढें दिल्याप्रमाणें एक यादी देतां येईल. आफ्रिका—(१) नेग्रीटो, (२) बुशमेन. आशिया—(१) सिलोनमधील वेद्द. (२) हिंदुस्थानांतील द्राविडपूर्व जमाती. (३) मलाया द्वीपकल्पांतील सेमांग आणि सकई. (४) अंदमानी. (५) सुमात्रामधील कुबू. (६) बोर्निओमधील पुनान. (७) आरु बेटांतील लोक. (८) फिलिपाइन बेटांतील नेग्रीटो. अमेरिका—(१) एस्किमो. (२) मॅकेंझी नदीच्या खोऱ्यांतील डेने. (३) न्यूफौंडलंडमधील बिओथक लोक (नष्ट). (४) यूटामधील पॉइट्ट (५) कॅलिफोर्नियांतील जमाती. (६) टायराडेल फ्यूगोमधील जमाती. ओशियानिया—(१) ऑस्ट्रेलियन. (२) टॅस्मॉनियन (हे आतां नष्ट झाले आहेत.).

## मानवाची संरक्षणप्रवृत्ति—

मानवानें जी आपली स्थिति इतर प्राण्यांपेक्षां अधिक सुसंस्कृत करून घेतली किंवा आपल्या आयुष्यक्रमात जी सुधारणा केली तिच्या मुळाशीं त्याची प्रथम स्वसंरक्षणाची वृत्ति हीच दृग्गोचर होते. अर्थात् ही स्वतःचें संरक्षण करण्याची वृत्ति सर्वच प्राण्यांत निसर्गतःच असते; मात्र इतर प्राण्यांत ती मर्यादित असते व निरनिराळे प्राणी त्याकरितां निरनिराळे मार्ग आक्रमण करतात. कोणी शत्रूपासून पळून जातात, तर कोणी त्यावर आक्रमण करतात. ज्या वेळीं मनुष्य इतर प्राण्यांप्रमाणेंच अरण्यांत भ्रमण करीत फिरत असे त्या वेळीं त्याला स्वतःचें उदरपोषण करून आपल्या शरीराचें संरक्षण करणें अवश्य असे व त्याप्रमाणेंच इतर प्राण्यांपासूनहि स्वतःचें संरक्षण करणें अवश्य असे. कारण त्या वेळीं त्याच्याभोंवतीं हत्ती, गेंडे, सिंह, वगैरे अनेक भयानक व प्रचंड प्राणी आपलें भक्ष्य शोधीत इतस्ततः भ्रमण करतांना आढळत असत व त्या प्राण्यांस जसे स्वतःचें संरक्षण करण्यास नखें, दांत, शिंगें, वगैरे अवयव असत तसे मनुष्यास नव्हते. त्याला आपलें संरक्षण केवळ आपल्या हातांनींच करावें लागे. याकरितां प्रथम तो आपल्या दोन पायांवर चालावयास व आपले हात मोकळे ठेवावयास शिकला. अर्थात् त्याला नुसत्या हातांनीं आपलें संरक्षण करतां येणें अशक्य होतें. याकरितां त्यास कांहीं तरी साधन घेणें अवश्य वाटलें. अर्थात् या वेळीं तो अगदींच वन्य अवस्थेंत असल्यामुळें त्याजवळ कोणतेंहि हत्यार नव्हतें. तेव्हां प्रथम हातानें मोडतां येण्यासारखा लाकडाचा दांडा किंवा एखाद्या वाळून पडलेल्या लांकडाचा बडगा एवढेंच हत्यार त्यास प्रथम वापरणें शक्य होतें. नंतर या लांकडास टोंक काढून तें भोंसकतां येण्यासारखें करण्याची त्याला युक्ति सुचली असावी. त्याप्रमाणेंच कधीं कधीं दगडाचे गोटे किंवा मोठमोठे तुकडे फेकून मारूनहि आपल्या शत्रूस दूर पिटाळतां येतें ही गोष्टहि त्याच्या लक्षांत आली असावी. याप्रमाणें लांकडी बडगा व दगड यांच्या साहाय्यानें तो शिकार करीत असतां ती शिकार फाडण्याकरितां एखादा तीक्ष्ण धार असलेला दगड अधिक उपयोगी पडतो ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली असावी व याप्रमाणें तीक्ष्ण धारेच्या गारगोट्या तो जवळ बाळगूं लागला असावा. तसेंच मारलेल्या पशूच्या चरगड्या किंवा हाडें यांसहि धार असते किंवा तीक्ष्ण अग्र असतें किंवा घांसून करतां येतें ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली असावी. याप्रमाणें तो गारांसहि घांसून धार काढूं लागला असावा. तसेंच हाडांस भोंक पाडून त्यांच्या सुया करण्याचीहि कला त्यास अवगत झाली असावी व याप्रमाणें तो आपलीं निरनिराळीं हत्यारें व साधनें बनवीत गेला असावा.

काठीच्या टोंकास तीक्ष्ण धारेची गार किंवा टोंकदार हाड वस्तविन्यास तें लांबून भोंसकतां येतें किंवा फेंकून मारतां येतें ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली असावी व यावरून तो भाले करूं लागला असावा. अशा तऱ्हेचीं हत्यारें आजहि रानटी लोकांमध्यें आपणांस आढळतात व कित्येक ठिकाणीं उत्खननांत सांपडलीं आहेत.

अशा तऱ्हेच्या प्राथमिक आयुष्यक्रमांतील मानवांचे अवशेष आता पश्चिम युरोप, आफ्रिका व आशियामध्येंहि आढळून आले आहेत. मानवाच्या प्रगतीचा इतिहास जरी सर्व प्रदेशांत सामान्यतः एकसारखाच आढळतो तरी तो एकसमयावच्छेदेंकरून मात्र झालेला नाहीं. उदाहरणार्थ, ईजिप्त व पश्चिम आशियामध्येंच हजारों वर्षांपूर्वी लेखनकला विकास पावली, पण पश्चिम युरोपमध्यें तिचा उदयहि झाला नाहीं. तसेंच ईजिप्तमध्यें धातूंचा सर्रास उपयोग होत असतां पश्चिम युरोप पाषाणयुगांतच होतें व तेथें गलबतांच्या सफरी चालू असतां येथें होडग्यापलीकडे माहिती नव्हती.

जी गोष्ट मनुष्याच्या स्वसंरक्षणाच्या बाबतींत प्रगतीस उद्युक्त करती झाली तीच त्याला आपल्या पोषणाच्या बाबतींतहि प्रगतिकारक ठरली. प्रथम मनुष्य झाडांचीं फळें किंवा एखादा लहानसा प्राणी मारून कच्चाच खाऊं लागला. पुढें त्यास विस्तव पेटविण्याची कला माहीत झाल्यावर तो आपलें अन्न भाजून खाऊं लागला व तें त्याला अधिक चवदार वाटूं लागलें. पुढें रोज नवीन नवीन भक्ष्य मिळविण्याचे श्रम व अनिश्चितता टाळण्यासाठीं तो कांहीं प्राणी जवळ बाळगूं लागला व याप्रमाणें पशुपालनवृत्ति त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. या पशूंचे कळप घेऊन ते चारण्यासाठीं तो भ्रमण करूं लागला व जेव्हां नाइल किंवा युफ्रेटीस नदी किंवा एखादा मोठा तलाव यांच्या कांठीं तो येऊन पोंचला तेव्हां विशेषतः स्त्रिया तृणबीजें गोळा करूं लागल्या व हीं तृणबीजें गाळवट जमिनींत रुजून त्यांस कणसें येतात हें त्यास कळून आल्यावर तो अशीं बीजें पेरून शेती करूं लागला व या वेळीं पेरलेलें बीं उगवून त्याचें पीक येईपर्यंत त्यास एका ठिकाणीं स्थायिक व्हावें लागल्यामुळें तो हळूहळू एका ठिकाणीं स्थिर होऊं लागला व नंतर घर वगैरे बांधून स्थायिक बनत गेला. या कृषिजीवनामध्येंहि एक जमीन वरचेवर पीक काढून नापीक झाल्यास नवीन ठिकाणीं जंगलास आग लावून जमीन साफ करून नवीन लागवड करण्याची व याप्रमाणें नवीन नवीन ठिकाणीं शेती करण्याची कूर्मी पद्धति आजहि आपणांस कांहीं भ्रमणवृत्ति लोकांत आढळते. पण सुपीक जमिनीवर लवकरच स्थायिक होण्याची प्रवृत्ति बळावते व याप्रमाणें नद्यांच्या कांठीं सुपीक प्रदेशांत प्रथम मानव स्थायिक होऊन त्याच्या समाजांत संस्कृति वाढीस लागलेली आपणांस दृष्टीस पडते.

**संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंतील मानव—**

याप्रमाणें कांहीं लोक अगदीं संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंत अद्यापहि आढळतात. सायबेरियामध्यें सामोयिद आणि ओस्तीयाक वगैरे लोक असे आहेत कीं, ते केवळ रेनडियर नांवाचे प्राणी बाळगून राहतात व त्यांची संस्कृतीहि या वरील लोकांप्रमाणेंच आहे.

या लोकांपैकीं कांहीं लोकांची शारीरिक वाढहि फारशी झालेली नाहीं. उदा.— आफ्रिकेंतील नेग्रीटो लोक, मलाया द्वीपकल्पांतील सेमाग लोक व अंदमानी व फिलिपाइन बेटांतील नेग्रीटो. हे सर्व लोक ठेंगू निग्रो जातीचे आहेत व त्या त्या प्रदेशांतील ते आद्य मानव आहेत. ऑस्ट्रेलियन लोक तर त्यापेक्षांहि प्राथमिक अवस्थेमध्यें आहेत. यावरून असें दिसतें कीं, जगामध्यें मनुष्य जातीचे अगदीं प्राथमिक अवस्थेंतील प्रतिनिधी आजहि या पृथ्वीवर आपणास दृष्टीस पडतात.

टॅस्मानियामध्यें तर थोड्याच वर्षांपूर्वी असे लोक आढळून आले होते कीं, त्यांच्या अंगावर सूतहि नसे. त्यांस छप्पर असलेली झोंपडी माहीत नव्हती. धनुष्य–बाण माहीत नव्हता. मासे धरण्याचें जाळें माहीत नसून ते भाल्यानें मासे मारीत. त्यास बकऱ्या, मेंढ्या, गायी, घोडे किंवा कुत्रेहि पाळण्याचें माहीत नव्हतें. तसेंच धान्य पेरणें व पीक काढणें माहीत नव्हतें. माती भाजल्यानें कठिण होते हें माहीत नसल्यामुळें मडकीं माहीत नव्हतीं. त्यांस विस्तव पेटविणें माहीत असल्यामुळें त्यापासूनच ते थंडीचें निवारण करीत व मांस भाजून खात. त्यांचे भाले लांकडीच असत व त्यांस धातु माहीत नसल्यामुळें अणकुचीदार दगडाचा फाळ बसवीत. त्यांस झाडांच्या सालीचे टोपले विणतां येत असत व त्यांची स्वतंत्र भाषाहि असे व तींत व्यवहारापुरतेच शब्द असत. आतां हे लोक अजीबात नष्ट झाले आहेत.

यापैकीं एक-दोन जाती सोडल्यास त्यांमध्यें कोणत्याहि प्रकारच्या कलांचा अथवा हस्तव्यवसायाचा विकास झालेला नाहीं. शेजारच्या अन्न-उत्पादक समाजापैकीं कांहीं लोकांचा संबंध या लोकांशीं आल्यामुळें यांच्यामध्यें थोडीफार प्रगति झालेली आढळते. परंतु तेवढी सोडून दिल्यास हजारों वर्षें लोटलीं तरी हे लोक प्राथमिक अवस्थेंतच आपलें जीवन कंठित असल्याचें आढळून येतें. जी कांहीं सांस्कृतिक प्रगति आपणांस झालेली आढळून येते ती प्रथम भूमध्य समुद्राच्या सभोंवतीं असलेल्या प्रदेशांतच दिसून येते.

## संस्कृति-विकासांत पर्वत, नद्या व मार्ग यांचें महत्त्व—

या मानवी संस्कृतीच्या आद्यकालीन विकासामध्यें पर्वत, नद्या व स्थलमार्ग अथवा रस्ते यांचें महत्त्व विशेष रीतीनें दृष्टोपत्तीस येतें. आपण कोठेंहि प्रवासास निघालों तर आपणांस दुर्ग, गड किंवा कोट ज्याच्या नांवाच्या शेवटीं आहे अशीं पुष्कळ शहरें प्राचीन काळापासून आढळून येतात : नंदीदुर्ग, रामदुर्ग, विजयदुर्ग, जयगड, चंदगड, प्रतापगड, सोनगड, गडहिंग्लज, पठाणकोट, नगरकोट, इ.. या गोष्टींवरून किल्ल्यांचें महत्त्व प्राचीन लोकांसहि किती उत्तम तऱ्हेनें समजलें होतें हें लक्षांत येतें. याचें कारण या दुर्गांपासून मार्गांचें रक्षण होत असे, हें होय.

## पर्वतांची स्थिरता व विभाजकता—

जगामध्यें वरचेवर बदल होत असतो. परंतु त्यामध्यें कांहीं गोष्टी स्थिर असतात. त्यात पर्वत ही एक अशी स्थिर वस्तु आहे. हे पर्वत कसे उत्पन्न झाले व ते विशिष्टच ठिकाणीं कसे स्थिर झाले यासंबंधीं प्राचीन काळापासून लोक विचार व आश्चर्य करीत आहेत. झेनोफॉनीज या नांवाचा एक ग्रीक तत्त्ववेत्ता भूमध्यसमुद्राभोंवतीं प्रवास करीत असतां सिसिली बेटावर आला. तेथील पर्वताच्या शिखरावर समुद्रांतील शिंपा पाहून त्यास आश्चर्य वाटलें. अर्थात् यावरून ही गोष्ट सिद्ध झाली कीं, हा पर्वत एकदां समुद्राच्या पृष्ठभागाखालीं असून त्यावर मासे व कालवें राहत होतीं व कालांतरानें तो समुद्राच्या पृष्ठभागाच्या वर आला असला पाहिजे. आज भूशास्त्रवेत्त्यांनीं ही गोष्ट मान्य केली आहे कीं, पृथ्वीच्या पृष्ठभागांत वरचेवर फेरफार होत असतात व त्यामुळें जेथें समुद्र असतो तेथें जमीन व जेथें जमीन असते तेथें समुद्र याप्रमाणें फेरफार होत आले आहेत. हिमालयांतील शिवालिक टेंकड्यांवरहि माशांचे शिंपले वगैरे आढळून येतात. यावरून त्या ठिकाणीं एकदां समुद्र असून हिमालय पर्वत हा समुद्रांतून हळूहळू वर आलेला व सर्वांत अर्वाचीन पर्वत आहे ही गोष्ट पूर्वी सांगितलीच आहे.

याप्रमाणें हिंदुस्थानांत हिमालय पर्वत, विंध्य पर्वत व सह्य पर्वत यांचें सांस्कृतिक दृष्ट्या फार महत्त्व आहे. त्याप्रमाणेंच इटलीमध्यें अपीनाइन पर्वत व दक्षिण अमेरिकेंत अँडीज पर्वत हे त्या भूखंडास कण्यासारखे आहेत. तसेंच उत्तर अमेरिकेंतील ॲपलाशियन आणि रॉकी पर्वत यांचेंहि त्या प्रदेशास विभागण्याच्या कामीं मोठें महत्त्व आहे.

## नद्यांपासून पाणी-पुरवठा व मार्गदर्शन—

पर्वतांप्रमाणेंच नद्यांचेंहि महत्त्व फार आहे. कोणत्याहि भूपृष्ठावर पाणी पडलें असतां तें सखल प्रदेशाकडे वाहत जाणें हा त्याचा स्वाभाविक धर्म आहे व तें सहज वाहत जाईल अशा रीतीनेंच सखल प्रदेशाकडे जातें व आपला नैसर्गिक मार्ग शोधून काढतें. यामुळें पाण्याच्या प्रवाहामुळें बनलेले मार्ग हे नैसर्गिक मार्ग होत. ज्याप्रमाणें पर्वत हे एका सरळ रेषेंत कधीं असत नाहींत त्याप्रमाणेंच नद्यांचे मार्गहि सरळ असत नाहींत व जेथें त्यांस अडथळा होतो तेथें त्यांचें पाणी सभोंवतालच्या प्रदेशांत पसरून तेथें दलदली किंवा मोठमोठे तलाव बनतात. अशा तऱ्हेचे नैसर्गिक तलावहि कांहीं काळानें बांध फुटून आंतील पाणी वाहून गेल्यामुळें सपाट मैदानाचें अथवा दरीचें स्वरूप पावतात. काश्मीर ही एक अशाच तऱ्हेची तलावाची दरी बनलेली आहे. उत्तर ग्रीस देशामध्यें थेसली हा प्रदेशहि असेंच एक सपाट मैदान बनलेलें आहे. असे प्रकार केव्हा केव्हां भूकंपानेंहि घडून येतात.

## मार्गांचें प्रवासास महत्त्व—

यानंतरची महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रवासमार्ग अथवा रस्ते ही होय. रस्त्यांसंबंधीं विचार करूं लागलें असतां आपणांस असें दिसून येतें कीं, बहुतेक रस्ते नदीच्या काठाकांठानें गेलेले असतात. तेव्हां नद्यांचे प्रवाह हे स्वाभाविक मार्ग होत. ही गोष्ट आपण वर नमूद केलीच आहे. कोणत्याहि प्रदेशांत मनुष्य जेव्हां प्रथम वसाहत करतो व त्या वसाहतीचा जो विस्तार होत जातो तो बहुतेक नद्यांच्या विस्तारास धरून होत असतो ही गोष्ट प्राचीन काळापासून घडत आलेली आहे आणि आजहि उत्तर अमेरिकेमध्यें संयुक्त संस्थानांत जी वसाहतींची वाढ होत गेली तिच्याकडे पाहिलें असतां आपणांस याच गोष्टीचा प्रत्यय येतो. एवढेंच नव्हे तर रेल्वेरस्त्यांची बांधणी करणारे इंजिनियर सुद्धां सामान्यतः नदीच्या प्रवाहास अनुसरूनच रेल्वेची आंखणी करीत असतात; कारण त्यांस हें ठाऊक असतें कीं, नदी आपला मार्ग शोधून काढते व जेथें पर्वत वगैरेंसारखी अडचण वाटेंत येईल तेथें त्या पर्वताच्या एखाद्या खोऱ्यातून ती आपली वांट काढते. यामुळें मानवी संस्कृतीच्या वाढीमध्यें नद्यांस फार महत्त्व आहे. व एकंदर मानवी संस्कृतीचे इतिहास विचारांत घेतल्यास आपणांस असें दिसून येईल कीं, मानवी संस्कृतीचा जो आद्यकालीन विकास झाला तो विशिष्ट नद्यांच्या कांठींच घडून आला. नद्यांप्रमाणेंच त्यांस जेथें सहज ओलांडतां येतें अशा स्थानास म्हणजे नद्यांच्या उतारांसहि मार्गांतील मर्मस्थानें म्हणून महत्त्व आहे व अशा ठिकाणीं आतांपर्यंत अनेक युद्धें झालीं आहेत.

## सुसंस्कृत मानवाचीं प्रथम वस्तीं—

या पृथ्वीवर मानवाची खरोखर आद्य वसाहत केव्हां आणि कोठें झाली व त्यानें कृषिकर्मास प्रथम कोठें आरंभ केला

याबद्दल आतांपर्यंत जरी बरेंच संशोधन झालें आहे तरी अद्यापि निश्चित असें विधान करतां येण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली नाहीं. तथापि गेल्या पन्नास वर्षांत या विषयासंबंधीं पुष्कळच नवीन नवीन शोध लावण्यांत आले आहेत. आपणांस फार झालें तर एवढेंच म्हणतां येईल कीं, खिस्तपूर्व १५ हजार ते १२ हजार वर्षांच्या सुमारास पश्चिम आशिया, भूमध्यसमुद्राचें खोरें किंवा उत्तर आफ्रिका या ठिकाणीं मनुष्यांची वस्ती असून ते शेती आणि पशुपालन हे उद्योग हळूहळू संवर्धन करीत होते. या लोकांनीं आपल्या शिकारी आयुष्यक्रमांतील हत्यारांपेक्षां अधिक चांगल्या तऱ्हेचीं हत्यारें व उपकरणें उपयोगांत आणलीं असावीं. त्यांस टोपल्या तयार करतां येत असाव्या व झाडाच्या सालीच्या तंतूंपासून कांहीं जाडें-भरडें कापडहि विणतां येत असावें. याप्रमाणेंच कांहीं मातीचीं भांडीं ते तयार करीत असावेत.

## नवपाषाणयुग—

या कालांत ते मानवी संस्कृतीच्या एका नवीन अवस्थेमध्यें प्रवेश करीत होते. या युगास नवपाषाणयुग असें म्हणतात. अर्थात् या युगामध्यें पूर्वपाषाण-युगांतील क्रोमॅग्नार्डे, ग्रिमाल्डी व ॲझीलियन, इत्यादि लोकांपेक्षां यांची अधिक प्रगति झाली होती यांत संशय नाहीं. हळूहळू या नवपाषाणयुगीन लोकांचा प्रसार जगांतील अधिक उष्ण अशा हवामानाच्या प्रदेशांत झाला. त्यांनीं जें कलाकौशल्य हस्तगत केलें होतें, तसेंच निरनिराळ्या वनस्पतींची व झाडांची लागवड केली होती, तसेंच जे निरनिराळे प्राणी बाळगले होते त्याचाहि प्रसार त्यांच्या साहचर्यानें ते ज्या ज्या प्रदेशांत गेले त्या त्या प्रदेशांत व त्यासभोंवतींच्या प्रदेशांत होत गेला. खि. पू. दहा हजार वर्षांपूर्वींच्या कालीं सर्व जगांतील मानवजातींत या नवपाषाणयुगीन संस्कृतीचा प्रसार झाला असावा असें मानवशास्त्रवेत्ते म्हणतात.

सर्व पृथ्वीवरील प्रदेशांपैकीं भूमध्यसमुद्राच्या पूर्वेकडील आशियाचा भाग, नाइल नदीचें खोरें, तैग्रीस व युफ्रेटीस यांचा दुआब, वगैरे भागांतच मानवाची सांस्कृतिक प्रगति प्राथमिक कालांतहि विशेष होण्याचें कारण तेथील विशिष्ट हवामान हें होय. या पृथ्वीतलावर चार हिमयुगें व त्यांच्या मध्यंतरीं चार उष्णमानाचे काल होऊन गेले असें भूस्तरशास्त्रवेत्त्यांचें म्हणणें आहे. ज्या वेळीं हिमयुगांत हिमवर्षाव होत असे तेव्हां विषुववृत्ताच्या प्रदेशामध्यें त्याची तीव्रता त्याच्या उत्तरेकडील किंवा दक्षिणेकडील प्रदेशापेक्षां कमी असून त्या प्रदेशांत हिमवर्षावाऐवजीं जलवृष्टिच होत असे. त्यामुळें तेथें भूपृष्ठभाग बर्फानें व्याप्त न होतां त्या भागांत जंगलाची वाढ बरीच झाली व त्यामुळें मध्य आशियांतील शीत प्रदेशाकडून मानव दक्षिणेकडे भूमध्यसमुद्राकडे म्हणजे अधिक उष्ण प्रदेशाकडे आला व पुढें उष्ण मध्यंतरामध्यें तैग्रीस-युफ्रेटीस दुआब किंवा नाइल नदीचें वेचकें यांमध्यें अनुकूल हवामान पाहून वस्ती करून राहिला व तेथें त्यास निर्वाहाकरितां वानस्पतिक व मांसमय आहार भरपूर मिळूं लागला. तेथें त्यास पशुसंवर्धनास व पुढें कृषिसंवर्धनास अनुकूल क्षेत्र व हवामान मिळालें म्हणून तेथेंच संस्कृतीचा विकास प्रथम झाला. चीनमधील नद्यांचा प्रदेश, इराणचें पठार व गंगायमुना प्रदेश यांचीहि गोष्ट अशीच आहे.

## शेतीचें प्राथमिक ज्ञान—

आज आपणांस जमीन नांगरून बीं पेरणें व त्याची जोपासना करून त्यास आलेलें पीक कापून व मळणी करून धान्याचा सांठा करणें ही गोष्ट अगदीं सुलभ वाटते. परंतु वीस हजार वर्षांपूर्वींच्या लोकांस या गोष्टी शिकण्यास बराच दीर्घ काळ लागला असावा. भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या प्रदेशांत एका जातीचे गहूं हें तृणधान्य रानटी अवस्थेंत आपोआप तयार होत असे. तसेंच आपल्या देशांत कांहीं ठिकाणीं देवभात हें स्वाभाविकपणेंच तयार होतांना आढळतें. हेंच गोळा करून मानव त्याचा उपयोग करीत असत. सर जे. जी. फ्रेजर यानें आपल्या 'गोल्डन बो' या ग्रंथांत असें प्रतिपादन केलें आहे कीं, पूर्वीं मृत मनुष्याबरोबर त्याच्या दैनिक आयुष्यक्रमांतील आवश्यक वस्तू पुरण्यांत येत असत. त्याबरोबर धान्यहि पुरण्यांत आल्यामुळें हें पुरलेलें धान्य रुजून त्यास कणसें येऊं लागलीं व अशा रीतीनें प्रथम शेतीची सुरुवात झाली. पुढें या कल्पनेवरून शेतीच्या आरंभीं म्हणजे बीं पेरण्याच्या वेळीं एक तरुण मानव पुरण्याची प्रथा पडली. यामुळें नरमेध व पेरणीचा हंगाम यांची सांगड जोडली गेली. अशा तऱ्हेचे यज्ञ वार्षिक करण्याचा प्रघात पडला आणि त्याकरितां कदाचित् सूर्य आणि तारे यांची आकाशांतील सापेक्ष स्थिति यांचा मेळ घालण्यांत आला असावा व याकरितां विशेषतः उष्ण हवेच्या प्रदेशांत सूर्यास महत्त्व येऊन त्याची उपासना करण्याचा संप्रदाय अस्तित्वांत आला असावा. अशा तऱ्हेची सूर्यपूजा जगांतील अनेक देशांत प्रचलित असलेली आपणांस आढळून येते. याकरितां या युगास सौर पाषाणयुग (हेलियोलिथिक संस्कृतियुग) असें नांव इलियट स्मिथ या ग्रंथकारानें दिलें आहे. अशा तऱ्हेची ही सूर्योपासनात्मक व कृषिकर्म आणि पशुसंवर्धनयुक्त संस्कृति पश्चिम आशिया खंडामध्यें कोठें तरी उत्पन्न होऊन तिचा प्रसार पूर्वेकडे पॅसिफिक महासागराच्या पलीकडेहि अमेरिका खंडांत व पश्चिमेकडेहि इतर खंडांत हळूहळू होत गेला. परंतु भूमध्यरेषेच्या दक्षिणेकडील आफ्रिका खंडामध्यें या संस्कृतीचा प्रसार झालेला आढळत

नाहीं, व तेथील लोक दीर्घकालपर्यंत रानटी अवस्थेंत असलेले दिसून येतात.

परंतु फ्रेजर यांची ही कल्पना ग्राह्य करण्याचें कारण नसून आम्हांस तर ती पूर्णपणें त्याज्य वाटते. कारण मृत मनुष्याबरोबर पुरण्यास तरी प्रथम धान्य कोठून उत्पन्न झालें ही गोष्ट शिल्लक राहतेच व खोल पुरलेलें धान्य उगवणाराहि नाहीं.

आजहि आपणांस जशीं कांहीं प्रकारचीं तृणें निसर्गतःच उत्पन्न होऊन त्यावर बीज उत्पन्न होतें ही गोष्ट दृष्टीस पडते त्याप्रमाणेंच गहूं, साळ, चार्ली, वगैरे धान्यें निरनिराळ्या प्रदेशांत प्रथम निसर्गतःच तृणबीजांच्या रूपानें प्रादुर्भूत होत असत. अशीं तृणबीजें आद्य मानवाच्या दृष्टीस पडून आपल्या देशांतील देवभाताप्रमाणें किंवा प्राचीन ग्रंथांत वर्णन केलेल्या नीवार या धान्याप्रमाणें मनुष्य हें तृणबीज गोळा करूं लागला व तेंच सहजगत्या ओल्या जमिनीवर पडून रुजून त्यास कणसें येऊं लागल्यामुळें त्यास त्या बीजाची लागवड करण्याची कल्पना सुचली असावी व याप्रमाणें धान्य उत्पादन करण्याची कल्पना जन्म पावली असावी. स्वित्झर्लंडमधील सरोगृहांत राहणाऱ्या लोकांस जेव्हां त्या तलावांतील पाणी आटत जाई त्या वेळेस तेथें तृण रुजून त्यास बीं येत असे ही गोष्ट प्रथम परिचित होऊन त्यामुळें त्यास धान्य पिकविण्याची कल्पना सुचली असावी.

स्वित्झर्लंडमधील एक सरोगृह १८५४ सालीं तेथें अवर्षण पडल्यामुळें आटून उघडें झालें होतें, त्यामुळें प्राचीन लोकांची अशा सरोवरात वस्ती कोणत्या तऱ्हेची असे हें प्रत्यक्ष दिसून आलें. या वस्तींत दगडाचीं व नंतर कांशाचीं हत्यारें, गहूं, चार्ली हीं धान्यें, तागाचें कापड, पाळीव पशूंचीं हाडें, वगैरे अनेक वस्तू सापडल्या आहेत.

याप्रमाणेंच नाइल नदीचा पूर ओसरल्यावर त्या ओल्या मळीच्या जमिनींत कांहीं प्रकारचीं तृणें उत्पन्न होऊन त्यांस बीज येतें ही गोष्ट ईजिप्ती लोकांच्या लक्षांत येऊन त्यांनीं हें बीज प्रथम गोळा करण्यास सुरुवात केली असावी, व कांहीं कालानंतर तें बीज स्वतः पेरून त्याचें अधिक बीज घेण्याची कल्पना त्यांस सुचली असावी व याप्रमाणें ईजिप्त देशांत गहूं व चार्ली हीं धान्यें उत्पादन करण्याची प्रथा सुरू झाली असावी. या गोष्टीचा पूर्वी उल्लेख केलाच आहे.

स्वित्झर्लंडांतील सरोगृहांत किंवा ईजिप्तमधील नाइल खोऱ्यांत धान्याच्या पेरणीचा व यज्ञाचा अथवा नरबलीचा संबंध कोठेंहि जोडलेला आढळत नाहीं. त्या अर्थी नरबली व धान्यपेरणी यांचा संबंध प्राचीन कालांत असावा हा तर्क तितकासा ग्राह्य नाहीं. तसेंच भरतखंडांतील प्रत्येक यज्ञविधीचा नरबलीशीं संबंध असतोच असें नाहीं; शिवाय निरनिराळे यज्ञ निरनिराळ्या कालीं करण्याची प्रथा भरतखंडांत आहे. भारतीयांस जर सूर्यासंबंधी कोणत्या कालाचें विशेष महत्त्व वाटत असलें तर तें उत्तरायणाच्या आरंभाचें होय. सूर्य उत्तरेकडे येऊं लागणें या गोष्टीस ते विशेष महत्त्व देत व मघा वगैरे नक्षत्रांत अग्न्याधान करीत त्या वेळीं पेरणीचा हंगाम नसे ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. तसेंच आज जरी कांहीं मानवसमाज संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंत असून विशिष्ट आचार पाळतात किंवा विशिष्ट समारंभ करतात असें आढळून आलें, तरी प्रत्येक मानवसमाज त्या त्या कल्पनांमधून किंवा अवस्थांमधून गेलेला असलाच पाहिजे असें अनुमान काढणें योग्य होणार नाहीं.



आजहि ऑस्ट्रेलियांतलि लोक अगदीं प्राथमिक अवस्थेंत आहेत. त्यांच्यामध्यें कोणतीच प्रगति झालेली नाहीं. तेव्हां ते इतर मानवसमाज ज्या अवस्थांतून गेले त्यांतून जाऊन प्रगत होतील असें मानणें योग्य होणार नाहीं; कारण टॅस्मॅनियन लोकांची मुळींच प्रगति न होतां ते नष्ट झाले ही गोष्ट आपणांस दिसत आहे. त्याप्रमाणेंच अमेरिकन इंडियन यांचीहि प्रगति होण्याची कांहीं आशा दिसत नाहीं. त्यामुळें आजच्या प्राथमिक अवस्थेंतील मनुष्यांच्या सामाजिक जीवनावरून व प्रगतिक्रमावरून आद्य मानवसमाजासंबंधीं अनुमानें काढतांना बरीच सावधगिरी बाळगणें जरूर आहे.

## पृथ्वीचा प्राथमिक मानवकालीन पृष्ठभाग—

ख्रि. पू. दहा हजार वर्षांपूर्वी पृथ्वीची भौगोलिक स्थिति जवळजवळ आजच्याप्रमाणेंच असावी. भूमध्यसमुद्राच्या पश्चिमेकडील टोंकाशीं पूर्वी एखादा बंधारा असून तो फुटल्यामुळें ॲटलांटिक महासागराचे पाणी आंत येऊन भूमध्यसमुद्राचें खोरें पाण्यानें भरून जाऊन सध्यांचा भूमध्यसमुद्र बनला असावा. कास्पियन समुद्र हा आतां दिसतो त्यापेक्षां बराच विस्तृत असून तो काळ्या समुद्राशीं जोडलेला व पूर्वेकडे बराच पसरलेला असावा. या समुद्राकाठीं असलेला आशिया खंडाचा प्रदेश त्या वेळीं अधिक सुपीक असावा. युरोपांतील रशियामध्यें दलदल असून आशिया व अमेरिका खंड बेहरिंग सामुद्रधुनीजवळ जोडलेलें असावें. तसेंच या वेळीं निरनिराळ्या प्रदेशांत आज आढळणाऱ्या मानवजातीहि स्थायिक झालेल्या असाव्या.

पृथ्वीच्या पूर्व गोलार्धांतील भूखंड अथवा जुनें जग म्हणजे आशिया, युरोप व आफ्रिका हीं तीन खंडें मिळून होणारा भूभाग बराच विस्तृत आहे. या भूभागामध्यें ख्रि. पू. ६ ते ७ हजार वर्षांच्या कालात आशिया खंडांतील सुपीक असलेल्या प्रदेशांत व नाइल नदीच्या सुपीक खोऱ्यांत सांस्कृतिक दृष्ट्या कांहींशी वाढ झालेली मानवजात वस्ती करून स्थायिक झालेली आढळून

येते. दक्षिण अमेरिकेंतील पेरू देशाचा प्रदेशहि जवळजवळ याच पट्ट्याच्या प्रदेशांत येतो. या कालामध्यें इराण, पश्चिम तुर्कस्तान व अरबस्तान हा भूभाग सध्यापेक्षां बराच अधिक सुपीक असावा आणि या प्रदेशांतील लोकांमध्यें संस्कृतीची बरीचशी वाढ झालेली असावी असें दिसून येतें. परंतु आपणांस मुख्यतः मेसापोटेमिया आणि ईजिप्त या दोन देशांमध्यें संस्कृतीची विशेष वाढ झालेली दिसून येते.

## सांस्कृतिक प्रगतीच्या अवस्था—

मानवाची सांस्कृतिक प्रगति ज्या अवस्थांतून व निरनिराळ्या पायऱ्यांनीं होत गेली त्याचें थोडेंसें दिग्दर्शन सारांशरूपानें करणें आवश्यक आहे. प्रथम निआंडर थाल मनुष्यानें विस्तव पेटविण्याच्या युक्तींचा शोध लावला अशी समजूत आहे. हें ज्ञान त्यास ज्वालामुखींतील अग्नि पाहून किंवा गारेवर गार आपटल्यानें ठिणगी पडलेली पाहून किंवा दुसऱ्या एखाद्या आकस्मिक प्रसंगानें झालें असावें. यानंतर त्यास हा विस्तव राखून ठेवण्याचें व तो मर्यादित क्षेत्रांत ठेवण्याचें ज्ञान झालें असावें. याप्रमाणें अग्नीचें ज्ञान झाल्यानंतर आपलें अन्न म्हणजे शिकारींत मिळालेलें मांस किंवा एखादें धान्य भाजून किंवा शिजवून कसें खावें याचें ज्ञान त्यास झालें असावें. अर्थात् धान्य शिजविण्यास एखादें पात्र पाहिजे यावरून त्यास मडकीं तयार करण्याची कला अवगत झाली असावी. यानंतर अग्नीच्या साहाय्यानें कांहीं धातू वितळतात ही गोष्ट त्याच्या नजरेस पडली असावी. प्रथम तांबें व कथील या लवकर वितळणाऱ्या अशा तऱ्हेच्या धातू त्यास आढळून आल्या. कालांतरानें तांबें आणि कथील यांचा संयोग होऊन कांसें ही नवीन धातु तयार होते ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली असावी. परंतु लोखंडाचा शोध त्यास बऱ्याच उत्तरकालीं लागला असावा.

## गुहावासी मानव—

थंडी व पाऊस यापासून स्वतःचें संरक्षण करण्याची आवश्यकता जेव्हां मनुष्यास वाटूं लागली तेव्हां त्यानें स्वाभाविकपणेंच पर्वतांतील गुहांचा आश्रय करण्यास सुरुवात केली असावी. विशेषतः अतिशय थंड प्रदेशांत मनुष्य गुहांच्याच आश्रयानें राहत असला पाहिजे. परंतु जेथें हवा फार थंड नसेल किंवा फार उष्ण नसेल अशा ठिकाणीं उघड्या जागांवरहि मनुष्यास वसति करतां येत असे. परंतु त्यास जीवनाची आवश्यकता असल्यामुळें तो पाण्याच्या आश्रयास राहत असे. अशा उघड्या जागेंतहि वाऱ्यापासून रक्षण करण्याकरितां तो झाडाच्या डहाळ्यांचें कूड करीत असे व ते प्रथम एकाच बाजूला आडोसा म्हणून लावीत असे. परंतु मागाहून झोंपडीप्रमाणें दोन्ही बाजूंस लावण्याची प्रथा त्यानें सुरू केली. या कुडांस तो मातीचा लेप देऊं लागला व त्यावरून भिंतीचीं त्यास कल्पना आली. तसेंच शिकारींत मारलेल्या प्राण्यांचीं कातडीं या कुडांच्याऐवजीं तो उपयोगांत आणूं लागला व याप्रमाणें राहुट्या अथवा तंबूची कल्पना उघड्या मैदानावर राहणाऱ्या लोकांमध्यें परिणत झाली.

## शिकार व पशुपालन—

अशा तऱ्हेनें मनुष्य वसति करून राहूं लागल्यानंतर त्यास अन्नाची आवश्यकता भासूं लागली. अर्थात् क्षुधेचें शमन करण्याकरितां प्रथम जे कोणतेहि पदार्थ त्यास मिळत गेले ते खाण्याचा त्यानें सपाटा लावला. त्यांत कृमि, कीटक, वन्यफळें, पक्ष्यांचीं अंडीं व पिलें, मासे, निरनिराळ्या झाडांचा पाला, मुळें व कांहीं मृत प्राण्यांचीं शवें तो भक्षण करूं लागला. प्रारंभीच्या कालीं मनुष्य रुचि अथवा स्वाद या बाबतींत फारसा चिकित्सक नव्हता, व जें हाताशीं मिळेल त्याचा तो फन्ना करून टाकीत असे. हळूहळू त्यास कांहीं आयुधें अथवा हत्यारें वापरण्याचें ज्ञान झालें व त्यांच्या साहाय्यानें तो शिकार करून कांहीं भक्ष्य मिळवूं लागला. कांहीं भक्ष्य तो फांस किंवा जाळीं यांच्या साहाय्यानेंहि मिळवीत असावा. अशा रीतीनें शिकार करून मारलेल्या भक्ष्यावर उदरनिर्वाह करीत असतां त्यास भक्ष्याचा साठा सतत मिळत राहावा याकरितां कांहीं पशूंचें पालन करून त्यांची वाढ करण्याची युक्ति माहीत झाली असावी, व अशा रीतीनें पशुपालनाचा व्यवसाय तो करूं लागला असावा. पाळीव पशूंचें मांस भाजून मनुष्य कसा खाऊं लागला यासंबंधीं एक कल्पना चार्ल्स लँब यानें डुकराचें मांस खाण्याचा प्रघात चिनी लोकांत कसा झाला यासंबंधीं एका चिनी मनुष्याच्या जळलेल्या झोंपडीची गोष्ट देऊन व्यक्त केली आहे.

## शिकारीच्या साधनांत सुधारणा—

क्रोमॅग्नन संस्कृतीच्या कालीं सामान्यतः मनुष्याची राहणी पुढें दिल्याप्रमाणें असावी. त्या वेळीं मनुष्य जमिनीखालीं तळघरासारखी खोल जागा करून व वर थोड्या दगडाच्या भिंती बांधून राहत असावा. त्या वेळीं तो शिकार करूनच उपजीविका करीत असावा. त्या वेळीं त्याचीं गारेचीं हत्यारें इतकीं उत्कृष्ट असत कीं, त्याची धार पोलादाच्या हत्याराइतकी तीक्ष्ण असे. त्यास खडू, गेरू कोळसा, वगैरे पदार्थांनीं दुसऱ्या पदार्थांवर रेघा ओढतां येतात हें माहीत झाल्यामुळें तो दगडावर किंवा आपल्या शरीरावर विशिष्ट आकृति काढूं लागला व रंगवूं लागला असावा. याच गोष्टीपासून चित्रकलेचा व शरीर रंगविण्याच्या कलेचा उगम झाला असावा. तसेंच हत्यारें तयार करण्याकरितां दगड घांसावे लागल्यामुळें त्यास शिल्पकलेचेंहि प्राथमिक ज्ञान झालें असावें व

त्यामुळें निरनिराळया प्रकारच्या दगडांची घडण व त्याचा ठिसूळपणा अगर घट्टपणा यांची माहिती त्यास झाली असावी. धनुष्य व बाण यांचेंहि ज्ञान मनुष्यास बहुधा याच कालांत झालें असावें.

यानंतरच्या कालांतील मनुष्यजातीमध्यें सुधारणेची अधिक प्रगति झालेली दिसून येते. त्यांचीं हत्यारें अधिक गुळगुळीत व तीक्ष्ण असत. हे लोक शिकारीवर फारसे विसंबून न राहतां शेळयामेंढ्या व गुरेंढोरें यांचें पालन करीत असत. घरें बांधण्याच्या कलेंतहि यांची अधिक प्रगति झालेली असून ते स्वित्झर्लंड देशात आढळणाऱ्या सरोगृहाप्रमाणें मोठमोठ्या तलावांत खांबावर घरें बांधून राहूं लागले असावे. पुढें पुढें पशुपालनाचा धंदाहि मागें पडून कृषिसंवर्धनाकडे त्यांचें अधिक लक्ष लागलें असावें. त्यांनीं कांहीं ठिकाणीं दगड उभे रचून देवाचीं मंदिरें रचल्याचें आढळून येतें. अशा मंदिरास 'स्टोनहेंज' असें म्हणतात. अशीं मंदिरें युरोपमध्यें बऱ्याच ठिकाणीं आढळून येतात. अशा एका मंदिरानें (सिल्बरी हिलजवळ ॲव्हबरी) २८ एकर जागा व्यापलेली आढळून येते. अर्थात् या कालांत मनुष्य एकत्र जमावानें राहत असला पाहिजे व कांहीं गांवें वसलीं असलीं पाहिजेत. या कालात मनुष्य ओबडधोबड कापड विणून वापरीत असे, व कांहीं भांडींहि घडवीत असे.

## मानवांतील कलह व युद्धें—

याप्रमाणें मनुष्य जमाव करून राहूं लागल्यानंतर या निरनिराळ्या जमावांमध्यें अथवा टोळ्यांमध्यें परस्पर आक्रमण होऊन युद्धें होऊं लागलीं असावीं. या युद्धामध्यें अर्थातच जेते लोक जित लोकांस पशूप्रमाणें पकडून नेऊं लागले असावेत व त्यांच्याकडून पशूप्रमाणेंच काम करून घेऊं लागले असावेत. अशा या युद्धापासूनच एका जातीस अथवा जमावास दुसऱ्या जमावावर जय मिळवून त्यावर आपली सत्ता प्रस्थापित करण्याची बुद्धि उत्पन्न झाली असावी व अशा रीतीनेंच राज्यें व राष्ट्रें निर्माण झालीं असावीं. शासन-संस्थेचा उदय या पद्धतीनेंच झाला असावा ही गोष्ट आपणांस निरनिराळ्या राष्ट्रांच्या इतिहासाकडे विहंगमावलोकन केलें असतांहि सहज दिसून येते. उदाहरणार्थ, तैग्रिस आणि युफ्रेटिस या दोन नद्यामधील दुआब-म्हणजे मेसापोटेमिया हा प्रांत-याकडे पाहिलें असतां आपणांस एक जित व जेते यांची मालिकाच दृष्टीस पडते ती अशी: सुमेरियन-नंतर ॲमोराइट, नंतर ॲसिरियन, अरब, मिडीयन, पर्शियन, मॅसिडोनियन, पार्थियन, मंगोलियन, सेल्जुक, तार्तार व अखेरीस तुर्क याप्रमाणें या प्रदेशांत एकापाठोपाठ एक एक जेते लोक होऊन गेले. हीच गोष्ट आपणांस नाइल नदीच्या खोऱ्याकडे पाहिलें असतां दिसून येते. तेथें ईजिप्ती लोकांवर हिक्सॉस, सेमाइट, न्यूबियन, पर्शियन, ग्रीक, रोमन, अरब, तुर्क व इंग्रज हे अनुक्रमानें विजेते असलेले आढळून येतात. इटली देशाकडे लक्ष दिल्यास तेथें आपणांस इट्रस्कन, रोमॅनोटथ्यूटन, रामन, ऑस्ट्रोगॉथ, लॉंचर्ड, फ्रँक, व जर्मन अशीं राष्ट्रें एकामागून एक आढळतात. गॉल प्रांतामध्यें रोमन, फ्रँक, बर्गंडियन व नॉर्मन हे एकामागून एक सत्ताधारी झाले. स्पेनमध्यें कार्येजिनियन, रोमन, व्हँडॉल, व्हिसिगॉथ व अरब यांनीं एकामागून एक सत्ता चालविली. ब्रिटनमध्यें प्रथम केल्ट, नंतर सॅक्सन व अखेरीस नॉर्मन हे सत्ताधारी झाले. हिंदुस्थान, चीन व अमेरिका यांचाहि इतिहास पाहूं गेलें असतां आपणांस हीच गोष्ट आढळून येते. यावरून आपणांस शासन-संस्थेच्या उदयामध्यें पुढील अवस्था दिसून येतात. जेव्हां मनुष्य केवळ शिकार करून उपजीविका करीत असे त्या वेळीं तो प्रथम आपल्या जित शत्रूला ठार मारून टाकीत असे. त्यानंतर मनुष्य पशुपालन करून राहूं लागला; त्या वेळीं तो आपल्या पशूंचे कळप घेऊन त्यांस चारण्याकरितां इतस्ततः भ्रमण करूं लागला. अशा वेळीं त्यास जे शत्रू उत्पन्न होत त्यांस जिंकल्यावर तो ठार न मारतां पकडून गुलाम करूं लागला व त्यांजकडून काम करून घेऊं लागला. यानंतर स्थिर वस्ती करून राहिल्यावर शत्रूंचे प्रदेश जिंकून त्या प्रदेशांतील लोकांसह त्या प्रदेशावर मनुष्यांचा एक समूह दुसऱ्यावर सत्ता प्रस्थापित करूं लागला व याप्रमाणें राज्यें निर्माण झालीं. अर्थात् हीं राज्यें प्रथम लुटारू लोकांनींच स्थापन केलीं. जमिनीवरील लुटारूंप्रमाणें समुद्रावरील लुटारू अथवा चांचे लोकांनीं आपली समुद्रावर किंवा कांहीं बंदरांमध्यें राज्यें स्थापन केलीं. याप्रमाणें या राज्यस्थापनेमध्यें पुढें दिलेल्या निरनिराळ्या पायऱ्या आढळून येतात: १ केवळ लूट करणें; २ अंशतः लूट करून प्रदेश ताब्यांत ठेवून सतत लूट करीत राहणें; ३ जित लोकांपासून नियमितपणें खंडणी वसूल करणें; ४ जित लोकांच्या प्रदेशांतच जाऊन वस्ती करून राहणें; ५ जेत्यानें स्वतःला राजा म्हणवून जित व जेते या दोन्ही लोकांवर राज्य करणें; ६ जित व जेते दोन्ही समाज एकाच प्रदेशांत पण जित व जेते या नात्यानें दोन्ही समाज एकत्र मिसळून राहणें.

याप्रमाणें मानवाची प्रगति हळूहळू होत जाऊन तो नद्यांच्या आसमंतात् सुपीक प्रदेशांत कृषि व पशुपालन करून राहूं लागल्यानंतर त्यांत हळूहळू संस्कृतीचा विकास होऊं लागला. अशीं मानव-वसाहतीस योग्य स्थलें म्हणजे नाइल नदीचें खोरें व मुखप्रदेश, तैग्रीस-युफ्रेटीसमधील दुआब, यांगत्सी नदीचें खोरें, इराणचें पठार व गंगा-यमुनांचा दुआब हे होत. यांपैकीं प्रथम

आपण नाइल नदीच्या प्रदेशाचें म्हणजे ईजिप्त देशाचें अवलोकन करूं.

### ईजिप्तची सुपीक भूमि—

आपण जर ईजिप्त देशामध्यें नाइल नदीच्या मुखाकडून आंत प्रवास करूं लागलों तर आपणांला दोन्ही बाजूंस उंच टेकड्या दिसूं लागतील. या टेकड्या सहारा वाळवंटाच्या असून त्यामधून नाइल नदी आपल्या रुंद खोऱ्यातून दक्षिणेकडून उत्तरेकडे वाहत येत आहे. हें खोरें सुमारें अधिकात अधिक ३० मैल रुंद असून त्यामध्यें १० मैलांची एक मळई जमिनीची पट्टी पसरलेली आहे. व तिच्या दोन्ही बाजूंस सहारा रणाची वाळू पसरलेली आहे. एकदां हें सर्व सहाराचें वाळवंट जलमय असून सर्वत्र मोठ्या अरण्यानें व्यापलेलें होतें. या जंगलातून पाषाणयुगांत शिकारी लोक आपलें भक्ष्य मिळविण्याकरितां सर्वत्र संचार करीत फिरत होते. प्रागैतिहासिक काळांत हे शिकारी लोक सिसिली बेटाच्या भूमय पुलावरून युरोपमध्येंहि जात-येत असावेत. अर्वाचीन लक्सॉर या गांवच्या आसपास त्यांचीं दगडी हत्यारें अद्यापहि पडलेलीं आढळून येतात व त्यांतील कांहीं पाण्याच्या प्रवाहाबरोबर खालीं गाळात वाहून आलेलीं दृष्टोत्पत्तीस येतात. हे शिकारी प्रथम पठारावर राहत होते. परंतु पुढें ते नाइल नदीच्या खोऱ्यात खालीं येऊन वस्ती करून राहिले. त्यांचे अवशेष अद्यापहि जमिनीच्या खालीं ३० फूट खोलीपर्यंत गाळाखालीं बुजलेले आढळून येतात. इतका गाळ जमा होण्यास सुमारें १५ ते १८ हजार वर्षे लागलीं असावींत.

या लोकांच्या भूपृष्ठाखालीं आढळणाऱ्या अवशेषांवरून असें दिसून येतें कीं, नाइल नदीच्या कांठीं आल्यावर त्यांनीं आपला शिकारी जीवनक्रम सोडून पशुपालन व कृषिकर्म या वृत्तींचा अंगीकार केला असावा. तसेंच त्यांनीं आपल्या शेतीकरितां पाण्याचे पाट काढले असावे. कारण या पाटांचे अवशेष अद्यापहि जमिनीखालीं खोदलें असतां आढळून येतात. यांच्या कृषिमय जीवनक्रमास साधारण ख्रि. पू. ६,००० वर्षांच्या सुमारास आरंभ झाला असावा.

### ईजिप्तमधील स्मशानभूमि—

या प्राथमिक लोकांनीं कृषिमय जीवनास प्रारंभ केल्यानंतर आपलीं प्रेतें या मळीच्या जमिनीच्या पलीकडील वाळवंटांत पुरून टाकण्याची प्रथा अवलंबिली असावी. अशा तऱ्हेच्या त्यांच्या स्मशानभूमी ज्या उंच स्थळीं होत्या व ज्या बऱ्याच अर्वाचीन कालापर्यंत चालू होत्या त्यावर अद्यापहि फारशी गाळाची माती पसरलेली नाहीं व सन १८९५ पासून अलीकडे अशा तऱ्हेच्या पुष्कळच कबरी शोधून काढून उकरून काढण्यात आल्या आहेत. आपणांस आजहि वाळवंटाच्या काठावर हजारों मातीचे उंचवटे दिसून येतात. या उंचवट्यांखालीं नाइल नदीच्या खोऱ्यांत राहणाऱ्या लोकांच्या पूर्वजांचीं प्रेतें पुरलेलीं आढळून येतात. अशा तऱ्हेचीं हजारों प्रेतें उकरून काढण्यांत आलेलीं आहेत व त्याच्या शरीररचनेवरून ते लोक भूमध्य-सामुद्रिक वंशातीलच असावेत असें दिसून येतें. अशा तऱ्हेच्या प्राथमिक मनुष्याच्या कबरींमध्यें मातीचीं मडकीं आणि दगडाचीं हत्यारें प्रेताबरोबर पुरलेलीं आढळतात. त्यावरून ६,००० वर्षांपूर्वीं या लोकांस धातूंची माहिती नसून ते दगडाचींच हत्यारें वापरीत असत असें दिसून येतें. या पुरलेल्या मडक्यांतून गहूं व बार्लीचे दाणे आढळून येतात. यावरून हीं दोन धान्यें अगदीं प्राथमिक अवस्थेतील मनुष्य पिकवीत असावे असें दिसून येतें. या धान्याप्रमाणेंच तागाचें कापडहि अशा थडग्यांत आढळून आलें आहे. नाइल नदीच्या दोन्ही बाजूंस आजहि आढळून येणाऱ्या कच्च्या मातीच्या विटांच्या घरांवरून ६,००० वर्षांपूर्वीं हे लोक कोणत्या तऱ्हेच्या घरांत राहत असावे याची कल्पना येते.

### लेखनकलेची उत्पत्ति—

अशा खेड्यांत एक मुख्य असून त्याच्या ताब्यांत सर्व पाण्याचे पाट असत व तो आपल्या गांवांतील शेतींत होणाऱ्या उत्पन्नाचा हिस्सा आपला भाग म्हणून कररूपानें घेत असे. हा कर दिल्याबद्दलच्या खुणा प्रत्येक मनुष्य आपल्या झोंपडीवर करून ठेवीत असे व हें धान्य टोपल्या भरून देण्यांत येत असल्यामुळें टोपलीचें चित्र व त्याशेजारीं जितक्या टोपल्या दिल्या असतील तितक्या रेघा काढलेल्या आढळून येतात. अशा तऱ्हेच्या खुणांची भाषा आजहि आपणांस अमेरिकन इंडियन लोकांत व अलास्कासारख्या प्रदेशात आढळून येते. अशा तऱ्हेच्या चित्रांवरून प्रत्यक्ष शब्द नसले तरी कल्पना व्यक्त करतां येतात व अशा तऱ्हेची चित्रांची भाषा अमेरिकन इंडियन लोकांत आजहि प्रचलित आहे. यानंतर प्रत्येक खूण एक विशिष्ट शब्दवाचक बनली. उदाहरणार्थ, पानाचें चित्र काढलें असतां तें चित्र 'पान' असें वाचतां येऊं लागलें. बैलाचें चित्र काढलें कीं बैल हा शब्द लिहिलेला समजूं लागला. याप्रमाणें शब्दवाचक खुणा प्रचारांत आल्या. परंतु ईजिप्शियन लोक याच्याहि पुढें एक पायरी जाऊन त्यांनीं या खुणा वर्णवाचक बनविल्या. उदाहरणार्थ, जर पान ही खूण पान या शब्दाऐवजीं 'प' हा, वर्ण दाखवणारी बनली व बैल ही खूण 'ब' वर्णवाचक बनली व घर ही खूण 'घ' वाचक बनली तर आज जसें आपण लहान मुलांस गवतांतील 'ग', नळांतील 'न',

घरांतील 'घ' असे वर्ण शिकवितों त्याप्रमाणें त्या त्या वस्तूंचीं चित्रें म्हणजे त्या त्या वर्णांच्या खुणा बनतात. अशा तऱ्हेनें ईजिप्ती भाषेंत निरनिराळीं २४ चित्रें हीं २४ आद्य वर्णांचीं वाचक बनलीं व याप्रमाणें ईजिप्ती वर्णमाला तयार झाली. परंतु हे वर्ण केवळ व्यंजनवाचक असून फक्त 'अ' हा एकच स्वर या भाषेंत आहे व 'य' आणि 'व' हे दोन अर्धस्वर आहेत. त्यांचाच उच्चार ई आणि ऊ सारखा करूं लागले व अंचाच अ व ए सारखा करूं लागले. हे वर्ण ते पापीरस नांवाच्या लव्हाळयाच्या पट्टयांवर लिहूं लागले, व त्यापासूनच पेपर हा कागदवाचक शब्द बनला. याप्रमाणें ईजिप्तमध्यें अत्यंत प्राचीन काळीं लेखनकलेची उत्पत्ति झाली.

### चित्रलिपीचें वाचन—

ही ईजिप्तमधील चित्रलिपि हजारों वर्षें अज्ञात राहिली. पुढें नेपोलियननें ईजिप्तवर स्वारी केली त्या वेळीं त्यास रोझेटा येथें एक शिला सांपडली. तीवर ईजिप्ती चित्रलिपींत, पुरोहिती लिपींत व ग्रीक लिपींत एकच लेख खोदलेला होता. यापैकीं ग्रीक भाषा व लिपि ज्ञात असल्यामुळें तीवरून शांपोलियन नांवाच्या फ्रेंच शास्त्रज्ञानें एका स्तम्भावरील टॉलेमी व क्लिओपात्रा या नांवातील वर्णांचें वाचन प्रथम करून नंतर ईजिप्ती वर्णमालेचें वाचन केलें व याप्रमाणें ईजिप्ती लेखांचें भांडार सर्व जगास खुलें करून दिलें. यापुढें अमर्ना येथील सांपडलेल्या विटांवर खोदलेल्या राजकीय पत्रव्यवहारावरून ईजिप्त देशाच्या इतिहासावर व राज्यकारभारावर पुष्कळच प्रकाश पडला. याप्रमाणेंच ईजिप्तमधील भव्य देवळांत कोरलेल्या लेखांवरून त्या देशावर होऊन गेलेल्या पराक्रमी राजांच्या पराक्रमाचें ज्ञान जगास झालें. तेव्हां लेखनकलेचें ज्ञान जगास करून देणारे व वर्णमाला तयार करणारे पहिले लोक ईजिप्ती होत ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. कारण लेखनकला ही सर्व ज्ञानाचा उगम आहे.

### कालगणना—

यानंतर या लोकास कालगणना करणें अवश्य वाटूं लागलें. प्रथम ते कालगणनेचें परिमाण म्हणून एका अमावस्येपासून दुसऱ्या अमावास्येपर्यंत म्हणजे चंद्राच्या पूर्णास्तावरून महिन्याचें परिमाण धरून कालगणना करूं लागले, परंतु पुढें त्यांस चान्द्रमहिना हा २९ किंवा ३० दिवसाचा असतो हें आढळून येऊन त्यावरून वर्षाचे बरोबर विभाग करतां येत नाहींत ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली. तेव्हां त्यांनीं प्रत्येक महिना ३० दिवसाचा ठरवून वर्षाच्या अखेरीस ५ दिवस उत्सवसमारंभाचे म्हणून ठरवून टाकले व चांद्रवर्षगणना सोडून देऊन सौरवर्षगणना स्वीकारली. ही कालगणना ईजिप्तमध्यें खिस्तपूर्व ४२४१ सालीं सुरू झाली. त्यानंतर त्यास महिन्याप्रमाणेंच विशिष्ट वर्षे दाखविण्याची जरूरी भासूं लागली. तेव्हां त्यांनीं प्रत्येक वर्षास त्या वर्षांत घडून आलेल्या विशेष प्रसंगावरून विशिष्ट नाव देण्याची पद्धति सुरू केली, अशी पद्धति अमेरिकन इंडियन लोकांत अद्यापहि प्रचलित आहे व आपणहि अद्यापि दुर्गादेवीच्या दुष्काळाचें वर्ष किंवा महायुद्धाचें पहिलें वर्ष अशा तऱ्हेनें उल्लेख करतों. अशा तऱ्हेच्या वर्षांच्या नांवांच्या याद्या जतन करून ठेवण्याची प्रथा होती. अशा तऱ्हेची एक यादी सिसिली बेटांत पालेर्मो येथें असलेल्या एका दगडावर खोदलेली आढळते. तींत खिस्तपूर्व ३४०० पासून २७०० पर्यंत म्हणजे ७०० वर्षांचीं नांवें आहेत. यानंतर ईजिप्ती लोकांनीं प्रत्येक राजाच्या राज्यारोहणापासून कालगणना सुरू करण्याची म्हणजे राजशकाची पद्धत अमलांत आणली. ही पद्धत हिंदुस्थानांत जे निरनिराळे शक सुरू झाले त्यांमध्यें अनुसरलेली आपल्या दृष्टीस पडतेच. या लोकांनीं आकाशाचे बारा राशींत विभाग केले होते व त्यांवरून महिन्यांस नांवें देत असत. पण राशिविभाग त्यांनीं असीरियन लोकांपासून घेतले असावे.

### तांब्याचा शोध व धातुयुगाचा उदय—

या सुमारास ईजिप्तमधील लोकास सिनाई द्वीपकल्पांत खिस्तपूर्व ४००० वर्षांच्या सुमारास तांब्याचा शोध लागला. हा शोध प्रथम कदाचित् तंबूसमोर पेटविलेल्या शेकोटीमध्यें तांब्याची अशुद्ध धातु वितळून लालभडक तांबें दृष्टीस पडून लागला असावा. याप्रमाणें प्रथम त्यांस धातूंचा उपयोग करण्याची कला अवगत झाली. ज्या वेळीं युरोप खंड हिमयुगांत गुरफटलेलें होतें त्या वेळीं ईजिप्तमध्यें धातुयुग सुरू झालें होतें. या लोकांस सोनें या धातूचीहि माहिती होती. मात्र रुप्याचा शोध त्यांस नंतर लागल्यामुळें ते चांदीस पांढरें सोनें असें म्हणत.

### ईजिप्तमधील मनोरे—

ईजिप्तमधील प्रवाशास प्रामुख्यानें दृष्टीस पडणारी मुख्य गोष्ट तेथील उंच मनोरे ऊर्फ पिरामिड होत. हे मनोरे तत्कालीन राजांच्या शवांवर बांधलेलीं थडगीं होत. या थडग्यांवरून ही गोष्ट स्पष्ट होते कीं, ईजिप्ती लोकांचा मरणोत्तर जीवनावर विश्वास होता व मरणोत्तर आयुष्य क्रमण्याकरितां शरीराचा नाश न होऊं देतां तें सुरक्षित ठेवणें त्यांस आवश्यक वाटत होतें. याकरितां प्रेत सुरक्षित राहावें म्हणून थडगीं बांधण्यांत येत असत, व या कल्पनेपासूनच प्रेतांमध्यें रासायनिक मसाला भरून त्यांचें रक्षण करण्याची कला जन्मास आली. एका राजाच्या थडग्याभोंवतीं अनेक थडगीं आढळतात. तीं त्याच्या

दरबारांतील मोठमोठ्या लोकांचीं असत. या थडग्याचा उर्फ मनोऱ्याचा ख्रि. पू. चार हजारपासून तीन हजारपर्यंतचा इतिहासहि अभ्यासण्यासारखा आहे. प्रथम मोठ्या खड्डयांत प्रेत पुरून वर कंकर टाकून वाळूचा ढीग करण्यांत येत असे. नंतर खड्डयाच्या बाजू कच्च्या विटांनीं बांधण्यांत येत. नंतर विटांऐवजीं दगड वापरूं लागले व वरहि दगड रचूं लागले. मग त्यांस पायऱ्या करूं लागले व शेवटीं निमुळत्या बाजूचीं आजचीं पिरामिडें तयार झालीं. गिझे येथील मोठा मनोरा बांधला जाण्यापूर्वी १५० वर्षे हेच लोक मातीच्या विटाचे मनोरे बांधीत असत व त्यावर वाळू आणि कंकर यांचा ढीग रचीत असत. त्यानंतर दगडी मनोरे बांधण्याची प्रथा सुरू झाली. सर्व जगांतील पहिल्या दगडी इमारती म्हटल्या म्हणजे ईजिप्तमधील राजांचीं थडगीं होत. अशा तऱ्हेचीं थडगीं बांधणारा पहिला शिल्पकार इमहोतेप या नांवाचा होऊन गेला. तो झोसेर राजाच्या पदरीं ख्रिस्तपूर्व ३,००० च्या सुमारास होता. यानें बांधलेला मनोरा दगडी असून पायऱ्या पायऱ्यांचा आहे, व तो पायऱ्यांचा मनोरा म्हणूनच प्रसिद्ध आहे. याचा ब्राँझचा पुतळा बर्लिन म्यूझियममध्यें आहे. यानंतर ख्रिस्तपूर्व २९०० च्या सुमारास गिझे येथील सर्वांत मोठा प्रचंड मनोरा बांधला गेला. या मनोऱ्यानें १३ एकर जमीन व्यापली असून त्याला २३ लक्ष चुनखडीचे दगड लावण्यांत आले आहेत. यांपैकीं प्रत्येक दगड २॥ टन वजनाचा आहे. याच्या तळाची प्रत्येक बाजू ७५५ फूट लांब आहे. हिरोडोटस या आद्य इतिहासकारानें हा मनोरा बांधण्यास १ लक्ष माणसें २० वर्षें काम करीत होतीं असें लिहिलें आहे. हें थडगें ज्या राजाकरितां बांधण्यांत आलें तो मोठा पराक्रमी असून त्याच्या हाताखालीं हजारों लोक असले पाहिजेत. हा सर्वांत प्रचंड मनोरा खुफू (ग्रीक-चिऑप्स) या नांवाच्या राजाचा असून त्याच्याच शेजारीं त्याच्या खालोखाल खफ्रा अथवा केफ्रेन नांवाच्या राजाचा मनोरा आहे व तिसरा मनोरा मेनकौरा अथवा मायसेरिनस नांवाच्या राजाचा आहे.

### मनोऱ्यांचा काल—

तत्कालीन राजांनीं म्हणजे ख्रि. पू. ४००० ते ३००० या कालांत एक कायद्यांचा संग्रहहि तयार केला होता असें दिसतें. त्या वेळीं करवसुली नाण्याच्या रूपानें होत नसून प्रत्यक्ष वस्तूंच्या रूपानें होत असे. त्यामुळें राजाच्या खजिन्यांत धान्य, पशू, मद्य, मध, कापड, वगैरे वस्तू येत असत व हीं भरून ठेवण्याकरितां मोठालीं कोठारें बांधावीं लागत असत. प्रत्यक्ष राजाकरितां एक मोठा राजवाडा असून त्याच्याभोंवतीं मोठमोठे बगीचे असत. नंतर त्यासभोंवतीं अधिकाऱ्यांच्या इमारती असत व त्यांसभोंवतीं लोकांची वस्ती असून एक मोठें नगर वसलेलें असे. या काळास 'पिरामिड किंवा मनोऱ्यांचा काळ' असें म्हणतात. या वेळीं ईजिप्तचा राजा बलाढ्य असून तो आपल्या देशाबाहेरूनहि संपत्ति मिळवून आणीत असे. त्या वेळीं दूरदेशास पाठविण्यांत येणाऱ्या मोठमोठ्या गलबतांचीं चित्रें आपणांस कांहीं थडग्यांतून कोरलेलीं किंवा रंगांत काढलेलीं पाहावयास सांपडतात. ख्रि. पू. २८ व्या शतकांत बांधल्या गेलेल्या सर्वांत जुन्या गलबताचें चित्र आपणांस एका देवळाच्या भिंतीवर दृष्टीस पडतें. या राजांच्या ताब्यांत सिनाई द्वीपकल्पांतील तांब्याच्या खाणी असत. तसेंच ते मोठमोठाले गाढवांचे तांडे किंवा कारवान नाइल नदींतून सूदान देशांत व्यापाराकरितां पाठवीत असत व तेथून एबनी लांकूड, हस्तिदंत, शहामृगाचीं पिसें व सुगंधी ऊद, वगैरे माल आणीत असत. या कारवानांबरोबर जाणारे अधिकारी नवीन नवीन प्रदेशाचा शोध लावीत असत. अशाच तऱ्हेनें निरनिराळ्या देशांचा माल आणण्याकरितां तांबडा समुद्र व भूमध्य समुद्र यांतून गलबतें पाठविण्यात येत असत.

ईजिप्तमधील थडग्यांतून जे निरनिराळे देखावे चित्रित केलेले आहेत त्यांवरून तत्कालीन आयुष्यक्रमाची बरीचशी माहिती उपलब्ध होते. त्यांमध्यें आपणांस शेतकरी बीं पेरतांना व जमीन नांगरतांना दृष्टीस पडतो. तसेंच कांहीं लोक कुदळी घेऊन खणीत असलेले आढळतात. यावरून कुदळीपासून तिचाच दांडा लांब होऊन नांगर कसा बनला असावा तें दिसून येतें. कांहीं चित्रांत निरनिराळ्या प्रकारचीं गुरेंढोरें दृष्टीस पडतात व गाईचें दूध काढीत असतांना दिसून येतात. ओझ्याचे पशू म्हणून बैल व गाढवें यांचा उपयोग केलेला आढळतो. त्यांस कोंबड्यांचीं वगैरे अंडीं कृत्रिम रीतीनें उबवण्याची कलाहि अवगत होती असें दिसतें. तांब्याच्या निरनिराळ्या वस्तू करण्यामध्यें पुष्कळच कौशल्य दृष्टीस पडतें. एका पिरामिडमधील देवळामध्यें पाव मैल लांबीची तांब्याची नळी पाण्याकरितां वापरलेली आढळून येते. दगडाचींहि निरनिराळीं पात्रें खोदून तयार केलेलीं आढळतात. यांपैकीं एक पात्र तर इतकें पातळ आहे कीं, त्यांतून सूर्यप्रकाश पलीकडे जाऊं शकतो. त्या वेळीं सुवर्णकाराची कलाहि पुष्कळच प्रगत झाली होती असें एका चित्रावरून दिसून येतें. त्यांस सोनें गाळणें माहीत होतें. व त्यांचे कांटे बरेच सूक्ष्म असावे. कुंभाराचें चाक व त्यानें मातीपासून तयार केलेलीं अनेक भांडीं अशाच एका चित्रांत आढळून येतात व तीं भाजण्याकरितां बांधलेल्या भट्ट्यांचींहि चित्रें दृष्टीस पडतात. राजवाड्यांच्या भिंतीस कांचेचा मुलामा दिलेलीं कवलें आढळतात. त्याप्रमाणेंच

अनेक रंगाच्या कांचेच्या बाटल्या व पात्रें बाहेरदेशीं पाठवलीं जात असावीं असें दिसतें. तत्कालीन स्त्रिया मागावर उत्तम कापड विणीत असत. अशा तऱ्हेचें कापड एका राजाच्या ममी-भोंवतीं गुंडाळून ठेवलेलें आढळून आलें आहे. तें इतकें तलम आहे कीं, सूक्ष्मदर्शक कांचेतून पाहिल्याशिवाय तें रेशमाहून भिन्न आहे ही गोष्ट लक्षांत येत नाहीं. राजाच्या राजवाड्यांत टांगण्याकरितां चित्रें विणलेल्या झालरीहि तयार करण्यांत येत असत. एका चित्रांत गलबतें बांधण्याचा कारखाना चित्रित केलेला आढळतो तर दुसऱ्या एका चित्रांत सुतारकामाचा कारखाना थाटलेला दिसतो. त्यामध्यें राजा व श्रीमंत लोक यांच्याकरिता खुर्च्या व कोच तयार करण्यांत येत असून त्यावर सोनेरी व रुपेरी काम केलेलें दिसतें. व त्यांत हस्तिदंत व एबनी यांचें खचकाम असून दर चामड्याच्या गाद्या तयार केलेल्या दिसतात. नाइल नदीवर इतस्ततः फिरत असलेलीं गलबतें व होड्या चित्रित केलेलीं आढळतात. तसेंच कांहीं ठिकाणीं बाजार वगैरेचींहि चित्रें असून त्यांत निरनिराळ्या वस्तूंचा परस्पर विनिमय होत असलेला दिसतो. या काळांत नाणीं प्रचलित नसल्यानें प्रत्यक्ष वस्तूंची देवघेव होत असे व क्वचित् प्रसंगीं सोन्याच्या किंवा तांब्याच्या ठराविक वजनाच्या आंगठ्या देण्याघेण्यांत येत असत.

या वेळीं ईजिप्ती लोकांत कांहीं लोक स्वतंत्र असून ते उद्योगधंदे करीत असत व कांहीं लोक गुलाम असून ते मोठ्या लोकांचीं कामें करीत असत. यांच्यावरचा वर्ग म्हणजे जमीनदारांचा असून त्यामध्यें राजाचे अधिकारी व उमराव येत असत. या मोठ्या लोकांच्या थडग्यांतून त्यांच्या व्यवसायासंबंधींचीं चित्रें काढलेलीं आढळून येतात.

या लोकांत वैद्यकीचें ज्ञानहि बरेंच वाढलें होतें असें दिसतें. अस्थिभंग झाला असतां अस्थि सांधण्याची कला त्यांस अवगत होती. तत्कालीन एक वैद्यक ग्रंथहि उपलब्ध आहे.

## ईजिप्तचा धावता इतिहास—

ईजिप्त देशाचा सर्व प्राचीन इतिहास येथें विस्तारानें देण्यास अवकाश नाहीं. तथापि त्याचें सामान्य स्वरूप दिग्दर्शित करावयाचें म्हणजे असें सांगतां येईल कीं, फार प्राचीन कालापासून म्हणजे ख्रिस्तपूर्व सहा हजार वर्षांपासून अलेक्झांडरच्या स्वारीपर्यंत तेथील शिल्पकामें, देवळें, इमारती, थडगीं, वगैरे व त्यामध्यें आढळणारे लेख, चित्रें, साधनें, साहित्य, वगैरे आणि अशाच थडग्यांतून आढळणारीं पापीरसचीं भेंडोळीं किंवा कांहीं ठिकाणीं आढळणारे इष्टिकालेख यांवरून हा इतिहास सुसूत्रतेनें लावण्यासारखी आज परिस्थिति आहे. अर्थात् येथें हा सर्व विस्तार देणें शक्य नाहीं.

ईजिप्तच्या प्राचीन इतिहासाचे मुख्यतः ठळक असे तीन काल-विभाग पडतात. त्यांतील पहिल्या कालविभागास 'जुनें राज्य' किंवा पिरामिडयुग म्हणतात, दुसऱ्या काल-विभागास 'सरंजामी' (फ्यूडल) काल म्हणतात व तिसऱ्या काल-विभागास 'नवीन साम्राज्य'काल संबोधण्यांत येतें.

या तीन काल-विभागांत ईजिप्तमध्यें अनेक राजघराण्यांनीं सत्ता स्थापन केली व त्यावरून कालाची विभागणी किंवा गणना निरनिराळ्या घराण्यांवरून करण्यांत येते. प्राचीन ज्ञात कालापासून अलेक्झांडरनें ख्रि. पू. ३३२ मध्यें ईजिप्त देश जिंकीपर्यंत एकंदर ३० राजघराणीं होऊन गेलीं.

पहिल्या जुन्या राज्याच्या कालांत एकंदर चार राजघराणीं होऊन गेलीं. त्यांपैकीं पहिल्या घराण्याचा संस्थापक मेनीस याची राजधानी मेंफीस येथें होती व यानें खालच्या व वरच्या ईजिप्तचें एकीकरण केलें. त्यानंतर चौथ्या घराण्यांत प्रसिद्ध मनोरे बांधणारे तीन राजे होऊन गेले.

चौथ्या घराण्यापासून पंधराव्यापर्यंत ईजिप्तमध्यें अन्तर्गत युद्धें व कलह चालू होते. यासच सरंजामी काल म्हणतात. या कालांत फक्त पेपी दुसरा हा महत्त्वाचा राजा होऊन गेला. यानें नव्वद वर्षें म्हणजे सर्वांत दीर्घकाल राज्य केलें. याच्या वेळचे बरेच लेख व इमारती उपलब्ध आहेत.

यानंतर हिक्सॉस या नांवाच्या पशुपालक लोकांनीं ईजिप्तवर स्वारी करून सोळाव्या घराण्याची स्थापना केली. यांनीं आपल्या सेथ या देवतेची उपासना सुरू केली.

यानंतर नूतन साम्राज्य-कालांतील अठरावें घराणें विशेष वैभवशाली होतें असें दिसतें. हिक्सॉस लोकांस अहमोसी यानें घालवून दिलें. त्यानंतर थाथमीस नांवाचे तीन राजे झाले. त्यांपैकीं तिसरा फार पराक्रमी होता. यानें आपलें साम्राज्य इथिओपियापासून युफ्रेटीसपर्यंत विस्तृत केलें. याच्याप्रमाणेंच अमेनोफीस तिसरा हाहि पराक्रमी राजा होऊन गेला. या दोन राजांनीं फार मोठीं बांधकामें केलीं. अमेनोफीस तिसरा यानें लक्सॉरची स्थापना केली व कर्णक येथेंहि बरींच बांधकामें केलीं तेल एल अमर्ना येथें सांपडलेल्या इष्टिका लेखांवरून या राजांचा बाबिलोनियन व हिटाइट राजांशीं चाललेला पत्रव्यवहार ज्ञात होतो.

यानंतर एकोणिसाव्या राजघराण्यांतील रामेसीस दुसरा यानें ६७ वर्षें राज्य केलें व अनेक भव्य देवळें व इमारती बांधल्या. याच्या कारकीर्दीत मोझेस ईजिप्तमध्यें होता. बाविसाव्या

घराण्यांतील शीशक अथवा शशांक यानें सालोमनचें देऊळ लुटून टाकलें (ख्रि. पू. ९३०). यानंतर पंचविसावें घराणें एका इथिओपिअन विजेत्यानें स्थापन केलें. त्याचा अंत ख्रि. पू. ६७० मध्यें झाला. यानंतर बाबिलोनियाचे राजे तिग्लथपिलेसर, सार्गन दुसरा, पिलेसर तिसरा व सेनाचेरीब यांनीं ईजिप्तवर अमल बसविला.

सव्विसाव्या घराण्यांतील सामेटिकस पहिला (ख्रि. पू. ६६४–६००) यानें ईजिप्तची सत्ता पुन्हा प्रस्थापित केली व नेको दुसरा यानें सीरिया प्रांत व युफ्रेटीस नदीपर्यंत आपल्या सत्तेचा विस्तार केला. परंतु नेबुचाडनेझर दुसरा यानें हा प्रदेश पुन्हां जिंकून घेतला व या वेळीं दुसऱ्या नेकोला यहुदी लोकांनीं मदत केल्यामुळें नेबुचाडनेझरनें यहुदी लोकांस जेरुसलेम शहराचा नाश करून बाबिलोन येथें कैदी करून नेलें.

ख्रि. पू. सहाव्या शतकांत इराणी लोकांनीं खाल्डिया जिंकल्यावर लवकरच ईजिप्त देशहि पादाक्रांत केला. ईजिप्ती लोकांनीं पुन्हां बंड करून साठ वर्षें आपलें स्वातंत्र्य पुन्हां मिळविलें, परंतु ख्रि. पू. ३३२ मध्यें अलेक्झांडरनें ईजिप्तवर आपला अमल बसवून व अलेक्झांड्रिया शहराची स्थापना करून आपला सेनापति टॉलेमी याची येथें स्थापना केली. यानंतर ईजिप्त देशावर प्रथम ग्रीक, नंतर रोमन व त्यानंतर अरब लोकांची सत्ता प्रस्थापित झाली. त्यानंतर तुर्क व त्यांचेमागून इंग्रज लोकांची सत्ता येऊन अलीकडेच ईजिप्तनें आपलें स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलें आहे.

पिरामिड युगांत आपणांस फार थोडे लेख दगडावर कोरलेले आढळून येतात; परंतु सरंजामी काळांतील उमरावांचे मोठमोठे लेखसंग्रह त्यांच्या थडग्यांतून सांपडले आहेत. हे लेख पापीरसच्या गुंडाळ्यांच्या रूपानें असून मोठमोठ्या बरण्यांत ठेवलेले आढळतात. त्यांमध्यें अनेक गोष्टी वर्णन केलेल्य दृष्टीस पडतात. उदा.,—एका ठिकाणीं तांबड्या समुद्राच्या पलीकडे केलेल्या सफरीची व तेथें गलबत फुटून एका ओसाड जागीं लागलेल्या माणसाची कथा दिसून येते. कांहीं लेखांतून गरीब लोकांचीं दुःखें वर्णन केलेलीं आढळतात. या वेळीं लोकांच्या धार्मिक कल्पनांतहि वाढ झालेली दृष्टीस पडते. पिरामिड युगांत फक्त सूर्यदेवतेची रे या नांवानें उपासना चालू असे व ऑसिरिस या नांवाखालीं नाइल नदीची सर्व सृष्टीच्या व निसर्गाच्या उत्पत्तीचें मूळ म्हणून उपासना चालू होती. परंतु सत् व असत्, चांगलें व वाईट या दोन्ही गोष्टींवर ईश्वराची सत्ता चालते अशी कल्पना या काळांत उद्भूत झाली नव्हती. ऑसिरिस ह्या निसर्गदेवतेवर रचलेलें एक नाटक आढळतें. हें जगांतील आद्य नाटक होय. कांहीं लेखांतून गाणीं व काव्यें आढळतात. एका पद्यांत दररोज प्रभातकाळीं फॅरोची करावयाची स्तुति चित्रित केली आहे. याच काळांत लिहिलेल्या एका वैद्यकीय ग्रंथाची हिक्सॉसकालीन प्रत उपलब्ध आहे. या वैद्यकीय ग्रंथांत शस्त्रकला आणि वैद्यक यांची माहिती असून डोक्यापासून पाठीच्या कण्यापर्यंतच्या शरीराविषयीं यांत वर्णन आढळतें. त्यांत मेंदू व मज्जातंतू यांचीं कार्यें वर्णन केलेलीं असून मेंदूपासून सर्व मज्जातंतूंस चालना मिळते असें लिहिलें आहे. कांहीं लेखांतून अंकगणित, प्राथमिक बीजगणित व भूमितीच्या प्राथमिक कल्पना, उदा., वृत्तचिति व अर्धगोल यांचें घनफळ काढण्याची रीत वर्णन केलेली आहे. आकाशांतील गोलांचें वर्णन व कांहीं निरीक्षणाचीं साधनेंहि वर्णन केलीं आहेत. या लोकांस तारे आणि ग्रह यांतील फरक ठाऊक होता. आकाशाची १२ राशींत विभागणी ही कल्पना ईजिप्तमध्यें जन्म पावलेली नसून ती त्या लोकांस अज्ञात होती. तत्कालीन राजे कांहीं वर्षांच्या अंतरानें शिरगणति करून त्यावरून कर ठरवीत असत. अशा शिरगणतीचे कांहीं कागद आज उपलब्ध आहेत. या राजांनीं मोठमोठे बांध घालून नाइल नदीचें पाणी कालव्यांकरितां साचवून ठेवण्याची तजवीज केली होती. नदीचा पूर किती चढतो हें प्रतिवर्षी मोजून त्याच्या दगडावर खुणा करून ठेवण्यांत येत असत व अशा खुणा आजहि दृष्टीस पडतात.

## ईजिप्तचा परदेशी व्यापार—

तत्कालीन राजे आपलीं गलबतें संपत्ति मिळविण्याकरितां दूर देशास पाठवीत असत. ईजियन् समुद्रांतील क्रीटसह बहुतेक सर्व बेटांवर त्यांचा ताबा आहे. नाइल नदी तांबड्या समुद्रास जोडणारा एक कालवा त्यांनीं खोदला होता. यांतून तांबड्या समुद्रांतील गलबतें नाइल नदींतून भूमध्यसमुद्रांत नेतां येत असत व याचप्रमाणें भूमध्यसमुद्रांतील गलबतें तांबड्या समुद्रांत नेतां येत असत. या वेळीं ईजिप्तच्या फॅरो राजानें एक खडें सैन्य ठेवलें होतें व त्याच्या योगानें पॅलेस्टाइन व न्यूबिया यांच्यावर आपला अमल बसविला होता. दुसऱ्या धबधब्याजवळ त्यांनीं बांधलेले कांहीं किल्ले अद्याप उभे आहेत. या राजांची सत्ता ख्रिस्तपूर्व १८०० पर्यंत टिकली. सरंजामी काळांतील राजांनंतर ईजिप्त देशावर आशियांतील हिक्सॉस नांवाच्या लोकांनीं स्वारी करून १ शतकभर राज्य केलें. त्यानींच ईजिप्त देशांत प्रथम घोडे आणले. यानंतर साम्राज्यकालास आरंभ झाल्यावर प्रथम जीं नगरराज्यें होतीं त्यांचींच पुढें राष्ट्रें बनलीं व त्या राष्ट्रांचें मिळून साम्राज्य बनलें. हें साम्राज्य ख्रिस्तपूर्व १६ व्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंत टिकलें.

या काळांतील अत्यंत भव्य स्मारक म्हणजे कर्णक येथील

भव्य देवालय होय. हें थिबीस या शहरांत बांधलेलें होतें. साम्राज्यकाळांत थतमोस तिसरा हा एक बलाढ्य राजा होऊन गेला. यानें ख्रिस्तपूर्व १५०० पासून १४४७ पर्यंत सुमारें ५० वर्षें राज्य केलें. यानें २० वर्षें चालविलेल्या युद्धांचें वर्णन तेथील देवळांत खोदलेलें आहे. या युद्धांत यानें पश्चिम आशियांतील अनेक राज्यें अंकित केलीं व एक मोठें आरमार पाठवून ईजिप्तन समुद्रावर आपली सत्ता बसविली. या राजाची सावत्र आई हाटशेपसूत याबरोबर गादीवर होती. हिनें थिबीस येथें एक भव्य देवालय बांधलें आहे व कर्णक येथील देवालयांत दोन एकसंध पाषाणांचे स्तंभ उभे केले होते. हिनें आपलीं पांच गलबतें पंट येथें पाठवून या देवळाकरितां पुष्कळ साहित्य आणिलें होतें. ही फार कर्तबगार स्त्री होती.

### कर्णक येथील भव्य स्मारकें—

या काळांत ईजिप्तमध्यें आशिया व न्यूबिया या देशांतून द्रव्याचा मोठा प्रवाह चालू होता. याची साक्ष कर्णक येथील भव्य स्तंभांच्या देवळावरून प्रत्ययास येते. हे स्तंभ ६९ फूट उंच असून प्रत्येक स्तंभाच्या माथ्यावर १०० लोक उभे राहूं शकतात. असे १३४ स्तंभ या देवळांत असून त्याच्या महाद्वाराची रुंदी ३६० फूट आहे. हे स्तंभ रंगीत असून या देवळाच्या भिंतींवर निरनिराळीं चित्रें खोदून त्यांत निरनिराळे रंग भरलेले असत. या देवळापुढें राजांचे एवढे भव्य पुतळे उभे केलेले असत कीं, ते अनेक मैलांवरून दिसत असत व हे सर्व एकाच दगडाचे बनविलेले असून त्यांचें वजन १,००० टनांपर्यंत असे. तथापि हे पुतळे शेंकडों मैल अंतरावरून आणलेले असत. ॲमेनहोतेप तिसरा याचे असे २ भव्य पुतळे थिबीस येथें पलीकडील तीरावर अद्याप उभे आहेत. दुसऱ्या धबधब्याजवळ असलेल्या देवळांत ९० फूट उंचीचे चार अवाढव्य पुतळे आहेत. हीं देवळें पाहावयास येणाऱ्यांनीं आपलीं नांवें कोरून ठेवलीं आहेत. त्यांत एक ग्रीक नांव ख्रि. पू. ७ व्या शतकांतलें आहे.

या देवळासभोंवतीं या राजाच्याबरोबर जे अधिकारी स्वाऱ्यांवर किंवा राज्यकारभारांत असत त्यांचीं थडगीं आहेत. या थडग्यांमधून त्यांच्या आयुष्यांतील विविध प्रसंग चित्रित केलेले आहेत व त्यांवरून आपणांस तत्कालीन आयुष्यक्रमाची कल्पना येते. विशेषतः तत्कालीन समाजाचें ज्ञान करून घेण्यास हीं अधिकाऱ्यांच्या किंवा जमीनदारांच्या थडग्यांतील चित्रेंच अधिक उपयुक्त आहेत व त्यांतील कांहीं स्वाभाविक रंगांमध्यें काढलेलीं आहेत. या चित्रांवरून त्यांच्या ऐहिक आयुष्यक्रमाप्रमाणेंच पारमार्थिक कल्पनांचीहि अटकळ बांधतां येते. थडग्यांतून ऑसिरिस या देवतेपुढें होणाऱ्या मरणोत्तर न्यायाच्या कल्पनेचें चित्र काढलेलें आढळतें. प्रत्येक मृत मनुष्याच्या शवाबरोबर 'मृतांचें पुस्तक' या नांवाचा ग्रंथ पुरलेला आढळतो. व त्यावरून तत्कालीन मरणोत्तर कल्पना व्यक्त होतात. एका मोठ्या कबरीमध्यें सव्वा एकर खडकाचा पृष्ठभाग शिल्पकामांनीं व्यापला आहे.

### पहिला एकेश्वरी संप्रदाय—

ॲमेनहोतेप तिसरा याच्यानंतर त्याचा मुलगा ॲमेनहोतेप चौथा हा गादीवर आला. त्या वेळीं ईजिप्तचें साम्राज्य फार दूरवर पसरल्यामुळें त्यास एका राष्ट्राच्या पलीकडील सार्वराष्ट्रीय कल्पना आकलन करतां येऊं लागली. यामुळें ते आपल्या राजास व रे या देवतेस जागतिक देवता मानूं लागले. याच वेळीं प्रथम एकदेवत्वाची कल्पना जन्म पावली. ॲमेनहोतेप चौथा हा या दृष्टीनें फार महत्त्वाचा राजा होऊन गेला. एक जग व एक देव ही कल्पना त्यानें प्रथम प्रसृत करून इतर देवतांस गौण स्थान दिलें व याकरितां आपलें नांव बदलून ॲमेनहोतेप याऐवजीं इखनअतोन असें नवें नांव धारण केलें, अतोन या नांवाखालीं एकाच सूर्यदेवतेची उपासना आपल्या सर्व साम्राज्यांत चालू केली, थिबीस ही राजधानी सोडून अमर्नो येथें नवी राजधानी स्थापन केली, आणि सर्वत्र जुन्या देवतांचीं व राजांचीं नांवें खोडून काढलीं. याची स्त्री नोफ्रेती हिनें हिटाइट राजपुत्रास आमंत्रण केलें होतें. हिचा पुतळा अमर्नो येथें एका शिल्पकाराच्या कलागृहांत सांपडला. परंतु तत्कालीन लोकांच्या कल्पना त्याच्याइतक्या प्रगत व व्यापक नसल्यामुळें ॲमॉन देवतेच्या उपासकांनीं व पुरोहितांनीं त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या सर्व कार्याचा नाश करून उलट प्रत्येक स्मारकावरील त्याचें नांव खरडून टाकलें.

### ईजिप्तचा राज्यकारभार—

अमर्नो येथें तत्कालीन लेखांचा म्हणजे कच्च्या विटांवरील खुणांचा मोठा संग्रह सांपडला आहे. त्यावरून त्या वेळच्या राज्यकारभाराची व साम्राज्याची कल्पना येते. या लेखांत परकीय राजांनीं पाठविलेला पत्रव्यवहार आहे. इखनअतोननंतर त्याचा जावई तुतंखअतोन हा गादीवर आला. परंतु त्याच्या कारकीर्दींत पुरोहितांनीं वर उल्लेखिल्याप्रमाणें केलेल्या बंडामुळें त्यास आपल्या सासऱ्याचें सर्व कार्य मोडून काढून स्वतःचें नांव तुतंखअतोन हें बदलून तुतंखॲमन असें ठेवावें लागलें. व ॲमन देवतेची पूजा सर्वत्र पुन्हां सुरू झाली. याच तुतंखॲमनचें थडगें १९२२ मध्यें हॉवर्ड कार्टर यानें लॉर्ड कारनॉर-

ऱ्हॉन याकरितां शोधून काढून उघडलें. त्यामध्यें सांपडलेल्या अनेक वस्तूंवरून तत्कालीन ईजिप्ती लोकांच्या आयुष्यक्रमाची उत्तम कल्पना येते व तत्कालीन कलांची वाढ किती झाली होती हें प्रत्ययास येतें.

### ईजिप्त साम्राज्याचा अंतकाल—

थिबीस येथील देवळांच्या भिंतींवरील चित्रांवरून तत्कालीन साम्राज्याच्या इतिहासाची बरीच स्पष्ट कल्पना येते. या वेळीं एका नवीन राजवंशाची कारकीर्द सुरू होती. या वंशात सेती पहिला व त्याचा पुत्र रॅमसीस दुसरा हे राजे बलाढ्य होऊन गेले. त्यांनीं ईजिप्शियन राज्य टिकविण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु त्यांस हिटाइट लोकांस सीरियामधून घालवून देणें अशक्य झालें. कारण त्यांच्याजवळ लोखंडाचीं हत्यारें असत व ईजिप्शियन लोकांस ब्रॉंझ धातूपेक्षां अधिक बळकट धातु माहीत नव्हती. हिब्रू लोकांचा छळ करण्याबद्दल रॅमसीस दुसरा हाच प्रसिद्ध आहे. याच्या मुलाच्या कारकीर्दींत हिब्रू लोक ईजिप्त सोडून गेले. रॅमसीसनें हिटाइट राजकन्येशीं विवाह केला होता. यानें रॅमेसियम नांवाचें एक देऊळ बांधलें व कर्णक येथील देऊळ वाढविलें व आपल्या पराक्रमाबद्दल लेख कोरविले. ग्रीक लोक यास सेसोस्ट्रीस असें म्हणत. शीशक राजानें आपली राजधानी बुबास्टीस येथें केली. या वेळीं ईजिप्ती सैन्यामध्यें परकी लोकांचा बराच भरणा असे. यावरून ईजिप्तमधील लोक आपल्या राष्ट्राचें संरक्षण करण्यास असमर्थ होत चालल्याचें दिसून येतें. यानंतर हळूहळू ईजिप्ती साम्राज्याचा लोप होत चालला व त्या देशावर परकीयांचें आक्रमण सुरू होऊन पुढें तो पूर्णपणें परकीयांच्या हस्तगत झाला. तथापि ईजिप्तच्या तिसाव्या घराण्यानें कांहीं काल पुन्हां आपलें वर्चस्व ईजिप्तवर स्थापन केलें. ईजिप्तवर पहिलें आक्रमण असुर बनिपाल यानें केलें. त्यानंतर दुसरें सायरसचा पुत्र कंबायसीस यानें केलें व कांहीं काल इराणची सत्ता ईजिप्तवर स्थापन झाली. या सत्तेचा पाडाव अलेक्झांडरनें केला व अलेक्झांड्रिया शहराची स्थापना करून तेथें आपला एक सेनापति टॉलेमी याच्या हातांत सत्ता दिली. अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर हा टॉलेमी स्वतंत्र होऊन त्याच्या घराण्यानें सुमारें तीनशें वर्षें राज्य केलें. त्यानंतर रोमन लोकांनीं हा प्रदेश जिंकला व रोमन साम्राज्यापासून अरबांनीं इसवी सनाच्या ६४० या वर्षीं ईजिप्त देश काबीज केला.

ईजिप्ती लोकांनीं आपल्या राज्यांत चांगली व्यवस्था ठेवली होती व चांगले कायदे केले होते. बौसेट यानें असें म्हटलें आहे कीं, ईजिप्तनें पद्धतशीर व चांगल्या राज्यकारभाराचा पायंडा घातला. त्या वेळीं व्यापार व व्यवहार पद्धतशीर रीतीनें चालू होते व अनेक व्यवहारांबद्दल अलीकडे कागद सांपडले आहेत. कोणत्याहि रकमेवर दामदुपटीपेक्षां अधिक व्याज आकारतां येत नव्हतें.

आतांपर्यंत जगामध्यें ज्या अत्यंत प्राचीन संस्कृति विकास पावल्या त्यांपैकीं एकीचें म्हणजे नाइल नदीच्या खोऱ्यांतील संस्कृतीचें आपण विहंगमावलोकन केलें. आतां अशाच तऱ्हेची व इतकीच प्राचीन अशी दुसरी संस्कृति जी तैग्रीस व युफ्रेटीस या दोन नद्यांच्या दुआबांत फार प्राचीन कालापासून संवर्धित होत होती तिच्याकडे लक्ष देऊं.

### आशियांतील प्राचीन मानवसंस्कृति—

आपण जर आशिया खंडाच्या नकाशाकडे दृष्टि टाकली तर आपणांस असें दिसून येईल कीं, या खंडाच्या मध्यभागीं एक मोठें पठार आहे. याच पठारावर अत्यंत प्राचीन काळीं मानवाची उत्पत्ति होऊन त्यानें त्या भागांत वसाहत केली होती. परंतु कांहीं कालानें तेथें अतिशय हिमवर्षाव होऊन त्या ठिकाणीं वस्ती करून राहणें अशक्य झालें. तेव्हां त्या पठारावरील लोक दक्षिण दिशेकडे भ्रमण करूं लागले. ही मानवांची वस्ती कॉकेशस पर्वताच्या माथ्यावर किंवा त्याच्यासभोंवतीं असल्यामुळें या मानवजातीस कॉकेशसवंशी मानव असें संबोधण्यांत येतें. या वंशांतील लोकांचे निरनिराळे समूह निरनिराळ्या दिशांकडे भ्रमण करीत गेले. बहुधा या लोकांपैकींच एक शाखा पूर्व दिशेकडे जाऊन मंगोलिया व चीन देशांत वस्ती करून राहिली. तेथील हवामानामुळें व प्रदेशाची उंची आणि प्रखर सूर्यप्रकाश इत्यादींमुळें त्यांच्या शरीरांत, चेहऱ्यांत व डोळ्यांत इतका फरक पडला कीं, त्यांस एक स्वतंत्रच मानववंश मानण्यांत येऊं लागलें, व त्यांस मंगोलाइड अशी संज्ञा देण्यांत आली. या कॉकेशिअन वंशांतील मानवांची एक शाखा वायव्येकडे जर्मनी, स्वीडन, नॉर्वे, वगैरे देशांकडे भ्रमण करीत गेली. या शाखेंतील लोकांस पुढें नॉर्डिक, स्कँडिनेव्हियन, वगैरे नांवें प्राप्त झालीं. पुन्हां या कॉकेशिअन वंशाच्या उत्तर व दक्षिण अशा दोन शाखा पडल्या. त्यांपैकीं दक्षिणेकडील शाखा दक्षिण दिशेकडे भ्रमण करीत गेली. व या शाखेपासूनच उत्तरकालीं भूमध्यसामुद्रिक शाखा निर्माण झाली. या शाखेपैकींच कांहीं लोक ईजिप्तमध्यें वस्ती करून राहिले व त्यांनीं नाइल नदीच्या खोऱ्यांत एक स्वतंत्र संस्कृति निर्माण केली. तिचें वर्णन पूर्वी केलेंच आहे. या श्वेतवर्णी लोकांपैकींच कांहीं लोक कदाचित् फार प्राचीन काळीं अधिक दक्षिणेकडे भ्रमण करीत गेले असावे व तेच आफ्रिकेंतील कृष्णवर्णी लोकांचे पूर्वज असावे. मात्र तेथील राहणी व हवामान या गोष्टींचा त्यांच्या शरीरावर परिणाम होऊन ते कृष्णवर्णी बनले

असावे व सांस्कृतिक प्रगतींतहि मागें राहिले असावे असें मानवशास्त्रज्ञांचें मत आहे. या दक्षिण कॉकेशिअन शाखेंतील कांहीं लोक आशियाच्या पश्चिम भागांतून दक्षिणेकडे भ्रमण करीत गेले व ते दीर्घ कालापर्यंत भ्रमणवृत्तींतच राहिले. यांसच सेमेटिक वंश असें नांव पडलें. यानंतर उत्तर कॉकेशिअन लोकांची एक शाखा पूर्वेकडे इराण व हिंदुस्थान या देशांत भ्रमण करीत जाऊन स्थायिक होऊन राहिली. या शाखेस इंडो-इराणी व इंडो-आर्यन अशीं नांवें देण्यांत येतात. उत्तर कॉकेशिअन लोकांचीच दुसरी एक शाखा पश्चिमेकडे भ्रमण करीत गेली तीस इंडो-युरोपियन असें म्हणतात व तीपासून ग्रीक व रोमन या लोकांच्या शाखा निघाल्या. याप्रमाणें मूळ मानववंशापासून निरनिराळ्या मानवशाखा निर्माण होऊन त्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं वस्ती करून आज भिन्न भिन्न नांवानें प्रचलित असलेल्या संस्कृती निर्माण केल्या. या गोष्टीचा ऊहापोह पूर्वी केलाच आहे व त्यांपैकीं ईजिप्त देशांतील नाइल नदीच्या खोऱ्यांत निर्माण झालेल्या संस्कृतीचें वर्णन वर दिलेंच आहे. आतां तशाच दुसऱ्या एका संस्कृतीचें वर्णन देण्यात येत आहे.

### तैग्रीस-युफ्रेटीस संस्कृति—

आपण पूर्वी पाहिलेंच आहे कीं, प्राथमिक अवस्थेंत मनुष्याची प्रवृत्ति केवळ भक्ष्य गोळा करण्याकडे असे व त्यामुळें त्यास दूर दूर भ्रमण करावें लागे. अशा वृत्तींत राहणाऱ्या लोकांस जंगलाचा आश्रय करणें भाग पडत असे. परंतु जंगलापासून दूर अथवा सपाट प्रदेशांत आल्यावर त्यांस भ्रमणवृत्तीनें भक्ष्य मिळवणें कठिण होऊं लागलें. यामुळें त्यांची भक्ष्य उत्पादन करण्याकडे प्रवृत्ति होऊं लागली व त्याकरितां अवश्य ते श्रम करण्याची साहजिकच प्रवृत्ति झाली. तसेंच त्यांच्या ठिकाणीं संग्राहक वृत्ति निर्माण झाली व तीमुळें अडचणीच्या वेळीं भक्ष्य मिळावें म्हणून ते भक्ष्य पदार्थांचा संग्रह करूं लागले. याच प्रवृत्तींतून पशुपालन व कृषिकर्म या वृत्तींची उत्पत्ति झाली. ज्या दिवशीं शिकार मिळणार नाहीं त्या दिवशीं भूक शमविण्याकरितां पाळलेले पशू उपयोगी पडूं लागले व ज्या दिवशीं गोळा केलेलें धान्य किंवा कंदमुळें, फळें, वगैरे उपलब्ध होणार नाहींत त्या वेळीं उत्पादन केलेल्या धान्याचा संग्रह उपयोगी पडूं लागला व अशा रीतीनें या दोन प्रवृत्ती बळावत चालल्या व त्यांस आनुषंगिक अशा इतर वस्तूंची निर्मिति व संग्रह हीं वाढत गेलीं. अर्थात् पशुपालन अथवा कृषिकर्म यास पहिली आवश्यक गोष्ट म्हणजे पाणी हें होय. पाणी हें सर्व प्राणिमात्रांचें जीवन आहे. याकरितां पशुपालनास पाणी व कुरणें आवश्यक असतात. त्याप्रमाणेंच कृषिकर्मासहि पाणी व सुपीक जमीन हीं आवश्यक असतात. यामुळेंच मानवसमाज स्थायिक होऊन सुसंस्कृत होण्यास पाणी व सुपीक जमिनीची आवश्यकता असते, व या दोन गोष्टी एखाद्या मोठ्या नदीच्या खोऱ्यातच उपलब्ध होतात. त्यामुळें आतांपर्यंत ज्या ज्या ठिकाणीं संस्कृतीची प्रगति होत आली आहे तीं सर्व ठिकाणें नदीच्या खोऱ्यांतच वसलेलीं आहेत.

### सुपीक अर्धचंद्र—

यापैकीं नाइल नदीच्या खोऱ्यांत जी संस्कृति संवर्धित झाली तिची माहिती वर दिलीच आहे. आतां आपण तैग्रीस व युफ्रेटिस या नद्यांच्या दुआबाकडे वळूं. आपण जर पश्चिम आशियातील आशिया मायनर या प्रदेशाकडे दृष्टि दिली तर आपणांस भूमध्यसमुद्राच्या पूर्वेकडे पॅलेस्टाइन देशापासून सुरू होऊन सीरिया देशाच्या सीमेपर्यंत गेल्यावर पूर्वेकडे मेसापोटेमियापासून बाबिलोनियापर्यंत एक अर्धचंद्राकृति जमिनीचा पट्टा दिसतो. यास 'सुपीक अर्धचंद्र' असें म्हणतात. हा सर्व प्रदेश गवतानें आच्छादिलेल्या कुरणांनीं युक्त असून पशुपालनास व कृषिजीवनास अत्यंत अनुकूल असा आहे. त्यापैकीं विशेषतः तैग्रीस आणि युफ्रेटीस या नद्यांमधील दुआब फारच सुपीक आहे. म्हणूनच त्यास ग्रीक भाषेत मेसापोटेमिया असें नांव मिळालें आहे. या शब्दाचा अर्थ पाण्यामधील प्रदेश म्हणजे दुआब असा आहे. आज तैग्रीस आणि युफ्रेटीस या नद्या इराणी आखातापासून सुमारें १७० मैलांवर संगम होऊन इराणी आखातास मिळतात. परंतु ख्रिस्तपूर्व ४,००० वर्षांच्या सुमारास इराणी आखात पुष्कळच जमिनींत दूरवर गेलें असून त्यास या दोन नद्या स्वतंत्र मुखांनीं मिळत असत. परंतु गेल्या ४,००० वर्षांत त्या नद्यांतून वाहून येणाऱ्या गाळानें इराणचें आखात सुमारें १७० मैलांइतकें मागें हटलें आहे. यामुळें त्या दोन नद्यांमधील प्रदेश सर्व मळीचा बनलेला असून तो किती सुपीक असेल याची कल्पना येईल.

### सुमेरियन—

वर उल्लेखिलेल्या सुपीक अर्धचंद्राच्या पश्चिमेकडील टोंकाकडील भागांत म्हणजे पॅलेस्टाइन देशांत हिब्रू लोक येऊन राहण्याच्या पूर्वी सेमाइट वंशांतील कॅननाइट नावाच्या लोकांची वस्ती होती. यांच्या उत्तरेकडे ॲमोराइट हे लोक वसले होते. व उत्तर सीरियाच्या भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावरील भागांत फिनिशियन लोकांची वस्ती होती. यानंतर तैग्रीस व युफ्रेटीस या नद्यांच्या खोऱ्यांत व त्या नद्यांच्या मुखाजवळ बाबिलोनिया या नांवाचा प्रदेश होता व त्या प्रदेशांत ईजिप्तप्रमाणेंच अत्यंत प्राचीन काळीं एक मैदान असून

त्या सपाट मैदानास शिनार असें नांव होतें. हें मैदान अत्यंत सुपीक अशा गाळाच्या मातीचें बनलें होतें. या प्रदेशांत भूमध्यसामुद्रिक प्रदेशाप्रमाणें हिंवाळ्यांत फक्त पाऊस पडत असे व तो इतका अल्प असे कीं, वर्षांतून त्याचें प्रमाण ३ इंचांवरहि जात नसे. यामुळें तेथें धान्य पिकविण्याकरितां पाण्याचे पाट बाधावे लागत. परंतु अशा पाटाखालीं केलेली शेती अतिशय सुपीक असे. यामुळें या शिनार मैदानांतील लोकांची मुख्य संपत्ति म्हणजे शेती हीच होती. या शिनार मैदानांत राहणारे लोक सेमेटिक शाखेचे नसून कॉकेशिअन श्वेत वंशाचे होते. ख्रिस्तपूर्व ३,००० वर्षांपूर्वीच या मैदानावर सुमेरियन लोकांनीं आक्रमण करून तें व्यापून टाकलें. या लोकांस पाटबंधारे बांधण्याची कला अवगत असल्यामुळें त्यांनीं शेतीच्या योगानें आपली बरीच प्रगति करून घेतली. ते मुख्यतः गहूं व बार्ली हीं धान्यें पिकवीत. हे लोक ज्या पाभरीनें बीं पेरीत असत तिचें चित्र एका मातीच्या मुद्रेवर कोरलेलें आढळून आलें आहे तें आजकालच्या तिफणीहून फारसें भिन्न दिसत नाहीं. यावरून त्यांनीं शेतीच्या अवजारांच्या बाबतींत किती प्रगति केली होती तें दिसून येतें. शेतीबरोबरच ते गुरेंढोरें, मेंढ्या व बकरे पाळीत असत. ते बैल नांगराला जुंपीत व गाढवांचा उपयोग ओझें वाहण्याला करीत. नद्यांच्या वरच्या बाजूच्या लोकांशीं व कदाचित् नाइल नदीच्या खोऱ्यांतील लोकांशींहि त्यांचा व्यापार चालत असे व त्यांच्याकडून त्यांस तांबें ही धातु मिळत असे. परंतु त्यांस ब्राँझ ही धातु करण्याची कला माहीत नव्हती. व्यापार व राज्यकारभार याकरितां त्यांस लेखनकलेची आवश्यकता भासूं लागली व त्याकरितां त्यांनीं मातीच्या ओल्या विटांवर खुणा करून लिहिण्याची पद्धति उपयोगांत आणली. या लेखनकलेची प्रगति शब्दांतील पदें निरनिराळीं लिहिण्यापर्यंत झाली होती. परंतु प्रत्येक वर्ण किंवा अक्षराकरितां स्वतंत्र चिन्ह वापरण्याची कल्पना ईजिप्तमधील लोकांप्रमाणें यांस सुचली नाहीं. परंतु त्यांच्या या लिपींत लिहिलेले अनेक लेख आज उपलब्ध झाले असून त्यांवरून त्यांच्या राहणीची पूर्ण कल्पना येते. हिशोबाकरितां त्यांस कालगणनेचीहि आवश्यकता होती. त्याकरितां त्यांनीं चांद्रमासाचा अवलंब केला व ते हा महिना अमावास्येपासून अमावास्येपर्यंत मोजीत असत.

## सुमेरी कालगणना—

चांद्रमासामुळें बारा महिन्यांचें वर्ष सौर वर्षाच्या मानानें कमी पडत असे. याकरितां ते तीन वर्षांत एक अधिक महिना आपल्याप्रमाणेंच धरीत असत. चांद्र महिन्याची व वर्षाची कालगणनापद्धति ज्यू व मुसलमान लोकांनीं तशीच अद्यापि चालू ठेवली आहे. ईजिप्ती लोकांप्रमाणें हे लोकहि प्रत्येक वर्ष संख्येनें न दाखवितां विशिष्ट नांवानें दाखवीत असत. याची अंकपद्धति एकम्, दहम् नंतर शतम् ऐवजीं साठ या क्रमानें असे. तसेंच विभाजनपद्धति षष्ठिमानात्मक असे. त्यामुळें ते प्रत्येक गोष्टीची विभागणी ६० मध्यें करीत असत व यामुळें वर्तुळाचे विभाग ६० या संख्येनें करून प्रत्येक अंशाच्या पुन्हां ६० कला व विकला मानीत. तसेंच प्रत्येक तासाचीं ६० मिनिटें व प्रत्येक मिनिटाचे ६० सेकंद ही विभागणीहि या लोकांपासूनच चालत आलेली आहे. त्यांस शून्याची कल्पना नव्हती. त्यांचें वजनाचें मान मिना हें असे व त्याचे शेकेल या नांवाचे साठ विभाग करीत.

## सुमेरी उंच देवळें—

शिनार मैदानांत निपूर या ठिकाणीं सुमेरियन लोकांनीं एक मोठें देऊळ बांधलें. त्याची उंची ३०० फुटांहून अधिक होती. अशा तऱ्हेचीं उंच उंच देवळें बांधण्याची प्रथा बाबिलोनियामध्यें सुरू झाली व बाबिलोन येथें बांधलेल्या अशा उंच देवळावरूनच बाबेलच्या मनोऱ्याची कथा प्रसृत झाली. ख्रिस्ती देवळामध्यें आढळणारे उंच मनोरे हें यांचेंच अनुकरण आहे. अशा देवळांभोंवतीं धान्याचीं कोठारें व राज्यकारभाराच्या जागा असून त्यांसभोंवतीं एक मोठा उंच तट असे. या देवळांची व्यवस्था पाहण्याकरितां पटेसी या नावाचा मुख्य पुजारी असे व तोच त्या गांवचा राजा असे. याच्या हाताखालीं पुष्कळ अधिकारी असत व त्याला सर्व प्रजा धान्य, बकऱ्या, मेंढ्या, वगैरे रूपानें कर आणून देई, व त्याबरोबर भूमीच्या सुपिकतेचें चिन्ह म्हणून एक झाडाची फांदी एका बरणींत घालून आणीत. याच झाडाच्या फांदीवरून पुढें 'जीवनवृक्षा'ची कल्पना निघाली. देवळांत येणारे लोक पृथ्वी, वायु, आकाश, समुद्र, इत्यादिकांस निरनिराळे पदार्थ अर्पण करून त्यांची समृद्धीकरितां प्रार्थना करीत, व विशेषतः नदीच्या पुरांपासून रक्षणाकरितां प्रार्थीत असत. कारण अशा एका पुरापासून त्यांचें फार नुकसान झालें होतें व त्या पुराची कथा त्यांच्यामध्यें परंपरागत चालत आलेली होती. हीच कथा पुढेंहि हिब्रू लोकांत प्रचलित झाली व तिचेंच इस्डुबरनें वर्णन केलें आहे. ब्रिटिश म्यूझियममध्यें एक सिलिंडर-वृत्तचिति—आहे तीवर जीवनवृक्ष आणि आदाम, ईव्ह व सर्प यांचीं चित्रें खोदलेलीं आहेत.

सुमेरियन लोक ईजिप्ती लोकांप्रमाणे आपल्या मृत आप्तास स्मशानभूमींत न पुरतां घरांतच एकाद्या खोलींत पुरून टाकीत

व तेथेंच त्याच्या जीवनाचा अंत झाला असें मानीत. त्यामुळें त्यामध्यें मृत्यूनंतर जीवनाची कल्पना नसे. यामुळें असीरियामध्यें ईजिप्तप्रमाणें मोठमोठ्या स्मशानभूमी किंवा थडगीं आढळत नाहींत.

देवळाच्या सभोंवतीं कच्च्या विटांनीं बांधलेलीं लोकांचीं घरें असत. पूर्वेकडील देशांत अशा तऱ्हेच्या कच्च्या विटांचीं घरें बांधण्याची पद्धत अजूनहि आढळते. अशा तऱ्हेचीं गांवें सामान्यतः एखाद्या उंच टेंकाडावर असत. जोराचा पाऊस पडल्यास हीं मातीचीं घरें कोसळून मातीचा ढीग पडत असे. तो ढीग उचलून काढण्याऐवजीं त्यावरच दुसरीं घरें बांधलीं जात. व अशा रीतीनें जुन्या शहराच्या माथ्यावर नवीं शहरें वसत असत. मेसापोटेमियामध्यें अशा तऱ्हेचीं अनेक टेंकाडें दृष्टीस पडतात. असें एखादें मोठें टेंकाड खोदून काढलें असतां त्याखालीं जुन्या गांवांचे अवशेष आढळून येतात. अशा तऱ्हेचीं खिस्तपूर्व ३२०० वर्षांपूर्वीचीं गांवेंहि खोदून काढण्यांत आलेलीं आहेत. उदा., निपूर या शहराचे अवशेष अमेरिकेंतील पेनसिलव्हेनिया युनिव्हर्सिटीनें पाठविलेल्या समितीनें खोदून काढले आहेत. या अवशेषावरून तत्कालीन सामाजिक जीवनाची कल्पना येते. त्या वेळीं समाजामध्यें कांहीं स्वतंत्र नागरिक व पुष्कळसे गुलाम असत. गाढवांचे तांडे अथवा कारवान यावरून व्यापार चालत असे. नदीकांठच्या शहरांशीं लहानमोठ्या होड्यांतून व्यापार व देवघेव होत असे.

## नगरराज्य—

स्वतंत्र अशा मध्यम वर्गापेक्षां वरिष्ठ असा अधिकारी वर्ग, पुरोहित व उमराव हे असत. एका शहराच्या आसपासची जमीन याप्रमाणें एका राजाच्या अमलाखालीं असे, यामुळें येथें बहुतेक नगरराज्यें असत. अशा तऱ्हेच्या सर्वांत प्राचीन शहराचा प्रत्यक्ष लेखी पुरावा आपणांस ऊर या शहरासंबंधीं आढळतो. त्या वेळीं तेथें अन्निपद्द नांवाचा राजा राज्य करीत असून त्यानें ऊर शहराच्या उपनगरांत एक देऊळ बांधल्याचा उल्लेख या लेखांत आहे. हा लेख खि. पू. ३१ व्या शतकांतला असावा. या नगरराज्यांतील राजा अथवा पटेसी याचा लोकांस युद्धकाळीं व पाटबंधाऱ्याच्या कामीं मुख्यतः उपयोग असे. कारण हे पाटबंधारे वरचेवर दुरुस्त करावे लागत. या नगरराज्यामध्ये नेहमीं परस्पर युद्धें चालू असत. त्यामुळें या लोकांत युद्धकलेची बरीच प्रगति झाली होती.

या नगरराज्यांची सत्ता खिस्तपूर्व २८ व्या किंवा २७ व्या शतकापर्यंत चालू होती. त्यानंतर सुमेर देशाच्या उत्तरेकडे अक्कड नांवाच्या प्रांतांत भटक्या सेमेटिक लोकांनीं वस्ती केली होती व तेथें कीश नांवाच्या शहराची स्थापना केली होती. या लोकास धनुष्यबाणानें लढण्याची विद्या साध्य झाली होती. या अक्कड लोकांबरोबर सुमेर लोकांचीं वरचेवर युद्धें होऊं लागलीं. अखेरीस खिस्तपूर्व २८ व्या शतकांत अक्कड लोकांचा राजा सार्गन यानें मोठा विजय मिळवला व सर्व सुमेर प्रांतावर आपली सत्ता स्थापन केली. तसेंच त्यानें भूमध्यसमुद्रापर्यंत आपला अमल बसविला. हे अक्कड लोक प्रथम भ्रमणवृत्ति असल्यामुळें असंस्कृत होते. परंतु आतां ते सुमेरियन लोकांप्रमाणें घरें बांधून राहूं लागले व त्यांच्या बाणाग्र लिपींत आपली भाषा लिहूं लागले व याप्रमाणें सेमेटिक भाषेंत प्रथम लेखनास आरंभ झाला. त्यांना प्रथम राज्यकारभार चालविण्याची कला माहीत नव्हती. तेव्हां त्यांनीं सुमेरियन लोकांपासून त्यांची कालमानपद्धति, वजनें, मापें, अंक व व्यवहारपद्धति, वगैरे गोष्टी उचलल्या. हे लोक युद्धामध्यें चामड्याचीं किंवा तांब्याचीं एक शेर वजनाचीं शिरस्त्राणें वापरूं लागले. सुमेरियन लोकांपासून त्यांनीं शिल्पकलेचें ज्ञान करून घेऊन तींत पुष्कळच प्रगति केली. ही गोष्ट सार्गननंतर होऊन गेलेल्या नरमसीन या राजाच्या कारकीर्दीतील शिल्पकामावरून दिसून येते. तसेंच सुमेरियन लोकांची मुद्रा खोदण्याची कलाहि त्यांनीं पुष्कळच वाढीस लावली.

## सुमेर व अक्कड संयुक्त राज्य—

परंतु शहरांत राहूं लागल्यामुळें अक्कड लोक दुर्बल बनत चालले. त्यामुळें खिस्तपूर्व २४०० वर्षांच्या सुमारास मूळ सुमेरी लोकांनीं आपलें स्वातंत्र्य पुन्हां मिळविलें व या कालांतील राजे आपणांस सुमेर व अक्कड येथील राजे असें म्हणवून घेऊं लागले. या काळांत कांहीं कथांच्या रूपानें वाङ्मयहि रचण्यांत आलें. त्या वेळच्या एतन, अदापा व गीलगामेश यांच्या गोष्टी आतां ज्ञात झाल्या आहेत. ऊर शहराच्या नेतृत्वाखालीं या राज्यांतील व्यापार, वगैरेमध्यें बरीच समृद्धि झाली, व कायदा, व्यवहार, चालीरीती, वाङ्मय व भाषा, वगैरे सांस्कृतिक शाखांचा पाया घातला गेला. सुमेर व अक्कड या संयुक्त राज्याचा काल म्हणजे ऊर शहराच्या प्रामुख्याखालीं झालेल्या सांस्कृतिक प्रगतीचें व भरभराटीचें शतक म्हणतां येईल. त्यानंतर तीन शतकें यांचा शेजारच्या लोकांशीं झगडा चालू होता. या कालांत व्यापाराची उलाढाल, कायदे, व्यवहाराचे नियम व पद्धति, भाषा व वाङ्मय यांची पुष्कळच वाढ झाली. अब्राहामच्या कालांत ऊर हें बंदर होतें.

यानंतर सुमेर आणि अक्कड या राज्यावर सीरियामधील अमोराइट नांवाच्या सेमेटिक लोकानीं स्वाऱ्या करण्यास सुरवात

केली. ख्रिस्तपूर्व २२०० च्या सुमारास या लोकांनीं युफ्रेटीस नदीवरील बाबिलोन हें गांव हस्तगत केलें व तेथून सुमेर व अक्कड देशांत प्रामुख्य मिळविण्याचा प्रयत्न चालविला.

**बाबिलोनचा उदय—**

अशा तऱ्हेनें हा झगडा चालला असतां बाबिलोन येथें अमोराइट वंशांतील सहावा राजा हम्मुरबी हा ख्रि. पू. २०६७ सालीं गादीवर आला. त्यानें वरचेवर विजय मिळवून आपली सत्ता सर्वत्र स्थापन केली व बाबिलोनिया या शहरास महत्त्व प्राप्त करून दिलें. आपल्या विजयानंतर त्यानें १२ वर्षें राज्य केलें व या शांततेच्या काळांत त्यानें पुष्कळच गोष्टींमध्यें प्रगति केली. या राजाच्या वेळचा बराचसा पत्रव्यवहार उपलब्ध आहे, त्यावरून त्याच्या राज्यकारभाराची बरीचशी कल्पना येते व त्यावरून त्याची चौफेर दृष्टि कशी असे तें कळून येतें. पशुपालनाकडे, विशेषतः मेंढ्यांच्या जोपासनेकडे त्याचें विशेष लक्ष असावें असें दिसतें. यानेंच प्रथम एलूल हा महिना अधिक धरून अधिक महिना धरण्याची प्रथा पाडली असावी. कर वसूल करण्याच्या बाबतींत तो सक्त असे व आपल्या सुभेदारास (उदा., लारसा येथील) तो वरचेवर ताकीद देत असे. ज्या लोकास न्यायाधीशाकडून न्याय मिळणें शक्य नसेल अशा लोकांस तो स्वतः न्याय देत असे. त्यानें सर्व राज्यांत एक तऱ्हेचे कायदे असावेत याकरितां एक कायद्यांची संहिता बनवली व ती अक्कड आणि अमोराइड भाषांत लिहून काढली व एका दगडावर खोदून काढली. या दगडावर सूर्य हम्मुरबीस कायदे सांगत आहे असें चित्र काढलें आहे. हा पाषाण आज उपलब्ध झाला आहे. या कायद्यामध्यें विधवा, अनाथ मुली व गरीब लोक यांस न्याय मिळण्याबद्दल विशेष खबरदारी दाखविली आहे.

**हम्मुरबी—**

यानें आपल्या सरहद्दीवर संरक्षणाकरितां खडें सैन्य ठेवलें होतें. व त्यामुळें दूरच्या देशांशीं व्यापार करणे व्यापाऱ्यांस सुरक्षित वाटत असे. या व्यापारामुळें सुमेरियन मालाच्या चिठ्ठ्या सर्वत्र जाऊं लागल्यामुळें बाबिलोनियांतील बाणाग्र लिपीची भाषा पश्चिम आशियांतील सीरिया, वगैरे प्रांतांत सर्वत्र प्रसार पावली. या वेळीं व्यवहाराचें केंद्र देऊळ हें असे. या देवळामार्फत मेंढ्यांचा व्यवहार व मालाची देवघेव मोठ्या प्रमाणावर चालत असून या देवळांच्या मालकीच्या मोठमोठ्या जमिनी असत. या वेळीं नाणीं प्रचारांत नसून त्यांऐवजीं चांदीच्या ठराविक वजनांच्या तुकड्यांचा उपयोग करीत; त्यांस शेकेल असें म्हणत. देण्याघेण्याचे व्यवहार सर्वत्र चालत. परंतु व्याजाचा दर २० टक्क्यांप्रमाणें असे व तें दरमहा द्यावें लागत असे.

लोक अद्यापि सुमेरियन देवांचीच पूजा करीत असत. परंतु बाबिलोन शहराच्या वर्चस्वामुळें तेथील मार्डूक देवतेस बरेंच प्राधान्य मिळाले व ईस्टर या चंद्रदेवतेसहि बरेंच महत्त्व प्राप्त झालें. हीच देवता पुढें ग्रीक लोकांत आफ्रोडीटी नांवानें प्रसिद्ध झाली.

याच काळांत भविष्य सांगण्याची कला व फलज्योतिष यांची बरीच प्रगति झाली. फलज्योतिषामुळेंच पुढें ज्योतिषशास्त्र वाढीस लागलें.

राज्याचा एवढा मोठा पसारा संभाळण्यासाठीं अर्थात् शाळांची आवश्यकता भासूं लागली व प्रत्येक देवालयाशीं बहुतेक शाळा संबद्ध असत. त्या वेळच्या एका विद्यालयाचें प्रत्यक्ष उत्खनन झालेलें आपणांस पाहावयास सांपडतें. त्या वेळचे विद्यार्थी ओल्या मातीच्या विटांवर खुणा करून लिहीत असत. त्या वेळीं शिक्षणास इतकें महत्त्व दिलें जात असे कीं, बाबिलोनियन लोकांत अशी एक म्हण प्रसिद्ध होती कीं, जो लेखनांत प्रावीण्य मिळवील तो सूर्यासारखा तेजस्वी होईल.

हम्मुरबीच्या काळचीं शिल्पकामें सर्व नष्ट झालीं आहेत त्यामुळें त्या कलांची प्रगति अजमावतां येत नाहीं. तथापि एक गोष्ट दृष्टीस पडते कीं, या शिल्पांत स्तंभांच्या रांगा दिसत नाहींत पण कमान मात्र प्रथमच दृष्टीस पडते. या शिल्पकामांत मनोन्यास प्राधान्य असे ही गोष्ट वर सांगितलीच आहे. त्या वेळीं चित्रकला प्रचलित नव्हती असें दिसतें. मुद्रा खोदण्याची कला मात्र सार्गनच्या कालापेक्षां खालावलेली दिसते.

हम्मुरबीच्या काळानंतर त्याचें राज्य फार दिवस टिकलें नाहीं. त्यावर कसाइट लोकांनीं स्वाऱ्या करून तें धुळीस मिळवलें. या लोकांनीं प्रथम अश्व हा प्राणी बाबिलोनियांत आणला. याच वेळीं हिटाइट लोकांनींहि वरून स्वाऱ्या केल्यामुळें बाबिलोनियाचें वर्चस्व नष्ट झालें. तें पुढें खाल्डियन लोकांच्या काळांत पुनरुज्जीवित झालें.

याप्रमाणें ख्रि. पू. तीन हजार वर्षांच्या सुमारास तैग्रीस व युफ्रेटीस या नद्यांमधील दुआबांत एका संस्कृतीचा उदय झाला. या कालांतील नगरराज्यांनीं एक हजार वर्षें या संस्कृतीचें संवर्धन केलें. सुमेरियन लोकांनीं शिनार येथें या संस्कृतीचा पाया घातला व सेमिटिक लोकांशीं एक हजार वर्षें झगडा चालविला. यामध्यें सेमिटिक लोकांनीं सार्गन आणि हम्मुरबी या दोन नेत्यांच्या पुढारीपणाखालीं जय मिळविला. पण ते मूळच्या लोकांशीं मिसळून गेले. यानंतर सुमेरियन लोक स्वतंत्रतः नष्ट झाले व बाबिलोनियाची भाषा सेमिटिक बनली. ही संस्कृति हम्मुरबीच्या कालांत कळसास पोंचली व यानंतर संस्कृतीचें केंद्र या दोन नद्यांच्या वरच्या बाजूस गेलें.

### असुरियाचा उदय—

ख्रिस्तपूर्व ३००० वर्षांच्या सुमारास असुर या प्रांतांत एक सेमेटिक जातीच्या भटक्या जातीनें वस्ती केली होती. हे बाबिलोनियन भाषेप्रमाणें एक सेमेटिक भाषा बोलत असत. त्यांनीं सुमेरियन लोकांप्रमाणेंच कांहीं नगरराज्यांची स्थापना केली व सुमेरियन लोकांपासून शिल्पकला, लेखनकला, वगैरेंचें ज्ञान मिळवलें व बऱ्याचशा कालगणनादि गोष्टींचा व इतर सांस्कृतिक प्रगतीचा स्वीकार केला. या लोकांवर आशिया मायनर-मधून हिटाइट लोक वरचेवर स्वाऱ्या करीत. मधून मधून हिटाइट राजांनीं आपली सत्ताहि तेथें स्थापन केली होती. तसेंच सार्गेन व हम्मुरबी यांनींहि आपली सत्ता तेथें बसविली होती. या सतत चाललेल्या युद्धामुळें असुर लोकांस युद्धकलेचें बरेंच शिक्षण मिळालें होतें. तशामध्यें त्यांनीं आपल्या सैन्यांत घोड्यांचा व रथांचा उपयोग करण्यास सुरुवात केली व अखेरीस ख्रिस्तपूर्व १३०० च्या सुमारास त्यांनीं युफ्रेटीस नदी ओलांडून हिटाइट लोकांस हांकून दिलें. एवढेंच नव्हे तर तैग्रीस नदीच्या रोखानें चालून येऊन बाबिलोन शहरहि हस्तगत केलें व तेथील कसाइट राजास काढून लावलें. या असुर लोकांनीं आपली सत्ता पश्चिमेकडे पसरविण्यास सुरुवात केली, परंतु भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर त्यांस फिनिशियन लोकांशीं सामना देणें भाग पडलें.

### अरेमियन—

याच सुमारास पॅलेस्टाइन आणि सीरिया या प्रदेशांत हिब्रू व अरेमियन किंवा सीरियन लोकांनीं प्रवेश करून ते प्रदेश व्यापून टाकले होते. या लोकांनींहि असुर लोकांस भूमध्य समुद्राचा किनारा गांठण्याच्या कामीं व्यत्यय आणला. ख्रिस्तपूर्व १२०० नंतर अरेमियन लोकांनीं हिटाइट व ईजिप्शियन या दोन्ही संस्कृतींचें अंशतः ग्रहण करून सीरियामध्यें आपलें वर्चस्व स्थापन केलें व दमास्कस येथें आपलें प्रमुख स्थान स्थापिलें. हे अरेमियन लोक मुख्यतः व्यापारी असून त्यांनीं आपला व्यापार सर्वत्र पसरण्यास सुरवात केली. त्यांचे व्यापारी तांडे भूमध्यसमुद्रापासून तैग्रीस नदीच्या उगमापर्यंत भ्रमण करीत असत. त्यांचीं काशांचीं वजनें नीनेव्हे शहराच्या उत्खननांत सापडलीं आहेत. हे लोक त्यांच्याच भाईबंद यहुदी लोकांप्रमाणेंच व्यापारामध्यें फार प्रवीण होते.

हे अरेमियन लोक बरेच सुसंस्कृत होते. ख्रिस्तपूर्व १००० च्या सुमारास ते वर्णयुक्त लेखनकला वापरीत होते. ही कला त्यांनीं फिनिशियन लोकांपासून घेतली होती. हे आपलें लेखन-साहित्य ईजिप्ती लोकांकडून घेत असत. यांच्या व्यापाराबरोबर, पावत्या-चिठ्ठ्यांबरोबर यांच्या वर्णमालेचा व लेखनकलेचाहि प्रसार झाला व त्यामुळें चाणाग्र लिपि मागें पडली. याच लेखनकलेचा पुढें इराणपर्यंत प्रसार झाला. या अरेमियन लोकांबरोबर त्यांच्या अरेमाईक भाषेचाहि दूरवर प्रसार झाला व प्रत्यक्ष असीरियामध्यें असीरियन भाषेपेक्षां अरेमाइक बोल-णारांची संख्या वाढूं लागली. असीरियन लेखांवर अरेमाइक भाषेंतील टीपा असलेल्या विटा उपलब्ध झालेल्या आहेत. बराच कालपर्यंत सार्वजनिक व्यवहार या भाषांतून चालत असे. असीरिया देशामध्येंहि अरेमियन लोक लेखक म्हणून नेमले जात असत. अखेरीस या सर्व सुपीक चंद्राकृति प्रदेशाची अरेमाइक हीच भाषा बनली. या भाषेनें हिब्रू भाषेचाहि प्रचार मागें पडला. प्रत्यक्ष येशू ख्रिस्त अरेमाइक भाषाच बोलत असे. याप्रमाणें असीरियन संस्कृतीवर अरेमियन संस्कृतीचा बराच पगडा बसला. परंतु अद्याप सीरियामधील अरेमियन उत्खनन झालेलें नसल्यामुळें आपणांस त्याबद्दल फारशी माहिती मिळत नाहीं. परंतु त्यांचें मुख्य शहर दमास्कस हें असीरियन लोकांच्या हल्ल्यापुढें दीर्घकालपर्यंत टिकून राहिलें. एवढेंच नव्हे तर त्या-मुळें हिब्रू लोकांचेंहि असीरियन हल्ल्यांपासून रक्षण झालें. अरेमियन, फिनिशियन आणि हिब्रू राजांनीं ख्रिस्तपूर्व १८ व्या शतकापर्यंत असीरियन राज्यास थोपवून धरलें.

### असुर शहर व तेथील राजे—

असुर हें शहर अशा ठिकाणीं वसलें आहे कीं, त्याचा संबंध पश्चिम व उत्तर या दोन्ही दिशांकडील प्रदेशांशीं सहजच येतो. त्यामुळें विशेषतः हिटाइट संस्कृतीचा त्यावर बराच परिणाम झालेला आढळतो. बाबिलोनपासून घेतलेल्या पदचिन्हांमध्यें असुर शहरानें दोनशें चिन्हांची भर घातली. शिल्पकलेमध्येंहि हिटाइट लोकांच्या अनुकरणानें बरीच प्रगति करून त्यांनीं आपल्या राजांच्या पराक्रमाचीं चित्रें राजवाड्याच्या भिंतींवर खोदून ठेवलीं आहेत. ही कला बाबिलोनमध्यें अज्ञात होती. बाबिलोनमध्यें बांधकाम फक्त विटांचेंच शक्य होतें तें आतां दगडांचें होणें शक्य असल्यामुळें इमारती बांधण्याच्या कामींहि असुरशाहीनें बरीच प्रगति केलेली आढळते. या इमारतींचे दगडी पाये व चौथरे हे भव्य प्रमाणांत असत. परंतु मुख्य इमारत विटांचीच असे. बाबिलोनियामधील देवादिकांच्या पौराणिक कथा जरी असुरमध्यें प्रचलित झाल्या तरी त्यांनीं असुर हीच आपली देवता कायम ठेवली व शहरास हिचेंच नांव ठेवलें. ही युद्धदेवता उग्र असे व ती सूर्याचेंच रूप मानीत. ही देवता त्यांस युद्धांत जय मिळवून देत असे. याचें प्रतीक म्हणून ते हिटाइट लोकांपासून घेतलेलें पक्षयुक्त चक्र वापरीत. याची

उत्पत्ति प्रथम ईजिप्तमध्यें झालेली होती. त्यांची मुख्य देवता ईश्तर हीच प्रेमदेवता असे. त्यांच्या धर्माचा आचारांवर फारसा परिणाम घडत नसे. कारण मरणोत्तर न्यायाची कल्पना त्यांच्यांत रूढ नव्हती. त्यांचीं प्रेतें पुरण्याची पद्धति बाबिलोनप्रमाणेंच घरांत पुरण्याची होती.

असुर येथील राजवाड्याच्या उत्खननांत दोन राजांच्या शवाच्या दगडी पेट्या सांपडल्या आहेत. या पेट्या म्हणजे अत्यंत प्राचीन अशा राजांच्या शवपेटिका होत. असुर बादशहा सार्गन दुसरा याच्या राजधानीच्या उत्खननांत शिकागो युनिव्हर्सिटीच्या ओरिएंटल इन्स्टिटयूटच्या संशोधकांस एक शिला सांपडली आहे. तीवर असुरिया देशाच्या राजांचीं नांवें बाणाग्रलिपींत कोरलेलीं आहेत. त्या यादींत १०७ नांवें आहेत. यांपैकीं पहिला राजा खि. पू. अडीच हजार वर्षांच्या सुमारास राज्य करीत असावा.

असुर राजांचा प्रधान उद्देश पश्चिमेच्या बाजूस भूमध्य समुद्रावर एखादें बंदर ताब्यांत आणण्याचा होता. परंतु त्यांस मधून-मधून उत्तर, पूर्व व दक्षिण या दिशांकडून होणाऱ्या स्वाऱ्यांस तोंड द्यावे लागे. खि. पू. चौदाव्या व तेराव्या शतकांत ईजिप्ती व हिटाइट राजे जेव्हां परस्परांशीं लढण्यांत गुंतले होते तेव्हां असुर राजे आपल्या राज्यास बळकटी आणण्याकडेच फक्त लक्ष देत होते. परंतु जेव्हां जेव्हां ते पश्चिमेकडे लक्ष देऊन स्वाऱ्या करीत तेव्हां तेव्हां त्यांस बाबिलोनी, एलामी व झग्रोस पर्वतांतील टोळ्या व उत्तरेकडील अरमेनियन देशांतील उरर्तु यांचेकडून होणाऱ्या आक्रमणाकडेहि लक्ष द्यावें लागत असे. अखेरीस खि. पू. नवव्या शतकापासून असुर लोकांनीं पश्चिमेकडे आपली सत्ता पसरविण्यास सुरवात केली. खि. पू. ७३२ या वर्षी दमास्कस शहर सर करण्यांत आलें व नंतर लवकरच पश्चिमेकडील सर्व प्रदेश ताब्यांत घेण्यांत आला. खि. पू. ७२२ या वर्षी हिब्रू लोकांचें समरिया हें शहर घेत असतां असुर राजा लढाईंत पडला व त्याचा पुत्र प्रख्यात सार्गन दुसरा हा गादीवर आला. याच्या वंशांत पुढील महत्त्वाचे राजे होऊन गेले. सार्गन दुसरा—खि. पू. ७२२–७०५; सेनाचेरिब ७०५–६८१; एसर हडन ६८१–६६८; असुर बनिपाल यास ग्रीक लोक सार्डन पालस म्हणतात ६६८–६२६. निनेव्हे शहराच्या ईशान्येस त्यानें दुरशरुकिन (सार्गनदुर्ग) नांवाचें एक भव्य शहर वसविलें. याचा विस्तार एक मैल चौरस असून त्यांत ८०,००० लोकवस्ती होती. त्याच्या राजवाड्यानें २५ एकर जागा व्यापली होती. याचा पुत्र सेनाचेरीब यानें खि. पू. ७०० या वर्षी टारसस व इतर ग्रीक शहरें घेऊन दक्षिणेकडे ईजिप्तच्या सीमेपर्यंतचीं सर्व फिनिशियन बंदरें काबीज केलीं. परंतु त्याचें सैन्य तेथील दलदलींतील हवेमुळें किंवा प्लेगमुळें खराब झालें व त्यास ईजिप्तवर स्वारी करतां आली नाहीं. या गोष्टीचा उल्लेख हिब्रू वाङ्मयात आढळतो. परंतु यानें बाबिलोन शहर घेऊन तें बेचिराख केलें. सेनाचेरिबच्या मुलानें ईजिप्तवर स्वारी केली. परंतु तो मरण पावल्यामुळें अखेरीस त्याच्या मुलानें खि. पू. ६७४ मध्यें ईजिप्त पादाक्रांत केलें.

खि. पू. ७०० च्या सुमारास सर्व सुपीक चंद्रकोरेचा प्रदेश असुर साम्राज्यांत अंतर्भूत होता, एवढेंच नव्हे तर बराचसा उत्तरेकडील प्रदेशहि त्यांच्या ताब्यांत असून त्यांत ईजिप्तचीहि नंतर भर पडली.

### सेनाचेरीब व निनेव्हे—

सेनाचेरिब यानें निनेव्हे शहराची वाढ केली आणि तेथें राजधानी केली व तेथें पाण्याची सोय करण्याकरितां एक मोठा कालवा व पाण्याकरितां पुलावरील पाट बांधला. हा जगांतील अशा तऱ्हेचा पहिला पाट होय. तैग्रीस नदीकांठीं असुर राजांनीं मोठमोठीं देवळें व राजवाडे बांधले. निनेव्हे शहराचा तट तैग्रीस नदीकांठी अडीच मैलपर्यंत पसरलेला होता व आंतील तटाची एकंदर लांबी आठ मैल होती. यानें राजकीय जासूद पाठविण्याची प्रथा पाडली. मोठमोठ्या सडका बांधण्याची प्रथा प्रथम असुर राजांनीं सुरू केली. दुसऱ्या सार्गननें सार्गनदुर्गापासून निनेव्हेपर्यंत सडक बांधली. या सडकांवरील मुख्य मुख्य ठिकाणीं राजाचे अधिकारी असत व ते राजकीय पत्रव्यवहार, सामानसुमान व माल वगैरे पाठविण्याची व्यवस्था करीत. डाक पद्धतीचें मूळ या व्यवस्थेत दिसून येतें. या राजाच्या हाताखालीं सुमारें साठ सुभेदार असत व कित्येक मांडलिक राजे असत. यांचें सैन्य मोठें पद्धतशीर असे व हिटाइट लोकांपासून त्यांस लोखंडाची माहिती झाल्यामुळे त्यांचीं शस्त्रें लोखंडाचीं असत. यांच्या सैन्यांत मुख्यतः तिरंदाज असत व त्यांस भालाईत व ढालाईत यांची मदत असे. यांखेरीज घोडेस्वार व रथ असत. ते त्या वेळीं अजिंक्य होते. असुर राजांनीं प्रथम तटावर मारा करणारीं यंत्रें व वेढ्याचीं साधनें उपयोगांत आणलीं व त्यांच्या साहाय्यानें मातीच्या विटांचे तट ते सहज पाडूं किंवा ढासळूं शकत. असुरी सैनिक क्रूर असत व ते जेथे जेथें जात तेथें तेथें तो प्रदेश जाळपोळ करून ओसाड करून टाकीत व लुटालूट करून सर्व माल नेत व प्रेतांचे ढिगारे रचून ठेवीत. रॉलिन्सन यानें यांस आशियांतील रोमन असें म्हटलें आहे.

असुर राजांनीं मोठमोठ्या भव्य इमारती बांधल्या. त्यांत कमानीस बरेंच महत्त्व असे व त्यांवर जिल्हईदार विटा असत. राजवाड्याच्या भिंतींवर सभोंवार अलबॅस्टरचीं चित्रें असत.

निनेव्हे येथें राजवाड्यांत ७१ दिवाणखाने व दोन मैल लांबीची चित्रयुक्त भिंत आढळली. यांतील कांहीं चित्रें ब्रिटिश म्यूझियममध्यें गेलीं. या चित्रांत राजांचे पराक्रम चित्रित केलेले आढळतात. या राजवाड्याच्या भिंतीवर गिलाव्यांतील चित्रांमध्यें पंखांचे देवदूत, हरणें, बैल, वगैरे अनेक प्राण्यांचीं, तशींच गुलाब वगैरे फुलें, ताडाचीं झाडें, तबकें, वर्तुळाकृति, वगैरे अनेक प्रकारचीं चित्रें काढलेलीं दिसून येतात.

असुर लोकांनीं इतर देशांपासून अनेक कलांचें ग्रहण केलेलें दिसतें. विटांवर जिल्हई देण्याची कला त्यांनीं ईजिप्त व बाबिलोनपासून घेतली. तसेंच कांहीं नक्षीचे प्रकारहि ईजिप्तमधून उचललेले असावे. राजवाड्यांतील लांकडी सामान फिनिशिअन कारागीर तयार करीत; पण तें ईजिप्ती नमुन्यांप्रमाणें बनविलेलें दिसतें. कांहीं बांधकामाच्या कल्पना त्यांनीं हिटाइट लोकांपासून घेतल्या होत्या ही गोष्ट सेनाचेरीबनें नमूद केली आहे. सेनाचेरीबनें बांधलेल्या कालव्याच्या पाण्यावर त्याला विस्तीर्ण बाग तयार करणें सुलभ झालें व या उद्यानांत त्यानें नाना तऱ्हेचीं व नाना देशांतील झाडें लावलीं त्यांत लोंकरीच्या झाडाचा (कापसाचा) त्यानें उल्लेख केला आहे. हीं अर्थात् हिंदुस्थानांतून नेण्यांत आलीं असावीं.

### असुर लेख व वाङ्मय—

दुसऱ्या सार्गोननें बराच मोठा ग्रंथसंग्रह जमविला होता व त्याच्या वंशजांनींहि तो वाढविला. असुर बनिपाल यानें असें म्हटलें आहे कीं, त्याच्या पित्यानें त्यास घोड्यावर बसणें व तिरंदाजी करणें, याप्रमाणें लिहिणें—वाचणें व इतर ज्ञानहि शिकविलें होतें. अर्थात् हें लेखन मातीच्या विटांवर असे. निनेव्हे येथें असुर बनिपालच्या एका खोलींत २२,००० अशा लिहिलेल्या विटा सांपडल्या. या सध्यां ब्रिटिश म्यूझियममध्यें आहेत. या लेखांत धर्म, भौतिक शास्त्रें व वाङ्मय या विषयांवरील ग्रंथ राजाच्या आज्ञेनें जमविलेले आढळतात. निनेव्हे येथील कांहीं विटा लेयार्ड यानें ब्रिटिश म्यूझियममधील जॉर्ज स्मिथ यास दिल्या. त्यांवर प्रसिद्ध जलप्रलय-कथेचा कांहीं भाग कोरलेला होता. त्या लेखांचें वाचन जॉर्ज स्मिथ यानें केलें व याप्रमाणें बाणाग्र लिपि सुबोध केली. पुढें स्मिथ यास जलप्रलय-कथा संपूर्ण सांपडली.

असुर साम्राज्याचा जसजसा विस्तार होत गेला तसतशी खड्या सैन्याची गरज अधिक वाटूं लागली व त्यामुळें शेतकरी लोकांस शेती सोडून सैन्यांत भरती व्हावें लागलें, उद्योगधंद्यांकडे दुर्लक्ष झालें, व्यापार अरेमियन लोकांच्या हातीं गेला व त्यांचीच भाषा विशेष प्रचारांत आली. याच वेळीं बाहेरून स्वाऱ्या होऊं लागल्या व अखेरीस बाबिलोनिया प्रांत खाल्डी लोकांनीं घेतला व त्यांचा राजा नबो पोलस्सर व मीड लोकांचा राजा सायाक्सरेस यांनीं ख्रि. पू. ६१४ मध्यें असुर व ६१२ मध्यें निनेव्हे काबीज केलें व असुर साम्राज्य नष्ट झालें.



### खाल्डियन बाबिलोन—

खाल्डी लोकांनीं बाबिलोनिया जिंकून घेऊन सेनाचेरीबनें विध्वंस केलेल्या बाबिलोन शहराची पुन्हां स्थापना केली व ख्रि. पू. ६०५ या वर्षी असुरांच्या अवशेष सैन्याचा व त्यांच्या ईजिप्ती सहाय्यकांचा कार्चेमिश येथें पराभव करून आपल्या साम्राज्याची सत्ता सर्व सुपीक चंद्रकोरेवर स्थापन केली. परंतु याच्या उत्तरेच्या बाजूस मीड लोकांची सत्ता राहिली. कार्चेमिशच्या लढाईतील जेता नेबोचाड नेझर यानें बाबिलोन येथें चाळीस वर्षे राज्य केलें. याचा उल्लेख बायबलमध्यें आढळतो. हिब्रू लोकांनीं ईजिप्तला मदत केली म्हणून यानें जूडावर स्वारी करून जेरुसलेम शहराचा विध्वंस केला व अनेक हिब्रू लोकांस कैद करून बाबिलोन येथें नेलें. यानें बाबिलोन शहरांत मोठमोठ्या इमारती व देवळें बांधलीं. देवळापासून राजवाड्यापर्यंत व ईस्तर दरवाजापर्यंत एक सुंदर रस्ता तयार केला व राजवाड्याच्या गच्च्यांवर सुंदर बगीचे बनविले. बाबिलोन शहराची वाढ करून त्यासभोंवतीं एक तट बांधला. एका तटाची भिंत युफ्रेटीसपासून तैग्रीस नदीपर्यंत पसरली होती. यानें युफ्रेटीस नदीवर पूल बांधला. हा सर्व जगांतील पहिला पूल होय. या शहराचें हिरोडोटसनें वर्णन केलें आहे.

### ज्योतिःशास्त्र—

या कालांत विशेषतः ज्योतिःशास्त्रांत बरीच प्रगति झाली. अर्थात् याचा आरंभ फलज्योतिषापासून झाला. यांनीं प्रथम बुध, शुक्र, मंगळ, गुरु व शनि या पांच ग्रहांस नांवें देऊन त्यांस देवता कल्पिलें. या ग्रहांस निरनिराळे रंग प्रिय असत अशी त्यांची कल्पना असे. उदा., शनि—काळा, गुरु—नारिंगी, मंगळ—रक्त, रवि—सुवर्ण, शुक्र—पीत, बुध—नील, चंद्र—रौप्य व याप्रमाणें त्यांच्या देवळांस निरनिराळे निमुळते चौकोनी चौथरे असून त्यांस क्रमानें वरील रंग असत. या ग्रहांचीं नांवें आतां भाषांतरित रूपांत प्रचलित आहेत. उदा., रोमन लोकांनीं ईस्तर याचें व्हीनस अथवा शुक्र असें नांव केलें व मार्डुकचें ज्युपिटर अथवा गुरु बनविलें. हे पांच ग्रह व चंद्र आणि सूर्य यांचा सप्ताह बनला व तो आजहि प्रचलित आहे. या लोकांनीं चंद्रग्रहणाचें फार प्राचीन कालापासून निरीक्षण केलें होतें. यापुढें नबोनसर याच्या

कारकीर्दीत खि. पू. ७४७ पासून प्रत्येक चंद्रग्रहणाची एका पुस्तकांत नोंद करून ठेवण्यांत येऊं लागली. हें सर्व पुस्तक आज उपलब्ध नाहीं. पण जुन्यांत जुनी नोंद खि. पू. ५६८ सालची आहे. अशा तऱ्हेची नोंद घेण्याची पद्धत ३६० वर्षेपर्यंत चालू होती. हें काम बाबिलोनी सत्ता नष्ट होऊन इराणी अमल चसला तरी चालू होतें. या ग्रहणांच्या नोंदीवरून खि. पू. ५०० वर्षांपूर्वीच नबुरिमन्नु नांवाच्या ज्योतिष्यानें चंद्र व सूर्य यांच्या गतींचीं कोष्टकें बनविलीं व त्यांची दैनिक, मासिक व वार्षिक भ्रमणगति निश्चित केली अथवा भगण ठरविले व यावरून चंद्र-ग्रहणें व सूर्य-ग्रहणें तो वर्तवूं लागला. यानें सौरवर्ष ३६५ दिवस ६ तास १५ मिनिटें व ४१ सेकंद असें ठरविलें. या गणनेंत दहा सेकंदांपेक्षां कमी चूक आहे. परंतु याच्यानंतर होऊन गेलेल्या किदिन्नु नांवाच्या ज्योतिष्यानें यापेक्षां कमी चूक अशीं कोष्टकें तयार केलीं. याच्या वर्षकालांत फक्त एक सेकंदाची चूक होती व कांहीं बाबतींत तर याचें गणित अर्वाचीन गणितापेक्षांहि अधिक सूक्ष्म होतें. कारण त्याच्यासमोर ३६० वर्षांचे वेध होते. किदिन्नु यानें असेंहि सिद्ध केलें होतें कीं, एका संपातापासून त्याच संपातबिन्दूपर्यंतच्या वर्षाचा अवधि व पृथ्वी जेव्हां सूर्याच्या अगदीं जवळच्या बिन्दूमध्यें येते त्या दोन कालांतील वर्षांचा अवधि यांमध्यें अंतर असतें. हा फरक अर्थात् पृथ्वीच्या अक्षचलनामुळें पडत असतो.

नबुरिमन्नु आणि किदिन्नु यांनीं नमूद केलेल्या गोष्टी ग्रीक ज्योतिःशास्त्रज्ञांस पुढें माहीत झाल्या होत्या. ते यांस अनुक्रमें नबुरिआनोस आणि किदेनास असें म्हणत. तसेंच मेटन या ग्रीक शिल्पज्ञानें अथेन्समध्यें नबुरिमन्नु याच्या कोष्टकावरूनच आपलें वर्षमान प्रचलित केलें. खाल्डियन लोकांच्या शिल्पकामांत असुरी शिल्पकलेची छटा दिसते. ते स्वतः मात्र जुनें बाबिलोनी शिल्पच आपण पुनरुज्जीवित करीत आहों असें मानीत. त्यांनीं जुनी लेखनशैली व वाङ्मयप्रकार प्रचारांत आणण्याचा प्रयत्न केला. नेबुचाडनेझ्झरनंतर सेमेटिक लोक मागें पडत जाऊन संस्कृतिसंवर्धनाची धुरा इंडो-युरोपीय लोकांकडे गेली.

### हिटाइट—

पश्चिम आशियाच्या उत्तर भागामध्यें एक उंचवट्याचा प्रदेश पसरलेला आहे. हा प्रदेश सुपीक चंद्रकोरेच्या उत्तरेच्या बाजूस असून ईजियन समुद्रापासून पूर्वेकडे कास्पियन समुद्र आणि इराणी आखात यांच्या दरम्यान व पलीकडे इराणपर्यंत पसरला आहे. या प्रदेशांत अनातोलिया, अरमेनिया, मीडिया आणि पर्शिया अथवा इराण हे देश येतात. या सर्व प्रदेशामध्यें एक तऱ्हेची संस्कृति परिणत होऊन तिची वाढ कांस्ययुगापर्यंत झाली होती. या संस्कृतीचे अवशेष मीडिया व इराणमध्यें अनेक तऱ्हेच्या मांड्यांच्या रूपानें आढळण्यांत आले आहेत. या संस्कृतीचे जनक कोण लोक होते तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. या प्रदेशांत हिटाइट या नांवाच्या लोकांची प्राचीन वसाहत आढळून येते. येथें हॅलिस नदीच्या पूर्वेच्या बाजूच्या डोंगरामध्यें लोखंड वगैरे धातू आढळतात. अर्थात् हिटाइट लोकांनीं प्रथम आपलीं शस्त्रें लोखंडाचीं केलीं. सुमारें खिस्तपूर्व २५०० च्या सुमारास कॉकेशस पर्वताकडून इंडो-युरोपीयन लोक खालीं येऊं लागले. यांसच हिटाइट या नांवानें प्राचीन लेखांत उल्लेखिलेलें आढळतें. याच लोकांनीं प्रथम आशिया मायनरमध्यें व सुपीक चंद्रकोरेमध्यें माणसाळलेला अश्व हा पशु आणला. या लोकांनीं तेथील पहिल्या अनातोलियन लोकांस नष्ट न करतां त्याच्यावर ते राज्य करूं लागले. त्यामुळें या दोन लोकांच्या भाषेंत मिश्रण झालेलें आढळतें. ही मिश्र भाषा पश्चिम आशियामध्यें सुमारें १००० वर्षें प्रचलित होती.

### हिटाइट व बाबिलोन—

या हिटाइट लोकांचा बाबिलोनी व असुरी फिरत्या व्यापाऱ्यांशीं संबंध आला व तेहि त्यांच्याबरोबर व्यापार, व्यवहार करूं लागले व त्यांचे विटांवरील लेख वाचावयास शिकले. अशा तऱ्हेच्या लेख लिहिलेल्या विटा हिटाइट अवशेषांमध्यें मोठ्या प्रमाणांत आढळून आल्या आहेत. या लेखांचें वाचन प्रथम चेकोस्लोव्हाकियन पंडित फ्रेडरिक व्होजने यानें केलें. हिटाइट लेखयुक्त विटा अलीकडे पुष्कळच उपलब्ध झाल्या आहेत. यांमध्यें कांहीं विटांवर पहिल्या रकान्यांत सुमेरियन, दुसऱ्यांत बाबिलोनियन किंवा असुरी आणि तिसऱ्यांत हिटाइट असे शब्द दिलेले कोशहि आढळून आले आहेत. या हिटाइट-लेखांचें पहिल्या महायुद्धानंतर बरेंच वाचन झालें असून एमील फॉरेर या जर्मन पंडितानें या काळच्या हिटाइट राजधानीमध्यें सांपडलेल्या विटांवरून तेथें हिटाइट सोडून निरनिराळ्या सात भाषा प्रचलित असल्या पाहिजेत असें दाखविलें आहे. लेखनकलेचें ज्ञान झाल्यावर हिटाइट लोकांनीं आपली पुष्कळच प्रगति करून घेतली. व त्यांची सत्ता इतकी वाढली कीं, ईजिप्त व असीरिया या दोन्ही देशांशीं त्यांची स्पर्धा चालू झाली. यांची खिस्तपूर्व १९०० ते १६५० व खिस्तपूर्व १४०० ते १२०० पर्यंत दोन साम्राज्यें होऊन गेलीं. ईजिप्तवर स्वारी करून सोळावें घराणें स्थापन करणारे हिक्सॉस लोक हे हिटाइट लोकांचीच एक शाखा असावी असें एक मत आहे. यांची भाषा ही इंडो-युरोपीय भाषेचीच एक शाखा असावी ही गोष्ट आतां विद्वानांस मान्य झाली आहे.

कारकीर्दीत खि. पू. ७४७ पासून प्रत्येक चंद्रग्रहणाची एका पुस्तकांत नोंद करून ठेवण्यांत येऊं लागली. हें सर्व पुस्तक आज उपलब्ध नाहीं. पण जुन्यांत जुनी नोंद खि. पू. ५६८ सालची आहे. अशा तऱ्हेची नोंद घेण्याची पद्धत ३६० वर्षेपर्यंत चालू होती. हें काम बाबिलोनी सत्ता नष्ट होऊन इराणी अमल बसला तरी चालू होतें. या ग्रहणांच्या नोंदीवरून खि. पू. ५०० वर्षांपूर्वीच नबुरिमन्नु नांवाच्या ज्योतिष्यानें चंद्र व सूर्य यांच्या गतींचीं कोष्टकें बनविलीं व त्यांची दैनिक, मासिक व वार्षिक भ्रमणगति निश्चित केली अथवा भगण ठरविले व यावरून चंद्र-ग्रहणें व सूर्य-ग्रहणें तो वर्तवूं लागला. यानें सौरवर्ष ३६५ दिवस ६ तास १५ मिनिटें व ४१ सेकंद असें ठरविलें. या गणनेंत दहा सेकंदांपेक्षां कमी चूक आहे. परंतु याच्यानंतर होऊन गेलेल्या किदिन्नु नांवाच्या ज्योतिष्यानें यापेक्षां कमी चूक अशीं कोष्टकें तयार केलीं. याच्या वर्षकालांत फक्त एक सेकंदाची चूक होती व कांहीं बाबतींत तर याचें गणित अर्वाचीन गणितापेक्षांहि अधिक सूक्ष्म होतें. कारण त्याच्यासमोर ३६० वर्षांचे वेध होते. किदिन्नु यानें असेंहि सिद्ध केलें होतें कीं, एका संपातापासून त्याच संपातबिन्दूपर्यंतच्या वर्षांचा अवधि व पृथ्वी जेव्हां सूर्याच्या अगदीं जवळच्या बिन्दूमध्यें येते त्या दोन कालांतील वर्षांचा अवधि यांमध्यें अंतर असतें. हा फरक अर्थात् पृथ्वीच्या अक्षचलनामुळें पडत असतो.

नबुरिमन्नु आणि किदिन्नु यांनीं नमूद केलेल्या गोष्टी ग्रीक ज्योतिःशास्त्रज्ञांस पुढें माहीत झाल्या होत्या. ते यांस अनुक्रमें नबुरिआनोस आणि किदेनास असें म्हणत. तसेंच मेटन या ग्रीक शिल्पज्ञानें अथेन्समध्यें नबुरिमन्नु याच्या कोष्टकावरूनच आपलें वर्षमान प्रचलित केलें. खाल्डियन लोकांच्या शिल्पकामांत असुरी शिल्पकलेची छटा दिसते. ते स्वतः मात्र जुनें बाबिलोनी शिल्पच आपण पुनरुज्जीवित करीत आहों असें मानीत. त्यांनीं जुनी लेखनशैली व वाङ्मयप्रकार प्रचारांत आणण्याचा प्रयत्न केला. नेबुचाडनेझ्झरनंतर सेमेटिक लोक मागें पडत जाऊन संस्कृति-संवर्धनाची धुरा इंडो-युरोपीय लोकांकडे गेली.

### हिटाइट—

पश्चिम आशियाच्या उत्तर भागामध्यें एक उंचवट्याचा प्रदेश पसरलेला आहे. हा प्रदेश सुपीक चंद्रकोरेच्या उत्तरेच्या बाजूस असून ईजियन समुद्रापासून पूर्वेकडे कास्पियन समुद्र आणि इराणी आखात यांच्या दरम्यान व पलीकडे इराणपर्यंत पसरला आहे. या प्रदेशांत अनातोलिया, अरमेनिया, मीडिया आणि पर्शिया अथवा इराण हे देश येतात. या सर्व प्रदेशामध्यें एक तऱ्हेची संस्कृति परिणत होऊन तिची वाढ कांस्ययुगापर्यंत झाली होती. या संस्कृतीचे अवशेष मीडिया व इराणमध्यें अनेक तऱ्हेच्या भांड्यांच्या रूपानें आढळण्यांत आले आहेत. या संस्कृतीचे जनक कोण लोक होते तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. या प्रदेशांत हिटाइट या नांवाच्या लोकांची प्राचीन वसाहत आढळून येते. येथें हॅलिस नदीच्या पूर्वेच्या बाजूच्या डोंगरामध्यें लोखंड वगैरे धातू आढळतात. अर्थात् हिटाइट लोकांनीं प्रथम आपलीं शस्त्रें लोखंडाचीं केलीं. सुमारें खिस्तपूर्व २५०० च्या सुमारास कॉकेशस पर्वताकडून इंडो-युरोपीयन लोक खालीं येऊं लागले. यांसच हिटाइट या नांवानें प्राचीन लेखांत उल्लेखिलेलें आढळतें. याच लोकांनीं प्रथम आशिया मायनरमध्यें व सुपीक चंद्रकोरेमध्यें माणसाळलेला अश्व हा पशु आणला. या लोकांनीं तेथील पहिल्या अनातोलियन लोकांस नष्ट न करतां त्यांच्यावर ते राज्य करूं लागले. त्यामुळें या दोन लोकांच्या भाषेत मिश्रण झालेलें आढळतें. ही मिश्र भाषा पश्चिम आशियामध्यें सुमारें १००० वर्षें प्रचलित होती.

### हिटाइट व बाबिलोन—

या हिटाइट लोकांचा बाबिलोनी व असुरी फिरत्या व्यापाऱ्यांशीं संबंध आला व तेहि त्यांच्याबरोबर व्यापार, व्यवहार करूं लागले व त्यांचे विटांवरील लेख वाचावयास शिकले. अशा तऱ्हेच्या लेख लिहिलेल्या विटा हिटाइट अवशेषांमध्यें मोठ्या प्रमाणांत आढळून आल्या आहेत. या लेखांचें वाचन प्रथम चेकोस्लोव्हाकियन पंडित फ्रेडरिक ऱ्होजने यानें केलें. हिटाइट लेखयुक्त विटा अलीकडे पुष्कळच उपलब्ध झाल्या आहेत. यांमध्यें कांहीं विटांवर पहिल्या रकान्यांत सुमेरियन, दुसऱ्यांत बाबिलोनियन किंवा असुरी आणि तिसऱ्यांत हिटाइट असे शब्द दिलेले कोशहि आढळून आले आहेत. या हिटाइट-लेखांचें पहिल्या महायुद्धानंतर बरेंच वाचन झालें असून एमील फॉरेर या जर्मन पंडितानें या काळच्या हिटाइट राजधानीमध्यें सांपडलेल्या विटांवरून तेथें हिटाइट सोडून निरनिराळ्या सात भाषा प्रचलित असल्या पाहिजेत असें दाखविलें आहे. लेखनकलेचें ज्ञान झाल्यावर हिटाइट लोकांनीं आपली पुष्कळच प्रगति करून घेतली. व त्यांची सत्ता इतकी वाढली कीं, ईजिप्त व असीरिया या दोन्ही देशांशीं त्यांची स्पर्धा चालू झाली. यांची खिस्तपूर्व १९०० ते १६५० व खिस्तपूर्व १४०० ते १२०० पर्यंत दोन साम्राज्यें होऊन गेलीं. ईजिप्तवर स्वारी करून सोळावें घराणें स्थापन करणारे हिक्सॉस लोक हे हिटाइट लोकांचीच एक शाखा असावी असें एक मत आहे. याची भाषा ही इंडो-युरोपीय भाषेचीच एक शाखा असावी ही गोष्ट आतां विद्वानांत मान्य झाली आहे.

हिटाइट लोकांतील पहिला आपणांस ज्ञात असलेला राजा म्हटला म्हणजे अनित्तश हा होय. याची आशिया मायनरमध्यें कुसार येथें ख्रिस्तपूर्व २००० च्या सुमारास राजधानी होती. यानें नेशश येथील दुसरा एक हिटाइट राजा जिशुश्तिश याचा पराजय केला. याप्रमाणेंच झलपुव अथवा खलप आणि पुरुषखंड व शालतिवर येथीलहि राजांचा पराभव केला. या वेळीं हिटाइट लोकांचीं ग्रीक लोकांप्रमाणें अनेक नगरराज्यें असावीं व त्याचीं परस्पर युद्धेंहि चालू असावीं. यांपैकीं हट्टी हें राष्ट्र प्रमुख होतें. या हट्टी शब्दावरूनच हिटाइट हा शब्द बनला आहे. याची राजधानी हॅलिस नदीच्या लवणामध्यें हत्तूसस येथें होती. या ठिकाणीं ख्रिस्तपूर्व १८ व्या शतकात मुरशील नांवाचा राजा राज्य करीत होता. यानेंच हम्मूरबीच्या वंशजांचें राज्य नष्ट करून बाबिलोन शहर जिंकलें. यांच्यापैकीं तवर्नेश किंवा लबर्नेश या राजानें आपलें राज्य समुद्रापर्यंत वाढविलें. याच्यामागून कोणी विशेष बलाढ्य राजा न झाल्यामुळें हें साम्राज्य लयास गेलें.

### हिटाइट व ईजिप्त—

दुसऱ्या साम्राज्याची स्थापना ख्रिस्तपूर्व १४०० च्या सुमारास होऊन तें दोन शतकें टिकलें. या साम्राज्याचा संस्थापक शुप्पिलु लुमा या नांवाचा होता. यानें दक्षिणेकडील प्रदेश काबीज करून व ईजिप्तची सत्ता दूर करून सर्व सीरिया प्रांत आपल्या ताब्यांत आणला. यानंतर युफ्रेटीस नदी ओलांडून मितन्नी लोकांचेंहि राज्य काबीज केलें. याप्रमाणें बहुतेक पश्चिम आशियावर यानें आपलें साम्राज्य स्थापन केलें.

हत्तूसस येथें आढळलेल्या लेखामध्यें एका ईजिप्तच्या राणीचें पत्र असून त्यात तिनें आपला जामात होण्याकरितां आपल्या एका राजपुत्रास ईजिप्तमध्यें पाठवावें अशी या राजास विनंति केलेली आढळते. ही राणी बहुधा इखनातोन राजाची राणी किंवा पुढें तुतनखामेनशीं विवाह झालेली त्याची मुलगी असावी. हा विवाह झाला असता तर ईजिप्त व हिटाइट या सत्तांचें एकीकरण होऊन एक बलिष्ठ साम्राज्य स्थापन झालें असतें. परंतु हिटाइट राजानें या बाबतींत चौकशी करण्याकरितां वेळ मोडून दिरंगाई केल्यामुळें हा विवाह घडून आला नाहीं. त्या राणीच्या शत्रूंनीं मध्यंतरीं सत्ता काबीज करून यानंतर आलेल्या हिटाइट राजपुत्रास मारून टाकलें. हें साम्राज्य पॅलेस्टाइनपासून बहुतेक आशिया मायनर व मितन्नी आणि असीरिया यांच्या प्रदेशावर पसरलें होतें.

यानंतर ईजिप्त व हिटाइट या साम्राज्यांत स्पर्धा सुरू झाली व या दोन सत्तांमध्यें २५ वर्षें युद्धें चालू होतीं. थॅतमिस तिसरा यानें हिटाइट लोकांवर मिळविलेल्या विजयाचें वर्णन थीबिस येथील लेखांत केलें आहे. त्या वेळीं हिटाइट लोकांची कार्चेमिश व कदेश हीं शहरें प्रसिद्ध होतीं. ईजिप्तचे राजे सेती पहिला व रामेसीस दुसरा, हेहि प्रतिस्पर्धी असून त्या वेळीं हिटाइट राजे शुप्पिलु लुमाचे नातू होते. याच वेळीं असीरियाकडून हिटाइट लोकांस उपद्रव पोंचूं लागला. सार्गन पहिला, तिग्लथ पिलेसर व असुर नझरपाल यांच्या प्रतिस्पर्ध्यांत हिटाइट लोकांचा उल्लेख आढळतो. शुप्पिलु लुमाचा नातू हत्तुसील यानें ईजिप्तच्या दुसऱ्या रामेसीसबरोबर तह केला व या दोन साम्राज्यांत सख्य स्थापन झालें. या दोन राजघराण्यांतील बराच पत्रव्यवहार तेल एल अमर्ना येथें आतां उपलब्ध झाला आहे. हिटाइट राजाच्या कन्येबरोबर दुसऱ्या रामेसीसनें विवाह केला. या राजकन्येच्या आगमनाचीं चित्रें ईजिप्तमध्यें दुसऱ्या थबधळ्याजवळील व न्युबीयामधील देवळांत कोरलेलीं अद्याप दृष्टीस पडतात. हिटाइट लोक सामान्यतः शांतताप्रिय असून त्यानीं आपल्या सभोंवतींच्या अनेक राजांबरोबर केलेले तह उपलब्ध झाले आहेत.

### हिटाइट कायदे व संस्कृति—

दुसऱ्या साम्राज्याच्या काळांत हिटाइट लोकांनीं पुष्कळच सांस्कृतिक प्रगति केली होती. येथील राजानें फार चांगले कायदे केलेले असून त्या कायद्याप्रमाणें खुद्द राजासहि वर्तन करावें लागे. हत्तूसील राजानें या कायद्यात सुधारणा करून एक नवीन संहिता बनविली. व त्यांतील कायद्यांचें स्वरूप पुष्कळच सौम्य केलें. अनेक अपराधांस पूर्वीं असलेल्या शिक्षा सौम्य केल्या. खुनाकरितांहि होत असलेली फांशीची शिक्षा त्यानें रद्द केली. दुसऱ्याचे एक गुरूं चोरल्यास त्याबद्दल पूर्वीं ३० गुरांचा दंड असे, तो त्यानें १५ गुरांवर आणला. हे कायदे ईजिप्तमधील व असीरियामधील कायद्यांपेक्षाहि सौम्य होते. या राजांनीं अनेक शिल्पकामें करून आशियामध्यें शिल्पकलेची वाढ केली. हत्तूसस या राजधानीभोंवतीं मोठा कोट असून तें आशियांतील पहिलें मोठें शहर होतें. हें बाबिलोन व निनेव्हे या शहरापेक्षांहि मोठें असून तीं शहरें या शहरानंतर कांहीं शतकांनीं अस्तित्वांत आलीं. यांनीं जे राजवाडे बांधले त्यांमध्यें मुख्य दरवाजापुढें एक देवडी असून तिच्या दोन्ही बाजूंस दोन उंच मनोरे असत. दरवाजाच्या दोन्ही बाजूंस सिंहासारखे मोठमोठे भयंकर प्राणी दगडांचे कोरलेले असत. राजवाड्यांतील भिंतींच्या पायथ्याशीं सभोंवार चित्रें कोरलेल्या दगडांची पट्टी बसविलेली असे. याचेंच अनुकरण पुढें असीरियन लोकांनीं केलें. कांहीं आकृती त्यांनीं बाबिलोनिया व ईजिप्तपासून घेतल्या. उदा-

हरणार्थ पंख असलेलें सूर्यबिंब त्यांनीं ईजिप्तपासून व पंख पसरलेलें गरुडाचें व सिंहाच्या डोक्याच्या आकृतीचें चित्र त्यांनीं बाबिलोनियन लोकांपासून घेतले. ही पंखयुक्त सूर्याची प्रतिमा पुढें असुरी व इराणी लोकांनीं स्वीकारली व गरुडाचें चित्र ईजियन संस्कृतीमार्फत युरोपमध्यें गेलें व आज अमेरिकेंतहि तें प्रचालित आहे.

**हिटाइट वाङ्मय—**

हिटाइट विटांवर गद्यशैलींतील बरेच ऐतिहासिक लेख दृष्टीस पडतात. त्यांचा वाङ्मयाकडे ओढा असे. त्यामुळें त्यांनीं बाबिलोनियांतील बऱ्याच कथा लिहून घेतलेल्या आढळतात. उदा., गिलगमेशाची कथा सर्व आशिया मायनरमध्यें प्रसृत झालेली आढळून येते. मितन्नी लोकांपासून घेतलेला शालिहोत्र अथवा अश्वविद्येवरील एक ग्रंथ आढळतो. कांहीं लेखकांनीं लेखावर आपलीं नावेंहि दिलेलीं आहेत. यांनीं आपल्या इमारतींवर खोदण्याकरितां एका नव्याच चित्रलिपीचा उपयोग केल्यामुळें त्यांच्या अनेक स्मारकांवर हीं चित्रयुक्त अक्षरें आढळतात. ह्या लेखांचें वाचन करण्याचा प्रयत्न हल्लीं चालू आहे.

**हिटाइट धर्म—**

मध्यें होतें व त्याचा ईजिप्त देशाशीं बराच संबंध आला होता असें दिसतें. या प्रदेशास आराम नहरायिम (दोन नद्यांमधील आराम) असें नांव होतें. बायबलमधील बलामचा या देशाशीं संबंध असावा (ड्यूट. २३-४). हे लोक हिटाइट लोकांपैकींच असावे असें एक मत आहे. कांहीं शास्त्रज्ञ यांस इराणी लोकांची शाखा समजतात. हिटाइट लोकांची राजधानी बोघाजकुई येथें १९०७ मध्यें शोधून काढण्यांत आली. यांपैकीं एक राजा दशरत्त या नांवाचा असून तो अमेन होतेप तिसरा (ख्रि. पू. १४११-१३८९) याचा सासरा असावा असें तेल एल अमर्ना येथील इष्टिकालेखांवरून दिसतें. हा हिटाइट राजा सुप्पिलिल्युमा याचा समकालीन असावा. दशरत्त याच्या आधीं शोश्तर, अर्ततम पहिला आणि सुतर्ण पहिला हे राजे होऊन गेले होते व अर्ततम दुसरा, अर्तश्शुमर, मत्तुअझ आणि सुतर्ण दुसरा हे दशरत्तनंतर होऊन गेले. कांहीं विद्वानांचें असें मत आहे कीं, याच राजांनीं बाबिलोन येथील अमोराइट घराण्याचा पाडाव करून मेसापोटेमियामध्यें राज्याची स्थापना केली. मितन्नी लोक हिटाइट लिपिच वापरीत असत व त्यांच्याच देवतांची पूजा करीत. तेल एल अमर्ना येथें सांपडलेल्या बाणाग्र लिपींतील इष्टिकालेखावरून असें दिसून येतें कीं, दशरत्त राजाचा एक राजदूत ट्युनिप येथील राजा होता यावरून ट्युनिप अथवा अर्वाचीन टेनिप हें मितन्नी लोकांच्या अमलाखालीं होतें व तेथें मितन्नी भाषा चालू होती. ही मितन्नी भाषा कॉकेशिअन वंशांतील असून तिचें जॉर्जिअन भाषेशीं [illegible] दिसतें.

**[illegible] शियन—**

यानंतर ईजिप्ती, असुरी, बाबिलोनी, हिटाइट व ईजिअन यां[illegible] ज्यांचा अनेक वेळां निकट संबंध आला व कांहीं [illegible] विशेष संघर्ष झाला अशा एका लोकांची अथवा [illegible] देणें अवश्य आहे. या लोकांस फिनिशियन [illegible] व्यापारी होते व त्यामुळें त्यांची वस्ती बहुतेक [illegible] निमित्तानें ते सर्वत्र जलपर्यटनें करीत [illegible] करीत. तसेंच आपल्या व्यापाराच्या [illegible] करितां निरनिराळ्या प्रदेशांत वसा- [illegible] शहरें स्थापन करीत. वेदांमध्यें जे लोक [illegible] आहेत ते फिनिशियनच असावेत [illegible] तसेंच 'पणिर्वणिक् भवति' असें एक वचन [illegible] असून त्यांनीं देवांच्या गायी चोरून [illegible] आहे व त्यांच्याकडे सरमा ही देवदूती [illegible] आहे. यामुळें अनेक संस्कृतींशीं देवाण-

घेवाण करणारे हे लोक संस्कृतिप्रसाराच्या दृष्टीनें फार महत्त्वाचे असल्यामुळें त्यांची माहिती येथें देणें अवश्य आहे.

सीरियाच्या पश्चिमेस लेबानन पर्वत व भूमध्य समुद्र याच्या दरम्यान एक २०० मैल लांबीची व सुमारें १२ मैल रुंदीची पट्टी एकर बंदराच्या उत्तरेकडे पसरली आहे. हीस प्राचीन काळीं फिनिशिया असें नांव होतें. लेबानन पर्वतावरून बरेचसे पाण्याचे प्रवाह वाहत येत असल्यामुळें ती पट्टी फार सुपीक होती. लेबानन पर्वताची पूर्वेकडील बाजू सरळ उभी असल्यामुळें त्या बाजूनें शत्रु येण्याची भीति नव्हती व पश्चिमेकडील उतारावर भरपूर पाणी असल्यामुळें दाट जंगल वाढलें होतें व त्यांतील झाडांचा गलबतें बांधण्यासाठीं उपयोग करतां येत असे. त्यामुळें या ठिकाणीं नेहमीं होड्या व गलबतें बांधण्याचे कारखाने असत. ख्रि. पूर्व ५ व्या शतकांत हिरोडोटस हा इतिहासकार आपल्या प्रवासामध्यें टायर या शहरीं गेला होता व तेथें त्यानें मेलकार्थ या देवतेचें देऊळ २३०० वर्षांपूर्वीं बांधलें असल्याचा उल्लेख केला आहे. यावरून टायर शहर ख्रि. पूर्व २७५० च्या सुमारास बांधलें गेलें असावें. फिनिशियन लोकांचें दुसरें शहर सिडोन हें टायर शहराच्यापूर्वीं वसविलेलें होतें व फिनिशियन लोकांना बायबल-मध्यें व होमरच्या काव्यांत सिडोनियन असें म्हटलें आहे. यावरून फिनिशियन लोकांची राजधानी प्रथम सिडोन या शहरीं असावी; परंतु नंतर टायर शहरास अधिक महत्त्व आलें. ख्रि. पूर्व १५ व्या शतकांत फिनिशियन लोकांची सिडोन व टायरप्रमाणेंच त्रिपलॉस, बैरूट आणि एकर हींहि उत्तम बंदरें व व्यापाराचीं केंद्रें होतीं. सध्यां बैरूटशिवाय बाकीचीं सर्व बंदरें गाळानें भरून गेलीं आहेत.

## फिनिशियन व्यापार—

फिनिशियन लोक आपणांस केणा असें म्हणवून घेत. यावरून ते प्रथम कॅनाइट असावेत. त्यांस ग्रीक लोकांनीं फिनिशियन हें नांव दिलें आहे. हें कदाचित् त्यांचा वर्ण तांबडा असावा म्हणून किंवा ते जांभळ्या रंगाचा व्यापार करीत यावरून मिळालें असावें. असीरियन लोकांच्या लेखांत यांस व यांच्या देशास अखर्र म्हणजे काळा देश असें नांव दिलेलें आढळतें. यांची भाषा हिब्रू भाषेसारखीच होती. परंतु हे भिन्न जातीचे असावेत असें वाटतें. ह्या लोकांचा स्वतःचा इतिहास नष्ट झाला आहे; त्यामुळें इतर लोकांच्या इतिहासांतून त्यांचेसंबंधीं जे उल्लेख येतात त्यांवरूनच त्यांची माहिती करून घ्यावी लागते. ख्रि. पू. १७ व्या शतकांत थातमिस तिसरा यानें यांच्यावर अमल बसवून यांच्यापासून सीरिया आणि पॅलेस्टाइनप्रमाणेंच कर वसूल केला होता. पुढें ख्रि. पू. १४ व्या शतकांत ईजिप्ती सत्ता हिटाइट लोकांच्या स्वाऱ्यांमुळें दुर्बल झाली असतां फिनिशिया देश स्वतंत्र झाला असावा. या कालांत त्यांचा व्यापार व धंदे पुष्कळच भरभराटीस गेले असावे. त्या वेळीं सिडोन येथील कांचेचें सामान व टायर येथील रंग फार प्रसिद्ध होते. तसेंच त्यांचा कापडाचा व भरतकाम, वगैरे कलाकुसरीच्याहि वस्तूंचा धंदा बराच वाढला होता. अर्थात् यांनीं आपल्या सर्व कला व धंदे ईजिप्त किंवा बाबिलोनियामधील लोकांपासूनच घेतले होते. व पुष्कळसा त्या देशांतीलच माल हे आपल्या गलबतांतून सर्वत्र नेऊन विकीत असल्यामुळें त्यांस बऱ्याच लेखकांनीं त्या मालाचे उत्पादक असें म्हटलें आहे. प्लिनी या ग्रंथकारानें कांचेचा शोध प्रथम फिनिशियन लोकांनीं लावला असें म्हटलें आहे. परंतु कांचेच्या बाटल्या प्रथम ईजिप्तमध्येंच तयार होत असत हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. टायर येथील रंग एका जातीच्या समुद्रांतील कालवापासून मिळत असत. फिनिशियन लोक कांशाचीं तऱ्हतऱ्हेचीं भांडीं, हस्तीदंती नक्षीचें काम आणि रत्नावरील खोदकाम यांबद्दल प्रसिद्ध असत. टायर येथून आणलेले कांशाचे दोन दरवाजे ब्रिटिश म्यूझियममध्यें आहेत. त्यांवर हे लोक निरनिराळीं कामें करीत असलेलीं चित्रें आहेत. होमर यानें सुवर्णमय पात्रांचा वगैरे सिडोनमधील म्हणून उल्लेख केला आहे. तसेंच टायर येथील हिराम राजानें सॉलोमन यास कुशल कारागीर पाठविण्याचें मान्य केल्याचें आपणांस बायबल-मध्यें दिसून येतें. याबद्दल सॉलोमन यानें हिराम यास तेल व मद्य पाठविण्याचें कबूल केलें असून गॅलिलीपैकीं काहीं मुलूखहि दिल्याचा उल्लेख आढळतो. फिनिशियन आणि हिब्रू देवळांत बरेंच साम्यहि आढळतें.

फिनिशियन लोक हे आपल्या देशांतील माल इतरत्र नेऊन विकीत असत. एवढेंच नव्हे तर त्याशिवाय ते इतर अनेक देशांतील माल इकडून तिकडे नेत-आणीत असत व त्याचा व्यापारहि करीत असत. त्यामुळें त्यांचा वाहतुकीचा धंदा भूमध्य-समुद्रांत मोठ्या प्रमाणावर चालू असे. सायप्रस बेटावर त्यांची मोठी वसाहत असून तेथें उत्पन्न होणाऱ्या धातूस कॉपर म्हणजे तांबें हें नांव त्या बेटावरूनच पडलें. मायसिनी येथील अवशेषांत त्यांच्या देवतांच्या ११ मूर्ति आढळून आल्या आहेत. कॉरिन्थच्या संयोगीभूमीवरहि त्यांचें प्राचीन काळीं एक देऊळ होतें.

'ओडेसी' या काव्यामध्यें वर्णन केल्याप्रमाणें फिनिशियन लोक लहान मुलांस व स्त्रियांस पळवून नेऊन दुसऱ्या देशांत गुलाम म्हणून विकीत असत ही गोष्ट युमियस याच्या गोष्टी-वरून दिसून येते.

हरणार्थ पंख असलेलें सूर्यबिंब त्यांनीं ईजिप्तपासून व पंख पसरलेलें गरुडाचें व सिंहाच्या डोक्याच्या आकृतीचें चित्र त्यांनीं बाबिलोनियन लोकांपासून घेतलें. ही पंखयुक्त सूर्याची प्रतिमा पुढें असुरी व इराणी लोकांनीं स्वीकारली व गरुडाचें चित्र ईजियन संस्कृतीमार्फत युरोपमध्यें गेलें व आज अमेरिकेंतहि तें प्रचलित आहे.

### हिटाइट वाङ्मय—

हिटाइट विटांवर गद्यशैलींतील बरेच ऐतिहासिक लेख दृष्टीस पडतात. त्यांचा वाङ्मयाकडे ओढा असे. त्यामुळें त्यांनीं बाबिलोनियांतील बऱ्याच कथा लिहून घेतलेल्या आढळतात. उदा., गिलगमेशची कथा सर्व आशिया मायनरमध्यें प्रसृत झालेली आढळून येते. मितन्नी लोकांपासून घेतलेला शालिहोत्र अथवा अश्वविद्येवरील एक ग्रंथ आढळतो. कांहीं लेखकांनीं लेखावर आपलीं नांवेंहि दिलेलीं आहेत. यांनीं आपल्या इमारतीवर खोदण्याकरितां एका नव्याच चित्रलिपीचा उपयोग केल्यामुळें त्यांच्या अनेक स्मारकांवर हीं चित्रयुक्त अक्षरें आढळतात. ह्या लेखांचें वाचन करण्याचा प्रयत्न हल्लीं चालू आहे.

### हिटाइट धर्म—

हिटाइट लोक दोन देवतासमूहाची पूजा करीत असावे : एक पृथ्वीवरचा व दुसरा द्युलोकांतील अथवा आकाशांतील. याच वेळीं क्नॉसस येथें ईजियन संस्कृति विकास पावली होती. व सहावें ट्रॉय शहर म्हणजे ज्याचें होमरनें आपल्या ईलियड या महाकाव्यांत वर्णन केलें आहे तें याच वेळीं भरभराटींत होतें. हिटाइट संस्कृति ही या दोहोंमधील दुव्यासारखी असून तिचीहि बरीच वाढ झाली होती. ग्रीक लोकांनीं आपली कला, शिल्प व धर्म यांचीं मूलतत्त्वें याच लोकांपासून घेतलीं. लोखंडाचा उपयोग प्रथम याच लोकांनीं शिकविला. तशीच यांनीं अनेक गोष्टींत सांस्कृतिक भर घातली व त्याच संस्कृतीची पुढें असीरिया, पर्शिया व इतर देशांत वाढ झाली.

या हिटाइट लोकांचीच बहुधा एक शाखा मितन्नी या नांवानें ओळखली जात असे. या लोकांचाहि हिटाइट लोक व ईजिप्ती लोक यांच्याशीं संघर्ष चालू असे म्हणून त्यांचीहि त्रोटक माहिती येथें देणें अवश्य आहे.

### मितन्नी—

हें राष्ट्र मेसापोटेमियामध्यें खि. पू. दोन हजार वर्षांच्या सुमारास स्थायिक होऊन राहिलें होतें. याची माहिती तेल एल अमर्ना येथें जे १८८७–८८ मध्यें इष्टिकालेख सांपडले त्यांवरून उपलब्ध झाली. तीवरून हें राष्ट्र उत्तर मेसापोटेमिया-मध्यें होतें व त्याचा ईजिप्त देशाशीं बराच संबंध आला होता असें दिसतें. या प्रदेशास आराम नहरायिम (दोन नद्यांमधील आराम) असें नांव होतें. बायबलमधील बलामचा या देशाशीं संबंध असावा (ड्यूट. २३-४). हे लोक हिटाइट लोकांपैकींच असावे असें एक मत आहे. कांहीं शास्त्रज्ञ यांस इराणी लोकांची शाखा समजतात. हिटाइट लोकांची राजधानी बोघाजकुई येथें १९०७ मध्यें शोधून काढण्यांत आली. यांपैकीं एक राजा दशरत्त या नांवाचा असून तो अमेन होतेप तिसरा (खि. पू. १४११–१३८९) याचा सासरा असावा असें तेल एल अमर्ना येथील इष्टिकालेखांवरून दिसतें. हा हिटाइट राजा सुप्पिलिल्युमा याचा समकालीन असावा. दशरत्त याच्या आधीं शोश्तर, अर्ततम पहिला आणि सुतर्ण पहिला हे राजे होऊन गेले होते व अर्ततम दुसरा, अर्तश्शुमर, मत्तुअझ आणि सुतर्ण दुसरा हे दशरत्तनंतर होऊन गेले. कांहीं विद्वानांचें असें मत आहे कीं, याच राजांनीं बाबिलोन येथील अमोराइट घराण्याचा पाडाव करून मेसापोटेमियामध्यें राज्याची स्थापना केली. मितन्नी लोक हिटाइट लिपिच वापरीत असत व त्यांच्याच देवतांची पूजा करीत. तेल एल अमर्ना येथें सांपडलेल्या बाणाग्र लिपींतील इष्टिकालेखावरून असें दिसून येतें कीं, दशरत्त राजाचा एक राजदूत ट्युनिप येथील राजा होता यावरून ट्युनिप अथवा अर्वाचीन टेनिप हें मितन्नी लोकांच्या अमलाखालीं होतें व तेथें मितन्नी भाषा चालू होती. ही मितन्नी भाषा कॉकेशिअन वंशांतील असून तिचें जॉर्जिअन भाषेशीं साम्य दिसतें.

### फिनिशियन—

यानंतर ईजिप्ती, असुरी, बाबिलोनी, हिटाइट व ईजिअन या संस्कृतींशीं ज्यांचा अनेक वेळां निकट संबंध आला व कांहीं लोकांचा ज्यांचेशीं विशेष संघर्ष झाला अशा एका लोकांची अथवा राष्ट्राची माहिती येथें देणें अवश्य आहे. या लोकांस फिनिशियन म्हणत. हे मुख्यतः व्यापारी होते व त्यामुळें त्यांची वस्ती बहुतेक बंदरांतून असून व्यापार निमित्तानें ते सर्वत्र जलपर्यटनें करीत व त्याबरोबर चांचेगिरीहि करीत. तसेंच आपल्या व्यापाराच्या संरक्षणाकरितां व संवर्धनाकरितां निरनिराळ्या प्रदेशांत वसाहती करून तटबंदी शहरें स्थापन करीत. वेदांमध्यें जे लोक पणी या नांवानें उल्लेखिले आहेत ते फिनिशियनच असावेत असें एक मत आहे. तसेंच 'पणिर्वणिक् भवति' असें एक वचन आहे. पणी हेहि व्यापारी असून त्यांनीं देवांच्या गायी चोरून नेल्याची कथा ऋग्वेदांत आहे व त्यांच्याकडे सरमा ही देवदूती गेल्याची कथा प्रसिद्ध आहे. यामुळें अनेक संस्कृतींशीं देवाण-

घेवाण करणारे हे लोक संस्कृतिप्रसाराच्या दृष्टीनें फार महत्त्वाचे असल्यामुळें त्यांची माहिती येथें देणें अवश्य आहे.

सीरियाच्या पश्चिमेस लेबानन पर्वत व भूमध्य समुद्र याच्या दरम्यान एक २०० मैल लांबीची व सुमारें १२ मैल रुंदीची पट्टी एकर बंदराच्या उत्तरेकडे पसरली आहे. हीस प्राचीन काळीं फिनिशिया असें नांव होतें. लेबानन पर्वतावरून बरेचसे पाण्याचे प्रवाह वाहत येत असल्यामुळें ती पट्टी फार सुपीक होती. लेबानन पर्वताची पूर्वेकडील बाजू सरळ उभी असल्यामुळें त्या बाजूनें शत्रु येण्याची भीति नव्हती व पश्चिमेकडील उतारावर भरपूर पाणी असल्यामुळें दाट जंगल वाढलें होतें व त्यांतील झाडांचा गलबतें बांधण्यासाठीं उपयोग करतां येत असे. त्यामुळें या ठिकाणीं नेहमीं होड्या व गलबतें बांधण्याचे कारखाने असत. खि. पूर्व ५ व्या शतकांत हिरोडोटस हा इतिहासकार आपल्या प्रवासामध्यें टायर या शहरीं गेला होता व तेथें त्यानें मेलकार्थ या देवतेचें देऊळ २३०० वर्षांपूर्वी बांधलें असल्याचा उल्लेख केला आहे. यावरून टायर शहर खि. पूर्व २७५० च्या सुमारास बांधलें गेलें असावें. फिनिशियन लोकांचें दुसरें शहर सिडोन हें टायर शहराच्यापूर्वी वसविलेलें होतें व फिनिशियन लोकांना बायबल-मध्यें व होमरच्या काव्यांत सिडोनियन असें म्हटलें आहे. यावरून फिनिशियन लोकांची राजधानी प्रथम सिडोन या शहरीं असावी; परंतु नंतर टायर शहरास अधिक महत्त्व आलें. खि. पूर्व १५ व्या शतकांत फिनिशियन लोकांची सिडोन व टायरप्रमाणेंच बिबलॉस, बैरूट आणि एकर हींहि उत्तम बंदरें व व्यापाराचीं केंद्रें होतीं. सध्यां बैरूटशिवाय बाकीचीं सर्व बंदरें गाळानें भरून गेलीं आहेत.

### फिनिशियन व्यापार—

फिनिशियन लोक आपणांस केणा असें म्हणवून घेत. यावरून ते प्रथम कॅनाइट असावेत. त्यांस ग्रीक लोकांनीं फिनिशियन हें नांव दिलें आहे. हें कदाचित् त्यांचा वर्ण तांबडा असावा म्हणून किंवा ते जांभळ्या रंगाचा व्यापार करीत यावरून मिळालें असावें. असीरियन लोकाच्या लेखांत यांस व यांच्या देशास अखर्र म्हणजे काळा देश असें नांव दिलेलें आढळतें. यांची भाषा हिब्रू भाषेसारखीच होती. परंतु हे भिन्न जातीचे असावेत असें वाटतें. ह्या लोकांचा स्वतःचा इतिहास नष्ट झाला आहे; त्यामुळें इतर लोकांच्या इतिहासांतून त्यांचेसंबंधीं जे उल्लेख येतात त्यांवरूनच त्यांची माहिती करून घ्यावी लागते. खि. पू. १७ व्या शतकांत थातमिस तिसरा यानें यांच्यावर अमल बसवून यांच्यापासून सीरिया आणि पॅलेस्टाइनप्रमाणेंच कर वसूल केला होता. पुढें खि. पू. १४ व्या शतकांत ईजिप्ती सत्ता हिटाइट लोकांच्या स्वाऱ्यांमुळें दुर्बल झाली असतां फिनिशिया देश स्वतंत्र झाला असावा. या कालांत त्यांचा व्यापार व धंदे पुष्कळच भरभराटीस गेले असावे. त्या वेळीं सिडोन येथील कांचेचें सामान व टायर येथील रंग फार प्रसिद्ध होते. तसेंच त्यांचा कापडाचा व भरतकाम, वगैरे कलाकुसरीच्याहि वस्तूंचा धंदा बराच वाढला होता. अर्थात् यांनीं आपल्या सर्व कला व धंदे ईजिप्त किंवा बाबिलोनियामधील लोकांपासूनच घेतले होते. व पुष्कळसा त्या देशांतीलच माल हे आपल्या गलबतांतून सर्वत्र नेऊन विकीत असल्यामुळें त्यांस बऱ्याच लेखकांनीं त्या मालाचे उत्पादक असें म्हटलें आहे. प्लिनी या ग्रंथकारानें कांचेचा शोध प्रथम फिनिशियन लोकांनीं लावला असें म्हटलें आहे. परंतु कांचेच्या बाटल्या प्रथम ईजिप्तमध्येंच तयार होत असत हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. टायर येथील रंग एका जातीच्या समुद्रांतील कालवापासून मिळत असत. फिनिशियन लोक कांशाचीं तऱ्हेतऱ्हेचीं भांडीं, हस्तीदंती नक्षीचें काम आणि रत्नावरील खोदकाम यांबद्दल प्रसिद्ध असत. टायर येथून आणलेले कांशाचे दोन दरवाजे ब्रिटिश म्यूझियममध्यें आहेत. त्यांवर हे लोक निरनिराळीं कामें करीत असलेलीं चित्रें आहेत. होमर यानें सुवर्णमय पात्रांचा वगैरे सिडोनमधील म्हणून उल्लेख केला आहे. तसेंच टायर येथील हिराम राजानें सॉलोमन यास कुशल कारागीर पाठविण्याचें मान्य केल्याचें आपणांस बायबल-मध्यें दिसून येतें. याबद्दल सॉलोमन यानें हिराम यास तेल व मद्य पाठविण्याचें कबूल केलें असून गॉलिलीपैकीं कांहीं मुलूखहि दिल्याचा उल्लेख आढळतो. फिनिशियन आणि हिब्रू देवळांत बरेंच साम्यहि आढळतें.

फिनिशियन लोक हे आपल्या देशांतील माल इतरत्र नेऊन विकीत असत. एवढेंच नव्हे तर त्याशिवाय ते इतर अनेक देशांतील माल इकडून तिकडे नेत-आणीत असत व त्याचा व्यापारहि करीत असत. त्यामुळें त्यांचा वाहतुकीचा धंदा भूमध्य-समुद्रांत मोठ्या प्रमाणावर चालू असे. सायप्रस बेटावर त्यांची मोठी वसाहत असून तेथें उत्पन्न होणाऱ्या धातूस कॉपर म्हणजे तांबें हें नांव त्या बेटावरूनच पडलें. मायसिनी येथील अव-शेषांत त्यांच्या देवतांच्या ११ मूर्ति आढळून आल्या आहेत. कॉरिन्थच्या संयोगीभूमीवरहि त्यांचें प्राचीन काळीं एक देऊळ होतें.

'ओडेसी' या काव्यामध्यें वर्णन केल्याप्रमाणें फिनिशियन लोक लहान मुलांस व स्त्रियांस पळवून नेऊन दुसऱ्या देशांत गुलाम म्हणून विकीत असत ही गोष्ट युमियस याच्या गोष्टी-वरून दिसून येते.

### फिनिशियन लिपि—

ग्रीक लोकांनीं आपली वर्णमाला फिनिशियन लोकांपासून घेतली. परंतु फिनिशियन लोकांस वर्णमालेचा परिचय यापूर्वीच ईजिप्तमधील लेख, अक्कड व बाबिलोनियामधील बाणाग्र लिपींतील लेख व हिटाइट लेख यांच्यावरून झाला होता ही गोष्ट आपण मागें पाहिलीच आहे. फिनीशियन लोकांनीं या लिपींत कांहीं सुधारणा व सोयी करून आपली लिपि बनविली असावी.

ग्रीक लोकांनीं आपलें नाविक कौशल्यहि फिनिशियन लोकांपासून घेतलें ही गोष्ट स्पष्ट आहे; कारण त्यांचीं गलबतें प्रथम फिनिशियन लोकांच्या गलबतांप्रमाणेंच असत व उत्तर ध्रुवाच्या ताऱ्यास ते फिनिशियन तारा म्हणत. झेनोफोन या ग्रीक ग्रंथकारानें फिनिशियन गलबतावर प्रत्येक गोष्ट किती व्यवस्थित रीतीनें मांडलेली असे, याचें वर्णन केलें आहे. सार्गन व सेनाचेरीब यांच्या शिल्पकामांत फिनिशियन गलबतांचीं चित्रें असून त्यांत वल्ह्यांच्या दुहेरी रांगा आहेत. या गलबतांच्या साह्यानें फिनिशियन लोकांनीं निरनिराळ्या प्रदेशांत आपल्या वसाहती स्थापन केल्या. यांपैकीं सर्वांत दूरची वसाहत ग्वाडाल क्विव्हिर नदीवर तार्सीस येथें होती. येथून ते चांदी आणीत असत. ती तेथें इतकी स्वस्त असे कीं, डायोडोरस या ग्रंथकारानें हे लोक तेथून येतांना आपल्या गलबतांचे नांगरहि चांदीचे करून आणीत, असें वर्णन केलें आहे. कथिलाकरितां फिनिशियन जहाजें ब्रिटनपर्यंत प्रवास करून कॉर्नवॉलमधील खाणींतील कथील नेत असत, असें वर्णन आढळतें. ब्रिटनमधील लोकांचा बाहेरच्या जगाशीं संबंध प्रथम याच लोकांमार्फत आला. फिनिशियन लोकांनीं ख्रि. पू. ११०० मध्यें गेडीझ (केडीज) आणि यूटिका येथें व ८१४ मध्यें कार्थेज येथें वसाहती स्थापन केल्या. यूटिका व कार्थेज हीं आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर असून त्यांच्या आसपासहि फिनिशियन लोकांच्या लहानमोठ्या वसाहती असत. त्याप्रमाणेंच स्पेनच्या व सिसिली बेटाच्या किनाऱ्यावरहि त्यांनीं वसाहती केल्या होत्या. या सर्व वसाहतींमार्फत त्यांचा व्यापार सर्वत्र चालत असे व दरवर्षी टायर येथील मेलकार्थ या देवतेच्या उत्सवाकरितां प्रत्येक वसाहतीस आपल्या उत्पन्नाचा १० वा हिस्सा पाठवावा लागत असे. टायरच्या वैभवाचें इझीकेल या प्रवक्त्यानें फार मजेदार वर्णन केलें आहे.

### फिनिशियन जलपर्यटन—

ईजिप्तचा फॅरो नेको यानें आफ्रिकेचा किनारा शोधून काढण्याकरितां एक आरमार पाठविलें. त्या वेळीं (ख्रि. पूर्व सातव्या शतकांत) त्यानें फिनिशियन लोकांपासूनच मुख्य जहाजें व खलाशी घेतले होते. हें आरमार तांबड्या समुद्रांतून अरबी उपसागरांतून दक्षिणेकडे गेलें. तेव्हां त्यांना पूर्वी जो सूर्य दक्षिण दिशेस दिसत असे तो उत्तरेस दिसूं लागला. हें आरमार आफ्रिकेस वळसा घालून जिब्राल्टरच्या सामुद्रधुनींतून ईजिप्तला ३ वर्षांनीं परत आलें. नंतर एका शतकानें हॅनो या नांवाच्या कार्थेजमधील एका अधिकाऱ्यानें ६० गलबतें घेऊन आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर संशोधनाकरितां एक सफर केली. या सफरीबद्दलचा एक लेख त्यानें मोलॉकच्या देवळावर खोदून ठेवला होता. त्याचें ग्रीक भाषांतर उपलब्ध आहे. त्यानें आपल्या सफरीमध्यें बऱ्याच ठिकाणीं व्यापारी ठाणीं स्थापन केलीं व इतरहि भौगोलिक माहिती गोळा केली. त्यापैकीं बरीचशी आतां पडताळून पाहण्यांत आली आहे. कार्थिजिनियन लोकांनीं युरोपमधील लोकांशीं अनेक युद्धें केलीं. प्रथम ख्रि. पूर्व ५ व्या शतकांत त्यांचें सिसिली बेटांतील वसाहतीबद्दल ग्रीक लोकांशीं युद्ध झालें. नंतर रोमन लोकांशीं त्यांचीं तीन फिनिशियन अथवा 'प्यूनिक' नांवाचीं युद्धें झालीं. त्यांमध्यें हमिलकार, हस्ड्रुबाल व हॅनीबाल असे तीन योद्धे बरेच चमकले. परंतु अखेरीस त्यांचा पराजय झाला.

ख्रि. पूर्व ७ व्या शतकांतच नेबूचाडनेझर यानें सिडोन शहर पादाक्रांत करून तेथील लोकांची कत्तल केली. नंतर टायर शहरास १३ वर्षें वेढा देऊन बसून तें शहर पादाक्रांत केलें. व तेथील राजास बाबिलोन येथें कैद करून नेलें. याप्रमाणें फिनिशिया देश बाबिलोनचा मांडलिक बनला. ख्रि. पू. ५२७ मध्यें कंबायसीसनें फिनिशिया काबीज करून आपली एक सत्रपी बनविली. सिडोन येथें अखेरच्या घराण्यानें ख्रि. पूर्व ४६० ते ३६३ पर्यंत राज्य केलें. अखेरीस अलेक्झांडरनें त्याचा पाडाव करून फिनिशियन राज्य बुडविलें. सिडोननंतर बिबलास आणि आराड्स हीं शहरें त्यानें जिंकून घेतलीं व टायर शहरानें शरण येण्याचें नाकारल्यामुळें त्या शहरास त्यानें सात महिने वेढा दिला. तें बेट असल्यामुळें हल्ला करून घेण्यास कठिण होतें म्हणून किनाऱ्यापासून बेटापर्यंत त्यानें एक बांध किंवा धक्का बांधला. त्याचे अवशेष अद्यापि दृष्टीस पडतात. हें शहर घेतल्यावर त्यानें तेथील हजारों लोकांची कत्तल करून ३०,००० लोकांस गुलाम म्हणून विकलें. या लोकांनीं आपलीं बायकामुलें आधींच कार्थेज येथें पाठवून दिलीं होतीं. टायर किंवा तीर याचें प्राचीन नांव सुर अथवा सीर असें होतें व अरबी भाषेमध्यें अजूनहि हेंच नांव प्रचलित आहे. व त्यावरूनच सीरिया हें त्या प्रदेशास नांव मिळालें.

### फिनिशियन धर्म—

फिनिशियन लोक सूर्य, चंद्र व पृथ्वी आणि नद्या, कुरणें व

जलाशय यांस पवित्र मानीत असत. ते सूर्यदेवतेची उपासना करीत व चंद्र ही त्याची पत्नी मानीत. तसेंच पृथ्वी अथवा अस्तोरेत हीसहि सूर्याची पत्नी मानीत असत. सूर्यदेवतेची निरनिराळ्या गांवीं निरनिराळीं नांवें असत. कांहीं ठिकाणीं त्यास एल हें नांव असे तर कांहीं ठिकाणीं बाल हें नांव असे. टायर येथें मेलकार्थ हें नांव असे. पण यांच्या देवळांत सूर्याची प्रतिमा कोठेंहि आढळली नाहीं. जरी हे निरनिराळ्या कांहीं लहानसान देवता मानीत तरी सूर्य हीच मुख्य देवता मानून ते एकेश्वरी मताचे असत. त्या वेळीं सूर्याची उपासना निरनिराळ्या नांवांनीं सर्वत्र चालू असे. हिटाइट लोक त्यास सेथ किंवा सुतेख म्हणत. कॅननाइट व फिनिशियन एल असें नांव देत किंवा जेहो किंवा जाह असेंहि म्हणत. बाल म्हणजे सर्वश्रेष्ठ हें नांव सर्वत्र होतें. केल्ट आणि ब्रिटन लोकांतहि बेल्टेन म्हणजे बालचा अग्नि या शब्दानें सूर्यपूजेची परंपरा दिसून येते.

या देवतेकरितां नरमेध करण्याचीहि या लोकांत चाल असावी असें कांहीं ग्रंथकारांच्या लेखांवरून दिसतें.

टायर शहराच्या पाडावानंतर कार्थेज हें काय तें फिनिशियन लोकांचें महत्त्वाचें केन्द्र राहिलें. याखेरीज सिसिली बेट, आफ्रिकेचा उत्तर किनारा व स्पेनचा पूर्व किनारा यांवर त्यांच्या कांहीं वसाहती होत्या, परंतु रोमशीं झालेल्या प्यूनिक युद्धानंतर त्यांचा अखेरचा पराजय झाला व रोमन लोकांनीं अक्षरशः कार्थेज शहरावर नांगर फिरवला. तेव्हांपासून हें राष्ट्र शब्दशः नामशेष झालें.

हिब्रू—

यानंतर फिनिशियन लोकांसारख्याच वणिक्वृत्तीच्या पण त्यापेक्षां अधिक चिकाटीच्या व आज आपलें अस्तित्व जगावर कायम ठेवलेल्या अशा एका प्राचीन इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या राष्ट्राकडे म्हणजेच यहुदी अथवा हिब्रू या राष्ट्राकडे आपणांस लक्ष देणें अवश्य आहे. या लोकांस स्वतःची भूमि नसून त्यांनीं आपले आचारविचार व परंपरा अद्यापपर्यंत कायम ठेवली आहे व आपला स्वभाव बदललेला नाहीं. यांनीं जो इतिहास व परंपरा रक्षण केली आहे, तिचाच अन्तर्भाव बायबलच्या जुन्या करारांत करण्यांत आलेला आहे व इस्लामी जनहि तो मान्य करतात. याप्रमाणें प्राचीन कालापासून आपला इतिहास जतन करून ठेवणारे व ख्रिस्ती व महंमदी या जगद्व्यापी दोन संप्रदायांस जन्म देणारे म्हणून हे लोक संस्कृतीच्या इतिहासांत फार महत्त्वाचे आहेत. म्हणून त्यांची येथें त्रोटक माहिती देणें अवश्य आहे.

यहुदी राष्ट्राचा इतिहास इतर सर्व राष्ट्रांपेक्षां अगदीं विचित्र आहे. यांचा प्राचीन कालचा इतिहास अगदीं निश्चितपणें सांगणें जरा कठीण आहे. यांनीं जरी आपला इतिहास बऱ्याच प्राचीन कालापासून लिहून ठेवलेला आहे तरी तो वरचेवर पुन्हां पुन्हा लिहिला गेला आहे व हें लेखन उद्देशपूर्वक झालेलें आहे. त्यामुळें अलीकडे जें नवीन नवीन संशोधन होत आहे त्यामुळें या प्राचीन लिखित इतिहासामध्यें कांहीं फेरफार करणें अवश्य होत आहे. कांहीं जुने इष्टिकालेख सांपडले आहेत त्यांवरून जोशुआच्या पूर्वींहि पॅलेस्टाइनमध्यें यहुदी लोकांची वस्ती होती असें दिसून येतें. जेरिको शहर उध्वस्त झालें व भूकंपामुळें त्याचा नाश झाला ही गोष्ट आतां स्पष्ट झाली आहे व या गोष्टीचा कालहि इतिहासाशीं जुळता आहे. तसेंच ईजिप्तमध्यें येब येथें त्यांचें एक देवालय होतें हीहि गोष्ट स्पष्ट झाली आहे. मात्र निरनिराळ्या व्यक्तींबद्दल—उदाहरणार्थ, अब्राहम, मोझेस व डेव्हिड यांच्यासंबंधीं ऐतिहासिक म्हणून जी माहिती देण्यांत आली आहे तिचें थोडेंफार पौराणिक स्वरूप उघड होऊं लागलें आहे. परंतु त्यांतहि तथ्यांश पुष्कळच आहे हीहि गोष्ट तितकीच खरी आहे. यहुदी लोकांच्या इतिहासाचें महत्त्व फार आहे; कारण तो एका राष्ट्राचा इतिहास आहे. आज जगामध्यें आपल्या वंशाची तीव्र जाणीव असणारे लोक यांच्यासारखे दुसरे कोठें आढळत नाहींत. यांस स्वतःची भूमि नसल्यामुळें ते सर्व जगभर पसरले आहेत व अनेक ठिकाणीं बाह्यतः देश्य लोकांप्रमाणें वागूं लागले आहेत. तथापि त्यांस सर्वत्र परकीय मानण्यांत येत आहे. हे लोक फक्त आपसांतच विवाह करतात, आपल्या चालीरीती, सण व उत्सव पाळतात. कारण त्यांस ही गोष्ट निश्चितपणें मान्य आहे कीं, जर आपली जात राखावयाची असेल तर ती आपले विधी व संस्कार आणि आचारनियम बिनचूक पाळण्यानेंच राहूं शकेल व याकरितां अन्तर्विवाह हा अवश्य आहे. याप्रमाणें अलग राहिलेली दुसरी जात क्वचितच आढळेल. तसेंच ख्रिस्ती धर्मापूर्वीचे सर्व धर्म, हिंदू, बौद्ध व झोरोआस्टर यांचे धर्म वगळल्यास, पूर्णपणें नष्ट झाले आहेत. पण यांचा धर्म टिकून राहिला आहे. अर्थात् त्यामध्यें कालानुसार थोडाफार बदल झाला असेल, पण यांच्या धर्मातील तत्त्वें किंवा त्यांकडे पाहण्याची वृत्ति फारशी बदललेली नाहीं. या लोकांत जर सुधारणावाद किंवा उदारमतवाद शिरला असता तर हें राष्ट्र दीर्घकाल टिकलें नसतें व मिश्रविवाहामुळें तें इतर समाजांत मिसळून गेलें असतें. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे पश्चिमेकडील कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट व इतर ख्रिस्ती संप्रदाय आणि इस्लाम यांचा पाया या धर्मावर आधारलेला आहे व त्यांत एकेश्वरी मत आहे हें मुख्य आहे. या सर्व गोष्टी घडून कशा आल्या हें आपणांस पाहावयाचें आहे.

### पॅलेस्टाइन—

पूर्वी जी सुपीक चंद्रकोर म्हणून एक प्रदेशाची पट्टी वर्णन केली आहे तिच्या पश्चिमेकडील बाजूस पॅलेस्टाइन या नांवाचा एक प्रदेश आहे. या प्रदेशास पॅलेस्टाइन हें नांव पडण्याचें कारण फिलिस्टाइन या नांवाच्या लोकांनीं या प्रदेशांत प्रथम वस्ती केली होती हें होय. हा प्रदेश भूमध्यसमुद्राच्या आग्नेयीस असून या समुद्राच्या व पलीकडील वाळवंटाच्या दरम्यान अरुंद पट्टीसारखा पसरलेला आहे. ही पट्टी सुमारें १५० मैल लांब असून १० मैल रुंदीची आहे. यापैकीं बराचसा भाग नापीकच आहे. उत्तरेचा भाग मात्र कांहींसा सुपीक आहे. या प्रदेशांत फक्त हिंवाळ्यांत कांहीं पाऊस पडतो. याच्या किनाऱ्यावर चांगलेंसें बंदरहि नाहीं. या पट्टीमध्यें प्रथम अनातोलियन लोकांची वस्ती होती, व त्यांचें मिश्रण पुढें हिब्रू लोकांमध्यें झालेलें आढळून येतें. या प्रदेशांत आपणांस ईजिप्त, ईजियन बेटें व बाबिलोनिया या तिन्ही प्रदेशांतील व्यापारी वगैरे लोकांची रहदारी बरेच दिवसांपासून चालू असलेली दिसते. व्यापारी लोकांप्रमाणेंच निरनिराळ्या राष्ट्रांचे सैनिकहि येथें येऊन धुमाकूळ घालीत असत, व त्यांचीं वरचेवर युद्धेंहि होत असत. कारण हा प्रदेश नाइल व युफ्रेटीस या दोन्ही नद्यांच्या खोऱ्यांच्या दरम्यान वसलेला होता, व मेगीडो ( आर्मगेडॉन ) किल्ल्याच्या पायथ्याशीं असलेली जमीन ही एक कायमचीच रणभूमि होती. या प्रदेशावर प्रथम ईजिप्तचा ताबा होता, नंतर असीरिया व खाल्डिया यांच्या ताब्यांत हा प्रदेश गेला व अखेरीस इराणची यावर सत्ता स्थापन झाली. यामुळें ज्या वेळीं हिब्रू लोकांनीं या प्रदेशांत प्रवेश केला, तेव्हां ते येथें फार दिवस स्वतंत्र राहतील असा मुळींच संभव नव्हता.

हिब्रू लोक हें प्रथम अरबस्तानच्या वाळवंटांत आपले गुरांचे व मेंढ्यांचे कळप चारीत हिंडत असत. हे लोक ख्रिस्तपूर्व १४०० ते १२०० या काळांत पॅलेस्टाइनमध्यें वस्ती करावयास आले. मध्यंतरीं पॅलेस्टाइनमध्यें दुष्काळ पडला तेव्हां ते गोशेन या प्रांतांत कांहीं काळ जाऊन राहिले. तसेंच हिक्सॉस राजांच्या कारकीर्दींत यांच्यापैकीं जोसेफ हा एक अधिकारी होता. कांहीं काळ यांच्यापैकीं कांहीं लोक ईजिप्तमध्यें रामेसीस दुसरा याच्या कारकीर्दींत गुलामगिरींत होते. त्यांस ख्रि. पू. १३२० च्या सुमारास गुलामगिरींतून सोडवून त्यांचा पुढारी मोझेस यानें पॅलेस्टाइनमध्यें आणिलें. या वेळीं दुसऱ्या रामेसिसचा मुलगा मेनेफ्था हा गादीवर होता. अलीकडील शोधांवरून असें दिसून येतें कीं, मोझेस हा प्रत्यक्ष पॅलेस्टाइनमध्यें आला नाहीं तर जोशुआ यानें या लोकांस कॅनानमध्यें आणलें व शेती सुरू केली. या नवीन शोधामुळें मोझेसच्या एकंदर चरित्राची कल्पनाच पूर्वीपेक्षां बरीच बदलावी लागेल व सॅमसन याबद्दलच्या कथाहि पौराणिक या सदरांत घालाव्या लागतील. कांहीं विद्वान् लोक तर सॅमसन याचा सेमेटिक सूर्यदेवता शेमशा याशीं संबंध जोडतात. त्या वेळीं या प्रदेशांत कॅननाइट लोक आधींच वस्ती करून राहिले होते. या कॅनानाइट लोकांचीं कांहीं दुर्बल असलेलीं गांवें हिब्रू लोकांनीं काबीज केलीं. हिब्रू लोक ज्या वेळीं या प्रदेशांत आले त्या वेळीं तेथें आधींच संस्कृतीची बरीच वाढ झाली होती. तेथील लोक चांगलीं घरें बांधून राहत व त्यांच्यामध्यें उद्योगधंदे व व्यापार, तसेंच राज्यव्यवस्था यांची बरीच प्रगति झाली होती. त्यांस लेखनकला अवगत होती. व त्यांमध्यें धार्मिक कल्पनांचीहि वाढ बरीच झाली होती. गोपवृत्ति हिब्रू लोक हे स्वतः असंस्कृतच होते. परंतु त्यांनीं या लोकांच्या संस्कृतीचा लवकरच स्वीकार केला व त्या लोकांशीं ते बऱ्याच अंशानें मिसळून गेले. त्यामुळें त्यांच्या आयुष्यक्रमांतहि बराच फरक पडला. ते आतां तंबूंच्या ऐवजीं घरें बांधून राहूं लागले व मेंढ्यांचीं कातडीं टाकून लोकरीचीं वस्त्रें वापरूं लागले. याप्रमाणें त्यांनीं बहुतेक कॅननाइट संस्कृतीचा स्वीकार केला. व त्यांच्याशीं विवाहसंबंधहि केले. अर्थात् हा फरक सर्व लोकांत एकदम घडून आला नाहीं. दक्षिणेकडील लोकांनीं आपल्या आयुष्यक्रमांत फारसा फरक केला नाहीं.

### हिब्रू लोकांचें राज्य—

या वेळीं ईजिप्तचें राज्य कमकुवत झालें होतें व असुर राष्ट्रहि अद्यापि इकडे स्वाऱ्या करूं लागलें नव्हतें. परंतु याच सुमारास ( ख्रिस्तपूर्व ११०० ) ईजियन बेटांतून फिलिस्टाइन नांवाचे लोक या प्रदेशांत आले. ते सुसंस्कृत व लढाऊ वृत्तीचे होते. यांनीं हिब्रू लोकांवर बरेंच आक्रमण केलें. अखेरीस हिब्रू लोकांनीं सॉल नांवाच्या एका पुढाऱ्यास राज्यपद देऊन एक संघ बनविण्याचा प्रयत्न केला. सॉल हा दक्षिणेकडील व जुन्या मताचा मनुष्य असल्यामुळें घरापेक्षां तंबूंत राहणें व जुन्या चालीरीतींस अनुसरून वागणें अधिक पसंत करीत असे. अखेरीस यानें फिलिस्टाइन लोकांशीं झगडत असतां पराभव पावून आत्महत्या केली. याचा एक अनुयायी डेव्हिड यानें जेरुसलेम येथील किल्ला काबीज केला व तेथें राजा बनून तो राज्य करूं लागला. यानें उत्तरेकडील लोकांसहि आपल्या सत्तेखालीं आणलें आणि फिलिस्टाइन लोकांचा पराभव केला. याच्या नांवावर बरींच स्तोत्रें प्रचलित आहेत.

### सॉलोमन—

याचा मुलगा सॉलोमन हा राजा झाल्यावर त्यानें व्यापाराकडे

अधिक लक्ष दिलें. व टायर येथील राजा हिराम याच्याशीं भागी करून बरीच संपत्ति मिळविली. व त्याच्याकडून कारागीर मिळवून आणून जेरुसलेममध्यें आतांपर्यंत तंबूमध्यें जो देव होता त्याची एक भव्य देवालय बांधून त्यांत स्थापना केली. यानें ईजिप्तच्या राज्यकन्येशीं लग्न केलें होतें. वरील देऊळ बांधण्याकरितां त्यानें प्रजेवर जबर कर बसविले, त्यामुळें उत्तरेकडील लोक स्वतंत्र होऊन त्यांनीं आपलें स्वतंत्र राज्य स्थापन केलें (ख्रिस्तपूर्व ९३०). या राज्यास इस्रायल असें नांव मिळालें; व दक्षिणेकडील राज्य जूडा या नांवानें प्रसिद्ध झालें. उत्तरेकडील राज्य अधिक श्रीमंत व भरभराटलेलें असे व दक्षिणेकडील लोक गरीब असून अद्यापि आपले कळप घेऊन फिरत असत. अर्थात् या दोन राज्यांमध्यें वैमनस्य उत्पन्न होऊन त्यांच्या धर्मामध्येंहि फरक पडत गेला. इथिओपियांतील शेबा येथून एक राणी याच्याकडे आली होती व तिनें त्यास पुष्कळ द्रव्य दिलें. उत्तरेकडील लोक फिलिस्टाइन लोकांच्या बाल ह्या स्थानिक देवतेची पूजा करीत, तर दक्षिणेकडील लोक आपल्या यव्हे ह्या एकाच देवतेस भजत. यामुळें यव्हे हा सामान्य जनतेचा देव व बाल हा श्रीमंत आणि अन्यायी लोकांचा देव अशी या लोकांत समजूत रूढ झाली, व अशा प्रकारचीं उदाहरणेंहि घडून आलीं. उदा., उत्तरेकडील आहाब नांवाच्या एका राजानें नबोथ नांवाच्या एका गरीब मनुष्याचा द्राक्षांचा मळा आपला राजवाडा बांधण्याकरिता जुलुमानें घेतला. याबद्दल एलिझा नांवाच्या एका दक्षिणेकडील हिब्रूनें आहाबच्या दरबारांत जाऊन त्याची निर्भर्त्सना केली. दक्षिणेकडील लोक आपली पशुपालवृत्तिच पसंत करीत. याचीं उदाहरणें म्हणजे अब्राहाम, इसाब, जेकब आणि जोसेफ यांचीं चरित्रें होत. तसेंच बेथेल येथें ॲमास यानें सर्व चैनी आयुष्याची केलेली निर्भर्त्सना ही याच वृत्तीची द्योतक होय.

हळूहळू हिब्रू लोक लेखनकलेंत प्रवीण झाले व त्यांनीं फिनिशियन आणि अरेमियन व्यापाऱ्यांपासून वर्णमाला घेऊन ईजिप्तमधील पापीरस, शाई व लेखणी यांच्या साहाय्यानें लेखनास आरंभ केला. या काळचे हिब्रू लोकांनीं लिहिलेले लेख उपलब्ध झाले आहेत. तथापि या लोकांनीं लेखनकलेप्रमाणेंच चित्रकला, शिल्प, वास्तुशास्त्र, यांमध्यें प्रगति केली नाहीं. या गोष्टींकरितां ते आपले शेजारी ईजिप्त, फिनिशिया, दमास्कस किंवा असीरिया यांवर अवलंबून असत.

यानंतर थोड्याच काळानें (ख्रि. पू. ७२२) शाल्मनेसर याच्या कारकीर्दीत असीरियन लोकांनीं उत्तरेकडील राज्याची राजधानी समरिया ही काबीज केली व तेथील हिब्रू लोकांस कैदी करून घेऊन गेले व समरिया या ठिकाणीं वसाहत स्थापन केली. त्या लोकांस समारिटन असें म्हणत. याप्रमाणें इस्रायल ह्या राष्ट्राचा नाश झाला.



### जेरुसलेमचा नाश—

या वेळीं जेरुसलेममधील लोकांस असुरी सत्तेची भीति वाटूं लागून आपल्या शहरावरहि असुरी सत्तेचें लवकरच आक्रमण होईल अशी धास्ती वाटूं लागली, परंतु ईसाया ह्या प्रवक्त्यानें त्यास धीर देऊन परमेश्वराची सत्ता सर्वश्रेष्ठ आहे व तो पातकी लोकास एखाद्या मध्यस्थाच्या हातून शिक्षा करवितो असा उपदेश केला व परमेश्वरावर विश्वास ठेवण्यास सांगितलें. याच वेळीं (ख्रिस्तपूर्व ७००) सेनाचेरीब या असुर राजाचें सैन्य नाइल नदीच्या पूर्वेकडील दलदलींत हिंवतापानें किंवा प्लेगमुळें नाश पावल्यामुळें जेरुसलेमवरील संकट टळलें. यानंतर एक शतकानें ख्रि. पूर्व ६१२ त निनेव्हे या शहराचा व असुर सत्तेचा नाश झाला. परंतु लवकरच खाल्डियन लोकांनीं पॅलेस्टाइनवर सत्ता स्थापन केली. व ख्रि. पू. ५८६ या वर्षी नेबुचॅडनेझर या खाल्डियन राजानें जेरुसलेम शहराचा नाश करून यहुदी लोकांस गुलाम करून बाबिलोनिया येथें नेलें. याप्रमाणें उत्तरेकडील व दक्षिणेकडील दोन्ही हिब्रू राज्यें नष्ट झालीं. उत्तरेकडील इस्रायल लोकांच्या दहा जमाती होत्या व दक्षिणेकडील जूडा लोकांच्या दोन जमाती होत्या. त्यांपैकीं इस्रायलांच्या सर्व जमाती नष्ट झाल्या व जुडा लोकांपैकींहि बाबिलोनियाहून फार थोडे परत आले. कांहीं यहुदी लोक ईजिप्तमध्यें पळून गेले, त्यांमध्यें जेरेमिया हा एक प्रवक्ता होता. यानें एलेफंटाइन या गांवीं ईजिप्तमध्यें एक वसाहत स्थापन केली व तेथें एक देऊळ बांधलें. जेरेमिया यानें तर असा उपदेश चालविला होता कीं, प्रत्येकानें हृदय देवळापेक्षां आपल्या अंतःकरणांतच देऊळ बांधावें. यहुदी लोक याप्रमाणें परांगदा असतां त्यांच्यांतील कांहीं प्रवक्ते त्यांचा हा देशत्याग ही पातकाबद्दलची शिक्षा असून परमेश्वरावर भरंवसा ठेवल्यास पुन्हां पूर्वीचें वैभव प्राप्त होईल, असा उपदेश करीत असत. अखेरीस सायरस या इराणी राजानें ख्रिस्तपूर्व ५३८ मध्यें बाबिलोन शहर जिंकल्यावर यहुदी लोकांची तेथून सुटका केली व ते पुन्हां पॅलेटाइनमध्यें येऊन वस्ती करून राहिले व कांहीं वर्षांनीं त्यांनीं पुन्हा आपलें देऊळ बांधलें.

हें देऊळ बांधण्याच्या कामींहि त्यांस समारिटन लोकांनीं बराच अडथळा केला. अखेरीस इराणी बादशहा अर्टाक्झर्क्झीस यानें ज्याचा मद्यपात्र धारण करणारा नेहेमिया यास जेरुसलेम शहरास तटबंदी करण्याचा परवाना दिला (ख्रि. पू. ४४४). हें जेरुसलेम शहर अलेक्झांडरच्या सेनापतीनें घेऊन तेथील लोकांस

अलेक्झांड्रिया व सायरेनी येथें वसाहत करण्यास लावलें. अलेक्झांड्रिया या ठिकाणीं वस्ती केल्यामुळें त्यांच्या 'सेप्तुआजिंट' (सप्ततिसंस्था) या ग्रंथाची रचना झाली. हें जुन्या करारांचें ग्रीक भाषेंतील भाषांतर होय.

या वेळीं जेरुसलेम येथें ज्युपिटर देवतेची स्थापना होऊन सर्व संस्कार व विधी त्या देवतेच्या संप्रदायाप्रमाणें होऊं लागले व यहुदी लोकांवर ग्रीक संस्कृतीचा विशेष पगडा बसला. एपिफानेस यानें सर्वत्र ज्युपिटर देवतेच्या प्रतिमांची स्थापना केली. या वेळीं मत्ताथियस याचे पांच पुत्र मकाबी म्हणून पुढें आले व त्यांस आपल्या प्रचारांत कांहींसें यश आलें. यानंतर जूडासचा पुतण्या जॉन हा राजा झाला. यानंतर एडोमाइट हेरोड पहिला हा गादीवर बसला. पुढें पांपेनें जेरुसलेम घेऊन त्याचा अन्तर्भाव सीरिया प्रांतांत केला. ऑगस्टस यानें हेरॉडला ज्युडियाचा राजा नेमलें. यानें जेरुसलेमचें देऊळ बांधलें व समरिया व सीझारिया हीं शहरें वसविलीं. हेरॉड ख्रिस्त जन्माच्या वर्षी म्हणजे ख्रि. पू. ४ या वर्षी मृत्यु पावला. त्यानंतर प्रोक्युरेटर या नांवाचे अधिकारी नेमण्यांत आले. त्या वेळीं यहुदी व समारिटन लोकात भांडणें चालू होतीं. अखेरीस व्हेस्पॉसियन बादशहाचा पुत्र टायटस यानें जेरुसलेम शहर काबीज करून तेथील देवळाचा विध्वंस केला व यहुदी लोकांस देशोधडीस लावलें.

हिब्रू लोकांनीं सीरियन व ग्रीक लोकांची कालगणना सुरू केली. अरब लोक अद्यापहि अलेक्झांडरच्या वारसाचा मॅसिडोनियन शक वापरतात. हिब्रू भाषा पार उपयोगांतून नाहींशी झाली. पॅलेस्टाइनमधील यहुदी अरेमाइक भाषा वापरूं लागले. ही बाबिलोनी भाषेची एक उपभाषा होती व तिचें सीरिॲक भाषेशीं मिश्रण झालेलें होतें. शुरेर म्हणतो, यहुदी लोकांत हिब्रू भाषेचें इतकें अज्ञान होतें कीं, सिनेगॉगमध्यें प्रत्येक प्रवचनाचें शब्दशः अरेमाइकमध्यें भाषांतर करावें लागे. सुशिक्षित यहुदी, सीरियन व अलेक्झांड्रियन लोक ग्रीक भाषा वापरीत. रोमन अमलामध्यें लॅटिन भाषा प्रचलित झाली. होरेस, ज्युव्हेनल, टॅसिटस, वगैरे अनेक रोमन ग्रंथकारांच्या ग्रंथांत यहुदी लोकांचा उल्लेख आढळतो.

याप्रमाणें यहुदी लोक हे एखाद्या स्वतंत्र संस्कृतीचे जनक नसले तरी अत्यंत प्राचीन कालचे लिखित अवशेष राखून ठेवणारे ईजिप्त व असुरी-बाबिलोनी संस्कृतींशीं संबंधित असलेले व यहुदी, ख्रिस्ती व महंमदी या तीन महत्त्वाच्या धर्मांशीं अत्यंत निगडित असलेले व एका अत्यंत प्राचीन परंपरेचें अनुस्यूत रक्षण करणारे या दृष्टीनें या लोकांचें संस्कृतीच्या इतिहासांत फार महत्त्व आहे.

यांनीं आपल्या चिकाटीनें व दीर्घोद्योगानें ईश्वरानें वचन दिलेल्या आपल्या पूर्वजांच्या पवित्र भूमींत आता एक स्वतंत्र राज्य निर्माण केलें आहे. तें आज जरी बाल्यावस्थेंत असलें तरी भविष्यकालीन इतिहासांत त्याचें महत्त्व अधिकाधिक वाढल्याशिवाय राहणार नाहीं असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

आतांच वर्णन केलेल्या यहुदी लोकांनीं आपली परंपरा व इतिहास रक्षण केलेला आहे व त्यांचा संबंध ईजिप्ती, असुरी, बाबिलोनी व इतर संस्कृतींशीं निकटचा आलेला असून त्या सर्व संस्कृतींचा परिणाम त्यांवर झालेला आहे ही गोष्ट आपण पाहिली. आतां आपणांस दुसऱ्या अशा एका भूप्रदेशाचें अवलोकन करावयाचें आहे कीं, ज्या भूप्रदेशामध्यें विकसित झालेल्या प्राचीन कालांतील संस्कृतीची परंपरा आपणांस सातत्यानें दृष्टीस पडत नाहीं, किंबहुना अशी एखादी संस्कृति प्राचीन कालीं या भू-भागांत विकसित झाली होती अशी आपणांस कल्पनाहि होत नाहीं. परंतु कांहीं कालापूर्वी या भूमीचें उत्खनन करीत असतां जे प्राचीन शिल्पकामाचे व इतर कलात्मक अवशेष आढळले त्यांवरून तेथील भूमिगत झालेल्या प्राचीन संस्कृतीची कल्पना आली व तिचें महत्त्व संशोधक जगास कळून आलें. अशा एका प्राचीन नष्ट संस्कृतीचें आपण आतां अवलोकन करूं.

## ईजिअन संस्कृति—

युरोप खंडांत संस्कृतीचा उदय प्रथम त्याच्या आग्नेयीच्या कोपऱ्यांत झाला. या भागांत कांहीं द्वीपकल्पें व बरींचशीं बेटें पसरलेलीं आहेत. त्यांपैकीं क्रीट हें बेट मुख्य जमिनीपासून बरेंच दूर असून ईजिप्त देशास जवळचें आहे. त्यामुळें ईजिप्त देशांतील गलबतें वरचेवर त्या बेटांत येत-जात असत. अर्थात् या बेटांत साहजिकच सांस्कृतिक वाढ प्रथम सुरू झाली. हें बेट ईजियन समुद्रांत आहे व हा समुद्र एका तलावासारखा असून त्याच्या सभोंवार बहुतेक सर्वच बाजूंस जमीन पसरलेली आहे. या समुद्राचा किनारा बराच दंतुर असून त्यामध्यें अनेक उपसागर व बंदरें आहेत. तसेंच या समुद्रांतून प्रवास करीत असतां सर्वत्र असंख्य बेटें आढळून येतात, व जमीन केव्हांच दृष्टीबाहेर जात नाहीं. या प्रदेशाची हवाहि सौम्य असून सूर्यप्रकाश नेहमींच मिळत असतो. समुद्राच्या किनाऱ्यावर लहान लहान नद्यांचीं खोरीं व मैदानें पसरलेलीं असून तीं सुपीक असल्यामुळें तेथें गहूं, बार्ली, द्राक्षें व ऑलिव्ह यांची वाढ पाट किंवा कालवे नसतांहि होऊं शकते. या प्रदेशांतील लोकांचें मुख्य अन्न भाकरी, तेल आणि मद्य हें असे. पावसाळ्यांत या प्रदेशांत सर्वत्र हिरवींगार कुरणें असून तेथें गुराढोरांस व शेळ्यामेंढ्यांस भरपूर चरावयास सांपडे.

या ईजियन समुद्रांतील बेटांशीं प्रथम पूर्वेकडील व दक्षिणेकडील सुसंस्कृत लोकांचा संबंध आला. क्रीट बेटापासून आफ्रिकेचा उत्तर किनारा फक्त १५० मैल अंतरावर आहे आणि पूर्वेकडे आशिया मायनर व हिटाइट लोकाचा प्रदेश असून तेथून सुपीक चंद्रकोरेच्या प्रदेशांत जाण्याचे मार्ग आहेत. यामुळें ईजियन समुद्रातील बेटांवर दक्षिणेकडून ईजिप्तमधील संस्कृतीचा व पूर्वेकडून आशिया मायनर व युफ्रेटीस दुआबांतील संस्कृतीचा परिणाम सहजच घडून आला व क्रीट बेटाचा या क्रियेमध्यें पुलासारखा उपयोग झाला. यामुळें प्रथम युरोपच्या मुख्य भूमीवर नव्हे तर क्रीट बेटांवरच संस्कृतीचा उदय झाला.

**क्रीट बेटांवरील अवशेष—**

या बेटांवर कोणत्या वंशाचे लोक राहत हें नक्की माहीत नसलें तरी त्यांस ईजियन असें नांव देण्यात येतें. हे भूमध्यसामुद्रिक वंशाचे होते. प्रथमपासून क्रीट बेटांकडे या प्रदेशाचें पुढारीपण होतें. या बेटांचा व आशिया मायनरचा संबंध फार प्राचीन काळापासून होता व त्यामुळें ख्रिस्तपूर्व ३००० वर्षांपासून या दोन्ही लोकांतील धार्मिक कला जवळजवळ सारख्याच होत्या. क्नॉसस या शहरीं बांधलेल्या राजवाड्याच्या अवशेषांच्याखालीं ३० फुटांवर या कालच्या झोंपड्यांचे अवशेष उत्खननांत आढळून आले आहेत. त्यांत तांब्याचीं भांडीं सांपडलीं आहेत. हें तांबें बहुतेक ईजिप्तमधून आलें असावें व ईजिप्तपासूनच त्यांनीं कुंभाराचें चाक व मडकीं करण्याची कला घेतली असावी. परंतु या कलेंत त्यांनीं पुष्कळच प्रगति केली व मातीचीं आणि दगडाचीं फार सुंदर पात्रें व बरण्या वगैरे ते करूं लागले. या पात्रांचें पिरामिडकालीन ईजिप्तमधील पात्रांशीं फारच साम्य आढळतें. यावरून कदाचित् ईजिप्तमधील कांहीं कारागीर येथें येऊन वसाहत करून राहिले असावे असेंहि अनुमान काढणें शक्य आहे. ईजिप्ती व बाबिलोनी लोकांप्रमाणेंच क्रीटमधील लोक एका चित्रलिपींत लिहीत असत. अशा तऱ्हेचीं सुमारें १३५ चित्र–अक्षरें यांच्या लेखांत आढळतात. पुढें पुढें ईजिप्ती लोकांप्रमाणें त्यांनीं अधिक सोयीची लेखनपद्धति सुरू केली.

ख्रिस्तपूर्व २००० च्या सुमारास क्रीट बेटांतील संस्कृति बरीच उच्च दर्जास पोंचली होती. या बेटाच्या किनाऱ्यावरील बंदरांतून मातीच्या व धातूंच्या भांड्यांचे कारखाने बरेच भरभराटीस आले असावे. व त्यांचा बराच मोठा व्यापार इतर देशांतील लोकांशीं चालू असावा. तसेंच या बेटाच्या अंतर्गत भागांत शेती आणि पशुपालन यांची बरीच वाढ झाली असावी. या वेळीं क्नॉसस या ठिकाणीं या प्रदेशाची राजधानी असून येथें एक भव्य राजवाडा बांधण्यांत आला होता. तो ईजिशियन धर्तीवर असून त्यामध्यें मध्यभागीं एक चौक होता व त्याच्या सभोंवतीं पुष्कळ दालनें होतीं. याच राजानें दक्षिणेकडे फिस्टस येथेंहि एक मोठा राजवाडा बांधलेला होता. कदाचित् तो एखाद्या दुसऱ्या राज्याचीहि राजधानी असूं शकेल. या राजवाड्याभोंवतीं तट नव्हते, परंतु त्यामध्यें संरक्षणाकरितां मुबलक हत्यारें व चिलखतें, वगैरे ठेवलेलीं आढळतात. क्नॉसस येथील राजवाड्यांतील अवशेषांत अशा तऱ्हेचीं शेकडों हत्यारें व हत्यारांच्या याद्या सांपडल्या आहेत. या राजाचीं बरींच गलबतें असून त्यांतून ते व्यापार व युद्धें करीत. या राजांची 'समुद्रराजे' म्हणून प्रसिद्धि असे. व त्यांपैकीं मिनॉस नांवाच्या राजाबद्दल पुष्कळ आख्यायिका प्रचलित आहेत व या राजाच्या नांवावरून क्रीटमधील संस्कृतीस मिनोअन संस्कृति असेंहि नाव देण्यांत येतें. याच ठिकाणीं आजच्या चिनीमातीच्या पेल्यासारखे सुंदर पेले, बरण्या आणि इतर पात्रें तयार होत. व तीं इतर देशांत मोठमोठ्या श्रीमंत लोकांमध्यें खपत असत. अशीं पात्रें ईजिप्तमधील ख्रि. पू. १९ व २० या शतकांतील थडग्यांत आढळलीं आहेत.

क्रीट बेटांतील व्यापाराबरोबर त्याच्या लेखनकलेचीहि बरीच प्रगति होत गेली. परंतु तेथें पापीरससारखा कागदास उपयोगी असा लव्हाळा नसल्यामुळें ते मातीच्या विटांवर आपल्या मालाच्या किंमती, वगैरे लिहूं किंवा खिळ्यानीं कोरूं लागले. अशा तऱ्हेच्या विटा वर उल्लेखिलेल्या शस्त्रास वगैरे बांधलेल्या आढळून आल्या आहेत. व अशाच तऱ्हेचे इतरहि अनेक लेख सापडले आहेत.

ईजिप्त व इतर देशांशीं चाललेल्या व्यापारामुळें क्रीट बेटाची बरीच भरभराट होत जाऊन क्नॉसस येथील राजवाड्याप्रमाणें दुसरेहि राजवाडे बांधण्यांत आल्याचें दिसून येतें. त्या राजवाड्यांतील भिंतीवर जीं चित्रें रंगविण्यांत आलीं आहेत, त्यांवरून तत्कालीन दैनिक आयुष्यक्रमाची पुष्कळच कल्पना येते. त्यामध्यें कलाकुसरीचे अनेक प्रकार दृष्टीस पडतात. ही कला अर्थात् ईजिप्तपासून घेतलेली असावी; कारण या चित्रांत ईजिप्तप्रमाणेंच कांचेचा उपयोग केलेला आढळतो. व कांचेच्या कौलांचाहि भिंतीस लावण्याच्या कामीं बराच उपयोग केलेला दृष्टीस पडतो. परंतु क्रीटमधील चित्रें ईजिप्तमधील चित्रांपेक्षां अधिक सजीव दिसतात.

**क्नॉसस शहर—**

क्नॉसस येथील राजवाड्यासभोंवतीं जीं मोठमोठ्या उमरावांचीं व व्यापाऱ्यांचीं प्रचंड घरें आहेत त्यांवरून केवळ याच भागाची वस्ती १२,००० असावी असें वाटतें. यापलीकडे मध्यम व गरीब लोकांची वस्ती असून तीमध्यें निरनिराळे कारागीर,

चित्रकार, वगैरे राहत असावेत व त्यांची वस्ती ७०,००० असावी. याप्रमाणें या शहराची वस्ती एकंदर ८०,००० च्या वर असावी असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं.

या शहरांत बैलांच्या झुंजी व तरुणांचे सामने होत असत व ते पाहण्यास राजवाड्यांतील इतर मोठमोठे लोक व स्त्रिया जमत असत. येथील राजवाड्यांत व मोठमोठ्या घरांत स्नान-गृहें व पाण्याचे नळ बांधलेले असत. शहरापासून बंदर सुमारें ३ ते ३॥ मैल दूर असून तेथें राजा आपल्या रथांत बसून जात असे व तेथें त्याचीं वरींच व्यापारी व इतर गलबतें असत. क्रीट येथील कलाकौशल्याचीं कामें आसपासच्या बऱ्याच देशां-मध्यें पसरलेलीं आढळून येतात. सिसिली बेटांत व स्पेनच्या पूर्व किनाऱ्यावरहि क्रीटमधील कलात्मक वस्तू आढळून आल्या आहेत. क्नॉसस येथील राजानें क्रीट बेटांत मोठाले रस्ते व बंदरांत मोठाल्या गोद्या व मालाच्या वखारी बांधलेल्या असाव्यात. या राजाच्या वाड्याजवळ तळघरांत एक चक्रव्यूह असून त्यामध्यें मिनोटार नांवाचा एक भयंकर पोळ सोडलेला असे व त्याच्याबरोबर द्वंद्वयुद्ध करण्याकरितां दूरदेशच्या राज-पुत्रांस आव्हान देण्यांत येत असे, अशा प्रकारची कथा ग्रीक लोकांत प्रचलित होती. या तळघराचे अवशेष आतां सांपडले आहेत.

## टीरीन्स व मायसीनी—

क्नॉसस येथील अवशेषांप्रमाणें ग्रीस देशाच्या मुख्य भूमीवर उत्खनन केलेल्या टीरीन्स आणि मायसीनी येथेहि ईजियन संस्कृतीचे अवशेष सांपडले आहेत व त्यांवरूनहि या संस्कृतीची प्रगति किती झाली होती हें दिसून येतें. ईजियन संस्कृतीचें महत्त्व क्रीट किंवा त्या सभोंवतालचीं बेटें सुसंस्कृत करणें एवढ्यावरूनच अजमावयाचें नसून अत्यंत प्राचीन काळापासून क्रीट बेटाचा व ईजिप्तचा व त्याप्रमाणें आशियामायनरमधील हिटाइट, बाबिलोनियन, फिनिशियन, वगैरे लोकांचा संबंध या बेटांशीं येत असल्यामुळें क्रीट बेट हेंच या लोकांतील परस्पर सांस्कृ-तिक विनिमयाची जागा होती. या बेटामध्यें ज्या उत्तम उत्तम कलाकुसरीच्या वस्तू उत्पन्न होत असत त्याना भूमध्यसमुद्राच्या पूर्वेकडील किनाऱ्यावरील सर्व प्रदेशांतील राजेरजवाड्यांकडून व श्रीमंत लोकांकडून अतिशय मागणी असल्यामुळे या बेटांशीं इतर सर्व प्रदेशांतील व्यापाऱ्यांचा फार निकटचा संबंध येत गेला व त्यामुळें साहजिकच व्यापारी वस्तूंबरोबर अनेक कला, विद्या व विचार यांचीहि देवाण-घेवाण होत गेली असली पाहिजे व त्यामुळें या सर्व देशांतील संस्कृतीमध्यें एक प्रकारचा विनिमय होत गेला असला पाहिजे. या दृष्टीनें सर्व संस्कृतींचा परस्पर संबंध घडवून आणणारी व अनेक संस्कृतींचा संनिकर्ष करणारी भूमि म्हणून क्रीट व ईजियन समुद्रांतील बेटें व त्यां-तील संस्कृति यांस फार महत्त्व आहे. या बेटांमार्फतच ईजिप्त आणि आशियामायनरमधील संस्कृति युरोप खंडास पोहोंचून तेथील पाषाणयुगांतील लोकांस संस्कृतीच्या मार्गावर नेती झाली.

ईजिअन संस्कृतीची वाढ ईजिप्तप्रमाणें किंवा असुरी, बाबि-लोनी संस्कृतींप्रमाणें फार अवाढव्य प्रमाणावर झाली होती असें नव्हे. ईजिप्ती किंवा असुरी साम्राज्याप्रमाणें किंवा आजच्याप्रमाणें इंग्लंडसारख्या लहान बेटानें जसें साम्राज्य स्थापन केलें आहे त्याप्रमाणें या बेटावरील लोकांनीं मोठें साम्राज्य स्थापन केलें नाहीं किंवा मोठमोठीं युद्धें करून त्यांत विजय मिळविले नाहींत. तथापि या बेटाचें महत्त्व संस्कृतीच्या इतिहासांत कांहीं कमी नाहीं. या संस्कृतीचे जनक एका लहान बेटावर किंवा द्वीप-समूहावर राहणारे असल्यामुळें दर्यावर्दीपणांत कुशल होते व ते लांबलांबच्या सफरी करीत असत व आपल्या गलबतांतून निर-निराळ्या देशांचा माल भिन्न भिन्न देशांत नेत असत व त्यांचा संबंध अनेक प्रदेशांशीं येत गेल्यामुळें अनेक देशांतील कला त्यांनीं हस्तगत केल्या, एवढेंच नव्हे तर त्या कलांचें इतकें संव-र्धन केलें कीं, आजहि तत्कालीन कलात्मक कृति पाहून विस्मय वाटतो. तेव्हां तत्कालीन कलांच्या संवर्धनाच्या बाबतींत व सांस्कृतिक विनिमयाच्या व प्रसाराच्या बाबतींत यांनीं फार महत्त्वाची कामगिरी केली आहे. आशिया, आफ्रिका व युरोप या तीन खंडांतील सांस्कृतिक दुवा म्हणून या संस्कृतीचें महत्त्व फार आहे. या ईजिअन द्वीपसमूहामार्फतच पूर्वेकडील संस्कृति पश्चिमेकडील देशांत प्रसृत झाली व या लोकांनीं पश्चिमेकडील लोकांस आपला वन्य आयुष्यक्रम सोडून नागर आयुष्यक्रम आचरण्यास शिकविलें हें यांचें महत्त्व आहे.

## मीड व इराणी लोक—

इंडो-युरोपीय लोकांची एक शाखा ख्रिस्तपूर्व २००० वर्षांच्या सुमारास विभक्त होऊन कास्पियन समुद्राच्या पूर्व किनाऱ्यावर आपलीं गुरें व कळप चारीत भ्रमण करीत होती. या ठिकाणीं हे लोक कांहीं काळ स्थायिक झाले व त्यांस आर्यन असें नांव याच ठिकाणीं प्राप्त झालें. या काळामध्यें त्यांस लेखनकला अव-गत नसावी आणि त्यांचीं कांहीं स्मारकेंहि उपलब्ध नाहींत. तथापि तत्कालीन लोकांच्या ज्या कल्पना त्या लोकांमध्यें व त्यांच्या वंशजांमध्यें परंपरेनें चालत आलेल्या आहेत त्यावरून त्यांनीं एका विशिष्ट व उदात्त धर्माची स्थापना केली होती असें दिसून येतें. या धर्माच्या मुळाशीं सद्विचार व सदाचार ह्या दोन गोष्टी होत्या. या लोकांमध्यें अग्निदेवतेस बरेंच महत्त्वाचें स्थान

प्राप्त झालें होतें आणि या अग्नीचे उपासक व रक्षक म्हणून अथर्वन् नांवाचे लोक त्यांच्यामध्यें विशेष महत्त्व पावले होते.

या आर्यन लोकांच्या ख्रिस्तपूर्व १८०० च्या सुमारास दोन शाखा झाल्या. त्यांपैकीं एक पूर्वेकडे भरतखंडामध्यें गेली व दुसरी आर्यन ह्या नांवावरूनच ज्या प्रदेशास नाव मिळालें आहे अशा इराण या प्रदेशांत स्थायिक झाली. यांपैकीं कांहीं लोक पश्चिमेकडे व आग्नेयीकडे सुपीक चंद्रकोरेच्या माथ्यावर जे पर्वत आहेत त्यांमध्यें वस्ती करून राहिले. या लोकांस मितन्नी असें नांव प्राप्त झालें व ते इराणी लोकांचीच एक शाखा होत, असें कांहीं शास्त्रज्ञ मानतात. कांहीं त्यांस पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें हिटाइट या इंडो-आर्यन लोकांपैकीं मानतात. इराणच्या पूर्व बाजूस मीड व पर्शियन अथवा फारशी या इराणी लोकांच्याच दोन शाखा वस्ती करून राहिल्या. या लोकांनींच पुढें सुपीक चंद्रकोरेच्या प्रदेशावर विजय मिळवून एक मोठें साम्राज्य स्थापन केलें.

सुपीक चंद्रकोरेच्या पूर्व बाजूच्या पर्वतावर वस्ती करून राहणारे लोक नेहमींच बाबिलोनिया व असुरिया या प्रांतांतील लोकांस उपद्रव देत असत. विशेषतः एलाम आणि उर्तु हीं असीरियन लोकांचीं शत्रू राष्ट्रें होतीं. त्यामुळें असीरियन बादशहांनीं या लोकांचा पराभव करून त्यांस पूर्णपणें मोडून काढलें. परंतु त्यामुळें असीरियन व खाल्डियन लोक हे पूर्वेच्या बाजूनें उघडे पडून त्यांच्यावर इंडो-युरोपियन लोकांचे हल्ले होऊं लागले.

या मध्यंतरीच्या लोकांस असीरियानें दुर्बल केल्यामुळें ख्रिस्तपूर्व ७०० च्या सुमारास जेव्हां मीड लोकांनीं असीरियावर स्वाऱ्या केल्या तेव्हा त्यांस मुळींच प्रतिबंध न होतां त्यांनीं तैग्रीस नदीच्या पूर्वेच्या प्रदेशामध्यें आपलें एक मजबूत साम्राज्य स्थापन केलें. या साम्राज्याचा विस्तार इराणी आखातापासून काळ्या समुद्रापर्यंत पसरलेला होता. या मीड लोकांनीं एकबटाना येथें आपली राजधानी स्थापन केली. हें शहर झग्रोस पर्वतापासून सुपीक चंद्रकोरेकडे व बाबिलोन शहराकडे जाणाऱ्या रस्त्यावरील खिंडीच्या अगदीं समोर वसलेलें होतें.

## झरथुष्ट्र व त्याचा संप्रदाय—

या इराणी लोकांमध्यें झोरोॲस्टर किंवा झरथुष्ट्र या नांवाचा एक महापुरुष होऊन गेला. यानें मनुष्याच्या आयुष्यक्रमास उत्तम वळण लावणारा एक धर्म स्थापन केला. या धर्माचें मूलतत्त्व सत् आणि असत् यांचें सतत चाललेलें द्वंद्व हें होय. त्याला या जगांत नेहमीं सत्प्रवृत्ति आणि असत्प्रवृत्ति यांचा झगडा चालला आहे असें दिसून आलें. यांपैकीं सत् म्हणजे चांगलें याचें प्रतीक म्हणून त्यानें मज्द किंवा अहुर्मज्द या देवतेची कल्पना केली, व जे असत् अथवा वाईट होतें त्याचें प्रतीक म्हणून अहरिमन् या दुष्ट देवदूताची कल्पना केली. याच अहरिमनचें पुढें ज्यू व ख्रिस्ती लोकांत सैतानामध्यें रूपांतर झालें. अहुर्मज्द याच्या अनुयायांमध्यें चांगले देवदूत होते. त्यांत प्रकाश अथवा मिथ्र हा प्रमुख होता. अहरिमनच्या बाजूस अर्थात् अंधःकार होता.

झोरोॲस्टर याचा धर्म मानवी जीवितावर आधारलेला असून मनुष्याच्या जीवनावर त्याचा विशेष परिणाम घडून येत असे यांत शंका नाहीं. जगांत उत्पन्न झालेल्या धर्मांमध्यें हा एक महत्त्वाचा धर्म होय ह्यांत शंका नाहीं. या धर्माची शिकवण अशी होती कीं, प्रत्येक मनुष्यानें सत् आणि असत् किंवा प्रकाश आणि अंधःकार यांपैकीं कोणत्या तरी एका प्रवृत्तीचा स्वीकार करावा व तो ज्या प्रवृत्तीचा स्वीकार करील त्याप्रमाणें त्यास मरणोत्तर न्याय मिळेल. याप्रमाणें मरणोत्तर न्यायाची कल्पना प्रथम आशियामध्यें उत्पन्न झाली.

झोरोॲस्टरचा धर्म परंपरागत आलेली श्रद्धा व देवता यांवरच आधारलेला असल्यामुळें त्यानें अग्नि ही देवता सत् अथवा प्रकाश याचें प्रतीक म्हणून कायम ठेविली व पूर्वींचे अग्निपूजक पुरोहितहि कायम ठेविले. झरथुष्ट्र हा मीड देशांत उत्पन्न झाला होता. परंतु तेथील लोकांत त्याच्या कल्पना प्रसार पावत नाहींत असें त्यास दिसून आल्यामुळें तो दक्षिणेकडे फारशी लोकांत गेला. त्याचे त्या वेळचे आशा व निराशात्मक उद्गार त्याच्या कांहीं स्तोत्रांत दृष्टीस पडतात. अखेरीस त्यानें तेथील राजाच्या घोड्यास रोगमुक्त केल्यामुळें त्याचा त्यावर प्रभाव पडून त्या इराणी राजानें त्याचें अनुयायित्व पत्करलें व यापुढील इराणचे बादशहा याच धर्माचे अनुयायी बनले. डरायस राजानें बहुधा या महात्म्याची कबर बांधली असावी. या धर्माचें वाङ्मय अवेस्ता नांवाच्या ग्रंथांत एकत्र केलेलें आहे.

## सायरस—

या झरथुष्ट्राच्या अनुयायी इराणी अथवा फारशी लोकांनीं ख्रिस्तपूर्व सातव्या शतकांत असीरियन लोकांनीं दुर्बल केलेल्या एलामाइट लोकाचा प्रदेश काबीज केला. ख्रिस्तपूर्व ६१२ मध्यें निनेव्हे शहर पडलें, त्या वेळीं हे इराणी लोक इराणच्या आखाताच्या पूर्वेस आणि उत्तरेस झग्रोस पर्वताच्या आग्नेयेकडील भागांत चांगले स्थायिक झाले होते. या वेळीं ते शेतकीवर उपजीविका करून शांतवृत्तीनें राहत असत. त्यांमध्यें लेखनकला, वाङ्मय अथवा इतर कलांची फारशी वाढ झाली नव्हती. या लोकावर या वेळीं उत्तरेकडे व वायव्येकडे राज्य करणाऱ्या मीड लोकांची सत्ता होती. एलाममध्यें याच सुमारास या फारशी

लोकांनीं अनशन् या नावाचें एक लहानसें राज्य स्थापन केलें होतें. निनेव्हेचा पाडाव झाला त्या वेळीं अनशन् येथें सायरस या नांवाचा एक फारशी राजा राज्य करीत होता. त्यानें इतर फारशी जमातींचें एकीकरण करून एक राष्ट्र बनविलें. त्यानंतर ३ वर्षांनीं त्यानें मीड लोकांवर स्वारी करून त्यांच्या राजाचा पराभव केला. आणि त्यांचा सर्व प्रदेश काबीज केला. हे फारशी लोक तिरंदाजीमध्यें प्रवीण होते. यामुळें ते दूर अंतरावरून शत्रूवर बाणांचा वर्षाव करून त्यांचा गोंधळ उडवून देत व नंतर हातघाईच्या लढाईंत त्यांचा पराभव करीत. नंतर अत्यंत कुशल असे फारशी घोडेस्वार दोन्ही बाजूंनीं लगट करून शत्रूचा पूर्ण फन्ना उडवीत. ही युद्धकला फारशी लोकांनीं असीरियन लोकांपासून घेतली होती. या फारशी लोकांच्या जेव्हा पश्चिमेकडे व दक्षिणेकडे स्वाऱ्या सुरू झाल्या तेव्हां लिडिया प्रदेशाचा राजा क्रीसस, बाबिलोनिया आणि ईजिप्त या देशांचे राजे आणि ग्रीसमधील स्पार्टा शहर या सर्वांनीं त्याच्याविरुद्ध सामना देण्याची तयारी केली. याचा पुढारी लिडिया देशाचा राजा क्रीसस हा होता. परंतु त्याचा ख्रिस्तपूर्व ५४६ मध्यें पराभव करून सायरसनें त्याची राजधानी सार्डिस हें शहर जिंकून त्या राजास कैद केलें.

नंतर सायरसनें पुढील पांच वर्षांत सर्व आशिया मायनर पादाक्रांत केलें. यानंतर त्यानें खाल्डियन सैन्याचा पराभव केला. आणि ख्रिस्तपूर्व ५३८ मध्यें बाबिलोन शहर जिंकलें. या शहरांत राजा व पुरोहित यांत वैमनस्य असल्यामुळें त्यास तें शहर युद्ध न करतांच मिळालें.

सायरस यानें पसारगडी या शहराची स्थापना करून तेथें आपली राजधानी केली. या ठिकाणीं असलेला त्याचा राजवाडा नुकताच खोदून काढण्यांत आलेला आहे. त्या ठिकाणीं एका पुतळ्यावर सायरस राजा हीं अक्षरें खोदलेलीं आढळून आलीं आहेत. या ठिकाणीं त्यानें एका देवालयाची स्थापना केली. हें सर्वांत जुनें इराणी देवालय होय. यानंतर सायरसनें उत्तरेकडील भटक्या लोकांवर स्वारी केली व तींत ख्रि. पू. ५२९ मध्यें तो एका लढाईंत पडला. त्याचें शव आणून पसारगडी येथें त्यावर कबर बांधण्यांत आली आहे. ही कबर पुढें २०० वर्षांनीं अलेक्झांडर दि ग्रेट याच्या दृष्टीस पडली होती.

या वेळीं म्हणजे ख्रि. पू. ५२९ मध्यें सर्व पश्चिम आशिया सायरसच्या सत्तेखालीं आला होता. यानंतर ४ वर्षांनीं ख्रि. पू. ५२५ मध्यें त्याचा पुत्र कंबायसेस यानें ईजिप्त पादाक्रांत केला. याप्रमाणें या साम्राज्याचा विस्तार नाइल नदीपासून भूमध्य समुद्राच्या पूर्वेकडील सर्व प्रदेशावर आक्रमण करून हिंदुस्थानपर्यंत पसरला होता.

## फारसी लिपी व लेख—

अर्थात् या वेळच्या सर्व सुसंस्कृत जीवनक्रमानें समृद्ध अशा बाबिलोन शहरांतील वैभवाचा आणि नाइल नदीच्या मुलप्रदेशांतील सुसंपन्न संस्कृतीचा परिणाम इराणी लोकांवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. या वेळीं बाबिलोन शहरामध्यें बहुतेक व्यापार अरेमियन व्यापाऱ्यांच्या हातांत असे. त्यामुळें त्यांचीच भाषा या सुपीक चंद्रकोरेच्या प्रदेशांत प्रचलित होती. हे व्यापारी आपले सर्व व्यवहारांतील लेख पापीरसच्या कागदावर शाईनें व लेखणीनें लिहीत. यामुळें बाणाग्र लिपींतील मातीच्या विटांवरील लेखांचा प्रघात मागें पडत चालला. इराणी साम्राज्यांतील अधिकाऱ्यांसहि आपले सर्व काम साम्राज्याच्या भागांत अरेमाइक भाषेमध्यें करावें लागे. यामुळें या साम्राज्यांत फारसी आणि अरेमाईक अशा दोन भाषा प्रचलित होत्या. इराणी भाषेकरितांहि कांहीं लोक अरेमाईक लिपीचा उपयोग करीत. तथापि इराणी लोकांनीं आपली फारसी भाषा लिहिण्याकरितां ३९ बाणाग्र लिपींतील खुणांचा वर्णरूपानें स्वीकार करून आपली एक वर्णमाला बनविली होती. याच वर्णमालेंत ते आपले शिलालेख कोरीत असत. या बाणाग्र लिपींतील इराणी लेखांचें एका दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. कारण याच लेखामुळें पश्चिम आशियातील बाणाग्र लिपींतील लेखांचें वाचन करतां येणें शक्य झालें. अरेमाईक भाषेनें बाबिलोनियन आणि असीरियन भाषांचें स्थान घेतल्यामुळें त्या भाषा जेव्हां प्रचारांतून गेल्या तेव्हां त्या भाषांच्या लिपींत लिहिण्याचा प्रघात बंद पडला. सर्वांत अखेरचा मातीच्या विटावरील खाल्डियन भाषेंतील व लिपींतील लेख म्हटला म्हणजे एक ज्योतिषशास्त्रविषयक ख्रि. पू. ७ या वर्षांतील लेख आहे. या लेखावर सेल्यूसिड या शकाचें ३०५ हें वर्ष आहे.

बाणाग्र लिपींतील फारसी भाषेमध्यें फक्त ३९ वर्णांच्या खुणा असल्यामुळें ते लेख वाचणें बरेंच सुलभ झालें. १९ व्या शतकांत ग्रोटफेंड नांवाच्या एका जर्मन शाळामास्तरनें या लेखांतील दरायस, क्झर्क्सीस व इतर कांहीं नांवें व शब्द वाचले. १८४७ मध्यें सर हेन्री रॉलिन्सन याने फारशी बाणाग्र लिपीचा पूर्ण उलगडा केला. यानें बेहिस्तन येथील शिलालेखावरून फारसी लेखाप्रमाणेंच बाबिलोनिया आणि असीरिया येथील लिपींतील लेखांचेंहि वाचन करून पश्चिम आशियांतील सुमारें अडीच हजार वर्षांपूर्वीचा इतिहास वाचकांस उपलब्ध करून दिला.

कंबायसीस ईजिप्तमध्यें असतां दोन मगी लोकांनीं त्याच्या स्मेर्डिस नांवाच्या सावत्र भावाच्या नांवानें बंड केलें. तें मोडण्या-

करितां येत असतां कंबायसेस वाटेंत मरण पावला. यानंतर दरायसनें त्या मगींचा पाडाव करून राज्यपद घेतलें.

## दरायस—

सायरसनें स्थापन केलेल्या या साम्राज्याचें शासन करणें ही एक महत्त्वाची गोष्ट होती व दरायसनें ह्या कामीं आपलें कौशल्य पूर्णपणें व्यक्त केलें. त्याचा राज्यकारभार न्यायी, दयाळू व बुद्धिमत्तादर्शक होता. अर्थात् हें राज्य एकसत्तात्मक असून त्यामध्यें लोकांस मुळींच सत्ता नव्हती. या साम्राज्यापैकीं ईजिप्त आणि बाबिलोनिया या देशांचा दरायस स्वतःस राजा म्हणवी. आणि बाकीच्या प्रदेशांचे त्यानें सत्रपी या नांवाचे प्रांत बनवून त्यांवर सत्रप या नांवाचे अधिकारी नेमले होते. याप्रमाणें प्रांताधिकारी नेमून राज्य चालविणें या बाबतींत त्यानें पूर्वींच्या ईजिप्ती, असुरी किंवा खाल्डी साम्राज्यापेक्षां अधिक प्रगति केली होती. या प्रांतातील लोकास जोंपर्यंत ते नियमित खंडणी देत असत व सैन्याकरितां लोक पुरवीत असत तोंपर्यंत अंतर्गत बरेंच स्वातंत्र्य असे. या प्रांतिक अधिकाऱ्यांवर नजर ठेवण्याकरितां राजाचे दूत असत व ते राजाकडे वरचेवर बातम्या पाठवीत. या कालांत शेतीची जमीन मोठमोठ्या जमीनदारांच्या किंवा सरदारांच्या ताब्यांत असे. या वेळीं लहान शेतकरी फारसे नसत. या सर्वांस सारा व कर द्यावे लागत. पूर्वेकडील प्रदेशांत हे कर ऐनजिनसां-मध्यें देण्यांत येत, परंतु पश्चिमेकडे लिडिया व इतर ग्रीक वसाहतींत नाणीं प्रचलित असल्यामुळें नाण्यांच्या रूपांत देण्यांत येत असत. दरायसनें प्रथम सोन्याचीं नाणीं पाडण्यास सुरुवात केली व आपल्या सत्रपांस चांदीचीं नाणीं पाडण्याची परवानगी दिली. त्या वेळीं सोन्याचा दर चांदीच्या १३ पट असे. म्हणजे सोनें १३ रु. तोळा याप्रमाणें मिळत असे. दरायसनें या साम्राज्यातील निरनिराळ्या प्रदेशांतील अनेक विविध गोष्टींचा स्वीकार केला. त्यानें ईजिप्तमधील ३० दिवसांचा महिना व १२ महिन्यांचें वर्ष ही कालगणनापद्धति स्वीकारली. त्याप्रमाणें अद्यापहि फारसी पंचांगांत ही पद्धत चालू असून दर वर्षी ५ दिवस गाथादिन म्हणून अधिक धरण्यांत येतात. ईजिप्तमध्यें वाढलेल्या वैद्यकीय ज्ञानाबद्दलहि त्यास आदर होता. याकरितां त्यानें एका ईजिप्ती पुरोहितास कैदेंतून सोडवून पश्चिम दुआबां-तील सायीस या शहरीं मोडकळीस आलेल्या एका वैद्यकीय शाळेचें पुनरुज्जीवन करण्याकरितां ईजिप्त देशास स्वतंत्र करून पाठविलें. यानें त्या शाळेचें पुनरुज्जीवन करून दोन इमारती उभ्या केल्या. याचें स्वरूप त्याचा पुतळा आज रोममध्यें व्हॅटिकन संग्रहांत आहे त्यावर कोरलेल्या लेखावरून व्यक्त होतें. याच राजाच्या कारकीर्दीत खाल्डियन ज्योतिषी नबू रिबन्नु याचें ज्योतिषशास्त्रांतील संशोधनाचें व वेध घेण्याचें काम चालू असून किदिन्नु हा ज्योतिषीहि अशाच प्रकारचें कार्य करीत होता. या राजानें इराणची समुद्रावरील सत्ता वाढविण्याकडेहि बरेंच लक्ष दिलें. अर्थात् या कामीं त्यास इराणमधील शेतकरी किंवा धनगर उपयोगी पडणें शक्यच नव्हतें. याकरितां त्यानें परदेशी लोकांचा उपयोग करून घेतला. स्कायलॅक्स नांवाच्या भूमध्यसमुद्रांतील एका कुशल खलाशास त्यानें सिंधु नदीचा मार्ग शोधून काढण्यास पाठविलें होतें. व त्यानंतर त्यास सिंधु नदीच्या मुखापासून सुएझच्या आखातापर्यंत सफर करण्यास सांगितलें. ईजिप्तच्या राजांनीं सुवेझ येथें तांबडा समुद्र व नाइल नदी यांस जोडणारा कालवा खोदला होता. तो मध्यंतरीं भरून गेला होता तो त्यानें परत खोदून काढला. या कालव्याच्या कांठीं दरायसचे अनेक शिलालेख सांपडले आहेत. त्यांमध्यें या काल-व्याच्या दुरस्तीचें वर्णन आहे. याच्या योगानें इराणी व्यापारी व्यापारांत पुढें येतील अशी त्यास आशा होती. परंतु इराणमध्यें लहान शेतकऱ्यांप्रमाणें लहान व्यापारीहि नव्हते. त्यामुळें त्याचा हेतु सफळ झाला नाहीं.

असीरियन लोकांप्रमाणें दरायसनें फिनिशियन लोकांस क्रूरपणानें न वागवितां त्यांस हाताशीं धरून एक लढाऊ आर-मार तयार केलें. हें आरमार त्यास व त्याचा मुलगा क्झर्क्सीस याला युरोपवर स्वारी करण्यास उपयोगी पडलें.

इराणी बादशहानें मोठमोठ्या उत्तम सडका बांधून सर्वत्र दळणवळणाची सोय केली. जासुदांमार्फत सर्वत्र डाक जाण्या-येण्याची व्यवस्था केली. हे जासूद अतिशय चपळ असत. या दळणवळणाच्या उपयोगाचें एक गमतीचें उदाहरण म्हणजे हिंदुस्थानांतील कोंबडी हा प्राणी जो आतांपर्यंत भूमध्यसमुद्रांत उपलब्ध नव्हता त्याची पैदास ईजियन समुद्रांत होऊं लागली.

## इराणी शिल्पकला—

या काळांत इराणची राजधानी सुसा या एलाम प्रांतांतील शहरांत होती. परंतु मधून मधून बादशहा बाबिलोन या शहरींहि हिंवाळ्यांत राहावयास जात असे व तेथील खाल्डियन राजवाड्यात राहत असे. सायरस यानें पसारगडी येथें एक मोठा राजवाडा बांधला होता. तसेंच दरायसनें पर्सीपोलिस येथें एक वाडा उभा केला होता. या पर्सीपोलिस शहराजवळच दरायस, क्झर्क्सीस, इत्यादि राजांच्या कबरी आढळतात. इराणी लोकांनीं शिल्पकलेचें ज्ञान बाबिलोनी व असुरी लोकांपासून घेतलें असावें असें दिसतें. त्यांच्या राजवाड्यांतील मोठमोठ्या गच्च्या, दरवाजाच्या बाजूंस असलेले प्रचंड पंखयुक्त वृषभ या

गोष्टी त्यांनीं असुरी लोकांपासून घेतल्या असाव्या. तसेंच त्यांच्या राजवाड्यांतील प्रचंड स्तंभांच्या रांगा ह्या ईजिप्तमधील लोकांचें अनुकरण करून बांधल्या असाव्या. तसेंच राजवाड्यांतील भिंतींवरील रंगीत विटांचीं कामें हींहि त्यांनीं तिकडील लोकांपासूनच घेतलीं असावीं. या साम्राज्यामुळें आशिया मायनरसभोंवतालच्या अनेक संस्कृतींचें एकीकरण घडून आलें. सायरस व दरायस यांच्या कालात त्यांच्या साम्राज्याचा विस्तार डॅन्यूब नदीपर्यंत झाला होता. अर्थातच याच्यापुढची पायरी म्हणसे ग्रीसवर आक्रमण ही क्रमप्राप्तच होती. व त्या आक्रमणामुळें ग्रीस व इराण यांमध्यें जो संघर्ष उत्पन्न झाला त्याचा इराणपेक्षा ग्रीसवरच फार महत्त्वाचा परिणाम घडून आला. इराण व त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशावर दोन शतकें शांततामय राजसत्ता असल्यामुळें त्या देशाची बरीच भरभराट झाली. यानंतरचे इराणी बादशहा सायरस किंवा दरायस यांसारखे कुशल नव्हते. ते आपला काळ चैनींत व सुखांत घालवूं लागले व राज्यकारभाराचा सर्व भार त्यांनीं सत्रप व इतर अधिकारी यांवर टाकला. अर्थातच त्यामुळें राजसत्ता कमकुवत होऊन अंदाधुंदी वाढत गेली. आणि यामुळे इराणी साम्राज्य दुर्बळ होत गेलें. दरायस किंवा क्झर्क्सीस यानंतर होऊन गेलेल्या राजांच्या कारकीर्दीचा विस्तृत इतिहास येथें संस्कृतीच्या वाढीच्या इतिहासामध्यें देण्यास अवकाश नाहीं व त्यास तितकें महत्त्वहि नाहीं.

हे इराणी बादशहा क्रूर व रानटी होते, असा कांहीं ग्रीक लोक आक्षेप घेतात. परंतु हा आक्षेप तितका खरा नसून प्रथमच्या बादशहांस तो मुळींच लागू पडत नाहीं. या बादशहांचा लोकांस न्यायी राज्य मिळावें असा मोठा कटाक्ष असे. ही गोष्ट दरायसनें आपल्या बेहिस्तन येथील शिलालेखांत स्पष्टपणें नमूद केली आहे.

"मी दुष्ट नव्हतों. असत्यभाषी नव्हतों. आणि क्रूर नव्हतों. तसाच माझा कोणी वंशज असा नव्हता. मीं न्यायानें राज्य केलें म्हणूनच मला अहुर्मज्दानें साहाय्य केलें."

आतांपर्यंत होऊन गेलेल्या अनेक साम्राज्यांपेक्षां तरी निदान इराणी साम्राज्य हें अधिक न्यायी व उदार होतें. इराणी बादशहा हे झरथुष्ट्राचे अनुयायी असून त्याच्या उपदेशाप्रमाणें आचरण करीत व त्यांच्या सत्तेमुळें या धर्माच्या शिकवणीचा प्रभाव त्यांच्या साम्राज्यांत दूरवर पडत गेला. आणि मिथ्र देवतेची उपासना बऱ्याच दूरवरच्या प्रदेशांत व दीर्घकालपर्यंत टिकून राहिली. एवढेंच नव्हे तर एका काळीं ती ख्रिस्ती संप्रदायाची प्रतिस्पर्धी होती. इराणी साम्राज्यानें लहानसहान राष्ट्रांच्या मर्यादा मोडून काढल्या. याप्रमाणें या पूर्वेकडील देशांमध्यें प्रथमच कला, शिल्प, वाङ्मय आणि शास्त्र यांचा उदय झाला. याच लोकांत प्रथम लिखित असे कायदे प्रचलित झाले. एकपरमेश्वराची कल्पना आणि त्याचें दयाळूपणानें मनुष्यजातीचें पालन या गोष्टी याच प्रदेशांत प्रथम कल्पिल्या गेल्या. एकराजसत्तेचा उदय पूर्वेकडे झाला होता व राज्यकारभारांत लोकांस कांहीं सत्ता असते ही कल्पना त्याच्यामध्यें उदय पावली नव्हती. त्यामुळें लोकराज्याची कल्पना त्यांस मुळींच नव्हती. तसेंच अनेक गोष्टी दैवी शक्तीनें होतात व देवहि अनेक असतात अशा कल्पना या प्रदेशात दीर्घकालापासून प्रचलित असल्यामुळें नैसर्गिक कारणें व निसर्गाच्या शक्तींचा शोध करण्याचा त्यांनीं कधीं प्रयत्न केला नाहीं. यामुळें भौतिक शास्त्रांची फारशी वाढ झाली नाहीं व वाङ्मयावरहि भोळ्या समजुतींचा पगडा पडत गेला. याप्रमाणें मानवजातीच्या ज्ञानांत अनेक अंगानें प्रगति व्हावयाची होती ती कालांतरानें कशी होत गेली हें आपण पुढें पाहूं.

याकरितां आपणांस पश्चिम दिशेच्या रोखानें जी एक इंडो-युरोपीय लोकांची शाखा गेली तिच्या कार्याकडे लक्ष दिलें पाहिजे. या लोकांनीं सध्यां ज्यास ग्रीस देश म्हणतात तेथें आपली स्थिर वस्ती करून आपल्या आयुष्यक्रमामध्यें जी सांस्कृतिक व वैचारिक प्रगति करून घेतली तिचा भविष्यकालीन जगावर कायमचा व महत्त्वाचा ठसा उमटला आहे. अशा या ग्रीक लोकांच्या इतिहासाकडे आपणांस लक्ष द्यावयाचें आहे व तें आतां आपण पुढील विभागामध्यें देऊं.

# भाग तिसरा

## झ

झ—या अक्षराचीं दोन वळणें आहेत. एक जैन व दुसरें दक्षिणी. याची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत; दुसरी, इ. स. २ ऱ्या शतकांतील वासिष्ठीपुत्र पुलुमायी याच्या एका लेखांत; व तिसरी, कोटा लेखांत ( काल इ. स. ७३८ ) आढळून येते. इ. स. ११ व्या शतकांतल्या एका हस्तलिखित पुस्तकांत चौथी अवस्था दृष्टीस पडते. पांचव्या अवस्थेंतील वळणदार 'झ' चौथीपासून लवकरच तयार झालेला दिसतो.

**झबेताखान रोहिला** ( मृत्यु १७८५ )—एक मोंगल सरदार. नजीबखान रोहिल्याच्या या मुलानें आपल्या बापाच्या पश्चात् बादशहाकडून मीरबक्षीगिरी मिळवून मराठ्यांवर चालून जाण्याचें ठरवलें होतें. महादजी शिंदे यानें नजीबखानाच्या घराण्याचा सूड घेण्याचा संकल्प केला होता व त्याप्रमाणें त्यानें झबेताखान हा शुक्रतालच्या किल्ल्यांत असतां त्याजवर तोफांचा मारा करून त्याचा सर्व प्रांत उध्वस्त करून टाकला. तेव्हां हा नजीबगडाच्या आश्रयास गेला. तरी मराठ्यांनीं नजीबगडहि हस्तगत करून झबेताखानाच्या बायका-मुलांस कैद केलें. पुढें यास नजफखानानें कांहीं दिवस आग्रा येथें कैदेंत ठेवलें होतें. याचा आपला मुलगा गुलाम कादर याच्याशीं सख्यभाव नसल्यानें यानें त्याची जहागिरी सुद्धां जत केली होती. घोसगड येथें हा मरण पावला.

**झमानशहा**—एक अफगाण राजा. हा अहमदशहा अबदालीचा नातू व तैमुरशहाचा मुलगा असून, काबूल-कंदाहारचा राजा होता. बापाच्या पश्चात् हा गादीवर आला ( स. १७९३ ); व स. १७९६ त लाहोरपर्यंत चालून आला होता. दिल्लीवर जाण्याचा त्याचा बेत होता; परंतु काबूलकडे त्याच्या भावांनीं धडाळी केल्यामुळें तो तेथूनच परत फिरला. पुढें (१८००) त्याच्या धाकट्या भावानें (हिरातच्या महमुदशहानें) त्याचे डोळे काढून, त्याला बाला हिसार किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. इंग्रजांनीं जेव्हां ( १८३९ ) शहासुजा याला काबूलच्या गादीवर बसविलें, तेव्हां अफगाण लोकांनीं झमानशहाच्या नांवाची द्वाही फिरविली होती.

**झरथुष्ट्र** ( सु. खि. पू. ९ वें शतक )— जगांत जे अत्यंत प्राचीन व उज्ज्वल धर्मपंथ आहेत त्यांत झरथुष्ट्री धर्माची गणना होते. झरथुष्ट्री धर्माचा उदय व विकास इराणांत झाला. झरथुष्ट्राला जन्मून अडीच हजारांवर वर्षें झालीं असतील. मीडियाच्या पश्चिमेस असलेल्या अट्रोपेटेन या गांवीं झरथुष्ट्र जन्मला. जगन्नियन्ता जो अहुर मझ्द त्याचें तेज झरथुष्ट्राची माता दुग्धोवा हिच्या गर्भांत प्रविष्ट झालें. यज्ञांतील 'हओम' (सोम) पितांना

गोष्टी त्यांनीं असुरी लोकांपासून घेतल्या असाव्या. तसेंच त्यांच्या राजवाड्यांतील प्रचंड स्तंभांच्या रांगा ह्या ईजिप्तमधील लोकांचें अनुकरण करून बांधल्या असाव्या. तसेंच राजवाड्यांतील भिंतींवरील रंगीत विटांचीं कामें हींहि त्यांनीं तिकडील लोकांपासूनच घेतलीं असावीं. या साम्राज्यामुळें आशिया मायनरसभोंवतालच्या अनेक संस्कृतींचें एकीकरण घडून आलें. सायरस व दरायस यांच्या कालांत त्यांच्या साम्राज्याचा विस्तार डॅन्यूब नदीपर्यंत झाला होता. अर्थातच याच्यापुढची पायरी म्हणसे ग्रीसवर आक्रमण ही क्रमप्राप्तच होती. व त्या आक्रमणामुळें ग्रीस व इराण यांमध्यें जो संघर्ष उत्पन्न झाला त्याचा इराणपेक्षा ग्रीसवरच फार महत्त्वाचा परिणाम घडून आला. इराण व त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशावर दोन शतकें शांततामय राजसत्ता असल्यामुळें त्या देशाची बरीच भरभराट झाली. यानंतरचे इराणी बादशहा सायरस किंवा दरायस यांसारखे कुशल नव्हते. ते आपला काळ चैनींत व सुखांत घालवूं लागले व राज्यकारभाराचा सर्व भार त्यांनीं सत्रप व इतर अधिकारी यांवर टाकला. अर्थातच त्यामुळें राजसत्ता कमकुवत होऊन अंदाधुंदी वाढत गेली. आणि यामुळें इराणी साम्राज्य दुर्बळ होत गेलें. दरायस किंवा क्झर्क्सीस यानंतर होऊन गेलेल्या राजांच्या कारकीर्दींचा विस्तृत इतिहास येथें संस्कृतीच्या वाढीच्या इतिहासामध्यें देण्यास अवकाश नाहीं व त्यास तितकें महत्त्वहि नाहीं.

हे इराणी बादशहा क्रूर व रानटी होते, असा कांहीं ग्रीक लोक आक्षेप घेतात. परंतु हा आक्षेप तितका खरा नसून प्रथमच्या बादशहांस तो मुळींच लागू पडत नाहीं. या बादशहांचा लोकांस न्यायी राज्य मिळावें असा मोठा कटाक्ष असे. ही गोष्ट दरायसनें आपल्या बेहिस्तन येथील शिलालेखांत स्पष्टपणें नमूद केली आहे.

"मी दुष्ट नव्हतों. असत्यभाषी नव्हतों. आणि क्रूर नव्हतों. तसाच माझा कोणी वंशज असा नव्हता. मीं न्यायानें राज्य केलें म्हणूनच मला अहुर्मज्दानें साहाय्य केलें."

आतांपर्यंत होऊन गेलेल्या अनेक साम्राज्यांपेक्षां तरी निदान इराणी साम्राज्य हें अधिक न्यायी व उदार होतें. इराणी बादशहा हे झरथुष्ट्राचे अनुयायी असून त्याच्या उपदेशाप्रमाणें आचरण करीत व त्यांच्या सत्तेमुळें या धर्माच्या शिकवणीचा प्रभाव त्यांच्या साम्राज्यांत दूरवर पडत गेला. आणि मित्र देवतेची उपासना बऱ्याच दूरवरच्या प्रदेशांत व दीर्घकालपर्यंत टिकून राहिली. एवढेंच नव्हे तर एका काळीं ती ख्रिस्ती संप्रदायाची प्रतिस्पर्धी होती. इराणी साम्राज्यानें लहानसहान राष्ट्रांच्या मर्यादा मोडून काढल्या. याप्रमाणें या पूर्वेकडील देशांमध्यें प्रथमच कला, शिल्प, वाङ्मय आणि शास्त्र यांचा उदय झाला. याच लोकांत प्रथम लिखित असे कायदे प्रचलित झाले. एकपरमेश्वराची कल्पना आणि त्याचें दयाळूपणानें मनुष्यजातीचें पालन या गोष्टी याच प्रदेशांत प्रथम कल्पिल्या गेल्या. एकराजसत्तेचा उदय पूर्वेकडे झाला होता व राज्यकारभारांत लोकांस कांहीं सत्ता असते ही कल्पना त्याच्यामध्यें उदय पावली नव्हती. त्यामुळें लोकराज्याची कल्पना त्यांस मुळींच नव्हती. तसेंच अनेक गोष्टी दैवी शक्तीनें होतात व देवहि अनेक असतात अशा कल्पना या प्रदेशात दीर्घकालापासून प्रचलित असल्यामुळें नैसर्गिक कारणें व निसर्गाच्या शक्तींचा शोध करण्याचा त्यांनीं कधीं प्रयत्न केला नाहीं. यामुळें भौतिक शास्त्रांची फारशी वाढ झाली नाहीं व वाङ्मयावरहि भोळ्या समजुतींचा पगडा पडत गेला. याप्रमाणें मानवजातीच्या ज्ञानांत अनेक अंगानें प्रगति व्हावयाची होती ती कालांतरानें कशी होत गेली हें आपण पुढें पाहूं.

याकरितां आपणांस पश्चिम दिशेच्या रोखानें जी एक इंडो-युरोपीय लोकांची शाखा गेली तिच्या कार्याकडे लक्ष दिलें पाहिजे. या लोकांनीं सध्यां ज्यास ग्रीस देश म्हणतात तेथें आपली स्थिर वस्ती करून आपल्या आयुष्यक्रमामध्यें जी सांस्कृतिक व वैचारिक प्रगति करून घेतली तिचा भविष्यकालीन जगावर कायमचा व महत्त्वाचा ठसा उमटला आहे. अशा या ग्रीक लोकांच्या इतिहासाकडे आपणांस लक्ष द्यावयाचें आहे व तें आतां आपण पुढील विभागामध्यें देऊं.

# भाग तिसरा

## झ

**झ**—या अक्षराचीं दोन वळणें आहेत. एक जैन व दुसरें दक्षिणी. याची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत; दुसरी, इ. स. २ ऱ्या शतकांतील वासिष्ठीपुत्र पुलुमायी याच्या एका लेखांत; व तिसरी, कोटा लेखांत ( काल इ. स. ७३८ ) आढळून येते. इ. स. ११ व्या शतकांतल्या एका हस्तलिखित पुस्तकांत चौथी अवस्था दृष्टीस पडते. पांचव्या अवस्थेतील वळणदार 'झ' चौथीपासून लवकरच तयार झालेला दिसतो.

**झबेताखान रोहिला** ( मृत्यु १७८५ )— एक मोंगल सरदार. नजीबखान रोहिल्याच्या या मुलानें आपल्या बापाच्या पश्चात् बादशहाकडून मीरबक्षीगिरी मिळवून मराठ्यांवर चालून जाण्याचें ठरवलें होतें. महादजी शिंदे यानें नजीबखानाच्या घराण्याचा सूड घेण्याचा संकल्प केला होता व त्याप्रमाणें त्यानें झबेताखान हा शुकतालच्या किल्ल्यांत असतां त्यांजवर तोफांचा मारा करून त्याचा सर्व प्रांत उध्वस्त करून टाकला. तेव्हां हा नजीबगडाच्या आश्रयास गेला. तरी मराठ्यांनीं नजीबगडहि हस्तगत करून झबेताखानाच्या बायका-मुलांस कैद केलें. पुढें यास नजफखानानें कांहीं दिवस आग्रा येथें कैदेंत ठेवलें होतें. याचा आपला मुलगा गुलाम कादर याच्याशीं सख्यभाव नसल्यानें यानें त्यांची जहागिरी सुद्धां जत केली होती. घोसगड येथें हा मरण पावला.

**झमानशहा**—एक अफगाण राजा. हा अहमदशहा अबदालीचा नातू व तैमुरशहाचा मुलगा असून, काबूल-कंदाहारचा राजा होता. बापाच्या पश्चात् हा गादीवर आला ( स. १७९३ ); व स. १७९६ त लाहोरपर्यंत चालून आला होता. दिल्लीवर येण्याचा त्याचा बेत होता; परंतु काबूलकडे त्याच्या भावांनीं बंडाळी केल्यामुळें तो तेथूनच परत फिरला. पुढें ( १८०० ) त्याच्या धाकट्या भावानें ( हिरातच्या महमुदशहानें ) त्याचे डोळे काढून, त्याला बाला हिसार किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. इंग्रजांनीं जेव्हां ( १८३९ ) शहासुजा याला काबूलच्या गादीवर बसविलें, तेव्हां अफगाण लोकांनीं झमानशहाच्या नांवाची द्वाही फिरविली होती.

**झरथुष्ट्र** ( सु. खि. पू. ९ वें शतक )— जगांत जे अत्यंत प्राचीन व उज्ज्वल धर्मपंथ आहेत त्यांत झरथुष्ट्री धर्माची गणना होते. झरथुष्ट्री धर्माचा उदय व विकास इराणांत झाला. झरथुष्ट्राला जन्मून अडीच हजारांवर वर्षे झालीं असतील. मीडियाच्या पश्चिमेस असलेल्या अट्रोपेटेन या गांवीं झरथुष्ट्र जन्मला. जगन्नियन्ता जो अहुर मझ्द त्याचें तेज झरथुष्ट्राची माता दुग्धोवा हिच्या गर्भांत प्रविष्ट झालें. यज्ञांतील 'हओम' (सोम) पितांना

तें झरथुष्ट्राच्या पितरांच्या पोटांत जावें अशी व्यवस्था देवांनीं करून ठेवली होती. झरथुष्ट्राच्या बालवयांत त्याच्यावर अनेक गंडांतरें आलीं; पण त्या सर्वांतून तो निभावला. चेटकी व अधर्मी लोकांनीं त्याला एकदां भट्टींत टाकून दिलें; एकदां गुरांच्या खिल्लारापुढें नेऊन टाकले; एकदां लांडग्यांच्या तोंडीं दिलें; पण त्या सर्वांतून तो पूर्णपणें निभावला.

यथाकालीं झरथुष्ट्राला गुरुगृहीं पाठविण्यांत आलें, आणि तेथें तो असामान्य बुद्धिमत्ता प्रगट करूं लागला. तो मूर्तिपूजेचा निषेध करी. मनुष्येतर प्राण्यांच्या दुःखाकडेहि तो कळवळ्यानें पाही. पुढें त्याचें लग्न ठरलें. त्या काळच्या रिवाजाप्रमाणें लग्न होईपर्यंत वधूचें मुखावलोकन करावयाचें नाहीं असें बापानें सांगितलें. पण वधूनें लग्नापूर्वी अवगुंठन सोडून दिलें पाहिजे असा त्यानें आग्रह धरला व बापाला तो पुरवावा लागला. अशा रीतीनें हा धर्मसुधारक लहान वयांतच आपल्या स्वतंत्र बुद्धीची चमक दाखवूं लागला.

झरथुष्ट्राच्या गांवानजीक एक पर्वत होता. या पर्वतांतील गुहेंत अनेक दिवस चिंतन करून झरथुष्ट्रानें परमेश्वरी साक्षात्कार प्राप्त होण्याची साधना केली. एके दिवशीं पहांटे झरथुष्ट्र दैत्या नदीच्या तीरावर हिंडत असतां देवदूत वोहूमना त्या ठिकाणीं आला व त्यानें झरथुष्ट्राला मझ्दाच्या दरबारांत नेलें. मझ्दानें त्याला श्रेष्ठ तत्त्वज्ञान निवेदन केलें. हा चमत्कार एका दिवसांत तीन वेळां घडला. पुढें वेळोवेळीं अनेक देवदूत प्रगट होऊन त्यांनीं झरथुष्ट्राला कांहीं ना कांही धर्मतत्त्वाची माहिती दिली व अशा रीतीनें या धर्मसंस्थापकाच्या ज्ञानाला पूर्णता आली.

यानंतर झरथुष्ट्रानें जारीनें धर्मप्रसार सुरू केला. तो राजा कै गुस्तास्प याच्याकडे गेला. राजावर जुन्या धर्मवेड्या सनातन्यांचा पगडा फार होता. पहिल्या भेटींतच झरथुष्ट्रानें राजाला भारून टाकिलें. पण धर्मगुरुंनीं राजाच्या कानांत विष ओतून झरथुष्ट्र हा जारणमारण करणारा चेटक्या आहे असें त्यास भासविलें. राजाला तें खरें वाटून राजानें झरथुष्ट्रास कैद करून कारागृहांत टाकिलें.

इकडे राजाच्या आवडत्या घोड्याचे पाय आंखडले गेले. राजा झरथुष्ट्राकडे गेला व घोड्याला पूर्ववत् करण्याविषयीं त्यानें त्याला विनविलें. झरथुष्ट्रानें राजाला आपल्या धर्माचा स्वीकार करावयास लाविलें तेव्हां घोडा पूर्वीसारखा झाला. मग खोरासान प्रांतांतील विख्यात अग्निमंदिरापुढें झरथुष्ट्रानें एका लहान झाडावर 'गुस्तास्प राजानें मझ्दाच्या धर्माचा स्वीकार केला', असें वाक्य कोरलें. यापुढें झरथुष्ट्री धर्माचा प्रसार होऊं लागला. ग्रीक व आर्य पंडितहि झरथुष्ट्राची कीर्ति ऐकून त्याच्या भेटीस येऊं लागले.

परंतु लौकरच परचक्राचीं संकटें इराणवर ओढवलीं. प्रथम आरजास्प नांवाचा एक राजा गुस्तास्पवर स्वारी करून आला त्याला झरथुष्ट्री धर्माचें उच्चाटण करावयाचें होतें. प्रथम झरथुष्ट्री पंथाचीं पुष्कळ माणसें कामास आलीं. पण पुढें झरथुष्ट्री लोकांनीं चांगलाच पराक्रम गाजविला. विशेषतः इराणचा 'अर्जुन' म्हणून प्रसिद्ध असलेला राजपुत्र एस्फेंदियर यानें शत्रूचा धुव्वा उडविला. पण पुढें लौकरच तुर्क लोकांनीं इराणवर हल्ला केला. बल्क शहरीं एका पवित्र अग्निमंदिरापुढें झरथुष्ट्र उपासना करण्यांत तल्लीन झाला होता. इतक्यांत रानटी तुर्कांनीं तेथें येऊन धुमाकूळ माजविला. रक्ताचा चिखल झाला. इतक्यांत स्वर्गांतून एक तेजाचा स्रोत खालीं आला. झरथुष्ट्राचा आत्मा त्या स्रोतांत मिसळून अहुर मझ्दाच्या गीतानिवासांत शाश्वत वस्तीसाठीं गेला. अशा रीतीनें हा थोर धर्मोपदेशक वयाच्या ७६ व्या वर्षी भूतलावरून अदृश्य झाला.

याप्रमाणें पारशी धर्माच्या संस्थापकाचें चरित्र आहे. इराणांत झरथुष्ट्राचा धर्म इ. स. ७ व्या शतकापर्यंत टिकला. पुढें त्या धर्माचे अनुयायी हिंदुस्थानांत येऊन राहिले. अग्नि-उपासना हा या धर्माच्या संस्कारांतील प्रमुख भाग आहे. पारशी पाहा.

**झरा**— जमिनींतून आपोआप वर येणारा पाण्याचा प्रवाह. पावसाचें पाणी सच्छिद्र खडकांवर पडतें व तें खालीं जातां येईल तितकें जातें. वाळूचा, चुन्याचा खडक झिरपणारा असल्यानें त्यांतून असें पाणी मुरून खालीं जातें. पुढें वाट बंद झाल्यावर सांचलेलें पाणी मागच्या पाण्याच्या जोरामुळें सांधीफटींतून पुन्हां वर येतें. अशा पाण्यांत गंधक, मीठ, लोह. इ. खनिज द्रव्यें विरलीं गेल्यास खनिजोदकाचे झरे बनतात. ऊन पाण्याचे झरे देखील असेच होतात.

**झा, डॉ. गंगानाथ** (१८७१-१९४१)—बिहार प्रांतांतील एक विद्वान् प्राच्यविद्याविशारद, अलाहाबाद विद्यापीठाचे माजी कुलगुरु व संस्कृत भाषा, हिंदु कायदा आणि तत्त्वज्ञान यांचे पंडित. बनारसच्या क्वीन्स कॉलेजमधून एम्. ए. ची पदवी मिळविल्यावर सन १८९३ मध्यें दरभंगा संस्थानच्या ग्रंथालयाच्या व्यवस्थापकाच्या जागेवर यांची नेमणूक झाली. या जागेवर असतांना हिंदुस्थानांतील अमूल्य ग्रंथसंग्रह ग्रंथालयासाठीं मिळवून देण्याची कामगिरी यांनीं केली. तसेच हिंदु कायदा आणि तत्त्वज्ञान या विषयाचा सखोल अभ्यास याच कालांत यांनीं केला. यानंतर कांहीं दिवस अलाहाबादच्या सेंट मूर कॉलेजमध्यें व नंतर प्रॉव्हिन्शिअल एज्युकेशनल सर्व्हिसमध्यें यांनीं काम केलें. अलाहाबाद विद्यापीठाशीं याच वेळीं यांचा संबंध आला व; सन १९०५ मध्यें त्या संस्थेचे फेलो, सन १९१० मध्यें सिंडिकेटचे

सभासद व सन १९२३–३२ या कालांत हे त्या विद्यापीठाचे कुलगुरु ( व्हाइस चॅन्सेलर ) झाले.

सन १९२६ मध्यें 'फिलॉसॉफिकल डिसिप्लिन' या कलकत्त्याला दिलेल्या 'कमला लेक्चर्स' मालेंतील व्याख्यान-ग्रंथाच्या प्रसिद्धीमुळें ग्रंथकार या नात्यानें हे लोकांसमोर आले. मुंबई विद्यापीठानें यांच्या मीमांसासूत्रांच्या भाषांतराला कॅम्बेल सुवर्णपदक देऊन यांचा गौरव केला. 'शंकराचार्य व त्यांचें भारतीयांच्या उद्धाराचें कार्य', 'वेदांत तत्त्वज्ञान' यांसारखीं यांचीं विद्वत्तापूर्ण व्याख्यानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालीं आहेत. 'हिंदु कायदा', 'शांकर वेन्दात' व 'पूर्वमीमांसा' यांचीं साधनें यांसारखे टीकात्मक वाङ्मय यांनीं लिहिलें आहे. यांनीं ईश, केन, कठ, वगैरे आठ उपनिषदांचा एस्. सीतारामशास्त्री यांच्या सहकार्यानें केलेला अनुवाद व शांकरभाष्याचें भाषांतर हें प्रसिद्ध आहे.

यांनीं केलेल्या थोर वाङ्मयकार्याबद्दल सरकारनें १९४१ सालीं यांना 'महामहोपाध्याय' व 'सर' अशा पदव्या देऊन यांचा गौरव केला. रॉयल एशियाटिक सोसायटी ( लंडन ) व ब्रिटिश ॲकॅडमी यांचे हे सभासद होते.

'डॉ. गंगानाथ झा रीसर्च इन्स्टिटयूट' ही संशोधनसंस्था यांचें स्मारक होय. या संस्थेतर्फे १९४३ सालापासून एक नियत-कालिक प्रसिद्ध होतें. तसेंच या संस्थेचें एक मोठें ग्रंथालयहि आहे.

**झाकाटेकस संस्थान**— अमेरिका, मेक्सिकोमधील एक संस्थान. क्षे. फ. २८,१२२ चौ. मै. असून हें ७,७०० फूट उंचीवर वसलेलें आहे. प्रदेश डोंगराळ असून मोठी नदी एकहि नाहीं. पाऊस कमी, त्यामुळें धान्य थोडें उत्पन्न होतें. हें संस्थान तेथील चांदीच्या खाणीसाठीं प्रसिद्ध आहे. झाडांपासून रबर काढणें, अशुद्ध धातू खाणींतून काढणें, इत्यादि धंदे येथें चालतात. लो. सं. ५,६५,४३७.

झाकाटेकस हें राजधानीचें शहर १५४६ सालीं चांदीच्या खाणीची एक रेषा जमिनींत सांपडली त्यामुळें तेथें वसलें गेलें. हें ८ हजार फूट उंचीवर आहे व टेंकडीवर वसलें आहे. ही व्यापाराची मोठी उतारपेठ आहे. येथील हवा कोरडी व आरोग्यदायक आहे. चांदीप्रमाणें सोनें, पारा, तांबें, लोखंड, जस्त, शिसें, मीठ, बिस्मथ, वगैरे खाणींतून काढतात. हा धंदा येथें मुख्य आहे.

**झांग**—पाकिस्तान, पंजाब, मुलतान भागांतील एक जिल्हा. याचें क्षे. फ. ३,४१५ चौ. मै. आहे. हा जिल्हा १८६१ सालीं नवीन वसविण्यांत आला. या जिल्ह्यांत झांग, चिनिओत, व शोरकोट या तहशिली आहेत. एकंदर गांवें ९८४ आहेत. लो. सं. ८,२१,६३१.

या जिल्ह्यांतून झेलमचा कालवा व चिनाबचा कालवा हे जात असल्यामुळें पूर्वीं ओसाड असलेला प्रदेश लागवडीखालीं येत आहे. येथें पाऊस सरासरी ८ इंच पडतो.

ह्या जिल्ह्याचा इतिहास म्हणजे सियाळ जातीचा इतिहास होय. या जातीनें शाहपूर व सुलतान यांच्या दरम्यान असलेल्या प्रदेशावर १९ व्या शतकाच्या आरंभापर्यंत राज्य केलें. हे लोक रजपूत वंशाचे असून त्यांच्या धारनगरच्या शंकरराय उर्फ सियाळ नांवाच्या एका पूर्वजानें मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली. ही गोष्ट १३ व्या शतकांत घडली. त्या वेळेपासून या जातीचें या भागावर प्रभुत्व होतें. बहुतेक सियाळ हे चांगले मुसलमान आहेत. इ. स. १८४७ मध्यें ब्रिटिश अमल सुरू झाला त्या वेळीं व इ. स. १८५७ च्या बंडांत या जहागीरदारानें ब्रिटिश सरकारास बरीच मदत केली. याबद्दल याला सरकारांतून कांहीं पेन्शन मिळालें.

ह्या जिल्ह्यांत शेंकडा ६८ मुसलमान, २४ हिंदू व ७ शीख याप्रमाणें वस्ती आहे. हल्लीं हा जिल्हा पंजाबांत महत्त्वाचा झाला असून येथें गहूं, ज्वारी, मका, कापूस, वगैरे पिकें होतात.

शहर—हें झांग जिल्ह्याचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण असून नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेच्या जेच–दोआब फांट्यावरील एक स्टेशन आहे. लो. सं. २५,००० वर आहे. गांवाच्या आसपास झाडी पुष्कळ असून बागाईत बरीच आहे. पंधराव्या शतकांत झांग गांव वसलें असावें. १८०५ सालीं रणजितसिंगानें हा गांव सर केला होता. सन १८६७ मध्यें येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. झांग–मघीआनाची लो. सं. ५०,०५१.

**झांज**— एक वाद्य. वयांत आलेल्या माणसाच्या तळहाता-एवढे असे कांशाचे दोन तुकडे वर्तुलाकार असतात; या प्रत्येक तुकड्यास बरोबर मध्यावर सुमारें दोन अंगुळें गर्भ ठेवून फुगवटी चढविलेली असते; तीमुळें आंतल्या बाजूनें सहजच पोकळी होते. या पोकळीच्या मध्यावर भोंक पाडून त्यांतून दोरी ओवून तिला आंतल्या अंगानें गांठ मारून ती बाहेर काढतात व बाहेरून गांठ मारून पक्की करतात; व त्या गांठीवर एक लांकडाची सुपारी-एवढी गोटी बसवितात, म्हणजे हातीं धरण्यास सुलभ जातें. झांजेचा उपयोग ताल धरण्याकडेच होतो. प्रायः कथा, भजन व आरती ह्या प्रसंगीं झांजेचा उपयोग होतो.

**झांजिबार**— पूर्व आफ्रिकेंतील टांगानिकाच्या पूर्वेस किनाऱ्यापासून २५ मैलांवर असलेलें एक बेट व त्याच बेटांतील पश्चिम किनाऱ्यावर असलेलें एक बंदर. बेटाची लांबी ५३ मैल; क्षेत्रफळ ६४० चौरस मैल. लो. सं. १,५०,०००, हिंदी लोक

१७,००० आहेत. झांजिबार शहराची लो. सं. ५०,०००. मुख्य व्यापार लवंगा, खोबरें व साखर यांचा. जगांतील लवंगांच्या व्यापारांतील ८० टक्के येथील असतात व हा व्यापार बहुतेक हिंदी लोकांच्या हातीं आहे. १९३४ सालीं हिंदी लोकांच्या या व्यापारावर सरकारी निर्बंध पडले. ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं येथें एक सुलतान राज्य करितो; तो अरब आहे.

१६ व्या शतकांत पोर्तुगीजांना हांकलून लावण्यासाठीं आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील अरबांनीं मस्कतच्या इमामांची मदत मागितली. पुढें मस्कतचें मांडलिकत्व नांवाचेंच होतें. १८३२ सालीं सय्यद सैदनें आपली राजधानी झांजिबारला आणली. १८५६ सालीं हें स्वतंत्र राज्य बनलें. नंतर १८९० मध्यें ब्रिटिशांनीं व्यापारासाठीं यावर स्वामित्व मिळविलें व हें ब्रिटिशसंरक्षित राज्य म्हणून केलें. झांजिबारखेरीज पेंबा व भोंवतालचीं लहान बेटें या संरक्षित राज्यांत येतात. सध्यांचा सुलतान सय्यद सर सालिफा बीन हरूब हा १९११ सालीं गादीवर आला. येथें एक ब्रिटिश रेसिडेंट असतो.

**झाडीतेलंग**—मध्यप्रांतांत गोंड व हलक्या जातीचे तेलंग या लोकांच्या मिश्रणापासून या झाडीतेलंग लोकांची उत्पत्ति आहे असे म्हणतात. यांची संख्या सु. ५,००० आहे. यांच्या तीन उपजाती झाल्या आहेत: (१) पुराइत, (२) सुराइत, व (३) पोहनी. पुराइतास अन्य जातीच्या स्त्रीपासून झालेल्या मुलास सुराइत म्हणतात व सुराइतास अन्य जातीच्या स्त्रीपासून झालेल्या मुलास पोहनी म्हणतात. हे लोक स्वतःचे पूर्वज बस्तरच्या राजाबरोबर वरंगळाहून आले असें सांगतात.

हे आपल्या जातींत ब्राह्मण, रजपूत व हलवा या लोकांस घेतात, व यांपैकीं कोणासहि तेलंगी स्त्रीपासून मुलगा झाला तर त्याचा प्रवेश त्याच्या आईच्या वर्गांत होतो. पण रावत, धाकर, जंगम, कुंभार व कलार यांच्यापासून मुलगा झाला तर तो आईच्या वर्गाहून एक वर्ग खालीं जातो.

यांच्या प्रत्येक कुलाच्या निरनिराळ्या देवता आहेत. देवतेच्या प्रतिमा लांकडी व दगडी असतात. यांचे पुरोहित जंगम असतात. यांचा जादूटोण्यावर फार विश्वास आहे. हे लोक शेतकींतील मजुरीचीं कामें करितात.

**झान्टे**—ग्रीसच्या ताब्यांतील आयोनियन विभागांतील, आयोनियन समुद्रांतील एक बेट. याचें क्षे. फ. २७७ चौ. मै. आहे. बेट २५ मैल लांब व १२ मैल रुंद आहे. बेटांत चुनखडीच्या टेंकड्या असून सर्वांत उंच टेंकडी १,६०० फूट आहे. बेटाचा मध्यभाग सुपीक आहे. टेंकड्यावरहि द्राक्षें, अंजीर, ऑलिव्ह, नारिंगे, वगैरे फळझाडें अतिशय आहेत. द्राक्षांची दारू करितात. बेटांत सर्वत्र लहान लहान पाण्याचे झरे आहेत. भूकंप मात्र नेहमीं होतात. रोमन साम्राज्यांत हें बेट एपिरस प्रांताचा भाग होता (ख्रि. पू. २११). पुढें याचें स्वामित्व अनुक्रमानें फ्रान्स, रशिया, इंग्लंड आणि ग्रीस यांकडे गेलें. लो. सं. (१९३८) ४४,७५०. हल्लीं हें बेट ग्रीक राज्यांत मोडतें.

बेटाची राजधानी झान्टे असून तें बंदर आहे. त्याची वस्ती साडेतेरा हजार आहे. हें प्राचीन झासिंथस नांवाचें शहर होय. लो. सं. ११,६०९.

**झाफरुल्लाखान, सर महंमद चौधरी** (१८९३- )—एक हिंदी मुसलमानांचे पुढारी व पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री. यांचें शिक्षण लाहोर व लंडन यांमध्यें झालें. १९१४ ते १९१६ पर्यंत यांनीं पंजाबमध्यें सियालकोट येथें वकिली केली. १९१६ ते १९३१ पर्यंत लाहोर हायकोर्टांत वकिली केली. १९१६ ते १९३२ पर्यंत हे 'इंडियन केसेस' या कायद्याच्या मासिकाचे संपादक होते. १९१९ ते १९२४ पर्यंत लाहोर येथील लॉ-कॉलेजमध्यें प्राध्यापक होते. १९१६ ते १९३२ पर्यंत पंजाब कायदेमंडळाचे सभासद होते. १९३०-१९३१ मध्यें गोलमेज परिषदेस प्रतिनिधि म्हणून गेले होते. १९३१ मध्यें अ. भा. मुस्लिम लीगचे अध्यक्ष होते. १९३१ मध्यें दिल्ली कटाच्या खटल्यांत हे सरकारी वकील होते. १९३२ मध्यें हे गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी मंडळाचे सभासद झाले. १९३९ सालीं कायदेमंत्री झाले. १९४२ त हिं. सरकारचे आफ्रिकेंतील एजंट जनरल होते. पाकिस्तान झाल्यावर यांना त्या राष्ट्रांत परराष्ट्रमंत्री म्हणून नेमलें. यांनीं 'युनो' मध्यें पाकिस्तानातर्फें हिंदी संघराज्याविरुद्ध काश्मीर-हैद्राबादबाबत कैफीयत मांडली.

**झाबुआ**—हें मध्यहिंदुस्थानांतील, जुन्या भोपावर एजन्सींतील एक संस्थान. याचें क्षे. फ. १,३३६ चौ. मै. आहे. लो. सं. सव्वा लाख आहे. संस्थान मध्यभारत संघांत १९४८ सालीं सामील झालें.

सोळाव्या शतकांतील लभाना संस्थानचा प्रसिद्ध लुटारू जो झब्बु नाईक, त्याच्या नांवावरून या संस्थानास व राजधानीस हें नांव पडलें. इ. स. १५८४ त दिल्लीच्या बादशहानें या नायकाच्या वंशजांस माळव्यांतील बदनावरची जहागिरी दिली. संस्थानचें उत्पन्न १४¾ लक्ष रु. आहे.

संस्थानांत भिल्लांची वस्ती शेंकडा ७२ आहे. संस्थानांत ६८६ खेडीं आणि १५८ भिल्लांचीं पाली आहेत. मही नदीच्या आसपासचा प्रदेश लागवडीस योग्य आहे.

येथें खनिज पदार्थ पुष्कळ आहेत. रंभापूर येथें मँगनीजच्या लहान खाणी आहेत. येथें पूर्वीं अफू फार होत असे. या संस्थानांत चार परगणे व अठरा लहान लहान जहागिरी आहेत. राजधानी झाबुआ नांवाचीच असून ती भादुरसागर या तलाव-

१०८ देवळें असून त्यांत घंटा टांगलेल्या होत्या. म्हणून यास हें नांव पडलें असें कोणी म्हणतात. झालार म्हणजे पाण्याचे झरे जवळ असल्यामुळें हे नांव पडलें असें दुसरे कोणी म्हणतात. येथील राजघराणें झाला नांवाचें असून त्याच घराण्यांतील एकानें हें गांव वसविलें म्हणून झालारपाटण नांव पडलें, अशी आणखी एक उपपत्ति आहे.

औरंगजेबाच्या कारकीर्दींत या गांवाचा नाश होऊन येथील देवळांची पडझड झाली. शीतलेश्वर महादेवाचें देऊळ त्यांतल्या त्यांत प्राचीन असून त्याची बांधणी ६ व्या शतकांतील आहे. या प्राचीन अवशेषांच्या उत्तरेस झालीमसिंगानें इ. स. १७९६ मध्यें हा नवीन गांव वसविला. इ. स. १८७६ त येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

छावणी— ही छावणी १७९१ साली झालावाड्याच्या झालिमसिंगानें वसविली. येथील लोकवस्ती १४,००० पर्यंत आहे. संस्थानिकाचा राजवाडा येथेंच आहे.

**झालावाड संस्थान**—हें संस्थान राजपुतान्यांत आग्नेयीस आहे, व याच्याभोंवतीं कोटा, इंदूर, ग्वाल्हेर, सीतामऊ, देवास व टोंक हीं संस्थानें आहेत. संस्थानचें क्षे. फ. ८१३ चौरस मैल आहे. संस्थानचा बराचसा भाग सपाट असून प्रमुख अशी काली नदी आहे. येथील हवा माळव्याप्रमाणे निरोगी आहे. पाऊस दरवर्षी सरासरी ३७ इंच पडतो. लो. सं. १,२२,२९९.

येथील राजघराणें रजपुतांच्या झाला वंशांतील असून राजास राणा व महाराजहि म्हणतात. इ. स. १४८८ च्या सुमारास राजधर नांवाच्या एका पुरुषानें काठेवाडामध्यें झालावाड प्रांतांत हालवाड येथें लहानशी जहागीर स्थापिली.

हल्लींचे राजे राणा हरिश्चंद्र यांचा जन्म स. १९२१ त झाला आहे. १९४३ साली हे गादीवर बसले. यांच्या वडिलांनी राज्यांत पुष्कळ सुधारणा केल्या. या संस्थानांत शहरें व खेडी सर्व मिळून एकंदर ४१० गांवें आहेत. संस्थानचें उत्पन्न सु. ८ लाख आहे. संस्थानांत एकंदर ५ तहशिली असून झालारपाटण (राजधानी) व छावणी हीं दोन शहरें आहेत. सोंधे लोकांची वस्ती जास्त दिसली तरी एकंदर लोकसंख्येंत त्यांचें प्रमाण शेंकडा २४ पडतें. निव्वळ शेतकीवर उपजीविका करणाऱ्यांचें प्रमाण शें. ५४ आहे.

उत्पन्नाचे मुख्य पदार्थ म्हटले म्हणजे ज्वारी, मका, कापूस, हरबरा, गहूं हे होत. गुरेंढोरें विपुल असून तीं चांगलीं मजबूत असतात. घोड्याकरितां या संस्थानची एकदां ख्याति होती. येथें थोडेंसे सैन्य असून त्यांतील पायदळापैकीं बऱ्याच जणांना पोलिसचें काम करावें लागतें. शिक्षणाच्या बाबतींत राजपुतान्यांतील एकंदर लहान-मोठ्या संस्थानांत व जहागिरींत झालावाडचा सातवा क्रम लागतो. येथें लिहितां-वाचतां येणारांचें प्रमाण राजपुतान्यांत सर्वांत जास्त आहे. शिक्षण मोफत मिळतें. आतां हें संस्थान राजस्थान संघांत सामील झालें आहे.

**झांशी**— हा जिल्हा संयुक्त प्रांतांत आहे. याचें क्षे. फ. ३,६०६ चौ. मै. आहे. या जिल्ह्यांतील हवा कोरडी व उष्ण आहे. पावसाची सरासरी ३१ इंच आहे. लो. सं. ७,७३,००२.

या जिल्ह्याच्या दक्षिणेकडील प्रदेश रुद्रप्रतापाच्या दुसऱ्या मुलाकडे होता; त्यानें चंदेरीचें राज्य स्थापिलें. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत चंपतरायाने बुंदेल्यांची तिसरी शाखा स्थापली. त्याचा पुत्र छत्रसाल यानें झांशी जिल्ह्याच्या बऱ्याच भागावर आपली सत्ता प्रस्थापित केली. सन १७३४ त छत्रसाल मरण पावल्यावर मराठ्यांस या राज्याचा तिसरा भाग मिळाला व त्यांनीं बाकीचा बहुतेक भाग ओरछाच्या राजापासून जिंकून घेतला (१७४२). १८१७ सालीं पेशव्यांनीं बुंदेलखंडावरील आपलें स्वामित्व सोडून तो प्रांत ईस्ट इंडिया कंपनीस दिला व त्याच वर्षी कंपनीनें तेथील मराठे सरदारांचे हक्क वंशपरंपरेचे आहेत ही गोष्ट मान्य केली.

या जिल्ह्यांत पुराणवस्तु पुष्कळ सांपडतात. या जिल्ह्यांत ९ मोठीं गांवें व १,३३१ खेडीं आणि सहा तहशिली आहेत. येथें शेंकडा ९३ हिंदु लोकांची वस्ती असून शेंकडा ९९ लोक बुंदेली भाषा बोलतात. या जिल्ह्यांत गहूं चांगला पिकतो. ज्वारी, हरभरा वगैरे पिकेंहि येथें होतात.

शहर—हें झांशी जिल्ह्याचें व तालुक्याचे मुख्य ठिकाण जी. आय्. पी. रेल्वेवर मुंबईहून ७०२ मैल अंतरावर आहे. लोकसंख्या ७५ हजार. ओरछाचा राजा वीरसिंगदेव यानें हें शहर वसवून येथील किल्ला बांधला (१६१३). इ. स. १७४२ पर्यंत हा गांव बुंदेल्यांकडे होता. परंतु त्या सालीं छत्रसाल याच्या मृत्युपत्रानें हा गांव मराठ्यांकडे आला.

माळव्यांत बाजीरावाने छत्रसालपासून कांहीं प्रांत मिळवून येथें मराठ्यांची सत्ता स्थापन केली (१७३४). महाराष्ट्रांतून कोणी सरदार येऊन सालीना ६ लक्षांप्रमाणें पांचसात वर्षांची खंडणी वसूल करीत असे. पुढें (१७४२) मल्हार कृष्ण व राणोजी शिंदे असे उभयतां सरदार आले असतां त्यांचा झांशीस मुक्काम झाला. रात्री बुंदेले ओरछेकर यांनीं छापा घालून मल्हार कृष्णाचा खून केला व मराठ्यांचा पराभव केला. तेव्हां पुण्याहून नारो शंकर राजेबहादूर याची रवानगी झाली. त्यानें प्रथम ओरछास येऊन लढाई करून व तेथील राजास कैद करून राजधानीवर गाढवांचा नांगर फिरविला. याच वेळीं झांशी मराठ्यांनीं घेतली. नारोशंकरनें इ. स. १७४२–५६ पर्यंत झांशी प्रांताचा बंदोबस्त ठेविला. पुढें महादाजीपंत सुभेदार

झाला. तो १७६० पर्यंत होता. ह्याच्यानंतर बाबुराव कान्हेरे हा १७६५ पर्यंत सुभेदार राहिला. पुढें विश्वासराव लक्ष्मण आला. नंतर रघुनाथराव हरि नेवाळकर जुन्नर सुभ्याचा सुभेदार याची नेमणूक झाली. त्यानें २५ वर्षें कारभार केला.

ज्या जागेवर हल्लीं झांशीचा किल्ला आहे, त्या ठिकाणीं पूर्वी बलवंतनगर नांवाचें लहान गांव होतें. नारो शंकरानें झांशीचा किल्ला ताब्यांत घेऊन तेथें आपलें वास्तव्य केलें आणि किल्ल्यास लागूनच झांशी हें नवीन शहर वसविलें. त्यांत ओरछाच्या लोकांकडून जबरीनें झांशी शहरांत वस्ती करविली आणि दक्षिणेंतूनहि पुष्कळ कुटुंबें आणून झांशीची वसाहत केली. गंगायमुनांच्या मधील सुपीक दुआबांत जाण्याचा रस्ता झांशीवरून असल्यामुळें थोड्याच अवधींत झांशीचा व्यापार वाढून तें शहर फार सधन झालें.

येथें जी. आय्. पी. रेल्वेचा गाड्या दुरुस्तीचा मोठा कारखाना आहे. सु. तीन हजार मजूर कामावर असतात. येथें किल्ल्यांत लष्करी तळ आहे. शहर चांगलें तटबंदी असून त्याला ९ वेशी आहेत. भोंवतीं अनेक तळीं आहेत. १८६१–१८८६ पर्यंत हें शहर ग्वाल्हेरकरांच्या ताब्यांत होतें. पुढें ग्वाल्हेर किल्ल्याच्या बदला हें ब्रिटिशांकडे आलें.

**झांशीची राणी (लक्ष्मीबाई) (१८३५–१८५८)**— ही शूर महाराष्ट्रीय महिला, दुसरे चिमाजी आप्पा पेशवे यांचे कारभारी

मोरोपंत तांबे यांची मुलगी. नांव मनुताई. हिचा जन्म काशी येथें १८३५ नोव्हेंबर ता. १९ रोजीं झाला. हिच्या जन्मानंतर तीनचार वर्षांनीं हिची आई व दुसरे चिमाजी आप्पा पेशवे वारल्यामुळें तिचे वडील तिच्यासह ब्रह्मावर्तास दुसऱ्या बाजीराव पेशव्यांकडे जाऊन राहिले. तेथेंच पेशवे कुटुंबांत तिचें बालपण गेलें. नानासाहेब, रावसाहेब, बाळासाहेब या पेशवे मंडळींचें तिच्यावर फार प्रेम असे. ते आपल्याबरोबरच तिचेंहि शिक्षण करून घेत. यामुळें तिला लहानपणींच शालेय व तसेंच काठी–बोथाटी, घोड्यावर बसणें, यांसारखें मर्दानी शिक्षणहि मिळालें.

हिचा विवाह झांशीचे राजे गंगाधरराव यांच्याशीं झांशीला १८४२ च्या वैशाख महिन्यांत झाला. १८५१ मध्यें हिला एक मुलगा झाला. पण तो तीन महिन्यांनींच मरण पावला. पुढें गंगाधरराव आजारी पडले व दुखण्यांतून उठण्याचा रंग दिसेना, म्हणून आपल्या कुळांतलाच आनंदराव या नांवाचा मुलगा बुंदेलखंडाचा पो. एजंट एलिस व लष्करी अधिपति मार्टिन या ब्रिटिश प्रतिनिधींच्या समक्षच त्यांनीं यथाशास्त्र दत्तक घेतला. त्याचें नांव दामोदरराव असें ठेविलें. नंतर १८५३ च्या नोव्हेंबरांत गंगाधरराव मरण पावले.

मालकम या इंग्रज प्रतिनिधीनें गव्हर्नर जनरलकडे दत्तक मुलगा कबूल न करतां राणीला महिन्याला ५,००० रु. ची नेमणूक करून देऊन संस्थान खालसा करण्यांत यावें, म्हणून शिफारस केली. शिफारसीप्रमाणेंच नेमणूक व राजवाडा राणीला मिळून दत्तक मुलगा फक्त खाजगी इस्टेटीला मान्य असल्याबद्दल कलकत्त्याहून लिहून आलें. त्याबरोबर एलिसनें संस्थान व किल्ला ताब्यांत घेतला. राणीनें, इंग्रजांना आपल्या सासऱ्यानें कठिण प्रसंगीं कितीदां मदत केली, याबद्दल ब्रिटिश सरकारला जाणीव दिली; इतकेंच नव्हे तर विलायतेला कोर्ट ऑफ डायरेक्टर्सकडे, आपले व कंपनी सरकारचे तह कशा प्रकारचे झाले आहेत व सध्यां संस्थानावर कसा अन्याय होत आहे तो दाखवून तो न व्हावा म्हणून, तिनें दाद मागितली. पण कशाचाहि उपयोग झाला नाहीं.

अशा प्रकारच्या विपण्ण स्थितींत ती काळ कंठीत असतांना १८५७ मध्यें शिपाई लोकांच्या मनक्षोभामुळें बंडाला आरंभ झाला. यांत दुसरे नानासाहेब पेशवे, अयोध्येचा नबाब, दिल्लीचा बादशहा यांसारखी प्रमुख पुढारी मंडळी सामील झाली. झांशीचें सैन्यहि बंडवाल्यांना मिळालें. त्यांनीं झांशीचा किल्ला व दारुगोळा ७ जून १८५७ ला हस्तगत केला.

या धामधुमींशीं राणीचा कसलाहि संबंध नव्हता. तेथील इंग्रज अधिकाऱ्यांच्याच इच्छेप्रमाणें राणीनें झांशी संस्थान ताब्यांत घेऊन सरकारी माणसांचें रक्षण केलें. यानंतर बंडवाल्यांनीं राणीकडे येऊन तिला गादीवर बसविल्याची ग्वाही फिरविली व एक लाख रुपये घेऊन ते दिल्लीकडे निघून गेले. इतकी स्थिति झाली तरी राणीनें इंग्रजांसच मदत केली. टिक-

ठिकाणच्या इंग्रजांस बंडाची वर्दी देऊन सावध केलें. पण इंग्रजांना वरील कृत्यें उलटींच दिसलीं. आपल्यांविरुद्ध राणीनें बंड पुकारलें असें त्यांना वाटूं लागलें. त्यांचा हा समज नाहींसा करावा म्हणून राणीनें आपला वकील त्यांच्याकडे पाठविला. पण वकिलानें आपली कामगिरी बरोबर केली नाहीं. यामुळें व शिवाय तिला तीर्थक्षेत्रीं केशवपनाला जाण्यास सरकारनें परवानगी दिली नाहीं, तिच्या खाजगी उत्पन्नामधून नवऱ्याच्या कर्जाबद्दल मोठी रक्कम जप्त करूं लागले, या सर्व कारणांमुळे 'इंग्रज हे कृतघ्न आहेत' अशी राणीची समज होऊन ती खरी-खुरीच बंडवाल्यांना मिळाली.

तिचा बंदोबस्त करण्यासाठीं सर ह्यूज रोजनें झांशीस वेढा दिला. राणीनें पेशवे व तात्या टोपे यांना मदतीस बोलाविलें. २३ मार्च १८५८ ला प्रत्यक्ष लढाई सुरु झाली. याच वेळीं इंग्रजांकडील तोफेच्या गोळ्यांमुळें राणीचा दारूखाना पेटून नाहींसा झाला. तात्या टोपे १५,००० लोकांसह मदतीला आला. त्यानें इंग्रजांवर बाहेरून हल्ले केले. याच वेळीं किल्ल्यांतूनहि तोफेचा भाडिमार झाला असता तर सर ह्यूज रोजची दाणादाण उडाली असती; पण हें न झाल्यामुळें तात्याचा पराभव झाला. शिवाय किल्ल्यांत फितुरी झाल्यामुळें किल्ला पडला व तो इंग्रजांच्या ताब्यांत गेला. राणीनें दामोदररावाला पाठीशीं घोड्या-वर घेऊन व ३०० लोकांसह इंग्रजांची फळी फोडून काल्पीचा रस्ता गांठला. काल्पी हें बंडवाल्यांचें मुख्य ठिकाण. ह्यूज रोज तें घेण्यास १६ मेला तेथें आला. रोजनें आधींच मान्याच्या जागा काबीज केल्या. शिवाय पेशव्यांच्या सैन्यांतील बेशिस्तपणा व व्यसनीपणा या दुर्गुणांचा पुरेपूर फायदा करून घेऊन काल्पी सर केली.

यानंतर राणीच्या सल्ल्यानें पेशव्यांनीं ग्वाल्हेरचा किल्ला हस्तगत केला. लक्ष्मीबाई व तात्या टोपे यांच्या पराक्रमानें ग्वाल्हेरचा किल्ला रावसाहेब पेशव्यांना मिळाला. ३ जूनला पेशवाईची स्थापना करून नानासाहेबांच्या नांवाची ग्वाही फिर-विण्यांत आली. तेथें लगेच ब्राह्मणभोजनें घालण्यास व ऐषआराम भोगण्यास रावसाहेब पेशव्यानें आरंभ केला. राणीनें याबद्दल त्याची कानउघाडणी केली. पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं.

रोजनें पेशव्यांच्या ह्या बेसावधपणाचा भरपूर फायदा घेतला. त्यानें मान्याच्या जागा अडवून मराठ्यांवर पद्धतशीर चढाई केली. शिवाय ग्वाल्हेरचा जयाजी शिंदे, ग्वाल्हेर पडल्यावर आग्र्यास गेला होता त्याला रोजनें परत आणलें व त्याच्यासाठीं आपण लढत आहोंत असें जाहीर केलें. यामुळें शिंद्यांचे जे सरदार इंग्रजांशीं लढत होते ते लढतनासे झाले. यामुळें पेशव्यांचें निम्में बळ कमी पडलें.

तात्या टोपे व पेशवे यांनीं राणीला ग्वाल्हेरच्या पूर्व बाजूचें रक्षण करण्याचें काम सांगितलें व तिनेंहि जयाची आशा दिसत नसतांहि तें पत्करलें. १८ जून १८५८ ला स्मिथनें प्रथम चाल केली. दुसऱ्या बाजूनें रोज राणीवर चालून आला. युद्धास तोंड लागलें. इतक्यांत रोजनें राणीच्या मागच्या बाजूच्या तोफ-खान्यावर हल्ला केला. दोन मोर्चे हस्तगत केले. स्मिथनें तोफेचा भडिमार करून राणीचे लोक मारण्याचा धूमधडाका लावला. यामुळें तिचे सर्वच मोर्चे रोजच्या स्वाधीन झाले. शेवटीं उरलेल्या दहावीस स्वारांसह ती इंग्रजांची फळी फोडून जाऊं लागली. इंग्रजांच्या घोडेस्वारांनीं तिचा पाठलाग चालविला. वाटेंत राणीचा घोडा पाण्याचा पाट पाहून अडला. तिचा पहिला कसलेला घोडा जखमी झाला म्हणून तिनें हा नवा घोडा घेतला होता. त्याला युद्धाची कसलीच माहिती नव्हती. तरी पण तिनें सर्व स्वारांना पिटाळून लावलें. पण ती श्रमानें फारच क्षीण झाली होती. इतक्यांत एका स्वारानें पाठीमागून तिच्या डोक्यावर वार केला. त्यामुळें मस्तकाचा उजवा भाग विच्छिन्न होऊन एक डोळा बाहेर आला. अशाहि स्थितींत राणीच्या छातींत शस्त्राचा घाव बसला. पण इतक्याहि मरणोन्मुख अवस्थेंत राणीनें त्या स्वारास ठार मारिलें. आपला मरणकाळ जवळ आल्याचें पाहून बरोबर असलेल्या इमानी रामचंद्रराव देशमुखास तिनें खूण केली. त्यानें व इतरहि दोन-तीन स्वारांनीं तिला जवळच असलेल्या बागेतल्या एका झोंपडींत नेऊन तोंडांत गंगा घातली. आपला देह म्लेंछांच्या हातीं लागूं न देतां त्यास अग्निसंस्कार करा व दामोदररावाचा सांभाळ करा असें सांगून या शूर स्त्रीनें या जगाचा निरोप घेतला. ग्वाल्हेरला तिच्या दहनाच्या जागीं १९२८ त एक वृंदावन बांधलें आहे.

राणीच्या हुषारीबद्दल व शौर्याबद्दल अनेक युरोपियन लोकांनीं प्रशंसापर उद्‌गार काढले आहेत. तिचें मोठें स्मारक झांशीला करण्याची योजना आहे. झांशीच्या राणीचीं अनेक भाषांतून बरींच लहानमोठीं चरित्रें, नाटकें व कवनें झालीं आहेत.

**झाळणी**—डांक. दोन धातूंच्या वस्तू एकत्र जोडण्याकरितां जी मिश्र व लवकर वितळणारी धातू वापरण्यांत येते तिला डांक असें म्हणतात. सोन्याकरितां डांक करावयाचा असल्यास तो सोनें व चांदी किंवा सोनें व तांबें यांचा मिश्र धातू बनवून तयार करतात. चांदीचा डांक चांदी व पितळ यांच्या मिश्रणानें बनवितात. पितळ किंवा तांबें यांस बसविण्याचा डांक निम्मे-निम तांबें व जस्त यांच्या मिश्रणानें बनवितात. हलके डांक लवकर वितळणाऱ्या धातूंचे बनवितात. हे बहुधा कथील व

शिसें यांचें निरनिराळ्या प्रमाणांत मिश्रण करून तयार करतात. तसेंच विसमथचाहि उपयोग करतात.

**झिंगा**—हे एक प्रकारचे कवचधारी प्राणी आहेत. यांस दहा पाय असतात. यांची लांबी २ इंच असून दोन फूट पाण्यांत विपुलतेनें आढळतात. यांची तांबडी जात अधिक खोल पाण्यांत राहते. गोड्या पाण्यांतील झिंगे मासे हे निराळ्या जातीचे असून त्यांस दोन प्रकारचे पाय असतात.

**झिंझूटी**—हा राग खमाज थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोहावरोह सातहि स्वरांनीं होत असल्यानें याची जाति संपूर्ण—संपूर्ण आहे. वादी स्वर गांधार व संवादी निपाद आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. हा सार्वकालिक असेंहि समजतात. हा राग क्षुद्रगीताहि समजला जातो.

**झितमोरी**—रशिया, युक्रेनिया प्रांताचें एक मोठें शहर. या शहरांत एक-तृतीयांशापेक्षां अधिक यहुदी आहेत. हें फार जुनें शहर आहे. ९ व्या शतकाच्या अगोदर हें स्थापन झालें. युक्रेन प्रांत जेव्हां रशियानें घेतला तेव्हां हे शहर रशियाच्या ताब्यांत आलें. लो. सं. (१९३९) ९५,०९०.

**झिनत्-उन्-निसा बेगम**—ही औरंगजेब बादशहाची दुसरी मुलगी. ही जन्मभर कुंवारच राहिली. ही बापाबरोबर दक्षिणेंत २५ वर्षें होती. त्या वेळीं जनानखान्यांत वडीलपणा घेऊन हीच देखरेख करीत असे. संभाजी छत्रपतीवर जिचें मन बसलें (व जिला त्यानें मागणी घातली) व जी त्याच्या पश्चात् लग्न न करतां अविवाहित राहिली, आणि जिनें शाहूचा व येसूबाईचा परामर्श अत्यंत काळजीनें घेतला, अशी आख्यायिका आहे, तीच ही बेगम होय. आपल्या वयाच्या ८० व्या वर्षी १७२१ त ही वारली. हिला दिल्लींतील झिनत्-उल्-मसजीद नांवाच्या मशिदीच्या आवारांत पुरण्यांत आलें. ही मशीद शहाजहानाबादमधील दरियागंज पेठेंत यमुनेच्या तीरावर आहे.

**झिम्मा**—महाराष्ट्रांतील एक मुलींचा खेळ. फुगडीप्रमाणें झिम्मा हा खेळ फार जुना आहे. दोन मुली समोर उभ्या राहून दोन्ही हातांनीं एकमेकींच्या हातांवर हात मारून टाळ्या वाजवितात व आपल्याभोंवतीं फिरतात. समोर तोंडें आलीं कीं पुन्हां हात मारून टाळ्या वाजवितात. 'झिम् पोरी झिम्। कपाळीचें भिंग।' 'आचा पिकतो। रस गळतो। कोंकणीचा राजा बाई झिम्मा खेळतो॥' इ. हा कोंकणचा राजा कोण याविपयीं डॉ. केतकरांसारख्या समाजशास्त्राभ्यासकांना कोडें पडलें होतें.

**झियाउद्दीन बरनी**—याला झियाई बरनी असेंहि म्हणतात. दिल्लीचे सुलतान मुहंमदशहा तुघलक आणि फिरोझशहा तुघलक यांच्या कारकीर्दींत हा पुढें आला. 'तारीख फिरोझशाहि' या बखरीचा हा कर्ता होय. या बखरींत आठ राजांची म्हणजे सुलतान ग्यासुद्दीन बल्बन (स. १२६६) पासून सुलतान फिरोझशाह तुघलक (१३५६) पर्यंतची माहिती दिलेली आहे. या वेळीं हा ७४ वर्षांचा होता. त्याचा बाप मुवय्यद हा बरन( सांप्रतच्या बुलंद शहरा )चा मुलकी अधिकारी होता( १२९६ ). या ठिकाणीं झियाचा जन्म झाल्यानें त्याला बरनी म्हणत.

**झियारत**—बलुचिस्तान, उन्हाळ्यांतील थंड हवेचें ठिकाण. हें समुद्रसपाटीपासून ८,०५० फूट उंच आहे. हें सिबि जिल्ह्यांत शाहरिग तहशिलींत आहे. १८८३ सालापासून हें थंड हवेचें स्थळ म्हणून निवडण्यांत आलें. १८९९ सालीं पिण्याचें पाणी नळानें वर आणून सोय केली. येथील देखावा फारच मनोहर आहे.

**झीट**— (सिंकोप). मनुष्याच्या शरीरांतील रुधिराभिसरण व श्वासोच्छ्वास एकदम बंद झाले असतां त्या अवस्थेस झीट किंवा मूर्च्छा असें म्हणतात. अशा वेळीं मेंदूस रक्ताचा पुरवठा कमी पडल्यामुळें एक प्रकारची गुंगी किंवा पूर्ण बेशुद्धावस्था येते व रोगी एकदम खालीं पडतो. कांहीं हृदयविकारांमध्यें अशी अवस्था होण्याचा संभव असतो. तसेंच ज्या रोगामध्यें रक्ताचा दाब कमी होतो अशा रोगांतहि अशी अवस्था होणें संभवनीय असतें.

मूर्च्छा आली असतां माणसाला कुशीवर निजवून त्याचें डोकें खालीं करावें, कपडे सैल करावे व तोंडावर गार पाणी मारावें; नाकाशीं अमोनिया, अल्कोहोल यांसारखा उत्तेजक पदार्थ धरावा. वाटल्यास थोडीशी ब्रँडी पाजावी. म्हणजे रोगी लगेच शुद्धीवर येतो.

**झीटून**—तुर्कस्तानांत या नांवाचीं शहरें पुष्कळ आहेत. त्यांत एक महत्त्वाचें अलेप्पी सुभ्यांत (विलायतेंत) आहे. बहुतेक लोक आर्मेनियन ख्रिस्ती आहेत. लो. सं. १०,००० आहे.

आर्मेनियन राज्य गेल्यानंतर हें ठिकाण लुटालूट करणाऱ्या आर्मेनियनांचें घरटें झालें होतें. यांनीं आपलें स्वातंत्र्य जवळजवळ १८७८ पर्यंत कायम राखलें. या सालीं तुर्कस्तानच्या सुलतानाला तेथील गडावर फौज ठेवूं दिली. १८९० व १८९५ सालीं बंडें झालीं. तीं मोडतांना यांचा पूर्ण नाश झाला असता; पण ख्रिस्ती राष्ट्रांचे जे प्रतिनिधी अलेप्पोला होते त्यांच्या मध्यस्थीनें यास जरा मानाचा व सुखाचा तह लाभला.

**झीनवर**—झीवर, धीमर, धीनवर. हीं नांवें पंजाबांत ओझेवाले, पाणके, कोळी व बुरूड या जातींना लावतात. यांची संख्या सुमारें चार लाख आहे. पैकीं शें. ६१ हिंदू व बाकीचे मुसलमान व फार थोडे शीख आहेत. झीनवरला कहार आणि

मेहर असेहि म्हणतात. मेहर आपणांस रजपूत बीजाचे म्हणतात. हिंदु जातींत यांचा दर्जा खालचा आहे. तथापि यांच्या चालीरीती व भावना वन्यधर्मीयांहून कांहींशा वरच्या दर्जाच्या आहेत. हे लोक आपल्या उद्योगधंद्यांत ज्यांचा संबंध येतो अशा देवता व गंगा, यमुना आणि सिंधु यांसारख्या नदी-देवता यांची मुख्यत्वेंकरून उपासना करतात; आणि होड्या, जाळीं आणि आपल्या धंद्याचीं इतर हत्यारें यांचीहि पूजा करितात.

**झीनॉफानीझ**—हा ग्रीक तत्त्ववेत्ता आशियामायनरमध्यें कोलोफोन येथे खि. पू. ५८० च्या सुमारास जन्मला. हा प्रथम ग्रीस देशांत गाणीं गात हिंडत असे. हिंडतां हिंडतां हा इटली देशाच्या दक्षिणेस इलिया येथें येऊन राहिला. त्यानें स्थापन केलेल्या पंथाचें नांव ( इलियाटिक ) या गांवाच्या नांवावरून पडलें. या पंथांतील तत्त्ववेत्त्यांपैकीं पार्मेनिडेझ, झेनो, व मिलीसस् हे प्रमुख होत.

**झीमन सिद्धान्त**—जेव्हां प्रकाश देणारा पदार्थ चुंबकीय क्षेत्रामध्यें ठेवण्यांत येतो, तेव्हां त्या प्रकाशापासून पडणाऱ्या विच्छिन्न किरणपटा( स्पेक्ट्रोस्कोप )मध्यें असलेल्या रेषांच्या निरनिराळ्या घटकांमध्यें पृथक्करण होतें. या क्रियेस झीमनचा परिणाम ( इफेक्ट ) असें म्हणतात. झीमन हा पदार्थविज्ञानी डच असून ॲमस्टरडॅम येथें प्राध्यापक होता ( १९०८ ). त्याच्या या शोधानें परमाणु( ॲटम )रचनेसंबंधीं मत बनविण्यास बराच उपयोग झाला.

**झीलंड**—डेन्मार्कमधील सर्वांत मोठें बेट. दक्षिणोत्तर ८२ मैल व पूर्व-पश्चिम ६८ मैल असा याचा विस्तार आहे. याचें क्षे. फ. २६४० चौ. मै. आहे. येथें ३५० फुटांहून उंच अशा खटिकामय ( क्रेटेशस ) टेंकड्या आहेत. ईशान्येस आरी, एस्रुम, वगैरे कित्येक मोठाली सरोवरें आहेत. जमीन सुपीक असून धान्य, बटाटे, इतर भाज्या व फळें उत्पन्न होतात. या बेटावर डेन्मार्कची राजधानी कोपनहेगन व कित्येक बंदरें आहेत. लो. सं. सु. ६ लाख.

**झीलफ**—हा राग भैरवी थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोह सात स्वरांचा व अवरोहांत ऋषभ वर्ज्य असल्यानें याची जाति संपूर्ण–षाडव आहे. वादी धैवत व संवादी गांधार. गानसमय सकाळचा पहिला प्रहर मानितात. या रागांत खट व जौनपुरी या रागांचें मिश्रण होत असतें. हा राग भैरव रागापासून अलग ठेवण्यासाठीं यांत ऋषभ स्वर कमजोर ठेवितात. हा आधुनिक व यावनिक राग आहे.

**झुंबर**—पूर्वीं मेणबत्त्या लावण्याकरितां अनेक कांचेच्या पेल्यांनीं युक्त असें एक टांगतें झाड तयार करण्यांत येत असे, त्यास झुंबर असें म्हणतात. अर्वाचीन झुंबर ब्रॉन्झ किंवा गनमेटल या धातूचें असून त्यावर बहुतेक मुलामा केलेला असतो; व त्याचा आकार निरनिराळ्या काळीं निरनिराळा असे. १८ व्या शतकांत फ्रान्समध्यें मोठमोठीं झुंबरें दिवाणखान्यांत लावीत असत. परंतु तीं इतर वेळीं धुळीनें खराब होत. याकरितां त्यास अभ्रे घालून ठेवावे लागत. लांकडाचींहि नक्षी केलेलीं व मुलामा दिलेलीं झुंबरें पूर्वीं तयार करीत असत. हीं साधारण १७ व्या शतकाच्या अखेरीस आढळतात.

**झुरळ**—सरळ पंख असलेल्या कीटकांची एक जात. यांचें शरीर वाटोळसर, लांबट असून खोलगट असतें व बाहेरील बाजूस

अ. पोठीकडून

ब. पोटाकडून

तुळतुळीत असतें. हे रात्रीचे बाहेर पडतात. व फार चपळ असून अनेक पदार्थांचा खाऊन फन्ना उडवतात. स्वयंपाकघरांत झुरळें फार आढळतात. यांना गारव्याच्या ठिकाणीं बसणें आवडतें. यांचे दांत तीक्ष्ण असल्यानें हे कागद, पुढे, भाकरी, इ. कुरतडून खातात. चिनपंखांच्या झुरळांना वागुरडे म्हणतात. झुरळाच्या जागीं टाकणखार ठेवल्यास तो खाऊन झुरळें मरतात. हीं आशिया खंडांतून युरोपमध्यें व तेथून अमेरिकेंत गेलीं आहेत.

**झुलफिकारखान** ( १६५७–१७१२ )— एक मोंगल सरदार. यास अमीर उल्–उमरा नसरतजंग असा किताब होता. औरंगजेबाचा वजीर आसदखान याचा हा मुलगा. औरंगजेबाच्या कारकीर्दींत यानें बऱ्याच कामगिऱ्या केल्या. रायगड फितुरीनें घेऊन बाल शाहू व येसूबाई यांना धरून औरंगजेबाच्या स्वाधीन केलें. व त्याबद्दल शहाने त्याला झुलफिकार ही पदवी दिली. नंतर राजारामासाठीं जिंजीला सहा–सात वर्षें वेढा घालून बसला ( १६९१–९७ ). परंतु मराठे सेनापति संताजी व धनाजी यांनीं त्याचा लाग चालूं दिला नाहीं. अखेरीस त्याच्या हातून राजाराम निसटला. या सुमारास याचें व औरंगजेबाचें नीट नव्हतें. यानें एकदां तर कामबक्ष शहाजाद्यास कैद केलें होतें.

मराठ्यांच्या बंदोबस्तासाठीं याला माळव्यांत पाठविण्यांत आलें (१७०५). तेथें त्याची व नेमाजी शिंद्याची चकमक उडाली. नंतर औरंगजेबानें शाहूस त्याच्या स्वाधीन करून सिंहगडावर धाडलें. धान्याच्या टंचाईनें अखेर किल्ला पडला (१७०६). पुढल्या वर्षी त्यानें धनाजी जाधवाविरुद्ध घोरपड्यांस मदत केली. इतक्यांत औरंगजेब मेल्याचें ऐकून तो अझीमशहास मिळाला (१७०८). आग्र्याच्या लढाईंत अझीमाचा पराभव झाला व शहाअलम (बहादूरशहा) जय पावला; तेव्हां खान दक्षिणेंत पळून आला. पण बहादूरशहानें त्याला क्षमा केली. एवढेंच नव्हे तर त्याला अमीरुल उमरा पदवी देऊन त्याला दक्षिणचा सुभेदार नेमिलें (१७०७). बहादुराच्या मागें, जहांदर हा आपल्या भावांना एकीकडे सारून केवळ झुलफिकारच्याच साहाय्यानें व कारवाईनें गादीवर आला. त्यामुळें त्यानें याला वजीर केलें. पुढें फर्रुखसियरनें जहांदरशीं लढाई करून त्याला पकडून कैदेंत ठेविलें व गादी बळकावली. नंतर त्यानें जहांदरचा खून केला व झुलफिकार यालाहि फांशीं दिलें.

**झुलुलंड**— दक्षिण आफ्रिका, नाताळ विभागांतील एक प्रांत. याचें क्षे. फ. १०,४२७ चौ. मै. आहे. पोंगोला, मॅपुरा, उम्गावुमा, अमकुझी, अमफोलोसी, व्लड, बफेलो व ट्युगला ह्या नद्या या प्रांतांतून वाहतात. येथील हवा समशीतोष्ण असून येथें एकंदर पाऊस ४७ इंच पडतो. लो. सं. सुमारें २ लाख. पैकीं २,००० गोरे लोक व २,००० बासुटो लोक आहेत. मॅझिट्ट, मॅरव्ही, वेगॉनी, मेटेबल, मॅग्व्हिटी आणि अवेझांझी लोकांनीं या प्रांतावर स्वाऱ्या करून पूर्व व मध्य आफ्रिकेचा बराच भाग काबीज केला. येथें गुरें ही येथील मुख्य दौलत समजली जाते.

झुलु लोक—या लोकांची स्वतंत्र जात म्हणून मोडत चालली असली तरी अद्यापि लिंपोपो आणि मध्य झांबेझी यांमधील प्रदेशांत यांचें वर्चस्व आहे. बहुपत्नीत्वाची चाल झुलु लोकांत रूढ असल्यामुळें वारसासंबंधीं भानगडी उद्भवतात. तरी यांचा कायदा फार उत्तम रीतीनें तयार केला आहे. यांच्या खाजगी मालमत्तेंत बहुशः गुरेंढोरें यांचाच समावेश होतो. लग्नाच्या वेळीं वधूबद्दल तिच्या बापाला मोबदल्यादाखल गुरेंढोरें देण्याची चाल झुलु लोक पाळतात. झोपड्यांचा समूह त्यांच्या प्रमुख नायकाच्या आधिपत्याखालीं असतो. हा नायक मूळ कुलसंस्थापक असून स्वजातिबांधवांच्या चांगल्या वर्तणुकीबद्दल तो जबाबदार असतो. याच्या वरचा अधिकारी म्हणजे जातीचा मुख्य पुरुष होय. त्याच्याहि वरचा अधिकार झुलुलंडच्या राजाला होता; परंतु सांप्रत तो कमिशनरच्या हातांत आहे. आफ्रिका पाहा.

शहरें—एशोवी शहराची लो. सं. २,२२३. कर्नल पीअर्सनला झुलु लोकांनीं १८७९ त येथेंच वेढलें. एशोवीच्या ईशान्येस २५ मैलांवर बोअर लोकांच्या मुलुखांत मेलमॉथ शहर आहे. सोमकेली हें सेंट लुशीआ कोळशाच्या खाणीचें मुख्य ठिकाण आहे. या देशाला बंदर मुळींच नाहीं. टुगेला नदीमार्गावर नाताळचे व झुलुलंडचे रस्ते येऊन मिळतात. १९०४ सालीं येथें रेल्वे सुरू झाली.

मका, ज्वारी, तंबाखू, साखर, चहा व कॉफी या जिनसा येथें होतात. सोनें, तांबें, लोखंड, कोळसा हे खनिज पदार्थ सांपडतात. येथील मुख्य सत्ता प्रांतिक मंडळाकडे आहे. १८९५ सालीं इंग्वाबुमा देश ब्रिटिश राज्यास जोडला गेला. येथील प्रत्येक झुलु नवऱ्याला प्रत्येक पत्नीमागें १४ शिलिंगप्रमाणे कर द्यावा लागतो. १९०६ सालापासून १६ वर्षांवरील प्रत्येक मनुष्यावर १ पौंड कर लादण्यांत आला.

**झूरिच**—स्वित्झर्लंड, झूरिच विभागाचें मुख्य ठिकाण. हें शहर लिम्मॅट नदीच्या दोन्ही तीरांवर वसलें असून स्वित्झर्लंड-मध्यें हें सर्वांत मोठें शहर आहे. येथील देखावा फार रमणीय आहे. लो. सं. ३,३६,३९५.

येथें ऑस्टीन फ्रायरचें देवालय आहे. त्या ठिकाणीं कॅथोलिक लोक प्रार्थना करावयास जातात. याच देवालयांत १६३१ सालीं स्थापलेलें एक ग्रंथसंग्रहालय आहे. या ग्रंथसंग्रहालयांत सुमारें दोन लक्ष ग्रंथ व हस्तलिखितें आहेत. एक विद्यापीठ १८३२ सालीं स्थापन झालेलें आहे.

हें शहर स्वित्झर्लंड देशांतील जर्मन भाषा बोलणाऱ्या लोकांचें बौद्धिक केंद्र आहे. येथील मुख्य धंदे म्हणजे कापूस पिंजणें व यंत्रें तयार करणें हे होत. येथें रेशमी कापडहि तयार होतें. या शहराजवळ एक वेधशाळा आहे.

**झेओलाइट**—अल्युमिनियम, आणि सिंधु (सोडियम), खट (कॅल्शियम) किंवा पालाश (पोटॅशियम) किंवा हीं सर्व

त्यांच्या सिकतां (सिलिकेटां) नीं तयार झालेल्या खनिजांचे हें वर्गनांव आहे. ह्या वर्गांत नाट्रोलाइट, स्टिल्बाइट, आणि अनालसाइट हीं खनिजें प्रसिद्ध आहेत. ज्वालामुखी खडकांतून या वर्गांतील खनिजें सांपडतात.

**झेकोस्लाव्हाकिया**—हें युरोपमधलें एक लोकसत्ताक संस्थान असून याच्यांत मध्य युरोपमधले पांच जिल्हे आहेत. १९१९ पावेतों ते सर्व ऑस्ट्रिया–हंगेरीमध्येंच सामील झालेले होते. त्यांचीं नांवें—बोहेमिया, मोरेव्हिया, स्लोव्हेकिया, सायलेशिया (अर्धा), व रुथेनिया. या सर्वांचें मिळून क्षेत्रफळ ५४,२४४ चौरस मैल आहे. या प्रांतांत झेक व स्लोव्हाक या दोन जातींचे लोक मुख्यत्वेंकरून आहेत. एकूण लोकसंख्या १,५२,४७,०००. प्राग हें मुख्य ठिकाण आहे. बीट (साखरेचें), बटाटे, राय, बार्ली व गहूं हीं पिकें निघतात. जंगलें मोठमोठीं व दाट आहेत. हॉप् द्राक्षाची लागवड होते व त्याच्यापासून दारू (बीर) तयार करून तिची निर्यात करतात. कांच, कापूस व लांकडी सामान यांचाहि निर्यात व्यापार मोठा आहे. कोळसा व लोखंड यांच्या खाणी आहेत.

सहाव्या शतकापर्यंत झेक आणि स्लोव्हाक लोकांचें राज्य या प्रदेशावर होतें. नंतर यांना मग्यार लोकांनीं जिंकलें. पहिल्या महायुद्धापर्यंत ऑस्ट्रियन–हंगेरियन वर्चस्वाखालीं हे लोक होते. या युद्धानंतर नवीन लोकराज्य निर्माण करण्यांत आलें (१९१८). १९१८ मध्यें झेकोस्लाव्हाकिया स्वतंत्र झाला. नॅशनल असेंब्ली व अध्यक्ष राज्यकारभार पहातात. १९१९ मध्यें या देशाच्या स्वतंत्र सरकारास मान्यता मिळाली. १९२० मध्यें देशाची स्वतंत्र घटना कायम करण्यांत आली.

१९३८ त जर्मनांनीं पश्चिम झेकोस्लाव्हाकियावर स्वारी करून बराच मुलूख बळकावला. बोहेमिया आणि मोरेव्हिया हे प्रांत रीशचे संरक्षित भाग म्हणून केले. १९४५ साली अमेरिकन आणि रशियन सैन्यांनीं जर्मनीचा ताबा उठवून पुन्हां राष्ट्र स्वतंत्र केलें. पुढें रुथेनिया हें मात्र रशियानें बळकावलें.

प्राग येथील विद्यापीठ १३४८ त स्थापन झालेलें आहे.

झेक लोक हे स्लाव्हिक वंशाचे असून यांचें मुख्य ठाणें म्हणजे बोहेमिया होय. प्राग येथें झेक संस्कृति प्रामुख्यानें दिसते. स्लोव्हाक लोक मोरेव्हिया आणि स्लोव्हाकिया भागांतले असून झेक लोकांशीं त्यांचा अगदीं जवळचा संबंध आहे; म्हणजे ते एकाच वंशाचे व भाषेचे लोकसमूह आहेत. अनेक शतके ते ऑस्ट्रियनांच्या सत्तेखालीं चरफडत राहिले होते. पहिल्या महायुद्धांत यांना स्वतंत्र होण्याची संधि मिळाली. नवव्या शतकापासून झेक वाङ्मयाची निर्मिति होत असून त्यांत काव्य, कथा, शास्त्र आणि इतिहास यांजवरचे ग्रंथ आहेत.

**झेंडूवर्ग**—हा वनस्पतींचा सर्वांत अधिक परिचित असा वर्ग आहे. या वर्गांतील बारा हजारांच्यावर वनस्पतींचें वर्णन करण्यांत आलें आहे. त्यांत कांहीं वनस्पती व कांहीं झुडपें आहेत. यांपैकीं शेंकडा दहा फुलझाडें आहेत व तीं जगावरील सर्व प्रदेशांत आढळतात. या फुलांना स्वतंत्र देंठ नसतें व तीं एकत्र अनेक मिळून एक फूल होतें. त्यांचें अग्र थोडें पसरलेलें असून त्या ठिकाणीं एक वाटीसारखा भाग झालेला असतो. या फुलाच्या पाकळ्या संघयुक्तपर्णी असतात व त्यांच्या पुष्पमुकुटांवरून या वर्गाच्या मुख्य दोन जाती पडलेल्या असतात: (१) ट्युबिलिफ्लोरी–नलिकाकार, व (२) लिगुलिफ्लोरी–जिव्हाकार. पुष्पकोश खालीं दडलेला असतो व त्याचें रक्षणकार्य बाहेरील आवरणानें होतें. पुंकेसर पुष्पमुकुटामध्यें खोंचलेले असतात व त्यांचे परागपीटक मिळून एक नलिका बनलेली असते (सिंगेनेसिअस). याचें बीं खालीं असलेल्या गर्भाशयांत उत्पन्न होतें व तें शुष्क बियांसारखें असतें. त्याला छत्रीसारखा एक केंसांचा झुबका असतो. त्यामुळें तें वाऱ्यानें उडून सर्वत्र पसरतें.

**झेंद-अवेस्ता**—हा पारशांचा धर्मग्रंथसंग्रह होय. अवेस्ता हा शब्द अविस्ताक (= ज्ञान, ज्ञान देणारें पुस्तक) या पहलवी भाषेंतल्या शब्दावरून बनलेला आहे.

अवेस्ता ग्रंथांचें व त्यांमध्यें सांगितलेल्या धर्माचे ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्व आहे. हे ग्रंथ पूर्वी २१ होते, पण त्यांपैकीं आतां तीनच उपलब्ध आहेत. या धर्मग्रंथांत ख्रिस्ती शकापूर्वी ५०० वर्षांपूर्वीच्या व ख्रिस्ती शकानंतर ७०० वर्षांच्या अवधींतील इराणी लोकांच्या धर्मकल्पना, समजुती, आचारविचार यांची माहिती सांपडते. हल्लीं उपलब्ध असलेला अवेस्ता ग्रंथ हा एका काळच्या मोठ्या वाङ्मयाचा अवशेष होय. मूळ अवेस्ता ग्रंथाचीं १२०० प्रकरणें होतीं. अवेस्ता ग्रंथ १२०० गाईंच्या कातड्यांवर कोरला होता, असें तबरी व मसुदी या इतिहासकारांनीं म्हटलें आहे. प्लिनी या रोमन पंडितानें, झरथुष्ट्रानें २० लक्ष कविता रचल्या, असें म्हटलें आहे. खुद्द उपलब्ध अवेस्ता ग्रंथांचें अंतरंगपरीक्षण केलें तरी हेंच दृष्टोत्पत्तीस येतें. पण सर्वांत बलवत्तर प्रमाण म्हणजे पहलवी भाषेंतील दिनकर्द या ग्रंथाचें व फारशी रिवायत ग्रंथाचें होय. या ग्रंथांत प्राचीन अवेस्ता ग्रंथांच्या विस्ताराबद्दल व त्यांतील मजकुराबद्दलची संपूर्ण माहिती आलेली आहे.

**झेनोफोन** (ख्रि. पू. ४३०–३५५)—एक ग्रीक इतिहासकार व तत्त्ववेत्ता. हा अथेन्सला जन्मला. लहानपणापासूनच तो साक्रेटिसाचा अनुयायी झाला. अथेन्सविषयीं त्याला बिलकूल सहानुभूति नव्हती. स्पार्टन लोकांच्या वतीनें तो अथेन्सच्या

झेलम नदीतीर — श्रीनगर (पृ. ९५०)

डीग किल्ल्याचें प्रवेशद्वार (पृ. १०१९)

टिटिकाका सरोवर (पृ. ९६८)

टिफ्लिस — निकोले पूल (पृ. ९७१)

त्यांच्या सिकतां ( सिलिकेटां ) नीं तयार झालेल्या खनिजांचें हें वर्गनांव आहे. ह्या वर्गांत नाट्रोलाइट, स्टिल्बाइट, आणि अनाल्साइट हीं खनिजें प्रसिद्ध आहेत. ज्वालामुखी खडकांतून या वर्गांतील खनिजें सांपडतात.

**झेकोस्लाव्हाकिया**–हें युरोपमधले एक लोकसत्ताक संस्थान असून याच्यांत मध्य युरोपमधले पांच जिल्हे आहेत. १९१९ पावेतों ते सर्व ऑस्ट्रिया–हंगेरीमध्येंच सामील झालेले होते. त्यांचीं नांवें—बोहेमिया, मोरेव्हिया, स्लोव्हेकिया, सायलेशिया (अर्धा), व रुथेनिया. या सर्वांचें मिळून क्षेत्रफळ ५४,२४४ चौरस मैल आहे. या प्रांतांत झेक व स्लोव्हाक या दोन जातीचे लोक मुख्यत्वेंकरून आहेत. एकूण लोकसंख्या १,५२,४७,०००. प्राग हें मुख्य ठिकाण आहे. बीट ( साखरेचें ), बटाटे, राय, बार्ली व गहूं हीं पिकें निघतात. जंगलें मोठमोठीं व दाट आहेत. हॉप् द्राक्षाची लागवड होते व त्याच्यापासून दारू ( बीर ) तयार करून तिची निर्यात करतात. कांच, कापूस व लांकडी सामान यांचाहि निर्यात व्यापार मोठा आहे. कोळसा व लोखंड यांच्या खाणी आहेत.

सहाव्या शतकापर्यंत झेक आणि स्लोव्हाक लोकांचें राज्य या प्रदेशावर होतें. नंतर यांना मग्यार लोकांनीं जिंकलें. पहिल्या महायुद्धापर्यंत ऑस्ट्रियन–हंगेरियन वर्चस्वाखालीं हे लोक होते. या युद्धानंतर नवीन लोकराज्य निर्माण करण्यांत आलें ( १९१८ ). १९१८ मध्यें झेकोस्लाव्हाकिया स्वतंत्र झाला. नॅशनल असेंब्ली व अध्यक्ष राज्यकारभार पहातात. १९१९ मध्यें या देशाच्या स्वतंत्र सरकारास मान्यता मिळाली. १९२० मध्यें देशाची स्वतंत्र घटना कायम करण्यांत आली.

१९३८ त जर्मनांनीं पश्चिम झेकोस्लाव्हाकियावर स्वारी करून बराच मुलूख बळकावला. बोहेमिया आणि मोरेव्हिया हे प्रांत रीशचे संरक्षित भाग म्हणून केले. १९४५ सालीं अमेरिकन आणि रशियन सैन्यांनीं जर्मनीचा ताबा उठवून पुन्हां राष्ट्र स्वतंत्र केलें. पुढें रुथेनिया हें मात्र रशियानें बळकावलें.

प्राग येथील विद्यापीठ १३४८ त स्थापन झालेलें आहे.

झेक लोक हे स्लाव्हिक वंशाचे असून यांचें मुख्य ठाणे म्हणजे बोहेमिया होय. प्राग येथें झेक संस्कृति प्रामुख्यानें दिसते. स्लोव्हाक लोक मोरेव्हिया आणि स्लोव्हाकिया भागांतले असून झेक लोकांशी त्यांचा अगदीं जवळचा संबंध आहे; म्हणजे ते एकाच वंशाचे व भाषेचे लोकसमूह आहेत. अनेक शतकें ते ऑस्ट्रियनांच्या सत्तेखालीं चरफडत राहिले होते. पहिल्या महायुद्धांत यांना स्वतंत्र होण्याची संधि मिळाली. नवव्या शतकापासून झेक वाङ्मयाची निर्मिति होत असून त्यांत काव्य, कथा, शास्त्र आणि इतिहास यांजवरचे ग्रंथ आहेत.

आर्मेनियन लोकांचें देवालय, ह्या होत. त्यांखेरीज या शहरीं बायझंटाइन धर्तीवर बांधलेला एक मोठा राजवाडा आहे. या राजवाड्यांत एक भव्य सभागृह आहे. येथें फ्रॅन्सिस जोसेफ या नांवाचें विद्यापीठ आहे. या शहरीं लांकूड, लोंकर, गुरें, दारू, वगैरेंचा व्यापार चालतो. येथें जर्मन, रुथेनियन, पोल, ज्यू, आर्मेनियन, जिप्सी इतक्या प्रकारचे लोक राहतात.

**झेर्बादी**— हिंदी-ब्रह्मी मानववर्गातील एक जात. हिंदी मुसलमान व ब्रह्मी स्त्री यांच्यापासून झालेली ही प्रजा होय. हे झेर्बादी लोक ब्रह्मी पोषाख करतात व ब्रह्मी भाषाच बोलतात; पण धर्मानें मुसलमान आहेत. यांची लो. सं. सुमारें एक लाख तरी आहे; व ती ब्रह्मदेशांतच आहे.

**झेलम**—१. कालवा—पंजाब, झेलम नदीवरील कालवा. गुजराथ जिल्ह्यांतील मोंग रसूल गांवाजवळ झेलम नदीस ४,१०० फूट लांबीचा बांध घातलेला आहे. मुख्य कालवा १४० फूट रुंदीचा आहे. एकंदर या कालव्याखालीं सुमारें चार हजार चौ. मैल जमीन आहे. १९०१ सालीं या कालव्याला आरंभ होऊन १९०८ सालीं काम संपलें. या कालव्याला १८ लाख रुपये खर्च झाला आहे.

२. जिल्हा—पंजाब. रावळपिंडी भागांतील जिल्हा. क्षेत्रफळ २,७७४ चौ. मैल आहे. या जिल्ह्याच्या दक्षिणेस पूर्व-पश्चिम पसरलेल्या दोन मिठाच्या डोंगराच्या ओळी असून त्यांची समुद्र-सपाटीपासून उंची सरासरी २,५०० फूट आहे. येथील हवा विशेष चांगली असून डोंगरांतील हवा तर साधारण समशीतोष्णच आहे. या भागांत सरासरी १६–२४ इंचांपर्यंत पाऊस पडतो. लो. सं. ६,२९,६५८.

येथील खाऱ्या डोंगरांत पांडवांनीं आपल्या वनवासाचे दिवस घालविले अशी एक दंतकथा आहे. अलेक्झांडर आणि पोरस यांचें युद्ध या जिल्ह्यांत कोठें तरी झालें असावें असा समज आहे. मुसलमानांच्या प्रथम ज्या स्वाऱ्या या प्रांतांत झाल्या त्या वेळीं गक्खर लोक येथें प्रबळ होते. मोंगलांच्या कारकीर्दीत हे त्या घराण्याचे राजनिष्ठ मांडलिक झाले. पुढें मोगलांची सत्ता नष्ट झाल्यावर या बाजूच्या इतर भागांप्रमाणें हाहि भाग शीखांनीं जिंकला. इ. स. १८४९ मध्यें इतर मुलखा-बरोबर हा जिल्हा शीखांकडून ब्रिटिशांना मिळाला. या जिल्ह्यांत ३ तहशिली आहेत. त्यांचीं नांवें : झेलम, पिंडदादनखान आणि चक्वाल. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण झेलम आहे. या जिल्ह्यांतील मुसलमानी वस्ती शेंकडा ८९ आहे. येथील लोकांत पश्चिमेकडील पंजाबी भाषा प्रचलित आहे. गहूं, हरबरा, जवस, गळिताचीं धान्यें, ज्वारी, बाजरी, वगैरे पिकें येथें मुख्य होत.

३. नदी—काश्मीर व पंजाब प्रांतांतून वाहत असणारी एक नदी. ज्या पांच नद्यांमुळें ‘पंजाब’ हें नांव पडलें आहे त्यांपैकीं ही अगदीं पश्चिमेकडील नदी होय. हिचें संस्कृत नांव ‘वितस्ता’ आहे. टॉलेमीनें हिचा उल्लेख बिडस्पेस असा केलेला आहे. मुसलमानी इतिहासकार तिचा उल्लेख विहत, विहट असा करतात. वीरनाग नांवाच्या मोठ्या झऱ्यापासून हिचा उगम असून पंधरा मैल उत्तरेस वाहत गेल्यावर तिला खानबलजवळ कांहीं ओढे मिळतात व या ठिकाणापर्यंत ही नदी जलमार्गास उपयोगी आहे. काश्मीरचा बहुतेक व्यापार या नदीवर अवलंबून आहे. हिची एकंदर लांबी ४५० मैल असून पैकीं २०० मैल संस्थानाबाहेरच्या मुलखांत आहे. झेलम व चिनाब या दोन नद्यांमधील प्रदेशासच दुआब असें म्हणतात.

या नदीच्या तीरावर श्रीनगर, झेलम, पिंडदादनखान, मियानी, मेर आणि खुशाब हीं गांवें आहेत.

**झैन-उल् अबिद्दिन**—काश्मीरचा एक राजा. हा सुलतान शिकंदर याचा मुलगा असून काश्मीरच्या राज्यावर इ. स. १४२२ मध्यें आला. हा आपल्या पूर्वींच्या राजांपेक्षां परधर्मसहिष्णु असून यानें देशांत पुष्कळ सुधारणा केल्या. विद्या आणि कला यांस उत्तेजन दिलें. त्यानें श्रीनगर ही राजधानी वाढवून तिची पुष्कळ सुधारणा केली. तो इ. स. १४७२ त ५२ वर्षे राज्य करून मरण पावला.

**झैनखान कोका**— एक मोंगल सरदार. हा अकबराचा दूधभाऊ असून याच्या बापाचें नांव ख्वाजी हिखी आणि आईचें नांव पिच्छाजान अनागा होतें. अकबरानें याला पांच हजारी मनसबदार बनविलें होतें. त्याची चुलत बहीण शहाजादा सलीम यास दिली होती. त्या दोघांचा मुलगा शहाजादा परवीज होय. इ. स. १५८६ मध्यें त्याच्या हाताखालीं मोठें सैन्य देऊन त्याला स्वाद आणि बिजाऊर येथील अफगाणांनीं केलेलें बंड मोडण्यास अकबरानें पाठविलें असतां त्याचा पराभव झाला आणि राजा बिरबल, अरबबक्षी, वगैरे मोठे सरदार ८,००० सैन्यानिशीं मारले गेले. तो आग्रा येथें इ. स. १६०० मध्यें मरण पावला. त्या काळांत तो एक उत्तम तंतुवाद्य वाजविणारा होता.

**झैनाबादी महाल**—ही औरंगजेबाची एक बेगम होती. हिचें सौंदर्य पाहून औरंगजेब हिच्यावर इतका भाळला होता कीं, तो एके समयीं हिच्या सांगण्यावरून दारू पिण्यास देखील तयार झाला.

**झोइसाइट**—पांढरें शुभ्र किंवा पिंगट रंगाची थोडीशी झांक असलेलें एक खनिज. त्यांत मुख्यत्वें अल्युमिनियम आणि खट (कॅल्शियम) यांची सिकता (सिलिकेट्) असून उज्ज (हायड्रो-

जन)हि थोड्याबहुत प्रमाणांत असतो. इपिडोट आणि झोइसाइट यांतील फरक म्हणजे झोइसाइटमध्यें लोखंडाचा अभाव असतो.

**झोग (पहिला) (१८९५– )**—आल्बानियाचा हा शेवटचा राजा झोगोली या मुसलमान घराण्यांतील आहे. हा पहिल्या महायुद्धांत ऑस्ट्रियनांच्या बाजूनें लढला. १९२० सालीं आल्बानियाच्या मंत्रिमंडळांत शिरला व दोन वर्षांनीं प्रधान मंत्री झाला. पण १९२४ सालीं हें पद सोडून त्याला युगोस्लाव्हियाला पळून जावें लागलें. एका वर्षांत आल्बानियांत परत येऊन त्यानें सत्ता काबीज केली व १९२८ त राजा बनला. त्यानें राज्यांत हळूहळू सुधारणा आणल्या. १९३८ त एका हंगेरियन सरदार घराण्यांतील मुलीशीं लग्न केलें. पण १९३९ त इटालियन सैन्यानें आल्बानियावर स्वारी केली व प्रदेश जिंकला. तेव्हां झोग कुटुंबासह परागंदा झाला व इंग्लंडांत जाऊन राहिला. दुसऱ्या महायुद्धानंतर आल्बानिया प्रजासत्ताक झाला व झोगचें राज्य गेलें.

**झोंप**—ज्या अवस्थेमध्यें ज्ञानेंद्रियें व मोठा मेंदू यांचीं कार्यें स्वाभाविकतः तात्पुरतीं विराम पावतात त्या अवस्थेस निद्रा किंवा झोंप असें म्हणतात. शरीराच्या क्रिया करणाऱ्या प्रत्येक अवयवास विश्रांतीची आवश्यकता असते. निद्रेमध्यें अशा तऱ्हेची विश्रांति मिळून मेंदूमध्यें विनाशात्मक अथवा विघटनात्मक क्रियेच्या ऐवजीं घटनात्मक अथवा पोषक क्रिया चालू असते. निद्रेचा काल हा विश्रांतीचा व शरीराची झालेली झीज भरून काढण्याचा काल असतो व सर्व गात्रें त्या वेळीं आपली झीज भरून काढण्याचें कार्य करीत असतात. प्रत्येक व्यक्तीस झोंप येण्याची क्रिया व काल या गोष्टी त्या व्यक्तीच्या संवयी, वय, स्वभाव आणि व्यवसाय इत्यादि गोष्टींवर बऱ्याच प्रमाणांत अवलंबून असतात. स्वप्नें व निद्रानाश हीं मज्जातंतुव्यूहांतील निरनिराळ्या अवयवांच्या क्रियेंतील व त्यांस मिळणाऱ्या निद्रावस्थेंतील फरक दाखविणारीं उदाहरणें आहेत. स्वप्नविरहित झोंप ही शरीरास हुषारी आणण्याच्या कामीं अत्यंत उपयुक्त आहे, असें सर्व इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञांचें मत आहे. मनुष्याची झोंप हलकी असल्यास क्षुल्लक आवाजानेंहि ती मोडण्याचा संभव असतो. निद्रावस्थेमध्यें मेंदू हा बहुतेक रक्तरहित असतो. तसेंच मेंदूमधून रुधिराभिसरणाची क्रियाहि अत्यंत मंद असते व ती अल्प प्रमाणांत चालू असते.

**झोब**—१. जिल्हा— बलुचिस्तान, ईशान्येकडील जिल्हा. याचें क्षे. फ. १०,४७८ चौ. मै. आहे. उन्हाळ्यांत पुष्कळ लोक या ठिकाणीं थंड हवेचें ठिकाण म्हणून येतात. जिल्ह्यांत झोब, कुंदर व गोमल या नद्या मुख्य आहेत. पावसाचें मान अतिशय कमी म्हणजे १० इंचांच्या थोडें वर आहे.

सातव्या शतकांत अफगाण लोकांची वस्ती येथेंच होती, व त्यायोगें हिंदुस्थानच्या संपत्तीबद्दल व राज्याबद्दल त्यांना हेवा वाटूं लागला. १३९८ सालीं तैमूरलंगाचा नातू पीर महंमद हा झोबपर्यंत थडकून हिंदुस्थानवर स्वारी करण्याच्या विचारांत होता. अहमदशहा दुराणीनें १८ व्या शतकांत झोबचा बेकर नीक याजला सुमा ही पदवी देऊन काकर लोकांवर अमल बसविण्याकरितां नेमला होता. सन १८७९ त शहाजहान व दोस्त महंमद या दोघांनीं या प्रांतांत पुंडावा करून इंग्रजांना फार त्रास दिला.

जिल्ह्यांत २७६ खेडीं असून महत्त्वाचें शहर एकच फोर्ट सँडिमन हें आहे. लो. सं. ६१,४९९ असून यांत बहुतेक सर्व पठाण आहेत. गहूं हें मुख्य धान्य असून तांदूळ, मका हींहि धान्यें येथें होतात. झोब जिल्ह्यांत बैल व गुरें कमी असून घोडे जास्त आहेत. उंटहि फार उपयोगी जनावर असतें. बकऱ्याचे तर कळपच्या कळप दृष्टीस पडतात.

इकडील लोकांना विद्येची अभिरुचि कमी आहे. तथापि मशिदींतून मुल्ला लोक मुलें पढवितात.

२. नदी— बलुचिस्तानमधील एक नदी. हिचा उगम पिशिनच्या पूर्वेस होऊन गोमल नदीला मिळेपर्यंत हिची लांबी २४० मैल आहे. नदीच्या वरील भागांत दोहों बाजूंच्या दरडी उंच असल्यामुळें हिचा उपयोग पाट वगैरे काढण्याकडे होत नाहीं. नदीच्या खालील बाजूस समखवाल शहरापासून पुढें कांहीं ठिकाणीं धरणें वगैरे बांधून यंत्रसाहाय्यानें पाणी वर चढवून जमिनीची मशागत केली आहे.

**झोला, एमील एडवर्ड चार्लस अँटायन (१८४०–१९०२)**—हा फ्रेंच कादंबरीकार पॅरिस येथें जन्मला. याचें शिक्षण प्रारंभीं एक्स येथें झालें. इ. स. १८६२ त त्याला कारकुनाची नोकरी लागली. याच सालीं त्यानें आपला लेखनव्यवसाय सुरू केला. 'कॉन्त द निनाँ' या नांवाचें त्याचें पहिलें पुस्तक १८६४ सालीं प्रसिद्ध झालें. झोलाच्या कादंबऱ्यांत स्वभाववैचित्र्य अतिशय सांपडतें. तो वस्तुस्थितिदर्शक कादंबऱ्यांचा प्रणेता होता. याची भाषा सोपी, रसभरित किंवा ओजस्वी नाहीं. पण कथानकांतील प्रसंगांचें भेसूर चित्र रेखाटण्यांत झोलाचा हात कोणी धरूं शकणार नाहीं. १९ व्या शतकाच्या शेवटीं फ्रेंच

राजकारणांत सामाजिक बाबतींत झोला याला महत्त्वाचा भाग घ्यावा लागल्यामुळें त्यालीं स्वदेश सोडून इंग्लंडचा आश्रय धरावा लागला.

**झोहॉक**— इराणचा एक राजा ( जमशीद पाहा ). या परकी राजानें इराणी प्रजेवर फार जुलूम केले. अखेर शहा जमशीद याचा नातू जो आबातिन त्याचा मुलगा फेरिदून यानें त्याचा पराभव करून त्याला एका दरीच्या तोंडाशीं खडकास घट्ट बांधून तेथें त्याला कायमच्या आरोळ्या मारीत ठेवलें. झोहॉक हा दुष्ट स्वभावाचा होता. याविषयीं त्याच्या पूर्व व उत्तर चरित्रांतील अनेक दंतकथा आहेत. त्यानें भारतीय पुराणांतील कंसाप्रमाणें बापाला ठार मारून राज्य बळकाविलें व पुढें इराणचा राजा झाल्यावर आपला भावी शत्रु फेरिदून हा जन्मल्याचें कळल्यापासून त्याला ठार मारण्याचे अनेक प्रयत्न केले, वगैरे कथा आहेत. तसेंच कवेह नांवाच्या एका लोहाराचे १६ मुलगे मारले गेल्यामुळें फेरिदूनला झोहॉकविरुद्ध लढाईंत लोकांची मदत मिळाल्याची कथा आहे. या कवेहने आपल्या अंगावरचें कातड्याचें वस्त्रच बंडाचें निशाण म्हणून उभारलें होतें. पुढें या वस्त्रालाच सोनेरी नक्शी व हिरेमाणकें लावून तें इराणचें राष्ट्रीय निशाण म्हणून मुसलमानांच्या अमलापर्यंत चालू होतें. परंतु यांपैकीं कित्येक कथा कल्पित असून त्या वेळीं इराणवर झालेल्या असुरी लोकांच्या स्वारीवर उभारलेलें तें एक रूपक आहे, असें अलीकडील ऐतिहासिक संशोधकाचें म्हणणें आहे.

---

# ट

**ट**— या वर्णाला आजचें रूप प्राप्त होण्यास तीन अवस्थांतून जावें लागलें. या वर्णाची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार लेखांत (खि. पू. ३ रें शतक), दुसरी क्षत्रपवंशी राजा रुद्रदामाच्या गिरनार लेखांत ( इ. स. २ रे शतक ), व तिसरी अवस्था समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील स्तंभावरील लेखांत दृष्टीस पडतें.

**टंक**—( बोरॉन ). बोरॅक्स वगैरे संयुक्तांच्या रूपानें निसर्गांत विपुल सांपडणारें एक मूलद्रव्य. हें काळसर पिंगट रंगाच्या स्फटिकरहित चूर्णाच्या स्वरूपांत असतें. ह्याच्या अंगीं उष्णतावाहकता नाहीं, व तापविलें असतां हें वितळत नाहीं. तथापि आत्यंतिक उष्णमानाच्या वेळीं प्राण ( ऑक्सिजन ), हर ( क्लोरिन ) व नत्र ( नायट्रोजन ) वगैरेबरोबर ह्याचा सहज संयोग होतो. ७०० ° श. (सें.) ला हें हवेत जळतें व त्याची हिरवी ज्वाला तयार होते. अतिशय कठिण पोलाद जें टंकलोह ( बोरॉन–स्टील ) ह्यांत ह्या मूलद्रव्याचा उपयोग केलेला असतो.

**टकमक किल्ला**— मुंबई, माहीमच्या आग्नेयीस पंधरा मैलांवर तानसा व वैतरणा यांच्या उगमाच्या ईशान्येस जंगलांत २,००० फूट उंचीच्या बिकट डोंगरावर हा किल्ला बांधलेला आहे. किल्ल्याचा माथा ४०० यार्ड लांब व १०० यार्ड रुंद आहे. डोंगराची चढण दोन ठिकाणीं साधारण सोपी आहे व याच ठिकाणीं तटबंदी आहे.

**टंकयंत्र**—( टाइपरायटर ). ज्याप्रमाणें मुद्रणकलेमध्यें कागदावर निरनिराळीं अक्षरें उठतात त्याप्रमाणेंच कागदावर अक्षरें उठविणाऱ्या यंत्रास टंकयंत्र म्हणतात. अशा तऱ्हेचें पहिलें यंत्र रेमिंग्टन कंपनीनें १८७३ मध्यें तयार केलें. मराठी अक्षरें उठविणारीं यंत्रेंहि अलीकडे 'नागरी'सारखीं तयार झालीं आहेत व त्यांत अधिकाधिक सुधारणा होत आहेत.

टंकयंत्राचे दोन प्रकार आहेत: १. करंडी( बास्केट )यंत्र, व २. नळकांडें यंत्र. करंडीयंत्रांत प्रत्येक टंक एका दांड्यावर बसविला असून तो दांडा किल्ली( की )ला जोडलेला असतो. हे टंकदांडे करंडीच्या आकाराच्या सांचावर बसविले असतात. अर्वाचीन यंत्रांत हा सांचा अर्धवर्तुलाकार असतो. नळकांडेंयंत्रांत टंक नळकांड्यावर बसविले असून किल्ली दाबली असतां नळकांडें फिरतें व लहान हातोड्यानें कागदावर त्या जागीं अक्षर बठविलें जातें. किल्लीचा तक्ता सर्वत्र सारखाच असतो.

सर्वसामान्यपणें टंकलेखक दर मिनिटाला साठ अक्षरें लिहितो; हा वेग चांगल्या हातलेखकाच्या लेखनवेगाच्या तिप्पट म्हणतां येईल. बायका टंकयंत्रावर चांगलें काम करीत असल्यानें त्यांना हा एक धंदाच होऊन बसला आहे.

**टंकी**—हा राग पूर्वी थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतो म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी ऋषभ आहे. गानसमय सायंकाळ मानितात. हा राग श्रीरागाच्या अंगानें गावयाचा असतो. यास कोणी श्रीटंक, टंकिका व टंकिरा अशीं निरनिराळीं नांवें देतात.

**टका**— १. मराठेशाहींतील एक चलन. मूळचा हिंदी शब्द. याची किंमत निरनिराळी आढळते. एक रुपया, चार आणे, एक आणा, तीन पैसे यांसहि टका म्हणतात. हें नाणें प्रत्यक्ष व्यवहारांत नसावें. फक्त विशिष्ट किंमतीचा वाचक शब्द असेल असें कांहीं संशोधक समजतात.

२. एक कर. जसें–घरटका, लग्नटका, इ.

३. जमीनमोजणींत १२० चौरस विघ्यांना टका म्हणतात.

**टंडन, पुरुषोत्तमदास** ( १८८९- )—संयुक्त प्रांतांतील एक नाणावलेले पुढारी, व हिंदी भाषेचे कट्टर पुरस्कर्ते. १९२१ सालापासून जातीय प्रश्नांबाबत म. गांधींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेनें स्वीकारलेलें पडतें घेण्याचें धोरण, राजाजी-करार, भुलाभाई–लियाकत योजना, व वर्किंग कमेटी तुरुंगांत असतांना राष्ट्रसभेच्या नांवावर लीगशीं करण्यांत आलेल्या वाटाघाटी या गोष्टी यांना बिलकूल मान्य नव्हत्या. व त्यांबद्दल यांनीं तीव्र शब्दांत व सडेतोडपणें आपली नापसंती व्यक्त केली. १९२५ सालच्या कानपूरच्या राष्ट्रीय सभेंत राष्ट्रसभेचें काम हिंदींत चालावें असा ठराव करून घेतल्यापासून राष्ट्र-भाषेच्या प्रसारास यांनीं सर्वथा स्वतःस वाहून घेतलें. पुढें हिंदी साहित्य संमेलनांत राष्ट्रभाषेच्या नांवावर उर्दू भाषेचा प्रवेश होऊं लागल्याचें दिसतांच यांनीं त्यास विरोध केला. १९३० सालीं अलाहाबाद कॉंग्रेस कमेटीचे हे अध्यक्ष होते. यानंतर सन १९३९ मध्यें कॉंग्रेस मंत्रिमंडळ अस्तित्वांत आल्यावर संयुक्त प्रांत असेंब्लीच्या अध्यक्षपदावर यांची निवड झाली. या वेळीं अध्यक्ष पक्षातीत असावा या नियमानुसार यांना राष्ट्रीय सभा किंवा अध्यक्षपद या दोहोंपैकीं एकावर पाणी सोडण्याची वेळ आली तेव्हां यांनीं सरळ अध्यक्षपदाचा त्याग करण्याची तयारी दाखवली. तेव्हां या नियमाला राष्ट्रीय सभेकडूनच यांचा अपवाद समजण्यांत येऊन यांना राष्ट्रीय सभेचें व असेंब्लीचें अशीं दोन्ही कामें करण्यास परवानगी देण्यांत आली. हे एकदां हिंदी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. हे फार निस्पृही व त्यागी गृहस्थ आहेत.

**टपाल वाहतूक**—परस्परांस पत्रें पाठविण्याचा व्यवहार बऱ्याच प्राचीन कालापासून चालू आहे. पण पूर्वी तो खाजगी स्वरुपाचा असे. कांहीं सावकार किंवा राजे नियमित डाक ठेवीत व तीबरोबर इतर लोकहि क्वचित् पत्रें पाठवीत; पण सरकारी टपालपद्धति ही इंग्रजी अमलानंतर हिंदुस्थानांत आली.

इंग्लंडमध्यें टपालासंबंधीं पहिला कायदा तिसऱ्या एडवर्डच्या कारकीर्दींत झालेला आढळतो. त्या वेळीं राजकीय जासूद नेम-लेले असत व ते पत्रें नेण्या–आणण्याचें काम करीत. पहिला पोस्ट मास्तर ब्रायन टूक ( १५३३ ) नांवाचा होता. १५४३ मध्यें लंडन व एडिंबर्ग यांमध्यें टपाल सुरू झालें. त्यास चार दिवस लागत. पहिल्या जेम्सच्या कारकीर्दींत टपालपद्धतीची बरीच वाढ झाली व युरोपशीं टपालानें व्यवहार होऊं लागला. १६१९ मध्यें परराष्ट्रीय टपालाकरितां पोस्ट मास्तर नेमला गेला. पहिल्या चार्लसच्या कारकीर्दीपर्यंत व्यापाऱ्यांच्या खाजगी डाका चालूच होत्या. तसेंच मोटमोठीं शहरें व विद्यापीठें यांच्याहि स्वतंत्र डाका चालू असत. पहिल्या चार्लसनें या खाजगी डाका बंद केल्या व तो टपालखात्याचें उत्पन्न घेऊं लागला. १६८३ मध्यें लंडनमध्यें पेनी पोस्ट ( आणा टपाल ) सुरू झालें. सर रौलँड हिल यानें १८३७ मध्यें सध्यांची नवीन सरसहा एक दर ठेवण्याची पद्धति सुच-विली व ती अमलांत आणली गेली. त्या वेळीं अर्ध्या औंसाला एक पेनी दर होता. पोस्टाचीं तिकिटें निघाल्यामुळें तर ही पद्धति यशस्वी झाली. १८९२ मध्यें प्रथम कार्डे निघालीं. उत्तर–पत्रें ( रिप्लायपोस्ट कार्डें ) १८९३ मध्यें प्रचारांत आलीं. चित्रांच्या कार्डांमुळें कार्डांचा उपयोग फार वाढला. १८८३ मध्यें पोस्टानें पार्सलें जाऊं लागलीं. १८९८ मध्यें ब्रिटिश साम्राज्यांत एक पेनी हा टपालाचा दर सार्वत्रिक करण्यांत आला. १८७० मध्यें तारायंत्र सुरू झालें. १८८५ मध्यें सहा पेनी तारेचा दर करण्यांत आला. १९१२ मध्यें टेलिफोन राष्ट्रीय करण्यांत आले. १८६५ मध्ये टपालामार्फत विम्याची योजना करण्यांत आली. पहिल्या महा-युद्धानंतर विमानानें टपाल पाठविण्याची व्यवस्था झाली. आतां ब्रिटिश टपाल कचेरींतून २०० देशांस विमानांनीं टपाल जातें.

हिंदुस्थान—हिंदुस्थानांत मुसलमानी अमदानींत खाजगी व सरकारी अशी दोन प्रकारची डाक असे. डाकेसाठीं घोडे व उंट असत व ते टप्प्याटप्प्यांनीं बदलत. सरकारी डाक फार नियमित व व्यवस्थित असे व जलद पोंचे. शिवाजी पुरंदरावर जयसिंगाच्या स्वाधीन झाला ही बातमी अकराव्या दिवशीं औरंगजेबास दिल्लीला मिळाली. खाजगी डाक व्यापारी लोक ठेवीत. सांके-तिक भाषेंत व्यापारी पत्रें पाठवीत. या डाकेचा उपयोग लोकां-नाहि करून घेतां येत असे.

सर्व हिंदुस्थानभर पेशव्यांच्या फौजा फिरत असल्यामुळें इकडून तिकडे बातमी पोंचवण्याची व्यवस्था करणें भाग होतें. त्यामुळें ठिकठिकाणीं लोक ठेवून पत्रें पाठविण्याची योजना अमलांत आली होती. बातम्या आणण्यापोंचविण्यासाठीं मुद्दाम माणसे ठेवीत त्यास डाक ठेवणें म्हणत. कोंकणांत बातम्या आणण्यासाठीं मचवे ठेवलेले असत त्यांस बातमीचे मचवे म्हणत. अमुक दिवशीं मचवे परत आलेच पाहिजे किंवा मजूरदारानें अमुक मैल चाललेंच पाहिजें असा नियम असे. सरकारच्या जरूरीकरितां डाकेची पद्धति प्रथम अस्तित्वांत आली. खासगी खुशालीचीं पत्रें पाठविण्याची अडचण तेव्हां लोकांना भासत नसे. यात्रेला निघाल्यावर मात्र घरची खुशाली आपल्याला व आपली खुशाली घरच्या माणसांना कळवावी असें वाटणें स्वाभाविक होतें. ही गरज भागविण्यासाठीं आटवले ह्यांची काशी तें पुणें डाक स्थापन झाली असावी. त्या वेळीं सरकारी व सावकारी अशा दोन

डाका निर्माण झाल्या. पत्रें तोलून वजनावर हंशील घेत. चार आणे तोळा असें हंशील असे.

इंग्लिशांच्या अमलानंतर म्हणजे श. १७७० पावेतों सावकारी डाका होत्या. सावकारी डाकेंत विमा उतरून जिन्नस पाठविण्याची रीत होती ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. मालाच्या किंमतीवर शेंकडा दोन रुपये एक आणा हा विम्याचा दर होता.

जेथें डाक नसे अगर डाकेचें हंशील भरमसाट असेल तेथें जासूद पत्रें देऊन पाठवीत. एका जासुदाजवळ अनेक लोकांचीं पत्रें असत. ज्याला पत्रें पाठविलीं असतील तो पत्रें घेऊन येणाऱ्या जासुदाला पैसे देई. पण पत्र पाठविणारानें कांहीं द्यावयाचें नाहीं. ही संवयच पुढें नॉटपेड पत्रें पाठविण्यास कारणीभूत झाली असावी.

ब्रिटिश अमदानी—ब्रिटिशांनी लॉर्ड क्लाइव्हच्या अमदानींत १७६७ सालीं प्रथम टपालपद्धत सुरू केली. सुरुवातीला फक्त सरकारी पत्रांची ने-आणच होई. परंतु १७७४ पासून जनतेचें टपालहि न्यावयाची सुरुवात झाली. या वेळी टपालाचे दर आजच्याप्रमाणें केवळ वजनावर अवलंबून नसत. १०० मैलांना दोन आणे असा दर असे. आज पुण्याहून खडकीला जावयाला कार्डाला पाऊण आणा पडतो आणि कलकत्त्यापासून पुण्याला जायलाहि पाऊण आणाच पडतो. हीं दोन आण्याचीं पोस्टाचीं तिकिटें तांब्याचीं असत. १८३७ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीनें बऱ्याच व्यापक प्रदेशांत टपाल जाण्या-येण्याची सोय केली होती. परंतु हे टपाल माणसांच्याकरवीं जात असल्याने टपालाला फारच वेळ लागे. आजच्याप्रमाणें आगगाड्या, मोटारी, विमानें, त्या काळीं नव्हती.

हिंदुस्थानांत पोस्टाचीं कागदाचीं तिकिटें सिंधचे कमिशनर बार्टले फ्रीअर यांनीं १८५२ मध्यें सर्वांत अगोदर काढलीं. मुंबई सरकारनें फ्रीअर साहेबांना टपाली पद्धति मुंबईच्या जनतेंत लोकप्रिय करण्याची विनंति केली. सरकारी कामासाठींच टपाल-पद्धति वापरली गेली तर टपाल खात्याचा खर्च सरकारला परवडणार नव्हता. इंग्लंडमधील 'पेनी पोस्टेज' च्या धर्तीवर फ्रीअरनें हिंदुस्थानांत स्वस्त दरांत टपाल नेण्या-आणण्याची व्यवस्था केली.

सिंध प्रांतांत कागदाचीं तिकिटें यशस्वी झालेलीं दिसल्यावर सबंध ब्रिटिश हिंदुस्थानांतहि हीच पद्धति सुरू करण्याबद्दल विचार करण्यांत आला. पोस्टाचीं तिकिटें इंग्लंडमधून छापवून घ्यावींत अशी विनंति ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टर बोर्डाला करण्यांत आली; परंतु खर्चिक म्हणून ती विचारांत घेतली नाहीं. हिंदुस्थानांत १८५४ मध्यें सर्वांत आधीं कलकत्त्याला तिकिटें छापलीं गेलीं आणि ५ एप्रिल १८५४ ला हीं तिकिटें मुंबईला पाठविण्यांत आलीं. शेंदरापासून तयार केलेल्या रंगांत हीं तिकिटें छापलीं होतीं; परंतु हा रंग हिंदुस्थानांत उपलब्ध नसल्यानें पुढें तिकिटें निळ्या रंगांत छापण्यांत आलीं. ह्या तिकिटांवर महाराणी व्हिक्टोरियाचा शिक्का होता; परंतु या तिकिटांच्या मागें चिकट-विण्यासाठीं गोंद लावलेला नसे.

१८५६ पासून टपालाचीं तिकिटें इंग्लंडमध्यें छापण्याची व्यवस्था झाली. १८८२ सालापर्यंत हिंदी तिकिटांवर 'ईस्ट इंडिया पोस्टेज' असे शब्द असत, परंतु कंपनीची सत्ता ब्रिटिश सरकारनें आपल्या हातीं घेतल्यानें यानंतर मात्र नुसतें 'इंडिया पोस्टेज' हे शब्द घातले जाऊं लागले. या वेळचीं तिकिटें दोन पैशांपासून एक रुपयापर्यंत असत. १९०२ मध्यें तिकिटांसाठीं वेगवेगळे रंग निवडण्यांत आले.

१९०६ मध्यें पोस्टाप्रमाणेंच रेव्हिन्यू खात्यासाठींहि दोन व चार पैशांचीं तिकिटें छापावयाचें ठरलें. १९०९ पर्यंत तारेच्या फॉर्मवर लावावयाचीं तिकिटें पोस्टाच्या तिकिटांपेक्षां वेगळीं असत; परंतु १९०९ पासून साधीं पोस्टाचींच तिकिटें तारांसाठींहि वापरावयाचें ठरलें. तारांना ५० रुपयांपर्यंत खर्च येत असल्यानें १०, १५, व २५ रुपयांचींहि तिकिटें छापण्यांत आलीं. तिकिटें गुलाबी, हिरव्या व निळ्या रंगांत छापण्यास सुरुवात झाली. १८९२ मध्यें १ रुपयाचीं व १८९५ मध्यें २।३ व ६ रुपयांचीं तिकिटें निघूं लागलीं. १९११ मध्यें पंचम जॉर्जचीं तिकिटें नव्या नमुन्याचीं निघालीं.

पहिल्या महायुद्धांत पोस्टाचीं तिकिटें हिंदुस्थानांतच छापण्याची गरज निर्माण झाली. १९२६ मध्यें यासाठीं एक छापखाना नाशिकमध्ये उघडण्यांत आला. तिकिटांसाठीं पाठीवर गोंद लावलेला एक विशेष प्रकारचा कागद वापरण्यांत येऊं लागला.

१९२९ मध्यें हवाई टपालाचीं तिकिटें काढण्यांत आलीं. ब्रिटिश राष्ट्रसमूहांत हा मान सर्वांत अगोदर हिंदुस्थानला मिळाला. सर्वांत अगोदर हवाई टपाल हिंदुस्थानांतच आलें. १८ फेब्रुवारी १९३१ या दिवशीं ६५०० पत्रें अलाहाबादहून नैनीला पाठविण्यांत आलीं. १९३१ पूर्वीं पोस्टाचीं तिकिटें अत्यंत साधीं असत. १९३१ सालीं नव्या राजधानीतील—नव्या दिल्लीतलीं—कांहीं दृश्यें पोस्टाच्या तिकिटांवर छापण्याचें पोस्ट खात्यानें ठरवलें. १९३५ सालीं पंचम जॉर्जच्या राज्यारोहण-रौप्यमहोत्सवाच्या निमित्तानेंहि मुद्दाम विशेष प्रकारचीं तिकिटें काढविण्यांत आलीं होतीं.

१९३७ मध्यें सहाव्या जॉर्जचीं तिकिटें चालू झालीं. वेगवेगळीं नक्षीदार तिकिटें काढण्यांत आलीं; परंतु १९३९ च्या महायुद्धांत काटकसरीसाठीं पुन्हां पहिल्यासारखीं साधीं तिकिटें निघालीं. तांब्याच्या नाण्यांची कमतरता पडल्यावर नाण्यांच्याऐवजीं अनेक ठिकाणीं पोस्टाच्या तिकिटांचाच उपयोग महायुद्धकालांत केला

गेला. १९४६ मध्यें युद्ध संपल्यावर विजयोत्सवाचीं तिकिटें काढण्यांत आलीं.

१५ ऑगस्ट १९४७ ला हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या सुमुहूर्तावर 'जय हिंद' तिकिटें काढण्यांत आलीं. नोव्हेंबर १९४७ मध्यें राष्ट्रध्वज, अशोकस्तंभ व विमान यांच्या चित्रांचीं तिकिटें निघालीं. हीं तिकिटें साऱ्या जगभर गाजलीं. एकट्या मुंबईत एकाच दिवसांत ४३,००० रुपयांचीं हीं नवीं तिकिटें विकलीं गेलीं.

हिंदुस्थान सरकारनें स्वराज्यतिकिटें काढण्याचें ठरवून त्यासाठीं देशांतल्या कलावंतांना आवाहन केलें. १७५० लोकांनीं तिकिटासाठीं आपापल्या कलाकृती पाठविल्या. चित्रांची परीक्षा करून सर्वोत्तम चित्रांचा पुरस्कार जाहीर करण्यांत आला. राष्ट्रपिते महात्मा गांधी यांच्या प्रतिमेचीं तिकिटेंहि स्वातंत्र्यदिनाच्या दुसऱ्या वाढदिवशीं काढण्यांत आलीं. आतां जुनीं *राजाच्या मुखवट्याचीं तिकिटें संपल्यावर नव्या प्रकारचीं पोस्टाचीं* तिकिटें छापण्याची योजना सरकारनें केली आहे. आतां विमानानें जाऊं शकेल तेथपर्यंत टपाल विमानानें जाऊं लागलें आहे.

अलीकडे देशांतल्या लोकांचा पत्रव्यवहारहि खूप वाढला असून रोज दहा लाख पाकिटें व वीस लाख कार्डें हिंदुस्थानांत खपत असतात ! यांची सर्वसाधारण विक्री सालीना चार कोटी रुपयांवर आहे. तिकिटांच्या कागदासाठीं तीन टन खास कागद लागतो.

**टपाल संघ**—(पोस्टल युनियन). जगांतील प्रत्येक सुधारलेल्या देशांत पोस्टाच्या वाहतुकीचे दर ठरविणें आणि वाहतुकीची व्यवस्था करणें या कामाकरितां पोस्टल युनियन बनविण्यांत आली आहे. तिची स्थापना प्रथम १८७५ सालीं होऊन तिची मुख्य कचेरी स्वित्झर्लंडमधील बर्न शहरीं आहे. या संस्थेतर्फें दर पांच वर्षांनीं पोस्टल कॉंग्रेस सभा भरविण्यांत येते.

**टपाली कबुतरें**—कबुतरें पहा.

**टर्गो, ॲन रॉबर्ट जॅक्स** (१७२७–१७८१)— एक फ्रेंच मुत्सद्दी व अर्थशास्त्रज्ञ. चर्चमध्यें नोकरी करण्याच्या उद्देशानें टर्गोचें शिक्षण होऊन १७४९ त त्या नोकरींत शिरकावहि झाला. १७५० सालीं त्यानें चर्चची नोकरी सोडून दिली. १७५२ मध्यें तो पॅरिसच्या पार्लमेंटचा कौन्सिलर व १७५४ मध्यें चेंबर रॉयलचा सभासद झाला. १७५५–५६ सालीं गोर्नेबरोबर तो फ्रान्समधील प्रांतांची व्यापारीदृष्ट्या पाहणी करीत फिरला. स. १७६१ मध्यें त्याला लिमॅगेस या अत्यंत गरीब व करांच्या ओझ्याखालीं वांकलेल्या प्रांताचा अधिकारी नेमण्यांत आलें. त्यानें सर्व जमिनीची पुनः पाहणी केली; शेतसारा सर्वांवर योग्य प्रमाणांत बसविला; व सडका वगैरे बांधून त्या प्रांताची अनेक प्रकारें सुधारणा केली.

१७७४ मध्यें नाविक खात्याचा त्याला मंत्री नेमण्यांत आलें. व नंतर एक महिन्यानेंच कन्ट्रोलर जनरलची जागा त्याला दिली. त्या वेळीं सरकारी जमाखर्चाची अत्यंत भयंकर स्थिति झालेली होती. टर्गोनें सर्व खात्यांच्या खर्चांत काटकसर करण्याचें कडक धोरण स्वीकारलें. अंदाजपत्रकहि त्यानें व्यवस्थेशीर तयार केलें. त्यामुळें खर्चांतील तूट बरीच कमी झाली व सरकारची पत वाढली. नंतर त्यानें धान्याचा खुला व्यापार सुरू करण्याचें ठरविलें. पण मोठमोठ्या व्यापाऱ्यांनीं टर्गोला जोराचा विरोध केला. त्यांत १७७४ मध्यें दुष्काळ पडला व रोटीच्या किंमती वाढल्या; त्यामुळें दंगे झाले. तथापि ते दंगे टर्गोनें मोठ्या निश्चयी धोरणानें मिटविले. १७७६ मध्यें त्यानें उपाध्याय वगैरे विशिष्ट हक्कदार वर्गांचे हक्क काढून घेऊन त्या सर्वांवर इतरांप्रमाणेंच कर बसविण्याचा निश्चय जाहीर केला. त्यामुळें सर्व अमीर–उमराव व वटे हक्कदार त्याचें शत्रुत्व करूं लागले. खुल्या व्यापाराच्या तत्त्वाबद्दल व्यापारी वर्ग, करांच्या सार्वत्रिक वसुलीबद्दल सरदारादि हक्कदार, व धार्मिक स्वातंत्र्याबद्दल खुद्द राजा व राणी हीं टर्गोवर नाखुष झालीं. शेवटीं टर्गोला १७७६ मध्यें राजीनामा देणें भाग पडलें. नोकरी सोडल्यावर अखेरपर्यंत तो पॅरिसमध्येंच होता.

तो बऱ्याच उच्च प्रतीचा मुत्सद्दी होता. त्यानें सुचविलेल्या सुधारणा अमलांत आल्या असत्या तर १७८९ मधील राज्यक्रांति टळली असती, असें म्हणतात.

**टर्टूलियन** (इ. स. १५५–२२२)— हा थोर लॅटिन आचार्यां( फादर )पैकीं अगदीं पहिला होय. त्याचा अतिशय सुप्रसिद्ध ग्रंथ 'अपोलोजेटिकम्' हा असून त्या ग्रंथांत त्यानें ख्रिस्ती धर्माचें संप्रदायशुद्ध समर्थन केलें आहे. त्याचा दुसरा ग्रंथ 'ॲड प्रॅक्सिअम्' हा पाश्चात्य धर्मविज्ञानविषयक वाङ्मयांत तत्कालीन वैशिष्ट्यदर्शक आहे. आणि त्यांत ट्रिनिटेरिअन (व्यक्तित्रयात्मक) देवमताच्या सिद्धांताच्या वाढीचा इतिहास दृग्गोचर होतो, म्हणून या ग्रंथाला विशेष महत्त्व आहे. त्याच्या ग्रंथांत गाढ विद्वत्ता, विशेष कल्पकता आणि तीक्ष्ण उपहासात्मक विनोद दिसून येतो.

**टर्नर, जॉर्ज** (१७९९–१८४३)— सिलोनमधील सुप्रसिद्ध प्राच्यविद्यासंशोधक व एक विद्वान् पालीभाषापंडित. इंग्लंडमधून शिक्षण घेऊन परत आल्यावर यांनीं सिलोनच्या सिव्हिल सर्व्हिसमध्यें काम करण्यास सुरुवात केली. ज्या लोकांमध्यें आपणांस काम करावयाचें त्यांची भाषा आपणांस अवगत व्हावी या हेतूनें यांनीं प्रथम सिंहली व नंतर पाली भाषेचें अध्ययन करण्यास सुरुवात केली. पाली भाषेंतील 'महावंश' या पद्यमय इतिहासग्रंथाचें अध्ययन करीत असतांना त्यांना त्यांत इसवी सनाच्या

पूर्वींच्या सिलोनमधील व हिंदुस्थानांतील परिस्थितीची माहिती देणारे उल्लेख आढळून आले. हे उल्लेख आपण इंग्रजींत अनुवाद करून प्रसिद्ध करावेत असें यांच्या मनानें घेतले व त्याप्रमाणें याच ग्रंथावरील एका जुन्या टीकेच्या साहाय्यानें यांनीं सन १८३७ मध्यें पहिल्या सदतीस प्रकरणांचा इंग्रजी अनुवाद प्रसिद्ध केला. यानंतरचा यांचा दुसरा ग्रंथ म्हणजे 'सिलोनच्या इतिहासाचें सार' या आशयाचा होय. या दोन्ही ग्रंथांमुळे सर्व पाश्चात्य अभ्यासकांत यांच्याबद्दल आदरभाव निर्माण झाला. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस पाश्चात्य विद्वानांनी हिंदुस्थानचे सांस्कृतिक मूल्य कमी करण्याच्या हेतूनें संस्कृत व पाली भाषेंतील ग्रंथांना भाकडकथा ठरविण्याचा प्रयत्न केला होता. या वेळीं धडाडीनें पुढे येऊन व अनेक दोषारोप पत्करूनहि यांनीं संस्कृत व पाली ग्रंथांची श्रेष्ठता सिद्ध करण्याच्या कामीं स्वतः भाग घेतला.

**टर्नर, जोसेफ मालार्ड विल्यम** (१७७५–१८५१)—एक सृष्टिसौंदर्यविषयक देखावे रंगवणारा इंग्रज चित्रकार. त्याला १८०७ सालीं रॉयल ॲकेडमीमध्ये प्रोफेसर नेमण्यांत आलें. पुढील वर्षी त्यानें 'बुक ऑफ स्टडीज' (अभ्यासग्रंथ) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. १८१० पर्यंत त्याच्या चित्रांवर डच कलापद्धतीची छाया पडलेली होती. या कलापद्धतीचीं चित्रें—'चक्की आणि घड्याळ' (१८०६), 'धुक्यांत सूर्योदय' (१८१०) हीं असून नंतर टर्नरनें क्लॉड या चित्रकाराच्या कलापद्धतीचें अनुकरण करून 'आल्प्स ओलांडणारा हॅनीबॉल' (१८१२) 'ओढा ओलांडणारा हॅनीबॉल' (१८१५) हीं चित्रें काढलीं. १८१९ मध्यें टर्नर इटलींत गेला. आणि तेथपासून त्याच्या चित्रकलेची तिसरी अवस्था सुरू होते. या पद्धतीचीं त्याचीं चित्रें आहेत तीं म्हणजे 'दि बे ऑफ बेओ', आणि 'यूलीसेस डिरायडिंग पॉलीफेमस' (१८२९) ही होत. त्याचीं अखेरची चित्रें सर्वांत उत्तम आहेत तीं: 'लढाऊ टेमेरेर', 'पेटवर्थ', आणि 'पाऊस, वाफ आणि वेग' (१८४४). या चित्रांत त्याचा कल्पकतेवर फार भर आहे.

**टर्नेट**— हें मलाया द्वीपसमूहांतील बेट हाल्महेराच्या पश्चिमेकडे आहे. याचें क्षे. फ. सुमारें २५ चौ. मै. आहे. हें बेट जवळजवळ ज्वालामुखीमय (५४०० फूट) आहे. येथें अनेक वेळां ज्वालामुखीचे स्फोट झाले आहेत. या बेटावर ३,००० लोकवस्तीचें टर्नेट नांवाचें लहान शहर आहे. येथील बंदर उत्तम आहे. टर्नेट व टिडोर या प्राचीन राज्यांवर टर्नेटच्या डच रेसिडन्सीची हुकमत चालते. टर्नेटच्या भागांत व हाल्महेरा, बेशिअन, आणि ओबी बेटांत डच सरकारचा प्रत्यक्ष अमल व इतर भागांवर टर्नेट व टिडोर यांच्या सुलतानांचा अमल आहे.

**टर्पेन्टाइन**— देवदारासारख्या शंकाकार वृक्षांपासून हा धूपासारखा पदार्थ निघतो. उत्तर कॅरोलिनामध्यें हीं झाडें फार. ऊर्ध्वपातनक्रियेनें धूपापासून तेल काढतात. टर्पेन्टाइन तेल हें निर्वर्ण असून याचा वास चांगला असतो. याचा उकळण्याचा बिंदु १६०° आहे. याचें विशिष्टगुरुत्व ·८५ ते ·८७ आहे. या तेलाचा मुख्य घटक एक टर्पिन् अथवा पिनेन हा असतो. या तेलांत स्फुर (फास्फरस), गंधक व आयोडिन हे विरघळतात. याचा रंग व रोगण तयार करण्याकरितां उपयोग करतात. औषधामध्यें याचा उपयोग शरीराचा दाह होत असल्यास त्या ठिकाणीं करतात.

**टॅव्हर्नियर, जॉन बॅप्टिस्ट**— हिंदुस्थानांतील एक युरोपियन प्रवासी. हा एक फ्रेंच जव्हेरी असून तो सन १६६१–६८ पर्यंत हिंदुस्थानांत व्यापारानिमित्त प्रवास करीत होता. त्याच्या प्रवासवृत्तांत व्यापारी माहितीच फार आहे. सुरत, आग्रा या ठिकाणीं तो बहुधा राही. तो हिंदुस्थानच्या बहुतेक सर्व भागांत हिंडला होता. त्यानें स्वतःची गाडी ठेविली होती. तो विद्वान् नसल्यानें पैका व व्यापार यांशिवाय त्यानें फारसें लिहिलेलें नाहीं. हिंदुस्थानांत कोठें कोणते जिन्नस उत्पन्न होतात त्यांच्या याद्या त्यानें दिल्या आहेत. याच्या पुस्तकाचें भाषांतर इंग्रजींत झालें आहे.

**टसर रेशीम**—हा रेशमाचा एक प्रकार आहे. आसाम आणि पूर्व बंगाल या भागांत एका (ॲन्थेरिआ पाफिना नांवाच्या) किड्यापासून हें उत्पन्न होतें. हें रेशीम जाडेभरडे असते व त्याचे टु–सु हे चिनी नांवहि त्याच अर्थाचें आहे. चीनमधून हें रेशीम पूर्वीं येत असावें. रेशमाला चीनांशुक हा संस्कृत शब्द आहेच.

**टॅसिटस कॉर्नेलिअस** (५५–१२०)—एक प्रख्यात रोमन इतिहासकार. क्लॉडिअसच्या कारकीर्दीच्या अखेरीस हा जन्मला असावा. प्रीटर व कॉन्सल अशा अधिकारांवर तो असून रोमन वकीलहि होता. टॅसिटस हा ज्युलियस ॲग्रिकोलचा जांवई होता. या मोठ्या घराण्याशीं त्याचा संबंध आल्यामुळें तो लवकर प्रसिद्धीस आला.

इतिहास लिहिण्याकरितां अवश्य असलेलें साहित्य टॅसिटसजवळ पुष्कळ होतें आणि त्याचा त्यानें योग्य उपयोग करून घेतला. त्याने पहिल्या शतकांतील राज्याचें खरेंखुरें उठावदार चित्र रेखाटले आहे. तत्कालीन सामाजिक अधोगति त्याला कळून चुकली होती व या अधोगतीचें कारण बादशाही सत्ता होय, असें त्याचें मत होतें. त्याचा राजकारणापेक्षां नीतिधर्माच्या बाबतींत अधिक संबंध येतो. वास्तविक पाहतां त्याला राजकारणपटु म्हणण्यापेक्षां नीतिशास्त्रज्ञ म्हणणें अधिक बरें.

**टस्कनी**— हा इटलीमध्यें वायव्येकडे समुद्रालगत प्रांत आहे. याचें क्षे. फ. ८,८८३ चौ. मैल आणि लो. सं. ३०,८८,५११. या प्रांतांत एट्रुस्कन अपेनाइन पर्वत आहे. व मुख्य नदी आर्नो ही आहे. येथें खाद्य धान्यें, द्राक्षें, तमाखू, चेस्टनट, फळझाडें आणि फुलबागा हीं होतात. समुद्रकिनाऱ्यालगत घोडे, आणि गुरें यांना चरण्याची सोय चांगली आहे. या प्रांताची मुख्य संपत्ति म्हणजे खनिज द्रव्यें आहेत; तीं म्हणजे लोखंड, पारा, तांबें, मीठ, संगमरवरी दगड, व पांढरा दगड. फ्लॉरेन्स हें मुख्य शहर, आणि लेगहॉर्न हें मुख्य बंदर असून फ्लॉरेन्स, पिसा, आणि सीना हीं शहरें कलेचीं केंद्रें आहेत. प्राचीन काळीं याच प्रांताला एट्रुरिया हें नांव होतें. हा प्रदेश अनेकांच्या अमलाखालीं जाऊन पुढें शार्लेमान बादशहाच्या वेळीं तो फ्रँकिश प्रांत बनला, आणि १२ व्या व १३ व्या शतकापर्यंत या प्रांतावर ड्यूकचा अमल असे, पण पुढें या प्रदेशाचीं चार लहान लहान राज्यें झालीं तीं — फ्लॉरेन्स, पीसा, सीना आणि लुक्का हीं होत. यांपैकीं फ्लॉरेन्सचें राज्य बलिष्ठ असे. आणि त्यानें भोंवतालच्या प्रदेशावर आपला अमल बसविला. टस्कन भाषा सर्व इटलीभर पसरली. १६६९ मध्यें १ ला पायस पोप यानें १ ला कॉसमो याला टस्कनीचा ग्रँड ड्यूक ही पदवी दिली. हा अधिकार मेडिसी घराण्याकडे १७३७ पर्यंत होता. नंतर तो अधिकार लॉरेनचा ड्यूक फ्रॅन्सीस स्टीफन याच्याकडे गेला. १८५९ मध्यें हा प्रांत सार्डीनियाला जोडला गेला, आणि १८६१ मध्यें सार्डीनिआसकट हा सर्व प्रांत इटलीच्या राज्यांत सामील करण्यांत आला.

**टाइम्स, दि**— हें लंडन शहरांत प्रसिद्ध होणारें इंग्रजी दैनिक वृत्तपत्र असून त्यानें ब्रिटिश वृत्तपत्रांत बऱ्याच दीर्घकाल अग्रस्थान मिळविलें आहे. या वृत्तपत्राची प्रथम स्थापना जॉन वॉल्टर यानें १७८५ मध्यें केली आणि त्याला प्रथम नांव 'दि डेली युनिव्हर्सल रजिस्टर' असें दिलें होतें. नंतर १७८८ मध्यें मूळच्या नांवाला 'दि टाइम्स' हे शब्द आरंभीं जोडण्यांत आले. जॉन वॉल्टरचा मुलगा आणि वारस दुसरा जॉन वॉल्टर याच्या देखरेखीखालीं या वृत्तपत्राचा जोम आणि महत्त्व त्वरित वाढत गेलें. १८१४ मध्यें या वृत्तपत्राच्या छापखान्यांत वाफेचें एंजिन बसवण्यांत आलें, आणि त्यानंतर त्या छापखान्यांत अनेक सुधारणा करण्यांत आल्या. १८६० सालीं 'स्टिरिओटाइप प्रिंटिंग' ही छपाईची पद्धति सुरू करण्यांत आली आणि त्यानंतरच्या ९ वर्षांत वॉल्टर प्रेस सर्व सुधारणांनीं पूर्णत्व पावला. १८४७ मध्यें तिसरा जॉन वॉल्टर हा या वृत्तपत्राचा मालक झाला, आणि १८९४ मध्यें त्याच्या जागीं आर्थर वॉल्टर हा आला. १९०८ मध्यें ही वृत्तपत्रसंस्था एका कंपनीच्या मालकीची करण्यांत आली. त्यांत लार्ड नॉर्थक्लिफ याचें भाडवल: बरेंच होतें. पुढें १९२२ मध्यें नॉर्थक्लिफ वारल्यावर पत्र एखाद्या पक्षाच्या ताब्यांत जाऊं नये म्हणून वॉल्टर आणि मेजर जे. जे. अॅस्टर या दोघांनीं त्याचा आपल्याकडे ताबा घेतला. टाइम्सचा एक साप्ताहिक सचित्र अंक व अनेक पुरवणी अंक निघतात.

**टाउनशेंड, सर चार्लस** (१८६१–१९२४)—एक ब्रिटिश सेनापति. १ ल्या महायुद्धाच्या वेळीं मेसॉपोटेमियामध्यें जी ६ वी हिंदी पलटण (डिव्हिजन) पाठवली होती तींत तो एका अधिकाराच्या जागेवर होता, आणि त्यानें १९१५ च्या एप्रिल महिन्यांत त्या पलटणीचा मुख्य अधिकारी होऊन तुर्की सैन्याचा कुर्ना येथें आणि कट–एल्–अमारा येथें त्वरित पराभव केला; म्हणून त्याला पुढें बगदादपर्यंत सैन्याची चाल करण्याचा हुकूम झाला. आणि तदनुसार तैग्रिस नदीच्या उगमाकडे चाल करून जात असतांना वाटेंत टेसीफोन येथें त्यानें तुर्की सैन्याचा पुन्हां पराभव केला, पण नंतर स्वतःच्या हिंदी पलटणीचा कमकुवतपणा ध्यानीं घेऊन त्याला कुटपर्यंत आपल्या सैन्याची माघार घ्यावी लागली. कुट येथें तुर्की सैन्यानें टाउनशेंडच्या पलटणीला वेढा घातला, आणि त्यामुळें टाउनशेंड आपल्या सैनिकांसह १४३ दिवस अडकून पडला. अखेर उपासमार आणि रोग यांना आपले सैनिक बळी पडूं नयेत म्हणून टाउनशेंड तुर्कांना शरण गेला.

**टांक**— पाकिस्तान, वायव्य सरहद्द प्रांतांत डेराइस्मायल खान जिल्ह्याचा पोटविभाग व तहशील. क्षे. फ. ६३८ चौ. मै.. मुलूख नापीक असल्यामुळें पुष्कळ दिवसपर्यंत त्यांत वस्ती नव्हती. अखेर पश्चिमेकडील डोंगराळ भागांत राहणाऱ्या पठाण लोकांनीं त्यांत वसाहत केली. पूर्वी ही तहशील एक निमस्वतंत्र संस्थान असून तेथील नबाब दौलतखेल टोळींपैकीं कातखेल जातीचा होता. तहशिलीचें मुख्य ठिकाण टांक आहे. इतर खेड्यांची संख्या ७७०. दौलतखानापासून अठाविसावा व शेवटचा नबाब १८८२ त वारला. व त्याच्या मरणापूर्वीच सर्व संस्थानचा कारभार इंग्रजांनीं आपणाकडे घेतला.

**टांकणखार**—(इं. बोरॅक्स). सिंधुत्रिटंकेत (सोडियम टेट्राबोरेट). हें हिंदुस्थान, तिबेट आणि कॅलिफोर्निया या देशांतील असून वाळवंटांच्या प्रदेशांत सांपडतें. पण बाजारांत येणारा टांकणखार प्रायः निसर्गांत सांपडणाऱ्या खटंकेत (कॅल्शियम बोरेट) पासून तयार केलेलें असतें. शुद्ध टांकणखार मध्यटंकेताम्ल (पायरो बोरिक अॅसिड)चें सिंधुलवण असून त्याचे स्फटिक पट्कोनी व स्वच्छ पारदर्शक असतात. हे स्फटिक हवेंत उघडे राहिले तर फुलतात व त्यांचें स्फटिकरूप नाहींसें होऊन बारीक पूड होते. आंच देऊन तापविले असतां त्याची फुगून लाही होते

व त्यांतील स्फटिकजल निघून जातें. आणखी जास्त तापवलें तर त्याचा कांचेसारखा पारदर्शक गोळा तयार होतो. ह्यामुळें कांच, एनॅमल, व चकचकीत विटा तयार करण्यासाठीं ह्याचा उपयोग करतात. साबणाच्या कारखान्यांतहि ह्याचा उपयोग होतो. त्याचप्रमाणे खाद्य पदार्थ टिकवण्यासाठींहि ह्याचा उपयोग होतो.

**टांकणखार फूल**—( बोरॅसिक-बोरिक ॲसिड ). बोरॉनचें अम्ल. ज्वालामुखीच्या प्रदेशांतील ( उदा., टस्कनी ) कढत पाण्याच्या झऱ्यांत हें सांपडतें. त्याचप्रमाणें बोरासाइट, बोरो-कॅल्साइट आणि बोरॅक्स ह्यांच्यापासूनहि हें तयार करतां येते. बोरिक ( किंवा बोरॅसिक ) अम्ल पाण्यांत विरघळतें. त्याचे स्फटिक पांढरे शुभ्र व चकचकीत असतात. ते तापविले असतां कांचेसारखा पारदर्शक गोळा तयार होतो. सौम्य जंतुनाशक म्हणून ह्याचा अतिशय उपयोग होतो. दूध, मलई, लोणी, फळभाज्या, वगैरे खराब होऊं नयेत म्हणून ह्याचा उपयोग करतात. पण ह्या उपयोगाच्या बाबत पुष्कळशीं बंधनें आहेत.

**टाकरी**—ठाकरी. ही लिपि म्हणजे शारदा लिपीचें मोडी स्वरूप होय. जम्मूमध्ये व पंजाबच्या उत्तरेकडील सर्व डोंगरी मुलुखांत ( बहुधा सिमला जिल्हा सोडून ) हिचा प्रचार असून ती निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या स्वरुपांत प्रचलित आहे. रजपुतांपैकीं ठाकूर लोकांची ही लिपि असल्यामुळें तिला ठाकरी, टाकरी असें नांव पडलें असावें. हिच्यांत स्वरचिन्हें मुळींच लिहीत नाहींत किंवा व्यंजनांच्या पुढे स्वर स्वतंत्रपणेंच लिहितात.

**टाकळ**—या झाडास संस्कृतमध्यें अग्निमंथ म्हणतात. टाकळींत लहान व मोठी, पांढरी व काळी अशा जाती आहेत. टाकळीचीं पानें कात्रेदार असून तीं नरवेलाच्या पानांहून लहान असतात. कोंकणपेक्षां देशावर ही झाडे फार होतात. काळ्या टाकळीच्या फळाचे तेल काढतात. आर्यवैद्यकांतील दशमुळांत हिचें मूळ असतें. पक्षघात, संधिवात, व सूज यांवर काळ्या टाकळीच्या मुळाचें तेल काढून लावतात.

**टाकळा** -हें एक जंगली झाड आहे. ह्यास लॅटिनमध्यें कॅसिआटोर, संस्कृतमध्यें चक्रमर्द म्हणतात. मराठींत याला तरोटा, सरवटा असेंहि म्हणतात. हें झाड शेताच्या ओसाड बांधावर अथवा परसांतील पडीत व ओसाड जागेंत पावसाळ्यांत पुष्कळ वाढलेलें आढळतें. त्याच्या पाल्याची भाजी करतात. ही औषधी आहे. वातानें अंग व सांधे दुखतात, त्यावर टाकळा गुणकारी आहे. तसेंच गजकर्ण, नायटे, इ. वर लावतात. ह्या झाडास मेथ्यासारखें बीं येतें. तें भाजून त्याची भुकटी कॉफी-प्रमाणें कित्येक लोक उपयोगांत आणितात. या बियांस 'इंडियन कॉफी' असेंहि म्हणतात. निळीबरोबर याच्या बियांचा रंगारी उपयोग करतात.

**टाकळी**—समर्थ रामदासस्वामींचा पहिला शिष्य जो उद्धव गोसावी, त्याच्या मठाचा व समाधीचा गांव. येथें समर्थांनीं १२ वर्षें पुरश्चरण केलें म्हणतात. हा गांव गोदावरीच्या काठीं नाशकापासून सुमारें १ कोसावर आहे.

**टांकसाळ**— ज्या ठिकाणीं राष्ट्राचीं प्रमाणयुक्त नाणीं पाडलीं जातात तो कारखाना. नाणीं अनेक धातूंचीं असतात. ज्या धातूचीं नाणीं पाडावयाचीं असतात ती धातु लगडीच्या रूपानें टांकसाळींत आणून तिची नीट परख करतात. नंतर ती वितळण्यासाठीं पाठवितात. या वेळीं ठराविक प्रमाणांत दुसरी धातु थोडी मिसळण्यांत येते. एकाच दर्जाचा रंग व सुबकपणा राहावा व नाणें लवकर झिजूं नये यासाठीं किंवा नाण्यांतील मूळ धातूची किंमत कमी करण्यासाठीं दुसऱ्या धातूची भेसळ करतात. २२ भाग सोनें व २ भाग तांबें अशा प्रमाणांत ही भेसळ सोन्याच्या नाण्यांत होते. वितळविण्याची क्रिया झाल्यानंतर कांबी पाडतात व थोडी उष्णता देऊन लागेल तो आकार आणतात. नंतर कांबीचे तुकडे पाडतात व स्वच्छ करून या तुकड्यांवर छाप मारतात. शेवटीं वजन करण्यांत येतें. वजन बरोबर भरावें लागतें. पुन्हां नाणकपरीक्षक सर्व प्रकारची तपासणी करतो. एवढें झाल्यानंतर त्याला नाणें म्हणून किंमत येते.

हिंदुस्थान--हिंदुस्थानांत नाणीं फार प्राचीन काळापासून माहीत आहेत व अशोककालापासूनचीं नाणीं उपलब्ध आहेत. पण टांकसाळीबद्दल जुनी माहिती सविस्तर मिळत नाहीं. नाण्यांना गांवांवरून नांवें पडलेलीं असल्यामुळें त्या त्या गांवीं टांकसाळी होत्या हें दिसून येतें. शिवाजीच्या कांहीं होनांना कावेरीपाकी, गुत्ती, धारवाडी, गंजीकोटी, अदवाणी, चंदावरी, वेरुळी, देवनहळ्ळी अशीं नांवें आढळतात ( नाणकशास्त्र पहा ).

शिवाजीच्या वेळेस रायगड या राजधानीच्या ठिकाणीं त्याची टांकसाळ होती. संभाजी व राजाराम यांच्या धामधुमीच्या कारकीर्दीत नाणें पाडण्यासंबंधानें काय व्यवस्था होती याची माहिती मिळत नाहीं. राजारामानें चंदीस तक्त नेलें, त्या वेळीं त्यानें तेथें अठरा कारखाने सुरू केले होते. शिवाजीच्या वेळचीं सर्व वर्षासनें होनांत असत. शाहूनें साताऱ्यास टांकसाळ सुरू करून आपल्या नांवानें नाणें पाडण्यास सुरुवात केली. 'शाहू शिक्का' म्हणून जे रुपये व पैसे निघाले ते शाहूच्या कारकीर्दीतले होत. साताऱ्याप्रमाणें कोल्हापुरासहि टांकसाळ सुरू झाली. कोल्हापूर ही राजधानी होण्यापूर्वी ( १७८८ ) पन्हाळा येथें टांकसाळ होती. या टांकसाळीमध्यें शंभुशिक्का किंवा शंभुपीरखानी पन्हाळी रुपये निघत असत. शंभु या हिंदु नांवाजवळ मुसलमानी पीरखानाचें नांव

कां आलें तें समजत नाहीं. कोल्हापुरास इतर कोणत्याहि राजाच्या कारकीर्दीमध्यें शंभुशिक्क्याखेरीज निरनिराळया शिक्क्यांचीं नाणीं पाडल्याचें दिसत नाहीं.

सातारा येथें शाहूच्या कारकीर्दीमध्यें भिकाजी नाईक रास्ते, परशुराम नाईक, अनगळप्रभृति नामांकित सावकार होते. त्यांच्याकडून छत्रपति कर्ज घेत असत, व त्यांच्या पेढीस सरकारी टांकशाळेंतून रुपये पाडून देत असत. मराठी राज्याचा जसजसा विस्तार होत गेला, तसतशा निरनिराळया ठिकाणीं टांकसाळी होऊं लागल्या. नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दीमध्यें नाणीं पाडण्याबद्दल ठिकठिकाणच्या सावकारांस व इतर लोकांस परवानगी देण्यांत आली.

धारवाड येथें सन १७५३ मध्यें जी टांकसाळ प्रथम संस्थापित झाली ती याच पेशव्यांच्या कारकीर्दीमध्यें झाली. त्याचप्रमाणें बागलकोट येथें विजापूरच्या बादशहांच्या अमदानींत जी टांकसाळ चालत होती ती ह्याच पेशव्यानें पुन्हां सुरू केली.

थोरल्या माधवराव पेशव्याच्या कारकीर्दीतहि पुष्कळ टांकसाळी सुरू झाल्या. नाशिक येथें सन १७६५ मध्यें लक्ष्मण अप्पाजी याच्या देखरेखीखालीं व सन १७७२ मध्यें चांदवड येथें तुकोजी होळकर याच्या विद्यमानें एक टांकसाळ सुरू झाली. सवाई माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दींत सन १७८२ मध्यें कोंकण प्रांतांत दुल्लभशेट गोविंदजी व गोविंद पांडुरंग यांस नाणीं पाडण्याबद्दल परवानगी मिळाली.

मराठ्यांची राजसत्ता जसजशी वाढत चालली तसतशा नाणीं पाडण्याकरितां अनेक सरदारांच्या व जहागीरदारांच्या विद्यमानें सर्व प्रांतांमध्यें टांकसाळी सुरू झाल्या. शिंदे व होळकर यांच्या उज्जनी व इंदूर येथें टांकसाळी होत्या. त्यांशिवाय माळव्यामध्यें भोपाळ, प्रतापगड, भिलसा, गंजबासोडा, सिरोंज आणि कोटा येथें वेगवेगळया टांकसाळी होत्या. नागपूर येथें भोंसल्यांची एक मोठी टांकसाळ होती. भडोच शिंद्यांकडे आल्यानंतर तेथें त्यांनीं टांकसाळ सुरू केली. त्याशिवाय शिंद्यांच्या कांहीं टांकसाळी खानदेशामध्यें होत्या; तेव्हां बऱ्हाणपुरी रुपये पाडीत असत. होळकरांची वाफगांवीं टांकसाळ होती. तेथील रुपयांस वाफगांवी असें नांव असे. पेशवाईच्या अखेर प्रत्येक सरदारानें निरनिराळया ठिकाणीं टांकसाळी सुरू करण्याचा प्रयत्न केला होता. टांकसाळीबद्दलची सरकारपट्टी दिली म्हणजे वाटेल त्यास परवानगी मिळत असे. आंग्र्यांची टांकसाळ कुलाब्यास होती. तेथें श्रीशिक्का रुपये पाडीत असत. जंजिऱ्यास जंजिऱ्याच्या हबशांची टांकसाळ होती. तेथें हबसाणी अथवा निशाणी रुपये निघत. त्यांवर 'ज' हें अक्षर असें. तें जंजिरा या शब्दाचें द्योतक होतें. कर्नाटकामध्यें प्रत्येक प्रमुख ठिकाणच्या देसायाची व जहागीरदाराची टांकसाळ होती. ह्या सर्व टांकसाळींबद्दल पेशवे सरकारास कांहीं नियमित पट्टी मिळे. कर्नाटकांतील टांकसाळीमध्यें खोटें नाणें फार पडूं लागल्यामुळें, पेशव्यांनीं सन १७६५ मध्यें धारवाड येथें पांडुरंग मुरार याच्या देखरेखीखालीं सरकारी टांकसाळ सुरू करून, कर्नाटकांतील इतर टांकसाळी बंद करण्याबद्दल हुकूम फर्माविले.

नाणीं पाडण्याचा एकमेव अधिकार सध्यां सरकारचा समजला जातो. परंतु मराठेशाहींत नाणीं पाडण्याचा अधिकार लोकांना दिलेला होता. अथवा लोक आपआपल्या व्यवहाराकरितां नाणीं पाडूं लागले. सरकारला लोकांकडून हें काम आपल्या एकट्याच्या हातीं ठेवण्याची आवश्यकता वाटली नाहीं. नाइलाजास्तव नियंत्रण घालावें लागलें हे निराळें. ह्याचा परिणाम म्हणजे देशांत असंख्य चलनें प्रचारांत असत. उदाहरणार्थ, पुढील नांवें पाहा—

चलनें—रहिमतपुरी, मलकापुरी, चांदवडी, मिरजी, आरकाटी, चिंचवडी, हुकेरी, बागलकोटी, गजापुरी, तळेगांवी, भडोची, सुरती, पन्हाळी, चतरासिंगी, नीलकंठी, सारोली, बहुती, गंजीकोटी, फुलचेरी, दौलताबादी, बेलापुरी, बडोदी, भातवडी, इटावी, बावडी, पनाळी, अंकुशी, एकबुंदकी, त्रिशुळी, फरशी, नागाचे, तुऱ्याचे, पंचमेळ, मिठे, पोतेचाल, वसईचाल (चांदवड), कल्याणचाल (मिठे), वार्इशिक्का, हालीशिक्का, काशीशिक्का, सीद्री शिक्का, साहुशिक्का, दिल्लीशिक्का, अटींचे, भुंडे, अलमगिरी, मल्हारशाही, महमदशाही, पेठ चलनी, बाजार चलनी, कोंकण चलनी (चिंचवड), सरकार चलनी, दाणे चलनी, पुणें चलनी, इ. इ. वरील चलनांतील कांहीं चलनांचीं नांवें ज्या गांवांत तें चलन पाडीत त्या गांवांवरून पडलीं आहेत. कांहीं नांवें नाण्यांवरील मुद्रांवरून त्या नाण्यांना मिळालीं आहेत. ज्या राजांनीं नाणें सुरू केलें त्यांच्या नांवावरून कित्येक चलनें ओळखलीं जातात. मिठे म्हणजे चांगलें असें समजतात. बाजार चलनी म्हणजे बाजारांत चालणारें. बाजार चलनी व पेठ चलनी ह्यांत भेद नसावा. तुरा ज्याच्यावर आहे तो तुऱ्याचा रुपया. सरकार चलनी तुऱ्याचे ह्याचा अर्थ सरकारनें मान्यता दिलेले तुऱ्याचे रुपये. दाणे बाजारांत चालणारा तो दाणे चलनी रुपया. एका नांवचे रुपये असले तरी ते निरनिराळया ठिकाणीं पाडीत असून त्यांच्या धातूंत कमी-अधिक प्रमाण असावें; म्हणून चिंचवड छापाचाच रुपया पण कोंकणांत चालणारा तो चिंचवड कोंकण चलनी समजावयाचा. वसई चाल, कल्याण चाल, पुणें चाल ह्यासंबंधानेंहि असेंच विधान करतां येईल. सिमी आणि ग्वाल्हेरी एकच नाणें असें म्हणतात. पोते चाल म्हणजे सरकार तिजोरींत स्वीकारला जाईल तो रुपया. पेशवे सरकारनें नाण्यांतील धातूंचे

प्रमाण ठरविलें होतें. त्याप्रमाणें जें नाणें असेल तें सर्व पोतेचाल. छापी सुलाखी म्हणजे भोंक पाडलेले रुपये. माळ करण्याकरितां भोंकें पाडण्याचा प्रघात पडला असावा; अथवा नाण्याचा खरे-पणा पाहण्यासाठीं भोंक पाडीत असें मोल्स्वर्थ म्हणतो. छापी म्हणजे छाप उठलेला रुपया असाहि अर्थ केलेला आहे. आरकट, फुलचरी, गंजीकोट, आरकटगंजीकोट, आरकट फुलचरी. ह्यांपैकीं अर्कॉट येथें इंग्लिशांची टांकसाळ होती आणि आरकट हें इंग्रजांचें नाणें होतें. त्याचप्रमाणें फुलचरी म्हणजे पॉडिचरी हें फ्रेंच नाणें होतें. गंजीकोटचें नाणें हें दिल्ली शिक्क्याप्रमाणें प्रमाणभूत मानलें जात असे, असें दिसतें. गंजीकोटाचें पूर्वींचें नांव गंडीकोट असून तेथें रुपये पाडीत. प्रत्येक जातीच्या चलनाचीं पोटनाणीं होतीं. पैसा, पावल्या, व अधेल्या असत. पैसा अर्थात् तांब्याचा असे. रुक्का हिशेबांत होता, पण नाणें नव्हतें. दोन आणे व आणा या किंमतीच्या नाण्यांचा उल्लेख नाहीं. परंतु अशीं नाणीं मुसलमान व हिंदू राजे पाडीत असत. दोन पैशांचें नाणें होतेंच पण अर्ध्या पैशाचें व पाव पैशाचेंहि होतें. इंग्लिश राज्यांतील पै ही रुक्क्याचेंच अनुकरण होतें. नाणकशास्त्र पाहा.

हिंदुस्थानांतल्या युरोपियन व्यापारी कंपन्या आपल्या टांक-साळींतून-पण त्या प्रदेशांत चालणारीं-नाणीं पाडीत. मोंगली नाणीं इंग्रज आपल्या टांकसाळींत पाडून तीं निर्धोक प्रचारांत आणीत. ही गोष्ट गैर आहे हें मोंगली बादशहांना कळूनहि बंद करतां आली नाहीं. आपला मान राखण्यासाठीं उलट फर्मान काढून संमति द्यावी लागली. इंग्रजांची टांकसाळ सुरतेस होती. सुरती रुपया प्रसिद्ध आहे. पुढे मुंबईलाच एके ठिकाणीं इंग्रज सरकारनें टांकसाळ ठेविली.

**टाँकिंग**—फ्रेंच इंडो-चायनामधील एक विभाग. टाँकिंग हें एक फ्रान्सचें संरक्षित राज्य आहे. क्षे. फ. ४०,५३० चौ. मै.. लो. सं. (१९४०) ९२,६४,३०९ असून त्यांपैकीं सुमारें १२,००० युरोपियन आहेत. बहुतेक वस्ती आनामी लोकांची आहे. येथील हवा युरोपियनांस मानवेल अशीच आहे.

तांदूळ, कॉफी, तंबाखू, रॅमी, कागदी झाड, कापूस, ताग, ऊंस, वगैरेची लागवड संस्थानांत होते. अलीकडे रेशमी किड्यांच्या संगोपनाच्या धंद्याला बरेंच महत्त्व येऊं लागलें आहे. सोनें, तांबें, जस्त, शिसें, वगैरे धातूंच्या खाणी आढळतात. या प्रदेशांत कागद-कारखान्यास विशेष महत्त्व आहे. हाँगकाँग व युन्नान यांमधील टाँकिंगच्या मार्गानें चालणारा देवघेवीचा व्यापार फार महत्त्वाचा आहे. हा व्यापार प्रायः चिनी लोकांच्या हातीं आहे. येथील नदी साँग-कोई फार महत्त्वाची असून तीवरूनच मालाची ने-आण होते. हैफाँग हें मुख्य बंदर आहे.

टाँकिंगचे २३ जिल्हे आहेत. हनोई हें राजधानीचें शहर आहे. फ्रेंच सरकारास जबाबदार असा सर्व संस्थानावर एक वरिष्ठ अधिकारी व राजप्रतिनिधि आहे. याला 'रेसिडेंट सुपीरिअर' असें म्हणतात. आनामप्रमाणेंच एकंदर राज्यपद्धति आहे. रेसिडेंट सुपीरियर हनोई येथें असतो. हनोई येथें फौजदारी व अपील कोर्ट आहे.

हें राज्य १८८४ सालीं फ्रेंचांच्या संरक्षणाखालीं आलें. हा पूर्वीं आनामचाच एक प्रांत होता.

**टाकी**—(अशरूर). इ. स. ६३३ मध्यें ही टाकीची (पंजाबची) राजधानी होती. लाहोर आणि पिंडी भाटीआन यांमधील मोठ्या रस्त्याच्या दक्षिणेस २ मैलांवर हें गांव आहे. अगदीं खेडें आहे. यास पूर्वीं उद किंवा उदनगर म्हणत असत. पुढे अकबराच्या वेळीं उगरशहानें येथे एक मशीद बांधिली. येथें १८ इंच लांब, १० इंच रुंद व तीन इंच जाड एवढाल्या विटा प्राचीन उत्खननांत पुष्कळ सांपडल्या. येथें इंडोसिथियन राजांचीं नाणींहि सांपडतात; यांवरून हें फार प्राचीन शहर असावें.

**टाँगपेंग**—ब्रह्मदेश, उत्तर शान संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षे. फ. ७७८ चौ. मै. आहे. येथील मुख्य धंदा म्हणजे चहाची लागवड व चहाचे कारखाने हा होय. कांहीं ठिकाणीं 'ली' जातीच्या तांदुळाचें पीक काढतात.

**टांगानिका**—१. ब्रिटिश पूर्व आफ्रिका, टांगानिका सरो-वराच्या पूर्वेचा मध्यपूर्व आफ्रिकेंतला प्रदेश. क्षेत्रफळ ३,६०,००० चौरस मैल. हा पूर्वीं जर्मनीच्या ताब्यांत होता. आतां ब्रिटिश मॅंडेट-खालीं आहे. आफ्रिकेंतील सर्वांत उंच शिखर किलिमांजारो (१,९,७२० फूट उंच) हें एक मृत ज्वालामुखीचें तोंड होय. ते याच प्रांतांत आहे. मौल्यवान् इमारती झाडें पुष्कळ आहेत. जमीन सुपीक आहे. मूळचे रहिवासी लोक जनावरें बाळगतात. युरोपियन लोकांचे कॉफीचे मळे आहेत. खोबरें, भुईमूग व कापूस यांची निर्यात मोठी आहे. दार-ए-सालेम हें मुख्य ठिकाण आहे. सोनें, कोळसा, वगैरे खनिज संपत्तिहि निघते. लो. सं. ५२,३१,९८३ असून त्यांपैकीं युरोपियन सु. सोळा हजार आहेत. आशियांतील लोक सु. ४६,००० आहेत. देश्य लोकांत शंभराच्या वर जाती आहेत. प्रत्येकीची भाषा निराळी व चालीरीती निराळ्या.

२. मध्य आफ्रिकेंतील एक सरोवर. हें आल्बर्ट सरोवराच्या दक्षिणेस आहे. याची लांबी ४२० मैल, साधारण रुंदी ३० मैल व खोली ४,७०८ फूट आहे. यावरील किगोमा नांवाच्या एका बंदराला दार-ए-सालेमहून आगगाडी जाते. १८५८ त या सरोवराचा शोध लागला.

**टागोर, अवनींद्रनाथ** ( १८७१- )—एक बंगाली चित्रकार. हे रवींद्रनाथ टागोर यांचे चुलते असून संगीत, लेखन, व चित्रकला या विषयांकडे पहिल्यापासूनच यांचा ओढा होता व वयाच्या एकोणतिसाव्या वर्षापर्यंत संगीताची साधना केल्यानंतर पाश्चात्य चित्रकलेकडे यांचें लक्ष वळलें. याच कालांत मि. हॅवेल यांच्या साहाय्यानें प्राच्य चित्रकलेचा यांनीं अभ्यास केला. मि. पामर व इटालियन चित्रकार सिनॉर गिलार्डी हे यांचे चित्रकलेंतील गुरु होत.

सन १९०१ मध्यें दिल्लीच्या चित्रकला-प्रदर्शनांत ठेवलेल्या यांच्या 'ताजमहाल' या चित्रास रौप्य-पदक मिळालें व सबंध जगभर तें वाखाणलें गेलें. यांखरीज 'महाभिनिष्क्रमण', 'सागरकन्यका', 'चांदण्यांतील वाद्यवादनें', 'राणी' हीं यांचीं चित्रें यांच्या कलानैपुण्याची साक्ष देतात. यांनीं प्राच्य खंडांतील चित्रांच्या विविध वळणांचें मिश्रण करून एक निराळेंच वळण तयार केले.

सुरेंद्रनाथ गांगुली, समरेंद्रनाथ गुप्त, ईश्वरीप्रसाद वर्मा, नंदलाल घोस, वगैरे सुप्रसिद्ध कलावंत यांच्याच शिष्यपरंपरेंतील होत.

**टागोर, देवेन्द्रनाथ** ( १८१८-१९०५ )—राममोहनराय यांच्या पश्चात् ब्राह्मो समाजाने दुसरे प्रसिद्ध समाजप्रवर्तक देवेन्द्रनाथ होत. यांचें घराणें नांवाला मात्र ब्राह्मण; परंतु जुन्या हिंदु समाजापासून च्युत झालेलें होतें. टागोर हें आजचें आडनांव ठाकूर या नांवाचा अपभ्रंश होय. देवेन्द्रनाथांचें शिक्षण हिंदु कॉलेजांत झालें. व त्या ठिकाणीं अज्ञेयवादाचा त्यांच्या मनावर संस्कार झाला. त्यांचें घराणें बरेंच श्रीमंत असल्यामुळें चैन, विलास यांची तरुण देवेन्द्रास कधींच कमतरता पडली नाहीं. विशीच्या सुमारास एका कौटुंबिक आपत्तीमुळें देवेन्द्रबाबूस अत्यंत दुःख झालें व ऐहिक सुखाची नश्वरता मनाला पटून ईश्वरी प्रेमाची त्यांच्या अंतःकरणांत आवड उत्पन्न झाली. १८३९ सालीं देवेन्द्र-बाबूंनीं 'तत्त्वबोधिनी सभा' स्थापन केली. या संस्थेचा उद्देश ब्राह्मधर्माचा प्रसार करावा असा होता. १८४२ मध्यें देवेन्द्रनाथ ब्राह्मो समाजाचे अनुयायी झाले व त्यांनीं समाजांत अभिनव चैतन्य उत्पन्न केलें. १८४३ मध्यें 'तत्त्वबोधिनी सभे' त त्यांनीं 'ब्राह्मकरार' सुरू केला, व 'तत्त्वबोधिनीपत्रिका' नांवाचें एक मासिकहि चालू करण्यांत आलें. १८५० सालीं देवेन्द्रांनीं 'ब्राह्म धर्म' नामक एक ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथाच्या पूर्वार्धांत जगन्नियंत्याचें गुणवर्णन केलेलें असून, उत्तरार्धांत नैतिक तत्त्वें ग्रथित केलीं आहेत. हिंदु धर्म व शास्त्रें यांबद्दल देवेन्द्रनाथांस फार आदर वाटत असे; मूर्तिपूजा मात्र त्यांना मान्य नव्हती. केशव-चंद्र सेनानें नवीन पंथ काढल्यावर देवेन्द्रांच्या पंथाला 'आदि-



ब्राह्मो समाज' असें नांव पडलें. देवेन्द्रबाबूंचा स्वभाव अत्यंत प्रेमळ व परोपकारी असून त्यांची काव्यरचनाहि चांगल्या प्रकारची होती. देवेन्द्रनाथ मोठे विद्वान् व श्रीमंत असून त्यांनीं युरोपांत प्रवासहि केला होता. यांचे एक चिरंजीव प्रख्यात तत्त्वज्ञानी कवि रवीन्द्रनाथ टागोर होत.

**टागोर, डॉ. रवीन्द्रनाथ** ( १८६१-१९४१ )—एक जग-द्विख्यात कवि. वडील देवेन्द्रनाथ ( पाहा ). प्रथम यांचें शिक्षण

खासगी रीतीनें झालें. नंतर १८७७ त इंग्लंडला गेले व कांहीं कॉलेज-शिक्षण घेतलें. वयाच्या चोविसाव्या वर्षी हे आपल्या वडिलार्जित मिळकतीच्या गांवीं राहावयास गेले. १९१२ मध्यें यांनीं पुन्हां इंग्लंडचा प्रवास केला, व आपल्या कांहीं बंगाली ग्रंथांचें इंग्रजींत भाषांतर केलें. १९१३ सालीं यांस 'गीतांजलि' काव्याबद्दल वाङ्मयाचें नोबेल पारितोषिक मिळालें. यांनीं सर्व जगभर प्रवास केला. यांस सरकारकडून सर हा किताब मिळाला होता. परंतु जालियनवाला बाग येथील कत्तलीचा निषेध म्हणून तो त्यांनीं सर-कारकडे परत पाठविला ( १९१९ ). हे अमेरिकेंत प्रवास करीत असतां कानडामधून त्यांस आमंत्रण आलें, तेव्हां त्यांनीं आपल्या देशबांधवांस ज्या देशांत मज्जाव आहे त्या देशांत जाण्याचें नाकारलें. यांची ग्रंथरचना फार मोठी आहे. यांच्या गीतांजलीचीं भाषांतरें-रूपांतरें कित्येक झालीं आहेत.

यांनीं 'शांतिनिकेतन' व 'विश्वभारती' या नवीन पद्धतीच्या सांस्कृतिक व शैक्षणिक संस्था स्थापन केल्या. त्यांत जागतिक लौकिकाचे पंडित येऊन राहून जातात.

यांनीं बंगाली वाङ्मयांत अत्यंत मोठी भर घातली आहे. सुमारें ३,००० कविता, ५० निबंध, ३८ नाटकें, ३५ राजकारणी ग्रंथ, १९ कथासंग्रह यांसारखें विविध साहित्य यांनीं निर्माण केलें.

यांपैकीं कांहींचीं निरनिराळ्या भाषांतून भाषांतरें झालीं आहेत. यांना चित्रकलाहि चांगली अवगत होती.

रवीन्द्रनाथ हे हिंदुस्थानचेच नव्हे तर जगाचे एक महान् तत्त्वज्ञानी कवि होते. व्यावहारिक विषयाला आध्यात्मिक अस्तर लावून विशेष प्रकारचें गूढगुंजन करण्याकडे यांची प्रवृत्ति फार. त्यांनीं व्यवहारांतील गोष्टींनाच रहस्यमय सौंदर्य चढवून अध्यात्माची गोडी वाचकांना लावून दिली. गूढ शक्ति म्हणून कांहीं आहे याचा आभास ते आपल्या लेखनांत करून देतात व ईश्वरभक्तीकडे नकळत नेतात. जडवादी पाश्चात्य लोकांना त्यांनीं आस्तिकवाद शिकविला व मानवी समतेचें तत्त्व पटवून दिलें. आधुनिक काळांतील एक प्रेषित म्हणून त्यांना मान मिळे. प्राच्य आणि पाश्चात्य संस्कृती एकत्र झाल्या तरच जगाचा उद्धार होईल, हा मंत्र त्यांनीं दिला. त्यासाठीं विश्वभारती विद्यापीठाची स्थापना केली.

राजकारणांत ते राष्ट्रीय पक्षाचे असत. त्यांचा म. गांधींना पाठिंबा असे. 'जन-गण-मन अधिनायक' हें त्यांचें बंगाली भाषेंतील राष्ट्रगीत स्वतंत्र हिंदी संघराज्याचें राष्ट्रगीत झालें आहे.

**टागोर, राजा सौरेन्द्र मोहन**—एक हिंदी संगीतशास्त्रज्ञ. यांचा जन्म १८४० सालीं झाला. वयाच्या चौदाव्या वर्षी सौरेन्द्रांनीं इतिहास-भूगोलावर एक पुस्तक लिहिलें व बंगालींत एक नाटकहि प्रसिद्ध केलें. सोळाव्या वर्षी हिंदी गायनकलेच्या अभ्यासास सुरुवात करून सौरेन्द्रांनीं मोठा लौकिक मिळवला. त्यांनीं देशी आणि पाश्चात्य ग्रंथांचें अध्ययन करून संगीतशास्त्रात बरीच प्रगति केली. सौरेन्द्रांच्या 'संगीतसार' नामक पुस्तकाची बंगालमध्यें प्रसिद्धि आहे. १८७१ साली त्यांनीं चित्तपुर रोड, कलकत्ता, येथें संगीतशास्त्र व कला यांचें शिक्षण देणारी एक संस्था काढली. १८७५ मध्ये त्यांस फिलाडेल्फिया विद्यापीठाकडून 'डॉक्टर ऑफ म्यूझिक' अशी पदवी मिळाली. १८८० मध्यें व्हॉइसराय लॉर्ड लिटन यांनीं त्यांस राजा असा किताब दिला. सौरेन्द्र राजांनीं इंग्रजींत व बंगालींत गायनकलेवर अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत.

**टांचणी**—टांचण्यांचा उपयोग मनुष्यास कांस्य युगापासून माहीत होता व त्या काळींहि टांचण्या बनविण्यांत येत होत्या. सध्यां प्रचारांत असलेल्या टांचण्या पंधराव्या शतकापासून उपयोगांत आल्या. फ्रान्समध्यें या प्रथम तयार होऊं लागल्या. आतां तारेपासून यंत्रांनीं टांचण्या केल्या जातात व त्या कागदावर ओळीनें टोंचण्याचें कामहि यंत्रांकडूनच केलें जातें. एका मिनिटाला सुमारें १६० टांचण्या यंत्रांतून बाहेर पडतात.

**टाटा, जमशेटजी नसरवानजी** (१८३९-१९०४)—एक हिंदी कारखानदार, यांचा जन्म १८३९ सालीं, नवसरी येथें एका मध्यम स्थितीच्या घराण्यांत झाला. लहानपणापासून टाटांच्या अंगीं चिकाटी आणि दृढनिश्चय हे गुण प्रामुख्यानें दिसून येत. मुंबईस १८५८ पर्यंत एल्फिन्स्टन इन्स्टिटयूशनमध्यें टाटांनीं शिक्षण संपादिलें. जमशेटजीचा बाप चीनशीं अफूचा व्यापार करीत असे. व्यापार धंद्यांतील लहानसहान गोष्टींचें ज्ञान व्हावें या हेतूनें टाटांनीं आपल्या बापाच्या धंद्यांमध्यें कांहीं काळ काम केलें. याच सुमारास, टाटा हाँगकाँग शहरीं गेलें व चीनशीं व्यापार करण्यास लागणारें अवश्य ज्ञान त्यांनीं मिळविलें.

या वेळीं टाटा कापसाचा व्यापार करीत असून मेसर्स प्रेमचंद रायचंद यांच्याशीं टाटांचा व्यापारी नात्यानें चांगला जम बसला होता. पुढें यंत्रकलेचें संपूर्ण ज्ञान मिळविण्याकरितां जमशेटजी मँचेस्टर येथें जाऊन आले. परत आल्यावर १८७७ सालीं त्यांनीं नागपूर येथें 'एम्प्रेस मिल' उघडली.

या एम्प्रेस मिलला अपूर्व यश मिळालें. तेव्हां लोंकर विणण्याचा कारखाना त्यांनीं काढला. त्याला त्यांनीं 'स्वदेशी मिल' हें नांव दिलें. याच सुमारास मुंबई इलाख्यांतील सर्वांत मोठ्या गिरण्यांपैकीं एक 'धरमसी मिल' त्यांनीं विकत घेतली. या गिरणीचा कारभार सुरळीत चालण्यास अनेक अडचणी आल्या. पण त्यांना धैर्यानें तोंड देऊन यश संपादन केलें.

१८९५ साल हें टाटाच्या वाढत्या उद्योग-धंद्यांत अतिशय भरभराटीचें गेलें. याच वेळेस हिंदी उमेदवारांना आय्. सी. एस्. च्या परीक्षेस बसतां यावे म्हणून यांनीं बरीच खटपट केली व गरीब विद्यार्थ्यांच्या साहाय्यार्थ एक निधि जमा केला.

हिंदुस्थानांतील खाणींतून निघालेलें लोखंड देशांतल्या देशांत वितळवून, त्यापासून पोलाद करतां यावें अशी योजना टाटांच्या मनांत आली व ती त्यांनीं आपल्या नेहमींच्या धिमेपणानें व चिकाटीनें यशस्वी करून दाखविली. पुढें या कारखान्याची फारच मोठी वाढ झाली व जमशेटजींच्या साकची येथील लोखंडी कारखान्यावरून त्या गांवालाच 'जमशेटपूर' हें नांव १९१८ सालीं देण्यांत आलें.

सह्याद्रि पर्वतावर पडणाऱ्या पावसाच्या पाण्याच्या ओघापासून वीज उत्पन्न करण्याची कल्पना मि. डेव्हिड गॉस्लीम नांवाच्या एका इंजिनियरनें सुचविली होती. ती कल्पना मूर्त स्वरूपास पुढें १९१० मध्यें आली.

आपल्या आगळी योजनांना मूर्त स्वरूप आलेलें पाहण्यास टाटा जगले नाहींत.

टाटा यांना त्यांच्या अंगीकृत कार्यांत जें अलौकिक यश मिळालें त्याचें कारण नुसतें भरपूर भांडवल हें नसून टाटांच्या अंगीं असलेलें धैर्य, चिकाटी, उद्योगप्रियता, दृढनिश्चय, वगैरे सद्गुण होत. हिंदुस्थानांतील आधुनिक उद्योगधंद्यांचें ते आद्य जनक होत. टाटा कंपनीचे हिंदुस्थानांत आज अनेक उद्योगधंदे आहेत.

**टाटा, सर दोराबजी जमशेटजी** ( १८५९–१९३२ )—मुंबईचे जगप्रसिद्ध व्यापारी, यशस्वी कारखानदार व दानशूर गृहस्थ. जमशेटजी टाटा यांचे हे चिरंजीव होत. वयाच्या सोळाव्या वर्षी हे शिक्षणासाठीं युरोपला गेले व तेथून चार वर्षांनीं परत आल्यावर मुंबईच्या सेंट झेवियर कॉलेजमधून बी. ए. झाले. यानंतर वडिलांच्या कापसाच्या धंद्यांत यांनीं लक्ष घातलें व अगदीं थोडक्या अवधींत जगांतील एक यशस्वी बडे व्यापारी म्हणून हे ओळखले जाऊं लागले. कापसाच्या धंद्याखेरीज टाटा आयर्न ॲण्ड स्टील वर्क्स, लि. जमशेटपूर, हा प्रचंड लोखंड-पोलादाचा कारखाना त्यांनीं उघडला. तसेंच टाटा हायड्रो–इलेक्ट्रिक कंपनीज, लोणावळा, या कारखान्याचा पाया घातला. १९११ सालीं बंगळूर येथें एक शास्त्रीय संशोधनसंस्था काढण्यासाठीं हिंदुस्थान सरकारजवळ ३० लक्ष रुपये दिले. उद्योगधंद्यांना शास्त्रीय संशोधनाचें साहाय्य देण्याचा उद्देश या संस्थेचा आहे. व्यापार व उद्योगधंदे यांत मिळवलेल्या द्रव्याचा बराचसा भाग यांनीं निरनिराळ्या उपयुक्त संस्थांना द्रव्यसाहाय्य करण्यांत खर्च केला.

**टाटा, सर रतन** (१८७१–१९१८)—हे जमशेटजी टाटांचे दुसरे चिरंजीव होत. यांचें शिक्षण मुंबईस झेवियर कॉलेजामध्यें झालें. नंतर त्यांनीं आपल्या वडिलांच्या धंद्यांत प्रवेश केला. १९०५ सालीं रतनजी यांनीं शास्त्रीय व वैद्यक विषयांत संशोधन करण्याकरितां एक संस्था स्थापन केली व १९१२ सालीं यांनीं साकची येथें, टाटा आयर्न ॲंड स्टील कंपनी स्थापन केली. तिची थोडक्याच काळांत फार भरभराट झाली. पण यांनीं हातीं घेतलेलें सर्वांत मोठें काम म्हणजे पश्चिम घाटांत पाण्याच्या जोरावर विद्युच्छक्ति निर्माण करून मुंबईस वीज पुरवणें ही होय. यामुळें मुंबईतील औद्योगिक उन्नतीला फार मदत झाली. इंग्लंडमध्यें यॉर्क हाउस येथें यांनीं एक टोलेजंग इमारत बांधविली व १९१२ सालीं ‘लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स’मध्यें समाजशास्त्र व आधिभौतिक शास्त्रें शिकविण्याचें स्वतंत्र खातें उघडण्याची त्यांनीं व्यवस्था केली. हे कॉर्नवाल येथें वारले.

**टॉड, कर्नल जेम्स** ( १७८२–१८३५ )— राजस्थानचा इंग्रज इतिहासकार. हा प्रथम बंगाल्याकडील इंग्रजी सैन्यांत इ. स. १७९९ त दाखल झाला. ह्यानें राजपुतान्यांतील अनेक राजघराण्यांचा बखरीवरून एक इतिहास लिहिला आहे; त्याचें नांव ‘ॲनल्स ॲन्ड ॲन्टिक्विटीज ऑफ राजस्तान’ असें असून तो इ. स. १८२९ त प्रथम प्रसिद्ध केला. टॉड हा राजपुतान्यांत इ. स. १८१८–१८२३ पर्यंत नोकरीवर होता. राजपुतान्यांत पोलिटिकल एजंट म्हणून जाण्यापूर्वी तो दौलतराव शिंद्याच्या दरबारीं असणाऱ्या इंग्रज रेसिडेंटाचा दुय्यम होता ( १८१२–१८१७ ). पेंढाऱ्यांच्या दंग्याच्या वेळीं यानें बरीच कामगिरी केली. यानें ‘ट्रॅव्हल्स इन वेस्टर्न इंडिया’ ( पश्चिम हिंदुस्थानांतील प्रवास ) नांवाचें दुसरें एक पुस्तक लिहिलें आहे.

**टॉडहंटर, आयझॅक** ( १८२०–१८८४ )—एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ. हेस्टिंग्ज येथें शिक्षण झाल्यावर पॅकहॅम येथील एका शाळेंत तो दुय्यम शिक्षकाचें काम करूं लागला व त्या वेळीं लंडनच्या युनिव्हर्सिटी–कॉलेजांतील रात्रीच्या शाळेंत तो शिकत असे. एम. ए. च्या परीक्षेंत त्याला सुवर्णपदक मिळालें. यानंतर तो केंब्रिज येथें सीनियर रँगलर होऊन कॉलेजांत शिकवूं लागला. १८६२ सालीं रॉयल सोसायटीचा फेलो व १८६५ सालीं लंडन येथील मॅथेमॅटिकल सोसायटीचा तो सभासद झाला. त्यानें बरेच गणिती ग्रंथ रचिले आहेत.

**टान्जीर**—आफ्रिका, मोरोक्कोमधील एक बंदर. हें जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीवर वसलें आहे. लो. सं. ५०,०००. समुद्रापासून टान्जीरचा देखावा फारच सुंदर दिसतो. टान्जीरमध्यें जवळजवळ कारखाने नाहींतच म्हटल्यास चालेल. बैल, मांस व अंडीं हे निर्गत व्यापाराचे मुख्य जिन्नस होत. बहुतेक सर्व व्यापार यहुदी लोकांच्या हातीं आहे. टान्जीरच्या उपसागरामुळें झालेलें बंदर फार विस्तृत व सबंध मोरोक्कोमध्यें उत्तम असें आहे. हवा समशीतोष्ण व निरोगी आहे.

युरोपच्या अत्यंत जवळचें हें बंदर असल्यामुळें युरोपीय सुधारणेचे परिणाम येथें उत्कृष्ट रीतीनें दृष्टीस पडतात. १८ व्या शतकाच्या अखेरीपासून हें परराज्यांतील वकिलांचें मुख्य ठिकाण बनलें आहे. शहर पाहण्यास येणाऱ्या लोकांच्या वाढत्या संख्येकरितां उत्तम तऱ्हेचीं उपाहारगृहें उघडण्यांत आलीं आहेत.

**टापिओका**—कसावा झाडाच्या मुळ्यांच्या सत्त्वापासून तयार केलेलें हें एक प्रकारचें पीठ असतें. हें ओलसर, दमट असतांना त्यास उष्णता देऊन तें तापलेल्या पत्र्यावर घालून वाळवितात. हें उकळत्या पाण्यांत घातलें असतां फुगून वाढतें व एक प्रकारचा चिकट चलकासारखा याचा पदार्थ तयार होतो. हें तवकिलाप्रमाणें खाण्याच्या पदार्थांत वापरतात.

**टाफिलेल्ट**—हें ओलवण ( ओएसिस ) साहारा वाळवंटांत फ्रेंच मोरोक्को प्रदेशांत फेजपासून दक्षिणेस सुमारें २००

मैलांवर आहे. या ओलवण प्रदेशांत पुष्कळ खेर्डी असून खजुराच्या पिकाबद्दल हा प्रदेश प्रसिद्ध आहे. टिम्बक्टूकडे जाणाऱ्या कारवान लोकांच्या मार्गावर हा ओलवण प्रदेश आहे. या प्रदेशाचा ताबा फ्रेंच लोकांनीं १९१६ साली घेतला. येथील मुख्य ठिकाण आबु आम् हें आहे.

**टॉफ्ट, विल्यम हॉवर्ड** ( १८५७–१९३० )— अमेरिकन सं. संस्थानांचा २७ वा अध्यक्ष. त्याचें शिक्षण येल येथें होऊन १८८० सालीं त्यानें वकिलीची सनद घेतली. नंतर कांहीं काळ वृत्तपत्रकार आणि खालच्या दर्जाच्या जागांवरचा अधिकारी अशा प्रकारची कामें केल्यावर त्याला फिलिपाइन्स बेटांत पाठवण्यांत आलें. १९०९ सालीं तो तेथला मुलकी गव्हर्नर झाला. १९०९ सालीं तो सं. संस्थानांचा अध्यक्ष झाला. १९१३ सालीं अध्यक्षाच्या जागेचीं ५ वर्षें भरल्यावर तो आपल्या जुन्या येल विद्यापीठांत कायद्यांचा प्राध्यापक झाला आणि १९२१ मध्यें वरिष्ठ कोर्टाचा मुख्य न्यायाधीश झाला.

**टायको ब्राहे** ( १५४५–१६०१ )— एक डॅनिश ज्योतिषशास्त्रज्ञ. प्रथम यानें कायद्याचा अभ्यास केला. पण १५६५ पासून ज्योतिषशास्त्राकडे याचें सर्व लक्ष वेधलें. पृथ्वीच्या सूर्य आणि ग्रह यांशीं असणाऱ्या संबंधाचा त्याचा सिद्धांत टॉलेमी आणि कोपर्निकस यांच्या सिद्धांताचा समन्वय करणारा आहे. त्याचे ज्योतिषविषयक ग्रंथ लॅटिन भाषेंत असून ते केप्लरनें प्रसिद्ध केले. व्यावहारिक ज्योतिषशास्त्रांत त्याची कामगिरी विशेष म्हणतां येईल. वेध घेण्यांतील त्याचें कौशल्य अप्रतिम होतें. धूमकेतूविषयीं त्याचे शोध, शर्मिष्ठा नक्षत्रासंबंधानें त्याचा अभ्यास व अक्षांश मोजण्याची त्याची रीत हीं नवीनच होतीं.

**टायबर**—इटली, लॅटिअम् प्रांतांतील जुनें शहर. या शहरांत हरक्युलीस व्हिक्टर याच्या देवळाचे अवशेष अद्याप आहेत. रोमन लोकांच्या काळांत टायबर हें एक रमणीय स्थान होतें.

लॅटिन लीग संघांत या शहराचा समावेश झाला होता. खि. पू. ९० या सालीं येथील लोकांना रोमन साम्राज्यांत प्रजेचे हक्क मिळाले. साम्राज्याच्या काळांत टायबर शहर चांगलें भरभराटीस आलें होतें. नार्सेसनें रोमवर हल्ला केला तेव्हां हें शहर लुटलें गेलें. परंतु इ. स. ५५७ सालीं नार्सेसनें हें पुनः वसविलें.

**टायबेरिअस**—पॅलेस्टाइन, एक गांव. हें गॅलिली समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे. येथें उन्हाळीं आहेत. हें हेराड अँटीपासनें एमाअस खेड्याजवळ नसविलें. जेरुसलेम पडल्यावर यहुदी लोक येथें येऊन राहिले. हें शहर इ. स. १६ व २२ च्या दरम्यान वसविलें असावें. टायबेरिअस बादशहाचें नांव यास दिलें आहे. येथें प्रसिद्ध सुफी पंथ स्थापन झाला. प्रसिद्ध शेख दाहिर एल् अमीर यानें १८ व्या शतकांत या शहराची तटबंदी केली. हें शहर फार घाणेरडें आहे. पण एका किल्ल्याचे व यहुदी मंदिराचे अवशेष प्रेक्षणीय आहेत. लो. सं. १२,१०४.

**टायर**—हें फोनीशियांतील प्रसिद्ध शहर होतें. हल्लीं हें शहर सुर या नांवानें ओळखलें जातें. रोमन लोकांच्या वेळीं शहराची फार भरभराट झाली होती. त्या वेळीं शहराची लो. सं.२५,००० होती. अरबांच्या वेळींहि या शहराला व येथील किल्ल्याला महत्त्व असे. इ. स. ११२४–१२९१ पर्यंत येथें क्रुसेडरांचें ठाणें असे. खिश्चन लोकांनी तें सोडल्यानंतर मुसलमानांनीं त्याचा नाश केला. स. १७६६ त तें मिटेनीला यानें घेतलें. तेव्हांपासून हल्लींचें शहर भरभराटींत आलें. लो. सं. ५,०००.

**टॉरस सामुद्रधुनी**— ही ऑस्ट्रेलिया आणि न्यूगिनी यांच्यामध्यें आहे. हिची रुंदी ८० मैल आहे. या सामुद्रधुनींत पुष्कळ बेटें व भूशिरें आणि उथळ समुद्र असल्यामुळें हा जलप्रदेश नाविक वाहतुकीला अडचणीचा आहे. येथें मोतीं, मोत्यांचे शिंपले व गोगलगायीसारखे प्राणी ( चिनी लोक खातात ते ) येथें सांपडतात.

**टारांटो**— इटली, लीस प्रांतांतील ( अॅपुलिआ ) बंदर. प्राचीन टारेंटम समुद्रसपाटीपासून ५६ फूट उंचीवर असलेल्या एका खडकाळ बेटावर हें बंदर आहे. मुख्य प्रार्थनामंदिरांत असलेल्या पदार्थसंग्रहालयांत पुष्कळ प्राचीन वस्तू आहेत. शिंपल्याची लागवड करण्याशिवाय ऑलिव्ह तेल शुद्ध करण्याचे व साबूचे कारखाने येथें आहेत. धान्य, मध आणि फळें हा येथील निर्यात माल होय. आरमारी शस्त्रागाराचें हें तिसरे महत्त्वाचें शहर आहे. येथील गोदीचे दोन भाग केले आहेत. मेरीपिकेलो हें जहाजें उभीं राहण्याचें ठिकाण आहे. मेरीपिकोलोच्या बाहेरच्या बाजूस असलेल्या रेल्वे स्टेशनच्या दक्षिणेस व्यापारी बंदर आहे. लो. सं. १,१७,७२२.

**टारिसेली, इव्हांजेलिस्टा** ( १६०८–१६४७ )—एक इटालियन गणिती व पदार्थविज्ञानी. बापाचा मृत्यु त्याच्या बालपणांतच झाला, पण त्याच्या चुलत्यानें त्याला शिक्षण दिलें व नंतर रोम येथील एका गणिताच्या प्रोफेसराच्या हाताखालीं शिकविण्यास पाठविलें. तेथें त्याने ग्यालिलिओचे ग्रंथ वाचले व त्या योगानें त्याला स्फूर्ति येऊन त्यानें एक पुस्तक लिहिलें. हें पुस्तक ग्यालिलिओनें पाहिलें व त्यानें टारिसेली यास फ्लॉरेन्स येथें आपल्याजवळ बोलावून घेतलें. तेथें त्यानें ग्यालिलिओच्या लेखकाचें काम तीन महिनेपर्यंत केलें. ग्यालिलिओच्या मरणानंतर त्याला फ्लॉरेन्स येथील अक्याडेमींत गणिताचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. १६४३ सालीं त्याने कांचेच्या नळींत पारा चुरुन ती नळी पारदपात्रांत उभी केली असतां पारदस्तंभाची उंची ठराविक

राहते व त्या स्तंभावर निर्वात स्थल असतें, असें त्यानें दाखवून दिलें. या निर्वात स्थलास 'टारिसेलीची पोकळी' असें नांव देण्यांत आलें आहे. यानें शुद्ध गणितांतहि कांहीं शोध लावले आहेत.

**टारो**— पॅसिफिक महासागरांतील बेटांवर उगवणारी एक पिठूळ वनस्पति. या वनस्पतीची निपज दर एकरीं पुष्कळच होते. एका एकरांत होणाऱ्या बटाट्यापासून जेवढा मैदा (स्टार्च) मिळतो, तेवढ्याच जागेतल्या टारोपासून चौपट मैदा मिळतो. हा मैदा माणसांनीं खाण्यासारखा असतो. हा मैदा हिमपद्धतीनें (फ्रीझिंग) दूरदेशीं पाठवावा लागतो.

**टॉर्पेडो**—पाणतीर पाहा.

**टॉर्पेडो मासा**—ही एक राय माशांच्या वर्गाची माशांची जात असून हे विजेचे धक्के देऊं शकतात. हे भू-मध्यसमुद्र, तांबडा समुद्र, अटलांटिक व पासिफिक महासागर यांत आढळतात. यांची लांबी चार फूट असून वजन ६० ते ७० पौंड असतें.

**टार्सस**— हें प्राचीन शहर सिलिसिआच्या सुपीक मैदानांत होतें. सिडनस नदी शहराच्या मध्यभागांतून वाहत होती. चांगलें बंदर, सुपीक प्रदेश, व टॉरस पर्वतावरून जाणाऱ्या रस्त्यावर मालकी, यामुळें या शहराचें महत्त्व होतें.

ख्रिस्ती धर्मांतील प्रेषित जो पॉल याचें हें जन्मस्थान. इ. स. पूर्वी मध्यें १०४ रोमन सत्तेखालचें एक अतिशय श्रीमान् व मोठें शहर होतें. अँटनीनें क्लिओपाट्राचें स्वागत याच ठिकाणीं केलें. या ठिकाणीं एक विश्वविद्यालय असून त्यांत ग्रीक तत्त्वज्ञान शिकविलें जाई.

टार्ससचें वैभव व्यापार, शांतता व सुराज्य यांवर अवलंबून असे. इ. स. ६६० च्या नंतर अरबांनीं सर्व सिलिसिआ काबीज केलें तेव्हांपासून एक शतकाहून अधिक वर्षें टार्ससला हीन दशा प्राप्त झाली होती. पुढें ७८७ सालीं हरून अल् रशीदनें तें पुनः बांधिलें व बायझन्टाइन साम्राज्याशीं झालेल्या युद्धांत याला वायव्येकडील राजधानीचें पद प्राप्त झालें.

येथें प्राचीन शहराचे अवशेष फार आहेत. नवीन शहराचा व्यापार व बाजार चांगला आहे. परंतु हवा खराब आहे. लो. सं. २५,००० असून त्यांत कांहीं हिंदूहि आहेत.

**टॉलबॉट, विल्यम हेन्री फॉक्स** (१८००–१८७७)— फोटोग्राफीच्या शास्त्रांतील एक सुप्रसिद्ध इंग्लिश संशोधक. त्याचें शिक्षण हॅरो येथें व केंब्रिजच्या ट्रिनिटी कॉलेजमध्यें झालें व १८२१ सालीं त्याला रँगलरची पदवी मिळाली. लहानपणापासूनच दृक्शास्त्राची त्याला गोडी असे. प्रकाशाच्या द्वारें काढलेली चित्रें डॅगेरी यानें जाहीर रीतीनें लोकांना ज्या वेळीं दाखविलीं त्या वेळीं टॉलबॉटनेंहि स्वतःचे त्याच विषयाचे शोध रॉयल एशियाटिक सोसायटीस कळविले. १८४१ सालीं त्यानें कॅलोटाइप टालबाटाइप या पद्धतीचा शोध प्रसिद्ध केला व १८५१ त तात्कालिक चित्रें काढण्याची पद्धत निर्माण केली. शास्त्रीय शोधाप्रमाणेंच पुराणवस्तुसंशोधनाचीहि त्याला आवड होती. त्यानें त्यासंबंधीं कांहीं पुस्तकेंहि लिहिलीं आहेत. सर हेन्री रॉलिन्सन व डॉ. हिंक्स यांच्याप्रमाणेंच निनेवा येथील कीलाकृति लिपींतील शिलालेख शोधण्याच्या व लावण्याच्या कामीं यालाहि श्रेय देणें जरूर आहे.

**टॉलस्टॉय, काउंट लिओ** (१८२८-१९१०)—एक सुप्रसिद्ध रशियन कादंबरीकार, धर्मोपदेशक व समाजसुधारक. याचें घराणें घरंदाज असून त्यांत पीटर दि ग्रेट या बादशहानें दिलेली काउंट ही पदवी चालत आली होती. वयाच्या आठव्या वर्षी टॉलस्टॉय पोरका झाला. त्याच्या आतेनें त्याचें संगोपन केलें. त्याचें प्राथमिक शिक्षण घरींच झालें. इ. स. १८४३ ते १८४६ पर्यंत प्राच्य भाषा व कायदा यांचा अभ्यास त्यानें काझन विश्वविद्यालयांत केला. इ. स. १८५१ सालीं क्रिमियन युद्धामध्यें सेबॅस्टोपोलच्या रक्षणांत यानें जातीनें भाग घेतला. लढाई संपल्यावर त्यानें 'स्नोज स्टॉर्मस' व 'टु हुसारस' हे ग्रंथ प्रसिद्ध केले. इ. स. १८५७ सालीं त्यानें बराच प्रवास केला व शेवटीं तो आपल्या जमीनजुमल्याच्या गांवीं जाऊन राहिला. येथें त्याने अगदीं साधेपणानें राहण्यास सुरुवात केली. शेतकऱ्यांच्या जीवनाशीं समरस होऊन तो त्यांच्या सुखदुःखांचा वांटेकरी बनला व त्यांच्या उद्धारार्थ त्यानें एक मोफत शाळा काढिली. शेतकऱ्यांच्या मुलांसाठीं म्हणून स्वतः पुस्तकें लिहून त्यांचा अभ्यासक्रमहि त्यानें आंखला, पण त्याच्या श्रमाचें व्हावें तसें चीज झालें नाहीं. या काळी त्यानें लिहिलेलीं पुस्तकें म्हणजे 'कुटुंबसुख', 'तीन मृत्यु', 'पॉलिकुश्का' हीं होत. इ. स. १८६२ सालीं त्याचें लग्न झालें. लग्नानंतर त्यानें जें वाङ्मय निर्माण केले त्यानेंच तो अजरामर झाला आहे. 'युद्ध आणि शांतता' व 'ॲना करेनिना' या दोन अव्वल दर्जाच्या त्याच्या वाङ्मयकृती असून त्यावरून टॉल्स्टॉयचें एकंदर तत्त्वज्ञान व जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोण काय आहे, याचें यथार्थ ज्ञान होतें. ॲना कॅरेनिनावरून टॉल्स्टॉयच्या आध्यात्मिक जीवनावरहि प्रकाश पडतो. याच वेळेला जीवित म्हणजे काय, त्याचा हेतु काय, वगैरे प्रश्नांनीं टॉल्स्टॉयला अंतर्यामीं भंडावून

सोडलें होतें. तेव्हां तो त्यांचें उत्तर शोधण्याच्या मार्गास लागला होता. यासाठीं त्यानें शास्त्रें व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास चालविला, पण त्यानेंहि त्याचें समाधान होईना. शेवटीं त्यानें धर्माचा अभ्यास चालविला व धार्मिक श्रद्धेनेंच जीविताचें कोडें सोडवितां येईल, शास्त्रें व तत्त्वज्ञान निरुपयोगी आहेत, असा निष्कर्ष काढून ख्रिश्चन धर्माचा स्वीकार करून आदर्श ख्रिश्चनाप्रमाणें तो वागूं लागला; पण प्रस्थापित ख्रिश्चन धर्मांत त्याला अनेक दोष दिसूं लागले. त्या बाबतींत धर्माधिकाऱ्यांशीं त्याचे मतभेद होऊन त्यानें शेवटीं आपला निराळाच ख्रिश्चन पंथ काढला. येशू ख्रिस्ताच्या पर्वतावरील उपदेशांत व अन्य ठिकाणीं त्यास जीविताधाराचीं मूळ तत्त्वें दिसलीं. अपकाराचा प्रतिकार करूं नका; देशांत सैन्य, कोर्टें, पोलिस, वगैरे असण्याचें कारण नाहीं; आपल्या सांप्रतच्या संस्था दंडुकेशाहीवर स्थापन झालेल्या आहेत त्या सर्व बंद करून अत्याचार, अहिंसा, विश्वप्रेम यांवर त्या आधारल्या पाहिजेत. अशा आशयाचे त्याचे धार्मिक विचार होते.

आर्थिक दृष्ट्या त्याचे विचार परिणामीं आजकालच्या समाजसत्तावाद्यांसारखेच होते. सर्व संपत्ति एकत्र करून, तिची समान वांटणी करून जगांतील विषमता नाहींशी करावी हाच त्याचाहि हेतु होता. पण हें करतांना अनत्याचार, अहिंसा, प्रेम, वगैरे उच्च भावनांचाच अवलंब करावयाचा, हे त्यांत विशेष आहे.

आपल्या समाजवादी तत्त्वाची अमलबजावणी करतांना त्यास घरीं बराच अडथळा आला. बायकोशीं त्याचे सारखे खटके उडूं लागले. ती आपली संपत्ति अशा तऱ्हेनें समाजाच्या हातीं देण्यास तयार होईना. शेवटीं आपल्या तत्त्वपूर्तीसाठीं त्यानें आपल्या घरादाराचा त्याग केला व शेतकऱ्यांच्या समाजांत पदार्पण केलें; पण तेथें लवकरच आजारी पडून तो ख्रिस्तलोकवासी झाला.

जगांतील प्रभावी धर्मोपदेशक व संत यांमध्यें टॉल्स्टॉयची गणना करण्याजोगी आहे. मानवी जीविताचा त्याचा अभ्यास जसा खोल होता तसाच व्यापक बुद्धिमत्ता, सूक्ष्म अवलोकन व मनाची तात्त्विक घटना यांवर अधिष्ठित असल्यानें त्याच्या प्रत्येक शब्दांत वाचकांच्या अंतःकरणांत स्फूर्तीची ज्योत पेटवून ती अखंड तेवत ठेवण्याचें सामर्थ्य आहे.

महात्मा गांधी टॉल्स्टायला फार मानीत व त्यांनीं त्याचे विचार आत्मसात् केले होते.

**टॉलेमी, क्लॉडिअस**—हा प्रख्यात गणिती, ज्योतिषी व भूगोलशास्त्रज्ञ ईजिप्तचा रहिवासी असून थीबेड येथें जन्मला. अलेक्झांड्रिया येथें हा अँटोनिनस पायसचा नोकर म्हणून राहत असे. अलेक्झांड्रा बंदराजवळील क्यानोपस येथील सेरापीच्या देवळांतील खांबावर, टॉलेमीनें लावलेले खगोलशास्त्रांतील शोध कोरून ठेविलेले आहेत. यानें इ. स. १२७ त पहिला व १५१ त शेवटचा शोध लावल्याचें आढळून आलें आहे. त्यानें अलेक्झांड्रा येथूनच ग्रहांचे वेध घेतले होते. अरबी दंतकथांवरून हा ७८ वर्षें जगला असें दिसतें.

**टॉलेमी राजे**—ईजिप्तमधील या नांवाचे राजे. अलेक्झांडरचें साम्राज्य विभागलें जाऊन ईजिप्तमध्यें अंतर्भूत झालेल्या एका प्रदेशावर हे टॉलेमी राजे राज्य करीत होते.

पहिला (ख्रि. पू. ३६७–२८३)—हा अलेक्झांडरचा परम स्नेही असून आशिया खंडावरच्या त्याच्या मोहिमेंत एक सेनापति होता. अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर त्याने ईजिप्तचा कारभार आपल्याकडे घेतला. यानें विद्या व कला यांना चांगलें उत्तेजन दिलें व अलेक्झांड्रिया ग्रंथालयाची स्थापना केली.

दुसरा (फिलाडेल्फस) (ख्रि. पू. ३०९–२४६)—बापानें अलेक्झांड्रिआ येथें स्थापिलेल्या ग्रंथालयांत चांगली भर घातली व फारोस बेटावरील दीपगृह, अलेक्झांड्रिअन वस्तुसंग्रहालय आणि राजांची स्मशानभूमि या इमारती नवीन बांधल्या.

तिसरा (ख्रि. पू. २८१–२२१)—यानें रोमशीं मित्रत्वाचें नातें जोडलें व वाडवडिलांप्रमाणेंच पंडितांना चांगला आश्रय दिला.

पांचवा (ख्रि. पू. २०९–१८१)—हा बाप वारला तेव्हां पांच वर्षांचाहि नसल्यानें त्याच्या पालकांनीं त्याला रोमच्या संरक्षणाखालीं ठेवला व ईजिप्तच्या कारभारांत प्रथमच रोमला हात घालूं दिला.

सहावा (ख्रि. पू. १८६–१४५)—याच्या भावानें याला अलेक्झांड्रिआ येथून हांकलून दिल्यामुळें हा रोमला पळाला व त्याच्या मध्यस्थीनें पुन्हां गादीवर आला. यापुढील टॉलेमी राजांच्या कारकीर्दींत रोमन लोकांचें ईजिप्तमधील वर्चस्व वाढत गेलें.

अकरावा (ख्रि. पू. ८०–५१)—याला प्रजेनें राज्यांतून घालवून दिल्यावर हा रोमनांच्या मदतीनें पुन्हां गादीवर बसला.

बारावा (ख्रि. पू. ६१–४८)—बहीण क्लिओपाट्रा व हा जोडीनें राज्यकारभार पाहत.

तेरावा (मृ. ख्रि. पू. ४४)— ११ व्या टॉलेमीचा सर्वांत धाकटा मुलगा. याला सीझरनें क्लिओपाट्रा या बहिणीसमवेत गादीवर बसविलें. क्लिओपाट्रानें याचा खून केला व अँटनीचा आक्टेव्हिअसनें पराभव केल्यावर स्वतः आत्महत्या केली व अशा रीतीनें टॉलेमी घराणें बुडवून ईजिप्त हा रोमन साम्राज्याचा एक प्रांत होऊं दिला (ख्रि. पू. ३०).

**टॉलेमी सिद्धान्त**—टॉलेमी हा ग्रीक ज्योतिषशास्त्रज्ञ इ. स. च्या २ ऱ्या शतकांत होऊन गेला. त्यानें असें प्रतिपादन केलें

कीं, पृथ्वीच्या भोंवतीं सूर्य, ग्रह आणि तारे फिरतात. हा त्याचा सिद्धान्त फार दिवस टिकून होता. पुढें कोपर्निकसनें तो खोटा ठरविला.

**टासो** (१५४४–१५९५)— एक सुप्रसिद्ध इटालियन कवि. याचा बाप सार्लेर्नोच्या घराण्यांतील राजाचा खासगी कारभारी होता. टासोचा बाप बऱ्यापैकीं कवि होता. त्यामुळें त्याला अर्बिनोच्या दरबारांत खुशामतयाची नोकरी मिळाली होती व तेथेंच टासो याचें राजपुत्रांच्या सहवासांत आयुष्य गेलें. बापाजवळ त्यानें प्रसिद्ध कवींच्या काव्याचें अध्ययन केलें. पुढें टासोला कायद्याचा अभ्यास करण्यासाठीं पाडुआला पाठविण्यांत आलें.

१५६२ सालीं त्यानें 'रिनाल्डो' हें काव्य प्रसिद्ध केलें. ह्या काव्यांत त्याचे अलौकिक गुण निदर्शनास आले. यानंतर त्यानें 'डिस्कोर्सेस ऑन दि आर्ट ऑफ पोएट्री' (काव्यशास्त्रावरचे विचार) नांवाचें पुस्तक लिहिलें. यामुळें त्याची उत्कृष्ट टीकाकार म्हणून प्रसिद्धि झाली.

स. १५६५–७० या दरम्यानचा त्याचा काळ सुखाचा गेला. राजकन्या लुक्रेशिया व लिओनारा यांच्या आश्रयाखालीं असतांना त्याला राजदरबारचें व बाहेरच्या जगाचें फार ज्ञान झालें. लिओनावर याचें प्रेम जडलें होतें असें म्हणतात. पुढें त्यानें फेराराच्या ड्यूकच्या पदरीं नोकरी धरली. यानंतरच्या चार वर्षांत 'अमिन्टा', व 'जेरुसलेम लिबर्टा', हीं दोन काव्यें लिहिलीं. त्यात 'अमिन्टा' हें काव्य नाटक फार साधें व उत्कृष्ट आहे.

पुढें त्याचें व फेराराच्या ड्यूकचें जमेनासें झालें. पुनः पळून जा, पुनः परत ये, असें वेड्यासारखें वर्तन तो करूं लागला. शेवटीं त्याला सात वर्षांच्या कैदेची शिक्षा देण्यांत आली.

या अवधींत त्यानें पुष्कळच वाङ्मय निर्माण केलें. तुरुंगांतून सुटका झाल्यावर त्याला कोठेंच नोकरी नव्हती. १५९०–१५९४ च्या दरम्यान तो निरनिराळ्या राजांच्या व सरदारांच्या आश्रयास राहिला. रोमच्या धर्माध्यक्षानें त्याला रोमला बोलावून त्याचा सन्मान केला व त्याला धन व बहुमानाच्या पदव्या दिल्या. पण उत्तरोत्तर त्याची प्रकृति ढासळतच चालली व तो १५९५ सालीं मरण पावला.

**टास्मान, आबेल जॅन्झून** (१६०२–१६५९)—एक डच नाविक. १६४२ सालीं त्यानें टास्मानिया हें बेट शोधून काढलें व त्यानंतर थोड्याच दिवसांनीं न्यूझीलंडचा शोध लावला. १६४४ सालीं त्यानें ऑस्ट्रेलेशियाची सफर केली व ह्या सफरींत त्यानें कॉर्पेंटरियाच्या सामुद्रधुनीचा शोध लावला.

**टास्मानिआ**— ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थमधलें एक संस्थान. ऑस्ट्रेलियाच्या दक्षिणेस हिंदी महासागरांत हें एक बेट आहे. लो. सं. सुमारें अडीच लाख आहे. न्यूझीलंड, फिजी बेटें वगैरेंचा शोध लावणारा डच नाविक टास्मान यानेंच याचाहि शोध लावला. म्हणून या बेटाला टास्मानिया म्हणतात. क्षेत्रफळ २६,३०४ चौरस मैल. सृष्टिसौंदर्य व औद्योगिक वाढ यांमुळें हें बेट पाहण्यास दरसाल हजारों लोक येऊन जातात. यांत नद्या व सरोवरें पुष्कळ आहेत. होबार्ट आणि लौनसेस्टॉन हीं प्रमुख शहरें आहेत. शेती व उद्योगधंदे यांची सुधारणा व वाढ पुष्कळ झाली असून परदेशीं होणारी निर्यात मोठी आहे. त्यांत लांकूड व लोंकर यांचा समावेश होतो. खनिज संपत्ति काढण्याचेहि उद्योगधंदे आहेत. कार्बाइड तयार करण्याचा धंदा महत्त्वाचा आहे. शिक्षण सक्तीचें व मोफत आहे. होबार्ट येथें एक विद्यापीठ आहे.

१७६९ सालीं हें बेट ब्रिटननें घेऊन त्यावर कैदी ठेवण्यास सुरुवात केली. १८५६ सालीं त्याला जबाबदारीची राज्यपद्धति बहाल करण्यांत आली व १९०१ सालीं ऑस्ट्रेलियन संघांत याचा समावेश झाला.

**टाळ**—एक वाद्य. काशाचा पोकळ गोळा नारिंगाच्या आकाराचा घेऊन त्याचे बरोबर दोन समान भाग केले कीं टाळाच्या दोनहि वाट्या आपणांस हव्या तशा मिळतात. ह्याची जाडी सुमारें दीड दोरी असते. झांजेप्रमाणेंच वरल्या अंगास मध्याभोंवतीं फुगवटी ठेवितात; व मध्यावर भोंक पाडून दोरी ओवून आंतल्या अंगास गांठ देतात व बाहेरील बाजूस पुन्हां गांठ देऊन तेथें सुपारी एवढ्या आकाराची लांकडी गोटी बसवितात. प्रत्येक हातांत अशी ही एक एक वाटी घेऊन ती एकमेकींवर आपटून त्यायोगें ताल धरतात. भजनांत, कीर्तनांत याचा उपयोग होतो.

**टिकमगड**—मध्यहिंदुस्थान, बुंदेलखंड, ओर्च्छा संस्थानाच्या राजधानीचें ठिकाण. जी. आय्. पी. रेल्वेवरील ललितपूर स्टेशनापासून ३६ मैलांवर आहे. यांतील मुख्य इमारती म्हटल्या म्हणजे महाराजांचा वाडा व किल्ला या होत. येथें हायस्कूल, दवाखाना, पोस्टऑफिस या मोठ्या इमारती आहेत.

**टिकेकर, रामचंद्र विनायक** (१८६२–१९०७)—एक मराठी लेखक. 'धनुर्धारी' या नांवानें हे सुपरिचित आहेत. यांनीं अनेक मराठी वृत्तपत्रांतून विविध विषयांवर लेख व सुमारें ४८ लहान-मोठीं पुस्तकें लिहिलीं आहेत. 'जवानमर्द ब्राह्मणभाई' व 'जवानमर्द मराठेगडी' ही त्यांची छोटी ऐतिहासिक पुस्तकमाला मराठ्यांचा स्वाभिमानी इतिहास वाचकांच्या मनावर सुंदर तऱ्हेनें ठसविण्यास फार उपयोगी आहे. यांचें गोल्डस्मिथच्या 'विकार ऑफ वेकफील्ड'चें 'वाईकर भटजी' नांवाचें भाषांतर रफार उत्कृष्ट वठलें आहे. लहान मुलांसाठीं त्यांनीं पुष्कळ वाचनीय पुस्तकें लिहिलीं, पण तीं आज उपलब्ध नाहींत. त्यांचे पुनर्मुद्रण करणें उपयुक्त ठरेल. धनुर्धारींची भाषा शुद्ध, रसाळ व स्वाभिमानो-त्तेजक असते. त्यांचे एक चिरंजीव श्रीपादराव हे पंत्रपंडित व टीकाकार म्हणून प्रसिद्ध आहेत.

**टिक्कण**— तेलगू महाभारताचा लेखक. वारंगळ येथील गणपतीसमोर याचा व जैनांचा जो वाद झाला त्यांत यानें जैनांचा पराभव केला.

**टिटवी**—हा पक्षी साधारणपणें बगळ्यासारखा लांब पायांचा असतो. परंतु याचा रंग निराळा असतो. वरच्या बाजूस पंख काळसर, उदी असून खालची बाजू पांढरी सफेत असते. पाय उंच पिंवळसर व चोंचहि त्याच रंगाची असते. डोळ्याच्या खालच्या बाजूस तांबड्या गलूल्या असतात. 'ट्ट्ट् ट्वि ट्वि' आवाजा-वरून टिटवी नांव पडलें. या पक्ष्यांचें राहणें किंवा संचार पाण्या-जवळ मोकळ्या जागेंत असतो, व त्या ठिकाणीं मिळणाऱ्या जीवजंतूंवर यांचा निर्वाह चालतो. यांचीं घरटीं दगडांच्या राशींत असतात व यांचीं अंडीं दरखेपेस चारपर्यंत घातलेलीं असतात. टिटवीला मागचें बोट नसल्यामुळें झाडांच्या फांद्यांवर बसतां येत नाहीं. त्यामुळें सारखें जमिनीवर हिंडावें लागतें. म्हणून पाण्याच्या आसपास हिंडतांना हे पक्षी आढळतात. यांना आकाशांत भराऱ्या मारण्याची संवय असते. यांची झोंपण्याची पद्धत मोठी विलक्षण आहे. म्हणजें निजतांना पाय आकाशाकडे करून टिटवी झोंपते असे म्हणतात. याविषयीं रूढ समजूत अशी आहे कीं, आकाश कोसळलें तर पायांनें वरच्यावर धरलें जावें व त्याखालीं आपण चिरडून जाऊं नये म्हणून ती तशी निजते! टिटवीचा आवाज अशुभ समजतात. 'टिटवी यमाची तराळीण' अशी एक म्हण आहेच. टिटवीनें समुद्र आटविल्याची दंतकथा फार जुनी आहे.

**टिटिकाका**— दक्षिण अमेरिकेतील गोड्या पाण्याचें सर्वांत मोठें सरोवर. त्याची लांबी १३० मैल व क्षेत्रफळ ३३०० चौ. मैल असून या सरोवराचा निम्मा भाग पेरू देशांत आणि निम्मा भाग बोलिव्हिया देशांत आहे. हें सरोवर समुद्रसपाटीपासून १२,६०० फूट उंचीवर आहे. यांतील पाणी डेसागॉडेरो नदीच्या-द्वारें बोलिव्हियांतील ऑलेगस या खाऱ्या पाण्याच्या सरोवरांत वाहत जातें.

**टिशियन** (ऊर्फ टिझियानो व्हेसेलिओ) (१४७७–१५७६)—एक व्हेनेशियन चित्रकार. त्यानें पूर्ववयांत काढलेलीं सर्व चित्रें जॉर्जिऑन कलापद्धतीचीं आहेत. म्हणजे या चित्रांत भडक रंग आणि मूर्तिपूजकांची आनंदी वृत्ति दिसून येते. या चित्रानंतर त्यानें काढलेलें प्रसिद्ध चित्र 'असम्शन ऑफ दि व्हर्जिन' (कुमारी मेरीचें स्वर्गगमन) यामध्यें टिटियनची स्वतःची स्वतंत्र कलापद्धति दिसून येते. या चित्रांत मोठा श्रीमंती थाट, पण विषयासक्त आणि जडवादी वृत्ति दिसून येते. या प्रकारचीं त्याचीं आणखी चित्रें आहेत तीं—'पेसारो मेडोना' (व्हेनीस), 'दि प्रेझेंटेशन ऑफ दि व्हर्जिन' (कुमारी मेरीचें देवदर्शन), 'डेथ ऑफ सेंट् पीटर' (संत पीटरचा मृत्यु) आणि एकेका व्यक्तीचीं मोठ्या आकाराचीं चित्रें. १५४५ मध्यें तो रोम शहरीं गेला आणि तेथें त्यानें पोप ३ रा पॉल, कार्डिनल फार्नेस आणि ड्यूक आटोव्हियो फार्नेस यांचे एकत्र चित्र काढलें. त्याच्या चित्रांचा शेवटचा कालविभाग १५५५ पासून सुरू होतो. या काळांत त्याचीं कांहीं चित्रें आपल्या आरंभींच्या चित्रांसारखीं म्हणजे मूर्तिपूजकांच्या काव्यांतील वृत्तीचीं आहेत; आणि कांहीं चित्रें अगदीं नव्या पद्धतीचीं म्हणजे भरपूर भावनाविष्कारयुक्त आहेत. या प्रकारचें त्याचें चित्र 'ख्राइस्ट क्राउन्ड विथ थॉर्न्स' (काटेरी मुकुटांत ख्रिस्त) हें आहे.

**टिटो, मार्शल जोसिप ब्रॉझ** (१८९०— )— युगोस्लाव्हियाचा प्रमुख मंत्री. प्रथम ऑस्ट्रो–हंगेरियन सैन्यांत शिपाई म्हणून दाखल (१९१४); रशियनांकडे गेला (१९१५); रशियन कँपांत कैदी (१९१५–१७); लाल सैन्याशीं लढा (१९१७–२१); नंतर युगोस्लाव्हियांत परत येऊन क्रोट मजूर पक्षाचा पुढारी बनला. कम्यूनिस्टांशीं कारस्थान् करतो या आरोपावरून पांच वर्षांच्या कैदेची शिक्षा मिळाली (१९२३). पुढें स्पेनमध्यें आंतरराष्ट्रीय तुकडी तयार करण्यांत पुढाकार घेतला. दुसऱ्या महायुद्धांत स्वातंत्र्यासाठीं तयार झालेल्या युगोस्लाव्ह राष्ट्रीय फौजेचा नेता झाला. राष्ट्रीय संरक्षक स मतीचा अध्यक्ष, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या फॅसिस्टविरोधी समितीचा सभासद, वगैरे जागा स्वीकारल्यानंतर तो युगोस्लाव्हियांतील कम्यूनिस्ट पक्षाचा सरचिटणीस झाला. पण स्टॅलिनचा कम्यूनिस्ट पक्षाशीं संबंध आल्यापासून कम्यूनिस्ट पक्षाशीं आतां याचें फारसे सूत नाहीं. त्याचा पक्ष निराळाच असून चीनच्या माओत्सुंगटुंगनेंहि टिटोचेंच अनुकरण केलें आहे.

टान्जीर — एक रस्ता (पृ. १६३)

टिंबक्टू — तिकडील स्त्रिया (पृ. २७१)

टिटो फार मोठा कर्तबगार पुरुष असून आपला देश चांगला सुधारून पूर्ण स्वतंत्र करण्याच्या खटपटींत तो असतो.

**टिडोर**— हें मलाया द्वीपसमूहाचें हालमाहेराच्या पश्चिम किनाऱ्याकडे टरनेटच्या दक्षिणेस असणारें एक बेट आहे. याचें क्षे. फ. सुमारें ३० चौ. मै. आहे. या बेटांत बरेंच जंगल व त्याच सुप्त ज्वालामुखींचीं (५,००० फूट) शिखरें आहेत. मुख्य शहर टिडोर. येथील सुलतान डच सरकारचा मांडलिक आहे. हा सुलतान व डच कमिशनर किंवा एजंट हे येथेंच राहतात. येथील मुसलमानी धर्माच्या मलाया जातीची लो. सं. सुमारें ८,००० आहे. हे लोक शेतकी (कापूस, तंबाखू, जायफळ, वगैरे पिकें) व मासे धरणें यांवर उपजीविका करितात.

**टिन्डाल, जॉन** (१८२०–१८९३)— एक ब्रिटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. त्याच्या बापाची जरी गरिबीची स्थिति होती तरी त्यानें स्वप्रयत्नानें विद्या संपादन केली. स. १८३९ मध्यें त्यानें आयर्लंडांतील सर्व्हे खात्यांत, पुढें १८४२ सालीं इंग्लिश सर्व्हे खात्यांत त्यानें नोकरी पतकरली. पुढें रेल्वे एंजिनियरचें कांहीं काळपर्यंत काम केलें. स. १८४७ मध्यें क्विनवुड कॉलेजांत शिक्षक, नंतर मार्बर्ग येथील विश्वविद्यालयांत विद्यार्थी होऊन दोन वर्षांत डॉक्टरची पदवी मिळविली. टिन्डाल यानें पहिला स्वतंत्र लेख चुंबकत्वावर लिहिला. त्याच्या या लेखामुळें त्याची प्रसिद्धि झाली व त्याला रॉयल सोसायटीचा सभासद करण्यांत आलें. १८५३ मध्यें त्याला रायल इन्स्टिटयूशनमध्यें प्रोफेसर नेमण्यांत आलें.

उष्णताशास्त्रांत टिन्डाल यानें पुष्कळ भर घातली आहे. हिमप्रवाहासंबंधानें त्यानें कित्येक प्रयोग करून पाहिले व त्याचप्रमाणें स्वित्झर्लंडांत जाऊन त्यानें तेथील हिमप्रवाहाचें अनेक शास्त्रीय साधनांनीं अवलोकन केलें, व तद्विषयक कित्येक लेख लिहिले. निरनिराळे वायू आणि तत्संबद्ध बाष्प यांच्या अनेक संबंधाबाबत टिन्डाल यानें कित्येक वर्षेंपर्यंत (१८५९–१८७१) परिश्रम केले व तद्विषयक जें त्यानें लिहिलें आहे तें त्याच्या सर्व आयुष्यांतील कामगिरींत अत्यंत महत्त्वाचें असें आहे. आकाशाचा रंग निळा कां असतो, याचा खुलासा करण्याकरितां त्यानें कित्येक महत्त्वाचे प्रयोग केले आहेत. वातावरणांतील हवेच्या अंगीं असणाऱ्या ध्वनीच्या अपारगामित्वाबद्दल त्यानें प्रयोग करून पुष्कळ महत्त्वाची माहिती उपलब्ध केली; या माहितीचा समुद्रावर जहाजांना सूचना देण्याकरितां व दीपगृहांना अत्यंत उपयोग झाला आहे.

**टिपगड डोंगर**— मध्यप्रांत, चांदा जिल्हा. मुरमगाव जमीनदारींत हे डोंगर असून सर्वांत उंच डोंगर समुद्रसपाटीपासून २,००० फूट आहे. येथेंच टिपगडचा प्राचीन किल्ला आहे. आजूबाजूस दाट जंगल असल्यामुळें जवळजवळ हा किल्ला मनुष्यवस्तीला पारखाच आहे. किल्ल्यांत एक मोठा तलाव असून आंत उतरण्याकरितां पायऱ्या केलेल्या आहेत. तलावाच्या दक्षिणेस बालेकिल्ला असून त्याभोंवतीं चांगली तटबंदी आहे.

**टिपरा जात**—या लोकांची वस्ती बंगाल–आसाममध्यें आहे. एकंदर लो. सं. दोन लाख आहे. पैकीं बंगाल्यांतच बहुतेक आहेत. टिपरा लोक बोडो राष्ट्रजातीपैकीं असावेत. सिलहटमधील हे लोक बहुधा आसपासच्या टेंकड्यांतून येथें आले असावेत.

**टिपऱ्या**—१. एक वाद्य. हें वीत दीड वीत लांबीचे व सुमारें पायाच्या अंगठ्याइतक्या आकाराचे दोन लांकडाचे तुकडे असून पूर्णपणें कांतून गोल केलेले व केव्हां केव्हां एका टोंकाकडे कांहींसे निमुळते केलेले असे असतात. दोन हातांत दोन असे घेऊन एकावर एक तालाच्या अनुरोधानें ते मारितात.

२. एक खेळ. टिपऱ्यांचा खेळ फार प्राचीन आहे. श्रीकृष्ण गोपगोपींबरोबर हा खेळ खेळत असल्याचीं वर्णनें परिचयाचीं आहेतच. टिपऱ्यांचा खेळ म्हणून जेव्हां खेळतात तेव्हां दहाबारा माणसें वर्तुलाकार उभीं राहून, नाचाच्या गतीवर पावलें टाकीत चक्राकार फिरतात व त्या वेळीं प्रत्येक मनुष्य उजव्या हातांतील टिपरी आपल्या उजव्या बाजूस असलेल्या माणसाच्या टिपरीवर व डाव्या हातांतील डाव्या बाजूस असणाऱ्या माणसाच्या टिपरीवर मारितो. सर्व माणसें आपापल्या बाजूशीं असणाऱ्या माणसांच्या टिपऱ्यांचे ठोके आपापल्या टिपरीवर घेण्यांत दक्ष असतात. ह्या खेळांत कवायतीप्रमाणें कांहीं विवक्षित गतीच्या अनुरोधानें माणसें फिरत असतात; त्यामुळें गोफहि विणला जातो. ह्या खेळास रासक्रीडाहि म्हणतात. टिपऱ्या खेळतांना वाद्याची साथ देतात व निरनिराळीं पदें म्हटलीं जातात. या खेळांत पायांचे पवित्रे, अंगविक्षेप व टिपऱ्यांवर मारावयाचे ठोके यांचें चांगलें ज्ञान असावें लागतें. गोफ विणींत टिपऱ्या खेळण्याचा रासक्रीडेसारखा एक प्रकार आहे. गुजराथेंत हा खेळ फार प्रिय आहे.

**टिपू सुलतान** (१७५३–१७९९)—म्हैसूरचा एक राजा. हैदरअल्लीचा हा थोरला मुलगा. याचें खरें नांव फत्ते अलीखान.

देवनहळ्ळी या गांवीं टिपूचा जन्म १७५३ त झाला. हा गादीवर येण्यापूर्वीपासून लढाईंत भाग घेत असे. १७७१ त त्यानें मराठ्यांना तोंड दिलें होतें. १७८१ त सेनापति कर्नल बेली व कर्नल ब्रेथवेट असे दोघे जण टिपूवर चालून आले; पण उभयताचा पराभव करून दोघानाहि त्याच्या फौजेसह कैद केलें.

१७८२ त हैदर वारल्यावर टिपू गादीवर बसला. याचें व फ्रेंचांचें सख्य होतें. यामुळें इंग्लिश सेनापति आयरकूट हा

टिपूवर चालून आला असतां फ्रेंच सरदार बुसी हा टिपूच्या मदतीस आला. हैदरानें जिंकलेला मुलूख वगळून सालबाई येथें झालेल्या तहांतील बाकीचीं सर्व कलमें टिपूला मान्य होतीं. त्यामुळें इंग्रजांनीं टिपूचा बेदनूर प्रांत घेतला. उलट त्यानें मंगळूरला नऊ महिने वेढा देऊन तें काबीज केलें व तेथल्या इंग्रजांना कैदेंत टाकलें. १७८४ च्या मार्च ११ ला उभयतांत मंगळूर येथें तह झाला व त्या तहाप्रमाणें एक-मेकांचा मुलूख परत केला.

टिपूचें धोरण आक्रमणशील असून लढाई अंगाशीं येते असें वाटल्यास तो तह करी. पण हा तह तो कधींच पाळीत नसे. लोकांना जबरदस्तीनें मुसलमान करणें, नरगुंदकरांची मुलगी जनानखान्यांत दाखल करणें, वगैरे कारणांमुळें त्याची हिंदु प्रजा त्रासली होती. शेजारच्या राजवटी त्याजवर विश्वास ठेवीत नसत. तसेंच त्याच्या अविश्वासी व उपद्रवी धोरणामुळें कॉर्नवॉलीसनेंहि निजाम व मराठे यांच्याशीं स्नेह वाढविला.

त्रावणकोरच्या तटबंदीवर टिपूने हल्ला केल्यामुळें इंग्रजांचें व त्याचें युद्ध सुरू झालें. मेडोजनें मलबार प्रांत घेतला. निजाम व मराठे हेहि त्याचीं ठाणीं सर करीत इंग्रजांना मिळाले. या वेळीं धडगत नाहीं असें पाहून त्याने १७९२ फेब्रु. २३ ला तह केला. नेपोलियनला लागेल ती मदत व जरूर ती माहिती पुरवून त्यानें हिंदुस्थानवर स्वारी करण्याविषयीं त्याच्याशीं पत्रव्यवहार केला. त्याचप्रमाणें इराण व तुर्कस्तान या देशांशीं संधान बांधून स्वतःची बाजू बळकट करण्याचा त्यानें प्रयत्न केला पण तो फुकट गेला.

यानंतर १७९८ मध्यें फ्रेंचांशीं दोस्तीचा तह करून व त्यांचीं पलटणे चाकरीस ठेवून इंग्लिशांना हांकलून लावण्याचा उद्योग आरंभिला. तेव्हां वेलस्लीनें खुलासा मागितला असतां टिपूने त्यास वाटाण्याच्या अक्षता लाविल्या. त्यामुळें वेलस्लीनें २२ फेब्रु. १७९९ ला युद्ध पुकारलें व टिपूच्या सैन्याचा एक दोन ठिकाणीं पराभव केल्यावर श्रीरंगपट्टणास वेढा दिला. तो उठविण्यासाठीं टिपू शेवटपर्यंत लढला. अखेर श्रीरंगपट्टणच्या वेशींत १७९९ च्या ४ मेला गोळी लागून तो मरण पावला. याचें प्रेत हुडकून काढून लालबागेंत हैदरच्या कबरस्थानाजवळच पुरण्यांत आलें.

टिपूचें राज्य त्याच्या मरणसमयीं १ कोटी ६ लक्ष रु.चें होतें. तें इंग्रज, मराठे व निजाम यांनीं वांटून घेतलें व थोडेंसें म्हैसूरच्या पूर्वीचा राजा चामराज वडेयर यांच्या वंशजांना दिलें. स्वभावानें हा लोभी, चंचल, अविश्वासी, क्रूर व धर्मवेडा होता. याच्या कारकीर्दीत प्रांतांचीं नांवें बदललीं; मापें, वजनें व नाणीं हीं नवीन पाडलीं. टिपूनें स्वतःचें पंचांग निराळें केलें. पूर्वी मोंगल बादशहाच्या नांवानें मशिदींत खुदबा पठत असत, तो यानें स्वतःच्या नांवानें पढण्याची चाल सुरू केली. यानें नवीन कालगणना चालू केली. त्याचप्रमाणें मुलकी व लष्करी खात्यांत यानें अनेक प्रकारच्या सुधारणा केल्या. याचा राज्यकारभार शिस्तवार असे. टिपूला कलाकौशल्याचा व वाङ्मयाचा चांगल्यापैकीं शोक होता. त्याला फारसी, कानडी व ऊर्दू या भाषा चांगल्यापैकीं अवगत होत्या. याचा ग्रंथसंग्रह सध्यां कलकत्त्यास आहे. त्यांत १० व्या शतकापासून बरेच हस्तलिखित संस्कृत ग्रंथ, कुराणाचीं भाषांतरें, मोंगल इतिहासाच्या बखरी, हिंदुस्थानच्या तवारिखा, इ. ग्रंथ आहेत. टिपूनें 'फर्मान–बनाम–अलिराज' व 'फतह–उल्–मजाहिदीत' या नांवाचे दोन ग्रंथ लिहिले आहेत.

**टिप्पेरा**—पाकिस्तान, पूर्व बंगाल, चित्तगांव विभागांतलि जिल्हा. याचें क्षे. फ. २,५३१ चौ. मैल. या जिल्ह्यांत मेघना, गोमती, दाकातिया, तितास या नद्या आहेत. ह्या सर्व नद्यांच्या पात्रांतून ४ टन वजनाच्या बोटी जाऊं शकतात. उष्णमान मध्यम. पावसाळा मार्च–एप्रिलमध्येंच सुरू होतो. वार्षिक पाऊस सरासरी ७५ इंच पडतो. लो. सं. ३८,६०,१३९.

सन १७३३ पावेतों ह्या जिल्ह्याचा डोंगरीटिप्पेरा संस्थानांत समावेश होत असे. १२७९, १३४५ व १६२० ह्या सालीं मुसलमानांनीं ह्या संस्थानावर स्वाऱ्या केल्या. पण एकाहि वेळीं राजानें आपलें स्वातंत्र्य गमावलें नाहीं. १७३३ सालीं बंगालच्या अधिकारी सुजाउद्दीनखान यानें या प्रदेशावर स्वारी करून तो घेतला. तेव्हांपासून ह्या जिल्ह्याचा प्रदेश मोंगलांकडे राहिला. १७६५ सालीं ह्या जिल्ह्याची व्यवस्था कंपनी सरकाराकडे आली. जिल्ह्यांत तीन शहरे (कोमिल्ला, ब्राह्मणबारिया, चांदपूर) व खेडीं ६,९१६ आहेत. लोक मेघनेच्या सुपीक प्रदेशाच्या बाजूनें जास्ती वस्ती करून आहेत. भाषा बंगाली असून ह्या भाषेस पूर्व अथवा मुसलमानी बंगाली ह्या नांवानें ओळखतात. शेकडा ७१ लोक मुसलमान व २९ हिंदू आहेत. शेंकडा ७९ लोक शेतकीवर उपजीविका करतात. येथील जमीन फार सुपीक आहे. तांदुळाचें उत्पन्न मुख्य आहे. ह्याच्या खालोखाल उत्पन्न तागाचें. शेतकरी

वर्ग खाऊन-पिऊन सधन आहे. पितळेचीं भांडीं, मातीचीं भांडीं, शेतकीचीं हत्यारें, वगैरे मालहि तयार करतात. ह्या जिल्ह्याचे तीन पोटविभाग पाडले आहेत. त्यांचीं नावें कोमिल्ला, ब्राह्मणबारिया व चांदपूर.

**टिफ्लिस**—हा जुना प्रांत रशियन ट्रान्सकाकेशियांतील जॉर्जिया संस्थान होय. (जॉर्जिया पहा). टिफ्लिस (आतां त्बिलिसी) जॉर्जियाचें राजधानीचें शहर कुरा नदीच्या दोन्ही कांठांवर वसलेलें आहे. हें अत्यंत प्राचीन शहर असलें तरी हल्लीं अगदीं नवीन धर्तीवर बांधलें गेलें. शहरांत उत्तम ख्रिस्ती चर्चें, मशिदी, बागा, रस्ते व इमारती आहेत. येथें बंदुका व तरवारी चांगल्या होतात. सुती व रेशमी कापडाचे कारखाने आहेत. १७९९ पासून तें रशियाच्या ताब्यांत आहे. लो. सं. ५,१९,१७५.

**टिंबक्टू**—फ्रेंच पश्चिम आफ्रिका, फ्रेंच सूदान वसाहतींतील एक शहर. या शहराला उंट व होड्या (कॅनो) यांची भेटण्याची जागा, किंवा सहारांतील सूदानचें बंदर म्हणतात. हें उत्तर आफ्रिकेंतील व नायगरच्या दक्षिण व पश्चिम भागांतील मालाच्या देवघेवीचें ठिकाण आहे. फ्रेंचांनीं १८९३-९४ सालीं हें शहर काबीज करण्यापूर्वी हें फार मोठें होतें. फ्रेंचांनीं उत्तरेस व दक्षिणेस दोन किल्ले बांधलेले आहेत. फ्रेंचांच्या संरक्षणाखालीं आल्यावर येथील व्यापार वाढला. रस्ते बांधण्यांत आले. युरोपियन शाळा, धर्ममंदिरें व इतर संस्था स्थापण्यांत आल्या. येथें कांहीं मौल्यवान् अरबी हस्तलिखितें आहेत. हें मुसलमान शिक्षणाचें केंद्र आहे. लो. सं. ५,२६८.

**टिब्यूलस, आल्बिअस** (ख्रि. पू. ५४—१९)—शोकगीताच्या चालीवर कविता लिहिणारा एक लॅटिन कवि. या वृत्तांत लिहिलेल्या याच्या कवितांचे दोन संग्रह उपलब्ध आहेत. त्याच्या पहिल्या कविता-संग्रहांत बहुतेक कविता त्यानें आपली प्रेयसी डेलिया हिला उद्देशून लिहिलेल्या आहेत. टिब्यूलसनें आपला दुसरा कवितासंग्रह स्वतःच्या दुसऱ्या नेमेसिस नांवाच्या प्रेयसीला उद्देशून लिहिलेला आहे. टिब्यूलस हा कोमल व संकोचवृत्तीचा कवि असून सदा रोगी व जीवनकलहांत उदासीन बनलेला होता. त्याच्या कवितांत त्याच्या स्वतःच्या भावनाप्रधान प्रेमप्रसंगांचें वर्णन असल्यामुळें त्या दृष्टीनें त्या महत्त्वाच्या नाहींत; पण त्याच्या कवितांत ग्रामीण जीवनाचीं वर्णनें आणि विषयाची मांडणी व भाषासौंदर्य यांमुळें क्विंटिलियननें टिब्यूलसला तशा प्रकारच्या लॅटिन कवींत अग्रस्थान दिलें आहे.

**टिमोर**—हें बेट मलाया द्वीपसमूहापैकीं सुंडा द्वीपसमूहांत अगदीं पूर्व टोंकाला आहे. या बेटावरचें राजकीय वर्चस्व नेदर्लंड्स आणि पोर्तुगाल यांच्यामध्यें विभागलेलें आहे. या बेटांत चुनखडीच्या पर्वताची पूर्व-पश्चिम रांग आहे. त्या पर्वताची सर्वसाधारण उंची ६,०००-७,००० फूट आहे. दरम्यान अनेक दऱ्या आणि जलप्रवाह आहेत. डच टिमोर भागांत कित्येक ज्वालामुखी आहेत.

(१) डच टिमोर (द्वीपसमूह) हा या बेटाचा पश्चिम बाजूचा प्रदेश आहे; पण त्यांत उत्तर किनाऱ्यावरील ओकूसी (पोर्तुगीज) याचा समावेश होत नाहीं. या प्रदेशाचें मुख्य शहर आणि बंदर कोपांग असून हें टिमोर द्वीपसमूहाची राजधानी आहे. सर्व टिमोरचें क्षे. फ. २४,४५० चौ. मैल आणि लोकसंख्या १६,५७,३७६ आहे. येथें मका, भात, गहूं, नारळ, तमाखू, भाजीपाला आणि फळफळावळ हीं पिकें होतात. येथून लहान आकाराचे घोडे, मध, मेण, वगैरे माल परदेशीं जातो. या डच टिमोर प्रदेशाचें क्षे. फ. ६,००० चौ. मैल आणि लोकसंख्या ३,५०००० आहे.

(२) पोर्तुगीज टिमोर-याचें क्षे. फ. ७,३३२ चौ. मैल आणि लोकसंख्या ४,६३,७९६ आहे. या भागाची राजधानी आणि मुख्य बंदर डिली हें शहर आहे. येथून कॉफी सर्वांत अधिक निर्गत होते. त्याशिवाय कोको, गुरांचीं शिंगें, मधमाशांचें मेण, म्हशी आणि चंदनाचें लांकूड आणि खोबरें हा माल परदेशीं जातो.

**टिमोर लौट**—(टेनिंबर बेटें). हा मलाया द्वीपसमूहांतील व आसू बेटांच्या नैर्ऋत्येकडील बेटांचा एक समूह आहे. हा समूह डच लोकांनीं आम्बोयना रेसिडेन्सीमध्यें समाविष्ट केला असून या बेटांचे लाराट व सेरा असे दोन जिल्हे पाडले आहेत. यांत अनेक लहान लहान बेटें येतात. सर्वांत मोठ्या यामडेना बेटाचें क्षेत्रफळ सुमारें १,१०० चौरस मैल असून बाकीच्या भागाचें क्षे. फ. एकंदर ९०० चौरस मैल आहे. येथील लो. सं. सुमारें २५,००० आहे. येथील रानटी लोक ६ फुटांपेक्षां देखील उंच आहेत. लोकांची कलाकुशलतेबद्दल फार प्रसिद्धि आहे. शेतकी, मासे धरणें, व गुरें बाळगणें यांवर हे लोक निर्वाह करतात.

**टिमोलिऑन** (ख्रि. पू. ४११-३३७)—एक ग्रीक सेनापति. ख्रि. पू. ३४४ मध्यें सिसिली बेटांत 'धाकटा' डायोनिसस आणि कार्थेजिअन सैन्य यांच्या विरुद्ध लढण्यास सिराक्यूझ येथील लोकांना मदत करण्याकरितां जें ग्रीक सैन्य पाठवण्यांत आलें, त्या सैन्याचा कमांडर टिमोलिऑन हा होता. त्यानें डायोनिससला सिराक्यूझमधून घालवून लावलें आणि नंतर कार्थेजिनिअन सैन्याचा पूर्ण पराभव केला. याप्रमाणें सिराक्यूझ येथील लोकांना त्यांचें स्वातंत्र्य परत मिळवून दिल्यावर टिमो-

लिऑननें आपल्या जागेचा राजीनामा दिला, आणि पूर्ण सेवानिवृत्त होऊन खाजगी रीतीनें आपलें उरलेलें आयुष्य घालवलें.

**टिम्गाड**—आफ्रिका. हें अल्जीरियांतील कॉन्स्टन्टाइन विभागांतील पडकें शहर असून चॅटनच्या आग्नेयीस २३ मैलांवर आहे. ज्युपिटरचें देवालय या शहराच्या नैर्ऋत्य भागांत आहे. याच्या उत्तरेस मोठा बाजार व पूर्वेस फोरम, नाटकगृह व न्यायमंदिर ह्या इमारती होत्या. येथे बरेच शिलालेख सांपडले आहेत व त्यांवरून येथील इतिहास लिहितां येतो.

**टिरपिझ, आल्फ्रेड फॉं** (१८४९–१९३०)—एक जर्मन ॲड्मिरल. १८९७ पासून १९१६ पर्यंत तो आरमारखात्यांत वरिष्ठ चिटणीस व नंतर मंत्री होता. १९१६ मध्यें टिरपिझचा बेथमन हॉलवेगबरोबर विरोध उत्पन्न झाला, म्हणून टिरपिझ सेवानिवृत्त झाला. पहिल्या महायुद्धांतील जर्मनीचें आरमारी सामर्थ्य टिरपिझच्या कर्तृत्वाचें फळ आहे. त्यानें महायुद्धांत पाणवुड्या बोटींचा शत्रूविरुद्ध क्रूरपणानें उपयोग करण्याची तरफदारी केली, त्यामुळें दोस्तराष्ट्रें त्याचा तिरस्कार करूं लागलीं होतीं, यांत नवल नाहीं.

**टिरोल**—ऑस्ट्रियन साम्राज्याचा एक अगदीं दक्षिणेकडील प्रांत. सेंट जर्मेनीच्या तहानें दोन भाग पाडण्यांत आले. या सर्व प्रदेशाचें क्षे. फ. ४७९० चौ. मै.. लो. सं. साडेतीन लक्ष आहे. या प्रदेशांत जर्मन व रोमन कॅथॉलिक लोकांचीच संख्या अधिक आहे. राज्यकारभाराच्या सोयीसाठीं उत्तर टिरोलचे सात जिल्हे पाडण्यांत आले आहेत. इन्स्ब्रक ही उत्तर टिरोलची राजधानी आहे. टिरोलमधील सुमारें निम्मी जमीन शेतकीला उपयुक्त आहे. शेतकी व गुरेंढोरें यांची पैदास करणें हे येथील मुख्य धंदे आहेत. हालचीं येथें मिठागरें आहेत. याशिवाय तांबें, शिसें, जस्त, गंधक, ॲस्फाल्ट, इ. खनिज पदार्थ येथें सांपडतात.

**टिळक, रे. नारायण वामन** (१८६२–१९१९)—एक अर्वाचीन मराठी कवि. रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली तालुक्यांतील करझगांव हें यांचें जन्मठिकाण. नाशिकला गणेशशास्त्री लेले यांच्याकडे यांनीं संस्कृतचें शिक्षण घेतल्यावर सन १८७७ च्या सुमारास यांनीं इंग्रजी शिक्षणास सुरुवात केली. घरच्या अडचणींमुळें इंग्रजी पांच–सहा इयत्तांच्यापुढें यांच्या शिक्षणाची मजल जाऊं शकली नाहीं. यानंतर शिक्षक, कीर्तनकार, पुराणिक यांसारखे अनेक व्यवसाय यांनीं केले. १८९१ साली नागपूरला श्री. आण्णासाहेब बूटी यांच्याकडे संस्कृत ग्रंथांचें संशोधन व भाषांतर करण्याचें काम यांनीं हातीं घेतलें व तेथेंच धर्मविषयक 'ऋषि' हें मासिक यांनीं काढलें. परंतु मतभिन्नतेमुळें या कार्याला रामराम ठोकून हे राजनांदगांवी नोकरीसाठीं गेले. तेथेंच सन १८९५ मध्यें यांनीं बाप्तिस्मा घेतला व शेवटपर्यंत खिस्तावर अढळ विश्वास ठेवून राहिले. *खिस्ती धर्म स्वीकारला असला तरी मराठी भाषेचा व संस्कृतीचा* पगडा यांच्या मनावर शेवटपर्यंत राहिला.

(१) टिळकांची कविता, (२) बापाचे अश्रु, (३) वनवासी फूल, (४) पवित्र क्रूसाचा राजमार्ग, (५) अभंगांजली, (६) माझा ओसाड पडलेला गांव, वगैरे यांचें वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे.

साधी पण मधुर व अलंकारिक भाषा, लेखनांतील तळमळ यांमुळें यांच्या काव्यास मराठी काव्यवाङ्मयांत उच्चस्थान प्राप्त झालें आहे.

**टिळक, लोकमान्य बाळ गंगाधर** (१८५६–१९२०)—हिंदुस्थानांतील एक श्रेष्ठ राजकारणी देशभक्त. *यांचा जन्म* २३ जुलै १८५६ रोजीं झाला. यांचा मूळगांव रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली तालुक्यांतील चिखलगांव हा होय. हे बालपणापासून फार बुद्धिमान् होते. १८७३ मध्यें हे डेक्कन कॉलेजमध्यें जाऊन १८७६ सालीं बी. ए., १८७९ सालीं एल्एल्. बी. झाले. व याच सुमारास सरकारी नोकरीचा राजीनामा देऊन, बाहेर पडून खासगी शाळा काढलेल्या विष्णुशास्त्री चिपळूणकरांस हे येऊन मिळाले. या न्यू इंग्लिश स्कूल शाळेस जोडून एक छापखाना काढून 'केसरी' व 'मराठा' हीं पत्रें सुरू करण्यांत आलीं होतीं त्यांत हे लिहीत असत. त्यामुळें 'केसरी–' तील बर्वे–प्रकरणीं एका लेखाबद्दल टिळक व आगरकर यांस शिक्षा भोगावी लागली. पण तीमुळें त्यांची लोकप्रियता वाढूं लागली. १८८४ मध्यें डेक्कन एज्युकेशन सोसायटी स्थापन होऊन तिचे टिळक आजीव सभासद झाले. व पुढें लवकरच फर्ग्युसन कॉलेज काढण्यांत आल्यावर तेथें ते एक उत्कृष्ट अध्यापक म्हणून चमकले. १८९० मध्यें त्यागवृत्तीच्या बाबतींत इतर सहकाऱ्यांशीं मतभेद झाल्यामुळें त्यांनीं संस्थेचा राजीनामा दिला. १८९१ सालीं संमतिवयाच्या कायद्याच्या प्रश्नांत त्यांनीं सरकारनें आमच्या सामाजिक बाबतींत हात घालतां कामा नये म्हणून सडकून टीका केली. १८९३ सालीं झालेल्या हिंदु-मुसलमानांच्या दंग्याच्या बाबतींत त्यांनीं सरकारास दोष दिला. १८९४ सालीं गणेशोत्सव व लवकरच शिवाजी–उत्सव सुरू करून त्यांनीं समाजांत पुष्कळच जागृति केली. १८९६ सालच्या दुष्काळांत यांनीं दुष्काळी कायद्याचा जनतेस फायदा मिळावा म्हणून पुष्कळ प्रचार केला व उपदेशक पाठवून महाराष्ट्रांत जागृति केली.

१८९७ सालीं पुण्यांत प्लेगनें कहर उडविला त्या वेळीं त्यांनीं गांवांत राहून हिंदु हॉस्पिटल चालविलें व लोकांस मदत केली.

त्या वेळीं घडलेल्या कांहीं अत्याचारासंबंधीं टीका केल्यामुळें त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला होऊन त्यांस १८ महिन्यांची शिक्षा झाली. परंतु एक वर्षानंतर प्रो. मॅक्समुल्लर वगैरे पाश्चात्य विद्वान् लोकांच्या मध्यस्थीमुळें त्यांची सुटका झाली. त्यानंतर ताईमहाराज प्रकरणामध्येंहि त्यांच्यावर फौजदारी खटला होऊन खालच्या कोर्टानें त्यांस शिक्षा दिली होती; पण हायकोर्टांत ते सुटले. १८९५ सालीं पुणें येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं त्यांनीं बराच पुढाकार घेतला. १९०५ मध्यें झालेल्या वंगभंगासंबंधीं यांनीं टीका करून पुष्कळच जागृति केली. या चळवळींतून स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ही चतुःसूत्री बाहेर पडली. पुढें १९०७ मध्यें कॉंग्रेसमध्यें दुफळी होऊन टिळक यांनीं कॉंग्रेस सोडली. १९०८ मध्यें बॉंबच्या अत्याचारासंबंधीं 'केसरीं'त चर्चा केल्यामुळें त्यांच्यावर राज्यद्रोहाचा खटला होऊन त्यांस सहा वर्षांची शिक्षा झाली. हा खटला त्यांनीं स्वतः चालविला. मंडाले येथें तुरुंगांत असतांना त्यांनीं 'गीतारहस्य' हा ज्यांत गीतेचा कर्मयोगपर अर्थ लावला आहे असा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. १९१४ मध्यें सुटून आल्यावर त्यांनीं कॉंग्रेसमध्यें जाऊन आपलें मताधिक्य करण्याचा प्रयत्न केला व १९१६ मध्यें कॉंग्रेस काबीज करून लखनौ-कराराच्या योगानें मुसुलमानांशींहि सख्य घडवून आणलें. याच वेळीं होमरूलची चळवळ त्यांनीं सुरू केल्यामुळें त्यांच्यावर पुन्हां खटला भरण्यांत आला व त्यांच्याकडून ४,००० रुपयांचा जामीन मागण्यांत आला. परंतु हायकोर्टानें तो रद्द केला. त्यांस याच वर्षी ६० वर्षें पूर्ण झाल्यामुळें त्यांच्या असंख्य चाहत्यांनीं एक लक्ष रुपये त्यांना अर्पण केले. ते त्यांनीं परत राष्ट्रकार्यास अर्पण केले.

महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं होमरूल संस्था काढून व दौरा करून त्यांनीं सर्वत्र जोराची जागृति केली. या कार्याचा प्रसार करण्यासाठीं १९१८ सालीं टिळक विलायतेस जाण्यास निघाले. पण सरकारी आडकाठीमुळें कोलंबोहून त्यांस परत यावें लागलें. १९१८ च्या जुलै महिन्यांत मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांचा मसुदा बाहेर पडला. परंतु त्या सुधारणा निराशाजनक, अपुऱ्या व असमाधानकारक आहेत असा त्यांवर टिळकांनीं शेरा मारून १९१९ मधील अमृतसर कॉंग्रेसमध्यें तसा ठराव करून घेतला. यानंतर चिरोल खटल्याच्या निमित्तानें ते या नवीन सुधारणांसंबंधीं हिंदी लोकमत काय आहे तें इंग्रज लोकांस स्पष्ट सांगण्यासाठीं शिष्टमंडळ घेऊन विलायतेस गेले. तेथें असतांना त्यांनीं शांतता-परिषदेकडेहि एक होमरूलचा खलिता पाठविला. तसेंच तेथें व्याख्यानें व लेख यांद्वारां अत्यंत महत्त्वाची कामगिरी केली. चिरोल केसमध्यें ते हरले व त्यांस प्रतिपक्षाचा खर्चहि भरून द्यावा लागला; पण जनतेनें त्यांस तीन लाखांची थैली अर्पण करून तो भरून काढला. परत येतांच पंजाब व खिलाफत-प्रकरणांबद्दल त्यांनीं सरकारवर जोराची टीका केली. पण त्यांच्यामध्यें व महात्मा गांधींमध्यें कांहीं राजकीय मतभेद होते. १९२० मध्यें त्यांनीं कॉंग्रेस डेमोक्रॅट पक्षाची स्थापना केली व त्या पक्षाचा जाहिरनामा प्रगट केला व नवीन सुधारणा राबवून घेण्याचें ठरविलें. परंतु थोड्याच दिवसांत मुंबई येथें १ ऑगस्ट १९२० रोजीं त्यांचा अंत झाला. त्यांच्या प्रेतयात्रेस पांच-सहा लाख लोक जमले होते; इतके ते लोकप्रिय होते व त्यांचें दहन मुंबईच्या चौपाटीवर करण्यांत येऊन तेथें पुढें एक पुतळा उभारण्यांत आला.

टिळकांस हिंदुस्थानांतील अशांततेचे जनक असें चिरोलनें म्हटलें होतें तें योग्यच होतें. त्यांनीं जनतेंत स्वराज्य नाहीं म्हणून मोठी अशांतता उत्पन्न केली व तिचाच पुढें स्वराज्यप्राप्तीला उपयोग झाला. ते समाजसुधारणेस मुळींच विरोधी नव्हते, पण राजकीय सुधारणांस प्राधान्य देणारे होते. त्यांनीं राजकारणांत प्रथम लोकजागृतीचेंच महत्त्वाचें कार्य केलें. ते फार बुद्धिमान व विद्वान् होते. त्यांचें गीतारहस्य, ओरायन व आर्टिक होम हे ग्रंथ चिरकालीन महत्त्वाचे व संशोधनपर आहेत.

**टीकाशास्त्र** (वाङ्मयीन)—वाङ्मयकृतीवर अभिप्राय देण्याचें, त्या कृतीची फोड करून, तीवर अनुकूल-प्रतिकूल टीका करून अभिप्राय देण्याचें एक शास्त्र बनलें आहे. संस्कृत वाङ्मयांत साहित्यशास्त्र यासाठींच आहे. पाश्चात्य टीकाशास्त्राचा आद्यगुरु आरिस्टॉटल होय. ऐतिहासिक, आत्मचरित्रवादी, गूढवादी, परंपरावादी, असे कांहीं टीकासंप्रदाय आहेत. ग्रीक टीकाकारांप्रमाणेंच सिसेरो, होरेस, वगैरे रोमन टीकाकार होऊन गेले. अंधारयुगाच्या अखेरीस पहिला मोठा टीकाकार झाला तो डान्टे होय. विद्यापुनरुज्जीवनाच्या चळवळीमुळें वाङ्मयाला सौंदर्याचें अधिष्ठान लाभलें. व्हिडा, स्कालिजर, टासो, वगैरे या अमदानींतील होत. यानंतर इटलींतून टीकाशास्त्राचा ओघ फ्रान्स, इंग्लंड व इतर युरोपच्या प्रदेशांत गेला. इंग्लंडमध्यें १६ व्या व १७ व्या शतकांत कॉक्स, थॉमस विल्सन, रॉजर आस्चॅम हे टीकाकार पुढें आले. बेन जॉन्सननें आरिस्टॉटलची पद्धति उचलली होती. फ्रान्समध्यें कॉर्नील, ब्वालो, व्होल्तेर, दिदरो व सेंट ब्व हे उत्कृष्ट टीकाकार होऊन गेले. इंग्लंडांत ड्रायडन—ॲडिसननंतर डॉ. जॉनसन जो आला त्यानें तर या क्षेत्रांत क्रांतिच करून सोडली. मॅथ्यू आर्नोल्ड, मेकॉले, स्विनबर्न, जॉर्ज सेंट्सबरी यांसारखे टीकाविशारद फार लोकप्रिय झाले. जर्मनींतहि गॉडश्चेड व बोडमर, शिलर व गोएटे, विंकलमन व

लेसिंग, दोन श्लेजेल या जोड्या सुप्रसिद्ध असून, हम्बोल्ड, वोल्फ, नित्शे वगैरे यांच्या जोडीला होतेच.

संस्कृतांतील साहित्यशास्त्राला धरून प्रथम मराठींत हें शास्त्र पुढें आलें. संतकवींनीं मराठी काव्याच्या बाबतींत थोडी स्वतंत्र विचारसरणी अवलंबिलेली आढळून येते. पुढें पाश्चात्य वाङ्मयाचा धडाक्याचा संसर्ग येऊन पाश्चात्य धर्तीवर मराठी टीकावाङ्मय तयार होऊं लागलें. 'केकावली' वरील अनेक टीका पाहिल्यास या गोष्टी ध्यानांत येतील. गुंजीकर, महाजनी, चिं. वि. वैद्य, मा. व्यं. लेले, न. चिं. केळकर, श्री. कृ. कोल्हटकर, वा. म. जोशी, ना. गो. चापेकर, बा. अ. भिडे, वगैरे कित्येक विद्वान्, उत्कृष्ट टीकाकार म्हणून मागच्या पिढींत पडतात. नवीन पिढींत ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. के. क्षीरसागर यांसारख्यांना प्रमुख स्थानीं बसवावें लागेल. विविधज्ञानविस्तार, मासिक मनोरंजन, लोकशिक्षण, रत्नाकर, चित्रमयजगत्, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, सह्याद्रि व कांहीं वृत्तपत्रें यांनीं टीकावाङ्मयाला चांगला वाव दिला व देत आहेत. विश्वविद्यालयीन उच्च अभ्यासक्रमांत टीकाशास्त्र विषय नेमला गेला असल्यानें कांहीं पद्धतशीर अभ्यास होतो. पाश्चात्य टीका-संप्रदायानुसार मराठींतहि विविध संप्रदाय आहेत. या टीकांतून वाङ्मयाचे सर्व प्रांत जसे येतात तसेंच नवमतवाद, मनोविश्लेषण, कलेसाठीं कला, वास्तववाद, गूढवाद, काव्यानंद, यांसारखे प्रचलित विषयहि येतात. ग्रंथसमीक्षणाचा प्रकार आहेच. या समीक्षणाचे संग्रहहि निघाले आहेत. तथापि टीकाशास्त्रावर स्वतंत्र मोठा ग्रंथ नाहीं व या शास्त्राचा सांगोपांग अभ्यास करून टीका कशी करावी हें शिकविणारे अधिकारी पुरुष नाहींत. "आपल्यामधील टीकावाङ्मय जितकें निर्दोष असावयास पाहिजे तितकें अजून झालें नाहीं. त्यामध्यें मत्सर, दुराग्रह, एकांगीपणा, याचें प्राबल्य दिसून येतें." असा श्री. कृ. कोल्हटकरांचा जुना अभिप्राय आजहि लागू पडतो. (डॉ. वाटवे—मराठी टीकाशास्त्र पाहा).

संगीत आणि नाट्य यांवर अलीकडे टीकात्मक लेख नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात. प्रा. मंगळूरकर यांची संगीतावरची टीका फार खोल अभ्यासाची दर्शक व मार्मिक असते. श्री. टेंबे, श्री. चिंतामणराव कोल्हटकर, प्रा. दाभाढे, वगैरेंच्या नाट्यावरच्या लेखांतून नाट्याचा इतिहास, आधुनिक नाटकांचे गुणदोष, रंगभूमि, इ. चें सूचक विवेचन असतें. तथापि खोल अभ्यास आढळून येत नाही. बरेच टीकात्मक प्रबंधहि प्रसिद्ध झाले आहेत. त्यांमध्यें प्रा. जोग यांचा 'केशवसुत' विशेष उल्लेखनीय म्हणतां येईल. आज मराठींत स्वतंत्र व शास्त्रशुद्ध सर्वे टीकाशास्त्र तयार होत आहे यांत शंका नाहीं.

**टुकुमान**—आर्जेन्टाइन, एक प्रांत व शहर. या राजधानीच्या शहरांत अल्कोहोल, बीरदारू आणि साखर होते. शिवाय नारिंगें व ऊंस यांची लागवड पुष्कळ होते. टुकुमन येथें विद्यापीठ आहे (स्था. १९१४). लोकसंख्या १,५७,९२६ आहे. प्रांताचें क्षे. फ. ८,८१७ चौ. मै. व लो. सं. २,१४,२१९.

**टुप्पर, मार्टिन फरक्हार** (१८१०–१८८९)—एक इंग्रज लेखक. त्याची सर्व कीर्ति 'प्रॉव्हर्बियल फिलॉसफी' (लौकिक तत्त्वज्ञान) या नांवाच्या त्याच्या ग्रंथामुळें झाली आहे. हा ग्रंथ प्रथम १८३८ सालीं प्रसिद्ध झाला. नंतर त्याचेच पुन्हां पुन्हां वाढवून चार आवृत्तिग्रंथ १८३९ ते १८७६ पर्यंत प्रसिद्ध झाले. आणि पहिल्या ग्रंथाच्या सुमारें ६० आवृत्त्या निघून अमेरिकेंत दहा लक्ष प्रती खपल्या; आणि ग्रेट ब्रिटनमध्यें २,५०,००० प्रती खपल्या. ग्रंथकार व प्रकाशक यांना प्रत्येकीं १०,००० पौंड मिळाले. व्हिक्टोरियन वाङ्मयामधील या ग्रंथाचा इतका भयंकर खप झाला, हें एक मोठें नवल आहे. कारण तसें पाहिलें तर या ग्रंथांतलें तत्त्वज्ञान जुनें, शिळें आहे; शब्दयोजना मूर्खपणाची आहे आणि जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोन अगदीं बालिश आहे.

**टुला**—हें शहर रशियांत आहे. पूर्वी याच नांवाच्या राज्याची राजधानी येथें होती. हल्लीं येथें चाकू, कातऱ्या व बंदुका करण्याचे कारखाने आहेत. लो. सं. २,७२,०००.

**टूक, जॉन हॉर्न** (१७३६–१८१२)—एक ब्रिटिश राजकारणी व भाषाशास्त्रज्ञ. १७७७ मध्यें त्यानें अमेरिकन युद्धाचा निषेध केल्याबद्दल राजद्रोहाच्या आरोपावरून त्याच्यावर खटला करण्यांत आला. त्यांत त्याच्यावर गुन्हा शाबीत होऊन त्याला एक वर्षाची कैद आणि २०० पौंड दंड ही शिक्षा झाली. तो कांहीं काळ ओल्ड सेरम मतदार संघातर्फे पार्लमेंटचा सभासद होता. त्यानें पुष्कळ राजकीय निबंध लिहिले व त्याचा भाषाशास्त्रविषयक ग्रंथ 'एपिआ प्टेरोएन्टा' नांवाचा आहे.

**टूरिन**—हें शहर उत्तर इटलींत पीडमॉन्ट संस्थानांत आहे. टूरिन या नांवाचा प्रांत असून त्याची राजधानी हें शहर आहे. या शहरांत एक ख्रिस्ती देवालय, एक राजवाडा, विद्यापीठ आणि माडामा राजवाडा आहे. शिवाय एक रॉयल मिलिटरी ॲकेडमी आणि अनेक कलांचें शिक्षण देणारी शाळा आहे. येथें रेशीम, लोंकर, कापूस आणि ताग यांच्या कापडाच्या गिरण्या; मोटारी, कागद, लोखंडी सामान, मातीचीं व चिनी मातीचीं भांडीं या जिनसांचे कारखाने आहेत. प्राचीन रोमन काळांत ऑगस्टस बादशहाच्या वेळीं टूरिन ही एक वसाहत बनली. पुढें ११ व्या शतकापासून १५ व्या शतकापर्यंत हा प्रदेश कधीं फ्रान्सच्या ताब्यांत आणि कधीं साव्हॉय संस्थानच्या ताब्यांत असे. १८६० पर्यंत टूरिन हें शहर सार्डिनियाची राजधानी

होतें. आणि नंतर १८६५ पर्यंत युनायटेड इटलीची राजधानी होतें. या शहराची लो. सं. ६,२९, ११५ आहे.

**टूर्गेनीव्ह, ईव्हान सर्गेयेविच** ( १८१८-१८८३ )—एक रशियन कादंबरीकार. याचें पहिलें महत्त्वाचें पुस्तक 'एका खेळाडूचे अनुभव' हें असून त्यानंतर त्यानें बऱ्याच लघुकथा व नाटकें लिहिलीं. त्याची अगदीं अगोदरची कादंबरी 'डिमट्री रूडिन' ही १८५५ मध्यें प्रसिद्ध झाली. आणि त्यानंतर त्याच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या त्या—'हेलेन', 'सरदारांचें घरटें (लिसा)', 'बाप आणि मुलें', 'धूर', 'एक अभागी', 'उन्हाळी पूर', 'बीन लागवडीची जमीन', इत्यादि. टर्गेनीव्ह हा कादंबरीकारांत उच्च दर्जाचा कादंबरीकार मानला जातो. सौंदर्य आणि कोमलता हे त्याच्या लेखनाचे मुख्य गुण आहेत.

**टूर्नर, सायरिल** ( १५७५-१६२६ )—एक इंग्रज नाटककार. त्याची कीर्ति दोन दुःखान्त नाटकांवर आधारलेली आहे. तीं नाटकें—'दि रिव्हेंजर्स ट्रॅजेडी' (१६०७), आणि 'दि एथेयिस्ट्स ट्रॅजेडी' ( १६११ ). यांपैकीं दुसरें नाटक अगोदर लिहिलें गेलें होतें असें दिसतें, कारण 'दि एथेयिस्ट्स ट्रॅजेडी' हें नाटक नवशिक्या इसमानें लिहिलेलें आहे हें स्पष्ट दिसतें आणि 'दि रिव्हेंजर्स ट्रॅजेडी' हें नाटक अधिक जोरदार आणि अधिक व्यवस्थित रचलेलें दिसतें. या दोन्ही नाटकांत पात्रांचा स्वभावपरिपोष चांगला झालेला नाहीं, आणि त्यांत नाट्यकलानैपुण्यहि फारसें नाहीं; परंतु त्यांतला काव्यांचा भाग सुंदर आहे आणि करुणरसाचा परिपोष सुरेख झाला आहे. त्यामुळें वेबस्टर नाटककाराच्या उत्कृष्ट नाट्यकृतींच्या तोडीचीं हीं नाटकें आहेत, असें म्हणतां येईल.

**टूलाँ**—हें फ्रान्स देशांतील व्हर विभागांतील एक बंदर, पहिल्या प्रतीचा किल्ला व आरमाराचें ठिकाण. येथील इमारतींत सेंट मेरी मेजेरचें देवालय, सेंट लुईचें देवालय, प्राणिसंग्रहालय, नौकानयन विद्यालय, मोठमोठ्या लष्करी शिपायांच्या चाळी ह्या मुख्य होत.

दारू, धान्य, लांकूड, कोळसा, ताग, लोखंड, साखर, कॉफी, व ताजे मासे हा येथील आयात माल असून मीठ, अशुद्ध तांबें, कातडीं कमावण्याकरितां व तेलाकरितां लागणाऱ्या झाडाच्या साली हा निर्गत माल आहे. शस्त्रें तयार करण्याचे कारखाने, जहाजें बांधणें, मासे धरणें, फीत करणें व दारू तयार करणें हे येथील व्यवसाय आहेत. लो. सं. दीड लाख.

ह्या शहरावर अनुक्रमें गॉथ, बर्गेडियन, फ्रँक, सॅरासीन या लोकांनीं स्वाऱ्या केल्या. १७९३ सालीं प्रजासत्तावादी लोकांचा याला गराडा पडला. ह्यांत नेपोलियन बोनापार्टनें योद्धा म्हणून नांव मिळविलें. पुढें इंग्लंडवर स्वारी करण्याकरिता नेपोलियननें येथेंच सर्व फौज एकत्र केली.

**टूलुझ**—फ्रान्सच्या नैर्ऋत्य भागांतील हाटेंगरोन विभागाचें मुख्य शहर. हें शहर गरोन नदीच्या उजव्या कांठावर वसलें आहे. लो. सं. २,१३,२२०.

टूलुझच्या इमारतींत सर्वांत चित्ताकर्षक असें सेरनिन किंवा सॅटर्निनचें ख्रिस्ती देवालय होय. येथें आर्चबिशपचें राहण्याचें ठिकाण असून दिवाणी कचेरी व अपील कचेरी आहे.

टूलुझ हें व्यापारी व उद्योगाचें केंद्रस्थान असून येथें घोडे, दारू, धान्य, फुलें, कातडीं, तेलें यांचा बाजार भरतो. येथें तंबाखूचे कारखाने, धान्य दळण्याच्या चक्क्या व लांकूड कापण्याचे कारखाने, शेतकीस लागणारीं अवजारें तयार करण्याचे कारखाने, खतें तयार करण्याचे कारखाने, वगैरे उद्योगधंदे चालतात.

**टे**—ही स्कॉटलंडमध्यें सर्वांत मोठी नदी आहे. ही नदी आर्गाइल शायरच्या सरहद्दीनजीक उगम पावून लॉक टे या सरोवरास मिळते आणि तेथून पुन्हां पुढें प्रवाह वाहत जातो. त्याला अनेक नद्या मिळतात. पर्थ शहरानजीक ती नदी इतकी रुंद होते कीं, तिच्यांतून जहाजांची वाहतूक होऊं शकते. अखेर ती नदी उत्तर समुद्राला मिळते. तिची लांबी १२० मैल आहे. तिच्या कांठीं डंडी हें मुख्य बंदर आहे. सालमन जातीचे मासे धरण्याचा धंदा फार महत्त्वाचा आहे.

**टेक, जोहान लुडविग** ( १७७३-१८५३ )—एक जर्मन ग्रंथकार. त्यानें 'कलेक्टेड नॉव्हेल्स' हा कादंबऱ्यांचा एकत्रित ग्रंथ प्रसिद्ध केला, आणि त्याची एकदम तत्कालीन वाङ्मयभक्तांच्या पहिल्या श्रेणींत गणना होऊं लागली. नंतर १८२६ मध्यें त्यानें 'ड्रामाटर्जिश ब्लाटर' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यानें शेक्सपिअरच्या ग्रंथांचा अभ्यास केला आणि त्यासंबंधीं एक ग्रंथ लिहिला; तसेंच श्लेजेल या जर्मन विद्वानानें शेक्सपिअरच्या नाटकांचें जर्मन भाषेंत भाषांतर करण्याचें काम सुरू केलें होतें तें काम टेकनें पुढें चालू ठेवलें.

**टेकचंद, मुनशी**—एक फारसी कवि. याचें कवितेंतील नांव बहार होतें. हा जातीनें खत्री ( हिंदू ) असून यानें 'बहार अजम' आणि 'नवादीर उल् मसादीर' हे दोन ग्रंथ केले आहेत. पैकीं पहिला हा फारसी भाषेंतील म्हणींचा कोश आहे. तो त्यानें १७३९ सालीं रचला. याशिवाय त्यानें 'अब्ताल झरुरत' हाहि एक ग्रंथ केला आहे.

**टेकरीराज**—बिहार, गया जिल्ह्यांतील जहागीर. आरंभीं धीरसिंग नांवाच्या लहानशा जमीनदारानें ही जहागीर स्थापिली. धीरसिंगाचा मुलगा सुंदरसिंग यानें नादिरशाहाच्या स्वारीनें १७३९ सालीं झालेल्या गडबडीचा फायदा घेऊन शक्य तेवढी जहागीर

वाढविली. याला अहमदशहानें राजा ही पदवी दिली. याच्या मागून याचा दत्तक पुत्र बुनीआद हा गादीवर आला. परंतु १७६३ सालीं कासीम अल्लीनें त्यास कपटानें बुडवून मारलें. नंतर मोठ्या कष्टानें याचा मुलगा ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या स्वाधीन केला. हा मुलगा स. १८४० त मरण पावल्यावर हें राज्य त्याच्या हितनारायण व मोदनारायण नांवाच्या दोन मुलांत वांटलें गेलें. पुढें हितनारायण साधु बनला व त्यानें आपलें राज्य इंद्रजितकुंवर नांवाच्या आपल्या बायकोस दिलें. पुढें या राणीनें महाराजा रामनारायण कृष्णसिंह यास दत्तक घेतलें. परंतु हा लवकरच मरण पावला. तेव्हां सर्व राज्य राजरूपकुंवर नांवाच्या त्याच्या बायकोस मिळालें. या राणीनें तें आपली मुलगी राधेश्वरीकुंवर हिला दिलें. स. १८८६ त हिचा मुलगा महाराजा कुमार गोपालशरण नारायणसिंग यास ९ आणे हिश्शाचें राज्य मिळालें. याचें उत्पन्न बारा लक्ष आहे.

७ आण्यांचा हिस्सा मोहननारायणसिंगाच्यानंतर त्याच्या दोघी बायकांना मिळाला. त्यांनीं १८७० सालीं बाबूराम बहादुरसिंग नांवाच्या पुतण्यास राज्य दिलें. त्यानें मरणानंतर आपल्या नातीला तें दिलें व तिनें आपली मुलगी राजकुमारी भुवनेश्वरकुंवर हिला दिलें. या सात आण्यांच्या हिश्शाच्या राज्यांत ७१५ खेडीं असून, क्षे. फ. ५२३ चौ. मैल आहे. उत्पन्न सरासरी दहा लक्ष.

**टेक्सस**— अमेरिकन संयुक्त संस्थानांत एक महत्त्वाचें संस्थान. हें दक्षिण मध्यभागांत आहे. क्षे. फ. २,६७,३३९ चौ. मैल व लो. सं. ६४,१४,८२४. याचा कांहीं भाग मेक्सिकोला लागून आहे व कांहीं मेक्सिकोच्या आखाताच्या कांठीं आहे. कमाल लांबी-रुंदी अनुक्रमें ७६० व ६२० मैल आहे. १८३६ पर्यंत याचा समावेश मेक्सिकोमध्येंच होत होता. अगदीं प्रथम स्पॅनिश लोकांनीं येथें शिरकाव केला व वसाहती स्थापल्या. प्रथम स्पॅनिश सरकारच्या व नंतर मेक्सिकन सरकारच्या संमतीनें अमेरिकन लोक या संस्थानांत वसाहतीकरतां उतरले. पुढेंहि त्यांची वाढत्या प्रमाणांत आवक चालूच होती. कांहीं काळानें स्पॅनिश अमलाखालीं राहणें इष्ट न वाटल्यानें त्यांनीं आपला कारभार स्वतंत्रपणें पाहण्यास सुरवात केली व शेवटीं १८३६ च्या मार्चच्या सुरवातीस आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. पुढे अमेरिका ( संयुक्त संस्थानें ) व मेक्सिको यांच्या दरम्यान युद्ध झालें. त्यात १८४५ सालीं हें अमेरिकन युनियनमध्यें दाखल झालें. हा शेतकीप्रधान देश आहे. धान्यें, फळें व दूधदुभतें पुष्कळ. सरकीचें तेल, कापड, इमारती दगड हीं तयार होतात. कोळसा, गंधक, पेट्रोलियम, जिप्सम, ग्रॅनाइट, रुपें, इ. खनिज पदार्थ होत. ऑस्टिन व वाको या ठिकाणीं विद्यापीठें आहेत.

**टेगनेर, एसैअस** ( १७८२–१८४६ )— एक स्वीडिश कवि. त्याला १८२४ सालीं व्हेक्झीओचा बिशप नेमण्यांत आलें. त्याचा मुख्य ग्रंथ 'फ्रिथ जोफ्स सागा' हें महाकाव्य होय.

**टेगस**— ही नदी आयबेरियन द्वीपकल्पांतल्या नद्यांमध्यें सर्वांत मोठी असून ही स्पेनमध्यें उगम पावून पोर्तुगालमधून वाहत जाऊन अटलांटिक महासागरास मिळते. तिची लांबी ५४० मैल असून तिच्या कांठीं लिस्बन व टोलेडो हीं शहरें आहेत.

**टेंगूळमाशी**—( गाल फ्लाय ). हा एक जातीचा कीटक आहे. हा किडा ओक वगैरे वृक्षांमध्यें छिद्र करून त्यांत आपलीं अंडीं व एक प्रकारचा रस घालतो. यामुळें त्या झाडास टेंगळासारख्या गांठी उत्पन्न होतात. या गांठी रंगाच्या कामीं उपयोगांत आणतात. आपल्याइकडे फणसटाच्या झाडाला अशा गांठी येतात. त्यांस फणसांचें किंवा फणस-अळवें म्हणतात.

**टेट, नाहुम** ( १६५२–१७१५ )—एक इंग्रज नाटककार, कवि व राजकवि. त्यानें शेक्सपिअरच्या अनेक नाटकांत सुधारणा करण्याचें कार्य सुरू केलें. 'दुसरा रिचर्ड' या शेक्सपिअरच्या नाटकाचें रूपांतर करून स्वतःच्या नाटकाला 'दि सिसिलियन यूझरपर' ( सिसिलीचा दडप्या ) असें नांव दिलें, आणि कोरिओलेनसच्या रूपांतरित नाटकाला 'दि इन्ग्रॅटिट्यूड ऑफ ए कॉमनवेल्थ' ( एका लोकराज्याची कृतघ्नता ) हें नांव दिलें. 'किंग लिअर' याचें त्यानें जें रूपांतरित नाटक केलें त्यामुळें शेक्सपिअरचें मूळ 'किंग लिअर' नाटक १८४० पर्यंत स्टेजवर मुळींच दिसलें नाहीं. १६९२ मध्ये टेटला राजकवि ( पोएट लॉरिट ) करण्यांत आलें. १६९६ मध्यें त्याचें 'न्यू व्हर्शन ऑफ दि साम्स' ( सामांची नवीन संहिता ) हें पुस्तक प्रसिद्ध झालें.

**टेट, पीटर गथ्री** ( १८३१–१९०१ )— एक स्कॉटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. प्रथमतः त्यानें कांहीं दिवस एडिम्बर्ग येथील विश्वविद्यालयांत शिक्षण घेतलें व नंतर तो केंब्रिज येथें शिक्षण घेण्यास गेला व १८५२ सालीं त्यानें 'स्मिथ' पारितोषिक आणि सीनियर रँगलरची पदवी मिळविली. पुढें दोन वर्षें केंब्रिज येथें घालवून तो बेलफास्ट येथील क्वीन्स कॉलेजात प्रोफेसर झाला. त्या ठिकाणीं थॉमस अन्ड्रू याच्याशीं त्याची ओळख झाली. येथें या दोघांनीं मिळून ओझोन वायूवर प्रयोग केले व ऑक्सिजन आणि इतर वायू यांच्यांतून विद्युत्प्रवाह गेला असतां काय परिणाम होतात यासंबंधानें त्यांनीं प्रयोग करून पाहिले. पुढें टेटची हॅमिल्टनबरोबर ओळख झाली. १८६० सालीं याला एडिंबर्गच्या कॉलेजांत प्रोफेसर नेमिलें. या ठिकाणीं त्यानें शेवटपर्यंत काम केलें.

उष्णता, प्रकाश, द्रव्याचे गुणधर्म, गतिशास्त्र, गत्युष्णताशास्त्र यांवर त्यानें उत्तम ग्रंथ लिहिले आहेत. लॉर्ड केल्व्हिन आणि टेट या दोघांनीं मिळून पदार्थविज्ञानशास्त्र नूतन पद्धतीनें लिहिण्याचें ठरविलें. या धोरणानुसार या दोघांनीं अठरा वर्षें स्वतंत्र रीतीनें काम केलें.

**टेट गॅलरी**—हें लोकप्रसिद्ध नांव इंग्लंडमधील 'नॅशनल गॅलरी ऑफ ब्रिटिश आर्ट' (ब्रिटिश कलाप्रदर्शन) या संस्थेला पडलें आहे. कारण हा कलावस्तुसंग्रह मूळ सर हेन्री टेट यानें १८९७ सालीं राष्ट्राला देणगी म्हणून दिला; म्हणून टेट गॅलरी हें नांव या संस्थेला प्राप्त झालें. टेट हा एक ब्रिटिश कारखानदार असून त्यानें साखरेच्या धंद्यांत पुष्कळ पैसा मिळविला. तो कलाप्रेमी असे. सर जोसेफ ड्युव्हीन याच्या देणगीमुळें १९१० सालीं 'टर्नर पाखे' बांधतां आलें. टेटगॅलरींतील वस्तुसंग्रह अर्वाचीन ब्रिटिश कलेचा प्रातिनिधिक म्हणतां येईल.

**टेन, हिप्पोलाइट अडोल्फ** (१८२८–१८९३)—एक फ्रेंच टीकाकार व इतिहासकार. फ्रेंच व लॅटिन गद्य किंवा पद्य लिहिण्यांत त्याचा हातखंडा होता. १८५१ सालीं त्यास टूलॉ येथील विद्यालयांत कांहीं दिवसांकरितां तत्त्वज्ञानाचा अध्यापक नेमलें. लोकसत्ताक राज्यपद्धतींतील अध्यक्षाच्या जाहीरनाम्यावर त्यानें सही करण्याचें नाकारल्यावरून त्याला बोसँकोनच्या लिसामध्यें सहाव्या दर्जाचा अध्यापक नेमलें. १८८३ सालीं त्याला लष्करी ॲकेडमीमध्यें इतिहास व जर्मन भाषेचा परीक्षक नेमलें. इ. स. १८७१ मध्यें त्याला युनिव्हर्सिटीनें डॉक्टरची पदवी दिली.

१८८४ सालीं आपला अध्यापकाचा धंदा सोडून तो वाङ्मयसेवक बनला. फ्रेंच राज्यक्रांतीवर तो लिहीत असलेल्या पुस्तकांपैकीं कांहीं पुस्तकें अपुरींच राहिलीं. त्याच्या ग्रंथांपैकीं 'ला फिलॉसॉफी द ला आर्ट' (कलेचें तत्त्वज्ञान), 'ला एन्शंट रेजीम' (जुनी अमदानी), 'ला रेव्होल्यूशन' (राज्यक्रांति) व 'ला रेजीम मॉडर्न' (नवीन अमदानी), वगैरे ग्रंथ मुख्य आहेत.

**टेनिअर्स, डेव्हिड** (१५८२–१६४९)—एक फ्लेमिश चित्रकार. त्यानें मुख्यतः जत्रा, खेडवळ लोकांचे खेळ आणि मद्यपानाचे जलसे यांचीं चित्रें काढलीं आहेत. आणि या तऱ्हेच्या चित्रकलेचा तो आद्यजनक असून पुढें त्याच्या मुलाने ही चित्रकला पूर्णावस्थेस नेली. त्याचा मुलगा धाकटा डेव्हिड टेनिअर्स, (१६१०–१६९०) हा अतिशय लोकप्रिय झाला होता. त्याला दरबारचा चित्रकार नेमण्यांत आलें. जत्रा, बाजार, मेजवान्या, पोलिसचौक्या (गार्ड–रूम्स), आणि पानगृहें हे विषय टेनिअर्सच्या चित्रांचे सामान्यतः असत. त्यानें एकंदर ७०० हून अधिक चित्रें काढलीं, तीं युरोपांतील खाजगी व सार्वजनिक चित्रालयांत (गॅलरीज्) ठेवलेलीं आहेत.

**टेनिस**—एक जुना चेंडूचा खेळ. यापासून पुढें लॉन टेनिस (पाहा) खेळ निघाला. क्रीडांगणाच्या मध्यें जाळें लावून दोन भाग पाडतात. चेंडू जमिनीवर पडूं द्यावयाचा नाहीं हा खेळांतील मुख्य उद्देश. १६ व्या शतकांत हा खेळ इटली, फ्रान्स व इंग्लंड या देशांत खेळत. आजहि कांहीं थोड्या ठिकाणीं हा खेळला जातो. क्रीडांगणावर भिंती व पडव्या बांधून व फरशीची जमीन करून हा खेळ खेळतात. इंग्लंडमध्यें १३ व्या शतकांत हा खेळ सुरू झाला. व दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दींत मोठ्या लोकांना हा फार प्रिय होता.

**टेनिसन, आल्फ्रेड** (१८०९–१८९२)—एक विख्यात इंग्रज कवि. ह्याचें शिक्षण केंब्रिज येथील ट्रिनिटी कॉलेजांत झालें. त्या वेळीं त्याच्याबरोबर अनेक होतकरू तरुण होते, त्यांपैकीं आर्थर हेन्री हॅलॅम हा टेनिसनचा अगदीं जिवलग मित्र बनला. त्याचा पहिला कवितासंग्रह (मुख्यतः भावगीतात्मक) १८३० मध्यें प्रसिद्ध झाला, व दुसरा

कवितासंग्रह १८३३ मध्यें प्रसिद्ध झाला. पुढें १८४२ मध्यें २ कवितासंग्रह प्रसिद्ध झाले. या दोन कवितासंग्रहांत टेनिसननें केलेल्या कवितांचे सर्व प्रकार दृष्टीस पडतात. ते प्रकार असे—१ इंग्रजांचें ग्रामीण जीवन, २ मध्ययुगीन अद्भुत कथा, ३ प्राचीन ग्रीक–लॅटिन दंतकथा, ४ जीवनमरणविषयक गूढता आणि अमरत्व. टेनिसनच्या यानंतरच्या कविताहि याच विषयांवर आहेत. पण त्यांत याच कल्पनांचा अधिक विस्तार, अधिक उच्च काव्यगुण आणि अधिक बोधतत्परवृत्ति दिसून येते. टेनिसनचें 'प्रिन्सेस' हें काव्य (१८४७–१८५३) 'ज्यू डेस्प्रिट' याची सुधारून फार वाढविलेली आवृत्ति आहे; परंतु हें काव्य टेनिसनच्या उच्च काव्यगुणांनीं मंडित झालेलें असल्यामुळें अतिशय रम्य झालें आहे. टेनिसनच्या 'इन् मेमोरियम' या काव्यामध्यें १३२ विभाग असून एकेका भागांत एकेक मानवी वृत्ति वर्णन केलेली आहे. हॅलॅम या प्रिय मित्राच्या मरणामुळें टेनिसनला झालेलें दुःख आणि त्यामुळें मृत्यूसंबंधींचे त्याचे विचार आणि आधुनिक शास्त्रापुढील बिकट प्रश्न अशा अनेक विषयांचा समावेश या काव्यांत केलेला आहे. 'दि ओड

ऑन दि डेथ ऑफ दि ड्यूक ऑफ वेलिंग्टन' (ड्यूक ऑफ वेलिंग्टनच्या मृत्यूवर गीत) (१८५२), आणि 'मॉड ॲन्ड अदर पोएम्स' या कवितांमध्यें टेनिसनची भावनानुरूप ताल-बद्धता आणि वृत्तान्तर करण्याची शैली चांगली दिसून येते. टेनिसनचे सर्वात महत्त्वाचें काव्य 'आयडियल्स ऑफ दि किंग' (राजाचे आदर्श) हें असून तें हप्त्याहप्त्यांनीं १८७५ पासून १८८५ पर्यंत पुरें झालें.

टेनिसननें आपल्या उतारवयांत लिहिलेल्या कांहीं कविता अधिक सरस असून, त्या कविता टेनिसनच्या इतर गोठाल्या काव्यांपेक्षां, अधिक काल लोकांना आवडत राहतील असें वाटतें. त्यानें नाटकें लिहिलीं तीं— 'क्वीन मेरी' (१८८५), 'हॅरोल्ड' (१८७७), 'बेकेट' (१८८४), इत्यादि आहेत. परंतु या नाटकांना फारसें महत्त्व नाहीं. शिवाय त्यानें लिहिलेल्या 'ल्युक्रेटिअस' (१८६८), 'दि रिव्हेंज: ए बॅलड ऑफ दि फ्लीट' (१८७८), 'बॅलड्स ॲन्ड अदर पोएम्स' (१८८०), 'टिरेसियस ॲन्ड अदर पोएम्स' (१८८५); 'लॉक्स्ले हॉल सिक्स्टी ईअर्स आफ्टर' (१८८६), 'डेमेटर ॲन्ड अदर पोएम्स' (१८८९), 'दि डेथ् ऑफ एनोन्' (१८९२) या कवितासंग्रहांत पूर्वीसारखी तेजस्विता नाहीं. तथापि या संग्रहांतहि कांहीं कांहीं कविता उत्कृष्ट असून त्यांत टेनिसनचा उत्कट देशाभिमान, सहृदयता आणि मानवाच्या भवितव्यतेबद्दल गूढ विचार आणि तळमळ नव्या नव्या शास्त्रीय शोधांबद्दल आशा, आकांक्षा आणि भीति हे विशेष दृष्टीस पडतात. टेनिसनला वर्ड्स्वर्थनंतर 'पोएट लॉरेट' (राजकवि) हें पद १८५० मध्ये मिळालें, आणि १८८४ मध्यें त्याला 'बॅरन ही पदवी मिळाली.

**टेनेरीफ**—हें कॅनेरी बेटांपैकीं सर्वांत मोठें बेट आहे. ७८२ चौ. मैल क्षेत्रफळ. सांताक्रूझ हें बेट या द्वीपसमूहाची राजधानी आहे. टेनेरीफ बेटाचें एक मोठें वैशिष्ट्य तेथें असलेलें १२,१८२ फूट उंचीचें शिखर, व त्यावर एका ज्वालामुखीचें ३०० फूट व्यासाचें असलेलें मुख, हें होय. येथें मका, गहूं, बटाटे, फळफळावळ, मध, टोमॅटो, केळीं, किरमिजी रंग (या रंगाचे कृमी), दारू हीं मुख्य पिकें व पदार्थ होतात. लो. सं. २,२४,३२९.

**टेनेसी**—अमेरिका, संयुक्त संस्थानें, यांतील दक्षिण मध्य-भागांतील एक संस्थान. क्षेत्रफळ ४२,२४५ चौरस मैल. टेनेसी व मिसिसिपी या मोठ्या नद्या वाहतात. मध्यभागीं ५,००० चौरस मैलांचें पठार आहे. नॅशव्हिले हें मुख्य ठिकाण आहे आणि मेम्फिस हें सर्वांत जास्त वस्तीचें शहर आहे. ह्या संस्थानां-तील मुख्य व्यवसाय शेतीचा व शेतीपासून उत्पन्न होणाऱ्या पदार्थांवरच्या उद्योगधंद्याचा. जनावरांची पैदास फार मोठी आहे. तंबाखू, आटा, मौल्यवान् इमारती लांकूड, हे व्यापाराचे महत्त्वाचे पदार्थ आहेत. नाना प्रकारची खनिज संपत्ति विपुल आहे. लो. सं. २९,१५,८४१.

याचे डिसोटो व ला सेली हे अगदीं पहिले संशोधक होत. व्हर्जिनियांतील वसाहतवालेहि स्वतः खालीं आलेच होते. १७६८ मध्यें फोर्ट स्टान्विक्सच्या तहानें स्थानिक इंडियनां-पासून गौरवर्णीयांना बरेच हक्क मिळवितां आले. १७६३ मध्यें फ्रेंच लोकांनीं काढता पाय घेतला व आपले सर्वाधिकार व हक्क त्यांनीं ब्रिटिशांना दिले. १७९६ मध्यें टेनेसी संस्थान युनियन-मध्यें दाखल झालें.

नॅशव्हिले आणि नॉक्सव्हिले या ठिकाणीं विद्यापीठें आहेत.

**टॅपर**—एक डुक्कर जात. हा एक सखुर सस्तन प्राण्यांचा

वर्ग आहे. याचें नाक सोंडेसारखें पुढें आलेलें असतें. याच्या पुढच्या पायांस चार बोटें असतात आणि मागील पायांस तीन बोटें असतात. हा दक्षिण अमेरिकेमध्यें सामान्यतः आढळतो व आकारानें गाढवाएवढा असतो. याची कातडी पिंगट रंगाची असून वर फारशी लव नसते. याच्या अनेक जाती आहेत. कांहीं जाती जावा, सुमात्रा, मलाया, वगैरेमध्यें आढळतात. हे अंगाने मोठे असून यांचें शरीर काळेंकुट्ट, पण पाठ मात्र पांढरी असते.

**टॅम्प्लर**—युरोपच्या इतिहासांत १२ व्या व १३ व्या शत-कांत फार मोठी कामगिरी बजावणारी ही एक लष्करी संस्था होय. या संस्थेची स्थापना ख्रिस्ती लोकांच्या पवित्र धार्मिक स्थळांचें संरक्षण करण्याकरितां १११९ सालीं करण्यांत आली; आणि जेरुशलेम येथें सालोमनच्या देवळाच्या जागेवर या संस्थेचें पहिलें वसतिस्थान असल्यामुळें या संस्थेला टॅम्प्लर्स हें नांव देण्यांत आलें. या संस्थेच्या सभासदांना ब्रह्मचर्य, दारिद्र्य व

आज्ञापालन या तीन गोष्टींची शपथ घ्यावी लागत असे. ही शपथ तहाहयात मुदतीची किंवा कांहीं वर्षें मुदतीची घेण्याची सवलत होती. या संस्थेचा मुख्य ग्रँड मास्टर नांवाचा अधिकारी असे. आणि या संस्थेचा प्रसार देशोदेशीं होऊं लागला, तेव्हां ग्रँड मास्टरच्या हुकमतीखालीं मास्टर्स, ग्रँड प्रायर्स, प्रिसेप्टर्स, किंवा कमांडर्स या नांवाचे अधिकारी निरनिराळ्या प्रांतांत नेमून त्या त्या प्रांतापुरती व्यवस्था त्यांच्याकडे सोंपवण्यांत येत असे. या टेंप्लर्सना त्या त्या प्रांतांतील बिशपची आज्ञा न मानण्याची सवलत ११७२ सालीं देण्यांत आली, आणि सर्व टेंप्लर्सवर प्रत्यक्ष पोपची हुकमत सुरू झाली. या संस्थेचा विशिष्ट पोषाख 'नाईट' वीरांना करावा लागे; तो म्हणजे तागाच्या कापडाचा पांढरा झगा व त्याला डाव्या खांद्यावर तांबडा क्रूस चिन्ह (क्रॉस). या टेंप्लर्स योद्धयांनीं जेरुसलेमचा ताबा मिळविण्याकरितां झालेल्या अनेक धर्मयुद्धांत (ख्रिस्ती विरुद्ध मुसलमान) मोठाले पराक्रम करून नांवलौकिक मिळवला. पॅलेस्टाइनच्या रणभूमीवर या संस्थेचे २०,००० योद्धे पतन पावले. ही संस्था ५ वा क्लेमंट पोप याच्या आज्ञेनें १२०७ ते १३१२ च्या दरम्यान बंद पाडण्यांत आली.

**टेबल मौंटन**— हा (पठार) पर्वत दक्षिण आफ्रिकेंत असून त्याचें सर्वांत उंच शिखर केप टाउन शहराजीक सुमारें ३,५८० फूट उंच आहे. त्याचा माथ्यावरील भाग सपाट आहे.

**टेंबुर्णी वर्ग**—[वर्ग एबेनासी]. हा एक संयुक्त पुष्पपर्णी द्विदल वनस्पतींचा वर्ग आहे. या वर्गांत झाडें व झुडपें येतात. यांचें लांकूड कठिण असतें व आंतील गाभ्याचा रंग काळा असतो. एबनी अथवा अबनूस हें या वर्गांतील झाड होय. याची मुख्य जाति डायोस्पिरॉस ही होय. या जातीपासून एबनी व लोहकाष्ट (आयर्नवुड) मिळतें. अबनूस पाहा.

डायोस्पिरॉस ही झाडां-झुडपांची एक मोठी जात आहे. या जातीचीं झाडें जगांतील उष्ण प्रदेशांत होतात. या झाडांच्या लांकडास एबनी लांकूड म्हणतात. चिनी खजूरी बोरीच्या झाडांस (डी. काकी) सफरचंदासारखीं टमाट्याएवढीं मोठीं फळें येतात. (खजूरी बोरें पाहा.)

**टेंबे स्वामी, वासुदेवानंद सरस्वती** (१८५४–१९१४)– एक सत्पुरुष व ग्रंथकार. सावंतवाडी संस्थानांतील माणगांव हें यांचें जन्मस्थान असून तेथून जवळच असलेली सिद्धपर्वतावरील गुहा ही यांची तपोभूमि होती. यांचें वेदाध्ययन लहानपणींच झालें व आपल्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत यांनीं नित्य वेदपठण चालू ठेवलें होतें. सद्विचार व धार्मिक आचार यांचे धडे यांनीं स्वतःच्या आचारावरून दुसऱ्यांना दिले. माणगांवांत यांनीं एक सुंदर दत्तमंदिर बांधलें. नरसोबाच्या वाडीस दत्तदर्शनास हे नेहमीं जात व तेथेंच यांना दत्ताचा साक्षात्कार झाला, असें म्हणतात.

(१) श्रीगुरुचरित्र (संस्कृत, सटीक), (२) सप्तशती, प्राकृत गुरुचरित्र, (३) कुमारशिक्षा (संस्कृत, सटीक), (४) श्रीदत्तपुराण (संस्कृत, सटीक), (५) श्रीदत्तभावसुधारस, यांसारखे बरेच ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**टेंभुरणी**—मुंबई, सोलापूर जिल्हा. हें गांव पुणें-सोलापूर सडकेवर बार्शी रोड स्टेशनच्या नैर्ऋत्येस १५ मैलांवर जी. आय्. पी. रेल्वेवर स्टेशन आहे. लो. सं. सुमारें २,०००. दुसऱ्या बाजीरावाचा कारभारी सदाशिव माणकेश्वर यास हें गांव इनाम मिळालें. त्यानें येथें एक किल्ला बांधला. तेव्हांपासून या गांवची भरभराट सुरू झाली. येथें रामाचें व विठोबाचें अशीं दोन देवळें आहेत. सदाशिव माणकेश्वरानंतर त्याचा दत्तक पुत्र लक्ष्मणराव व नंतर त्याची विधवा स्त्री यांजकडे हा गांव येऊन त्या बाईच्या मरणापर्यंत (१८७९) इनाम चालत होता.

**टेमिशोआरा**—(टेमेश्वर). रुमानिया, टेमेस विभागांतील एक शहर. हें बेगा नदीवर वसलें आहे. पूर्वीं या शहरास मोठी तटबंदी असे. हें शहर रोमन कॅथोलिक व ग्रीक सनातनी धर्मगुरूंचें वसतिस्थान आहे. या शहराचा व्यापार धान्य, पीठ, दारू व घोडे यांचा आहे. हें शहर फार जुनें आहे. १५५३ सालीं तुर्कांनीं हें शहर जिंकलें. स. १७१६ पर्यंत त्यांच्याच ताब्यांत होतें. पुढें सॅव्हॉयचा राजपुत्र युजान यानें हें तुर्कांपासून परत घेतलें. लो. सं. सुमारें पाऊण लाख.

**टेरा डेल फ्यूगो**—हा द्वीपसमूह दक्षिण अमेरिकेच्या दक्षिण टोकानजीक असून हा द्वीपसमूह आणि अमेरिका खंड यांच्यामध्यें मॅगेलन सामुद्रधुनी आहे. या द्वीपसमूहांत टेरा डेल फ्यूगो हें सर्वांत मोठें बेट, आणि इतर लहान लहान पुष्कळ बेटें आहेत. या बेटांचें एकंदर क्षे. फ. ३२,००० चौ. मैल आहे. या द्वीपसमूहापैकीं निम्म्या प्रदेशावर अर्जेंटिना देशाचा ताबा आणि निम्म्या प्रदेशावर चिली देशाचा ताबा आहे. अर्जेंटिनाच्या प्रदेशाची राजधानी पूंटा आरेनॉस शहर, आणि चिलीच्या प्रदेशाची राजधानी यूशूया शहर आहे. हा सर्व प्रदेश डोंगराळ आहे. परंतु सर्वत्र मेंढ्या चरण्याजोगीं कुरणें आहेत. येथें मूळ आदिवासी लोक सुमारें १,००० असून ही जमात झपाट्यानें नष्ट होत चालली आहे. टेरा डेल फ्यूगोचा शोध प्रथम मॅगेलननें १५२० मध्यें लावला.

**टेरी, एलेन ॲलिस** (१८४८–१९२८)— एक इंग्रज नटी. वयाच्या सातव्या वर्षापासून नाटकांतून कामें करूं लागली. पुढें ती प्रथम लिसीयम थिएटरांत हेन्री आय-

व्हिंग या नटाच्या जोडीला स्टेजवर आली. तेव्हांपासून तिचा फार लौकिक झाला. तिनें पोर्शिया, ज्यूलियट, बीॲट्रीस, व्हायोला, लेडी मॅकबेथ, क्वीन कॅथराइन, कॉर्डेलिया, रोझॅमन्ड, ग्विनीव्हीर, इमोजेन ह्यांसारख्या मुख्य भूमिका घेतल्या होत्या.

**टेरेन्स** ( ख्रि. पू. १९५–१५९ )–विनोदी नाटकें लिहिणारा एक रोमन नाटककार. तो कार्थेज येथें जन्मला, आणि त्याला गुलाम ( स्लेव्ह ) म्हणून रोम शहरीं नेण्यांत आलें; पण तेथें त्याचा मालक टेरेनटिअस लुकॅनस यानें त्याला गुलामगिरींतून मुक्त केलें, म्हणून त्यानें स्वतःला टेरेन्स हें नांव धारण केलें. त्याच्या वाङ्मयीन बुद्धिमत्तेमुळें त्याला धाकटा सिपिओ आफ्रिकेनस याच्या मित्रपरिवारांत प्रवेश मिळाला. टेरेन्सचीं ६ नाटकें आहेत तीं : 'ॲड्रास कुमारी', 'सासू', 'स्वतःची बोंचणी', 'खोजा', 'फोर्मिओ' आणि 'भाऊ भाऊ'. हीं सर्व नाटकें मूळ ग्रीक नाटकांचीं रूपांतरें आहेत. त्यांपैकीं 'सासू' आणि 'फोर्मिओ' हीं दोन नाटकें आपोलो डोरस याच्या नाटकांवर आधारलेलीं असून बाकीचीं चार नाटकें मेनॅन्टर याच्या नाटकांच्या आधारें रचलेलीं आहेत. टेरेन्सनें आपलीं बहुतेक नाटकें मूळ दोन किंवा अधिक ग्रीक नाटकांचें मिश्रण करून बनवलेलें एक लॅटिन नाटक अशा संयोजन पद्धतीनें लिहिलेलीं आहेत. या लेखनपद्धतीला 'कॉंटॅमिनॅशिओ' हें नांव आहे. हीं नाटकें लिहिल्यानंतर टेरेन्स ग्रीक देशामध्यें ग्रीक सुखान्त नाटकांचा अधिक सूक्ष्म अभ्यास करण्याकरितां गेला. तेथें त्यानें मेनॅन्डरचीं १०० हून अधिक ग्रीक सुखान्त नाटकें भाषांतरित केलीं असें म्हणतात. पण तो पुढें इटालींत परत आला नाहीं. तो तिकडेच समुद्रांत बुडून मेला असा कांहीं ठिकाणीं उल्लेख आहे; पण कांहीं ठिकाणीं असा उल्लेख आहे कीं, त्यानें केलेलीं भाषांतरें समुद्रांत वादळ होऊन त्यांत नष्ट झालीं; त्यामुळें दुःखानें टेरेन्स हृदयक्रिया बंद पडून मरण पावला.

**टेल, विल्यम**—स्विझर्लंडमधील दंतकथांत वर्णिलेला एक राष्ट्रीय वीरपुरुष. याच्या दंतकथेवर शिलर कवीनें 'विल्हेल्म टेल' नांवाचें जें नाटक लिहिलें तें अतिशय प्रसिद्ध आहे.

ऑस्ट्रियाच्या जुलुमापासून यानें आपला देश सोडविला ( १३०७ ), अशा प्रकारच्या दंतकथा आहेत. आपल्या मुलाच्या डोक्यावरील फळ बाणानें उडविण्याची शिक्षा दिली असतां त्यानें उलट ऑस्ट्रियन अधिकाऱ्यासच बाणानें विद्ध केलें व त्यामुळें लोक बंड करून उठले. या प्रकारच्या टेलच्या गोष्टी सर्वश्रुत आहेत.

**टेलफर्ड, थॉमस** ( १७५७–१८३४ )— एक ब्रिटिश एंजिनीयर. १८०३ व १८०४ सालीं स्कॉटलंडच्या हायलंड प्रदेशांत सडका व पूल बांधण्याकरितां नेमलेल्या पार्लमेंटरी कमिशनरांनीं, आणि नंतर कॅलेडोनियन कालवा बांधण्याच्या कामावरच्या कमिशनरांनीं या कामासाठीं टेलफर्डला एंजिनियर नेमलें. सेव्हर्न नदीवर पांच मोठाले पूल बांधण्याच्या कामावर तसेंच ग्लूस्टर व बर्कले, दि ग्रँड ट्रंक, बर्मिंगहॅम, लिव्हरपूल व मॅक्लेसफील्ड, हे इतके कालवे बांधण्याच्या कामावर टेलफर्डलाच देखरेख करण्याचें काम सांगण्यांत आलें होतें. तथापि त्याच्या स्थापत्य कौशल्याचें सर्वांत उत्तम स्मारक म्हणजे कार्नार्व्हनशायर ॲंग्लसी बेटाला जोडणारा मेनाय तरता पूल होय.

**टेलर, ( सर ) एडवर्ड बर्नेट** ( १८३२–१९१७ )—एक इंग्रज मानववंशशास्त्रवेत्ता. तो ऑक्सफोर्ड येथें १८९६ सालीं या शास्त्राचा प्राध्यापक नेमला गेला. त्याचे मुख्य ग्रंथ 'रिसर्चेस इन टु दि अर्ली हिस्टरी ऑफ मनकाइंड' ( मानव जातीच्या प्राचीन इतिहासांतील शोध ) आणि 'प्रिमिटिव्ह कल्चर' ( आद्य संस्कृति ) हे आहेत.

**टेलर, जॉन** ( १५८०–१६५३ )—हा इंग्रज निबंधकार असून याला जलकवि ( वॉटर-पोएट ) असेंहि म्हणतात. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते– 'पेनिलेस पिलग्रिमेज' (अकिंचन यात्रा) 'लाफ ॲन्ड बी फॅट्' ( हंसा आणि लठ्ठ व्हा ), वगैरे. त्याचें लिखाण जोरदार पण थोडेंबहुत ग्राम्य आहे.

**टेलर, झॅशरी** ( १७८४–१८५० )— अमेरिकन संयुक्त संस्थानांचा बारावा अध्यक्ष. तो मेक्सिकोबरोबर युद्ध सुरू झालें त्या वेळीं सैन्याचा कमांडर झाला. त्यानें मेक्सिकन सैन्याचे लागोपाठ पराभव करून अखेर ब्यूनाव्हिस्टाची लढाई (१८४७) जिंकली. नंतर तो व्हिगपक्षातर्फे अमेरिकेचा अध्यक्ष निवडून आला; पण फारच थोडे महिने तो त्या जागेवर होता.

**टेलर, फिलिप मेडोज** ( १८०८–१८७६ )—एक ॲंग्लो-इंडियन कादंबरीकार. वयाच्या १५ व्या वर्षी मुंबईच्या एका व्यापाऱ्याकडे नोकरी करण्याकरितां तो विलायतेहून इकडे आला. परंतु तेथें न जमल्यामुळें, टेलरनें निजामाच्या पदरीं लष्करी नोकरी धरली. त्याचें सर्व आयुष्य निजामाच्याच पदरीं गेलें. कांहीं दिवसांनीं त्याला लष्करी कामावरून काढून मुलकी व दिवाणी कामावर नेमलें. १८४० सालीं त्यानें 'ठगाची जबानी' ही कादंबरी प्रसिद्ध केली. यानंतर 'टिप्पू सुलतान', 'तारा', 'राल्फ डार्नेल', 'सीता', 'नोबल क्वीन', इ. कादंबऱ्या त्यानें प्रसिद्ध केल्या. या सर्व पुस्तकांतून त्यानें तत्कालीन लोकस्थितीचें वर्णन दिलें आहे. स. १८४० ते १८५३ पर्यंत तो 'टाइम्स' पत्राचा बातमीदार होता. १८६० सालीं तो विलायतेस परत गेला. कर्नल टेलरच्या अंगचे गुण इंग्रज सरकारास जरी तो ई. इं. कंपनीचा नोकर नव्हता तरी चांगले कळून आले

आणि त्यानें मेडोजला डेप्युटी कमिशनरच्या हुद्यावर नेमिलें. विलायतेस गेल्यावर त्यास सी. एस्. आय्. ची पदवी देऊन त्याचा गौरव करण्यांत आला. त्याचें आत्मवृत्त वाचनीय आहे.

**टेहरी संस्थान**—संयुक्त प्रांत, एक संस्थान. क्षे. फ. ४,५००चौ. मै. आहे. हें सर्व संस्थान हिमालयाच्या प्रदेशांत असून त्यांत गंगा व यमुना या नद्यांचा उगम आहे. गंगा व यमुना या नद्यांच्या उगमाजवळ गंगोत्री व जम्नोत्री हीं यात्रेचीं मोठीं ठिकाणें आहेत. संस्थानची हवा गढवाल जिल्ह्याच्या हवेसारखी आहे. हिवाळ्यांत चार हजार फुटांवर बर्फ पडतें. हें संस्थान व गढवाल जिल्हा हीं पूर्वीं एकाच घराण्याच्या ताब्यांत असल्यामुळे याचा पूर्वेतिहास गढवाल ( पाहा ) प्रमाणेंच आहे. शेवटला राजा पर्दुमनशहा गुरख्यांशीं झालेल्या लढाईत मारला गेला. परंतु १८१५ सालीं नेपाळचें युद्ध संपल्यावर इंग्रजांकडून त्याचा मुलगा सुदर्शनशहा याला हल्लींचें टेहरी संस्थान मिळालें. सध्यांचे महाराज मानवेंद्रशहा १९४६ सालीं गादीवर आले. या संस्थानांत २,४५६ खेडीं आहेत. परंतु मोठें गांव एकहि नाहीं. लोकसंख्या ( १९४१ ) ३,९७,३६९. शेंकडा ९९ पेक्षां जास्त लोक हिंदू आहेत. येथें मुख्यतः मध्य पहाडी भाषा चालते. शेंकडा ८८ लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर होतो. संस्थानचें उत्पन्न सु. बावीस लक्ष रुपये आहे. हें संस्थान आतां संयुक्त प्रांतांत विलीन झालें आहे.

**टेहाळणी दिवा**—( सर्च-लाइट ). हा एक अत्यंत तेजस्वी असा प्रकाशाचा सारखा स्रोत असतो. हा अत्यंत प्रकाशदायक दिवे व परावर्तक यांच्या साहाय्यानें प्रकाश-किरण एका समांतर दिशेनें व एका किरणशलाकेच्या रूपानें जातील अशी तजवीज करून निर्माण करण्यांत आलेला असतो. याचा उपयोग, अरुंद खाडींतून जहाजें सुरक्षित नेण्याकरितां, समुद्रांत असलेलीं जहाजें किंवा आकाशांत असलेलीं विमानें यांच्यावर टेहाळणी करण्याकरितां, किंवा खुणा करून संदेश पाठविण्याकरितां करण्यांत येतो. ही समांतर किरणशलका परवलयाकृति ( पॅरॅबोलिक ) आरसे अथवा परावर्तक योजून तयार करण्यांत येते. याकरितां सामान्यतः ३० पासून २०० पर्यंत अँपीयर शक्तीच्या विद्युत्-प्रवाहानें कर्ब ( कार्बन आर्क ) उज्वलित करून प्रकाश उत्पन्न करण्यांत येतो.

**टैन-शान पर्वत**—( स्वर्गीय पर्वत ). ह्या आशियांतील विस्तीर्ण पर्वताच्या ओळी आहेत. ( १ ) खान टेंगरी व मध्य-टैनशान, ( २ ) पूर्व उत्तर भाग, ( ३ ) पश्चिम व दक्षिण भाग, असे या पर्वताचे तीन वेगळाले भाग करतां येतील. खान टेंगरी शिखराची उंची २३,६०० फूट आहे. हें शिखर मध्यटैनशाच्या जलविभाजक क्षेत्रांत असून याशिवाय येथें ३,००० ते ३,५०० फूट उंचीचीं अशीं बरींच शिखरें आहेत.

पर्वतांतील मोठ्या बर्फवाहिन्या नद्या खालीलप्रमाणें आहेतः—( १ ) सेमेनोव्ह, ( २ ) मुस्केटोव्ह, ( ३ ) इनालचिक, व ( ४ ) कायंडी. एकंदर पर्वताच्या दक्षिण भागापेक्षां उत्तरेकडील भाग जास्त सुपीक व अरण्यमय असा आहे. व उत्तर भागांत पाऊसहि जास्त पडतो. उत्तर भागांत १,५०० फूट उंचीपर्यंतचा प्रदेश माळरानाचा आहे. त्यापुढें ४,३०० फुटांपर्यंतचा सुपीक व कृषियोग्य असा आहे. यापुढें पर्वतावर निरनिराळ्या प्रकारचीं झाडें व वनस्पती दृष्टीस पडतात. ११,००० फुटांपासून मात्र पर्वत बर्फाच्छादित असतो. दक्षिण भागांत पाऊस कमी असल्यामुळे प्रदेश नापीक व खरखरीत आहे.

**टोंक संस्थान**—राजपुतान्यांतील एक संस्थान. याचें क्षे. फ. २,५५३ आहे. संस्थानचें उत्पन्न एकवीस लाख रु. आहे. टोंक व अलीगड हे जिल्हे सपाट असून, कोठें कोठें लहान टेंकड्या आहेत. मुख्य नद्या बनास व पार्वती असून बनासला माशी, सोहद्र, गंभीर व बेसना ह्या नद्या मिळतात. हवा शुष्क व आरोग्यदायक आहे. पावसाची सरासरी २६ इंच.

येथील नबाब हा बुनर जातींतील अथवा अफगाण वंशीय पठाण आहे. महंमदशहाच्या कारकीर्दींत कोणी तालेरखान नांवाचा प्रसिद्ध रोहिला अलिमहमदखान ह्याच्याकडे नोकरीस राहिला. त्याचा पुत्र हैयातखान ह्यास मुरादाबादमध्यें कांहीं जमीनजुमला मिळाला. त्यास १७६८ सालीं ह्या संस्थानचा संस्थापक प्रख्यात पेंढारी अमीर अल्लीखान हा पुत्र झाला. कांहीं काळ शिपायाचें काम केल्यानंतर, १७९८ सालीं तो यशवंतराव होळकराचा सेनापति बनला.

जिंकलेला प्रदेश व लूट अर्धी वांटून घ्यावयाची असें अमीरखानाचें व होळकराचें ठरलें होतें. त्याप्रमाणें अमीरखानास होळकरानें दिलेल्या जहागिरी मिळून टोंक संस्थान बनलें. ते इंग्रजांनीं त्याच्याकडे कायम करून व त्याच्या मुलांस पलवल प्रांत बक्षीस दिला ( अमीरखान पाहा ).

त्याचा मुलगा महंमदखान यानें १८५७ च्या बंडाच्या वेळीं बांद्याचा नबाब व तात्या टोपे यांनीं टोंक किल्ल्यावर केलेला हल्ला परतवून इंग्रजांना मदत केली. त्याबद्दल त्याला १७ तोफांची सलामी मिळाली व त्यास मुसलमानी शास्त्राप्रमाणें पुत्र नसला तरी वंशाकडे गादी ठेवण्याची सनदहि मिळाली. त्याच्यानंतर त्याचा पुत्र महंमदअल्लीखान हा गादीवर आला. त्यानें प्रजेवर बराच जुलूम केला म्हणून १८६६ सालीं ब्रिटिश सरकारनें त्याला गादीवरून काढून टाकिलें. सांप्रतचे हिज हायनेस नबाब महंमद फरुक अलीखान बहादुर हे १९४७ सालीं गादी-

वर वसले. संस्थानांत शिक्षण मोफत आहे. संस्थानचें उत्पन्न सु. चाळीस लक्ष रु. आहे.

संस्थानांत मोठीं गांवें ५ व खेडीं १,२८९ आहेत. टोंक नांवाचें एकच शहर आहे. हिंदूंची संख्या शेंकडा ८२ व मुसलमानांची शेंकडा १५ आहे. भाषा राजपुताना परगण्यांत हिंदी, मेवाडी, ऊर्दू, व मध्य हिंदुस्थानांतील जिल्ह्यांत माळवी आहे. संस्थानची जमीन सुपीक असून पाणी मुबलक आहे. लो. सं. ३,५३,६८७. आतां हें संस्थान राजस्थान संघांत सामील झालें आहे.

शहर—हे शहर राजपुतान्यांत बनास नदीच्या कांठीं दिल्लीच्या नैर्ऋत्येस १०५ कोसांवर असून टोंक जिल्ह्याचें मुख्य ठिकाण व राजधानीचें शहर आहे. या शहराच्या दक्षिणेला भूमगड नांवाचा किल्ला आहे.

**टोकिओ**—हें शहर जपानी साम्राज्याच्या राजधानीचें ठिकाण आहे. हें आगगाड्यांचें एक मोठें जंक्शन आहे. शहराचें क्षे. फ. ३० चौ. मै. आहे. येथें मोठें सरकारी पदार्थ-संग्रहालय, पुस्तकालय व प्राणिसंग्रहालय हीं आहेत. शिवाय एक लष्करी पदार्थ-संग्रहालय असून त्यांत रशिया व चीन या देशांशीं केलेल्या युद्धांत जिंकलेल्या हत्यारापात्यारांचा संग्रह ठेवला आहे. हें शहर १२ व्या शतकाच्या अखेर अस्तित्वांत आलें. १४५७ सालीं हें टाडोकान नांवाच्या सरदारानें घेतलें. १५९० सालीं हें आयेयासू यानें हस्तगत केलें. पुढें ३०० वर्षें तें याच्याच वंशजांच्या ताब्यांत राहिलें. या शहरास राजधानीचा दर्जा आल्यावर याची बरीच भरभराट झाली. मध्यंतरी भूकंपानें हें शहर अगदीं बसल्यासारखें झालें होतें.

आधुनिक जपानचा विशेष म्हणजे टोकिओ नगर होय. येथें पूर्वकालीन वास्तुशिल्पाचे उत्कृष्ट नमुने बरेच आढळतात. ९०० चौरस मैलांच्या क्षेत्रांत आधुनिक उद्योगधंदे व व्यापार यांचें केंद्र बनलेल्या या शहराची वस्ती झालेली आहे. राजवाडा, मोठाले खंदक, चित्रविचित्र नौका ज्यांत संचार करतात असे मोठाले कालवे, इतस्ततः दृग्गोचर होणाऱ्या वृक्षराजी, लहान लहान टेंकड्यांच्या पायथ्याशीं असलेल्या उद्यानवाटिका, लहान व सुंदर गृहें आणि दूर अंतरावर असलेला व या राजधानीपासून दृष्टीस पडणारा फुजी पर्वत, इ. गोष्टी टोकिओ नगरीच्या सौंदर्याचे विशेष होत. टोकिओ हा जपानचा आदर्श असून त्यांत जपानी मनोरचना व जपानी अंतःकरण प्रतिबिंबित झालें आहे. आगगाड्या, तारायंत्रें, ट्रॅम्वे, मोटारगाड्या, विमानें, विद्युद्यंत्रें, वगैरे आधुनिक सुधारणेच्या अनेक गोष्टी त्या ठिकाणीं पाहावयास सांपडतात. लंडन व पॅरिस यांप्रमाणें गगनचुंबी इमारती, लांब, रुंद व सुंदर रस्ते, प्रशस्त उपवनें आणि शैक्षणिक संस्था येथें बऱ्याच आहेत. जनसंमर्दानें गजबजलेलीं अनेक देवालयें पाहून नागरिकांची धर्मश्रद्धा पटते. लो. सं. ६७,७८,८०४.

येथील विद्यापीठ १८७७ सालीं स्थापन झालें असून त्यांत सु. दहा हजार विद्यार्थी आहेत.

**टोगो, हीहाचिरो** ( १८४७–१९३४ )— एक जपानी नाविकदलाध्यक्ष. 'वोरसेस्टर' या ब्रिटिश शिकाऊ जहाजावर व इंग्लंडमधील ग्रीनविच येथील रॉयल नेव्ही कॉलेजांत त्याचें बहुतेक शिक्षण झालें. जपानला परत आल्यावर त्याला प्रथम हवाईला जपानचा प्रतिनिधि म्हणून पाठविण्यांत आलें. चिनी-जपानी युद्धांत पराक्रम गाजविल्यावर तो व्हॉइस ॲड्मिरल झाला. नंतर यानें जपानी आरमार सुधारलें. रूसो-जपानी युद्धांत तर जपानी आरमार याच्या नेतृत्वाखालीं होतें. त्यानें पोर्टअर्थर बंदरांत व जपानी समुद्रांत मोठे विजय संपादन केले. १९१२ सालीं त्याला ॲड्मिरल करण्यांत आलें.

**टोगोलंड**—आफ्रिका, गिनीच्या आखातावरील एक माजी जर्मन वसाहत. ही १८८४ साली जर्मनीनें आपल्या ताब्यांत घेतली. वसाहतीचें क्षेत्रफळ ३३,७०० चौ. मै. आहे. टोगोलंडचा किनारा फक्त ३२ मैल लांबीचा आहे. किनाऱ्यावरील हवा फार उष्ण त्याचप्रमाणें रोगटही आहे.

येथील रहिवासी निग्रो व निग्रॉइड वंशाचे आहेत. उत्तरेस हौसा राष्ट्रजातीचे लोक राहतात. किनाऱ्यावर राहणारे लोक पोर्तुगीज रक्ताचे आहेत. बहुतेक सर्व बंदरांतून ब्राझील येथील निग्रो लोकांचे वंशज दृष्टीस पडतात. किनाऱ्यावरील प्रदेशांतील लोक शेतकरी व व्यापारी आहेत. येथील जातींपैकीं कांहीं मुसलमान, कांहीं मूर्तिपूजक, व थोडे ख्रिस्तोपासक आहेत. नैसर्गिक उत्पन्नाच्या बाबतींत हा देश फार समृद्ध आहे. ताडाचें तेल, रबर, कापूस, मका, भुईमूग, नीळ, अननस, वगैरे निर्यात व्यापाराचे मुख्य जिन्नस होत. चिनी मातीचीं भांडीं करणें, लोहारकाम व लांकडी खोदकाम करणें, इ. धंदे एतद्देशीय लोक करतात. ते सुंदर शाली तयार करतात. निरनिराळ्या धातू, लोखंडी सामान व कापड ह्या आयात व्यापाराच्या मुख्य वस्तू होत.

जर्मनीच्या ताब्यामधील हें संरक्षित संस्थान १९१४ सालीं इंग्लंड व फ्रान्स यांच्या सैन्यांनीं जिंकून घेतलें व तद्दानंतर या दोन्ही राष्ट्रांच्या ताब्यांत तहपरिषदेनें दिलें.

टोगोलंड प्रांत जिंकून घेतल्यानंतर अर्थातच त्याची व्यवस्था लावण्याचें काम दोस्तांवर येऊन पडलें. इंग्लंडनें राज्यकारभाराच्या दृष्टीनें पश्चिम टोगोलंडचा भाग घेतला व बाकीचा फ्रेंचांच्या ताब्यांत आला. १९१९ सालच्या सुप्रीम कौन्सिलनें टोगोलंड संस्थान ब्रिटिश व फ्रेंच यांच्या ताब्यांत दिल्याचें जाहीर केलें. यानंतर टोगोलंडची पुनः इंग्लंड व फ्रान्स यांनीं आपापसांत वांटणी करून घेतली. लोम प्रांत व समुद्रकांठचा प्रदेश फ्रान्सच्या ताब्यांत आला व इंग्लंडच्या ताब्यांत डगोंबाचा प्रदेश राहिला. ब्रि. टोगोलंडचें क्षे. फ. १३,०४१ चौ. मै. व लो. सं. ३,५१,४७२ आहे. फ्रान्सच्या ताब्यांतील प्रदेशाचें क्षे. फ. २१,८९३ चौ. मै. व लो. सं. ७,८०,४९७ आहे.

**टोंचणें**—(इनॉक्युलेशन). एखाद्या संसर्गजन्य रोगास प्रतिबंध करण्याची शक्ति शरीरांत उत्पन्न होण्यासाठीं त्याच रोगाचा किंचित् प्रादुर्भाव औषधें टोंचून उत्पन्न करणें यांस टोंचणें असें म्हणतात. या पद्धतीचा उपयोग प्रथम देवींच्या बाबतींत करण्यांत आला. देवींची लस शरीरांत टोंचली असतां प्रत्यक्ष देवी येतात, पण त्यांचें स्वरूप तीव्र नसतें. पाश्चूरनें अँथ्रॅक्सच्या (काळपुळी) रोगाच्या जंतूंची वाढ करून ते टोंचून त्या रोगाचा प्रतिकार करण्याची शक्ति पशूमध्यें उत्पन्न करण्याचा प्रयोग केला. याच पद्धतीनें त्यानें पिसाळलेल्या कुत्र्याच्या दंशावरहि उपाययोजना केली. कुत्र्याच्या दंशापासून रोग होण्यास ४० दिवस लागतात. व या दरम्यानच्या काळांत त्या रोगाचा उद्भव होत नाहीं. विषमज्वराचे मृत जंतू टोंचले असतां विषमज्वरालाहि प्रतिबंध करतां येतो. अशा तऱ्हेचें प्रतिबंधक औषध टोंचलें असतां प्रत्यक्ष रोगाचा प्रादुर्भाव झाला तरी त्याचें स्वरूप तीव्र नसतें. उदाहरणार्थ, एखाद्या मनुष्यास गळवें होत असलीं तर त्यांचे मृत जंतू घेऊन ते टोंचले असतां नवीन गळवें उठण्याचें बंद होतें. अशा तऱ्हेनें कफ, खोकला, वगैरेंचे विकार बंद करतां येतात. क्षयावरहि क्षयाचे जंतू टोंचून उपाय करण्यांत कांहीं अंशीं यश आलें आहे.

**टोडरमल्ल** (सु. १५३५–१५८९)—हा अकबर बादशहाचा एक मंत्री असून जातीनें खत्री रजपूत होता. अयोध्या प्रांतांत लाहरपुर येथें टंडन कुळांत जन्म झाला. हा प्रथम अकबर बादशहाच्या दरबारांत एक कारकून म्हणून होता. परंतु आपल्या अंगच्या गुणामुळें हा प्रसिद्धीस आला. याला अकबरानें स. १५६७ मध्यें अयोध्येच्या शिकंदरशहावर पाठविलें असतां यानें त्याचा पूर्ण पराभव केला. त्याचप्रमाणें बंगाल–बहार प्रांतातील बंडें त्यानें मोडलीं. त्याच्या या कामगिरीबद्दल बादशहानें गौरवून 'दिवाण' हा किताब दिला. तो राज्यव्यवहारकुशलहि असे. यानें गुजराथमध्यें जमिनीची मोजणी करून तिचें वर्गीकरण केलें व जमीनमहसुलाची पद्धत घालून दिली, तिला 'अस्सल–इ–जमा–इ–तुमारे' असें नांव आहे. कायमधाऱ्याची पद्धतिहि यानें घालून दिली. राज्यव्यवहारांत यानें फारसी भाषा हिंदीऐवजीं सुरू केली. टांकसाळीच्या बाबतींतहि सुधारणा करून नवीन नाणीं पाडलीं. त्याची स्वधर्मावर चांगली श्रद्धा असून तो मोठा भाविक असे. दानधर्महि पुष्कळ करी. यानें 'टोडरानंद', 'टोडरप्रकाश', 'टोडराज', 'स्वरमेलकलानिधि' यांसारखे ग्रंथ तयार करविले व टोडरानंद ग्रंथांत निरनिराळीं प्रकरणें पाडून त्यांत श्राद्ध, व्यवहार, प्रायश्चित्त व विवाह वगैरे गोष्टींची चर्चा केली आहे आणि त्यांनाच श्राद्धसौख्य, व्यवहारसौख्य अशीं नावें दिलीं आहेत.

**टोन, थिओबाल्ड वुल्फ** (१७६३–१७९८)—एक आयरिश देशभक्त. हा एका गाडीवाल्याचा मुलगा. त्याला लष्करी पेशाची फार आवड होती. पण मॅटिल्डा विदरिंग्टन नांवाच्या एका कुमारिकेच्या प्रेमपाशांत सांपडल्यामुळें त्यानें १७८६ सालीं कॉलेजची पदवी घेतली व १७८९ सालीं तो वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाला.

टोननें थॉमस रसेल व नॅप्पटँडी यांच्या सहकार्यानें 'संयुक्त आयरिश राष्ट्रमंडळ' या नांवाची सभा स्थापन केली. या सभेचा मूळ उद्देश कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट लोकांमध्यें ऐक्य घडवून आणणें व कायदेशीर पद्धतीनें राज्यकारभारांत सुधारणा घडवून आणणें हा होता. पण या सनदशीर मार्गांनीं देशाचें कल्याण साधणार नाहीं असें त्याला कळून आल्यानें त्यानें त्या मंडळांतील सभासदांच्या बहुमतानें, सशस्त्र बंडाच्या योगानें स्वातंत्र्य मिळविण्याचें या मंडळाचें धोरण निश्चित केलें. आयरिश पार्लमेंटमध्यें आपलीं मतें मान्य होणें शक्य नाहीं असें वाटल्यामुळें संयुक्त आयरिश राष्ट्रमंडळानें आपली सर्व भिस्त फ्रेंचांच्या मदतीवर ठेवली.

याच सुमारास (१७९४) फ्रान्समध्यें बरींच वर्षें राहिलेला विल्यम जॅक्सन नांवाचा एक धर्मोपदेशक फ्रेंच राज्यमंडळाकडून आयरिश राष्ट्रमंडळाशीं वाटाघाट करण्यासाठीं आयर्लंडमध्यें आला. त्याला सर्व माहिती समजून देण्याच्या निमित्तानें टोननें आयर्लंड हें बंडाला कसें तयार आहे हें दाखवून दिलें. याबद्दल टोनला शिक्षा झाली असती, पण त्यानें आपली सुटका करून घेतली व तो १७९५ मध्यें अमेरिकेला गेला. तेथून परत पॅरिस येथें येऊन त्यानें आयर्लंडला स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं फ्रेंच अधिकाऱ्यांचीं

दिलें. १५८० सालीं हें ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें. नंतर डच व फ्रेंच लोकांच्या हातीं जाऊन १८१४ सालीं हें पुनः ब्रिटिशांस मिळालें. सध्यां हे ट्रिनिदाद बेटांच्या ताब्यांत असून तेथें त्याच बेटांचा कायदा चालतो.

**टोमॅटीन**—टोमाटोच्या झाडापासून, पानांपासून तयार होणारें एक जन्तुघ्न. अमेरिकेच्या शेतकी खात्याचे तज्ज्ञ अधिकारी मि. थॉमस द फाँतेन, जॉर्ज डब्ल्यू. आयर्व्हिग, वगैरेंनीं हें औषध शोधून काढलें. पेनिसिलीनचा उपयोग ज्या जंतूंवर होत नाहीं त्यांच्यावरहि या औषधाचा प्रभाव होतो.

**टोमाटो**—[ वर्ग–सोलानासी. लायकोपर्सिकम एस्क्युलेंटम]. हें एक भाजीचें लहान झुडुप आहे. याला मराठींत वेलवांगें म्हणतात. त्याचीं फळें हिरवेपणीं वांग्यासारखीं असतात व झाड वेलासारखें पसरतें म्हणून त्यास 'वेलवांगें' (बेलवांगें) हें नांव पडलें आहे. याचें मूलस्थान दक्षिण अमेरिका होय.

टोमाटो हें एक आरोग्यदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें व उपयुक्त फळ आहे. सर वाल्टर रॅले यास हें फळ रोलको नांवाच्या बेटांत सांपडलें, व तेथून त्यानें त्याची लागवड करण्यासाठीं तें यूरोपमध्यें नेलें.

युरोपियन व मुसलमान वगैरे मांसाहारी लोक टोमाटोचा मांसाच्या भाजींत उपयोग करितात. हिंदू लोकहि कोशिंबिरीसारखा उपयोग करितात. टोमाटोच्या अंगीं जातीचाच आंबटपणा असल्यामुळें पदार्थांत चिंच अगर आमसुलें घालण्याची जरूर लागत नाहीं. पण गूळ मात्र जास्त लागतो.

**टोम्स्क**—याच नांवाच्या प्रांताचें हें मुख्य शहर. ओम्स्कच्या पूर्वेस ४४५ मैलांवर असून ट्रान्स-सायबेरियन रेल्वेची एक शाखा या शहरापर्यंत गेली आहे. येथें कापड, कमावलेली कातडीं व साबण–कारखाने आहेत. लोंकर, मासे व गुरें यांचा मोठा व्यापार येथे चालतो. सन १८८८ मध्यें स्थापन झालेलें विद्यापीठ येथें आहे. लो. सं. १,४१,२१५ आहे.

**टोरॉंटो**—कानडामधील ओन्टारियो प्रांतांतील प्रमुख शहर. या शहराच्या आसपास चोहोंकडे मोठमोठे कारखाने आहेत. १९११ सालानंतर या शहरामध्यें पुष्कळच भव्य व सुंदर इमारती बांधण्यांत आल्या. त्यांपैकीं ३,००० लोकांची सोय होईल एवढें मोठें 'सेंट पॉल्स अँग्लिकन चर्च', 'दि टिमॉथी ईटन मेमोरियल चर्च', 'रॉयल बँक ऑफ कॅनडा' या इमारती प्रमुख होत. टोरॉंटोमधील विजेच्या साहाय्यानें पाणी पुरवण्याची पद्धत, सर्व अमेरिकेंत नमुनेदार आहे. टोरॉंटो विश्वविद्यालयाची स्थापना १८२७ त झालेली असून त्यांत सुमारें सात हजार विद्यार्थी शिकतात. हे शहर म्हणजे कानडाचे शैक्षणिक व व्यापारी केंद्र होय. येथें दरसाल राष्ट्रीय प्रदर्शन भरत असून त्यासाठीं स्वतंत्र व मोठी जागाच आहे. लो. सं. ६,७६,८८७.

**टोरी**— हें इंग्लंडमधील एका राजकारणी पक्षाचें नांव आहे. याचा प्रतिपक्ष तो व्हिग पक्ष होय. टोरी पक्ष मूळ १६७९ च्या सुमारास पार्लमेंटमध्येंहि 'एक्सक्ल्युझिव्ह बिल' या प्रस्तावावर वादविवाद चालू असतांना उद्भवला. आयर्लंडमध्यें टोरी हें नांव, ज्या मूळच्या आयरिश लोकांच्या जमिनी ब्रि. सरकारनें काढून घेतल्या होत्या, आणि ज्या इसमांना सरकारनें बहिष्कृत (आउट-लॉ) केलें होतें, त्यांना लावण्यांत येऊं लागलें. इंग्लंडमध्यें ज्या इंग्रजांनीं राजाचा ईश्वरी अधिकार ( डिव्हाइन राइट ) आणि राजाज्ञेचें विनतक्रार पालन, हीं तत्त्वें मान्य केलीं, त्यांना 'टोरी' हें नांव देण्यांत आलें; पण या पक्षाला हें नांव नक्की कोणत्या सालीं देण्यांत आलें, तें सांगतां येत नाहीं. हॅनोव्हेरियन राजघराण्यापैकीं, १ ला जॉर्ज व २ रा जॉर्ज या राजांच्या कारकीर्दींत टोरी पक्षाचे लोक 'जॅकोबाइट्स' म्हणजे पदच्युत झालेल्या २ऱ्या जेम्सच्या पक्षाचे आहेत, असें मानलें जात असे. पुढें ३ रा जॉर्ज गादीवर आला त्या वेळीं (१७६०) या टोरी पक्षानें या नव्या राजघराण्याशीं राजनिष्ठ राहण्याची वृत्ति दर्शविली. त्यानंतर अमेरिका स्वतंत्र होऊन तेथील वसाहती इंग्लंडच्या हातून गेल्या, त्या राष्ट्रीय हानीच्या काळांत टोरी पक्ष धाकट्या पिटच्या नेतृत्वाखालीं उदारमतवादी तत्त्वें ग्राह्य करूं लागला; परंतु लवकरच फ्रेंच राज्यक्रान्ति झाली, आणि तींतील अत्याचारामुळें टोरी पक्षानें उदारमतवादित्व सोडून दिलें. आणि तेव्हांपासून (१७८९ पासून) १८३२ पर्यंत टोरी पक्षानें प्रथम युद्धपुरस्कार केला, आणि १८१५ नंतर पार्लमेंटरी रिफॉर्मला (सुधारणेला) विरोध चालू ठेवला. १८३२ मध्यें रिफॉर्म ॲक्ट मान्य झाल्यानंतर ह्या पक्षाचें 'टोरी' हें नांव लुप्त होऊन 'कॉंझर्व्हेटिव्ह' हें नामाभिधान रूढ झालें.

**टोरी फत्तेपूर**—मध्य हिंदुस्थानांत, बुंदेलखंड एजन्सीच्या अधिकाराखालीं असलेलें एक लहानसें सनदी संस्थान. क्षे. फ. २७ चौ. मैल. यांत ११ गांवें आहेत. लो. सं. ६,२६९. बुंदेलखंडाचा दिवाण रायसिंग यानें ही जहागीर, दिवाण हिंदुसिंग नांवाच्या आपल्या मुलास दिली. १८२३ सालीं इंग्रज सरकारनें दिवाण हरप्रसाद याला या जहागिरीची सनद दिली. टोरी फत्तेपूर हें गांव या जहागिरीचें मुख्य ठिकाण आहे. हें संस्थान १९४८ सालीं विंध्य प्रदेश संघांत सामील झालें.

**टोलुईन**—टुलोल किंवा मिथिल बेंझेन अशीहि ह्याचीं नांवें आहेत. कर्ब (कार्बन) आणि उज्ज (हायड्रोजन) यांनीं हा तयार झाला असून याचे साधारण गुणधर्म बेंझिनसारखे आहेत.

हा वर्णहीन द्रवरूप पदार्थ असून ११०° श. (सें.) ला हा रंग उकळतो. आणि स्फोटक द्रव्यें तयार करण्यासाठीं हा उपयोगी पडतो.

**टोलेडो**—स्पेन, एक प्रांत. याचें क्षे. फ. ५,९१९ चौ. मैल. ह्या प्रांताला टेगस आणि तिला मिळणाऱ्या नद्यांमुळें पाण्याचा पुरवठा चांगला आहे. येथें रेशमी व लोंकरीचा कपडा, मातीचीं भांडीं, साबण, तेलें, दारू, चॉकोलेट, इ. जिन्नस तयार होतात.

शहर—ही पूर्वीं स्पेनची राजधानी होती. हल्लीं फक्त टोलेडो प्रांताचीच राजधानी आहे. हें मॅड्रीडपासून ४७ मैल आहे. हें शहर टेंकडीवर असून उत्तरखेरीज याच्या सर्व बाजूंना टेगस नदी आहे. हें शहर गॉथिक धर्तीवर वसलेलें आहे. कारागिरीच्या दृष्टीनें पाहिलें असतां येथील प्रार्थनामंदिरें फार महत्त्वाचीं आहेत. टोलेडो येथें १४९८ पासून १८४५ पर्यंत विश्वविद्यालय होतें. हल्लींहि हें शहर विद्येचें केंद्रस्थान म्हणून प्रसिद्ध आहे. मुख्य धंदा तरवारी तयार करण्याचा आहे. हें शहर अनेक शतकांपासून तरवारीच्या पात्यांकरितां प्रसिद्ध आहे. खि. पू. १९२ मध्यें हें रोमन लोकांनीं जिंकून घेतलें होतें.

**टोळ**—हे झुरळ-वर्गातील प्राणी असून यांच्या अनेक जाती

आहेत. हे पाकोळ्या किंवा गवतांतील उंटांसारखें दिसतात. (नाकतोडा पाहा). त्यांचे मागील पाय मोठे व बळकट असतात. हे सर्व जगभर आढळतात. यांची धाड आली म्हणजे हे लक्षावधि संख्येनें येतात व सर्व वातावरण आच्छादून टाकतात आणि मार्गांत येणाऱ्या सर्व झाडांचीं पानें खाऊन टाकून गवताचीं पातींहि राहूं देत नाहींत. अरब, वगैरे लोक यांस खातात.

भूमध्य समुद्रावरच्या प्रदेशांत व दक्षिण आफ्रिकेंत यांचे प्रचंड समूह ठराविक वेळीं येऊन आकाश झांकून टाकतात. हे पिकें सफा करतात व रोगराई पसरवतात. इंपीरियल इन्स्टिट्यूट ऑफ एन्टॉमॉलॉजी या संस्थेनें टोळांच्या जन्मभूमी शोधून काढून त्यांचा नाश करण्यासाठीं बरेच प्रयत्न केले. यांना खड्ड्याकडे नेऊन तेथें त्यांना आगीनें किंवा औषधांनीं मारण्याचा एक उपाय आहे.

हिंदुस्थानांत दक्षिण प्रदेशांकडे येणाऱ्या टोळांची निपज बहुतेक पश्चिम घाट व सातपुडा यांनजीकच्या भागांत होते. टोळधाडीमुळें होणारा त्रास हा त्यांतील उडणाऱ्या तांबड्या झुंडीपासून होतो. त्यांच्या लहान पांखरांचा उपद्रव फारसा नसतो. या झुंडी हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत सैरावैरा उडूं लागतात. कित्येक वेळां वाऱ्याच्या झोताबरोबर त्यांचें प्रयाण चालू राहतें. बागाईत व रबी पिकें आणि विशेषतः आंबा व इतर फळझाडें यांचें या टोळधाडीपासून अतोनात नुकसान होतें. १९०१–१९०२ पासून खरीप पिकांच्या हंगामांत सुद्धां टोळधाडी येऊं लागल्या. १८८२ ते ८३ या वेळच्या टोळधाडींची संपूर्ण हकीगत प्रथमतः सरकार-दप्तरीं नमूद झाली. या वेळीं सरकारांतून टोळांचा नाश करण्यासाठीं निरनिराळ्या उपाययोजना झाल्या. तेव्हां असें दिसून आलें कीं, उन्हाळ्यांत टोळ घाटांतील जंगलांतून असतात व नंतर ते दक्षिण देशाकडे येतात. टोळ समुद्रकांठच्या जिल्ह्यांतून मे व जून महिन्यांत यावयास लागतात. तेव्हांच मारण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे. म्हणजे त्यांची वाढ थांबेल. त्यांनीं एकदां अंडीं घातल्यावर तीं शोधून नष्ट करणें फार कठिण जातें व त्याचा फारसा उपयोग होत नाहीं. टोळांची निपज होत आहे असें दिसतांच सर्व गांवकऱ्यांस टोळ-किडे व लहान पांखरें मारण्याच्या कामीं एकदम रुजू करावें. टोळांचा नाश करण्यासाठीं अनेक उपायांची योजना करावी. कारण एका जिल्ह्यांत यशस्वी ठरलेले उपाय दुसऱ्या जिल्ह्यांत निरुपयोगी ठरतात. तेव्हां फक्त ठराविक उपाय योजून स्वस्थ बसूं नये. टोळांची संख्या कमी झाली कीं त्या प्रमाणांत पिकांची नासाडी देखील कमी होते.

**टौंगू**—ब्रह्मदेशाच्या तेनासरिम भागांतील एक जिल्हा. याचें क्षे. फ. ६,१७२ चौ. मै. आहे. ह्या भागांत पुष्कळ नद्या व सरोवरें आहेत. जिल्ह्याच्या मध्यभागांत गाळाच्या जमिनी आहेत. श्वेगीन नदीच्या उपनद्यांच्या भागांत सोनें सांपडतें. याशिवाय तांबें, जस्त, शिसें आणि कोळसा सांपडतो. येथील हवा सर्द असून उत्तरेकडील भागांत कोरडी होत गेलेली आहे. जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणच्या ईशान्येस थानडौंग ह्या ठिकाणची हवा थंड आहे व येथें पुष्कळ लोक राहण्याकरितां येतात. ह्या जिल्ह्याचा इतिहासदृष्ट्या टौंगू वंशाशीं संबंध आहे. हा वंश १६ व्या शतकांत ब्रह्मदेशाच्या इतिहासांत फार प्रसिद्धीस आला होता. हल्लींच्या टौंगू शहराजवळच सम्राट अशोकानें इ. स. पूर्वीं ३२१ ह्या वर्षीं कांहीं देवालयें बांधिलीं, असा तिकडील इतिहासांत उल्लेख आहे. जिल्ह्यांत टौंगू (मुख्य ठिकाण) आणि श्वेगीन हीं दोन शहरें आहेत. १९०१ सालीं २,२६,७०० बुद्धधर्मी, १,५०० वन्य व २७,३०० ख्रिस्ती धर्माचे लोक होते. येथें शेंकडा ७० लोक ब्रह्मी आणि २० करेण भाषा बोलतात. ब्रह्मदेशांत टौंगू हें

मिशनरी लोकांचें मुख्य ठाणें आहे. १७७३ सालीं ह्या ठिकाणीं ॲंग्लिकन मिशन स्थापन झालें. जिल्ह्याच्या मध्य भागांत तांदूळ फार पिकतो. तांदूळ हें जिल्ह्याचें मुख्य पीक आहे. ह्या ठिकाणीं गुरांकरितां मोठालीं जंगलें आहेत. येथें बैल, गाई व घोडे शान संस्थानांतून आणतात. जिल्ह्याचे टौंगू, यु आणि श्वेगी असे तीन भाग केले आहेत.

गांव—टौंगू जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. या गांवाची रचना सुरेख असून यांत दीड मैल लांब व अर्धा मैल रुंद असा एक तलाव आहे. गांवाच्या भोंवतालीं १७० फूट रुंदीचा खंदक असून तो पावसाळ्यांत तुडुंब भरलेला असतो.

**टौंग्यु**— हे जंगली लोक मूळचे करेण जातीचे असून ब्रह्मदेशाच्या पूर्व सरहद्दीवर व शान संस्थानच्या मध्यभागीं व पश्चिम सरहद्दीच्या प्रदेशांत राहतात. हे जवळजवळ करेण भाषेसारखीच भाषा बोलतात. यांच्यांतील पुरुषांचा पेहराव शान लोकांप्रमाणें आहे. म्हणजे हे लोक साधें जाकीट व ढिली विजार घालतात. या लोकांच्या बायका अंगावर एक मोठें पांघरूण घेऊन आंतून पैरण घालतात. हे नांवाचेच बौद्धधर्मी आहेत. कारण ते पिशाच्चादिकांची पूजा करतात.

**ट्युनिस**—ट्युनिशिआ. उत्तर आफ्रिकेंतील एक बार्बरी संस्थान व फ्रान्सच्या संरक्षणाखालील एक देश. क्षे. फ. ४८,३१३ चौ. मै. व लो. सं. २५ लाखांवर आहे. तीपैकीं मुसलमान बर्बर २३ लक्ष व बाकीच्या २ लक्षांत युरोपियन, माल्टी व ज्यू आहेत. येथील मुसलमान लोक अरबी भाषा बोलतात. बायझर्टा व ट्युनीसचें आखात यांमधील प्रदेश फारच रम्य आहे. या प्रदेशांत पाण्याचा पुरवठा मुबलक आहे. गरम पाण्याचे झरे (उन्हाळीं) पुष्कळ आहेत. तांबें व जस्त या धातूंच्या खाणी या ठिकाणीं आहेत. केफ प्रांतांत लोखंडहि सांपडतें. भॅजरडा नदीच्या खोऱ्यांत संगमरवरी दगड सांपडतात. व इतरत्र फॉस्फेटचे अवशेष फार सांपडतात.

अरब लोक हे भॅजरडाच्या दक्षिणेस, सुसाचा उत्तर समुद्रकिनारा व अल्जीरिआची सरहद्द यांच्यामधील प्रदेशांत राहतात. या लोकांच्या चालीरीती रानटी आहेत. ११ व्या शतकांत जी दुसरी अरब स्वारी आली, त्या स्वारींतील लोकांचे हे वंशज आहेत. अरबी व बर्बर भाषा प्रचारांत आहेत. बर्बर लोकांच्या सुसंघटित अशा राष्ट्रजाती असून त्यांच्यांत लोकसत्ताक राज्यपद्धति प्रचलित आहे.

येथील रोमनकालीन व इतर वेळचे प्राचीन अवशेष म्हटले म्हणजे, राजधानीनजीकचे कालवे, झाधवान येथील देवालय, कार्थेजजवळील प्रचंड पाण्याचा खजिना व एलजेम येथील अर्धचंद्राकार नाटकगृह हे होत. शेती हा येथील मुख्य धंदा आहे. ओट, गहूं व जव हीं उत्तरेचीं मुख्य धान्यें होत. मध्यभागात ऑलिव्हची विस्तृत प्रमाणांत लागवड करण्यांत येते. दक्षिणेंत खजुराची लागवड करतात. याप्रमाणें हा देश कृषिप्रधान असल्यानें खाद्य धान्यें विस्तृत प्रमाणावर पिकवितात.

हा देश फ्रान्सच्या संरक्षणाखालीं आल्यापासून येथील व्यापार बराच भरभराटला आहे. ऑलिव्ह झाडांची समृद्धि असल्यानें ऑलिव्ह तेल, गहूं, जव, खजूर, लोंकर, तांबें, जस्त, इ. जिन्नस येथून परदेशीं जातात. युरोपांत तयार झालेलें सामान, यंत्रें, साखर, इमारती लांकूड, मद्यार्क, कोळसा व पेट्रोलिअम, इ. वस्तू बाहेरून येतात. उंट हें इकडे मुख्य वाहन आहे. येथील राज्यकर्त्यांचा वंश १७०५ पासून आहे. सध्यांचे सिद्दी महंमद अल् अमीन हे १९४३ सालीं गादीवर आले. यांचें अरब प्रधानमंडळ व अधिकारी मंडळ यांचीच राज्यावर सत्ता आहे. व त्यांच्यावर फ्रान्सची फक्त अप्रत्यक्ष देखरेख आहे. मात्र सर्व ख्रिस्ती लोकांवर व परकीयांवर फ्रान्सची प्रत्यक्ष सत्ता आहे. एक फ्रेंच रेसिडेंट जनरल देखरेखीला असतो. सु. ५०० सरकारी शाळा आहेत. ट्युनिस येथें मोठ्या मशिदींत मुस्लिम विद्यापीठ आहे.

शहर—ट्युनिस शहर ट्युनिशियाची राजधानी असून उत्तर आफ्रिकेंतील ईजिप्तच्या बाहेरचें सर्वांत मोठें शहर आहे. इलबहिरा सरोवर कृत्रिम खाडीनें ट्युनिसच्या आखाताशीं जोडल्यानें ह्या शहराचें रूपांतर बंदरांत झालेलें आहे. या शहराचा आकार अर्धचंद्राकृति असून कसबा अथवा बालेकिल्ला अगदीं उंचावर आहे.

ट्युनिस शहरांत चांगलीं इस्पितळें व लोकांस उपयोगी संस्था आहेत. येथील बंदरांत येणाऱ्या जहाजांत निम्मीं फ्रेंच, एक-तृतीयांश इटालियन व बाकीचीं ब्रिटिश असतात. मुख्य व्यापार फ्रान्सशीं चालतो. फास्फेट, खनिज पदार्थ, द्विदल धान्यें, ऑलिव्ह तेल, गुरेंढोरें, कातडीं, स्पंज व मेण ह्या मालाची निर्गत होते. कापड, पीठ, लोखंडी सामान, कोळसा, साखर, चहा, कॉफी, वगैरे माल परक्या देशांतून येतो.

लो. सं. (स. १९३६) २,१९,५५८. ट्युनिसच्या आसमंतांतील भाग फार रमणीय आहे. आग्नेयीस एका सुंदर टेंकडीवर फ्रेंच किल्ला असून शहराच्या वायव्य वेशीपासून सव्वा मैलावर बार्डो नांवाचा राजवाडा आहे. येथील पदार्थसंग्रहालयांत रोमन व कार्थेजियन अवशेष व नमुने ठेवण्यांत आले आहेत.

**ट्यूटन लोक**—या जमातीचें मूलगृह जर्मनीच्या वायव्य प्रदेशांत एल्बच्या उत्तर बाजूस असावेंसें दिसतें. ख्रि. पू. ४ थ्या शतकांत हे पुढें आले व त्यांनीं गॉल प्रांत बेचिराख केला, पण

एक्सनजीक लढाईत मार्सिसनें त्यांचा पूर्ण पराभव केला ( ख्रि. पू. १०२ ).

आज ट्यूटॉनिक वंशीयांत ( १ ) हाय जर्मन ( उत्तर आणि मध्य जर्मनी, स्वित्झर्लंड आणि ऑस्ट्रिया यांतील लोक ) ; ( २ ) लो जर्मन ( फ्रिझिअन, प्लाटड्यूश, डच, फ्लेमिंग आणि ब्रिटनमध्यें राहिलेले सॅक्सन, अँगल आणि इतर जातींचे इंग्लिश लोक ); ( ३ ) स्कँडिनेव्हिअन ( नॉर्वेजियन, स्वीड, डेन आइसलंडर लोक ), हे प्रादेशिक लोक येतात. पण साधारणपणें जर्मन लोकांना ट्यूटन हें नांव लावण्यांत येतें.

**ट्रॉट्स्की, लेऑं** ( १८७९–१९४० )—( दाविदोविश ब्रॉन्स्टिन ). रशियांतील एक क्रांतिकारक पुढारी. याचें नांव लेनिनच्या नांवाबरोबर आदरानें उच्चारिलें जातें. हा ज्यू धर्माचा रशियन साम्यवादी ( कम्युनिस्ट ) होता. १९१७ जुलैमध्यें केरेन्स्की याचा पाडाव करण्याचा जो प्रयत्न झाला त्यांत हा एक प्रमुख पुढारी होता ; पण सदरहू प्रयत्न सफल झाला नाहीं. म्हणून १९१७ ऑक्टोबरमध्यें पुन्हां तसाच प्रयत्न होऊन ट्रॉट्स्कीचा विजय झाला ; नंतर तो परराष्ट्रमंत्री झाला, आणि बुखारिन याच्या नेतृत्वाखालील कट्टर वाम पक्षाचा ( एक्स्ट्रीम लेफ्ट पार्टी ) सभासद होऊन त्यानें लेनिनला अतिशय जोराचा विरोध केला. १९१८ सालीं तो लाल सैन्या( रेड आर्मी )चा कमांडर–इन्–चीफ झाला, आणि कडक लष्करी धोरणाचा त्यानें पुरस्कार केला. १९२५ सालीं त्याला लष्करी हुद्यावरून काढून टाकण्यांत आलें. १९२६ सालीं रशियन सरकारच्या विरोधी पक्षाचा पुढारी झाला, म्हणून १९२८ सालीं स्टॅलिननें त्याला हद्दपारीची शिक्षा दिली. १९३६ त स्टॅलिनला मारण्याच्या कटांत हा सांपडला होता. पुढील सालीं तो मेक्सिकोंत गेला व तेथें १९४० सालीं त्याचा खून झाला.

**ट्रान्सकॉकेशिया**—हें रशियांतील एक सोव्हिएट सोशालिस्ट फेडरल रिपब्लिक होतें. या लोकराज्य–संघामध्यें १९२२ सालीं अझरबैजान, आर्मेनिया आणि जॉर्जिया या तीन संस्थानांचा समावेश करण्यांत आला. संघाची राज्यघटना आणि प्रत्येक संस्थानाची राज्यघटना सारख्याच स्वरूपाची असे. टिफ्लिस हें शहर या संघाची राजधानी होतें. १९३६ सालीं वरील तीन राज्यें स्वतंत्र लोकराज्यें झालीं.

**ट्रान्सजॉर्डन**— अरबस्तानांत हें एक स्वतंत्र राज्य आहे व तेथील राजाला अमीर म्हणतात. हें राज्य जॉर्डन नदीपासून मृत समुद्रापर्यंत पसरलेलें आहे. क्षे. फ. ३४,७४० चौ. मै.. लो. सं. ४,००,००० असून त्यांपैकीं ३,२०,००० अरब मुस्लिम, ५०,००० अरब खिस्ती आणि ३०,००० कॉकेशिअन ( सिर्क्यासियन ) लोक आहेत. पहिल्या महायुद्धापूर्वी ट्रान्सजॉर्डन हा आशियांतील तुर्कस्तानचा भाग होता, पण नंतर १९२२ मध्यें राष्ट्रसंघाच्या मान्यतेनें हा प्रदेश ब्रिटनच्या वर्चस्वाखालीं देण्यांत आला. १९२१ मध्यें अबदुल्ला ( इराकच्या फैझल राजाचा भाऊ ) हा या प्रदेशाचा अमीर झाला. १९२९ सालीं एक मंत्रिमंडळ अमिराच्या मदतीस देण्यांत आलें. १९४६ सालीं ब्रिटननें या राज्याचा स्वतंत्र राष्ट्राचा दर्जा मान्य केला. हेजाझ रेल्वे या देशामधून गेली आहे आणि या प्रदेशाचा पश्चिम भाग सुमारें ३० मै. रुंदीचा असून सुपीक प्रदेश आहे व तेथें शेती करतात. बाकीचा सर्व प्रदेश वालुकामय आहे. तथापि तेथें ग्रामीण धंदे चालतात. या प्रदेशांत फॉस्फेटयुक्त खनिज द्रव्यें आहेत. आणि मृत समुद्रानजीक पोटॅश सांपडतो. या प्रदेशाची राजधानी अम्मान हेजाझ रेल्वेवर असून तेथें रॉयल एअर फोर्सचा वैमानिक तळ आहे ( कायरो–बगदाद विमानमार्ग ). हें शहर जेरुशलेमला मोटार सडकेनें जोडलेलें आहे. या प्रदेशांत सर्वांत मोठें शहर एस–सॉल्ट हें असून तें शेती आणि द्राक्षाचे मळे यांचें केंद्र आहे. याशिवाय मादेबा, हेस्बन, माआन आणि अल्–केरक हीं शहरें आहेत. सरकारी भाषा अरबी आहे.

**ट्रान्सव्हाल**—दक्षिण आफ्रिका संघा( दि युनियन ऑफ साउथ आफ्रिका )मधील एक प्रांत. हा प्रथम केप भागांतल्या बोअर शेतकऱ्यांनीं १८३६–३७ त वहिवाटींत आणला व आपली वसाहत केली. इंग्लिश लोकांच्या जुलमी नियंत्रणाला कंटाळून १८५२ मध्यें ते स्वतंत्र झाले. १८७७ मध्यें इंग्रजांनीं पुन्हां कबजा केला व आपल्या ताब्यांतील मुलखास जोडला, परंतु थोड्याच वर्षांत १८८१ मध्यें त्यांना अंतर्गत स्वातंत्र्य द्यावें लागलें. १९०० मध्यें पुन्हां इंग्रजांनीं पूर्णतया हा आपल्या सत्तेखालीं घेतला. सन १९०६ मध्यें जबाबदार राज्यपद्धतीच्या धोरणावर पुन्हां स्वराज्याचे अधिकार मिळाले. १९१० मध्यें आफ्रिकन युनियनमध्यें एक घटक म्हणून याला मान्यतापूर्वक घेण्यांत आलें. क्षेत्रफळ १,१०,४५० चौ. मै. व लो. सं. ( १९३६ ) १,३३,४१,४७० ; यांत युरोपीयन फक्त ८,००,००० व हिंदी लोक सु. २५,००० आहेत. ट्रान्सव्हालची जमीन बहुतेक उंच माथ्यावरच्या पठाराची आहे. खानदानी उत्तम जनावरें हा या भागाचा विशेष आहे. जनावरांची आणि मेंढ्यांची जोपासना व पैदास विशेष आहे. सोनें आणि हिरे–विशेषतः जोहान्सबर्गच्या आसपासचे प्रसिद्ध आहेत. खनिज संपत्ति विपुल आहे. व्यापाराकरितां उत्कृष्ट रेल्वे आहेत. राजधानीचें शहर जोहान्सबर्ग.

**ट्रॉय ( ट्रोड )**—हा देश आशियाचें वायव्येकडील भूशिर आहे. ट्रोड म्हणजे पश्चिम व नैर्ऋत्य मिशिया असावा. यामधून मेंडेरस नदी वाहते. ह्या प्रांतांत इमारतीचें लांकूड,

ओक, एल्म, वगैरे वृक्ष व कलिंगडें होतात. कापूस, गहूं, वगैरे पिकतो. येथील जमीन सुपीक आहे.

होमरनें ईलियडमध्यें लिहिलेली ट्रोडची हकीगत म्हणजे निव्वळ कविकल्पना होय. इ. स. पूर्वी ७ व्या शतकारंभीं थ्रेशियन टोळधाड येऊन तिनें ट्रोडमध्यें धुमाकूळ मांडिला असावा. ग्रीक वसाहतीपासून ट्रोडच्या खऱ्या इतिहासास सुरुवात होते. इ. स. पूर्वी ३२४ मध्यें येथील लोकांनीं शिकंदरला ट्रोजन युद्धांतील शस्त्रें दाखविलीं. ह्यानें शहरास राजकीय स्वातंत्र्य दिलें. इ. स. पूर्वी ३९० त रोमन लोक ट्रोडमध्यें शिरले. फिम्ब्रीआनें हें शहर इ. स. पू. ८५ मध्यें घेऊन पुनः मोडकळीस आलेल्या स्थितींतच सोडून दिलें. परंतु सुलानें तें बांधिलें. ४ थ्या शतकानंतर ह्याचा ऱ्हास होत गेला. १८७० त श्लीमननें ट्रॉय भागांत उत्खनन सुरू करून तें वीस वर्षें चालविलें. व इमारती बांधकाम आणि मातींचीं भांडीं शोधून काढलीं. तीं ख्रि. पू. दीड हजार वर्षांपूर्वीचीं दिसतात.

**ट्रिपोली**—उत्तर आफ्रिका, लिबियांतील एक प्रांत. हा १९११–१२ पर्यंत तुर्कस्तानचा होता. नंतर तो इटलीनें घेतला. त्याच्या उत्तरेस भूमध्यकिनारा असून सुमारें १,१८० मैलांचा हा किनारा आहे. हा प्रांत ट्युनिस व ईजिप्त यांमध्यें असून याचें क्षे. फ. सुमारें ४ लक्ष चौ. मैल आहे. लो. सं. ५,४०,६००.

राजधानीच्या दक्षिणेच्या बाजूस 'जेबेल' नांवाच्या डोंगराच्या रांगेचें टक्रूर नांवाचें ज्वालामुखीचें शिखर (२,८०० फूट) आहे. खास ट्रिपोली व फेझन खोलवटा यांमध्यें ४०,००० मैल क्षेत्रफळाचें हमदा–इल–होमरा नांवाचें डोंगर पठार आहे. या निर्जन 'तांबड्या हमदां'तून पूर्वी नद्या वाहत होत्या. ओसाड घेडेम्स जिल्ह्याच्या पलीकडे पुष्कळसें हिरवें गवत असलेले भाग, खजुराचीं झाडें व कांहीं पाण्याचीं तळीं आहेत.

ट्रिपोलीचें हवामान नेहमीं बदलत असतें. उत्तरेकडे ५ पासून १५ इंचांपर्यंत पाऊस पडतो.

खजुराचीं झाडें सर्वत्र आढळतात. कांहीं जिल्ह्यांत द्राक्षें होतात. ओक, पाइन, ऑलिव्ह, वगैरे वृक्ष असून बदाम, अंजीर, डाळींब, जरदाळू, वगैरे फळझाडें येथें आहेत.

१९ व्या शतकाच्या शेवटच्या ५० वर्षांत येथें खणून जे शोध झाले त्यांवरून असें दिसतें कीं, येथें आदिमानवाची वस्ती होती, एवढेंच नव्हे तर आयबेरिया, ब्रिटनी व ब्रिटिश बेटें याप्रमाणें येथें पाषाणयुगीन संस्कृति नांदत होती.

रोमन काळापासून ट्रिपोली हेंच नांव कायम असून सीरियांतील ट्रिपोलीपासून हें ओळखण्यासाठीं यास वेस्ट (पश्चिम) ट्रिपोली म्हणतात. यावरून या प्रांताचें मुख्य शहर ट्रिपोली हें जगांतील एक प्राचीन शहर असून ऐतिहासिक दृष्ट्या प्रसिद्ध अशा व्यापारी मार्गावर हें वसलें होतें असें दिसतें.

ट्रिपोली हा निव्वळ शेतकीचा व व्यापाराचा देश असून यांत उद्योगधंदे नाहींत. व मिठाखेरीज दुसरे खनिज पदार्थ नाहींत. गहूं, जव, गवत, ऑलिव्ह, केशर, अंजीर, वगैरे पदार्थ होतात. नारिंग, लिंबू, वगैरे फळें व भाजीपाला येथें विपुल होतो.

पूर्वी येथें निग्रो गुलामांचा व्यापार चालत असे. सांप्रत गवत, जव, अंडीं, गुरेंढोरें, स्पंज, चटया आणि मध्य आफ्रिकेंतून हस्तिदंत, शहामृगाचीं पिसें, कमावलेलीं कातडीं व सोनें सांपडणारी माती या पदार्थांचा व्यापार चालतो. येथें खाद्य पदार्थ, कापड, तंबाखू, धातू, व लोखंडाचे सामान यांची आयात होते. १९४३ सालीं दुसऱ्या महायुद्धांत दोस्तराष्ट्रांनीं लिबिया जिंकून घेतला व सध्यां त्यावर एक ब्रिटिश सर्वाधिकारी नेमला आहे.

शहर—हें ट्रिपोलीचें मुख्य शहर असून हें भूमध्य समुद्रांतील एका भूशिरावर वसलेलें आहे. प्राचीन किल्ल्यांची रांग बंदराच्या एका बाजूनें संरक्षण करीत असून दुसऱ्या बाजूस अंतर्दुर्ग आहे. हा दुर्ग स्पॅनिश सत्तेच्या वेळचा आहे. शहर दिसण्यांत रमणीय असून त्यावर पौरस्त्य छटा दिसते. बंदराजवळ एक रोमन विजयकमान आहे. हिचें काम ॲंटोनियन बादशहाच्या कारकीर्दींत सुरू होऊन मार्कस् ऑरेसच्या वेळेस तें पुरें झालें. पश्चिमेस ओसाड मैदान असून पूर्वेस हिरवीगार असलेली मेसियाची ओलवण आहे. या ओलवणींत कारामान्लियन सुलतानांच्या कबरी व सिद्दी हामोंदाचा बारा घुमट असलेली विहीर आहे.

हें व्यापारी शहर असून याच मार्गानें भूमध्यसमुद्राचा सहाराशीं व्यापार चालतो. लो. सं. १,०८,२४०; यांत सु. ४०,००० इटालियन आहेत. स्थानिक व्यापार यहुदी व माल्टीज लोकांच्या ताब्यांत असून समुद्रमार्गानें होणारा व्यापार इटालियनांच्या ताब्यांत आहे.

**ट्रीएस्टे**—इटली, आड्रिआटिक आखातावरील एक बंदर. ह्याची लो. सं. २,४६,००० होती; पैकीं ¾ इटालियन असून बाकीचे जर्मन, ज्यू, ग्रीक, इंग्लिश व फ्रेंच लोक आहेत. हें शहर ट्रीस्टच्या आखातावर वसलें असून याचा देखावा फार रमणीय आहे. येथें १६८० सालीं बांधलेला एक किल्ला आहे. येथील कित्येक चौक उत्कृष्ट शिल्पाच्या स्मारकांनीं विभूषिले गेले आहेत. येथील मराथामगोरचें ख्रिस्ती देवालय जेसुइट लोकांच्या शिल्पकलेचा उत्कृष्ट मासला होय. येथील इतर महत्त्वाच्या इमारती म्हटल्या म्हणजे नगरभवन, प्रांतिक प्रतिनिधिसभागृह, व्यापाराची कचेरी, वगैरे होत. येथें एक मोठी नौकानयन संस्था व पदार्थसंग्रहालयहि आहे.

ह्या शहरीं पेट्रोल शुद्ध करण्याचे, रासायनिक द्रव्यें तयार

करण्याचे, साबण बनविण्याचे, वगैरे अनेक कारखाने आहेत. ह्या शहराच्या अवाढव्य व्यापाराकरितां बंदरांत बऱ्याच सुधारणा केल्या आहेत. ह्या बंदरांतून ऑस्ट्रिया देशांत कापूस, सुती कापड, कॉफी, कोळसा, वगैरे जिन्नस येऊन परदेशीं लोंकर, गरम कपडा, कागद, यंत्रें, वगैरे जिन्नस जातात.

**ट्रीट्स्के, हेन्रिक फॉन** ( १८३४–१८९६ )—एक जर्मन इतिहासकार व राजकीय लेखक. हेन्रिक हा बहिरा असल्यामुळें त्याला सार्वजनिक कामांत लक्ष घालतां आलें नाहीं. लाइप्झिग व बॉन येथील अभ्यासक्रम पुरा झाल्यानंतर तो लाइप्झिग येथें इतिहास व राजनीति यांवर व्याख्यानें देत असे. विद्यार्थ्यांवर त्याची विलक्षण छाप असे. १८७४ सालीं तो बर्लिन येथें प्रोफेसर झाला. पुढें एका ऐतिहासिक मासिकाचा संपादक झाला. तरुण पिढीच्या मनःसंस्कृतीची घडण करण्याचें बरेंचसें श्रेय त्याच्याकडे आहे. सोशिआलिस्ट, पोल लोक व रोमन कॅथॉलिक लोक, यांचा पाडाव करण्यास त्यानें मदत दिली. तो ब्रिटिश लोकांचा कट्टा दुश्मन् होता. व १९ व्या शतकाच्या अखेर ब्रिटिशांच्या विरुद्ध उत्पन्न झालेल्या वातावरणास हाच कारणीभूत आहे.

इतिहासकार या नात्यानें त्याची योग्यता अत्यंत मोठी आहे. त्याचा इतिहासाचा अभ्यास मुत्सद्दी दृष्टीचा आहे. प्रशियाच्या पलीकडे त्याचें लक्ष बहुतेक जात नसे. '१९ व्या शतकांतील जर्मनीचा इतिहास' हा त्याचा मुख्य ग्रंथ होय.

**ट्रुमन, हॅरी** ( १८८४–        )—एक अमेरिकन मुत्सद्दी व सं. संस्थानांचा सध्यांचा अध्यक्ष. पदवीधर झाल्यावर लष्करी विद्यालयात प्रवेश मिळविण्याचा यानें प्रयत्न केला, पण अधु डोळ्यांमुळें त्याला तेथें घेण्यांत आलें नाहीं. पहिल्या महायुद्धांत तो फ्रान्सच्या रणभूमीवर लढला व मेजरच्या हुद्यापर्यंत चढला. मिसोरीचा प्रतिनिधि म्हणून तो सिनेटमध्यें होता. दुसऱ्या महायुद्धाच्या कामीं होणाऱ्या उत्पादनांत जी नासधूस चालली होती तिची चौकशी करण्यासाठीं नेमलेल्या सिनेट कमिटीचा तो अध्यक्ष होता व त्या ठिकाणची त्याची कामगिरी फार नांवाजण्यासारखी झाली. तेव्हां १९४५ च्या जानेवारींत त्याला सं. संस्थानांच्या उपाध्यक्षाची जागा मिळाली व १२ एप्रिलला रूझवेल्ट एकाएकीं वारला तेव्हां ट्रुमन आपोआप अध्यक्ष-पदावर चढला. लवकरच इटली आणि जर्मनी शरण आले, पण जपान तसाच राहिला. तेव्हां ट्रुमननें हिरोशिमा आणि नागासाकी या शहरांवर अणुबाँब टाकण्यास परवानगी देऊन जपानला शरण आणलें. यामुळें कांहीं जण ट्रुमनला या मोठ्या मानव-हत्येबद्दल दोषी धरतात. यानंतर तहाच्या वाटाघाटींत ट्रुमननें अमेरिकेच्या वर्तीनें जें प्रत्यक्ष लक्ष पुरविलें तें प्रशंसनीय आहे. तो व्यावहारिक उदारमतवादी आहे. युरोपची दिवाळखोरी थांबविण्यासाठीं त्यानें मदतीची चांगली आंखणी केली आहे. १९४८ च्या नोव्हेंबरांत झालेल्या निवडणुकींत ट्रुमन आपला जबरदस्त प्रतिस्पर्धी ड्युई याचा पराभव करून अध्यक्षपदावर आरूढ झाला.

**ट्रेंगॅन्यू**— मलाया संघराज्यांतील एक संस्थान. हें संस्थान मलाया द्वीपकल्पाच्या पूर्व बाजूस असून त्याचें क्षे. फ. ५,०५० चौ. मै. आणि लो. सं. २,११,०४१ आहे. येथील प्रदेश सुपीक व पाणीपुरवठा भरपूर आहे. येथून कथील, रबर, खोबरें, मिरीं परदेशीं जातात. याची राजधानी काला ट्रेंगेन्यू असून हें संस्थान १९०१ पासून ब्रि. संरक्षणाखालीं होतें. नंतर १९४८ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत एक मलाया संघराज्य स्थापन झालें; त्यांत हें संस्थान आहे. हल्लींचे सुलतान इस्माईल इब्न अल् मरहूम हे आहेत.

**ट्रेंटो**— इटली, ट्रेंटिनो प्रांताची राजधानी. ॲडीजे नांवाच्या एका नदीच्या तीरावर हें शहर वसलेलें असून शहराच्या भोंवतीं प्रचंड तट आहेत. या शहरांत मोठे राजवाडे असून शहर फार रमणीय आहे. अजबखाने, भव्य प्रार्थनामंदिरें, मोठें ग्रंथसंग्रहालय, डांटे कवीचा पुतळा, विस्तीर्ण टाउन हॉल यांमुळें तर शहराच्या रमणीयतेंत भरच पडली आहे. ऐतिहासिक दृष्ट्या ट्रेंटोला पुष्कळ महत्त्व आहे. ट्रेंटोच्या इतिहासांत 'कौन्सिल ऑफ ट्रेंटो' ऊर्फ ट्रेंटोची धर्मपरिषद ( १९४५–६३ ) हिला फार महत्त्व आहे. संगमरवरी दगडाच्या खाणी व मातीच्या भांड्यांचे कारखाने यांविषयीं हें प्रसिद्ध आहे. लो. सं. ५०,०००.

**ट्रेन्टॉन**—अमेरिका, संयुक्त संस्थानांतील न्यू जर्सी या संस्थानाची राजधानी. हें डेलावेर नदीच्या कांठीं असून येथपर्यंत नाविक वाहतूक चालते. हें मातीच्या भांड्यांच्या धंद्याचें केंद्र आहे. पेन सल्व्हानियामधील दगडी कोळशाच्या खाणीपासून हें शहर नजीक आणि वाहतुकीच्या साधनांनीं युक्त असल्यामुळें येथें महत्त्वाचे उद्योगधंदे चालतात. येथील लोकसंख्या १,२४,६९७ आहे.

**ट्रेबिझाँड**—आर्मेनिया. हें शहर काळ्या समुद्राच्या आग्नेय कोंपऱ्यावर आहे. ग्रीकांनीं येथें वसाहत केल्यापासून हें व्यापाराचें केंद्र बनलें. हें अडीच शतकेंपर्यंत एका साम्राज्याच्या राजधानीचें ठिकाण होतें. इराण, मध्य आशिया व इतर देश यांतून युरोपांत जाणारे जिन्नस या बंदरांतून जात असल्यामुळें या शहराचें महत्त्व वाढलें आहे. तेथें हवा उत्तम असते. जुन्या शहराला हल्लीं काले असें म्हणतात व येथें तुर्क राहतात. याची लो. सं. ५५ हजार असून निम्मे मुसलमान व बाकी ख्रिस्ती आहेत. हें प्रांताचें मुख्य ठिकाण आहे.

**ट्रेव्हिथिक, रिचर्ड** (१७७१–१८३३)— एक ब्रिटिश एंजिनियर आणि संशोधक. त्याचा पहिला यांत्रिक शोध 'सुधारलेला पंप' हा होय. नंतर त्यानें अतिभारकल्पयंत्र (हाय प्रेशर स्टीम एंजिन) सुधारून उत्तम बनवलें. १८०१ सालीं पथसंचारी (रोड लोकोमोटिव्ह) वाफेच्या शक्तीनें चालवून प्रवाशांची यांत्रिक वाहतूक प्रथम त्यानें सुरू केली, आणि ट्रॅम रोड लोकोमोटिव्हहि त्यानें यशस्वीपणें चालू केलें. त्याच्याच कल्पना घेऊन पुढें स्टीफेन्सननें वाफेच्या यंत्रांत सुधारणा केली.

**ट्रेव्हेलिअन, सर जॉर्ज** (१८३८–१९२८)—एक ब्रिटिश ग्रंथकार आणि राजकारणी पुरुष. तो आयर्लंडचा चीफ सेक्रेटरी होता (१८८२–८४), आणि स्कॉटलंडचाहि सेक्रेटरी होता (१८८६ आणि १८९२–१८९५). १९११ सालीं त्याला ओ. एम्. पदवी मिळाली. त्यानें लिहिलेल्या ग्रंथांत 'लाइफ अँड लेटर्स ऑफ लॉर्ड मेकॉले' (लॉर्ड मेकॉलेचें चारित्र व पत्रें) हें अर्वाचीन काळांतील एक उत्कृष्ट चरित्र म्हणतां येईल. उत्तम इतिहासकार म्हणूनहि तो प्रसिद्ध आहे.

**ट्रोलोप, ॲन्थनी** (१८१५–१८८२)—एक इंग्रज कादंबरीकार. त्याचा वाङ्मयप्रेमी कुटुंबांत जन्म झाला. त्या कुटुंबांत ज्या अतिशय सुप्रसिद्ध व्यक्ती होऊन गेल्या त्याः—(१) ट्रोलोपची आई फ्रॅन्सिस ट्रोलोप (१७८०–१८६३)–तिचें लिखाण पुष्कळ आहे. पण तिची प्रसिद्धि कादंबरीकार म्हणून आहे. तिच्या कादंबऱ्या, 'दि व्हिकार ऑफ रेक्सहिल' आणि 'विडो बार्नेबी' या होत. पण 'दि डोमेस्टिक मॅनर्स ऑफ दि अमेरिकन्स' (अमेरिकन लोकांच्या घरगुती चालीरीती) या पुस्तकामुळें तिची कुप्रसिद्धि झाली आहे. (२) ट्रोलोपचा थोरला भाऊ थॉमस आडाल्फस ट्रोलोप (१८१०–१८९२)–याच्या असंख्य कादंबऱ्या असून त्यांपैकीं 'ला वेआता' आणि 'दि गारस्टँग्स ग्रेज' या प्रसिद्ध आहेत. (३) ॲन्थनी ट्रोलोप यानें १८३४ सालीं पोस्ट ऑफिसांत कारकुनाची नोकरी धरून तेथें ३३ वर्षें मोठ्या कर्तबगारीनें नोकरी केली, आणि त्या खात्यांत पुष्कळ सुधारणा केल्या. नोकरींत असतांना त्यानें कादंबऱ्या लिहिण्यास सुरुवात केली आणि पहिल्या दोन कादंबऱ्या आयरिश लोकांच्या जीवनक्रमाबद्दल लिहिल्या; पण त्या अगदीं अयशस्वी झाल्या. पुढें १८५५ मध्यें त्यानें 'दि वॉर्डन' ही कादंबरी प्रसिद्ध केली, आणि तो प्रथम प्रसिद्धीस आला. यानंतर त्यानें 'बार्सेटशायर नॉव्हेल्स' म्हणून एक कादंबरीमाला सुरू केली. आणि या कादंबरीमालेमुळें ट्रोलोपचे नांव अजरामर झालें आहे. या मालेंत 'बार्चेस्टर टॉवर्स', 'डॉ. थॉर्न', 'फ्रेमले पार्सनेज' इ. कादंबऱ्या आहेत. या मालेशिवाय त्यानें आणखी ६० कादंबऱ्या लिहिल्या. त्यांपैकीं उत्तम कादंबऱ्या आहेत त्या म्हणजे 'ऑर्ले फार्म' आणि 'दि थ्री क्लार्क्स' (तीन कारकून) या होत. त्यानें आत्मवृत्त लिहिलें आहे, त्यांत वाङ्मयाच्या धंद्याबद्दल मोठी मनोरंजक हकीकत दिली आहे. त्यानें आपल्या कादंबऱ्यांवर ७०,००० पौंड मिळविले. त्याच्या कादंबऱ्यांत अतिशयोक्ति आढळत नाहीं. त्यानें तत्कालीन समाजाचें अत्यंत यथातथ्य चित्र वर्णिलें आहे.

**ट्वीड**—लोंकरीपासून तयार केलेल्या हरएक रंगाच्या कापडाला ट्वीड म्हणतात. खरें ट्वीडचें कापड फक्त लोंकरीचें असतें. परंतु आतां मिश्र प्रकारच्या कापडालाहि हेंच नांव लावतात. अद्यापहि स्कॉच ट्वीड हें कापड शुद्ध लोंकरीचें असतें. हॅरीस ट्वीडहि तसेंच असतें. परंतु अलीकडे निरनिराळ्या प्रकारचे रंग आणि निरनिराळे प्रकारचे धागे यांच्या मिश्रणानें लोंकरीचें कापड तयार करतातः ती कला इतकी परिपूर्ण झाली आहे कीं, शुद्ध लोंकरीचें कापड आणि बनावट लोकरीचें कापड ओळखून काढणें फार अवघड झालें आहे.

**ट्वेन, मार्क** (१८३५–१९१०)—हें सॅम्युअल लँगहोर्न क्लेमेन्स या अमेरिकन ग्रंथकाराचें टोपणनांव आहे. बारा वर्षांचा असतांनाच ह्याचा बाप वारला. वयाच्या १७ व्या वर्षीं नदीवरील एका जहाजावर तो नावाडी झाला. पण १८६१ सालीं लढाई सुरू झाल्यामुळें त्याची नोकरी गेली व पुढें तो आपल्या भावाबरोबर पश्चिमेकडे गेला; तेथें गेल्यावर तो 'मार्क ट्वेन' या टोपण नांवाखालीं स्थानिक वर्तमानपत्रांत लिहूं लागला. १८६७ सालीं एका वर्तमानपत्रातर्फें तो भूमध्यसमुद्रांतील बंदराकडे जाणाऱ्या बोटीबरोबर गेला. प्रवास करीत असतांना त्यानें लिहिलेलीं पत्रें 'दि इनोसंट्स ॲब्रॉड' (निरागस प्रवासी) या नांवाच्या पुस्तकांत प्रसिद्ध झालीं आहेत. हें पुस्तक फार लवकरच लोकप्रिय झालें. पुढें तो बफेलो येथें एक दैनिक काढूं लागला.

त्याचें सर्व लिखाण २२ भागांत प्रसिद्ध झालें आहे. पुस्तकांवर मिळविलेल्या सर्व पैशानें त्यानें आपलें सर्व कर्ज फेडलें. १९०७ सालीं त्याला ऑक्सफोर्ड विद्यापीठाची डॉक्टरची पदवी मिळाली. अमेरिकन ग्रंथकारांत मार्क ट्वेन बरेच दिवस लोकप्रिय होता. तो विनोदी लेखक म्हणून प्रसिद्ध आहे. त्याचीं नैतिक तत्त्वें अत्यंत उच्च दर्जाचीं होतीं. 'टॉम सोयर', 'हकलबेरी फिन', 'पुडनहेड विल्सन', 'ख्रिश्चन सायन्स', वगैरे त्याचीं मुख्य पुस्तकें आहेत.

## ठ

ठ—हा वर्ण तीन अवस्थांतून गेलेला आहे. पहिली अवस्था अशोकाच्या दिल्ली येथील शिवालिक स्तंभावरील लेखांत, व दुसरी आणि तिसरी अवस्था इ. स.च्या ११ व्या शतकांतील उज्जयनीच्या लेखांत दृष्टोत्पत्तीस येईल.

**ठक्कर, अमृतलाल** ( १८६९- )—एक वन्य-समाज-सुधारक. यांचा जन्म भावनगर येथें झाला. पुणें इंजिनिअर कॉलेजमधून हे १८९० मध्यें एल्. सी. ई. झाले. १८९० ते १९१४ पर्यंत यांनीं इंजिनिअर म्हणून काम केलें. ईस्ट आफ्रिकेमध्यें युगांडा रेल्वेमध्यें ३ वर्षें, सांगली येथें स्टेट इंजिनिअर म्हणून १९०३ ते १९०५ पर्यंत व मुंबई म्युनिसिपालिटींत १९०५ ते १९१४ पर्यंत. नंतर यांनीं सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटींत जाण्याकरितां राजीनामा दिला. यांनीं मागासलेल्या जातींतील अज्ञान व व्यसनें काढून टाकण्याचें कार्य सतत चालविलें आहे व त्याकरितां हे पंचमहाल जिल्ह्यांतील डोंगरांमध्यें राहणाऱ्या भिल्ल लोकांत जाऊन राहिले आहेत. त्यांनीं १९२२ मध्यें भिल्ल सेवा मंडळाची स्थापना केली. यांस सर्वत्र ठक्करबाप्पा असें म्हणत. १९३२ मध्यें यांनीं महात्मा गांधी यांनीं स्थापन केलेल्या हरिजन सेवक संघाचे चिटणीस होऊन याहि कार्यास वाहून घेतलें आहे. १९२०–२१ मध्यें यांनीं जमशेटपूर येथें कार्य केलें. १९२६ मध्यें यांनीं खानदेश, ओरिसा, आसाम, वगैरे भागांत तेथील वन्य जातीच्या लोकांच्या आयुष्यक्रमाचा अभ्यास करण्याकरितां प्रवास केला. १९३३–३४–३५ या तीन वर्षांत त्यांनीं सर्व हिंदुस्थानांत संघाच्या शाखा स्थापन करण्याकरितां प्रवास केला व त्या कार्याची सर्वत्र पाहणी केली. महात्मा गांधी यांनीं हरिजन कार्याकरितां काढलेल्या नोव्हेंबर १९३३ ते जुलै १९३४ मधील दौऱ्यामध्यें हे त्यांच्याबरोबर होते.

**ठग, ठगी**—ठग हा एक धार्मिक मारेकऱ्यांचा संप्रदाय आहे. स्थग या संस्कृत व ठक या पाली शब्दापासून ठग हा शब्द बनला असावा. यांना फांसीगर असेंहि म्हणतात. त्यांची मुख्य देवता हिंदूंची काली ( ठाकुराणी ), दुर्गा अथवा भवानी नांवाची देवी असे. या पंथांत हिंदू व मुसलमान दोन्हीहि समाविष्ट होत व भांडणतंटा न करतां भावांप्रमाणें राहत. त्यांच्यांत शिस्त उत्तम असून ते गुप्तपणा फार राखीत. देवीला रक्तपाताशिवाय माणसांचा बळी देणें हा ते धार्मिक विधि मानीत व बळी देऊन मग त्याचा माल लुटीत. त्यांना माणसाचा प्राण घेण्याबद्दल कांहींच क्षिति किंवा पाप वाटत नसे. आपलें हें एक धार्मिक कृत्यच होय अशी त्यांची खरोखरीची समजूत असे. या कृत्यावरच त्यांची उपजीविका असे. पण ते बायकांना कधींहि मारीत नसत. १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत या ठगांचा प्रसार फार झाला होता.



या लोकांच्या संस्था फार गुप्तपणानें चालत असत. कोंकणाशिवाय बाकीच्या सर्व हिंदुस्थानांत हे लोक पसरलेले होते. त्यांची भाषा सांकेतिक असे. तसेंच त्यांच्या कांहीं खुणाहि असत. त्या खुणांवरून अमुक माणूस ठग आहे असें समजून येई.

ठगीची दीक्षा देण्याचा प्रकार मोठ्या समारंभाचा असे. त्या वेळीं त्यांचा उपाध्याय ( हा बहुतेक हिंदु व त्यांतल्या त्यांत ब्राह्मण असे ) एका कुऱ्हाडीच्या साहाय्यानें हा विधि करीत असे. नवीन माणूस संप्रदायांत दाखल केल्यावर गूळ वांटीत. त्यांची शिस्त कडक असे. निरनिराळीं कामें वांटून दिलेलीं असत व तीं ज्याचीं त्यानें पार पाडलींच पाहिजेत असा त्यांचा सक्त नियम असे. हे लोक मोठमोठ्या टोळ्या करून प्रवास करीत. यांना देशांतील कांहीं व्यापारी, सावकार, जहागीरदार, शेतकरी, पोलिस, जमीनदार यांचा गुप्त आसरा होता असें म्हणतात. लुटलेला माल यांच्यामार्फत ठग लोक विकीत असत! कांहीं व्यापारी तर यांच्या गुप्तसंस्थांचे सभासदहि असत.

टिपूचें राज्य खालसा केल्यावर इंग्रजांच्या सैन्यांतील बरेचसे शिपाई एकाएकीं नाहींसे झाले ( १७९९ ) व त्याच वेळीं दख्खनमध्यें ठगी जास्त बोकाळली. सन १८१८–१९ पासून ठगीचा मोड करण्यास प्रारंभ झाला. पुढें १८२९ सालीं जेव्हां त्यांच्यापैकीं एका प्रख्यात फरिंग्या नांवाच्या ठगानें माफीचा साक्षीदार बनून आपल्या मार्गाच्या व पंथाच्या सर्व गुप्त माहितीचा परिस्फोट केला, तेव्हां मात्र ठगीचा नायनाट लवकर झाला. कर्नल स्लीमन याला त्याच्या हाताखालीं सैन्य देऊन केवळ याच कामावर नेमिलें होतें. वरील फितुरी ठगाच्या जबानीवरून भराभर सर्व ठग पकडले गेले व १८३१–३७ पर्यंत ३,२६६ ठगांचा नायनाट करण्यांत आला.

**ठट्टा**—सिंधप्रांत, कराची जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षे. फ. १२२५ चौ. मै. असून यांत ४४ खेडीं आहेत. यांत ६ मुख्य कालवे असून त्यांचें पाणी जमिनीला पुरविलें जातें. तांदूळ, ऊंस, गहूं, जव, ज्वारी, बाजरी, आणि तीळ हीं या तालुक्यांतील मुख्य पिकें आहेत.

ठट्टा शहर तालुक्याचें मुख्य ठिकाण. ठट्टा शब्दाचा अर्थ तीर असा आहे. हें सिंधचा अधिकारी निजामउद्दीन यानें इ. स. १४९५ त स्थापिलें. ठट्टा हें गांव अलीकडचें आहे. अरब

भूगोलवेत्त्यांचें मनहाचरी आणि पेरिप्लुस ग्रंथांतले मीनागरा ह्यांचें स्थान ठठ्ठा हेंच असावें.

अकबरानें सिंध आपल्या राज्यास जोडिला तेव्हां हें गांव मिरझाजानीबेगकडे जहागीर म्हणून होतें. इ. स. १७३९ त हें गांव इराणच्या नादीरशहानें घेतलें. त्याच्यापासून कळहोराजनें व नंतर कळहोराजपासून तालपुर मीर यानें घेतलें.

या गांवीं कापूस व रेशीम यांचीं वस्त्रें विणण्याचे कारखाने आहेत. हें ठिकाण व्यापारास फार सोईचें आहे.

**ठसा छपाई**—( प्रोसेस वर्क ). प्रकाशलेखनपद्धतीनें ( फोटोग्राफीनें ) आकृती, चित्रें, प्रकाशलेख, वगैरे ठसे करून किंवा उठावदार पद्धतीनें एका किंवा अनेक रंगांत छापण्याच्या कलेस ठसा छपाई म्हणतात. या कलेंत कोरलेल्या पद्धतीनें, प्रकाशलेखनक्रियेनें, यांत्रिक कोरण्याच्या क्रियेनें किंवा जिलेटिननें ठसे करणें या क्रियाहि येतात.

रेषा ठसे—साध्या खिळ्यांच्याबरोबर आकृती वगैरे छापण्याकरितां साधे रेषा ठसे सोईचे व स्वस्त असतात. हे रेषा ठसे शाईनें काढलेली चित्रें, आकृती, नकाशे, आराखडे, वगैरेवरून तयार करण्यांत येतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अपारदर्शक काळ्या शाईनें पांढऱ्या स्वच्छ कागदावर काढलेल्या किंवा छापलेल्या कोणत्याहि आकृतीपासून हे ठसे तयार करण्यांत येतात. याकरितां काढावयाच्या आकृती गुळगुळीत पांढऱ्या कागदावर स्वच्छ ठळक रेषांनीं काळ्या रंगांत काढलेल्या असाव्या. या आकृती सामान्यतः कोणत्याहि आकाराच्या चालतात; पण छापून येणाऱ्या आकृतींच्या तृतीयांशानें मोठ्या असल्यास बरें पडतें. ही आकृति फळ्यावर बसवून तीवर तीव्र प्रकाश पाडण्यांत येतो व त्याची ऋण प्रतिमा घेण्यांत येते. या प्रतिमेंत काळ्या रेषा स्वच्छ पांढऱ्या दिसतात. नंतर अंड्यांतील बलक व पालाश द्विक्रुमित ( पोट्याशिअम बायक्रोमेट ) यांचा थर दिलेला एक जस्ताचा पत्रा घेऊन तो या ऋण प्रतिमेच्या खालीं ठेवण्यांत येतो व एका चौकटींत बसवून त्यावर तीव्र प्रकाश पाडण्यांत येतो. जेवढ्या पांढऱ्या स्वच्छ रेषा त्या ऋण प्रतिमेंत असतात त्यांतून प्रकाश जस्ताच्या पत्र्यावर जाऊन तेथील बलकाचा थर पाण्यांत विरघळणार नाहीं असा बनतो. जो भाग अपारदर्शक असतो त्यांतून प्रकाश पलीकडे जात नाहीं आणि तेथील बलकाचा थर विरघळूं शकतो. यानंतर त्या जस्ताच्या पत्र्याला शाईचा पातळ थर लावण्यांत येतो व तो पाण्यांत ठेवण्यांत येतो आणि कापसाच्या बोळ्यानें हळूहळू घासण्यांत येतो. त्यामुळें विरघळणारा बलक निघून जातो. यानंतर मूळ आकृति त्या पत्र्यावर काळ्या शाईनें काढल्यासारखी दिसते. नंतर तो पत्रा पुन्हां तापविण्यांत येतो व त्यावर राळेची भुकटी टाकण्यांत येते व तिच्या पाठीमागच्या बाजूस लाखेचें रोगण लावण्यांत येतें. नंतर तो पत्रा नत्रिकाम्लाच्या ( नायट्रिक ॲसिड ) कमजोर द्रावणांत ठेवण्यांत येतो. कांहीं वेळ ठेवल्यानंतर तो पत्रा काढून धुऊन वाळविण्यांत येतो. नंतर पुन्हां गरम करून पुन्हां त्यावर राळेची भुकटी टाकण्यांत येते व यामुळें ज्या रेषा उठावदार रीतीनें वर उठलेल्या असतात त्यांचे कांठ अथवा कोरा शाबूत राहतात व त्यावर अम्लांचा परिणाम होत नाहीं. यानंतर पुरेशा खोलीपर्यंत बाकीचा पत्रा खोदला जाईपर्यंत ही क्रिया पुन्हां पुन्हां करण्यांत येते. नंतर हा पत्रा साफ करून खिळ्याच्या उंचीच्या लांकडावर ठोकून बसविण्यांत येतो. या तऱ्हेचे ठसे कोणत्याहि जातीच्या कागदावर किंवा पृष्ठभागावर छापतां येतात.

अर्धवर्ण ठसे—प्रकाशलेख ( फोटोग्राफ ), पाणरंगांतील किंवा इतर रंगीत चित्रें किंवा कोणतीहि रंगीत आकृति वगैरेवरून उठावदार ठसे बनविण्याची ही पद्धति आहे. या पद्धतीमध्यें मूळ चित्रांतील रंगीत भाग निरनिराळ्या आकाराच्या लहान बिंदूंमध्यें विभागण्यांत येतो, व यामुळें त्या मूळ रंगांतील छटांची प्रतिकृति उठवितां येते. ही गोष्ट मूळ चित्राचा प्रकाशलेख ( फोटोग्राफ ) घेतांना दोन कांचा उभ्या-आडव्या रेषा आंखलेल्या मध्यें घालून करतां येते. ज्या प्रकारचें चित्र घ्यावयाचें असेल त्या मानानें ही रेषा आंखलेल्या कांचांची जाळी लहान-मोठी वापरण्यांत येते. या जाळीनें एका चौ. इंचांत ६० पासून अधिकाधिक चांगल्या कामाकरितां १३० ते २०० पर्यंत बिंदु उठविण्यांत येतात. हे ठसे करण्याकरितां उत्तम प्रतीकरितां तांब्याचा व सामान्य प्रतीकरितां जस्ताचा पत्रा वापरण्यांत येतो. याकरितां प्रतिबंधक द्रव्य द्विक्रुमित माशाचा सरस ( बायक्रोमेटेड फिश्ग्लू ) वापरण्यांत येतो. बाकी सर्व कृति वरीलप्रमाणेंच असते. पत्रा खोदण्याकरितां नत्रिकाम्लाच्याऐवजीं कमजोर लोहपरहरिद ( परक्लोराइड ऑफ आयर्न ) वापरण्यांत येतें. या पद्धतींत पत्रा फारसा खोल खोदावा लागत नाहीं, व असे उत्तम ठसे छापण्याकरितां कागद गुळगुळीत मोहरेदार वापरावा लागतो. कमी प्रतीचे ठसे साध्या कागदावर छापतां येतात.

त्रिवर्ण अथवा तिरंगी पद्धति—रंगीत चित्रांची प्रतिकृति उठविण्याची ही एक वरील पद्धतीचीच सुधारून बनविलेली पद्धति आहे. जर मूळ चित्र सपाट असेल तर त्याचे अर्धवर्ण पद्धतीप्रमाणेंच तीन जाळ्यांतून निरनिराळ्या रंगांस संवेदनक्षम अशा कोरड्या पत्र्यांवर प्रकाशलेख घेण्यांत येतात. पहिली निळ्या, दुसरी हिरव्या व तिसरी तांबड्या जाळींतून प्रतिमा घेण्यांत येते. तीनहि पत्रे वर दिलेल्या पद्धतीनें खोदण्यांत येतात. यानंतर त्या तीन पत्र्यांवरून जाळीच्या रंगास संवादी

किंवा पूरक रंगांत चित्र छापण्यांत येतें. उदाहरणार्थ, निळया रंगाच्या जाळींतून घेतलेल्या पत्र्यावरून पिंवळया रंगांत छपाई करण्यांत येते. हिरव्या रंगाच्या जाळींतून घेतलेल्या पत्र्यावरून मॅजेंटा रंगांत छपाई करतात आणि तांबड्यावरून निळसर हिरव्या रंगांत छपाई करण्यांत येते. यानंतर एका चौथ्या पत्र्यावरून काळया किंवा करड्या रंगांत छपाई करण्यांत येते. घन पदार्थांचे रंग मुद्रणांत उठविणें असल्यास अधिक भानगडीची कृति करावी लागते.

प्रकाशलेखखनन किंवा अन्तर्खननपद्धतीनें चित्रें छापावयाचीं असल्यास या पद्धतींत ज्या पृष्ठभागापासून मुद्रण करावयाचें असतें तो पृष्ठभाग पत्र्याच्या पृष्ठभागाच्या आंत कोरावयाचा असतो. ज्या चित्राची प्रतिकृति करावयाची असेल त्याचा प्रकाशलेख घ्यावयाचा असतो आणि ऋणप्रतिमेपासून एक पारदर्शक धनप्रतिमा तयार करावयाची असते. त्याचबरोबरच एका तांब्याच्या गुळगुळीत स्वच्छ पत्र्यावर राळेची भुकटी एका पेटींतून पाडून तो थोडा खरखरीत करण्यांत येतो व ही भुकटी त्या पत्र्यावर उष्णता देऊन पक्की करण्यांत येते. या भुकटीमुळें वरच्या पद्धतींतील जाळीचें काम होतें. नंतर त्या धनप्रतिमेवरून एक कर्ब (कार्बन) प्रतिमा घेण्यांत येते व ती तांब्याच्या पत्र्यावर भुकटीच्या बाजूनें उपडी बसविण्यांत येते. यानंतर तो पत्रा ऊन पाण्यांत ठेवण्यांत येतो व कर्ब प्रतिमेचा कागद ओढून काढण्यांत आला म्हणजे त्यावरील प्रतिमा पत्र्यावर उठते. यानंतर प्रकाशानें ज्या जिलेटिनच्या भागावर परिणाम झालेला नसतो तो जिलेटिनचा भाग निघून जातो व मूळ चित्रांतील दाट रंगाच्या जागीं दाट जिलेटिनचा थर राहतो व त्यापेक्षां कमी भडक रंग असतील किंवा छाया असेल तेथें पातळ थर राहतो. या कृतींतहि पत्रा खोदण्याकरितां लोहपरहरिद (परक्लोराइड ऑफ आयर्न) वापरण्यांत येतें.

यांत्रिक क्षरण—ही पद्धति प्रकाशलेखनाप्रमाणेंच आहे. पण या पद्धतींत यांत्रिक साहाय्य घेण्यांत येतें व मुद्रणशक्तीनें चालणाऱ्या यंत्रानें खोदणीकाम करण्यांत येतें. ही पद्धति व्यापारी मुद्रणामध्यें फार उपयुक्त आहे. कारण या पद्धतींत खिळ्यांपासून चित्रांप्रमाणेंच एकाच पत्र्यावर केलेल्या मुद्रणाचेंहि क्षरण किंवा खोदणी करतां येते किंवा कोरून काढतां येतो. यामुळें बहुतेक सचित्र वर्तमानपत्रें या पद्धतीनें छापण्यांत येतात. या पद्धतींत बरेच प्रयोग करून सुधारणा करण्यांत येत आहेत व जरी त्रिवर्ण पद्धति अजून फारशी मागें पडली नाहीं तरी या पद्धतीचा उपयोग दिवसेंदिवस फार मोठ्या प्रमाणांत वाढत आहे.

प्रकाशलेखनशिलामुद्रण—शिळेवर प्रकाशलेखनपद्धतीनें तेलकट प्रतिमा उठविण्याची ही पद्धति आहे. प्रथम प्रतिकृति घ्यावयाच्या वस्तूची ऋणप्रतिमा घेण्यांत येते व द्विकुमितमय (बायक्रोमेटेड) जिलेटिनचा थर दिलेल्या एका कागदावर ती छापण्यांत येते. ती प्रकाशांत धरली असतां घट्ट होतें व नंतर तिला एका रुळाच्या साहाय्यानें दुसऱ्या वस्तूंवर उठणारी विशेष प्रकारची शाई (ट्रॅन्स्फर इंक) लावण्यांत येते. नंतर ती प्रतिमा पाण्यांत घालून स्वच्छ धुऊन पक्की करण्यांत येते. या क्रियेनें सूर्यप्रकाश पडलेल्या भागावर शाई चिकटून राहते. ही शाईची प्रतिमा नंतर एखाद्या पत्र्यावर किंवा शिळेवर उठविण्यांत येते. किंवा त्या ऋणप्रतिमा जस्ताच्या किंवा अल्युमिनमच्या पत्र्यावर साक्षात् छापण्यांत येते. अशा पत्र्यावरच्या आकृति अलीकडे बहुतेक रबरी प्रतिमाग्राहक मुद्रणयंत्रावरून (रबर ऑफसेट प्रेस) छापण्यांत येतात. त्याकरितां तो पत्रा एका पोलादी रुळाभोंवतीं घट्ट ताणून बसविण्यांत येतो. हा रूळ एका दुसऱ्या रुळावर रबराचा ताग बसविलेला असतो अशा रुळाला चिकटवून दाबून फिरविण्यांत येतो. त्यामुळें प्रत्येक फेऱ्याच्या वेळीं पत्र्यावरील शाई रबराच्या ताग्यास चिकटते व त्या रबरी रुळावरून ती प्रतिमा कागदावर उठविण्यांत येते. ही चिकटवून उठविण्याची पद्धति सर्वांत अलीकडील आहे. आणि या पद्धतीची पुष्कळच वाढ होण्यास जागा आहे. कारण या पद्धतीनें कोणत्याहि जाड्याभरड्या कागदावरहि मुद्रण करतां येते. याच पद्धतीनें टिनच्या पत्र्यावर मुद्रण करतां येतें.

कोलोटाइप—या पद्धतीमध्यें एखाद्या पृष्ठभागापासून मुद्रण करण्यांत येतें व ही पद्धति जिलेटिन हा पदार्थ उघड्या काष्ठ द्रव्यमय पेशींचा बनलेला असून त्यामध्यें पाणी शोषून घेण्याचा धर्म आहे या तत्त्वावर आधारलेली आहे. या पद्धतींत ज्या पृष्ठभागावरून मुद्रण करावयाचें तो एक जाड कांचेचा पत्र्यासारखा तुकडा असतो व त्यावर द्विकुमितजिलेटिन (बायक्रोमेटेड जिलेटिन) चा थर दिलेला असतो. हा जिलेटिनचा थर उष्णता देऊन वाळविण्यांत येतो आणि त्यावर ऋणप्रतिमा ठेवून त्यावर सूर्यप्रकाश पाडण्यांत येतो. प्रकाशाच्या प्रमाणाप्रमाणें जिलेटिनच्या पेशी घट्ट व कडक बनतात व हें प्रकाशाचें प्रमाण ऋणप्रतिमेंतून ज्या प्रमाणांत तो पार होत असेल म्हणजे तीवर ज्या मानानें घट्ट पातळ थर असेल त्यावर अवलंबून असते. ही प्रकाशाची क्रिया जितकी क्षीण स्वरूपाची असेल त्या मानानें हें जिलेटिन अधिक पाणी शोषण करून घेतें. यानंतर शिळाछापाप्रमाणें या थरावर शाई लावण्यांत येते व ही शाई तेलकट किंवा चरबीयुक्त असल्यामुळें जेथें प्रकाशाची क्रिया झाली असेल तेथें चिकटून राहते व जेथें कमी झालेली असेल त्या भागानें पाणी शोषून घेतल्यामुळें फार थोडी चिकटते किंवा मुळींच चिकटत नाहीं. या पद्धतीनें चांगली गुळगुळीत

छपाई होते व थोड्या खर्चांत प्रकाशलेखां ( फोटो ) च्या प्रतिकृति तयार करतां येतात. चित्रांचीं कार्डें बहुतेक या पद्धतीनें छापतात. जेथें हवामान वरचेवर बदलतें तेथें या पद्धतीचा बहुतेक उपयोग करण्यांत येत नाहीं. पण जेथें हवामान स्थिर असतें त्या प्रदेशांत या पद्धतीनें छपाई करणें सुलभ असतें.

**ठसे** ( बोटांचे )— निरक्षर माणसाची सहीची निशाणी घेण्याचा हा खात्रीलायक प्रकार आहे. या साधनाकडे १८२३ सालीं ब्रेस्लौ येथील सुप्रसिद्ध इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ पुर्कीजे यानें इतरांचें लक्ष वेधलें. या साधनाचा प्रथम उपयोग हिंदुस्थानांत बंगाल प्रांतांतील हुगळी जिल्ह्यांत सर विल्यम हर्शेल यानें केला. नंतर सर फ्रान्सिस गाल्टन यानें बोटांचे ठसे या विषयाचा ( डॅक्टिलोग्रॅफीचा ) सूक्ष्म अभ्यास केला. त्यानें अनेक माणसांच्या हातांच्या अंगठ्यांचे आणि इतर बोटांचे ठसे घेऊन त्यांची एकमेकांशीं सूक्ष्म रीतीनें तुलना केली. त्यांत त्याला असे आढळून आले कीं, कोणत्याहि दोन माणसांच्या अंगठ्यांचे ठसे हुबेहुब सारखे नसतात. त्या ठशांत फरक असतो. आणि एका माणसाच्या अंगठ्याचा ठसा जसा असेल तसा त्याच्या हयातीपर्यंत कायम राहतो, म्हणजे त्या ठशांत वयोमानाप्रमाणें फरक होत नाहीं. याप्रमाणें खात्री करून घेतल्यावर माणसांच्या अंगठ्याला शाई लावून कागदावर ठसे उमटविण्याची पद्धत सुरू झाली. अशा बाबतींत न्यायकोर्टांत कांहीं लबाडी आढळून आल्यास त्याचा निर्णय करण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें प्रांतोप्रांतीं अंगठ्याचे ठसे ओळखणाऱ्या तज्ज्ञ अधिकाऱ्यांना नेमून त्यांची स्वतंत्र कचेरी ठेविली आहे. ज्ञात गुन्हेगारांच्या अंगठ्यांचे ठसे घेऊन त्यांची जंत्रीच पोलिस खात्यांत तयार ठेवलेली असते.

**ठसेकाम**—( डायसिंकिंग ). जेव्हां एकासारख्याच अनेक वस्तू तयार करावयाच्या असतात तेव्हां त्या तयार करण्याकरितां एखाद्या धातूच्या तुकड्यामध्यें त्या वस्तूसारखी आकृति कोरून काढण्यांत येते व तो तुकडा ठोकून किंवा दाबून आपणांस पाहिजे त्या आकाराच्या वस्तू बनविण्यांत येतात.

याकरितां असे ठसे बहुधा पोलादाचे बनविण्यांत येतात व त्याकरितां चांगल्या पोलादाची निवड करण्यांत येते व तें बऱ्याच उष्णतेमध्यें तापवून हळूहळू वितळविण्यांत येतें व नंतर कोरणाऱ्याकडे देण्यांत येतें. कोरणाऱ्यानें अवश्य ती आकृति तुकड्यामध्यें आंत कोरल्यानंतर तो तुकडा पुन्हां कठिण करण्यांत येतो. त्यानंतर तो स्वच्छ करून गुळगुळीत केल्यावर त्यास मादी ( मेट्रिक्स ) म्हणतात. यापासून लगेच अवश्य त्या वस्तू तयार करीत नाहींत तर त्यावर पंच अथवा नर तयार करण्यांत येतो. यावर ती आकृति उठावदार दिसते.

मातीवरील चित्रें किंवा रबर स्टँप तयार करण्याकरितां लागणारे ठसे फॉस्फर ब्रॉंझ किंवा कठिण पितळामध्यें उठावदार किंवा उलट पद्धतीनें तयार करण्यांत येतात. भिंतीवरील रंगीत कागदांकरितां लागणारे ठसे रुळांवर तयार करण्यांत येतात. फुलांची नक्षी तयार करण्याकरितां लागणाऱ्या ठशांच्या कडा तीक्ष्ण ठेवण्यांत येतात त्यामुळें त्या ठशांवरून तीं चित्रें कापून व उठावदार करून एकाच वेळीं तयार होतात. पॅंटोग्राफ नांवाच्या यंत्रानें वाटेल त्या आकाराचे ठसे कोरतां येतात.

**ठाकुर**—ठाकर. यांची एकंदर लो. सं. अडीच लाखांपर्यंत असून ही जात मुख्यत्वेंकरून मुंबई, पंजाब व काश्मीर या इलाख्यांत आढळते. ठाकुर लोकांत हिंदू, मुसलमान, शीख व बौद्ध या धर्मांचे लोक आहेत. यांना ठक्कर असेंहि दुसरें नांव आहे. ठाकुर ही पदवी लहान रजपूत संस्थानिकांना लावण्याचा प्रघात आहे. यावरून कित्येकांची अशी समजूत झाली आहे कीं, ठाकुर जात रजपुतांशीं मिश्रण होऊन झालेली आहे. नाशिक जिल्ह्यांत इगतपुरी येथें एका ठाकराजवळ एक ताम्रपट आढळला. त्यांत ठाकुर शब्द जातिवाचक अर्थी उपयोजिलेला आहे. प्रथमतः हे शेतकी व मजुरी करून उदरनिर्वाह करीत. पुढें ते जळाऊ लांकडांचा व्यापार करूं लागले. क-ठाकुर व म-ठाकुर असे त्यांचे दोन भेद आहेत. म-ठाकुर श्रेष्ठ समजले जातात. कारण ते मराठे असतात. क-ठाकुर म्हणजे कडु ( दासीपुत्र ) होत असें समजतात. त्यांच्या देवकांत सूर्यफूल, तलवार, अंबा, उंबर, साग, जांभूळ हीं असतात. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें पण आतेबहिणीशीं व मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. हे मांसाहारी व मद्यपी असून कुणबी, धनगर, गोपाळ यांच्या हातचें अन्न खातात. यांचे मुख्य देव हिरवा, चेडा, वाघ्या, बहिरी, भवानी, सुपली, खंडेराव, वेताळ व मोखाडा पेट्यांतील डोंगरावरचीं भुतें होत. कांहीं वर्षांपूर्वी त्यांचे धार्मिक संस्कार नेच करीत; अलीकडे ते ब्राह्मण उपाध्यायामार्फत करूं लागले आहेत.

ठाकुरी भाषा— उत्तर सह्याद्रीच्या जवळचा दख्खनचा पठार हा ठाकुरांचा प्रदेश होय. घाटावरच्या व कोंकणांतल्या भाषांमुळें यांच्या भाषेवर त्याप्रमाणें संस्कार झालेले दिसतील. क-ठाकुर आणि म-ठाकुर यांच्या बोली निरनिराळ्या आढळतील. क-ठाकुर अद्याप असंस्कृत असल्यानें त्यांची भाषा जास्त जुनी व जातीय आहे. ठाणें आणि कुलाबा जिल्ह्यांतून सुमारें २५,००० ठाकुर आहेत. एकंदर संख्या ८७,००० भरते.

यांच्या भाषेंत कांहीं गुजराती मिश्रण आढळलें. उदा., देजो ( दे ); जूधा ( निराळा ); ध्यान राखजो.

बोलण्यांत सारखा कचा किंवा मचा उच्चार येतो म्हणून क-ठाकुर व म-ठाकुर असे भेद पडले असावेत. ठाकुरांचे उच्चार मराठीहून फार निराळे वाटतात. एकदम बोलणें समजत नाहीं. बोलण्यांत कठोर व्यंजनें फार येतात. कांहीं अपभ्रष्ट शब्द दिसतात—

बाऊक ( बारिक ), परिताव ( प्रत्यय ), वनसई( वनस्पति), यारूच ( एरवींच ), जेला ( गेला ), विवक्षा ( विवंचना ).

"मीं कल्याण पाहिले" असें आपण म्हणतों, पण ठाकुर म्हणतील, "माह्या कल्याण पाहिलं ह."

कांहीं शब्द— अभ्गा ( नवीन ); आंखो ( पुन्हां ); अनावळ ( आबाळ ); भेट ( अर्ध्या ); हेडली ( दारू ); असोळा (अश्रु ); पाचोरा ( पांचवी-पूजन ); पोराळी ( बऱ्याच मुलांची आई ); बोडसणें ( संपविणें ); ठाकणें ( निजणें ).

पुढील संस्कृत शब्द वापरांत आहेत— बहु, मधुर, विश्राम.

अनेकवचनीं आं येतो—घरां; लाडवां; मानसां.

कांहीं वाक्प्रचार—देव घेऊनच आलों ( सूर्यास्तापूर्वीच आलो ). उंटाहून उंच जाला. शेणमाती करणें ( तडजोड करणे ). देश तसा वेस. दादयान् झाडाचं मरण, नी बायकान् पोटाचं मरण.

**ठाकुरदास बोवा**— एक संतकवि. हा कनोजी ब्राह्मण शिनराजपूरचा रहिवासी. ह्याचें मूळचें नांव बालाप्रसाद. बापाचें नांव नीलकंठ. उपनांव द्विवेदी. गोत्र काश्यप. हा अकरा वर्षांचा असतांच याला उपरति होऊन घरून निघाला व यात्रा करीत करीत हैद्राबादेस ( निजाम ) आला. त्याच्या भजन-कीर्तनांवर लुब्ध होऊन हैद्राबादच्या चंदुलाल दिवाणानें त्याला आपल्या पदरीं ठेविलें. पुढें तो फिरत फिरत रामेश्वर करून पंढरपुरास आला व तेथें तो बरींच वर्षें राहिला. येथें असतां त्यानें ठाकुरदास हें नांव धारण केलें. एके समयीं बाजीराव रघुनाथ पेशवे, बापू गोखले व पंडित भूदेव मिश्र हे पंढरपुरास आले. भूदेव मिश्रानें ठाकुरदासांचें कीर्तन ऐकिलें आणि तो लुब्ध होऊन गेला. ती वार्ता त्यानें श्रीमंतांस दिली. दुसऱ्या दिवशीं बाजीराव व बापू गोखले हे कीर्तनास गेले. कीर्तन ऐकून बापू गोखले इतका रमला कीं, तो लगेच बोवांचा चेला बनला. बापूच्या सांगण्यावरून पेशव्यानें बोवाला तारगांव ( सातारा जिल्हा ) इनाम दिला. यानें 'सहजबोध' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे.

**ठाण**—मुंबई, काठेवाड, लखतर संस्थानांत हें एक खेडें आहे. या खेड्याच्या सभोंवतालीं कोट आहे. मेजर जी. डब्ल्यू. वाट्सन् यानें खालीलप्रमाणें या खेड्याचें वर्णन केलें आहे: ठाण हें अतिशय जुनें गांव असून याच्या आसमंतांतील भूमिभाग फार पवित्र मानतात. ठाण हा संस्कृत स्थान या शब्दाचा अपभ्रंश आहे. येथून जवळच त्रिनेत्रेश्वर या नांवाचें सूर्याचें प्रसिद्ध देवालय असून वासुकि व बंधुक यांचीं दोन प्रसिद्ध देवालयें आहेत. ठाण सौराष्ट्रांत वसलें आहे. सौराष्ट्रालाच देवपांचाल असें म्हणतात व हीच द्रौपदीची जन्मभूमि होती. या ठिकाणीं पहिलें देवालय ( सूर्यप्रीत्यर्थ ) सत्ययुगांतील मांधाता राजानें बांधलें. त्या वेळेस येथें ३६,००० ब्राह्मण, ७२,००० क्षत्रिय, ५५,००० वैश्य आणि ९०,००० शूद्र होते. एकंदर लोकसंख्या २,५०,०००. येथें श्रीकृष्ण रुक्मिणीसह आले होते. रुक्मिणीनें येथील तलावांत स्नान केलें. त्यामुळें हा दोन्ही तलावांचीं नांवें प्रियतमा व कमला अशीं पडलीं असें म्हणतात. जवळच एक कुंड आहे. *त्यांत स्नान केल्यानें सर्व पापें भस्म होऊन* जातात व म्हणूनच या कुंडाला 'पापनाशन' असें नांव आहे.

**ठाणें**—मुंबई इलाख्याच्या उत्तर विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,५७३ चौ. मै. आहे. हा जिल्हा सखल असून त्याच्या पूर्वेस व ईशान्येस १०० ते २,५०० फूट उंचीचे पुष्कळ डोंगर आहेत. किनाऱ्याजवळील वैतरणीच्या कांठची जमीन सखल व सुपीक आहे. सर्व भागांत पाणी मुबलक असून झाडी पुष्कळ आहे. पाण्याच्या विपुलतेमुळें भाताचें पीक मुख्यतः काढतात. या जिल्ह्यांत मिठागरेंहि पुष्कळ आहेत. वैतरणी ही मुख्य नदी नाशिक जिल्ह्यांतील त्र्यंबक डोंगरांत उगम पावते. त्यामुळें तिला फार पवित्र मानतात.

या जिल्ह्यांत विहार, तुळशी व तान्सा या कृत्रिम तलावांच्या योगानें मुंबईला पाण्याचा पुरवठा होतो.

या जिल्ह्याच्या किनाऱ्याला पुष्कळ बेटें आहेत. त्यांमध्यें साष्टी हें सर्वांत मोठें आहे. या जिल्ह्यांत प्रमुख उन्हाळीं माहीम, वाडें, भिवंडी आणि वसई येथे आहेत. किनाऱ्याजवळ ताडीचीं झाडें पुष्कळ आहेत. फळझाडांत कलमी आंबे फार उत्तम होतात. किनाऱ्याला सरासरी वार्षिक पाऊस ६२ ते ६९ इंच होतो.

ठाणें जिल्ह्यांत ७ मोठीं गांवें असून १,६९७ खेडीं आहेत. त्यांत १०३ इनामी आहेत. लो. सं. ९,३२,७३३. पैकीं शेंकडा ९० हिंदु व शेंकडा ५ मुसलमान आहेत. शेंकडा ८८ लोक मराठी भाषा बोलतात. वारली, ठाकुर, कातकरी, काथोडी, आगरी आणि कोळी, वगैरे मूळच्या ( अनार्य ) लोकांचा भरणा ठाणें जिल्ह्यांत बराच आहे. जिल्ह्यात जुनी देवळें व लेणीं पुष्कळ आहेत.

या जिल्ह्यांत नऊ तालुके व दोन पेटे आहेत ते: वसई,

भिवंडी, डहाणू, कल्याण, माहीम, मुरबाड, साष्टी, शहापूर, व वाडे आणि उंबरगांव व मोखाडे पेटे. या जिल्ह्यांतच जव्हार संस्थान आहे.

येथें भात हें मुख्य पीक असून त्याच्या खालोखाल नागली व वरी हीं पिकें होतात. मासे मारण्याचा धंदा बराच महत्त्वाचा असून फायद्याचा आहे. शेतीच्या खालोखाल समुद्राच्या पाण्यापासून मीठ तयार करणें हा या जिल्ह्यांतील महत्त्वाचा धंदा आहे. या जिल्ह्यांतून तांदूळ, मीठ, लांकूड, चुना, व खारे मासे हे जिन्नस बाहेर जातात. समुद्रकिनाऱ्यानें व खाड्यांतून जहाजें व पडाव यांच्या योगानें दळणवळण होतें.

शहर—हें गांव या जिल्ह्याचें व साष्टी तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. हें खाडीच्या कांठीं असून बंदर व रेल्वे-स्टेशन आहे. हे पूर्वी एका स्वतंत्र (यादव) हिंदु राज्याच्या राजधानीचें ठिकाण होतें. पुढें मुबारक खिलजीनें हें गांव जिंकून त्या ठिकाणीं एक मुसलमान सुभेदार नेमला (१३१८). त्यानंतर हें पोर्तुगीज लोकांना मिळालें (१५३३). त्यांच्यापासून मराठ्यांनी काबीज करून घेतलें व शेवटीं इंग्रजांच्या हातीं आलें.

येथील किल्ला हा पोर्तुगीजांनीं १७३० त बांधला. १७३७ त मराठ्यांनीं हा घेतला व तटबंदीचें काम पुरें केलें. हा तट १६ ते २१ फूट उंच होता. किल्ल्यांत १३॥ एकर जागा होती. १७३८ त पोर्तुगीजांनीं हा घेण्याचा प्रयत्न केला. पण मल्हारराव होळकराने त्यास परतवून लावलें. १७७४ त इंग्रजांनीं हा किल्ला घेतला. त्रिंबकजी डेंगळे यास १८१६ मध्यें येथें कैद करून ठेवलें होतें. पण तेथून तो पळून गेला. १८३३ पर्यंत येथें फौजेचें ठाणें होतें. पुढें हा किल्ला पाडून टाकण्यांत आला.

ठाण्यास उत्तम सुती कापड निघतें. येथील मराठी ग्रंथसंग्रहालय चांगलें व्यवस्थित असून बहुतेक सर्व मराठी पुस्तकें त्यांत आहेत. मुलांमुलींची हायस्कुलें व प्राथमिक शाळा आहेत. गांव वाढतें आहे. लो. सं. २९,७९१.

**ठाणेसर**—(ठाणेश्वर). पंजाब, कर्नाळ जिल्ह्यांतील ही एक उत्तरेकडील तहशील आहे. ही यमुना नदीच्या पश्चिम तीरावर असून क्षेत्रफळ ५९९ चौ. मैल आहे. तहशिलींत ४१८ खेडीं असून ठाणेसर हें मुख्य ठिकाण आहे.

गांव—हें गांव, ठाणेश्वर तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. कुरुक्षेत्राच्या भागांत हें अतिशय पवित्र आहे. १०१४ सालीं गझनीच्या महंमदानें हें गांव लुटलें होतें. येथें महंमद घोरीनें पृथ्वीराजाचा पराजय केला (११९३).

**ठेंगू**— कांहीं व्यक्तींप्रमाणें कांहीं मानववंशहि ठेंगू असतात. आफ्रिकेंतील 'बुशमेन', 'पिग्मी' या मानवजाती मुळांतच ठेंगण्या असतात. त्यांची उंची साडेचार पावणेपांच फुटांपर्यंतच असते. सर्व राष्ट्र जातींतील माणसांत ठेंगू लोक आढळतात. अगदीं ठेंगू लोक राजेरजवाड्यांजवळ गमतीखातर बाळगलेले असत. इंग्लंडच्या पहिल्या चार्लस राजाजवळ जेफ्रे हडसन नांवाचा तिसाव्या वर्षी देखील अठरा इंच उंच असलेला माणूस होता. मनुष्याची वाढ जीवर अवलंबून असते त्या अमृतपिंडा (डक्टलेस ग्लँड) चा कांहीं बिघाड झाल्यास ठेंगणेपणा येतो.

'पिग्मी' मुलगी

ज्याला 'पिग्मी' (ठेंगू) म्हणतात तो एक मानववंश आहे. यांची उंची ३½ ते ५ फुटांपर्यंत असते. यांची माहिती प्रथम होमरनें ईलियड काव्यांत दिली आहे. यांच्या दोन शाखा आहेत. एक आफ्रिकेंत (नेग्रिलो) व दुसरी आशिया (आफ्रिका, कांगो खोरें) खंडात (नेग्रिटो) असते. हे लोक साधारणपणें माकडासारखे दिसतात व यांची राहणी अगदीं प्राचीन काळच्या लोकांप्रमाणें असते. हे मासे मारून व शिकार करून खाद्य मिळवितात व पानाफांद्यांच्या झोंपड्यांतून राहतात.

**ठोंबरे, त्र्यंबक बापूजी** (१८९०–१९१८)—'बालकवि' या नांवानें सुप्रसिद्ध असलेले एक मराठी कवि. हे खानदेशांत जन्मले. घरच्या गरिबीमुळें यांचें शालेय शिक्षण तर बेतानेंच झालें. परंतु पुढील आयुष्यांत देखील आर्थिक ओढाताण व गृहसौख्याचा अभाव यांसारख्या अडचणींना यांना तोंड द्यावें लागलें. यांच्या स्नेही मंडळींत कविवर्य केशव महादेव सोनाळकर, नारायण वामन टिळक, व गोविंदाग्रज यांसारख्यांची गणना होते. 'अरुण', 'फुलराणी' यांसारख्या कविता लिहून निसर्गावरील आपली भक्ति यांनीं व्यक्त केली आहे. निसर्गप्रेमी कवि म्हणून हे सुप्रसिद्ध आहेत. 'बालकवींची कविता' या नांवानें यांचा काव्यसंग्रह उपलब्ध आहे.

## ड

ड—या वर्णाची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी 'ट' सदृश असलेली क्षत्रपवंशी राजा रुद्रदामाच्या गिरनार लेखांत (इ. स. २ रें शतक), तिसरी समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथीलस्तंभावरील लेखांत (४ थें शतक), व चौथी अधूचा परमार राजा धारावर्ष याच्या वेळच्या उडिया लेखांत (इ. स. १२०८) आढळून येते.

**डंकी**—एक देशी व्यायाम प्रकार. डंकीच्या (धड मारण्याच्या) डावांचा उपयोग कुस्ती खेळतांना फार होतो. अशी मेहनत रोज केल्यानें शरीर हलकें होऊन त्याच्यावर उत्तम प्रकारचा ताबा येतो. डंकी मारण्याच्या निरनिराळ्या तऱ्हा नीट साधल्या तर शरीरांत स्फूर्ति व तडफ येते. शरीर उंचावरून जमिनीवर आपटतें, त्यामुळें स्नायू चांगले मजबूत व कणखर होतात. कुस्ती खेळल्यानंतर डंक्या टाकण्याची मेहनत केल्यानें शरीर रगडलें जाऊन हलकें होतें, व कुस्ती खेळून आलेला शीण कमी होतो. मल्लखांबावर डंकीच्या उड्या बसविल्या आहेत. डंकीचा दसरंग मल्लखांबावर केल्यानें शरीरावर फार चांगला ताबा येतो व शरीर उताणें न करतां तें उजव्या अगर डाव्या कुशीवरच तिरपें ठेवण्याची संवय होते. टांगाच्या डावांत या डंकीच्या मेहनतीचा फार चांगला उपयोग होतो. आपणास कुस्ती खेळतांना प्रतिस्पर्ध्यानें उचलून चीत करण्यासाठीं टाकलें तर आपल्या शरीराचा तोल संभाळून उताणें न पडतां डाव्या अथवा उजव्या कुशीवर डंकीच्या संवयीनें पडतां येतें.

**डग्लस, गाविन** (१४७४–१५२२)— एक स्कॉटिश कवि. त्यानें व्हर्जिल कवीच्या 'एनियड' या काव्याचें भाषांतर पद्यमय केलें. प्राचीन कवींच्या ग्रंथांपैकीं इंग्रजी भाषेंत भाषांतर झालेलें हें पहिलेंच काव्य होय. हें भाषांतर १५१२ च्या सुमारास झालें, आणि १५५३ सालीं तें प्रथम प्रसिद्ध झालें; त्याशिवाय डग्लसनें दोन रूपकात्मक कविता लिहिल्या त्या— 'दि पॅलेस ऑफ ऑनर' आणि 'किंग हार्ट' या होत.

**डच ईस्ट इंडीज**—(नेदर्लंड्स इंडीज, इंडोनेशिआ). हा द्वीपसमूह आशिया खंडांत असून तो अद्यापि डच सरकारच्या मालकीचा आहे. या द्वीपसमूहांत पांच मोठालीं बेटें आहेत तीं : जावा, सुमात्रा, बोर्निओ, सेलेबीज, आणि न्यूगिनी (या बेटांचा पश्चिमार्ध फक्त डच सरकारच्या मालकीचा असून पूर्वार्ध ब्रिटिश व ऑस्ट्रेलियन सरकारच्या मालकीचा आहे). शिवाय मध्यम आकाराचीं बेटें पंधरा असून, अगदीं लहान लहान बेटें तर शेंकडों आहेत. या बेटांपैकीं जावा आणि मदुरा या दोन बेटांची १९३० मधील लोकसंख्या ४,१७,१८,३६४ असून तीपैकीं १,९२,५७१ युरोपियन, ४,०८,९१,०९३ तद्देशीय (आदिवासी), ५,८२,४३१ चिनी आणि बाकीचे अरब, वगैरे इतर. बाकीच्या बेटांची लो. सं. १,९०,०८,८६९ असून तीपैकीं ४७,८४६ युरोपियन, १,८२,४६,९७४ तद्देशीय, ६,५०,७८३ चिनी, आणि ६३,२६६ इतर आशियाटिक लोक. येथील बहुतेक लोक इस्लामी धर्माचे आहेत. १५,००,००० ख्रिस्ती आहेत. बलीबेट आणि लोंबोक बेट यांत सुमारें १२,००,००० हिंदुधर्मीय लोक, आणि सुमारें १०,००,००० बौद्ध आहेत. ख्रिस्ती सनाच्या पहिल्या दोन-चार शतकांत हिंदुस्थानांतील हिंदू लोकांनीं या बेटावर स्वाऱ्या केल्या आणि बऱ्याच लोकांनीं तेथें वसाहती करून, राज्यें स्थापलीं. पुढें १५ व्या शतकांत मुसलमानांनीं स्वाऱ्या केल्या व १६ व्या शतकांत पोर्तुगीज, ब्रिटिश आणि डच या युरोपियन व्यापाऱ्यांनीं तेथें वसाहती केल्या. अखेर डच लोकांनीं ब्रिटिश व पोर्तुगीज लोकांना हांकलून लावून आपली सत्ता प्रस्थापित केली. १६०२ मध्यें डच ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाली, व दोन शतकें तिनें या बेटांवर आपला अमल चालवला. ही कंपनी १७९८ सालीं विसर्जन पावली. आणि डच सरकारनें या बेटांवर आपला कारभार सुरू केला. एक गव्हर्नर जनरल आणि चार सहा सरकारनियुक्त सभासदांचें कौन्सिल यांच्या हातीं राज्यकारभार असे. पुढें हळूहळू स्थानिक लोकांना राजकीय हक्क देण्यांत आले. आणि १९२५ सालीं जावा आणि मदुरा बेटांत प्रांतिक स्वायत्तता म्हणजे पूर्ण प्रांतिक स्वराज्याचे अधिकार लोकांना देण्यांत आले. १९२७ मध्यें नॅशनल इंडोनेशियन पार्टी हा राजकीय पक्ष पुढाऱ्यांनीं स्थापन केला आणि त्यानें १९३७ सालीं आपलें पूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर केलें. १९४५ चे नोव्हेंबर महिन्यांत लोकशाही मंत्रिमंडळ (रिपब्लिकन कॅबिनेट) स्थापन झालें. त्यांत १९४६ मार्चमध्यें सुधारणा होऊन डॉ. जहरीर हा पंतप्रधान आणि सोकार्नो हा अध्यक्ष झाला. तथापि डच साम्राज्य सरकार आणि इंडोनेशियाचें हें राष्ट्रीय सरकार यांमध्यें पुरा समेट न होतां युद्ध सुरूच होतें. नंतर हें भांडण जागतिक राष्ट्रसंघा (युनो) कडेहि गेलें होतें. आतां कांहीं तडजोड होऊन राष्ट्रीय सरकारकडे सर्व राज्यकारभार कांहीं अटींवर आला आहे.

येथें मुख्य पिकें : भात, मका, बटाटे, भुईमुगाच्या शेंगा, सोयाबीन, तमाखू, कांदे, कापूस, ऊंस, कॉफी आणि रबर हीं होतात. बटेव्हिया येथें एक विद्यापीठ आणि कायदा, वैद्यक शास्त्र, शिल्पकला आणि वाङ्मय आणि इंडोनेशियन सिव्हिल सर्व्हिस या शिक्षणाचीं कॉलेजें आहेत. शिवाय युरोपियन, चिनी व इतर लोकांच्या प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या शाळा आहेत.

( या इंडोनेशियांतील जावा, सुमात्रा, इ. बेटांवर या कोशांत स्वतंत्र लेख आहेत ते पाहावेत ).

**डंडी**— स्कॉटलंड, फारफरशायर परगण्यांतलें एक बंदर. हें रॉयल म्युनिसिपल व पार्लमेंटरी बरो असून टे खाडीच्या उत्तर किनाऱ्यावर वसलें आहे. डंडी शहराचा जलमार्गानें व खुष्कीनें बराच व्यापार चालतो. तरीपण तागाच्या कारखान्याबद्दल याची विशेष प्रसिद्धि आहे.

येथें नगरभवन, आल्बर्ट स्क्वेअरमधील बाजार व आल्बर्ट संस्था या मुख्य इमारती आहेत. येथें सेंटमेरी, सेंटपॉल, व सेंट क्लेमेंट ही तीन महत्त्वाची प्रार्थनामंदिरें आहेत.

येथील मुख्य उद्योगधंदा तागाचा होय. तागाच्या व्यापारास वाहिलेल्या जहाजांतून सुमारें ३,००,००० टन कच्चा ताग दर वर्षी हिंदुस्थानांतून डंडी शहरांत येतो. मच्छीमारीचा धंदाहि मोठा आहे. डंडी येथें बऱ्याच गोद्या आहेत. त्यामुळें डंडी बंदराचा जलमार्गानें पुष्कळ व्यापार चालतो. डंडीतर्फे पार्लमेंटांत दोन सभासद असतात. लो. सं. पावणेदोन लाखांवर आहे.

**डॅनिएल, जॉन फ्रेडरिक** ( १७९०-१८४५ )— एक इंग्रज पदार्थविज्ञानी व रसायनशास्त्रज्ञ. सन १८३१ मध्यें नव्या राजविद्यालयांत लंडन येथें हा रसायनशास्त्राचा अध्यापक झाला. सध्यां टेलिग्राफ व इतर ठिकाणीं उपयोगांत येणाऱ्या डॅनिएलच्या विद्युत्घटावरून याचें नांव प्रसिद्ध आहे. दंवबिंदु ठरविण्याचें दंवमापनयंत्र ( हायग्रोमीटर ) यानेंच शोधून काढलें. १८३० सालीं रॉयल सोसायटी दिवाणखान्यांत त्यानें पाण्याचें भारमापक यंत्र उभें केलें. टर्पेंटाइन व लाख यांपासून जाळण्याचा वायु यानें शोधिला. १८३९ सालीं परराष्ट्रीय चिटणीस झाला.

**डनूकर्क**—उत्तर फ्रान्समधील एक बंदर. हे डोव्हरच्या सामुद्रधुनींत लिलीच्या वायव्येस ५३ मैलांवर आहे. हें बोर्डो-प्रमाणेंच महत्त्वाचे असून फ्रान्स देशांत ह्याचें महत्त्व पॅरिस व बोर्डो यांच्या खालोखाल आहे. येथील नोत्रदामच्या देवालयांत एक लहान मूर्ति आहे व तिच्या दर्शनास बरेच यात्रेकरू येतात. बेल्जियन सरहद्दीकडे सैन्य पसरविण्याकरितां सोपें जावें म्हणून पूर्वेस किल्ल्यांची रांग बांधलेली आहे. येथील बंदरांत मोठालीं जहाजेंहि येऊं शकतात. येथें १९३ फूट उंचीचें एक दीपगृह असून तें १९ मैलांवरून दिसतें.

गेल्या दोन महायुद्धांत या शहरास बरेंच महत्त्व आलें होतें. १९४० सालीं जर्मनीनें डन्कर्क येथें दोस्तांच्या सैन्याला पेंचांत धरलें. तेव्हां ब्रिटिशांना माघार घ्यावी लागली होती. न्यूयॉर्क, लंडन व संयुक्त संस्थानांतील मुख्य मुख्य बंदरांशीं डनूकर्कचें बरेंच दळणवळण आहे. येथें कापसाचें व तागाचें कापड विणण्याचे कारखाने व लोखंड शोधण्याच्या भट्ट्या, व साबू वगैरेंचे कारखाने आहेत. तसेंच जहाजें बांधण्याचें कामहि होतें.

**डॅन्झिग**— पोलंड, व्हिस्चुला नदीच्या किनाऱ्यावर असलेलें एक बंदर. क्षे. फ. ७५३ चौ. मै. व लो. सं. चार लक्ष. या शहरांत चांगली तटबंदी असून हें बंदरहि आहे. वेळ पडल्यास शहराच्या पूर्वेकडचा भाग पाण्याखालीं बुडवितां यावा अशी व्यवस्था केली आहे व पश्चिम भागाच्या संरक्षणा-करितां त्या बाजूस किल्ल्याची नाकेबंदी केली आहे. पूर्वी हें जर्मनीकडे होतें. पण पहिल्या महायुद्धानंतर हें एक स्वतंत्र राज्य म्हणून राष्ट्रसंघानें याला मान्यता दिली. जर्मनीनें दुसऱ्या महायुद्धांत प्रथमच हें १९३९ सालीं जिंकून घेतलें होतें.

येथें शस्त्रे व तोफा तयार करण्याचें काम मोठ्या प्रमाणावर चालतें. शिवाय येथें सरकारी व खासगी गोद्या आणि जहाजें बांधण्याचे कारखाने आहेत. मद्यें व इमारती लांकूड यांकरितां हें शहर प्रसिद्ध आहे. पूर्वी पोलंड व आसपासचे रशियन व प्रशियन प्रांत यांत होणारीं धान्यें येथील बंदरांतून परप्रांतीं रवाना होत असल्यामुळें या शहराच्या व्यापारास महत्त्व आलें होतें. येथें लढाऊ व व्यापारी जहाजें बांधणें, पोलादाचें ओतीव काम करणें, साखर शुद्ध करणें, मद्य तयार करणें, पिठाच्या व तेलाच्या गिरण्या चालविणें, इ. उद्योगधंदे आहेत.

**डन्डोनाल्ड, थॉमस कॉक्रेन** ( १७७५-१८६० )— एक ब्रिटिश नावाधिकारी ( ॲडमिरल ). १८०० सालीं स्पीडी नांवाच्या १४ तोफांच्या लढाऊ जहाजावर त्याची नेमणूक झाली आणि त्यानें पुढील तेरा महिन्यांत शत्रूचीं ५० जहाजें हस्तगत केलीं. १८०५ सालीं 'पालास' या नांवाच्या लढाऊ जहाजावर तो कमांडर झाला. त्या वेळींहि त्यानें बरींच शत्रूचीं जहाजे काबीज केली. नंतर तो चार वर्षे 'इम्पेरीझ' नांवाच्या लढाऊ जहाजावर कमांडर होता, त्या वेळीं त्यानें अनेक धाडसी पराक्रमाचीं कृत्यें केलीं व शत्रु पक्षाची धूळधाण उडविली. लष्करी नोकरीतून निवृत्त झाल्यावर तो ब्रिटिश पार्लमेन्टचा सभा-सद झाला आणि त्यानें आरमार खात्याच्या कारभारांतील दोषां-वर कडक टीका केली. ती आरमारी अधिकाऱ्यांना फार झोंबली. त्यामुळें त्याच्या शत्रूंनीं स्टॉक एक्सेंजच्या कारभारांत जो एक मोठा पैशाच्या अफरातफरीचा गुन्हा १८१४ सालीं झाला होता, त्यांत डन्डोनाल्डला गुन्हेगार ठरवून त्याचें पार्ल-मेन्टांतील सभासदत्व रद्द करविलें. त्याला दिलेली 'ऑर्डर ऑफ दि बाथ' ही पदवी काढून घेण्यांत आली आणि त्याला एक वर्षाची कैद व १,००० पौंड दंड ही शिक्षा देण्यांत आली. पुढें १८१८ सालीं त्यानें चिली देशाच्या आरमारांत नोकरी धरली आणि त्याच्या धाडसी पराक्रमामुळें त्या देशाला राष्ट्रीय स्वातंत्र्य

मिळविण्याच्या कार्यांत त्याची फार मदत झाली. १८३२ सालीं डन्डोनाल्डला ब्रि. आरमारांत पुन्हां पूर्वीच्या अधिकारावर नेमण्यांत आलें, आणि १८४७ मध्यें त्याची 'ऑर्डर ऑफ दि बाथ' ही पदवी त्याला परत देण्यांत आली. त्यानें लढाऊ जहाजांवर वाफेचीं एंजिनें आणि नौचक्र (स्क्रू प्रॉपेलर) चसवण्याच्या कामीं फार मदत केली. त्यानें आपलें आत्मचरित्र लिहिलें आहे. तें फारच मनोरंजक आहे.

**डनूवार, विल्यम** (१४६०-१५२०)—एक स्कॉटिश कवि. तो सेंट ॲन्ड्र्यूज येथें १४७७ सालीं बी. ए. झाला. आणि नंतर दोन वर्षांनीं त्यानें एम्. ए. ची पदवी मिळवली. नंतर तो फ्रॅन्सिस्कन धर्मपंथांत शिरला आणि रोमन कॅथॉलिक पंथाचा भिक्षु (फ्रायर) बनून इंग्लंड आणि फ्रान्स या देशांत त्यानें भिक्षा मागत प्रवास केला. १४९० सालीं स्कॉटलंडमध्यें परत आल्यावर ५ वा जेम्स या राजाच्या दरबारांत त्याला आश्रय मिळाला आणि त्याला १० पौंड पेन्शन मिळूं लागलें. ४ थ्या जेम्स राजाचा इंग्लंडच्या मार्गारेट राजकन्येशीं विवाह झाला. या प्रसंगास अनुसरून डनूवार कवीनें एक सुंदर काव्य लिहिलें. त्याचें नांव 'दि थ्रिसिअल अँड दि रॉइस' हें आहे. त्यानें पुष्कळ कविता लिहिल्या. त्यांत रूपकात्मक, उपहासात्मक आणि विनोदात्मक कवितांचाच बहुतेक भरणा आहे.

**डॅन्यूब नदी**—युरोप खंडांतील एक मोठी नदी. हिचा उगम डोनेशिंजेनमधील ब्लॅक-फॉरेस्टमध्यें होतो. समुद्रसपाटीपासून याची उंची २,१८७ फूट आहे. येथून पूर्वेस वाहत जाऊन काळ्या समुद्रास ही मिळते. हिची लांबी १,७८० मैल आहे. हिला सुमारें ३०० उपनद्या मिळाल्या आहेत. युरोपच्या इतिहासांत ह्या नदीला बरेंच महत्त्व आहे. पूर्वी ह्या नदीच्या तीरावर रोमन राज्याची सीमा होती. यानंतर नेपोलियनच्या बऱ्याच लढाया हिच्या तीरावरच झाल्या. व्यापारासाठीं हिचा चांगला उपयोग व्हावा म्हणून युरोपांतील देशांनीं ह्या नदीची स्थिति सुधारण्याचें मनावर घेऊन त्याप्रीत्यर्थ कित्येक प्रयत्न केले. १८५६ सालीं डॅन्यूब कमिशन नेमून नदींत व तिच्या मुखाकडे बऱ्याच सुधारणा करण्यांत आल्या आहेत. डॅन्यूबच्या कांठचें सृष्टिसौंदर्य, विशेषतः ऑस्ट्रिया देशांतील, अप्रतिम आहे.

**डफ**—एक वाद्य. सहा बोटें रुंद व पाव इंच जाड व सुमारें दोन फूट लांब अशी फळी घेऊन ती वर्तुलाकार वांकवून तिर्चा दोनहि टोकें एकमेकांशीं पक्कीं खिळविलेलीं असतात. हें गोल कडें चामड्यानें मढवितात. उंच स्वरांत त्याचा आवाज निघावा म्हणून विस्तवावर तें धरून शेकतात. एका हातानें छातीशीं धरून दुसऱ्या हातानें ते वाजवितात. हें वाजविण्यांत एकप्रकारचें कौशल्य आहे. हाताचा पंजाच्या मनगटाजवळचा भाग दाबून धुमकी काढतात. ह्यांत गतकाम केलेलेंहि ऐकूं येतें. दुसऱ्या हातानें वेताची काडी लावून, तबल्याच्या चामडीवर वाजणारे बोल यावर वाजवितात. ह्याच्या वर्तुलाकार आकारावरून ह्याला 'कडें' हीहि एक संज्ञा प्राप्त झाली आहे. तमाशांत ह्याची साथ असते. 'लावणी' ह्या गीतास प्रायः ह्याचीच साथ असते. 'डफ' हा शब्द अरबी आहे. ह्यावरूनच हें वाद्य मुसलमानांबरोबर हिंदुस्थानांत आलें असावें.

**डफरिन, लॉर्ड** (१८२६-१९०२)—एक ब्रिटिश मुत्सद्दी व हिंदुस्थानचा ग. जनरल. इटलीमध्यें फ्लॉरेन्स शहरीं जन्मला. त्याचें लहानपणाचें शिक्षण ईटन येथें झालें. शिक्षण संपल्यावर तो आयर्लंडमध्यें आपल्या वतनाची व्यवस्था लावण्याकरितां गेला. लॉर्ड पामर्स्टन आणि जॉन रसेल यांच्या मंत्रिमंडळांत हिंदुस्थानचा अंडर-सेक्रेटरी (१८६४-६६) आणि युद्धखात्याचा अंडर सेक्रेटरी (१८६६) या नात्यानें त्यानें कामें केलीं.

१८७२ सालीं त्याला कानडाचा गव्हर्नर-जनरल नेमण्यांत आलें. नंतर ब्रिटिशांचा वकील म्हणून लॉर्ड बीकन्सफील्डनें रशियांत त्याची नेमणूक केली. तेथें दोन वर्षें काम केल्यावर कॉन्स्टान्टिनोपल येथे तुर्कस्तानांतील ब्रिटिशांचा वकील या नात्यानें तो राहूं लागला. इ. स. १८८४ त हिंदुस्थानांत ग. जनरलच्या जागीं त्याची नेमणूक झाली. लॉर्ड रिपनच्या मागून हा हिंदुस्थानचा व्हाइसरॉय झाला. ह्याच्या कारकीर्दीत इंग्रजांनीं ब्रह्मदेश जिंकला. ब्रह्मदेश ब्रिटिश राज्यास जोडल्यामुळेच तो विलायतेस परत गेल्यावर त्यास 'मार्किस ऑफ डफरिन अॅन्ड आव्हा' हा किताब मिळाला (१८८८).

विलायतेस परत गेल्यावर रोम व पॅरिस येथील इंग्रजांचा वकील म्हणून डफरिनची नेमणूक झाली. उदारमतवादी मुत्सद्दी म्हणून त्याची प्रसिद्धि होती.

**डफळे**—डफळे हे मूळचे जत परगण्याचे देशमुख होते. चव्हाण हें यांचें मूळचें नांव. परंतु डफळापुर नांवाच्या खेड्याचे हे वंशपरंपरा पाटील असल्यामुळें त्यांना डफळे हें नांव मिळालें होतें. विजापूरच्या राज्यांत यांच्याकडे मनसब होती. जतचे संस्थानिक डफळे घराण्यांतीलच होत.

**डंबल**—मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा, गदगच्या आग्नेयेस सुमारें १३ मैलांवर असलेलें गांव. स. १८६२ पर्यंत डंबल हें पेट्याचें मुख्य ठाणें होतें. येथें पेरू व द्राक्षें पुष्कळ पिकतात. येथें दोड्ड बसाप्पा, कालेश्वर आणि सोमेश्वर यांचीं जुनीं देवळें आहेत. गांवाबाहेर तोडस्वामीचा मठ आहे. गांवाच्या पश्चिमेस जुन्या किल्ल्याचे अवशेष दिसतात. किल्ल्यांत एक मोडकळीस आलेलें जैन मंदिर आहे. गांवाच्या पश्चिमेस मोठा तलाव आहे. किल्ल्यांतील जैन मंदिरांत १०९५ सालचा एक शिलालेख आहे;

त्याचप्रमाणें कालेश्वराच्या देवळांत दोन शिलालेख आहेत. तसेंच डंबलच्या देसायाजवळ विजयानगरचा राजा दुसरा हरिहर (इ. स. १३७९–१४०१) याच्या वेळचे ९ ताम्रपट होते. हें देसाई घराणें औरंगजेबाचें मांडलिक असून पुढें मराठे आणि हैदर–टिपू यांच्या अंकित बनलें. जनरल वेलेस्लीनें १८०० त हें जिंकून घेतलें. या घराण्यांतील पुरुष १८५६ च्या बंडांत सामील असल्याचा आरोप ठेवून ही जहागीर जप्त करण्यांत आली.

**डबलवीन**— हा एक भाजीचा वेल आहे. याच्या शेंगा जंबियाच्या आकाराच्या असून बीं मोठें व निरनिराळ्या रंगांचें असतें. हिंदुस्थानांत आसाम, ब्रह्मदेश, बंगाल, संयुक्त प्रांत व पंजाब, वगैरे प्रांतांतून याची लागवड होते. पक्कें बीं हस्तिदंताप्रमाणें पांढरें असतें. याच्या शेंगा शिजवून त्यांचा भाजीप्रमाणें उपयोग करतात. परंतु हें केव्हां केव्हां विषारी असतें.

**डब्लिन**— ही आयर्लंडची राजधानी लिन्स्टर विभागांत डब्लिन उपसागराच्या मुखावरील बेटावर वसली आहे. लो. सं. सुमारें ५ लाख. हें शहर लिफे नदीवर आहे. येथील कस्टमहाउस, रोटुंडा, वगैरे इमारती पाहण्यासारख्या आहेत. ख्राइस्ट चर्च व सेंट पॅट्रिक चर्च ही ख्रिस्ती मंदिरेंहि चांगलीं असून त्यांत स्विफ्ट वगैरेंसारख्या प्रसिद्ध पुरुषांचीं थडगी आहेत.

ख्राइस्ट चर्चजवळच डब्लिन किल्ला आहे. येथील ट्रिनिटी कॉलेजमधील ग्रंथसंग्रहालयांत, ग्रेट ब्रिटनमध्यें प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची एक प्रत पाठविण्याबद्दल 'कॉपीराइट ॲक्ट' मध्ये नमूद केले आहे. याशिवाय येथें स. १८६५ च्या आंतरराष्ट्रीय प्रदर्शनाची चिरस्थायी इमारत सेंट स्टीफन्स ग्रीनच्या विहारभूमीजवळ असून स. १९०८ पावेतों या इमारतींत आयर्लंडचे विश्वविद्यालय होतें. येथें दारू फार तयार होते. बंदरांतून ही दारू, जनावरे, दुधाचे पदार्थ, रासायनिक खतें, इ. निर्यात होते.

**डब्लिन विश्वविद्यालय**—ही संस्था १५९१ मध्यें स्थापन होऊन त्या संस्थेला एलिझाबेथ राणीनें 'कॉलेज ऑफ दि होली ॲन्ड अन्‌डिव्हायडेड ट्रिनिटी' या नांवानें सनद दिली. या युनिव्हर्सिटींत बी. ए. ची पदवी नेहमींच्या ठराविक विषयांची देण्यांत येते. बी. ए. नंतर एम्. ए. ची पदवी, ठरलेलें शुल्क घेऊन ठराविक मुदतीनंतर देण्यांत येते. त्याकरितां परीक्षा घेण्यांत येत नाहीं. ऑक्सफोर्ड व केंब्रिज युनिव्हर्सिटींतहि अशीच पद्धत आहे. या कॉलेजमध्यें वाचनालय आहे, त्यांत चार लक्ष छापील ग्रंथ आणि हस्तलिखितें आहेत. तेथें एक वनस्पतिशास्त्रविषयक बाग आणि वस्तुसंग्रहालय आहे. तेथें विद्यार्थ्यांची संख्या सुमारें तीन हजार असते.

**डभई**—मुंबई, बडोदें संस्थान, डभई पोटभागांतील शहर. गायकवाडांच्या मुलुखांत प्राचीन इतिहासाच्या, विशेषतः तटबंदी व दरवाजे यांच्या शिल्पाच्या, बाबतींत हें शहर फार महत्त्वाचें आहे. येथील 'हिरावेशी'वर हत्ती, घोडे, सिंह, उंट, पक्षी, घोडेस्वार व युद्धाचीं शस्त्रास्त्रें फारच सुंदर तऱ्हेनें काढलीं आहेत. वेशीच्या उजव्या बाजूस भद्रकालिकामातेचें देऊळ व डाव्या बाजूला महादेवाचें देऊळ आहे.

१७२५ सालीं सेनापति दामाडे यानें डभई हें आपलें मुख्य ठिकाण केलें. स. १७७९ त कर्नल गॉडार्डनें हें जिंकून घेतलें. तेथील लोक चीट, कापड, लांकडाचें खोद-काम व जातीं करतात. लो. सं. वीस हजार.

**डमडम**—बंगाल, चोवीस परगणे जिल्ह्याच्या बराकपूर पोटविभागांतील एक गांव. हें कलकत्त्याच्या ईशान्येस ७ मैलांवर आहे. येथें सरकारी तोफखाना सन १८५३ पावेतों होता. येथें लढाईकरितां लागणारा दारूगोळा तयार करण्याचा एक कारखाना आहे. ज्या तहानें नबाब सिराजउद्दौलानें कलकत्ता, कासिमबाझार व डाका हीं इंग्रजांचीं ठाणीं परत केलीं तो तह व त्या तहनाम्यावर सही डमडम येथेंच झाली (१७५७). लो. सं. सु. सहा हजार.

**डमडम गोळ्या**—डमडम येथील दारूच्या कारखान्यांत तयार झालेल्या गोळ्या. या बंदुकीच्या गोळ्यांचें पुढील टोंक नरम धातूचें किंवा पोकळ असतें. त्यामुळें ही गोळी शरीरांत गेल्यावर पसरून भयंकर जखम करते. या गोळ्या युद्धांत वापरूं नयें असा आंतरराष्ट्रीय करार असतो. या प्रथम कलकत्त्याजवळ डमडम गांवीं करण्यांत आल्या व त्यांचा उपयोग इंग्रजांनीं हिंदुस्थानच्या वायव्येकडील सरहद्दीवर केला.

**डॅम्पीयर, विल्यम** (१६५२–१७१५)—एक इंग्रज दर्याप्रवासी. त्यानें १६९७ सालीं आपलें 'जगभर प्रवास' (व्हॉएज राउंड दि वर्ल्ड) हें पुस्तक प्रसिद्ध केलें, व तें फार लोकप्रिय झालें. पुढील सालीं ऑस्ट्रेलियन समुद्रांतील प्रदेशांचें संशोधन करण्याकरितां जी नाविक सफर गेली, त्याचा डॅम्पीयरला मुख्य (कमांडर) नेमण्यांत आलें. १७०३ सालीं तो एका खासगी नाविक सफरीचा कमांडर होऊन दक्षिण समुद्रांत गेला व तिकडून १७०७ सालीं परत आला. पुढील वर्षी कॅप्टन वुड्स रॉजर्सच्या सफरीबरोबर पृथ्वीप्रदक्षिणा करण्याकरितां गेला. वरील पुस्तकाखेरीज त्यानें 'व्हॉएजेस ॲंड डिस्क्रिप्शन्स' (प्रवास आणि वर्णनें) हें पुस्तक, आणि त्याची पुरवणी 'व्हॉएज टु न्यू हॉलंड', हीं पुस्तकें लिहिलीं.

**डरहॅम**—इंग्लंड, डरहॅम परगण्याचें मुख्य शहर. हें शहर प्राचीन असून वीअर नदीच्या कांठीं वसलें आहे. येथें एक

जुना किल्ला व भव्य देवालय आहे. येथें एक विद्यापीठ व इतर शाळा आहेत. यापासून जवळच कोळशाच्या खाणी आहेत. लो. सं. वीस हजार.

**डरहॅम विद्यापीठ**—हें १८३२ सालीं स्थापन झालें आणि १८३७ साली तें सरकारांत नोंदण्यांत आलें. या युनिव्हर्सिटीचा डरहॅमचा बिशप या धर्माधिकाऱ्याच्या धर्मसंस्थेशीं संबंध जोडलेला आहे, म्हणजे डरहॅमचा डीन हाच युनिव्हर्सिटीचा वार्डन म्हणजे गव्हर्नर ऊर्फ प्रेसिडेंट असतो, आणि डरहॅमचा एकेक कॅनन हा डिव्हिनिटी ( धर्मशास्त्र ) आणि अभिजात ( क्लासिकल ) वाङ्मय या एकेका विषयाचा प्रोफेसर असतो. आर्मस्ट्रॉंग कॉलेज ( स्थापना १८७४ ) व एक वैद्यक शास्त्राचें कॉलेज हीं विद्यापीठाच्या मालकीचीं आहेत. येथें सुमारें तीन हजार विद्यार्थी शिकतात.

**डर्बी**—इंग्लंड, डर्बीशायर परगणा. डरवेंट नदीच्या तीरावर हें प्राचीन शहर आहे. मिड्लंड रेल्वे कंपनीचे हे मुख्य ठिकाण झाल्यापासून याची पुष्कळ भरभराट झाली. सेंट पीटर, सेंट अल्कमंड, सेंट अँड्र्यू, वगैरे प्रार्थना मंदिरें येथें आहेत. हें शहर मातीच्या भांड्यांकरितां प्रसिद्ध असून स्पार खनिज, लोखंडाचें ओतकाम, वगैरेचे कारखाने येथें आहेत. प्रतिनिधिविभागांतून पार्लमेंटांत दोन सभासद निवडले जातात. हें घोड्यांच्या शर्यतींकरितां प्रसिद्ध आहे.

'डर्बी दिन' ( डर्बी डे ) हा लंडनचा एक वार्षिक सणाचा दिवस आहे. या दिवशीं लॉर्ड डर्बी यानें १८७० सालीं ठेवलेल्या पैजेसाठीं घोड्यांची शर्यत सुरू होते. बुधवार हाच वार डर्बी दिनाचा असतो. लंडनपासून १५ मैलांवर असणाऱ्या सरे मैदानावर ही शर्यत होते. शर्यतींतील घोडे तीन वर्षांच्या वयाचे असून, प्रेक्षकांना प्रवेशशुल्क पन्नास गिनी असतें.

**डलविच**—लंडन शहरांतल्या एका भागाला हें नांव आहे. हा भाग सरे परगण्यांत लंडन ब्रिजच्या दक्षिण अंगास सुमारें ५ मैलांवर आहे. या भागांत डलविच कॉलेज ही १६१९ सालीं स्थापन झालेली शिक्षणसंस्था असल्यामुळें या भागाला महत्त्व आलेलें आहे. संस्था सुप्रसिद्ध नट एडवर्ड एलेन यानें स्थापन केली. या संस्थेच्या मूळच्या घटनेंत १८५७ सालीं सुधारणा करण्यांत आली. या संस्थेच्या हल्लीं दोन शाखा आहेत. एक शिक्षणशाखा आणि दुसरी दानधर्मालयशाखा आहे. आणि दरसाल जी शिल्लक उरेल तीपैकीं $\frac{3}{4}$ रक्कम शिक्षणशाखेकडे आणि $\frac{1}{4}$ रक्कम दानधर्मशाखेकडे खर्च करण्यांत येतें. येथें प्राथमिक आणि उच्च शिक्षणाचीं विद्यालयें असून चार विद्यार्थी-वसतिगृहें आहेत. येथें शिक्षणशुल्काचे दर हलके आहेत आणि बऱ्याच युनिव्हर्सिटी शिष्यवृत्त्या आहेत. दानधर्मालयशाखेतर्फें कांहीं गरीब लोकांना संस्थेच्या जागेंत आश्रय देण्यांत येतो आणि कांहीं बाहेरच्या गरीब इसमांना मदत–भिक्षा देण्यांत येते. डलविच कॉलेजमध्यें सुप्रसिद्ध चित्रांचा चांगला संग्रह आहे.

**डलहौसी, लॉर्ड जेम्स अँड्र्यू** ( १८१२–१८६० )—

हिंदुस्थानचा एक गव्हर्नर–जनरल. याचा बाप हिंदुस्थानांत कमांडर असल्यामुळें त्यास हिंदुस्थानची माहिती लहानपणापासूनच होती. सर्व शिक्षण आटोपल्यावर तरुणपणीं यानें ईस्ट इंडिया कंपनींत अनेक महत्त्वाचीं कामें केलीं.

१८४३ सालीं याला ट्रेड-बोर्डाचा अध्यक्ष केलें. यानंतर याची नेमणूक हिंदुस्थानांत गव्हर्नर-जनरलच्या जागीं १८४७ सालीं झाली. यानें १८४८ पासून १८५६ पर्यंत कोणाचा दत्तक नामंजूर करून, कोणाला वारस नाहीं म्हणून, कोणाचा कारभार अव्यवस्थित म्हणून आणि कोणाशीं निष्कारण युद्धें पुकारून हिंदुस्थानांतील बरींच संस्थानें खालसा केलीं. यांपैकीं सातारा, झांशी, जैतपूर, संबळपूर, नागपूर, अयोध्या हीं प्रमुख होत. शिखांचें मुलतानचें राज्य व ब्रह्मदेशचा दक्षिण भाग व सिक्किमचा कांहीं भाग डलहौसीनें जिंकून ब्रिटिश राज्याला जोडला.

दुसरा बाजीराव पेशवा मरण पावल्यावर त्याची ८ लाखांची नेमणूक बंद केली. तसेंच तंजावरच्या घराण्याची नेमणूकहि रद्द केली. खैरपुरच्या संस्थानिकाचा तनखा १५ लाखांनीं कमी केला.

या सर्व कृत्यांबद्दल त्याची प्रशंसा करून ई. इं. कंपनीनें त्यास वार्षिक पांच हजार पौंडांचें पेन्शन दिलें. शिखांचें राज्य घेतल्याकारणानें त्यास 'मार्किस' ही पदवी मिळाली. पण पुढे १८५७ मध्यें उत्पन्न झालेल्या शिपाईबंडाचा–हिंदी स्वातंत्र्ययुद्धाचा

दोष याच्यावर लादण्यांत आल्यामुळें यास अनेक अपवाद ऐकावे लागले.

*तथापि यानें हिंदुस्थानांत बऱ्याच शास्त्रीय व इतर सुधारणा* आणल्या. तारायंत्र व आगगाडी यांचे मार्ग हिंदुस्थानांत यानेंच चालू केले. सडका व कालवे यांकरितां एक नवीन खातें निर्माण केलें. पोस्टाची व्यवस्था यानेंच केली. हिंदुस्थानांतील जुन्या शिल्प कामाच्या इमारती व प्रसिद्ध ऐतिहासिक स्थळें हीं शाबूत ठेवण्याचें कार्य याच्या अमदानींत प्रथम सुरू झालें. मनुष्याला बळी देण्याची चाल यानें बंद केली. आय्. सी. एस्. च्या परीक्षेस हिंदी उमेदवार घेण्याला डलहौसीनें अनुमति दिली. हिंदुस्थानच्या औद्योगिक पाहणीस यानेंच आरंभ केला. हिंदुस्थानांत ब्रिटिशांची सत्ता वाढविणाऱ्या मुत्सद्यांत याची गणना केली जाते, पण हिंदी लोक याच्या नांवाबद्दल तिरस्कार दाखवितात.

**डलास**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं टेक्सस संस्थानामधील डलास कौंटीचें मुख्य ठिकाण. हें ट्रिनिटी नदीच्या पूर्वतीरावर आहे. याचें क्षे. फ. सुमारें १५ चौ. मैल आहे. हें सुमारें ८ रेल्वेचें केंद्रस्थान आहे. सार्वजनिक इमारतींत कार्नेजी वाचनालय, कोर्ट, सिटी हॉल, सेंट मॅथ्यूचें देवालय, वगैरे इमारती येतात. येथें एक वैद्यक शाळा आहे. साउथ मेथॉडिस्ट विद्यापीठ आहे. येथून आजूबाजूच्या ठिकाणचा गहूं, कापूस व फळफळावळ हीं बाहेर पाठविण्यांत येतात. लो. सं. २,९४,७३४.

**डल्सिमिअर**—हें एक प्राचीन काळापासून चालत आलेलें विलायती वाद्य आहे. याचा आकार अनियमित चौकोनी असून याचें वरचें तोंड उघडें असतें. यांत निरनिराळ्या स्वरांच्या तारा बसविलेल्या असून त्या खुंट्यांच्या साहाय्यानें लावतां येतात. व त्यांवर बुचाचे तुकडे शेवटीं असलेल्या दोन हातोड्यांनीं ठोकून हें वाजविण्यांत येतें.

**डहोमी**—पश्चिम आफ्रिकेंतील एक देश. येथें पूर्वी स्वतंत्र राज्य होतें. परंतु सध्यां ही फ्रेंच वसाहत आहे. क्षे. फ. ४३,२३२ चौ. मै. व लो. सं. १४,३६,०००. आंत पन्नास मैलपर्यंत हा देश सपाट आहे. पन्नास मैलांपलीकडील अन्तर्भाग हा चढ-उतारीचा असून रुक्ष आहे. तुरळक जंगलांत मधून मधून नारळ, तमाल व ताड यांचीं झाडें आहेत. नायगरकांठच्या प्रदेशांत सिंह पुष्कळ आढळतात.

समुद्रकिनाऱ्याजवळच्या प्रदेशाची हवा उष्ण व सर्द आहे. समुद्राजवळील सरासरी उष्णमान सुमारें ८० अंश. असतें. किनाऱ्याजवळील भागांतले लोक शुद्ध निग्रो वंशाचे आहेत. डहोमी लोकांना त्यांच्या स्वतःच्या भाषेंत फॉन अथवा फाविन असें म्हणतात. हे उंच, मजबूत बांध्याचे, मानी, परकीयांशीं सभ्यपणें वागणारे, लढवय्ये व व्यापारांत दक्ष असे लोक आहेत. खुद्द डहोमी लोक भुतांखेतांची पूजा करणारे व क्षुद्रदेवतोपासक आहेत. हे लोक बहुधा शेतकी व व्यापार यांवर आपली उपजीविका करतात. *येथील मुख्य उत्पन्नाची बाब म्हणजे* ताडाचें तेल होय. मका, रताळीं, केळीं, संत्रीं, नारळ, लिंबें, सफरचंद, वगैरे जिन्नस होतात. रबराचीं झाडेंहि आहेत. व्यापार बहुतेक जर्मनी व ग्रेट ब्रिटन या देशांशीं आहे. कोटोनूपासून नायगारपर्यंत आगगाडीचा मुख्य रस्ता असून तेथून वसाहतीच्या पूर्व भागांत एक फांटा नेला आहे.

१८५१ त फ्रेंचांनीं येथें पाय पसरण्यास सुरुवात करून १८९४ त सबंध प्रदेश गिळंकृत केला. येथील राज्यकारभार एक गव्हर्नर पाहतो व त्याला मदतगार म्हणून सरकारी व बिनसरकारी लोकांचें एक सल्लागार मंडळ आहे.

**डॉइल, सर आर्थर कॉनन** ( १८५९–१९३० )— एक इंग्रज कादंबरीकार. त्यानें प्रथम वैद्यकशास्त्राचा अभ्यास केला, आणि वैद्यकीचा धंदाहि कांहीं वर्षें केला. नंतर तो धंदा सोडून देऊन डॉइल वाङ्मयाकडे वळला. त्यानें १८८७ सालीं 'ए स्टडी इन् स्कार्लेट' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत त्यानें शर्लाक होम्स या गुप्तहेराचें वर्णन केलें आहे. त्याचीं 'दि साईन ऑफ फोर', 'दि व्हाइट कंपनी', 'दि ॲडव्हेंचर्स ऑफ शर्लाक होम्स', इ. पुस्तकें प्रसिद्ध आहेत. हेरगिरीच्या गोष्टींविषयीं याचें नांव अजरामर राहील.

**डाउनिंग स्ट्रीट**— हें लंडन शहरांतलि व्हाइट हॉलपासून निघणाऱ्या सडकेचें नांव आहे. या सडकेच्या बाजूला ब्रिटनच्या पंतप्रधानाची कचेरी ( नं. १० ), फडणिसाची कचेरी इमारत ( नं. ११ ) आणि परराष्ट्रीय वसाहतींच्या कचेऱ्या आहेत.

**डाक** ( सु. सहावें शतक )—एक बंगाली कवि. याचा जन्म आसाममधील बावसी परगण्यांतील लोह या गांवीं झाला. याचीं वचनें आसाम, बंगाल व ओरिसा या भागांत प्रसिद्ध आहेत.

**डाकूर**—मुंबई, खेडा जिल्ह्याच्या थास्रा तालुक्यांतील एक यात्रेचें स्थान. हें बी. बी. सी. आय्. रेल्वेच्या गोध्रा–रतलाम शाखेवर आनंदच्या ईशान्येस ९ मैल आहे. येथें रणछोडजीचें प्रसिद्ध देवालय आहे. बोधानो नांवाच्या रजपुतानें ही डाकूरनाथांची मूर्ति द्वारकेहून आणिली. येथें मासिक मेळेहि भरत असून दरसाल एक लक्ष लोकांचा जंगी मेळा आश्विन–कार्तिक पौर्णिमेस भरतो.

**डाकोटा**—अमेरिका, सं. संस्थानांत उत्तर डाकोटा आणि दक्षिण डाकोटा अशीं दोन संस्थानें आहेत. उत्तर डाकोटा संस्थानांतून मिझोरी, तांबडी नदी, छोटी मिझोरी आणि जेम्स नदी या नद्या वाहतात; शिवाय सरोवरें पुष्कळ आहेत; त्यांपैकीं डेव्हिल्स सरोवर हें सर्वांत मोठें आहे. या संस्थानांपैकीं कांहीं

भाग ( १५६ चौरस मैल ) रेड इंडियनाकरिता राखून ठेवलेला आहे. या संस्थानांतील बहुतेक भाग सुपीक असून त्यांत गहूं उत्तम होतो. ५,००० मैलांहून अधिक रेल्वे आहे. क्षे. फ. ७०,६६५ चौ. मै. व लोकसंख्या ६,४१,९३५ आहे. बिस्मार्क हें राजधानीचें शहर आहे ( उत्तर डॅकोटा पाहा ).

द. डाकोटा या संस्थानाचा बराच भाग गवताळ आहे व त्यापैकीं कांहीं अरण्यमय आहे. वायव्येकडील भाग डोंगराळ असून त्यांत सोनें, रुपें, कथिल, शिसें, तांबें व इतर खनिज द्रव्यें सांपडतात. या प्रदेशांतून मिझोरी, व्हाइट, ग्रॅंड, जेम्स, वगैरे नद्या वाहतात. मका, जवस, वगैरे धान्यें येथें होतात. पाएर हें राजधानीचें शहर आहे. रेल्वे लाइन ४,००० मैल. क्षे. फ. ७७,०४७ चौ. मैल व लोकसंख्या ६,४२,९६१ आहे. विद्यापीठ व्हर्मिलियन येथें आहे.

**डाकोटा इंडियन**—सिउक्स. हा एक उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोकांचा एका काळीं अत्यंत बलिष्ठ असा संघ होता. यांची संख्या सुमारें पंचवीस हजार असावी. सध्यां यांची सांस्कृतिक प्रगति झाली असून त्यांची संख्या वाढत आहे. १८ व्या शतकामध्यें हे लोक आपलें पूर्वीचें मोठ्या सरोवराजवळचें स्थान सोडून ब्लॅक हिल् ( कृष्ण पर्वत ) या ठिकाणाकडे गेले. तेथें ते गोऱ्या लोकांशीं शांततेनें वागूं लागले. परंतु १८६२ मध्यें त्यांनीं बंड केलें, आणि मिनेसोटा संस्थानांत ८०० सैनिकांस आणि वसाहतकारांस त्यांनीं ठार मारलें. हें बंड मोडून काढण्यांत आलें, तथापि सिउक्स लोकांची गडबड चालूच होती; व त्यांनीं १७६८ ते १८६८ पर्यंत एक प्रकारचें युद्धच चालू ठेविलें होतें. त्यांनीं गोऱ्या सैनिकांचा अनेक चकमकींत पराभव केला. विशेषतः १८७६ मध्यें जनरल कस्टर याच्या सैन्याचा लिट्ल बिग हॉर्न या ठिकाणीं झालेल्या लढाईंत धुव्वा उडविला. १८७७ मध्यें त्यांचें क्षेत्र राखून ठेवण्यांत आलें. तथापि त्यांनीं १८९१ मध्यें पुन्हां बंड केलें. ते जनरल माइल्स यानें मोडलें. सध्यां यांचे पुष्कळ लहान लहान विभाग पाडले असून उत्तर व दक्षिण डाकोटा या संस्थानांत त्यांचीं राखीव क्षेत्रें आहेत.

**डाका**—पूर्व पाकिस्तान, पूर्व बंगाल प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,७३८ चौ. मै.. पद्मा किंवा हल्लींचें गंगेचें पात्र व मेघना यांच्यामध्यें असलेल्या या जिल्ह्याचा आकार निमुळता असून, नद्यांची खळमळ व पूर यांच्या योगानें येथील भुसभुशीत जमिनींत वारंवार फरक होत असतो. हा जिल्हा एक सपाट मैदान असून त्यांत मधुपुर हें एकच वन आहे. त्या वनांतून वाहणाऱ्या वन्सी व लख्या नद्यांच्या पात्रामुळें झालेल्या खोल दऱ्यांतील शोभा सुंदर आहे. या जिल्ह्यांत तीन नद्यांचीं पात्रें असल्यामुळें पावसाच्या व हिमालयावरील वर्फ वितळून आलेल्या पाण्याच्या योगानें नद्यांना पूर येऊन बराच प्रदेश जलमय होऊन जातो. वार्षिक पाऊस सरासरी ७२ इंच पडतो. लो. सं. ४२,२२,१४३.

मुसलमान लोक बंगाल प्रांतांत प्रथम ११९९ सालीं आले. स. १२९६ त दिल्लीचा बादशहा झाल्यावर अल्लाउद्दिनानें बंगालची विभागणी करून बहादुरशहाला आग्नेय भागाचा सुभेदार नेमिलें. त्याची राजधानी हल्लींच्या डाका शहराच्या पूर्वेस १५ मैलांवर मेघना नदीच्या कांठीं सोनारगांव येथें होती. स. १६०८ त शेख इस्लामखानानें आपली राजधानी राजमहालाहून डाका येथें आणली. याचें कारण त्या वेळीं सरहद्दीवर परक्यांच्या स्वाऱ्या होत होत्या. मोंगल सुभेदारानें पोर्तुगीज लोकांच्या हाताखालीं जहाजांवर पुष्कळ सैन्य ठेवून आपल्या सरहद्दीचें रक्षण केलें. १६६० सालीं मीरजुमला बंगालचा सुभेदार असतां डाका जिल्ह्याची फार भरभराट झाली. मीरजुमल्याच्या पाठीमागून नूरजहानचा पुतण्या शाइस्तेखान हा सुभेदार झाला. त्यानें चित्तगांव साम्राज्यास जोडून औरंगजेबाच्या हुकुमानें इंग्रजांच्या वखारी जप्त करून डाका येथील व्यापारी गुमास्त्यास तुरुंगांत टाकलें. १७०४ सालीं मुर्शिदकुलीखानानें येथें राजधानी नेल्यापासून डाकाच्या उतरत्या कळेस प्रारंभ झाला. १७६७ सालीं येथें ब्रिटिश सत्ता स्थापन झाली.

माणिकगंजाचा पश्चिम भाग सोडून इतर ठिकाणची हवा निरोगी असल्यामुळें लोकांची वाढ होत आहे. शें. ६० च्यावर मुसलमान आहेत व शें. ३७ हिंदू आहेत. येथील मुख्य भाषा बंगाली आहे. येथील मुख्य पीक भात आहे. भाताच्या खालोखाल पीक ताग होय. यांशिवाय कडधान्यें, मोहरी, गळिताचीं धान्यें, ऊंस, तीळ, वगैरे जिन्नसहि होतात.

सूत काढणें आणि मलमल तयार करणें हे धंदे येथें प्राचीन काळापासून चालत आहेत; कशिद्याचें काम मुसलमानी अमलानंतर होऊं लागलें आहे. सुंदर मलमल व निरनिराळ्या प्रकारचे कशिदे काढलेलीं रेशमी वस्त्रें युरोप व पश्चिम आशिया यांकडे मोठ्या प्रमाणावर पाठविलीं जात असत. पण विलायतेंत यंत्रसाहाय्यानें तयार होणाऱ्या मालाशीं चढाओढींत न टिकल्यामुळें हा धंदा खालावत चालला. डाका येथील अगदीं तलम कापडाचा उल्लेख दोन हजार वर्षांपासून येतो. हा प्राचीन धंदा व्यापारी ब्रिटिश सरकारनें आपल्या देशांतील लोकांच्या फायद्यासाठीं मुद्दाम मारला असा इतिहास आहे. या मलमलीच्या धंद्याचें सविस्तर वर्णन ज्ञानकोश, वि. १४, पृ. (ड) १३–१५ वर दिलेलें आहे.

या जिल्ह्याचा आयात व निर्गत व्यापार नारायणगंजावरून

होतो. कापड, मीठ, रॉकेल, दारू, जोडे आणि छत्र्या हे जिन्नस कलकत्त्याहून व चुना आणि दगडी कोळसा आसामांतून येतो. याशिवाय बकरगंज येथून तांदूळ, मसाला, गूळ व सुपाऱ्या येतात. ताग हा येथील मुख्य निर्गत माल होय.

शहर—डाका जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें शहर बुऱ्ही गंगा नदीच्या उत्तर तीराला आहे. ढाक झाडाच्या नांवावरून या शहराचें नांव पडलें असावें किंवा येथें असलेल्या ढाकेश्वरीच्या नांवावरून तें पडलें असावें, असें कांहींचें मत आहे. हें शहर बरेंच मोठें आहे. ब्रिटिश अमलापूर्वी हें शहर फार भरभराटींत असून येथील मलमल युरोपांत रवाना होत असे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत झप्पण, कशिदा, यांचे कारखाने व ताग आणि कातडीं यांचा व्यापार यांमुळें या शहराला थोडीबहुत बरी स्थिति येऊं लागली आहे. लो. सं. २,१३,२१८.

येथें शिक्षणाची सोय चांगली आहे. डाका विद्यापीठ, जगन्नाथ विद्यापीठ, वैद्यकीय शाळा, व इंजनिअरिंग कॉलेज ह्या संस्थांशिवाय दुय्यम व प्राथमिक शाळा अनेक आहेत.

**डांग**—खानदेश व नाशिक या जिल्ह्यांच्या मध्यें हीं पंधरा डांग संस्थानें किंवा जहागिरी आहेत. डांग या शब्दाचा धात्वर्थ माथा, पर्वतशिखर असा आहे. पुणें भागांत ज्याला मावळ म्हणतात, तसल्याच प्रदेशाला नाशकाकडे साधारणतः डांग म्हणतात. उत्तरेस बडोदें, दक्षिणेस नाशिक जिल्हा, पूर्वेस खानदेश व पश्चिमेस सुरत जिल्हा. याचें क्षे. फ. ९९९ चौ. मै. आहे. अंबिका, पूर्णा, काप्री व गिऱ्हा या नद्या यांतून वाहतात. या जिल्ह्यांत फक्त आदिवासी राहतात. त्यांची लो. सं. ४०,४९८ आहे. यांपैकीं १४,१३४ भिल्ल, ९,९२३ कुणबी, ६,४४२ कोंकणी व ५,७०६ वारली आहेत. फारच थोडे साक्षर आहेत. यांस साक्षर करण्यासाठीं आतां १३० शाळा निघाल्या आहेत व बहुतेक खाजगीच आहेत.

डांग देशांत पुढील पंधरा जहागिरी आहेत :— १. अमाळें, २. अवचारें, ३. चिंचली, ४. देरभवती, ५. दुधें, ६. धारवी, ७. झाडी गरखंडी, ८. केकत कडुपाद, ९. किर्ली, १०. पळासविहीर, ११. पिंपळादेवी, १२. पिंप्री, १३. शिवाबारें, १४. वढावण व १५. वासुर्णे. या प्रत्येकीवर स्वतंत्र जहागीरदार आहे. पूर्णा, अंबिका, काप्री व कुढा या नद्या यांत मुख्य आहेत. रूपगड नांवाचा एक किल्ला आहे. या डोंगरांत लोखंड पुष्कळ सांपडतें. साग, शिसू हीं इमारती लांकडें फार आहेत. मोहाचीं झाडेंहि पुष्कळ असल्यानें दारूचें उत्पन्न बरेंच होतें.

मुख्यतः भिल्ल व इतर कुणबी, कोंकणी, वारली, काथोडी, वगैरे लोकांची वस्ती आहे. नागली, बाजरी, भात, कोद्र, वगैरे हलकीं धान्यें पिकवून हे लोक आपला उदरनिर्वाह करतात. बहुतेकांजवळ धनुष्य-बाण असतात व त्यायोगानें पशुपक्ष्यांची शिकार करून त्यांवर हे पोट भरतात. वाघदेव, शिवेवरील म्हसोबा, व नाग हे त्यांचे मुख्य देव आहेत. गुजराथी, हिंदुस्थानी व मराठी यांची मिश्र भाषा हे बोलतात.

डांग राजे आपल्याला रजपुतवंशी म्हणवितात. त्यांचा मुख्य धारवीकर आहे. पूर्वी हे सारे जहागीरदार मुल्हेर येथील देशमुखाच्या हाताखालीं असत. इंग्रजी राज्य झाल्यावर हे स्वतंत्र बनले. त्यांचे कांहीं हक्क गायकवाडींत होते. त्यांची व्यवस्था इंग्रजांनीं लावून दिली. मुल्हेरकर देशमुखाला यांच्यापासून थोडीशी खंडणी पूर्वापार मिळते. सुरत जिल्ह्याचा कलेक्टर हाच यांचा पोलिटिकल एजंट असे. आतां हीं संस्थानें मुंबई इलाख्यांत विलीन झालीं आहेत. १० जुलै १९४८ पर्यंत एक तुटक भाग म्हणून याचा कारभार केला जाई व सुरत जिल्ह्याचा कलेक्टर हा कारभार पाही. पण त्या दिवसापासून मुंबई प्रांताचा हा एक जिल्हा झाला.

१९ व्या शतकाच्या प्रारंभीं हे लोक शेजारच्या प्रदेशांत लुटालूट करीत. पण सर जेम्स औट्रम (त्या वेळीं कॅ. औट्रम) यानें मोठ्या कौशल्यानें या लोकांस तो धंदा सोडून शांततेचा मार्ग पत्करण्यास लाविलें. चौदा भिल्ल राजे डांग प्रदेशावर सत्ता गाजवीत. लोक यांना खंडण्या देत. या राजांखेरीज नाईक, प्रधान किंवा पोवार हे अधिकारी असत. आतां जिल्हा झाल्यापासून इतर जिल्ह्याप्रमाणें शेतकी करणारांस सरकारनें बऱ्याच सवलती दिल्या. हे लोक फार दारूबाज आहेत; पण दारूबंदीच्या कायद्यामुळें यांच्यांत सुधारणा होत आहेत. डांगी पाहा.

या लोकांची भाषा मराठीची कीं गुजरातीची उपभाषा, याबद्दल संयुक्त महाराष्ट्र आणि महागुजरात स्थापूं पाहणाऱ्या लोकांत मोठा वाद माजून राहिला आहे. नुकतीच मुंबई सरकारनें पूर्ण चौकशीअंतीं डांग प्रदेशाची भाषा मराठीच ठरविली आहे.

या जिल्ह्यांत नुकतीच फार मोठी (सु. २०० चौ. मै. भागाला) आग लागली व सरकारचें तिकडे आतां बरेंच लक्ष गेलें.

**डांगची**—मुंबई इलाखा. खानदेशांत सर्वांत मागसलेली ही एक रानटी जात आहे. हे लोक दुर्व्यसनी असल्यामुळें प्रायः खुजट असून काबाडकष्टांनीं व दारिद्र्यानें गांजल्यामुळें मनाचे दुर्बल असतात. यांची राहणी अत्यंत किळसवाणी असते. शेतकीवर यांचा उदरनिर्वाह असतो. परंतु हें काम करण्यास नेहमीं कंटाळा करतात, त्यामुळें कोंकणी व वारली कुळांपासून पिकाचा जो कांहीं वांटा मिळेल त्यावरच यांना गुजराण करावी लागते. हे वाघाला पूज्य मानतात व वाघ देवतेची पूजा करतात. हे सदोदित आपल्याजवळ चकमक बाळगतात.

**डांगर**—[ लॅटिन–कुकुरबिटा पेपो ]. एक वेल. हा भोपळ्यासारखा असतो व पांचपंचवीस हात लांब वाढतो. वेलास तीसचाळीस फळें येतात. त्यांस डांगर म्हणतात. फळ लांबोडें वाटोळें असून रंग पिवळा असतो. आंत बिया असतात; त्या खातात. डांगराच्या पानांची व फुलांची भाजी होते. देवडांगर किंवा भोपळा असेंहि याला नांव आहे.

**डांगी**—शेतकी करणारी ही जात आहे. यांची लो. सं. सु. पंचवीस हजार असून बहुतेक मध्यप्रांतांत सागर जिल्ह्यांत आहेत. गडपान्याचे राजे डांगी असत व त्या भागास पूर्वी डांगीवाडा म्हणत.

डांग शब्द फारसी आहे. त्याचा अर्थ डोंगराळ किंवा रानवट असा आहे. चांगल्या स्थितींत असलेले डांगी आतां स्वतःस रजपुतांचे वंशज म्हणवितात. पण यांच्या रक्तांत जरी रजपूत अंश असला तरी इतर जातींचें मिश्रण झालें आहे. कारण यांचीं कुलनामें राख्या म्हणजे कुंभारणीचीं मुलें, धोबिया-धोबिणीचीं मुलें, पवनिया-कोष्टिणीचीं मुलें अशीं आहेत. पूर्वी हे रजपूत व मराठा सैन्यांत नोकरी करीत असत. नागपुराजवळ इंदुरी गांवांत यांची वसाहत आहे. हे भोसल्यांच्या सैन्यांत नोकर असत.

दुर्गा देवीची पूजा हे लोक फार भाविकपणानें करतात. जिझोटिया ब्राह्मण यांचे पुरोहित आहेत. हे आता शेतकी करतात. यांच्या बायकाहि कष्टाचीं कामें करतात. हे कुसुंबा व तागाची पेरणी करतात. डांग पाहा.

**डांगे, श्रीपाद अमृत** (१९००- )— एक हिंदी कम्युनिस्ट पुढारी व समाजकार्यकर्ते. नाशिक हें यांचें जन्मठिकाण होय. मुंबईच्या विल्सन कॉलेजमध्यें असल्यापासूनच यांना इंग्रजी भाषेंत लिहिण्याचा, बोलण्याचा व कविता करण्याचाहि नाद लागला. गडकऱ्यांच्या 'वाग्वैजयंती' चें यांनीं इंग्रजींत भाषांतर केलें आहे. हे कॉलेजचें शिक्षण पूर्ण होण्यापूर्वीच राष्ट्रकार्यांत शिरले. १९२२ सालीं 'सोशॅलिस्ट' पत्र काढून यांनीं समाजवादी विचारसरणी लोकांसमोर मांडली. सर्व उत्पादनाचीं साधनें हीं कामगारांच्या श्रमांवर उभारलीं गेलीं असल्यानें तीं सर्व सार्वजनिक मालकीचीं झालीं पाहिजेत व त्यांवर कामगारांचाच हक्क आहे अशी तत्त्वप्रणाली हे मांडीत असत. १९२४ सालीं शेतकरी व कामगार यांना बंडास प्रवृत्त करणे व ब्रिटिश हुकमत नष्ट करणें या आरोपांखालीं यांना चार वर्षांची शिक्षा झाली. सरकारची ही दडपशाहीची वृत्ति पाहून यांनीं आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीनें कानपूर येथें १९२५ सालीं कम्युनिस्ट पार्टीची स्थापना केली. हिलाच पुढें अखिल भारतीय स्वरूप येऊन १९२७ सालीं शेतकरी–कामकरी पक्षाची स्थापना झाली. हिंदुस्थानची राज्यघटना ठरवणाऱ्या 'सायमन कमिशन'वर यांनीं बहिष्कार टाकला. संपाच्या अस्त्रानें मजुरांची पगारकपात थांबवली. तसेंच मुंबईचा हिंदु-मुसलमानांचा दंगा थांबवण्यासाठीं यांनीं स्वतःचें वजन खर्ची घातलें. 'मीरत केस' प्रकरणांत १९२९ सालीं यांना पकडण्यांत येऊन बारा वर्षांची शिक्षा देण्यांत आली. परंतु अपिलांत ती तीन वर्षांची होऊन १९३५ सालीं यांची सुटका झाली. यानंतर 'क्रांति' हें मराठी व 'नॅशनल फ्रंट' हे इंग्रजी साप्ताहिक यांनीं काढलें. १९३९ सालीं मुंबईस महागाईभत्त्यासाठीं ऐंशीं हजार कामगारांनीं जो प्रचंड संप घडवून आणला त्याचे नेतृत्व यांच्याकडेच होतें. यामुळें यांना अटक करण्यांत आली व तुरुंगांत डांबण्यांत आलें. परंतु कम्युनिस्टांच्या युद्धानुकूल धोरणामुळें लवकरच यांची मुक्तता होऊन हे युरोपमध्ये गेले. लंडनच्या जागतिक कामगार–परिषदेंत हिंदी कामगारांचे प्रश्न यांनीं मांडले. ब्लॅकपूल येथें भरलेल्या सत्तर लाख मजुरांचे प्रतिनिधि असलेल्या सभेंत यांनीं हिंदी स्वातंत्र्याच्या ठरावास पाठिंबा मिळवला. पॅरिस येथें भरलेल्या जागतिक कामगार-परिषदेंत हे सर्व वसाहतींचे पुढारी बनले व यांनीं वसाहतींच्या स्वातंत्र्याला मान्यता मिळवली.

स्वातंत्र्याच्या लढ्याला भांडवलदारांचा कधींच उपयोग होणार नाहीं; श्रमजीवी बहुजनसमाजानेंच त्यासाठीं आपली ताकद खर्चली पाहिजे, अशा विचारसरणीवर यांचें कार्य चालू असतें. त्यासाठीं क्रांतिकारक लढाऊ वर्ग तयार करणें, लढ्याचें नेतृत्व भांडवलदारांकडून काढून श्रमजीवी बहुजनसमाजाकडे आणणें, शेतकरी व कामकरी यांची पोलादी संघटना घडवून आणणें, वगैरे कार्यक्रम यांनीं हातीं घेतले आहेत. आपले विचार निर्भयपणे मांडण्याचें सामर्थ्य यांच्यांत आहे.

(१) लेनिन व गांधी, (२) हेल् फाडंड, (३) वैदिक कालाचा इतिहास, वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.

मुंबईच्या विधिमंडळांत हे आपल्या पक्षातर्फे १९४७ सालीं निवडून आले. पण कॉंग्रेसविचारसरणीशीं यांच्या पक्षाचीं मतें जुळत नसल्यानें यांना संरक्षण कायद्याखालीं सध्यां तुरुंगांत ठेवण्यांत आलें आहे.

**डांग्या खोकला**—हा एक सर्दी-पडशाचा प्रकार असून यामध्यें खोकल्याची जोराची उबळ येते व श्वास कोंडल्यासारखा होऊन शेवटीं मोठ्या जोराने श्वास घेण्यांत येतो. हा रोग अतिशय सांसर्गिक आहे. याचा उद्भव सामान्य सर्दीपासूनच होऊन वरचेवर खोकला येऊं लागतो. यापासून पुढें दुसरे रोग उत्पन्न होऊन त्यामुळें मुलें मृत्यु पावतात.

या रोगाच्या तीन अवस्था असतात: पहिलींत पडशाचा

विकार जास्त असून ती आठवडाभर टिकते. यानंतर आवेगा-(उचली)ची अवस्था येते व ती महिनाभर असते. शेवटच्या अवस्थेत विकार कमी होत जातो. या रोगांत इतर रोग-उदा., झटके, श्वासनलिकादाह, मेंदूत रक्तस्राव, कफक्षय, इ.-उत्पन्न होण्याचा फार संभव असतो. हा रोग मुलांनाच बहुतकरून होतो. याचा आवेग कमी करण्यासाठीं औषधें द्यावीं लागतात. साधारणतः बेलाडोना देतात. या रोगाचा संसर्ग दुसऱ्यास होऊं नये म्हणून रोग्याचा कफ जाळून टाकावा व जंतुघ्न औषधांनीं पिकदाणी धुवावी.

**डाघेस्तान**—रशियांत कॉकेशस पर्वताकडील एक लोकराज्य. हें कास्पियन समुद्राच्या पश्चिम अंगास पसरलेलें आहे. क्षे. फ. १३,७३० चौ. मैल आणि लो. सं. ८,००,००० आहे. राजधानी डेरबेंड आहे. येथील लोक तार्तार व सिर्केशियन या जातींचे व बहुतेक सर्व इस्लाम धर्मी आहेत. येथील दऱ्यांचा प्रदेश सुपीक असून तेथें धान्य चांगलें पिकतें; शिवाय कापूस, तमाखू, जवस, रेशीम हीं होतात.

**डॉन जुआन**—हा एका स्पॅनिश दंतकथेंतील एक नायक आहे. त्यानें एका मुलीला फूस लावून पळवून नेण्याचा प्रयत्न केला आणि त्यांत तिच्या बापाला द्वंद्वयुद्धांत यानें ठार मारलें. नंतर त्यानें त्या मृत माणसाच्या पुतळ्याला आपल्या चैनबाजींत सामील होण्यास निमंत्रण दिलें. तेव्हां तो पुतळा सजीव झाला आणि त्यानें डॉन जुआनला नरकांत नेलें. या दंतकथेवर पुढें अनेक जणांनीं नाटकें लिहिलीं. त्यांपैकीं अतिशय प्रसिद्ध नाटकें आहेत तीं: मोझार्टचें 'गिओवान्नी', मोलियरचें 'डॉन ज्युआन' आणि शॅडवेलचें 'दि लिबर्टाइन'. इंग्रज कवि बायरन यानेंहि डॉनजुआन हें नाटक लिहिलें. परंतु त्याचा सदरहू दंतकथेशी संबंध नाहीं. फक्त बायरननें तेंच नांव आपल्या नाटकाला देऊन त्यांतला नायक फक्त बदफैली दाखविला आहे.

**डाना, जेम्स ड्विट** (१८१३–१८९५)—एक अमेरिकन सृष्टिशास्त्रज्ञ. त्यानें खनिजशास्त्र व भूस्तरशास्त्र यांवर ग्रंथ लिहिले. शिवाय पुष्कळ शास्त्रीय वृत्तान्त व निबंध लिहिले. त्यानेंच अमेरिकेच्या भूस्तरशास्त्राला शास्त्रीय दिशा लावून दिली.

**डान्टे, आलिघीरी** (१२६५–१३२७)—एक सर्वश्रेष्ठ इटालियन कवि. बिआन्ची आणि नेरी येथील विरोधी पक्षांच्या भांडणतंट्यांमुळें डान्टेला स्थानत्याग करून अखेरपर्यंत परमुलखांत राहावें लागलें. तो आरेझो बोलोना, सीना, पॅरिस, वगैरे शहरांत राहून १३१४ सालीं व्हेरोना येथे, आणि १३२० सालीं रॅव्हेना येथें त्यानें काळ घालविला व तेथेंच मरण पावला. त्याचें महाकाव्य 'डिव्हायना कॉमेडिआ'. याचे हेल् (पाताल), पर्गेटरी (नरक) व पाराडाइझ (स्वर्ग) असे तीन भाग आहेत. डान्टेला

स्वप्न पडतें कीं, स्वप्नांत त्याची एका अरण्यांत व्हर्जिल कवीशीं गांठ पडते, आणि व्हर्जिल डान्टेला हेल् व पर्गेटरी यांमधून घेऊन जातो. प्रथम ते हेलमध्यें प्रवास करतात. तेथें डान्टे अनेक प्रकारचे गुन्हेगार, पापी इसम व ते भोगीत असलेल्या शिक्षा पाहतो; नंतर ते दोघे पर्गेटरीमधून प्रवास करतात, व येथेंहि डान्टेला शिक्षा भोगीत असलेले गुन्हेगार दिसतात; पण त्या शिक्षा अल्पकालीन असतात. नंतर डान्टे पृथ्वीवरील पाराडाईझमध्यें प्रवेश करतो व तेथें डान्टेला बिआट्रिस दृष्टीस पडते. नंतर तिच्यासह डान्टे स्वर्गीतील नंदनवनांत (पाराडाइझमध्यें) जातो, आणि नंतर सात निरनिराळ्या लोकांत (स्फीअर्स) हिंडून नंतर आठव्या लोकांत जातो. तेथें डान्टेला जीझस ख्राइस्ट व त्याच्याभोंवतीं असलेले दिव्य देहधारी मंडळ दिसतें. नंतर नवव्या लोकांत अनेक पुण्यात्मे सिंहासनस्थ व अतिविस्तृत-वर्तुलाकार बसलेले त्याला दिसते; नंतर दहाव्या लोकांत खुद्द परमेश्वर अतिशय दीप्तिमान् असल्यामुळें डान्टेचे डोळे दिपतात व त्याला मुळींच दिसत नाहीं. याप्रमाणें नरक, पाताल, पृथ्वी, स्वर्ग व अनेक दिव्य लोक यांचें वर्णन डान्टेनें आपल्या महाकाव्यांत केलें आहे. तें इतकें सरस व कल्पनारम्य आहे कीं, त्यामुळें डान्टेच्या तोडीचा कवि अद्याप कोणी झाला नाहीं असें वाटतें. त्यामुळें त्याचा परिणाम लॅटिन वाङ्मयावर तर झालाच, पण सर्व देशांतल्या आधुनिक वाङ्मयावर झाला आहे. डान्टेनें जें नैतिक गुणदोषविवेचन केलें आहे, तें सेंट थॉमस आणि निओ-प्लेटॉनिक पंथ यांच्या मतानुसार बरेंचसें आहे. डान्टेच्या या महाकाव्याचें पद्यमय भाषांतर केरी, लॉंगफेलो, डीन प्लमटर व हॅझेलफूट यांनीं, आणि गद्य भाषांतर डॉ. जॉन कार्लाइल, सी. ई. नॉर्टन, व एच्. एफ्. टोझर यांनीं केलें आहे. डान्टेचे इतर ग्रंथ आहेत ते—व्हिटा नोव्हा, डी मॉनर्की, डी व्हल्गेरी एलोक्विओ, डी आक्वा एटटेरा, वगैरे.

**डॉप्लरचा सिद्धांत**—वर्णपटशास्त्राच्या योगानें खस्थ पदार्थांच्या दृष्टीच्या रेषेंतील गती निश्चित करतां येतात असा हा सिद्धांत आहे. जेव्हां खस्थ पदार्थ आणि प्रेक्षक यांमधील अंतर कमी होत असतें तेव्हां त्या पदार्थापासून दर सेकंदाला मिळणाऱ्या विशिष्ट रंगाच्या प्रकाशलहरींची संख्या वाढत असते. त्यामुळें प्रकाशांतील प्रत्येक वर्ण वर्णपटाच्या जांभळ्या टोंकाशीं

थोडासा सरकत जातो. अशा स्थलांतरांच्या शोधामुळें तारे, तेजोमेघ, इ. च्या दृष्टीच्या रेषेंतील गती मोजतां येतात. इ. स. १८४२ मध्यें डॉलरनें वरील सिद्धांत मांडला.

प्रेक्षकांच्या सापेक्ष गतीमुळें आदोलनसंख्येंत उघड फरक होत असतो. प्रेक्षकाच्या जवळ येतांना किंवा दूर जातांना वाजणाऱ्या इंजिनाच्या शिटीचा आवाज असाच बदलत असतो.

**डांबर**—( पिच् ). डांबराचे तीन प्रकार असतात : कोळसा-डांबर, लांकूड-डांबर व खनिज डांबर ( अस्फाल्ट ). डांबर काळें व तकतकीत असतें. कोळशाच्या खरीच्या विटा, डांबरकागद, छप्परी कौलें, रोंगणें, इ. साठीं डांबर वापरतात. बर्गंडी डांबर हें स्प्रूसफर झाडाचा डिंक होय.

कोळसा-डांबर—( कोल टार ). घट्ट व उग्र वासाचा हा द्रव पदार्थ पाण्यापेक्षां जड असतो. कोळशाच्या ऊर्ध्वपातनांतून डांबर निघतें. पुन्हां डांबराचें ऊर्ध्वपातन केल्यास अनेक उपपदार्थ तयार होतात. बेन्झीन, ॲनिलीन, नॅफ्था, क्रिओसोट, ॲन्थ्रॅसीन, वगैरे उपपदार्थ निरनिराळ्या उष्णतामानांत डांबरापासून काढतात. या पदार्थांचा औषधासाठीं फार उपयोग होतो.

**डॉब्सन, हेन्री ऑस्टिन** ( १८४०–१९२१ )— एक इंग्लिश कवि. त्याचा पहिला कवितासंग्रह १८७३ सालीं प्रसिद्ध झाला व त्यानंतर आणखी ग्रंथ प्रसिद्ध झाले ते म्हणजे : 'प्रॉव्हर्बज् इन पोर्सिलेन', 'ओल्ड वर्ल्ड आयडियल्स', 'ॲट दि साइन ऑफ दि लायर'. त्यानें कांहीं ग्रंथ लिहिले, त्यांपैकीं पुढील चरित्रें प्रसिद्ध आहेत : होगार्थ, फील्डिंग, स्टील, गोल्डस्मिथ, होरेस वॉलपोल, रिचर्डसन आणि फॅनी बर्नें.

**डामरडिंक**—[ डामर हा राळेला मराठी शब्द आहे ]. हा डिंक किंवा राळ निरनिराळ्या झाडांपासून तयार होतो व याचे प्रकारहि अनेक आहेत. ईस्ट इंडियन किंवा मांजरडोळ्या डिंक अगस्त्यापासून तर लालवृक्षापासून सालडामर निघतो. काळा डामर हा आणखी एक प्रकार आहे. रोंगणें तयार करण्यासाठीं डामरडिंक वापरतात.

**डामाजी नाईक**—मराठ्यांच्या आरमारांतील एक शूर सरदार. हा धुळपांच्या आरमारांत 'समशेरजंग' नांवाच्या उत्कृष्ट पालावरचा अधिकारी असून १७७५ सालीं इंग्रज आरमाराशीं लढाई झाली तेव्हां डामाजीनें निकराची झोंबी केली व आतां 'समशेरजंग' शत्रूच्या हातीं पडणार हें पाहून स्वतःच तें पेटवून दिलें व आपण आपल्या लोकांनिशीं हें अग्निदिव्य केलें. 'डामाजी नाईक धन्य । केलें हलाल धन्याचें अन्न ।' असें याच्यासंबंधींच्या पोवाड्यांत वर्णन आहे.

**डॉमिनिक, सेंट** ( ११७०–१२२१ )—हा डॉमिनिकन्स या ख्रिस्ती धर्मपंथाचा संस्थापक होय. १२१५ मध्यें तो रोम शहरीं गेला आणि तेथें त्यानें पोप ३ रा इनोसंट याची परवानगी सदर पंथ काढण्याकरितां मागितली. ती त्याची विनंति अंशतः मान्य करण्यांत आली आणि त्याच्या नंतरचा पोप ३ रा होनोरियन्स यानें या पंथाचें महत्त्व लक्षांत घेऊन या पंथाला ख्रिस्ती धर्मप्रचारकार्याचे सर्व अधिकार दिले.



**डायमंड हारबर**—( हिरा बंदर ). बंगालमधील चोवीस परगणा जिल्ह्याचा नैर्ऋत्येकडील एक पोटविभाग. क्षेत्रफळ १,२८३ चौ. मैल. खेडीं १,५७५ ; पैकीं डायमंड हारबर हें मुख्य खेडें आहे. हें खेडें हुगळी नदीच्या डाव्या तीरावर आहे. डायमंड हारबर व कलकत्ता यांमध्यें रेल्वे आहे. दक्षिणेस 'चिंग्रिखाली' नांवाचा किल्ला आहे.

**डायसेन, पॉल** ( जन्म १८४५– )— हिंदी तत्त्वज्ञानाचा एक जर्मन अभ्यासक. यांचें शिक्षण बॉन व बर्लिन युनिव्हर्सिटींत झालें व त्यानंतर प्रो. लासेन यांच्याजवळ यांनीं संस्कृतचें अध्ययन केलें. पुढें जिनेव्हा युनिव्हर्सिटींत प्राध्यापक असतांनाच यांनीं तत्त्वज्ञानाच्या अभ्यासास स्वतःस वाहून घेतलें तें आयुष्याच्या अगदीं अखेरीपर्यंत. प्लेटो, आरिस्टॉटल व कॅन्ट यांच्या तत्त्वज्ञानांचा यांनीं पूर्ण अभ्यास केला होता. पन्नास उपनिषदांचें जर्मनमध्यें भाषांतर करून त्यांची अनेक दृष्टींनीं चिकित्सा करण्याची कामगिरी यांनीं केली. कॅन्ट व शंकराचार्य यांच्या विचारसरणींतील साम्य लोकांपुढें ठेवून अद्वैत वेदान्त व आधिभौतिक विज्ञानशास्त्र यांचा संगम यांनीं घडवून आणला. यांनीं हिंदी तत्त्वज्ञानावर कांहीं ग्रंथ लिहिले आहेत.

**डायाझ, बार्थोलोमो** ( मृ. १५०० )— एक पोर्तुगीज जलपर्यटनकार. १४८६ मध्यें तो दोन जहाजांचा कमांडर होऊन केप ऑफ गुडहोपला त्यानें वळसा घातला, पण त्याची जाणीव त्याला त्या वेळीं झाली नव्हती. या केपला त्यानें पुन्हां वळसा घातला व तेथें वादळी समुद्र असल्यामुळें त्याला डायाझनें कॅबो टॉर्मेंटोसो ( केप ऑफ स्टॉर्म्स ) हें नांव दिलें. पण पुढें पोर्तुगॉलच्या राजानें तें नांव बदलून केप ऑफ गुडहोप हें हल्लींचें नांव ठेवलें. नंतर एका सफरींतील केवळ या जहाजाचा डायाझलाच कमांडर नेमलें असतां त्यानें ब्राझील देशाचा शोध लावला; पण तें जहाज नंतर परत येत असतांना नष्ट झालें.

**डायाटोमाइट**— ही एक प्रकारची माती असून ती कुजलेल्या खताच्या खालीं सांपडते. हिचा उपयोग डायनामेट तयार करण्याकरितां व कांहीं सिकतायुक्त रंग तयार करण्यास करतात. तसेंच चिनी माती, तापकाचें अस्तरण, वगैरे करण्याकडे ही वापरतात.

**डायाना**—प्राचीन रोमन लोकांची देवता. ही चंद्रदेवता शिकारीची अधिष्ठात्री आहे. ग्रीक लोकांची आर्टीमिस आणि डायाना एकच, असें नंतरच्या काळांत मानण्यांत येऊं

लागलें. ही चंद्राची आणि शिकारीची कुमारी देवता ( व्हर्जिन गॉडिस ) असून हिचीं आयुधें म्हणजे चंद्रकोर, धनुष्य, बाण, आणि भाता हीं होत. हिची उपासना फक्त स्त्रिया करीत. पुरुषांना हिच्या देवळांत मज्जाव असे. ही अप्सरांची देवता हरणांच्या रथांत बसून शिकारीला जात आहे, अशा प्रतिमा काढलेल्या दिसतात.

**डायारबेकिर**—आशिया खंडांतील तुर्कस्तानांतील याच नांवाच्या प्रांताची ही राजधानी तैग्रीस नदीवर असून या शहराभोंवतीं उंच व जाड भिंत आहे. गांवांत मोठी मशीद असून राजवाड्याचेहि अवशेष दिसतात. येथें लोखंड व तांबें यांचे जिन्नस, कमावलेलीं कातडीं, रेशीम, लोंकर व कापूस यांचें कापड, वगैरे करण्याचे कारखाने आहेत. अलेप्पो व बगदाद या शहरांबरोबर व्यापार चालतो, व कारवान लोकांचें हें महत्त्वाचें ठिकाण आहे. लो. सं. ९८,६९१.

**डायालेज**— हा एक आजाइटचें रूपांतर झालेला खनिज पदार्थ आहे. याची घटना सरळ रेषात्मक असून याचा पृष्ठभाग प्रकाकित असतो. शिल्रस्पार हाहि यासारखाच एक पदार्थ असून त्याचे स्फटिक समभुज असतात.

**डायोजेनीस** ( इ. स. पू. ४१२–३२३ )—हा ग्रीक तत्त्ववेत्ता सिनोप येथें जन्मला. त्याचा बाप सराफीचा धंदा करीत असे. डायोजेनीस अँटिस्थेनिजचा शिष्य बनून वैराग्यमार्गांत शिरला व लवकरच त्यांत गुरूच्या सवाई तयार झाला. कॉरिंथ येथें एका गृहस्थाकडे शिक्षक म्हणून तो राहत असे. तेथें असतां एका सार्वजनिक सामन्याच्या प्रसंगीं खुद्द अलेक्झांडर बादशहा तेथें हजर असतां त्याची सावली डायोजेनीसवर पडली होती. तेव्हां, 'आपण दूर व्हा, मला आनंदानें सूर्याचें ऊन खाऊं द्या,' अशी त्यानें बादशहास विनंति केली. तेव्हां ती असामान्य निर्लोभता पाहून बादशहाच्या तोंडून पुढील उद्गार निघाले:

'मी जर अलेक्झांडर नसतों तर आनंदानें डायोजेनीस झालों असतों.' त्याच्या मरणानंतर स्मारक म्हणून कॉरिंथियन लोकांनीं एक स्तंभ उभारून त्यावर एक दगडाचा कुत्रा बसविला आहे.

**डायोडोरस, सिस्युलस**—हा ग्रीक इतिहासकार सीझर व रोमन बादशहा ऑगस्टस यांच्या काळीं होऊन गेला. त्यानें विश्वाचा इतिहास लिहिला. त्यास तीस वर्षें लागलीं. त्या ग्रंथाचीं ४० पुस्तकें आहेत. पण त्यांपैकीं १–५ आणि ११–२० एवढींच पुस्तकें आणि कांहीं अर्धवट भाग आज उपलब्ध आहेत.

**डायोन कॅसिअस** ( इ. स. १५५— ? )— एक ग्रीक इतिहासकार. २१९ सालीं त्याला कॉन्सलची जागा मिळाली आणि २२४ च्या सुमारास तो आफ्रिकेचा प्रोकॉन्सल झाला. त्याच्या ग्रंथांपैकीं सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ 'रोमचा इतिहास' हा असून या ग्रंथाचें ८० भाग केलेले आहेत. व त्यांत इटलीमध्यें एनिअसचें आगमन झालें, आणि आल्बा आणि रोम हीं शहरें स्थापिलीं गेलीं, तेव्हांपासून इ. स. २२९ पर्यंतची हकीगत दिलेली आहे. परंतु या ग्रंथाचा कांहीं भागच आज उपलब्ध आहे.

**डायोनीसियस**— ख्रि. पू. २८५–२८७ या कालांतील ईजिप्तचा राजा फिलाडेल्फस टॉलेमी याचा हा हिंदुस्थानांतील बिंदुसार मौर्याच्या दरबारांतील वकील होय. यानें लिहिलेलें हिंदुस्थानविषयक वर्णन इ. स. च्या पहिल्या शतकापर्यंत उपलब्ध होतें. आतां तें उपलब्ध नाहीं.

**डायोफॅन्टस** ( अलेक्झांड्रिआचा )—हा बीजगणितावर लिहिणारा पहिला ग्रीक लेखक होय. तो इ. स.च्या तिसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेला. तो बीजगणिताचा जनक या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यानें 'अंकगणितीय प्रश्न' या नांवाचीं १३ पुस्तकें लिहिलीं. त्यांपैकीं फक्त ६ पुस्तकें आज उपलब्ध आहेत. शिवाय त्यानें 'बहुकोण संख्या' ( पॉलीगोनल

नंबर्स ) या नांवाचा ग्रंथ लिहिला. 'संख्यासिद्धांत' ( थिअरी ऑफ नंबर्स ), या प्रकरणांतील एका भागाला 'डायोफॅन्टाइन ॲनालिसिस' हें नांव डायोफॅन्टसच्या सन्मानार्थ दिलेलें आहे.

**डायोराइट**—हा एक अग्निजन्य खडक असून त्याचे स्फटिक फार खडबडीत असतात व त्यांचा रंग पांढरट असून त्यामध्यें काळे किंवा हिरवट काळे ठिपके असतात व ते हॉर्नब्लड आणि कॅल्शियम सोडियम फेल्सफार यांचे बनलेले असतात.

**डायोस्कोरिडीज, पेडॅनिअस** ( इ. स. १ लें शतक )—एक ग्रीक वैद्यकशास्त्रज्ञ. त्यानें मटीरिआ मेडिका हा सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला; त्याचीं पांच पुस्तकें आहेत. त्यांतील वनस्पतिशास्त्रविषयक माहिती विशेष महत्त्वाची आहे.

**डॉर्टमंड**—हें प्रशियांतील वेस्ट फालिया प्रांतांत एमशर नदीवर एक शहर आहे. अनेक आगगाड्यांचें तें केंद्र आहे आणि त्या शहराच्या आसपास कोळशाच्या खाणी आहेत. येथें लोखंड, पोलाद आणि यंत्रें, दारू, मातीचीं भांडीं, तमाखू आणि रासायनिक द्रव्यें यांचे कारखाने आहेत. लो. सं. ५,३७,००० आहे.

**डार्डोनेल्स सामुद्रधुनी**—ही सामुद्रधुनी मार्मोराचा समुद्र व ईजियन समुद्र यांना जोडते. हिचें प्राचीन नांव हेलेस्पांट असें होतें. अगदीं अरुंद भागाचें रक्षण करणाऱ्या दोन किल्ल्यांवरून हिला डार्डोनेल्स म्हणतात व सुला व मिथ्रडेटस यांच्या तहाबद्दल ( ख्रिस्तपूर्व ८४ ) प्रसिद्ध असलेलें ट्रोडमधील डार्डोनेल्सचें नांव ह्या सामुद्रधुनीला आहे. या सामुद्रधुनीची लांबी ४७ मैल असून रुंदी सरासरी ३–४ मैल आहे. डार्डोनेल्स ऐतिहासिकदृष्ट्या फार प्रसिद्ध असून क्सर्क्सीझ व शिकंदर यांनीं होड्यांचा पूल करून ही सामुद्रधुनी ओलांडली होती. लष्करी शास्त्राच्या दृष्टीनें सुद्धां डार्डोनेल्सचें महत्त्व असून भूमध्यसमुद्रांतून कॉन्स्टांटिनोपलकडे येणाऱ्या मार्गाचें हें नाक आहे. या मार्गाचें रक्षण करण्यास फार त्रास पडत नाहीं. इतकें असून सुद्धां इंग्लिश ॲडमिरल डकवर्थ हा १८०७ मध्यें मार्मोराच्या समुद्रांत शिरला. स. १८४१ जुलैचा तह व स. १८५६ चा पॅरिसचा तह यांच्या अन्वयें तुर्की सरकारच्या हुकुमाशिवाय कोणत्याहि लढाऊ जहाजास आंत शिरतां येत नसे. परंतु गेल्या महायुद्धानंतर ही सामुद्रधुनी सर्वांस खुली ठेवण्यांत आली आहे.

**डार्मस्टाट**—हें शहर जर्मनींतील हेस रिपब्लिकमध्यें डार्मनदीवर फ्रँकफोर्ट शहरापासून १९ मैलांवर आहे. येथें सुप्रसिद्ध इमारती आहेत. त्यांत एक जुना राजवाडा आणि १५५० मध्यें बांधलेला टाउन हॉल, रॉथहॅस या इमारती आहेत. येथें एक टेक्निकल कॉलेज आहे. या शहरांत अनेक विविध प्रकारचे कारखाने आहेत, त्यांत यंत्रें, गालिचे, रासायनिक माल व टोप्या यांचे कारखाने महत्त्वाचे आहेत. लो. सं. ( १९३९ ) १,१५,५२६ आहे.

**डार्लिंग, ग्रेस** ( १८१५–१८४२ )—एक इंग्रज वीर स्त्री. १८३८ सालीं फॉरफरशायर या नांवाची आगबोट ४१ प्रवासी, यांशिवाय खलासी इतक्या इसमांना घेऊन जात असतांना फार्ने बेटानजीक वादळांत सांपडून त्यांतून निभावण्यास असमर्थ झाली, आणि खडकांवर आपटून फुटली, व बोटीचे दोन भाग झाले. आणि कांहीं खलाशी व प्रवासी त्या मोडक्या भागांवर अडकून राहिले. दुसरे दिवशीं सकाळीं ग्रेस डार्लिंग व तिचा बाप प्रत्येकीं एकेक वल्हें घेऊन त्या मोडक्या बोटीजवळ गेलीं, व ह्या संकटग्रस्तांपैकीं नऊ इसमांना त्यांनीं सोडवून आणून वांचविलें.

**डार्विन, चार्लस रॉबर्ट** ( १८०९–१८८२ )— एक प्रसिद्ध इंग्रज सृष्टपदार्थशास्त्रज्ञ. एऱ्यासमस डार्विन याचा हा नातू होय. १८३१ सालीं डार्विन पदवीधर झाला. बाप व चुलता यांच्या संमतीनें डार्विननें मोठी पृथ्वीप्रदक्षिणा केली. ॲटलांटिक महासागरांतील बेटें, दक्षिण अमेरिकेचे किनारे, न्यूझीलंड, टॅस्मॉनिया, ऑस्ट्रेलिया, ब्राझिल, सेंट हेलिना, इ. स्थळीं त्यानें प्रवास केला व या देशाच्या भूस्तरांबद्दल परत आल्यावर त्यानें अनेक ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले. १८३१ ते १८३६ पर्यंत सर्व काळ डार्विननें प्रवासांत घालविला. उपरिनिर्दिष्ट प्रवास हाच डार्विनच्या शास्त्रीय शोधांचा पाया होय.

१८३८ सालीं डार्विननें 'मालथस ऑन पॉप्युलेशन' नामक पुस्तकाचें अध्ययन केलें. नैसर्गिक निवडानिवड कशी होते याबद्दल त्याचें असें मत आहे कीं, जीवनार्थ कलहांत योग्य असतील तेच टिकून राहतात व अयोग्य प्राणी मात्र नष्ट होतात. यावरून नव्या उपजातीची घटना होत असावी असें डार्विनला सुचलें. १८५९ सालीं डार्विनचा मोठा ग्रंथ प्रसिद्ध झाला. 'दि ऑरिजन ऑफ स्पीसीज बाय मीन्स ऑफ नॅचरल सिलेक्शन' ( नैसर्गिक निवडीच्या साहाय्यानें होणारी जीवजातीची-उत्पत्ति ), असें या ग्रंथाचें नांव होतें. या ग्रंथानें बौद्धिक जगांत मोठीच खळबळ उडवून दिली. १८७१ सालीं 'डिसेंट ऑफ मॅन अँड व्हेरिएशन इन् रिलेशन टु सेक्स'. ( मनुष्योत्पत्ति व लिंगानुसार होणारे बदल ) नामक दुसरा ग्रंथ स. १८७१ मध्यें

प्रसिद्ध झाला, आणि १८७६ मध्यें 'व्होल्कॅनिक आयलंड्स अँड साउथ अमेरिका' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला.

डार्विन १९ एप्रिल १८८२ साली ख्रिस्तवासी झाला व त्याचें शव वेस्टमिनिस्टर अॅबेमध्यें पुरण्यांत आलें. डार्विनची शरीरप्रकृति चांगली नव्हती तरी त्यानें जिवापाड मेहनत घेण्यांत मुळींच कसूर केली नाहीं. डार्विननें आपल्या सिद्धांतामुळें जगांत मोठीच खळबळ उडवून दिली. खालच्या प्राण्यांपासून मनुष्योत्पत्ति झाली आहे हा त्याचा सिद्धांत सामान्यतः शास्त्रज्ञांना पटतो; पण नैसर्गिक निवडीचा सिद्धांत फार वादग्रस्त आहे. परिस्थितीचा बसणारा पगडा डार्विननें लक्षांत घेतला नाहीं असें त्याचे टीकाकार म्हणतात.

**डार्विन, सर जॉर्ज हॉवर्ड** (१८४५-१९१२)—हा वरील प्रख्यात विकासवादी विद्वान् जो चार्लस डार्विन त्याचा मुलगा. यानें ज्योतिषशास्त्रांतील अनेक विषयांवर विद्वत्तापूर्ण निबंध लिहिले; त्यांत विशेषतः समुद्राच्या भरतीओहोटी व त्यांचे परिणाम, आणि भरतीओहोटीच्या संघर्षामुळें पृथ्वीचें परिभ्रमण व चंद्राचें परिभ्रमण यांच्यावर होणारे परिणाम या विषयांवर विशेष भर दिलेला आहे. ब्रिटिश असोसिएशनचा १९०५ सालीं डार्विन अध्यक्ष होता.

**डार्विन, सर फ्रॅन्सिस** (१८४८-१९२५)— हा चार्लस डार्विन याचा दुसरा मुलगा. त्यानें 'एलेमेन्ट्स ऑफ बॉटनी' (वनस्पतिशास्त्राचीं मूलतत्त्वें), चार्लस डार्विनचें चरित्र आणि पत्रव्यवहार व 'फाउंडेशन्स ऑफ दि ओरिजिन ऑफ स्पीसीज' (जीवजातीच्या उत्पत्तीचा पाया) हे ग्रंथ लिहिले.

**डॉलफिन मासा**— हा व्हेल माशाच्या जातीचाच एक

माशांचा वर्ग आहे. हे सर्वत्र आढळतात. हे कळप करून राहतात व फार जलद पोहणारे आहेत. याची लांबी ६ ते १० फूट असते. याचा जबडा लांबट असून त्याच्या दोहो बाजूंस अनेक टोंकदार निमुळते दांत असतात. याचें मांस वातड असतें, पण लॅपलँडर लोक तें खातात. हा मासे, कालवें, वगैरेवर उपजीविका करतो. याला श्वासोच्छ्वास करण्याकरितां मधून मधून पाण्याच्या पृष्ठभागावर यावें लागतें. याचें घ्राणेंद्रिय फार तीक्ष्ण असतें. हा तालबद्ध स्वरानें आकर्षिला जातो. याच्या मादीस दरवेळीं एकच पिलूं होतें.

**डालमियां, शेट रामकृष्ण हरजीमल** (१८९०-)— एक सुप्रसिद्ध हिंदी व्यापारी. हे जातीनें मारवाडी असून पिढीजात श्रीमंत म्हणून यांची ख्याति आहे. यांचे पूर्वज पंजाब जिल्ह्यांतील डालमा या गांवाहून जयपुरला आले म्हणून यांचें घराणे डालमिया या नांवानें ओळखलें जाऊं लागलें. वयाच्या बाराव्या वर्षी अवघ्या बारा रुपये पगारावर यांनीं व्यापारांत प्रवेश केला व पुढें आपले बंधु जयदयाळ व जांवई शांतिप्रसाद जैन यांच्या सहकार्यानें यांनीं आपली धंद्यांतील प्रगति पुढें चालू ठेवली. विश्वविद्यालयीन शिक्षण झालें नसतांनाहि स्वानुभवानें संपादन केलेल्या अर्थशास्त्राच्या व व्यापाराच्या ज्ञानावर पहिल्या प्रतीचे हिंदी व्यापारी म्हणून यांनीं नांव मिळवलें. डालमियानगर (बिहार), डालमियापुरम् (द. हिंदुस्थान), डालमियाद्रि (पंजाब) व शांतिनगर (कराची) यांसारखीं कारखान्यांचीं केंद्रें निर्माण करून यांनीं सिमेंट, साखर, कागद, वनस्पती तूप, सल्फ्यूरिक अॅसिड, ब्लीचिंग पावडर, कॉस्टिक सोडा, डिस्टेंपर यांसारख्या अनेक महत्त्वाच्या वस्तूंचें उत्पादन सुरू केलें. आपल्या 'डालमिया सिमेंट'नें यांनीं हिंदुस्थानांतील सर्व सिमेंटचा बाजार काबीज केला आहे. भारत बँक, लि., या पेढीसंस्थेचे संस्थापकहि हेच होत. याशिवाय भारत इन्शुरन्स कंपनी व भारत फायर अॅण्ड इन्शुरन्स याची स्थापनाहि यांनींच केली आहे. १९४६ सालीं 'टाइम्स ऑफ इंडिया' या आशिया खंडांतील मोठ्या वृत्तपत्रसंस्थेचे पासष्ट टक्के भाग (शेअर्स) दीड कोट रुपयांना विकत घेऊन हिंदुस्थानांतील एका मोठ्या परदेशी संस्थेचें हिंदीकरण करण्याचा मान यांनीं मिळवला आहे. हे नुकतेच पाश्चात्य देशांत जाऊन आले व तेथें त्यांनीं जागतिक स्वरूपाच्या जगदैक्याच्या योजना पुढें मांडल्या.

**डालेन, निल्स गुस्टाव्ह** (१८६९- )—एक स्वीडिश एंजिनियर. त्यानें अनेक यांत्रिक शोध लावले, त्यांपैकीं समुद्रांतील निर्जन द्वीपगृहांतील दिवे आपोआप लागण्याची युक्ति, आणि रेल्वे सिग्नलांचे दिवे आपोआप लागण्याची युक्ति हे शोध महत्त्वाचे आहेत. त्याला १९१२ सालीं पदार्थविज्ञानशास्त्र विभागांतील नोबेल पारितोषिक देण्यांत आलें.

**डाल्टन, जॉन** (१७६६-१८४४)—एक इंग्रज सृष्टिशास्त्रज्ञ आणि रसायनशास्त्रज्ञ. याचा बाप जोसेफ डाल्टन हा गरीब कोष्टी होता. जॉन याचें प्राथमिक शिक्षण त्याच्या बापाजवळ व जॉन फ्लेचर नांवाच्या तेथील शाळामास्तराजवळ झालें. आरंभीं डाल्टननें शिक्षकी, शेती, वगैरे धंदे केले. पण त्यांत यश आलें नाहीं. पुढें १७९३ सालीं तो मँचेस्टर येथें गेला. तेथें तो मरेपर्यंत राहिला. जानगौफ नांवाच्या एका अंधळ्या तत्त्ववेत्त्याजवळ तो शास्त्र शिकला व पुढें गणित व पदार्थविज्ञान शास्त्रांचा

तेथील अध्यापक झाला. स. १७९३ त त्यानें विद्युत् उल्कादींचें निरीक्षण व इतर निबंध नांवाचें पुस्तक लिहिलें. १८०१ सालीं इंग्रजी व्याकरणाचीं मूलतत्त्वें नांवाचें पुस्तक लिहिलें. तो स्वतः वर्णांध असल्यानें वर्णांधतेवर त्यानें जी माहिती दिली तिला डाल्टनिझम असें नांव पडलें.

याचे विशेष महत्त्वाचे शोध 'अणुवाद' या विषयावर होते, व त्यामुळेंच त्याला युरोपभर कीर्ति लाभली. मँचेस्टरच्या रॉयल सोसायटीचा स. १८१७ पासून अंतकालपर्यंत म्हणजे स. १८४४ पर्यंत तो अध्यक्ष होता. तेथें त्यानें ११६ निबंध लिहिले.

प्रयोग करण्याकरितां याला सुबक व बिनचूक यंत्रें लागत नसत. त्याचें काम चालचलाऊ यंत्रांवर भागत असे. प्रयोगापेक्षां त्याची आपल्या अकलेवरच फार भिस्त असे. दुसऱ्याच्या प्रयोगांवर व प्रयोगनिर्णयांवर त्याचा फारसा विश्वास नसे. मँचेस्टर येथील रॉयल सोसायटींत त्याचा अर्धपुतळा आहे. त्याचे बाष्प आणि वायु यांच्या भारासंबंधींचे जे सिद्धांत आहेत त्यांना 'डाल्टन लॉज्' असें म्हणतात. हवेंत पाणी स्वतंत्रपणें वायुरूपानें वास करतें हें त्यानें प्रथम दाखवून दिलें.

**डास**—हे प्राणी उष्ण प्रदेशांत राहतात व त्यांच्या रक्तशोषक गुणामुळें भयंकर त्रासदायक म्हणून हे सर्वत्र प्रसिद्ध आहेत. हे आपलीं अंडीं संथ पाण्यांत घालतात. यांच्या दंशापासून जो हिंवतापाचा प्रसार होतो तो यांच्या शरीरामध्यें जे एक प्रकारचे परोपजीवी सूक्ष्म जंतू वसति करून राहतात ते यांच्या दंशाबरोबर मनुष्याच्या शरीरांत प्रवेश करतात, त्यामुळे होतो. अशा प्रकारें हिंवतापाचा प्रसार करणाऱ्या डांसाच्या जातीस अनोफिल म्हणतात. या उपद्रवी प्राण्यांचा नाश करावयाचा परिणामकारक उपाय म्हटला म्हणजे, त्यांच्या उत्पत्तिस्थानांचा पूर्णपणें नाश करणें हा होय व ही गोष्ट कोठेंहि पाणी सांचूं न देणें व सांचणारें पाणी वाहून जाईल अशी व्यवस्था करणें व त्यांचीं अंडीं किंवा पूर्वावस्थेंतील कीटकांचा नाश करणें, यांच्या योगानें साध्य होऊं शकते.

**डासाचें तोंड**

[इ जंभास्थि, ड चिबुकास्थि, क ऊर्ध्वोष्ठ, ब अधोष्ठ, अ जीभ.]

**डास, पीटर** (१६४७–१७०८)—एक नॉर्वेजियन कवि. त्याचें मुख्य गीत 'दि ट्रम्पेट ऑफ नॉर्थलंड' (नॉर्थलंडची तुतारी) हें अतिशय लोकप्रिय राष्ट्रीय काव्यांपैकीं एक आहे.

**डॉस-पॅसॉस, जॉन रॉडरीगो** (१८९६)—एक अमेरिकन कादंबरीकार. याचा जन्म शिकागो शहरांत झाला. याची 'मॅनहटन ट्रान्स्फर' (मॅनहटन बेटाचें हस्तांतर, १९२१) ही कादंबरी तत्कालीन अमेरिकन कादंबऱ्यांत सर्वोत्कृष्ट समजली जाते. याच्या सर्वांत उत्तम कादंबऱ्या म्हटल्या म्हणजे, त्यानें लिहिलेली कादंबरीत्रयी होय—१ 'यू. एस्. ए.'; २ 'फॉर्टी सेकंड पॅरलल'; व ३ 'दि बिग मनी'. यानें ऐतिहासिक कथानकें घेऊन त्यांचीं लहान लहान प्रकरणें करून त्यांचा उपयोग आपल्या कादंबऱ्यांत करण्याची नवीनच प्रथा पाडली. तसेंच त्यानें वर्तमानपत्रांतील मथळे आणि लोकांतील प्रचलित वाक्प्रचार विशिष्ट व्यक्तिचित्रें व प्रसिद्ध व्यक्तींच्या चरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टी या सर्वांचा आपल्या कथानकांमध्यें व मुख्य पात्रांमध्यें सर्रास उपयोग करण्याची नवीनच टूम काढली. 'अॅडव्हेंचर्स ऑफ ए यंग मॅन' (एका तरुणाचीं साहस कृत्यें, १९३९) या कादंबरींत मात्र त्यानें ही नवीन प्रथा सोडून जुन्या सनातन पद्धतीचाच अवलंब केलेला दिसतो.

**डासेंट, सर जॉर्ज वेब** (१८१७–१८९६)—हा आइस्लंडसंबंधीं संशोधक, विद्वान् व विविध विषयांवरचा एक लेखक आहे. त्याचे ग्रंथ आहेत त्यांत पुढील ग्रंथांचीं इंग्रजी भाषांतरें आहेत : 'दि प्रोज ऑर यंगर एड्डा', 'दि नोर्समेन इन् आइस्लंड', 'पॉप्युलर टेल्स फ्रॉम् दि नोर्स' (नोर्स लोकांचा मनोरंजक दंतकथासंग्रह), आणि 'टेल्स् फ्रॉम दि फेल्ड' (तसलाच दंतकथासंग्रह).

**डाहाणु**—मुंबई, ठाणें जिल्ह्याचा एक अगदीं उत्तरेकडचा तालुका. क्षे. फ. ६४४ चौ. मै. असून यांतच उंबरगांव पेट्याचा समावेश होतो. एकंदर खेडीं २१२ असून पैकीं डाहाणु हें मुख्य आहे. सर्व तालुकाभर कमीजास्त उंचीचे दाट जंगल असलेले डोंगर आहेत व त्यामुळें तालुक्यास विशेष रमणीय स्वरूप आलेलें आहे. तालुक्यांतील एकंदर हवा रोगट आहे, तरी समुद्रकिनाऱ्याची हवा चांगली आहे. लो. सं. सुमारें एक लक्ष आहे.

डाहाणु गांव मुंबईहून ७८ मैल आहे. नाशिकच्या लेण्यांत 'दाहानुका' हें नांव आहे. येथें असलेल्या 'नोसा सेनहोरा डॉस ऑगस्टस' मूर्तीबद्दल त्या गांवची ख्याति आहे. डाहाणु नदीच्या उत्तर तीरावर एक लहानसा किल्ला आहे. याच्या भिंती ३० फूट उंच व १० फूट रुंद आहेत. हा किल्ला बहुधा पोर्तुगीजांनीं बांधला असावा. १७३९ त हा मराठ्यांकडे आला. ह्या बंदरांतून बराच लांकूड-फांटा बाहेर जातो.

**डाळ**—शिंबी वर्गांतील झाडांच्या बियांपासून डाळी तयार होतात. त्याप्रमाणेंच घेवडा, वाटाणा, मसुरा, वगैरेपासूनहि डाळी तयार होतात. या सर्व डाळी पौष्टिक असून अन्न म्हणून

त्यांचा महत्त्वाचा व फार मोठ्या प्रमाणावर उपयोग होतो. तूर (अरहर), हरभरा (चणा), लाख (लांग), वाल, पावटा, कुळीथ (हुलगा), मूग, उडीद, मसूर, मटकी, गवारी, वाटाणा, वगैरे कडदण किंवा डाळींचीं धान्यें होत. कडधान्यें पाहा.

**डाळिंब**—[लॅ. प्युनिका ग्रानाटम]. हें एक क्षुद्रप असून तें दाट वाढतें. याची उंची ८ ते २० फुटांपर्यंत भरते. याचीं पानें गुळगुळीत असून फुलें मोठीं व लाल असतात. फळ नारिंगाएवढें असतें. फळावर एक कठिण साल असते आणि आंत दाणे असतात व त्यांत बिया असतात. डाळिंबाचे दाणे किंचित् लांबट व तुरट लागतात. दक्षिण युरोपांत याची लागवड सर्वत्र मोठ्या प्रमाणावर होते.

डाळिंबीची लागवड फार प्राचीन काळापासून होत आहे. होमरच्या ओडिसी ग्रंथांत याचा उल्लेख आहे. ग्रीक व रोमन लोकांना डाळिंबाच्या सालीचा उपयोग माहीत होता. डाळिंबाचा उल्लेख शुक्रनीतींत आहे. हें फळ इतकें प्राचीन असल्यामुळे याचें मूलस्थान कोणतें हें खात्रीनें सांगतां येत नाहीं. तरी तें इराण किंवा अफगाणिस्तान असावें. अफगाणिस्तानांत कंदाहार येथें उत्तम डाळिंबें होतात. वायव्येकडील प्रांतांतील पेशावर येथून वर्षास ३७ हजार मणांपेक्षां अधिक डाळिंबें इतर प्रांतांत रवाना होत असत. सिंध प्रांतांत हैद्राबाद, खैरपूर, सक्कर व कराची या ठिकाणीं डाळिंबाची लागवड बरीच होते. गुजराथेंत काठेवाड, अहमदाबाद, धोलका, महाराष्ट्रांत पुणें, नगर, सातारा या जिल्ह्यांत डाळिंबाची लागवड बरीच होते.

डाळिंबाच्या तीन जाती आहेत: तांबडी, पांढरी व काळी. तांबडी अगर लाल जात पुणें नगर, सातारा, वगैरे भागांत होते. पांढरी जात अहमदाबाद, धोलका, वगैरे ठिकाणीं होते. काळी जात उत्तर हिंदुस्थानांत होते.

डाळिंबाच्या रसाचा औषधासाठीं लेह करतात. फळाच्या सालीचा उपयोग बाळंतकडूंत व काढ्यांत घालण्यासाठीं करतात. मुळाची व खोडाची साल कातडीं कमावण्यासाठीं उपयोगी पडते.

**डि ॲलेंबर्ट** (१७१७–१७८३)—एक प्रसिद्ध फ्रेंच तत्त्वज्ञ व गणितशास्त्रज्ञ. जिआन ल रॉंड नामक, चर्चेनजीक रस्त्यांत आढळलेलें, अज्ञातपितृक असें हें बालक रूसो नांवाच्या बाईनें जतन केलें. स. १७३० त याचा मॅझॅरिन कॉलेजांत प्रवेश झाला व त्या ठिकाणीं त्याची गणिताबद्दल फार वाहवा झाली. तो १७३८ सालीं ॲडव्होकेट झाला, पण त्याची गणिताची आवड वाढतच होती. १७४१ सालीं तो ॲकॅडेमी ऑफ सायन्स नामक संस्थेचा सदस्य झाला. व त्यामुळें त्याचा लौकिक वाढूं लागला. भौतिकशास्त्रासंबंधीं त्यानें अनेक शोध लाविले. फ्रेडरिक दि ग्रेटनें त्यास बर्लिनमध्यें राहावयास बोलाविलें. बर्लिनच्या विद्यापीठानें त्यास अध्यक्षपद देऊं केलें होतें, पण त्यानें तें स्वीकारलें नाहीं. सं. १७४१ ते १७५४ पर्यंतचा काळ त्यानें नवीन शोध लावण्यांत व त्यासंबंधीं ग्रंथ लिहिण्यांत घालविला. स. १७५९ मध्यें त्याचा तत्त्वज्ञानासंबंधीं ग्रंथ प्रसिद्ध झाला. स. १७७९ मध्यें त्यानें संगीतकलेसंबंधींहि एक पुस्तक लिहिलें. त्याचा स्वभाव स्वतंत्र बाण्याचा व निरपेक्ष होता. स. १७६२ त त्यास रशियाच्या कॅथेराइन राणीचें बोलावणें आलें होतें, परंतु त्यानें तेंहि नाकारलें. ॲलेंबर्टचें खाजगी वर्तन साधें होतें. त्याचा परोपकारी व स्वतंत्र असा स्वभाव होता. प्रेमाच्या बाबतींत ॲलेंबर्टची पूर्ण निराशा झाली होती. तथापि त्यानें आपला विद्याव्यासंग सोडला नाहीं. त्याच्या शास्त्रीय ग्रंथाचे आठ विभाग झाले असून वाङ्मय व तत्त्वज्ञान यासंबंधीं त्याचे ग्रंथ १८ विभागांत प्रसिद्ध झाले आहेत. पहिल्या सुप्रसिद्ध फ्रेंच ज्ञानकोशाचा हा एक संपादक होता.

**डिंक**— कांहीं झाडांच्या सालीच्या निर्यासापासून डिंक मिळतो. कांहीं डिंक–उदाहरणार्थ, अरबी गोंद–हे पाण्यांत चांगले विरघळतात तर कांहीं अर्धवट विरघळतात (उदा., ट्रागाकॅंथ–मेंढशिंगी); पण त्यांस मद्यार्कामध्यें घातलें असतां ते पूर्ण विरघळतात. राळ (गम्‌रेझीन) विरघळण्यास पाणी व मद्यार्क लागतो. राळ व डिंक हे याप्रमाणें भिन्न पदार्थ आहेत. यांस स्वाभाविक रंग नसतो व बहुतेक बेचव असतात.

डिंक बाभळीचा—(गम् अरेबिक). हा बाभूळ जातीच्या अनेक झाडांपासून निघतो. हा आपोआप झाडाच्या सालीच्या बाहेर येतो. याचा उपयोग कापडास तकाकी आणण्याकरितां करण्यांत येतो; तसेंच चिटें छापतांना रंग घट्ट करण्याकरितां वापरतात. औषधें तयार करतांनाहि या डिंकाचा उपयोग करण्यांत येतो. तसेंच सिमेंट, शाई, खडूच्या रंगाच्या कांड्या, जलरंगाच्या वड्या, वगैरे अनेक वस्तू तयार करण्याच्या कामांत डिंकाचा उपयोग करण्यांत येतो.

खैराचा डिंक पौष्टिक असून त्याचे लाडू करून खातात.

**डिकन्स, चार्लस** (१८१२–१८७०)— एक प्रसिद्ध इंग्रज कादंबरीकार. लहानपणीं त्याचें बहुतेक शिक्षण घरींच आईच्या देखरेखीखालीं झालें. त्याचें बालपण बहुतेक केंटमध्येंच गेल्यामुळे त्या स्थलाचा त्याला मोठा अभिमान असे व तें त्यानें लिहिलेल्या 'ग्रेट एक्स्पेक्टेशन्स' या पुस्तकावरून स्पष्ट होतें. सांपत्तिक स्थिति चांगली नसल्यामुळें डिकन्सला अगदीं बालवयांतच नोकरी करावी लागली व बऱ्याच अडचणी सोसाव्या लागल्या. परंतु त्यानें पुढें लिहिलेल्या पुस्तकांना या वेळचा अनुभव फार उपयोगी पडला. लवकरच लघुलेखनकला शिकून तो बऱ्याच

मासिकांचा बातमीदार झाला. व या संधीचा फायदा घेऊन स्वतःचे लेख मासिकांतून लिहिण्यास त्यानें प्रारंभ केला. १८३७ सालीं 'पिक्‌विक्‌ पेपर्स' प्रसिद्ध केलें. या पुस्तकानें डिकन्सचें नांव जगप्रसिद्ध झालें आहे.

त्याचे लेख स्वाभिमानाची व नागरिकत्वाची जाणीव करून देत. लोकांना काय पाहिजे आहे तें जाणण्याची कला त्याला चांगली अवगत होती व हेंच त्याच्या लोकप्रियतेचें मूळ कारण होय. त्याची निरीक्षणशक्ति फार दांडगी असे. डिकन्सचीं कथानकें जरा भानगडीचीं असल्यामुळें समजण्यास कठिण जातात. तरी तत्कालीन स्थिति वर्णन करण्यांत त्याचा हातखंडा असल्यामुळें त्याच्या पुस्तकांतील गोडी कधींहि नाहींशी होणार नाहीं. त्यानें लिहिलेल्या पुस्तकांपैकीं 'डेव्हिड कॉपरफील्ड', 'निकोलस निकोलबी' व 'ओल्ड क्युरिऑसिटी शॉप' हीं बरींच लोकप्रिय आहेत.

**डिकेमाली**—या झाडास संस्कृतमध्यें हिंगुफल, मराठींत डिकेमाली अशीं नांवें आहेत. हीं झाडें मोठालीं होतात. तीं बहुधा डोंगराळ प्रदेशांत सांपडतात. कोंकणांत व देशावर हे वृक्ष पुष्कळ आढळतात. ह्या झाडांच्या डेखांतून हिंवाळ्यांत हिरवट पिंवळा चीक निघतो, त्यासच डिकेमाली म्हणतात. फळांचें लोणचें होतें. जंगली लोक चिकाच्या वड्या करून विकतात व त्या करतांना त्यांत डेखांचीहि भेसळ करतात. डिकेमाली तिखट, उष्ण व अग्निदीपक असून कफ, वायु, मलबंध व आम यांचा नाश करते. जंतावर डिकेमालीचें चूर्ण साखरेंतून देतात. डब्याच्या रोगावर डिकेमाली व काळाबोळ मुलांना पाजतात.

**डिकेन्सि, थॉमस** (१७८५–१८५८)—एक इंग्रज निबंधलेखक. हा लहानपणापासून लाजाळू, कोंवळया मनाचा, हुषार व कल्पक असे. वयाच्या १५ व्या वर्षापूर्वीच फार परिश्रम घेऊन त्यानें ग्रीक भाषेंत बरेंच प्रावीण्य मिळविलें. परंतु वडील माणसांची शिक्षणपद्धति त्याला नापसंत असल्यामुळें त्यानें स. १८०२ मध्यें घरांतून पळ काढिला. पुढें लौकरच वडील माणसांचा व त्याचा सलोखा होऊन त्याला ऑक्सफोर्ड येथील विद्यालयांत पाठविण्यांत आलें. तेथें तो पांच वर्षें होता. व तेथें त्यानें जर्मन भाषेचा अभ्यास केला. या कालांत त्याची वर्ड्स्वर्थ, लँब, हॅझलिट, वगैरे विद्वानांशीं ओळख झाली. विद्यालयांत असतांनाच मज्जातंतुव्यथा असल्या झाल्यामुळें त्याला अफू खाण्याची खोड लागली. विद्यार्थीदशा संपल्यावर सुमारें दीड वर्ष 'वेस्टमूरलंड गॅझेट'चा संपादक होता व पुढें तो कित्येक मासिकांतून आपले लेख प्रसिद्ध करीत असे. १८२२ त त्यानें 'कन्फेशन्स ऑफ ॲन इंग्लिश ओपिअम-ईटर,' (एका इंग्रज अफीणबाजाचा कबुलीजबाब) या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. या पुस्तकांत कल्पनासृष्टीचें चित्र फार चांगल्या तऱ्हेनें रेखाटलें गेल्यामुळें तें लवकरच लोकप्रिय झालें व लेखकाचा लौकिक दूरवर पसरला. या पुस्तकामुळें त्याचें नांव अजरामर झालें आहे. स. १८३७ त झालेल्या त्याच्या पत्नीच्या निधनापासून तो एके ठिकाणीं फार दिवस राहिला नाहीं. राहती खोली कागदांनीं भरली म्हणजे तो दुसरीकडे राहावयास जात असे. लेखन हें डिकेन्सीचें जीवनाचें साधन होतें. त्याची लेखनशैली मनोवृत्ति हालवून टाकणारी आहे. संगतवार वर्णन, क्वचित् स्थळीं करुण रस, सहानुभूति, विनोद, व व्याजोक्ति या गुणांमुळें ह्या ग्रंथकर्त्याचे लेख फारच लोकप्रिय झाले आहेत.

**डिक्सी, सर फ्रॅन्सिस बर्नार्ड** (१८५३–१९२८)—एक ब्रिटिश चित्रकार. त्यानें १८७६ सालीं ॲकेडमीच्या प्रदर्शनांत आपलीं चित्रें मांडलीं. त्याला १८८१ सालीं ए. आर्. ए. ही पदवी, आणि १८९१ सालीं आर्. ए. ही पदवी मिळाली. १९२४ सालीं तो रॉयल ॲकेडमीचा अध्यक्ष निवडला गेला; व १९२५ सालीं त्याला नाइट पदवी मिळाली. त्यानें पुष्कळ व्यक्तींचीं चित्रें काढलीं; 'हार्मनी,' 'टू क्राउन्स', 'दि पासिंग ऑफ आर्थर,' 'रोमिओ ॲड ज्यूलिएट', 'ला बेल दाम सां मर्सी', यांसारखीं त्याचीं चित्रें प्रसिद्ध आहेत.

**डिखळ**—(कॉन्क्रीशन). भूस्तरामध्यें कधीं कधीं सामान्यतः एखाद्या खडकामध्यें एखादा खनिज पदार्थ पूर्वीं वितळून राहिला असल्यास अगदीं गोलाकार पिंडासारखा एखादा गोळा बनून राहतो, त्यास डिखळ किंवा ढेप म्हणतात. अशीं डिखळें किंवा गोळे एखाद्या समपातळीमध्यें भूस्तर बनतांनाच बनून राहिलेले आढळतात, किंवा खडकामध्येंच लुकणासारखें द्रव्य एखाद्या ठिकाणीं जमून घट्ट होऊन बनलेले असतात. अशा वेळीं सामान्यतः चिखलासारखा पदार्थ वाहून जाऊन त्या जागीं लोह कर्बित किंवा लोह गंधकिद (आयर्न कार्बोनेट किंवा आयर्न सल्फाइड) यांचा गोळा येऊन बसतो. चुनखडीमध्यें मधून मधून गारा येऊन बसतात. अशा ठिकाणीं वरच्या पद्धतीनेंच डिखळें बनलेलीं असतात. कांहीं खाणींमध्यें अशीं लोहमय किंवा लोहाश्मीय, खटस्फुरित (कॅल्शियम फॉस्फेट), किंवा

इतर खनिजांचीं डिखळें बनलेलीं आढळतात व तीं काढण्याकरितां खाणी खोदण्यांत येतात.

**डिंगणकर, मोरो विश्वनाथ**—सागर (मध्यप्रांत)-कडील एक छोटासा जहागीरदार. गोंडवनांतील चौरागड येथील गोंड राजे गोवध करीत म्हणून या मोरोपंतानें त्यांच्यावर स्वारी करून चौरागड काबीज केला. दमोह येथील गोंड राज्यहि पंतानें जिंकलें. धाकट्या रघूजी भोंसल्यानें पंतास कळविलें कीं, तुमचा गढा प्रांत आम्हांस द्यावा नाहीं तर जबरीनें आम्ही घेऊं. परंतु पंत लढाईस तयार झाला. रघूजीचें सैन्य ४०-५० हजारांपर्यंत होतें व पंताजवळ सारे दोन हजार स्वार होते. पुढें पंतानें रात्रीं अचानक छापा घालून भोसल्याकडील विठ्ठलपंताचा तंबू गांठला व तंबूचें तणावे कापून भोसल्याचा दुय्यम सेनापति वेणीसिंग यास ठार मारिलें. तेव्हां विठ्ठलपंत व त्याची फौज पळून गेली. यानंतर थोड्याच दिवसांनीं मोरोपंत वारला.

**डिंगरी**—[ लॅटिन रॅफानस साटिव्हस ] मुळ्याची शेंग. थंडीत मुळ्याचे बुडखे लाविल्यास त्यास शेंगा येतात; त्यांस डिंगऱ्या म्हणतात. या भाजीचे गुणधर्म मुळ्याप्रमाणेंच आहेत.

**डिझरायली, आयझॅक** (१७६६–१८४८)— एक इंग्रज पंडित. त्याने पीटर पिंडर याला निनांवी उत्तर म्हणून 'ऑन दि अॅब्यूजं ऑफ सटायर' (उपहासाचा दुरुपयोग) या नांवाचा एक निबंध लिहिला. नंतर त्याचा 'क्युरिऑसिटीज ऑफ लिटरेचर' (वाङ्मयांतील वैचित्र्यें) हा ग्रंथ १७९१–१७९३ या दरम्यान् प्रसिद्ध झाला. त्याचे वाङ्मयलेखनविषयक ग्रंथ— 'एसे ऑन दि लिटररी कॅरॅक्टर' (साहित्यिक निबंध), 'कॅलॅमिटीज ऑफ ऑथर्स' (ग्रंथकारांचीं संकटें), 'क्वॉरल्स ऑफ ऑथर्स' (ग्रंथकारांचीं भांडणें) यांसारखे आहेत. १८४१ मध्यें त्यानें 'अॅमेनिटीज ऑफ लिटरेचर' (साहित्यांतील रम्य स्थळें) हें पुस्तक प्रसिद्ध केलें.

**डिझरायली, बेंजामिन**—लॉर्ड बीकन्सफील्ड पाहा.

**डिडेरो, डेनिस** (१७१३–१७८४)—हा फ्रेंच ग्रंथकार व फ्रेंच ज्ञानकोशाचा संपादक म्हणून प्रसिद्ध आहे. हा कॅथोलिक धर्माचा शत्रु होता. बापाच्या इच्छेविरुद्ध त्यानें पुस्तकें विकण्याचें दुकान काढलें. त्याला कौटुंबिक सुख मुळींच मिळाले नाहीं. हा जरी मोठा ग्रंथकार नव्हता तरी हा कल्पनाप्रचुर, सूचक व धाष्टर्यवान् असा लेखक होता. प्रारंभीं त्यानें परकीय पुस्तकांचीं फ्रेंच भाषेत भाषांतरें करण्यास सुरुवात केली. नंतर वेदांतविषयक पुस्तकें लिहिण्यास प्रारंभ केला. त्याची विचारसरणी सरकारला पसंत न पडल्याकारणानें त्याला कैदेंत जावें लागलें. कैदेंतून सुटका झाल्यावर त्यानें फ्रेंच भाषेंत ज्ञानकोश लिहिण्याचें ठरविलें. हें कार्य करीत असतांना त्याला अनेक अडथळे आले. जरी कित्येक निराशाजनक प्रसंग ओढवले तरी त्यानें सतत बावीस वर्षें अविरत परिश्रम करून अंगीकृत कार्य तडीस नेलें. जरी हा अत्यंत नांवाजलेला लेखक होता तरी गरीबच होता. याचें कारण समाजाच्या विरुद्ध त्याची मतें होतीं. त्याला शेवटीं आपलें पुस्तकालय महाराज्ञी कॅथेराइन हिला विकावें लागलें.

**डिपेल तेल**—प्राण्यांचीं शिंगें, हस्तिदंत, रक्त, वगैरे प्राणिज द्रव्यांपासून विनाशक ऊर्ध्वपातनक्रियेनें हें औषधी तेल काढण्यांत येतें. हें तेल प्रथम डिपेल नांवाच्या एका जर्मन किमयागारानें शुद्ध केलें. मागें याचा बराच उपयोग घाम येण्याकरितां आणि झोंप येण्याकरितां करण्यांत येई.

**डिफो, डॅनिअल** (सु. १६५९–१७३१) —एक प्रसिद्ध इंग्रज लेखक. याचा बाप खाटकाचा धंदा करीत असे. डॅनियललाहि उदरभरणार्थ अनेक प्रकारचे धंदे करावे लागले. व शेवटीं तो साहित्याच्या मागें लागला. तिसऱ्या विल्यमच्या मेहेरनजरेनें डिफोच्या आयुष्यास थोडे चांगले दिवस लाभले व तो जनतेसमोर आला. पण विल्यमच्या मृत्यूनंतर त्याच्या हालअपेष्टांस पुनः सुरुवात झाली.

तो कट्टर व्हिग व डिसेंटर होता. त्यानें 'शॉर्टेस्ट वे विथ दि डिसेंटर्स' हें खळबळ उडवून देणारें पुस्तक लिहून अॅन राणीचा रोष ओढवून घेतला. त्याच्यावर खटला भरण्यांत येऊन १७०३ सालीं त्याला शिक्षाहि झाली. या शिक्षेमुळें त्याचा फायदाच झाला. रॉबर्ट हार्ले या विख्यात इंग्लिश मुत्सद्याच्या मध्यस्थीनें त्याची सुटका झाली व त्यामुळें त्यास लोकप्रियताहि मिळाली. सुटका झाल्यावर त्यानें 'रिव्ह्यू' नांवाचें एक साप्ताहिक सुरू केलें. यापुढील डिफोचा बहुतेक सर्व काळ लेखनांतच गेला. याचीं महत्त्वाचीं पुस्तकें पुढीलप्रमाणें आहेतः—

'ट्रू बॉर्न इंग्लिशमन' (खरा इंग्रज), 'रॉबिन्सन् क्रूसो', 'एव्हरी बडीज बिझिनेस इज नोबडीज बिझिनेस (प्रत्येकाचें काम म्हणजे कोणाचेंच काम नव्हे), 'पोलिटिकल हिस्टरी ऑफ डेव्हिल' (सैतानाचा राजकीय इतिहास), 'अॅपरिशन ऑफ मिसेस व्हिल', 'ज्युरे डिव्हिनो', इ.. या पुस्तकांपैकीं रॉबिन्सन क्रूसोनें डिफोची कीर्ति अजरामर करून सोडली आहे. डिफोची

भाषा साधी, प्रासादिक व अत्यंत ओघवती होती. उपहासात्मक लेख लिहिण्यांतहि त्यानें चांगलेंच प्रावीण्य मिळविलें होतें.

**डि बॉइने**— शिंद्यांच्या पदरचा एक फ्रेंच सेनापति. हा जातीचा फ्रेंच होता. हा प्रथमतः फ्रान्सच्या सैन्यांत निशाण-बारदार होता. परंतु येथें बढतीची कांहीं आशा नाहीं असें पाहून तो रशियाला गेला. तेथून तो ग्रीसला गेला व पुढें तो हिंदुस्थानांत आला. मद्रासला त्याला त्या इलाख्यांतील हिंदी शिपायांच्या ६ व्या पलटणींत अधिकाराची जागा मिळाली. यानंतर एका अॅड्ज्युटंटच्या जागेवर आपला हक्क असतां ती अन्यायानें दुसऱ्यास दिली गेली असें पाहून त्यानें रशियास जाण्याच्या उद्देशानें कंपनीच्या नोकरीचा राजीनामा दिला. याच सुमारास शिंद्यांस बुंदेलखंडावर स्वारी करावयाची आहे असें समजल्यावरून डी बॉइननें शिंद्यांस अर्ज करून त्यांच्याकडून साडेआठशेंची एकेक अशा दोन पलटणी उभारण्याची परवानगी मिळविली. त्यानें शक्य तों इंग्लिश पद्धतीवर आपल्या पलटणी उभ्या केल्या, व भेदाभेद न करतां सर्व राष्ट्रांचे युरोपियन अधिकारी त्यांत नेमले. यानंतर बुंदेलखंड, जयपूर, वगैरेकडील मोहिमांत डी बॉइनेच्या पलटणी गेल्या होत्या (१७८५-८६).

गुलामकादर व इस्मायलबेग यांनीं दिलेला आग्र्याचा वेढा उठविण्याकरितां महादजीनें डि बॉइनेच्या दोन पलटणी राणे-खानाबरोबर पाठविल्या (१७८८). या लढाईंत डि बॉइनेच्या पलटणींनीं जी निकराची व जें धैर्य दाखविलें तें वाखाणण्यासारखें होतें.

इ. स. १७९० च्या आरंभीं डि बॉइनेच्या हाताखालीं सात-सातशें शिपायांची एक पलटण अशा आठ पलटणींचें एक ब्रिगेड होतें. त्यांत महादजीनें भर घालून शेवटीं त्याच्या तीन ब्रिगेड केल्या. त्याचा तोफखानाहि वाढतां वाढतां शेवटीं त्यांत एकंदर दोनशेंवर तोफा झाल्या होत्या. डि बॉइनेचा पगार शेवटीं दरमहा १०,००० रुपयांपर्यंत वाढविण्यांत आला होता. याशिवाय त्याच्या पायदळाच्या व तोफखान्याच्या खर्चा-करितां कांहीं जमिनी लावून दिल्या असून त्याच्या ऐन वसुलावर शें. दोन टक्के नफा घेण्याची त्यास परवानगी देण्यांत आली होती.

सन १७९२ मध्यें त्याच्या हाताखालीं कवायती पायदळ १८,००० व करोलस्वार ६०० असून शिवाय बिनकवायती प्यादे ६,०००, स्वार २,०००, व २०० वर तोफा होत्या व आग्र्याचा किल्लाहि ताब्यांत होता. या लष्कराचा खर्च चालविण्याकरितां दोआबांतील २२ लाख ऐन वसुलाचे जिल्हे त्याच्या स्वाधीन करण्यांत आले होते. या सालीं होळकर व शिंदे यांच्या सैन्यांत अजमेरजवळ लखेरी येथें जी लढाई झाली तींत हा हजर होता. पुढें खर्डें येथें मराठ्यांची निजामअल्लीबरोबर जी लढाई झाली तींतहि हा १०,००० कवायती पायदळासह हजर होता (१७९५).

पुढल्या वर्षी प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें हा शिंद्यांची नोकरी सोडून युरोपमध्यें परत गेला. डि बॉइने हा धाडशी होता तरी समजूतदार व दूरदर्शीहि होता.

**डिमॉर्गन, ऑगस्टस** (१८०६-१८७१)— एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ आणि तर्कशास्त्रज्ञ. तो लंडन युनिव्हर्सिटींत गणितशास्त्रज्ञाचा प्रोफेसर ३० वर्षांहून अधिक काल होता. त्याचे पुष्कळ ग्रंथ आहेत, त्यांपैकीं प्रसिद्ध आहेत ते— 'एलेमेन्ट्स ऑफ ॲरिथमेटिक, आल्जिब्रा ॲंड ट्रिगॉमेट्री' (अंकगणित, बीजगणित आणि त्रिकोणामिति यांचीं मूलतत्त्वें), 'एसे ऑन प्रॉबॅबिलिटीज् अॅन्ड ऑन देअर ॲप्लिकेशन टु लाइफ कॉंटिन्जेन्सीज्,' (संभव आणि जीवनांतील आकस्मिक गोष्टींकडे त्यांचा विनियोग), आणि 'फॉर्मल लॉजिक' 'बजेट ऑफ पॅरॅडॉक्सेस.' या शेवटच्या ग्रंथांत त्यानें 'सर्कल स्क्वेअर्स' (वर्तुल समचतुष्कोण) आणि 'परपेच्युअल मोशनिस्ट्स' (निरं-तरगामी) या कल्पनांची मनोरंजक माहिती देऊन त्यांवर टीका केली आहे.

**डिमॉर्गन, विल्यम फ्रेंड** (१८३९-१९१७)— हा इंग्रज कादंबरीकार वरील विद्वानाचा मुलगा होय. त्यानें कादंबरी-लेखनाला १९०५ सालीं सुरुवात केली, आणि अनेक कादंबऱ्या लिहिल्या. त्यांपैकीं 'जोसेफ व्हॅन्स', 'ॲलीस-फॉर-शॉर्ट', 'समहाउ गुड', 'इट नेव्हर कॅन हॅपन अगेन', व्हेन घोस्ट मीट्स घोस्ट', इ. चांगल्या कादंबऱ्या आहेत.

**डिलन, जॉन** (१८५१-१९२७)—एक आयरिश राज-कारणी व चळवळ्या. १९१८ सालीं जॉन रेडमंड वारल्यावर डिलनला आयरिश राष्ट्रीय पक्षाचा अध्यक्ष निवडण्यांत आलें. पुढें सिनफीन पक्षाच्या उदयामुळें व या दोन पक्षांतला फरक नाममात्र असल्यामुळें त्याचा पक्ष दुर्बळ झाला. डिलनचा भाऊ एमिल जोसेफ याची वृत्तपत्रांचा परदेशचा बातमीदार म्हणून मोठी कीर्ति आहे.

**डि ला मेर, वॉल्टर** (१८७३- )—एक इंग्रज कवि आणि गद्यलेखक. त्याचे 'दि रिटर्न' (कादंबरी), 'दि लिस-नर्स', 'कम हिदर', 'हेन्री ब्रॉकेन', 'मेमॉयर्स ऑफ ए मिड्जेट', 'कानोसर', इ. ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**डिलावेर**—अमेरिका, संयुक्त संस्थानांतील ॲटलांटिक महासागराकांठचें पूर्वेकडचें एक संस्थान. हें आद्य (तेरा) संस्थानांतील एक आहे, पण हें सर्वांत लहान संस्थान आहे. जास्तींत जास्त रुंदी ३५ मैल व लांबी ११० मैल. क्षेत्रफळ २,०५७

चौ. मै. व लोकसंख्या २,६६,५०५. डोव्हर हें मुख्य ठिकाण. बागाइतीचा मुख्य धंदा आहे. व्यापार उत्तरेकडील संस्थानांशीं चालतो. विल्मिंग्टन हे कारखान्यांचे व उद्योगधंद्यांचें केंद्र आहे. लोखंडी व पोलादी माल, स्फोटक द्रव्यें, कातडी काम, कागद, कणीक, वगैरेचें उत्पादन होतें. न्यू यॉर्क येथें संस्थानचें विद्यापीठ आहे.

१७ व्या शतकांत डच व स्वीडिश वसाहतवाल्यांनीं हें संस्थान वसविलें. १७७४ मध्यें ॲमस्टरडामबरोबर तें इंग्रजांकडे आलें. सन १६८२ ते १७७६ या कालांत ते पेन्सिल्व्हेनिया कॉलनीचा एक भाग होतें.

**डिवार, सर जेम्स** ( १८४२–१९२३ )—एक विख्यात रसायनशास्त्रज्ञ. ह्याला लंडन रॉयल इन्स्टिटयूटमध्ये रसायनशास्त्राचा मुख्य अध्यापक १८७७ सालीं नेमलें. ह्यानें रसायनशास्त्रांत पुष्कळ संशोधन केलें. हा मुख्यतः अनेक वायू द्रवरूपांत आणल्याबद्दल प्रसिद्ध आहे. ह्यानें मुद्दाम बनविलेल्या उपकरणांच्या साह्यानें प्राणवायु द्रवरूपांत आणला व तो सांचवून ठेवण्याकरितां भांडे तयार केलें व त्यांत तो ठेवतां येऊं लागला. कांहीं दिवसांनीं त्यानें उज्जवायु देखील तसाच द्रवरूपांत आणतां येतो हें प्रयोगानें सिद्ध केलें व त्याकरितां एक नवीन मोठें यंत्रहि बनविलें. यानें थर्मास बरण्यांच्या उपयोगास आरंभ करून दिला.

**डिवेट, ख्रिश्चन रुडोल्फ** ( १८५४–१९२२ )—हा बोअर सैन्याचा जनरल होता. यानें द. आफ्रिकन युद्धांत प्रथम नाताळमध्यें सैन्याच्या कमांडरचें काम केलें, आणि नंतर पश्चिमेकडील प्रदेशांत क्रोन्जे याच्या हाताखालीं काम केलें. १९०० च्या मार्चनंतर त्यानें ब्रिटिश वाहतुकीच्या मार्गांवर हल्ले करून आणि स्वतः मोठ्या शिताफीनें कैद होण्याचा प्रसंग टाळून मोठी प्रसिद्धि मिळविली. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर द. आफ्रिकेंत बंड झालें, त्यांत तो सामील झाला, पण १९१४ डिसेंबर ता. १ रोजीं त्याला वॉटरबर्ग येथें कैद करण्यांत आलें आणि ६ वर्षें कैद आणि २,०००पौंड दंड अशी शिक्षा देण्यांत आली.

**डि व्हॅलेरा, ईमॉन** ( १८८२– )—आयरिश स्वातंत्र्याचा जनक व आयरिश रिपब्लिकन पक्षाचा महान् पुढारी. त्याचे पूर्वज स्पॅनिश वंशाचे होते. तो एका स्पॅनिश चित्रकाराचा मुलगा असून त्याच्या बापानें कॅथराइन कोल या नांवाच्या आयरिश स्त्रीबरोबर विवाह केला होता. डि व्हॅलेराचें शिक्षण चार्लव्हिले येथें ख्रिश्चन ब्रदर्स स्कूलमध्यें आणि ब्लॅकरॉक कॉलेजमध्यें झालें. तो बी. ए., बी. एस्सी. पदवीधर झाला. त्यानें १९१६ च्या आयरिश सिनफीन बंडांत बंडखोरांचा पुढारी होऊन प्रत्यक्ष बंडांत भाग घेतला म्हणून त्याला फांशीची शिक्षा सांगण्यांत आली. पुढें सदर बंडखोरांना सार्वत्रिक माफी देण्यांत आली त्या वेळीं त्याची फांशीची शिक्षाहि माफ करण्यांत आली. पण पुन्हां लवकरच त्याला तुरुंगांत टाकण्यांत आलें. लिंकन जेलमध्यें कैदेंत असतां तो १९१९ सालीं तुरुंगांतून पळून गेला. तो सिनफीन पार्लमेंटचा सभासद १९१७–१९ पर्यंत ईस्ट क्लेअरतर्फे, आणि १९१९–२२ पर्यंत ईस्ट मेयोतर्फे होता. १९१७–१९२६ पर्यंत तो सिनफीन पक्षाचा अध्यक्ष होता. १९१९–२२ आणि १९३२–३७ पर्यंत तो आयरिश फ्री स्टेटचा अध्यक्ष होता. तसेंच आयर्लंडच्या नॅशनल युनिव्हर्सिटीचा तो कुलपति (चॅन्सलर) होता. १९३७ सालीं तो आयरिश फ्री स्टेटच्या अध्यक्षाच्या जागीं पुन्हां निवडून आला, परंतु १९३८ सालीं त्याच्या जागीं डॉ. हाइड अध्यक्ष झाला आणि डि व्हॅलेरा मुख्य प्रधान झाला. दुसऱ्या महायुद्धांत त्यानें आपला देश तटस्थ ठेवला व हळूहळू ब्रिटिश साम्राज्यांतून बाहेर पडण्याची त्यानें खटपट चालविली. १९४३ व १९४४ जूनमध्यें तो पुन्हां मुख्य प्रधान या पदावर निवडून आला. या पदावर तो १९४८ पर्यंत होता. आधुनिक कालांत स्वातंत्र्य-संग्रामांतील एक यशस्वी वीर व अत्यंत धडाडीचा राजकारणी पुरुष म्हणून डि व्हॅलेराचें नांव सर्वांच्या स्मरणांत राहील.

**डी, जॉन** ( १५२७–१६०८ )—एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ, किमयाशास्त्रज्ञ आणि ज्योतिषशास्त्रज्ञ. त्यानें १५८१ मध्यें केली नांवाचा एक इसम बरोबर घेऊन युरोप खंडांतील अनेक देशांच्या राजदरबारांना भेटी दिल्या. हा, मी भुतेंखेतें नाहींशीं करतों, असें सांगत फिरे. १५९५ सालीं एलिझाबेथ राणीनें त्याला मँचेस्टर कॉलेजचा वॉर्डन नेमलें. त्यानें बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांत कांहीं शास्त्रीय स्वरूपाचीं आणि कांहीं गूढविद्या व भुताखेतांची मंत्रविद्या, यांविषयींचीं आहेत.

**डी. डी. टी.**—एक कीटकनाशक. संपूर्ण नांव डायक्लोरो डायफेनिल ट्रायक्लोरोइथेन. या कीटकनाशकाची माहिति झीडर या शास्त्रज्ञास इ. स. १८७४ मध्येंच झाली होती. तथापि त्याच्या गुणधर्मांकडे पूर्ण लक्ष गेल्या महायुद्धांत गेलें. त्या वेळीं रोगवाहक उवांचा नाश करण्याची फार आवश्यकता होती. याचा माणसांवर दुष्परिणाम होत नाहीं. कीटकांच्या शरीरास या रासायनिक द्रव्याचा स्पर्श होतांच, त्यांना निश्चित मृत्यु येतो; वेळ कमीजास्ती लागतो इतकेंच. डांसांची उत्पत्ति ज्या ठिकाणीं होते तेथें वरून डी. डी. टी.चे फवारे सोडतात.

**डी. एफ्. डी. टी.**—डी. डी. टी. च्या जातीचें पण त्याच्यापेक्षां प्रभावी असें कीटकनाशक. याचें संपूर्ण नांव डायफ्लोरो डायफेनिल ट्रायक्लोरोइथेन. डी. डी. टी. मध्यें क्लोरीनचे पांच अणु असतात. क्लोरीनपेक्षां त्याच रासायनिक कुटुंबांतील फ्लुरीन अधिक

प्रभावी. या फ्लूरीन (फ्लोरीन) चे दोन अणू त्या पांचांतील दोन क्लोरीन अणूंच्याऐवजीं असले कीं हें नवें औषध झालें. गेल्या महायुद्धांत जर्मन संशोधकांचे जे कागदपत्र जप्त करण्यांत आले, त्यावरून हें औषध शोधण्यांत आलें आहे.

**डीग**—राजपुतान्यांतील भरतपुर संस्थानामध्यें डीग तह-शिलीचें व निझामतीचें मुख्य ठिकाण. हें भरतपुरच्या उत्तरेस २० मैल आहे. गांवाभोंवतीं तट आहे. या गांवाचें पुरातन नांव दीर्घ होतें असें म्हणतात किंवा दुर्गपुर देखील म्हणत असावेत. इ. स. च्या १८ व्या शतकाच्या सुरवातीस जाट लोकांच्या ताब्यांत हें गेलें. त्यांच्याजवळून १७७६ सालीं नजफखानानें घेतलें व नंतर तें भरतपूरच्या रणजितसिंग महा-राजास परत देण्यांत आलें. १८०४ सालीं जनरल फ्रेझरनें येथें होळकरांचा पराभव केला. नंतर तो किल्ला जाट लोकांस परत देण्यांत आला. येथें सुरजमल्लनें बांधलेले मोठमोठे वाडे आहेत. नंदभवनांत लांकडावरचें उत्तमपैकीं नकशीकाम आहे.

**डीझ, फ्रेडरिश खिश्चन** (१८९४–१८६६)—एक जर्मन भाषाशास्त्रज्ञ. यानें लॅटिन भाषावंशासंबंधीं एक महत्त्वाचा ग्रंथ लिहिला. याच्या जोडीला ग्रिम या पंडितानेंहि जर्मन भाषा-वंशासंबंधीं एक ग्रंथ लिहिला आहे. या दोन्ही विद्वानांचे ग्रंथ भाषाशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत.

**डीझेल, रुडोल्फ** (१८५८–१९१३)—एक जर्मन शास्त्र-संशोधक. त्याचें कांहीं शिक्षण इंग्लंडांत झालें. डीझेल एंजिनचा मूळ यंत्रसंशोधक हाच होय. १८९९ मध्यें त्यानें आपला क्रांति-कारक शोध पुढें मांडला व 'अंतःस्फोट' (इन्टर्नल एक्स-प्लोझन) एंजिनापेक्षां चांगलीं असणारीं 'अंतर्ज्वलन' (इन्टर्नल कॉंबश्चन) एंजिनें तयार केलीं, हींच डीझेल एंजिनें होत. या एंजिनांत अशुद्ध रॉकेल (क्रूड ऑइल) वापरीत, पण डीझेलनें कोळसा-रॉकेलची उणीव भरून काढण्यासाठीं कोणतेंहि तेल वापरून शक्ति उत्पन्न करतां येतें, हें दाखवून दिलें. यामुळेंच आज शक्त्युत्पादक यंत्रांत डीझेल एंजिनचें नाव प्रथम घेण्यांत येतें.

**डुक्कर**—हा प्राणी सर्वभक्षक असून याच्या सर्व पायांस सारखीं बोटें असतात. हा रवंथ करीत नाहीं. याच्या खुरांस दोन गेळें असून हा सस्तन जातीचा प्राणी आहे. याच्या तोंडास सोंडेचा आकार असून ती लवचिक असते. त्यामुळें ती जमिनींत खुपसून वर उचलतां येते. या सोंडेच्या शेंवटीं दोन नाकपुड्या असतात. याच्या पायास चार बोटें असतात. परंतु शेवटचीं बोटें आंखूड असून तीं जमिनीस लागत नाहींत. हे प्राणी जुन्या जगांत सर्वत्र आढळतात, पण नव्या जगांत (अमेरिकेमध्यें) हे आढळत नाहींत. याच्या निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या जाती प्रसिद्ध आहेत. खेड्यांतून उकिरडे फुंकीत असणारीं गांवठी डुकरें रानडुकरांचीच अशक्त प्रजा असावी. हिंदुस्थानांत रान-डुकराची शिकार करतात व वराहास विष्णूच्या दशावतारांपैकीं

रानडुक्कर

एक अवतार मानतात. 'स्वर्गीतला वराह' असें रुद्राचे वर्णन आहे. वराहाची शिकार करतांना कुत्र्याचा उपयोग करण्याच्या चालीचा उल्लेख वैदिक वाङ्मयांत एकदां आलेला आहे.

सेलिबिस बेटांतील डुकराच्या अंगावर फारसे केंस नसून त्याचे सुळे बरेच लांब व वर वांकलेले असतात.

मुसलमानांना डुकराची फार चीड आहे, पण पाश्चात्य लोकांना डुकराचें मांस फार आवडतें.

**डुकराचे केंस**—कलाकौशल्यांत ज्या राठ व ताठर केंसांचा उपयोग करितात, ते डुकराचेच बळकट व जाड केंस असतात. डुकराच्या पाठीवर जे केंस असतात, तेच तेवढे हवे तितके बळकट व मोठ्या आकाराचे असतात. रशिया, पोलंड आणि त्यासभोंवतालचा प्रदेश यांतून लाखों रुपयांचे केंस दरसाल बाहेर जातात. या केंसांचा ब्रश व कुंचले करण्यास उपयोग होतो.

**डुक्करकंद**—ही एका जातीची वेल आहे. तीस संस्कृतमध्यें वाराही, ब्रह्मपुत्रिका, शबरकंद अशीं नांवें आहेत. ही वेल जमिनीवर पसरते. हिची उत्पत्ति बहुतेक सर्व मोठमोठ्या पर्वतांवर आपोआप होते. या वेलीस फुलांचे घोंस येतात, व हिचा कंद मुख्यत्वेंकरून फार उपयोगी आहे. कंदाचा आकार लांबट असून त्यावर डुकराप्रमाणें राठ केंस असतात. यावरून यास डुक्करकंद म्हणतात. हे कंद हात हात खोल जमिनींत सांपडतात. आर्यवैद्यकांत हा कंद फार महत्त्वाचा मानला जातो. क्रांडराच्या विषावर पाण्यांत उगाळून देतात.

**डुंगर**—काठेवाड, माहुवाच्या पश्चिमेस १३ मैलांवरील एक प्राचीन शहर. याचीं जुनीं नांवें दम्रापुरी अथवा दमरकोट अशीं आहेत. चावडा राजे येथें राज्य करीत होते असें कांहीं गाण्यां-वरून समजतें. जवळ गेरवा नांवाच्या टेकडींत रक्तलेहपरि-

आम्लजित सांपडतें. येथील व्यापारी सुखवस्तु व धाडशी असून ते धान्य, कापूस व इमारतीचें लांकूड यांचा व्यापार करतात. येथे मुख्यत्वेंकरून कापूस उत्तम जातीचा होतो व ऊंस मुबलक पिकतो. लो. सं. सुमारें तीन हजार.

**डुगाँग**—व्हेल माशासारखा हा सस्तन मत्स्य जातीचा वनस्पत्याहारी प्राणी आहे. हा हिंदी महासागर व ऑस्ट्रेलियन समुद्र यांत आढळतो. याची लांबी सामान्यतः ७ ते ८ फूट असते. परंतु केंव्हां केंव्हां २० फूट लांबहि आढळतो. हा समुद्रावरील झाडपाला खाऊन राहतो. याच्यापासून फारसें तेल निघत नाहीं. पण मलायी लोक याला मारून याचें मांस खातात.

**डुप्ले, जोसेफ** (स. १६९७–१७६३)—हिंदुस्थानांतील एक

फ्रेंच गव्हर्नर. त्याचा बाप प्रथम जकातदार होता. पुढें ईस्ट इंडिया कंपनीच्या तंबाखूच्या व्यापाराचा मक्तेदार बनला. जोसेफ हा १८ व्या वर्षी हिंदुस्थानांत येऊन राहिला. याला पुढें पाँडेचरीच्या कौन्सिलांत वरिष्ठ अधिकाराची जागा मिळाली. हिंदुस्थानांतील देशी राजकारणाचा अभ्यास करण्यांत यानें बराच वेळ घालविला. या वेळीं फ्रेंचांचा बंगालमधील व्यापार मंदावला होता. त्याकरितां यास चंद्रनगरच्या वखारीवर नेमलें. यानें तेथील व्यापार वाढवून पाटणा व कासीमबाजार येथें वखारी उघडल्या. स्वतः खाजगी व्यापार करून बराच पैसा मिळविला. याची राहणी साधी होती. यानें लांच देऊन पदवी मिळविण्याची खटपट केली, पण ती व्यर्थ गेली. पुढें याला गव्हर्नर नेमिलें. हा पाँडेचरीचा गव्हर्नर स. १७४२–१७५४ पर्यंत होता. चंदासाहेबानें पाँडेचरीच्या आसपासचीं ८० गांवें फ्रेंचांना देऊन खास डुप्ले यास कांहीं जहागीर दिली. अंबूरच्या लढाईत डुप्लेचा विजय झाला, यामुळें इंग्रजांचें धाबें दणाणलें. डुप्लेचा प्रतिस्पर्धी इंग्रज कंपनीचा क्लाइव्ह असून त्यानें डुप्लेचे हिंदुस्थानात फ्रेंच साम्राज्य स्थापण्याचे सर्व मनोरथ बुडविले. पुढें इंग्रजांचा सारखा विजय होत गेला. १७५४ त त्याला फ्रेंच सरकारनें परत बोलाविलें व त्याची मानहानि केली. हा थोर पुरुष हालअपेष्टेंत व दारिद्र्यांत वारला.

**डुरंड रेषा**—ही हिंदुस्थान आणि अफगाणिस्तान यांमधील सरहद्दीची आंतरराष्ट्रीय रेषा १८९३ मध्यें ठरविण्यांत आली. सर मॉर्टिमर डुरंड व अमीर अबदुर रहमन यांमध्यें झालेल्या करारान्वयें अफगाणिस्तानची दक्षिण आणि पूर्व हद्द निश्चित करण्यांत आली व हिंदुस्थान सरकारनें अमीराला द्यावयाची खंडणी पूर्वी आठ लक्ष रुपये होती ती बारा लक्ष करण्यांत आली. यामुळें अफगाणिस्तानची सरहद्द कुनार नदी खोऱ्यांतील चेंडकेपासून इराणच्या सीमेपर्यंत ठरली. मोहमंड प्रदेशाच्या सीमा या वेळीं ठरविण्यांत आल्या असतांहि पुढें त्यासंबंधीं वाद उपस्थित झालेच. आतां अफगाणिस्तान व पाकिस्तान यांमध्यें सरहद्दीसंबंधानें तंटे उपस्थित झाले आहेत.

**डुलांग** ( १७८५–१८३८ )— एक फ्रेंच पदार्थविज्ञानी व रसायनशास्त्रज्ञ. प्रथम तो पॅरिसच्या एका भागांत वैद्याचा धंदा करीत असे, परंतु लवकरच त्यानें तो धंदा सोडून शास्त्रीय शोधांकडे आपली दृष्टि वळविली. तो बर्थोलेच्या हाताखालीं कांहीं दिवस शिकला व मग अध्यापक झाला.

त्यानें प्रथम रसायनशास्त्रांत शोध सुरू केले. १८११ त नत्रहरिद त्यानें शोधून काढलें. १८१५ सालीं एकोल येथील अध्यापक अलेक्सिस थेरीसी पेटिट याच्या मदतीनें पाऱ्याचें उष्णमानमापक यंत्र व हवेचें उष्णमानमापक यंत्र यांची तुलना केली. १८१९ त पेटिट व डुलांग ह्यांनीं 'उष्णतेच्या कल्पनेविषयीं महत्त्वाचे मुद्दे' हा निबंध प्रसिद्ध केला. १८२० त बर्झेलियसबरोबर पाण्याच्या घटनेचें महत्त्व व स्थितिस्थापक द्रवपदार्थांचें विशिष्टगुरुत्व यांविषयीं शोध लावले. १८२६ मध्यें वायूंची प्रकाशवक्रीभवनाची शक्ति व १८२९ मध्यें वायूंचें विशिष्टगुरुत्व हें त्यानें ठरविलें. १८३० मध्यें त्यानें अॅरॅगोबरोबर प्रयोग करून "उष्णमान वाढलें असतां वाफेंत स्थितिस्थापकत्व येतें", हा शोध लाविला.

**डूइस्बर्ग**—जर्मनी, प्रशियांतील एक शहर. हें डूसेलडार्फपासून १५ मैलांवर आहे. येथें लोखंडी माल, एंजिनें, रासायनिक द्रव्यें, कापूस व लोंकरीचें कापड, इ. चे कारखाने आहेत. येथून ऱ्हाइन नदीपर्यंत कालवा असून त्यांतून वाहतूक चालते, त्यामुळें हें शहर व्यापाराचें मोठें केंद्र बनलें आहे. येथें १२ फूट खोलीचीं जहाजें येऊं शकतात, म्हणून ॲमस्टरडॅम व रॉटरडॅम यांकडून येथें जहाजें येतात. लो. सं. ४,३१,२५६.

**डून, ओलफ** ( १८७६–१९३९ )—एक अत्यंत मोठा नॉर्वेजियन साहित्यिक. भाषेवर त्याचें प्रभुत्व होतें व 'दि पीपल ऑफ ज्युव्हिक' या सहा कादंबऱ्यांच्या मालिकेंत त्यानें समाजाचा वन्य संस्कृतीपासून अर्वाचीन औद्योगिक कालापर्यंतचा इतिहास फार कौशल्यानें गोंविला आहे. मानवी व्यक्तिमत्तेसंबंधींची अंतर्दृष्टि त्याच्यामध्यें चांगली होती. माणसाचा निसर्गाशीं झगडा त्यानें ठिकठिकाणीं दाखविला आहे. व १९३८ सालीं लिहिलेल्या 'मेन ॲंड दि पॉवर्स' या ग्रंथांत जगाच्या आगामी प्रलयाचें जणुं अतीन्द्रिय ज्ञान्याचें भविष्यच आहे. त्याची लेखनशैली अत्यंत ठाशीव व हुबेहूब वर्णन करणारी असे.

**डूरर, अल्ब्रेश्ट** ( १४७१–१५२८ )—एक जर्मन शिल्पकार, चित्रकार आणि संयोजक ( डिझाइनर ). १५०५ सालीं तो आपल्या आवडीच्या कलेचें आणखी शिक्षण घेण्याकरितां व्हेनिस शहरीं गेला; आणि नंतर बोलोन शहरीं जाऊन तेथेंहि त्यानें त्या कलेचें आणखी ज्ञान मिळवलें. आपलें मूळ गांव नूर्नबर्ग येथें परत आल्यावर त्याची कीर्ति फार पसरली. पहिल्या मॅक्झीमिलियन राजानें आपल्या दरबारचा चित्रकार या जागेवर डूररची नेमणूक केली, आणि पांचवा चार्लस यानें त्याला त्या जागेवर कायम केलें. 'क्रूसिफिकेशन'; 'ॲडॅम ॲन्ड ईव्ह'; 'ॲडोरेशन ऑफ दि मगी'; इ. त्याचीं चित्रें उत्कृष्ट आहेत. त्याचीं तांब्याच्या पत्र्यावर व लांकडांवर खोदलेलीं पौराणिक चित्रें आहेत.

**डे, थॉमस** (१७४८–१७८९)—एक ब्रिटिश ग्रंथकार. याचें अनेक विषयांवर गद्य व पद्य लिखाण आहे. पद्य लेखनांत 'दि डाइंग नीग्रो' आणि गद्य लिखाणांत 'हिस्टरी ऑफ सॅंडफर्ड ॲंड मर्टन' व 'हिस्टरी ऑफ लिट्ल जॅक' हीं प्रसिद्ध आहेत.

**डेकर, थॉमस** ( १५७०–१६४१ )—एक इंग्रज नाटककार आणि संकीर्ण लेखक. त्याच्या चरित्राबद्दल इतकीच माहिती आहे कीं, त्याला झालेलें कर्ज फेडतां येईना म्हणून बरेचवेर कैदेंत बसावें लागलें; परंतु त्यानें या आपत्ती आणि कष्ट मोठ्या आनंदी वृत्तीनें सोसले. तो अगदीं पक्का 'लंडनकर' होता आणि त्याचें अनेक बाबतींत डिकन्सशीं साम्य दिसतें. त्याचीं सर्वांत उत्तम नाटकें म्हणजे 'दि शूमेकर्स हॉलिडे' आणि 'ओल्ड फॉर्च्युनेट्स'. तो निबंधहि चांगले लिहीत असे. त्याचा 'गल्स हॉर्नबुक' हा निबंध फारच मनोरंजक आहे.

**डेकार्टे** ( १५९६–१६५० )—एक फ्रेंच तत्त्ववेत्ता. लाफ्लीच येथें जेसुइट पंथाच्या शाळेंत त्याचें शिक्षण झालें. त्यानें लष्करी शिक्षणहि घेतलें. १६२५ सालीं तो पॅरिसमध्यें येऊन राहिला. त्याचा गणिताचा व्यासंग चालूच होता. पण यापुढें त्यानें प्रकाशादि पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास सुरू केला आणि शेवटीं सत्यसंशोधन करण्यांतच सर्व आयुष्य घालविण्याचें ठरवून तो हॉलंडमध्यें कायमचा जाऊन राहिला. प्रत्यक्ष प्रयोग व विचार यांमध्यें त्याचें आयुष्य गेलें. शास्त्रांना तो झाडाची उपमा देत असे. झाडाचें जें मूळ तें अध्यात्मशास्त्र, बुंधा पदार्थविज्ञान आणि मुख्य तीन फांद्या : यंत्रशास्त्र, औषधिशास्त्र व नीतिशास्त्र या होत. १६३३ मध्यें त्यानें 'जग' हें पुस्तक लिहून तयार केलें. पण गॅलिलिओच्या पुस्तकाच्या प्रती जाळून त्याला शिक्षा झालेली ऐकून त्यानें आपलें पुस्तक छापण्याचा बेत रहित केला. स. १६४४ मध्यें त्यानें आपला 'तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. फ्रान्सप्रमाणें डेन्मार्क, स्वीडन, इटली ह्या देशांत हळूहळू त्याचीं मतें प्रसार व मान्यता पावूं लागलीं. स. १६४९ मध्यें स्वीडनमध्यें येण्याबद्दल तेथील दरबारांतून आग्रहाचें आमंत्रण आल्यामुळें तो स्टॉकहोमला गेला. तेथें राणीनें नवीन सुरू व्हावयाच्या शास्त्रीय विद्यालयाकरितां नियमावली तयार करण्याचें व स्वतःला दररोज एक तास तत्त्वज्ञान शिकविण्याचें काम डेकार्टेला सांगितलें व लवकरच त्याला मोठी जहागीर देऊन 'नोबल' म्हणजे सरदार करण्याचें ठरविलें. परंतु दुर्दैवानें तेथील हवेमुळें तो आजारी पडून त्यांतच मरण पावला. तो बुद्धिप्रामाण्यवादी पंथाचा आद्य प्रवर्तक होय.

**डेंग्यू**—हा रोग सांसर्गिक असून उष्णकटिबंधामध्यें होतो. हा झाला असतां ताप पुष्कळ चढतो. सांधे आणि स्नायू दुखूं लागतात. आणि गोवरासारख्या अंगावर पुटकुळ्या उठतात. या रोगांतून उठण्यास थोडा अधिक वेळ लागला तरी या रोगामुळें बहुधा मृत्यु येत नाहीं. कांहीं विशिष्ट डांसांकडून या रोगाचे जंतू नेले जाऊन डांस चावणाराला हा रोग होतो.

**डेझी**—हें झेंडूच्या वर्गातील सर्वत्र आढळणारें रोप आहे. हें युरोप, आशिया व अमेरिका यांमध्यें आढळतें. हें तसेंच निरनिराळ्या ठिकाणीं भिन्न भिन्न उंचीवर आढळतें. याला सर्व वर्षभर फुलें येतात. फूल पांढरें स्वच्छ व एकेरी असतें. दुहेरी व इतर रंगांचींहि फुलें कृत्रिम रीतीनें तयार करतात. मध्ययुगांत युरोपांत प्रेम आणि निष्ठा यांचें प्रतीक म्हणून हें फूल असे; आतां निरागसपणासाठीं योजतात.

**डेट्रॉइट**—हें बंदर अमेरिकेंतील सं. संस्थानांतील मिचिगान संस्थानांत डेट्रॉइट नदीच्या कांठीं आहे. सं. संस्थानांतील 'ग्रेट लेक्स' या नांवाच्या मोठाल्या सरोवरांतून जी व्यापारी मालाची नाविक वाहतूक चालते, त्यापैकीं बरीच वाहतूक या बंदरांतून होते. या शहरांत मोठमोठाले कारखाने आहेत ते म्हणजे लांकूड कापण्याच्या गिरण्या, पिठाच्या गिरण्या, ओतीव कामाचे कारखाने, कमावलेल्या कातड्यांचे कारखाने, तमाखू आणि सिगारेट

यांचे कारखाने आणि एंजिनें करण्याचे कारखाने, वगैरे होत. या बंदरांत पाण्याची खोली बरीच असल्यामुळें मोठमोठ्या बोटी येऊं शकतात. लो. सं. १६,२३,४५२.

**डेन्मार्क**—युरोप खंडांतील एक देश. क्षेत्रफळ १६,५७५ चौरस मैल. लोकसंख्या सु. ३८,००,०००. याशिवाय ग्रीनलंड व फॅरो बेटें हीं डेन्मार्कचींच आहेत. तसेंच आइसलंड हें राज्य-कारभाराच्या दृष्टीनें अगदीं स्वतंत्र आहे, तरी डेन्मार्कचा व आइसलंडचा राजा एकच आहे. कोपनहेगन हें सर्वांत मोठें व राजधानीचें शहर आहे. डेन्मार्कच्या बहुतेक सर्व बाजूंस समुद्र आहे. दक्षिणेकडे डेन्मार्क व जर्मनी एकमेकांस लागून आहेत. जमीन सुपीक असून लागवडीच्या, वगैरे सुधारलेल्या पद्धतीनें पिकें चांगलीं येतात. लोणी, अंडीं व बेकन (मांस) हे व्यापाराचे मुख्य जिन्नस आहेत. मुख्य चलन क्रोन नांवाचें आहे. किंमत अंदाजें १३ आणे. १०० ओरचा एक क्रोन होतो.

डेन्मार्कचा पूर्वेतिहास स्कँडिनेव्हिअन देशाच्या (स्वीडन, नॉर्वे व डेन्मार्क) इतिहासाशीं निगडित आहे. हे सर्व देश एके काळीं एकाच राजसत्तेखालीं होते. पूर्वी या प्रदेशांत सिंब्री नांवाचे लोक होते; त्यानंतर व्हिकिंग आले. १०१८ त स्वेईन राजानें इंग्लंड जिंकला व तो देश सुमारें पाव शतक डेन्मार्कच्या सत्तेखालीं होता.

१४४८ मध्यें डेन्मार्कनें आपला स्वतंत्र राजा निवडला. त्यामुळें स्वीडन निराळा झाला. परंतु १८१२ पर्यंत नॉर्वे डेन्मार्क-बरोबरच एकटा होता. १८६३ मध्यें सत्ताधारी राजघराण्यांत कोणीहि राहिलें नाहीं, तेव्हां 'नववा ख्रिश्चन' म्हणून 'होल्स्टिन' घराण्याचा राजा निवडण्यांत आला. यामुळें लवकरच ऑस्ट्रिया व प्रशिया यांच्याबरोबर डेन्मार्कला युद्ध करावें लागलें. प्रशियानें होल्स्टिन व श्लेस्विग प्रांत काबीज केले. या देशावर इंग्लंडप्रमाणें मर्यादित राजसत्ता आहे. हल्लींचा राजा दहावा ख्रिश्चन हा १९१२ त गादीवर आला.

पहिल्या महायुद्धांत डेन्मार्क तटस्थ राहिलें, पण त्यामुळें उत्तर श्लेस्विग त्याला परत मिळालें. १९४३ त जर्मनीनें याची राजसत्ता आपल्याकडे घेतली. १९४५ मध्यें जर्मनीचा पराभव झाला तेव्हां डेन्मार्क पुन्हां स्वतंत्र झाला. कोपनहेगनचें विद्यापीठ १४७९ सालीं स्थापन झालेलें आहे.

**डेन्व्हर**—हें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील कोलोरॅडोचें मुख्य शहर आहे. हें शहर साउथ प्लेट नदीवर वसलेलें आहे. येथें रेल्वेचें केंद्रस्थान आहे. लॉगपीक, ग्रेपीक, वगैरे शिखरें डेन्व्हरहून फार लांब नाहींत. स्टेट कॅपिटॉल नांवाची इमारत बरीच सुंदर आहे. येथील संग्रह फार चांगला आहे. शहरांतील ग्रंथालयांत ३ लाखांवर पुस्तकें आहेत. डेन्व्हर विश्वविद्यालयांत चार हजार विद्यार्थी शिकतात. आजूबाजूच्या खाणी व शहरांतील कारखाने यांना येथील रेल्वेची चांगली मदत होते. या शहराच्या इतिहासाची सुरुवात १८५८ पासून होते. १८६७ सालीं डेन्व्हर हें राजधानीचें शहर झालें. लो. सं. ३,२२,४१२.

**डेमलर, गोट्लिएब** (१८३४–१९००)— एक जर्मन एंजिनियर. तो इंग्लंडमध्यें गेला, व मँचेस्टर येथील व्हिट्वर्थ कारखान्यांत कामावर लागला. त्यानें आपले सर्व लक्ष पेट्रोलियम मोटार व ऑइल-एंजिन या यांत्रिक सुधारणांकडे दिलें. आणि मोटारीकरितां लागणाऱ्या अति ज़लदगति पेट्रोल एंजिनाचा शोध लावला.

**डेमाव्हेंड**— हा इराणमधील एक ज्वालामुखी पर्वत, आणि एल्बूर्झ पर्वतांतील सर्वांत उंच शिखर आहे. याची उंची सुमारें १९,४०० फूट आहे.

**डेमॉस्थिनीझ** (ख्रि. पू. ३८५–३२२)— एक जगद्विख्यात ग्रीक वक्ता. याचा बाप तरवारी तयार करण्याचा धंदा करीत असे. त्यानें डेमॉस्थिनीझसाठीं बरीच इस्टेट राखून ठेवली होती. पण त्याच्या मृत्यूनंतर डेमॉस्थिनीझच्या पालकांनीं ती लांबविण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं डेमॉस्थिनीझ अवघा सतरा वर्षांचा होता. त्यानें आपल्या पालकावर फिर्याद करून खटला स्वतः चालवून तो जिंकला. त्यानंतर त्यानें वक्तृत्वकलेचा पद्धतशीर अभ्यास चालविला. त्याच्या आवाजांत अनेक दोष होते, तथापि मोठ्या चिकाटीनें त्यानें सर्व दोष घालवून उत्कृष्ट वक्तृत्व-कौशल्य संपादन केलें. मॅसिडोनच्या फिलिपविरुद्ध त्यानें केलेलीं भाषणें 'फिलिपिक्स' या नांवानें अजरामर होऊन राहिलीं आहेत.

ख्रि. पू. ३३६ सालीं ॲलेक्झांडर गादीवर आला असतां त्याच्याविरुद्ध डेमॉस्थिनीझनें एक मोठें बंड उभारलें. पण ॲलेक्झांडरनें तें बंड अत्यंत निष्ठुरपणें मोडलें. स्वतः डेमॉस्थिनीझ ॲलेक्झांडरच्या हातीं सांपडला. तथापि मोठ्या हिकमतीनें त्याच्या हातून सुटला. ख्रि. पू. ३२४ मध्यें त्याच्यावर ॲलेक्झांडरच्या सेनापतीकडून लांच खाल्ल्याचा खोटा आरोप ठेवण्यांत आला; तथापि मोठ्या युक्तीनें त्यानें देशांतर केलें. पण ॲलेक्झांडरच्या मृत्यूनंतर एक वर्षानें ग्रीक देशभक्तांनीं स्वातंत्र्याचा लढा पुढें चालविण्यासाठीं त्यास स्वदेशांत परत बोलविलें. त्याप्रमाणें

तो आला. पण इतक्यांत ॲंटिपेटरनें ग्रीकांचा मोठा पराभव केला व डेमॉस्थिनीझला पकडण्याची पराकाष्ठा केली. तेव्हां त्याच्या ताब्यांत जिवंत सांपडूं नये म्हणून त्यानें विष खाऊन आत्महत्या केली (खि. पू. ३२२).

ग्रीक वक्तृत्वाचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून डेमॉस्थिनीझचें वक्तृत्व जगांत अमर होऊन राहिलें आहे. त्याच्या वक्तृत्वांत अकृत्रिमपणा, जोम, प्रमाणबद्धता, सुसंगत रेखीवपणा, वगैरे अव्वल दर्जाचे अनेक गुण आढळून येतात.

**डेमेट्रिअस** (खि. पू. २००-१९०)—एक बॅक्ट्रियन राजा. ग्रीक राजा यूथिडीमास याचा हा पुत्र व सीरियाचा राजा ॲंटिओकस याचा जांवई. खि. पू. २०० मध्यें यानें हिंदुस्थानवर स्वारी केली, त्या वेळी पाटलीपुत्र येथें देववर्मा मौर्य हा राजा राज्य करीत होता. डेमेट्रिअस हा शूर असून यानें आपल्या पराक्रमानें हिंदुस्थानांत व अफगाणिस्थानांत आपल्या नांवानें अनेक शहरें वसवलीं. याचा विजय-काल देववर्म्याचा पुत्र शतधनुष मौर्य याच्या कारकीर्दीत आलेला दिसतो.

**डेमेट्रिअस, फॅलेरिअस** (खि. पू. ३४५-२८३)— एक ग्रीक वक्ता आणि मुत्सद्दी. तो अथेन्सचा गव्हर्नर होता. पण डेमेट्रिअस पोलिओर्सेटीझने तें शहर जिंकून घेतलें, त्या वेळीं हा ईजिप्त देशांत पळून गेला. त्याचें नांव असलेला वक्तृत्व-कलेवरील एक ग्रंथ ('पेरी हेर्मेनिअस') आज उपलब्ध आहे, पण तो डेमेट्रिअसच्यानंतरच्या कालांतला आहे.

**डेमोक्रिटस**—(सु. खि. पू. ४६०-३७०)—भौतिकवादी ग्रीक तत्त्ववेत्त्यांमध्यें हा सर्वश्रेष्ठ तत्त्ववेत्ता होता. हा थ्रेसमध्यें जन्मला. वडिलार्जित मोठी इस्टेट त्याला मिळाल्यामुळे दूरदूरच्या प्राच्य देशांत प्रवास करून त्यानें ज्ञान संपादन केलें. पुढें ईजिप्तमध्यें सात वर्षें राहून गणित व भौतिक शास्त्रें यांचा अभ्यास त्यानें केला. त्याला 'हंसरा तत्त्ववेत्ता' हें नांव पडलें होतें. कोणी म्हणतात, तो नव्वद वर्षें जगला व त्यानें ७२ ग्रंथ लिहिले. प्लेटो, ॲरिस्टॉटल यांच्या ग्रंथांइतका परिणाम डेमोक्रिटसच्या ग्रंथांचाहि ग्रीक व अर्वाचीन विचारांवर झालेला आहे. परमाणु व विश्वरचना, आत्मा, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, ह्या विषयांवर त्याचे ग्रंथ आहेत.

**डेराइस्मायलखान**—पाकिस्तान. हा वायव्य सरहद्दीवरील प्रांताचा अगदीं दक्षिणेकडील जिल्हा आहे. याचें क्षे. फ. ४,२१६ चौ. मै. व आकार अनियमित त्रिकोणासारखा आहे. पावसाळ्यांत ह्यांतून पुष्कळ प्रवाह वाहतात, पण उन्हाळ्यांत बहुतेक ते कोरडे असतात. बन्नू किंवा डेरागाझीखान ह्यापेक्षां येथील हवा कोरडी आहे. उष्णमान ११६°. हिवाळ्यांत थंडी इतकी असते कीं, उघड्या हवेंत आंब्याचीं झाडें वाढत नाहींत. वार्षिक पाऊस १० इंच पडतो.

लो. सं. २,९८,१३१; पैकीं शें. ९० मुसलमान आहेत. डोंगराच्या पायथ्याच्या प्रदेशांत पुश्तु व इतर ठिकाणीं झट्की भाषा (पंजाबी व सिंधी यांच्या मिश्रणानें झालेली भाषा) बोलतात. शें. ५० लोकांचा उदरनिर्वाह शेतकीवर होतो.

गहूं व ज्वारी हीं येथील मुख्य पिकें होत. या जिल्ह्यांतील कारखाने महत्त्वाचे नाहींत. डेराइस्मायलखान व पहाडपूर येथें उत्तम कातकाम होतें. हिंदुस्थान व खोरासान यांच्या दरम्यान चालणाऱ्या व्यापाराचा मार्ग या जिल्ह्यांतून जातो. डेराइस्मायल-खान, टांक, व कुलाची हीं स्थानिक व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत.

गांव—डेराइस्मायलखान जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. सु. ३८,०००; पैकीं मुसलमान निम्याहून अधिक आहेत. मलिक सोऱ्हाबचा पुत्र इस्मायलखान ह्याने हा गांव वसविला. १८२३ सालीं जुना गांव सर्व वाहून गेला. हल्लीं वसविलेला नवीन आहे. गांवाभोंवतीं कच्च्या मातीचा तट आहे. वायव्येकडे अकालगड किल्ला आहे. येथून खोरासान, वगैरे प्रदेशांत माल जातो.

१५ व्या शतकाच्याअखेर मलिक सोराबच्या सत्तेखालीं बलुची लोक येथें राहण्यास आले. त्याचे मुलगे इस्मायलखान व फत्तेखान. होत घराणें (बलुची घराण्याचें नांव) स्वतंत्रपणें ३०० वर्षें म्हणजे १७५० पर्यंत वरच्या डेराजातवर राज्य करीत होतें. १७९४ त शहा इमाम दुराणी यानें हा प्रदेश सदोझै टोळींतील महंमदखान नांवाच्या अफगाणाला देऊन त्याला नबाब ही पदवी दिली. महंमदखानानें हा सर्व जिल्हा व सिंधूच्या पूर्वेकडील मुलूख घेऊन त्यावर २० वर्षें राज्य केलें. तो १८१५ सालीं मरण पावला. याच्या मरणानंतर त्याचा नातू गादीवर आला. पण रणजितसिंगानें सिंधूच्या पूर्वेकडील प्रदेश घेतला म्हणून तो डेराइस्मायलखानांत परत गेला. त्याला शिखांना सारा परत द्यावा लागे. १८३६ सालीं नवनिहालसिंग यानें हा जिल्हा लाहोर राज्यास जोडला व नबाबाला कांहीं भाग तोडून दिला. १८४८ सालीं ले. एडवर्ड्स यानें पंजाब प्रांत ब्रिटिश राज्यास जोडला, तेव्हां हा जिल्हाहि ब्रिटिश अमलाखालीं आला.

**डेरागाझीखान**—पाकिस्तान, पंजाब, मुलतान विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ९,३६४ चौ. मैल. पंजाबांत सिंधु नदीच्या पलीकडे असलेला हा एकच जिल्हा आहे. लो. सं. ५,८१,३५०.

या जिल्ह्याची हवा अत्यंत कोरडी व निरोगी आहे. डोंगराळ प्रदेशांतील हवा नेहमींच सौम्य व सुखकारक असते. पण हा जिल्हा सिंधु नदीच्या कांठीं असल्यामुळें पुरापासून नेहमीं भीति असते.

**डेव्हिस, जॉन** (१५५०–१६०५)—एक इंग्रज जलपर्यटनकार. त्यानें १५८५ व १५८७ या दरम्यान वायव्यमार्ग शोधून काढण्याकरितां तीन सफरी केल्या. नंतर १५९१–१५९३ पर्यंत पॅसिफिक महासागरांत कॅव्हेंडिश सफरीबरोबर प्रवास केला; आणि नंतर ईस्ट इंडीजकडे अनेक जलपर्यटनें केलीं.

**डेव्ही, सर हंफ्री** (१७७८–१८२९)—एक इंग्रज रसायनशास्त्रज्ञ. स. १७९४ त याचा बाप रॉबर्ट डेव्ही हा मरण पावला तेव्हां त्याची आई व चार भावंडें यांच्या चरितार्थाचा भार यावरच पडला. तेव्हां तो वैद्यकी शिकण्याकरितां एका औषधविक्या वैद्याकडे उमेदवार राहिला. तेथें अध्यात्मशास्त्र, नीतिशास्त्र, गणित, इ. शास्त्रांचा अभ्यास केल्यावर इ. स. १७९७ त त्याची दृष्टि रसायनशास्त्राकडे वळली. १७९८ सालीं त्याची व थॉमस बेडीस याची ओळख झाली व तो त्याच्या वैद्यक कार्यालयांत व्यवस्थापक झाला.

१७९९ सालीं त्यानें असा शोध लाविला कीं, नत्रसप्राणिद (नायट्रस ऑक्साइड) अपायकारक नाहीं, परंतु त्यानें अंमल चढतो. १८०० त त्यानें 'नत्रसप्राणिदावर शोध' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यामुळें त्याची रसायनशास्त्रज्ञ अशी ख्याति झाली. लंडन येथे रॉयल सोसायटींत १८०३ सालीं तो अध्यापक झाला. १८१३ सालीं 'शेतकीच्या रसायनशास्त्राचीं मूलतत्त्वें' हा ग्रंथ त्यानें प्रसिद्ध केला. १८०७ त त्यानें विद्युद्‌घटमालेच्या साहाय्यानें सिंधु व पालाश या धातू मूळ रूपांत निराळ्या काढल्या. स. १८०९ मध्यें त्यानें पालाश (पोटॅश) ही मूळ धातुच आहे हें सिद्ध केलें.

या सुमारास याची फारच प्रसिद्धि झाली व त्याची कीर्ति लंडनच्या बाहेरहि पसरली. डब्लिन विश्वविद्यालयानें त्याला एल्‌एल्. डी. ची बहुमानाची पदवी दिली. १८१३ सालीं तो प्रथम पॅरिस येथे गेला तेव्हां त्याचा तेथील विद्वानांनी फार गौरव केला. १८१५ त युरोपच्या प्रवासाहून तो लंडनला परत आल्यावर त्याला 'सुरक्षित दिवा' तयार करण्याकरितां खाणीवाल्यांनीं विनंति केली. धातूंच्या तारांचीं जाळीं उपयोगांत आणण्याविषयीं त्यानें सुचविलें व त्याप्रमाणें तसा 'सुरक्षित दिवा' उपयोगांत येऊं लागला. त्यानें या शोधाबद्दल पेटंट घेतलें नाहीं. या त्याच्या स्वार्थत्यागाबद्दल न्यूकॅसल येथील खाणीवाल्यांनी त्याला चांदीच्या ताटांचा संच नजर केला. पुढें ही चांदी वितळवून त्या पैशांतून एक पदक युरोप खंडांत उत्तम शास्त्रीय शोध लावणारास 'डेव्ही पदक' नांवानें देण्यांत येऊं लागलें.

स. १८१८ त त्याला बॅरोनेटची पदवी मिळाली. स. १८२० त तो रॉयल सोसायटीचा अध्यक्ष निवडला गेला.

**डेव्होनियन खडक**—भूस्तरशास्त्रामध्यें डेव्हनशायर आणि कार्नवाल यांमध्यें आढळणाऱ्या आणि सिल्यूरियन आणि कर्बयुक्त (कार्बानिफरेस) या थरांच्या दरम्यान असणाऱ्या स्तररचनेस हें नांव प्रथम देण्यांत आलें होतें. या थरामध्ये वाळूचे दगड, गारेचे पाटीसारखे दगड व चुनखडीचे दगड आढळतात. यासारखे प्रस्तर मध्य युरोप, अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें, पूर्व कानडा व नोव्हास्कोशिया यांमध्यें दृष्टीस पडतात. यांसारख्याच कांहीं दगडास जुने तांबडे वाळूचे दगड म्हणतात.

**डेहराडून**—संयुक्तप्रांत, मिरत विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १,१०२ चौ. मै.. ह्या जिल्ह्याचा मोठा विभाग हिमालय पर्वत व सिवालिक डोंगर यांच्या दरम्यानच्या खोऱ्यांत आहे. येथें हिमालयाच्या सान्निध्यामुळें वातावरण थंड राहतें. खोऱ्यांतील उष्णमान ३७° ते १०१° व मसुरी येथील २७° ते ८१° च्या दरम्यान असतें. पाऊस सर्व ठिकाणीं सारखा पडत नाहीं. डेहरा येथें ८९ इंच, हिमालयाच्या पायथ्याजवळ राजपूर येथें १२१ इंच व चक्रात येथें ८० इंच पडतो.

या जिल्ह्याची लो. सं. १९४१ सालीं २,६६,२४४ होती. शें. ८३ हिंदू व शें. १४ मुसलमान आहेत. खोऱ्यांत मुख्य भाषा पश्चिम हिंदी चालते.

ह्या जिल्ह्यांत गहूं, तांदूळ, मका व बाजरी हीं धान्यें पिकतात. मसुरी येथें दारू गाळण्याचे कारखाने आहेत, व चक्रात येथेंहि एक आहे. या जिल्ह्यांतून इमारती लांकूड, बांबू, चुना, कोळसा व चहा हे पदार्थ बाहेर जातात. अयोध्या आणि रोहिलखंड रेल्वेच्या मुख्य फांट्यावरील लक्सार स्टेशनपासून हरिद्वारापर्यंत जाणारा फांटा वाढवून डेहरापर्यंत नेलेला आहे.

शहर—डेहराडून जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. समुद्रसपाटीपासून उंची २,३०० फूट. लो. सं. ५७,१८३. हरिद्वार–डेहरा रेल्वेचें हें शेवटचें टोंक आहे. शीख लोकांचा गुरु म्हणविण्याचा प्रयत्न व्यर्थ झाल्यावर उदासी पंथाची स्थापना करणारा गुरु रामराय यानें हें शहर स्थापन केलें. १६९९ सालीं बांधिलेल्या या गुरूच्या देवालयांत जहांगीर बादशहाच्या थडग्याप्रमाणें तयार केलेल्या गर्भगृहामध्यें या गुरूचा बिछाना ठेवण्यांत आला आहे.

जिल्ह्यांतील अधिकारी हिंवाळ्यांत डेहरा येथें राहतात. हिंदुस्थान सरकारच्या त्रिकोणमिति व जंगलमोजणी खात्यांचे अधिकारी, त्याचप्रमाणें, कृषिकर्मरसायनज्ञ व परोपजीवनशास्त्रज्ञ यांचें हें राहण्याचें ठिकाण आहे. 'फॉरेस्ट कॉलेज' ही सर्वांत सुंदर इमारत असून येथें जंगलांतील वस्तूंचा मोठा संग्रह आहे. सर्व हिंदुस्थानाकरितां लागणारे जंगल–अधिकारी येथून शिकून तयार होतात. नॅशनल कॅडेट कोअरचे लोक शिक्षणाकरितां

येथें येतात. येथें एक लष्करी छावणी आहे. हिमालयांतील कोलुखेनपासून व कलंगाड डोंगरांतील नालापाणीपासून या शहराला पाणीपुरवठा होतो.

येथें जंगलशास्त्र शिकण्याची शाळा प्रथम १८७८ त निघाली; नंतर १८८४ मध्यें मध्यवर्ती सरकारच्या ताब्यांत ती येऊन त्याचें कॉलेज बनलें. १९३२ सालीं येथें हिंदी लष्करी अधिकारी तयार करण्यासाठीं 'इंडियन मिलिटरी अॅकॅडमी' सरकारनें स्थापन केली.

**डोंगरपुर**—राजपुताना. या संस्थानास डुंगरपुर असेंहि नांव आहे. येथील राजास महारावळ म्हणतात. संस्थानिक सिसोदिया रजपूत आहेत. उदयपूर राजघराण्याची ही वडील पाती आहे. चितोडचा राणा कटमसी याचा वडील पुत्र महेराजी यानें बापाच्या आज्ञेवरून आपला गादीवरील हक्क सोडून आपण डुंगरपुर येथें नवीन राज्य स्थापिलें (११७९). महेराजीचा नववा वंशज समरशी यानें दिल्लीच्या बादशहाचें मांडलिक बनून डुंगरपुराहून राजधानी हालवून बडोदें (त्याच संस्थानांतील एक गांव) येथें नेली. परंतु वीरसिंह या त्याच्या नातवानें पुनः डुंगरपुरास ठाणें केलें. त्याचा नववा वंशज उदयसिंह हा एका लढाईंत मारला गेला. त्यानें आपलें राज्य आपल्या पृथ्वीराज व जगमल्ल या दोन पुत्रांत वांटलें. औरंगजेबापर्यंत डुंगरपुर मुसलमानी साम्राज्यांत होतें. परंतु पुढें त्यावर मराठ्यांचें आधिराज्य झालें व धारच्या पोवाराच्या देखरेखीखालीं राहून हें सालीना ३५ हजार खंडणी देत असे. पेशवाई नष्ट झाल्यावर हें इंग्रजांच्या अमलाखालीं गेलें व वरील खंडणी इंग्रजांना मिळूं लागली.

डुंगरपुर व बांसवाडा मिळून या प्रांतास प्राचीन वागेर असें नांव होतें. हल्लींच्या संस्थानिकांचें नांव महीमहेंद्र महाराजाधिराज महारावळ श्रीलक्ष्मणसिंघजी बहादूर असून १९१८ सालीं त्यांना गादी मिळाली. पुढें दहा वर्षांनीं प्रत्यक्ष राज्यसूत्रें त्यांनीं हातीं घेतलीं.

संस्थानांत आगगाडी नाहीं. संस्थानाचें उत्पन्न वीस लाखांवर आहे. त्याचें क्षे. फ. १४६० चौ. मै. आहे. व लो. सं. २,७४,००० आहे. संस्थानांत ७१६ गांवें आहेत. संस्थानांतील लो. सं. पैकीं ७२ हिंदू आहेत. राजस्थानी, अजमेरी, शेखावती, जयपुरी, माळवी, मेवाडी, हिंदी व उर्दू या भाषा चालतात. मुख्य धंदा शेतीचा आहे. हें संस्थान आतां राजस्थान संघांत सामील झालें आहे.

**डोगरा**—पंजाबांतील एक जात. लो. सं. सुमारें सत्तर हजार. ही अर्धवट गुराखी व अर्धवट शेतकरी यांची जात आहे. हे राजपुतांपासून झाले असें म्हणतात. त्यांच्या चालीरीती गुजर लोकांच्यासारख्या आहेत. ते मुख्यतः मुसलमान आहेत. दिल्ली, जालंधर, लाहोर, कपुरथळा, फरीदपुर व पतियाळा संस्थान यांतून हे आढळतात.

**डोंगरे, पंडिता रमाबाई** (१८५८–१९२२)—एक विदुषी व ख्रिश्चन मिशनरी. म्हैसूर जिल्ह्यांत यांचा जन्म ब्राह्मण कुलांत झाला. वयाच्या बाराव्या वर्षींच यांनीं संस्कृत, कानडी, मराठी, हिंदी यांसारख्या भाषांवर प्रावीण्य मिळवलें. पुढें वडिलांच्या मृत्यूनंतर सन १८७८ मध्यें या कलकत्त्यास गेल्या. तेथें 'बालविवाह' व 'विधवांना होणारा त्रास' यांसारख्या विषयांवर यांचीं व्याख्यानें झालीं. यांच्या हृदयस्पर्शी वक्तृत्वानें यांना पाठिंबा देणारा असा एक वर्ग तेथें निर्माण झाला. 'सरस्वती' ही पदवी याच वेळीं यांना बहाल करण्यांत आली. यानंतर बिपिन बिहारी मेधावी या ब्राह्मणेतर जातीच्या पदवीधर वकिलाशीं या विवाहबद्ध झाल्या. परंतु या लग्नानंतर अवघ्या एकोणीस महिन्यांनींच बिपिन बिहारी हे कॉलऱ्यास बळी पडले व या पुण्यास आल्या. तेथें न्या. मू. रानडे, डॉ. भांडारकर यांच्या सल्ल्यानें यांनीं स्त्रीशिक्षणाचें कार्य करण्याच्या दृष्टीनें 'आर्यमहिला समाज' या संस्थेची स्थापना केली. १८८३ सालीं या इंग्लंडला गेल्या व चेल्टनहॅमच्या लेडीज कॉलेजमध्यें यांनीं दोन वर्षें संस्कृतच्या प्राध्यापकाचें काम केलें. याच काळांत यांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारला. यानंतर अमेरिकेस जाऊन यांनीं किंडरगार्टन पद्धतीचें शिक्षण घेतलें. व तसेंच हिंदुस्थानांत विधवांकरतां शिक्षणसंस्था काढण्याची कल्पना यांनीं तेथें मांडली व तिला तेथें चांगला पाठिंबा मिळवला. यानंतर हिंदुस्थानांत परत येऊन मुंबईस यांनीं १८९८ सालीं 'शारदासदन' या संस्थेची स्थापना केली. परंतु या संस्थेचा उद्देश हिंदू मुलींना बाटवून ख्रिस्ती करण्याचा आहे असा लोकांना संशय येतांच यांच्याबद्दलचा लोकांचा आदर नाहींसा झाला. तेव्हां मिशनऱ्यांच्या मदतीनें केडगांवचें 'मुक्तिसदन', 'कृपासदन' नांवाचें अनाथालय, व 'मुक्ति प्रेयर बेल्' नांवाचें मासिक यांसारख्या साधनांनीं आपली ख्रिस्ती धर्मप्रसाराची मोहीम पुढें चालू ठेवली. सन १८९७ च्या दुष्काळांत गांवोगांवीं हिंडून यांनीं अनेक स्त्रिया व मुली यांना मृत्यूच्या दाढेंतून वांचवलें व आपल्या सदनांत घेतलें.

विलायत व अमेरिका प्रवासवर्णन, स्वधर्मनीति, बायबलचें संस्कृत भाषांतर (अपूर्ण), टेस्टिमनी व हायकास्ट हिंदु वूमन हे ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**डोंगरे, वासुदेव नारायण** (१८५०–१९०५)— एक जुने महाराष्ट्रीय नाटककार. हे अण्णासाहेब किर्लोस्करांचे समकालीन व प्रतिस्पर्धी नाटककार व एका नाटकमंडळीचे मालक होते. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत वाडाजून गांवीं झाला व मॅट्रिक्युलेशनपर्यंतचा अभ्यास मुंबईस झाला. १८८० सालीं त्यांनीं

नाटकें लिहिण्यास सुरुवात केली. किर्लोस्करांच्या 'शाकुंतला'च्या प्रयोगानंतर चार-पांच महिन्यांत डोंगरे यांनीं मुंबईस आपल्या शाकुंतलाचा प्रयोग करून दाखविला. डोंगरे यांची पद्यरचना जास्त शास्त्रशुद्ध व गवई चिजांच्या चालीवर असे. यांचा शाकुंतल नाटकाचा प्रयोग लोकप्रिय झाल्यावर, डोंगरे यांनी वेणीसंहार, रत्नावली, मृच्छकटिक, विक्रमोर्वशीय, मालतीमाधव, वगैरे नाटकांचीं संगीत भाषांतरें करून त्यांचे रंगभूमीवर प्रयोग करून दाखविले. पण यांच्या मंडळींत पात्रें टिकून राहत नसल्यामुळें १८९५ सालीं त्यांना हा धंदा बंद करावा लागला. पुढें त्यांनीं सर्व व्याप सोडून आमरण स्वस्थपणें इकडे तिकडे करण्यांत आयुष्य घालविलें.

महाराष्ट्रीय रंगभूमीला वळण लावण्याचें कार्य किर्लोस्करांप्रमाणें यांनीहि बरेंच केलें. हे उत्तम नट व गायक होते. यांची नाट्यरचना संस्कृताच्या धर्तीवर व सभ्य होती. यांची भाषा प्रौढ व विचार प्रगल्भ असत.

**डोडो**—हे कबुतराच्या जातीचे पक्षी मॉरिशस बेटांत आढळत असत पण आतां ते नष्ट झाले आहेत. हा पक्षी हंसापेक्षां मोठा व बोजड असून याच्या शरीरावर पिसांच्याऐवजीं पर असत. याचे पाय आंखूड व बेढब असून याची चोंच मोठी व बांकदार असे. याची शेपटी व पंख इतके आंखूड असत कीं, त्यांचा उडण्याच्या कामीं कांहीं उपयोग होत नसे. हा सुमारें साठ वर्षांपूर्वी नष्ट झाला असावा.

**डेनाटोलो** (१३८६–१४६६)—एक इटालियन मूर्तिकार. घिबर्टी नांवाच्या एका प्रसिद्ध मूर्तिकाराच्या हाताखालीं राहून त्यानें मूर्तिकलेचें प्राथमिक शिक्षण संपादन केलें. पुढें ब्रुनलेश्री नांवाच्या दुसऱ्या एका मूर्तिकाराच्या बरोबर तो रोममध्यें पुढील अध्ययनास गेला व ब्रुनलेशीच्या सहवासांत त्याला या कलेचें उत्तम ज्ञान झालें.

१४०५ सालीं तो फ्लोरेन्स येथे आला. तेथील प्रार्थनामंदिराच्या उत्तर दरवाजाच्या बाजूस बसविण्याकरितां त्यानें 'प्रेपितां'च्या दोन संगमरवरी मूर्ती तयार केल्या व त्याबद्दल त्याला चांगलें वेतनहि मिळालें. १४१२–१४१५ च्या दरम्यान त्यानें 'सेंट पीटर', 'सेंट जॉर्ज' व 'सेंट मार्क' यांचे पुतळे तयार केले; ते ऑरसान मायकेलच्या प्रार्थनामंदिरांत बसविले आहेत. याच सुमारास त्यानें क्रूसावर चढविलेल्या ख्रिस्ताची लांकडामध्यें कोरलेली मूर्ति तयार केली. ती फार उत्कृष्ट साधली. यानंतर त्यानें 'अब्राहाम', 'जेरेमिया' व 'इचकक', इ. मूर्ती तयार केल्या.

यापुढील डोनाटेलोनें तयार केलेल्या मूर्तींमध्यें डोनाटेलोचें कलाकौशल्य परिणतावस्थेला पोहोंचलेलें दिसेल. नेपल्स येथील 'स्वर्गारोहण' हा पुतळा हे त्याचें निदर्शक होय. त्यानें आपलीं शेवटचीं वर्षें फ्लोरेन्स येथें घालविलीं. तेथें असतांना त्यानें जुडिथ, क्रूसारोहण, इ. पुष्कळ उत्कृष्ट मूर्ती तयार केल्या. मूर्तिकार या नात्यानें त्याची प्रसिद्धि त्याच्या हयातींत पुष्कळ झाली व मायकेल अँजेलो, रफायल, इ. प्रख्यात मूर्तिकारांनींहि त्याची प्रशंसा केली.

**डेनॉल्डसन, जॉन विल्यम** (१८११–१८६१)—एक इंग्रज भाषाशास्त्रज्ञ. याचा पहिला ग्रंथ 'दि थिएटर ऑफ दि ग्रीक्स' हा असून 'दि न्यू क्रेटिलस' आणि 'व्हॅरोनियॅनस' हे आणखी महत्त्वाचे त्याचे ग्रंथ होत. यांत अनुक्रमें ग्रीक व लॅटिन भाषाविषयक माहिती आहे.

**डोनेटस, ईलिअस** (जन्म इ. स. ३३३)—एक रोमन व्याकरणकार. त्यानें लॅटिन भाषेचें व्याकरण लिहिलें; ते मध्ययुगीन कालांत सर्वत्र इतकें उपयोगांत होतें कीं, त्या पुस्तकाला 'डोनॅट' हें नांव रूढ झालें होतें.

**डोंवगांव**—हैद्राबाद सं., उस्मानाबाद जिल्हा. परांडे तालुक्यांत हा गांव आहे. रामदासस्वामींचा पट्टशिष्य कल्याण याचा मठ येथें आहे. मठांत रामदासांनीं सांगितलेला व कल्याणनें स्वहस्तानें लिहिलेला दासबोध आहे. त्याचप्रमाणें रामदासांनीं कल्याणास आपल्या हातानें काढून दिलेला कित्ता व त्यांच्या कांहीं वस्तूहि आहेत. कल्याणची समाधि डोंवगांवींच नदीकांठीं आहे. मठास शाहूछत्रपतींनीं इनाम गांवें दिलीं होतीं.

**डोबरोनेर** (१७८०–१८४९)—एक जर्मन रसायनशास्त्रज्ञ. मंचबर्ग येथें त्यानें वैद्यकीचा अभ्यास केला. व १८०३ सालीं रासायनिक द्रव्यांचा कारखाना काढला. १८१० सालीं त्याला येना येथें रसायनशास्त्र, वैद्यक व यंत्रशास्त्र या विषयांच्या अध्यापकाची जागा मिळाली. तेथेंच त्याचा अंत झाला. रॉयल सोसायटीच्या ग्रंथांत याचे १७१ निबंध आहेत. त्यानें चूर्णस्थितींतल्या प्लाटिनमविषयीं व मद्यार्का (अल्कोहोल)च्या प्राणिदीकरणाविषयीं पुष्कळ प्रयोग केले. यानें तयार केलेल्या एकदम प्रकाश देणाऱ्या दिव्यास त्याचेंच नांव आहे (डोबरोनेर्स लॅंप).

**डोंबारी**—हे विशेषतः म्हैसूर-मद्रास इलाख्यांत तुमकुर व कोलार जिल्ह्यांत आढळतात. या लोकांचा धंदा कोलांट्या मारणें, दोरावरून नाचणें, वगैरे कसरतींचा आहे; पण कांहीं लोक शेतीहि

करतात. त्यांचा गुरु वैष्णव ब्राह्मण असतो. हे भटके असल्यामुळें त्यांच्या ज्या निरनिराळया टोळ्या असतात त्या प्रत्येकीवर एक नाईक असतो. हे लोक मूळचे तेलगू असून कुर्नुल व नेलोर ज़िल्ह्यांत राहणारे आहेत. येलम्मा, संकडाम्मा, गुरुमूर्ति, वगैरे यांच्यातील प्रमुख देवता आहेत. हे लोक पक्षी पकडण्यांत अत्यंत प्रवीण असतात. फिरतीच्या वेळीं यांचीं वाहनें गाढवें व बैल हीं असतात. या जातीची लो. सं. सुमारें एक लक्ष आहे.

**डोम**— डोब. हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेली ही एक हलकी जात असून ती द्राविड वंशीय आहे असें म्हणतात. बंगालमधील विहारी-मघय्या ही डोम जात फार प्रसिद्ध आहे. ही जात मुख्यत्वेंकरून अनार्य लोकांपासून झालेली आहे. उत्तर हिंदुस्थानांतील डोम जातीचे मुख्यतः तीन प्रांतिक विभाग आहेत.

बृहत्संहितेंत 'श्वपचादयः' म्हणजे जे कुत्र्याचें मांस शिजवून खातात ते व त्यांच्यासारखे इतर म्हणजे डोंब असें म्हटलें आहे. व टीकेंत 'श्वपचा डोंबाः'—कुत्र्याचें मांस शिजविणारे लोक डोंब असतात, असें म्हटलें आहे. डोंब शब्द रुद्रदेवाच्या शिलालेखांतहि आढळतो. युरोपियन संशोधक हे डोंब लोकांना जिप्सी असें म्हणतात.

पंजाबमधील हे लोक मुख्यतः हिंदू असून कांग्रा, होशियापुर, गुरुदासपुर, सियालकोट जिल्हे, आणि मंडी, सुकेत, चंबा, पतियाळा हीं संस्थानें यांतून आढळतात. ते भंग्याचा व बांबूंच्या टोपल्या वगैरे तयार करण्याचा धंदा करतात. बुरुडाचें काम करणाऱ्या डोमास डोंब, डोंगरे किंवा भंजरा असें म्हणतात.

पंजाबांतील मिराशी डोम हे ढोल वाजविणें, पोवाडे गाणें, वगैरे धंदे करतात. त्यांच्या स्त्रियाहि गातात व झनान्यांतील दासी म्हणून कामें करतात. ही डोम जात जवळ जवळ मुसलमान बनलेली आहे. तथापि कांहीं मूळच्या चालीरीती त्यांच्यांतून अद्याप गेल्या नाहींत. १९४१ सालच्या खानेसुमारीच्या अहवालावरून डोम जातीची लोकसंख्या मद्रासेंत २०,६६८ व ओरिसांत १,०४,२४३ होती. यांत सर्व जातींचे लोक आहेत. मुसलमान पाऊण लाख आहेत.

प्राचीन काळीं हे लोक स्तुतिपाठकाचा धंदा करीत असावे. काशीस अद्यापिहि पुराणकाळाप्रमाणें प्रेत जाळण्याचा मान या जातीकडे असून त्यानें स्पर्श केलेल्या प्रेतास सद्गति मिळते असा समज आहे.

**डोमकावळा**—१. (इं. जॅकडॉ). हा कावळ्याच्या जातीचाच पक्षी असून याची लांबी एक फूट असते. याची पाठ व पंख पूर्ण काळे असतात व याची चोंच आंखूड असते. हा आपलें घरटें जमिनीपासून उंच बांधतो. याची मादी पांच-सहा अंडीं घालते व तीं हिरवट रंगाचीं असतात. यांस शिकवल्यास ते बोलूं शकतात; पण हे कावळे जिनसा पळविण्यांत पटाईत असतात.

२. (इं. रॅव्हेन). हा काकवर्गांतील एक पक्षी आहे. याची लांबी दोन फुटांवर असते. हा पाळतां येतो, पण फार चोरटा व नासाड्या आहे. हा पुष्कळ उंच उडूं शकतो व त्याला अनेक मैलांवरून मृत मांसाचा वास येतो. हा फळें व लहानसहान प्राणी खातो (कावळा पाहा).

**डोमिनिकन रिपब्लिक**—वेस्ट इंडीजमधील एक संस्थान. लो. सं. १७,६८,१६३. क्षे. फ. १९,३३२ चौ. मैल. सान्तो डोमिंगो या राजधानीच्या ठिकाणावरून सबंध संस्थानालाहि सान्तो डोमिंगो असें असतात. हॅति बेटाचा पश्चिमार्ध यानें व्यापला आहे. त्यामुळें संबंध बेटालाहि कित्येक वेळां सान् डॉमिंगो म्हणतात. विस्तीर्ण जंगलांतून मौल्यवान् इमारती लांकूड विपुल निघतें. तंबाखू, कॉफी, साखर, वगैरेचा व्यापार आहे. १८४४ मध्यें लोकराज्य स्थापण्यांत आलें. जनावरांचीहि पैदास होते. कांहीं खाणीहि आहेत. भाषा स्पॅनिश पण लोक मिश्र आहेत. सान्तो डोमिंगो येथें १५३८ सालीं स्थापलेलें एक विद्यापीठ आहे.

१४९२ मध्यें कोलंबसानें गोऱ्यांची वसाहत स्थापन करीपर्यंत येथें इंडियन लोक राहत होते. वसाहतींतील लोकांनीं स्पॅनिश वर्चस्वाविरुद्ध अनेक वेळां बंडें केलीं, पण फारसा उपयोग झाला नाहीं. शेवटीं १९१७ सालीं अमेरिकन सं. संस्थान सरकारनें याचा ताबा घेतला. १९२४ सालीं नवीन घटना झाली. १९३६ सालीं सान्तो डोमिंगोचें नांव बदलून सिउदाद गुजिलो असें ठेवण्यांत आलें. १९४२ त नव्या लोकराज्याची घटना अमलांत आली.

**डोमिनिका**—ब्रिटिश वेस्ट इंडीज, विंडवर्ड द्वीपसमूहामधलें एक बेट. क्षेत्रफळ ७०० चौ. मैल. लो. सं. (१९४४) ५५,५०५.

सेओ हें राजधानीचें ठिकाण. मुलूख डोंगराळ आहे. पण जमीन सुपीक आहे. लिंबें, केळी, संत्रीं, नारळ, तेले, इ.चें उत्पादन होतें. कारिब लोकांची एक लहान वसाहत या संस्थानांत आहे.

१९४० सालीं हें बेट विंडवर्ड द्वीपसमूहामध्यें घालण्यांत आलें व स्वतंत्र वसाहत म्हणून याचा कारभार सुरू झाला.

**डोरपट**—टार्टो. हें शहर पूर्वी लिव्होनियामध्यें पण हल्लीं इस्टोनिया रिपब्लिकच्या मालकीचें आहे. ते एम्बॅक नदीवर असून तेथें एक विद्यापीठ, वेधशाला आणि अनेक शिक्षणसंस्था आहेत. या शहरांत दारू, लांकडाचें चिरकाम व सिगारेट यांचे कारखाने आहेत. येथें धान्य, लोंकर आणि जवस यांचा मोठा व्यापार चालतो. लो. सं. ७०,०००.

**डोरली**—ह्या झाडास संस्कृतमध्यें वार्ताकी म्हणतात. हें झाड हुबेहुब वांग्याच्या झाडासारखें असतें. म्हणून ह्यास रानवांगें असेंहि म्हणतात. हें झाड कमरेइतकें उंच वाढते. ह्याच्या फळाचा रंग पिवळा असून त्याचा आकार गोल सुपारीसारखा असतो. गरीब लोक या फळाची भाजी करतात. कोंकणांत या झाडांची एक जात आहे, तीस मोतरिंगणी किंवा चिंचुरटी असें म्हणतात. मोतरिंगणीचीं फळें डोरलीपेक्षां बारीक असतात. डोरली तिखट, उष्ण, कडू असून वांति, दमा, खोकला, कृमि, हृद्रोग, अग्निमांद्य यांचा नाश करते. गुरांस कोणताहि विषार लागल्यास मुळ्या कुटून रस पाजतात.

**डोलॅंड, जॉन** (१७०६–१७६१)—एक इंग्रज दृक्शास्त्रज्ञ. त्याने वक्रीभवन दूरदर्शक( रिफ्रॅक्टिंग टेलेस्कोप )ची सुधारणा करण्याकडे आपले लक्ष दिलें, आणि वस्तुकांच ( ऑब्जेक्ट ग्लास ) तयार करण्यांत यश मिळविलें. या कांचेमुळें प्रकाश-किरणांची वक्रीभवनीयता दुरुस्त होते.

**डोलेराइट**—हा बॅसाल्ट श्रेणींतील एक भरीव टणक खडक असून तो स्फटिकमय असतो. याच्या घटकांमध्यें ओगाइट, लॅब्रॉडोराइट व तितनयुत ( टिटॅनिफेरस ) लोह धातु व ऑलिव्हिन हे असतात. याची रस्त्यावर घालण्यास खडी चांगली होते.

**डोलोमाइट**—एक खनिज. ह्यांत खटकर्बित ( कॅल्शियम कॉर्बोनेट ) आणि मग्नकर्बित ( मॅग्नेशियम कॉर्बोनेट ), त्यांच्या आणविक ( मॉलिक्युलर ) प्रमाणांत असतात. ह्याचा रंग पिवळट पांढऱ्यापासून पिवळट पिंगटपर्यंत असतो. चाकूच्या पात्याने ह्याच्यावर रेषा पाडतां येतील इतका हा नरम व अर्ध-पारदर्शक असतो.

**डोव्हर**—इंग्लंडांतील केंट परगण्यांत डोव्हर बंदर असून म्युनिसिपालिटीचा विभाग आहे. हें कॅलेपासून २१ मैल डोव्हर खाडीवर वसलेलें आहे. हें उन्हाळ्याचें ठिकाण असून येथील हवा आरोग्यकारक आहे. तोफखाना आणि किल्ल्याच्या दरम्यान जुनें शहर आहे. किल्ल्याच्या आवारांत रोमन दीपगृह आहे. सेंट मेरी प्रार्थनामंदिर येथें आहे. सॅक्सन किल्ल्याचे अवशेष अजून दृष्टीस पडतात. जुन्या डोव्हरच्या नैर्ऋत्येस आर्च क्लिफ किल्ला आहे.

येथून कॅले व ऑस्टेंड यांपर्यंत आगबोटीचें दळणवळण आहे. आरमाराच्या सोईकरितां येथें एक कृत्रिम बंदर बांधण्यांत आलें. जहाजें बांधण्याचा, इमारतीच्या लांकडाचा व दोरखंडाचा व्यापार-धंदा येथें चालतो. कँटरबरी धर्मपीठांत हें मदतनीस बिशपचें मुख्य ठिकाण आहे. शहराचें क्षे. फ. २,०२६ एकर आहे.

प्रिन्स ऑफ वेल्स पीअरपर्यंत आगगाडी नेण्याकरितां एक तरता पूल बांधण्यांत आला व महायुद्धांत मालाच्या झटपट ने-आणीच्या कामीं या पुलाचा फार उपयोग झाला. डोव्हरच्या सामुद्रधुनीचें रक्षण करण्यासाठीं येथें पुष्कळशा विनाशिका व पाणबुड्या ठेवलेल्या आहेत. पहिल्या महायुद्धांत डोव्हरच्याभोंवती मोठा खंदक खणण्यांत आला. स्विंकगेटच्या भागांत मोठें विमानगृह बांधण्यांत येऊन त्या ठिकाणीं विमानासंबंधींचें शिक्षण देण्यांत येऊं लागलें. महायुद्धाच्या पूर्वार्धांत डोव्हर हें आरमाराचें केंद्र होतें, पण पुढे तें बदलण्यांत आलें व त्याचा मुख्यतः व्यापारासाठीं उपयोग करण्यांत येऊं लागला. डोव्हरचें ऐतिहासिक महत्त्व असल्याकारणानें येथील किल्ला व इतर पुरातन इमारती यांची डागडुजी करण्यासाठीं पुराणवस्तु-संरक्षक खात्यानें बरेच परिश्रम घेतले आहेत. स. १९२० नंतर डोव्हरच्या टापूंतील केंट येथील कोळशाच्या खाणी खणण्यांत आल्या. या खाणी खण-ण्याच्या कामी डोव्हर येथें एक स्वतंत्र कंपनी स्थापन झाली होती. लो. सं. ४१,०९५.

**डोव्हरची पुडी**—हें एक अफू ( एक ग्रेन ), इपेकाकुआन्हा ( एक ग्रेन ) व पोटॅशियम सल्फेट ( आठ ग्रेन ) यांचें मिश्रण असून तें सामान्यतः प्रौढ माणसास एका वेळीं दहा ग्रेन देण्यांत येतें. याचा उपयोग सर्दी वगैरेमध्यें घाम आणण्याकरितां होतो. तसेंच पोटामध्यें वायु धरला असल्यास, अमांश अगर अतिसार झाल्यास याचा उपयोग करण्यांत येतो.

**डोळे येणें**—या रोगांत डोळ्याच्या पापण्यांच्या आंतील श्लेष्मल त्वचेचा दाह होतो. डोळे लाल होऊन त्यांतील पांढरा भाग सुजतो, व डोळ्यांतून पू बाहेर येऊं लागतो. डोळ्याची आग होते व ते खुपूं लागतात. तथापि साध्या रोगांत प्रकाशा-कडे पाहण्यापासून फारसा त्रास होत नाहीं. हा रोग तीव्र अथवा जीर्ण स्वरूपाचा असूं शकतो. पापणीच्या आंतील अंतस्त्वचेवर बारीक पुटकुळ्या येऊन खुपऱ्या होतात. नवीन जन्मलेल्या मुलांना कधीं कधीं मातेच्या संसर्गजन्य विकारामुळें या रोगाची

तीव्र बाधा होऊन अंधत्वहि येतें; त्यासाठीं सुइणीनें फार काळजी घ्यावी लागते.

**डौडन, एडवर्ड** (१८४३–१९१३)—एक आयरिश कवि व टीकाकार. तो १८६७ सालीं डब्लिन येथील ट्रिनिटी कॉलेज-मध्यें इंग्लिश वाङ्मय या विषयाचा प्रोफेसर झाला. 'शेक्स्पिअर, हिज माइन्ड ॲन्ड आर्ट' (शेक्स्पिअरचें अंतरंग आणि कला), 'लाइफ ऑफ शेले', 'रॉबर्ट ब्राउनिंग', आणि 'एसेज मॉडर्न ॲन्ड एलिझाबेदन' हे त्याचे टीकाग्रंथ आहेत. त्याचा एक कवितासंग्रह १८७६ मध्यें प्रसिद्ध झाला. आणि १९१४ सालीं त्याचीं 'पोएटिकल वर्क्स' (काव्यग्रंथ) आणि 'लेटर्स' (पत्रव्यवहार) हीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं.

**डौर**—हें संस्कृत 'डमरू' शब्दाचेंच अपभ्रष्ट रूप आहे. 'डमरू' वाद्य वाजवून शंकरानें तांडवनृत्य केलें असें पुराणांतील वर्णन आहेच. इकडे भिक्षा मागणारे जे गोंधळी, वाघ्ये, वगैरे लोक, त्यांपैकींच 'डौरी' हा एक वर्ग आहे. हे लोक हातानें डौर वाजवून तोंडानें देवादिकांचीं गाणीं गाऊन भिक्षा मागतात. डौराचा आकार मापी अच्छेरासारखा असून त्याचीं दोनहि तोंडें कातड्यानें मढविलेलीं असतात. सुताच्या दोरीनें हीं कातडीं तोंडें ताणतां येतील अशा प्रकारें ती सुतळी ओढून मध्यें गुंडाळलेली असते. हें वाद्य हाताच्या बोटांनीं वाजवितात.

**ड्युडरनेक**—हा फ्रेंच लढवय्या तुकोजी होळकराच्या सैन्यांतील एक लष्करी अमलदार होता. याला तुकोजीनें स. १७९२ च्या सुमारास चाकरीस ठेवून त्याच्याकडून पायदळाचीं चार पलटणें कवाईत शिकवून तयार करून घेतलीं. याच सालीं हा व शिंद्याचा सेनापति डी बॉइने हे दोघेहि रजपुतांच्या मुलुखांत खंडण्या गोळा करीत फिरत असतां, एकदां वांटणीसंबंधांत दोघांमध्यें कांहीं भांडण होऊन अजमेरजवळ लखैरी येथें दोघांची लढाई झाली. शिंद्याच्या बाजूस गोपाळरावभाऊ, लखबादादा व डी बॉइने हे सरदार असून त्यांच्याजवळ २०,००० स्वार व ९,००० पायदळ एवढा सरंजाम होता. ड्युडरनेकजवळ ३०,००० फौज व पायदळाच्या चार पलटणी होत्या. आयत्या वेळीं दारूच्या १२ बुधल्यांना आग लागून भडका उडाल्यामुळें शिंद्याच्या सैन्यांत गोंधळ उडाला. तरीहि शिंद्याचें सैन्य झाडींत असल्या-कारणानें ड्युडरनेकला या गोंधळाचा फायदा घेतां आला नाहीं. या लढाईंत ड्युडरनेकच्या चारहि पलटणी जवळजवळ सबंध गारद होईपर्यंत शिंद्याच्या सैन्याशीं शौर्यानें लढल्या. परंतु शेवटीं ड्युडरनेकचा पराभव झाला. खर्ड्याच्या लढाईंत ड्युडरनेक हा आपल्या २,००० हजार कवाइती पायदळासह तुकोजी होळकराबरोबर होता (१७९५). तुकोजी होळकराच्या मृत्यूनंतर हा आरंभीं खासेरावाच्या पक्षाकडे होता. परंतु इ. स. १८०० च्या सुमारास यशवंतरावाच्या धाडशीपणामुळें त्याच्याविषयीं अनुकूल मत होऊन तो आपलें सर्व पायदळ व तोफखाना घेऊन त्याला मिळाला. पण पुढें त्यालाहि सोडलें.

१८०३ सालच्या ऑगस्ट महिन्यांत शिंद्याचें इंग्रजांशीं युद्ध सुरू झालें तेव्हां शिंद्यानें ड्युडरनेक याजबरोबर सात पलटणी देऊन त्यास दक्षिणेंतून उत्तर हिंदुस्थानांत पेरॉनच्या मदतीस पाठविलें. ड्युडरनेक आपल्या पलटणींसह ऑक्टोबर महिन्यांत उत्तर हिंदुस्थानांत आला. परंतु इंग्रजांशीं लढण्याच्या ऐवजीं तो फितुर होऊन इंग्रजांस मिळाला!

**ड्युब्वा पिएर** (१२५०–१३१२)—हा फ्रेंच ग्रंथकार फिलिप दि फेअर या राजाच्या कारकीर्दींत प्रसिद्धीस आला. ह्यानें राजकीय विषयांवर बरीचशीं लहान लहान चोपडीं लिहून प्रसिद्ध केलीं. याचें शिक्षण पॅरिस येथें झालें. ह्यानें रॉजर बेकन याच्या मतांचा अभ्यास केला होता. इ. स. १३०६ मध्यें तो ग्वायानामध्यें पहिल्या एडवर्डचा वकील म्हणून होता. यानें राजकारणांत अत्यंत महत्त्वाचा भाग घेतला व सैन्य, चर्च, धर्म, वगैरे बाबतींत सुधारणा करण्याच्या योजना आंखल्या होत्या.

**ड्यूमा** (१८००–१८८४)—एक फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ. त्यानें जिनिवा येथें एम्. ए. पिक्टेट याचीं पदार्थविज्ञानशास्त्रावर, व सी. जी. डी. लारिव्हि याचीं रसायनशास्त्रावर व ए. पी. डी. कंडोल याचीं वनस्पतिशास्त्रावर व्याख्यानें ऐकिलीं व लौकरच पिरी प्रिव्होस्ट याजबरोबर त्यानें प्राणिगुणधर्मासंबंधानें रसायनशास्त्रांत शोध सुरू केले. १८२३ सालीं त्यानें जिनिवा सोडलें व तो पॅरिस शहरीं आला. तेथेंच तो शेवटपर्यंत होता. त्यानें तेथें लवकरच नांव मिळविलें व दहा वर्षांच्या आंत तो शास्त्रविद्यापीठाचा सभासद झाला. वयाच्या पन्नासाव्या वर्षाच्या सुमारास तो राजकारणांत शिरला व राष्ट्रीय कायदे करणाऱ्या मंडळीचा सभासद झाला. १८५१–१८५२ सालच्या सुमारास कांहीं महिने तो व्यापार व शेतकी खात्याचा प्रधान झाला होता. नंतर लवकरच सिनेटर, पॅरिस म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष व फ्रेंच टांकसाळीचा तो मुख्य झाला. परंतु दुसऱ्यांदां फ्रेंच साम्राज्याचा ऱ्हास झाल्या वेळीं याच्या राजकीय कारकीर्दीचाहि अंत झाला.

एकोणिसाव्या शतकांतील प्रमुख शास्त्रज्ञांत याची गणना होते. बर्झेलियसच्या विद्युद्रसायनावर टीका करणारा हा पहिला गृहस्थ होय. त्याच्या कल्पनेचा त्या वेळेस फार प्रसार झालेला होता व तीच कल्पना खरी अशी लोकांची समजूत होती. संयुक्त द्रव्यांत अणूंची अदलाबदल होऊं शकते हें यानें प्रथम ठरविलें.

ड्यूमा हा हुशार लेखक होता. व्यावहारिक रसायनशास्त्रावर त्यानें आठ ग्रंथ लिहिले. १८४० सालापासून तो 'पदार्थविज्ञान

व रसायनशास्त्र यांचा इतिहास' या पत्रकाचा संपादक होता. शिक्षक या दृष्टीनेंहि ड्यूमा याचीं शुद्ध व व्यावहारिक रसायनशास्त्रावरील व्याख्यानें फार महत्त्वाचीं असत.

**ड्यूमा, अलेक्झांडर** (१८०३–१८७०)—**१.** एक प्रसिद्ध फ्रेंच कादंबरीकार व नाटककार होता. यानें लहानपणींच लिहिण्यास सुरुवात केली व वयाच्या सव्विसाव्या वर्षीच त्याचें पहिलें नाटक 'हेन्री तिसरा' हें यशस्वी झालें. याच वर्षी त्यानें 'ख्रिस्ताइन' नांवाचें दुसरें एक नाटक लिहिलें. त्यानंतर त्याने 'अँटनी', 'रिचर्ड द आर्लिंग्टन', 'टेरेसा', 'लातूर द नेस्ल', 'कॅथरीन हॉवर्ड' आणि 'मादमॉसेल द बेल आइल' हीं नाटकें एकामागून एक लिहून काढलीं. यानंतर तो अद्भुत कादंबरीलेखनाकडे वळला व त्याने अनेक ऐतिहासिक अद्भुतरम्य कादंबऱ्या लिहून काढल्या. त्यांपैकीं कांहींचीं नांवें द्यावयाचीं म्हटलीं तर 'ल बातार्द द मोलेऑं', 'इसाबेल द बाव्हिएर', 'ले ग्यू दिआनिस', 'ला रीन मार्गो', 'ले त्र्वा मुस्केतेरस'. इत्यादि होत. याच्या 'मॉंटेक्रिस्टो', 'थ्री मस्केटिअर्स', वगैरे कादंबऱ्यांचीं इंग्रजी भाषेमध्यें व इंग्रजीमधून मराठीमध्यें भाषांतरें झाल्यामुळें त्या इंग्रजी व भारतीय वाचकांस सुपरिचित झालेल्या आहेत. याच्या नांवावर सुमारें १,२०० ग्रंथ मोडतात. त्यांत ६० नाटकें आहेत. परंतु वास्तविक त्यानें हे सर्व ग्रंथ स्वतः लिहिलेले नाहींत तर तो कथानक लिहून काढीत असे किंवा दुसऱ्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांवर एकदां स्वतः हात फिरवीत असे. याच्या ग्रंथांमध्यें कलेपेक्षां निर्माणकौशल्य अधिक दिसून येतें. यानें जरी आपल्या प्रतिभेचा वाजवीपेक्षां जास्त उपयोग केलेला असला तरीसुद्धां एकंदर या ग्रंथकाराबद्दल व त्याच्या कृतीबद्दल अगदी वेगवेगळ्या प्रकारच्या लोकांत आदर होता. न. चिं. केळकर यांनीं याच्या 'रिशेल्यू' या कादंबरीवरून 'अमात्य माधव' हे नाटक रचिलें आहे.

२. (१८२४–१८९५४)—हा फ्रेंच कादंबरीकार व नाटककार वरील अलेक्झान्डर ड्यूमाचा दासीपुत्र होता. आपल्या बापाच्या सहवासांत पॅरिसमधील चालीरीतींचें व मनुष्यस्वभावाचें यथार्थ ज्ञान त्याला सहजच प्राप्त झालें. बापाजवळ खूप संपत्ति आहे असा त्याचा भ्रम होता पण तो खोटा ठरला. व त्याला लेखकाचा धंदा करावा लागला. १८४७ सालीं त्यानें 'पेशे द जुनेसे' हा छोटासा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. १८४८ सालीं त्यानें 'ला दाम ओ कामोलिआ' नांवाची कादंबरी लिहिली व ती बरीच लोकप्रिय झाली. १८४८ मध्यें 'लामी दे फाम' व १८५१ मध्यें 'दिआन द लीस' या कादंबऱ्या लिहिल्या. पुढें त्यानें 'ला दाम ओ कामोलिआ' हिला नाटकाचा पेहराव चढविला. पण बरेच दिवस तें नाटक रंगभूमीवर आणण्यास परवानगी मिळाली नाहीं. पण दोन वर्षांनंतर त्याला परवानगी मिळाली व त्याचे प्रयोग झाले व तें नाटक अत्यंत यशस्वी ठरलें. याशिवाय 'दिआन द लीस', 'ला क्रश्यँ दार्जो', वगैरे याचीं प्रमुख नाटकें आहेत. हा उच्च प्रतीचा नाटककार होऊन गेला. त्याची भाषा उत्तम व जुन्या वळणाची व विनोदपूर्णहि आहे. १८७४ सालीं फ्रेंच ॲकेडमीमध्यें याची निवडणूक झाली.

**ड्यूरर, आल्ब्रेक्ट** (१४७१–१५२८)—एक सुप्रसिद्ध खोदकलाभिज्ञ. तो बेल्गेमाट नांवाच्या सुप्रसिद्ध चित्रकलाभिज्ञाकडे उमेदवार म्हणून राहिला. उमेदवार असतांना ड्यूररला चित्रकलेचे व नक्षीकामाचेंहि बरेंच ज्ञान मिळालें. १४९० सालीं तो प्रवासास निघाला. जर्मनींत तो कॉलमुर येथें शौंगुर या सुप्रसिद्ध चित्रकारापाशीं शिक्षण घेण्याकरितां आला. पण तेथे येतांच त्याला शौंगुर मेल्याची बातमी समजली. तथापि शौंगुरच्या भावांनीं त्याला आपल्यापाशीं ठेवून घेऊन धातु खोदकाम व लांकडावरील नक्षीकाम शिकविलें. १४९४ सालीं तो नूरेंबर्गला परत आला. प्रवासांत असतांना त्यानें बरींच चित्रें काढलीं. त्यांत शौंगुरच्या चित्रकलापद्धतीची छाया दृष्टोत्पत्तीस येते.

जाड तांब्यावर चित्रें कोरण्याच्या कलेचाहि त्यानें अभ्यास चालविला होता. लांकडावर तो वाटेल तशीं अवघड चित्रें कोरीत असे. पण तांब्यावर मात्र तो प्रथम साधीं व अप्रसिद्ध व्यक्तींचीं चित्रें काढीत असे. १५०३ सालीं त्यानें नेमिसिस्चें नग्नस्थितींतील जें चित्र काढलें आहे तें फार उत्कृष्ट साधलें आहे. १५००–१५०५ या काळांतील ड्यूररचीं चित्रें चांगलीं आहेत. तथापि त्यांत प्रमाणबद्धता, साधेपणा व कल्पकता प्रामुख्यानें दिसून येत नसून बाह्य भपकेपणाकडेच अधिक कल दिसून येतो.

१५०५ सालीं ड्यूरर हा इटलीस गेला. तेथील जर्मन रहिवाशांकडून त्याला सेंट बार्थोलोम्यूच्या प्रार्थनामंदिरासाठीं एक चित्र काढण्याचें काम मिळालें. हें चित्र 'फीस्ट ऑफ रोज गार्लेंड्स' या नांवाने प्रसिद्ध आहे. यांतील रंग तर इतके सुंदर भरलेले होते कीं, त्यामुळें इटलींतील नामांकित चित्रकलाभिज्ञांनीं देखील तोंडांत बोटें घातलीं. याशिवाय व्हेनीसमध्यें असतांना 'ख्राइस्ट क्रुसिफाइड', 'दि व्हर्जिन ॲंड दि चाइल्ड विथ गोल्डफ्रिंच', वगैरे चित्रें काढलीं व त्यामुळें इटलींत त्याचा सर्वत्र बोलबाला झाला; एवढेंच नव्हे तर युरोपभर त्याची प्रसिद्धि झाली.

१५०७–१५११ च्या दरम्यान त्यानें 'ॲडम ॲंड ईव्ह', 'व्हर्जिन विथ दि इरिल', वगैरे चित्रें रंगविलीं. 'ॲडम ॲंड ईव्ह' या चित्रांत त्यानें आपलें सारें कौशल्य खर्च केलें आहे. १५१२ मध्ये 'लिटल पॅशन' या विषयासंबंधीं १५ चित्रें त्यानें तांब्यावर कोरलीं. १५१९ सालीं त्यानें जर्मन बादशहाच्या

प्रार्थनाग्रंथाच्या प्रत्येक पानावर सुंदर व विविध प्रकारचें चित्र काढून दिलें. ड्युररनें काढलेला चित्रसंग्रह व्हिएन्ना येथील आल्बर्टिना म्यूझियममध्यें तसेंच बर्लिन व ब्रिटिश म्यूझियममध्यें ठेवण्यांत आला आहे.

**ड्युसेल्डॉर्फ**—प्रशियाच्या ऱ्हाइन नदीच्या प्रांतांतील जर्मनीचें एक शहर. पश्चिम जर्मनीतील सुंदर शहरांत ह्या शहराची गणना होत असून तें मध्य युरोपांतील मोठ्या जलमार्गावर व आगगाडीच्या मुख्य रस्त्यांच्या संगमकेंद्रावर असल्यामुळें तेथील उद्योगधंद्याची वाढ झपाट्यानें झाली आहे. येथें उद्योगधंद्यांतील कलाकौशल्याचें पदार्थसंग्रहालय, ऐतिहासिक अजबखाना, उद्योगधंद्याच्या शिक्षणासाठीं शाळा व संस्था असून बऱ्याच व्यापारी मंडळ्या येथें आहेत. परंतु हें शहर प्रसिद्धीस येण्याचें मुख्य कारण येथील चित्रकलेचें विद्यापीठ होय. शहराच्या एका नगरोपांतांत बंदर आहे. त्यांत मोठमोठीं जहाजें उभीं राहण्याकरितां विस्तृत धक्के असल्यामुळें ड्युसेल्डॉर्फचा लंडन व डच शहरांशीं चालणारा व्यापार पुष्कळ वाढला आहे. येथील उद्योगधंद्यांत लोखंडाचे कारखाने, विणकाम व त्या आनुषंगिक असे दुसरे मुख्य धंदे आहेत. लो. सं. ५,३९,९०५.

**ड्राफ्ट्स**—हा एक बुद्धिबळासारखा बैठा पाश्चात्य खेळ आहे. यांत बुद्धिबळासारखी फारशी अक्कल लढवावी लागत नाहीं. तथापि या खेळाचे आंतरराष्ट्रीय सामने होतात. या खेळांत २४ ड्राफ्ट्समन किंवा सोंगट्या असतात; पैकीं बारा काळ्या व बारा पांढऱ्या असतात. पटावर काळीं पांढरीं अशीं ६४ घरें असतात. सोंगट्या रिकाम्या घरांत सरकवून प्रतिस्पर्ध्याच्या सोंगट्या मारणें हा हेतु असून एखादी सोंगटी प्रतिस्पर्ध्याच्या काळ्या चौकटींतून गेली तर ती राजा बनून स्वैर संचार करते.

**ड्रायडन, जॉन** ( १६३१–१७०० )—एक प्रसिद्ध इंग्लिश कवि. याचें शिक्षण वेस्टमिनिस्टर ट्रिनिटी कॉलेजांत झालें. १६५९ सालीं ड्रायडननें क्रॉमवेलच्या मृत्यूस उद्देशून केलेल्या कांहीं कविता प्रसिद्ध करून काव्यप्रांतांत पदार्पण केलें. त्यानें प्रथम नाटकेंच लिहिलीं व तीं लोकांना फार आवडलीं. १६६७ सालीं 'ॲनस मिरॅबिलिस' ही महत्त्वाची कविता प्रसिद्ध केली.

उपहासगर्भलेखनाचाहि ड्रायडननें अभ्यास केला होता. त्यानें १६८२ सालीं 'ॲबसॅलोम ॲंड अचितोफेल', 'दि मेडल' व 'मॅक् फ्लेक्नो' या उपहासगर्भ कविता प्रसिद्ध करून कीर्ति मिळविली.



इ. स. १६८८ पर्यंत ड्रायडनची भरभराट होती. त्यास राजकविपद मिळालें होतें. त्यानें आधींच रोमन कॅथॉलिक पंथ स्वीकारला होता. पण तिसरा वुइल्यम गादीवर येतांच सारा मनु पालटला. त्याचें व्हर्जिलचें भाषांतर १६९७ त प्रसिद्ध झालें. मृत्यूनंतर वेस्ट मिनिस्टर ॲबेमध्यें त्याला स्थान मिळालें. इतकी त्याला लोकप्रियता लाभली होती. 'इंडियन क्वीन', 'दि इंडियन एंपरर', 'दि हिंद ॲंड दि पॅन्थर' हें त्याचें हिंदुस्थानविषयक नाटकें व कविता यांचें प्रख्यात लिखाण आहे.

**ड्रॉयसन, जोहान गुस्टाव्ह** ( १८०८–१८८४ )— हा जर्मनींतील एक मोठा इतिहासकार होऊन गेला. त्याचें सर्व शिक्षण स्टेटिन येथें व बर्लिन विश्वविद्यालयांत झालें. इ. स. १८२९ त तो बर्लिनमधील ग्रेन क्लोस्टर संस्थेंत शिक्षक झाला. स. १८४० त कील येथें त्याला इतिहास विषयाचा अध्यापक नेमिलें. त्यानें त्या वेळीं उपस्थित झालेल्या राजकीय चळवळींत डेन्मार्कविरुद्ध डचांची बाजू चांगली उचलून धरली होती. स. १८४८ त फ्रँकफोर्टच्या पार्लमेंटचा तो सभासद निवडून आला. स. १८५१ त त्याला येथें प्रोफेसर नेमण्यांत आलें. तो १८५९ मध्यें बर्लिनला गेला तो मरेपर्यंत तेथेंच होता. त्याच्या ग्रंथांमध्यें अलेक्झांडरचा इतिहास, प्रशिया, डेन्मार्क व श्लेस्विग होल्स्टेन यांच्यासंबंधींचा इतिहास हे प्रमुख आहेत.

**ड्रिंकवॉटर, जॉन** ( १८८२–१९३७ )—एक इंग्रज कवि व नाटककार. तो पुष्कळ वर्षे निरनिराळ्या विमा कंपन्यांत कारकून होता. 'पिल्ग्रिम प्लेअर्स' हें नाटकगृह तयार करण्यास तो कारणीभूत झाला. हल्लीं त्याच नाटकगृहाला 'बर्मिंगहॅम रिपर्टरी थिएटर' हें नांव आहे. त्याचें पुष्कळ लिखाण आहे. त्यांत कांहीं काव्यसंग्रह व कांहीं टीकात्मक निबंध आहेत. 'आब्राहाम लिंकन', ऑलिव्हर क्रॉमवेल', 'मेरी स्टुअर्ट', 'रॉबर्ट बर्न्स' हीं त्याचीं नाटकें आहेत.

**ड्रुइड**—प्राचीन ब्रिटन व गॉल देशांतील केल्ट नामक लोकांचे हे धर्मोपदेशक (प्रीस्ट) होत. सीझरनें असें लिहून ठेवलें आहे कीं, या लोकांचा केल्टिक राष्ट्रांत मोठा अधिकार असे. त्यांना भूमितीचें व सृष्टिशास्त्राचें ज्ञान असे, व धार्मिक व नैतिक बाबतींत त्यांचें आधिपत्य असे; व न्यायदानाचें काम त्यांच्याकडेच असे. ओक वृक्षावर वाढलेल्या मिसलटो नांवाच्या लतेला व त्या ओकवृक्षाला ड्रुइड लोक पूज्य–पवित्र मानीत असत. त्यांचीं धार्मिक तत्त्वें काय होतीं, याची माहिती मिळत नाहीं. त्यांच्या पूज्यस्थानाभोंवतीं वाटोळा दगडी कठडा असावा, असें इंग्लंडांत स्टोनहेंज येथील अवशेषांवरून वाटतें. कांहीं संशोधकांच्या मतें हे वाटोळे रचून ठेवलेले दगड ड्रुइड लोकांच्याहि पूर्वीचे असावेत.

**ड्रुमाँड, विल्यम** ( १५८५–१६४९ )—एक स्कॉटिश कवि. तो आपल्या आयुष्याचा बहुतेक काळ हॉथॉर्नडेन या गांवीं निवृत्त स्थितींत राहिला. बेन जॉन्सन हा प्रसिद्ध ग्रंथकार ड्रुमॉडला भेटण्याकरितां १६१९ च्या जानेवारींत गेला होता. तेथें या दोघांचें जें संभापण झालें तें ड्रुमाँडनें लिहून काढलें. या भापणाचें संपूर्ण पुस्तक १९२३ सालीं प्रसिद्ध झालें. त्याचे मुख्य ग्रंथ पुढील आहेत—१. 'ए सायप्रस ग्रोव्ह'—या गद्य ग्रंथांत मृत्यू-विषयींचे आपले विचार ड्रुमॉडनें ग्रथित केले आहेत; २. 'फ्लावर्स ऑफ झिऑन ऑर स्पिरिच्युअल पोएम्स'; ३. 'दि रिव्हर फोर्थ फीस्टिंग'; आणि ४. 'हिस्टरी ऑफ दि लाइव्हज अ‍ॅन्ड रेन्स ऑफ दि फाइव्ह जेम्सेस'; ५. किंग्ज ऑफ स्कॉटलंड'. त्याचीं धार्मिक मतें जॅकोबाइट लोकांच्या हायचर्च या धार्मिक पंथाचीं होतीं. त्याच्या ऐतिहासिक ग्रंथांतील भापा अलंकारयुक्त आहे.

**ड्रयूझ**—हे लोक सीरियन वंश आणि अरेबियन वंश यांच्या-पासून झालेल्या मिश्र जातीचे आहेत. ही ड्रयूझ लोकांची जमात लेबानॉन आणि अ‍ॅन्टीलेबानॉन या पर्वतावर आणि दमास्कसच्या वायव्येकडील हौरान प्रांतांत राहते. त्यांचा धर्म ज्यू धर्म, ख्रिस्ती धर्म आणि इस्लाम धर्म या तीन धर्मांतील तत्त्वांचें एकीकरण करून बनलेला आहे. या जमातींतले बहुतेक लोक साक्षर म्हणजे लिहितां वाचतां येणारे आहेत. त्यांची एकंदर लो. सं. १,००,००० आहे. या लोकांची इंग्रज लोकांबरोबर फार मैत्री आहे. या लोकांनीं १९२५ सालीं फ्रेंच लोकांविरुद्ध मोठें बंड केलें होतें.

**ड्रेस्डेन**—हें बर्लिनच्या दक्षिणेस असलेलें जर्मनींतील सॅक्स-नीच्या राजधानीचें शहर एल्ब नदीच्या दोन्ही किनाऱ्यांवर वसलें आहे. मनोहर नगररचना व अनेक प्रेक्षणीय स्थळें यांमुळें ड्रेस्डेन शहरास पुष्कळ वेळां जर्मन फ्लॉरेन्स असें म्हणतात. कला-कौशल्याची समृद्धि, शिक्षणाच्या सोयी व भोंवतालचा रम्य प्रदेश यांना लुब्ध होऊन पुष्कळ सुखवस्तु लोक येथें येऊन राहतात. येथील राजघराणे जरी रोमन कॅथॉलिक आहे तरी शहरांतील बरेच लोक प्रॉटेस्टंट धर्मीयच आहेत. लो. सं. साडेसहा लाख.

या शहराची वाढ १९ व्या शतकांतील अखेरच्या २० वर्षांत झाली असून तें आतां जर्मनींतील व्यापारांत व उद्योगधंद्यांत प्रमुख असलेल्या शहरांत गणलें जातें. ड्रेस्डेनचीं चिनी मातीचीं भांडीं फार प्रसिद्ध आहेत. तसेंच येथें पिआनो व शास्त्रीय उप-करणीं होतात.

ड्रेस्डेनचा एवढा नांवलौकिक होण्याचें मुख्य कारण म्हणजे येथें असलेला कलाकौशल्याच्या, साहित्याच्या व शास्त्रीय वस्तूंचा प्रचंड संग्रह होय. यांत पहिली जागा अजबखान्यांत असलेल्या चित्रांच्या दिवाणखान्यास दिली पाहिजे. येथें ३,९०० वर चित्रें असून त्यांत इटालियन, डच व फ्लेमिश चित्रकलांचे उत्कृष्ट मासले आहेत.

ड्रेस्डेन हें लोहमार्गाचें एक केंद्रस्थान असून येथून उत्तर व मध्य जर्मनीच्या व ऑस्ट्रियाच्या किंवा पूर्वेच्या कोणत्याहि शहराशीं दळणवळण ठेवतां येतें.

नेपोलियनला जे मोठमोठे विजय मिळाले त्यांतील शेवटचा ड्रेस्डेन येथील होय. ही लढाई दोन दिवस चालली होती. फ्रेंचांच्या हातीं लागल्यावर त्यांनीं या शहराची तटबंदी पाडून टाकली.

पहिल्या महायुद्धांत जर्मनींतील इतर कोणत्याहि शहरापेक्षां ड्रेस्डेन शहराचें अतिशय नुकसान झालें. ड्रेस्डेन हें ललितकलांचें माहेरघर असल्यानें तेथें दररोज परदेशीय पाहुणे येत असत, व वाटेल तसा पैसा खर्च करीत असत. पण महायुद्ध सुरू झाल्यावर पाहुण्यांची संख्या नाहींशीच झाली. त्यामुळें तेथील वस्तूंचा खप नाहींसा झाला, व ड्रेस्डेनची आर्थिक परिस्थिति खालावली. तीच स्थिति दुसऱ्या महायुद्धांत व नंतर झाली.

---

## ढ

**ढ**— नागरी लिपीच्या वर्णमालेपैकीं 'ढ' हें एकच अक्षर असें आहे कीं, जें पूर्वीपासून आपल्या मूळ स्वरूपांतच अद्यापहि बहुतेक जसेंच्या तसें कायम आहे.

**ढकला, ढीग**—( ड्रिफ्ट ). भूस्तरशास्त्रामध्यें, जेव्हां पाण्याच्या पुरामुळें किंवा बर्फाच्या प्रवाहामुळें माती किंवा खडक वाहत जाऊन एखाद्या प्रदेशावर पडून राहतात तेव्हां त्यास प्रवाहजनित खडक असें म्हणतात. कधीं कधीं ही संज्ञा नवनूतन ( प्लिओसिन ) युगाच्या नंतरच्या काळांतील वाळू, कंकर, माती, वगैरेंच्या जमिनीच्या पृष्ठभागावर आढळून येणाऱ्या थरांस लावतात.

**ढग**—हवेंत, जमिनीपासून बरेच वर जे धुक्याचे पुंज जमतात त्यांना हें नांव आहे. हवा उष्ण असली म्हणजे जमीन तापते व खालून वर ऊन वारे वाहतात. हे वारे वर गेल्यावर त्यांच्यावरचा हवेचा दाब कमी होऊन ते पसरतात व थंड होतात. पुन्हां ते अशा पातळीवर येतात कीं, त्यांतील आर्द्रता अदृश्य स्वरूपांत राहूं शकत नाहीं. घनीभवन सुरू होतें व ढग बनत जातात. उष्ण आणि थंड हवा एकत्र आल्यास थंड हवा उष्ण हवेला वर ढकलते व त्यामुळेंहि ढग तयार होतो. पर्वताच्या उतरत्या पृष्ठभागावरून वाहणाऱ्या वाऱ्यामुळेंहि हाच प्रकार

होतो. तंतुमेघ ( सायरस ), स्तरमेघ ( स्ट्रॅटस ), व पुंजमेघ ( क्युम्युलस ) हे ढगाचे तीन प्रमुख वर्ग आहेत. तंतुमेघ हलके असून बहुधा वादळापूर्वी आकाशांत दिसतात. पुंजमेघ दाट व फुगीर असतात व स्तरमेघ एकावर एक आडवे पसरलेले असतात. पयोधर मेघ पावसापूर्वीचे असून त्यांचा रंग काळा-कभिन्न असतो. कसर ( सायरस-क्युम्युलस ), तडिद्गर्भ ( क्युम्युलोनिंबस ), तंतुस्तरी ( सायरस-स्ट्रॅटस ), इ. ढगांचे पुष्कळ प्रकार आहेत.

**ढालाईत**—मराठी राज्यांत ढालाईत म्हणून नोकर असत. यांच्याजवळ ढाल व तरवार असे. हे खुद्द छत्रपति, पेशवे व इतर मोठमोठ्या सरदारांजवळ असत. एखाद्या अपराध्यास पकडून आणावयाचें असल्यास यांना पाठवीत. त्यांच्याजवळ पकडून आणण्याचा सरकारी हुकूम असे. त्या हुकुमाप्रमाणें अपराधी आपण होऊन त्यांच्या स्वाधीन झाल्यास ते त्यास त्रास देत नसत; परंतु त्यानें प्रतिबंध केल्यास हाणामार करून त्याच्या मुसक्या बांधून त्यास घेऊन जात; त्यांचा खाण्यापिण्याचा खर्च सरकार या अपराध्याकडून वसूल करून घेई. त्यास मसाला असें नांव असे.

**ढिसा**—( किंग फिशर ). हा पक्षी जगांतील सर्व भागांत आढळतो. हा सामान्यतः नदीच्या कांठीं राहतो. याच्या निरनिराळ्या देशांत अनेक जाती आहेत. यांचीं पिसें चित्रविचित्र रंगांचीं असतात.

**ढीमर**—मासे मारणारांची व पालख्या वाहणारांची ही जात मध्यप्रांत-वऱ्हाडांत विशेषतः मराठी जिल्ह्यांतून पुष्कळ आहे. यांची संख्या जवळजवळ तीन लाख आहे. गोंड लोक भोई संज्ञा फार सन्मानाची समजतात; यावरून बरेच गोंड ढीमर व भोई जातींत शिरले असावे.

यांचे उपवर्ग बरेच आहेत. शिंगाडे पेरणारांस सिंगारिया, नदी व नाल्याच्या कांठीं राहणारांस बाढा, पाटा व जातें यांना टाकी लावणारांस टांकीवाले, झिंगे धरणारे झिंगे अशीं नांवें उपवर्गांचीं आहेत. हीं अर्थात् धंद्यावरून पडलीं आहेत. धुरिया हे लाह्या व पोहे विकतात व यांचा मूळपुरुष महादेवानें पार्वतीची पालखी वाहून नेण्याकरितां मूठभर मातीपासून निर्माण केला, अशी त्यांची समजूत आहे. सोनझारा ढीमर सोनें मिळविण्याकरितां झारेकऱ्याचें काम करतात. कसधोनिया हे स्नानाच्या वेळीं क्षेत्रांतील नद्यांतून लोकांनीं टाकलेले पैसे उचलतात. कोल लोक पालखी वाहण्यांत फार कुशल आहेत. सुवरहा लोकांचें नांव डुकरावरून पडलें आहे. गधेवाले ढीमर ओझ्यांचीं गाढवें बाळगतात.

याच्यांत बरेच असगोत्रविवाही, पशुपक्षी व झाडांचीं नांवें घेतलेले लोक आहेत; जसें, वाघमारे, ओझवे, गुरुपहचान, भिदोईया ( सीमा राखविणारे ), गिधवे ( गिधाड ), गधेखाय, कस्तुरे, तुमसरे, वगैरे.

**ढुंढ्ये जैन**— जैन जातींत श्वेतांबरांतच ढुंढ्या या नांवाची एक शाखा आहे. यांना माळव्यांत शेवडे असें नांव आहे. पण हे स्वतःस साधुमार्गी अथवा मठमार्गी म्हणवितात. हा पंथ फार विचित्र आहे. ते मूर्तिपूजा मानीत नाहींत; अर्थात् या लोकांना मंदिराची आवश्यकता नाहीं. मनोविकारांचें दमन करणें हाच मोठा धर्म असें ते समजतात; आणि या धर्माचें चिंतन तीच त्यांची मानसपूजा. तीर्थकरांच्या पवित्र आचरणाचा कित्ता वळवावा असें ते म्हणतात. पण तीर्थंकरांना विशेष मान देण्याचा प्रघात त्यांच्यांत नाहीं. त्यांचे गुरु शुभ्र वर्णाचीं पण मळकीं वस्त्रें पांघरतात. श्वासोच्छ्वास करतांना उष्ण श्वासानें हवेंतले क्षुद्र जीव मरूं नयेत म्हणून तोंडावर कापडाची एक पट्टी बांधतात, व रस्त्यानें चालतांना पाय पडून जीवजंतूंची प्राणहानि होऊं नये म्हणून झाडण्यासाठीं हातात एक कुंचा घेऊन फिरतात. या कुंचाला रजोहरण असें म्हणतात. हे लोक सगळ्या जन्मांत कधीं स्नान करीत नाहींत व हजामत करवीत नाहींत; हातानें केंस उपटतात. यांचें राहणें मठांत असतें. या मठाला थानक म्हणतात. यांच्यांत शिकलेले किंवा धार्मिक ग्रंथ पढलेले लोक फार थोडे आहेत. यांच्यात काहीं स्त्रिया आजन्म कुमारी राहतात व ब्रह्मचर्यव्रत पाळतात.

**ढेंकूण**— अर्धपक्ष कीटकवर्गांतील प्राणी. कांहीं ढेंकणांना पंख असतात व कांहींना नसतात. असतात त्यांना चार असून त्यांपैकीं वरचे पंख अर्धे जाड व अर्धे पातळ असतात. यावरूनच यांना अर्धपक्ष हें नांव पडलें. पिकांचा रस शोषून घेणारे ढेंकूण शेतांत असतात.

घरांतील ढेकणांना पंख नसतात. हे त्रासदायक कीटक बिछान्यांतून आढळतात. हे $\frac{3}{16}$ इंच लांब असतात. यांचें शरीर वाटोळसर असून बसकट असतें. यांचा रंग मळकट व गंजासारखा असतो व त्यांस स्पर्श केला असतां दुर्गंधि येते. यांची वाढ ११ आठवड्यांत होते. हे मनुष्याचें रक्त शोषून घेतात पण इतरहि कांहीं पदार्थ खातात. खाण्यास न मिळाल्यास हे कित्येक महिने उपास काढतात. ढेंकूण नाहींसे करण्यास रॅकिलसारखें सोपें व उत्तम औषध नाहीं.

**ढोर**—एक जात. दक्षिण हिंदुस्थान, बेळगांव व विजापूर या प्रांतांतून हे लोक थोडे थोडे आढळतात. या लोकांचा धंदा गुरांचीं कातडीं कमाविण्याचा आहे. यांच्या आडनांवावरून यांचीं कुळें ठरलीं जातात. उंबर, जांभूळ, इत्यादि यांचीं देवकें असून एकच देवक असणाऱ्या लोकांमध्यें विवाहसंबंध होत नाहीं. ढोर लोक मांसाहारी आहेत. महार व मांग लोकांच्या

हातचीं हे पक्की रसोई खातात. यांच्या कुलदेवता भवानी, जनाई, खंडोबा, महादेव व विठोबा ह्या आहेत. यांचे विधिसंस्कार ब्राह्मण व लिंगायत उपाध्ये चालवितात.

यांच्यांत मराठे, हिंदुस्थानी व कर्नाटकी असे तीन मुख्य भेद आहेत; हे एकमेकांशीं रोटी–बेटीव्यवहार करीत नाहीत; यांच्या भाषाहि अनुक्रमें मराठी, हिंदुस्थानी व कानडी आहेत. लो. सं. सुमारें पंधरा हजार. ढोरांचा पिढीजात धंदा कातडीं कमावण्याचा आहे. महारापासून कातडीं विकत घेऊन तीं चार दिवस चुन्याच्या पाण्यांत भिजत ठेवतात. नंतर बाहेर काढून बाभळीची साल आणि हिरडे घातलेल्या पाण्यांत उकळवितात. तीन दिवसांनंतर या पाण्यांतून काढून उन्हांत वाळवितात. या कामांत पुरुष आणि बायका दोघेंहि राबतात.

**ढोर आंवा**—हें झाड गोवें प्रांतांत फार दृष्टीस पडतें. मार्गशीर्षाच्या सुमारास याला आंव्यासारखीं वाटोळीं फळें येतात. तीं पिकलीं म्हणजे गुळचट लागतात. या फळांचें सांबारें किंवा रायतें करतात.

**ढोल**—ताशावरोबर 'ढोल' व 'मर्फा' अशीं दोन वाद्यें असतात. ढोलाचे पखवाजाच्या खोडासारखें लांकडी खोड असून त्याचीं तोंडें कातड्यानें मढविलेलीं असतात. व सुताच्या दोरीनें तीं खोडाशीं आवळलेलीं असतात. ह्यावर नुसता ताल धरावयाचा असतो. एक तोंड टिपरीनें व दुसरें हातानें, असें हें वाद्य वाजवितात.

अलीकडे इंग्रजी तऱ्हेचें पडघम (ड्रम) हें वाद्य प्रचारांत येत आहे. याचे तीन प्रकार असतात: (१) मोठा फडकें गुंडाळलेल्या काठीनें वाजवावयाचा व खालचे मंद्रस्वर काढणारा; हा फक्त मोठमोठ्या वृंदसंगीतांत व सैन्यांतील बँडमध्यें वाजवितात. (२) दोन बाजू असलेला ढोल: याच्या एकाच बाजूवर दोन काठ्यांनीं वाजवितात. (३) ताशा: याच्या तोंडावर कातडें बसविलेलें असतें व त्याचा आकार अर्धगोल असतो.

---

## ण

**ण**—मराठी वर्णमालेंतील १५ वें व्यंजन. या अक्षराचें पहिलें रूप अशोकाच्या शिलालेखांत आहे. पहिल्या व दुसऱ्या शतकांतील कुशानवंशी राजाच्या वेळचें मथुरा, सारनाथ व चारगांव ह्या ठिकाणीं जे लेख उपलब्ध झाले आहेत त्यांत दुसरें रूप आढळतें. दुसऱ्यापासून तिसरें रूप बनलें आहे. चौथें रूप स. ५३२ च्या सुमारास राजा यशोधर्मन् याच्या कारकीर्दीतील मंदसोर येथील लेखांत आहे. पांचवें रूप जपानमधील होर्युजी येथील मठांत सांपडलेल्या ताडपत्रांवरील 'उष्णीष विजयधारिणी' या ग्रंथांत व प्राचीन हस्तलिखित पुस्तकांतून सांपडतें. शेवटचें रूप हें दक्षिणेकडील नागरी लिपींतच फक्त प्रचलित आहे व इतर ठिकाणच्या नागरी लिपींत अक्षरविकासांतील सहावें रूप रूढ आहे.

---

## त

**त**—या अक्षराचें सर्वांत जुने पहिलें रूप अशोकाच्या (खि. पू. ३ रें शतक) शिलालेखांत; दुसरें पहिल्या रूपापासून जरा खालच्या तंगड्यांना गोलपणा येऊन तयार झालें आहे. तिसरें रूप सराहा (चंबा राज्य) येथें सांपडलेल्या सात्यकीच्या वेळच्या प्रशस्तीमध्यें (इ. स. १० वें शतक) आहे.

**तंगडी**—सं. जंघा. मनुष्याच्या तंगडीमध्यें पावलापासून ढोपरापर्यंत दोन अस्थी असतात. त्यांतील आंतल्या नळीस नडगी–'अंतर्जंघास्थि' (टिबिया)–आणि बाहेरील नळीस पकडहाड–'बहिर्जंघास्थि' (फिब्यूला) म्हणतात. गुडघ्याच्या पुढील भागामध्यें स्नायुदोरकामध्यें गुडघ्याची वाटी (पटेला) असते. या दोन अस्थींच्या बाजूस घोट्याचा सांधा असतो. तंगडीच्या मागच्या बाजूस दोन मोठाले स्नायू असून त्यांची पोटरी बनते, व ते एका जाड स्नायुदोरकानें बांधलेले असतात; त्यास अचिलिसबंधन (टेंडो ॲचिलीस) असें म्हणतात.

**माणसाच्या जंघेचीं हाडें**

(डावीकडून) १. (अ) वरचें–मांडीचें हाड; (आ) खालचें–अंतर्जंघास्थि; यापलीकडील–बहिर्जंघास्थि. २ मांडीचें हाड. ३ अलीकडील–अंतर्जंघास्थि; यापलीकडील–बहिर्जंघास्थि. ४ (३ च्या खालीं) गुडघ्याची वाटी.

**तगर**—तगरीचें झाड बरेंच मोठें होतें. ह्या झाडास गोडा तगर असेंहि म्हणतात. एकेरी तगरीचें फूल पारिजातकाच्या फुलापेक्षां कांहींसें मोठें असतें. तगरीचें पान लांबट असून शेवटीं त्यास टोंक असतें. तगरीच्या फुलास सकाळीं मात्र कांहीं

वास असतो. पुढें वास राहत नाहीं. मस्तकशूलावर तगरीचें मूळ उगाळून डोक्यावर लेप ठेवतात.

गांठ्या तगर—ह्या तगरीचीं झाडें हिमालय पर्वत व अलमोराचा पहाड यांवर होतात. यांच्या मुळास 'तगरमूळ' असें म्हणतात. ह्या जातीचा तगर फार सुवासिक असतो. याचा धूपांत उपयोग करतात. तगर मुळाचा रंग कांहींसा तपकिरीसारखा असतो. सुवासिक उटण्यांत व सुगंधि पदार्थांतच याचा फार उपयोग होतो. तगर शीतल, पथ्यकर, कडु, मधुर, लघु व स्निग्ध असून नेत्ररोग, मस्तकरोग, इ. व्याधींचा नाश करते, असें आर्यवैद्यकांत सांगितलें आहे.

**तघी चांभार** (१३४७–१३५०)—गुजराथेंतील एक शूर चांभार. यानें अनेक बंडखोर लोकांना वश करून घेऊन त्यांच्या साहाय्यानें मुहम्मद तुघ्लकास अगदीं जेरीस आणलें. प्रथम यानें गुजराथच्या पूर्वकडील डोंगरी मुलखांतील राजेरजवाड्यांच्या मदतीनें पाटण जिंकलें व नंतर खंबायत लुटून भडोचला वेढा दिला. याच्या बंदोबस्तासाठीं बादशहानें पाठविलेल्या युसफ बुध्रा या सरदाराचा यानें पूर्ण पराभव केला. हा जामच्या आश्रयास असतां मुहम्मद तुघ्लक याजवर चाल करून निघाला होता. परंतु वाटेंतच तट्टा शहराच्या अलीकडे तीस मैलांवर तुघ्लकास मृत्यु आला. यानंतर थोड्याच दिवसांत हाहि मरण पावला.

**तंजावर**—मद्रास इलाख्याच्या दक्षिण भागांत किनाऱ्याच्या काठचा एक जिल्हा. क्षे. फ. ३,७३८ चौ. मै. व लो. सं. २५,६३,३७५.

उत्तरेच्या व पूर्वेकडील प्रदेशांत कावेरी व तिच्या शाखा यांच्या योगानें शेतीला पाणी मिळण्याची सोय उत्तम असल्यामुळें, तेथें वस्ती सर्वांत दाट आहे. या भागापेक्षां दक्षिण भागाची उंची ५० फूट जास्त असून प्रदेश रुक्ष आहे. जिल्ह्याची हवा एकंदरींत आरोग्यकारक आहे; येथें पाऊस सरासरी वर्षास ४८ इंच होतो.

दहाव्या शतकाच्या मध्यभागापर्यंत हा जिल्हा चोलांच्या राज्यांत मोडत होता. तेराव्या शतकांत चोलांच्या इतर मुलखाबरोबर तंजावरहि द्वारसमुद्राच्या होयसळ बल्लाळांच्या आणि मदुरा येथील पांड्यांच्या अमलाखालीं गेलें. चौदाव्या शतकाच्या अखेरीस उदयोन्मुख विजयनगरच्या राज्यांत सामील होण्यापूर्वी हा जिल्हा सर्व दक्षिणेबरोबर मलिक काफूरच्यामागून आलेल्या मुसलमानांच्या स्वाऱ्यांना बळी पडला असावा. सोळाव्या शतकांत विजयनगरच्या एका सेनापतीनें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें व त्याच्यानंतरच्या पुरुषानें सतराव्या शतकाच्या प्रारंभींच्या वर्षांत तंजावर येथें नायक घराणें स्थापन केलें. ह्या घराण्यांतील राजांनीं जिल्ह्यांतील बहुतेक किल्ले व वैष्णव मंदिरें बांधिलीं आहेत. नायक घराण्यांतील शेवटच्या राजाला मदुरा नायक चोक्कनाथ यानें स. १६६२ त वेढा दिला. त्या वेळीं बचाव करणें अशक्य आहे असें पाहून त्यानें राजवाडा व झनाना उडवून दिला, व आपण आपल्या पुत्रांसह वेढा देणाऱ्या लोकांवर तुटून पडून लढतां लढतां मरण पावला. तथापि त्याचा एक लहान मुलगा बचावला. मुलाच्या अनुयायांनीं विजापुरास मदत मागितल्यावरून विजापूरहून शहाजी भोंसले यास तंजावरावर पाठविण्यांत आलें. शहाजीनें प्रथम बाल नायकाला गादीवर बसविलें. परंतु पुढें लवकरच आपल्याकडे कारभार घेऊन तेथे मराठे घराण्याची त्यानें स्थापना केली. अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत या मराठे घराण्याची सत्ता कायम होती.

१७४९ त येथील गादीसंबंधीं तंटा चालू असतां इंग्रजांनीं एक पक्ष स्वीकारून देवीकोट्टईवर हल्ला करून तें गांव घेतलें. १७७३ सालीं तंजावरचा राजा, हैदरअल्ली व मराठे यांच्याबरोबर कांहीं मसलत करीत आहे असें वाटल्यावरून इंग्रजांनीं तंजावर आपल्या ताब्यांत घेतलें. परंतु १७७६ त कंपनीशीं झालेल्या तहान्वयें तें परत करण्यांत आलें. स. १७९९ त सरफोजी राजानें आपला सर्व मुलूख कंपनीच्या हवालीं करून आपण राजसंन्यास घेतला. १८५५ सालीं सरफोजीचा मुलगा शिवाजी हा निपुत्रिक वारल्यामुळें तंजावर गांव व किल्लाहि ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला.

जिल्ह्यांत लहानमोठीं २,५२९ गांवें आहेत. जिल्ह्यांत सर्वत्र तामिळ भाषा चालते. केवळ शेतीवर उदरनिर्वाह करणारा असा वर्ग या जिल्ह्यांत कमी आहे.

तंजावर जिल्हा समुद्रकांठीं असून त्यांतून रेल्वेचे फांटे पुष्कळ गेलेले असल्यामुळें तो व्यापारदृष्ट्या फार सोयीचा आहे. त्यांत एकंदर १५ बंदरें असून नेगापट्टम् हें सर्वांत महत्त्वाचें आहे. खुष्कीनें व जलमार्गानें होणारा बहुतेक व्यापार चेट्टी व मुसलमान लोकांच्या हातीं आहे.

साक्षरतेच्या बाबतींत तंजावर जिल्ह्याचा अनुक्रम मद्रास शहराच्या खालोखाल लागतो.

शहर— तंजावर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून मद्रास इलाख्यांतील हें आंठवें मोठें शहर होय. ज्या तंजन राक्षसाला विष्णूनें मारलें त्यावरून नांव पडलें. तंजावर हें अनुक्रमानें चोल, नायक व मराठे लोकांच्या राजधानीचें ठिकाण होतें. स. १७९९ त तंजावरचा राजा सरफोजी यानें आपला सर्व मुलूख इंग्रजांना दिला त्या वेळीं तंजावर शहर मात्र आपल्या ताब्यांत ठेविलें होतें. त्याचा मुलगा १८५५ सालीं निपुत्रिक वारल्यावर तेंहि इंग्रजांच्या राज्यांत सामील झालें. राजाच्या चार राण्या व कुटुंबांतील इतर मंडळी, किल्ल्याच्या मध्यभागीं असलेल्या राजवाड्यांत राहत असत. राजवाड्याला आठ मजली गोपुर

आहे. उंची १९० फूट आहे. दिवाणखान्यांत भिंतींवर पौराणिक व ऐतिहासिक चित्रें आहेत. राजवाड्यांत मराठे व नायक यांचे दरबारी दिवाणखानें, शस्त्रागार व निरनिराळ्या भाषांतील २५,००० पुस्तकें असलेलें ग्रंथालय आहे. हा सरस्वती महाल ग्रंथसंग्रह विलायतेस नेण्याचें घाटत होतें, पण सुदैवानें तो राहिला व आज त्याची व्यवस्था बरी आहे. किल्ल्याचा तट पाडून टाकलेला आहे. किल्ल्याच्या आंतल्या बाजूला शिवगंगा नांवाचा लहानसा किल्ला असून त्यांत शिवगंगा टाकें, व बृहदीश्वरस्वामीचें प्रख्यात देवालय आहे. राजराज चोलानें दहाव्या शतकांत हें बांधलें. याचें शिल्प अप्रतिम आहे. एतद्देशीय राजांच्या अमदानींत तंजावर हे कलांचें माहेरघर समजलें जात असे. अद्यापहि येथें कांहीं कुशल कारागीर आहेत. तंजावरासारखें धातुकाम व वाद्यें या इलाख्यांत बहुधा दुसऱ्या कोठेंहि होत नाहींत. लो. सं. ६८,७०२.

**तंजावरचें राजघराणें**—चोल राजे हे फार पूर्वींपासून इ. स. १२४४ पर्यंत राज्य करीत होते. नंतर पांड्य राजांनीं स. १५५९ पर्यंत आणि त्यांच्यामागून नायक राजांनी स. १६७३ पर्यंत आपला अमल चालविला. त्यांच्यामागून भोंसले हे तंजावरचे राजे झाले.

मदुरा व तंजावर येथील नायक राजांत नेहमीं भांडणें होत. तंजावरचा नायक राजा विजयराघव होता ; त्याच्यावर मदुरेच्या चोक्कनाथ नायकानें स्वारी करून त्यास लढाईत ठार केलें. त्याचा मुलगा सेंगमल(चेंगमल)दास नांवाचा होता. त्यानें विजापुरास जाऊन चोक्कनाथाविरुद्ध आदिलशहाची मदत मागितली व शहानें शहाजीस तंजावरावर पाठविलें. त्यानें चोक्कनाथापासून तंजावर काबीज करून सेंगमल यास नेमणूक करून देऊन व तो प्रांत आपल्याकडे घेऊन त्या प्रांतांतील विधुपुर, कावेरीपट्टण, श्रीरंगपट्टण, चंदी, मदुरा, वाल्गुंडपुर, वगैरे ठिकाणचे नायक राजे जिंकले (१६३७–४८). आणि देशाची जमाबंदी करून व धारे ठरवून सर्वत्र उत्तम व्यवस्था लाविली. शहाजीनें आपल्या आयुष्याचीं शेवटचीं दहा वर्षें तंजावर व बंगलूर येथें आपला मुलगा व्यंकोजी याच्यासह काढलीं. पुढें बेदनूरच्या नायकावर स्वारी करण्यास जात असतां शहाजी हा वाटेंत मरण पावला व व्यंकोजी हा त्याच्यामागून या जहागिरीचा वारस झाला. शहाजीनंतर तंजावर येथें खालील राजांनीं राज्य केलें.

(१) व्यंकोजी (१६३१–१६८२); (२) शहाजी (१६८२–१७११); (३) सरफोजी (१७११–१७२८); (४) तुकोजी (१७२८–१७३५); (५) बाबासाहेब (१७३६); (६) सुजनबाई (१७३६–१७३९); (७) काटराजा (१७३९); (८) सयाजी (१७४०); (९) प्रतापसिंह (१७४०–६३); (१०) तुळजाराजा (१७६३–८६), (११) अमरसिंह (१७८६–१७९८); (१२) सरफोजी (१७९८–१८३२); व (१३) शिवाजी (१८३३–१८५५).

शिवाजीच्या पश्चात् १५ राण्या जिवंत होत्या; त्यांपैकीं शेवटची राणी जिजांबा ही ३ मे १८९२ रोजीं वारली. यांचे दोन दत्तक राजपुत्र शिवाजीराजे व प्रतापसिंहराजे हे होत. या राण्यांना व इतर आप्तांना नेमणुका होत्या.

तंजावरच्या राजांनीं कला आणि वाङ्मय यांना चांगलें उत्तेजन दिलें. शहाजीचा दरबार पंडितांनीं आणि कलावंतांनीं भरलेला असे. त्याचा मुलगा एकोजी हाहि विद्वानांचा चहाता असे. तो स्वतःहि विद्याव्यासंगी होता. त्यानें घातलेली 'समस्या' जयराम पिंड्ये यानें पुरी केल्याची गोष्ट 'राधामाधवविलासचंपू'त आहे. त्यानें तेलगूंत 'द्विपद' रामायण रचलें. त्याची राणी दीपाबाई हीहि स्वतः कविता करीत असे व कवींना साहाय्य देत असे, हें चिंदडशंकर या तंजावरच्या कवीच्या उदाहरणावरून दिसून येईल. एकोजीचा एक मंत्री नरसिंहराव यानें संस्कृतांत 'त्रिपुरविजयचंपू' लिहिला. जयराम पिंड्ये याच्याच पदरीं होता. तामिळ, तेलगू व मल्याळी भाषांतूनहि त्याच्या कारकीर्दींत ग्रंथरचना झालेली आहे. रघुनाथपंडित, आनंदतनय व गोसावीनंदन हे प्रसिद्ध मराठी कवी याच्याच काळांतील होत.

एकोजीनंतर गादीवर आलेला शहाजी हा सर्व भाषांतून लेखन करीत असे. त्याची कारकीर्द ही मराठी आणि संस्कृत वाङ्मयाचें सुवर्णयुग समजण्यांत येतें. 'शब्दरत्नसमन्वय' हा संस्कृत कोश आणि 'शृंगारमंजिरी' हा शृंगारशास्त्रावरील ग्रंथ त्याच्या नांवावर आहे. त्यानें १६९३ सालीं तिरुवासनल्लूर हें गांव पंडितांना दान देऊन त्याचें नांव 'शहाजीराजपुर' असें ठेविलें. पतंजलीप्रमाणें पंडित असा रामभद्र दीक्षित, श्रीनिवास दीक्षित, व्यंकटेश्वर कवि, वैद्यनाथ, भूमिनाथ कवि, अप्पाशास्त्री, महादेव वाजपेयी, वगैरे विद्वद्रत्नांना त्याचा आश्रय असे. चिंदडशंकर, नानजोशी, रंगस्वामी, दिगंबर व त्र्यंबक ज्योतिर्विद हे मराठी कवी होऊन गेले.

शहाजीचा मुलगा सरफोजी यानेंहि बापाप्रमाणेंच विद्येला आश्रय दिला. तोहि संस्कृत आणि मराठी भाषेंत कविता करी. पण सरफोजीनंतर गादीवर बसलेला तुकोजी हा जास्त विद्वान् व लेखक होता. 'धन्वंतरिविलास' आणि 'संगीतसारामृत' यांचा कर्ता तुकोजीच आहे. सदाशिव आणि घनश्याम हे त्याच्या दरबारांतील श्रेष्ठ पंडित होते. तुकोजीनंतरचा राजा प्रतापसिंह हा चांगला मराठी लेखक होता. ऋषिपंचमीव्रत, ध्रुवचरित्र, प्रबोधचंद्रोदय, कृष्णजन्म, वगैरे त्याचे ग्रंथ आहेत.

या वेळीं कावेरी नदीच्या तीरावर त्रिवन्दूर हें मराठी विद्यापीठ बनलें होतें. याच वेळीं माधवसुताचें 'भारत' रचलें गेलें. प्रतापसिंहानंतर गादीवर आलेल्या अमरसिंहानेंहि वेळांत वेळ काढून कृष्ण अमात्याकडून 'रुक्मिणी स्वयंवर' लिहून घेतलें.

प्रतापसिंहाची कंचनी मद्दुपालनी नांवाची असून ती तेलगूंत सुंदर काव्यरचना करी. 'राधिकासांत्वनमु' व 'शतपदलु' हे ग्रंथ याची साक्ष देतील.

तुळजा राजाची कारकीर्द राजकीय दृष्ट्या चांगली नव्हती तरी दरबारची वाङ्मयीन आणि सांस्कृतिक परंपरा सुटली नव्हती.

वाङ्मयाप्रमाणेंच किंवा जास्तहि संगीतकलेला तंजावरच्या राजांनीं प्रत्यक्ष उत्तेजन दिलें. कर्नाटकांतील संगीताचें केंद्र म्हणून तंजावरची प्रसिद्धि होती. स्वतः राजे हे संगीतज्ञ, इतकेंच नव्हे तर चांगले गवयी व वादक असत. वीणावादनाची उत्कृष्ट कला तंजावरमध्यें पाहावयास सांपडे. गिरिराज कवि, वीणाकृष्ण अय्यर, वीरभद्र अय्यर, इत्यादि प्रसिद्ध गवयी आणि वादक होऊन गेले. त्यागय्या हा गवयी-संत १७५९ त जन्मला व त्याचें लहानपण तंजावरनजीकच्या तिरुवडी गांवीं गेलें. तुळजा राजानें या कलेला अतिशय प्रोत्साहन दिलें व संगीताला विशिष्ट वळण देऊन नीटनेटकेपणा आणला. कीर्तनालाहि त्यानें वळण लाविलें. त्यानें स्वतः तेलगू आणि तामिळ भाषेंत कीर्तनें रचिलीं. त्यानें उत्तम कलावंतिणी व गवयी बाळगले होते. महादेव नट्टवनर यानें राजावर अनेक कविता रचल्या व देणग्या मिळविल्या. भागवती कीर्तनकार 'कालक्षेपम्' चे प्रयोग, संगीतवादन आणि नृत्य यांच्या साहाय्यानें जें करतात त्याचा उगम तंजावरच्या कलासंप्रदायांत सांपडेल.

**तटस्थता**—१. (न्यूट्रॅलिटी). इतर देशांमध्यें चाललेल्या युद्धांत भाग न घेणें. आन्तरराष्ट्रीय कायदा असा आहे कीं, तटस्थ राष्ट्रानें युद्धामध्यें कोणत्याहि प्रकारें हस्तक्षेप करतां कामा नये. कोणत्याहि युध्यमान राष्ट्राला, किंवा युध्यमान राष्ट्राच्या कोणत्याहि सैन्याला मदत करतां कामा नये, किंवा अडथळा करतां कामा नये. मात्र तटस्थतेचा भंग करणारें कृत्य केलें गेल्यास तटस्थ राष्ट्रानें स्वतःचें संरक्षण केलें पाहिजे. तटस्थतेचा एक पर्याय 'जनहितैषी तटस्थता' (बेनेव्होलंट न्यूट्रॅलिटी) प्रत्यक्ष व्यवहारांत दिसून येतो. परंतु वस्तुतः तो प्रकार बेकायदेशीर आहे. तटस्थ राष्ट्राच्या प्रदेशांत किंवा समुद्रमर्यादेंत युध्यमान राष्ट्रांनीं कोणतेंहि लढाऊ कृत्य करतां कामा नये. तटस्थतेचा भंग करणारें कृत्य युध्यमान राष्ट्राच्या लष्करानें, आरमारानें किंवा वैमानिक दलानें केल्यास त्या कृत्याला प्रतिकार करण्याचा हक्क तटस्थ राष्ट्राला आहे. तटस्थ राष्ट्रानें स्वतःच्या प्रदेशांतून युध्यमान राष्ट्राच्या सैन्याला वाट देतां कामा नये; लष्करी, आरमारी किंवा वैमानिक तळाला स्थान देतां कामा नये; तसेंच स्वतःच्या प्रदेशांत युध्यमान राष्ट्रांस सैनिक–भरती करूं देतां कामा नये. युध्यमान राष्ट्रांच्या लढाऊ जहाजांना तटस्थ राष्ट्राच्या बंदरांत फक्त २४ तास मुक्काम करण्यास मुभा असते, व या मुक्कामांत लढाऊ जहाजांना जळण व अन्नपुरवठा घेण्यास, आणि जरूर ती जहाजाची दुरुस्ती करण्यास परवानगी असते ( दुरुस्तीकरितां आणखी २४ तास मुदत वाढवितां येते ). परंतु स्वतःचें लढाऊ सामर्थ्य वाढविण्याकरितां दुरुस्ती करण्यास मनाई आहे. अशा लढाऊ जहाजावर युद्धकैदी असल्यास तटस्थ राष्ट्राच्या बंदरांत शिरल्यावर ते कैदी मोकळे सोडले पाहिजेत. युध्यमान राष्ट्रांबरोबर तटस्थ राष्ट्रांना व्यापार करण्यास, व त्यांना युद्धसामुग्री पुरवण्यास तटस्थ राष्ट्रांना मोकळीक असते; परंतु अशा मालाची वाहतूक करणाऱ्या जहाजांची तपासणी करून त्यांना बंदी करण्यासंबंधींचे कायदे आहेत, त्यांची अमलबजावणी युध्यमान राष्ट्र करूं शकतें.

आरमारी युद्धें चालू असतांना, तटस्थ राष्ट्रांतील माल युध्यमान राष्ट्राच्या बोटींत असला, किंवा तटस्थ राष्ट्राच्या बोटींत युध्यमान राष्ट्राचा माल असला तर महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न होतात. या बाबतींत पूर्वीं असें तत्त्व होतें कीं, तटस्थ राष्ट्राच्या बोटींवरील मालाची तपासणी करून तो माल शत्रूचा असल्यास जप्त करावा; उलट पक्षीं शत्रूच्या बोटींवर तटस्थ राष्ट्राचा माल सांपडल्यास तो तटस्थ राष्ट्रांना परत द्यावा. पण या तत्त्वामुळें तटस्थ राष्ट्रांचीं जहाजें तपासण्याचें काम सतत करावें लागे. या त्रासाला कंटाळून पुढे वरील तत्त्वाच्या अगदीं विरुद्ध तत्त्व १८५६ सालीं पॅरिस येथें भरलेल्या सभेंत ग्रेट ब्रिटन, ऑस्ट्रिया, फ्रान्स, प्रशिया, रशिया, सार्डिनिया व तुर्कस्तान या देशांच्या परराष्ट्रीय वकिलांनीं मान्य केलें. तें तत्त्व असें कीं, फक्त युद्धसाहित्याला बंदी असावी, आणि तटस्थ राष्ट्राचें निशाण असलेल्या बोटीवर शत्रुराष्ट्राचा माल असला, किंवा शत्रूचें निशाण असलेल्या बोटीवर तटस्थ राष्ट्राचा माल सांपडला तरी तो जप्तीस पात्र नाहीं; फक्त शत्रुराष्ट्राचें युद्धसाहित्य तटस्थ राष्ट्राच्या निशाणाच्या बोटीवर असेल, किंवा शत्रूचें निशाण असलेल्या बोटीवर तटस्थ राष्ट्राच्या मालकीचें युद्धसाहित्य असेल, तर तें जप्त करावें.

गेल्या महायुद्धांत आयर्लंडनें याप्रमाणें पूर्ण तटस्थता राखिली होती.

२. (नॉन–इंटरव्हेन्शन). ही तटस्थतेची किंवा उदासीनतेची वृत्ति हिंदुस्थानांत ईस्ट इंडिया कंपनीच्या कांहीं गव्हर्नरांनीं स्वीकारली होती; पण त्यामुळें कंपनीचा तोटा होत जाऊन तिच्याकडे हिंदी संस्थानिक वेगळ्या दृष्टीनेंच पाहूं लागले. कॉर्न-

वालिस व सर जॉन शोअर यांचे हें धोरण वेलस्लीनें बाजूला सारून चढाई वृत्ति स्वीकारली.

युरोपांतील राष्ट्रांनीं स्पॅनिश यादवी युद्ध (१९३६–१९३९) चालू असतांना स्वीकारलेले असेंच तटस्थतेचें धोरण निरुपयोगी ठरलें. हें धोरण असें होतें कीं, बडीं राष्ट्रें व कांहीं छोटीं राष्ट्रें यांनीं स्पेनमधील कोणत्याहि युध्यमान पक्षाला शस्त्रास्त्रें किंवा सैनिक पथकें यांचा पुरवठा करावयाचा नाहीं, असें आपसांत ठरविलें. तदनुसार लंडनमध्यें एक तटस्थता–समिति नेमण्यांत आली, आणि स्पॅनिश बंदरें व स्पॅनिश सरहद्दीवरील ठिकाणें येथें आन्तरराष्ट्रीय नियंत्रण ठेवणारे अधिकारी नेमले; शिवाय स्पॅनिश समुद्रकिनाऱ्यावर पहारा करण्याची व्यवस्था केली. इतका बंदोबस्त केला तरीहि स्पेनमध्यें युद्धसाहित्य आणि मोठालीं सैन्यें आडमार्गानें जाऊं लागलीं. त्यामुळें निरुपाय होऊन अखेर तटस्थता–समितीनें आपलें कार्य बंद केलें.

**तट्टू**— ही घोड्याची सर्वांत लहान जात असून फार प्राचीन काळापासून या जातीचा पाळीव प्राण्यांत समावेश झालेला आहे. याची उंची सामान्यतः ८ पासून १४ मुठी असते. याच्या देशपरत्वें पुष्कळ जाती आहेत. तट्टें फार काटक असून पुष्कळ काम करतात. तसेंच वळकट असून चाणाक्ष असतात. महाराष्ट्रातलें भीमथडी तट्टू प्रसिद्ध असून अटकेचें पाणी प्यालेलें आहे.

**तडवी**— मुसलमानी भिल्लांचा हा एक वर्ग असून अशिरगडापासून चोपड्यापर्यंत सातपुड्याच्या पायथ्यावरील खेड्यांत आढळून येतो. मुसलमान व भिल्ल स्त्रीपुरुष यांपासून झालेली ही प्रजा असून औरंगजेबाच्या कारकीर्दींत असली संकरप्रजा दृग्गोचर होऊं लागली. हे दिसण्यांत उंच व सुदृढ असून इतर भिल्लांपेक्षां गोरे असतात. यांचा पेहेराव साधारणतः खानदेशी कुणब्यांप्रमाणें असतो. पण हे मुसल्मानांप्रमाणेंच आळशी आहेत. हे लष्करी पेशालाच लायक असून शेतकीकामास नालायक आहेत. यांचे आचारविचार मुसलमानांप्रमाणेंच आहेत. परंतु पूर्वींचा हिंदुत्वाचा संस्कार असल्यामुळें हिंदु देवतांना पूज्य मानतात. यांच्यांत विवाहविधि काजी चालवितो. अडावद या भागांतील तडवी देवी मानाबाई हीस फार पूज्य समजतात. जातिप्रमुखाला खानसाहेब असें म्हणतात. रखवालदार या नात्यानें प्रमुखाला सरकारी वेतन मिळतें. यांना धर्माचें ज्ञान मुळींच नसतें.

**तंतल**—(टॅन्टॅलम्). एक दुर्मिळ धातुद्रव्य. याचें अणुमान १८१·५ आहे. स्वीडनमधील टॅन्टेलाइट किंवा टिट्रोटॅन्टेलाइट ह्या खनिजांत हें सांपडतें. हें एकाकी असतें तेव्हां पांढरें व लवचिक असतें. याचा द्रावणबिंदु बराच वरचा आहे. तसेंच विद्युद्विरोधकताहि बरीच आहे. पोलादांत मिसळण्यासाठीं व अंगारदीपा(इन्कॅन्डेसेंट लँप)च्या तंतूसाठीं तंतलद्रव्य वापरतात.

**तत्त्वज्ञान**—तत्त्वज्ञान म्हणजे आपल्यासभोंवतीं जें प्रत्यक्ष जग दिसत आहे व त्याचें जें स्वरूप आपणांस आपल्या स्वतःच्या आयुष्यामध्यें व इतर सर्वत्र पसरलेल्या जीवनामध्यें प्रतीत होत असतें त्यासंबंधीं विचार होय. तत्त्वज्ञानामध्यें मानसशास्त्रीय, नीतिशास्त्रात्मक, आध्यात्मिक व दैवतविषयक प्रश्नांचा विचार केलेला असतो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे या शास्त्रामध्यें, (१) मन, जाणीव, संवेदना, भावना, बुद्धि, स्मरणशक्ति, कल्पनासाधर्म्य, भाषा; (२) नीतिशास्त्राची जाणीव आणि कल्पना, मनुष्याची नैतिक वागणूक व तिचे हेतु आणि नीतिधर्माचें प्रमाण; (३) जीवाचें अस्तित्व, सत्, जड आणि चित्; (४) ज्ञानाचें स्वरूप, त्याचा उगम, त्याचें सत्यत्व आणि त्याची मर्यादा; (५) नैसर्गिक चमत्कारांच्या मागील शक्ति, आणि परमेश्वर आणि त्याचे गुण, या सर्व गोष्टींचा विचार करण्यांत येतो.

पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचे पुढें दिल्याप्रमाणें कालविभाग पाडतां येतात :— १ ग्रीक तत्त्वज्ञान, २ ग्रीको–रोमन तत्त्वज्ञान, ३ मध्ययुगीन तत्त्वज्ञान, व ४ अर्वाचीन तत्त्वज्ञान.

ग्रीक लोक हे प्रथम ज्ञानाकरितां ज्ञान मिळविण्याच्या खटपटीस लागल्याचें आढळतें, व त्यांनींच प्रथम शास्त्रीय बुद्धीची स्वतंत्र वाढ केल्याचें दृष्टीस पडतें. अर्थात् त्यांच्यावर प्राच्य आणि ईजिप्तमधील ज्ञानाचा बराच परिणाम झालेला आढळून येतो. ग्रीक तत्त्वज्ञानांतील मुख्य विशेष म्हणजे प्लेटोच्या मतें संशोधन हा होय. ग्रीक तत्त्वज्ञानाचे पुन्हां तीन कालविभाग पडतातः—(अ) सृष्टिविषयक तत्त्वज्ञान, (आ) प्राणिविषयक तत्त्वज्ञान, व (इ) पद्धतशीर तत्त्वज्ञान.

१. ग्रीक तत्त्वज्ञानामध्यें पहिला प्रयत्न आपल्यासभोंवतीं असणाऱ्या सृष्टीचें निरीक्षण व नैसर्गिक गोष्टींचें ज्ञान मिळविण्याकरितां करण्यांत आला. ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीं आत्म्यासंबंधीं विचार केला नसून जगासंबंधीं विचार केलेला आढळतो. थेलीस (खि. पू. ६००) हा आयोनियन संप्रदायाचा प्रमुख तत्त्वज्ञ होता. याखेरीज पायथागोरसचा संप्रदाय आणि एलियाटिक अथवा झेनोफोनीज, परमेनिडीज आणि झेनो यांचा संप्रदाय हेहि या प्रश्नांचा अभ्यास करीत होते. हेरॅक्लिटस (सुमारें ५२० खि. पू.) यानें अमूर्तापासून मूर्ताकडे कशी प्रगति होते याचें विवेचन करण्याचा प्रयत्न केला. एम्पिडोक्लिस (खि. पू. ४४०) यानें स्थिर वस्तूमध्यें जड द्रव्य असतें व शक्ति ही चलनाचें तत्त्व असतें अशी उपपत्ति पुढें मांडली. ल्युसिपस आणि डेमॉक्रिटस (खि. पू. ४५०) यांनीं कणवाद प्रचलित केला, आणि जगाची उत्पत्ति चलच्छक्तीपासून होते असें प्रतिपादन केलें. ॲनॅक्झेगोरस (खि. पू. ५००) यानें प्रथम बुद्धि हें मुख्य तत्त्व आहे असें प्रतिपादन केलें व येथपासून तत्त्व-

ढगांचे आकार (पृ. १०३४)

**उजवा अर्धा भाग (वरून खालीं) :**—(१) तंतुमेघ—यांची रचना दोऱ्याप्रमाणें असते. (२) स्तर-पुंजमेघ — यांच्या मोठ्या राशी असतात. (३) तडिद्‌गर्भमेघ—मोठ्या गारा व वर्षाव यांचे मेघ.

**डावा अर्धा भाग (वरून खालीं) :**—(१) तंतु-पुंजमेघ—हे वाटोळे व तरंगाकार असतात. (२) उच्च-पुंजमेघ—हे समांतर गटांचे असतात (३) पुंजमेघ—हे विशिष्ट आकाराचे व पृथक् असतात.

पुरस्कार केलेला दिसतो. ट्रेंडलेनबर्ग, फेशनेर, लट्झे, वगैरेंनीं नवीनच पंथ काढलेले आढळतात. तसेंच एच्. रिटर, कॅरूस, वीझ आणि फ्रिड्रिक निट्सचे यांचेहि संप्रदाय उल्लेखनीय आहेत. १९ व्या शतकाच्या आरंभीं विशेष प्रसार पावलेल्या जडवादास आणि इंद्रियवादास दोन तत्त्वज्ञानपद्धतींनीं फ्रान्समध्यें विरोध आरंभला. त्यांपैकीं एक दैवतवादी होती, व दुसरी रॉयर कॉलर्ड या रीडच्या शिष्यानें सारात्मक व आध्यात्मिक पद्धतीवर आधारलेली नवीन पद्धति होती. या पद्धतीचा पुरस्कार पुढें कझिन या तत्त्वज्ञानें केला. जूफ्राय या तत्त्वज्ञानें मेन डी बायरन आणि स्कॉटिश संप्रदाय यांचा मिलाफ करून एका नवीनच तत्त्वज्ञानपद्धतीचा अवलंब केला व तिच्यांतच आध्यात्मिक पद्धतीचा समावेश केला. या पद्धतीचे पुरस्कर्ते गार्नियर, जॅनिट, रेम्युसाट, फ्रँक, ज्यूल्स सायमन, वगैरे आढळतात. यांखेरीज पीएर लेरो, लामेने, जीन रेनोद आणि बुशेज् यांचे स्वतंत्र तत्त्वज्ञानपंथ दृष्टीस पडतात. तसेंच कॅबेनिस, ब्रुसे, गाल, वगैरेंनीं जडवादाचा पुरस्कार केलेला दिसून येतो. ऑगस्ट काम्ट यानें वास्तववादाचा पाया घातला, व त्यास युरोपमध्यें व इंग्लंडमध्यें अनेक अनुयायी मिळाले. इंग्लंडमध्यें स्कॉटिश संप्रदायाचे अनुयायी सर जेम्स मॅकिन्टॉश ( १७६५ ते १८३२ ) आणि सर विल्यम हॅमिल्टन ( १७८८ ते १८५६ ) हे होऊन गेले. यांपैकीं दुसऱ्यावर कान्टच्या मानसशास्त्रीय तत्त्वांचा कांहीं परिणाम झालेला आढळतो. याचे शिष्य मॅन्सेल आणि मॅक्कॉश हे होत. हार्टले, प्रिस्टले आणि एरॅस्मस डार्विन यांच्या साहचर्यात्मक मानसशास्त्रपद्धतीचा पुरस्कार जेम्स मिल ( १७७३ ते १८ आणि त्याचा मुलगा जॉन स्टुअर्ट मिल ( १८०६ ते १८ यांनीं विशेष रीतीनें केलेला आढळतो व तीच पद्ध ग्रोट आणि ल्युएस यांनींहि स्वीकारलेली दिसते. हर्बर्ट यानें याच पद्धतीचा जगद्विकासात्मक तत्त्वामध्यें करण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. उलट टी. ए जे. अँड ई. केअर्ड आणि डब्ल्यू. वॉलेस यांनीं हेगेल ज्ञानाचा पुरस्कार केलेला दिसून येतो. गेल्या ५ तत्त्वज्ञानाच्या विचारसरणीमध्यें एखादी शास्त्र आधारलेली जागतिक तत्त्वज्ञानपद्धति असावी उत्कटत्वानें झालेली दृष्टीस पडते व त्याबरोबरच वस्तूंचीं मूल्यें ठरविण्याचा प्रयत्न चाललेला आढ तत्त्वज्ञांनीं म्हटलें म्हणजे अँड्रयू सेथ, डी. जी. र वाल्कर, डब्ल्यू. एस्. जेव्हॉन्स, लेस्ली स्टिफन, जानेट, ई. बोत्रो, ए. फाउली, आणि हेन्री बर्गसन, हे फ्रान्समध्यें; एफ्. पॉल्सेन, क्यूनो फिशर, हर्मन कोहेन, आणि आर्. यूकेन हे जर्मनीमध्यें; आणि बी. क्रोस हा इटलीमध्यें असे विख्यात तत्त्वज्ञानी आहेत.

भारतीय तत्त्वज्ञान— तत्त्वज्ञान हा शब्द सध्यां इंग्रजी फिलॉसफी ह्या शब्दाऐवजीं मराठींत रूढ झाला आहे. फिलॉसफी शब्दाचा धात्वर्थ चिकित्सकपणाची आवड असा आहे. तत्त्वज्ञानानें सुद्धां कोणत्याहि विषयाच्या बुडाशीं जाऊन पाहणें असें सामान्यतः समजलें जातें. पदार्थांचें मूळ शोधणें व त्याचा विकास होऊन पदार्थ कसा बनला ह्याचें ज्ञान म्हणजे तत्त्वज्ञान होय. परंतु सध्यां सृष्टवस्तुविषयक विद्या भौतिक शास्त्रांत पडते व अदृश्य असा जो आत्मा तत्संबंधींचा विचार अध्यात्मशास्त्रांत मोडतो. सत् आणि ऋत हे अतिप्राचीन म्हणजे वैदिक शब्द फार महत्त्वाचे आहेत. सत् म्हणजे जें केवळ भावरूपानें आहे तें कूटस्थ, निर्विकार, निष्क्रिय ब्रह्म होय. ऋत म्हणजे हळूहळू विकसित झालेलें जग. ऋ या धातूचा अर्थ जाणें, चलणें, हालचाल होणें असा आहे. ऋत म्हणजे साम्यावस्था सोडून विचलित झालेलें. सत्चें व ऋताचें स्वरूपविषयक ज्ञान तें तत्त्वज्ञान. जग निर्माण कसें झालें, त्याला कर्ता कोणी आहे कीं नाहीं हा विचार वेदकालापासून भारतांत चालू आहे. हा विचार तत्त्व-

पृथ्वी, आकाश, पाणी कांहींच नव्हतें." पण कवि पुढें सांगतो, "एकच एक चिच्छक्ति असावी आणि तिच्यापासून ह्या सृष्टीचा प्रादुर्भाव झाला असावा." पुनः त्याला संशय येऊन तो विचारतो, "ह्या पसारा अमक्यापासून झाला हें कोण सांगेल? कारण देव झाले तरी पाठीमागनेच." ह्या सूक्तांत (१०-१२९) संशय व्यक्त केला आहे; चिकित्सा आहे; १२१ व्या सूक्तांत मात्र सृष्टीच्या मुळाशीं परमेश्वर आहे ही कल्पना निःसंदिग्ध शब्दांत प्रकट केली आहे. अनेक देवतांचे ऋग्वेदकालीन उपासक अखेरीस एकदेव-कल्पनेवर स्थिर झाले.

ऋग्वेदाचे धार्मिक व तात्त्विक असे दोन भाग आहेत. तात्त्विक भाग थोडा आहे. ह्यांतूनच पुढें पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा (औपनिषद् दर्शन) हीं दोन शास्त्रें निर्माण झालीं. पैकीं पूर्व-मीमांसा हें धर्मशास्त्र असल्यामुळें अध्यात्मांत अगर तत्त्वज्ञानांत त्याचा समावेश होणार नाहीं. यज्ञयाग करणें हा ऋग्वेदकालीन धर्म होता. हे यज्ञ कसे करावे म्हणजे फलप्राप्ति होईल ह्याचा विचार पूर्वमीमांसाकारांनीं केला, 'अथातो धर्मजिज्ञासा' (आतां धर्माची चिकित्सा) हें त्यांचें आरंभींचें वाक्य आहे. ज्योतिष्टोम यज्ञ केला तर स्वर्गाची प्राप्ति होते हें सिद्ध करण्यां-करितां बुद्धिमत्तेची आश्चर्यकारक कसरत करून त्यांनीं आपल्या शास्त्राची रचना केली. वेदांचें अपौरुषेयत्व व शब्दप्रामाण्य हे दोन महासिद्धांत त्यांनीं प्रस्थापित केले. पूर्वमीमांसाकारांची फार महत्त्वाची व अपूर्व कामगिरी म्हणजे वैदिक वचनांचा अर्थ करण्याच्या नियमांचे त्यांनीं एक शास्त्र तयार केलें. तात्त्विक विचारांकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें. स्वर्ग म्हणजे काय, तेथें सुखोपभोग कसा मिळतो व त्याकरितां जीव कोणतें शरीर धारण करतो; हें स्वर्गसुख अक्षय्य असतें कीं नाहीं, ह्याची चर्चा त्यांनीं टाळली. पूर्वमीमांसाकार देवांना मुळींच महत्त्व देत नाहींत, मग स्वर्गांत सुख कोण देणार; स्वर्ग वेदांच्या पूर्वी होता कीं यज्ञानें प्रत्येकाचा स्वर्ग स्वतंत्र आपोआप बनतो, इत्यादि प्रश्नांना त्यांनीं स्पर्श केला नाहीं. वेदांच्या स्वतःप्रामाण्या-वर त्यांनीं भर दिला.

अध्यात्माचा विषय म्हणजे सृष्टि अथवा जगत्. सृष्टीचे जड आणि चित् असे दोन भाग पडतात. उत्तरमीमांसा चित् सृष्टीचा म्हणजे जीवसृष्टीचा विचार प्रामुख्यानें करते. हे सर्व मीमांसाकार ईश्वराचें अस्तित्व मान्य करतात. जीवशिवाच्या परस्परसंबंधात मतभेद उत्पन्न झाले व तदनुसार द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत असे संप्रदाय निर्माण झाले. ह्या सर्वांचा आधार प्रस्थानत्रयी (गीता, उपनिषदें व ब्रह्मसूत्र). आपआपल्या बौद्धिक प्रवृत्तीला अनुसरून प्रत्येकानें ह्या मूलाधाराचा वेगवेगळा अर्थ लावला. आज शंकराचार्यांच्या अद्वैत मताचा पगडा हिंदु-मनावर बसला आहे. हा संप्रदाय जीवात्मा व परमात्मा ह्यांचा आत्यंतिक अभेद मानतो. 'अहमेव ब्रह्मास्मि' हें ह्यांचें निर्मळ महावाक्य. हें ज्ञान झालें-आत्मसाक्षात्कार झाला-म्हणजे बद्ध जीव मुक्त होतो-ब्रह्मांत विलीन होतो. 'मला ब्रह्म व्हावयाचें नाहीं; मी ब्रह्मच आहें'-मात्र हें साक्षात् ज्ञान झालें पाहिजे. इतका अभेद मानल्यावर जगाला स्थानच राहत नाहीं. ब्रह्म एक, तें पुनः सर्वव्यापी, मग जग निराळें कसें असूं शकेल? ह्यास्तव मायावाद प्रसृत झाला. जगत् मिथ्या हा सिद्धांत प्रतिपादण्यांत आला. गौडपादाचार्यांच्या कारिकेंत जग झालेंच नाहीं असा सिद्धांत मांडला आहे (एतत् तत् उत्तमं सत्यं यत्किंचित् न जायते।). मायानिर्मित हें जगत् व्यवहारार्थ सत्य मानावयाचें इतकेंच. ज्ञानोत्तर माया नष्ट होते. रज्जुसर्पाचा दृष्टांत समजुती-सार्टी हे तत्त्वज्ञानी देत असतात. दोरी पडलेली असावी. अंधारांत ती आपणांस सापासारखी दिसते. आपण भितों. पुढें वस्तुस्थितीचें ज्ञान होतें. सर्पग्रहव्यवहार आपोआप बंद पडतो. ह्या मतांत जगाच्या उत्पत्तीला अर्थातच महत्त्व नाहीं.

ह्याच्या उलट द्वैती परमेश्वर व जीव अगदीं भिन्न आहेत, असें मानतात. त्यांच्यांत सेव्यसेवकभाव आहे. तसेंच पहिला स्वतंत्र व सर्वज्ञ तर दुसरा परतन्त्र व अल्पज्ञ. ह्या मताचे पुरस्कर्ते मध्वाचार्य; त्यांच्या नांवावरून हें तत्त्वज्ञान माध्वसिद्धान्त म्हणून ओळखलें जातें. पुढील श्लोकांत ह्या मताचीं तत्त्वें संग्र-हित केलेलीं आहेत—

> श्रीमन्मध्वमते हरिः परतरः सत्यं जगत् तत्त्वतो
> भेदो जीवगणा हरेरनुचरा नीचोच्चभावं गताः।
> मुक्तिर्नैजसुखानुभूतिरमला भक्तिस्तु तत्साधनम्
> ह्यक्षादित्रितयं प्रमाणमखिलाम्नायैकवेद्यो हरिः॥

अद्वैताच्या सर्वथैव उलट. जग सत्य; जीव परस्परांहून भिन्न; सुखानुभूति ही मुक्ति-आनंदानुभूति नाहीं; आणि भक्ति हें साधन.

रामानुजाचार्यांनीं विशिष्टाद्वैत मताचा पुरस्कार केला. ह्या संप्रदायाचे अनुयायी थोडे दक्षिणेंत व थोडे मारवाडांत आहेत. ह्या मताचा प्रभाव जनमनावर कधींच पडला नाहीं. जीव (चित्) व जगत् (जड) हीं ईश्वरापासून भिन्न आहेत व सत्य आहेत; तथापि हीं दोन तत्त्वें ईश्वराच्या शरीराचेच भाग आहेत. हें एक विशिष्ट प्रकारचें अद्वैत आहे. म्हणून ह्या पंथाला विशिष्टाद्वैत हे नांव पडलें. जीव हा ज्ञानस्वरूप असून जडदेहाचा शरीरी व ईश्वराचें शरीर असा आहे. द्वैत्यांप्रमाणें सर्व जीव भिन्न भिन्न मानतात. परमात्म्याचें अचित् शरीर म्हणजेच प्रकृति. या प्रकृतीचा-विकास म्हणजे जग. ही विकासप्रक्रिया वा विकासक्रम जवळजवळ सांख्यांप्रमाणेंच आहे. रामानुजाचार्यांना मायावाद,

पुरस्कार केलेला दिसतो. ट्रेंडलेनबर्ग, फेशनेर, ल्ट्झे, वगैरेंनीं नवीनच पंथ काढलेले आढळतात. तसेच एच्. रिटर, कॅरूस, वीझ आणि फ्रिड्रिक निट्सचे यांचेहि संप्रदाय उल्लेखनीय आहेत. १९ व्या शतकाच्या आरंभीं विशेष प्रसार पावलेल्या जडवादास आणि इंद्रियवादास दोन तत्त्वज्ञानपद्धतींनीं फ्रान्समध्यें विरोध आरंभला. त्यांपैकीं एक दैवतवादी होती, व दुसरी रॉयर कॉलर्ड या रीडच्या शिष्यानें सारात्मक व आध्यात्मिक पद्धतीवर आधारलेली नवीन पद्धति होती. या पद्धतीचा पुरस्कार पुढे कझिन या तत्त्वज्ञानें केला. जूफ्राय या तत्त्वज्ञानें मेन डी बायरन आणि स्कॉटिश संप्रदाय यांचा मिलाफ करून एका नवीनच तत्त्वज्ञानपद्धतीचा अवलंब केला व तिच्यांतच आध्यात्मिक पद्धतीचा समावेश केला. या पद्धतीचे पुरस्कर्ते गार्निंयर, जॉनेट, रेम्युसाट, फ्रॅंक, ज्यूल्स सायमन, वगैरे आढळतात. यांखेरीज पीएर लेरो, लामेने, जीन रेनोद आणि बुशेज् यांचे स्वतंत्र तत्त्वज्ञानपंथ दृष्टीस पडतात. तसेंच कॅबेनिस, ब्रुसे, गाल, वगैरेंनीं जडवादाचा पुरस्कार केलेला दिसून येतो. ऑगस्ट काम्ट यानें वास्तववादाचा पाया घातला, व त्यास युरोपमध्यें व इंग्लंडमध्यें अनेक अनुयायी मिळाले. इंग्लंडमध्यें स्कॉटिश संप्रदायाचे अनुयायी सर जेम्स मॅकिन्टॉश ( १७६५ ते १८३२ ) आणि सर विल्यम हॅमिल्टन ( १७८८ ते १८५६ ) हे होऊन गेले. यांपैकीं दुसऱ्यावर कान्टच्या 'मानसशास्त्रीय तत्त्वांचा कांहीं परिणाम झालेला आढळतो. याचे शिष्य मॅन्सेल आणि मॅक्कॉश हे होत. हार्टले, प्रिस्टले आणि एरॅस्मस डार्विन यांच्या साहचर्यात्मक मानसशास्त्रपद्धतीचा पुरस्कार जेम्स मिल ( १७७३ ते १८३६ ) आणि त्याचा मुलगा जॉन स्टुअर्ट मिल ( १८०६ ते १८७३ ) यांनीं विशेष रीतीनें केलेला आढळतो व तीच पद्धति बेन, ग्रोट आणि ल्युइस यांनींहि स्वीकारलेली दिसते. हर्बर्ट स्पेन्सर यानें याच पद्धतीचा जगद्विकासात्मक तत्त्वामध्यें परिष्कार करण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. उलट टी. एच्. ग्रीन, जे. अँड ई. केअर्ड आणि डब्ल्यू. वॉलेस यांनीं हेगेलच्या तत्त्वज्ञानाचा पुरस्कार केलेला दिसून येतो. गेल्या ५० वर्षांतील तत्त्वज्ञानाच्या विचारसरणीमध्यें एखादी शास्त्रीय तत्त्वावर आधारलेली जागतिक तत्त्वज्ञानपद्धति असावी अशी जाणीव उत्कटत्वानें झालेली दृष्टीस पडते व त्याबरोबरच निरनिराळ्या वस्तूंचीं मूल्यें ठरविण्याचा प्रयत्न चाललेला आढळतो. अर्वाचीन तत्त्वज्ञांनीं म्हटलें म्हणजे अ‍ॅंड्र्यू सेथ, डी. जी. रीचि, ए. जे. बाल्फर, डब्ल्यू. एस्. जेव्हॉन्स, लेस्ली स्टिफन, जेम्स सली, एच्. सिज्विक्, जेम्स वॉर्ड, एफ्. एच्. ब्रॅडले, बी. बोझांके, एस्. अलेक्झांडर, बर्ट्रान्ड रसेल आणि ए. एन्. व्हाइटहेड हे इंग्लंडमध्यें; जोशिया रॉइस आणि विल्यम जेम्स हे अमेरिकेमध्यें; पॉल जानेट, ई. बोत्रो, ए. फाउली, आणि हेन्री बर्गसन, हे फ्रान्समध्यें; एफ्. पॉलसेन, क्यूनो फिशर, हर्मन कोहेन, आणि आर्. यूकेन हे जर्मनीमध्ये; आणि बी. क्रोस हा इटलीमध्यें असे विख्यात तत्त्वज्ञानी आहेत.

भारतीय तत्त्वज्ञान— तत्त्वज्ञान हा शब्द सध्यां इंग्रजी फिलॉसफी ह्या शब्दाऐवजीं मराठींत रूढ झाला आहे. फिलॉसफी शब्दाचा धात्वर्थ चिकित्सकपणाची आवड असा आहे. तत्त्वज्ञानानें सुद्धां कोणत्याहि विषयाच्या बुडाशीं जाऊन पाहणें असें सामान्यतः समजले जातें. पदार्थांचें मूळ शोधणें व त्याचा विकास होऊन पदार्थ कसा बनला ह्याचें ज्ञान म्हणजे तत्त्वज्ञान होय. परंतु सध्यां सृष्टवस्तुविषयक विद्या भौतिक शास्त्रांत पडते व अदृश्य असा जो आत्मा तत्संबंधींचा विचार अध्यात्मशास्त्रांत मोडतो. सत् आणि ऋत हे अतिप्राचीन म्हणजे वैदिक शब्द फार महत्त्वाचे आहेत. सत् म्हणजे जें केवळ भावरूपानें आहे तें कूटस्थ, निर्विकार, निष्क्रिय ब्रह्म होय. ऋत म्हणजे हळूहळू विकसित झालेलें जग. ऋ या धातूचा अर्थ जाणें, चलणें, हालचाल होणें असा आहे. ऋत म्हणजे साम्यावस्था सोडून विचलित झालेलें. सत्चें व ऋताचें स्वरूपविषयक ज्ञान तें तत्त्वज्ञान. जग निर्माण कसें झालें, त्याला कर्ता कोणी आहे कीं नाहीं हा विचार वेदकालापासून भारतांत चालू आहे. हा विचार तत्त्वज्ञानांत सामाविष्ट होतो. वस्तुविषयक ज्ञान हा भौतिक शास्त्राचा विषय. वस्तु उत्पन्न कशी झाली हा अध्यात्माचा विषय. ज्या निरनिराळ्या शास्त्रांनीं ह्याचा विचार केला त्या शास्त्रांस पूर्वी दर्शनें म्हणत. हीं दर्शनें सहा आहेत : सांख्य, न्याय, वैशेषिक, योग, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा. तत्त्वज्ञान शब्द अलीकडला असला तरी निराळ्या अर्थानें तो न्यायशास्त्रांत पूर्वी वापरलेला आहे; उदा., "प्रमाणप्रमेयतत्त्वज्ञानान्निःश्रेयसाधिगमः।" प्रत्यक्षादि प्रमाणांनीं आत्मादि प्रमेयांच्या वास्तविक स्वरूपाचें ज्ञान ते प्रमाणप्रमेयतत्त्वज्ञान. ह्या ज्ञानानें मोक्षप्राप्ति होते अशी कल्पना. तात्पर्य, मोक्षाकरितां शास्त्र प्रयुक्त झालें आहे. कल्पनेवर–तर्कांवर हें शास्त्र आधारलेलें असतें. ह्या कारणानें सहा दर्शनें–शास्त्रें अस्तित्वांत आलीं.

ईश्वर आणि सृष्टि हा ह्या शास्त्रांचा मुख्य विषय. सृष्टीचे पुनः दोन भाग पडतात : ( १ ) सचेतन, व ( २ ) जड. ईश्वर असेल तर त्याचें स्वरूप काय ? सृष्टि अथवा जगत् आणि ईश्वर ह्यांचा संबंध ; जगताचें स्वरूप व अंतिम परिणाम ह्यांची चर्चा प्रायः हीं दर्शनें करतात. पुढील दर्शनांत अध्यात्मविषयक जे विचार विचारपूर्वक प्रतिपादिले आहेत त्यांचा उगम ऋग्वेदांत आपणास स्पष्टपणें आढळतो. यज्ञयागांचा व सोमपानाचा धूमधडाका चालू असतां सुद्धां "मूळारंभीं असत्हि नव्हतें व सत्हि नव्हतें.

पृथ्वी, आकाश, पाणी कांहींच नव्हतें. " पण कवि पुढें सांगतो, "एकच एक चिच्छक्ति असावी आणि तिच्यापासून ह्या सृष्टीचा प्रादुर्भाव झाला असावा." पुनः त्याला संशय येऊन तो विचारतो, "हा पसारा अमक्यापासून झाला हें कोण सांगेल? कारण देव झाले तरी पाठीमागचेच." ह्या सूक्तांत (१०-१२९) संशय व्यक्त केला आहे; चिकित्सा आहे; १२१ व्या सूक्तांत मात्र सृष्टीच्या मुळाशीं परमेश्वर आहे ही कल्पना निःसंदिग्ध शब्दांत प्रकट केली आहे. अनेक देवतांचे ऋग्वेदकालीन उपासक अखेरीस एकदेव-कल्पनेवर स्थिर झाले.

ऋग्वेदाचे धार्मिक व तात्त्विक असे दोन भाग आहेत. तात्त्विक भाग थोडा आहे. ह्यांतूनच पुढें पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा (औपनिषद् दर्शन) हीं दोन शास्त्रें निर्माण झालीं. पैकीं पूर्व-मीमांसा हें धर्मशास्त्र असल्यामुळें अध्यात्मांत अगर तत्त्वज्ञानांत त्यांचा समावेश होणार नाहीं. यज्ञयाग करणें हा ऋग्वेदकालीन धर्म होता. हे यज्ञ कसे करावे म्हणजे फलप्राप्ति होईल ह्याचा विचार पूर्वमीमांसाकारांनीं केला, 'अथातो धर्मजिज्ञासा' (आतां धर्माची चिकित्सा) हें त्यांचें आरंभींचें वाक्य आहे. ज्योतिष्टोम यज्ञ केला तर स्वर्गाची प्राप्ति होते हें सिद्ध करण्यां-करितां बुद्धिमत्तेची आश्चर्यकारक कसरत करून त्यांनीं आपल्या शास्त्राची रचना केली. वेदांचें अपौरुषेयत्व व शब्दप्रामाण्य हे दोन महासिद्धांत त्यांनीं प्रस्थापित केले. पूर्वमीमांसाकारांची फार महत्त्वाची व अपूर्व कामगिरी म्हणजे वैदिक वचनांचा अर्थ करण्याच्या नियमांचे त्यांनीं एक शास्त्र तयार केलें. तात्त्विक विचारांकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें. स्वर्ग म्हणजे काय, तेथें सुखोपभोग कसा मिळतो व त्याकरितां जीव कोणतें शरीर धारण करतो; हें स्वर्गसुख अक्षय्य असतें कीं नाहीं, ह्याची चर्चा त्यांनीं टाळली. पूर्वमीमांसाकार देवांना मुळींच महत्त्व देत नाहींत, मग स्वर्गांत सुख कोण देणार; स्वर्ग वेदांच्या पूर्वी होता कीं यज्ञानें प्रत्येकाचा स्वर्ग स्वतंत्र आपोआप बनतो, इत्यादि प्रश्नांना त्यांनीं स्पर्श केला नाहीं. वेदांच्या स्वतःप्रामाण्या-वर त्यांनीं भर दिला.

अध्यात्माचा विषय म्हणजे सृष्टि अथवा जगत्. सृष्टीचे जड आणि चित् असे दोन भाग पडतात. उत्तरमीमांसा चित् सृष्टीचा म्हणजे जीवसृष्टीचा विचार प्रामुख्यानें करते. हे सर्व मीमांसाकार ईश्वराचें अस्तित्व मान्य करतात. जीवशिवाच्या परस्परसंबंधात मतभेद उत्पन्न झाले व तदनुसार द्वैत, अद्वैत, विशिष्टाद्वैत असे संप्रदाय निर्माण झाले. ह्या सर्वांचा आधार प्रस्थानत्रयी (गीता, उपनिषदें व ब्रह्मसूत्र). आपआपल्या बौद्धिक प्रवृत्तीला अनुसरून प्रत्येकानें ह्या मूलाधाराचा वेगवेगळा अर्थ लावला. आज शंकराचार्यांच्या अद्वैत मताचा पगडा हिंदु-मनावर बसला आहे. हा संप्रदाय जीवात्मा व परमात्मा ह्यांचा आत्यंतिक अभेद मानतो. 'अहमेव ब्रह्मास्मि' हें ह्यांचें निर्मळ महावाक्य. हें ज्ञान झालें—आत्मसाक्षात्कार झाला—म्हणजे बद्ध जीव मुक्त होतो—ब्रह्मांत विलीन होतो. 'मला ब्रह्म व्हावयाचें नाहीं; मी ब्रह्मच आहें'—मात्र हें साक्षात् ज्ञान झालें पाहिजे. इतका अभेद मानल्यावर जगाला स्थानच राहत नाहीं. ब्रह्म एक, तें पुनः सर्वव्यापी, मग जग निराळें कसें असूं शकेल? ह्यास्तव मायावाद प्रसृत झाला. जगत् मिथ्या हा सिद्धांत प्रतिपादण्यांत आला. गौडपादाचार्यांच्या कारिकेंत जग झालेंच नाहीं असा सिद्धांत मांडला आहे (एतत् तत् उत्तमं सत्यं यत्किंचित् न जायते।). मायानिर्मित हें जगत् व्यवहारार्थ सत्य मानावयाचें इतकेंच. ज्ञानोत्तर माया नष्ट होते. रज्जुसर्पाचा दृष्टांत समजुती-साठीं हे तत्त्वज्ञानी देत असतात. दोरी पडलेली असावी. अंधारांत ती आपणांस सापासारखी दिसते. आपण भितों. पुढें वस्तुस्थितीचें ज्ञान होतें. सर्पग्रहव्यवहार आपोआप बंद पडतो. ह्या मतांत जगाच्या उत्पत्तीला अर्थातच महत्त्व नाहीं.

ह्याच्या उलट द्वैती परमेश्वर व जीव अगदीं भिन्न आहेत, असें मानतात. त्यांच्यांत सेव्यसेवकभाव आहे. तसेंच पहिला स्वतंत्र व सर्वज्ञ तर दुसरा परतन्त्र व अल्पज्ञ. ह्या मताचे पुरस्कर्ते मध्वाचार्य; त्यांच्या नांवावरून हें तत्त्वज्ञान माध्वसिद्धान्त म्हणून ओळखलें जातें. पुढील श्लोकांत ह्या मताचीं तत्त्वें संग्र-हित केलेलीं आहेत—

श्रीमन्मध्वमते हरिः परतरः सत्यं जगत् तत्त्वतो
भेदो जीवगणा हरेरनुचरा नीचोच्चभावं गताः।
मुक्तिर्नैजसुखानुभूतिरमला भक्तिस्तु तत्साधनम्
द्वयक्षादित्रितयं प्रमाणमखिलाम्नायैकवेद्यो हरिः॥

अद्वैताच्या सर्वथैव उलट. जग सत्य; जीव परस्परांहून भिन्न; सुखानुभूति ही मुक्ति—आनंदानुभूति नाहीं; आणि भक्ति हें साधन.

रामानुजाचार्यांनीं विशिष्टाद्वैत मताचा पुरस्कार केला. ह्या संप्रदायाचे अनुयायी थोडे दक्षिणेंत व थोडे मारवाडांत आहेत. ह्या मताचा प्रभाव जनमनावर कधींच पडला नाहीं. जीव (चित्) व जगत् (जड) हीं ईश्वरापासून भिन्न आहेत व सत्य आहेत; तथापि हीं दोन तत्त्वें ईश्वराच्या शरीराचेच भाग आहेत. हें एक विशिष्ट प्रकारचें अद्वैत आहे. म्हणून ह्या पंथाला विशिष्टाद्वैत हे नांव पडलें. जीव हा ज्ञानस्वरूप असून जडदेहाचा शरीरी व ईश्वराचें शरीर असा आहे. द्वैत्यांप्रमाणें सर्व जीव भिन्न भिन्न मानतात. परमात्म्याचें अचित् शरीर म्हणजेच प्रकृति. या प्रकृतीचा विकास म्हणजे जग. ही विकासप्रक्रिया वा विकासक्रम जवळजवळ सांख्यांप्रमाणेंच आहे. रामानुजाचार्यांना मायावाद,

जगन्मिथ्यावाद, जीवब्रह्मैक्य व निर्गुणब्रह्मवाद असंमत आहेत. शंकराचार्यांचें खंडण करणें हा ह्या शास्त्राचा हेतु. त्यांत अभिनव विचार मुळींच नाहीं. म्हणून ह्या शास्त्राचा लोप होऊं पाहत आहे. ह्यांच्या मोक्षाचें साधन भक्तिमार्ग होय.

वल्लभाचार्यांना शंकराचार्यांची माया अमंगल वाटली. बाकीच्या अद्वैत सिद्धांत त्यांना मान्य. ब्रह्माला अमंगल मायेचा संपर्क नको म्हणून त्यांनीं शुद्धाद्वैताचा पुरस्कार केला. त्यांचें ब्रह्म म्हणजे कृष्ण. वल्लभाचार्यांच्या ब्रह्मसूत्रावरील भाष्याला अणुभाष्य म्हणतात. शंकराचार्य मायेपासून जगाची उत्पत्ति मानतात; सांख्य प्रकृतीपासून; नैयायिक परमाणूपासून; तर वल्लभाचार्य, स्वतः ब्रह्मच जगद्रूपी कार्यांत परिणत होतें, असें प्रतिपादितात. ह्यांचा आवडता दृष्टांत कोळ्याचा. कोळी आपल्या अंगांतून सूत काढतो व त्याचें जाळें विणतो, आणि वाटेल तेव्हां तें परत अंगांत जिरवतो. तद्वत् जग हें ब्रह्मापासून बाहेर पडलें आहे.

निंबार्कानें द्वैताद्वैत मत प्रस्थापित केलें. त्याच्या मतें जीव, जडसृष्टि व ईश्वर ह्यांत भेद आहे तसाच अभेदहि आहे. रामानुजाचार्यांशीं निंबार्काचें मत जुळणारें आहे.

न्यायशास्त्राचा अध्यात्माशीं दूरान्वय संबंध आहे. न्यायशास्त्र म्हणजे तर्कशास्त्र. ईश्वर, जीव व जडसृष्टि हे ज्ञानाचे विषय होत. हें ज्ञान मिळविण्यास कोणतीं प्रमाणें उपयोजावीं ह्याचा विचार मुख्यत्वेंकरून हें शास्त्र करतें. आमच्या पद्धतीनें आत्मसाक्षात्कार होऊन मोक्ष मिळतो असे हें शास्त्र सांगतें.

योगशास्त्राची गणना तत्त्वज्ञानांत करतां येणार नाहीं. त्याला वैचारिक मूल्य नाहीं. शारीरशास्त्र हा योगाचा आधार. यमनियमादि साधनांनीं प्राणवायूचें नियंत्रण करून चित्तवृत्तींचा निरोध केला असतां आत्मसाक्षात्कार होतो. अशा चित्तनिरोधाला समाधि म्हणतात. पातंजलीचें योगशास्त्र मोक्षासाठीं आहे, एवढ्याचकरितां न्यायशास्त्राबरोबर योगाचा उल्लेख करणें भाग पडलें. मोक्षासाठीं म्हणजे मोक्षप्राप्तीचें साधन योगशास्त्र आहे. योगशास्त्राच्या समाधीविना आत्मसाक्षात्कार अशक्य आहे, असें कित्येकांचें म्हणणें आहे.

कपिलाचें सांख्यदर्शन हें एक स्वतंत्र विचाराचें कार्य म्हणून झळकणारें आहे. ह्या शास्त्राची परिभाषाहि त्यामुळें स्वतंत्र आहे. जीवात्म्याला सांख्यपुरुष म्हणतात. हा पुरुष नित्य, द्रष्टा व कर्तृत्वशून्य आहे. हे पुरुष अनंत आहेत. प्रत्येकाचा जीवात्मा स्वतंत्र. सांख्यांचें मुख्य तत्त्व म्हणजेच प्रकृति. सत्त्व, रज व तम यांची साम्यावस्था म्हणजेच प्रकृति. ह्या प्रकृतीपासून जगाची निर्मिति झाली आहे. ह्या निर्मितींत महत् अथवा बुद्धि हें पहिलें तत्त्व; नंतर अहंकार, अहंकारापासून पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व अकरावें मन आणि शिवाय पांच तन्मात्रें, ह्यांची उत्पत्ति होते. तन्मात्रांपासून आकाश, वायु, तेज, जल आणि पृथ्वी हीं पंचमहाभूतें उत्पन्न होतात. ह्या अनुक्रमानें सांख्यांनीं जगताची उत्पत्ति वर्णिली आहे. प्रकृति आणि पुरुष स्वतंत्र आहेत. सांख्य जडवादी आहेत. कारण त्यांच्या सृष्टीची उत्पत्ति जडापासून आहे.

शब्द, स्पर्श, रूप, रस व गन्ध हीं पंच तन्मात्रें होत. प्रकृतीला प्रधान हें दुसरे नांव आहे. अहंकार, बुद्धि व मन ह्या तिघांना मिळून अन्तःकरण म्हणतात. मनुष्याला सुखदुःख होतें. हे अन्तःकरणाचे विकार समुद्राच्या लाटांप्रमाणें आहेत. ह्यांत जीवाचें प्रतिबिंब पडतें. या लाटांच्या उसळींत प्रतिबिंबाला सुखदुःखाचे हेलकावे खावे लागतात. आणि जीव हें सुखदुःख माझेंच आहे, असें मानतो. हा भ्रम, ह्या अंन्तःकरणाच्या सुखदुःखादि विकारांशीं माझा कांहीं संबंध नाहीं हें ज्ञान जीवाला झालें कीं तो मुक्तच आहे. ह्या ज्ञानाकरितां जगापासून प्रकृतीपर्यंत सर्व पदार्थांच्या वास्तविक स्वरूपाची त्याला ओळख झाली पाहिजे. हें पदार्थविज्ञानशास्त्र त्याला एकदां अवगत झालें म्हणजे त्याचा निश्चय होतो आणि तेथें बुद्धि स्थिर होण्यासाठीं तो योगाचा अवलंब करतो. अशा रीतीनें योगशास्त्र हें सांख्यशास्त्राचें एक अंग आहे, असें मानलें पाहिजे.

सांख्यांच्या शास्त्रांत ईश्वराला कोठेंच स्थान नाहीं. सांख्यांचें तत्त्वज्ञान, त्यांची प्रक्रिया अन्य सर्व शास्त्रांनीं उचलून आत्मसात् केली. निरीश्वरवादामुळें सांख्यमत मागें पडलें,

सांख्यांना यज्ञयागादि वैदिक कर्ममार्ग संमत नव्हता. पशुघातामुळें तो त्यांनी त्याज्य ठरविला. गीतेमधील अध्याय २– श्लोक ४२, ४३, ४४ ह्यांत सांख्यांचा अभिप्राय जोरदार भाषेंत व्यक्त केला आहे. सांख्यशास्त्र अधिक निष्काम कर्मोपदेश म्हणजे गीता. सांख्यांच्या मोक्षाचें साधन ध्यान–धारणा–समाधि ह्या प्रकारचें होतें. निष्काम कर्माचा मार्ग त्यांस माहीत नव्हता. अद्वैती वेदांत्यांनी श्रवण, मनन, निदिध्यास ह्यांवर भर दिला, त्यांना योगशास्त्र अपरिहार्य साधन असें वाटत नाहीं. सांख्यपद्धतीचें स्पष्टीकरण करणारा दृष्टांत पाण्यांत दिसणाऱ्या प्रतिबिंबाचा.

येणेप्रमाणें आमच्या तत्त्वज्ञानाचा इतिहास आहे.

उपनिषदांत जिवंतपणा व स्वतंत्र विचार आहे. उपनिषदांनंतर सांख्यांनीं जगांतील तत्त्वज्ञानात अमोलिक भर घातली. तदनंतर गीतेनें एक नवीनच निष्काम कर्माचें तत्त्व लोकांपुढें मांडलें. ह्या सर्वमान्य होणाऱ्या नावीन्यामुळें गीतेला अपूर्व महत्त्व प्राप्त झालें. शंकराचार्यांनीं अगदीं नवीन असें कांहींच सांगितलें

नाहीं. परंतु सर्वांचा समन्वय करून सर्व शास्त्रांचें मंथन करून एका सुसंगत तत्त्वज्ञानाची अलौकिक मांडणी केली. आणि आपल्या ह्या रसायनाला स्वतंत्र मताचें महत्त्व प्राप्त करून दिलें. शंकराचार्योंची ओजस्वी भाषा, वादनैपुण्य, सशास्त्र युक्तिवाद ह्या अद्वितीय गुणांनीं बाकीचीं शास्त्रें निष्प्रभ झालीं. शंकराचार्योंच्या मागून येणारे आचार्य नुसतीं हाडें चघळीत बसले, स्वतंत्र विचार पूर्णपणें लोप पावला, असा आरोप करणें हें विपर्यस्त व कठोरपणाचें कित्येकांना वाटणें उचित असलें तरी ह्या मागूनच्या आचार्योंनीं, किरकोळ गोष्टी वगळल्या तर तत्त्वज्ञानांत महत्त्वाच्या विचाराची भर घातली, असें प्रतिपादणें जड जाईल.

ह्या मुख्य तत्त्वज्ञानाखेरीज तदंगभूत असे दुसरे सिद्धांत आहेत. ह्या सिद्धांतांनीं भारतीयांच्या जीवनावर शाश्वत परिणाम केला आहे; त्यांच्या जीवनाला एक विशिष्ट वळण लागलें आहे. ह्यास्तव त्यांचा निर्देश करणें अवश्य आहे.

सर्व शास्त्रकार मोक्ष मानतात. तेव्हां जीव देहाबरोबर नष्ट होत नाहीं, तो अमर आहे, हें ओघानेंच प्राप्त झालें. एवढेंच नव्हे तर पुनर्जन्महि त्यानें सूचित होतो. जीवाचें अमरत्व व पुनर्जन्म हे भारतीय तत्त्वज्ञानाचे आधारस्तंभ होत. ह्यानंतर जन्माला कारक कर्म आहे हा एकट्या भारतीयांनींच प्रस्थापित केलेला महान् सिद्धांत आहे. ह्या सिद्धान्तानें कर्मविचिकित्सेला जन्म दिला. मोक्ष म्हणजे जन्माचा अभाव. कर्म जन्मप्रद; म्हणून अकर्मानें जन्म टळेल असें स्वाभाविक अनुमान निघतें. परंतु कर्म तर टाळतां येत नाहीं. "न जातु तिष्ठत्यकर्मकृत्।" तेव्हां फलाची आशा न धरतां निर्हेतुकपणें जें कर्म केलें जातें तें बंधनकारक म्हणजे जन्मप्रद होत नाहीं हा सिद्धांत प्रतिपादण्यांत आला. कर्म करूनहि कर्म न केल्यासारखें होतें. ह्याला कर्मवाद, कर्मयोग, वगैरे नांवें आहेत. कर्मयोगाचें एक स्वतंत्र तत्त्वज्ञान आहे असें समजण्यास हरकत नाहीं. सकाम कर्मानें चित्तशुद्धि होत नाहीं, ती निष्काम कर्मानेंच होणार असें शंकराचार्य म्हणतात व गीतेंतहि त्याला आधार आहे (योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वात्मशुद्धये). आतां अशी कल्पना करूं कीं, एका माणसाचें प्रारब्धकर्म ह्या जन्मीं संपलें आहे. ह्या जन्मीं त्यानें निष्काम कर्म केलें. परंतु आत्मज्ञान झालें नाहीं. अशा स्थितींत त्या माणसाचें काय होणार? बंधनकारक कर्म न केल्यामुळें पुनर्जन्म नाहीं; ज्ञान नसल्यानें मोक्ष नाहीं. शंकराचार्यांनीं कर्मविपाकाचा सिद्धांत मान्य केला आहे; परंतु हें कोडें सोडविलें नाहीं. निष्काम कर्मानेंच सिद्धि अथवा मुक्ति मिळते असें स्वतंत्र तत्त्वज्ञान एका काळीं असावें. ज्ञानसिद्धांत पुढें आल्यावर तें मागें पडलें असावें. कारण उघडच आहे. कर्म हें जड आहे. तें मोक्ष देण्यास असमर्थ असणार. निष्काम कर्माचें फळ जर केवळ चित्तशुद्धि असेल तर कर्मयोग हें नांव अन्वर्थक होणार नाहीं.

**तत्रक**—युरोपांत याचें सुमर किंवा न्हुस असें नांव आढळतें. हें छोटें झाड कॅनरी व मदिरा बेटें आणि भूमध्यसमुद्राचा कांहीं भाग येथें आढळतें. ह्याच्या पानांत रंजक द्रव्य असतें. युरोपमध्यें पानें व डहाळ्या या दोन्हींचा कातडीं कमविण्याकडे उपयोग करतात. यांच्यापासून मोरोक्को कातडें कमवितात. पुस्तकबांधणीला लागणारें कातडें यांच्यापासून उत्तम प्रकारें कमवितां येतें. प्रसिद्ध जपानी रोगण याच्या एका जातीपासून तयार करतात.

**तंत्रयुक्ति**—सभा-परिषदा यांतून चर्चा कशी करावी यासंबंधीं विवेचन करणारा हा फार जुना (ख्रि. पू. ६०० च्या सुमाराचा) एक ग्रंथ आहे. सुश्रुत, चरक, अर्थशास्त्र, वात्स्यायन, भाष्यें, इ. ग्रंथांतून याचा उल्लेख आहे. तर्कशास्त्रीय इतिहासग्रंथांत हा सर्वांत जुना आहे. मेधातिथि गौतमानेंहि याच कालांत अशाच प्रकारचा ग्रंथ लिहिला आहे.

शास्त्रीय पद्धतीनें चर्चा करतांना पुढील प्रकार या तंत्रयुक्ति ग्रंथांत सांगितले आहेत:—

(१) अधिकरण (विषय); (२) विधान (व्यवस्था); (३) योग (शब्दसमुच्चय); (४) पदार्थ (वर्ग); (५) हेत्वार्थ (गर्भितार्थ); (६) उद्देश (व्याख्या); (७) निर्देश (प्रकट करणें); (८) उपदेश (सूचना); (९) अपदेश (विशिष्ट कथन); (१०) अतिदेश (योजनाविस्तार); (११) प्रदेश (विधान जें करावयाचें त्याची निश्चिति); (१२) उपमान (सादृश्य); (१३) अर्थापत्ति (गृहीत गोष्ट); (१४) संशय (शंका); (१५) प्रसंग (सुसंगत मत); (१६) विपर्यय (उलटणें); (१७) वाक्यशेष (संदर्भ); (१८) अनुमत (संमति); (१९) व्याख्यान (वर्णन); (२०) निर्वचन (उपपत्तिविवरण); (२१) निदर्शन (उदाहरण); (२२) अपवर्ग (अपवाद); (२३) स्व-संज्ञा (विशिष्ट परिभाषा); (२४) पूर्वपक्ष (प्रश्न); (२५) उत्तरपक्ष (उत्तर); (२६) एकान्त (कोणी); (२७) अनागतावेक्षण (पूर्वभाकित); (२८) अतिक्रान्तावेक्षण (सिंहावलोकन); (२९) नियोग (प्रतिबंध); (३०) विकल्प (एकाऐवजीं दुसरा); (३१) समुच्चय (एकराशि); (३२) ऊह्य (पदन्यूनत).

**तंत्रवाङ्मय**—हिंदूंच्या धार्मिक वाङ्मयांत श्रुति, स्मृति, पुराणें यांच्यानंतर तंत्रांचा अनुक्रम महत्त्वाच्या दृष्टीने येतो. शाक्तपंथी याला पांचवा वेद मानतात. कांहीं तंत्रें पुराणांच्या आधींचीं (६ व्या, ७ व्या शतकांतील) तर कांहीं मागाहूनचीं आहेत. तंत्र म्हणजे धार्मिक विधि किंवा नियम असा मूळ अर्थ; नंतर

तंत्राला रहस्यमय अर्थ प्राप्त झाला. दत्तात्रेयानें हे ग्रंथ लिहिले असें समजलें जातें, पण शिवपार्वतीसंवादरूप हे ग्रंथ आहेत. बंगालमधील शाक्तपंथी लोक तंत्रग्रंथांना वेदांहून अधिक महत्त्व देतात. बरेचसे तंत्रग्रंथ शारदालिपींत लिहिलेले आहेत.

तंत्रवाङ्मय हे कित्येकांना अनीतिमूलक व टाकाऊ वाटत असलें तरी त्यांत गूढविद्या भरलेली आहे व त्याच्या मुळाशीं औपनिषद् तत्त्वज्ञान आहे. जगताच्या उत्पत्ति–धारणा–विलयाचें सामर्थ्य शक्ति–प्रकृति देवता हिच्या ठिकाणीं आहे असा या पंथाचा जो दावा आहे तो असत्य म्हणतां येणार नाहीं. शाक्तपंथ व्यापक आणि उदार तत्त्वज्ञानावर उभारला आहे; पण त्याच्या फक्त आचारविधींवर कटाक्ष ठेवून वाङ्मयाकडे पूर्ण दुर्लक्ष केलें जातें.

बौद्धधर्मावरहि तंत्रांचा मोठा परिणाम झालेला आहे. बौद्ध-वाङ्मयांत क्रियातंत्र, चर्यातंत्र व योगतंत्र असे तीन प्रकारचे तंत्रग्रंथ आहेत. मोठी संख्या योगतंत्राची आहे. या तंत्रांत गूढविद्या, जादूटोणे व शृंगारविलास यांचें चांगलेंच मिश्रण आढळेल. या ग्रंथांची भाषा फार अशुद्ध असते. याचा प्रसार उत्तर हिंदुस्थान, तिबेट व चीन या भागांत झाला. शाक्तपंथ पाहा.

शाक्तांचे तंत्रग्रंथ मांत्रिकांचीं व तांत्रिकांचीं पोट भरण्याचीं साधनें होऊन राहिलीं आहेत. यांपैकीं आगम ग्रंथ पुढील होत—

इंद्रजाल, उड्डीसरतंत्र, उमामहेश्वरतंत्र, कालाग्निभैरवतंत्र, कात्यायनीतंत्र, कामेश्वरतंत्र, कुलार्णव, कुलादेशतंत्र, कौमारीतंत्र, कैवल्यतंत्र, कंकालभैरवतंत्र, गायत्रीतंत्र, गुहक्षतंत्र, गंधर्वतंत्र, चामुंडातंत्र, चंडोग्रशूलपाणितंत्र, चंडाश्वरतंत्र, छिन्नरहस्य, डामर-तंत्र, मंत्रमहोदधि, त्रिपुरार्णवतंत्र, निर्वाणतंत्र, नीलतंत्र, पूर्वम्रतंत्र, फेत्कारीतंत्र, बगलामुखीतंत्र, बालाविलासतंत्र, बिंदुमालिनीतंत्र, ब्रह्मयामल, बृहद्योनितंत्र, भुवनेश्वरीतंत्र, भूतडामरतंत्र, भैरवतंत्र, भैरवीतंत्र, भैरवनाथतंत्र, महानिर्वाणतंत्र, महामायातंत्र, मातृका-तंत्र, मालिनीतंत्र, माहेश्वरीतंत्र, मुद्राप्रकाशतंत्र, मुंडमालातंत्र, मंत्रमहोदधि, योगिनीतंत्र, रुद्रयामलतंत्र, लिंगतंत्र, वामकेश्वरतंत्र, वातुलोत्तरतंत्र, विश्वसारोद्धारतंत्र, विमलतंत्र, वीरतंत्र, वैष्णवीतंत्र, शक्तिसंगमतंत्र, शक्तियानला, श्यामारहस्यतंत्र, देवीरहस्यतंत्र, कालिका–पुराण, शारदातंत्र, श्यामोपनिषद्, शारदातिलक, श्यामार्चनचंद्रिका, सारस्वततंत्र, सिद्धभैरवनाथतंत्र, सुंदरीतंत्र, सौम्यतंत्र, संमोहनतंत्र, ज्ञानार्णव.

या मंत्रशास्त्राच्या देवता पुढीलप्रमाणें आहेत :—काली, श्री, तारा, महिषासुरमर्दिनी, नारसिंही, रुद्राणी, शववाहना, श्यामा, शक्ति, शरभा, राजराजेश्वरी, त्रिपुरसुंदरी, कामेश्वरी, वज्रेश्वरी, वनदुर्गा, योगिनी, भद्रकाली, कामाक्षी, तुळजा, व्याघ्रजा, कात्यायनी, मीनाक्षी, कौमारी, माहेश्वरी, भैरवी, धनुर्धारी, छिन्नमस्तका, असितांगभैरव, कालभैरव, कपालभैरव, बटुभैरव, क्रोधभैरव, चंडभैरव, मार्तंडभैरव, उच्छिष्टभैरव, वगैरे, या देवतांचे ताईतदोरे भक्तांना विकले जातात.

**तनखा**—हें रुपयासारखेंच एक जुनें नाणें होतें. मुसलमानी अमलांत हेंच चालत असे. हिंदुस्थानांतील प्रत्येक सुभा, सरकार, महाल, कर्यात, कसबा व गांव यांच्या वसुलीची बादशाहींत जी आकारणी झाली होती तिलाच तनखा–वसूल म्हणत असत. पेशव्यांनीं सरदारांस जहागिरी दिल्या त्यापूर्वींचा त्या त्या प्रदेशाचा तनखा पाहून अजमासें दिल्या होत्या.

**तन्यता**—(डक्टिलिटी). घनपदार्थ विशेषतः धातु याची तार निघण्याची जी शक्ति अथवा गुणधर्म तीस तन्यता असें म्हणतात. निरनिराळ्या धातूंमध्यें ही तन्यता कमीअधिक प्रमाणांत आढळून येते. तन्यतेच्या गुणधर्मांप्रमाणें जर आपण निरनिराळ्या धातूंचा उतरता क्रम लावला तर तो पुढें दिल्या-प्रमाणें लागेल:—सोनें, चांदी, प्लॅटिनम्, लोह, ताम्र, निकेल, पॅलॅडियम, कॅडमियम्, जस्त, कथिल आणि शिसें.

**तपकीर**—किंवा नसस्य ही तंबाखूपासून तयार करतात. १७ व्या शतकांत तपकीर ओढण्याचें व्यसन इंग्लंडमध्यें सुरू झालें व १९ व्या शतकाच्या आरंभापर्यंत त्याचा बराच प्रसार झाला. पण तो आतां तेथें नामशेष झाला आहे.

हिंदुस्थानांत माळवा, राजपुताना, मद्रास, इत्यादि ठिकाणची नस (तपकीर) फार प्रसिद्ध आहे. पुण्यासहि उत्तम प्रतीची तपकीर होत असे. पुण्याची कृष्णंभट्टी अथवा वर्तकी तपकीर पूर्वीं प्रसिद्ध असे.

तपकीर ठेवण्याच्या डब्या करण्यांतहि कौशल्य दिसून येतें. त्या कामीं वापरलेली कलाकुसरी प्रदर्शनांतून ठेवलेल्या डब्यांत पाहावयास मिळते.

**तफावत**—ही अर्थशास्त्रीय संज्ञा शेअरबाजारांतील आहे. जेव्हां शेअर्स विकतात किंवा विकत घेतात तेव्हां विकत देणारा किंवा घेणारा प्रत्यक्ष ते देण्याच्या किंवा घेण्याच्या उद्देशानें व्यवहार करीतच नसतो. तर त्यांच्या चढउतारांत नफा मिळ-वावा या हेतूनें ही सट्टेबाजी करीत असतो. विक्रीची वेळ आणि हिशेब चुकते करण्याची वेळ या अवधींत भावांत जो फरक पडतो ती तफावत. जर भाव उतरला तर विकत घेणाऱ्याला आपला व्यवहार पुढच्या हिशेबाला ओढण्यासाठीं तफावतीचे पैसे फक्त भरावे लागतात. पण जर भाव चढला तर विक-णाऱ्याचें नुकसान होतें.

**तबला**— एक वाद्य. पखवाजाच्या खोडाचे दोन समान भाग करून ते उभे ठेविले असतां तबल्याचा आकार होतो.

तबल्याच्या खोडास एका अंगास तोंड ठेवितात व तें कातड्यानें मढवितात. ही मढविण्याची व त्यास शाई भरण्याची कृति पखवाजाप्रमाणेंच असते; पण गजऱ्यांतून ओंविलेली वादी दुसऱ्या अंगास बसविलेल्या लोखंडी कड्यांतून काढून घेतलेली असते; ह्या वादीखालीं पखवाजांत असलेल्या गठ्ठ्याप्रमाणेंच गठ्ठे घालवितात. दुसरा भाग क्वचित् लांकडी, मातीचा अगर तांबें किंवा पितळ ह्या धातूंचा करतात. त्यास 'बाह्या' म्हणतात. ह्यास एक तोंड ठेविलेलें असतें. तें कातड्यानें मढवितात. केव्हां केव्हां ह्याहि तोंडाशीं गजरा बसवितात व त्यांत ओंविलेली वादी बुडाशीं बसविलेल्या लोखंडी कड्यांतून ओंवून पक्की करतात. ह्या बाह्याच्या तोंडाशीं मढविलेल्या कातड्यावर मध्यापासून किंचित् एका अंगास सुमारें तसूभर व्यासाची वर्तुळाकार शाई घालितात. ह्यायोगें दर वेळीं कणीक लावण्याचे श्रम वांचतात. कणीक लावण्याचा जो हा भाग त्यास 'बाह्या' म्हणावयाचें; कारण हें कीं, तो डाव्या हातानें वाजविला जातो. याला प्रचारांत 'डग्गा' असेंहि म्हणतात. तबल्याचा उपयोग गायकाबरोबर साथ करण्यांत होतो.

**तंबाखू**—[वर्ग–सोलानासी. जाति निकोटिआना]. या जातीचीं अनेक झाडें आहेत. याच्या पानांचा निरनिराळ्या प्रकारांनीं उपयोग करण्यांत येतो. तंबाखू फार प्रमाणांत ओढल्यास तिचा मज्जातंतूंवर व शरीरावर परिणाम होतो; कारण तंबाखूच्या पानांत निकोटिन नांवाचें विषारी द्रव्य असतें.

तंबाखू हें एकवर्षायु रोप असून त्याची लागवड बियापासून करतात. याचें बीं फार बारीक असतें व एका औंसांत ४,००,००० भरतें. हें मूळ दक्षिण व मध्य अमेरिकेंतील असून अमेरिकेमध्यें व्हर्जिनिआ संस्थानांत आढळलें. याचीं पानें दोन फूट लांब असून एकाआड एक येतात व आकारानें लांबट भाल्याच्या पात्यासारखीं असतात. दुसऱ्या एका जातीचीं पानें लहान असून तीस हिरवट पिवळीं फुलें येतात. यावेरीज सुमारें ५० इतर जाती आहेत.

तंबाखूचीं पानें उत्तम प्रतीचीं व मोठ्या आकाराचीं मिळावीं याकरितां कांहीं झाडें बियाकरितां राखून बाकीच्यांचीं फुलें (शेंडे) तोडून टाकण्यांत येतात. खालचीं पानें प्रथम पिवळीं पडतात व वाळतात. कांहीं ठिकाणीं इतर पानें वाळण्यापूर्वी हीं पानें गोळा करण्यांत येतात. यांचे गुणधर्म इतर पानांपेक्षां निराळे असतात म्हणून तीं दुसऱ्या कामीं उपयोगास लावतात.

कांहीं ठिकाणीं विशेषतः अमेरिकेमध्यें सर्व झाडच वाळल्यावर उपटून त्याचीं पानें गोळा करण्यांत येतात. नंतर तीं कोठ्यामध्यें टांगून ठेवून वाळविण्यांत येतात. वाळल्यावर त्यांचे ढीग रचून ठेवण्यांत येतात. यामुळें पानें उबतात व कुजतात व उबेमुळें उष्णता उत्पन्न होते. या क्रियेमुळें त्यांचा रंग व स्वाद बदलतो. यास मुरवणें म्हणतात. यामुळें ती टिकाऊ होते. याप्रमाणें मुरवलेल्या तंबाखूचे गठ्ठे बांधण्यांत येतात व ते पाहिजे तिकडे पाठविण्यांत येतात. हीं वाळलेलीं पानें कारखान्यांत आलीं म्हणजे तीं दमट करण्यांत येतात व त्यामुळें तीं नरम होतात. नंतर साफ करून वाटेल त्या उपयोगास आणतां येतात. नंतर ओढण्याची तंबाखू करावयाची असल्यास निरनिराळ्या प्रकारच्या तंबाखूचें योग्य प्रमाणांत मिश्रण करून पानें कातरून बारीक करण्यांत येतात; किंवा सुकीं पानें चुरडून त्यांची पूड करण्यांत येते.

कांहीं देशांत तंबाखूचीं जाड पानें प्रथम मधुर व स्वादयुक्त पाण्यांत बुचकळून काढण्यांत येतात. आणि त्यांचे दोर वळण्यांत येतात. व त्यांचीं लहानमोठीं वळीं करण्यांत येतात. नंतर तीं सुकविण्यांत येतात. कांहीं देशांत अशा स्वादयुक्त तयार केलेल्या पानांच्या वळकट्या गुंडाळण्यांत येतात आणि तीं दाबून वाळविण्यांत येतात. कांहीं देशांत तीं कातरून खाण्याच्या कामीं उपयोगांत आणतात.

युनायटेड स्टेट्स, हिंदुस्थान, व चीन या देशांत जगांतील ¾ तंबाखू होते. शिवाय हॉलंड, जर्मनी, ब्राझील, जपान, ग्रीस, तुर्कस्तान, ब्रह्मदेश, इत्यादि देशांतहि याची बरीच लागवड आहे. १९३९–४० सालीं अडीच कोटी क्विंटल तंबाखू जगांत निघाली. तंबाखूचें मूलस्थान दक्षिण अमेरिका. तेथून पोर्तुगीज लोकांनीं १७ व्या शतकाच्या आरंभीं ती हिंदुस्थानांत आणिली. दाराशिकोहीमध्यें स. १५०८ त दक्षिणेंत प्रथम तंबाखू आली असें म्हटलें आहे. स. १६०५ मध्यें आसदबेगनें विजापूरहून अकबरास तंबाखू पाठविली. १८२९ सालीं ईस्ट इंडिया कंपनीनें मेरीलॅंड व व्हर्जिनिया या जातीची तंबाखू हिंदुस्थानांत पाठविली. १८७६ सालीं गंगेच्या कांठीं गाझीपूर येथें ८०० एकर क्षेत्राचें एक प्रयोगक्षेत्र स्थापन झालें. सर्व हिंदुस्थानांत गाझीपुरी तंबाखू चांगली समजतात. त्रिचनापल्ली येथील चिरूटाची सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्धि आहे.

हिंदुस्थानांत वेळोवेळीं तंबाखूच्या अनेक जाती आल्या. त्यापैकीं पूर्वी आलेल्या अमेरिकन जातींना येथें देशी असें म्हणतात. त्या बहुतकरून महाराष्ट्रांत पिकतात. दुसरी जात तुर्कस्तानांतून आली. तिला विलायती असें नांव पडलें आहे. ही उत्तर हिंदुस्थानांत पिकते.

तंबाखूपासून पुढील जिनसा होतात—

१. तपकीर—तपकीर करण्याकरितां जाड, काळीं पानें निवडून घेतात. नंतर त्यांवर ज्येष्ठमध वगैरे कांहीं द्रव्यांची स्वाद येण्यांकरितां क्रिया करण्यांत येते. नंतर तीं ओलसर करून बरेच दिवस रचून दाबून ठेवण्यांत येतात. म्हणजे तीं उबतात व थोडीशीं कुजतात, म्हणजे मुरतात. नंतर तीं वाळवून त्यांची भुकटी करण्यांत येते व पुन्हां ती तंबाकू मुरविण्यांत येते. तपकीर बारीक, काळी, पिंगट किंवा फिकट करडी असते.

२. सिगार-चिरूट— यांमध्यें मुख्य तीन भाग असतात. १ पुरण, २ बंधन, व ३ आवरण. पुरण हें निरनिराळ्या जातींच्या मिश्र केलेल्या तंबाखूचा चुरा असतो. हा चुरा एका दमट व नरम तंबाखूच्या पानांत गुंडाळून त्याचा एक लांबट वाटोळा गुंडा तयार करतात व हा गुंडा पुन्हां एका विशिष्ट रंगाच्या व जाडीच्या दांडा असलेल्या तुकड्यात गुंडाळतात. व त्याच्या बारीक बाजूस चिकटवून त्याचें तोंड बंद करतात. फिक्या रंगाचे चिरूट ओढावयास हलके असतात व काळ्या रंगाचे तीव्र असतात, ही समजूत बरोबर नाहीं. अलीकडे यंत्रांनींहि चिरूट वळण्याचें काम करण्यांत येतें, पण हातांनीं वळलेल्या व यंत्रानें वळलेल्या चिरूटांतील चवींतील फरक तज्ज्ञ ओढणाऱ्यास कळून येतो.

सिगारेट—सिगारेट ही तंबाखूचा बारीक चुरा कागदांत गुंडाळून तयार करण्यांत येते. निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या जातीची तंबाखू सिगारेटकरिता वापरण्यांत येते. अलीकडे सिगारेट आपोआप तयार करणाऱ्या यंत्राच्या साहाय्यानें बनविण्यांत येतात. या यंत्रामध्यें प्रथम एक तंबाखूची बनलेली लांब नळी बाहेर येते व ती बरोबरच एका गुंडाळींतून त्याच गतीनें कागदाची पट्टी बाहेर येत असते. त्या पट्टीमध्यें ती तंबाखूची नळी गुंडाळली जाऊन कागद भोंवतीं डकविला जातो. नंतर या नळीचे योग्य आकाराचे तुकडे कापले जातात. त्यांवर नांव छापलें जातें आणि त्यांस बुचाचीं टोकें डकविलीं जातात. हें फार विलक्षण यंत्र आहे. या यंत्रानें एका तासांत दहा हजार सिगारेट तयार करतां येतात.

**तंबाखूवीर्य**— (निकोटाइन). तंबाखूंतील क्षारकल्प (अल्कलॉइड). तंबाखूंत ह्याचें प्रमाण शेंकडा १ ते ८ असून हें सेबिकाम्ल (मॅलिक ॲसिड) आणि निंबाम्ल (सायट्रिक ॲसिड) यांच्या लवणरूपांत आढळतें. हें स्वच्छ, वर्णहीन तेल चांगलेंच विषारी असून मज्जातंतूंवर अनिष्ट परिणाम करतें. तथापि तंबाखू ओढतांना धुरामध्यें फारच थोडें निकोटाइन जातें.

**तबारी** (८३८-९२३)—हा अरबी इतिहासकार व धर्मशास्त्रज्ञ अमोल येथें जन्मला. राइ बगदाद, सिरिया व ईजिप्त येथें त्याचें शिक्षण झालें. हा लहान असतांच ह्याचा बाप मरण पावला. त्यामुळें कष्ट करून त्याला शिक्षण मिळवावें लागलें. व त्याचे दिवस फार हालांत गेले. शिक्षण संपल्यावर तो वजिराच्या मुलाचा शिक्षक झाला. तो ईजिप्तमध्यें गेला, पण लौकरच त्याला बगदाद येथें परत यावें लागलें. तेथें तो मरेपर्यंत परंपरागत धर्माचा व कायद्याचा शिक्षक होता. त्याचा जीवनक्रम साधा पण उदात्त असून तो अत्यंत उद्योगी होता. त्यानें सर्व मतांवर टीका करून आपला नवीनच संप्रदाय काढला; यामुळें त्याजवर हनबाली पंथाच्या लोकांचा रोष झाला होता. पैगंबराचा व राजांचा इतिहास व कुराणावर टीका असे त्याचे दोन प्रमुख ग्रंथ आहेत.

**तंबू**—हें कापडी घर म्हणतां येईल. तंबूंचा उपयोग लष्करी शिबिरांत फार प्राचीन काळापासून सेनानींस उतरण्यासाठीं होत

असल्याचे उल्लेख आहेत. घराबाहेर उघड्यावर फार काळ राहावयाचें झाल्यास तंबू फार उपयोगी आहे. हे तंबू लहान-मोठे, एकखांबी, दुखांबी, कनातीचे, इ. प्रकारचे व शिबिर, शामियाना, राहुटी, बिचवा, पाल, इ. नांवाचे असतात. मोठमोठ्या समारंभासाठीं शामियाना उभारतात. याच्या उलट पाल अगदीं साधें असतें. जत्रेंतून दुकानदार अशीं पालें ठोकतात व त्यांतून हंगामी दुकानें थाटतात.

तंबू हा पाऊस आणि वारा यांना प्रतिबंध करणारा असावा; व त्याबरोबर हवा-उजेड आंत येण्याची त्यांत सोय पाहिजे. उन्हाळ्यांत थंड व थंडींत उबदार अशा तऱ्हेचा तंबू असतो; पण तो एकाच प्रकारचा नसतो. गरजेप्रमाणें त्याचे प्रकार असतात. जेव्हां कायम तळ पडावयाचा असतो तेव्हां कनातीचा (भिंतीचा) तंबू ठोकतात (चित्रांत ३ आंकडा); तो ऐसपैस असतो. अगदीं हलका, वाहून नेण्यासारखा तंबू जो असतो (चित्रांत १ आंकड्याचा) त्याला खांबाची जरुरी असतेच असे नाहीं. या तंबूच्या कांठानें एक भक्कम दोरी (टेप) शिवलेली असून तिच्या दोन्ही टोंकांस फासे ठेवतात. या फाशांतून एक दोरी ओंवून ती दोन झाडांमध्यें बांधतात. ही दोरी समोरासमोर तंबूबाहेरील दोन खांबांना

बांधल्यास ताठ राहते. या प्रकारच्या तंबूच्या तोंडाशीं व मागच्या बाजूस आधारासाठीं खांब उभे करतात (चित्रांत २ आंकडा). कांहीं तंबूंना दरवाजापुढें छत असतें. तंबूंत पाणी शिरूं नये म्हणून भोंवतालीं चर खणतात. मोठ्या तंबूंना तणावाच्या दोऱ्या असून त्या जमिनींत ठोकलेल्या खुंट्यांना बांधतात. मोठे अधिकारी व श्रीमंत लोक तंबूंत सर्व प्रकारच्या सोयी करून घेतात. तंबूंना दारें व खिडक्या ठेवतात. शेजारीं स्नानाचा, स्वयंपाकाचा व इतर कामाचा तंबू वेगळा ठोकतात.

**तंबोरा**—हें वाद्य लहानमोठ्या आकाराचें असतें. ह्या वाद्याचे दोन भाग असून ते एकमेकांस जोडलेले असतात. एक भाग वाटोळा असतो. तो प्रायः तीन–चतुर्थांश कडू भोपळा घेऊन तयार केलेला असतो. ह्यास पांच-सहा बोटें रुंदीची निमगोल दांडी बसविलेली असते. भोपळ्यावरील आच्छादनास पाटी म्हणतात व दांडीवरील लांकडी आच्छादनास दांडीच म्हणतात. दांडीचें वरचें टोंक लांकडी गाबडीनें बंद केलेलें असतें. दांडीच्या चारीक शेवटापासून सहा किंवा आठ इंचांवर हस्तिदंती दोन अटी एक बोट अंतरावर बसवितात. एकीला तारा ओंवण्याकरितां चार भोकें असतात व दुसरीला चार खांचा ठेवितात. ह्या अटीच्या वरच्या भागास तारा लावण्याकरितां अंगठ्याएवढ्या जाडीच्या दोन खुंट्या बसवितात; ह्यांस जोडाच्या खुंट्या म्हणतात. दांडीच्या एका अंगास तशाच प्रकारची एक खुंटी बसवितात; तिला पंचमाची खुंटी म्हणतात व दुसऱ्या अंगास आणखी एक खुंटी बसवितात तिला खर्जाची खुंटी म्हणतात. घोडीच्या दोनहि अंगांस दोन बोटांवर दाभण जाईल अशीं पांच पांच भोकें पाटीस पाडलेलीं असतात; त्यायोगें आवाज अधिक खुलतो. तंबोऱ्यास लावावयाच्या तारा चार असतात. दांडीच्या टोंकाशीं मध्यावर दोन खुंट्यांस दोन पोलादी तारा लावतात. त्यांस जोडाच्या तारा म्हणतात. तारांचा ध्वनि गोड निघावा म्हणून घोडीवर तारेखालीं थोडा कापूस पिंजून घालतात त्यास 'जव्हारी' म्हणतात. स्वर थोडा कमी–जास्त करतां यावा म्हणून तारांत मणी ओंविलेले असतात. गायकी तंबोऱ्याचें प्रमाण म्हणजे सामान्यतः तीस इंच घेराच्या भोपळ्यास तीन फूट लांबीची दांडी, इतकें असतें. गायकाशीं स्वराची साथ देण्यांत ह्याचा उपयोग होतो.

**तंबोरी**—ही तंबोऱ्यापेक्षां बरीच लहान असते. हिचा भोपळा सुमारें टीचभर व्यासाचा असतो व दांडी सुमारें दीड हात असते. हिचा स्वर बराच चढा असतो. वारकरी, हरिदास, भजनी लोक हिचा उपयोग करतात. स्वराची साथ देणें हाच हिचाहि उपयोग आहे. बीनकार आपल्या साथीस हिचा उपयोग करतांना दृष्टीस पडतात. हिची सर्व बनावट तंबोऱ्यासारखीच असून हिला चारच तारा लावितात; त्या पंचम, षड्ज, आणि खर्ज ह्या स्वरांत मिळवितात.



**तमाल**—मसाल्याचें एक झाड. समुद्रसपाटीपासून सुमारें ३,००० ते ७,००० फूट उंचीपर्यंतच्या प्रदेशांत हीं झाडें वाढतात. हीं झाडें मध्यम आकाराचीं असून सिंधु व सतलज ह्या दोन नद्यांमधील प्रदेशांत तुरळक आढळतात. परंतु पूर्व बंगाल, खासी टेंकड्या व ब्रह्मदेश यांमधून तीं पुष्कळ होतात. या झाडाच्या सालीपेक्षां पानांचें जास्त महत्त्व आहे व या पानांचा व्यापार बऱ्याच प्राचीन काळापासून सुरू होता. या झाडाची लागवड बहुधा बागांतून फणस व सुपारीचीं झाडें यांबरोबर करतात. खूप पाऊस व कडक ऊन जेथें आळीपाळीनें पडतें तेथे या झाडाची वाढ झपाट्यानें होते. पण झाडांच्या बुडाशीं एकसारखा बराच ओलावा असल्यास पानाचा वास कमी होतो. झाड सुमारें दहा वर्षांचें झाल्यावर त्यापासून उत्पन्न होऊं लागतें व पुढें जवळजवळ शंभर वर्षें या झाडांपासून उत्पन्न घेतां येते.

पानांपासून रंग व सिरका तयार होऊन त्याचा भाजीच्या मसाल्यांतहि उपयोग करतात. तमालपत्र एक तसूभर रुंद असून सुमारें चार-पांच अंगुलें लांब असतें. तें मधुर, बलकर व शीत असून श्रम, दाह, कफ, शैत्य व पित्त यांचा नाश करतें.

**तय्यबजी, बद्रुद्दिन** (१८५४–१९०६)—मुंबई हायकोर्टाचे निर्भय व स्वतंत्र वृत्तीचे एक न्यायमूर्ति व राष्ट्रीय सभेचे मुसलमान कार्यकर्ते. हे सुप्रसिद्ध अरब व्यापारी तय्यबजी मियासाहेब यांचे चिरंजीव होत. इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन आल्यावर थोड्याच दिवसांत एक बुद्धिमान् कायदेपंडित म्हणून हे प्रसिद्धीस आले. यानंतर मुंबई हायकोर्टांत न्यायाधीशपदावर यांची नेमणूक झाली.

सार्वजनिक कार्यांतहि यांनीं धडाडीनें भाग घेतला. प्रथम अन्जुमान-इ-इस्लामचे कार्यवाह, नंतर बॉंबे मुहॉमेडन एज्युकेशन कॉन्फरन्सचे अध्यक्ष व अलीगड कॉलेज असोसिएशनचे सभासद यांसारख्या जबाबदारीच्या जागांवर यांनीं कामें केलीं. मुसलमान समाजांतील अंधदृष्टि व अज्ञान नाहींसें करण्यासाठीं यांनीं अनेक प्रयत्न केले. आपल्या समाजाच्या उत्कर्षाबरोबरच राष्ट्राचाहि उत्कर्ष झाला पाहिजे ही जाणीव कायम मनांत बाळगून यांनीं इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या स्थापनेंत व कार्यांत उत्साहानें भाग घेतला. १८८७ सालीं मद्रास येथें भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनाचें अध्यक्षपद यांच्याकडेच आलें. त्या वेळीं 'हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्यशाहीचें निर्मूलन करण्याकरितां इतर देशबांधवांच्या खांद्याला खांदा लावूनच मुसलमानांनींहि लढलें पाहिजे,' असा संदेश त्यांनीं दिला.

**तरणजीवसंघ व प्लवंग**— (प्लॅंक्टन–नेक्टन). हे एका जातीचे पाण्यांत राहणारे प्राणी व वनस्पती यांचे संघ आहेत. जे प्राणी आणि वनस्पती गोड्या किंवा खाऱ्या पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगतांना आढळतात त्यांस 'प्लॅंक्टन' असें म्हणतात. परंतु जे प्राणी अधिक हालचाल करणारे, पोहणारे व खादाड असून पाण्याच्या पृष्ठभागाच्या फारसे खालीं जात नाहींत त्यांस 'नेक्टन' असें म्हणतात. पहिल्या जातीचे प्राणी सामान्यतः पारदर्शक किंवा अर्धपारदर्शक असतात. आणि त्यांपैकीं अनेक हवेच्या किंवा तेलाच्या बुडबुड्याबरोबर येतात. यांपैकीं बरेचसे प्राणी एकपेशीमय असून त्यांत कांहीं सच्छिद्र जातीचेहि प्राणी असतात. यांमध्यें बऱ्याचशा जेलीफिश, ॲनिलीड, वगैरे माशांच्या जाती, तसेंच कवचधर माशाच्या आळ्या व पिल्ले, मृदुकाय प्राणी, विशेषतः ज्यांच्यावर व्हेल मासे निर्वाह करतात असे प्राणी व पंखासारखे पाय असलेल्या गोगलगाई, इत्यादि प्राणी मोडतात. दुसऱ्या वर्गांत माखली (कटल फिश), स्क्विड आणि इतर बऱ्याचशा जातींचे मासे, कांहीं पाण्यांत राहणारे पेंग्वीनसारखे पक्षी, सील, समुद्रसिंह, वगैरेसारखे प्राणी येतात.

**तरतें**—(बूइ, ब्वा). एखाद्या गलबताचा नांगर किंवा

१ शंकाकार. २ डबा. ३ गोलाकार. ४ वायु-घंटाधारी.

एखादी उथळ जागा, पाण्याखालील खडक किंवा एखाद्या खाडीचें प्रवेशद्वार किंवा बंदरांतील रस्ता दाखविण्याकरितां जे तरंगणारे मोठाले गोळे बनविण्यांत येतात त्यांस तरतीं म्हणतात. हीं बहुधा लोखंडी पत्रे एकमेकांस खिळ्यांनीं पक्के जोडून पोकळ खोल्यांसारखीं बनविलेलीं असतात. त्यांस विशिष्ट प्रकारचा रंग दिलेला असतो, आणि तीं एका सांखळीनें विशिष्ट ठिकाणीं नांगरलेलीं असतात. यांचा आकार निरनिराळा असून त्या आकाराप्रमाणें त्यांस नांवें दिलेलीं असतात. कांहींस घंटा लावलेल्या असतात; कांहींमध्यें अनेक दिवस पुरेल इतका वायु भरलेला असतो; कांहींची हालचाल किंवा स्थिति किनाऱ्यावरून विजेच्या साहाय्यानें नियंत्रित केलेली असते. वरती दिवे लावलेलीं तरतीं निरनिराळ्या ठिकाणीं ठेवणें व त्यांत धुक्याची सूचना देणारे फटाके ठेवण्याची व बिनतारी संदेश यंत्रानें नियंत्रित करण्याची योजना व प्रयोग करण्यांत आलेले आहेत. थेम्स नदींत १५४० सालापासून अशीं तरतीं ठेवलेलीं आहेत.

**तरल, द्रव**—(फ्लुइड). द्रव्याच्या सामान्यतः घन, द्रव, आणि वायुरूप अशा तीन अवस्था असतात. त्यांपैकीं घन अवस्थेंत नसलेल्या वरील दोन्ही द्रव्यांस तरल ही संज्ञा देण्यांत येते. याप्रमाणें द्रव आणि वायुरूप या दोन्ही जातींचीं द्रव्यें तरल वर्गांत मोडतात. प्रत्येक मूलमानभाराच्या (युनिटमास) द्रव पदार्थास आणि वायुरूप द्रव पदार्थास ठराविक उष्णमानामध्यें आणि द्रवामध्यें निश्चित असें घनफळ असतें. परंतु वायुरूप पदार्थ ज्या पात्रांत ठेवलेला असेल तें सर्व पात्र व्यापून टाकतो. त्यामुळें त्याचा दाब घनफळ आणि उष्णमान यांस अनुसरून बदलतो. परंतु द्रव पदार्थ एखाद्या भांड्यांत ठेवला तर त्या भांड्यांचा कांहीं विशिष्ट भागच व्यापून टाकतो. परंतु त्या द्रव पदार्थांतून एकसारखी वाफ निघत राहते व ती वाफ त्या पात्राचा बाकीचा भाग व्यापून टाकते. परंतु ही वाफ होण्याची क्रिया त्या मूळ द्रव पदार्थांतील द्रव्य, त्या भांड्याचें घनफळ आणि त्या वेळचें उष्णमान यांवर अवलंबून असते.

**तरवड**— यास लॅटिनमध्यें कासिया ऑरिक्युलाटा, संस्कृतमध्यें शरपुष्प, अव्हूर व देशी भाषेंत चांभार आंवळी अशीं नांवें आहेत. तरवडीच्या सुमारें ३८० उपजाती आहेत, व त्यांची वाढ उष्ण प्रदेशांतून होते. हिंदुस्थानांत १८ उपजाती आढळतात. त्यांचीं फुलें सुंदर असतात व त्यांचा उपयोग औषधी कामाकरितां व कातडीं रंगविण्याकडे केला जातो.

तरवडाचें झुडुप उंच असून राजपुतान्याचा दक्षिण भाग, मध्य हिंदुस्थान, दक्षिण हिंदुस्थान व ब्रह्मदेशाचा कांहीं भाग यांतून पुष्कळ उगवतें.

कातडीं कमावण्यास याच्या सालींचा उपयोग करितात. डोळे येऊन पू फार येऊं लागला म्हणजे तरवडाच्या बियांचा औषधासारखा उपयोग करितात. चहाच्याऐवजीं याच्या पानांचा काढा पितात व दुष्काळांत लोक भाजीपाल्याप्रमाणें पानांचा उपयोग करितात. याचीं पानें टाकळ्याच्या पानासारखीं असतात. यास पिंवळ्या रंगाचे फुलांचे घोस येतात.

**तर(ल)वार**—एक हत्यार. 'तरवारि' असा शब्द संस्कृत शब्दकोशांत सांपडतो व त्याचा उपयोग 'मालतीमाधव' या संस्कृत नाटकांत केलेला आहे. तथापि हा प्राचीन वैदिक शब्द नसून तरवारवाचक 'असि' हा शब्द वेदवाङ्मयांत आहे. तरवार हें चढाईचें हत्यार छाटण्यासाठीं व खुपसण्यासाठींहि वापरतात.

तरवारीचे दोन भाग असतात. एक भाग हातांत धरण्याची मूठ व दुसरा भाग लांब पातें. खरी उत्तम तरवार धातूखेरीज इतर कशाचीहि करतां येणार नाहीं. हिंदुस्थान व इराण या देशांची तरवारीबद्दल प्रसिद्धि आहे. युरोपांत इंग्लंडचीच तरवारी करण्याबद्दल प्रसिद्धि आहे. आधुनिक यांत्रिक शोधांचा उपयोग तरवारी करण्यांत फारसा होत नाहीं. उत्तम तरवारी हातानेंच तयार कराव्या लागतात. व त्यांला फार हस्तकौशल्य लागतें. अनेक प्रकारच्या व कमजास्ती लांबीरुंदीच्या तरवारी उपलब्ध असून त्यांत सरळ व बांकदार असे दोन मुख्य भेद आहेत. प्रत्येकांत कांहीं वैशिष्ट्य असतें.

रानटी लोकांच्या हत्यारांत लांकडाच्या व दगडाच्या तरवारी सांपडतात. आफ्रिडी व अफगाण लोकांत मोठाले सुरे असतात त्या आंखूड तरवारीच होत. प्रथम तांब्याच्या व नंतर ख्रि. पू. २०० च्या सुमारास ब्राँझ धातूच्या तरवारी करीत असत; आणि ख्रि. पू. १००० ते ७०० च्या दरम्यान लोखंडाच्या तरवारी होऊं लागल्या. पौरस्त्य देशांत मागें वैदिक काळापर्यंत तरवारीचा पत्ता लागतो. पण त्यापूर्वीच्या काळाबद्दलचें फारसें संशोधन झालें नाहीं. रजपूत, मुसलमान, ग्रीक, मराठे, वगैरे लोकांत तरवारीचें प्रामुख्य दिसून येतें. जपानांत दोन्ही हातांनीं धरून तरवार वापरण्याची पद्धत आहे. शिवाजीची प्रख्यात भवानी तलवार ही गोवेंकर सावंतावरच्या स्वारींत मिळाली. तीनशें होन व पोषाक वगैरे देऊन ही घेतली. ही वंशपरंपरेनें सातारकर छत्रपतींच्या जवळ होती. ती आतां लंडन येथें ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे असें म्हणतात. कांहींच्या मतें ती सातारा येथील महाराजांच्या जलमंदिरांतील देवघरांत पूजेंत ठेविलेली आहे. तिचें म्यान रत्नजडित असून त्यांत ११७ माणकें, १२ हिरे व ३ पाच आहेत. या तरवारीची लांबी २॥ हात असून, मुठीपासून १॥। हातांपर्यंत हिची धार एकेरी आहे [भा. इ. सं. षष्ठसंमेलनवृत्त. पृ. १८४].

आज तरवार फक्त शोभेसाठीं, अलंकार म्हणून वापरली जाते. युद्धांत तरवारीचा आज उपयोग नाहीं. तिची जागा रायफलनें घेतली आहे.

**तरस**—हा सांगुलिपादचारी, मांसाहारी, सस्तनप्राणिवर्गांतील एक प्राणी आहे. यांचें जवादी मांजराच्या जातीशीं बरेंच साम्य आहे. हे प्राणी रात्रीं बाहेर पडतात व अतिशय खादाड असून मुख्यतः प्रेतांच्या मांसावर उपजीविका करतात. यांस

कुजलेलें मांस फार आवडतें. हे रात्रीचे बाहेर पडतात व भेसूर आवाज काढीत भक्ष शोधतात. यांच्या मुख्यतः तीन जाती आहेत. त्या दक्षिण आफ्रिकेंत व आशियामध्यें आढळतात. त्यांपैकीं एका जातीच्या अंगावर ठिपके असतात व एका जातीच्या अंगावर पट्टे असून त्यांचा रंग पिंगट असतो.

याचे पुढील पाय मागील पायांपेक्षां लांब असल्यानें हा वांकडा-तिकडा चालतो व त्याला जलद चालतांहि येत नाहीं.

**तराणा**—मध्यहिंदुस्थान, इंदूर संस्थान, महिदपूर जिल्ह्यांतील एका परगण्याचें मुख्य ठिकाण. येथें आढळून येणाऱ्या अवशेषांवरून हें गांव एका काळीं फार मोठें असावेंसें वाटतें. १८०० सालीं होळकरांच्या खास जहागिरींत हें गांव होतें. अहल्याबाई होळकर हिनें या ठिकाणीं 'तिळमांडेश्वरा'चें देवालय बांधलें व पुष्कळशीं झाडें लावलीं. अहल्याबाईच्या मुलीचें लग्न यशवंतराव फणसे यांच्याबरोबर झालें त्या वेळेस हें गांव त्याला मिळालें. सन १८४९ पर्यंत फणसे घराण्याकडे सदरहू गांव होतें.

**तरीचा हक्क**—नद्यावर वाहतूक करण्यासाठीं सार्वजनिक तरी चालवण्याचा हक्क देणें हा सरकारचा अधिकार आहे. सरकार ज्या इसमाला तरीचा हक्क देतें त्यानें प्रवाशांची वाहतूक करण्याकरितां चांगल्या प्रकारच्या होड्या ठेवल्या पाहिजेत, वाहातुकीचा योग्य दर ठेवला पाहिजे, आणि नदीच्या दोन्ही कांठांवर प्रवाशांना उतरण्याकरितां चांगली सोय केली पाहिजे. एका इसमाला सरकारनें तरीचा हक्क दिला म्हणजे जवळ आसपास दुसरी तर चालू ठेवण्यास मनाई असते.

**तर्कशास्त्र**—(लॉजिक). हें एक ध्येयवादी (नॉर्मेटिव्ह) शास्त्र आहे. आपण जो तर्क किंवा अनुमान काढतों, तें अनुमान बरोबर बिनचूक असलें पाहिजे, व त्याकरितां अनुमान काढण्याची आपली विचारसरणी कांहीं विशिष्ट नियमानुसार असली पाहिजे; याप्रमाणें बिनचूक अनुमान काढण्याचे जे नियम त्यांना

तर्कशास्त्र म्हणतात. तर्कशास्त्र म्हणजे शब्दाच्या व्याख्या ऊर्फ अर्थ निश्चित करण्याचें शास्त्र होय, असें कित्येक तर्कशास्त्रज्ञ म्हणतात; पण हें वर्णन बरोबर नाहीं. कारण दोन शब्द एकत्र जोडून वाक्य बनवलें म्हणजे त्यापासून निराळाच अर्थ निष्पन्न होतो व तो अर्थ त्यांपैकीं कोणत्याहि एका शब्दानें व्यक्त होणें शक्य नाहीं. आपलें ज्ञान स्पष्ट व असंदिग्ध असावें, म्हणून बिनचूक अनुमानपद्धति ऊर्फ तर्कशास्त्र उपयोगांत आणावें लागतें. एखाद्या वस्तूचें बिनचूक व संपूर्ण ज्ञान ही त्या शब्दाची उत्कृष्ट व्याख्या होय; आणि अशी व्याख्या करण्याकरितां तर्कशास्त्राची जरूरी लागते.

प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्ता सॉक्रेटीस याच्यापूर्वी तर्कशास्त्र शास्त्रस्वरूपांत अस्तित्वांत नव्हतें. तत्पूर्वीचे म्हणजे ख्रि. पू. ६ व्या ते ४ थ्या शतकांतील थेल्स, हेरॅक्लीटस, पर्मेनिडस, आणि एलीआच्या झेनो या तत्त्ववेत्त्यांनीं जगाची उत्पत्ति कशी झाली, या विषयाकडे अधिक लक्ष दिलें; मानवी मन किंवा बुद्धि याचें ज्ञानग्राहक सामर्थ्य किती व कशा प्रकारचें आहे इकडे त्यांचें लक्ष नव्हतें. अथेन्समध्यें कायद्यांची अमलबजावणी या विषयाला इतकें महत्त्व आलें कीं, कायद्यासंबंधींच्या विषयावर वादविवाद कसा करावा, हें शिकविणारे 'सोफिस्ट' नामक तत्त्ववेत्ते निर्माण झाले, आणि तो एक स्वतंत्र ग्रीक पंडितांचा पंथ निर्माण झाला. सॉक्रेटीसनें प्रथम या सोफिस्ट पंथीं विद्येचा अभ्यास करून त्या पद्धतीनें सत्यज्ञान कसें प्राप्त करावें, त्या वादविवादपद्धतीची दिशा दाखविली. सॉक्रेटीसची पद्धति हीच आपल्या आधुनिक 'उद्गमन' (इन्डक्टिव्ह) तर्कपद्धतीचा मूलारंभ होय. सॉक्रेटिसाच्या या पद्धतीचा प्लेटोनें विकास केला; आणि आरिस्टॉटलनें त्या पद्धतींतून स्वतंत्र 'तर्कशास्त्र' या विषयाची मांडणी केली; म्हणून 'सावयवी अनुमानपद्धती' (सिलॉजिझम्)चा जनक आरिस्टॉटल होय. त्यानें आपल्या 'ऑर्ग्यानॉन' या नांवाच्या निबंधसंग्रहांत हा विषय मांडला आहे. आरिस्टॉटलचें तर्कशास्त्र 'निगमनपद्धती' (डिडक्टिव्ह)चें म्हणजे सामान्यांतून विशेष अनुमान काढण्याच्या पद्धतीबद्दलचें आहे. त्याची व्याख्या अशी करण्यांत आली कीं, दिलेल्या दोन प्रमेयांपासून या दोन प्रमेयांच्या सत्यतेवर ज्याची सत्यता अवलंबून आहे असें तिसरें प्रमेय शोधून काढण्याची जी विचारपद्धति तीस निगमन असें म्हणतात. या दोन प्रमेयांपैकीं ज्यामध्यें तिसऱ्या प्रमेयाचें विधेय असतें त्यास मुख्य प्रमेय असें म्हणतात आणि ज्यामध्यें उद्देश्य असतें त्यास दुय्यम अथवा गौण प्रमेय म्हणतात. हीं तीन प्रमेयें तीन पदांचीं बनलेलीं असतात : प्रमुख पद किंवा मुख्य पद, गौणपद आणि मध्यपद; मुख्य आणि गौणपद ह्या तिसऱ्या प्रमेयाचें विधेय आणि उद्देश्य यांमध्यें असतात. आणि या दोन पदांमधील संबंध अथवा नातें हें मध्यमपद दर्शवीत असतें व त्यावरून अनुमान निघतें. अशा तऱ्हेनें अनुमान काढण्याकरितां कांहीं नियम पाळणें आवश्यक असतें. ते नियम असे : (१) प्रत्येक अनुमानामध्यें तीन पदें आणि तीनच पदें असणें आवश्यक आहे. (२) त्यामध्यें तीन आणि तीनच प्रमेयें आवश्यक आहेत. (३) मध्यमपद (हेतु) याच्या योगानें त्या वर्गांतील सर्व वस्तूंचा निर्देश होत असला पाहिजे. (४) ज्या पदाचा पूर्ण अथवा सर्व निर्देश मूळ प्रमेयांत झाला नसेल त्याचा तसा निर्देश अनुमानांत होतां कामा नये. (५) दोन नास्तिपक्षी किंवा विशेष प्रमाणांपासून कोणतेंहि अनुमान निघूं शकत नाहीं. (६) एक प्रमेय नास्तिपक्षी अथवा विशेष प्रमेय असेल तर अनुमानहि नास्तिपक्षी किंवा विशेषच निघूं शकतें. अनुमानें तीन प्रकारचीं असूं शकतात : (अ) जातिवर्गीय किंवा विधेयवर्गात्मक (केवलवाक्य); (आ) सापेक्ष (सापेक्षवाक्य); किंवा (इ) पक्षांतर बोधक (पक्षांतरवाक्य). व त्याप्रमाणें त्यांचे आकार आणि रूप यांमध्यें फरक असतो. त्यांचा आकार (फिगर) हा प्रमेयांच्या अनुक्रमावरून निश्चित होतो, आणि रूप (मूड) हें त्यांच्या परिमाणावरून (म्हणजे सामान्य अथवा विशेष) किंवा गुणावरून (म्हणजे अस्तिपक्षी अथवा नास्तिपक्षी) निश्चित होतें. प्रत्येक विधान हें पुढील चार प्रकारांपैकीं कोणत्या तरी एका प्रकारांत मोडतें : A सामान्यविधायक (सर्व मानव मर्त्य असतात); I विशेष विधायक (कांहीं लोक शहाणे असतात); E सामान्य निषेधक (मनुष्यें चतुष्पाद नसतात); O विशेष निषेधक (कांहीं लोक शहाणे नसतात). आतां अनुमानांतील वाक्यामध्यें A I E O यांपैकीं कोणताहि एक प्रकार संभवतो. यावरून एकंदर रूपांचे प्रकार ६४ होतात. परंतु वरील नियमामुळें फक्त १९ प्रकार ग्राह्य असूं शकतात.

अनुमानपद्धतीमध्यें चूक झाल्यास त्यास हेत्वाभास (फॅलसी) असें म्हणतात. हेत्वाभासाचे दोन वर्ग पडतात : १. विधिगत हेत्वाभास—यामध्यें प्रमेयाच्या रचनेंतच दोष असतो व त्यामुळें त्या वाक्यांतील विधान बरोबर आहे किंवा नाहीं हें पाहण्याचीहि आवश्यकता नसते. २. वस्तुगत हेत्वाभास—यामध्यें वाक्यांत मांडलेल्या विषयांशीं संबंध येतो. विधिगत हेत्वाभासाचे अनेक प्रकार आहेत. तसेंच वस्तुगत हेत्वाभासाचेहि अनेक प्रकार आहेत.

कांहीं कालानें ही अनुमानपद्धति म्हणजे केवळ एक सांप्रदायिक शब्दच्छलाचें स्वरूप पावली. याकरितां फ्रान्सिस बेकन आणि लॉक यांनीं आपली आगमनपद्धति (इंडक्टिव्ह) सुरू केली. ह्या

पद्धतीमध्यें कोणतेंहि सामान्य विधान करण्यापूर्वी पुरेसा पुरावा व विशेष उदाहरण देणें आवश्यक असतें. यांनीं नवीन तर्कशास्त्र-पद्धतीचा पाया घातला आणि कान्ट व त्याचे अनुयायी यांनीं तर्कशास्त्रपद्धतीस योग्य वळण दिलें; व तर्कशास्त्र हें आकारावर अवलंबून नसून विचाराच्या स्वरूपावर अवलंबून आहे, ही गोष्ट सिद्ध केली. या विचारप्रणालीचा पुरस्कर्ता इंग्लंड-मध्यें हॅमिल्टन हा होता. मिल यानें तर आगमनपद्धति हीच शुद्ध तर्कपद्धति होय असें प्रतिपादन केलें. अर्वाचीन कालांत तर्कशास्त्रामध्यें दोन पंथ असलेले आढळून येतात: एका पंथाचा आग्रह असा आहे कीं, तर्कशास्त्रांतील प्रत्येक विधान गणितशास्त्राच्या पद्धतीवर आधारलेलें असलें पाहिजे; दुसऱ्या पंथाचें म्हणणें असें कीं, ज्या अर्थी आगमनपद्धतिहि विगमन पद्धतीच्याच उलट स्वरूपाची आहे, त्या अर्थी पूर्वीची आरिस्टॉटलची पद्धतिच योग्य होती.

**तर्खडकर, दादोबा पांडुरंग** (१८१४-१८८२)—आद्य मराठी व्याकरणकार. यांचा जन्म मुंबईंत झाला. प्राथमिक शिक्षण मुंबईत एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें झालें. विद्यार्थी असतांनाच यांनीं आपलें मोठें व्याकरण लिहून प्रसिद्ध केलें व मराठी नकाशे छापले. विद्यार्थ्यांस त्यांचा फार उपयोग झाला. १८६५ सालीं सरकारच्या आज्ञेवरून त्यांनीं लघु व्याकरण लिहिलें; त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. याशिवाय त्यांनीं फारशी व संस्कृत व्याकरणें लिहिलीं आहेत. यांनीं शाळाखात्यांत काम करून फार वाहवा मिळविली. १८५७ सालच्या शिपायांच्या युद्धाच्या वेळीं अहमदनगरास भिल्लांनीं बंड केलें. त्या वेळीं हे नगरास डे. कलेक्टर होते. मोठ्या चातुर्यानें यांनीं भिल्लांचें बंड मोडलें. सरकारनें रावबहादुर ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला. १८६२ सालीं यांनीं पेन्शन घेतलें. कांहीं दिवस बडोद्याच्या दिवाणाचे हे मदतनीस होते. यांच्या 'लघु' आणि 'मोठ्या' व्याकरणाशिवाय शिशुबोध, यशोदा-पांडुरंगी, इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. प्रार्थना-समाज हें नांव पुढें ज्या सभेला मिळालें ती परमहंस सभा यांनींच स्थापन केली. यांनीं एक आत्मचरित्र लिहिलें असून तें प्रसिद्ध आहे.

**तर्खडकर, द्वारकानाथ राघोबा** (१८४६-१९०४) एक भाषाविषयक लेखक. जन्म मुंबईत व प्राथमिक शिक्षण पुण्यास झालें. कॉलेजशिक्षण पुरें झाल्यावर यांना सरकारनें लॅटिनचे शिक्षक नेमिलें. यांनीं पुष्कळ ठिकाणीं हेडमास्तरची नोकरी केली व १८९९ सालीं पेन्शन घेतलें. यांनीं लिहिलेल्या 'भाषांतर पाठमाला' सुप्रसिद्ध आहेत. नाशिक येथें यांनीं गंगाबाईचें देवालय बांधलें आहे. यांचा स्वभाव प्रेमळ व परोपकारी होता.

**तलैंग**—१. लोक—ब्रह्मदेशांत वर्चस्वाकरितां ब्रह्मी लोकांशीं झगडणाऱ्या पेगू महावंशाच्या अवशिष्ट समाजाला तलैंग म्हणतात. अठराव्या शतकाच्या मध्यंतरीं पेगू लोक मार्ताबान-च्या आखातापासून मंडालेपर्यंतच्या मुलुखाचे मालक होते. हल्लीं तलैंग लोक खालच्या ब्रह्मदेशांत तेनासरीम व पेगू या भागांत राहतात. परंतु ही जात नामशेष होण्याच्या मार्गास लागली आहे. हे लोक आपणांस मॉन म्हणवितात. ब्रह्मी लोकांपेक्षां तलैंग लोक सुदृढ बांध्याचे असून त्यांचे चेहरे (ब्रह्मी लोकां-पेक्षां) अधिक गोल आहेत. पूर्वी तलैंग हें सुसंस्कृत व प्रबळ राष्ट्र असावें. तलैंगांनीं बौद्ध धर्माचा स्वीकार ख्रि. पू. ४ थ्या शतकाच्या आरंभींच केलेला दिसतो. यांचे जुने ऐतिहासिक ग्रंथ आहेत. पोर्तुगीजांच्या इतिहासांत या राष्ट्राचें नांव येतें.

२. भाषा—तलैंग भाषा अगदीं स्वतंत्र आहे. या भाषेची लिपि ब्रह्मीसारखीच आहे. उच्चार चिनी शब्दांसारखे असतात. स्वर आणि व्यंजन मिळून अक्षर बनतें व हें अक्षर एकावयवी धातूला जोडून नवा शब्द तयार होतो. संयुक्त व्यंजनें पुष्कळ आहेत. क्रियापदापूर्वी कर्ता व क्रियापदानंतर कर्म येतें. प्रत्यय लागून शब्दांचीं निरनिराळीं रूपें बनतात. तलैंग भाषेंतील शब्दसंग्रह अगदीं स्वतंत्र आहे. हिंदुस्थानांतील कोणत्याहि प्रधान भाषेशीं तलैंगचें साम्य नाहीं. मात्र कोल, गोंड, वगैरे कांहीं डोंगरी लोकांच्या भाषेशीं ही कांहींशी जुळेल. मलाक्काशीं तलैंगाचा बराच संबंध असावा.

**तवॉय**— खालच्या ब्रह्मदेशांत, तेनासेरीम विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ५,३०८ चौ. मैल. लो. सं. १,७९,९६४. तवॉय नदीच्या कांठच्या लागवडीचा भाग व समुद्रकिनाऱ्याची अरुंद पट्टी सोडली असतां, हा सर्व जिल्हा खडकाळ व डोंगराळ आहे. मुर्गुई जिल्ह्याच्या सरहद्दीवर मैनमोलेतकत (६,८०० फूट) हें जिल्ह्यांतील सर्वांत उंच शिखर असून नवलबो शिखर त्याच्या खालोखाल आहे. दक्षिणेकडे तेनासेरीम व उत्तरेकडे तवॉय ह्या मुख्य नद्या आहेत. ह्या जिल्ह्यांत औषधी वनस्पती पुष्कळ आहेत. लवंग, एरंडी, सार्सापरिला, वगैरेंचीं झाडेंहि पुष्कळ आहेत. हत्ती, गेंडा, वाघ, चित्ता, सांबर, मलायी अस्वल, डुक्कर, पांच सहा प्रकारचे हरण, वगैरे रानटी पशु येथें आढळतात. समुद्रावरील वाऱ्यांच्या योगानें उन्हाळ्यांतील उष्णता कमी होत असल्यामुळें जिल्ह्याची हवा एकंदरींत सुखावह आहे. पावसाचें मान वार्षिक सरासरी २२८ इंचांपर्यंत आहे.

हा जिल्हा निरनिराळ्या काळीं, सयाम, पेगू व आवा येथील राजांच्या मुलुखांत मोडत असे; परंतु त्याचा प्राचीन इतिहास चांगलासा उपलब्ध नाहीं. सयामी लोक हे येथील पहिले रहिवासी असावेत; परंतु आराकानी लोकांची वसाहत फार

प्राचीन काळापासून होती असें म्हणतात. इ. स. १२०० त ब्रह्मी राजा नरपदिसिथु यानें जेता म्हणून न येतां धर्मगुरु या नात्यानें इकडे येऊन कैदौंगच्या उपसागरांत क्येथलुट हें गांव वसविलें, असें ह्या देशासंबंधींच्या सर्वांत प्राचीन लेखांत म्हटलें आहे. त्याच राजानें तवॉय टेकडीवर एक देऊळ बांधलें असें सांगतात. १७५२ सालीं तवॉयचा राजा स्वतंत्र झाला; परंतु लौकरच (१७५७) तो पुनः सयामच्या हातीं गेला. १७५९ सालीं ब्रह्मी राजा अलौंगपया यानें हा देश घेतला; परंतु तो राजा लौकरच मरण पावला. स. १७६० पासून यांदोबोचा तह (१८२६) होईपर्यंत, अंतःकलह व सयामी लोकांचे हल्ले यांमुळें जिल्ह्याचें फार नुकसान झालें; अखेर पहिल्या ब्रह्मी युद्धांत सर आर्चिबॉल्ड कॅम्बेल याच्या हाताखालीं सैन्य पाठवून इंग्रजांनीं हा जिल्हा आपल्या ताब्यांत घेतला. १८२९ सालीं मौंगदा (पूर्वीचा सुभेदार) यानें बंड केलें होतें. परंतु तें लौकरच मोडण्यांत आलें. तेव्हांपासून हा जिल्हा ब्रह्मदेश स्वतंत्र होईपर्यंत होता.

शहर— तवॉय जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें तवॉय नदीच्या डाव्या तीराला, तिच्या मुखापासून ३० मैलांवर व समुद्रकिनाऱ्यापासून ७ मैलांवर आहे. हल्लींचें तवॉय शहर १७५१ सालीं स्थापन झालें. १८२४ सालीं इंग्रजांनीं या शहरावर सैन्य पाठवून तें आपल्या ताब्यांत घेतलें. या शहराचा व्यापार रंगून, मुंबई आणि कलकत्ता व स्ट्रेट्स सेटल्मेंट यांशीं चालतो. तांदूळ, रेशमी कापड, मीठ, इमारती लांकूड व (घरें शाकारण्याकरितां उपयोगांत येणारीं) दाणीचीं पानें हा माल बाहेर जातो; व तंबाखू, कापड, साखर, रॉकेल, सूत, वगैरे जिन्नस बाहेरून येतात.

रेशमी कापड विणणें हा शहरांतील मुख्य धंदा असून मातीचीं भांडीं, सुती कापड, व सोन्याचांदीचें काम थोडेंबहुत होतें. येथील म्युनिसिपालिटी १८८७ सालीं स्थापन झाली. लो. सं. ३०,०००.

**तहकुबी**—(अबेयन्स). कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखादी पदवी किंवा अधिकार किंवा स्थावर किंवा जंगम मिळकत यावर असलेला मालकी हक्क त्याचा मालक मयत झाल्यामुळें व नंतरचा कायदेशीर वारस प्रस्थापित न झाल्यामुळें मध्यंतरींची बेवारशीपणाची जी स्थिति ती. इंग्लंडचा कायदा असा आहे कीं, जेव्हां एखादा सरदार निपुत्रिक मरण पावतो, तेव्हां ती त्याची सरदारकीची पदवी मयताच्या कायदेशीर वारसाचा हक्क इंग्लंडच्या राजानें मान्य करीपर्यंत बेवारशी स्थितींत असते.

**तळगड किंवा तळें किल्ला**—रत्नागिरी जिल्हा. तळें गांवापासून ४०० फूट व समुद्रसपाटीपासून १,०९० फूट उंचीवर देवाच्या डोंगर किंवा मुरा डोंगर याच्या पूर्वेकडील टोंकावर हा किल्ला आहे. चढण प्रथम सोपी आहे पण पुढें उभी आहे. दरवाजा आग्नेयी दिशेस आहे. किल्ल्यास तिहेरी तट आहे. लांबी ४०० यार्ड व रुंदी ३० यार्ड आहे. आंत भवानीचें किंवा रत्नाकर महादेवाचें देवालय व लक्ष्मीकोठी आहे. १६४८ त हा शिवाजीनें विजापूरकरांकडून घेतला. १६५९ त शिद्दीनें यास वेढा दिला होता परंतु अफझुल्लखानाच्या मृत्यूनंतर त्यानें वेढा उठविला. शिवाजीनंतर हा शिद्द्यानें घेतला होता तो १७३५ मध्यें पहिल्या बाजीरावानें परत घेतला. १८१८ त इंग्रज प्रोथरनें घेतला.

**तळेकर, कृष्णशास्त्री रघुनाथशास्त्री** (१८२६–१८८०)—एक मराठी पंडित. रघुनाथशास्त्री हे दशग्रंथी ब्राह्मण असून शास्त्रांतहि प्रवीण होते. त्यांस विद्येची फार अभिरुचि होती. कृष्णशास्त्री ह्यांनीं पुण्याच्या संस्कृत पाठशाळेंत अलंकारशास्त्राचा चांगला अभ्यास केला व त्या काळच्या चालीप्रमाणें दक्षिणा मिळविली. पुढें दिवसानुदिवस इंग्रजीचें माहात्म्य वाढूं लागलें. महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, इत्यादि मंडळी क्यांडी साहेबाच्या वर्गांत इंग्रजी शिकूं लागली. तेव्हां कृष्णशास्त्री हेहि इंग्रजीचा अभ्यास करूं लागले; त्यांत त्यांची फार चांगली प्रगति झाली. त्यांचें शिक्षण सुरू असतां रघुनाथशास्त्री ह्यांना देवाज्ञा झाली व शास्त्रीबोवांचा आधार नाहींसा झाला व त्यांच्या गळ्यांत संसार पडला. पण क्यांडी साहेबांचा त्यांच्यावर फार लोभ होता. त्यांनीं शास्त्रीबोवांस एक लहानशी इंग्रजी कारकुनाची जागा दिली. त्या जागेवर असतां मोल्सवर्थ साहेबांस मराठी–इंग्रजी कोश तयार करण्याच्या कामीं त्यांनीं चांगलें साहाय्य केलें. शास्त्रीबोवा कित्येक वर्षें पंडितगिरीचें म्हणजे साहेब लोकांस मराठी भाषा शिकविण्याचें काम करीत होते. पुढें बेळगांव हायस्कुलांत ह्यांस संस्कृताचे शिक्षक नेमिलें. संस्कृत भाषेचें व्याकरण मराठींत येथेच असतांना शास्त्रीबोवांनीं लिहिलें. तें सरकारास पसंत वाटून त्यांनीं त्यांस त्याबद्दल पांचशें रुपये बक्षीस दिले.

बेळगांवाहून त्यांची बदली क्यांडी साहेबांच्या हाताखालीं ट्रान्स्लेशन एक्झिबिशनरच्या जागीं झाली. तेथें असतां मराठी क्रमिक पुस्तकें तयार करण्याचें काम क्यांडी साहेबांनीं केलें त्यांत शास्त्रीबोवांचा त्यांना फार उपयोग झाला. त्या पुस्तकांतील कित्येक धडे शास्त्रीबोवांच्या हातचे आहेत. नंतर त्यांस रत्नागिरीस इंग्लिश हायस्कूलचे हेडमास्तर नेमिलें. पण तेथील हवा मानवेना म्हणून बदली करून घेऊन पुण्यास आले. या सुमारास सर रिचर्ड टेंपल हे नागपुर प्रांताचे चीफ कमिशनर होते, त्यांनीं तिकडे शाळाखात्याची नवी व्यवस्था करण्याचा विचार केला तेव्हां शास्त्रीबोवांना डेप्युटी एज्युकेशनल

इन्स्पेक्टरच्या जागेवर तिकडे नेमलें. तेथून पुन्हां ते खानदेशांत बदलून आले.

पुढें १८७२ सालीं त्यांची नेमणूक अहमदनगरच्या डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या जागेवर झाली. त्या ठिकाणीं त्यांनीं सुमारें पावणेपांच वर्षें काम केलें. १८७६ सालीं ते क्यांडी साहेबांच्या मागें मराठी ट्रान्स्लेटर झाले. ह्या कामावर असतांनाच पुणें येथें त्यांना देवाज्ञा झाली (२२-४-१८८०).

**तळेगांव ढमढेरे**—मुंबई, पुणें जिल्हा, शिरूर तालुका. शिरूरच्या नैर्ऋत्येस २० मैलांवर वेल नदीवर हा गांव आहे. लोकसंख्या ७,२३५. १८५५ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली आहे. गणपति, नाथ, सिद्धेश्वर, टकलेश्वर व उत्तरेश्वर अशीं येथें पांच देवालयें आहेत. पैकीं गणपतीचें देवालय ढमढेरे वंशांतील एकानें बांधिलें. देवालयावरील नक्षीकाम फारच उत्तम आहे. नाथाचें मंदिर शिवाजीच्या वेळीं बांधलेलें आहे. येथें महाशिवरात्रीस जत्रा भरते. उत्तरेश्वर कोणीं महाजनानें बांधलें. वायव्येस भैरवाचें देऊळ आहे. १७५१ सालीं मोंगलांनीं ह्या गांवाची अगदीं नासधूस करून टाकली होती.

**तळेगांव दशासर**— वऱ्हाड, जिल्हा उमरावती, तालुका चांदूर. दशासर हा दशसहस्राचा अपभ्रंश आहे. एके काळीं हें चांदूर तालुक्यांतील सर्वांत मोठें गांव होतें. परंतु चांदूर रेल्वे स्टेशन झाल्यावर तेथून तहशिलीचें ठिकाण चांदूरास गेलें. हल्लीं हा गांव मोडकळीस आला आहे. तरी पूर्वीच्या इमारती व देवळें पाहिलीं असतां पूर्वीचें वैभव ध्यानांत येतें. येथें सरकी काढण्याचा कारखाना, व कापड विणण्याचे माग आहेत.

येथें केशवराज ऊर्फ श्रीकृष्ण याची काळ्या दगडाची मूर्ति असून ती येथील व्यवस्थापक देशपांडे यांच्या पूर्वजांनीं सरासरी १०० वर्षांपूर्वी प्रस्थापित केलेली आहे.

गोपाळबुवा उर्फ श्रीकृष्णमहाराज या नांवानें प्रसिद्ध असलेल्या सत्पुरुषाची समाधि गांवाबाहेर नदीकिनारीं आहे.

**तळेगांव दाभाडे**—मुंबई इलाखा, पुणें जिल्ह्यांत मावळ तालुक्यांत पुण्याच्या वायव्येस १७ मैलांवर आहे. गांवाच्या दक्षिणेस पाण्याचा मोठा तलाव असून कांहीं महादेवाचीं देवालयें आहेत. जुनें इंदुरी गांव व किल्ला येथून जवळच आहे. पावसाची सरासरी ३५ इंच आहे. येथून खेडेवरून जुन्नरला सारख्या मोटारी जातात. शाहूच्या कारकीर्दींत दाभाडे घराणें नांवारूपास आलें. खंडेराव दाभाडे हा या गांवाचा संस्थापक होय. दाभाडे हे श्रावण मासांत तळेगांवास ब्राह्मणभोजन घालून दक्षिणा देत असत; ती दक्षिणा पुढें पेशवे पुण्यास देऊं लागले. गांवांत पारशी वस्ती नाहीं. आजूबाजूस नवी होत आहे. येथें म्युनिसिपालिटी आहे. पैसाफंडानें चाललेली कांचशाळा व नूतन समर्थ विद्यालय, व उत्तम प्रकारचें क्षयरोगाचें व डोळ्याचें इस्पितळ या प्रसिद्ध संस्था येथें आहेत.

**तळोदें**—मुंबई, पश्चिम खानदेश जिल्ह्यांत हा एक तालुका आहे. या तालुक्यांत मेवा नांवाच्या ६ जहागिरी आहेत. येथील जमीन उत्तम आहे. या तालुक्यांत पूर्व व पश्चिम बाजूस सातपुडा डोंगर आहे. कांहीं ठिकाणची हवा बरी आहे, परंतु सातपुडा डोंगराशेजारीं हवा अतिशय वाईट आहे. पाऊस दर वर्षी सरासरी ३० इंच पडतो.

तळोदें गांव धुळ्याच्या वायव्येस ६२ मैलांवर आहे. येथें लांकडांचा मोठा व्यापार असून रोशेल तेल व धान्य यांचाहि कांहींसा व्यापार आहे. येथें म्युनिसिपालिटी, मामलेदार कचेरी, सरकारी शाळा व पोस्ट, वगैरे आहेत. येथें एक किल्ला आहे व तो बऱ्या स्थितींत आहे.

**तक्षक**—कद्रुपुत्र, एक नाग. हा सव्वीस नागकुलांतील एका कुलाचा अधिपति असून, याच्या कुलांत जीं कुळें होतीं त्यांतून अठरा कुळें जनमेजयकृत सर्प-सत्रांत दग्ध झालीं. सर्पसत्रांत तक्षकावरच स्वतः प्रसंग आला असतां यास आस्तिक मुनीनें वाचविलें. या सत्रांत तक्षकानें संरक्षणासाठीं इंद्राची पाठ धरली, तेव्हां ‘इंद्राय तक्षकाय च स्वाहा।’ असा मंत्र म्हणून इंद्रालाहि खालीं ओढलें. यावरून ‘इंद्राय०’ ही म्हण पडली आहे.

**तक्षशिला**—ग्रीको-रोमन नांव तक्षिला. हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील रावळपिंडीजवळचें एक ऐतिहासिक स्थान. या प्रसिद्ध शहराचें ठिकाण बरेच दिवस नक्की माहीत नव्हतें. प्लिनीच्या पुष्कलावतीपासून तक्षशिलेचें अंतर रोमन ६० (इंग्लिश ५५) मैल लिहिलें आहे. त्यावरून सिंधूच्या पूर्वेस दोन दिवसांच्या वाटेवर हसन अबदलाच्या पश्चिमेस हारो नदीवर तें असावें. सिंधूपासून तिसरा मुक्काम कालकसराई येथें येतो. यावरून कालकसराईजवळ कोठें तरी तक्षशिला असावें असें संशोधकांनीं अनुमान काढलें. कालकसराईच्या ईशान्येस १ मैलावर शहाधिरे म्हणून गांव आहे. तेथें ५५ हून जास्त स्तूप, २८ विहार व ९ देवळें, इतक्यांच्या खुणा आढळल्या. त्या स्तूपांपैकीं २ स्तूप माणिक्यालच्या प्रसिद्ध स्तूपाएवढे होते. या खुणांवरून तक्षशिला येथेंच असावें हें ठरलें. महाभारतांतील तक्षकाचें राज्य येथें होतें व सर्पसत्र येथेंच झालें असावें. बौद्ध ग्रंथांवरून या शहराचा इतिहास खि. पू. ७०० पर्यंत मागें जातो. उत्खननांतील अवशेष खि. पू. ४ थ्या किंवा ५ व्या शतकांतील आहेत.

या शहराचें वैभव व विस्तार यांविषयीं ग्रीक ग्रंथकारांनीं पुष्कळ वर्णन केलें आहे. एरियन लिहितो कीं, तें सिंधु व ब्हेहात प्रांत्यामध्यें सर्वांहून मोठें, जास्त वस्तीचें आणि संपत्तिमान् असें

होतें. स्ट्रेबो म्हणतो कीं, याच्या आसपासचा प्रदेश दाट वस्तीचा व सुपीक होता. ह्या सर्व गोष्टी शहाधेरीजवळच्या अवशेषांशीं जमतात.

अलेक्झांडरच्यानंतर ५० वर्षांनीं तक्षशिला येथील लोकांनीं मगधराजा बिंदुसार याच्याविरुद्ध बंड. केलें. तेव्हां त्यानें आपला मोठा मुलगा बंदोबस्तास पाठविला. पण बंदोबस्त झाला नाहीं, म्हणून दुसरा मुलगा अशोक यास पाठविलें. त्यास लोक शरण आले. अशोक प्रतिनिधि म्हणून असतां तक्षशिला येथें अफाट संपत्ति होती.

कनिष्काच्या वेळीं तक्षशिला येथें त्याचा क्षत्रप असावा. या क्षत्रपांचीं पुष्कळ नाणीं सांपडलीं आहेत. तक्षशिला हें नांव ज्यांत आहे असा एक ताम्रपट सांपडला आहे. तक्षशिला याचें पाली रूप तखशिला व त्याचें ग्रीक रूप तक्शिला झालें आहे.

फाहिआन येथे आला होता (स. ४००). तो म्हणतो कीं, येथें बुद्धानें आपलें मस्तक भिक्षेंत दिलें, त्यावरून यास हे नांव पडलें. ह्यूएनत्संग हा दोनदां (६१०, ६४३) येथें आला होता. तो लिहितो की, शहराचा घेर १० ली होता, तेथें राजा नव्हता. येथील जमीन सुपीक होती. विहार पुष्कळ, परंतु बहुतेक मोडलेले होते. शहरापासून २ मैलांवर अशोकाचा स्तूप होता. तेथेंच बुद्धाने आपलें मस्तक दिले होतें. वायव्य हिंदुस्थानांत जे ४ स्तूप प्रख्यात होते, त्यांतलाच हा एक आहे. तक्षशिला हें बौद्धधर्मी लोकांत फार महत्त्वाचें होते. याच्या नांवावरून मस्तकाची दंतकथा उत्पन्न झाली असावी. कारण बौद्धधर्माच्या पूर्वीचें हें नांव आहे. हे नगर अयोध्येच्या भरताचा पुत्र तक्ष यानें वसविलें.

तक्षशिला प्रांताचा घेर १३३ मैल म्हणून ह्यूएनत्संगाने लिहिला आहे. पश्चिमेस सिंधु, उत्तरेस उरम प्रांत, पूर्वेस झेलम नदी आणि दक्षिणेस सिन्हापूर प्रांत, ह्या सीमा होत्या.

सर जॉन मार्शल यांनीं या भागांत बरेंच उत्खनन करून प्राचीन शहराचे अनेक अवशेष बाहेर काढले आहेत. भारतीय, ग्रीक आणि इराणी या तीन संस्कृतींचा संगम येथे दिसतो. रावळपिंडीच्या वायव्येस २० मैलांवर सरैकेला गांव आहे. त्याच्या पूर्वेला आणि ईशान्येला तक्षशिलेचे अवशेष पडले आहेत. तीन नगरें या भागांत होतीं. चीर स्तूप फार मोठा आहे. त्याच्याभोंवतीं अनेक चैत्य व विहार आहेत. प्राचीन काळचें तक्षशिला हें एक मोठें विद्यापीठ होतें.

तक्षशिलेची विद्येचें माहेरघर म्हणून फार कीर्ति असल्यानें लांबून सर्व ठिकाणांहून विद्यार्थी येत. तेथील शिक्षकवर्गाच्या लौकिकामुळेंहि विद्यार्थी आकर्षिले जात. येथें उच्च शिक्षणच दिलें जाई. म्हणून सर्व विद्या शिकून झाल्यावर उरलेंसुरलें ज्ञान घेण्यासाठीं विद्वानांची रीघ लागे. वैद्यकासारखें शास्त्रीय ज्ञानहि या ठिकाणीं अनेक वर्षें घालवून मिळवीत, हें जीवकाच्या गोष्टीवरून दिसून येतें. शिवाय कायदा आणि लष्करी शिक्षण यांचा विशेष अभ्यास तक्षशिलेमध्यें घेण्यांत येई.

**ताईत**— ताईत, गंडेदोरे यांच्या ठिकाणीं रोग किंवा विघ्न निवारण्याचे सामर्थ्य आहे असें मानणारे लोक सर्वत्र आहेत. दगड किंवा धातू यांचे ताईत बनवितात. दगडावर मंत्राक्षरें कोरतात व धातूच्या नळकांड्यांत मंत्राचा कागद घालतात. असे ताईत विशिष्ट मुहूर्तावर तयार करून हातावर किंवा गळ्यांत बांधतात. लहान मुलांच्या गळ्यांत दृष्टीचे ताईत घालतात. गंडेदोरे असेच मंत्रून बांधतात. काशीच्या काळभैरवाचे गंडे प्रसिद्ध आहेत.

प्लिनी या सर्वांत जुन्या कोशकारानें असें लिहिलें आहे कीं, टार्किनियस प्रिस्कस यानें आपल्या मुलाच्या गळ्यांत प्रथम ताईत बांधला. पुराणवस्तुशास्त्रज्ञांनी अनेक प्रागैतिहासिक ताईत शोधून काढले आहेत. अशा प्रकारचे ताईत यहुदी, ग्रीक व रोमन लोकांत वापरीत असत. अद्यापहि इराण, अरबस्तान व इतर कांहीं देश यांतून ही प्रथा दृष्टीस पडते.

**ताई तेलीण**—ही एक तेल्याची बायको असून हिचें खरें नांव रमा होतें. ती औंधच्या प्रतिनिधि घराण्यांतील परशराम श्रीनिवास ऊर्फ थोटोपंत याजपाशीं राख म्हणून राहिली. त्यांचा हा संबंध सर्वश्रुत होता. १८०६ सालीं प्रतिनिधीचें व त्याच्या आईचें जमेना म्हणून आईनें बापू गोखले ह्याच्या मदतीनें प्रतिनिधीस मसूरच्या गढींत अटकेंत ठेविलें. तेव्हां तेलिणीनें अवघड असा वासोटा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला व मसूरच्या गढीवर हल्ला करून प्रतिनिधीस बंधमुक्त केलें (१८०७). पुढें स्वस्थ न राहतां प्रतिनिधीनें पेशव्याविरुद्ध बंड केलें; म्हणून बाजीरावानें बापू गोखले ह्यास पाठवून त्यास गिरफदार करून पुण्यास आणलें व त्याचे बहुतेक किल्ले व मुलूख आपल्या ताब्यांत घेतले. वासोट्याचा किल्ला मात्र ताई तेलिणीच्या ताब्यांत होता. तिनें तो आठ महिनेंपर्यंत लढविला. शेवटीं धान्याच्या कोठारास आग लागल्यामुळें तिला शत्रूस शरण जावें लागलें. या वेळच्या प्रसंगास अनुलक्षून एक आर्या (श्रीमंत पंतप्रतिनिधी यांचा किल्ला···वासोटा ॥) प्रसिद्ध आहे. ताई ही अखेरपर्यंत पंताजवळच होती.

**ताउलिन**—एक चिनी प्रवासी. किंगचाऊचा कियांगलिंग प्रांताचा भिक्षु ताउलिन ताम्रस्तंभाकडून लंकेला गेला. आणि कलिंगाच्या (पेगूच्या) किनाऱ्यानें नग्न लोकांच्या देशांत आला. येथील राजानें त्याला फार चांगल्या रीतीनें वागविलें. तो तेथें बरींच वर्षें राहून ताम्रलिप्तीस गेला. व तेथें त्यानें तीन वर्षें संस्कृत शिकण्यांत घालविलीं. नंतर, वज्रासनास जाऊन बोधिवृक्षाची पूजा करून नालंदास गेला. तेथें कोशाचा दोन वर्षें

अभ्यास करून राजगृहाजवळील गृध्रशिखराकडून पश्चिम हिंदुस्थानांत आला. तेथें त्यानें तामिंगचाऊ ग्रंथाचा अभ्यास केला. त्यांत एक लक्ष श्लोक होते असें म्हणतात; परंतु त्याचा बराचसा भाग गहाळ झालेला होता. तरी बुद्धाच्या मरणानंतर आर्य नागार्जुनानें मूळ ग्रंथाचें महत्त्व कायम राखिलें. नंतर ताउलिन हा काश्मिराहून उद्यान देशास जाऊन कविश येथें येऊन राहिला. त्या ठिकाणीं बुद्धाच्या शिराच्या कवटीची पूजा करून समुद्रांतून केदाईला (किएचा येथें) आला. तेथें त्याला उत्तरेकडील तार्तर लोकांनीं त्याच्या मित्रोंच्यासारखे कोणी त्यांना भेटल्याचें सांगितल्यामुळें तो पुन्हां उत्तर हिंदुस्थानांत येऊन वयाच्या पन्नासाव्या वर्षी मरण पावला.

**ताउहि**—एक चिनी प्रवासी. हा लिहशिंग प्रांतांतील कायदेपंडित होता. त्याचें संस्कृत नांव श्रीदेव होतें. तो उच्च कुळांतील होता. हिंदुस्थानांतील निरनिराळीं क्षेत्रें हिंडत तो महाबोधि येथें आला. तेथें बरींच वर्षें राहून नंतर तो नालंदला व तसाच पुढें कुशी(नगर)ला गेला. अमरावताच्या मुंग राजानें त्याचा बराच सन्मान केला. नालंदास राहत असतांना त्यानें महायानाचा कसून अभ्यास केला. त्यानें चुपोपुन्ना (दहनक्षेत्र किंवा निर्वाणमंदिर) येथें विनयपिटकाचा आणि शब्दविद्येचा अभ्यास केला होता. तहशिओ (महाबोधि) देवळामध्यें असतांना चिनी भाषेमध्यें त्यानें एक स्मृतिलेख कोरला. चिनी सूत्रें आणि शास्त्रें यांवरचे त्यानें नालंद येथें नवेजुने मिळून ४०० ग्रंथ ठेविले होते. इत्सिंगनें त्याचें वसतिस्थान पाहिलें, पण तो त्याला भेटला नाहीं. तो पन्नास वर्षांचा होऊन अमरावत देशांत वारला.

**ताऊस**— ताऊस शब्द फारसी भाषेंतलि असून त्याचा अर्थ मोर असा आहे. भोपळ्याऐवजीं याच्या बुडाशीं लांकडी मोर बसवितात. मोराची पाठ म्हणजे सतारीच्या भोपळ्यावरील पाटी म्हणावयाची; पण ह्या मोराच्या पाठीवर एक चौकोनी पेटी असते. ती कातड्यानें मढविलेली असते; तिच्या मध्यावर घोडी असते. तिच्या पायांत पातळ, एक दोरीभर जाडीची दुसरी घोडी असते. पेटीवर दांडी सतारीच्या दांडीसारखीच असते. खुंट्या, अट, पडदे, वगैरे व्यवस्था सर्व सतारींतील व्यवस्थेप्रमाणेंच असते. मात्र ह्याच्या मुख्य तारा चार व सतारींत सात हा दोहोंत फरक आहे. ह्या चार तारा सा, प, सा, म अशा मिळवितात. तर्फाकरितां सतारींत जशी उजव्या बाजूस रेजा देऊन त्यांत अकरा खुंट्या बसविलेल्या असतात तशा ह्यांतहि असतात. तारा व तर्फा जुळविण्याची पद्धति सतारीप्रमाणेंच असते; वाजविण्यांत मात्र फरक असतो. हें वाद्य घोड्याच्या केसांनीं ताणलेल्या धनुष्यानें वाजवितात. ह्या धनुष्यास गज म्हणतात. याची लांबी सुमारें १॥ फूट असते. ह्या वाद्यांत २० पडदे असतात. याचें गतकाम चांगलें असून वादन स्वतंत्रच असतें.

**ताग**—[वर्ग–टिलियासी. इं. ज्यूट]. एका प्रकारच्या झाडापासून काढलेल्या दोरास ताग म्हणतात. या झाडांची लागवड हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर करण्यांत येते. झाड एकवर्षायु असून त्याची वाढ ८ ते १२ फुटांपर्यंत होते. या झाडांच्या अन्तस्त्वचेपासून दोर काढतात. यांचा मोठा व्यापार चालतो. या दोरांपासून गोणपाट, पोतीं, सुतळी, पदार्थ गुंडाळावयाचा कागद, वगैरे तयार करतात. कलकत्त्यामध्यें सुमारें १५ ते २० लक्ष गोणपाटाचे गठ्ठे तयार होतात.

तागाची लागवड हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं होते. हें पीक वाखासाठीं व हिरवाळ खतासाठीं करतात. गुजराथेंत गोराडू जमिनींत हें पीक फारच जोरानें वाढतें.

वाखाच्या पिकांत तागाला पहिलें स्थान मिळतें. कारण हें पीक करणें फायदेशीर असून याची मागणी व्यापारांत फार आहे. बंगाल्यांत कारखानदार व शेतकी खातें ह्यांचेंहि या पिकाचें उत्पन्न वाढविण्यासाठीं प्रयत्न चालू असतात. या पिकाखालीं दर वर्षी सुमारें तीस लक्ष एकर जमीन असते व यापेक्षांहि जास्त क्षेत्र वाढण्याचा संभव आहे.

वाखापैकीं बहुतेक माल परदेशीं रवाना होतो. राहिल्यापैकीं बाकीचा कांहीं पोतीं, कॅन्व्हस, सुतळी, वगैरे रूपानें बाहेर जातो व कांहीं हिंदुस्थानांत खपतो. दर वर्षी सुमारें ७,२०,००० टन (४० लक्ष गठ्ठे) वाख साधारणपणें परदेशीं रवाना होतो. तागाचा हा मक्ता फक्त हिंदुस्थानला अद्याप आहे.

ज्यूट ताग हें पीक मुख्यत्वें पूर्व बंगाल, आसाम व बिहार या प्रांतांत फार महत्त्वाचें आहे. याशिवाय कुचबिहार, बिहार व ओरिसा प्रांतांत याची लागवड होत असून नेपाळांतहि याचा थोडाबहुत पेरा होतो. तागाचा वाख इतर वाखापेक्षां कमजोर असूनहि त्याचें विशेष महत्त्व, नरमपणा, रेशमाप्रमाणें चकाकी व दोरा वळून कपडा विणतां येतो, म्हणून आहे.

तागाची विक्री बंगालमध्यें आपल्याकडील कापसाप्रमाणें मारवाडी दलालांमार्फत होते. उत्तम तागाचें तलम कापड व सामान्य तागाचे पडदे, सतरंज्या, गोणपाटें, वगैरे जिन्नस होतात. हलक्या व निरुपयोगी तागाचा कागद करतात व खरखरीत, बळकट तागाचीं दोरखंडें करतात. हिंदुस्थानांतील गिरण्यांत जाडाभरडा माल निघतो व युरोपांत व अमेरिकेंत सफाईदार व उंची माल काढतात.

मॅनिला ताग म्हणून एक तागाची जात आहे. ज्या जमिनींत झाडपाला कुजला असेल अशा ठिकाणीं हा ताग होतो. हा मूळ

फिलिपाइन बेटांतील. अलीकडे हिंदुस्थान, अंदमान, आराकान पर्वत यांमध्यें याची लागवड होते. याचे दोर व कागद करतात. याखेरीज राजमहाल ताग नांवाचा एक ताग प्रसिद्ध आहे. हा सिक्किमपासून पश्चिमेकडील हिमालयाच्या भागांत आहे.

तागी कापड—(लिनन). तागाच्या धाग्यापासून विणलेल्या कापडास तागी कापड (लिनन) म्हणतात. हें कापड फार प्राचीन काळापासून उपयोगांत आढळतें. अनेक प्रकारचें कापड ईजिप्तमधील संरक्षित शवांच्याभोंवतीं गुंडाळलेलें आढळतें. तागाच्या सालीचा धागा काढून त्याचें कापड विणण्याची कला सर्व देशांमध्यें परिचित दिसते. कापसाच्या धाग्याचें कापड विणण्याचे जे माग असतात त्यांपेक्षां याचे फारसे निराळे नसतात. परंतु कापसापासून धागा करण्याचीं यंत्रें व पद्धति यांमध्यें फार फरक असतो. कारण कापसाचा धागा फार तर दीड-दोन इंच लांब असतो तर तागाचा धागा दोन ते तीन फूट लांब असतो.

तलम तागी कापडाचे प्रकार म्हणजे लॉन, कँब्रिक व दमास्क हे होत. उत्तर आयर्लंडमध्यें तागी कापड पुष्कळ व चांगलें होतें.

**तागडी, तराजू, कांटा**—निरनिराळ्या पदार्थांचें वजन ज्या उपकरणांच्या साहाय्यानें आपणांस कळतें त्यास तागडी म्हणतात. तागडी, कांटे किंवा तराजू निरनिराळ्या प्रकारचे असतात. सामान्य व्यवहारांतील तराजू म्हणजे एका टेकूवर फिरणारा आडवा दांडा व त्याला जोडलेलीं दोन पारडीं हा होय. कांट्याच्यामधील टेकू एका चाकूच्या धारेसारखा तीक्ष्ण दगडाचा असतो व त्याला एक कांटा जोडलेला असून त्याखालीं एक रेखांकित प्रमाणपट्टी बसविलेली असते व जेव्हां वरील आडवा दांडा पूर्णपणें समपातळींत असतो तेव्हां हा कांटा शून्यावर असतो. कांट्यामध्यें सामान्यतः तीन गोष्टी आवश्यक असतात : १. जेव्हां पारडीं रिकामीं असतील किंवा त्यांत सारख्या वजनाचे जिन्नस असतील तेव्हां दांडा पूर्णपणें समपातळींत राहिला पाहिजे. २. एका पारड्यांत अगदीं सूक्ष्म वजन घातलें तरी त्यामुळें वरील दांडा समपातळीत न राहतां त्या बाजूस खालीं गेला पाहिजे. याला कांट्याची सूक्ष्मता म्हणतात. तसेंच ३. एका बाजूला दांडा नमला तरी पुन्हां त्याची समपातळींत येण्याकडे प्रवृत्ति असली पाहिजे. याला कांट्याची स्थिरता असें म्हणतात. विशेष बारकाईनें वजन करावयाचें असल्यास कांट्याच्या दांड्यावर मिलिग्रामचें तारेचें कडें ठेवतात.

तराजूच्या दुसऱ्या प्रकारामध्यें एक रोमन तराजू किंवा लोहदंड तराजू असतो. याचा टेकू टांगता असून त्याच्या एका बाजूस एक लोखंडी दांडा खालीं-वर होत असतो व दुसऱ्या बाजूस आंखूड दांडा असून त्यास एक पारडें जोडलेलें असतें. लांब दांड्यावर प्रमाणांकित रेषा असून तीवर एक सरकतें वजन असतें. यानें मोठमोठ्या वोजांचें वजन करतात. रेल्वेवरील कांटा याच प्रकारांतील असतो. डॅनिश जातीच्या या तराजूमध्यें लांब दांड्याच्या टोंकास वजन पक्कें बसविलेलें असून टेकूची कडी सरकती ठेवलेली असते. ताणकांट्यामध्यें कमान असून ती कमान जितकी ताणली जाईल त्यामानानें किंवा ती जितकी दबेल त्यामानानें वजन करतां येतें. ताणकांट्याचा उपयोग विद्युद्गति यंत्रामध्यें अश्वशक्ति मोजण्याच्या कामींहि करतां येतो. टांकसाळीमध्यें एक अशा प्रकारचा कांटा असतो कीं, त्यामध्यें टाकलेल्या नाण्यांचे हलकीं, बरोबर व भारी असे तीन वर्ग एकदम पडतात. पत्रें वजन करण्याच्या कांट्यास रॉबरव्हल कांटा असें म्हणतात.

**तागाल**—तागाल, ता-गाल अथवा गाल भाषा. ही ज्याप्रमाणें मलाया द्वीपकल्पांत व बेटांत मलयु, अथवा हिंदुस्थानांत हिंदुस्थानी सर्वत्र आढळते, त्याप्रमाणें फिलिपाइन बेटांत सर्वत्र आढळते. या भाषेंत ग्रीक भाषेप्रमाणें उपपदें आहेत. ही लॅटिनप्रमाणें प्रौढ असून तींत शब्दसंग्रह मोठा आहे. ती हिब्र्यूप्रमाणें गूढ आहे. आणि इटालियनप्रमाणें व्यापाराच्या व आदरसत्काराच्या बाबतींत मधुर आहे, असें एका स्पॅनिश मिशनऱ्यानें तिचें वर्णन केलें आहे. थिवेनॉट यानें एका स्पॅनिश मिशनऱ्याच्या ग्रंथांतील जी माहिती आपल्या प्रवासावरील ग्रंथांत घेतली आहे, तींत असें म्हटलें आहे कीं, जरी फिलिपाइन बेटांत प्रत्येक जिल्ह्यांत स्वतंत्र भाषा आहे तरी त्या सर्वांमध्यें परस्परसंबंध असून एकसूत्रीपणा आहे. या सर्व भाषांमध्यें तागाल हीच जराशी संस्कृत भाषा दिसते. दुसरी एक विसाय हीहि बरीच सामान्य आहे; पण ती रानटी आहे.

तागाल भाषेचा अभ्यास युरोपीयांपैकीं प्रथम स्पेनमधील मिशनरी लोकांनीं केला. फ्रा. गास्पर यानें एक व्याकरण लिहिलें. त्याच्या एक १७०३ मध्यें व १७८७ मध्यें दुसरी अशा दोन आवृत्त्या निघाल्या. याखेरीज त्यानें तागाल भाषेंत कांहीं ख्रिस्तसांप्रदायिक ग्रंथ लिहिले. यानंतर फिलिपाइन भाषेंतील ग्रंथांची एक यादी प्रसिद्ध झाली आहे (१८८२) आणि कांहीं व्याकरणेंहि प्रसिद्ध झालीं आहेत.

तागाल भाषेंत १४ व्यंजनें व ३ स्वर मिळून १७ वर्ण आहेत. ही भाषा बांबू अथवा ताडपत्र यांवर लोखंडाच्या अणकुचीदार खिळ्यानें लिहितात. ही भाषा चिनी भाषेप्रमाणें वरून खालीं लिहीत, असें स्पॅनिश मिशनरी म्हणतात, पण बांबू व खिळा या साधनांवरून व यांतील वर्ण वर्त्तावर्णाप्रमाणें दिसतात यावरून ती वर्त्ताप्रमाणेंच खालून वर लिहीत असावे, असा लेडेन याचा तर्क आहे. जे लोक अजून ख्रिस्ती कळपांत शिरले नाहींत ते

अद्यापिहि तागाल भाषा वापरतात. ही भाषा मलयु, बुगीस, जावानी यांसारख्या भाषांच्याच वर्गांतील आहे.

**ताजमहाल**—आग्रा येथील ताजमहालची इमारत आपल्या अप्रतिम सौंदर्यानें जगांतील सर्व इमारतींत अग्रपद पावली आहे. ही आग्रा शहरापासून दीड कोसावर यमुनेच्या पश्चिम तीरावर आहे. त्या वेळीं हिंदुस्थानांत शिल्पशास्त्र किती उत्कृष्ट स्थितींत होतें याची उत्तम साक्ष ही इमारत देत आहे.

१६३१ सालीं शहाजहानची आवडती बेगम अर्जुमंदबानू ऊर्फ मुम्ताजमहाल ही मरण पावली. तिच्या मृत्यूनें बादशहास अत्यंत दुःख झालें. त्याला कांहीं सुचेना. कित्येक दिवस तो दरबारासहि गेला नाहीं. बेगमेच्या कबरीजवळ जाऊन तो ढळढळां रडे. आग्र्याच्या दक्षिणेस राजा जयसिंग याच्या मालकीची एक जागा होती, ती त्याजकडून बादशहानें खरेदी केली. तज्ज्ञ कारागिरांकडून इमारतीचे नकाशे मागविले. त्यांपैकीं एक पसंत करून प्रथम त्याचा लांकडी नमुना तयार करविला. नमुन्याप्रमाणें स. १६३१ च्या प्रारंभीं इमारतीस सुरुवात झाली, ती स. १६४३ च्या जानेवारींत पुरी झाली. मक्रामतखान व अब्दुलकरीम हे दोघे त्या कामावर मुख्य देखरेख करीत होते. त्या इमारतीस पन्नास लाख रुपये खर्च आला. ती बांधण्याच्या कामीं वीस हजार मनुष्यें खपत होतीं. इमारतीचा खर्च ९ कोटी १७ लाख रुपये झाला. स. १६४३ त बादशहा ताजमहालांत गेला आणि एक लाख रुपयांच्या उत्पन्नाचीं तीस गांवें ताजमहालाच्या खर्चाकडे व भोंवतालच्या सराया, दुकानें, बाग यांच्या खर्चासाठीं त्यानें लगेच लावून दिलीं.

पुढील इमारतीजवळ बाग आहे. बागेच्याकडेस ताजमहाल आहे. दरवाजापासून महालापर्यंत सुरूचीं झाडें आहेत. त्यांतून रस्ता जातो. त्यांत कारंजीं व पाण्याचे लांबट हौद आहेत. यांत निरनिराळ्या रंगाचे दरवाजाच्या आंत महिरपदार कमानीचे दुजोडी सोपे आहेत. उत्तमोत्तम वीस जातींच्या दगडांचा उपयोग या इमारतीस केला आहे. मुख्य महाल, मनोरे व आसपासच्या लहान इमारती यांना संगमरवरी दगड वापरलेला आहे. तो शुभ्र असून त्यांत थोडी काळ्या रंगाची झांक मारते. प्रथम मुख्य इमारतीचा चौथरा, नंतर पटांगण व पुढें मुख्य वेस लागते. तिच्यावर संगमरवरांत कोरून स्लेटच्या दगडासारखे काळे दगड बसवून कुराणांतील वाक्यें तयार केलीं आहेत. कमानीच्या पुढच्या कडेला संगमरवरी तोडा घातलेला आहे व भिंतीवर चित्रविचित्र नकसकाम आहे.

हिच्यांतून आत गेल्यावर खालीं खऱ्या थडग्याकडे जाण्याचा प्रशस्त संगमरवरी जिना लागतो. आंत गेल्यावर आपल्या उंचीनें मनास थक्क करून सोडणारी जमीन आणि भिंतीवरील नक्षीनें डोळ्याचें सार्थक करणारी दिव्य सृष्टि नजरेस पडते. येथें अंधुक प्रकाश आहे. दालनांत मध्यभागीं मुम्ताजबेगमचें व त्याच्या उजव्या बाजूस शहाजहानाचें दिखाऊ थडगें आहे. खरीं थडगीं खालच्या तळमजल्यांत आहेत. जमिनीवर व भिंतीवर फारच सुरेख नक्षीकाम आहे. पांढऱ्या दगडांत नमुना कोरून आंत रंगीबेरंगी खडे बसवून नक्षीचा प्रकार दाखविला आहे. झाडाचें पान मुरडलें तर आंतील बाहेरील रंग भिन्न दिसतो तो देखील प्रकार त्या त्या रंगाचे खडे बसवून दाखविला आहे फुलें, पाकळ्या, यांचे निरनिराळ्या अवस्थेमधील निरनिराळे रंग त्या त्या रंगाच्या खड्यांनीं साधले आहेत.

मुख्य इमारतीच्याभोंवतीं चार मनोरे आहेत. प्रत्येकाचा घेर साठ-पासष्ट फूट असावा. बैठकी अष्टपैलू व मनोरे वाटोळे आहेत. ते पांच मजली असून त्यांची उंची निदान दीडशें फूट असावी. मुख्य इमारतीच्या दोन्ही बाजूंना लहान लहान दोन इमारती असून त्यावरहि घुमट आहेत. सर्व भिंतींचे कोपरे छाटून सुंदर नक्षीदार महिरपा तयार करून खिडक्या केल्या आहेत. ही इमारत फारच प्रमाणशुद्ध कलाकुसरीच्या कामानें भरली आहे. ही भव्य, रम्य व चित्ताकर्षक असून जणुं काय कालच बांधली आहे इतकी ती नवी दिसते. आग्रा पाहा.

**ताजिक**—जे इराणी लोक अफगाणिस्तानचे मूळ मालक होते त्यांचे वंशज ताजिक लोक आज अफगाणिस्तानच्या दास्यत्वाखालीं आहेत. ते आपणांस पर्शियन म्हणवितात. ते अरब व इराणी जातींपासून झालेले असून त्यांचा धंदा हलकीं कामें करण्याचा आहे. काबूलच्या उत्तरेकडील जिल्ह्यांतील ताजिक लोक चांगले लढवय्ये आहेत. अफगाणिस्तानांत त्यांची संख्या सुमारें ८० हजार आहे. ताजिक लोक तुर्कस्तान, अफगाणिस्तान, बुखारा, खिवा व काशगर या ठिकाणीं दास्यत्वांत असून बदकशान, वाखन, दार्वज, कोस्त या ठिकाणीं त्यांच्या हातीं राज्यसूत्रें आहेत. कास्पियन समुद्राच्या पश्चिमेस त्यांना तात म्हणतात.

**ताड**—[ वर्ग बोरासस फ्लाबेलिफॉर्मिस. इं. पामिरा-पाम ]. हिंदुस्थानांत पूर्व पंजाब व आसाम हे प्रांत खेरीजकरून सर्व प्रांतांतून ताडाचीं झाडें आहेत. त्यांची संख्या ४ कोटींवर भरले. तथापि हें झाड मूळचें हिंदुस्थानांतील नाहीं. ताडाचा वृक्ष आफ्रिकेंतून इकडे आला असला पाहिजे असा पुष्कळ लोकांचा समज आहे. या झाडापासून पांच तऱ्हांचे तंतू निघतात : (१) पानाच्या देंठाभोंवतीं असलेला विरल तंतु, (२) देंठापासून काढलेला, (३) बुंध्याच्या आंतील गाभ्यापासून तयार केलेला, (४) फलवेष्टनापासून काथ्या, व (५) पानापासून निघालेला. पानापासून तयार केलेल्या वाखाचा उपयोग टोपल्या,

परड्या, पेटारे, इ. वस्तू करण्याकडे करतात. काथ्याचा निर्गत व्यापार मुख्यत्वेंकरून तिनवेल्ली जिल्ह्यांतील तुतिकोरीन येथेंच होतो. ताडाच्या पानांवर अक्षरें कोरून ग्रंथ लिहिण्याचा पूर्वी प्रघात असे. असे ताडपत्री ग्रंथ अजूनहि पाहावयास सांपडतात. ह्या झाडाचा रस (ताडी) उत्साहवर्धक व कफनाशक आहे. पानथरी वाढली असतां ताडाची पोय जाळून ती राख औषधं म्हणून देतात. हातांत धरावयाच्या काठ्या, आंखण्या, छत्र्यांचे दांडे, इ. यांच्या जिनसा तयार करतात.

टिचकी मारल्याबरोबर फुलांच्या देठांतून रस गळतो; तो आंबला म्हणजे त्यास ताडी असें म्हणतात. ताडीचें ऊर्ध्वपातन केल्यास त्या रसाची दारू बनते. ताडीच्या रसापासून गूळहि तयार करतात. असा गूळ मद्रास इलाख्यांत करतात. त्या गुळाचा रोजच्या खाण्याकडे खप होतो आणि कांहीं गूळ साखर करण्याच्या कारखान्याकडे जातो.

**ताडगूळ**—मद्रास व बंगाल प्रांतांत फार प्राचीन काळापासून ताडापासून गूळ तयार करण्यांत येत असतो. यापुढे दारूबंदीमुळें ताडीच्या उत्पादनाचा–विक्रीचा धंदा करणाऱ्यांचें उपजीविकेचे साधन नाहींसें होणार म्हणून हिंदुस्थान सरकारनें या लोकांना ताडीपासून गूळ तयार करण्याचें शिक्षण देण्याला सुरुवात केली आहे. बहुतेक प्रांतांतून अशीं शिक्षणकेंद्रें उघडण्यांत आलीं आहेत. या नव्या धंद्यामुळें ताडी करणाऱ्या सुमारें ५० लक्ष कुटुंबांना उदरनिर्वाहाचें साधन मिळेल. ताडाच्या ६० झाडांपासून एका वर्षाला सु. ६,००० पौंड गूळ तयार होतो. एवढा गूळ तयार करण्यास सारा दीडशें रुपये खर्च होतो व उत्पन्न निघतें दीड हजार रुपयांचें.

**ताडतेल**—हें एका जातीच्या ताडाच्या झाडापासून निघतें. त्याला तेलताड (एलीइस गिनिन्सिस) असें म्हणतात. हीं झाडें पश्चिम आफ्रिकेत होतात. याच्या फळाच्या सभोंवतीं जो मांसल गर असतो तो उकळून त्यांपासून हें तेल काढण्यांत येतें. या तेलाचा उपयोग युरोपमध्यें साबण व मेणबत्त्या तयार करण्याकरितां करण्यांत येतो. फळाच्या आंतील गरापासून निघणाऱ्या तेलाचें वंगण व मार्जारीन नांवाचें लोणी करण्यांत येतें.

**ताडपत्र**—लेखनसाधनाच्या विविध वस्तूंपैकीं ताडपत्राचाच उपयोग हिंदुस्थानांत प्रथमतः करूं लागले असावे, असें संस्कृत वाङ्मय-ग्रंथासंबंधीं जे पारिभाषिक शब्द आढळतात त्यांवरून दिसून येत आहे. ताडपत्र हें ज्याच्या पानापासून तयार करतात त्या तालवृक्षाची उत्पत्ति हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व भागांत थोडीबहुत व दक्षिण हिंदुस्थानांत विशेषेंकरून होते. काळजीपूर्वक बनविलेल्या पोथ्या तालवृक्षाच्या पानाचे एकपासून चार इंचापर्यंत रुंदीचे तुकडे करून, वाळवून, त्यांना पाण्यांत उकळून व पुन्हां वाळवून, आणि मग शंख किंवा कवडी यांसारख्या एखाद्या गुळगुळीत वस्तूनें घोटून त्यावर लिहिलेल्या असतात. पानांची लांबी थोडी असल्यास प्रत्येक पानास व त्याच्र आकाराच्या खालीं व वर ठेविलेल्या लांकडाच्या फळ्यांस मध्यें एकच भोक पाडून, व जास्त असल्यास दोन्ही बाजूंस एक एक भोंक पाडून त्यांतून दोरी ओवून त्यांचें पुस्तक बांधलेलें असतें. ह्या बांधण्याच्या रीतींवरूनच एखाद्या विषयावरील पुस्तकास ग्रंथ किंवा सूत्र हें नांव पडलें असावें; व ताडपत्रामुळें वृक्षाचा व पुस्तकाचा जो संबंध जडला त्यायोगें, पुस्तकविषयींच्या परिभाषेंत स्कंध, कांड; शाखा, वल्ली, पर्ण व पत्र यांसारखे वृक्षासंबंधींचे शब्द आले असावे. ताडपत्रावर शाईनेंहि लिहितात. परंतु लिहिण्याच्या क्रियेस संस्कृतमध्यें जो 'लिख्' हा धातु आहे त्यावरून लोखंडाच्या तीक्ष्ण कलमानें ताडपत्रावर अक्षरें कोरून त्यांवर काजळ फासण्याचीच रीत सर्वांत जुनी असली पाहिजे, असें दिसतें. त्यांतील पहिली रीत पश्चिम व उत्तर हिंदुस्थानांत व दुसरी दक्षिणेमध्यें प्रचलित होती. ताडपत्रावर लिहिलेला सर्वांत जुना ग्रंथ म्हटला म्हणजे इसवी सनाच्या दुसऱ्या शतकाच्या सुमारास डॉ. लुडर्स यानें छापविलेला नाटकाचा अंश होय. तथापि बुद्धाच्या निर्वाणानंतर म्हणजे खिस्तपूर्व पांचव्या शतकांत राजगृहाजवळ सप्तपर्णी गुंफेंत भरलेल्या बौद्ध संगीतीनें 'त्रिपिटक' ताडपत्रावरच लिहविलें होतें असा प्राचीन लेखांत उल्लेख सांपडतो. (ह्युएनत्संगच्या चरित्राचें बीलकृत रूपांतर, पा. ११६–११७). बंगालमध्यें दुर्गापाठ लिहिण्याच्या व रामेश्वराच्या व जगन्नाथाच्या मंदिरांत भरणा केलेल्या रुपयांच्या पावत्या देण्याच्या कामीं व तसेंच हिंदुस्थानच्या दक्षिण व आग्नेय भागांतील प्राथमिक शिक्षणाच्या शाळांत अद्यापिहि ताडपत्रच वापरतात.

**ताडवर्ग**—[वर्ग–पामासी]. हा एक एकदल काष्ठमय खोड असणाऱ्या उष्ण कटिबंधांत होणाऱ्या वृक्षांचा वर्ग आहे. याचीं फुलें सहा पाकळ्यांचीं निर्वर्ण व मांसल असतात व त्यांवर एक मोठें मानासारखें आवरण असतें. याचा सूक्ष्म गर्भ बलकामध्यें असतो व तो बीजाच्या डेंखापासून दूर असतो. याचीं पानें मोठीं, घड्या असलेलीं व टोंकदार असतात. याच्या उंचींत व इतर बाबतींत याच्या निरनिराळ्या जातींत बराच फरक आढळून येतो. याच्या सुमारें १,१००. जाती आतांपर्यंत ज्ञात

झालेल्या आहेत. तथापि, अद्यापि पुष्कळांचें संशोधन व्हावयाचें राहिलें आहे. यांच्यापैकीं पुष्कळ जातीं मनुष्यास फार उपयुक्त असतात. यांच्यापासून मनुष्यास दारू, तेल, मेण, पीठ, साखर, साबूदाणा, दोरा, भांडीं, शस्त्रें आणि इमारती सामान मिळतें. नारळ, खजूर, वगैरे झाडांचें त्यांच्या फळांमुळेंच महत्त्व आहे. कोबीताड हा त्याच्या अग्रभागीं असणाऱ्या खाण्यासारख्या कळ्याकरितां उपयुक्त आहे. पंख्याचा ताड व इतर कांहीं जाती त्यांच्या पानाकरितां महत्त्वाच्या आहेत.

**तांडूर**—हैद्राबाद संस्थान, गुलबुर्गा जिल्हा. कोडंगल तालुक्यांतील एक जहागीर व तिचें मुख्य ठिकाण. हें फरशीकरितां प्रसिद्ध आहे. लो. सं. सु. आठ हजार.

**तांतव**—(फिब्रिन). हा प्राणी व वनस्पती ह्यांमध्यें आढळणारा एक विशिष्ट प्रकारचा सेंद्रिय पदार्थ आहे. प्राण्याच्या शरीरामध्यें हा पदार्थ जेव्हां रक्त थिजतें तेव्हां खालीं राहतो. परंतु हा लाळ, लस, पू, वगैरेमध्येंहि असतो. हा पदार्थ औजस् (प्रोटिन) असून बलक किंवा केसिन यांसारखा असतो. पोषणाचें कार्य करण्याच्या कामीं हा फार महत्त्वाचा आहे. निरोगी मनुष्याच्या शिरांतील रक्तांत याचें प्रमाण शें. २·२ असतें. परंतु शुद्ध रक्तवाहिन्यांमध्यें हें प्रमाण थोडें अधिक असतें.

**तांतवा, तंती**—बंगाल, बिहार व आसाम प्रांतांतील विणकरी लोकांची जात. यांचा पूर्वज विश्वकर्म्यापासून शूद्र स्त्रीच्या पोटीं जन्मला असें हे लोक समजतात. विश्वकर्मा हा यांचा देव. अलीवर्दीखानानें एका तंतीला गवतावर वाळत असलेलें वस्त्र गाईनें खाल्लें म्हणून शिक्षा दिली होती. ८८ गज लांब दोऱ्याचें फक्त एक रति वजन भरे इतकें बारीक सूत कांतण्याबद्दल यांची प्रसिद्धि होती. प्रसिद्ध डाक्याची मलमल हेच लोक विणीत असत. बंगाल्यांत यांच्या हातचें पाणी ब्राह्मण पितात.

**तातार**—१. रशियाच्या साम्राज्यांतील मुसलमानी व तुर्की उत्पत्तीच्या रहिवाशांना तातार म्हणतात. युरोपांतील रशियांतील बहुतेक तातार लोक, तेराव्या शतकांतील मंगोल स्वारींतील अवशिष्ट लोकांचे वंशज आहेत, व सैबेरियांतील तातार लोक तुर्क लोकांचे वंशज असून त्यांच्यांत फिन व सामोयिडी रक्ताचेंहि थोडेंबहुत मिश्रण आहे. तातार लोकांच्या तीन मुख्य शाखा आहेत: (१) युरोपांतील रशिया व पोलंड देशांतील तातार, (२) कॉकेशसमधील तातार, व (३) सैबेरियांतील तातार. यांचे ११ पोटविभाग आहेत. ते—(१) खानन, (२) आस्त्राखान, (३) क्रिमियन, (४) नोगेस—हे कुमा नदीच्या कांठीं राहतात. (५) करचेस—हे एल्ब्रुझच्या आसपास राहतात. (६) पर्वतावर राहणारे तातार, (७) बारब, (८) चुलिअम, (९) अबाकान, (१०) अल्ताई पर्वताच्या उत्तरेकडील उतरणीवर राहणारे, व (११) अल्ताई तातार.

सहा शतकांपूर्वी ज्या मंगोली व तुर्की रक्ताच्या लोकांनीं युरोपवर स्वारी केली त्यांना प्रथमतः तातार म्हणत. हल्लीं तातार हें नांव स्थूलमानानें उरल्‌अल्ताइक राष्ट्रजातींना व वस्तुतः रशियांतील तुर्क भाषा बोलणाऱ्या मुसलमानांना लावतात. हे कधींहि आटोमन अथवा सेल्जुक साम्राज्यांत नव्हते. त्यांनीं लहान लहान वसाहती केल्या होत्या व इतर मुसलमानांपासून ते अलिप्त होते.

२. एक सोव्हियट सोशॅलिस्ट रिपब्लिक. हें युरोपियन रशियाच्या पूर्व भागांत आहे. पूर्वीच्या काझान प्रांताचा या रिपब्लिकमध्यें समावेश करून १९२० सालीं स्वायत्त संस्थान बनविण्यांत आलें. काझान शहर या संस्थानची राजधानी आहे. या संस्थानचें क्षेत्रफळ २५,७०० चौ. मै. आहे. लो. सं. सुमारें तीन लक्ष असून निम्में लोक तातार आहेत.

**तात्या टोपे** (१८१४–१८५९)—१८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धांत प्रसिद्धीस आलेला एक शूर मराठा. हा देशस्थ ब्राह्मण असून येवलें येथील (जि. नाशिक) रहिवासी होता. बाजीरावाबरोबर यांचें घराणें ब्रह्मावर्ताला गेलें. १८५७ च्या युद्धांत दिल्ली, लखनौ, जगदीशपूर, कानपूर या ठिकाणच्या लढायांत तात्या अग्रेसर होता. १० ऑक्टोबर १८५७ला आग्रा येथें कर्नल ग्रेथडच्या फौजेवर बंडवाल्या शिपायांनीं तात्याच्या सेनापतित्वाखालीं हल्ला चढविला. त्याचप्रमाणें झांशी येथें राणी लक्ष्मीबाई हिलाहि तात्या मदत करण्यास आला होता. पण जनरल रोझनें त्याचा पराभव केल्यामुळें त्यास पळून जावें लागलें. नंतर तात्या, राणी लक्ष्मीबाई, बांद्याचा नबाब, रावसाहेब पेशवे, वगैरे पुढारी ग्वाल्हेरवर चालून गेले. व शिंद्यांचा पराभव करून त्यांनीं तें शहर काबीज केलें. बेटवाच्या लढाईंत २२,००० शिपाई तात्याच्या हाताखालीं लढले.

तात्या फार धूर्त, शूर व धाडसी होता. त्याच्या हाताखालील फौज बिनकवायतीची व पोटभरू असल्यानें त्याचा पराभव होई. तथापि यानें इंग्रजी सेनापतींचा एकदोनदां पराभव केला होता व सर रोझसारख्या सेनापतीसहि आपल्या चलाखीनें चकित करून सोडलें होतें. बंडाचा बीमोड झाल्यावरसुद्धां तात्यानें मोठमोठ्या मी मी म्हणविणाऱ्या सेनापतींना दोन वर्षें मार्गें रखडवीत लावलें व त्राहि भगवन् करून सोडलें. त्या वेळीं त्याच्याजवळ दोनतनिशेंच लोक होते. शेवटीं पदरच्या लोकांपैकीं एकानें विश्वासघात केला. नर्मदाकांठच्या जंगलांत तो असतां १८५९ सालीं एप्रिलच्या ता. ७ ला तो पकडला गेला.

व १८ व्या तारखेस त्यास फांशी दिलें. मरणापूर्वी त्यानें जी कैफीयत दिली तींत, मी राज्यद्रोही किंवा बंडखोर नाहीं, मीं माझ्या धन्याची चाकरी एकनिष्ठेनें केली व माझ्या देशासाठींच मी लढलों, असें म्हटलें आहे.

तात्याचा मुलगा पांडुरंगराव हा नानासाहेब पेशव्याबरोबर नेपाळांत गेला होता. त्याचे चारहि मुलगे राणीगंज येथें नानासाहेबांच्या बायकामंडळींबरोबर राहत असत. व त्यांनीं त्यांच्या सेवेंत आपलें आयुष्य वेचलें.

**तांदुळजा**—या वनस्पतीस पाश्चात्य वनस्पतिशास्त्रज्ञ अमरंथ या वर्गांत घालतात. अमरंथ या (इंग्रजी) नांवानें दर्शविल्या जाणाऱ्या वनस्पतींच्या तीन जाती आहेत :—

(१) भाजीपाला— मुख्यतः बागेंत तयार करतात. या वर्गांत लालमाठ, चौलेलाग, चेवू, नतिया, कांटेमाठ, तंदुलिया, चौळाई, वगैरे पोटजाती आहेत.

(२) धान्य—यास केदारी चुवा, रमदन, वगैरे नांवें आहेत. हें हिंदुस्थानांत सपाट प्रदेशांत बागांतून शोभेकरितां अगर भाजीपाल्याकरितां लावलें जातें. परंतु डोंगरी लोक धान्याकरितां याची शेतांत लागवड करतात. ज्याला प्राचीन लेखक अनर्दन असें म्हणत तें याच जातीचें असावें. परंतु हल्लीं, चुवा (आ), चुको, गणहर, वगैरे नांवांनीं तें परिचित आहे.

(३) धान्याकरितां शेतात लावतात. हीच जात सर्वांत महत्त्वाची आहे.

काश्मीरपासून सिकीमपर्यंत हिमालयावर ३,००० ते १०,००० फूट उंचीच्या भागांत, मध्य व दक्षिण हिंदुस्थानांत आणि ब्रह्मदेशांत, उत्तर-पश्चिम आणि मध्य हिंदुस्थानच्या सपाट प्रदेशांत हें हिंवाळी पीक काढतात. हें धान्य इतर धान्यांपेक्षां पौष्टिक गुणांत फारसें कमी नसतें.

**तांदुळजाची लढाई**—हिला राक्षसभुवनाची लढाई असेंहि म्हणतात. थोरले माधवराव गादीवर आल्यानंतर पेशव्यांच्या घरांत भांडणें सुरू झालीं. राघोबाच्या धालमेलींनीं अनेक मराठे सरदार असंतुष्ट झाले. अशा वेळीं निजामअल्लीचा दिवाण विठ्ठल सुंदर यानें पेडगांवचा तह मोडून पेशव्यांशीं युद्ध सुरू केलें (१७६२). गोपाळराव पटवर्धन, मोरोबा फडणीस, वगैरे असंतुष्ट मराठे सरदारांना विठ्ठल सुंदरानें आपल्या पक्षास वळवून घेतलें. तसेंच साताऱ्याच्या गादीचें आमिष दाखवून जानोजी भोसल्यासहि आपल्याकडे ओढलें. राघोबाची या वेळीं युद्धाकरितां तयारी नव्हती. तथापि माधवराव पेशव्यांनीं आपल्या चुलत्यास शक्य तेवढें पाठबळ दिलें. मल्हारराव होळकर व दमाजी गायकवाड सैन्यांत दाखल झाले. मराठ्यांची फौज शत्रूला मुकाबला देण्यास पुरेशी नव्हती. म्हणून त्यांनीं शत्रूचा मुलूख लुटून उध्वस्त करण्याचा सपाटा लावला. तेव्हां पुणें शहर लुटण्याच्या इरादानें निजाम पुण्याच्या रोखानें चालून आला. हें पाहतांच राघोबानें आपला मोर्चा हैद्राबादेकडे वळविला.

निजामानें पुण्यापासून कांहीं अंतरावर छावणी देऊन आपल्या सैन्यास पुणें लुटण्यास परवानगी दिली. ज्यांनीं पैसे दिले ते बचावले; बाकीच्यांना लुटून त्यांचीं घरें जाळून टाकण्यांत आलीं.

निजामानें पुणें जाळलें हें ऐकून हैद्राबादच्या आसपासच्या खेड्यांतून २,८०,००० रु. खंडणी उकळून राघोबा निजामाच्या पाठीवर आला. जानोजी भोसल्यास कांहीं मुलूख देऊं करून त्याला शत्रूपासून फोडलें.

निजामाचें सैन्य गोदातीरीं आलें. कांहीं सैन्य नदीपार झालें. बाकीचें सैन्य नदी ओलांडेपर्यंत विठ्ठल सुंदरानें गोदेच्या दक्षिण तीरावरच राक्षसभुवन येथें राहावें असें ठरलें. जानोजी कांहीं बहाणा करून निजामापासून दूर गेला. जानोजी वेगळा होतांच मराठ्यांनीं निजामावर हल्ला केला. घनचक्कर लढाई झाली. दादा हत्तीवरून तिरंदाजी करीत होता. निजामाच्या सर्व पठाणांनीं दादास वेढलें व त्याचा हत्ती वळविला. मराठे पळूं लागले. माधवराव सैन्याच्या मागें दोन कोसांवर नजरकैदेंत होता. त्यानें आयत्या वेळीं येऊन शत्रूची दाणादाण केली. निजामाचा पराभव होऊन तो शरण आला. ही लढाई १० ऑगस्ट १७६३ रोजीं झाली. निजामअल्लीस पूर्ण क्षमा करूनच दादा थांबला नाहीं, तर त्यानें उलट त्याला १९ लक्षांचा मुलूख देण्याचें आश्वासन दिलें ! परंतु कारभारी मंडळींनीं राघोबाचें मन वळवून फक्त ९ लक्षांचाच मुलूख निजामाच्या स्वाधीन केला. पुष्कळ मराठी बखरींतून व कागदपत्रांतून हिला राक्षसभुवनाची लढाई म्हणतात. ग्रांट डफ व कांहीं बखरी हिला तांदुळजाची लढाई म्हणतात. मराठेशाहींत ही एक प्रसिद्ध विजयाची लढाई म्हणून स्मरणीय आहे.

**तांदुळवाडीचा किल्ला**— मुंबई, माहिमच्या आग्नेयीस १० मैलांवर १,९०० फूट उंचीच्या टेंकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. पूर्वी मजबूत तटबंदी असावी. पूर्वेस पायथ्याशीं वैतरणा नदी वाहते व जवळ लालठाण नांवाचें खेडें आहे. येथें एक पाण्याचा तलाव आहे. तो पोर्तुगीजांनीं बांधला असावा.

**तांदूळ**—एक धान्य. भात कांडून जे दाणे काढतात त्यास तांदूळ म्हणतात. भाताचें पीक व प्रकार याची सविस्तर माहिती 'भात' खालीं सांपडेल. व्रीहि हा तांदुळवाचक संस्कृत शब्द ऋग्वेदांत कोठेंहि आला नाहीं, पण अथर्ववेद, व इतर उत्तरकालीन वाङ्मयांत वारंवार आढळतो. तांदूळ हिंदुस्थानच्या आग्नेय भागांत प्रथम उत्पन्न होत असावा, म्हणून ऋग्वेदांत त्याचा उल्लेख आलेला

नाहीं. तैत्तिरीय संहितेमध्यें पांढरा व काळा तांदूळ यांची तुलना केली आहे, व या संहितेंत काळा, लवकर होणारा (आशु) व मोठा तांदूळ (महाव्रीहि) असें वर्णन आलें आहे. कदाचित् हा लवकर वाढणारा तांदूळ म्हणजे पुढें ज्याला वार्षिक (साठ दिवसांत तयार होणारा असें नांव मिळालें) तो असावा. व्रीहि व यव यांची जोडी संहिता ग्रंथांत आढळते.

१९४८–४९ सालांत जगांत तांदुळाचें उत्पादन १४·५ कोटी टन होतें. जगांतील निम्मे लोक तांदूळ खाणारे आहेत. पूर्वेकडे याचा सर्वांत जास्त खप असतो. जगांतील ९६ टक्के तांदूळ आशिया खंडांत पिकतो. यांत सत्त्वांश फार कमी असतो तरी पचण्यास हलका असतो.

**तानसेन**—एक सुप्रसिद्ध गवई. हा जातीचा गौड ब्राह्मण व ग्वाल्हेरचा राहणारा. याच्या बापाचें नांव मकरंद पांडे. प्रसिद्ध अवलिया मुहम्मद घोष यास मकरंद यानें पुत्रप्राप्तीसाठीं नवस केला होता. त्याच्या कृपाप्रसादानें तानसेन झाला. त्यास तन्नामित्र असें म्हणत. याची अनुकरण करण्याची शक्ति फार विलक्षण होती. हा कोणत्याहि प्राण्याचा आवाज हुबेहूब काढीत असे. एकदां हरिदासबाबा नांवाचे एक साधु याच्या बागेंत आले होते. त्या वेळीं तानसेनाची अनुकरण करण्याची शक्ति त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली. हरिदासबाबांनीं मकरंदाजवळ तानसेनाची मागणी केली व सांगितलें कीं, "मी याला उत्तम गाणें शिकवितों." पुढें हा या हरिदासबाबांजवळ गायनकला शिकला व ग्वाल्हेरास परत आला.

प्रथम तानसेन रामचंद्र नांवाच्या एका हिंदु राजाच्या पदरीं होता. पुढें त्याची कीर्ति अकबर बादशहाच्या कानीं गेली. अकबर संगीतकलेचा भोक्ता होता. त्यानें रामचंद्राकडे तानसेनाची मागणी केली. रामचंद्रानें तानसेनास अकबराकडे पाठविलें. बादशहानें त्यास दरबारीं आणून त्याचा मोठा गौरव केला व त्यास नवरत्नांत बसविलें.

यानें अनेक रागांत ध्रुपदें व नवीन रागहि रचिले आहेत. यानें कांहीं ध्रुपदांत आपल्या आश्रयदात्या बादशहाचें नांव घातलें आहे. हा वयाच्या ६३ व्या वर्षी इ. स. १५८८ सालीं मरण पावला. मियाचा मल्हार, मियाची तोडी, मियाचा सारंग, इत्यादि राग त्यानें शोधलेले आहेत.

एकदां तानसेन व अकबर हरिदासस्वामी यांचें गाणें ऐकण्यास गेले. बादशहानें त्या वेळीं वाद्यवाहकाचा वेष धारण केला होता. असें एक चित्रहि उपलब्ध आहे. गाणें झाल्यावर बादशहानें विचारलें कीं, "तुझ्या व तुझ्या गुरूच्या गाण्यांत फरक कां?" तेव्हां तानसेन म्हणाला, "बावा हे आपल्या लहरीप्रमाणें गातात, पण मला मात्र आपल्या आज्ञेप्रमाणें वागावें लागतें."

हल्लीं गवयी लोकांत यास इतकी मान्यता आहे कीं, ते याचें नांव निघतांच कान पिरगाळून घेऊन यास नमन करीत असतात. याची कबर ग्वाल्हेर येथें किल्ल्याच्या पायथ्याशीं आहे.

**तानाजी मालुसरे**—एक शूर मराठा सरदार. हा शिवाजीचा परम विश्वासू असा बाळमित्र होता. प्रतापगडाखालीं जावळी खोऱ्यांतील उमराठें हें याचें राहण्याचें गांव. लहानपणापासून हा शिवाजीबरोबर अनेक संकटांच्या प्रसंगांत होता. त्याला किल्ले घेण्यांतहि हा पुष्कळ उपयोगी पडला. अफजलच्या प्रसंगांत हा शिवाजीबरोबर भेटीच्या मंडपांत गेला होता. व पुढें यानेंच सय्यद बंडा (अफजलाचा अंगरक्षक) यास छाटून टाकिलें. (१६५९). पुढें शाहिस्तेखानाच्या छाप्यांत जीं १०–१२ माणसें शिवाजीबरोबर खानाच्या तंबूंत घुसलीं, तींत हा एक होता (१६६३). आग्र्यास शिवाजी गेला, त्या वेळीं याला बरोबर नेलें होतें (१६६६). तेथून स्वदेशीं परत आल्यावर शिवाजीनें आपले मोंगलांस दिलेले किल्ले परत घेण्याची मोहीम आरंभिली. तींत कोंडाणा घेण्याची कामगिरी याच्याचकडे आली. या वेळीं तानाजी हा बारा हजार हशमा(पायदळा)चा सुभेदार होता. त्याला पालखीचा व पांच कर्ण्यांचा मान होता.

शुक्रवार माघ व. ९ (ता. ४–२–१६७०) रोजीं तानाजी हा आपला भाऊ सूर्याजी व वृद्ध मामा शेलार आणि तीनशें निवडक मावळे बरोबर घेऊन काळोख्या रात्रीं सिंहगडाखालीं आला. किल्ल्याचा बंदोबस्त मोंगलांनीं उत्तम प्रकारें ठेविला असून, तेथील शिबंदीवर उदेभान राठोड हा शूर रजपूत सरदार मुख्य होता. थोड्याशा मावळ्यांनीं हा किल्ला काबीज करणें हें काम मोठेंच मर्दुमकीचें व धाडसाचें होतें. तानाजीनें दोन टोळ्या केल्या व एक स्वतः बरोबर घेतली. ती रात्र माघ वद्य नवमीची. अंधार फार होता. व गडाच्या आसपास झाडीहि दाट होती. अशी आख्यायिका आहे कीं, तानाजीनें आपली यशवंती घोरपड घेऊन तिच्या कमरेस सांखळी बांधली व तिला ठरविलेल्या कड्यावर चढविलें; पण ती परत आली. या अपशकुनाकडे दुर्लक्ष करून त्यानें तिला पुनः वर चढविली. प्रथम सुभेदार वर चढला. त्याच्यामागून शेलारमामादि पन्नास मावळे वर चढले. त्यांच्यानंतर इतर चढूं लागले, इतक्यांत सांखळदंड तुटला; तेव्हां शेलारमामा घाबरला, परंतु तानाजीनें त्याला धीर दिला. पुढें दरवाजावर आपले लोक ठेवण्यासाठीं सुभेदारानें पुणें बाजूकडील पहिल्या दरवाजावर जाऊन तेथील पहारेकऱ्यांवर हल्ला करून त्यांना तोडून काढलें, व दरवाजा ताब्यांत घेतला. आतां किल्ल्यांतील रजपुतांस चाहूल लागली, व ते एकदम सज्ज होऊन युद्धास आले.

त्या प्रसंगीं थोडा वेळ फारच निकराची तुंबळ लढाई झाली तींत पन्नास मावळे व पांचशें रजपूत ठार झाले. त्याचे वेळेस तानाजी व उदेभान यांची प्रत्यक्ष गांठ पडून दोघेहि हातघाईवर येऊन एकमेकांच्या वारांनी मरून पडले. तानाजी पडलेला पाहून मावळ्यांनीं पाठीमागें पाऊल घेतलें. इतक्यांत कांहीं मावळ्यांनीं धांवत जाऊन कल्याण दरवाजा उघडला. तेव्हां सूर्याजीचे लोक आंत आले. त्यांस. शेलारमामानें धीर देऊन रजपुतांवर सोडतांच त्यांनीं त्वेषानें पुढें घुसून त्यांची कत्तल आरंभिली. याप्रमाणें तानाजी पडला, परंतु गड काबीज झाला.

संकेतानुरूप सूर्याजीनें किल्ल्यावरील एका झोपड्यास आग लावून त्या उजेडानें किल्ला हातीं आल्याची इशारत शिवाजीस राजगडावर दिली. त्या खुणेनें शिवाजीस आनंद झाला. पण दुसरे दिवशीं तानाजीचा पराक्रम व त्याचा शोचनीय अंत यांची वार्ता कळल्यावर त्यास अत्यंत दुःख झालें. राजानें दहा दिवस डोईस मंदील काढून पांढरा पटका बांधला. तानाजीची ही कामगिरी शिवाजीच्या इतिहासांत अवर्णनीय होऊन गेली. तानाजीची समाधि, उदेभानाचें थडगें, तानाजीचा हात तुटलेली जागा, डोणागिरीचा कडा, वगैरे ठिकाणें सिंहगडावर पाहण्यासारखी आहेत. हल्लीं दरसाल सिंहगडावर तानाजीचा उत्सव होत असतो.

**तान्सा सरोवर**— मुंबई, ठाणें जिल्ह्यांत, हें एक कृत्रिम सरोवर आहे. तान्सा नदींत बंधारा बांधून हें सरोवर केलें आहे. बांधाची उंची ११८ फूट असून लांबी १½ मैल आहे. या बांधाला जवळजवळ, १॥ कोटी रुपये खर्च आला. मुंबईला पाण्याचा पुरवठा येथून होतो.

**ताप**—शरीराची एक रुग्णावस्था. या अवस्थेमध्यें नाडीचे ठोके जलद पडूं लागतात. शरीरांतील उष्णता वाढते. शरीराचे व्यापार बरोबर होत नाहींसे होतात. शक्ति क्षीण होते. आणि बहुधा शोष पडतो. ताप हा बहुधा दुसऱ्या एखाद्या रोगाच्या अनुषंगानें येतो. जेव्हां ताप हाच मुख्य रोग असतो तेव्हां त्याचे पुढीलप्रमाणें प्रकार करतां येतात.: १. सतत ज्वर—या तापामध्यें होणारीं लक्षणें एकसारखीं चालू राहून उतार पडेपर्यंत कमी होत नाहींत. साधा ताप, दोषी ताप, विषमज्वर, हीं याचीं उदाहरणें आहेत. २. थांबून थांबून येणारा ताप–यामध्यें वरील लक्षणें नियमित कालानें थांबून पुन्हां व्हावयास लागतात. ३. चढ-उताराचा ताप–यामध्यें वरील लक्षणें दररोज कांहीं वेळ कमी प्रमाणांत होतात. पीतज्वर, वगैरे उदाहरणें या प्रकारचीं होत. ४. उद्रेक ज्वर–हा ताप कांजिण्या, देवी, गोंवर, प्लेग, डेंग्यु, वगैरेमध्यें येतो.

**तापक**—(बॉयलर). कोणतीहि पातळ वस्तु तापविण्यासाठीं जें भांडें आपण घेतों त्याचें नांव बॉयलर किंवा तापक. हा तात्त्विक अर्थ झाला. पण रूढ अर्थानें वाफेचें एंजिन चालविण्यासाठीं ज्या बंद भांड्यांत पाणी तापवून वाफ कोंडली जाते तो बॉयलर. अगदीं प्रथम वाफेचीं एंजिनें निघालीं त्या वेळेस वाफेचा दाब प्रत्येक चौरस इंचास सरासरी ५ ते १० पौंड असे. वाफेचा दाब वाढवून त्या दाबाच्या प्रसरणशक्तीचा फायदा घेणें हें त्या वेळेस अवगत नव्हतें. परंतु कमी दाबाची वाफ उत्पन्न केली असतां जें जळण लागतें तें अधिक दाबाची वाफ उत्पन्न केली असतां दाबाच्या समप्रमाणांत वाढत नाहीं—

फार कमी प्रमाणांत वाढतें—असें आढळून आल्यामुळें बॉयलरमध्यें तयार होणाऱ्या वाफेचा दाब वाढत चालला. सर्वसाधारणपणें १५० ते २५० पौंडांपर्यंत दाबाची वाफ उत्पन्न करणारे बॉयलर असतात. तथापि यापेक्षांहि ५००, ७००, १२००, १५०० पासून ३००० पौंडांपर्यंत दाबाची वाफ उत्पन्न करणारे बॉयलरहि तयार होऊं लागले आहेत. ३००० पौंडांची वाफ तयार होत असतांना बुडबुडे वगैरे कांहींहि न येतां पाण्याची एकदम वाफ होत असते. अर्थात् त्याला उष्णता बरीच लागते. व बॉयलर तयार करण्याची योग्य अशी पद्धतिहि बदलावी लागते.

बॉयलरमध्यें उत्पन्न होणाऱ्या वाफेच्या दाबाच्या प्रमाणानुसार व ते जसे लहानमोठे हवे असतील त्या सोईप्रमाणें त्याचे दोन प्रकार आहेत: (१) उभा, व (२) आडवा. दर ताशीं अधिकांत अधिक ५०० ते १००० पौंड पाण्याची वाफ करावयाची असेल व त्याचा दाब १०० पौंडांहून अधिक नसेल अशा ठिकाणीं उभा बॉयलर वापरतात. बाकी इतर ठिकाणीं आडवा बॉयलर वापरतात. प्रत्येक बॉयलरमध्यें कांहीं तरीं उष्णतेनें पाणी तापविण्याची व्यवस्था असते. प्रथम जे बॉयलर निघाले त्यांत बाहेरील मोठ्या रुंद नळीवजा भांड्यामध्यें दुसरें अरुंद नळीवजा भांडें बसवलेलें असतें. या बारीक भांड्यांत जळण जाळण्याची व्यवस्था असतें. व या दोन भांड्यांच्यामधील जी मोकळी जागा राहते त्यांत, पाणी भरलेलें असतें. याच पद्धतीचें बॉयलर अद्यापहि बरेच प्रचारांत आहेत. लहानमोठा बॉयलर असेल त्याप्रमाणेंच मोठ्या नळीमध्यें एक किंवा एकाहून अधिक अशा नळ्या बसविलेल्या असतात. एका चुलयाच्या बॉयलरला

'कॉर्निश' व दोन चुल्यांच्या बॉयलरना 'लँकॅशायर' बॉयलर असें म्हणतात. जमिनीवर वापरण्यांत येणाऱ्या एंजिनमध्यें बहुधा दोनपेक्षां अधिक बॉयलर असत नाहींत.

जसजशीं मोठीं एंजिनें तयार होऊं लागलीं तसतशी अधिक वाफेचीहि जरूर लागूं लागली. साहजिकच कमी जागेंत अधिक वाफ करण्याची आवश्यकता वाटूं लागली. वाफ उत्पन्न करण्याची शक्ति उष्ण वायूशीं संलग्न होणाऱ्या पृष्ठभागावर अवलंबून असते. हा पृष्ठभाग जितका अधिक रुंद त्या प्रमाणांत वाफ होण्याची शक्ति वाढते. एका मोठ्या नळीऐवजीं बॉयलरमध्यें जर लहान लहान अनेक नळ्या घातल्या तर त्यांतून उष्ण वायु गेल्यामुळें हा पाण्याशीं संलग्न होणारा पृष्ठभाग बराच वाढेल व व त्यामानानें तेवढ्याच जागेंत अधिक वाफ उत्पन्न करतां येईल असें समजून आल्यावर हीच योजना पुढें अमलांत आणावी लागली. त्यामुळें एका मोठ्या नळीऐवजीं बॉयलरमध्यें अनेक नळ्या बसवून त्यांतून ज्वलनानें उत्पन्न झालेले वायू नेण्याची पद्धति सुरू झाली. अशा बॉयलरना म्हणजे ज्यांच्या नळ्यांतून जळलेले वायू जातात त्यांना 'फायर ट्यूब' बॉयलर असें म्हणतात. ही पद्धति सुरू केल्यामुळें जुन्या त्याच आकाराच्या बॉयलरमध्यें अधिक वाफ करतां येऊं लागली. अशा प्रकारचे बॉयलर विशेषेंकरून आगगाडीच्या एंजिनवर, तसेंच रोड रोलरसारख्या यंत्रामध्यें वगैरे आणि आगबोटींवर वापरले जातात. आगगाडीच्या एंजिनमध्यें वापरल्या जाणाऱ्या बॉयलरना 'लोकोमोटिव्ह' बॉयलर असें नांव आहे. याची लांबी फार असल्यामुळें चुल्यामधून निघणारे गरम वायू लहान लहान नळ्यांच्या एका तोंडांतून आंत जाऊन दुसऱ्या तोंडानें बाहेर पडून चिमणीवाटें निघून जातात. बोटीवर थोड्या जागेंत बराच समावेश करावयाचा असल्यानें तेथील बॉयलर लांबीला कमी असतात. परंतु रुंदीला बरेच असतात. त्यामध्यें जळण घालण्याचे एकापासून तीनपर्यंत चुले असतात. तसेंच जळलेल्या वायूंचा उपयोग चांगला व्हावा म्हणून नळ्यांची लांबी पुरेशी नसल्यामुळें चुल्यामधून जाणारे वायू खालच्या अर्ध्या नळ्यांतून मागेंपर्यंत जातात व तेथूनच मागें वळून वरच्या नळ्यांतून परत येऊन चिमणीवाटें निघून जातात. याचें मुख्य कारण जर नळीची लांबी पुरेशी नसेल तर आंतील वायू लवकरच निघून गेल्यामुळें पाणी तापवून वाफ तयार करण्याकडे त्यांचा उपयोग फारसा होत नाहीं व बोटीवर लांब बॉयलर घालणें शक्य नसल्यामुळें खालच्या अर्ध्या नळ्यांतून वायू अगदीं मागेंपर्यंत नेऊन वरील नळ्यांतून परत आणावे लागतात. अशा बॉयलरना 'स्कॉचें' बॉयलर किंवा 'मरीन' बॉयलर असेंहि म्हणतात. या बॉयलरमधून उत्पन्न होणारी वाफ साधारणपणें २५० पौंडांपर्यंत होते.

आतांपर्यंत ज्या बॉयलरचें वर्णन केलें त्यांमध्यें नळ्यांच्या आंतून जळलेले वायू जात असतात. परंतु नळ्यांतून पाणी जाऊन त्यांच्या बाहेरील बाजूनें जळलेले वायू जावेत अशा तऱ्हेचेहि बॉयलर असतात त्यांना 'वॉटर ट्यूब' बॉयलर असें म्हणतात. यामध्यें बहुधा एक किंवा एकाहून अधिक लांब ड्रम असतात. या ड्रमना जरूर त्या प्रमाणांत हा सर्व भाग एका सांगाड्यावर टांगलेला असतो. हा सांगाडा सर्व बाजूंनीं बंद अशा अग्निरोधक विटांनीं बंद केलेल्या खोलींत असतो. ही खोली तो सांगाडा (तीं चौकट) राहील इतकीच बांधलेली असते. जळलेले वायू या नळ्यांमधून दोन-चार ठिकाणीं वाकडेतिकडे होऊन जात असल्यामुळें उष्ण वायूंना काम करण्यास बराच पृष्ठभाग मिळतो व म्हणून जळणापासून उत्पन्न होणाऱ्या उष्णतेचा शक्य तितका उपयोग केला जातो. या बॉयलरमधून बसवलेल्या नळ्या तिरप्या बसविलेल्या असतात. नळ्या तापूं लागल्या कीं आंतील पाण्याची वाफ होते. स्वाभाविकपणेंच ही वाफ ड्रममध्यें वर जाते व आपल्याबरोबर बरेंच पाणीहि घेऊन जाते. हें मिश्रण ड्रममध्यें गेल्यावर त्यांतून वाफ निराळी होऊन ड्रमच्या वरील बाजूस जाते. पाण्याच्या सारख्या वाफ होण्याच्या क्रियेमुळें व पाणी आणि वाफ यांचें सारखें मिश्रण जात असल्यानें पाण्याला सारखी गति मिळत असते. ड्रममध्यें एका बाजूनें मिश्रण वर येत असतें व दुसऱ्या बाजूनें ही जागा भरून काढण्यासाठीं पाणी खालीं जात असतें. ही जी चक्राकार गति उत्पन्न होते त्यामुळें तापलेल्या नळ्यांच्या पृष्ठभागावर वारंवार नवें पाणी आल्यामुळें त्याचीहि वाफ जलद उत्पन्न होण्यास उपयोग होतो व त्यामुळेंहि जळणांतहि बचत होते.

या तऱ्हेचे बॉयलर १५० ते २०० अश्वशक्तीच्या एंजिनाला पुरेशी म्हणजे सुमारें ताशीं ४ ते ५ हजार पौंड वाफ उत्पन्न करण्यापासून पुढें लागेल तेवढी वाफ उत्पन्न करतील इतके मोठे तयार करतां येतात. आपल्याकडे टाटा आयर्न वर्क्समध्यें या जातीचा एकच बॉयलर २५,००० अश्वशक्तीची टर्बाइन चालविण्यास पुरेल इतकी वाफ उत्पन्न करील असा चालू आहे. अशा टर्बाइनला दर ताशीं दर अश्वशक्तीला ८ ते १० पौंड वाफ लागते.

सर्व तऱ्हेचे मोठे बॉयलर याच जातीचे असतात. कारण ते तयार करण्यास, बसविण्यास व दुरुस्त करण्यास सोपे असतात. यांचा वाफेचा दाबहि हवा तेवढा असूं शकतो. हे बॉयलर तयार करणाऱ्याच्या कल्पनेप्रमाणें ते बनविण्याची पद्धतिहि निरनिराळी असते. रचनापद्धतीवरून नांवें पडलेल्या बॉयलरपैकीं 'बॅकॉक', 'स्टर्लिंग', 'यारो' हे तीन प्रकार आहेत. यांपैकीं 'यारो' पद्धतीचे बॉयलर विशेषेंकरून आगबोटींवर चालतात. बोटींवरील

बॉयलरच्या वाफेचा दाब ४०० ते ४५० पौंडांहून अधिक असत नाहीं.

वर एके ठिकाणीं ३,००० पौंड दाबाची वाफ उत्पन्न करणाऱ्या बॉयलरचा जो उल्लेख केला आहे तसे बॉयलर अजून प्रचारांत कमी आहेत. या बॉयलरमध्यें एका ड्रमला एक नळीचें वेटोळें जोडलेलें असतें. हें वेटोळें चुल्यामध्यें बसविलेलें असतें. जळलेले वायू या चुल्यामधून बाहेर जात असतात. त्यासाठीं ३,००० पेक्षां अधिक दाब उत्पन्न करणाऱ्या या नळीच्या वेटोळ्यामधून पाणी जात असतें. वेटोळ्याच्या एका बाजूनें पाणी आंत शिरत असतें व दुसऱ्या बाजूनें त्याच पाण्याची वाफ होऊन ड्रममध्यें जात असते.

**तापन**— ( हीटिंग ). थंड देशामध्यें घरांत ऊब राहण्याकरितां उष्णता पुरविण्याची योजना करावी लागते. ही योजना नळ्यांतून गरम पाणी अथवा वाफ खेळवून करण्यांत येते. पाणी एका तापकांत ( बॉयलर ) तापविण्यांत येते. हा तापक ओतीव लोखंडाचा बनविलेला असतो व त्याचे भाग पाडलेले असतात. प्रत्येक भाग दुसऱ्या भागास खिळ्यांनीं जोडलेला असतो. त्यामुळें कोणताहि पुन्हां घालतां येतो. गरम पाण्याने अथवा वाफेनें उष्णता पुरविण्याच्या योजना निरनिराळ्या प्रकारच्या असतात. गरम पाणी २००° फा. उष्णतामानाचें अशी ऊब पुरविण्याच्या सोईचें असतें. घराच्या प्रवेशद्वाराशीं अशी मोठी नळी असली म्हणजे तिची ऊब घरांत पसरते. याप्रमाणेंच बसावयाची खोली, कांहीं शेजघरें, वगैरेस ऊब पुरविण्यांत येते. परंतु मोठ्या दिवाणखान्यांतील शेगड्या कायम ठेवून त्यांच्याभोंवतीं बसण्याची व्यवस्था केलेली असते व खिडक्यांस तेवढी उष्णता पुरविण्यांत येते.

मोठमोठ्या कारखान्यांत वाफेनें उष्णता पुरविण्यांत येते. ही वाफ बहुधां एंजिनमधून बाहेर पडणारीच वाफ नळ्यांतून खेळविलेली असते किंवा नळ्यांचीं वेटोळीं बसविण्यांत येऊन आरंभींच बसविलेल्या एका पंख्याच्या साहाय्यानें ती नळ्यांत घालविण्यांत येते. या पंख्याला मिळणारी हवा एका पडद्याच्या साहाय्यानें बंद अथवा सुरू करतां येते व पाहिजे तेव्हां कारखान्यांतीलच हवा त्यास पुरविण्यांत येते. वाफेचें थंड होऊन बनलेलें पाणी एका नळीवाटे बाहेर सोडण्यांत येतें. दर इंचास ८० ते ९० पौंड दाबाची हवा पुरविण्यांत येते.

जेव्हां एखादा दवाखाना, वगैरेमध्यें निरनिराळ्या दूरदूरच्या भागांस उष्णता पुरवावयाची असते त्या वेळीं एका मध्यवर्ती ठिकाणीं उष्णता उत्पन्न करण्याची योजना ठेवण्यांत येऊन तांब्याच्या नळींने वाफ ठिकठिकाणीं पुरविण्यांत येते. या नळीभोंवतीं एक पंचपात्राचें वेष्टण असतें. मोठमोठ्या शहरांमध्ये अशा तऱ्हेची मध्यवर्ती उष्णता देण्याची योजना केल्यास हवा शुद्ध राहते. मात्र याकरितां जळण वापरावयाचें तें चांगलें वापरावें. दगडी कोळसा असल्यास विधूम्र अथवा धूररहित केलेला कोक वापरण्यांत यावा. उघड्या शेगड्या वापरावयाच्या असल्यास त्या फार उंच नसून सखल असाव्या व त्यांच्या बाजू चांगल्या समपातळींत असाव्या.

**तापी नदी**—पश्चिम हिंदुस्थानांतील मोठ्या नद्यांपैकीं एक नदी. सूर्यानें स्वतःच्या उष्णतेपासून बचाव करण्यासाठीं ही नदी उत्पन्न केली, अशी समजूत आहे. मुल्ताईच्या पवित्र तलावांतून हिचा उगम आहे. खानदेशांत शिरल्यावर हिला वऱ्हाडमधून पूर्णा नदी मिळते. हिच्या कांठीं पुष्कळ तीर्थें आहेत. पूर्णा व तापी यांच्या संगमावर चांगदेव नांवाचें प्रसिद्ध पवित्र ठिकाण आहे. आणि सुरतेच्या वरच्या बाजूला बोधान या नांवाच्या तीर्थाचें ठिकाण आहे. सुरत शहर व थाळनेरचा किल्ला हीं या नदीच्या कांठची इतिहासप्रसिद्ध ठिकाणें आहेत.

**तांबट**— कासार पाहा.

**तांबडी पूड**—( रूझ ). लोहप्राणिद( फेरिक ऑक्साइड )चा एक प्रकार. हा लोहक्षार ( फेरिक हायड्रोक्साइड ) किंवा हवेंत लोहगंधक ( फेरस सल्फेट ) तापविलें म्हणजे मिळतो. रंग किंवा कांच तयार करण्यासाठीं ह्याचा उपयोग होतो. दागिन्यांना झिलई देण्यासाठीहि ह्याचा उपयोग होतो.

**तांबडी माती**— ( रेडल ). हा एक लोह पाषाणाचा प्रकार असून त्याचा तांबडा रंग देण्याच्या कामीं उपयोग करण्यांत येतो. मेंढ्यावर खूण करण्याच्या कामीं हा वापरतात.

**तावा काढून घेणें**—( डिसपझेशन ). स्थावर मिळकत, घर किंवा जमीन यांचा तावा मालकाखेरीज इतर इसमांना मिळण्याचे दोन प्रकार आहेत ते—( १ ) कायदेशीर तावा किंवा कबजा ; आणि ( २ ) गैर हक्की तावा किंवा कबजा. इमारतींतला भाडेकरी, किंवा जमिनीचा खंडकरी, कूळ याला मालकाकडून कायदेशीर तावा मिळालेला असतो ; म्हणून अशा भाडेकऱ्याला किंवा कुळाला कांहीं विशेष सवलती कायद्यानें दिलेल्या आहेत. हिंदुस्थानांत महायुद्धाच्या काळांत राहण्याच्या जागांची टंचाई झाल्यामुळें सरकारनें 'रेंट कंट्रोल ॲक्ट' हा कायदा करून भाड्याच्या दरावर नियंत्रण घातलें ; व शिवाय भाडेकऱ्याला काढून जागेचा तावा मिळवण्याचा मालकाचा हक्कहि फार मर्यादित केला. जमिनीच्या कुळांचा खंड व जमिनी या बाबींत 'टेनन्सी ॲक्टानें' कुळांना फार सवलती दिल्या आहेत. पण जर एखादा इसम दांडगाईनें गैरहक्कानें एखाद्या इमारतींत किंवा जमिनींत शिरून कवजा करील तर त्याच्याकडून

ताचा काढून घेण्याचा दावा (इजेक्टमेंट सूट) लावण्यांत कोणतीहि सवलत गैरहक्की कबजा करणाराला दिलेली नाहीं.

**तांबें**—हा महत्त्वाचा धातु फार प्राचीन काळापासून लोकांना माहीत आहे. ख्रि. पू. दोन हजार वर्षांपूर्वी तांब्याचीं उपकरणीं माणसें वापरूं लागले व पाषाणयुगांतून लोक बाहेर पडले म्हणून त्या काळास ताम्रयुग असें पुराणवास्तुशास्त्रज्ञ म्हणतात. या धातूचा रंग तांबूस, पिवळसर असून परमाणुभारांक ६३·६ आहे. सोनें, रुपें व प्लॅटिनम सोडल्यास या धातूइतका ताणला जाणारा व वाढणारा दुसरा धातु नाहीं व पोलादाखालोखाल हा लवचिक आहे. यांतून उष्णता व वीज जाऊं शकते. याला वेगळा वास व वाईट रुचि आहे. पाण्याचा याच्यावर कांहीं परिणाम होत नाहीं. पण हवेंत याच्यावर हिरवा गंज चढतो. हा शुद्ध व अशुद्ध अशा दोन्ही स्वरूपांत सांपडतो. बहुतेक युरोपांतील देशांत, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका, आणि अमेरिका या खंडांत आणि जपानांतहि तांबें सांपडतें. १९३३ सालीं जगांत १४,३०,००० टन तांबें निघालें. त्यापैकीं निम्मे अमेरिकेच्या सं. संस्थानांतील होतें. पूर्वी ग्रेट ब्रिटनमध्यें तांबें निघत असे, पण हल्लीं बंद आहे. तांब्याचा उपयोग भांड्यांसाठीं फार होतो.

**तांबे, भास्कर रामचंद्र** (१८७४–१९४१)—एक अर्वाचीन मराठी कवि. यांचा जन्म ग्वाल्हेर संस्थानांत मुगावली गांवीं झाला. भास्कररावांचें व झांशीच्या राणीचें माहेर घराणें एकच. यांचें शिक्षण काशीनाथपंत लेले नांवाच्या गुरूच्या नेतृत्वाखालीं झालें. काशीनाथपंतांनीं आपल्या शिष्याच्या ठिकाणीं असलेला काव्यांकुर . वाढीस लाविला. तांबे यांना महाविद्यालयीन शिक्षण मिळालें नाहीं, तरी त्यांनीं आपल्या व्यासंगानें व वाचनानें ती योग्यता मिळविण्यास कमी केलें नाहीं. त्यांचें संस्कृत व इंग्रजी या भाषांचें अध्ययन सखोल असून काव्याबरोबरच काव्यशास्त्राचीं मूलतत्त्वेंहि ते फार मार्मिकतेनें जाणत. त्यांचें मराठी, इंग्लिश व संस्कृत कवितांचें पाठांतर भरपूर असून त्यांच्या आवडत्या टेनिसनच्या कविता, तुकारामाचे अभंग, अथवा संस्कृत कवींचीं सुभाषितें त्यांच्या जिह्वाग्रीं सदैव नाचत. नोकरीनिमित्त भास्कररावांना ठिकठिकाणीं हिंडावें लागलें. तथापि शेवटीं ते ग्वाल्हेर मुक्कामीं कायमचे स्थिरस्थावर झाले. ग्वाल्हेर दरबारनें त्यांना 'साहित्यिक वृद्धवेतन' देऊन शिवाय त्यांना 'राजकवि' ही पदवीहि अर्पण केली. त्याचप्रमाणें देवासचे राजेसाहेब श्रीमंत खासेसाहेब पवार, यांनींहि त्यांना स्वतंत्र वृद्धवेतन दिलें. तांबे हे आजच्या युगाचे प्रमुख कवि असून अत्यंत लोकप्रिय होते. त्यांची कविता प्रतिभेंतून स्फुरलेली, उत्कट भावनेनें ओथंबलेली व झोंकदार कल्पनेनें नटलेली अशी असते. ती बहुतेक गेय असल्यानें आजकाल आबाल–वृद्धांच्या तोंडीं खेळत आहे.

त्यांच्या कवितेचा पहिला संग्रह प्रो. वा. गो. मायदेव यांनीं इ. स. १९२० मध्यें व दुसरा भाग श्री. दि. गं. केळकर यांनीं इ. स. १९२७ मध्यें संपादन केला. १९३६ सालीं प्रो. मा. त्रिं. पटवर्धन यांनीं श्री. तांबे यांची समग्र कविता संकलित करून तिची अधिकृत आवृत्ति संपादित केली. त्यांचीं कांहीं गाणीं ध्वनिमुद्रितहि झालीं आहेत. त्यांच्या कवितेंत राव, रंक, दलित, विधवा, स्त्रीजात, वगैरेसंबंधींचे उदात्त व स्फूर्तिप्रद उद्गार आढळून येतात.

१९३२ च्या डिसेंबरांत कोल्हापुरास भरलेल्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनप्रसंगीं श्री. तांबे कवि–संमेलनाचे अध्यक्ष होते. १९३४ मध्यें त्यांच्या वयास साठ वर्षें पुरीं झाल्यामुळें त्यांचा एकसष्टावा वाढ-दिवस सार्वजनिकपणें साजरा करण्यांत आला.

**तांबेरा**—[कुल–युरेडिनी. पुक्सिनिआ]. ही एक परोपजीवी बुरशी, वगैरेसारख्या वनस्पतींची मोठी जाति आहे. धान्यावर जो तांबेरा पडतो, तसेंच गूजबेरी, असरागम, वगैरेंच्या पिकांवर जो रोग पडतो तोहि याच जातीच्या एका वनस्पतीपासून (पी. ग्रॅमिनिस) उत्पन्न होतो व ती वनस्पति कांहीं काळ आपलें पोषण बर्बेरी (बर्बेरिस व्हल्गॅरिस) या वनस्पतीवर करते.

**तांबेरावर्ग**—(युरेडिनी). हा एक बुरशीच्या जातीचा वनस्पतींचा मोठा व महत्त्वाचा वर्ग आहे. यात २० जाती आणि १,५०० पोट जाती आढळतात. यास सामान्य व्यवहारांत गंज असें म्हणतात. सर्व उच्च जातीच्या झाडावर पोषण करणाऱ्या या परोपजीवी वनस्पती आहेत व त्यांपैकीं कांहीं धान्य व कॉफीचीं झाडें यांस उपद्रव देतात.

**तांबोळी**—हें धंदेवाचक जातिनाम असून त्याचा अर्थ विड्याचीं पानें विकणारा असा होतो. ही मुख्यतः पंजाबांतील जात आहे. तेथें हे हिंदू व मुसलमान असून, दिल्ली, कर्नाळ, अंबाला, सिमला, कांग्रा, लुधियाना, फिरोजपूर, लाहोर, रावळपिंडी व मुलतान हे जिल्हे आणि नहन व पतियाळा संस्थानें यांत आढळतात. हे मुख्यतः संयुक्त प्रांतांतून आलेले आहेत.

महाराष्ट्रांतील तांबोळी—ही जात मूळ महाराष्ट्रीय नसून गुजराथ–पंजाबमधून इकडे १००।१२५ वर्षांपूर्वी आली असें म्हणतात. यांची वस्ती बहुतेक जिल्ह्यांत आढळते. या जातींपैकीं कांहीं अद्याप गुजराथी भाषा बोलतात व गुजराथी पेहराव करतात. पण बहुतेकांनीं मराठी भाषा व चालीरीती उचलल्या आहेत. त्यांचा मुख्य धंदा खाण्याचीं पानें, अपटा, वगैरे पानें

विकणें होय. सातारा जिल्ह्यांत या जातीची वस्ती अडीच-तीन हजारांपर्यंत आहे.

लिंगायत तांबोळी—लिंगायत, मराठा व मुसलमान असे या जातीचे पोटभेद आहेत. दहा-बारा पिढ्यांपूर्वी हे कर्नाटकांतून येथें आले. लिंगायत तांबोळी मराठी भाषा बोलतात. बहुतेक तांबोळी गाई व म्हशी पाळतात. ते मद्यमांसाशन करीत नाहींत. विड्याचीं पानें, सुपाऱ्या, तंबाखू, वगैरे सामान विकतात. कित्येक तांबोळी शेती करतात. ते हिंदू देवतांची पूजा करितात, व सर्व हिंदू सण व उपास पाळतात. जंगम किंवा ब्राह्मण हे त्यांच्या धर्मकृत्यांस जरूर लागतात. मुसलमान व मराठा तांबोळी अलीकडे पानें विकण्याच्या धंद्यांत पुढें आल्यामुळें लिंगायत तांबोळी मागें पडले आहेत.

**ताब्रीझ**—इराणांतील अझरबैजन प्रांताची राजधानी. लोकसंख्या सुमारें २ लक्ष आहे. हरून-अल्-रशिद याच्या बायकोनें ८९१ सालीं हें शहर वसविलें असें सांगतात. पण त्यास पुरावा नसून त्याच्यापूर्वी कित्येक शतकें ताब्रीझ माहीत होतें. जवळच असणाऱ्या गरम खनिज पदार्थांच्या झऱ्यांवरून हें नांव पडलें आहे.

शहरांत प्रख्यात इमारती फार थोड्या आहेत. गझनखान (१२९५-१३०४) व जहानशहा (१४३७) यांनीं बांधलेल्या मोठ्या इमारती पडलेल्या आहेत. इराणांत उत्तम हवेचीं जीं शहरें आहेत त्यांपैकीं हें एक आहे. भूकंपानें या शहराचें पुष्कळ नुकसान झालें आहे. १८७८ पूर्वी येथें व्यापार चांगला चालत असे, पण कॉकेशसमध्यें रेल्वेरस्ता झाल्यानें व इतर कांहीं कारणांनीं या शहराचें व्यापारी महत्त्व कमी झालें. लो. सं. २,२०,०००.

**तामिळ भाषा व वाङ्मय**—तामिळ भाषा—मॅक्समुलरनें जगांतील एकंदर भाषांचे सेमेटिक, आर्य व तुराणी असे तीन मुख्य वर्ग पाडले आहेत. तुराणी वर्गांतील भाषा ऑस्ट्रेलियापासून फिनलंडपर्यंतच्या फार विस्तृत प्रदेशात पसरल्या असून या वर्गांतील सर्व भाषांमध्यें तामिळ हीच भाषा सर्वांत अधिक प्रगत असून तिच्यांत शुद्ध देश्य असें वाङ्मयहि पुष्कळ व उच्च प्रतीचें आहे. तामिळ या शब्दाचा अर्थ 'गोड' असा आहे आणि तेलगू भाषेइतकी मधुरता तामिळ भाषेंत नसली तरी तिला 'पूर्वेकडील इटालियन भाषा' म्हणतां येईल. "थोडक्या शब्दांत जोरदार अर्थ आणण्याच्या बाबतींत तामिळच्या वरचढ अशी जगांत दुसरी कोणतीहि भाषा बहुधा नसेल," असे रेव्हरंड. पी. पर्सीव्हल म्हणतो. तामिळ भाषा बोलणारे लोक पुलिकतपासून त्रिवेंद्रम्पर्यंतच्या व समुद्रकिनाऱ्यापासून पूर्वघाटापर्यंतच्या प्रदेशांत आहेत. शिवाय सिलोनमधील सुमारें निम्मे लोक तामिळ असून ब्रिटिश ब्रह्मदेश, मॉरिशस बेट, नाताळ व वेस्ट इंडिया बेटें, वगैरे मुलखांत तामिळ लोकांची वस्ती आहे. उत्तर सिलोनसह हिंदुस्थानांतील ५८ हजार चौरस मैल प्रदेश तामिळ भाषा बोलणाऱ्या लोकांनीं व्यापला आहे आणि तामिळ ही १ कोटी २० लक्ष लोकांची मातृभाषा आहे.

द्राविडी भाषावर्गांत तामिळ, तेलगू, कानडी, मल्याळम्, तुळू, गोंड व कु या भाषांचा समावेश होतो. द्राविडी भाषा मूळ एका निराळ्याच भाषेपासून झाल्या असल्या तरी संस्कृत शब्दांचें मिश्रण तामिळमध्यें शें. ४०, तेलगूमध्यें शें. ५० व मल्याळम् भाषेंत याहूनहि अधिक प्रमाणांत आहे व तत्त्वज्ञान, शास्त्र, धर्म व कला यांसंबंधीं पारिभाषिक शब्द संस्कृतमधील आहेत.

इरूल, कुरुंब आणि येरूकल अशा तामिळच्या तीन पोटभाषा आहेत. पैकीं पहिल्या दोन नीलगिरि पर्वतांतील जंगली लोक बोलतात, व शेवटची जिला कोर्ची किंवा कोरव असेंहि म्हणतात ती जिप्सी लोकांसारख्या भटक्या जाती बोलतात. माळसर हा तामिळचाच एक अपभ्रष्ट प्रकार असून ही भाषा अनमलइ पर्वतांतील उत्तरेकडील जंगली लोक बोलतात. मुख्य तामिळ भाषेंत शेन (उच्च) व कोडुम (खेडवळ) असे दोन प्रकार असून पहिली काव्यवाङ्मयांत व दुसरी सामान्य लोकांच्या बोलण्यांत रूढ आहे.

लिपि—तामिळ, तेलगू-कानडी व मल्याळम् अशा तीन द्राविडी लिपी आज प्रचारांत आहेत. त्या तिन्ही मूळ देवनागरी लिपीपासून निघाल्या आहेत असें मानतात. तेलगू-कानडी व तामिळ या दोन लिपींत बरेंच अंतर आहे व या दोन्ही लिपी देवनागरीहून फार भिन्न आहेत. प्राचीन तामिळ भाषेची वेत्तळुत्तु (म्ह. वाटोळीं अक्षरें) ही फार जुनी लिपि असून, आधुनिक तामिळ लिपि, ग्रंथलिपि व तिच्या पूर्वीची अशोककालीन जुनी ब्राह्मी लिपि यांपासून तयार झालेली आहे व कांहीं वर्ण जुन्या वेत्तळुत्तु लिपींतून घेतलेले आहेत. तथापि ही लिपि फार अपुरी आहे. तामिळ लिपींत बारा स्वर व अठरा व्यंजनें मिळून तीस वर्ण आहेत. स्वर भरपूर आहेत; पण व्यंजनें फारच कमी आहेत. पांच पांच वर्णांचे पुरे पांच वर्ग नाहींत; तर क वर्गांतील ख, ग, घ या तीन वर्णांचें काम एकट्या 'क' ला भागवावें लागतें व अशीच चवर्ग, टवर्ग, तवर्ग व पवर्ग यांबद्दल स्थिति आहे. क, च, ट, त, प या पांच वर्गांतील अनुनासिकें मात्र आहेत. पुढें य, र, ल, व हे चार वर्ण आहेत आणि श, ष, स, ह हे वर्ण नाहींत. 'ड' चें काम 'क' ला व 'स' चें 'च' ला करावें लागतें. याशिवाय न, र, ल, ळ अशांसारख्या उच्चाराचे चार वर्ण आहेत. तामिळ व्याकरणकार व्यंजनांचे कठोर, मृदु व मध्यम असे तीन वर्ग पाडतात. कठोर

व्यंजनापैकीं कोणतेंहि शब्दाच्या शेवटीं येत नाहीं. मृदूंपैकीं एक खेरीज कोणतेंहि आणि मध्यमापैकीं कोणतेंहि शब्दाच्या शेवटीं येऊं शकतें.

तामिळ वाङ्मय—तामिळ भाषा दक्षिण मद्रास इलाखा, उत्तर सिलोन व दक्षिण त्रावणकोर येथील सुमारें २ कोटि लोकांची मायबोली आहे. हिंदमधील अत्यंत प्राचीन भाषांपैकीं ही आहे. मराठीमधील शके ११०० च्या पूर्वीचें वाङ्मय उपलब्ध नाहीं. परंतु तामिळ भाषेतील चांगलें लिखित वाङ्मय इ. स. च्या प्रारंभापासूनचें उपलब्ध असून सर्वसामान्य जनतेच्या परिचयाचें आहे. मदुरेच्या पांड्य राजांच्या आश्रयानें तामिळ वाङ्मयांत प्राचीन काळीं तीन संघ (वाङ्मयपरंपरा) होऊन गेले, अशी सर्वत्र समजूत आहे. पहिला व दुसरा संघ मिळून अनेक शतकांपर्यंत वाङ्मयाचें संवर्धन करण्यांत आलें. उत्तरेकडील जनसमूह व त्याची संस्कृति दक्षिण भारतांत आणणारा महर्षि अगस्त्य हा पहिल्या संघाचा (म्हणजे वाङ्मय कालखंडाचा) प्रमुख कार्यकर्ता मानला जातो. तो व त्याचा शिष्य तोळकापियर यांनीं तामिळ भाषेचें पहिलें व्याकरण (याचें नांव तोळकापियम आहे) रचिलें व तें हल्लीं सबंध उपलब्ध आहे. तिसरा संघ इतिहासज्ञात कालांत अनेक पांड्य राजांच्या आश्रयानें अनेक शतकें चालू होता. पहिल्या दोन संघांत रचलेलें वाङ्मय (एका तोळकापियम या व्याकरणाशिवाय) हल्लीं मुळींच अवशिष्ट राहिलें नाहीं. पांड्यांच्या पहिल्या दोन राजधान्या समुद्रांत बुडून नामशेष झाल्या व त्यांच्याच बरोबर पहिल्या दोन संघांचें वाङ्मयहि नाहींसें झालें. तोळकापियम या व्याकरणांत शब्दरचना, वाक्यरचना व छंदःशास्त्र यांचा विचार केला आहे. त्यांतील एका भागामध्यें इ. स. च्या पहिल्या शतकांतील राजकीय, सामाजिक व धार्मिक माहितीचें अल्पस्वल्प दर्शन होतें. या व्याकरणावर केलेलीं तीन भाष्यें हल्लीं अस्तित्वांत आहेत.

इ. स. च्या पहिल्या ते पांचव्या शतकापर्यंत चालू असलेल्या तिसऱ्या संघकालांतील पुष्कळ काव्यबद्ध वाङ्मय उपलब्ध आहे. त्यांत एट्टुतोग (आठ रत्नमाला), पट्टुपाट्टु (दहा भावगीतें) व पदिनेंकिल कणक्कु (अठरा नीतिकाव्यें) हे ग्रंथ प्रमुख आहेत. पुरनानूर नांवाचा एक ४०० वीररसपूर्ण कवितांचा संग्रह आहे. त्यांत अनेक राजे, योद्धे व कवी यांचीं चरित्रें आहेत. यांत प्राचीन तामिळ लोकांचें शौर्य व प्रताप यांचें सुंदर वर्णन आहे व त्याविषयीं त्यांस फार आदर व अभिमान आहे. तसाच अहनानूरु नांवाचा १४५ कवींच्या ४०० प्रेमगीतांचा एक संग्रह आहे. हा संग्रह मदुरेच्या रुद्रशर्मन् नांवाच्या कवीनें गुंफला आहे. या आठ रत्नमाला मिळून एकंदर २,३०० कविता आहेत व त्यांत ५३० कवींचीं नांवें आलीं आहेत.

'दहा भावगीतें' या संग्रहापैकीं एकांत कार्तिकेयाचे अनेक अवतार व त्याचीं पूजास्थानें यांचें वर्णन आहे. दुसऱ्या एका गीतसंग्रहांत चोळ राजांच्या कावेरीपट्टण या बंदराचें चित्र रेखाटलें आहे. तिसऱ्या संग्रहांत कांचीचें राज्य व तेथील प्रसिद्ध राजा तोंडेमान यांचें विस्तृत वर्णन आहे. कपिलर या तृतीय संघाच्या प्रसिद्ध कवीनें कुरिंजीपाट्टू नांवाचें एक काव्य केलें आहे. त्यांत प्रेम आणि ग्रामीण जीवनाचें सुंदर भाषेंत वर्णन केलें आहे. दुसऱ्या शतकांतील प्रसिद्ध चोलराजा करिकल यानें स्वतःचें शौर्य व बुद्धिमत्ता व आपल्या राज्याची संपन्न स्थिति यांचें वर्णन एका काव्यसंग्रहांत केलें आहे. या संघाच्या तिसऱ्या काव्यसंग्रहांत नीतिधर्म यांचें विवरण आहे. या संग्रहाचें नांव पदिनेंकिल कणक्कु असें आहे. यांत अठरा काव्यसंग्रह आहेत. कर्णकिल राजाचें वर्णन, विद्येचें माहात्म्य, नीतिनियम, व्यवहार व आचार, इ. कांहीं काव्यांचे विषय आहेत. तिरुवल्लुवर याचा कुरळ नांवाचा काव्यसंग्रह तामिळ भाषेचें अमूल्य रत्न आहे. याचा कर्ता शूद्र होता. आपला मित्र सिंहलचा राजा एलल याला उपदेश करण्याच्या हेतूनें त्यानें हें काव्य केलें. या ग्रंथकर्त्याच्या स्तुतिपर तिरुवल्लुव माले नांवाचा एक ग्रंथ इसवी सनाच्या प्रारंभींच्या शतकांत झाला अशी समजूत आहे. या कुरळ ग्रंथांत १३३ अध्याय असून धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांचें मोहक व ठसठशीत भाषेंत विवरण केलें आहे. नळदियार हा ४०० श्लोकांचा ग्रंथ कुरळच्या खालोखाल महत्त्वाचा आहे. प्रत्येक श्लोकांत एक विचार संपूर्ण केला आहे. व त्यांत तामिळ जनतेच्या मनाचें स्पष्ट प्रतिबिंब आहे. यांत देव किंवा धर्म यांचा फारसा संबंध आला नाहीं. तृतीय संघांतील प्रमुख कवी नक्कीरार (दुसरें शतक), कपिलर व परनर हे होत. यांच्या जोडीला अव्वयर नांवाची कवयित्री पूज्य मानली जाते. तिचीं लहानलहान वचनें त्या काळच्या सर्व प्रसिद्ध कवींनीं आपल्या काव्यांत उद्धृत केलीं आहेत.

'शिलपधिकारम्' व 'मणिमेखले' हीं दोन काव्यें तामिळ पंचमहाकाव्यांत महत्त्वाचीं असून तीं सातव्या शतकापूर्वी रचिलीं आहेत. शिलपधिकारमचा कर्ता इलंगो हा चेर राजकुळांतील राजपुत्र होता. हें काव्य शोकान्त आहे. कोवलन नांवाचा वैश्य माधवी वेश्येच्या नादीं लागून भिकेस लागला. पण त्याची पत्नी कण्णकी हिनें पातिव्रत्य अढळ ठेवलें. तो पत्नीसह मदुरेस आला. तेथें पांड्य राणीचें नूपुर चोरल्याचा त्याच्यावर आळ येऊन त्याला सुळावर दिलें. कण्णकी सती जाऊन स्वर्गास गेली. तिच्या पातिव्रत्याचें स्मारक म्हणून राजानें तिचें देऊळ बांधलें. राजा व राणी अनुतापानें मरण पावले, व मदुरा शहर भस्मसात् झालें.

या महाकाव्यांत वाङ्मय, संगीत व नाट्य यांचा उच्च आविर्भाव झाला आहे. हें महाकाव्य स्वामिनाथ अय्यर यांनीं संशोधन करून उत्कृष्ट प्रकारें छापलें आहे. याच्याच जोडीचें मणिमेखले काव्य समकालीन कूलवाणिगन यानें रचिलें. त्यांत माधवी वेश्येचें व तिची सकलकलासंपन्न मुलगी मणिमेखला हिचें चरित्र वर्णिलें आहे. संघकालीन काव्यांत उल्लेख असलेले पांड्य, चोल व चेर राजे तिसऱ्या शतकाच्या प्रारंभीं राज्य करीत होते. यानंतर तीन ते पांच या शतकांत उल्लेखनीय वाङ्मय निर्माण झालें नाहीं.

सहाव्या शतकाच्या अखेरीस पाड्य राज्य प्रबळ व सुस्थिर होऊन पुढें तीनशें वर्षें टिकलें. या वेळीं शैव व वैष्णव संतांनीं प्रचलित जैन व बौद्ध तत्त्वज्ञानावर हल्ले चढविले. अय्यर व ज्ञानसंबंदर हे शैव संत सातव्या शतकांत जिवमान होते. सुंदर नायनार हे नवव्या शतकांत होऊन गेले. या तिघांनीं मिळून तेवारम् नांवाचा ग्रंथसंग्रह तयार केला. माणिक वाचक यांनीं नवव्या शतकांत 'तिरुवाचकम्' काव्य केलें. सर्व प्रसिद्ध शिवमंदिरांत अजून याचा पाठ चालू आहे. या तीन संतांचा तेवारम् स्तोत्रसंग्रह अजून सर्व शैव मंदिरांत प्रमाणभूत मानला जातो. नंबी (इ. ९७५–१०३५) यानें हीं स्तोत्रें ७ भागांत विभागून व्यवस्थित केलीं. सेकिलर (१२ वें शतक) हा मोठा कवि व भक्त होता. यानें ४,२०० श्लोकांचें शिवपुराण रचलें.

आळवार नांवाचे बारा वैष्णव आचार्य तामिळ देशांत होऊन गेले. त्यांनीं 'दिव्य प्रबंध' नांवाचा एक भक्तिकाव्याचा संग्रह तयार केला. शैवधर्मग्रंथ 'तिरुमुराई' याच्याच बरोबरीनें या वैष्णव काव्याचा प्रसार बाराव्या शतकापासून करण्यांत आला. पहिले तीन वैष्णव आचार्य पल्लवांच्या राज्यांत सहाव्या शतकापूर्वी होऊन गेले. नम्माळवार हा या बारा आचार्यांमध्यें फार मोठा पुरुष होऊन गेला. त्यानें भक्तिमार्गावर चार काव्यप्रबंध लिहिले. त्यांपैकीं एकामधें एक हजार श्लोक असून त्यांत नारायणाचीं अनेक रूपें व गुण यांचें उत्कृष्ट वर्णन आहे. पेरी आळवार यानें श्रीकृष्णावर सुंदर काव्य लिहिलें आहे. त्याची मुलगी साध्वी आंदाल हिनें 'नाचिआर तिरुमोली' नांवाचें मोठें काव्य केलें आहे. त्यांतील गीतें अजूनसुद्धां वैष्णवांच्या विवाहविधींत म्हणण्यांत येतात.

तंजावरचें चोल घराणें १० व्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत भरभराटींत होतें. त्या काळांत शेकिलारचें 'पेरिय पुराण' आणि कंबरचें रामायण रचण्यांत आलें. तामिळ वाङ्मयाचें अत्युच्च स्वरूप या रामायणांत दिसून येतें. कंबरनें आपल्या कालास अनुसरून वाल्मीकीच्या रामचरित्रांत पुष्कळ फेरफार केले आहेत. तसेंच नम्माळवारच्या स्तुतिपर एक शतक कंबरनें लिहिलें आहे. पुगलेंदी कवीनें ४०० अतिसुंदर श्लोकांत नलचरित्र वर्णिलें आहे.

या वेळींच व्याकरण, कोश व अलंकार यांवरहि पुष्कळ ग्रंथरचना झाली. अमृतसागरची 'याप्यारंगलवृत्ति' व गुणसागराच्या 'याप्यारंगल कारिका' यांत छंदःशास्त्रावर विस्तृत विवेचन आहे (दहावें शतक). 'दंडीअलंकारम्' या ग्रंथांत काव्यालंकारांचें विवेचन केलें आहे. जैन ग्रंथकार पवनंदी मुनिवर याचा 'नन्नूल' हा व्याकरणग्रंथ सुगम व स्पष्ट आहे. या ग्रंथाची योग्यता 'तोळकापियम्'च्या खालोखाल मानण्यांत येते. मेकंदर (तेराव्या शतकाचा आरंभ) यानें 'शिवज्ञानबोधम्' या आपल्या प्रसिद्ध ग्रंथांत तामिळ शिवोपासनेच्या सिद्धांतांची पद्धतशीर मांडणी केली. या ग्रंथांत न्याय, भक्ति व योग यांचा मिलाफ आहे. मेकंदरचा शिष्य अरुळनंदी शिवाचार्य यानें 'शिवज्ञानसिद्धि' हा ग्रंथ लिहिला. हा तामिळ शैवसंप्रदायाचा सर्वमान्य ग्रंथ आहे. अरुळनंदीचा शिष्य मरेज्ञानसंबंद व त्याचा शिष्य उमापति शिवाचार्य. शैवसिद्धान्ताच्या मूलभूत ग्रंथांपैकीं बराच भाग उमापतीनें लिहिला आहे. याच काळांत व्याकरण, धर्मशास्त्र व नीतिशास्त्र यांवर अनेक ग्रंथ झाले.

याच कालखंडांत संतकवि तायूमाननस्वामी यांचीं मधुर ब्रह्मज्ञानमय पद्यें, राजपुत्र अतिवीरराम पांड्य याचे नैषध, कूर्मपुराण व काशीखंड हे ग्रंथ; अरुणगिरिनाथ (इ. स. १४००) याचीं सुंदर सुब्रह्मण्य-स्तुति-गीतें; राजनाथ डिंडिमाचा साळुवाभ्युदय, विल्लीपुट्टुर याचें महाभारत, इत्यादि वाङ्मय निर्माण झालें. स्कंदपुराणकर्ता काश्यप शिवाचार्य, अष्ट-प्रबंधकर्ता पिलेंपुरुमाल व संतकवि तायूमानवर हेहि याच काळांतील होत. तायूमानवरचीं पद्यें अजूनसुद्धां लोक प्रेमानें गात असतात.

जैनांनीं तामिळ वाङ्मयांत मोठी कामगिरी केली आहे. तामिळ पंचमहाकाव्यांतील सर्वोत्कृष्ट काव्य म्हणजे 'जीवकचिंतामणि' हें जैन कवि तिरुतक्क देवर यानें केलें आहे. त्यानें संस्कृत काव्याची घडण व वृत्तें तामिळमध्यें आणलीं. चूडामणि, नीलकेशी, कुंडलकेशी, वगैरे पांच लघुकाव्यें हीं जैन कवींचींच आहेत.

सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत पोर्तुगीजांचें भारतांत आगमन झाल्यापासून तामिळ वाङ्मयाच्या अर्वाचीन युगास प्रारंभ झाला. रॉबर्ट डी नोबिली हा दक्षिण हिंदमध्यें १६०६ ते १६५६ पर्यंत राहिला. त्यानें तत्त्वबोधकस्वामी हें नांव घेऊन 'आत्मनिर्णय', 'सत्यवेदलक्षण', 'येशू-चरित्र', वगैरे गद्य ग्रंथ तामिळमध्यें लिहिले. एक तामिळ-पोर्तुगीज

कोशहि केला. त्याच्याहूनहि जास्त प्रसिद्ध असलेला फादर कॉन्स्टान्शियस बेसची हा इ. १७३० ते १७४७ पर्यंत तामिळ मुलखांत राहिला. त्यानें तामिळ भाषेचें अति खोल ज्ञान मिळविलें. वीरमहामुनि हें नांव घेऊन त्यानें गद्यामध्यें अनेक नीतिबोधक ग्रंथ लिहिले. पाश्चात्य व्याकरणग्रंथाच्या वळणावर इ. १७३७ मध्यें दोन व्याकरणग्रंथहि लिहिले. यानें आपल्या काव्य-ग्रंथांत जुनें काव्याचें तंत्र संपूर्णपणें सांभाळलें असून सुद्धां रचना, विषय आणि घडण यांत अनेक नवीन प्रकार आणले आहेत.

मिशनरी लोकांनीं इ. स. १८५१ मध्यें पहिलें तामिळ पत्र सुरू केलें. सुधारलेल्या हिंदु धर्माचा प्रसार करण्याच्या हेतूनें 'विवेक-विळक्कम्' हें पत्र १८६५ मध्यें सुरू करण्यांत आलें. स्त्रियांकरितां पहिलें मासिक 'अमृतवचनी' या नांवानें प्रसिद्ध झालें. 'स्वदेशमित्र' हें पत्र राजकीय व सामाजिक विषयप्रतिपादन करण्याकरितां इ. स. १८७० मध्यें सुरू करण्यांत आलें व तें अजून उत्तम रीतीनें चाललें आहे.

तामिळ नाटकें गेल्या ५०-६० वर्षांत पुष्कळ लिहिलीं गेलीं आहेत. सुंदरपिलेचें 'मनोन्मनीयम्'; लक्ष्मण पिलेचें शेक्स्पियरच्या सिंबेलाइनची प्रतिकृति 'सत्यवती'; सूर्यनारायण-शास्त्रींचीं 'रूपवती' व 'कलावती'; सरसलोचनचें 'ट्वियरची सरसांगी'; संबंद मुदलियारचीं अनेक पौराणिक व विनोदी नाटकें हीं उल्लेखनीय आहेत.

राष्ट्रप्रेमी कवि सुब्रह्मण्यभारती यांचीं 'स्वदेशगीतें' स्वदेशाभिमानानें रसरसलेलीं आहेत.

तांडवराय मुदलियार हे पहिले अर्वाचीन तामिळ गद्य लेखक होत. जाफनाचे अरुमुग नवलर यांनीं शुद्ध, सोपे व सुंदर गद्य लिहिण्याचा नमुना घालून दिला. राजम् आयरची 'कमलांबा'; माधवय्याची 'पद्मावती'; वेदनायकं पिलेची 'सुगुण सुंदरी'; सरवण पिलेची 'मोहनांगी' या कादंबऱ्या लोकप्रिय आहेत.

मदुरा हें तामिळ वाङ्मयाचें आदिपीठ, पांड्य व चोल राजे हे आश्रयदाते, तोळ्कंपियर हा पाणिनि, अगस्त्य हा मुख्य ऋषि, तिरुवल्लुवर हा उपनिषत्कार, आणि कंबर हा वाल्मीकि आहे, असें थोडक्यांत सांगतां यईल.

अर्वाचीन तामिळ वाङ्मयाचे तीन भाग पडतात: १८६० पासून १९१६ पर्यंत तामिळ वाङ्मय अर्धसुप्त अवस्थेंत होतें. या कालखंडांत जाफनाच्या अरुमुग नवलर यांनीं रामायण, भारत, इ. सोप्या गद्यांत लिहिलीं. वेदनारायण पिले यांनीं 'प्रताप मुदलियार चरित्र' ही पहिली नवलकथा लिहिली. या काळांतील सर्वोच्च लेखक म्हणजे सुब्रह्मण्य भारती. हे कवि, गद्य-लेखक व भाषांतरकर्ते होते. त्यांनीं तामिळ समाजास निर्भयता सत्य व प्रगति यांचा उपदेश आपल्या 'निर्भयता' या काव्यांत केला आहे. 'द्रौपदीशपथ' या आपल्या काव्यांत त्यांची उज्ज्वल प्रतिमा भित्र्या माणसासहि धाडसी वीर बनविण्यास समर्थ झाली आहे. कृष्णस्वामी शर्मा, चिदंबर पिले, सुब्रह्मण्य पिले (शैवसंतचरित्रें), स्वामी वेदाचलम्, श्रीनिवास अय्यंगार, स्वामिनाथ अय्यर हे या काळांतील प्रमुख लेखक होते. रामलिंग हे सध्यांचे प्रमुख कवि आहेत. त्यांनीं पंचम जॉर्जचें उत्तम चित्र काढलें म्हणून त्यांस दिल्ली दरबारांत पदक मिळालें पण गांधींच्या सत्याग्रहासंबंधींच्या कवितेमुळें तुरुंगांत जावें लागलें. हे गांधींचे अनन्य भक्त आहेत. यांच्या कवनांतील भाग तोंडानें गात शेंकडों लोकांनीं लाठीमार व संगिनीचे हल्ले यांस तोंड दिलें आहे.

गांधीजी, नेहरू, रवींद्रनाथ यांचे पुष्कळ ग्रंथ उत्कृष्ट तामिळ-मध्यें प्रसिद्ध झाले आहेत. तामिळ लोक नाटकाचे फार भोक्ते आहेत. या नाटकांत संवादापेक्षां संगीतच जास्त असतें. संबंद मुदलियार यांनीं शेक्स्पियरच्या अनेक नाटकांचीं भाषांतरें व शेंकडों स्वतंत्र नाटकें लिहिलीं आहेत. माधवय्या, सूर्यनारायण, सुंदरम् पिले, नटेश अय्यर, वगैरे अनेक उत्तम नाटककार होऊन गेले. कादंबऱ्याहि फार लोकप्रिय आहेत. बहुतेक साप्ताहिकांत चालू कादंबऱ्या येतात. रंगराजू, दुरईस्वामी अय्यंगार, कोते नायगी यांच्या कादंबऱ्या स्वभावचित्रणांत फार उच्च दर्जाच्या आहेत. लघुकथांचें लेखनहि अलीकडे मुबलक होत आहे. सर्व मासिकांतून या दरमहा प्रसिद्ध होतात. त्यांत बहुजनसमाजाविषयीं प्रेम व सहानुभूति व्यक्त होते. दैनिकांपैकीं 'दिनसरी' व 'दिनमणि' हीं पत्रें पुष्कळ वाङ्मयविषयक मजकूर छापतात. 'कल्की' हें साप्ताहिक अतिशय लोकप्रिय आहे. राजकीय पुढारी श्री. राजगोपालाचारी व ने. ना. श्रीनिवास शास्त्री यांनींहि तामिळ भाषेची संपत्ति वाढविली आहे.

**ताम्रपट**—सर्व धातूंमध्यें तांबें ह्या धातूचाच हिंदुस्थानांत लिहिण्याकडे सर्वांत अधिक उपयोग केला जात असे. भांड्यावर मालकाचें नांव खोदविण्याची रीत तर प्राचीन आहेच, पण मंदिर, मठ व ब्राह्मण किंवा साधू ह्यांना गांव, शेतें, विहिरी, दान केल्याच्या सनदा तांब्याच्या पत्र्यावर खोदवून देण्याची वहिवाटहि प्राचीन काळीं सर्वसामान्य होती असें दिसतें. ह्या सनदांना ताम्रपत्र, ताम्रशासन किंवा शासनपत्र म्हणत असत. ताम्रपटावर लिहिण्याचा प्रचार आज बराच कमी झाला आहे. तरी तो अद्याप अगदींच बंद मात्र पडला नाहीं. कधीं कधीं राजाज्ञांकरितां (सोहगौराचे ताम्रलेख—ए. सो. बंगा. प्रेसिडिंग्ज, इ. स. १८९४, आकृतिपट १), स्तूप, मठ, वगैरे बांधविले जाण्यासंबंधींच्या लेखांकरितां (तक्षशिलेचा ताम्रपट—ए. इं. पु. ४, पा. ५५–५६) व जैनांच्या व ब्राह्मणांच्या यंत्रतंत्राकरितांहि

(उदाहरणार्थ, अजमीरच्या संभवनाथाच्या श्वेतांबरीय जैन मंदिरांतील वीसस्थानक यंत्र) ताम्रपटांचाच उपयोग केलेला दृष्टीस पडतो. हे ताम्रपट त्रिकोणाकृति, चतुष्कोणाकृति किंवा वर्तुळाकार असून वाटेल तेवढ्या लहानमोठ्या आकाराचे असतात. उत्तर हिंदुस्थानांत सांपडणारीं दानपत्रें बहुधा एक किंवा दोन पानांवरच खोदविलेलीं असतात; परंतु दक्षिणेंतील दानपत्रें यांहून अधिक पानांचीं असून लेडन युनिव्हर्सिटीच्या पदार्थसंग्रहालयांत ठेविलेल्या राजेंद्र चोल राजाच्या एका दानपत्रांत तर २१ पत्रें आहेत. (डॉ.बर्जेस-संपादित तामिळ अँड संस्कृत इन्स्क्रिप्शन्स, पानें २०६-१४). एकाहून अधिक पानांच्या दानपत्रांत पहिलें व शेवटचें पान फक्त एका म्हणजे आंतल्या बाजूनेंच लिहिलेलें असतें. हीं दानपत्रांचीं पानें प्रत्येक पानास एक किंवा दोन भोंकें पाडून व त्यांतून कड्या घालून एका ठिकाणीं अडकविलेलीं असतात. ह्या कड्यांच्या सांध्यावर किंवा दानपत्रांतील पानावर राजमुद्रा ठोकून त्या झाळून बसविण्यांत येत. असल्या ताम्रपटांवर केवळ दानपत्रे व शासनपत्रेंच नव्हे, तर सबंध ग्रंथचे ग्रंथहि लिहून ठेविल्याचीं उदाहरणें हिंदुस्थानांत पाहावयास मिळतात. मद्रास इलाख्यांत त्रिपति येथें तांब्याच्या पत्र्यांवर कोरविलेलीं तेलगू पुस्तकें (बर्नेल; सा. इं. पॅ. पा. ८६) सांपडलीं आहेत. ह्यूएनत्संगच्या लिहिण्यावरून असें समजतें कीं, काश्मीर येथें भरलेल्या बौद्ध संगीतीनें तयार केलेल्या उपदेशशास्त्र, विनयविभाषाशास्त्र व अभिधर्मविभाषाशास्त्र नांवाच्या लक्ष लक्ष श्लोकांच्या टीका कनिष्क राजानें ताम्रपटांवर खोदवून ते एका दगडाच्या पेटींत ठेवून तिजवर स्तूप बांधविला होता (बील; बु. रे. वे. व. पु. १ पा. १५५; ह्यूएनत्संगच्या हिंदुस्थानांतील प्रवासावर टॉमस वॉटर्सनें लिहिलेलें पुस्तक, भाग १, पान २७१). असेंहि म्हणतात कीं, सायणानें केलेलें वेदांवरील भाष्यहि ताम्रपटांवरच खोदून ठेविलें होतें (मॅक्समुल्लरसंपादित, ऋग्वेद पु. १ पा. १७).

मराठी ताम्रपट—मराठी भाषेंतले ताम्रपट पुढीलप्रमाणें उपलब्ध आहेत. शके ९८२ मध्यें कोरलेला एक पूर्णपणें मराठी भाषेंत लिहिलेला ताम्रपट डॉ. मो. गं. दीक्षित यांस श्रीवर्धनजवळील दिवे आगर या गांवीं मिळाला. त्यांत या गांवांतील ब्राह्मणांमध्यें झालेली देवाण-घेवाण उल्लेखिली आहे. यानंतर कालदृष्ट्या शके १००१ चा भोरसंग्रहांतील चालुक्य खंम ह्याचा ताम्रपट दिसून येतो. यांत "सर्व वाई वाहे, सूर्य तपे वरिल पुइल तेल (ला) दि कारुक देणें" अशीं मराठी वाक्यें आहेत. यापुढचा ताम्रपट शके ११२४ चा आहे. हा डॉ. दीक्षित यांस दापोलीजवळ मिळाला. यांत दिनले, दद्दले, गैलि (घेईल), लिखियले अशीं क्रियापदांचीं रूपें दिसतात. हा ताम्रपट जैत्र सांवत नांवाच्या मांडलिक राजाच्या कारकीर्दींतला आहे. यांत पोफळीच्या अग्रहाराचा व्यवहार उल्लेखिला आहे. श्री. ग. ह. खरे यांनी संपादिलेल्या शके ११७२ च्या तासगांव ताम्रपटांत दानविषयक मजकूर आहे. कशेळी ताम्रपटाच्या शेवटीं शके १२०१ मधील पुरवणींत "उतकटीतं कोंतापुरींचेन वज्जन सोनारें" असे शब्द आहेत.

**ताम्रपर्णी**—मद्रास, तिनेवेल्ली जिल्ह्यांत ही एक नदी आहे. हिचा बृहत्संहितेंत उल्लेख आहे. ही पश्चिम घाटांत अगस्त्यमलए नांवाच्या शिखराजवळून निघाली आहे. पुढें कांहीं अंतरावर पापनाशनम् नांवाचें तीर्थ असून वनतीर्थाजवळ हिचा एक धबधबा आहे. ही मानारच्या आखातास मिळते. या नदीस बंधारे असून त्यांपैकीं मरुदुर नांवाच्या बंधाऱ्यामुळें ३०,००० एकर जमिनीला पाणी पुरविलें जातें. बाकीच्या सहा बंधाऱ्यांच्या योगानें ७१,००० एकर जमिनीस पाणी मिळतें. या नदीचें खोरें अत्यंत सुपीक आहे.

**ताम्रपर्पटी**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधककज्जली, ताम्रभस्म हीं मुख्य औषधें आहेत. हातापायाला झटके येणें, अजीबात भूक न लागणें, यकृत् व पान्थरी वाढणें, पुष्कळ दिवसांचा जीर्णज्वर असणें व त्यानंतर अतिसार होणें, पायाला व तोंडाला सूज येणें, इत्यादि विकारांवर अतिशय उपयोगी आहे. $\frac{1}{2}$ ते $\frac{1}{2}$ गुंज आल्याचा रस, मध, किंवा आर्द्रकावलेह यांत देतात.

**ताम्रभस्म**—एक आयुर्वेदीय औषध. पान्थरी, यकृत् यांची वृद्धि झाली असतांना या औषधाचा चांगला उपयोग होतो. पुष्कळ दिवसांचा शूळ, अपचन, अग्निमांद्य, इत्यादि आंतड्यांच्या रोगांवर हें औषध हमखास गुण देणारें आहे. पांडुरोग, श्वास, खोकला, उदर, हातापायाला सूज, इत्यादि विकारांवर हें चांगलें औषध आहे. $\frac{1}{2}$ ते १ गुंज मध, पिंपळी, आल्याचा रस, किंवा आर्द्रकावलेह यांत देतात.

**ताम्रलिप्ति**—या प्राचीन शहराचा महाभारतांत (भीष्म पर्वांत) आणि बृहत्संहितेंत (१०·१४) उल्लेख आहे. अशोकाच्या साम्राज्याची ताम्रलिप्ति ही पूर्वेकडील सीमा होय. हें 'तमलुक' नांवानें प्रसिद्ध आहे. हें हल्लीं गंगेच्या मुखाजवळचें बंदर आहे. बंगाल इलाख्यांतील मिदनापूर जिल्ह्यांत समुद्रापासून ३० कोसांवर हें शहर आहे. येथें चिनी प्रवासी फाहिआन यानें दोन वर्षें राहून संस्कृतचा अभ्यास केला होता.

**तारक तुंबी**—(लाइफ-बॉय). बुचाचें किंवा पोलादी पत्र्याचें मध्यें पोकळ खण ठेवलेलें एक चाक असतें त्यास म्हणतात. त्याच्याभोंवतीं दोऱ्या बांधलेल्या असतात त्या धरून एकाच वेळीं अनेक लोकांस तरंगत राहतां येतें. आंत बूच भर-

लेली कॅन्व्हसची वाटोळी पिशवी साधारणपणें ३० इंच व्यासाची असते. ही गळयांतून घालून खाकेंत वरतात. दुसऱ्या प्रकारची तुंची जाकिटासारखी अंगांत वसते.

**तारक नौका**—(लाइफ-बोट). जहाज बुडाल्यास जीव वांचविण्यासाठीं या नौका ठेवलेल्या असतात. अशी पहिली नौका ग्रेट ब्रिटनमध्यें १७८५ मध्यें निघाली. नंतर हींत बऱ्याच सुधारणा झाल्या. आतां उपडी होण्याची हिला भीति नसून वाटेल तितकें ओझेंहि मावतें. तसेंच आंत शिरणारें पाणीहि बाहेर काढण्याची हींत व्यवस्था असतें.

**तारकासुर**—एक असुर. फक्त सात दिवसांच्या मुलाकडून मृत्यु येईल, असा याला वर होता. याच्यापासून अतिशय उपद्रव झाला असतां कार्तिकेयाचा अवतार झाला, व त्यानें सातव्याच दिवशीं यास मारिलें (मत्स्यपुराण, अ. १४७-१५९).

**तारकेश्वर**—बंगाल इलाखा, हुगळी जिल्हा, श्रीरामपूर पोस्टविभागांत हें खेडें आहे. तेथें असलेल्या शिवाच्या देवालयामुळेंच हें खेडें फार प्रसिद्ध आहे. या देवालयाच्या नांवानें पुष्कळशी जमीन आहे. शिवरात्रीच्या दिवशीं येथें यात्रा भरते. यात्रेला हजारों लोक जमतात. दुसरी मोठी यात्रा चैत्र संक्रांतीच्या दिवशीं भरते. येथें मागें मोठा सत्याग्रह होऊन महंत व लोकांचे प्रतिनिधी यांमध्यें देवस्थानाच्या व्यवस्थेसंबंधीं करार झाला.

**तारणपत्र**—(लेटर ऑफ क्रेडिट). हें तारणपत्र म्हणजे एका बँकेला आपल्या खातेदारांच्या पतीविषयीं केलेली शिफारस होय. लेटर ऑफ क्रेडिटचा खरा उपयोग जर विशेष कोठें होत असेल तर देशाच्या परदेशी व्यापारासंबंधीं होय. येथील व्यापाऱ्यांना इतर देशांतील व्यापाऱ्यांची पूर्ण माहिती नसते. तेव्हां येथून त्यांनीं पाठविलेला माल ते स्वीकारतील किंवा नाहीं व स्वीकारल्यास त्याचे पैसे योग्य वेळीं देतील किंवा नाहीं अशी शंका वाटत असते. अशा वेळेला ते व्यापारी त्या परदेशी व्यापाऱ्यांना बँकेमार्फत असें तारणपत्र पाठविण्याची विनंति करतात. व तीस अनुसरून परदेशांतील बँक येथील व्यापाऱ्यांच्या बँकेला असें कळवितें कीं, तेथील व्यापाऱ्यांनीं परदेशांतील व्यापाऱ्यांवर काढलेल्या ह्या मालासंबंधींच्या हुंड्या अमुक रकमेपर्यंत आम्ही स्वीकारूं व योग्य त्या वेळीं त्याचे पैसे देऊं. अशा प्रकारचें तारणपत्र येथील व्यापाऱ्यांच्या बँकेंत आलें म्हणजे व्यापारी त्यांनीं परदेशी व्यापाऱ्यांवर काढलेल्या हुंड्या आपल्या बँकेकडून वटवून घेतात. अशा प्रकारें व्यापाऱ्याला आपल्या मालाची किंमत मिळून त्यासंबंधींची काळजी राहत नाहीं. त्यानंतर त्या मालाची सर्व जबाबदारी या बँका घेत असतात. असें तारणपत्र देण्यापूर्वी बँका त्याच्याइतकी रक्कम किंवा खातेदाराच्या पतीप्रमाणें कमी रक्कम ठेव म्हणून खातेदाराकडून ठेवून घेतात. त्याचप्रमाणें ज्या हुंड्या आपणांवर लिहिल्या जातील त्या व त्यांचे पैसे योग्य त्या वेळीं आपण भरूं, असें बँकेला खातेदारानें लिहून द्यावें लागतें.

परदेशी व्यापाराशिवाय तारणपत्राचा उपयोग ज्या लोकांना विशेष लांबलांबचे प्रवास करावयाचे असतात त्यांना होत असतो. असे लोक आपल्या बँकेजवळून तिनें आपल्या शाखांना व इतर प्रतिनिधींना लिहिलेलें एक विनंतिपत्रक घेतात. या पत्रावर निरनिराळ्या शाखांच्या माहितीसाठीं तें घेणाराच्या नमुन्याची सही घेतलेली असते. असें पत्र घेणाऱ्याला त्या पत्रांत नमूद केलेल्या कोणत्याहि शाखेकडे किंवा प्रतिनिधींकडे त्यांना हें पत्र दाखविलें असतां त्यांनीं आपल्या बँकेवर लिहिलेले चेक वटवून घेतां येतात. अशी सवलत देतांना बँका त्यावर थोडासा आकार करीत असतात.

सु. वि. भा. ३-१८

**तारा**—१. बृहस्पतीच्या दोन स्त्रियांतील दुसरी. हिला चंद्रापासून बुध हा झाला व या व्यभिचारासाठीं दिलेल्या शापानें चंद्रास क्षय लागला अशी पौराणिक कथा आहे.

२. सुषेण वानराची कन्या व वालीची पत्नी. हिचा पुत्र अंगद. वालीच्या मृत्यूनंतर त्याचा धाकटा भाऊ सुग्रीव याची ही पत्नी झाली.

३. सूर्यवंशीय हरिश्चंद्र राजाची पत्नी. हिला तारामती असेंहि नांव असून हिला रोहिदास नामक पुत्र होता. विश्वामित्राची दक्षिणा पुरी करण्यासाठीं हरिश्चंद्रानें हिला काशींत एकाला विकलें. तेथें हिच्यावर पोरें खाणारी डाकीण असा आरोप, हिचा मुलगा रोहिदास हा सर्पदंशानें मृत्यु पावला असतां, आला व हिचा वध राजाज्ञेनें करण्यास डोंबाचें काम करणारा हरिश्चंद्र सिद्ध झाला. तेव्हां त्या वेळीं इंद्रानें रोहिदासास जिवंत केलें व हिला स्वर्गलाभ झाला.

प्रातःस्मरणांतील पंचकन्यांमध्यें जी तारा आहे ती ही असावी.

**तारानाथ**—एक तिबेटी, लामा. यानें स. १६०८ मध्यें हिंदुस्थानांतील बौद्ध धर्माचा इतिहास लिहिला आहे. त्यांत अनेक महत्त्वाच्या गोष्टींचा निर्देश सांपडतो. वारेन्द्राधिपति देवपाल व शर्मपाल यांच्या वेळीं धीमन् व त्याचा मुलगा विठपाल हे उत्तम शिल्पकलाभिज्ञ, चित्रकार व ओतारी असल्याची माहिती यानें दिली आहे.

**तारापूर**—मध्यप्रांत, रायगड संस्थानांत ३७ गांवांची ही जमीनदारी आहे. क्षेत्रफळ ९,६९४ एकर. लोकसंख्या सु. दहा हजार. जमीनदार रायगड संस्थानिकाचा नातलग असून त्यास ठाकूर ही पदवी आहे.

**तारापूर (चिंचणी)**—मुंबई, ठाणें जिल्हा, माहीम व डाहाणू तालुक्यांत हीं दोन खेडीं आहेत. या दोन खेड्यांच्या मध्यें खाडी आहे. यांपैकीं तारापूर हें बंदर असून चिंचणी हें फार जुनें गांव आहे.

तारापुरास एक सरकारी व एक पारशांची शाळा आहे. येथें एक पारशांचें देऊळ व स्मशानभूमि आहे. देऊळ १८२० च्या सुमारास विकाजी मेहेरजीनें बांधलें. इ. स. १२८० च्या सुमारास माहीमचा अधिकारी भीम यानें तारापूर जिंकलें. स. १५३५ त पोर्तुगीजांनीं हें गांव जाळून टाकलें.

तारापूर हें ठिकाण लष्करीदृष्ट्या पूर्वी महत्त्वाचें मानलें जात असे. यांत पारशी व वाणी सावकार फार आहेत. येथें पूर्वी फार मोठा व्यापार चालत असे.

तारापूरचा किल्ला—तारापूरच्या खाडीच्या दक्षिण तीरावर माहीमच्या उत्तरेस १५ मैलांवर तारापूर गांव असून तेथें १५९३ त पोर्तुगीजांनीं भुइकोट किल्ला बांधला. क्षेत्रफळ ५०० चौ. फूट. तटाची उंची ३० फूट व जाडी १० फूट व वर शिवाय ४ फूट पडदी आहे. भरतीचें पाणी तटाला येऊन भिडतें. तीन बाजूंस खंदक होता. १५५६ मध्यें पोर्तुगीज अमलाखालीं हें भरभराटीचें ठिकाण होतें. १५५९ मध्यें यावर हबशांनीं हल्ला केला, पण तो पोर्तुगीजांनीं मोडून काढला. १५८२ मध्यें मोंगलांनीं तारापूर घेण्याचा प्रयत्न केला तो फुकट गेला. १७३९ त हा किल्ला चिमणाजी अप्पानें घेतला. त्या वेळीं बाजी भीमराव हा लढाईंत पडला. पेशव्यांनीं हा किल्ला विकाजी मेहेरजी नांवाच्या मनुष्यास १०० वर्षांच्या मुदतीनें इनाम दिला होता. १८०३ त हा इंग्रजांनीं घेतला.

**ताराबाई** (१६७५–१७६१)—एक मोठी शूर व कर्तबगार राणी. छत्रपति राजारामाची दुसरी बायको. सेनापति हंबीरराव मोहिते याची मुलगी. हिचें लग्न स. १६८९ च्या सुमारास झालें. हिचें सासरचें नांव सीताबाई पण तें लोपून माहेरच्या ताराबाई याच नांवानें ही प्रसिद्धीस आली. हिला विशाळगडीं स. १६९१ त शिवाजी या नांवाचा पुत्र झाला. पुढें राजाराम मरण पावला. त्या वेळीं शिवाजी दहा वर्षांचा होता. तेव्हां त्याला रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी नारायण सचिव, धनाजी जाधव सेनापति यांच्या मदतीनें गादीवर बसवून ताराबाईनें राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं व राजसबाई (सवत) व तिचा मुलगा संभाजी या दोघांस कैदेंत टाकलें. त्यामुळें गृहकलह वाढला; व त्याचा परिणाम होऊन सरदारांत फाटाफूट झाली.

हिनें परशुराम त्रिंबकास प्रतिनिधि करून त्याच्याकडे सर्व किल्ल्यांच्या बंदोबस्ताचें काम सोपवून दिलें, व स्वतः कोणत्याहि किल्ल्यांत न राहतां वेळ पडेल त्याप्रमाणें जागा बदलण्याचें ठरविलें. याच वेळीं जाधव, निंबाळकर, भोंसले, दाभाडे, चव्हाण, वगैरे सरदारांनीं मोंगलांच्या मुलुखांत शिरून सर्व ठिकाणांहून चौथाई, सरदेशमुखी व घासदाणा या नांवाखालीं पैसा गोळा करण्याचा क्रम आरंभला (१७००).

औरंगजेबाच्या मरणानंतर अझीमशहानें शाहूची सुटका केली. व तो स्वदेशीं परत यावयास निघाला. त्यानें ताराबाईस आपण येत असल्याचें कळविलें. परंतु ताराबाईनें आपल्या मुलास गादीवर बसविलें व शाहूशीं विरोध सुरू केला. परसोजी भोंसले, हैबतराव निंबाळकर व नेमाजी शिंदे, वगैरे सरदार शाहूस मिळाले. ताराबाईनें आपल्या हातची सत्ता सोडली नाहीं. उलट ती शाहूस तोतया म्हणूं लागली. तिनें रामचंद्रपंत, धनाजी, परशुराम त्रिंबक, आंग्रे यांच्याजवळून स्वामिभक्तीची शपथ घेववून शाहूस तोंड देण्याचें ठरविलें. धनाजी, खंडो बल्लाळ व परशुराम त्रिंबक यांची शाहूवर रवानगी झाली. परंतु शाहूनें धनाजी व खंडो बल्लाळ यांस आपल्याकडे वळवून घेतलें. पुण्याच्या उत्तरेस बावीस मैलांवर खेड-कडूस येथें दोन्ही पक्षांची चकमक झाली. परशुराम त्रिंबक पराभव पावला व साताऱ्यास गेला (स. १७०८). पुढें धनाजीच्या मदतीनें शाहूनें किल्ले घेतले. साताऱ्यास जाऊन स्वतःस राज्याभिषेक करून घेतला (१७०८). तेव्हां ताराबाई साताऱ्याहून पन्हाळ्याकडे पळून गेली. शाहूनें तोहि किल्ला घेतला. तेव्हां ती मालवणास गेली. शाहूनें बरेच किल्ले व मुलूख घेतले, त्यामुळें तिचा पक्ष निर्माल्यवत् झाला (स. १७१२).

पुढें पन्हाळ्याच्या किल्लेदारानें तो किल्ला हिच्या स्वाधीन केला. हिनें वाडीकर सावंताच्या मदतीनें आणखी कांहीं किल्ले परत घेतले. पन्हाळा व कोल्हापूर हीं दोन राहण्याचीं ठिकाणें कायम केलीं. या वेळीं हिच्या पक्षानें जोर धरला होता. धनाजीच्या मरणानंतर चंद्रसेन जाधव ताराबाईला मिळाला. थोरात, चव्हाण, अमात्य, निंबाळकर, प्रतिनिधि, पांढरे, ही सर्व मंडळी हिच्या पक्षाकडे होती. परंतु पुढें परत हिची सर्वच बाजू एकदम ढांसळली. शाहूनें सैन्य जमवून हीस तोंड दिलें. व हिच्याकडील कांहीं सरदारांस फितविलें. हिचा मुलगा शिवाजी यास तर वेडा ठरविलें. इतक्यांत स. १७१२ त हिचा तो मुलगा देवीनें मरण पावला. त्यामुळें कोल्हापुरास चरीच क्रांति झाली. रामचंद्रपंतानें हिच्या सवतीच्या मुलास—संभाजीस—गादीवर बसवून हिला व हिच्या सुनेला कैदेंत टाकलें.

शाहूनें आपल्यास मुलगा नसल्यानें दत्तक घेण्याचें ठरविलें. ही बातमी ताराबाईस कळली. तेव्हां 'तें दत्तविधान मी होऊं देणार नाहीं' असें ही म्हणूं लागली. पुढें आपला नातू (शिवाजीचा मुलगा) रामराजा हा जिवंत आहे त्यालाच दत्तक

घ्या म्हणून हिनें शाहूस आग्रह केला. तेव्हां शाहूनें तें कबूल केलें. व शाहूच्या मृत्यूनंतर पेशव्यानें रामराजास गादीवर बसविलें.

रामराजा गादीवर आल्यावर आपण सर्व कारभार करावा असें तिला वाटत होतें. पण तसें घडलें नाहीं. म्हणून रामराजा हा माझा नातू नव्हेच असें तिनें चोहोंकडे पसरविलें. पण या कामीं तिला फारसें यश आलें नाहीं.

पुढें ही भलतीं कारस्थानें करूं लागली. रामराजा गादीवर असतांना हिनें कारस्थानांचा कळसच केला. त्यास हिनें शेवटीं कैद केलें. तो शेवटपर्यंत म्हणजे हिच्या मरणापर्यंत कैदेंतच होता. ही स. १७६१ च्या डिसेंबर महिन्यांत मरण पावली. त्या वेळीं हिचें वय ८६ वर्षांचें होतें. हिच्या चरित्राकडे अद्यापि योग्य दृष्टीनें पाहिलें जात नाहीं. नवऱ्याच्या मागें औरंगजेबाला तोंड देण्याचें कार्य हिनें अधिकच तडफेनें पार पाडलें. मोंगली मुलुखावर हल्ले चढवून मराठ्यांचा आर्थिक प्रश्न सोडविण्याचें काम हिच्याच कारकीर्दींत सुरू झालें. मराठेशाहींतील अव्वल दर्जाच्या मुत्सद्यांची जूट हिनें शेवटपर्यंत टिकविली होती. आणि पराक्रमांत हिनें केव्हांच हार खाल्ली नाहीं. पण औरंगजेब मेल्यावर शाहूला स्वराज्याची सनद देऊन सोडण्यांत आल्यामुळें चार पिढ्या खर्ची घालून वाढविलेलें स्वातंत्र्याचें रोपटें दुहीच्या किडीनें जमीनदोस्त झालें. या वेळीं मराठ्यांचें साम्राज्य नष्ट होऊन दिल्लीच्या मांडलिकांचें राज्य सुरू झालें. या दृष्टीनें हिच्या व हिच्या भोंवतालच्या थोर पुरुषांच्या वर्तनाकडे पाहिलें असतां त्यांत हीनतेपेक्षां उज्ज्वलताच परिणामकारक रीतीनें दिसते. हिचें कांहींच चालेना म्हणून हिनें शेवटीं शाहू व पेशवे यांच्यावर राज्यहिताच्या दृष्टीनें विश्वास ठेविला होता (पे. द. ३०, २२७).

**तारामत्स्य**— चक्रमत्स्य. हें नांव सामान्यतः कंटकिततनु वर्गांतील सर्व प्राण्यांस लावण्यांत येतें. हे सर्व उष्ण प्रदेशांतील व युरोपांतील समुद्रात आढळतात. यांचा आकार ताऱ्याप्रमाणें किंवा चाकाप्रमाणें असतो. मधोमध तोंड असतें व तेथून एकेक नळी एकेका हाताकडे किंवा आऱ्याकडे गेलेली असते. आऱ्याच्या टोंकास एक स्पर्शेंद्रिय असतें. या माशाच्या अंगावर कांटे असतात. हा रेचकछिद्रांतून पाणी शरीरांत ओढून घेतो व तें नळ्यांवाटे सर्वत्र पसरतें. हा प्राणी मोठमोठे काल्व, शिंप, वगैरे प्राणी मारून खातो. या माशांत नर व मादी वेगळीं असतात व मादी जीं अंडीं घालते त्यांची वाढ पाण्यांतच होते.

**तारायंत्र**—एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं विजेच्या प्रवाहाच्या साहाय्यानें संदेश नेणाऱ्या यंत्रास तारायंत्र म्हणतात. यामध्यें विद्युत्प्रवाहामुळें उत्पन्न होणाऱ्यां विद्युच्चुंबकीय क्रियेचा उपयोग केलेला असतो. या पद्धतीला एक संदेशप्रेषक, एक विद्युद्वाहक तार, आणि एक संदेशग्राहक यंत्र एवढी सामुग्री लागते. प्रत्येक तारायंत्राच्या कचेरींत एक विद्युद्घटमाला, एक घटमाला तारेस जोडणारी चावी, संदेश पाठविण्याकरितां एक डोळ्यांनीं पाहण्याचें सुईचें यंत्र किंवा आवाज ऐकण्याचें यंत्र असतें. संदेश पाठवितांना एका यंत्राच्या साहाय्यानें विजेचा प्रवाह तोडण्यांत किंवा चालू करण्यांत येतो. त्याप्रमाणें ग्राहक यंत्रांत सुई फिरते किंवा ठोके ऐकूं येतात. या ठोक्यांवरून अक्षरें बसविलेलीं असून त्यां त्या अक्षरांप्रमाणें ठोके देण्यांत येतात किंवा ऐकूं येतात. तारायंत्राच्या विद्युद्घटमालेमध्यें डॅनिएल घट वापरण्यांत येतात. किंवा द्विक्रमित किंवा लाकलाच याचे घट वापरतात. मोठ्या कचेऱ्यांतून संचायकांतून विजेचा पुरवठा करण्यात येतो.

साध्या तारायंत्राची रचना

ग्राहकयंत्रें सुईचीं किंवा ठोक्यांचीं असतात. कांहीं ठिकाणीं व्हीटस्टोनचीं तबकडीचीं यंत्रें वापरतात. यांच्या साहाय्यानें एका मुळाक्षरांच्या तबकडीवर अक्षरें दाखविलीं जातात. मॉर्सनें एका कागदाच्या पट्टीवर अक्षरें उठविलीं जातील (टिंबें व रेघ यांच्या आकृतींत) अशी योजना केलेली असते.

सुईचें यंत्र—व्हीटस्टोनच्या सुईच्या पद्धतींत विद्युद्दर्शकाचा (गॅल्व्हानोस्कोप) उपयोग केलेला असतो. यामध्यें मध्यभागीं एक सुई असून तिच्या दोन्ही बाजूंस तारेचे गुंडे असतात त्यांतून विजेचा प्रवाह एकदां या दिशेनें तर पुन्हां उलट दिशेनें पाठवितां येतो. व त्याप्रमाणें ती सुई डाव्या किंवा उजव्या बाजूकडे वळते. डाव्या बाजूनें टिंब व उजव्या बाजूनें रेघ दर्शविली जाते व. याप्रमाणें टिंबें व रेघा यांच्या साहाय्यानें अक्षरांचे संदेश पाठवितां किंवा घेतां येतात. अशा प्रकारचीं यंत्रें रेल्वेमध्यें वापरण्यांत येतात,

मॉर्सचें ध्वनियंत्र—या यंत्रामध्यें एक विद्युच्चुंबक असतो व एक नरम लोखंडाचें चक्रवलय (आर्मेचर) असतें व त्याला एक तोलदांडा जोडलेला असून तो एका ठिकाणीं पक्का केलेला असतो आणि त्याच्या दुसऱ्या टोंकाच्या खालीं व वर अशा दोन खुंट्या असतात त्यांत तो वर-खालीं होऊं शकतो. पण सामान्यतः खालच्या खुंटीवर स्थिर असतो. जेव्हां विद्युच्चुंबकांतून विजेचा प्रवाह सुरू होतो तेव्हां हा दांडा वर उचलून वरच्या खुंटीवर आपटतो व प्रवाह बंद झाला म्हणजे खालच्या खुंटीवर येऊन बसतो. याप्रमाणें वरच्या खुंटीवर आपटल्यानें ठोके पडतात व ते ज्या कमीजास्त अंतरानें पडत असतात त्या मानानें टिंबें किंवा रेघा मांडून अक्षरें दाखविण्यांत येतात. हें यंत्र सुईच्या यंत्रापेक्षां सोपें असून यास उलटसुलट प्रवाह लागत नाहीं. पण यास विद्युत्प्रवाह जरा जोराचा लागतो.

पूरक— वर वर्णन केलेल्या पद्धतीनें फार दूरवरच्या अन्तरावर या विद्युद्घटमालेच्या साहाय्यानें संदेश पाठवितां येत नाहीं. कारण जसजशी तारेची लांबी वाढत जाते तसतसा तीमधील विद्युद्रोध वाढत जातो व विद्युत्प्रवाहहि गळतीमुळें क्षीण होत जातो. याकरितां अशा दूरच्या विद्युच्चक्रामध्यें संदेशग्राहक यंत्राच्याऐवजीं मधून मधून पूरक (रीले) यंत्रें बसविण्यांत येतात. या पूरक यंत्रांमध्यें संदेशप्रेषक यंत्राकडून क्रिया सुरू होतांच एक विद्युद्घटमाला व ध्वनिकारक यंत्राच्या साहाय्यानें एक नवीन विद्युच्चक्र निर्माण होतें व त्यामुळें मूळ प्रवाहास अधिक शक्ति मिळते.

तारा— एका स्थळापासून दुसऱ्या स्थळीं विद्युत्प्रवाह नेण्याकरितां सामान्यतः लोखंड किंवा तांब्याच्या तारा उपयोगांत आणण्यांत येतात. या खांबांवर बसविण्यांत येऊन ते चिनीमातीच्या पेल्यांच्या साहाय्यानें विद्युद्रोधक बनविण्यांत आलेले असतात. हे खांब साधारण ७० ते ८० यार्ड अंतरावर असतात. तार सामान्यतः लोखंडाची असून तिचा व्यास $\frac{१७}{१००}$ इंच असतो.

समुद्राखालून तारा घालणें—जमिनीवर तारांचे खांब रोवून तारा घालण्यापेक्षां समुद्राच्या पोटांतून तारायंत्राच्या तारा घालणें ही अगदीं भिन्न बाब आहे. तसेंच दूर अंतरावर संदेश पाठविण्याकरितां साधें तारायंत्राचें यंत्रहि उपयोगी पडत नाहीं. कारण त्यामुळें विलंब फार लागतो. कारण साध्या यंत्रानें फार तर दूर अंतरावर दर मिनिटास एक शब्द पाठवितां येतो. यासाठीं असे संदेश पाठविण्याकरितां केल्व्हिनचा दर्पण विद्युन्मापक (मिरर गॅल्व्हानोमीटर) आणि वक्रनलिकालेखक (सायफन रेकॉर्डर) वापरण्यांत येतो.

**तारायंत्री झाड**—हें हिंदुस्थानांत आढळतें. याला जांभळसर (व्हायोलेट) फुलें येतात. याचीं पानें तारा करणाऱ्या मनुष्याच्या चोटांप्रमाणें हालतात म्हणून यास तारायंत्री झाड म्हणतात.

**तारायुग्म**—किंवा जोड तारा. दोन तारे एकमेकांच्या इतके जवळ असतात कीं ते नुसत्या डोळ्यांनीं एकच दिसतात; पण दुर्बिणींतून पाहिल्यास निराळे दिसतात. यांपैकीं एक दुसऱ्याभोंवतीं फिरतांना दिसतो. पण वास्तविक हे दोन्ही एकाच गुरुत्वकेंद्राभोंवतीं फिरत असतात.

**तारिम**— ही नदी चिनी तुर्कस्तानांत काराकोरम पर्वतांत यार्कंद या नांवानें उगम पावून लोपनोर सरोवराला मिळते. तिची लांबी १,२०० मैल आहे. अगदीं प्राचीन संस्कृतीचा उगम या प्रदेशांत झाला.

**तारे**— आकाशांत असंख्य तेजोगोल आहेत. कांहीं संशोधक म्हणतात कीं, त्यांचें तेज कधींच गेलें आहे. ते फार दूर असल्यानें स्थिर दिसतात, पण त्यांना सूर्याप्रमाणें कांहीं गति असली पाहिजे व सूर्याप्रमाणेंच त्यांना ग्रहचंद्रांची मालाहि असेल. नुसत्या डोळ्यांनीं सुमारें सहा हजार तारे आकाशांत दिसतात. पण दुर्बिणी आणि फोटो-यंत्रें यांच्या योगानें लाखों तारे दिसूं लागतात. मोठाले तारे आणि तारापुंज ओळखतां यावे म्हणून ज्योतिष्यांनीं आकाशाचे काल्पनिक विभाग पाडले आहेत. ताऱ्यांच्या तेजावरून त्यांच्या प्रती केल्या आहेत. पहिल्या सहा-सात प्रतींपलीकडील तारे नुसत्या डोळ्यांनीं दिसत नाहींत. त्यांना दुर्बिणी तारे म्हणतात. ताऱ्यांचे आकार सांगतां येत नाहींत, पण तेजावरून अनुमान काढतात. व्याध (सिरिअस) हा अत्यंत तेजस्वी तारा जो प्रकाश देतो तो सूर्याच्या प्रकाशापेक्षां ६३$\frac{३}{४}$ पट जास्त असावा.

पृथ्वीपासून ताऱ्यांचें अंतर अतिशय मोठें आहे. अगदीं जवळचा तारा म्हणजे अ-नरतुरंग (दक्षिण गोलार्धांतील एक जोड तारा) होय. त्याचा प्रकाश पृथ्वीवर पोंचण्यास ३$\frac{३}{४}$ वर्षें लागतात. एका घुमटांत तारे ठेवलेले असून तो घुमट आपल्याभोंवतीं फिरतो आहे असें जें आपणांस वाटतें त्याचें कारण पृथ्वीची दैनंदिन गति होय. सूर्यचंद्रहि असेच दिसतात. कांहीं तारे प्रकाशविकारी आहेत. म्हणजे त्यांचा प्रकाश कमीजास्त होत असतो. ताऱ्यांना रंग आहेत. तांबडा, पिवळा, निळा आणि हिरवा हे त्यांचे रंग ओळखूं येतात. यावरून त्यांच्यांतील घटकद्रव्यें निरनिराळीं असावींत असें अनुमान निघतें. सूर्याच्या बारा राशी व चंद्राच्या मार्गांतील सत्तावीस नक्षत्रें यांखेरीज तारागण आहेतच. सप्तर्षि, ध्रुवमत्स्य, शर्मिष्ठा हे उत्तरध्रुवाकडील आणि वृहल्लुब्धक, अगस्ति, यमुना, नौका, दक्षिणमत्स्य, नरतुरंग, स्वस्तिक, इ. दक्षिण ध्रुवाकडील तारे आहेत.

तान्यांच्या पृष्ठभागांचें उष्णतामान १५००° शत. ते २३,०००° शत. या मर्यादेंत असतें, असें आतां सिद्ध झालें आहे.

**तारेचें वेटोळें**— ( सोलेनॉइड ). चुंबकीय क्षेत्र निर्माण करण्याकरितां एका पंचपात्राकृति तारेच्या वेटोळयांतून विजेचा प्रवाह पाठविण्यांत येतो. या साधनास विद्युत्तारवलय म्हणतात. या क्षेत्रांतील बहुतांश शक्तिरेषा अक्षाशीं समांतर रेषांमध्यें या तारवलयांतून जातात. या साधनाचें कार्य साध्या लोहचुंबकाप्रमाणेंच होत असतें.

**तातेर लोक**—तातार पहा.

**ताल**— गीत, वाद्य व नृत्य यांच्या क्रियेच्या गतीचें नियमित प्रमाण ज्याच्या योगानें दाखविलें जातें त्यास ताल म्हणतात. तालास लागणाऱ्या विशेष महत्त्वाच्या गोष्टीस प्राण म्हणतात. हे प्राण दहा आहेत : काल, मार्ग, क्रिया, अंग, ग्रह, जाति, कला, लय, यति व प्रस्तार. तालाच्या ठेक्याचे बोल असतात. तालाचा मुख्य हेतु गीताला कालमर्यादा लावण्याचा असतो. कोणत्या गीतास कोणता ताल लावावा हें गीताचा विषय, त्यांतील अक्षरें, रचना, इ. वर अवलंबून असतें. दक्षिणेंतील तालपद्धति वेगळी आहे. त्यांत मुख्य ताल सात असून प्रत्येक तालाच्या पांच जाती आहेत.

मात्रा, आघात व लय हीं तालाचीं मुख्य तीन तत्त्वें आहेत. विवक्षित अवकाशाला मात्रा म्हणतात. हें कालाचें एक परिमाण आहे. आघात म्हणजे ठोका किंवा टाळी, व लय म्हणजे तालांतील प्रत्येक मात्रा सारख्या प्रमाणांत असण्याची क्रिया. निरनिराळ्या तालांत निरनिराळी मात्रासंख्या असते व निरनिराळ्या मात्रांवर आघात असतात. इंग्रजी 'र्‍हिदम'ला ताल हा प्रतिशब्द वापरतात, पण र्‍हिदमचा आघात समांतर कालानें नियमित पडतो तर तालाचे आघात कमी-अधिक मात्रांच्या अवकाशानें पडतात.

**तालमुद**—यहुदी लोकांचा धर्मग्रंथ. ख्रिस्ती शकाच्या चौथ्या शतकापासून तों सहाव्या शतकापर्यंतच्या यहुदी लोकांच्या धार्मिक व सामाजिक चळवळींचा वृत्तांत यांत आलेला आढळतो. जुन्या कराराइतकीच याचीहि योग्यता यहुदी लोक मानतात. तालमुद याचा अर्थ अध्ययन, अध्यापन असा आहे. त्यामध्यें मिश्नाह म्हणजे जुन्या करारामधील कायद्यांची धार्मिक व व्यावहारिक प्रश्नांच्या निर्णयांसह सुधारून वाढवलेली आवृत्ति ; आणि जेमारांत धर्मव्यवहारविषयक जादा साहित्यांचा अंतर्भाव होतो. तालमुदच्या दोन प्रती प्रसिद्ध आहेत. एक बाबिलोनी प्रत व दुसरी पॅलेस्टिनी प्रत. तालमुदमध्यें निरनिराळ्या प्रकारचे भानगडीचे प्रश्न व तद्विषयक निर्णय यांची खिचडी आहे. विषयाची मांडणी अव्यवस्थित, आध्यात्मिक विषयावरून एकदम ऐहिक विषयावर व ऐहिक विषयावरून अध्यात्मावर उडी मारण्याची पद्धत, अनेक प्रकारच्या भाषासरणी, अशा तऱ्हेची रचना तालमुदमध्यें दिसून येते. कांहीं ठिकाणीं भाषा अगदींच सूत्रमय व दुर्बोध आहे. त्यामुळें मिश्नाहाच्या स्पष्टीकरणार्थ जेमारा ऊर्फ टीकांची आवश्यकता भासूं लागली. तालमुदला कायद्याचा ग्रंथ अगर धर्मग्रंथ हें नांव बरोबर नाहीं. त्याला यहुदी ज्ञानकोश हें नांव अधिक यथार्थ दिसेल. त्यामध्यें ख्रिस्ती शतकाच्या पहिल्या तीन-चार शतकांतील सर्व प्रकारच्या चळवळींचा उल्लेख आला आहे.

**तालिकोट**—मुंबई, विजापूर जिल्हा, मुद्देबिहाळ तालुका यांत हा गांव आहे. या गांवाजवळ असणाऱ्या रक्कसगी आणि तंगडगी या गांवीं विजयानगरचा रामराजा व दक्षिणेंतील विजापूर, बेदर व गोवळकोंडा येथील राजे यांमध्यें मोठी लढाई होऊन तींत रामराजाचा पराभव झाला. तरी देखील मुसलमानी राजांतील परस्पर मत्सरामुळें विजयानगरचें राज्य याच वेळीं समूळ नष्ट झालें नाहीं. रामराजाच्या भावाकडे थोडेंसें राज्य ठेवण्यांत आलें. मात्र हिंदुसाम्राज्यसत्ता नष्ट झाल्यानें त्यांतील देशमुख, जमीनदार, जहागीरदार, वगैरे लोक स्वतंत्र पाळेगार बनले. सन १७५० मध्यें बाळाजी बाजीरावानें हा गांव आनंदराव रास्ते यांस सरंजामासाठीं दिला. पुढेंहि हा गांव रास्त्यांकडेच राहिला. येथें साड्या व सतरंज्या चांगल्या होतात. येथें पाटीचा दगड सांपडतो. लो. सं. ८,२५९.

**ताशकंद**—रशिया, उझबेकिस्तान लोकराज्याची राजधानी. शहराच्या जुन्या वस्तींत सार्ट, उझबेग, यहुदी, खिरघीझ व रशियन लोक आहेत. रशियन ऊर्फ नवी वस्ती, रुंद रस्ते व बागा यांच्यामुळें सुंदर दिसते. येथें एक विद्यापीठ आहे. लो. सं. ५,८५,००५.

**ताशा**—चौघड्यांतील टिमकीएवढेंच व तसेंच हें वाद्य असतें ; स्वरांत चढवावयाचें असल्यास ह्यासहि शेकावें लागतें. हें वेताच्या दोन छड्यांनीं वाजवितात. हल्लीं प्रचारांत ताशाचें भांडें तांब्याचें असतें. स्वर उतरला असल्यास किल्लीनें स्क्रू पिळून कातड्यास ताण देतात. वेतांच्या छड्यांनीं वाजवून सनईची सांथ करतात.

**तास**— एक वाद्य. टीचभर व्यासाचा सुमारें अर्धा तसु जाडीचा काशाचा गोल तुकडा, ह्यास तास म्हणतात. लांकडाच्या लहान मोगरीनें त्याजवर आघात करून ध्वनि उत्पन्न करतात. ह्याचा उपयोग देवादिकांच्या आरतीच्या वेळीं केलेला आढळतो.

**तासगांव**— मुंबई, सातारा जिल्ह्याचा हा एक तालुका आहे. यांत ४८ खेडीं आहेत. लो. सं. १,१०,६०९. उत्तर

व पूर्व भाग खडकाळ व नापीक आहे. पश्चिम व आग्नेय भाग सुपीक आहे. या भागांत बाभळीचीं व आंब्याचीं झाडें पुष्कळ आहेत. कृष्णा व वेरळा ह्या दोन नद्या या तालुक्यांतून वाहतात.

गांव—तासगांव तालुक्याचें मुख्य ठिकाण. पूर्वी गांवाभोंवतीं तट असून चार दरवाजे होते. गांवांत परशुरामभाऊ पटवर्धनांचा राजवाडा असून वाड्याभोंवतीं तट आहे. व त्याला चार मजबूत दरवाजे आहेत. राजवाड्यापासून थोड्या अंतरावर एक गणपतीचें सुंदर देवालय आहे. व त्याला द्राविड शिल्पपद्धतीचें गोपुर आहे. हा गांव परशुरामभाऊ पटवर्धन यांचा होता. ते येथेंच राहत असत. येथें एक हायस्कूल आहे. लो. सं. ११,'८७.

**ताहीर (पहिला)**—ताहीर हा खलीफ मामुन याच्या प्रमुख मदतगारांपैकीं एक असून त्याच्या वेळच्या मोठमोठ्या सेनानायकांत याची गणना होत असे. इ. स. ८११ त अली ईसा याला ताहीरनें एका लढाईंत ठार करून त्याचें शिर खलीफ मामुन याच्याकडे नजराणा म्हणून पाठविलें. या कृत्याबद्दल खलीफानें त्यास बक्षीस दिलें. पुढें आपला बंधु, बगदादचा खलीफ अमीन याच्याविरुद्ध मामुननें बंड केलें. मामूननें ताहीरच्या हाताखालीं फौज देऊन त्यास अमीनवर पाठविलें. ताहीरनें बगदाद शहर काबीज करून अमीन यास ठार मारिलें (इ. स. ८१३). व त्याचें शिर मामुनकडे पाठविलें. या जयाबद्दल मामुननें ताहीरास खोरासान प्रांताची जहागीर दिली. ही जहागीर ताहीरच्या वंशाकडे कायम राहिली. ताहीर हा सन ८२२ त मर्व्ह येथें मृत्यु पावला.

**ताळू**—मुखाच्या वरच्या भागास ताळू म्हणतात. हिचे दोन भाग असतात: एक कठिण व दुसरा मृदु. खातांना, बोलतांना व गिळतांना मनुष्य कठिण भागाचा उपयोग करतो. मृदु भाग हा त्याचाच आंतील भाग असतो. तो तोंड आणि मागील नाकपुड्या यांच्या मध्यमार्गीं असतो. वरच्या बाजूनें पडजीभ खालीं लोंबत असते, आणि दोन्ही बाजूंस तालुस्तंभ किंवा कमानी असून त्यांच्यामध्यें जिह्वाग्रंथी असतात. मृदु ताळूचा उपयोग गिळण्याच्या व बोलण्याच्या कामीं होतो, व कांहीं ध्वनी उत्पन्न करण्याच्या कामीं हिचें फार महत्त्व असतें. पडजिभेचा विशेष महत्त्वाचा उपयोग काय आहे हें अद्यापि कळलें नाहीं.

**तिकिटें**—सरकारच्या किंवा एखाद्या संस्थेचा छाप असलेला कागदाचा तुकडा. पैसे भरून तिकिट घ्यावें लागतें. पोस्ट, आगगाडी, खेळ, इ. चीं छापील तिकिटें असतात. सरकारी कामासाठीं अर्जावर तिकिटें लावावीं लागतात. यांना 'रेव्हेन्यु स्टँप' म्हणतात. ज्यांवर सरकारी कर असतो त्या कराच्या रकमेइतकी त्या जिनसांवर तिकिटें लावावीं लागतात. कोर्टांतील खटल्यासाठीं जे कागद दाखल करावे लागतात त्यांना कोर्टाचीं तिकिटें लावावीं लागतात. टपालानें जावयाच्या पत्रांना व पार्सलांना पोस्टखात्यानें काढलेलीं तिकिटें वजनाप्रमाणें लावावयाचीं असतात.

पोस्टाचीं तिकिटें इंग्लंडांत १८४० सालीं निघालीं. त्यापूर्वी पत्रें देतांना त्यांबद्दलचें हंशील घेत. तिकिटाचे दोन प्रकार आहेत: १ डकवावयाचीं तिकिटें; व २ छापी तिकिटें. वरीच पत्रें-पार्सलें असल्यास पोस्टखातें त्यावर तिकिटाचे छाप मारतें. हिंदुस्थानांतील पोस्टाच्या तिकिटांसंबंधींचा सविस्तर इतिहास 'टपालवाहतूक' या लेखांत दिला आहे.

**तिकिटें गोळा करण्याचा छंद**—(फिलेटेली). पोस्टाचे छाप, तिकिटें, पाकिटें, इ. जमविण्याचें आज एक शास्त्रच बनून गेलें आहे. इ. स. १८४० त पेनी पोस्टेज (आण्याचें टपाल) सुरू झाल्यापासून हा छंद निघाल्याचा इतिहास सांपडतो. ऑस्ट्रेलिया, कानडा, अमेरिका, फ्रान्स, इटली, वगैरे राष्ट्रांतील पहिले छाप (तिकिटें) जमविण्यास भरमसाट किंमत द्यावी लागते. १८४७ चें मॉरिशिअसचें पहिलें निळें तिकिट (याच्या फक्त २६ च प्रती जगांत उपलब्ध आहेत) पॅरिस येथें ४,६७० पौंडाला विकत गेलें. माजी इंग्लंडचे पांचवे जॉर्ज राजे यांचा तिकिटांचा संग्रह जगांत प्रख्यात होता. तसेंच फिलिप फान फेरारी याचाहि असे. त्याचा कांहीं भाग १९२२-२५ मध्यें लिलांवानें विकून ४,०२,९६५ पौंड आले. हा जुनीं तिकिटें देण्याघेण्याचा व्यवहार करणाऱ्या संस्था आहेत. हिंदुस्थानांत मुंबईस १८९७ सालीं स्थापन झालेली अशी एक संस्था आहे.

**तिक्कन सोमयाजी**—एक तेलगू कवि व इतिहासवेत्ता. नेल्लुर प्रांतांतील पोचरच गांवीं याचा जन्म झाला. हा शालिवाहनाच्या १२ व्या शतकांत होऊन गेला. कविराट नांवाच्या गुरुजवळ यानें संस्कृतचें अध्ययन केलें. तेलगू भार्षेत हा चांगलाच प्रवीण होता. मानसिंग राजाच्या आज्ञेवरून भारताच्या अठराहि पर्वांचें भाषांतर यानें तेलगूंत फार जलद केलें. राजा फार प्रसन्न झाला व त्यानें सोमयाजीस बरीच जमीन इनाम दिली, अशी दंतकथा आहे. त्या उत्पन्नावर यानें अनेक यज्ञ करून सोमयाजी असें नांव मिळविलें.

**तिगळ**—एक जात. यांना तिळगर अथवा तिळवी असेंहि म्हणतात. यांची मुख्य वस्ती बेळगांव, धारवाड, विजापूर आणि कानडा हे जिल्हे, आणि म्हैसूर व मद्रास यांमध्यें आढळते. मुंबईच्या तिगळ लोकांनीं आपली एक स्वतंत्र जात बनविली आहे. हे घरीं एन्चार नांवाची बोली बोलतात. तिगळ आपणांस आद्य क्षत्रिय समजतात. हे गळ्यांत जानवें घालतात. तथापि त्यांचा वंशपरंपरा धंदा शेतीचा आहे.

तिगळ हे वैष्णव पंथाचे हिंदू आहेत. राम, हनुमान, रंगनाथ व भैरव या चार देवतांची हे उपासना करतात. गुरुनाथम्मा नांवाची त्यांची कुलदेवता असून म्हैसूर व कारकल (दक्षिण कानडा) शहरीं या देवतेचीं देवळें आहेत. आश्विनामध्यें तिरुपतीची आणि चैत्रामध्यें उडपीची यात्रा करण्याची चाल या लोकांत आहे. हिंदूंचे सर्व सण तिगळ लोक पाळतात. मुसलमान साधुसंतांनाहि हे लोक मान देतात. अनेगुंडीचा ब्राह्मण स्वामी हा तिगळांचा धर्मगुरु. विवाहविधीहि ब्राह्मणाकरवींच होतात. वधूबद्दल तिच्या बापास वराच्या बापानें हुंडा अगर 'तेरु' देण्याचा प्रघात आहे. विधवांना पुनर्विवाह करण्याची मुभा आहे. बायकोच्या वाईट वर्तणुकीबद्दल नवरा तिला सोडचिठ्ठी देऊं शकतो. ही जात हिंदुवारसाचा कायदा पाळते. एकाच वेळीं अनेक बायका करण्याची चाल तिगळ लोकांत आहे.

शेती व बागाईत हे यांचे धंदे आहेत. हे मांसाहारी आहेत व मदिरापानहि करतात.

**तिजोरी**—मौल्यवान वस्तू, पैसा, कागद, इ. ठेवण्यासाठीं तयार केलेली विशेष प्रकारची पेटी किंवा कपाट. आग आणि चोरी यांपासून संरक्षण होईल अशा प्रकारची याची रचना असते. १८४० सालीं थॉमस मिल्नरनें ज्या पद्धतीनें तिजोऱ्या तयार केल्या. तीच पद्धत बहुधा आजहि चालू आहे. या तिजोरीच्या भिंती पोकळ असून त्यांत अदाह्य व मंद(उष्णता)वाहक द्रव्यें भरतात; उदा.-माती, तुरटी, जिप्सम, इ.. कधीं कधीं पाण्यानें भरलेल्या बाटल्या ठेवतात. तिजोरीचीं दारें पोलादी पत्र्याचीं असून पत्रे स्क्रूनीं चांगले बसविलेले असतात. हे स्क्रू बाहेरून मुळींच दिसत नाहींत. या पत्र्यांना भोंक पाडणें शक्य नसतें. उचकटण्यानें दारें काढतां येऊं नयेत म्हणून त्यांना सर्व बाजूंनीं खिट्या (बोल्ट) बसविलेल्या असतात. तिजोरी खोल्या अशाच प्रकारें भक्कम बनविल्या जातात. पोलादी तुळया आंत घालून री-इन् फोर्स्ड कॉंक्रीटनें भिंती बांधतात. चोरांची चाहूल लागावी म्हणून या खोल्यांना विजेचीं विशिष्ट यंत्रें बसविलेलीं असतात. हिंदुस्थानांत गोद्रेज कंपनी तिजोऱ्या करते.

**तितन**—(टिटॅनिअम). एक मूलद्रव्य. परमाणुभारांक ४८·१. १७९१ सालीं याचा शोध लागला. ऑक्साइड म्हणून हें लोखंडाच्या कांहीं खनिज धातूंत असतें. गर्द राखी रंगाचें जड आणि अस्फटिक भुकटीच्या रूपांत हें असतें. सामान्यतः त्याचे गुणधर्म सिलिकॉनसारखे आहेत.

**तित्तिरीर**—ज्याला मराठींत कवडा म्हणतात त्याचें हें नांव असून तें मागाहून झालेल्या संहिता व ब्राह्मण ग्रंथ यांमध्यें आलेलें आहे. या पक्षाचें तित्तिर नांव त्याच्या ध्वनीवरून पडलेलें आहे. या पक्षाचें बहुतकरून 'निरनिराळ्या रंगाचे पंख असलेला' असें वर्णन आलेलें आहे. या पक्षालाच दुसरीं नांवें कपिंजला व कलविंक अशीं आहेत.

**तिथि**—चांद्र दिनाचें नांव, म्हणजे सत्तावीस दिवसांहून किंचित् जास्त असलेल्या चांद्रमासाचा $\frac{1}{30}$ वा भाग. हा शब्द उत्तरकालीन सूत्रग्रंथांत आलेला आहे. पण ब्राह्मण ग्रंथांत तो पूर्ण अज्ञात आहे. कारण ब्राह्मणांत ज्या दिवसाचा उल्लेख आहे तो नैसर्गिक सावन दिवस होय.

चंद्र-सूर्यामध्यें १२ अंश अंतर पडण्यास जो काल लागतो त्यास तिथि म्हणतात. तीस तिथींचे दिवस २९½ होतात. या काळासच चांद्रमास म्हणतात. पंचांगांत दर तिथीची घटी व पळें दिलीं असतात. तिथीचें मान ६० घटिकांहून जास्त जेव्हां होतें तेव्हां तिथीची वृद्धि झाली असें म्हणतात. तिथि सूर्योदयापासून धरतात. सूर्योदयीं तिथि नसेल तर ती क्षयतिथि मानतात.

**तिनेवेल्ली**—मद्रास इलाख्यांतील एक जिल्हा. क्षे. फ. ४,३४२ चौरस मैल. अगस्त्यमलए हें अत्युच्च शिखर असून त्याची उंची ६,२०० फूट आहे. ताम्रपर्णी, चित्तार, वैप्पार या नद्या आहेत.

१८ व्या शतकापर्यंत मदुरा जिल्ह्याचा व तिनेवेल्ली जिल्ह्याचा इतिहास बहुतेक सारखाच आहे. ताम्रपर्णीच्या मुखानजीक असलेल्या कोलकई गांवीं पाण्ड्य राजांची पूर्वकालीं राजधानी होती. सन १७४३ मध्यें तिनेवेल्ली हा जिल्हा अर्काटच्या नबाबाच्या ताब्यांत आला. पण हा ताबा नांवाचा होता. पाळेगारांनीं मधून मधून अनेक बंडें केलीं. अखेरीस १८०१ सालीं ई. इं. कंपनीनें ह्या जिल्ह्याचा सर्व कारभार आपणांकडे घेतला व तेथील नबाबास पेन्शन दिलें.

प्राचीनकालीन द्राविड संस्कृतीचें हा जिल्हा म्हणजे माहेरघर होय. कोलकई व कायल हीं पूर्वी राजधानीचीं शहरें होतीं. पण त्यांचें पूर्वकालीन वैभव दाखविणारें आतां कांहींच उरलें नाहीं. तिरुचेन्दूर, अलवार, तिरुनगरी, श्रीवैकुंठम, तिनेवेल्ली गांव, नानगुनेरी, श्रीविल्लीपुत्तुर, तेनकासी, पापनाशम्, कलुगुमलए, व कुत्तालम् येथील देवालयें प्रसिद्ध आहेत.

या जिल्ह्यांत गांवें २९, खेडीं १४८२ व तालुके ९ आहेत. लो. सं. २,२४४,९४३. शेंकडा ४६ लोक तामिळ भाषा बोलतात व शेंकडा १३ लोक तेलगू भाषा बोलतात.

उत्तरेस काळी कापसाची जमीन आहे. ताम्रपर्णी नदीकांठचा प्रदेश सुपीक आहे. कापसाचें उत्पन्न मुख्य असून सोनामुलीचें उत्पन्न त्याच्या खालोखाल आहे. ताडी काढण्याचा धंदा बरेच लोक करतात.

ह्या जिल्ह्यांत एकंदर २,३०० तलाव आहेत व शिवाय ताम्रपर्णीच्या पाण्याचे कालवे आहेत.

अम्बासमुद्रम् तालुक्यांत वीरवनल्लूर व कलिंदईकुरिची येथें विणकाम मोठ्या प्रमाणावर चालतें. बाहेर पाठविला जाणारा माल कापूस, मिरची, तंबाखू, मीठ, सुके व खारे मासे व गुरें हा असून आंत येणारा माल ताग, परदेशी कापड, रॉकेल तेल होय. तुतिकोरीन, कुलशेखरपट्टनम् व कायलपट्टनम् हीं बंदरें आहेत. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा बराच पुढारलेला आहे.

तिनेवेल्ली गांव हें ताम्रपर्णी नदीच्या डाव्या तीरावर वसलें असून जिल्ह्यांतील सर्व गांवांत मोठें आहे. १५६० सालच्या सुमारास नाईक घराण्याचा संस्थापक विश्वनाथ यानें हें गांव पुन्हां वसविलें. यानेंच या गांवांत पुष्कळ देवालयेंहि बांधिलीं. या गांवाची लोकसंख्या ६०,६७६ आहे. या गांवांत दोन कॉलेजें आहेत. साखरेचे कारखाने आहेत. याशिवाय या गांवांत लांकडाचा मोठा व्यापारहि चालतो.

**तिबेट**— मध्य आशियाच्या मोठ्या पठाराचा दक्षिण भाग या देशानें व्यापिला आहे. हिमालय आणि कुलुन यांमधील पामिरापासून चीनपर्यंत याची हद्द आहे. हिंदुस्थान, नेपाळ, भूतान, चीन, मोंगोलिया व सिंकिआंग यांमध्यें तिबेट वसलें आहे. क्षे. फ. ४,६३,२०० चौ. मै. व लो. सं. पंधरा ते साठ लक्षांपर्यंत धरण्यांत येत असते. नुकताच लोकसंख्येचा जो अदमास घेतला तो सात आठ लाखांपर्यंत भरला. तिबेटांत अनेक पर्वतराजी ( २३,००० फुटांवरहि कांहींचीं शिखरें आहेत ), विस्तृत पठारें व उंचसखल मैदानें दिसतात. सिंधु, ब्रह्मपुत्रा, वांगहो, यांगत्सेकिआंग, इ. नद्यांचें उगम येथें आहेत. अनेक खारीं-गोडीं सरोवरें आहेत.

तिबेटी धर्मगुरु

तिबेटांत येण्याच्या व राहण्याच्या अनेक अडचणी आहेत. म्हणून हा प्रदेश पुरा संशोधिला गेला नाहीं. हवा अत्यंत कोरडी आहे. पण थंडीचा कडाका फार. कांहीं भागांत शेतकी कामें चालतात. बार्ली व कांहीं किरकोळ धान्यें होतात. भाज्या व फळेंहि कोठेंकोठें होतात. जनावरें म्हणजे मेंढ्या व याक प्राणी बहुधा दिसतात. क्वचित्, डुकरें, म्हशी व उंट आढळतात. लोंकरीपासून कापड तयार करण्याचा धंदा सार्वत्रिक आहे. सोनें, टांकणखार व मीठ हीं खनिजें सांपडतात.

चीन आणि हिंदुस्थान या शेजारच्या देशांशीं मोठा व्यापार चालतो. हिंदुस्थान आणि तिबेट यामधील व्यापारी मार्ग १४,००० ते १८,००० फूट उंचीवरच्या डोंगरांतून काढलें असून कांहीं मोसमांत ते पाऊस आणि बर्फ यांमुळें बंदच असतात. दार्जिलिंगजवळील सिलिगुरी येथून तिबेटला जाण्याचा महत्त्वाचा हमरस्ता आहे. तिबेटांतील ग्यान्से आणि यातुंग या मोठ्या व्यापारी ठिकाणांना जाण्याचा मार्ग सिक्किम संस्थानांतून आहे. सिमला आणि आल्मोरा येथूनहि आणखी रस्ते आहेत.

राज्याचा मुख्य दलाईलामा असून एक राजप्रतिनिधि आणि पांच मंत्री यांच्या मदतीनें तो कारभार चालवितो. १७२० पासून चीननें आपला पगडा या राज्यावर बसवून लष्कर आणि परराष्ट्रखातें आपल्याकडे ठेविलें होतें. त्यामुळें तिबेटच्या व्यापाराबाबत चीनशीं वाटाघाट करावी लागे. १९०४ सालीं कर्नल यंगहजबंडनें ल्हासाला जाऊन तिबेटांतील तीन ठिकाणीं व्यापार खुला करून घेतला. १९११ सालीं चीनमध्यें राज्यक्रांति झाल्यावर तिबेटनें चीनचें लष्कर हांकलून लाविलें. तथापि ब्रिटन चीनचें तिबेटवरील स्वामित्व बऱ्याच अंशीं मान्य करून होतें. यामुळें बरेच तंटे माजले. चीनला तिबेट खावयाचा होता. पण १९१३ मध्यें सिमला येथें तीन राष्ट्रांची वाटाघाट झाली. तथापि नक्की कांहींच ठरलें नाहीं.

तिबेटी लोक मंगोलियन वंशाचे आहेत. भाषा तिबेटी ब्राह्मी आहे. धर्म लामापंथी आहे. हा पंथ म्हणजे बौद्ध धर्माचें एक विकृत स्वरूप होय. कांहीं लोक शामानपंथाचे आहे.

ल्हासा हें राजधानीचें शहर आहे. तेथें दोन सरकारी शाळा आहेत. एक मुलकी अधिकारी तयार करण्यासाठीं व दुसरी धार्मिक अधिकारी तयार करण्यासाठीं आहे. खाजगी शाळा पुष्कळच आहेत.

बऱ्याच अलीकडील काळपर्यंत तिबेटची फारच थोडी माहिती उपलब्ध होती. मोठमोठ्या पर्वतांच्या रांगांनीं संरक्षित्यामुळें ती एक गूढ भूमि राहिली. तिबेटचा फक्त चीनशीं खरा संबंध असे. तिबेट सरकारच्या खास परवानगीशिवाय अजूनहि परदेशांतील लोकांस प्रवेश मिळत नाहीं. परकीय मनुष्य आपले जुने विचार, आपली राहण्याची पद्धति यांत ढवळाढवळ करील किंवा प्रसंगीं आपलें स्वातंत्र्यहि हिरावून घेईल, अशी त्या लोकांस भीति वाटते. सिक्किमवर स्वारी केल्यामुळें सन १९०४ मध्यें ब्रिटिशांनीं तिबेटवर सैन्य पाठवून त्यास व्यापारी करार करण्यास भाग पाडिलें.

तिबेटमध्यें पुष्कळ सरोवरें व उन्ह पाण्याचे झरे आहेत. झऱ्यांतील उन्ह पाणी बाहेर आल्याबरोबर तें गार होतें व हवेच्या योगानें त्याचे बर्फ बनतें. कांहीं झऱ्याचें पाणी ६० फूट वर

तंजावर—राजवाड्यांतील मनोरा (पृ. १०३८)

तिबेटी स्त्री (पृ. १०८०)

तिबेटी भिक्षु व धर्मचक्र (पृ. १०८१)

तेल्लिचेरी—मलबार किनारा (पृ. ११०८)

उडतें. तिबेट हें समुद्रसपाटीपासून १६,००० फूट उंच आहे. तिबेटच्या उत्तर भागाची हवा अतिशय थंड आहे. त्यामुळें तेथें फारशा वनस्पती नाहींत. तांगला पर्वताच्या दक्षिण भागांत जास्त लोकवस्ती आहे. आमदो, खाम, वू, त्सांग आणि नरी हे पांच प्रांत आहेत. लामा हे येथील खरे सत्ताधारी असून दलाईलामा हे त्यांचे प्रमुख होत. ते ल्हासा या राजधानीमध्यें राहतात. ल्हासा हें समुद्रसपाटीपासून ११,७०० फूट उंच असून 'ईश्वराची भूमि' या नांवानें बौद्धांना माहीत आहे. उन्हाळ्यामध्यें तिबेट ही फुलांची भूमि बनते. प्रत्येक दरी व मोकळी जागा ही गुलाब, लिली, वगैरे अनेक प्रकारच्या फुलांनीं झांकून जाते. गवतानें व फुलांनीं व्यापलेली ही भूमि हिंवाळ्यांत वर्फाच्छादित होते. येथें गहूं व मका होतो पण भात पिकत नाहीं. येथें वाटाणे, बटाटे, कांदे, वगैरे होतात. फळांमध्यें द्राक्षें, पीच, अक्रोड, सफरचंद, इत्यादि फळें होतात. चहा हें मुख्य पेय असून त्याची आयात चीनमधून होते. तिबेटी लोक लोणी किंवा दूध चहांत मिसळतात. येथें सर्वसाधारण दोन किंवा तीन मजल्यांचीं घरें असतात. येथें तळमजल्यावर कोणी राहत नाहीं. तेथें घोडे अगर गुरें बांधतात. घराच्या शिखरावर प्रार्थनेचीं निशाणें असतात.

तिबेट हें सोन्यानें समृद्ध आहे. परंतु तें खणून काढण्याची पद्धति जुनी आहे. येथें चांदी, मीठ व टांकणखारहि सांपडतो. चीन, तुर्कस्तान, मंगोलिया, इंडोचीन आणि हिंदुस्थान यांच्याशीं तिबेटाचा व्यापार चालतो. येथून लोंकर, मीठ, टांकणखार आणि कांहीं सोनें व चांदी बाहेर जाते.

इतिहास—तिबेटचा इतिहास चार कालखंडांत विभागतां येईल: (१) ख्रि. पू. पांचशें वर्षांपासून इ. स. दहाव्या शतकापर्यंत 'पहिल्या राजसत्तेचा काल'; (२) दहाव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत 'भांडणाचा काल'; (३) तेराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत 'धर्मोपदेशकांच्या सत्तेचा पूर्वार्ध'; व (४) सतराव्या शतकापासून आतांपर्यंत 'धर्मोपदेशकांच्या सत्तेचा उत्तरार्ध'.

सोंग्त्सन गाम्-पो हा पहिला राजा होय. यानें सातव्या शतकाच्या पूर्वार्धांत राज्य केलें. याच्यापूर्वी हजार वर्षांपेक्षां अधिक काळ राजसत्ता होती. याची सत्ता तिबेट, भूतान, नेपाळ, वरचा ब्रह्मदेश, तुर्कस्तान आणि पश्चिम चीनचा कांहीं भाग यांवर होती. हिंदुस्थानांतून तिबेटमध्यें बौद्ध धर्माचा प्रसार झाला. वेन चॅग हिच्या लग्नांत सोंग्त्सन गाम्-पो ह्या तिच्या नवऱ्यास एक बुद्धाचा पुतळा भेट म्हणून देण्यांत आला. हा पुतळा तयार केला तेव्हां बुद्ध जिवंत होता अशी दंतकथा आहे व तो पुतळा सोनें, चांदी, जस्त, लोखंड व तांबें यांचा तयार केला होता. तिबेटमध्यें राज्याचा वारसा फारच विलक्षण आहे. जेव्हां दलाईलामा मृत पावतो तेव्हां तो पुन्हां लहान बालकाच्या रूपानें राज्यांत कोठें तरी जन्मास येतो. बऱ्याच शोधानंतर या लामाचा आवतार असें योग्य मूल सांपडल्यावर त्याला ल्हासा येथें नेण्यांत येतें. दलाईलामा मोठा होईपर्यंत राजप्रतिनिधि कारभार पाहतो. सर्व आईबापांना आपला एक तरी मुलगा लामा—धर्मोपदेशक—व्हावा असें वाटतें. लामा हे गुंफा किंवा मठ यांमध्यें राहतात. प्रत्येक लामाला स्वतःची खोली किंवा घर असतें; आणि तो स्वतःचें अन्नहि मिळवितो. वार्षिक नाच हा मठाचा मोठा उत्सव आहे. धर्मोपदेशक हे नर्तक असतात. हल्लींचा लामा तांचू हा चौदावा दलाईलामा होय. तो ल्हासा येथील पोतला राजवाड्यांत राहतो. जो-खांग हें एक ल्हासा येथील प्रसिद्ध ठिकाण आहे. काळ्या टोप्यांचा नाच हा तिबेटमधील सर्वांत मोठा धार्मिक नाच आहे. हा ११ व्या शतकांत सुरू झाला. लामा ल्हालुन पाल्दोर यानें केलेल्या राजा लांगादर्भा याच्या खुनाचा हा नाच स्मृतिचिन्ह होय. खुनी इसमानें खुनाच्या वेळीं काळा वेष धारण केला होता. यांत ८० नर्तक असतात. हा विलक्षण नाच ते ढोल, बांसरी यांच्या निनादाबरोबर सुरू करतात.

तिबेटी लोक—दक्षिणेकडील मंगोलांपासून तिबेट लोकांची उत्पत्ति झाली असावी. या वंशाच्या तीन शाखा उपलब्ध आहेत: (१) बोडपा ही थोडीशी सुधारलेली जात शहरांत व खेड्यांत आढळते. (२) ड्रूपा ही अर्धवट रानटी जात उत्तरेकडील पठारावर तंबू ठोकून राहते. (३) तांगत ही जात ईशान्येकडील भागांत आढळते. हिंदुस्थानप्रमाणें तिबेटांतहि कोळी, हुंडीवाले, लोहार, खाटीक, इत्यादि हलक्या जाती आहेत. उच्च समजल्या जाणाऱ्या जाती चार आहेत: (१) गेर-पा (सरदार), (२) न्गोक्-पा (मांत्रिक), (३) बोन-चो (जुन्या धर्माचे प्रतिनिधी), व (४) शाल्-न्गो (जुनीं राजघराणीं). सरदारांत यबशी नांवाचा वर्ग सगळ्यांत श्रेष्ठ आहे. या यबशी कुळांतील पुरुषांना तिबेटांतील मुख्य प्रधानाच्या व व इतर महत्त्वाच्या जागा मिळतात. सरदार-घराण्याच्या खालोखाल वर्ग म्हटला म्हणजे मांत्रिकांचा होय. ह्या वर्गाचा सन्मान मोठा असतो. तिबेटी लोक ज्या वेळेस लग्न लावितात त्या वेळीं ते बोनबोस उपासना करण्यास सांगतात. उच्च वर्ग व कनिष्ठ वर्ग ह्यांच्यामधील सामान्य लोक म्हणजे वैश्य वर्ग. या वैश्य वर्गाचे तोंगू-बाव, तोंग-दु असे दोन वर्ग आहेत. ह्या दोहोंत सहभोजन व परस्पर लग्नव्यवहार होत नाहीं व वर ज्या चार कनिष्ठ जाती सांगितल्या त्यांच्यामध्येंहि सहभोजन व परस्पर लग्नव्यवहार होत नाहीं.

लोकांचा पोषाख म्हणजे कमरेभोंवतीं बांधलेला एक अंगरखा असतो. हे अंगरखे लोंकरीच्या कापडाचे किंवा रेशमाचे किंवा वक-ऱ्याच्या कातड्याचे असतात. पुरुष व स्त्री दोघेहि उंच बूट घालतात. या झग्याच्या आंत पुरुष व स्त्री दोघेहि शर्ट घालतात. पुरुष व स्त्री एकमेकांना सारखे लेखतात. मूल झाल्यानंतर आई त्याला धर्मगुरूकडे नेते. धर्मगुरु त्याला आशीर्वाद देऊन नांव ठेवितो. हजारों लोक लामा होतात व हजारों शेतकरीही होतात

तिबेटी लोक फार घाणेरडे आहेत. ते वर्षावर्षांतून स्नान करीत नाहींत. यांच्या स्वच्छतेच्या कल्पनांचा उच्चनीचत्वाशीं संबंध आहे. एखाद्या पेल्यांतून हलक्या पदवीचा गृहस्थ चहा प्याला तर तो पेला विटाळतो. जर मुलीचें तोंड आणि हात स्वच्छ असले तर तिनें आपलें सुदैव धुऊन टाकलें असें समजतात. तिबेटी लोकांचें पंचांग हिंदुस्थानी अगर चिनी पंचांगा-प्रमाणें नाहीं. तें तुर्की आहे. तथापि तिबेटी वर्ष तुर्की वर्षाच्या १ वर्ष पाठीमागे आहे. तिबेटांत गोड्या पाण्यांत मासे सांपडतात. याक, मेंढ्या, बकरी यांच्या मांसाचा आहार होतो, पण मासे मारणें ते पाप समजतात. तिबेटी लोक गारांस फार भितात. कांहीं विधींसाठीं हे लोक माणसांच्या डोक्याच्या व तंगड्यांच्या हाडांचीं उपकरणीं करतात. ज्याला आशीर्वाद द्यावयाचा त्याच्या महत्त्वाप्रमाणें लामांचे आशीर्वाद देण्याचे चार प्रकार आहेत: (१) डोक्यास डोकें लावून आशीर्वाद, (२) दोन हातांनीं दिलेला आशीर्वाद, (३) एक हाताचा आशीर्वाद, व (४) काठीचें टोंक डोक्यास लावून दिलेला आशीर्वाद. यांच्यांत सतत सौख्यास 'चाचंगपेम्म' असें म्हणतात. 'चाचंगपेम्म' म्हणजे चहा व दारू हीं एकामागून एक पिणें. चोर लोक ज्याची लूट केली असेल तो धर्मवाक्यें वाचणारा असल्यास त्यास तीन दिवस पुरेल इतकें अन्न देतात. लोक सार्वजनिक कसाईखान्यांत मंत्रोच्चारपूर्वक पशूंची हत्या करतात. बहुपत्नीत्व तिबेटांत क्वचि-तच आढळतें. कधीं कधीं दोन-तीन बहिणी काटकसरीसाठीं एकच नवरा करतात. तिबेटी स्त्रियांमध्यें एका बाईनें अनेक नवरे करण्याची चाल आहे. बहीणभाऊ एकमेकांशीं लग्न करीत नाहींत आणि चुलतभाऊ व चुलतबहिणी ही एकमेकांशीं लग्न करीत नाहींत. बायकांचा अधिकार नवऱ्यावर मोठा असतो. नवरा मिळवून आणील तें त्यानें बायकोच्या हवालीं केलें पाहिजे. लग्नाच्या वेळेस मुलीस नवऱ्या मुलाकडून देणग्या मिळतात आणि आईबापास हुंडा मिळतो. त्यास स्तनद्रव्य म्हणतात. बहुतेक मुलींचीं संमतीशिवाय लग्नें होतात. त्यामुळे घटस्फोटहि पुष्कळ होतात. बहुतेक स्त्रियांस ओझ्यावर चांगलें बसतां येतें. बायकांना व्यवहारज्ञान चांगलें असून त्या व्यापारधंद्यांत पुढे आहेत.

भाषा—तिबेटी भाषेंत पांच स्वर आहेत असें युरोपीय वैयाकरण लिहितात. पण तिबेटी लिपीचा उत्पादक 'थुमि संबोत' हा फक्त चारच स्वर तिबेटी भाषेंत आहेत असे म्हणतो. कावागुचीच्या मताप्रमाणें सितुलामा हा श्रेष्ठ तिबेटी वैयाकरण होय. न्गुलच लामाचें एक व्याकरण तेथें प्रसिद्ध आहे. तिबेटी भाषेस बोदस्काद असें म्हणतात. एकंदर तीन प्रांतिक भाषा येथें रूढ आहेत. ल्हासा, यू व संग येथील भाषा हीच तिबेटची सर्वसामान्य भाषा होय. पश्चिमेच्या बाजूस लदक, लाहुल, बाल्तिस्तान, पुरीग या प्रांतिक भाषा असून खाम प्रांताची पूर्वेकडील भाषाहि प्रसिद्ध आहे. भाषेच्या दृष्टीनें तिबेटचा ब्रह्मदेशीय भाषांशीं फार निकट संबंध आहे. सातव्या शतकांत एका हिंदी बौद्ध भिक्षूच्या साहाय्यानें तिबेटांत प्रथम लिपि लिहिण्यास सुरुवात झाली. तिबेटी बोलीचे व लिहिण्याचे प्रकार यांत फार अंतर असल्यानें व्युत्पत्तिशास्त्रज्ञांस या भाषेचा अभ्यास करणें फार मनोरंजक होईल.

वाङ्मय—या देशांत धार्मिक वाङ्मय बरेंच झालें आहे. छापखाने भिक्षुवर्गाच्या हातीं असल्यामुळें धर्माखेरीज अन्य जातीच्या वाङ्मयोत्पादनास फारसा अवकाश राहिला नाहीं. मिलरासपाचीं हजारों गीतें येथें प्रसिद्ध आहेत. मिलरासपा ऊर्फ मिला हा ११ व्या शतकांतील एक भिक्षु असून त्यानें धर्मोतर-कार्यप्रीत्यर्थ तिबेटांत बराच प्रवास केला होता. तीसंगबियांग ग्यांमतकृत प्रेमगीतेंहि फार प्रसिद्ध आहेत. हीं गीतें १७०१ सालीं पदच्युत झालेल्या रंगेल दलाईलामावर रचण्यांत आलीं होतीं. दंतकथा, गोष्टी, वगैरे बऱ्याच असून जुनीं नाटकेंहि आहेत. 'केसरमहाकाव्य हें उत्तर आशियांतील एका वीर-पुरुषासंबंधीं आहे. ए. एच्. फ्रँके यानें या काव्याचें भाषांतर केलें आहे. 'जियुंगयी' नामक एक कथात्मक ग्रंथ हा खाम-मध्यें राष्ट्रीय महाकाव्यग्रंथ म्हणून प्रसिद्ध आहे. गद्यपद्यांत हें काव्य लिहिलेलें असून तात्त्विक चर्चा व विनोदात्मक कथानकें यांत बरीच आहेत. जियुंगलिंग, होलिंग व जियालिंग असे याचे तीन विभाग आहेत. या ग्रंथांपैकीं कांहीं भाग बऱ्याच तिबेटी लोकांना पाठ असतो. 'याल्डरंग' नांवाचें एक महा-काव्य प्रसिद्ध आहे. रामायणाचें भाषांतर करण्यांत आलें आहे.

**तिमाप्पा वड्डार**— पेशवाईच्या अखेरच्या सुमारास वड्डार लोकांत हा प्रसिद्धीस आला होता. वडार लोकांची यानें एक टोळी बनविली होती. हा प्रथम सांगलीकरांच्या सैन्यांत शिलेदारी करीत असे. त्रिंबकजी डेंगळ्यानें इंग्रजांच्या कैदेंतून पळून जाऊन जेव्हां बंड उभारलें तेव्हां त्यास जे लोक मिळाले त्यांत हा होता. पुढें त्रिंबकजीचा बंदोबस्त झाल्यावर चिंतामणराव सांगलीकरांच्या मध्यस्थीनें यास माफी मिळाली (च. को.).

**तिमिंगिल वर्ग**—( सेटॅसी ). हा एक समुद्रांतील प्राण्यांचा वर्ग आहे. यांत व्हेल, डॉल्फिन, वगैरे मासे मोडतात. हे सस्तन प्राणी आहेत, कारण ते आपल्या पिलांस स्तनपान देतात. यांचें रक्त उष्ण असून ते फुप्फुसांच्या साहाय्यानें श्वासोच्छ्वास करतात. यांचें शरीर दिसावयास माशासारखें असतें. परंतु पाठीमागें एक दुभागलेली शेपटी असून ती नेहमीं आडवी अथवा समुद्रपृष्ठाशीं समपातळींत असते. यांच्या पाठीवर पंखासारखा अवयव असतो, परंतु तो केवळ एक स्नायुबंधांच्या घडीसारखा असून त्यामध्यें हाडांचा कणा नसतो. व्हेल माशास प्रौढावस्थेंत दांत नसतात, परंतु त्याच्या टाळूमध्यें दांतासारखें हाड असतें, व त्याच्यावर तिरप्या रेषा असतात; परंतु गर्भावस्थेंत असलेल्या माशास सूक्ष्म दांत असतात. जेव्हां व्हेल मासा श्वासोच्छ्वास करण्याकरितां पाण्याच्या पृष्ठभागावर येतो तेव्हां तो आपल्या फुप्फुसांतून मोठ्या जोरानें हवा बाहेर सोडतो व त्यांतून निघणाऱ्या वाफेचा ढग बनतो. त्याच्या घशांतून फुप्फुसाकडे जाणारी नळी नाकाच्या बाजूस निमुळती होत आलेली असते व त्यामुळें त्यास तोंड उघडें ठेवूनहि पाण्यांतून पोहतां येतें व याप्रमाणें न गुदमरतां आपलें भक्ष्य पकडतां येतें. यांच्या शरीरांतील रक्तपेशी एका मोठ्या जाळ्यासारख्या असतात व त्यांत प्राणवायुयुक्त रक्त बराच वेळ राहूं शकतें व त्यामुळें त्यास पुष्कळ वेळ पाण्याखालीं राहतां येतें. यांचे पुढील पांच वर्ग पाडण्यांत येतात: (१) बॅलिनिडी अथवा हाडांचे व्हेल मासे—यांच्या पुन्हां दोन जाती आढळतात: एक गुळगुळीत त्वचेचे असून त्यांच्या पाठीवर पंख नसतात; व दुसरे कंगोरे असणारे व्हेल मासे, यांच्या पाठीवर खोलगट कंगोरे असतात आणि त्यांस पाठीवर पंख असतात. (२) फिजेटेरिडी अथवा स्पर्म व्हेल—यांच्या टाळूमध्यें हाडें नसून दांत असतात पण ते खालच्या जबड्यांत असतात. (३) डेल्फिनिडी—यांच्या दोन्ही जबड्यांत दांत असतात. या वर्गांत डॉल्फिन पॉरपाइज आणि नार्व्हेल-जातीचे मासे येतात. (४) व्हिकोसेटी—या वर्गांतील मासे स्पर्म व्हेलसारखेच असतात, परंतु त्यांच्या फक्त खालच्या जबड्यांत दोन किंवा चार दांत असतात. तसेंच यांचें तोंड किंवा नाक निमुळतें असून त्यास एकच नाकपुडी असते. (५) झुग्लोडोन्टिडी या जातीचे मासे नष्ट झाले असून त्यांच्या जबड्यांत सुळे दांत व आंकडेदार दांत असत.

**तिरखेडी**—( मालपुरी जमीनदारी ). मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. ही इस्टेट तिरोरा तहशिलींत असून दोन जमीनदाऱ्या मिळून झालेली आहे. तिरखेडीचें क्षेत्रफळ १५ चौरस मैल व मालपुरीचें २१ चौरस मैल आहे. खेडीं ७०. बहुतेक भाग जंगलाचा असून त्याचें उत्पन्नहि चांगलें आहे. मराठे राज्यकर्त्यांशीं इमानीपणानें वागल्याबद्दल पांडू पोवार नांवाच्या इसमास १८१५ सालीं या जमीनदाऱ्या मिळाल्या. जमीनदार तिरखेडी येथें राहतो. तिरखेडी गांव सालेकसा स्टेशनापासून ४ मैल लांब आहे.

**तिरळेपणा**—हा एक डोळ्यांचा विकार असून त्यामुळें दोन्ही डोळ्यांची दृष्टि एकाच पदार्थावर केंद्रित करतां येत नाहीं. याचें कारण डोळ्यांच्या स्नायूंपैकीं एखाद्या स्नायूवर इतरांपेक्षां अधिक ताण पडतो हें होय. एखाद्या स्नायूवर आघात होऊन त्यास पक्षघात झाला असतांहि हा विकार उत्पन्न होतो. तिरळेपणामध्यें अनेक प्रकार असतात. त्यांतील दोन मुख्य प्रकार म्हणजे एक अंतर्दिशात्मक व दुसरा बहिर्दिशात्मक. पहिल्या-प्रकारामध्यें दोन्ही डोळ्यांचे अक्ष एकत्र येऊं पाहतात व दुसऱ्यामध्यें ते दूर होऊं पाहतात. विशिष्ट चष्मे लावून किंवा लहान शस्त्रक्रिया करून तिरळेपणा काढतां येऊं लागला आहे.

**तिरुक्कलीक्कुनरम्**—( पक्षितीर्थ ). मद्रास, चिंगलपट जिल्हा व तालुका. एक तीर्थस्थान. लोकसंख्या सात-आठ हजार. या गांवाजवळच ५०० फूट उंच असणाऱ्या टेंकडीवर महादेवाचें देवालय आहे. हें ठिकाण क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. प्रत्येक दिवशीं दोन गरुडपक्षी या टेंकडीवर येतात व देवालयांतील पुजारी त्यांना खीर खावयास घालतो. या गांवांत असणाऱ्या तलावांत या पक्ष्यांचें स्नान करण्याचें स्थान आहे. त्यांत स्नान केल्यानें सर्व प्रकारचे रोग बरे होतात अशी समजूत आहे. हे पक्षी प्राचीन ऋषी म्हणून समजले जातात. कांहीं उदार भाविकांनीं या ठिकाणीं यात्रेकरूंकरितां कित्येक धर्मशाळा बांधिलेल्या आहेत.

**तिरुपति**—मद्रास, उत्तर अर्काट जिल्हा. चंद्रगिरी तालुक्यांत हें गांव आहे. लोकसंख्या सु. वीस हजार. या गांवांत अनेक प्रसिद्ध देवालयें आहेत. येथें जें एक प्रचंड बालाजीचें देवालय आहे, तें यात्रेचें प्रसिद्ध स्थान आहे. ज्या डोंगरावर हें गांव वसलें आहे तो डोंगर ( तिरुमल पाहा ) मेरु पर्वताचा भाग आहे अशी दंतकथा आहे. या पर्वतश्रेणीचीं सात मुख्य शिखरें असून प्रत्येकास निरनिराळें नांव आहे. यांपैकीं 'शेषाचलम्' असें एका शिखराचें नांव असून वायुदेवतेनें जोराचें वादळ करून उडविल्यामुळें सध्यां असलेल्या ठिकाणीं तें येऊन पडलें, अशी एक दंतकथा आहे. या शिखरानजीकच विष्णूचें-बालाजीचें देवालय आहे. इमारतीचें शिल्पकाम अगर कलाकौशल्य विशेष वाखाणण्यासारखें नाहीं. तथापि विष्णूची चतुर्भुज मूर्ति प्रेक्षणीय आहे. ती पाषाणाची असून, ७ फूट उंच आहे. मूर्तीच्या तीन हातांत शंख, चक्र, आणि पद्म अशीं आयुधें असून चौथा हात पर्वतशिखर दर्शवितो. या देवाचीं १,००८ नांवें आहेत. त्यांपैकीं, 'श्रीनिवास' व

'व्यंकटाचलपति' हीं दोन सर्वसाधारणपणें प्रचारांत आहेत. दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांतील यात्रेकरू या मूर्तीस बालाजी या नांवानें संबोधितात. येथील पितळेचा धंदा प्रसिद्ध आहे. तिरुपति संस्थान फार उत्पन्नाचें आहे. १८४३ पर्यंत हें इंग्रज सरकारच्या ताब्यांत होतें. नंतर महंताकडे गेलें. त्याला फार उत्पन्न होई. पण नीट व्यवस्था नसे. तेव्हां मद्रास सरकारनें आपल्या देखरेखीखालीं घेतलें.

**तिरुमंगई आळवार**—हा शेवटचा आळवार संत होय. हा तंजावर जिल्ह्यांतील कुरुगूर येथें जन्मला. हा जातीचा कलार. एका लहानशा प्रांताचा कारभार हा पाही व लुटारूचा धंदा करीत असे. एकदां त्यानें एका ब्राह्मणाचें वऱ्हाड लुटलें. नंतर त्याला पश्चात्ताप झाला व त्यानें त्या ब्राह्मणापासून नारायणमंत्र घेतला. नंतर त्यानें तीर्थयात्रा केली व तो श्रीरंगम् येथें राहूं लागला. वेगापट्टम् येथील बौद्धस्थान त्यानें लुटलें व श्रीरंगम् येथील देवळांचा जीर्णोद्धार केला. तसेंच नम्माळवार याच्या तिरुवयमोली ग्रंथाचें पठण दरवर्षी होईल अशी त्यानें तजवीज केली. वैष्णव प्रबन्धांतील ४९०० श्लोकांपैकीं १३६१ श्लोकांची रचना तिरुमंगई यानें केली आहे. वैष्णव लोक आचार्योपेक्षां आळवारास जास्त पूज्य मानतात.

पहिला आचार्य नाथमुनि हा आळवारांनंतर २१३ वें वर्षोनीं झाला असावा. नाथमुनीचा काल इ. स. १० वें शतक होय. व तो ३४० वर्षें योगसमाधींत होता असा उल्लेख आहे. तिरुमंगई आळवार नाथमुनीच्यापूर्वी होऊन गेला. अकराव्या शतकांत आळवारांच्या काव्या( तिरुनेडुनुदांडइम् )चें पठण करण्याची व्यवस्था चोल-केरळ राजानें केल्याचा उल्लेख सांपडतो. याच्या काव्यांत कोच्चेंगत नांवाचा चोल राजा व कांचीचा राजा परमेश्वर विण्णगळ ( पल्लव ) यांचें वर्णन आहे. हा पल्लव राजा परमेश्वर-वर्मा ( दुसरा ) असावा, असें डॉ. हुल्झ्श याचें मत आहे. यावरून कृष्णस्वामी अय्यंगार यांनीं अनुमान काढिलें कीं, तिरुमंगई याचा काल इ. स. ८००–८५० हा असावा. याचा ज्ञानसंबंदर या शैवसंताबरोबर वाद झाला अशी दंतकथा आहे.

**तिरुमल**—मद्रास, उत्तर अर्काट जिल्ह्यांतील चंद्रगिरी तालुक्यांत ही २,५०० फूट उंचीची टेंकडी आहे. या टेंकडीवर तिरुपतिबालाजीचें अतिशय प्रसिद्ध देवालय आहे. पूर्वी मुसलमान व खिस्ती लोकांना या टेंकडीवर येण्याची बंदी असे. हिंदुस्थानच्या सर्व भागांतून हजारों लोक देणग्या घेऊन तिरुपतीला येतात. याच टेंकडीवर हिंदूंना पवित्र व अतिशय मनोहर अशीं पुष्कळशीं स्नानास योग्य अशीं कुंडें आहेत.

**तिरुमल्ल आरविडु** ( मृ. १५७० )—आरविडु घराण्यांतील हा पहिला राजा. श्रीरंग व तिरुमलाम्बा यांचा हा मुलगा. कृष्णदेवराय तुळुवाची मुलगी व्यंकलाम्बा ( वेंगला ) ही यास दिली होती. हा व याचे दोन भाऊ रामराय व व्यंकटाद्रि या तिघांनीं व्यंकटाद्रि तुळुवाचा प्रधान सलाकम यास ठार करण्याचें कपट कारस्थान सुरू केलें. विजयानगरवर स्वारी करून यांनीं सलाकमचा वध केला व सदाशिवराय यास गादीवर बसवलें. प्रधानकीचीं सूत्रें रामरायानें आपल्या हातीं ठेवलीं. तिघां भावांनीं जरी राज्यवृद्धीचे अतिशय प्रयत्न केले तरी सदाशिवरायाला वागविण्याबाबत या तिघांत मतभेद माजले व त्याची मजल रामरायाविरुद्ध बंड होण्यापर्यंत गेली. पुढें राक्षसतागडीच्या लढाईंत रामराय मारला गेल्यावर तिरुमल्ल हा प्रधानकीच्या पदावर आला. यानें सदाशिवरायाला फार त्रास देऊन चंद्रगिरीस बंदींत ठेवलें. पुढें याच्याच प्रोत्साहनामुळें व्यंकटपति देवराय नांवाच्या याच्या मुलानें सदाशिवरायाचा खून केला. यानें विजयानगर ही राजधानी बदलून पेंणुकोंडा येथें नेली. वयाच्या नव्वदाव्या वर्षी ( १५७० त ) गादीवर येतांच यास मुसल्मानांच्या स्वाऱ्यांचा फार त्रास झाला. यानें आपल्या राज्याचे कर्नाटक, तामिळ व तेलगू असे तीन सुभे पाडून आपल्या तीन मुलांना त्यांजवर सुभेदार नेमलें.

**तिरुमलार्य** ( स. १६४५–१७०६ )—एक कानडी कवि. याचा जन्म श्रीरंगपट्टण येथें झाला. हा चिक्कदेवराजाचा मंत्री होता. मदुरेच्या नायकाची पत्नी मंगम्मा हिचाहि हा बरेच दिवस मंत्री होता. याला तिरुमल्ल अयंगार असेंहि म्हणतात. याचा भाऊ सिंगरार्य हाहि कानडी कवि होता. याचे ग्रंथ—अप्रतिम वीरचरित, चिक्कदेवरायविजय, चिक्कदेवराजवंशावलि, चिक्कदेवराजशतक. शिवाय चिक्कदेवराजाच्या नांवावर असणारे चिक्कदेवराजबिन्नप व गीतगोपाळ याचेच दिसतात.

**तिरुवल्लुवर**—एक तामिळ कवि. प्रख्यात कवियित्री अव्हेयर हिचा भाऊ. मैलापूर येथील वल्लुवर नामक गृहस्थानें यास वाढविलें. तेथें हा विद्वान् झाला. पुढें वयांत आल्यावर हा मदुरा शहरीं गेला व राजदरबारांतील ४९ पंडितांस यानें जिंकलें. हा हीन जातीचा असतांहि यास तामिळ विद्यालयांत येऊं देत. इतकेंच नव्हे तर तेथें त्याचा सत्कारहि करीत. त्यानें कुरळ म्हणून एक ग्रंथ तामिळ भाषेंत लिहिला. तामिळ भाषेंतील सर्व ग्रंथांत याची रचना सर्वोत्कृष्ट मानिली आहे. दक्षिण हिंदुस्थानांत सदर ग्रंथ फार प्रसिद्ध आहे. एलिसनें याचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. वल्लुवर यानें त्यास वाढवून विद्या शिकविली म्हणून याच्या नांवापुढें त्याचें नांव जोडलें असावें असें दिसतें. नीतिविषयपर याची कविता पुष्कळ असून यानें आपल्या इतर भावंडांप्रमाणेंच लग्न केलें नव्हतें असें म्हणतात.

**तिरुज्ञान संबंदर**—एक तामिळ कवि. चिदंबर शहराजवळील शियली (काली) या गांवीं हा जन्मला. याचें गोत्र कौंडिण्य. बापाचें नांव शिवपादहृदय व आईचें भगवती. याचें नांव आळुदैय पिल्ले; परंतु देवीनें त्याला प्रत्यक्ष दूध पाजल्यानें तिरुज्ञानसंबंदर (ज्ञानामुळें देवाशीं ज्याचा संबंध आला तो) हें नांव त्यास मिळालें. यानें मदुरेच्या पांडय राजाला जैन धर्म सोडून पुनः सनातनधर्मी बनविलें. यानें सर्व तामिळ प्रांतांत हिंडून शैव पंथाचा प्रसार केला व बौद्ध धर्माचा पाडाव केला. याचें लग्न झाल्यावर मंडपांत एक दैवी अग्नि उत्पन्न झाला व तेथेंच वधूवरें व इतर सर्व लोक स्वर्गास गेलीं. यावरून मंडप पेटून त्यांत सर्व जळालीं असें दिसतें.

आद्य शंकराचार्यांच्या सौंदर्यलहरींतील द्रविड शिशु म्हणजे तिरुच होय. भक्तविलास, शिवभुजंग, शिवानंदलहरी या काव्यांतहि त्याचा उल्लेख आहे. त्यावरून आचार्यांच्यापूर्वी हा होऊन गेला, म्हणजे ७ व्या शतकाच्या आधीं झाला.

दक्षिण हिंदुस्थानांत शैव समाजांत त्याचें नांव फार पूज्य मानितात. सर्व शैव, विशेषतः अब्राह्मण शैवसमाज त्याला फार श्रेष्ठ व त्याच्या ग्रंथाला वेदतुल्य समजतो.

**तिरोडा**— मध्यप्रांत. भंडारा जिल्ह्यांतील ही उत्तरेकडची तहसील आहे. क्षेत्रफळ १,३२८ चौरस मैल. या तहशिलींत १३ जमीनदाऱ्या असून त्यांचें क्षेत्रफळ ७२० चौरस मैल आहे. मालगुझारी जमिनीपैकीं ७६ चौरस मैल सरकारी जंगल आहे. या तहशिलींतील मुख्य पीक म्हटलें म्हणजे भात हें होय. इतर पिकें जवस, हरबरा आणि डाळी हीं होत.

तिरोडा हें तहशिलीचें मुख्य ठिकाण असून बंगाल-नागपूर रेल्वेचें एक स्टेशन आहे. स्टेशनपासून हें गांव एक मैल असून नवीन वस्ती स्टेशनच्या आसपास होत आहे.

**तिलक कामोद**—हा राग खमाज थाटांतून उत्पन्न होतो. या रागाच्या आरोहांत धैवत स्वर वर्ज्य आहे व अवरोह संपूर्ण आहे; म्हणून याची जाति षाडव-संपूर्ण होय. याचा वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. या रागाचा गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानतात. हा क्षुद्रगीताई असून याचें चलन वक्र आहे. याचें स्वरूप बऱ्याच ठिकाणीं देस व सोरट या रागासारखें भासतें. या रागांत दोनहि निषाद लागतात. तसेंच अवरोहांत ऋषभ स्वर वक्र होतो. गांधारावरून षड्जास येऊन मिळणें हें या रागाचें रक्तिदायक वैशिष्टय आहे. त्याचप्रमाणें निषाद स्वरावर होणारा अपन्यास मधुर लागतो.

**तिलंग**—हा राग खमाज थाटांतील जन्यरागांपैकीं एक आहे. याच्या आरोहावरोहांत ऋषभ व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत, म्हणून याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर गांधार व संवादी निषाद आहे. गानसमय रात्रीचा दु॰ रा प्रहर मानितात. यास कोणी सार्वकालिक समजतात. हा एक क्षुद्रगीताई राग आहे.

**तिलोशिका**—एक बौद्ध विहार. हा विहार नालंदापासून पश्चिमेस २० मैलांवर होता. राजा बिंबिसाराच्या शेवटच्या वंशजानें हा मोठा विहार प्रथम बांधला. तीन मजली दालनांचे चार चौक, उंच गच्च्या व मोठमोठ्या वाटा या विहारांत असून सर्व ठिकाणाहून येथें मोठे पंडित लोक येऊन राहत. ह्यूएनत्संगाला या ठिकाणीं १,००० वर महायानी पंथाचे अनुयायी आढळले. त्या वेळीं विद्वान् बौद्ध पंडित प्रज्ञाभद्र या मठांत राहत होता.

**तिवारी, दुर्गाप्रसाद आसाराम** (१८८७-१९३९)—एक मराठी कवि. हे जातीनें कान्यकुब्ज ब्राह्मण. यांचे आजे उत्तर हिंदुस्थानांतून इकडे आले. जळगांव हें ह्यांचें राहावयाचें ठिकाण. यांनीं इंग्रजी, गुजराथी, हिन्दी व मराठी या भाषांचा अभ्यास केला. यांचीं 'मराठ्यांचीं संग्रामगीतें' अत्यंत लोकप्रिय असून शालेय पुस्तकांत त्यांतील उतारे घेतले आहेत.

यांनीं लहानमोठीं अठरा पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यांपैकीं मुख्य: १ संग्रामगीतें (भाग १-२), २ मधुरा काव्य, ३ काव्यकुसुमांजलि, ४ काव्यरत्नमाला, इत्यादि.

**तीर्थंकर**—जैन धर्मांतील सर्वश्रेष्ठ पुरुष. तीर्थंकर म्हणजे अवतार नव्हत. चोवीस तीर्थंकर म्हणजे एकाच आत्म्याचे किंवा परमात्म्याचे चोवीस अवतार नव्हत. चोवीस निरनिराळे आत्मे आपल्या आध्यात्मिक प्रगतीसाठीं अनेक योनी फिरत होते आणि शेवटीं कोणत्या तरी योनींत असतां त्यांस श्रेष्ठ प्रकारचें ज्ञान होऊन त्यांनीं तीर्थंकरास योग्य असें आचरण ठेवलें आणि तीर्थंकर ही पदवी लाखों वर्षांनीं निरनिराळ्या काळीं पावले. तीर्थंकरांस योग्य आचार ठेवणें व पूर्णत्वास पावणें ही गोष्ट फार कठिण असल्यामुळें लाखों योनी फिरतां फिरतां व आत्मविकास पावतां पावतां कोणत्या तरी योनींत असतां लाखों वर्षांत एकाच ती गोष्ट शक्य होते. किती जीवांपैकीं एक जीव तीर्थंकर होतो हें पाहावयाचें झाल्यास कोणत्याहि कालांतील कोटिकोट्यवधि मनुष्यादि प्राण्यांच्या योनी घ्याव्यात आणि त्यांत विद्याधर, देव, असुर, यक्ष, इत्यादिकांच्या योनींतील संपूर्ण लोकसंख्या मिळवावी व त्यास लाखोंनीं गुणावें म्हणजे जो गुणाकार येईल त्यापैकीं एकच व्यक्ति तीर्थंकरपदास पावली आहे. तीर्थंकरत्व म्हणजे अंतिम श्रेष्ठत्व असल्यामुळें तीच व्यक्ति पुन्हां अवतरेल हें शक्यच नाहीं. तर दुसरा कोणता तरी आत्मविकासार्थ प्रयत्न करणारा आत्मा लक्षावधि वर्षांनीं यश पावेल.

मोक्षप्राप्तीस तीर्थंकर झाले पाहिजे असें मुळींच नाहीं. शिवाय मोक्षप्राप्तीस कारण होण्याइतकें शील किंवा तपश्चर्या नसली तरी

उत्तम कुलीं जन्म, स्वर्गास जाणें व तेथें कांहीं लक्ष वर्षें राहणें हीं सुखें प्राप्त होतातच. एवढेंच नव्हे तर चुकलेल्या मार्गानें तपश्चर्या केली तरी स्वर्गादि फळें मिळतातच. तीर्थंकर ही जैनधर्मांत विशेष महत्त्वाची व्यक्ति होय. तीर्थंकर म्हणजे धर्मतीर्थाचे प्रवर्तक. त्यांना मति, श्रुति, अवधि, मनःपर्यय आणि केवलज्ञान अशीं पांच ज्ञानें होतात. त्यांपैकीं पहिलीं तीन जन्मतःच असतात. बाकीचीं दोन क्रमानें होत जातात. तीर्थंकर गर्भात आल्यापासून मोक्षास जाईपर्यंत त्यांचे पांच प्रकारचे उत्सव होत असतात. त्यांस पंचकल्याणिक म्हणतात. तीर्थंकरांच्या गर्भावस्थेंत असतांना (इंद्राज्ञेनें) होणारा उत्सव गर्भकल्याणिक, जन्मल्यावर इंद्र त्यास मेरुपर्वतावर अभिषेक करतो तो जन्मकल्याणिक, दीक्षाग्रहणकालचा दीक्षाकल्याणिक, केवलज्ञानकालचा केवलज्ञानकल्याणिक व मोक्षप्राप्तीनंतरचा मोक्षकल्याणिक हे ते पांच उत्सव होत. तीर्थंकरास केवलज्ञान झाल्यानंतर इंद्राच्या आज्ञेनें कुबेर, वगैरे देव येऊन समवशरणाची (दिव्य सभामंडपाची) रचना करतात. तेथें मध्यसिंहासनावर विराजमान होऊन तीर्थंकर सर्व लोकांना उपदेश देतात. महाराष्ट्रांतील प्रत्येक जैनमंदिरांत केवलज्ञान प्राप्त झाल्यानंतर शुक्लध्याननिमग्न अशा तीर्थंकरांच्या मूर्ती स्थापन केलेल्या असतात. पार्श्वनाथ, अनंतनाथ, वृषभनाथ, चंद्रप्रभ, महावीर यांच्या प्रतिमा जैनमंदिरांतून विशेष आढळतात.

ऋषभ (आदिनाथ), अजितनाथ, संभवनाथ, अभिनंदननाथ, सुमतिनाथ, पद्मप्रभनाथ, सुपार्श्वनाथ, चंद्रप्रभनाथ, पुष्पदंत, शीतळनाथ, श्रेयांसनाथ, वासुपूज्य, विमलनाथ, अनंतनाथ, धर्मनाथ, शांतिनाथ, कुंथुनाथ, अरनाथ, मल्लिनाथ, मुनिसुव्रत, नमिनाथ, नेमिनाथ, पार्श्वनाथ व महावीर किंवा वर्धमान हे चोवीस तीर्थंकर होत.

**तीर्थपात्र**—(फॉट). ख्रिस्ती लोकांत बाप्तिस्मा देण्याच्या वेळीं उपयोगांत आणावयाचें पात्र. पूर्वी मोठमोठया मनुष्यांस बाप्तिस्मा देतांना या पात्रांत बुडवावें लागत असे. त्यामुळें हें एका स्वतंत्र इमारतींत ठेवीत असत. आठव्या शतकापासून लहान मुलांसच बाप्तिस्मा देण्याची पद्धत पडली व त्यामुळें हें पात्र लहान लहान होत हल्लीं केवळ एका मोठ्या पेल्याच्या आकाराचें असतें. पूर्वी हें एका पिंपाएवढें असे. हें पूर्वी पांच खांबांवर बसविण्यांत येत असे. पण आतां बहुतेक एकच खांब असतो. वरील पात्र बहुतेक स्थानिक दगडाचें, पण कधीं कधीं संगमरवरी किंवा आलाबास्टरचें गुळगुळीत केलेलें असतें. याचा आकार पंधराव्या शतकांत अष्टकोनी असे, पण आतां बहुधा वाटोळा किंवा चौकोनी असतो.

**तीळ**—[लॅटिन १ सिसामम इंडिकम, २ गिझोटिया ओलिफेरा]. तेलाकरितां जगांतील उष्णकटिबंधांतील सर्व प्रदेशांत दरवर्षी या पिकाची लागवड होते. याचें मूलगृह आफ्रिकेंतील असून तें सुंडा बेटांतून आलें असें वनस्पतिशास्त्रज्ञ म्हणतात. परंतु अथर्ववेदांत व तदुत्तर ग्रंथांत तिल ह्याचा अर्थ तीळ किंवा तिळाचें झाड (ज्याच्यापासून चांगलें तेल निघतें असें) असा आहे. ह्याचा उडिदांबरोबर नेहमीं उल्लेख केला जातो. तैत्तिरीय संहितेमध्यें हीं दोन्ही धान्यें हेमंत व शिशिर या ऋतूंत होतात असें म्हटलें आहे. तिळाच्या झाडाचीं चिपाडें जळणाच्या उपयोगी येत व तिळाचा अन्नाकरितां (तिलौदन) उपयोग होई. तिळाचीं बहुतेक नांवें संस्कृतसंभव आहेत. यावरून तीळ हिंदुस्थानांतीलच असावा. हिंदुधर्मशास्त्रामध्यें मकरसंक्रांतींत तिलभक्षण व तिलपात्रदान यांचें फार महत्त्व आहे.

तिळाची बहुतेक सर्वत्र मुख्य पीक म्हणून लागवड करतात. परंतु संयुक्त प्रांतांत व कांहीं ठिकाणीं ज्वारी, बाजरी, व कापूस यांबरोबर मिश्र पीक म्हणूनहि करतात.

तिळाचें तेल घाण्यांतून काढतात. हें तेल शुद्ध, गढूळ, पिवळसर अथवा काळया रंगाचें असतें. याला वास नसतो. भुईमुगाच्या तेलाशीं या तेलाचें नेहमीं मिश्रण करतात. हिंदुस्थानांत याचा खाण्याकरितां, अंगास लावण्याकरितां, साबण बनविण्याकरितां व दिव्यांत जाळण्याकरितां उपयोग करतात. याचा तुपांत भेसळ करण्याकरितांदेखील नेहमीं उपयोग करतात. इंग्लंडांत मुख्यत्वेंकरून याच तेलाचा साबण करतात. याचे पुष्कळ गुण ऑलिव्ह तेलासारखे आहेत व याचा ऑलिव्ह तेलासारखाच उपयोग होतो. पांढऱ्या तिळाच्या तेलापेक्षां काळया तिळाचें तेल औषधोपयोगी असतें असें तज्ज्ञ म्हणतात. या तेलाचा हिंदुस्थानांतील अत्तरें बनविण्याच्या कामींदेखील फार उपयोग करितात. तेल काढल्यानंतर जी ढेप उरते ती गुरांना घालतात व दुष्काळाच्या दिवसांत गरीब लोक ढेपीचा अन्नाऐवजीं उपयोग करितात.

**तीक्ष्णदंती**—(रोडेनशिआ- कुरतडणारे प्राणी). हा एक सस्तन प्राण्यांचा वर्ग असून यांच्या शरीरांत फक्त पुढील जातीचे दांत असतात: १ छेदक दांत, २ सुळयांच्या आधींचे दांत व सुळे. यांच्या शरीरांत श्वदंत मुळींच नसतात. सुळ्यापूर्वींच्या व सुळेदांतास अग्रभागीं सपाट किंवा गांठीसारखा भाग असतो व त्यांचा उपयोग त्यामध्यें अन्न धरून घासण्याकरितां होतो. छेदक दांत लांब असून ते एका मृदु पदार्थापासून उत्पन्न होतात व त्यामुळें ते एकसारखे पुन्हां तयार होऊन वर येत असतात. यांचे मुख्यतः दोन वर्ग करण्यांत येतात: १ सिंप्लीसिडेन्टाटा (सरलदंती)- या वर्गांत उंदीर, खारी, वगैरे येतात व त्यांच्या

प्रत्येक जबड्यांत फक्त दोन छेदक दांत असतात. २ डुप्लिसी-डेन्टाटा (द्विदन्ती)— यामध्यें ससे, वगैरे प्राणी येतात. यांस खालच्या जबड्यांत दोन व वरच्या जबड्यांत चार छेदक दांत असतात.

**तुकाबाई भोंसले**—ही शहाजी राजाची द्वितीय पत्नी. शिवाजीच्या जन्मानंतर एक-दोन वर्षांत शहाजीनें दुसरें लग्न तुकाबाईशीं केलें. हिचा मुलगा एकोजी. ही मूळ मोहित्यांच्या घराण्यांतील. हिचा भाऊ सुप्याचा संभाजी मोहिते. मोहिते घराणें शिवाजीच्या विरोधकांत होतें. ही शहाजीची आवडती राणी होती म्हणतात.

**तुकाराम** (१६०८–१६४९)—हा विख्यात महाराष्ट्रीय संत व कवि देहू येथें शके १५३० मध्यें जन्मला. उपनांव मोरे असून आंबले किंवा आंबीले असेंहि आडनांव आढळतें. याचें आजोळ लोहगांवीं भोसे यांच्याकडे होतें. याच्या वडिलांचें नांव बोल्होबा व आईचें कनकाई. बोल्होबाच्या आठव्या पिढींतील मागील पुरुष विश्वंभर यानें देहूस विठ्ठलाचें देऊळ बांधलें होतें. तुकारामास वडील व धाकटा असे दोन भाऊ होते. हा मधला. मोरे हे कुणबी असून वाण्याचा धंदा करीत. पूर्ववयांत तुकारामानें दुकानाचें कामकाज व एकंदर संसार उत्तम रीतीनें केला.

तुकाराम १७ वर्षांचा झाला तेव्हां त्याचे आईबाप निवर्तले. वडील बंधूच्या पत्नीचाहि याच वेळीं अंत झाला. यामुळें मुळांतच विरक्त असलेला वडील बंधु अधिक विरक्त होऊन तीर्थयात्रेस निघून गेला; व त्याच्या कुटुंबाचा भार यावर पडला. याच सुमारास दुष्काळ पडून चार-पांच रुपयांस शेर धारण झाली (१६३०–३२). तुकारामाचीं गुरेंढोरें अन्नावांचून पटापट मरण पावलीं. तुकारामाच्या पहिल्या बायकोनें अन्न-अन्न म्हणून प्राण सोडला. याचा मुलगाहि याच सुमारास वारला. नंतर याचें दुसरें लग्न झालें. याची दुसरी बायको जिजाबाई निव्वळ व्यावहारिक बुद्धीची असल्यामुळें तुकारामास तिजपासून सुख मिळेना. याचा परिणाम तुकारामाचें लक्ष प्रपंचांतून पूर्णपणें निघालें. जगाची नश्वरता व कष्टमय स्थिति याची त्याला जाणीव होऊन सहजच परमार्थाकडे त्याची दृष्टि वळली.

तुकारामानें आपल्या विठोबाच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला व तो आपला सर्व काळ भागवतधर्मीय ग्रंथांच्या अध्ययनांत, भजनांत, कवित्व करण्यांत व ध्यानधारणेंत घालवूं लागला. भंडाऱ्या डोंगरावर तुकारामानें एकनाथी भागवताचीं १,००० पारायणें केलीं. त्याची बायको कर्कशा होती, तरी ती त्याला तेथें भाकरी पोहोंचविण्याची स्वतः व्यवस्था करी. भजनांत व अध्ययनांत काळ व्यतीत होत असतां साक्षात्काराचा अनुभवहि त्याला येऊं लागला. भंडाऱ्यापेक्षांहि निवांत अशा भामचंद्राच्या डोंगरावर उपाधि टळावी म्हणून तो गेला असतां तेथें त्याची समाधि लागून त्याला ईश्वरी साक्षात्कार झाला, नामदेवानें पांडुरंगासहित येऊन तुकारामाला दर्शन दिलें व कवित्व करण्याचा मार्ग दाखविला, अशी आख्यायिका आहे.

केशवचैतन्य हा तुकारामाचा मोक्षदाता सद्गुरु होय. पण त्यानेंहि यास नामदेवाप्रमाणें स्वप्नांतच साक्षात्कार दिला.

ज्ञानेश्वरमहाराजांनीं भागवतधर्माचा पाया घातला व तुकाराममहाराजांनीं त्यावर कळस चढवून भागवतधर्माची इमारत पूर्णत्वास नेली, असें जें भागवत मंडळी म्हणतात तें खरोखरच सत्य आहे.

अंत्यजापासून तों थेट ब्राह्मणापर्यंत सर्वांना समान लेखून भेदाभेदाच्या अमंगळ भ्रमाचा विटाळ होऊं न देतां, "तुका म्हणे, एका देहाचे अवयव" या वचनाप्रमाणें सर्व जगताला एकच विराट पुरुष मानणारीं वेदवचनें भागवतधर्मानें प्रत्यक्ष कृतींत उतरविलीं. भक्तीसारख्या सुलभ आत्मशुद्धीच्या व नाम सर्व-मुखीं करून मन एकाग्र करण्याच्या साधनाचा या धर्मानें मार्ग दाखविला व "मुखीं नाम हातीं मोक्ष" अशी स्वतः ग्वाही देऊन भक्तिरसाचा मोठा पूर वाहविला. तुकारामानें या कार्याचा कळस करून अखिल महाराष्ट्रसमाज व अॅकवर्थसारखे पाश्चात्य धर्मजिज्ञासूहि भक्तीच्या चंद्रभागेंत नाहविले. त्यांत त्या काळीं रामेश्वरभट्ट वाघोलीकरासारखे वैदिक कर्ममार्गी, कर्मठ पण प्रामाणिक ब्राह्मणहि होते व सालोमालोसारखे तोतये पोटभरू साधूहि होते. रामेश्वरभट्टास वेदगुपित अंत्यजापर्यंत नेऊन पोहोंचविणें खरोखरच अब्राह्मण्य वाटलें. परंतु तुकारामाच्या विश्व-व्यापक भागवतधर्माच्या झेंड्याखालीं येतांच त्याची समजूत पटली. पण हें काम नुसत्या तोंडच्या उपदेशानें पार पडलें नाहीं. रामेश्वरभट्टानें अभंगांच्या पोथ्या तुकारामास इंद्रायणींत बुडवि-ण्यास सांगितलें. तुकारामानें ब्राह्मणास ईश्वरमूर्ति समजून त्याची आज्ञा शिरोधार्य केली व स्वहस्तें अभंगांच्या बाडांना इंद्रायणींत बुडवून स्वतः १३ दिवस तेथें निर्वाण मांडलें व प्रत्यक्ष पांडुरंगानें वर येऊन स्वतः वह्या वर धरून परत तुकारामास दिल्या. याबद्दल खुद्द तुकारामाचे अभंग आहेत. बिचारा रामेश्वरभट्ट लीन होऊन तुकारामचरणीं नम्र झाला. तुकाराम सदेह वैकुंठास गेला अशी जुन्या काळापासून भाविकांची समजूत आहे. कांहीं संतवाङ्मयाभ्यासक समजतात कीं, त्यानें जलसमाधि घेतली.

तुकारामाचे अभंग सुमारें सहा ते आठ हजार उपलब्ध आहेत. यांशिवाय श्लोक, पदें व ओव्याहि आहेत. अभंगांत भक्तीची परमोच्च स्थिति दृष्टीस पडते. यांशिवाय प्रचलित सामाजिक

दोपांवरहि यानें तडाखे ओढले आहेत. त्यामुळें याच्या अभंगांचा फार मोठा प्रचार आबाल-वृद्धांच्या तोंडीं आहे.

"फुटो हें मस्तक, तुटो हें शरीर। नामाचा गजर सोडूं नये।" अशा याच्या निश्चयी चारित्र्याचा व अभंगांतील शिकवणुकीचा महाराष्ट्रांतील सामान्य जनतेवर फार परिणाम झाला आहे. महाराष्ट्रांतील स्त्री, शूद्र व अस्पृश्य समाज धर्माच्या एका निश्चित व अचल भूमिकेवर आहे याचें श्रेय तुकारामाला आहे.

हिंदुधर्मीयेतर देखील तुकारामाचे अभंग व वचनें आपल्या उपासनेंत घेतात. सर्व धर्मांना जोडणारा तो एक दुवा आहे असें म्हणतां येईल. तुकारामाच्या अभंगांच्या गाथा अनेक झाल्या आहेत; व तुकाराम-वाङ्मयाचा अभ्यास करणारे जुनेनवे पंडितहि अनेक आहेत.

**तुका ब्रह्मानंद** (स. १६५०)—एक मराठी संतकवि. शिवाजीमहाराजांच्या कारकीर्दींत विश्वब्राह्मण (सुवर्णकार) कुलामध्यें तुका ब्रह्मानंद या नांवाचा एक मोठा विद्वान् योगी होऊन गेला. हा सातारा येथें राहत असे. याच्या वडिलांचें नांव नागनाथ असून उपनांव कर्मार होतें. म्हणून पूर्ववयांत याला तुका नागनाथ कर्मार असें म्हणत. उपनयन झाल्यावर याच्या वडिलांनीं याच्याकडून वेदाध्ययन, संस्कृत व्याकरणशास्त्र व अलंकारशास्त्र यांचा अभ्यास करविला.

वडिलांच्या पश्चात् याच्याकडे सरकार-कचेरींतील पोतदारीचें काम आलें. पुढें शिवाजीमहाराजांच्या अनुज्ञेनें यानें ब्रह्मानंदस्वामींच्या अनुग्रहानें संन्यासदीक्षा घेतली. ब्रह्मानंदांनीं याचें 'तुका ब्रह्मानंद' नांव ठेविलें. त्या आश्रमांत यानें हठयोगाचें परिपूर्ण अध्ययन करून प्रस्थानत्रयादि वेदांतग्रंथांचें परिशीलन केलें.

हा उत्तम कवि होता. यानें भर्तृहरिकृत शतकत्रयावर समश्लोकी टीका केली आहे. शांकरभाष्यटीका, वेदांतरहस्य, सतशतीची टीका, प्रणवाष्टक, नाटकरामायण, गीतगोविंद समश्लोकी, विश्वकर्ममाहात्म्य, वगैरे ग्रंथ यानें लिहिले आहेत. प्रणवाष्टक व गीतगोविंद हे दोन ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेले आहेत. तुका ब्रह्मानंद यानें माहुली येथें कृष्णा-वेण्या संगमावर आपला देह ठेविला. त्या ठिकाणीं याची समाधि, घाट व देवालयहि बांधलें आहे.

**तुकारामबावा वर्दे** (स. १५७१)—एक मराठी कवि. सारस्वत ब्राह्मण. वडिलांचें नांव अमृतराव. गोवें येथील रहिवासी. यानें भर्तृहरीच्या तीनहि शतकांच्या दशकांना वेगळालीं नांवें देऊन समश्लोकी भाषांतर केलें आहे. शतकत्रयास सुभाषितरत्नावली असें जुनें नांवहि यानें कायम ठेवलें आहे. वामनपंडित व हा समकालीन होते. पण याची कविता त्यापूर्वीची असावी.

**तुकाविप्र**—एक मराठी कवि व सत्पुरुष. देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. सातारा जिल्ह्यांतील रहिमतपूरचा जोशी-कुलकर्णी. गुरु विप्रनाथस्वामी. सकाळीं कृष्णातीरीं स्नानसंध्या व दुपारीं भागवतपुराण असा याचा कार्यक्रम असे. याच्या घराण्यांत अनेक विद्वान् व अधिकारी पुरुष होऊन गेले. याच्या घराण्यास मोंगलाईत अंजनावती नांवाचा गांव इनाम आहे. याला रंगनाथ स्वामी निगडीकर याची कविता विशेष आवडे. याचें देहावसान अंजानवतीस झालें. याचा प्रयाणशक राजवाडे यांनीं १६९० ठरविला आहे. पण शके १७०१ मध्यें मुरूड येथें कीर्तन केल्याचा निर्देश सांपडला आहे (भा. इ. सं. मं. त्रै. १२ ले. २८). यानें तुकारामाचा सव्वा लक्ष अभंग रचण्याचा संकल्प पुरा केला असें म्हणतात. याचे कांहीं अभंग तुकारामाच्या अभंगांत मिसळून गेले आहेत.

याचे ग्रंथ—आत्मसिंधु, सुदामचरित्र, भानुदासचरित्र, कालियामर्दन, आरती कीर्तनरंगाची, इ..

**तुकोजी पवार**—देवासच्या पवार घराण्याचा संस्थापक. हा धारच्या आनंदराव पवार याचा चुलतभाऊ असून देवासकर म्हणून प्रसिद्ध आहे. याच्या पित्याचें नांव काळोजी. तुकोजीला जिवाजी म्हणून एक भाऊ होता. हे दोघे १७२५ त बाजीरावाबरोबर मध्य हिंदुस्थानांत आले. माळव्याच्या मुलखाची वांटणी झाली तेव्हां या दोघांस देवासचें राज्य मिळालें (२२ जुलै १७३२). त्यावरून याच्या कामगिरीची कल्पना येते.

**तुकोजी भोसले** (१७२८-१७३५)—तंजावरचा एक राजा. सरफोजीनंतर त्याचा कनिष्ठ बंधु तुकोजी हा तंजावरच्या गादीवर बसला.

तुकोजी हा राजकारणपटु व कुशाग्रबुद्धि असून मोठा विद्यामिलापी होता. यास संस्कृत, तामिळ, मराठी, फार्सी, इत्यादि भाषा अवगत होत्या. त्यामुळें दूरदूरचे विद्वान् पंडित व फकीर लोक याच्या भेटीस येत असत. अद्यापि तंजावर येथें एक अशी दंतकथा प्रसिद्ध आहे कीं, कोणी एक फकीर अरबस्तानांतून तुकोजीस भेटावयास आला आणि त्यानें आपला प्रसाद म्हणून त्यास 'नागिणी' आणि 'पद्मिणी' अशा दोन तरवारी नजर केल्या. त्या तलवारी मद्रास येथील सरकारी पदार्थसंग्रहालयामध्यें पुष्कळ वर्षें होत्या. तुकोजीस एकंदर सहा स्त्रिया होत्या. त्यास चार औरस पुत्र व एक दासीपुत्र होता. तुकोजीनंतर त्याचा मुलगा बाबासाहेब व्यंकोजी ऊर्फ एकोजी हें नांव धारण करून गादीवर बसला.

**तुकोजी होळकर** (१७२५-१७९७)—हा होळकराच्या वंशांतील जानोजीचा मुलगा. हा मल्हारराव होळकराचा (दत्तक) पुत्र असें आपणांस शिक्क्यांत व कागदपत्रांतहि म्हणवितो;

आणि या गोष्टीस इतर संमति दर्शवितात. प्रत्यक्ष दत्तविधान झालेलें नव्हतें.

अहल्याबाईनें होळकरांच्या राज्याचा बंदोबस्त पाहावा आणि यानें सेनापति होऊन मराठी राज्याची कामगिरी पार पाडावी अशी कामाची विभागणी होती. पण यामुळें घोड्यावर बसणारा एक आणि लगाम धरणारा दुसरा असें होई. ही दुःस्थिति पेशव्यांना व यास पुष्कळ जाणवे, पण अहल्याबाईनें आपल्या हातांतील सत्ता केव्हांहि सोडली नाहीं. पण यामुळें याला स्वतंत्रपणें कारभार केव्हांहि करतां आला नाहीं. इकडे नाना फडणिसाच्या आणि तिकडे बाईच्या करड्या आज्ञेंत राहून मुलूखगिरीवर सैन्याचा खर्च भागविण्याचे दिवस राहिलेले नव्हते; त्यामुळें तुकोजी नेहमीं ओढगस्त स्थितींत असे.

यामुळें बाई व तुकोजी यांचे बरेच खटके उडत. पेशव्यांचीहि तुकोजीच्या हातांत एकमुखी कारभार असावा अशी इच्छा होती. पण अहल्याबाईची दूरदृष्टि यांत यशस्वी झालेली दिसते.

तथापि याला स्वतःचा स्वतंत्रपणें कारभार कधींच करतां आला नाहीं. कारभाऱ्यांच्या हा आहारीं जात असे. आपला कारभारी नारो गणेश (शौचे) याची यानें केलेली विटंबना केव्हांहि समर्थनीय ठरत नाहीं. हा दारूहि अत्यंत पीत असे. तसेंच राजकारणासारख्या महत्त्वाच्या बाबतींतहि क्षुद्र रखेल्यांच्या मर्जीप्रमाणें वागण्याची याची वृत्ति अगदींच अश्लाघ्य होती. शिवाय याची *पत्नी रखमाबाई हिचें व अहल्याबाईचें जमत नसे.*

सन १७६९ पासून महादजी शिंद्यांबरोबर हा पांच वर्षे दिल्लीकडे होता. पण यानें नजीबखानास पाठिंबा दिल्यामुळें शिंद्याचा सर्व बेत फसला. तसेंच पुढें स. १७७१ मध्यें नजीबाचा पुत्र झबेताखान मराठ्यांच्या अटकेंत असतां त्यास यानें सोडलें. स. १७७४ मध्यें हा दक्षिणेंत आला. हा पहिल्यापासून राघोबाच्या पक्षाचा. त्याप्रमाणें बारभाईच्या कारस्थानाच्या वेळींहि दादास मिळाला; पण पुढें फुटला. स. १७७७–७८ च्या सुमारास याला हरिपंत फडक्यांच्या मदतीस कर्नाटकांत जाण्यास सांगितलें. पण तें यानें नाकारलें व मोरोबाचा पक्ष प्रबळ केला. पण यास महादजीच्या द्वारां नानानें आपणाकडे वळविलें. स. १७७८ मध्यें हा महादजी व हरिपंत यांच्याबरोबर इंग्रजांशीं लढण्यास गेला होता. स. १७८० मध्यें महादजीबरोबर गुजराथेंत इंग्रजांवर चालून गेला होता. स. १७८१ सालच्या बोरघाटांत इंग्रजांशीं झालेल्या लढाईंत सैन्याचें आधिपत्य हरिपंत व तुकोजी यांकडे होतें. १७८६ मधील टिपूवरील लढाईंत यानें चांगला पराक्रम केला. स. १८८७ सालीं हा उत्तरेकडे महादजीच्या मदतीस म्हणून गेला, पण यानें त्याच्या कामांत सारख्या अडचणी उत्पन्न केल्या. स. १७९० मध्यें इस्माईल बेगच्या गांवें यानें लुटल्यानें महादजीचें व याचें वांकडें आलें.

डी बायने शिंद्याचा सेनापति होता. तेव्हां यानें शिंद्यांवर वरचष्मा करण्याकरितां ड्युड्रेनेक या फ्रेंच अधिकाऱ्यास नोकरीस ठेवून कवायती फौज तयार करण्यास आरंभ केला (स. १७९२). शिंदे–होळकरांची तेढ ह्या सुमारास विकोपाला गेली व मराठेशाहीचा आब उघडपणें नाहींसा झाला. दोन्ही फौजांची स. १७९२ सालीं कोट्याच्या उत्तरेस लाखेरीवर मोठी लढाई झाली व याच्या सैन्यास हार खावी लागली. तेव्हां यानें चिडून शिंद्यांचें उज्जयनी शहर लुटलें. पुढल्या वर्षी याला अर्धांगवायु झाला (स. १७९३). तथापि हा खर्ड्याच्या लढाईंत पेशव्यांनीं मुद्दाम बोलविल्यावरून हजर होता (१७९४). पुढें अहल्याबाई वारली. व हा ता. १५–८–१७९७ रोजीं पुणें येथें मरण पावला.

याचा वडील मुलगा काशीराव हा जन्मतांच हातापायानें लुळा होता व धाकटा मल्हारराव माल्ह होता. यशवंतराव व विठोजी हे याचे दासीपुत्र होत.

**तुंगतामापक यंत्र**— (हायप्सॉमीटर). या यंत्रानें पर्वतादिकांची उंची मोजतां येते. वातावरणाचा दाब कमी झाला असतां पाणी किंवा कोणताहि द्रव कमी उष्णमानावर वाहूं लागतो. द्रवाच्या या तत्त्वाचा उपयोग करून पर्वतादिकांची उंची मोजतां येते.

*एका उष्णमानमापकासभोंवार पंचपात्राकृति दोन जाकिटें* बसविलेलीं असतात. मधल्या पंचपात्रांत खालील पात्रांतील उकळणाऱ्या पाण्याची वाफ येऊं देतात; नंतर ती वाफ बाहेरच्या जाकिटांत जाते व तेथून ती वाफ हवेंत जाते. दुसरें पंचपात्र वापरण्याचें कारण–हें जर नुसतें एकच जाकिट वापरलें तर बाहेरच्या थंड हवेंत त्याच्या बाजू थंड होऊं शकतात व त्यामुळें उष्णतेच्या उत्सर्जनानें उष्णमानमापकावर परिणाम होऊं शकतो. या प्रकारचा परिणाम होऊं नये, याकरितां दुसऱ्या जाकिटाची योजना केलेली असते. याप्रमाणें कढणाऱ्या पाण्याच्या बाफेंत उष्णमानमापक ठेवून त्यावरून पर्वताच्या पायथ्याशीं आणि पर्वताच्या शिखरावर कोणतें उष्णमान असतें हें काढतात व या दोन उष्णमानांच्या साहाय्यानें पर्वताची उंची काढतां येते.

दोन स्थळांतील उंचीनें अंतर काढावयाचें असल्यास त्या स्थळावर वायुभारमापक यंत्रांतील येणाऱ्या पाऱ्याच्या उंचीच्या घातांकाच्या अंतराला ६०,००० नें गुणावें असा स्थूल नियम आहे. ६०० फूट उंचीवर गेल्यास साधारणपणें उत्कलन बिंदु एक अंश खालीं येतो. हवेच्या विचित्रपणामुळें ह्या पद्धती सध्यां उपयोगांत आणीत नाहींत.

**तुंग-तिकोना**—मुंबई प्रांत, मोर संस्थान, पवनमावळ तालुक्यांतील दोन किल्ले. कोळवणपासून तुंग सुमारें ६ मैल व तिकोना ४ मैल आहे.

**तुंगभद्रा**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक मोठी नदी. म्हैसूरच्या कडूर जिल्ह्याच्या सरहद्दीवर पश्चिम घाटांत गंगामुळा येथें तिचा उगम झाला असून तुंगा आणि भद्रा हे दोन लहान प्रवाह मिळून तुंगभद्रा नदी झाली आहे. तुंगभद्रा, म्हैसूर संस्थान आणि मुंबई प्रांत यांची सरहद्द असून पुढें मुंबई व मद्रास यांचीहि सरहद्द आहे. शिमोगा जिल्ह्यापासून पश्चिमेस तुंगभद्रेला कुमुद्वती व वरदा या दोन नद्या मिळतात आणि दाक्षिणेस हरिद्रा नांवाची नदी मिळते. हरिहर या ठिकाणीं तुंगभद्रेवर दोन पूल आहेत. विजयानगरच्या राजांनीं तुंगभद्रेला बल्लारी जिल्ह्यांत हंपी येथें पुष्कळ धरणें व पाट करून ठेवलेले आहेत. त्यांचे कांहीं अवशेष अद्याप दृष्टीस पडतात. तुंगभद्रा ज्या ठिकाणीं कृष्णेला मिळाली आहे तेथें तुंगभद्रेच्या मोठ्या धरणाचें पाणी कर्नूळ कडाप्पा कालव्याला सारखें मिळत आहे.

**तुंगस्थ**—( टंगस्टेन-वोल्फ्राम ). एक धातु. परमाणुभारांक १८४. ह्याचा रंग राखी असून याला अतिशय चकाकी असते. पोलादाइतका हा धातु कठिण असून मंज( मँगेनीज )पेक्षांहि हा वितळविण्याला कठिण आहे. ह्याच्या खनिज धातूंमध्यें हा खटतुंगस्थ( कॅल्शियम टंगस्टेट ) किंवा लोखंड आणि मंज ह्याचें तुंगस्थ म्हणून असतो. विजेचे दिवे करण्यासाठीं ह्याचा उपयोग होतो. त्याचप्रमाणें अतिशय वेगानें फिरणारीं हत्यारें तयार करण्यासाठीं लागणारें पोलाद तयार करण्यासाठीं याचा उपयोग करतात. या धातूचा शोध १७८१ सालीं लागला.

**तुंगी किल्ला**—मुंबई, ठाणें जिल्हा, कर्जत तालुक्यांत नेरळच्या पूर्वेस १२ मैलांवर खानदस नांवाच्या खेड्याजवळ एका टेंकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. उंची २,०१९ फूट.

**तुंगू लोक**—मंगोल-तातीर वंशाची एक शाखा तुंगू या नांवानें प्रसिद्ध आहे. हे तुराणी जातीचे लोक पूर्व आशिया खंडांत पुष्कळ पसरलेले आहेत. मांचू लोकहि या लोकांपैकींच होत. या जातीची लोकसंख्या ५५,००० पेक्षां थोडी जास्त असून त्यांपैकीं १०,००० अमूर नदीच्या कांठीं व बाकीचे सैबेरियांत राहतात.

तुंगू लोकांचे चेहरे मंगोलियन लोकांप्रमाणेंच असतात. त्यांची सरासरी उंची ५ फूट ४ इंच असून नाक लहान, तोंड रुंद, ओठ पातळ, व डोळे लहान, लांबट व काळे असतात. त्यांच्यापैकीं कांहीं शेतीचा धंदा करितात. पुष्कळ लोक जंगलांत शिकारीचा धंदा करून राहतात. ते दीर्घोद्योगी, विश्वासू, विनयशील, स्वावलंबी व मोकळ्या मनाचे असून, जंगलांतील एकांतस्थान सोडण्यास ते कधींहि तयार नसतात. प्रतिकूल परिस्थितींत सुद्धां ते आनंदी राहतात.

**तुघलख घराणें** ( १३२१-१३८८ )—या घराण्याचा संस्थापक ग्यासुद्दिन हा गुलाम घराण्यांतील सुलतान बल्बन याचा गुलाम होता. तो स्वपराक्रमानें चढत दिल्लीचा पातशहा झाला. हा हिंदूंवर जुलुम करी, पण यानें राज्य वाढविलें. दिल्लीजवळ तुघलखाबाद नांवाचा किल्ला बांधला. त्याच्यामागून त्याचा पुत्र महंमद हा गादीवर आला. त्याच्या अचाट कल्पना असत. तो चांगला विद्वान् होता. पण तसाच क्रूरहि होता. त्याची लहर संभाळली नाहीं कीं तो माणसांचे फार हाल करी. आपल्या विक्षिप्तपणामुळें यानें राज्य बरेंच घालविलें. त्याच्यानंतर त्याचा चुलतभाऊ फिरोझशहा हा फार चांगला राजा होऊन गेला. त्यानें सर्व प्रजेला फार सुख दिलें; व पूल, कालवे, दवाखाने, शाळा, इ. स्थापून आपलें नाव केलें. पण यानें हिंदूंवर आपल्या पूर्वजांप्रमाणेंच जुलूम केला. फिरोझनंतर बरेच राजे तुघलख घराण्यांत होऊन गेले. पण कोणी फार काळ नांदले नाहींत. पंजाब, बंगाल, गुजराथ, माळवा, वगैरे प्रांत स्वतंत्र झाले. तैमूरची दिल्लीवर स्वारी होऊन राज्याचा फार नाश झाला. शेवटचा महंमद बादशहा १४१२ त वारल्यानंतर लोदी घराणें कांहीं थोडा काळ राज्यावर होतें. नंतर सय्यद घराणें आलें.

**तुघ्रलबेग**—सेल्जुक सुलतानाचा हा नातू. महमद गझनीकर याच्या पदरीं हा चाकरीस होता. १०३८ सालीं सुलतान मसाऊद याचा पराजय करून तुघ्रलबेगनें निशापूरचा बादशहा असा किताब धारण केला. त्यानें इराक प्रांत जिंकून बगदाद शहरहि आपल्या ताब्यांत घेतलें. खलीफा कामबिल्लास यानें तुघ्रलबेगास खोरासानच्या सुलतानचीं वस्त्रें दिलीं व त्यास मुसलमानांचा गुरु नेमिलें. त्यामुळें तुघ्रलनें खलीफास आपली बहीण दिली. कांहीं काळानें सेल्जुक घराण्याच्या तीन निरनिराळ्या शाखा होऊन हम्दान, किरमाण, आणि रूम अथवा अनातोलिया या तीन ठिकाणीं त्यांनीं संस्थानें स्थापिलीं. इ. स. १०६३ त तुघ्रलबेग सत्तर वर्षांचा होऊन मरण पावला. त्याला मुलगा नसल्यानें त्याचा पुतण्या गादीवर बसला.

**तुटका ओठ**—एखाद्या मनुष्याचा वरचा ओठ मध्यभागीं दुभंगलेला असतो व ही चीर केव्हां केव्हां टाळूपर्यंतहि पोंचलेली असते. कांहीं मुलें जन्मतः अशा तुटक्या ओठांचीं जन्मतात व कांहींमध्यें ही फट दुहेरी असते. ही विकृति बरी करण्याकरितां फटीच्या बाजूचे दोन्ही ओठांचे कांठ कापून ते एकत्र जोडून सांधले जातील इतका वेळ दाबून एकत्र ठेवणें अवश्य असतें.

**तुंड्रा**—हा अमेरिका व युरेशिया यांच्या उत्तर ध्रुवप्रदेशाकडील समुद्रकिनाऱ्यालगत पसरलेला सपाट व निर्वृक्ष प्रदेश आहे. हा प्रदेश वर्षातील निम्याहून अधिक काल बर्फानें गोठलेला असतो; परंतु उन्हाळ्यांत येथील बर्फ वितळून हा सर्व प्रदेश डासांनीं व्यापलेला, दलदलीचा, व गवताळ बनतो.

**तुणतुणें**—एक वाद्य. लांकडाचा ओंडा सुमारें दोन वीत लांब व सुमारें वीतभर व्यासाचा घेऊन तो कोरून त्याची कड सुमारें पाव इंच जाडीची आहे असें एक पोकळ कडें तयार करतात. त्याची एक बाजू कातड्यानें मढवितात. ह्याच्या मध्यभागीं एक बारीक भोंक पाडतात व बाहेरच्या बाजूनें ह्या भोंकावर एक लांकडाची पातळ चकती बसवितात. ह्या चकतींतून तार ओंवून ती कातड्याच्या भोंकांतून बाहेर काढून दुसऱ्या तोंडाशीं आणितात. ह्या तोंडाशीं सुमारें पायाच्या अंगठ्याइतक्या जाडीचा सुमारें दीड वीत लांब असा बांबूचा तुकडा कड्याला बसविलेला असतो व त्यास एक खुंटी, दुसऱ्या टोंकापासून सुमारें दोन तीन बोटांवर बसविलेली असते; तिला ती खालून आणिलेली तार गुंडाळतात. ही तार खुंटीनें ताणून हवा तितका उंच स्वर करतात व मग गाणाऱ्याशीं सूर धरण्याकरितां ती तार एका काडीनें सारखा आघात करून वाजवितात. गोंधळी, लावण्या व पोवाडे म्हणणारे, भुत्ये, वगैरे हलकीं गाणीं गाणारे आपल्या साथीस स्वर धरण्याकरितां ह्याचा उपयोग करतात. काडीच्या आघातानें तारेचा जो 'तुण्तुण्' असा आवाज होतो त्यावरून ह्यास 'तुणतुणें' हें नांव पडलें आहे.

**तुतनखामेन** (ख्रि. पू. १४००)—एक फारोहा राजा. प्राचीन ईजिप्तच्या १८ व्या राजघराण्यामधील शेवटल्या तीन राजांपैकीं हा एक राजा आहे. या राजाचें थडगें थेबीजजवळच्या किंग्ज व्हॅलीमध्यें लॉर्ड कार्नरव्हॉन आणि हॉवर्ड कार्टर यांनीं शोधून काढलें व उघडलें (१९२२). या थडग्यांत दोन खोल्या असून, पहिल्या खोलीच्या पूर्व अंगास लागून दुसरी मुख्य खोली, म्हणजे थडगें असलेली खोली आहे. या दुसऱ्या खोलींत जाण्याच्या दरवाजाजवळ, दोन मोठे पुतळे संरक्षक शिपायांप्रमाणें उभे आहेत. पुढें कार्टर आणि ईजिप्शिअन सरकार यांच्यामध्यें मतभेद होऊन ईजिप्शियन सरकारनें सरकारी रीत्या हें थडगें पुन्हां १९२४ त उघडलें. त्या थडग्यांत असलेली मृताची पेटी १९२५ सालीं उघडण्यांत आली. त्यांत एक १५ वर्षांच्या मुलाचें मसाला भरलेलें प्रेत सांपडलें. शिवाय या थडग्यांत फार मौल्यवान् आणि महत्त्वाच्या वस्तू सापडल्या.

**तुतारी**—लहानसा कर्णा म्हणजेच तुतारी होय. कर्णा पाहा. इंग्रजींत याला ट्रंपेट म्हणतात. हें वृंदसंगीतांतील एक तोंडानें फुंकून वाजवावयाचें पितळेच्या नळीचें केलेलें वाद्य आहे. यांतील स्वर बदलण्याकरितां याला तीन किल्ल्या असतात. त्या दाबल्या म्हणजे आवाजांत फेरबदल होतो.

**तुतिकोरीन**—मद्रास, तिनवेल्ली जिल्हा. श्रीवैकुंठम् तालुक्यांतील एक बंदर व शहर. कॉरोमांडल किनाऱ्याच्या दक्षिण टोंकाला हें आहे. मद्रास शहरापासून रेल्वे मार्गानें ४४३ मैल लांब आहे. मद्रास इलाख्यांत हें दुसऱ्या दर्जाचें बंदर असून साउथ इंडियन रेल्वेचें अखेरचें स्टेशन होय. १५४० सालीं प्रथमतः या ठिकाणीं पोर्तुगीज वसाहत होती. नंतर १६५८ सालीं पोर्तुगीजांपासून डच लोकांनीं तुतिकोरीन घेतलें. स. १७८२ त इंग्रजांनीं डच लोकांना हांकललें. स. १८१८ त पुन्हां डच लोकांकडे तुतिकोरीन आलें. तथापि १८२५ सालीं इंग्रजांनीं तुतिकोरीन काबीज केलें व आपलें ठाणें कायमचें बसविलें. तेव्हांपासून इंग्रजांकडेच असून फार महत्त्वाचें शहर बनलें आहे. पालमकोट येथें दिवाणी कचेरी होती ती तुतिकोरीन येथें आणली आहे.

सन १८६६ मध्यें येथें म्युनिसिपल कमिटीची स्थापना झाली. व्यापारी पेठ म्हणून मद्रास इलाख्यांत दुसऱ्या दर्जाचें व हिंदुस्थानांत ६ व्या दर्जाचें शहर गणलें जातें. या ठिकाणीं सुताच्या व कापूस दाबण्याच्या गिरण्या आहेत.

तुतिकोरीन बंदर चांगलें आहे. पण तोंडाशीं पाण्याची खोली फार कमी आहे. मुख्य निर्यात जिन्नस म्हणजे कच्चा कापूस, जनावरें, कॉफी, सूत, कापड, सोनामुखी, कांदे, औषधें, तांदूळ, कच्चीं व कमावलेलीं कातडीं, मसाले व चहा. आयात जिन्नस—विलायती कापड व सूत, पेट्रोलियम, यंत्रें, लोखंडी सामान, इमारतीचें लांकूड, वगैरे. सिलोन (कोलंबो) शीं तुतिकोरीनचें दळणवळण पुष्कळ असून मनुष्यांचें जाणें-येणें जलमार्गानें अतिशय आहे. जवळ दोन दीपगृहें आहेत. लो. सं. ७५,६१४.

**तुतीचें झाड**— [वर्ग—मोरासी. जाति मोरस]. मलबेरी झाडांचा किंवा झुडुपांचा हा एक वर्ग आहे. काळी, पांढरी व तांबडी अशा तीन जाती आहेत. ज्या तीन जाती हिंदुस्थानांत होतात त्यापैकीं मोरस इंडिका ही प्रसिद्ध आहे. मोरस आल्वा हें मूळचें उत्तर आणि पश्चिम आशियामधील आहे. याची लागवड १,१०० फूट उंचीवर उत्तर हिंदुस्थानांत व सिंधु नदीच्या पलीकडील भागांत करतात. पंजाबांत आणि काश्मीरमध्यें मुख्यतः याच झाडांवर रेशमी किडे पोसतात. याचीं फळें खातात. तुतीला फेब्रुवारीमध्यें फुलें येतात व मे आणि जून महिन्यांमध्यें फळें तयार होतात. एक घनफूट लांकडाचें वजन १९ ते २८ शेर असतें. हें लांकूड इमारतीला लावतात. तसेंच याच्या बोटी, घरगुती लांकडी सामान आणि शेतकीचीं अवजारें करतात.

दुसऱ्या जातीला मोरस इंडिका, तुन, नुनि, छोटाकिंबू, मेंकप, सिगटोक, करन, जोकुल, अंबोर, कंविलिपूच, हिप्पल-नेराली व पोस अशीं नांवें आहेत. ही जात खालच्या हिमालय व ब्रह्मदेशांतील शान डोंगर (४,००० फुटांवर) येथें आढळते. तसेंच नीलगिरी पर्वतावर हीं झाडें लावलेलीं आहेत.

तिसऱ्या जातीचें झाड मूळ चीनमधील होतें. पूर्वे तुर्कस्तानांत याचा कागद करण्याच्या कामीं उपयोग करीत असत. परंतु कागदाचा रंग चांगला नसतो. याच्या सालीपासून एक प्रकारचा तंतु निघतो, त्यापासून ज्याला चिनी चर्मपत्र म्हणतात तें तयार करतात.

**तुंबड्या लावणें**—(कपिंग). सुक्या तुंबड्या लावणें म्हणजे त्वचेवर एक पैसा ठेवावा व त्यावर कापूर ठेवून तो जळतांना त्यावर एक लहान पोकळ पात्र हळूहळू पालथें ठेवावें; म्हणजे कापूर विझून चामडी वर फुगून येऊन ते भांडें त्वचेस चिकटतें. यासच घटिकाचूषण म्हणतात. हें भांडें चिकटण्याचें कारण हवेचा दाब उष्णतेमुळें नाहींसा होऊन भांडें चिकटतें व त्वचेच्या पृष्ठभागीं खोल जागेंतील साखळलेलें रक्त येतें व आंतील दाह, वेदना शमतात. कांचेच्या हंडीसारख्या आकाराच्या पात्राचाहि उपयोग करतात व कापराऐवजीं स्पिरिटचे थेंब त्या कांचपात्रांत जाळून तें पात्र त्वचेस चिकटून बसेल अशा बेतानें त्वचेवर पूर्ण स्पिरिट जळून जाईतों लावतात. मान, कमर, छाती, पोट अगर जेथें दर्द असेल त्या ठिकाणीं ह्या घटिकाचूषणानें वेदनाशमन करतां येतें. एकापेक्षां अधिक पात्रें म्हणजे चार–पांचहि जरूर तर लावावींत.

तुंबड्या (ओल्या) लावून रक्त काढणें म्हणजे वरच्याप्रमाणें पृष्ठभागीं रक्त आणून त्यावर थोड्या, चोंचावल्याप्रमाणें बारीक व पुष्कळ जखमा शस्त्रानें अगर विशिष्ट यंत्रानें करून पुनः तेथें घटिकाचूषणक्रियेनें कांचपात्र लावलें म्हणजे हवेचा दाब नसल्यामुळें रक्त बाहेर शोषलें जाऊन पात्र रक्तानें भरून जातें. पात्रें रक्तानें भरल्यावर तीं काढावीं. कारण तीं सुटण्याच्या बेतांतच असतात. आणखी रक्त काढवून वेदना व दाह यांचें शमन व्हावें अशी इच्छा असल्यास पुनः त्याच जागीं कांचपात्रें लावून आणखी रक्त काढावें.

या कृत्यास जरा चलाखी व सराव पाहिजे. थोड्या वेळांत अंग न भाजतां त्या पात्रांत एकदम जितकी अधिक निर्वातता करतां येईल तितका पृष्ठभाग अधिक आकर्षिला जाऊन पात्र तितकें चांगलें चिकटतें; व वेदना व रोगशमनाचें कार्य तितकें अधिक चांगलें घडतें. घटिकाचूषण (सुक्या तुंबड्या) म्हणजे एक चांगला सुलभ व गुणकारी घरगुती उपाय आहे.

**तुंबरु (तुंबुरु)**—कश्यप व प्राधा यांच्या गंधर्वपुत्रांतील एक. याची स्त्री रंभा होती. हा शापानें दंडकारण्यांत विराध राक्षस झाला होता. हा चैत्रमासीं सूर्यासमागमें संचार करणाऱ्या गणांतील गंधर्व होय. हा नारदाबरोबर गायन करून परमेश्वर-स्तवन करतो असें नेहमी वर्णन येतें.

**तुमकूर**—म्हैसूर संस्थान, ईशान्येकडील जिल्हा. क्षे. फ. ४,१५८. या भागांत नारळ आणि ताड यांची झाडें पुष्कळ आहेत. ईशान्य भाग पाटाच्या पाण्यामुळें फार सुपीक आहे. हवा चांगली व निरोगी आहे. रागी, हरभरा व तांदूळ हीं मुख्य पिकें होत. लोखंड व चुना हीं खनिजें सांपडतात. या जिल्ह्यांत लोखंडाचे व साखरेचे कारखाने आहेत. बहुतेक व्यापार लिंगायत लोकांकडे आहे. तुमकूर तालुक्यांत जयमंगली नदी उगम पावते. देवराय दुर्गाच्या दक्षिणेस तलाव आहेत.

तुमकूर शहर म्हैसूर रेल्वेचें स्टेशन आहे व हें बंगळूरच्या वायव्येस ४३ मैलांवर आहे. शहर कांतराज अरसू नांवाच्या एका राजपुरुषानें स्थापलें. पूर्वी गांवाला तट होता. जवळच एक मोठा तलाव आहे.

तुमकूर प्रदेशावर मागें, गंग, पल्लव, राष्ट्रकूट आणि होयसळ यांची एकामागून एक सत्ता होती. विजयानगर राजाचें देवराय-दुर्ग येथें मुख्य ठाणें होतें. विजापूरकरांच्या अमलांत त्यांचा सुभेदार म्हणून शहाजीच्या ताब्यांत हा भाग होता. १७६६ सालीं मराठ्यांनीं हा घेतला. सिरा हें इतिहासप्रसिद्ध शहर आहे.

**तुमसड**—ही एक अतिशय अधाशी माशी असून हिची नांगी भयंकर वेदनाकारक दंश करते. ही किडे, वगैरे खाऊन निर्वाह करते. यांचें घरटें एखाद्या ढोलींत, वगैरे असून कागदाचें केल्यासारखें दिसतें.

**तुमसर**—मध्यप्रांत, भंडारा जिल्हा आणि तहशिली यांतील एक शहर. हें बंगाल-नागपूर रेल्वेवर भंडाऱ्यापासून २७ मैल व मुंबईपासून ५७० मैल लांब आहे. तुमसरला म्यु. कमिटी १८६७ सालीं स्थापन झाली. हें व्यापारी गांव असून सिवनी व बालाघाटा जिल्ह्यांतील माल याच ठिकाणीं येतो. तुमसरच्या आसपास तांदुळाचें उत्पन्न उत्तम प्रकारचें असून पुष्कळ असतें. कापसाचें कापड विणून तयार करणें हा तेथील लोकांचा मुख्य धंदा समजला जातो. कापडाची घडामोड पांच–सात लक्ष रु. पर्यंत जाते.

**तुरटी**—पांढरा स्वच्छ पारदर्शक खड्याचा, तुरट गो पदार्थ. ह्याच्या खड्याचे स्फटिक नियमबद्ध आणि वाटेल त्या आकाराचे तयार करतां येतात. हा पदार्थ नित्याच्या उपयोगांतील असून, औषधांत, कापड रंगविण्याच्या कामीं, कातडें

क्रमविण्यासाठीं आणि कागदाच्या कारखान्यांत त्याचा पुष्कळ उपयोग होतो.

रासायनिकदृष्ट्या हा पालाश गंधकित ( पोटॅशियम सल्फेट ) आणि स्फटगंधकित ( अॅल्युमिनियम सल्फेट ) ह्या दोन संयुक्तांचा बनलेला आहे.

त्यामुळें अॅलम ह्या शब्दाला रसायनशास्त्रांत विशिष्ट अर्थ आला असून दोन गंधाकितांच्या द्विलवणास हा शब्द वापरण्यांत येऊं लागला आहे. पोटॅशियमच्याऐवजीं सोडियम, अमोनियम सल्फेट व अॅल्युमिनियमच्याऐवजीं क्रोमियम, आयर्न सल्फेट हे घेऊन निरनिराळ्या तुरटी ( अॅलम्स ) तयार करतां येतात.

अलुनाइट, बाक्साइट, क्रियोलाइट, वगैरेपासून तुरटी तयार करतात. हिंदुस्थानांत फिटकारी, फटकिरी, शिब, क्षीक, फटकी, चंकचिन, इ. नांवें आहेत. बहार, पंजाब व कच्छ यांमध्यें कित्येक ठिकाणीं तुरटी तयार करतात. वरच्या ब्रह्मदेशांतहि तुरटी सांपडते; पण तेथें ती तयार केली जात नाहीं. एके काळीं चीनमधून तुरटी हिंदुस्थानांत येत असावी. हिंदुस्थानांत तयार होणाऱ्या मालाचें प्रमाण अनिश्चित आहे; परंतु दर वर्षास दोन हजार टनांपेक्षां अधिक तुरटी निघत नसावी. पण तेथील तुरटी आयात तुरटीइतकी पांढरी नसते.

तुरटीच्या क्षारांचा रंगाऱ्या व इतर औद्योगिक कामांत फार उपयोग होतो. ते पाण्यांत विरतात व त्यांची चव तुरट, आंबट व गुळचट असते. लिटमसवर त्यांचा परिणाम अम्लांसारखा होतो व त्यांचे समकोन अष्टकोनाकृति स्फटिक बनतात. तापविले असतां ते वितळतात व ही क्रिया चालू ठेविल्यास स्फटिकीभवनानें पाणी निघून जातें. क्षारावर फेंस येऊन त्याचा आकार वाढतो व शेवटीं पिठूळ भुकटी उरते. बाजारांत मिळणारी तुरटी ही पालाश ( पोटॅशियम ) धातूचा क्षार होय. पूर्वींचे लोक सोरा व तुरटी या दोहोंनाहि एकाच नांवानें संबोधीत असत. तुरटी तयार करण्याकरितां पुष्कळ खनिज पदार्थांचा उपयोग केला जातो. त्यांपैकीं तुरटीचा दगड, बॉक्साइट व क्रियोलाइट हे मुख्य आहेत.

तुरटीचे स्फटिक समकोन अष्टकोनाकृति असून, ती पाण्यांत पुष्कळ विरते. द्रावणाच्या योगानें लिटमस तांबडा होतो व द्रावण तुरट लागतें. रंग पक्का करण्याकरितां तुरटीचा उपयोग फार होतो. हातानें तयार केलेल्या कागदांना लावण्याचा रंग तयार करण्याकरितां व गढूळ द्रवपदार्थ स्वच्छ करण्याकरितां तुरटीचा उपयोग करतात. तसेंच औषधाकरितां, फोटोग्राफीमध्यें व शिरका शुद्ध करण्याकरितांहि तिचा उपयोग करतात.

**तुरा**—१. पूर्वीं शिरस्त्राणावर तुरा लावण्यांत येत असे. हा तुरा प्रत्येकाचा स्वतंत्र आकाराचा व स्वरुपाचा असे. त्यामुळें त्या त्या सरदाराची ओळख पटत असे व पुढें पुढें ही प्रत्येक सरदाराची ओळखण्याची खूणच बनली. पुढें शिरस्त्राणें प्रचारांतून गेल्यावर हा तुरा हारावर, किंवा मुकुटावर किंवा टोपीवर व ढालीवरहि बसविण्यांत येऊं लागला. सरदाराच्या राजचिन्हापेक्षांहि त्याचा तुरा हेंच त्याचें वैशिष्ट्य व मुख्य चिन्ह समजण्यांत येऊं लागलें व तें अलीकडे राजचिन्हामध्यें सामील करण्यांत आलें आहे.

२. हा लावणीचा एक प्रकार आहे. यांत प्रकृति (स्त्री) हिच्यावर पुरुषाचें वर्चस्व वर्णिलेलें असतें. यांतील नायक हा नायिकेच्या आर्जवांत असतो. या लावणीवाल्यांच्या डफावर तुरा लावलेला असतो. तुऱ्याच्या उलट कलगीची लावणी होय. कलगीतुरा पाहा.

**तुराणी**—हें नांव मूळ इराणी भाषेंतील इराणीतर लोकांना पूर्वीं योजीत असत. हे लोक फिरत्या टोळ्या करुन मध्य आशियांत राहत असत. हल्लीं तुराणी हें नांव तुर्कीवंशांतील सर्व जमातींना लावतात. एकंदर तुराणी लोकांची लोकसंख्या ४,८०,००,००० असून त्यांपैकीं २,२०,००,००० (तुर्क, माग्यार व फिन ) युरोप खंडांत राहतात आणि बाकीचे आशिया खंडांत राहतात. त्यांच्या निरनिराळ्या भाषा एकाच भाषावंशांतून निघालेल्या असून मूळ भाषेला उरल-आल्ताई भाषावंश म्हणतात. तुराणी लोकांच्या ज्या अनेक पोटजाती आहेत, त्या मूळ एकाच वंशाच्या निरनिराळ्या शाखा असून तो मूळ वंश ऐतिहासिक काळाच्या अगदीं आरंभीं मध्य आशियांतील सपाट मैदानांत राहत असे. शारीरदृष्ट्या तुराणी वंशीय लोकांचा उत्तम नमुना मोंगोलियन जमात हा होय. उस्मानी लोक, मग्यार लोक आणि बल्गार लोक या तीन जातींच्या तुराणी लोकांचा अधिक श्रेष्ठ संस्कृतीच्या लोकांशीं संबंध आल्यामुळें आणि आर्यवंशीय लोकांशीं विवाह होऊन मिश्रण झाल्यामुळें या तीन जातींच्या तुराणी लोकांमध्यें मूळच्या तुर्की वंशाचें शारीरिक वैशिष्ट्य फारसें राहिलें नाहीं. फिन लोक हे तर स्लाव्ह लोकांमध्यें बहुतेक पूर्ण मिसळून गेले आहेत. पॅन-तुरॅनियनिझम ही चळवळ १९१७ मध्यें रशियन राज्यक्रान्ति झाल्यानंतर विशेष जोर पावली असून, या चळवळीचा उद्देश ओटोमन तुर्क लोक आणि आशियांतील तुराणी लोक यांची राजकीय एकी घडवून आणणें हा आहे.

**तुरी**—एक जात. यांची एकंदर लोकसंख्या सु. एक लाख आहे. तुर अथवा भेरी वाजविणारे हे बहुधा गुजराथ प्रांत व त्यांतील संस्थानें यांतून आढळतात. त्यांच्या सांगण्यावरून ते भाटांचे वंशज असावे असे दिसते. यांच्यांत विधवेनें दिराशीं लग्न करण्याची चाल आहे. तुरी लोकांत घटस्फोट करतात. ते

दुसऱ्या जातीला मोरस इंडिका, तुन, नुनि, छोटाकिंभू, मेकप, सिगटोक, करन, जोकुल, अंबोर, कंबिलिंपूच, हिप्पल-नेराली व पोस अशीं नांवें आहेत. ही जात खालच्या हिमालय व ब्रह्मदेशांतील शान डोंगर (४,००० फुटांवर) येथें आढळते. तसेंच नीलगिरी पर्वतावर हीं झाडें लावलेलीं आहेत.

तिसऱ्या जातीचें झाड मूळ चीनमधील होतें. पूर्व तुर्कस्तानांत याचा कागद करण्याच्या कामीं उपयोग करीत असत. परंतु कागदाचा रंग चांगला नसतो. याच्या सालीपासून एक प्रकारचा तंतु निघतो, त्यापासून ज्याला चिनी चर्मपत्र म्हणतात तें तयार करतात.

**तुंबड्या लावणें**—( कपिंग ). सुक्या तुंबड्या लावणें म्हणजे त्वचेवर एक पैसा ठेवावा व त्यावर कापूर ठेवून तो जळतांना त्यावर एक लहान पोकळ पात्र हळूहळू पालथें ठेवावें; म्हणजे कापूर विझून चामडी वर फुगून येऊन तें भांडें त्वचेस चिकटतें. यासच घटिकाचूपण म्हणतात. हें भांडें चिकटण्याचें कारण हवेचा दाब उष्णतेमुळें नाहींसा होऊन भांडें चिकटतें व त्वचेच्या पृष्ठभागीं खोल जागेंतील साखळलेलें रक्त येतें व आंतील दाह, वेदना शमतात. कांचेच्या हंडीसारख्या आकाराच्या पात्राचाहि उपयोग करतात व कापराऐवजीं स्पिरिटचे थेंब त्या कांचपात्रांत जाळून तें पात्र त्वचेस चिकटून बसेल अशा बेतानें त्वचेवर पूर्ण स्पिरिट जळून जाईतों लावतात. मान, कमर, छाती, पोट अगर जेथें दर्द असेल त्या ठिकाणीं ह्या घटिकाचूपणाने वेदनाशमन करतां येतें. एकापेक्षां अधिक पात्रें म्हणजे चार–पांचहि जरूर तर लावावींत.

तुंबड्या (ओल्या) लावून रक्त काढणें म्हणजे वरच्याप्रमाणें पृष्ठभागीं रक्त आणून त्यावर थोड्यां, चोंचावल्याप्रमाणें बारीक व पुष्कळ जखमा शस्त्रानें अगर विशिष्ट यंत्रानें करून पुनः तेथें घटिकाचूपणक्रियेनें कांचपात्र लावलें म्हणजे हवेचा दाब नसल्यामुळें रक्त बाहेर शोषलें जाऊन पात्र रक्तानें भरून जातें. पात्रें रक्तानें भरल्यावर तीं काढावीं. कारण तीं सुटण्याच्या बेतांतच असतात. आणखी रक्त काढवून वेदना व दाह यांचें शमन व्हावें अशी इच्छा असल्यास पुनः त्याच जागीं कांचपात्रें लावून आणखी रक्त काढावें.

या कृत्यास जरा चलाखी व सराव पाहिजे. थोड्या वेळांत अंग न भाजतां त्या पात्रांत एकदम जितकी अधिक निर्वातता करतां येईल तितका पृष्ठभाग अधिक आकर्षिला जाऊन पात्र तितकें चांगलें चिकटतें; व वेदना व रोगशमनाचें कार्य तितकें अधिक चांगलें घडतें. घटिकाचूपण (सुक्या तुंबड्या) म्हणजे एक चांगला सुलभ व गुणकारी घरगुती उपाय आहे.

**तुंबरु (तुंबुरु)**— कश्यप व प्राधा यांच्या गंधर्वपुत्रांतील एक. याची स्त्री रंभा होती. हा शापानें दंडकारण्यांत विराध राक्षस झाला होता. हा चैत्रमासीं सूर्यासमागमें संचार करणाऱ्या गणांतील गंधर्व होय. हा नारदाबरोबर गायन करून परमेश्वरस्तवन करतो असें नेहमीं वर्णन येतें.

**तुमकूर**—म्हैसूर संस्थान, ईशान्येकडील जिल्हा. क्षे. फ. ४,१५८. या भागांत नारळ आणि ताड यांची झाडें पुष्कळ आहेत. ईशान्य भाग पाटाच्या पाण्यामुळें फार सुपीक आहे. हवा चांगली व निरोगी आहे. रागी, हरभरा व तांदूळ हीं मुख्य पिकें होत. लोखंड व चुना हीं खनिजें सांपडतात. या जिल्ह्यांत लोखंडाचे व साखरेचे कारखाने आहेत. बहुतेक व्यापार लिंगायत लोकांकडे आहे. तुमकूर तालुक्यांत जयमंगली नदी उगम पावते. देवराय दुर्गाच्या दक्षिणेस तलाव आहेत.

तुमकूर शहर म्हैसूर रेल्वेचें स्टेशन आहे व हें बंगळूरच्या वायव्येस ४३ मैलांवर आहे. शहर कांतराज असू नांवाच्या एका राजपुरुषानें स्थापलें. पूर्वीं गांवाला तट होता. जवळच एक मोठा तलाव आहे.

तुमकूर प्रदेशावर मागें, गंग, पल्लव, राष्ट्रकूट आणि होयसळ यांची एकामागून एक सत्ता होती. विजयानगर राजाचें देवरायदुर्ग येथें मुख्य ठाणें होतें. विजापूरकरांच्या अमलांत त्यांचा सुभेदार म्हणून शहाजीच्या ताब्यांत हा भाग होता. १७६६ सालीं मराठ्यांनी हा घेतला. सिरा हें इतिहासप्रसिद्ध शहर आहे.

**तुमसड**— ही एक अतिशय अधाशी माशी असून हिची नांगी भयंकर वेदनाकारक दंश करते. ही किडे, वगैरे खाऊन निर्वाह करते. यांचें घरटें एखाद्या ढोलींत, वगैरे असून कागदाचें केल्यासारखें दिसतें.

**तुमसर**— मध्यप्रांत, भंडारा जिल्हा आणि तहशिली यांतील एक शहर. हें बंगाल-नागपूर रेल्वेवर भंडाऱ्यापासून २७ मैल व मुंबईपासून ५७० मैल लांब आहे. तुमसरला म्यु. कमिटी १८६७ सालीं स्थापन झाली. हें व्यापारी गांव असून सिवनी व बालाघाटा जिल्ह्यांतील माल याच ठिकाणीं येतो. तुमसरच्या आसपास तांदुळाचें उत्पन्न उत्तम प्रकारचें असून पुष्कळ असतें. कापसाचें कापड विणून तयार करणें हा तेथील लोकांचा मुख्य धंदा समजला जातो. कापडाची घडामोड पांच–सात लक्ष रु. पर्यंत जाते.

**तुरटी**—पांढरा स्वच्छ पारदर्शक खड्याचा, तुरट गो पदार्थ. ह्याच्या खड्याचे स्फटिक नियमबद्ध आणि वाटेल त्या आकाराचे तयार करतां येतात. हा पदार्थ नित्याच्या उपयोगांतील असून, औषधांत, कापड रंगविण्याच्या कामीं, कातडें

प्रमाणें पगारी तुर्कांचा अरबांच्या सैन्यांत प्रवेश होत असावा; त्यामुळें ९ व्या शतकानंतर सर्वच परक्यांना तुर्क असें नांव एतद्देशीय देत असावेत (मध्ययुगीन भारत, भाग २ रा, पृ.१८०).

**तुर्क लोक**— राजकीय, भाषाविषयक, व मानववंशशास्त्रीय अशा तिन्ही दृष्टींनीं पाहिलें असतां तुर्क शब्दाचे तीन निरनिराळे अर्थ होतात. राजकीयदृष्ट्या तुर्क लोक म्हणजे तुर्कस्तानच्या सुलतनाच्या अमलाखालचे लोक असा अर्थ होतो. भाषेप्रमाणें पाहिलें असतां उरल-आल्ताईक भाषा बोलणाऱ्या लोकांना तुर्क लोक म्हणतात. मानववंशशास्त्रदृष्ट्या तुर्क लोकांचे विशेष शारीरिक गुणधर्म सांगतां येत नाहींत. कारण युरोपांत आल्यावर त्यांनीं मिश्रविवाह केले व त्याचप्रमाणें ख्रिस्ती मुलें घेऊन त्यांना भाषा, रीती, वगैरे बाबतींत तुर्क बनविलें. या कारणांमुळें अर्वाचीन तुर्क लोक शारीरिकदृष्ट्या युरोपांतील लोकांप्रमाणें आहेत. त्याचप्रमाणें त्यांनीं मध्य आशियांतहि केलें. यांनींच युरोपांत व हिंदुस्थानांत महंमदी धर्माची स्थापना केली.

अर्वाचीन शानतन शहराजवळ एक तुर्क नांवाची टेकडी होती. त्या टेकडीच्या नांवावरून तेथील असेना शाखेच्या लोकांचा चीनच्या इतिहासांत तुर्क नांवानें उल्लेख आहे. इ. स. ५६० च्या सुमारास तुर्क लोक ऑक्सस् नदीच्या कांठच्या प्रदेशांत येऊन इ. स. ५६७ त त्यांनीं पूर्व रोमचा सम्राट् दुसरा जस्टिन याच्याकडे आपला वकील पाठविल्याबद्दल उल्लेख सांपडतो. इ. स. १० व्या शतकांत तुर्क लोकांनीं गझनी येथें गझनी घराणें स्थापिलें व त्याच कालांत सेल्जुक लोकांचा उदय झाला. इ. स. १२१९ मध्यें मध्य आशियांतून युरोपकडे तुर्क लोकांची एक टोळी देश जिंकण्याच्या उद्देशानें आली. तिचें आधिपत्य चेंगीजखानाकडे होतें. त्यानें सर्व लहान लहान राज्यें जिंकलीं. तैमूरलंग हा तुर्क होता. तैमूरलंगाचें घराणें समरकंद येथून जिंकलेल्या प्रदेशाचा राज्यकारभार पाहत होतें. त्याच्या राज्यांत उत्तर अफगाणिस्तान, इराण, ट्रान्सऑक्झिआना व तुर्कस्तान हे प्रदेश होते. शैबानि नांवाच्या वंशानें तैमूरलंगाच्या घराण्याचा पाडाव केला. त्यांना उझबेग असें म्हणत. हल्लींच्या तुर्क साम्राज्याचें उत्पादक उस्मान घराणें असून तें खोरासानहून आशिया मायनरमध्यें आलें. आजपर्यंतच्या ज्या लोकांशीं त्याचा संबंध आला त्यांच्या चालीरीती तुर्क लोकांत दृष्टीस पडतात. इस्लाम धर्माचा स्वीकार करण्यापूर्वी त्यांनीं अंशतः तरी बौद्ध धर्म, अग्निपूजा व नेस्टोरियन-ख्रिस्ती धर्म स्वीकारला असावा. तुर्की अथवा तार्तार-तुर्की ही भाषा उरल-आल्ताईक भाषा विभागापैकीं एक आहे.

**तुर्क व कैको बेटें**— हा ब्रिटिश वेस्ट इंडियन द्वीपसमूह हायटी बेटाच्या उत्तरेस असून राजकीय दृष्ट्या जमेकाच्या ताब्यांत आहे. याचें क्षे.फ. १६५ चौ. मैल आहे, आणि लोकसंख्या ६,१४८ असून त्यापैकीं २१० गोरे लोक आहेत. या द्वीपसमूहाचें कैको बेटें आणि तुर्क बेटें असे दोन भाग आहेत. याची राजधानी ग्रॅंड टर्क बेट असून, त्याची लोकसंख्या १६९३ आहे. कैको द्वीपसमूहांत कॉकबर्न हें मुख्य बंदर आहे. या द्वीपसमूहाची हवा चांगली आरोग्यकारक आहे, परंतु येथें पाण्याची टंचाई आहे. येथील मुख्य धंदा मीठ तयार करणें हा असून कांहीं भागांत कापूस पिकवतात, आणि स्पंजहि येथें सांपडतो. मीठ, स्पंज, शिंपले व कापूस हे जिन्नस परदेशीं जातात. येथें शिक्षण मोफत आहे. या बेटांचा राज्यकारभार जमेकाच्या गव्हर्नरनें नेमलेला कमिशनर आणि एक लेजिस्लेटिव्ह बोर्ड यांच्या हातीं असतो. जमेकानें केलेले कायदे तुर्क आणि कैको या दोन्ही द्वीपसमूहांना लागू असतात. या बेटांत प्रथम बर्मुडी लोकांची वस्ती होती. पुढें स्पॅनियर्ड लोकांनीं त्यांना हांकून लावलें. १७९९ मध्यें हीं बेटें बाहामा बेटांना जोडण्यांत आलीं, आणि शेवटीं १८४८ मध्यें जमेकाच्या नियंत्रणाखालीं गेलीं.

**तुर्कस्तान**—युरेशियामधलें एक लोकसत्ताक राज्य. क्षेत्रफळ २,९६,१०७ चौ. मै.; पैकीं ९,२५७ चौ. मै. चा भाग युरोपांत व बाकीचा आशियामध्यें आहे. अंगोरा हें राजधानीचें ठिकाण. इस्तंबूल, स्मर्ना, कोनिया हीं मोठीं शहरें आहेत. देशांत अनेक प्रकारच्या खाणी आहेत; परंतु फार थोड्यांतून कामें चालू आहेत. मुख्य डोंगरांची रांग म्हणजे दक्षिणेंतील तौरूस होय. उच्च शिखराचा अरारट पर्वत पूर्वेस इराणच्या हद्दीवर आहे. कोरुह, टायग्रिस, सकार्या व किझिल या नद्या होत. मोठीं सरोवरें म्हणजे व्हान, टुझ व बेसेहीर हीं होत. शेतीहि मागासलेली आहे. परंतु आतां प्रगति झपाट्यानें होत आहे. फळें, मसाल्याचे पदार्थ, धान्यें, लोंकर, कातडीं, वगैरेंचा व्यापार चालतो. मच्छीमारी मोठ्या प्रमाणांत चालते.

इ. स. १३८९ मध्यें अमुरथ पहिला यानें, पश्चिमेकडे जाण्याची लाट ओटोमन लोकांत जोरानें पसरली असतां, आपली राजधानी आड्रियानोपल येथें नेली आणि पुढें सर्व्हियन लोकांचा पराभव केला. हाच तुर्कांचा युरोप खंडांत प्रवेश. तुर्कांची युरोपमध्यें चालू झालेली ही चाल अमुरथ याच्यामागून तशीच जोमानें चालू राहिली. १५२० ते १५६६ या काळात सुलेमान यानें व्हिएन्नावरुन जर्मनीपर्यंत आक्रमण केलें. १५७१ मध्यें मात्र या लाटेला जोराचा प्रतिरोध झाला. त्या सालीं लिपॅन्टो येथें स्पेननें तुर्कांचा पराभव केला, आणि पुढें १२५ वर्षांनीं १६९९ मध्यें कार्लोविनच्या तहानें तुर्कांना शरणागति घ्यावयास लावलें. १७३० मध्यें तुर्कांच्या सत्तेखालीं राहणाऱ्या ख्रिश्चन लोकांचा कैवार

मांसाहारी आहेत व दारूहि पितात. त्यांच्या मुख्य देवता उमिथा व हरिंद होत. त्यांचे उपाध्ये गुरुदास अथवा घेड ब्राह्मण असतात. ते मृताला पुरतात. आसामांतहि या नांवाची एक जात असून ते मूळचे छोटा नागपुराकडील अनार्य असावेत. हे लोक मजुरी करतात.

**तुरुंग**—गुन्हेगारांना ठेवण्याची जागा. इंग्लंडांत तुरुंगासंबंधीं सर्व व्यवस्था व अधिकार सरकारकडे आहेत. १८७७ पूर्वी स्थानिक तुरुंग स्थानिक संस्थांच्या ताब्यांत होते; आणि १८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत स्थानिक तुरुंगच फक्त होते. त्या तुरुंगांत दोष व दुर्गुण फार असत. सर्व सत्ता जेलरच्या हातीं असल्यामुळें ते शक्य तितका स्वतःचा स्वार्थ साधीत असत. त्यांना पगार नाममात्र असे. कैद्यांना व कैद्यांच्या भेटीला येणाऱ्या इसमांना खाद्यपेय पदार्थ विकून ते त्या फायद्यावर आपला चरितार्थ चालवीत असत. लहान-मोठे वयाचे इसम व स्त्रीपुरुष असे सर्व कैदी दिवसां एकत्र असत, आणि रात्रींहि नेहमीं पृथक् खोल्यांत असत असें नव्हतें. या सर्व आक्षेपार्ह स्थितीबद्दल जॉन हॉवर्डप्रभृति पुढाऱ्यांनीं चळवळ केल्यावर सरकारनें तुरुंगांची व्यवस्था आपल्या हातीं घेतली, नवे तुरुंग बांधले, व कैद्यांची वर्गवारी केली. कच्चे कैदी म्हणजे खटला सुरू होण्यापूर्वीचे कैदी, दिवाणी तुरुंगांतले ऋणको कैदी, कोर्टाचा अपमान हा गुन्हा केलेले कैदी, आणि गुन्हा शाबीत होऊन साधी किंवा सक्तमजुरीची कैद ही शिक्षा झालेले कैदी, इतके कैद्यांचे प्रकार ठरवण्यांत येऊन त्यांना वागवण्याचे नियम पुढीलप्रमाणें केले आहेत: (१) कच्चे कैदी यांना स्वतंत्र खोली व बैठक, खुर्चीटेबल असून घरचें अन्न आणण्याची परवानगी असते. आतेष्टांच्या भेटी घेणें व पत्रव्यवहार यांवर नियंत्रण नसतें. मात्र सर्व पत्रें तुरुंगाचे अधिकारी वाचतात व भेटींतलें बोलणें अधिकाऱ्यासमक्ष होतें. वकिलांना मात्र सल्लामसलत गुप्तपणें देण्याची मोकळीक असते. अशा कैद्यानें स्वखुषीनें कांहीं काम मागितलें तर तें काम करण्याची परवानगी त्याला मिळते. (२) गुन्हेगार कैद्यांचा एक वर्ग एक महिन्याहून अधिक व तीन वर्षांहून कमी कैदेची शिक्षा झालेल्या इसमांचा स्वतंत्र असून त्यांना चांगल्या वर्तणुकीबद्दल व चांगलें काम केल्याबद्दल एकषष्ठांश मुदतीइतकी कैद माफ होते. (३) तीन वर्षांहून अधिक सक्तमजुरीची कैद ही शिक्षा झालेल्या कैद्यांचा स्वतंत्र वर्ग असतो व त्यांचे तुरुंगहि निराळे असतात. त्यांना काम अधिक तसेंच कष्टाचे व शिस्तीचे नियम अधिक कडक असतात. याप्रमाणें इंग्लंडांत कैद्यांचे तीन वर्ग असतात. शिवाय १६ ते २१ वयाच्या बाल गुन्हेगारांना बोर्स्टल संस्थांत ठेवून तेथें सामान्य व धंदेशिक्षण देण्यांत येतें व त्यांचें वर्तन सुधारण्याचे विशेष प्रयत्न करण्यांत येतात.

हिंदुस्थानांत १८९४ चा प्रिझन्स ॲक्ट आणि १९०० सालीं पसार झालेला प्रिझनर्स ॲक्ट आहे. शिवाय स्टेट प्रिझनर्स रेग्युलेशन, मद्रास (१८१९), बंगाल (१८१८), स्टेट प्रिझनर्स ॲक्ट (१८५० व १८५८) यांप्रमाणें तुरुंग व कैदी यांबद्दलचे कायदे आहेत. स्टेट प्रिझनरबद्दलच्या कायद्यांनीं देशांत शांतता राहावी, बंडाळी होऊं नये, किंवा परकी शत्रूचें आक्रमण होऊं नये म्हणून एखाद्या इसमाला, कोर्टांत प्रत्यक्ष खटला न करतां चौकशीवांचून कैदेंत ठेवण्याचा आणि त्याची मालमत्ता जप्त करण्याचा अधिकार सरकारला दिला आहे.

**तुरुंगवास**—ही शिक्षा दोन प्रकारांची असते: १ सक्तमजुरीची कैद, व २ साधी कैद. साध्या कैदेच्या गुन्हेगारांचे तीन वर्ग असतात: अ वर्ग—या वर्गांतल्या कैद्यांना तुरुंगासंबंधींचे नियम लागू नसतात. त्यांना विशेष सवलती देऊन वागविण्यांत येतें. ब वर्ग—या दुसऱ्या वर्गांतील कैद्यांना तुरुंगासंबंधींच्या नियमांत कांहीं थोड्या सवलती दिलेल्या असतात. आणि क वर्ग—या वर्गांतील कैद्यांना तुरुंगासंबंधींचे सर्व नियम लागू असतात. हिंदुस्थानांतहि कैद्यांबद्दलचा असाच स्वतंत्र कायदा आहे.

**तुरुंबें**—मुंबई, ठाणें जिल्हा, साष्टी तालुक्यांतील एक बंदर. हें मुंबई शहरापासून ईशान्येस ३ मैलांवर आहे. हें लहानसें खेडें असून या ठिकाणीं जकातीचें ठाणें, एक मिठागर व एक पडकें पोर्तुगीज देऊळ आहे. व्यापारी घडामोड होते. मुख्य आयात जिन्नस गुरें, गोणपाट, गवत व साग हे असून, तांदूळ, मीठ, सरपण, गवत, इत्यादि निर्गत माल आहे.

**तुरुष्क**—सुमारें ८५० सालीं लिहिलेल्या सागरताल लेखांत 'तुरुष्क' असें एका प्रदेशाचें नांव सांगितलें आहे. तुरुष्क हा शब्द 'तुर्क' या शब्दापासून निघाला असावा. पण तुर्कांनीं इ. स. १० व्या शतकाच्या उत्तरार्धांत हिंदुस्थानांत प्रवेश केला. महाभारतांत तुरुष्क हा शब्द उपलब्ध नाहीं. भागवतांत सांपडतो. पण भागवत ग्रंथ ८ व्या शतकानंतर लिहिला गेला. स्मिथच्या मतें, तुरुष्क-तुर्क हें अरबांचें नांव असावें; पण श्री. चिं. वि. वैद्यांना हें मान्य नाहीं. अरबांना 'ताजिक' असें नांव आहे व प्रसंगीं बर्बर असेंहि म्हणत. पण ८५० च्या पूर्वी त्यांना तुरुष्क असें कोठेंच म्हटलेलें आढळत नाहीं. वैद्यांचा तर्क असा—इ. स. ६००-८००पर्यंत हिंदुस्थानांत वारंवार स्वाऱ्या करण्यांत अरबांचें सैन्य संपत आलें व त्यांना नवीन स्वारीकरितां तयार सैन्याचा तुटवडा पडूं लागला असावा. अशा वेळीं हिंदुस्थानांत म्हणजे सिंधमध्यें जें सैन्य अरबांतर्फे पाठविलें जात असावें त्यांत तुर्क लोकांचा भरणा विशेष होत असावा. आज ज्याप्रमाणें हिंदी सैन्य इंग्रजांच्या वतीनें जर्मनांशीं लढलें त्या-

प्रमाणें पगारी तुर्कांचा अरबांच्या सैन्यांत प्रवेश होत असावा; त्यामुळें ९ व्या शतकानंतर सर्वच परक्यांना तुर्क असें नांव एतद्देशीय देत असावेत (मध्ययुगीन भारत, भाग २ रा, पृ.१८०).

**तुर्क लोक**— राजकीय, भाषाविषयक, व मानववंशशास्त्रीय अशा तिन्ही दृष्टींनीं पाहिलें असतां तुर्क शब्दाचे तीन निरनिराळे अर्थ होतात. राजकीयदृष्ट्या तुर्क लोक म्हणजे तुर्कस्तानच्या सुलतानाच्या अमलाखालचे लोक असा अर्थ होतो. भाषेप्रमाणें पाहिलें असतां उरल-आल्ताईक भाषा बोलणाऱ्या लोकांना तुर्क लोक म्हणतात. मानववंशशास्त्रदृष्ट्या तुर्क लोकांचे विशेष शारीरिक गुणधर्म सांगतां येत नाहींत. कारण युरोपांत आल्यावर त्यांनीं मिश्रविवाह केले व त्याचप्रमाणें ख्रिस्ती मुलें घेऊन त्यांना भाषा, रीती, वगैरे बाबतींत तुर्क बनविलें. या कारणांमुळें अर्वाचीन तुर्क लोक शारीरिकदृष्ट्या युरोपांतील लोकांप्रमाणें आहेत. त्याचप्रमाणें त्यांनीं मध्य आशियांतहि केलें. यांनींच युरोपांत व हिंदुस्थानांत महंमदी धर्माची स्थापना केली.

अर्वाचीन शानतन शहराजवळ एक तुर्क नांवाची टेकडी होती. त्या टेकडीच्या नांवावरून तेथील असेना शाखेच्या लोकांचा चीनच्या इतिहासांत तुर्क नांवानें उल्लेख आहे. इ. स. ५६० च्या सुमारास तुर्क लोक ऑक्सस् नदीच्या कांठच्या प्रदेशांत येऊन इ. स. ५६७ त त्यांनीं पूर्व रोमचा सम्राट् दुसरा जस्टिन याच्याकडे आपला वकील पाठविल्याबद्दल उल्लेख सांपडतो. इ. स. १० व्या शतकांत तुर्क लोकांनीं गझनी येथें गझनी घराणें स्थापिलें व त्याच कालांत सेल्जुक लोकांचा उदय झाला. इ. स. १२१९ मध्यें मध्य आशियांतून युरोपकडे तुर्क लोकांची एक टोळी देश जिंकण्याच्या उद्देशानें आली. तिचें आधिपत्य चेंगीजखानाकडे होतें. त्यानें सर्व लहान लहान राज्यें जिंकलीं. तैमूरलंग हा तुर्क होता. तैमूरलंगाचें घराणें समरकंद येथून जिंकलेल्या प्रदेशांचा राज्यकारभार पाहत होतें. त्याच्या राज्यांत उत्तर अफगाणिस्तान, इराण, ट्रान्सऑक्झिआना व तुर्कस्तान हे प्रदेश होते. शैबानि नांवाच्या वंशानें तैमूरलंगाच्या घराण्याचा पाडाव केला. त्यांना उझबेग असें म्हणत. हल्लींच्या तुर्क साम्राज्याचें उत्पादक उस्मान घराणें असून तें खोरासानहून आशिया मायनरमध्यें आलें. आजपर्यंतच्या ज्या लोकांशीं त्याचा संबंध आला त्यांच्या चालीरीती तुर्क लोकांत दृष्टीस पडतात. इस्लाम धर्माचा स्वीकार करण्यापूर्वी त्यांनीं अंशतः तरी बौद्ध धर्म, अग्निपूजा व नेस्टोरियन-ख्रिस्ती धर्म स्वीकारला असावा. तुर्की अथवा तार्तार-तुर्की ही भाषा उरल-आल्ताईक भाषा विभागापैकीं एक आहे.

**तुर्क व कैको बेटें**— हा ब्रिटिश वेस्ट इंडियन द्वीपसमूह हायाटी बेटाच्या उत्तरेस असून राजकीय दृष्ट्या जमेकाच्या ताब्यांत आहे. याचें क्षे.फ. १६५ चौ. मैल आहे, आणि लोकसंख्या ६,१४८ असून त्यापैकीं २१० गोरे लोक आहेत. या द्वीपसमूहाचे कैको बेटें आणि तुर्क बेटें असे दोन भाग आहेत. याची राजधानी ग्रँड टर्क बेट असून, त्याची लोकसंख्या १६९३ आहे. कैको द्वीपसमूहांत कॉकबर्न हें मुख्य बंदर आहे. या द्वीपसमूहाची हवा चांगली आरोग्यकारक आहे, परंतु येथें पाण्याची टंचाई आहे. येथील मुख्य धंदा मीठ तयार करणें हा असून कांहीं भागांत कापूस पिकवतात, आणि स्पंजहि येथें सांपडतो. मीठ, स्पंज, शिंपले व कापूस हे जिन्नस परदेशीं जातात. येथें शिक्षण मोफत आहे. या बेटांचा राज्यकारभार जमेकाच्या गव्हर्नरनें नेमलेला कमिशनर आणि एक लेजिस्लेटिव्ह बोर्ड यांच्या हातीं असतो. जमेकानें केलेले कायदे तुर्क आणि कैको ह्या दोन्ही द्वीपसमूहांना लागू असतात. या बेटांत प्रथम चर्मुडी लोकांची वस्ती होती. पुढें स्पॅनियर्ड लोकांनीं त्यांना हांकून लावलें. १७९९ मध्यें हीं बेटें बाहामा बेटांना जोडण्यांत आलीं, आणि शेवटीं १८४८ मध्यें जमेकाच्या नियंत्रणाखालीं गेलीं.

**तुर्कस्तान**—युरेशियामधलें एक लोकसत्ताक राज्य. क्षेत्रफळ २,९६,१०७ चौ. मै.; पैकीं ९,२५७ चौ. मै. चा भाग युरोपांत व बाकीचा आशियामध्यें आहे. अंगोरा हें राजधानीचें ठिकाण. इस्तंबूल, स्मर्ना, कोनिया हीं मोठीं शहरें आहेत. देशांत अनेक प्रकारच्या खाणी आहेत; परंतु फार थोड्यांतून कामें चालू आहेत. मुख्य डोंगरांची रांग म्हणजे दक्षिणेंतील तौरुस होय. उच्च शिखराचा अरारट पर्वत पूर्वेस इराणच्या हद्दीवर आहे. कोरूह, टायग्रिस, सकार्या व किझिल या नद्या होत. मोठीं सरोवरें म्हणजे व्हान, टुझ व बेसेहीर हीं होत. शेतीहि मागासलेली आहे. परंतु आतां प्रगति झपाट्यानें होत आहे. फळें, मसाल्याचे पदार्थ, धान्यें, लोंकर, कातडीं, वगैरेंचा व्यापार चालतो. मच्छीमारी मोठ्या प्रमाणांत चालते.

इ. स. १३८९ मध्यें अमुरथ पहिला यानें, पश्चिमेकडे जाण्याची लाट ओटोमन लोकांत जोरानें पसरली असतां, आपली राजधानी आड्रियानोपल येथें नेली आणि पुढें सर्व्हियन लोकांचा पराभव केला. हाच तुर्कांचा युरोप खंडांत प्रवेश. तुर्कांची युरोपमध्यें चालू झालेली ही चाल अमुरथ याच्यामागून तशीच जोमानें चालू राहिली. १५२० ते १५६६ या काळात सुलेमान यानें व्हिएन्नावरून जर्मनीपर्यंत आक्रमण केलें. १५७१ मध्यें मात्र या लाटेला जोराचा प्रतिरोध झाला. त्या सालीं लिपॅन्टो येथें स्पेननें तुर्कांचा पराभव केला, आणि पुढें १२५ वर्षांनीं १६९९ मध्यें कार्लोविनच्या तहानें तुर्कांना शरणागति घ्यावयास लावलें. १७३० मध्यें तुर्कांच्या सत्तेखालीं राहणाऱ्या ख्रिश्चन लोकांचा कैवार

घेऊन रशियानें तुर्कस्तानशी युद्ध सुरू केलें आणि तुर्की सत्तेची दक्षिणेकडे पिछेहाट केली. क्रिमिअन युद्धामध्यें इंग्लंड व फ्रान्स यांनीं तुर्की सुलतानास संयुक्त रीतीनें मदत केली. पुन्हां १८७७ मध्यें अशा बाह्य मदतीनेच रशियापासून तुर्कस्तानचा बचाव झाला. तुर्कस्तानला 'युरोपचा दुखणाईत' ही संज्ञाच प्राप्त झाली होती. १९०१ मध्यें 'तरुण तुर्क' या संस्थेचा बीमोड केला गेला. १९०८ मध्यें सुलतान अबदुल हमीद पदच्युत झाला. महायुद्धाच्या वेळीं दार्दनेलीस सामुद्रधुनीमधून जबरदस्तीनें शिरकाव करण्याचे प्रयत्न मात्र तुर्कांनीं थोपवून धरले. पहिल्या महायुद्धांत तुर्कस्तान हा जर्मनीचा दोस्त होता. या युद्धानंतर १९१९ मध्यें क्रांति होऊन अंगोरा येथें स्वतंत्र सरकार स्थापन करण्यांत आलें. ग्रॅंड नॅशनल असेंब्ली ही देशाची सर्वाधिकारी शासनसंस्था १९२१ पासून करण्यांत आली. १९२२ मध्यें ग्रीसबरोबर लढाई झाली तींत तुर्कस्तानला यश आलें. याच वर्षी सुलतानची गादी (सलतनेत) काढून टाकण्यात आली आणि लोकसत्ताक संस्थान स्थापण्याचें जाहीर होऊन मुस्तफा केमाल हा अध्यक्ष झाला. या केमालच्या नेतृत्वाखालीं देशाची सर्वांगीण प्रगति झाली. शेती सुधारली. उद्योगधंदे वाढले. स्त्रियांचा दर्जा वाढला. युरोपियन राहणीचा आणि सर्व पाश्चिमात्य चालीरीतींचा सर्वत्र स्वीकार व प्रसार झाला. १९३८ सालीं केमालच्या मृत्यूनंतर इस्मत इनोन्यू तुर्क राज्याचा अध्यक्ष झाला.

इस्तंबूल येथें तुर्कस्तानांतील अनेक धर्मांचीं पीठें आहेत. मुस्लिम, आर्मेनियम, खाल्डियन, सीरियन, ग्रीक, लॅटिन, ज्यू, वगैरे धर्मीयांचे मुख्य आचार्य तेथें असतात. दीड कोटीहून जास्त मुसलमान आहेत. ज्यू लोक सु. ऐशीं हजार आहेत. देशाचा निराळा धर्म असा नाहीं. साक्षरतेचें मान पुरुषांत २३ टक्के व स्त्रियांत ८ टक्के आहे. प्राथमिक शिक्षण नांवाचेंच सक्तीचें म्हणतां येईल. खाजगी शाळा फार थोड्या आहेत. इस्तंबूल विद्यापीठ १९०० सालीं स्थापन झालें व त्याची पुनर्घटना १९३३ मध्यें करण्यांत आली. १९२८ पासून लॅटिन लिपीचा सरकारी हुकुमानें अवलंब झाला व अरबी लिपि बंद झाली.

वाङ्मय—इस्लामी धर्म स्वीकारल्यानंतर अरबी वर्णमाला आली व लवकरच इराणी वाङ्मयाची छाप इराण जिंकल्यानंतर पडली. १३०० ते १८४० पर्यंतचा काळ अभिजात वाङ्मयाचा म्हणतां येईल. पुढें इराणी वर्चस्व जाऊन फ्रेंच वाङ्मयाचा परिणाम दिसूं लागला. नामूक केमाल, अबदुल्हाल हमीद, तेवफिक फिक्रेत, झिया गोक आल्प, मेहमेद अमीन, मेहमेद अकीफ शिनासी, वगैरे कवी व लेखक अर्वाचीन काळांत चमकले. लोकशाही अमदानींत देशांतील जुनें अप्रसिद्ध लोकवाङ्मय व जागतिक वाङ्मय यांतून तुर्की साहित्य तयार होत आहे. पाश्चात्य वाङ्मयांतील सर्व प्रकार तुर्की वाङ्मयांत आलेले दिसतील.

**तुर्किस्तान**—मध्य आशियांतील प्रदेश. पश्चिम तुर्किस्तान यांत पूर्वीचा रशियन तुर्किस्तान व अफगाणिस्तानच्या अगदीं उत्तरेकडचा भाग यांचा समावेश होतो. पूर्व तुर्किस्तान, यांतच चिनी तुर्किस्तान आला, याचा सिंगकिंग प्रांतांत समावेश केला गेला आहे. पुष्कळसा भाग पामिर प्रदेशांत मोडतो व घनदाट जंगलांनीं तो बहुधा व्याप्त आहे. मूळच्या रानटी भटके लोकांची वस्ती बरीच आहे. उझबेग, तुर्कोमन व किरघिझ या मुख्य जमाती आहेत. यांच्या सरहद्दी अनिश्चित व अनिर्णीत आहेत, आणि यांचें क्षेत्रमापनहि त्यामुळें सांगतां येत नाहीं. मलबेरीची लागवड फार प्रचंड आहे. घोड्यांचा व्यापार मोठा आहे.

१९१८ पासून १९२३ पर्यंत रशियन तुर्किस्तान या प्रदेशाचीं तीन निरनिराळीं लोकसत्ताक राज्यें बनवण्यात आलीं, आणि तीं सोव्हिएट रशियाला जोडण्यांत आलीं तीं तीन राज्यें येणेंप्रमाणें— तुर्किस्तान (राजधानी ताशकंद), बुखारा आणि खोरेझम. पुढें १९२४ मध्यें हीं तीन राज्यें नष्ट झालीं. आणि खोरेझमचा बराच मोठा प्रदेश बुखाराला जोडून त्याचें उझबेक लोकराज्य बनवण्यांत आलें. आणि शिवाय ताडजिक रीजन हा स्वयंशासित स्वतंत्र प्रदेश करण्यांत आला. खोरेझमचा उरलेला प्रदेश आणि तुर्किस्तानचा कांहीं भाग मिळून तुर्कोमन लोकराज्य बनवण्यांत आलें. शिवाय तुर्किस्तानचा कांहीं भाग किरघिझ लोकराज्यामध्यें सामील करण्यांत आला. आणि तुर्किस्तानचा उरलेला प्रदेश कारा-काल्पाक आणि कारा-किर्घिझ यांमध्यें विभागून सामील करण्यांत आला.

**तुर्कोमन**—तुर्कमेन किंवा तुर्की लोक. तुराणियन लोक ट्रान्सकॉकेशियांतील तुर्कोमन लोकराज्यांत राहतात, आणि शिवाय अफगाण, तुर्किस्तान, वायव्य इराण, आनातोलिया, वगैरे प्रदेशांतहि या लोकांची थोडी थोडी वस्ती आहे. तुर्कमेन, लोकांची एकंदर लोकसंख्या २,९०,००० आहे.

मर्व्ह आणि अटक या भागांतील टेक्के, एर्सरी, योमुद व गोकलन या तुर्कोमनांच्या मुख्य जाती आहेत. यांच्या भाषा निरनिराळ्या पण संबद्ध अशा असतात. धर्म सुनी पंथाचा आहे.

**तुर्कोमन लोकराज्य**—तुर्कमेनिस्तान. १९२६ पासून हे रशियामध्यें स्वयंशासित 'सोशॅलिस्ट सोव्हियट रिपब्लिक' आहे. हें संस्थान आशियांतील रशियाच्या नैर्ऋत्य टोंकाला असून याचें क्षे. फ. १,७१,३८४ चौ. मैल, आणि लोकसंख्या १२,५३,९८५ आहे. या संस्थानची राजधानी आश्खाबाद

(पोल्टारास्क) असून, मर्व्ह हें मोठें शहर आहे. हीं दोन्ही शहरें कास्पियन समुद्राकडे जाणाऱ्या रेल्वे-लाइनवर आहेत.

लोकांचा मुख्य धंदा शेती असून तो पाटबंधाऱ्यांच्या पाण्यावर चालतो. कापूस, लोंकर, आस्त्राकान लव (फर), गालिचे हीं होतात. विशेष अवलादीचे घोडे होतात. देशांत १,३२२ प्राथमिक व दुय्यम शाळा असून ४० संशोधनसंस्था आहेत.

**तुलादान**—आपलें वजन जोखून तितकें द्रव्य, पदार्थ, धान्य, इ. दान करणें, याला म्हणतात. सोळा महादानांपैकीं हें एक दान आहे. याचे उल्लेख अनेक पुराणांतून सांपडतात. हेमाद्रीनें तुलादानावर एक स्वतंत्र प्रकरणच लिहिलें आहे. या तुलादानाचा इतिहास ख्रि. पू. तिसऱ्या शतकापासून सांपडतो. वाङ्मयोल्लेख सोडल्यास शिलालेख आणि ताम्रपट यांतून राजपुरुषांनीं तुलादान केल्याचीं अनेक उदाहरणें दाखवून देतां येतील. तुलेसाठीं तागडी ज्याला टांगावयाची तें तोरण लांकडी असावें असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे; पण वारंवार तुला केल्यानें तें मोडूं नये म्हणून विजयानगरच्या सम्राटांनीं दगडी तोरणच उभारलें होतें. तें अद्यापि हंपीला पाहावयास मिळतें.

तुलादानाचीं शिल्पेंहि पाहावयास मिळतात. पांड्य, राष्ट्रकूट, चोळ, गहडवाल, इत्यादि घराण्यांतील कांहीं राजांनीं तुला केल्याच्या नोंदी आहेत. दक्षिणेंत या तुलाविधीसाठीं स्वतंत्र मंदिरेंच होतींसें दिसतें. भारंभार सोनें, रुपें किंवा इतर जिन्नसा वजन करून त्या ब्राह्मणांना किंवा गोरगरिबांना दान करण्याची वहिवाट होतीच. पण कांहीं ठिकाणीं हा तुलेचा पैसा देवालयें, गोपुरें किंवा इतर धार्मिक स्वरूपाच्या इमारती बांधण्यासाठीं खर्च करीत, असें स्पष्ट दिसतें. श्रीरंगम्‌चें देवालय तुलेच्या द्रव्यांतून बांधलें आहे. चिदंबरम्‌चें गोपुर तसेंच. हिऱ्यामोत्यांचीहि तुला करीत. विजयानगरच्या अच्युतरायानें विष्णुकांची येथें पत्नीपुत्रासह मोत्याची तुला करविली होती (१५३२).

मुसलमान अमदानींतहि अकबर, जहांगीर, शहाजहान यांनीं आपली तुला केल्याचें इतिहासांत सांपडतें. औरंगजेबहि आपली तुला करीत असे; पण ही हिंदुपद्धति आहे असें जेव्हां त्याला कळलें तेव्हां त्यानें ती सोडून दिली.

महाराष्ट्रांत मुरार जगदेवाची तुला प्रसिद्ध आहे. भीमा-इंद्रायणी संगमावर शके १५५५ च्या भाद्रपद अमावास्येस सूर्यग्रहणाच्या प्रसंगीं त्यानें सोनें, रुपें, इत्यादि चोवीस पदार्थांनीं चोवीस तुळांचें महादान केलें. म्हणून या गांवाला तुळापूर हें नांव पडलें, असें सांगतात. शिवाजीनें आपली आई जिजाबाई हिची तुला महाबळेश्वरीं सूर्यग्रहणाच्या वेळींच (पौष ३० शके



१५८६) केली व स्वतःची राज्याभिषेकाच्या वेळीं करवून घेतली. या प्रसंगींच्या सुवर्णतुलेला १६,००० होन लागले. बाळाजी विश्वनाथाची स्त्री राधाबाई, बाजीरावाची स्त्री काशीबाई, शाहूची स्त्री सगुणाबाई यांच्या तुला केल्या होत्या. नानासाहेब पेशव्यानें तर कित्येक वेळां तुलादान केल्याच्या नोंदी आहेत. रामचंद्रबाबा शेणवी यांनींहि दोन सोन्याच्या व दोन रुप्याच्या तुला केल्याचें नमूद आहे (पे. द. ४०. ८४). माधवराव पेशवा, अहल्याबाई होळकर, दामोदर महादेव हिंगणे, इत्यादि इतिहास-प्रसिद्ध स्त्री-पुरुषांनीं तुला केल्याचें वाचण्यांत येतें.

इंग्रज अमदानींत विश्वनाथ नारायण मंडलीक यांनीं चंद्रग्रहणांत सपत्नीक रौप्य तुला केली होती (१८७९). मुंबईचे व्यापारी श्री. केशव विष्णु गोखले, व श्री. केशव गणेश जोशी यांनीं रौप्यतुला व सांगलीचे श्री. विष्णु रामचंद्र वेलणकर यांनीं दोन वर्षांपूर्वी सुवर्णतुला केल्याचें आठवणींत ताजें आहे.

भारतीय संस्कृति जेथें जेथें गेली तेथें तेथें ही महादानाची प्रथा पडत गेली असली पाहिजे, असें सयामच्या राजघराण्यांत असलेली चाल पाहून वाटूं लागतें. भा. इ. सं. मंडळांतील संशोधक श्री. ग. ह. खरे यांनीं तुलादानाची समग्र माहिती देणारें स्वतंत्र पुस्तकच रचलें आहे.

**तुळजापुर**—हैद्राबाद संस्थानांतील उस्मानाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ७८१ चौ. मै.. तालुक्यांत एक तुळजापूर व दुसरें मोरम अशीं दोन शहरें आहेत. तालुक्यांत १३४ खेडीं असून यांत १६ जहागिरी आहेत. लोहारे व रानजोरी याच तालुक्यांत मोडतात. तुळजापूर, सिद्धेश्वर, मुद्गलेश्वर, बागलिंग, घाटशिळा, वगैरे स्थळें प्रेक्षणीय आहेत.

तुळजापूर शहर सोलापुरापासून २८ मैल दूर व उस्मानाबादपासून १४ मैलांवर आहे. सोलापुराहून येणाऱ्या वाटेंत सिंदफळ गांव लागते. हें देवीचें माहेर समजतात. डोंगराच्या पायथ्याशीं तुळजा भवानीचें देऊळ आहे. नवरात्र, दसरा, या वेळीं मोठा मेळा भरतो. साताऱ्याच्या राजांनीं भवानीचें देऊळ बांधलें असें म्हणतात. ही भवानी अनेक महाराष्ट्रीय घराण्यांची कुलदेवता आहे.

देवालय फार विस्तीर्ण आहे. गाभाऱ्यांत कल्लोळ व गायमुख हीं दोन तीर्थें आहेत. समोर होमशाळा आहे. देवीच्या उत्सवांत दरसाल नगरच्या तेल्याची पालखी येते.

तुळजापूर ही चांगली व्यापारी पेठ आहे. मंगळवारीं आठवडा बाजार भरतो.

**तुळजो राम**— हा नागपूरकर भोसल्यांच्या पदरचा एक ब्राह्मण सरदार होता. हा यमाजी शिवदेवाच्या कुटुंबापैकीं असावा. शाहूनें याला रघूजीजवळ नेमला होता. रघूजीनें देवगड प्रांतीं फौजेचा बंदोबस्त करण्याकरितां याची नेमणूक केली.

स. १७४८ ते १७५१ या काळांत रघूजीनें ओरिसा प्रांतावर स्वारी केली, तेव्हां त्याजबरोबर तुळजो राम होता. ह्यानें बंगाल-कर्नाटकापर्यंत स्वाऱ्या केल्या. रघूजीच्या सर्व स्वाऱ्यांत हा असे.

**तुळस**—[ऑसिमम् बॅसिलिकम्–बेसिल]. या वनस्पतीचें झाड सुमारें दोन हात उंच वाढतें व ही हिंदुस्थानांत आढळते. याचीं फुलें दुभंगलेलीं असतात. काळी व पांढरी अशा हिच्या दोन जाती आहेत. तुळशीच्या पानांचा व मंजिऱ्यांचा देवपूजेकडे उपयोग करितात. विष्णूला ही फार प्रिय असल्याचें पुराणांत वर्णन आहे. वैष्णव लोकांत तुळशीचें माहात्म्य फार आहे. कार्तिकांतील द्वादशीस दरवर्षी विष्णूचा तुळशीशीं विवाह लावण्याची चाल हिंदू लोकांत आहे. तुळशीची पूजा नित्य करण्याबद्दल (विशेषतः स्त्रियांनीं) वराहपुराणादि ग्रंथांत विवेचन आहे. आर्य वैद्यकाप्रमाणें तुळशीच्या रसाचा अनेक औषधांत उपयोग केला जातो. तुळशीमुळें हवा शुद्ध व रोगरहित होते. तुळशीचा चहा ज्वरावर देतात. विषमज्वरांत काळ्या तुळशीच्या रसांत मिरपूड घालून देतात. तुळशीचें बीं रक्तातिसारावर देतात. विंचवाच्या दंशावर, गजकर्णावर रस चोळतात. रानतुळस ही जात निराळी आहे.

**तुळसीदास** (स. १५३१–१६२३)—सुप्रसिद्ध हिंदी कवि व महान् रामभक्त. याचा जन्म राजापूर नांवाचें एक गांव यमुनेच्या दक्षिण तीरावर आहे तेथें झाला. हा सरजूपुरी ब्राह्मण होता असें त्याच्या कवितावलीवरून समजतें. याचा जन्म मूळ नक्षत्रावर झाल्यामुळें याच्या आईबापांनीं याला टाकून दिलें व एका साधूनें त्याचा प्रतिपाळ करून वाढविलें. या साधूबरोबर तीर्थाटन करण्यांत व रामकथा श्रवण करण्यांत त्याचा लहानपणचा काळ गेला. तुळसीदासाच्या गुरूचें नांव नरहरि. तुळसीदासाच्या पित्याचें नांव आत्माराम शुक्ल दुबे व आईचें नांव हुलसी. शूकरक्षेत्रीं त्याचें अध्ययन होऊन त्याचें लग्न झालें. याच्या सासऱ्याचें नांव दीनबंधु पाठक व स्त्रीचें नांव रत्नावली. त्याला लवकरच मुलगा झाला. त्याचें नांव तारक. रत्नावलीवर तुळसीदासाची अत्यंत प्रीति होती. एकदा तो परगांवीं गेला असतां रत्नावली माहेरीं गेली. तुळसीदास घरीं येतांच रत्नावली माहेरीं गेल्याचें त्याला कळलें. तो तडक तिकडे गेला. पतीची इतकी आसक्ति पाहून तिनें त्याची कानउघाडणी केली—

'लाज न लागत आपुकी धौरे आयेहू साथ।
धिक् धिक् ऐसे प्रेमकी कहा कहौ मे नाथ।
अस्थिचरममय देह मम तामौं जैसी प्रीत।
तैसी जौ श्रीराम मँह होत न तौं भवभीत।'

या बोलण्यानें तुळसीदासाचे डोळे उघडले व वैराग्य उत्पन्न होऊन तो अयोध्येस गेला; व तीर्थाटनें करण्यांत काळ घालवूं लागला. अयोध्येस असतांना एकदां रामचंद्र तुळसीदासाच्या स्वप्नांत येऊन त्यांनीं सुलभ प्राकृतांत रामायणाची रचना करण्यास तुळसीदासास आज्ञा केली व त्याप्रमाणें रामनवमी या दिवशीं त्यानें रामायण रचण्यास सुरुवात केली (१५७४). पुढें त्याचें अयोध्येंतील वैरागी वैष्णवांशीं पटेनासें झालें त्यामुळें तो काशीस जाऊन राहिला. काशीस तो असीघाटावर राहत असे. या ठिकाणीं १६२३ मध्यें तो मरण पावला.

तुळसीदास हा अकबराच्या कारकीर्दीच्या शेवटीं व जहांगीरच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं झाला. टोडरमल, अबदुल रहिमखान खाना, जयपूरचे महाराज मानसिंह, इत्यादि मोठमोठे लोक याचे स्नेही होते व ते त्याच्या दर्शनास नित्य जात असत. टोडरमल्लाशीं तुळसीदासाचा दाट परिचय होता.

त्याच्या नांवावर लहान-मोठे एकवीस ग्रंथ आहेत. पण त्यांपैकीं पुढील तुळसीदासाचे असावेत असें दिसतें: (१) रामललानहछु, (२) वैराग्यसंदीपनी, (३) छंदावली रामायण, (४) पार्वतीमंगल, (५) जानकीमंगल, (६) श्रीरामाज्ञा ऊर्फ श्रीराम–सगुणावली, (७) दोहावली, (८) कडरवा रामायण, (९) गीता रामायण, (१०) कृष्ण गीतावली व (११) रामचरितमानस.

रामचरितमानस हें तुळसीदासाचें अत्यंत प्रसिद्ध काव्य होय. उत्तर हिंदुस्थानांत तुळसीरामायण न वाचणारा माणूस विरळा. या ग्रंथानें तुळसीदासाचें नांव अमर केलें. इंग्रज मनुष्य शेक्स्पिअरला अगर बायबलाला जितका मान देतो तितका, किंबहुना त्याच्याहून अधिक मान या ग्रंथाला हिंदी मातृभाषा असणाऱ्या मनुष्याकडून मिळतो.

तुळशीदास कट्टा शैव किंवा वैष्णवहि नव्हता. रामभक्तीचा तुळसीदासानें फार प्रसार केला. तुळसीदासाच्या काळीं कृष्णोपासना, शाक्तमत व निरनिराळ्या ग्रामदेवतांची उपासना, इत्यादि अनेक मतें प्रचलित होतीं. पण कृष्णोपासनेशिवाय इतर सर्व मतांना मागें सारून तुळसीदासाची रामोपासना उत्तर हिंदुस्थानांत फार फैलावली व त्याचा तत्कालीन समाजावर फार उत्तम परिणाम झाला असें दिसून येतें.

**तुळसीबाई** (मृ. १८१७)—ही यशवंतराव होळकराची एक आवडती राख असून फार सुंदर, शिकलेली, हुशार, पण दुष्ट, रागीट व अत्यंत बदफैली होती. दुसऱ्यास मोह पाडण्याचा गुण तिच्या अंगीं विशेष होता. हिनें होळकरशाहीचा कारभार १० वर्षें केला. यशवंतरावाच्या मृत्यूपूर्वीच तिनें केसरबाईपासून झालेला त्याचा मुलगा मल्हारराव यास दत्तक घेतलें होतें, मात्र

कारभार स्वतः तीच पाही. पण ही कारभार पाहूं लागल्यावर सरकारसारा नीट वसूल होईना व राज्यव्यवस्था नीट चालेना.

स. १८१७ त बाजीरावानें मल्हारराव होळकरास आपल्या मदतीस बोलाविलें. होळकरी फौज कूच करून महेश्वरास आली असतां मालकमनें होळकरास पेशव्यांकडे न जाण्याबद्दल कळविलें. तुळसीचा विचार इंग्रजांशीं तह करण्याचा होता; परंतु तो तिचा विचार सैन्यांतील अधिकाऱ्यांस पसंत नव्हता. म्हणून तराणें गांवीं (२० डिसेंबर १८१७) पहांटे मल्हाररावास तुळसाबाईच्या तंबूंतून बाजूस नेलें व त्याच रात्रीं तिचा वध करून तिचें प्रेत क्षिप्रेंत फेंकून दिलें. तिच्या अशा अंताबद्दल कोणासहि फारसें वाईट वाटलें नाहीं.

ही घरांतल्या माणसांवर सत्ता चालवीत असे व सहीशिक्का वापरीत असे, वगैरे कारणांवरून ही राख नव्हती, तर लग्नाची बायको म्हणजे राणी होती, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न कांहीं लेखकांनीं केलेला आढळतो.

**तुळाजी आंगरे** (मृ. १७८७)—हा कान्होजी आंगरे याचा दासीपुत्र. याच्या आईचें नांव गहिनीबाई. स. १७३५ मध्यें याचे सावत्रबंधू संभाजी व मानाजी यांच्यांत यादवी सुरू झाल्यामुळें हा कुलाब्यास न येतां सुवर्णदुर्गास राहिला.

संभाजी आंगरे दौलतीवर असतां हा त्याचा कारभारी होता. स. १७३४ मध्यें हा संभाजीबरोबर हबशांपासून अंजनवेल घेण्याकरितां गेला होता. पेशवे व आंगरे यांचें वैर जुनेंच होतें. स. १७४० मध्यें हिराकोटजवळ आंगऱ्यांच्या व पेशव्यांच्या लोकांत झटापट झाली. तींत हा जखमी होऊन पेशव्यांच्या हातीं सांपडला. स. १७४१ त संभाजी मरण पावला. यानंतर तुळाजीचें व पेशव्यांचें सडकून वैर जुंपलें. स. १७४२ मध्यें यानें अंजनवेलचा किल्ला घेतला. त्यानंतर शाहूनें यास सरखेल ही पदवी दिली.

आरमाराच्या जोरावर इंग्रजांचें एकहि जहाज हा सुरक्षित जाऊं देत नसे. तसेंच पेशव्यांची सत्ताहि हा जुमानीत नसे. पेशव्यांनीं याच्याकडे रत्नागिरी व सुवर्णदुर्ग हे किल्ले मागितले, पण यानें "सुईच्या अग्राइतकी जमीन देणार नाहीं", असें उत्तर दिलें. स. १७५५ मार्चांत पेशवे व इंग्रज या दोघांनीं संगनमत करून तुळाजीवर हल्ला केला. त्याचे कांहीं किल्ले घेतले व त्याचें आरमार पळवून लावलें. तुळाजी पेशव्यास दरसाल ठराविक खंडणी देत असे. ती आली नाहीं म्हणून त्यांनीं वकील पाठविला. त्याची तुळाजीनें नाक, कान कापून विटंबना केली. यानंतर १७५६ च्या फेब्रुवारींत लढाई होऊन तुळाजीचें आरमार जळून खाक झालें. त्याचे सर्व किल्ले पेशव्यांनीं घेतले. तेव्हां त्याला पेशव्यांच्या स्वाधीन व्हावें लागलें.

तुरुंगांत असतांहि पेशव्यांना यानें फंदफितुरी करून अत्यंत त्रास दिला. नानासाहेबांच्या मृत्यूनंतर यानें एकदां तर चंदनवंदनाच्या तुरुंगांतून पुणें लुटण्याचा प्रयत्न केला, पण तो अयशस्वी ठरला (रा. खं. १२८६). वंदन, सोलापूर, राजमाची, विसापूर, नगर, चाकण, दौलताबाद, वगैरे किल्ल्यांत याला ठेवलें होतें. अखेर हा सोलापूरच्या किल्ल्यांत मरण पावला (स. १७८७). याचीं बायकामुलें तुरुंगांत याच्याजवळच असत. याच्या सहा स्त्रियांपैकीं एक सती गेली.

हा निमगोरा, उंच, भव्य, देखणा व अत्यंत रूपवान् होता. याला पाहिल्याबरोबर मूर्तिमंत धैर्याची कल्पना येत असे. याची कृतिहि रूपास साजेशी होती. कोणतेंहि जहाज याच्या तावडींतून सुटत नसे. इंग्रज याला थरथर कांपत. असें याचें एका इंग्रजानें वर्णन केलें आहे.

याला नष्ट केल्यानें शिवाजीमहाराजापासून वाढत असलेलें मराठ्यांचें आरमार नष्ट झालें. समुद्राच्या बाजूनें इंग्रजाचा वरचष्मा कायमचा बसला, आणि मराठी राज्याचें मरण जवळ ओढवलें, असें कांहीं इतिहासकार म्हणतात.

**तुळाजी भोसले** (१७६३–१७८७)—तंजावरचा एक मराठा राजा व प्रतापसिंहाचा मुलगा. याचे इंग्रज, हैदर व अर्काटचा नबाब असे तीन प्रमुख शत्रू होते. याचा व अर्काटचा नबाब महमदअली याचा मेलूरच्या कालव्याच्या दुरुस्तीविषयीं तंटा झाला असतां, तो इंग्रजांच्या मध्यस्थीनें मिटला (१७६४). स. १७६९ त हैदरानें याच्यावर स्वारी केली. तेव्हां हैदरास चार लाख रुपये व चार हत्ती दिले. हें पाहून महमदअलीनें स. १७७१ त इंग्रजांच्या मदतीनें याच्यावर चाल केली. पण त्यानें त्यांच्याशीं तह केला. पण तहांत इंग्रजांचा उल्लेखहि केला नाहीं. यामुळें राग येऊन इंग्रजांनीं जनरल स्मिथ यास १७ सप्टेंबर १७७३ रोजीं तुळाजीवर पाठविलें. स्मिथनें तुळाजीस कैद केलें व तंजावर संस्थान खालसा केलें. परंतु ही गोष्ट कोर्ट ऑफ डायरेक्टर्स याना नापसंत पडून, त्यांनीं यास फिरून ११ एप्रिल १७७६ रोजीं सन्मानानें गादीवर बसविलें. पुढें यानें स. १७८७ पर्यंत इंग्रजांच्या मदतीनें राज्यकारभार केला. हा राजा १७८७ मध्यें मरण पावला. ह्याला मूलबाळ नव्हतें. त्यानें भोसल्यांच्या वंशांतील एक मुलगा दत्तक घेऊन त्याचें नांव शरफोजी असें ठेविलें. यास मोहनाबाई, राजसाबाई व राजकुंवरबाई अशा तीन बायका होत्या. पुढें मुलाकरितां सुलक्षणबाई व मोहनाबाई अशा आणखी दोन बायका केल्या. पण एकीपासूनहि यास मुलगा झाला नाहीं.

**तुळापूर**—मुंबई, पुणें जिल्हा. पुण्याच्या ईशान्येस १६ मैलांवर जेथें भीमा व इंद्रायणी या दोन नद्यांचा संगम होतो

तेथे हें खेडें आहे. याचें मूळ नांव नागरगाव असे होतें. एकदां आदिलशाही सरदार मुरारपंत याच्या हत्तीचें वजन करण्याकरिता या ठिकाणीं शहाजीनें त्या हत्तीस एका नावेंत चढविलें, व हत्तीच्या वजनामुळें पाण्यांत नाव किती बुडाली तें पाहून नंतर त्यानें त्या हत्तीस बाहेर काढून त्याच्या जागीं ती नाव तितकीच पुन्हा पाण्यांत बुडेपावेतों बरेचसे दगड टाकले. मग या सर्व दगडांचें निरनिराळें वजन करून शहाजीनें त्या हत्तीचें वजन किती होतें तें मुरारपंतास सांगितलें; व म्हणूनच या खेड्याचें नांव बदलून तुळापूर असें नवीन नांव देण्यांत आलें. या सुमारास सूर्यग्रहण असल्यानें मुरारपंतानें आपली तुळा करून ती ब्राह्मणांस वांटून दिली व सबंध गांव अग्रहार म्हणून ब्राह्मणांस इनाम दिला (तुलादान पाहा). यास ऐतिहासिक आधार सांपडले आहेत व कदाचित् या गोष्टीनेंच तुळापूर हें नांव पडलें असावें. १६८९ सालीं येथें औरंगजेबाची छावणी असतांना संभाजीचा या ठिकाणाहून जवळच नदीपलीकडे वढू येथें हाल हाल करून वध करण्यांत आला. यामुळें या गांवास ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व आलेलें आहे. येथें संभाजीची समाधि दाखवितात व दरसाल स्मारक-उत्सवहि होतो.

**तुळुव घराणें**— विजयानगरचें एक राजघराणें. नरस नायक हा तुळुव घराण्याचा संस्थापक होता. याचा पुत्र कृष्णदेवराय. हा मोठा वैभवशाली व कीर्तिमान् राजा होऊन गेला. यानें इ. स. १५०९ पासून १५२९ पर्यंत अवघीं वीस वर्षेंच राज्य केलें. पण तेवढ्या अवधींत त्यानें विजापूरच्या इस्माइल आदिलशहाचा पराभव करून त्याजपासून ज्याच्याकरितां हिंदुमुसलमानांत आजपर्यंत अनेक लढाया झाल्या होत्या तो रायपूरचा किल्ला घेतला व आदिलशहाची राजधानी विजापूरहि काबीज करून तेथें कांहीं दिवस आपला तळ दिला. हा जसा शूर तसा उदार मनाचाहि होता. पाएजसारख्या परदीपस्थ इसमानें देखील त्याच्या स्वभावाची अगदीं मनमोकळेपणानें स्तुति केलेली आढळते. त्याच्या दरबारचें वैभव पाहून युरोपियन लोकांचे तर डोळेच दिपून जात. कृष्णदेवरायाच्या मागून त्याचा चुलतभाऊ अच्युतराय राज्यारूढ झाला. अच्युतराय हा दुर्बल व जुलमी राजा निघाला. हा कृष्णदेवरायाच्या कारकीर्दींत जिंकून घेतलेले रायचूर व मुद्गल हे दोन्ही किल्ले गमावून बसला; व इब्राहिम आदिलशहाने विजयानगरवर स्वारी केली तेव्हां यानें त्यास जबर खंडणी देऊन वाटेस लावलें. अच्युतराय १५४२ त मरण पावला, व त्याच्या जागीं त्याचा पुतण्या सदाशिवराय हा गादीवर बसला. त्याच्या कारकीर्दींत सर्व सत्ता त्याचा कारभारी रामराय साळुव याच्या हातीं होती. हा रामराय मोठा शूर पुरुष होता. कृष्णदेवरायाप्रमाणें यानेंहि मुसलमानांसंबंधांत चढाईचें धोरण स्वीकारून तुंगभद्रा ओलांडून पलीकडील मुसलमानी राज्यांत स्वाऱ्या केल्या व तेथील सुलतानांस 'त्राहि भगवान्' म्हणण्याची पाळी आणली. इ. स. १५४३ त रामरायानें विजापूर व गोवळकोंडें येथील सुलतानांशीं सख्य करून अहमदनगरवर स्वारी केली. या दुसऱ्या स्वारींत हिंदूंनीं अहमदनगरचा मुलूख अतिशय निर्दयतेनें उध्वस्त केला व आपल्या मुसलमान दोस्तांचाहि उघड उघड पाणउतारा केला. यामुळें मुसलमान लोक चिडून गेले. विजापूर, अहमदनगर, गोवळकोंडें व बेदर येथील सुलतानांनीं आपसांतील भांडणें घटकाभर एकीकडे ठेविलीं, व एकजुटीनें विजयानगरवर स्वारी करून इ. स. १५६५ त तालिकोटच्या लढाईत हिंदूंचा पूर्ण पराभव केला. लढाईत विजय पावल्यावर मुसलमानांनीं विजयानगर शहरांत शिरून इतकी कत्तल, लुटालूट व जाळपोळ केली कीं, विजयानगरच्या राज्यास पुन्हां कधीं डोकें वर काढतां आलें नाहीं.

**तुळू**—एक द्राविडी भाषा. तामिळ, तेलगू व कानडी या सुसंस्कृत भाषांच्या खालोखाल तुळू भाषेचा क्रम येतो. ही भाषा बोलणाऱ्या लोकांची संख्या ६,२९,४२५ आहे. कूर्ग, मद्रास, कोचीन, त्रावणकोर व म्हैसूर या भागांत हे लोक आहेत. तुळू व कानडी या दोन्ही भाषांची वर्णमाला सारखीच आहे. या भाषेंतील वाङ्मय मात्र फारच थोडें आहे. तरी पण वाङ्मयाच्या अभावीं सुद्धां या भाषेची बरीच वाढ झाली होती असें दिसतें. चंद्रगिरी व कल्याणपुरी या दोन नद्यांमधील प्रदेशांत हिचा प्रचार होता. पण हल्लीं या भाषेचा फारसा प्रचार नसल्यामुळें ती भाषा मागें पडूं लागली आहे. तरी पण ही भाषा बोलणारे तुळू लोक पुराणमताभिमानी असल्यामुळें अद्यापहि त्यांनीं आपली भाषा जिवंत ठेवली आहे. ख्रिस्ती धर्मांत गेलेल्या तुळू लोकांना कानडी व तुळू या भाषा शिकविण्यांत येतात.

तुळू याचा मूळ अर्थ मृदु अगर नम्र. यावरून हें नांव प्रथम लोकांना लावण्यांत आलें असावें व यानंतर लोकांच्या नांवावरून भाषेला तें नांव पडलें असावें, तुळू भाषा ही मलयालम्-मल्याळी भाषेची एक पोटभाषा असावी असा कित्येक विद्वानांचा समज होता. याचें कारण तुळू ब्राम्हण संस्कृत मलयालम लिपींत लिहीत असत. पण तुळू भाषेच्या अभ्यासकांनीं तुळू भाषा ही पोटभाषा नसून ती स्वतंत्र भाषा आहे, असें सिद्ध केलें आहे. ब्रिगेल नामक युरोपियन पंडितानें 'तुळू भाषेचें व्याकरण' हा ग्रंथ प्रसिद्ध करून त्या भाषेसंबंधीं महत्त्वाचे शोध लावले आहेत. तुळू भाषा मलयालम् अगर तामिळ भाषेहून अगदीं निराळी असून तिचें कानडी भाषेशीं किंचित् सादृश्य दिसतें, असें त्यानें म्हटलें आहे. मद्रासच्या आसपासच्या भागांत वेल्लाळ लोकांची वस्ती असून ते आपल्याला तुळू व वेल्लाळ

असें म्हणवून घेतात. पूर्वी या भागांत कुरुंबर नांवाची एक मेंढपाळांची जात होती. तिला हांकून देऊन तुळू लोकांनीं या भागांत वस्ती केली होती असें दिसतें. तरी पण या भागांत तुळू लोकांची मोठी वस्ती नव्हती व त्यांच्या भाषेचा तामिळ भाषेवर कांहींच परिणाम घडून आलेला दिसत नाहीं.

**तुळया पवार** (फांशी १७७९)—रघुनाथराव पेशव्याचा हुजऱ्या व नारायणरावाच्या खुनांतील एक प्रमुख कटवाला. हा महाखटपटी व हिंमतवान् होता. कांहीं आगळीक केल्यामुळें त्यास नारायणरावानें चाबकानें मारल्याची आख्यायिका आहे. त्यावरून तुळाजी सूड घेण्याच्या बुद्धीनें खुनाच्या कटांत शिरला असें म्हणतात. तुळयानें नारायणरावाचा पाय धरून ओढिलें व त्यास दादाच्या मिठींतून सोडविलें. नंतर सुमेरसिंगानें नारायणरावावर वार टाकिला. बारभाईंच्या अमदानींत तुळया प्रथम हैदराकडे पळाला. बारभाईंचा हैदराशीं तह झाला तेव्हां हा गोंव्याकडे पळाला. पण पोर्तुगीजांनीं यास पकडून पेशव्यांच्या ताब्यांत दिलें. तेव्हां त्याची जबानी घेऊन त्यास १७७९ त देहांतशासन दिलें.

**तूद**—तोडा. एका भाषेचें व जातीचें नांव. नीलगिरि पर्वताच्या रांगांमध्यें राहणाऱ्या एका रानटी जातीची ही भाषा आहे. हे तूद अगर तूदवर लोक या पर्वतांत राहणारे मूळचे रहिवासी नव्हत असें सिद्ध झालें आहे. पण ते कोठून आले हें मात्र निश्चितपणें सांगतां येत नाहीं. या लोकांची संख्या हजारापेक्षां जास्त नाहीं. तथापि यांच्यामधील कांहीं विलक्षण चालीरीतींवरून या जातीला थोडेंफार महत्त्व प्राप्त झालें आहे. रेव्हरंड मेत्झ नांवाच्या एका मिशनऱ्यानें या लोकांसंबंधीं व त्यांच्या भाषेसंबंधीं माहिती परिश्रमानें जमा केली आहे व पोप नांवाच्या एका इंग्रजानें तूद ऊर्फ तोडा भाषेसंबंधीं एक व्याकरणहि तयार केलें आहे. तूद ऊर्फ तोडा हा शब्द तामिळ तोर म्हणजे धनगर या शब्दापासून आलेला आहे असें त्याचें म्हणणें आहे; पण तें बरोबर दिसत नाहीं. हे तूद लोक अफू खाणारे असून त्यांच्यांत बहुभर्तृकत्वाची चाल आहे. यांच्यामध्यें पूर्वी बालहत्या प्रचारांत असल्याकारणानें स्त्रियांची संख्या फार कमी झाली. त्यामुळें ही बहुभर्तृकत्वाची चाल प्रचारांत आली असें कांहीं विद्वानांचें मत आहे.

**तूप**—घृत हा नेहमींच्या आणि यज्ञाच्या वेळीं उपयोगी पडणारें तूप याचा वाचक संस्कृत शब्द ऋग्वेदांत आणि तदुत्तर वाङ्मयांत आलेला आहे. ऐतरेय ब्राह्मणावरील सायणभाष्यांत घृत म्हणजे घट्ट तूप (घनी-भूत) आणि सर्पिस् म्हणजे पातळ तूप असा फरक दाखविला आहे. अग्नींत तूप टाकीत, त्यामुळें अग्नीला घृतप्रतीक, घृतपृष्ठ, घृतप्रसत आणि घृतप्रा असें म्हणत. घृताला शुद्ध करण्याकरितां पाण्याचा उपयोग करीत म्हणून पाण्याला घृतपू असें म्हणत. ऐतरेय ब्राह्मणांत आज्य, घृत, आयुत आणि नवनीत हे क्रमशः देव, मनुष्य, पितर आणि गर्भ ह्यांना देत, असें सांगितलें आहे.

दुधाचें लोणी काढून व लोणी कढवून तूप करण्याचा प्रघात हिंदुस्थानाबाहेर फारसा नाहीं. पाश्चात्य लोक लोणीच वापरतात. त्याचें तूप करीत नाहींत. आपल्याकडे आयुर्वेदांत तुपाचे पुष्कळ गुण सांगितले आहेत व औषधांसाठीं तूप वापरण्यात येतें.

**तूर**—या झाडास लॅटिनमध्यें कजानस इंडिकस व इंग्रजींत पिजनपी म्हणतात.

हें झाड हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. परंतु तुरीचें झाड आपोआप होत असल्याचें कोणीं लिहिलें नाहीं. यावरून हें पीक मूळचें येथील नसून बाहेरून आलें असलें पाहिजे. आफ्रिकेंत यांचीं झाडें आपोआप होतात. चीनमध्यें हीं मुद्दाम करतात व आपोआपहि होतात; परंतु पूर्वीच्या चिनी लोकांस याची माहिती असल्याचें दिसून येत नाहीं. फिजीमध्यें पाद्री लोकांनीं हें झाड आणलें, पण मादागास्करमध्यें तें पूर्वीपासूनच आहे.

कडधान्याच्या सर्व झाडांत तुरीच्या झाडाचा विस्तार जास्त होतो. तुरीचें झाड चार फुटांपासून सहा फुटांपावेतों उंच वाढतें. तुरीचीं मुळें जमिनींत खोल जातात व तळजमिनींतील पोषक द्रव्यें पृष्ठभागीं आणतात. तुरीची शेंग दोन ते तीन इंच लांब असते. उत्तर हिंदुस्थानांतील अरहर (तुरी) चें झाड फार मोठें वाढतें. तुरींत दोन तऱ्हेचीं फुलें आढळतात. पैकीं पिवळीं सर्वत्र आढळतात, व तांबडीं म्हैसुराकडील तुरींत आढळतात. या तुरीची शेंग व दाणेहि मोठे असतात. तुरींत दोन जाती आहेत: हळवी व गरवी. खानदेशांतील व बारामतीकडील तूर हळवी असते; बाकी सर्व गरव्या होत. म्हणजे पेरल्यापासून सात ते दहा महिन्यांत त्या तयार होतात.

रंगावरून हिच्या मुख्य दोन जाती पडतात: पांढरी व तांबडी. पैकीं पांढरी तूर फार करून गुजराथेंत पिकते. तिला सुरती किंवा जंबूसरी असें म्हणतात. ह्या तुरीची डाळ लवकर शिजते. उत्तर हिंदुस्थानांतील अरहरचा रंगहि पांढरा भुरकट असतो. तांबडी तूर सर्वत्र होते. हिला घाटी तूर म्हणतात. ही शिजावयास जरा वेळ लागतो. आमटी व सार यांसाठीं तुरीची डाळ लागतेच. गुजराती लोक तांदूळ व डाळ यांची रोज खिचडी करून खातात. धान्यांत तांदुळाखालोखाल या डाळीचें महत्त्व आहे.

तुरीच्या पानांचें व शेंगांचें भूस हें गुरांचें पौष्टिक व आवडतें खाद्य आहे. तुरीच्या झाडाचे ओले शेंडेहि गुरांस खावयास घालतात. उत्तर बंगालमध्यें व आसामांत लाखेचा किडा पोस-

ण्यास तुरीची लागवड करतात. मादागास्करमध्यें तुरीचीं पानें एक प्रकारच्या रेशमाच्या किड्यांस खावयास घालतात. तुरीच्या पिठाचें पोटीस करतात. तूर तुरट, गोड, पचनास हलकी, कफहारक व पित्तहारक आहे. सर्पाच्या विषावर मुळी चावून खातात, मूर्च्छेवर डाळ उगाळून अंजन करतात व खरजेवर डाळ किंवा पाला जाळून दह्यांत खलून लावतात.

**तेघबहादूर** (मृ. १६६५)—शिखांचा नववा गुरु. यास मुसलमानांनीं अत्यंत हाल करून ठार मारल्यामुळेंच शिखांत नवचैतन्य निर्माण झालें. याची बलिदानतिथि वि. सं. १७२२, मार्ग. शु. ५ आहे.

**तेजपात्र**—वसंत ऋतूंत बहरणाऱ्या फुलझाडांपैकीं सौम्य गुलाबी रंगाच्या फुलांचें हें झाड आहे. तेजपात्राच्या अनेक जाती आहेत. पैकीं हिंदुस्थानांत जास्त प्रमाणांत आढळणाऱ्या दोन जातींस 'बर्मा' आणि 'जाव्हा' अशीं नांवें आहेत.

'बर्मा' जातीच्या झाडांच्या फांद्या फुलांनीं आच्छादिलेल्या असतात, पण त्यांवर पानांचा अभाव असतो. तर 'जाव्हा' जातीच्या फुलांचे घोंस लांबट आकाराच्या कोंवळ्या पानांतून डोकावतात.

**तेजसिंह गुहिलोत**— मेवाडचा एक राजा. जैत्रसिंहानंतर मेवाडच्या गादीवर हा आला. यानें परमभट्टारक, महाराजाधिराज, परमेश्वर अशीं बिरुदें धारण केलीं होतीं. धोलक्याचा राजा विसलदेव व तेजसिंह यांमध्यें युद्ध झालें असावें, असें एका शिलालेखावरून दिसतें. याची राणी जयतल्लदेवी. हिनें चितोडवर शामपार्श्वनाथाचें मंदिर बांधलें. हिचा पुत्र समरसिंह. तेजसिंहाची दुसरी राणी रूपादेवी. हिचा बुडतऱ्याच्या विहिरीवर शिलालेख आहे. ही जालोरचा चाचिकदेव चौहान व लक्ष्मीदेवी यांची मुलगी व क्षेत्रसिंहाची माता होय.

याच्या वेळीं वि. सं. १३१७ (स. १२६१) माघ शु. ४ ला श्रावक प्रतिक्रमणसूत्रचुर्णि नांवाचें पुस्तक आघाटदुर्ग (आहाड) येथें ताडपत्रावर लिहिलें गेलें. तें आज अनहिलवाडा येथें सुरक्षित आहे. त्यांत याच्या महामात्याचें नांव समुद्धर असें दिलें आहे. याच्या वेळचे दोन शिलालेख मिळाले आहेत. पहिला चितोडजवळ घाघसा गांवच्या बावडीवर आहे. तो वि. सं. १३२२, कार्तिक शु. १ रविवारचा आहे. त्यांत पद्मसिंहापासून तेजसिंहापर्यंत वंशावळ आहे. तसेंच बावडी बांधणाऱ्या डिंडू जातीच्या रत्नाच्या पूर्वजाचें वर्णन आहे. ही प्रशस्ति भुवनचंद्राचा शिष्य रत्नप्रभसुरीनें केली आहे. दुसरा शिलालेख गंभीरी नदीच्या पुलावर आहे. त्यांत चैत्रगच्छाचे आचार्य रत्नप्रभसुरि याच्या उपदेशावरून याच्या वेळीं याचा राजपुत्र कांगा याच्या पुत्रानें तो बांधिला असें लिहिलें आहे.

तेजसिंह हा वि. सं. १३२४–३० (स. १२६६–७३) च्या दरम्यान वारला. (च. को.).

**तेजोमेघ**—(नेब्युला). हे तेजोमेघ बहुधा दुर्बिणीच्या मदतीनें पाहतां येतात. साधारणतः यांचे दोन वर्ग पडतात: १ हिरवे तेजोमेघ, व २ पांढरे तेजोमेघ. हिरव्यांत दीप्तिमान् वायू असतात व पांढऱ्यांत दीप्तिमान् घन किंवा द्रव पदार्थ असतात. हे सर्व तेजोमेघ शंखाकृति असतात. देवयानी किंवा उत्तरा भाद्रपदा नक्षत्रांतील तेजोमेघ पांढऱ्या वर्गापैकीं सर्वांत मोठे होत. हिरव्या वर्गांतील ओरायनमधील तेजोमेघ आकाशगंगेच्याजवळच दिसतो. मृगांतील व देवयानींतील तेजोमेघ पाहण्यास फारशी मोठी दुर्बीण लागत नाहीं. तेजोमेघांचे वेध घेऊन त्यांच्याविषयीं बरीच माहिती सर विल्यम हर्शल व सर जॉन हर्शल यांनीं दिली आहे. तेजोमेघांचे वर्णलेख घेतां येतात व कांहींत स्पंदमान् तारेहि दिसतात. त्यांच्या मदतीनें तेजोमेघांचीं अंतरे काढतां येतात. वर्णलेखाच्या योगानें उज्ज, प्राण, नत्र व सौर वायू यांचे परमाणू अत्यंत विरल स्वरूपांत तेजोमेघांत असल्याचें सिद्ध झालें आहे. तेव्हां तेजोमेघ हे स्वयंप्रकाशित नसून त्यात असलेल्या ताऱ्यांमुळें ते आपणांस दिसतात.

प्रसिद्ध ज्योतिषी लाप्लास यानें तेजोमेघाचा सिद्धांत मांडला. फार प्राचीन काळीं एक फार मोठा पसरलेला तेजोमेघ असून तो स्वतःभोंवतीं फिरत असावा. अरीभवनानें याची उष्णता कमी होत चालली असतां त्याचें संकोचन झालें व वर्तुलगति वाढली. तेव्हां यांतून एक तेजोमय पदार्थ-चक्र अलग झालें. अशीं एकामागून एक चक्रें पडत चाललीं. हें प्रत्येक चक्र पुढें घनत्व पावून अवशिष्ट मध्यवर्ती तेजोमेघाभोंवतीं फिरूं लागलें. याप्रमाणें सूर्यमाला बनली. ग्रहांचे चंद्रहि असेच बनून फिरूं लागले. हा लाप्लासचा सिद्धांत गतिशास्त्राला धरून नसल्यानें सर्वमान्य नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

**तेनाल रामलिंग**—एक तेलगू कवि. हा कवि शालिवाहनाच्या १५ व्या शतकांत तेनाली खेड्यांत ईश्वरप्रगटवारू नामक ब्राह्मण कुलांत जन्मला. कृष्ण रायल्लू राजाच्या दरबारांत जे प्रख्यात आठ कवी होते, त्यांपैकीं हा होय असें म्हणतात. यानें भट्टपालक्य नांवाच्या एका राजकवीजवळ संस्कृत भाषा व तेलंगी भाषेचें व्याकरण यांचें अध्ययन केलें. कृष्णदेवाच्या राणीवर एक काव्य रचून यानें दरबारांत प्रवेश मिळविला. राजाश्रय मिळाल्यावर पांडुरंगमाहात्म्य नांवाचें एक रसाळ काव्य यानें रचिलें. हा अतिशय थट्टेखोर होता. याच्याबद्दल अनेक गोष्टी कालिदास व भोजराजा, किंवा अकबर व बिरबल यांप्रमाणें प्रचलित आहेत.

**तेनासरीम**—खालचा ब्रह्मदेश, एक विभाग. क्षे. फ. ३६,०८६ चौ. मै. व लो. सं. १८,७२,६६८. तालुक्याचें क्षेत्रफळ ४,०३३ चौरस मैल. यांत ११४ खेडीं आहेत. अर्ध्यापेक्षां जास्त जमिनींत तांदूळ होतो व बाकीच्या जमिनींत इतर पीक होतें.

हा सयामच्या हद्दीला लागून आहे. विभागाचें मुख्य ठिकाण मोलमीन आहे. तेनासरीम शहर तेनासरीम नदीच्या कांठीं आहे. नदी २५० मैल लांबीची आहे. शेंकडों वर्षेंपर्यंत हें गांव सयामशीं होणाऱ्या व्यापाराचें मुख्य बंदर होतें. येथें एक दगडी खांब आहे. बायका याच्या दर्शनास नेहमीं येतात व त्याला सोन्याचीं पानें चिकटवतात. या गांवांत असणाऱ्या टेकडीवर एक शिलालेख आहे. 'चिन्नयरत्नराजानें १४९१ ते १५२६ सालापर्यंत पेगू येथें राज्य केलें,' असें त्यांत लिहिलें आहे.

पहिल्या इंग्रजी-ब्रह्मी युद्धांत (१८२६) आराकानबरोबर तेनासरीम ब्रिटिशांकडे आलें. जपाननें दुसऱ्या महायुद्धांत ब्रह्मदेश घेतला. तो १९४५ सालीं ब्रिटिशांनीं परत मिळविला. तरी या विभागावर त्यांची मूळची सत्ता एकदम सुरू झाली नव्हती.

**तेरडा**—एक फुलझाड. याचीं फुलें तांबड्या रंगाचीं असतात व झाडावर खालींवर सर्वत्र येतात. फुलांस वास नसतो, पण दिसावयाला शोभिवंत असतात. नेहमीं रंग बदललेले दिसतात, यावरून 'तेरड्याचा रंग तीन दिवस' ही म्हण पडली आहे. तेरडा हा वांति, व्रण व विस्वरता यांचा नाशक आहे.

**तेरदाळ**—मुंबई, जुनें सांगली संस्थान, तेरदाळ विभागाचें मुख्य ठिकाण. तेरदाळ हें बेळगांवच्या ईशान्येस ६० मैल व सांगलीच्या आग्नेयीस ४१ मैल आहे. येथून कृष्णेचा प्रवाह ४॥ मैल आहे. हें तालुक्याचें ठाणें होतें. हें व्यापाराचें मोठें ठिकाण आहे. येथें लोकांचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे साड्या, धोतरें, आणि कांबळीं करणें हा होय. पूर्वी या गांवांत तांबें व पितळ यांचा बराच व्यापार चालत असे. येथें प्रभुस्वामी व नेमनाथ या नांवांचीं ११८७ सालीं बांधलेलीं जैन लोकांचीं फार महत्त्वाचीं अशीं दोन देवालयें आहेत. यास पूर्वी जो तट होता त्याचाच उल्लेख बहुधा नेमनाथाच्या देवळांतील शिलालेखांत असावा. तटाचा कांहीं भाग अवशिष्ट आहे.

**तेलंग, काशिनाथ त्र्यंबक (१८५०-१८९३)**—मुंबईचे एक हिंदी कायदेपंडित व प्राच्यविद्याकोविद. हे एम्. ए., एल्एल्. बी. झाल्यावर कांहीं दिवस वकिली करीत होते. नंतर यांना हायकोर्टात जज्जाची जागा मिळाली. हे चांगले संस्कृत पंडित असून यांनीं बरेच विद्वत्ताप्रचुर आणि संशोधकीय लेख लिहिले आहेत. हे समाजसुधारक होते. रामायण फार प्राचीन असून होमरच्या काव्याचा अनुवाद नाहीं असें त्यांनीं पुराव्यानिशीं सिद्ध करून दिलें. तसेंच भगवद्गीता व बायबल यांचा संबंध नाहीं असें दाखविलें. पाश्चात्य पंडितांचे भारतीय साहित्यासंबंधींचे कांहीं अपसिद्धांत यांनीं खोडून काढले.

राष्ट्रीय सभेच्या प्रस्थापनेच्या कामीं खटपट करणाऱ्यांपैकीं हे एक होते. हे कांहीं वर्षे राष्ट्रीय सभेचे चिटणीसहि होते. त्यांनीं पहिल्या अधिवेशनांत वरिष्ठ व प्रांतिक कायदे मंडळासंबंधींच्या ठरावावर भाषण केलें व मतदारसंघाचा आराखडा मांडला. सर ऑकलंड कॉल्विन व लॉर्ड डफरीन यांनीं राष्ट्रीय सभेवर जी टीका केली तिला यांनीं राष्ट्रीय सभेच्या चौथ्या अधिवेशनांत झणझणीत उत्तर दिलें. याच वेळीं कायमधारापद्धतीच्या चर्चेमधील आपली बाजू यांनीं उत्कृष्ट तऱ्हेनें मांडली. सरकार आपल्या अनेक कार्यांवर पैसा खर्च करतें, पण शिक्षणाकरितां केवळ एक टक्काच खर्च करतें अशी त्यांनीं योग्य टीका केली आहे.

**तेलगू भाषा व वाङ्मय**—तेलगू भाषा-द्राविडी भाषेच्या आंध्र वर्गांत तेलगू भाषा मोडते. तेलगू भाषा बोलणारांची एकंदर लो. सं. (१९३१) २,६३,७३,७२७ आहे. ही भाषा बोलणारे लोक हिंदुस्थानांत सर्वत्र असून, विशेषतः मद्रास इलाखा (सु. दीड कोटी) आणि निजामाचें राज्य (साठ लक्ष) यांत जास्त आहेत. निजामाच्या राज्यांत मुख्य चार भाषा आहेत, त्यांत तेलगू ही एक आहे. १८८१ पासून मोंगलाईंतील ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या शेंकडा ५० नें वाढली आहे. निजामाच्या राज्यांत या लोकांचा एक स्वतंत्र तेलंगण नांवाचा प्रांतच आहे. मोंगलाईंतील दुसरा भाग जो मराठवाडा त्यांतील करीमनगर, मेदक व नळगोंडा या जिल्ह्यांत यांची संख्या शें. ९० आहे. तेलंगणांत यांच्या लोकसंख्येची वाढ गेल्या वीस वर्षांत दीडपटीपेक्षां अधिक झाली आहे. रायचूर, बेदर, गुलबुर्गा इकडेहि तेलंगी भाषा बरीच प्रचारांत आहे. खुद्द हैद्राबाद शहरांत सु. दोन लाख इतकी तेलगू भाषा बोलणारांची लोकसंख्या आहे. निजामाच्या राज्यांत मराठी भाषा बोलणारांपेक्षां ही भाषा बोलणारांची संख्या दुप्पट आहे. याशिवाय अंदमान, आसाम, बंगाल, बिहार-ओरिसा, ब्रह्मदेश, मुंबई इलाखा, मध्यप्रांत, वऱ्हाड, कूर्ग व म्हैसूर संस्थान या भागांतहि तेलगू लोकांची वस्ती कमीजास्त प्रमाणांत आहे.

तामिळ भाषेपेक्षां तेलगू भाषेचा प्रसार जास्त आहे. साधारणतः हिच्या चतुःसीमा पुढीलप्रमाणें ठरतातः—उत्तरेस मध्यप्रांतांतील चांद्यापासून ते ओरिसामधील चिकाकोलपर्यंत; पश्चिमेस मोंगलाईचा मराठवाडा; दक्षिणेस मद्रासपर्यंत—म्हणजे जेथें तामिळ भाषेस सुरुवात होते तेथपर्यंत; आणि पूर्वेस

किनाऱ्यापर्यंत. पश्चिम किनाऱ्यावर मात्र तेलगूंची मुळींच वस्ती नाहीं.

तेलगू भाषिकांच्या प्रांतास प्राचीन काळीं आंध्र देश म्हणत असत. हल्लींचें तेलिंगण हें नांव मुसलमान लोकांनीं दिलें आहे. त्यावरूनच सांप्रत येथील भाषेस तेलगू किंवा तेलिंग असें म्हणतात. तामिळ भाषेच्या खालोखाल हिच्यांत मोठा शब्दसंग्रह असून हिचे उच्चार मधुर असतात. संस्कृति व सुधारणा या बाबतींत ही तामिळच्याच जवळजवळ आहे. प्रत्येक शब्दाचा शेवट स्वरांत होत असल्यामुळें हिला पूर्वेकडील 'इटालियन भाषा' असें म्हणतात. मधुरोच्चारामुळें व सांस्कृतिक परिणामामुळें जेंटू असेंहि हिला कांहीं विद्वानांनीं नांव दिलें होतें; हल्लीं मात्र तें नांव फारसें प्रचारांत नाहीं.

लिपि—तेलगू लिपि स्वतंत्र असून, ती तामिळसारखी मूळ अशोकाच्या ब्राह्मी लिपीच्या वंशांतील आहे. मात्र सातव्या शतकांतील वेंगी आणि चालुक्य यांच्या राजवटींचा परिणाम तिच्यावर होऊन तिचें प्राचीन रूप बरेंचसें बदललें आहे. कानडी लिपीचेंहि मूळ याचप्रमाणें असून, तेलगू व कानडी या दोन्ही १३ व्या शतकापर्यंत एकाच स्वरूपांत पाहावयास सांपडत असत. पुढें मात्र त्यांत फरक पडत जाऊन १९ व्या शतकांत तर मुद्रणकलेच्या प्रसारामुळें दोहींचें स्वरूप बरेंच भिन्न दिसूं लागलें. सांप्रत या दोन्ही लिपि अगदींच स्वतंत्र झाल्या आहेत. ज्याप्रमाणें जुन्या वत्तेलुत्तु मुळाक्षरांतील वर्णांची संख्या ठराविक नव्हती त्याचप्रमाणें तेलगूचीं मुळाक्षरें ठराविक नाहींत. मलयाळम् वर्णांप्रमाणेंच तेलगू वर्णहि पुष्कळ आहेत. तेलगू अक्षरांना जीं वांकडीं अथवा गोल वळणें दिलेलीं आढळतात, त्याचें कारण पूर्वीं ताडपत्रावर लोखंडाच्या लेखणीनें लिहितांना, लेखणी पानांच्या शिरांत घुसून अक्षरें फाटून जाऊं नयेत हें होय.

प्राचीन शिलालेखांत पांचव्या शतकांपासून या लिपीचा उपयोग केलेला आढळतो. तेव्हांपासून चौदाव्या शतकापर्यंत हिच्यांत हळूहळू रूपांतर होत होत आजची तेलगू लिपि बनली आहे. त्वरेनें लिहिणें व वर सांगितल्याप्रमाणें तें ताडपत्रावर लिहिणें हीं कारणें या लिपीच्या सांप्रतच्या वळणास मुख्यत्वेंकरून घडलीं आहेत. याच कारणामुळें कानडीमध्येंहि फरक होऊन या दोहोंची सांप्रत अगदींच फारकत झालेली आढळून येते. पल्लव, कदंब, पश्चिम आणि पूर्व चालुक्य, राष्ट्रकूट, गंग व काकतीय, वगैरे राजवंशांच्या दानपत्रांत व शिलाशासनांत तेलगू लिपि योजली गेली असून त्या सर्वांत तिचें प्रथमपासून शेवटपर्यंतचें परिवर्तन पाहावयास सांपडतें.

तेलगू हा शब्द 'तेलू' ह्या विशेषणापासून निघाला असावा असा देखील कदाचित् संभव आहे. कारण, तेलू म्हणजे सुंदर, पांढरा असा अर्थ होतो, आणि हें विशेषण बहुतकरून तेलंगणच्या लोकांची इतर देशाच्या लोकांशीं तुलना करतांना लाविलें असल्याचें संभवतें, असें रा. शंकर सायन्ना परशा हे म्हणतात.

तेलगू भाषा द्राविड भाषासंघांतील आहे हें आजचें भाषाशास्त्र सांगतें. तथापि जुन्या ग्रंथकारांनीं इतर प्राकृत भाषांप्रमाणें तेलगू ही देखील संस्कृतचें अपत्य म्हणून धरली होती.

तेलगू भाषेंतील शब्दांसंबंधानें व्याकरणदृष्टीनें ४ मुख्य भेद आहेत ते असे :—तत्सम, तद्भव, देशी व ग्राम्य. तत्सम म्हणजे संस्कृतसम. संस्कृत शब्द जसाचा तसा घेऊन त्यास तेलगू प्रत्यय लावून जो शब्द योजिला जातो त्यास तत्सम म्हणतात. आतां दुसरा प्रकार तद्भव हा होय. संस्कृतांतून किंवा प्राकृतांतून अपभ्रंश होऊन तेलगूंत आलेले शब्द तद्भव होत. तद्भव शब्दांपैकीं निम्मे शब्द संस्कृत भाषेंतील शब्द होत व बाकीच्या निम्म्या शब्दांहून थोडेसे अधिक शब्द महाराष्ट्र प्राकृत भाषेंतील होत. तेलगू तद्भव शब्द हे केवळ संस्कृत भाषेंतील अथवा ज्या सहा प्राकृत भाषा आहेत त्यांच्यापासून निघालेले असावे असें वाटतें. तेलगू भाषेंतील शुद्ध शब्द कोणते व तद्भव शब्द कोणते हें ओळखणें कित्येकदां कठिण पडतें. तेलगूंतील शब्दसंग्रहापैकीं एक-चतुर्थांश शब्द तद्भव आहेत. देशी म्हणजे इतर कोणत्याहि देशांतील नसून केवळ तेलंगी देशांतलेच शब्द. ग्राम्य शब्द म्हणजे प्राकृत जन भाषणांत जे ग्राम्य शब्द वापरतात ते. ग्राम्य शब्द ग्रंथांत अनुकरणाकरितांहि योजण्याचा पूर्णपणें निषेध आहे. ग्राम्य किंवा अलाक्षणिक (व्याकरणविरुद्ध) शब्दप्रयोग भाषेंत होऊं न देण्याविषयीं तेलगू भाषा-लक्षणवेत्ते फार काळजी घेतात. आंध्रदीपिका नामक तेलगू व्याकरणाचा कर्ता मामीडी व्यंकय्या ह्यानें आपल्या व्याकरणांत निरनिराळे पंचवीस शब्द घेऊन त्यांपैकीं शुद्ध तेलगू शब्द कोणते व अशुद्ध तेलगू शब्द कोणते हें दाखविलें आहे. शुद्ध तेलगू शब्दांस 'अचा तेलगू' म्हणतात व जे अशुद्ध तेलगू शब्द भाषेंत मिसळले आहेत त्यांस ग्राम्य तेलगू म्हणतात. तेलगू भाषेचा प्रसिद्ध वैयाकरण नन्नयभट्ट होय आणि त्यानें आपला व्याकरणग्रंथ संस्कृतमध्यें लिहिला आहे. तेलगू कवींनीं संस्कृत वृत्तेंच वापरलीं आहेत.

तेलगू भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा पुष्कळ असून लिखाणहि बरेंच आहे. तिच्या उपभाषा फार नाहींत. मध्यप्रांतांतील कोमटी, यानादि व मद्रासकडील चेंट्सु (जेंटू ?) असल्या कांहीं किरकोळ भाषा या उपभाषांमध्यें गणल्या जातात. कैकाडी आणि वडार हे जी भाषा बोलतात तीहि अपभ्रष्ट तेलगूच होय. द्राविड भाषांमध्यें तेलगूचें स्थान बरेंच महत्त्वाचें व स्वतंत्र असल्यामुळें,

मोठा तेजोमेघ — उत्तराभाद्रपदा नक्षत्रांतील ( पृ. ११०२ )

दार्जिलिंग — लेपची स्त्री ( पृ. ११७८ )

तोरणा किल्ला ( पृ. १११३ )

त्रिचनापल्ली — तळें ( पृ. १११७ )

दांतांसारखी योजना केलेली असते. शरीररचनेंतील अगदीं प्रगत अवस्थेंतील जी जीभ ती तोंडांतच असते.

**तोंडलें**—तेंडलें. या वेलास लॅटिनमध्यें सेफालँड्रा इंडिका, व संस्कृतमध्यें तुडिकेरी असें म्हणतात. तोंडल्याचे वेल असतात, व ते अनेक वर्षे जगतात. सरद-गरम हवेंत सर्व वर्षभर त्याला फळें येतात. वेल मांडवावर अगर दुसऱ्या झाडावर चढवितात. वेलाचीं कडीं उन्हाळ्यांत लावावीं. पण देशावर पावसाळ्यांत लावावीं. तोंडल्याची भाजी राजमान्य आहे. वांगीभाताप्रमाणें तोंडलीभात करतात. तोंडलें बुद्धिनाशक आहे असें म्हणतात, पण तें औषधी आहे. त्याचा रस विषावर उपयोगी आहे.

**तोडा**— एक जात. तूद पाहा.

**तोडी**—हा राग तोडी थाटाचा आश्रयराग आहे. याचा आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतो म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. या रागांत पंचमाचें प्रमाण अमळ कमी असतें. तसेंच आरोहांत ऋषभ स्वर दुर्बल ठेवितात. गांधार स्वरावरील आंदोलन मनोवेधक असतें. या रागाची प्रकृति गंभीर आहे.

**तोतया भाऊसाहेब**—पानपताच्या लढाईत सदाशिवराव-भाऊ पडल्यानंतर त्याचा एक तोतया निघाला. हा बुंदेलखंडांत छत्रपूरजवळील कनोल गांवीं सुखलाल नांवाचा कनोजी ब्राह्मण होता. त्याच्या बापाचें नांव रामानंद व आईचें अन्नपूर्णा. भाऊ-बंदांच्या त्रव्यास त्रासून सुखलाल नरवर येथें आला. तेथें थकून एका वाण्याच्या दुकानीं बसला असतां दोन-तीन दक्षिणी माणसांनीं त्याला पाहून म्हटलें कीं, तूं भाऊसाहेबांसारखा दिसतोस, तुला पेशवाई देऊं, चल ! सुखलाल धाडसी व धूर्त होता. त्यानें या रूपसाम्याचा फायदा घेण्याचें ठरविलें व आपणांस सदाशिवरावभाऊ म्हणून जाहीर केलें. नरवर येथें शंभुपुरी पंथाच्या गोसाव्यांचा एक मठ होता. तेथील पुष्कळ गोसावी सुखलालास मिळाले व हे खूळ वाढत चाललें. तोतयानें फौजहि जमविली.

नरवरजवळ करेरा येथें झांशीचा सुभेदार नारोशंकर याचा पुतण्या विश्वासराव राहत होता. त्याला तोतयानें किल्ला आपणांस देण्याबद्दल लिहिलें. त्याने माणसें पाठवून खात्री करून घेतली व किल्ला स्वाधीन केला. याबरोबर हिंदुस्थानांतील ठिकठिकाणचे मामलेदार भेटीस येऊन वसूल मिळूं लागला. तोतयानें खरोखरीच्या पेशव्याप्रमाणें फौज, तोफा, गारदी, हत्ती, पालख्या, वगैरे सारा सरंजाम ठेवून तो दक्षिणेकडे आला. स्वारीच्या खर्चासाठीं त्यानें वाटेंत मराठ्यांचेंच गांव लुटलें.

समशेरबहाद्दुराच्या मेव्हण्यानें पेशवे यास व दोन भिक्षुकांनीं खुद्द पार्वतीबाईस पत्रें लिहिलीं कीं, भाऊ खरे आहेत ! नर्मदा उतरून तोतया खानदेशांत दंगा करूं लागला. तेव्हां थोरल्या माधवरावाने फौज पाठवून त्याला पकडून धनगडास कैदेंत टाकलें. पुढें त्याची व जनकोजीच्या तोतयाची जाहीर चौकशी करून ते खोटे असें नक्की ठरल्यावर त्यांना प्रतिबंधांत ठेवलें (१७६७).

पुढें तोतया रत्नागिरीस असतां रत्नागिरीचा सुभेदार रामचंद्र नाईक परांजपे यानें फितुर होऊन तोतयाला सोडलें व त्याची द्वाही फिरविली (१७७६). तोतयानें फौज जमवून कोंकणांत धुमाकूळ घातला. सरकारचें सर्व आरमार त्याला मिळालें. कोंकणां-तील बहुतेक किल्ले व मुलूख काबीज करून बोरघाट चढून त्यानें राजमाची घेतली व सिंहगडाकडे प्रेष लाविला (ऑक्टो-बर). या वेळीं इचलकरंजीवर घोरपडे, इंग्रज, कोल्हापूरकर, हैदर, वगैरेंनीं त्यास मदत केली. इतकें झाल्यावर नानानें शिंदे, होळ-कर व पानशे यांना तोतयावर पाठविलें. महादजीनें सिंहगडाचा बंदोबस्त केला. पानशे यानें तोतयास मागें हटवून राजमाची-हून त्याला हुसकलें. तेव्हां तो कोंकणांत पळाला. त्याच्या मागें शिंद्यानें आपला दिवाण पाठविला. तोतया बेलापुरास येऊन गलबतांतून इंग्रजांकडे मुंबईस निघाला. राघोजी आंग्र्यानें बातमी राखून गलबत पकडलें व त्याच्या सर्व लोकांनिशीं तोत-यास पुण्यास आणलें (नोव्हेंबर).

तोतयानें पुनः आपली चौकशी करावी म्हणून विनंति केल्या-वरून नानांनीं, रामशास्त्री, गोपीनाथ दीक्षित, हरिपंत फडके, बापूजी नाईक, वगैरे पंच नेमून जाहीर चौकशी केली. तींत तोतया सर्वानुमतें खोटा ठरल्यावर त्याची धिंड काढून व शहरां-तील लोकांस दाखवून नंतर मेखसूनें त्याचें डोकें फोडून त्याला देहांत शासन दिलें (१८ डिसेंबर १७७६).

इतिहासांत आणखी बरेच तोतये निघालेले आढळतील. सवाई माधवरावाची स्त्री यशोदाबाई हिची एक तोतयी स्त्री पुढे येऊन तिनें ब्रिटिश सरकारकडे उत्पन्नाबद्दल अर्ज केला होता. दुसरा नानासाहेब पेशवा (बंडवाला) याचेहि तोतये १९१७ पर्यंत ऐकूं येत होते.

**तोतयेगिरी**—इंग्लंडांत एखाद्या शेअरचा मालक, भागीदार किंवा वर्षासनाचा मालक इत्यादींचा मालक आहे अशी खोटी बतावणी करणें (पर्सोनेट) याला तोतयेगिरी म्हणतात. आणि अशा गुन्ह्याला जास्तींत जास्त हयातभर (फॉर लाइफ) सक्त-मजुरीची शिक्षा असते. निवडणुकीच्या वेळीं मत देतांना तोतयेगिरी करणें याला कमाल दोन वर्षे सक्तमजुरीची शिक्षा आहे. हिंदुस्थानांत 'इंडियन पिनलकोड' या कायद्यांत आणि

निवडणुकीबद्दलच्या कलमांत या गुन्ह्याबद्दल शिक्षा सांगितलेल्या आहेत (कलमें १७०।१७१।१७१ एफ्).

**तोतरें बोलणें**— भाषण करीत असतां अक्षराचा उच्चार एकदम बंद होऊन कांहीं काळपर्यंत स्तब्धता व नंतर बहुतकरून कांहीं वेळां त्याच अक्षराचा कित्येक वेळां जलद पुनरुच्चार होणें. हें व्यंग बरेंच पाहण्यांत येतें. या व्यंगाचें कमीअधिक प्रमाण असतें. कांहीं ठराविक अक्षरापुरतें अडखळणें, गनांत असलेलें अक्षर न उमटल्यामुळें भलताच अर्थशून्य शब्द उच्चारणें हें अल्प प्रमाण झालें. पण मोठ्या प्रमाणांत इष्ट शब्द जिभेनें न उच्चारतां आल्यामुळें चेहरा, जीभ, घसा या ठिकाणीं विलक्षण चेंधा उडते, इतकेंच नव्हे तर श्वसनक्रियेचे स्नायू व हस्तपादादि अवयव यांवरहि या अडखळण्याचा परिणाम दिसतो. तोतरें बोलणें आनुवंशिक असतें असें म्हणतां येईल. चारपांच वर्षांच्या वयापासून पुढें व विशेषतः यौवनावस्थेत मूल प्रवेश करीपर्यंत हें व्यंग पूर्णावस्थेंत येतें व पुरुषामध्यें स्त्रियांपेक्षां तें अधिक आढळून येतें. उन्मादवात, फेंपरें वगैरे वातरोग, अशक्तपणा, मोठें दुखणें येऊन जाणें, मनास धक्का बसणें व तोतऱ्या माणसास वेडावणें या कारणांमुळें हा रोग जडतो.

हें व्यंग उच्चार सुधारण्यासाठीं शिक्षक ठेवून न कंटाळतां उच्चाराचा अभ्यास केल्यानें पूर्णपणें दूर होतें. कांहीं प्रसिद्ध वक्त्यांना देखील हें व्यंग अगोदर असून त्यांनीं तें मेहनतीनें घालविल्याचीं उदाहरणें आहेत. अति अडखळणारा जो रोगी असेल त्यानें आपली प्रकृति—मुख, जीभ, कंठ, वगैरे—तज्ज्ञांस दाखवून त्यांपैकीं कांहींमध्यें अगर एकंदर प्रकृतींत कांहीं दोष असल्यास ते सुधारून घ्यावे; म्हणजे थोडाबहुत उपयोग होण्याचा संभव आहे.

**तोफखाना**—बंदुका व लहान हत्यारें आणि 'मशीनगन्स' वगळून बाकी मोठ्या सर्व तोफांचा समावेश तोफखान्यांत होतो. तोफा चालविणाऱ्या सैन्याचाहि यातच अंतर्भाव होतो. तोफखान्याचे युद्धाच्या (फील्ड), अवजड (हेव्ही), व वेढ्याच्या (सीज) असे तीन प्रकार असतात. वेढ्याच्या तोफांचा उपयोग जर्मन लोकांनीं प्रथम चौदाव्या शतकांत करण्यास सुरुवात केली व पुढील शतकांत त्यांचा सर्वसामान्य युद्धांत उपयोग होऊं लागला. लंडनमध्यें १५३७ मध्यें पहिली तोफखाना मंडळी (ऑनरेबल आर्टिलरी कंपनी) निघाली. यांचा उद्देश सर्व उडणाऱ्या हत्यारांस उत्तेजन देण्याचा होता. अलीकडे तोफखान्यामध्यें फारच प्रगति झालेली आहे व आज प्रत्यक्ष दिसत नसलेल्या लक्ष्यावरहि नेमका तोफेचा गोळा टाकतां येतो. तसेंच बिनधुराच्या दारूचा उपयोग करण्यांत येत असल्यामुळें शत्रूच्या तोफखान्याच्या जागेचा शोध लावणें दिवसेंदिवस फार कठिण होत चाललें आहे. तोफखान्याचा उपयोग फक्त आपल्या सैन्यास मदत करण्याच्या कामीं होतो. केवळ तोफखान्याच्या साहाय्यानें लढाई जिंकतां येत नाहीं, तर यांचा पायदळाला मार्ग करून देण्याच्या कामीं चांगला उपयोग होतो.

आशिया खंडांतील पश्चिमेचीं मुसलमानी राष्ट्रें तोफखाना बाळगून असत. बाबरनें हिंदुस्थानांतील दिल्लीचा बादशहा इब्राहिम लोदी याचा तोफांच्या बळावर पानपत येथें पराभव केला (१५२६). मोंगल बादशाहींत तोफखाना असे, पण तो फारसा कार्यक्षम नसे. औरंगजेबाला इराणच्या शहाशीं बरेंच लढूनहि कंदाहार जिंकतां आलें नाहीं; कारण इराणी तोफखाना सरस होता.

मराठे अमदानींत तोफा व दारूगोळा प्रथम युरोपियन व्यापाऱ्यांकडून खरेदी करीत व त्याकारणानें त्यांची कार्यक्षमता विशेषशी नसे. दारूचे कारखाने बहुधा लहानमोठ्या किल्ल्यांवरून असत; शिवाय पुणें, कल्याण, अहमदाबाद, बह्मारी, इ. मोठ्या ठिकाणींहि दारू तयार होई. प्रत्येक किल्ल्यावर लहानमोठ्या तोफा असत; तसेंच लष्करी ठाण्यांत तोफा, जुंबरे, दारूगोळा, वगैरे लढाऊ सामान ठेवलेलें असे. त्याची वेळोवेळीं सरकारी तपासणी होई. तोफांचे कांहीं प्रकार म्हणजे चिडीतोफ, गरनाळ, जुंबरा, पंचरसी, जेजाला, सूतरनाळ, इ. असत. तोफांना अस्मानतडाखा, ज्वालाभवानी, व्याघ्रमुखी, महांकाळी, मेढा, इ. नांवें दिलेलीं असत. तोफखान्यांत हलका, भारी, डोंगरी, आरमारी, वगैरे पुन्हां प्रकार असत. तोफखान्याचें महत्त्व प्रथम चिमाजीआप्पाला कळून आलें. नंतर त्याचा मुलगा सदाशिवरावभाऊ यानें तोफखाना मराठे लष्करास जोडला. हा इब्राहीमखान गारद्याचा तोफखाना इतिहासांत प्रसिद्ध आहे. पुढें सरदार पानसे हे तोफखान्याचे सरदार होते.

ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टर बोर्डानें १७४८ मध्यें युरोपियन पद्धतीवर तोफखान्याची रचना करण्याचें ठरविलें. त्यापूर्वी चार-पांच ठिकाणीं थोडथोड्या तोफा असत. यानंतर प्रत्येक प्रांतांत एक तोफखान्याची तुकडी उभारण्यांत आली. हिंदुस्थानचा कारभार इंग्लंडच्या राजाकडे गेल्यावर बादशाही तोफखान्यांत मुंबई, मद्रास व बंगाल येथील युरोपियन तोफखाने सामील केले. हिंदी तोफखाना कमी झाला. शांततेच्या काळांतील तोफखान्याची व्यवस्था पुढीलप्रमाणें होती—१ रॉयल हॉर्स, २ फील्डरॉयल, ३ रॉयल फील्ड, ४ पॅक, ५ मीडियम, ६ कोस्ट, ७ फ्रॉंटियर गॅरिसन व ८ इंडियन कोस्ट हे आर्टिलरीचे विभाग केले. हिंदी इसमांना तोफखान्याचें शिक्षण देण्याची कांहीं तरतूद केली होती.

हल्लीं हिंदी तोफखान्याचे मौंटन, फील्ड, अॅन्टीटँक, अॅन्टी-एअरक्रॅफ्ट, कोस्ट डिफेन्स यांसारखे विभाग असून गेल्या महायुद्धांत ८४,००० सैनिक तोफखान्याकडे होते.

**तोफा**—तोफा प्रथम लांकडाच्या करीत असत किंवा क्वचित् चामड्याच्या करीत. त्यांवर लोखंडाच्या पट्ट्या बसवीत. हिल्या तोफा निमुळत्या शंकूसारख्या असत. त्यांचीं तोंडें रुंद असत. पुढें त्या वाटोळ्या लांबट बनवूं लागले. नंतर त्या लोखंडाचे गज लोखंडी पट्टयानें बांधून पिंपासारख्या तयार करूं लागले. अशा तऱ्हेची तोफ एडिंबरोच्या किल्ल्यांत आहे. लोखंडी ओतींव तोफा इंग्लंडमध्यें प्रथम हॉज आणि बॉड यांनीं १५४३ मध्यें बकस्टेड येथें तयार केल्या.

१. समुद्रकिनाऱ्यावरील अवजड तोफ

[अ. मागील भाग. ब. क. मजबुतीचा भाग. ड. पोकळ भाग. फ फ. कानपे. इ. तोंड.]

२. तोफ-गाडा

सध्यांच्या तोफांत तीन प्रकार असतात : १ लांब पल्ल्याच्या, २ वेढ्याच्या व ३ खंदकी. लांब पल्ल्याच्या तोफांचा मारा सरळ असतो व गोळ्यांचा वेग फार असतो. वेढ्याच्या तोफांचा मारा उंचावरून खालीं येऊन होतो व त्यांच्या गोळ्यांचा वेग कमी असतो. तशाच या तोफा आंखूड व हलक्या असतात. खंदकी तोफांत तोंडांतून गोळा टाकण्यांत येतो. त्या कमी अंतराकरितांच वापरण्यांत येतात व त्यांचे गोळे घरेच वर जाऊन खालीं येतात. त्यांतून जड बॉंब टाकण्यांत येतात व त्यांचा मारा मातीच्या खंदकांवर व तटांवर, वगैरे चांगला होतो. अलीकडे तोफा बनविण्याच्या कृतींत बऱ्याच सुधारणा व नवीन नवीन शोध निघत आहेत. तोफेच्या आंतील भाग भोंवरेदार, खोबणदार करण्याची कल्पना १८५९ मध्यें निघाल्यापासून गोळा लांब वापरतां येऊं लागला. तोफांच्या गोळ्यांचें वजन, त्यांची जलद वाटोळें फिरण्याची गति, त्वरेनें उडविण्याची सोय, गोळे मागल्या बाजूनें भरण्याची युक्ति, वगैरेंमुळें तोफांच्या धातूवर इतका ताण पडतो कीं, अलीकडे लोखंड, पितळ, पंचरसी धातु, वगैरे सर्व मागें पडून कर्बाचें कमी प्रमाण असलेलें पोलाद तोफा ओतण्याच्या कामीं वापरण्यांत येऊं लागलें आहे. या तोफा बहुतेक एकावर एक थर ओतून तयार करण्यांत येतात. जड तोफा पोलादाची पट्टी गुंडाळून तयार करण्यांत येतात. ही पट्टी पाव इंच रुंद व एक–दशांश इंच जाडीची असते व ती एका लांबटे नळीवर गुंडाळण्यांत येते. यावर पुन्हा एक नळी बसविण्यांत येते. अशा तऱ्हेच्या पट्टया गुंडाळून केलेल्या तोफा ओतींव तोफांपेक्षां हलक्या असून मजबुतींतहि अधिक असतात. जेव्हां वरचेवर उडविण्यांत आल्यामुळें आंतील भाग गंजून जातो तेव्हां आंतील नळी बदलून दुसरी बसवितां येते. बहुतेक प्रत्येक देशामध्यें तोफा तयार करण्याचे सरकारी कारखाने असले तरी कांहीं खाजगी कारखानेहि पाहिजे तशा तोफा ओतून देतात. असे कारखाने आर्मस्ट्रॉंग व्हिटवर्थ (एल्स्विक), कॉव्हेन्ट्री आर्डनन्स वर्क्स, श्नीडरक्रॅनेट (क्रूसोफ्रान्स), क्रुप (एसेन), वगैरे ठिकाणीं आहेत.

सर्व अर्वाचीन तोफांना तोंडांतून गोळा न भरतां बाजूनें एका छिद्रांतून गोळा भरण्याची सोय असते. यास दारें (ब्रीच) म्हणतात. हें दारें एका फिरत्या ठोकळयानें (मधून-मधून खंड असलेल्या) खंडित स्क्रूनें बंद करतां येते (ब्रिटिश); किंवा त्यावर एक पाचर आडवी बसवून बंद करतात (जर्मन); किंवा एक आडव्या पिळाच्या स्क्रूनें बंद करण्यांत येतें (फ्रेंच). सर्व तोफांना दारें पक्कें बंद झाल्याशिवाय तोफ उडूं नये अशी संरक्षक योजना केलेली असते. तोफेच्या गाड्यामध्यें तोफ बसविण्याची योजना, ती गोळा उडतांना मागें येते ती तिची गति थांबविण्याची योजना, ती उडविण्याच्या योग्य स्थितींत येईल अशी फिरविण्याची योजना, ती उंच करण्याची, आडवी फिरविण्याची, वगैरे सर्व प्रकारच्या योजना केलेल्या असतात. मागें येण्याची गति थांबविण्याकरितां पाण्याच्या दाबाची योजना केलेली असते. मागें आल्यावर स्प्रिंगच्या साहाय्यानें ती पुढें सारण्यांत येते.

तोफ वर करण्याकरितां तिच्या दाऱ्याजवळ खालीं एक स्क्रू बसविलेला असतो. तसेंच एका दुसऱ्या स्क्रूच्या साहाय्यानें ती फिरवितां येते. फ्रेंच तोफा आंसावर फिरवितात. तोफेचा नेम धरण्याकरितां प्रथम स्पर्शरेषातत्त्वावर व्यवस्था केलेली असे. अलीकडे कमानीचें यंत्र असतें. याशिवाय तोफेवर एक तबकडीचें यंत्र असतें त्यानें वेग घेतां येतो. या यंत्रांत एक काटकोनी दुर्बीण असते व तिचें डोकें सरकवितां येतें. ही दुर्बीण एका टेबलावर बसविलेली असून त्यावर अंशात्मक खुणा असतात. व ती वाटेल तशी फिरवितां येते. तोफेच्या गोळ्याची लांबी व्यासाच्या तिप्पट किंवा चौपट असते.

**तोफेचे गोळे**—तोफेचे गोळे सामान्यतः वाटोळे पंचपात्रासारखे असून एका टोंकास निमुळते होत गेलेले असतात. या गोळ्यांसभोंवतीं एक तांब्याची पट्टी बसविलेली असते. तीमुळें हा गोळा तोफेंतून सुटला म्हणजे फिरत फिरत पुढें जातो. ही

तोफेच्या आंत जी भोंवऱ्यासारखी खोचण असते तिच्या धारेनें कापली जाते. त्यामुळें गोळा पुढें नेणारे वायू कोंडून राहतात. तसेंच गोळ्यापासून मिळणाऱ्या धक्क्याचें नियमन होतें. आणि तोफेचें तोंड वर केलें असतां गोळा मागें येत नाहीं. सर्व गोळे एकाच तऱ्हेनें बनविलेले असतात. त्यांचा उपयोग जरी निरनिराळ्या कामीं करण्यांत येत असला तरी त्यांच्या रचनेंत फारसा फरक नसतो. यांचे सामान्यतः तीन प्रकार असतात: १ अत्यंत स्फोटक गोळा—याचे तुटून अनेक तुकडे होतात व ते दूरवर फेंकले जातात. २ छरांचा गोळा—याच्या पोटांत अनेक गोळ्या भरलेल्या असतात. ३ रासायनिक गोळा—याच्या पोटांत निरनिराळीं रासायनिक द्रव्यें भरलेलीं असतात.

**तोबोलस्क**—रशियामधील एक शहर. पूर्वी पश्चिम सायबेरिआंत तोबोलस्कचें जें राज्य होतें त्याची ही राजधानी. हें शहर इर्तिश आणि तोबोल नद्यांच्या संगमावर आहे. १५८७ सालीं कोसाक लोकांनीं या शहराची स्थापना केली. तोबोलस्क राज्याची लो. सं. सु. वीस लक्ष आहे. क्षे. फ. ५,३९,६६० चौ. मैल. राज्यांत रशियनांशिवाय तातार, ओस्तिआक, सॉमोयीडी, व्होगल, जर्मन, यहुदी, इत्यादि लोक राहतात. या राज्याचे दहा जिल्हे पाडण्यांत आले आहेत. हा भाग शिक्षणांत फार मागासलेला आहे. येथील मुख्यतः शेतीचा धंदा करतात. शहराची लो. सं. २५,०००.

**तोमर**—हें दिल्ली येथें राज्य करणारें एक प्राचीन क्षत्रिय घराणें होतें. दिल्ली हें पूर्वी अगदींच लहान गांव होतें. तेथें प्रथम अनंगपाल तोमरानें लहानसें राज्य स्थापिलें. ह्या राज्याचा उत्कर्ष यापुढील दोनशें वर्षांत झाला. दिल्लीचे तोमर व सांबरचे चाहमान यांचें जवळजवळ हाडवैरच असे. कारण दोघांचींहि राज्यें एकमेकांस अगदीं लागलेलीं असत. चाहमान चंदनराजाचें तोमर रुद्रेणाशीं इ. स. ९१३ त युद्ध झालें. तसेंच ९४३ सालीं वाक्पतिराजानें तोमर तंत्रपालाचा पराभव केला; व वाक्पतीचा मुलगा सिंहराज यानेंहि एका तोमराचा पराभव केला, वगैरे माहिती हर्षशिलालेखांत आढळते. पण ती खुद्द तोमरांच्या लेखांवरून मिळत नाहीं. तोमरांचे लेख थोडेच सांपडतात. त्यांत असें आढळून येतें कीं, तोमर राजे कनोजचे मांडलिक होते. तोमर म्हणजेच तुंवर होत. विग्रहराज (वीसल देव) चाहमानां(चव्हाणा)नें दिल्ली एका तोमरराजापासून शेवटची जिंकून घेतली. विग्रहाचा पुतण्या प्रख्यात पृथ्वीराज चव्हाण होय. शेवटचा तोमरराज हा अनंगपालाचा वंशज होय. अनंगपालानेंच दिल्लीचा लालकिल्ला (लालकोट) बांधला (९९३). पुढील एका तोमरराजानें मथुरेहून चंद्र याचा लोहस्तंभ आणून दिल्लीस पुरला (१०५२). यालाच पृथ्वीराजाची लाट म्हणतात. त्याच्यावर लेख आहे. माळव्याच्या भोजांना या तोमरांनीं जिंकल्याचा उल्लेख आढळतो (१२ वें शतक).



**तोरगळ**—मुंबई प्रांतांत, कोल्हापूर संस्थानांतील तोरगळ नांवाच्या जहागिरीचें मुख्य ठिकाण. हें कोल्हापूरच्या नैर्ऋत्येस १०० मैलांवर आहे. हें गांव स. ११०० च्या सुमारास भूतंकुश नांवाच्या एका सरदारानें वसविलें, अशी दंतकथा आहे. पुढें १६९० सालीं नरसोजीराव शिंदे यानें विजापूरच्या सुलतानापासून हें गांव जिंकून घेतलें व राजाराम छत्रपतीनें तें नरसोजीरावास जहागीर म्हणून दिलें. तेथें भूतंकुशानें बांधलेलें एक भूतनाथाचें जुनें देवालय आहे. गांवाभोंवतीं पडका तट आहे. त्याच्या आंत जहागिरदाराचा वाडा आहे. तो स. १७०० त बांधलेला आहे.

**तोरण**—एक झाड. हें करवंदीसारखें असून डोंगराळ प्रदेशांत होतें. झाडास फुलांचे तुरे व पिवळीं फळें येतात. फळें खातात. याची गांगेरुक नांवाची एक जात आहे. मुखविकारावर तोरणाचीं फळें खाण्यास देतात. घटसर्पावर पाला चुरून तोंडांत धरतात.

**तोरणमाळ**—मुंबई, पश्चिम खानदेश, तळोदें तालुक्यांतील सातपुडा पर्वताची एक टेंकडी. मांड लोकांचें हें मुख्य ठाणें होतें. ह्या टेंकडीचें क्षेत्रफळ सरासरी १६ चौरस मैल असून समुद्रसपाटीपासून ३,३०० पासून ४,००० फूट उंचीवर आहे. टेंकडीवर एक सुंदर तलाव असून पडकीं देवळें पुष्कळशीं आहेत. गोरखनाथ साधु याच ठिकाणीं पूर्वी राहत होता असें म्हणतात. येथें नाथपंथी मठ आहे. टेंकडीच्या दक्षिणेस पारसनाथाचें एक जैन देवालय असून दरसाल ऑक्टोबरमध्यें मोठी यात्रा भरते. थोडे भिल्लखेरीजकरून टेंकडीवर मनुष्यवस्ती बहुधा नसते.

**तोरणा**—पुण्याच्या नैर्ऋत्येस चाळीस मैलांवर नीरा नदीच्या उगमाजवळ हा किल्ला आहे. इ. सन १६४६ त आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षी शिवाजीनें प्रथमच हा किल्ला हस्तगत केला, असें बखरकार सांगतात; पण तत्कालीन पुरावा नाहीं. या किल्ल्याची डागडुजी करीत असतां शिवाजीला पडलेल्या भागाखालीं मोठा सुवर्णनिधि सांपडला असें म्हणतात. हा किल्ला हल्लीं मोरकर पंतसचिवांच्या ताब्यांत होता. पुण्यांतील लकडीपुलावरून व फर्ग्युसन कॉलेजच्या मागील टेंकड्यांवरून हा किल्ला स्पष्ट दिसतो. यासच प्रचंडगड असें दुसरें नांव आहे. किल्ल्याच्या पायथ्यापर्यंत मोटारी जातात. घाटमाथ्यावरील सर्व किल्ल्यांत याची उंची जास्त आहे.

**तोरमली**—एक खनिज रत्न. याचे स्फटिक त्रिपार्श्व किंवा षट्पार्श्व असतात व ते निमुळते होत गेलेले असतात. याच्या योगानें कांचेवर ओरखडा उठतो. याचें विशिष्टगुरुत्व ३ असून,

हा अग्निजन्य व रूपांतरित खडकांत आढळतो. विशेषतः वज्रतुंड, जंबुर आणि अभ्रक यांत हा फारकरून आढळतो. हा पूर्ण पारदर्शक, अर्धपारदर्शक किंवा अपारदर्शकहि असतो. तसेंच हा विवर्ण, किंवा हिरव्या, पिंगट, गुलाबी किंवा निळ्या रंगाचा व काळाहि असतो.

संस्कृत नांव वैक्रांत किंवा गंधर्व असून, तुरमली किंवा तोरमली हें सिंहली नांव आहे. याच्या गुणामुळें हा हिऱ्याचें उपरत्न समजला जातो. पांढरी तोरमल्ली सिलोनी हिरा म्हणून बाहेर विकला जातोच. पाश्चात्यांनीं रंगावरून तोरमल्लीचीं निरनिराळीं नांवें ठेविलीं आहेत (जसें रुबेलाइट, अक्रॉइट, इंडिकोलाइट, इ.). सिलोन, ब्राझील, सायबेरिया, उरल पर्वत, उत्तर अमेरिका, मादागास्कर, इ. प्रदेशांत हें रत्न सांपडतें.

**तोरमाण** (मृ. ५१०)—हूण वंशांतील अत्यंत प्रतापी राजा. हूण ही अर्धसंस्कृत भटकी जात मोंगल वंशाची असावी. हूणांनीं चवथ्या शतकांत युरोप उध्वस्त केला व ते हिंदुस्थानांत शिरले. गुप्त सम्राटांनीं त्यांचा प्रतिकार केला. पण त्यांचाच नाश झाला. लाहोरच्या अजबखान्यांत याचा एक लेख आहे. तोरमाणाला 'महाराजाधिराज षाही जऊव्ल' अशी पदवी होती. जऊव्ल हें याच्या कुलाचें नांव असावें. षाही हा मध्य आशियांतील भाषेमधील किताब आहे.

तोरमाण हा पंजाबांतून दक्षिणेकडे आपल्या राज्याचा विस्तार करीत असतां कुमारगुप्ताशीं याचें युद्ध झालें. त्यांत कुमारगुप्त मारला गेला. पण कुमारगुप्ताचा पुत्र स्कंदगुप्त यानें मोठ्या शौर्यानें लढून याचा पराजय केला. तोरमाणानें गुजराथ, काठेवाड, राजपुताना, माळवा, वगैरे जिंकून आपल्या राज्यांत सामील केले. याचें राज्य गांधार, पंजाब व काश्मीर, वगैरे भागांवर आधींच होतें. याच्यानंतर याचा पुत्र मिहिरकुल (मिहिरगुल) गादीवर आला.

**तोरु दत्त** (१८५६–१८७७)—एक बंगाली कवयित्री. जन्म कलकत्ता येथें झाला. विद्वत्तेबद्दल दत्तघराण्याचा मोठा लौकिक असून तोरूचे वडील गोविंदचंद्र दत्त हे मोठे विद्वान् व श्रीमंत होते. दत्त घराणें पूर्वीपासून ख्रिश्चन झालेलें होतें. तोरुला एक भाऊ व आरु नामक बहीण होती. परंतु तीं दोघें लहानपणींच वारलीं. तोरुलता (तरुलता) लहान असतांच गोविंदचंद्र आपल्या कुटुंबियांसह युरोपांत गेले. त्यांनीं इंग्लंड व फ्रान्स येथें बरींच वर्षें काढलीं. तोरूचें सर्व शिक्षण तेथेंच झालें. म्हणून तिला फ्रेंच व इंग्रजी भाषा चांगल्या अवगत झाल्या. १८७३ सालीं हें दत्त कुटुंब बंगाल्यांत परत आलें. १८७६ सालीं तोरूचा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला व तिची कीर्ति चोहोंकडे पसरली. पण वर्षानेंच ही २१ वर्षांची तरुण कवयित्री मृत्यु पावली.

'ए शीफ ग्लीन्ड इन् फ्रेंच फील्डस्', 'एन्शंट बॅलड्स् अँड लीजंड्स' (प्राचीन पोवाडे आणि दंतकथा), 'वुमन इन् एन्शंट इंडिया' (प्राचीन हिंदी महिला) व 'बॅलड्स अँड लीजंड्स ऑफ हिंदुस्थान' (हिंदुस्थानचे पोवाडे आणि दंतकथा) हे तिचे काव्यसंग्रह होत. जन्मानें हिंदी, शिक्षणानें इंग्रजी व अंतःकरणानें फ्रेंच असलेल्या या अल्पायु कवयित्रीला फ्रेंच वाङ्मयांत अवश्य स्थान मिळालें पाहिजे, असें एक फ्रेंच टीकाकार तोरूबद्दल लिहितो. बंगालीपेक्षां इंग्रजींतच तोरूचें बरेंच काव्य लिहिलें गेलें; तथापि तिच्या काव्यसंग्रहावरून तिचें बंगाली अंतःकरणच स्पष्ट दिसतें यांत शंका नाहीं.

**तौरस पर्वत**—हा पर्वत आशियामायनरमध्यें युफ्राटीस नदीपासून एजियन समुद्रापर्यंत व पुढें *आडालिया आखातापर्यंत* सुमारें ५०० मैल लांब पसरलेला आहे. याच्या ईशान्य भागाला आलादाघ म्हणतात आणि नैर्ऋत्य भागाला बुलघरदाघ म्हणतात. आणि या दोहोंच्या दरम्यान खिंड आहे. तिला सिलिशियन द्वार (गेट) म्हणतात. या पर्वताचें सर्वांत उंच शिखर मेटडेसिस (११,५०० फूट) असून हा पर्वत ॲन्टीटारस पर्वताला आराराट, एलबुर्झ व कॉकेशस या पर्वतांनीं जोडला आहे.

**त्सिंग**—एक चिनी प्रवासी. हा पिंग चाऊचा एक कायदेपंडित होता. याचें संस्कृत नांव चंद्रदेव असें होतें. तो इ. स. ६४९ मध्यें म्हणजे चेक्कॉन कालाच्या शेवटच्या वर्षीं तुफान रस्त्यानें हिंदुस्थानांत आला व बोधि देवळाजवळ येऊन यानें चैत्यांची पूजा केली. तो तरुण असून पुढें तो नालंदला गेला. तेव्हां तेथील राजानें त्याचा बराच सन्मान केला. यानंतर १२ योजनें पूर्वेकडे गेल्यावर तो राजमंदिरास गेला. तेथें फक्त हीनयानाचाच अभ्यास होत असे. तेथें तो हीनयानाप्रमाणेंच तिपिटकाचाहि अभ्यास करीत बरींच वर्षें राहिला. पुढें नेपाळमधून चिनास परत जाऊन वारला.

**त्यागराज** (१८००–१८५०)—एक दाक्षिणेंतील संगीतविशारद. उत्तर हिंदुस्थानांतील संगीतपद्धति जेव्हां नव्या तत्त्वावर वर्गीकरण करण्याचा प्रयत्न करीत होती, त्या वेळीं दक्षिणेंत नवीं नवीं पद्यें रचण्याचें काम पुढें चालू होतें. तंजावर हिंदुस्थानांतील संगीतकलेचें एक प्रमुख ठिकाण होतें. येथेंच त्यागय्या अथवा त्यागराज या विख्यात गायक कवीनें अनेक पद्यें स्वतः रचून तीं म्हणून दाखविण्याचा क्रम चालविला होता. त्यामुळें त्याच्याजवळ शिष्यवर्गहि बराच जमला; व या शिष्यांनीं त्याची गायनपद्धति अद्याप चालू ठेवली आहे. त्यानें केलेलीं

सुंदर पद्यें व कीर्तनें अद्यापहि दक्षिणेंत सर्वत्र गाइलीं जातात. तो स्वतः उत्तम दर्जाचीं पद्यें रचीत असे आणि या त्याच्या पद्यांनीं दक्षिण हिंदुस्थानांतील संगीताच्या प्रगतीला चांगली मदत केली. अशी दंतकथा आहे कीं, नारद ऋषींनीं स्वतः येऊन त्यागराजाला स्वरार्णव नांवाचा ग्रंथ दिला. याना गुरु संथी वेंकटरामन् हा होता. धार्मिक बुद्धि व संगीताची आवड हीं दोन्ही त्याच्या ठिकाणीं एकत्र वास करीत असल्यामुळें त्याचीं पद्यें पूर्ण भक्तिरसमय असत. त्यागराजानें संगीती म्हणून एक पद्यांचा नवा प्रकार सुरू केला. मूळ रागांत कांहीं विशेष फरक करून हीं पद्यें तयार केलेलीं असत. ह्या नव्या भिन्न पद्यांत मूळ रागाचीं महत्त्वाचीं लक्षणें कायम ठेवून त्यांत कांहीं नव्या नव्या सुधारणा केलेल्या असत. अशा सर्व पद्यांत नवीनपणा हा प्रमुख गुण होता.

**त्रावणकोर संस्थान**—(मूळ नांव तिरुवांकर, तिरुवालंकोडी = महालक्ष्मीचें स्थान). हें संस्थान हिंदुस्थानांत अगदीं दक्षिणेस असून त्याची राजधानीची मुख्य जागा त्रिवेंद्रम आहे. संस्थानची आकृति सरासरी त्रिकोणी आहे. याचें क्षेत्रफळ ७,६६२ चौ. मै. आहे. पैकीं २,५०० चौ. मै. जंगल व २,००० चौ. मै. डोंगराळ कुरण आहे. तथापि त्रावणकोर एकंदरींत फार सुपीक असून सुंदर आहे. घाटाच्या कडेची जागा सदा हिरवीगार असते. तळभागावर ताडाचीं, माडाचीं व नारळाचीं झाडें विपुल आहेत. पहाडांत आणि मोठ्या जंगलांत शिकार मुबलक सांपडते. हत्ती असंख्य आहेत. येथील हवामान समशीतोष्ण आहे. पाऊस अतिशय पडतो. संस्थानची लोकसंख्या १९४१ सालीं ६०,७०,०१८ होती. संस्थानांत एकंदर ९ शहरें व ३,८८५ खेडीं आहेत. लोकसंख्येपैकीं ३५,४२,३९९ हिंदू, १९,५८,४९१ ख्रिस्ती, ४,३४,१५० मुसलमान असून बाकी इतर धर्मीय आहेत. येथें विशेषेंकरून कनिष्ठ जातींत वारसा मुलीकडे जातो. लग्न हा एक साधारण करारनामा असून दोहोंपैकीं कोणी तरी तो रद्द करूं शकतो. ब्राह्मणांत नंबुद्रि ब्राह्मणाचें विशेष महत्त्व असतें. ख्रिस्ती लोकसंख्या बरीच आहे.

लोकांचें उपजीविकेचें साधन शेतकी आहे. जंगली उत्पन्नांत इमारतीचें सागवान मुख्य असून कोचीनहून तें मुंबईस जातें. इतर बाकीच्या लांकडांचा व्यापार अरबस्तानपर्यंत चालतो. उद्योगधंद्यांत कापड विणणें व नारळाच्या काथ्याच्या हांतऱ्या करणें हे मुख्य धंदे होत. कलेमध्यें हस्तिदंताचें नक्षीकाम मुख्य मानलें जातें व त्यास संस्थानांतूनच चांगला आश्रय मिळतो. व्यापारी पेठा कोलचेल, क्विलॉन, अलेप्पी, कोतार, कायनकुलम्, चंगनाचेरी, वगैरे असून त्या ठिकाणीं व्यापार वाढलेला आहे. बाहेर जाणारे मुख्य जिन्नस—नारळ, मिरीं, चहा, सुंठ, इमारतीचें लांकूड, कातडीं, कॉफी, वगैरे; व बाहेरून येणारे मुख्य जिन्नस तंबाखू, तांदूळ, कापूस आणि सूत, वगैरे होत. संस्थानांत पद्मनाभ, त्रिवेंद्रम, क्विलॉन व कोट्टायम हे चार जिल्हे आहेत व तालुके ३१ आहेत. संस्थानचा सर्व कारभार आतांपावेतों दिवाणामार्फत राजेसाहेब चालवीत. दोन कायदेमंडळें आहेत (श्री चित्र व श्री मूल). यांत लोकनियुक्त सभासद असतात. १९४७ सालीं महाराजांनीं जबाबदारीचें लोकराज्य स्थापण्याची घोषणा केली; पण नंतर आतां त्रावणकोर आणि कोचीन हीं दोन संस्थानें संयुक्त झालीं असून राज्यकारभार एकवटच चालविण्याचें ठरलें आहे.

त्रावणकोरची जमाबंदीपद्धत भानगडीची आहे. तथापि तत्त्वतः रयतवारीची आहे. कारण कांहीं जमीन भरपूर आकाराची, कांहीं निम्मे आकाराची व कांहीं पूर्ण माफीची आहे. संस्थानचें गावांतर उत्पन्न म्हणजे तंबाखू, मीठ, अफू आणि मद्य यांच्यावर बसवलेलो जकात हें होय.

संस्थानांतून सर्वत्र मोफत शिक्षण दिलें जातें. मागासलेल्या लोकांना व जंगली जातींना शिक्षण देऊन त्यांना सुशिक्षित करण्याचे प्रयत्न त्रावणकोर संस्थानांत विशेष रीतीनें नजरेस येतात. मिशनरी लोकांचा या कामांत पुढाकार नेहमींप्रमाणें बराच जुना आहे. संस्थानांत साक्षरतेचें प्रमाण हिंदुस्थानांत अत्युच्च असें (४७ टक्के) आहे. तसेंच स्त्रीशिक्षण अतिशय आहे. बऱ्याच स्त्रिया पदवीधर आहेत. संस्थानांत अनेक कॉलेजें आहेत. १९३६ सालीं विद्यापीठ स्थापन झालें आहे. लोकांचा या सुधारणेच्या कामांत पुढाकार नेहमींप्रमाणें बराच आहे.

इतिहास—संस्थानच्या प्राचीन इतिहासासंबंधानें फारसें माहीत नाहीं. दंतकथांवरून असें आढळतें कीं, पुरातन केरळ राजे त्रावणकोरपैकीं बऱ्याच भागांत होते. सरासरी अकराव्या शतकाच्या सुमारास चोल राजांनीं त्रावणकोरचा भाग केरळांपासून जिंकला. पुढें एका शतकानंतर केरळ राजांनीं चोलांचा पराभव करून वैभव संपादन केलें. तेराव्या शतकांत मदुरेच्या पांड्य राजांनीं त्रावणकोरचा आग्नेय भाग व्यापून टाकला; तरी केरळांनीं त्यांना फार दिवस टिकूं दिलें नाहीं. १५४४ सालीं विजयानगरचा राजा अच्युतराय यानें त्रावणकोरवर स्वारी केली होती.

अठराव्या शतकांत नाईक राजांपैकीं मार्तंडवर्म्यानें बाकीच्या नाइकांचा पराभव करून त्रावणकोर आपल्या सत्तेखालीं आणलें. मार्तंडवर्मा व त्याचा दिवाण रामाय्यन हे फार कर्ते पुरुष होते. त्यांनीं पुष्कळशा सुधारणा केल्या. व्यापार वाढविला, मोठाले राजवाडे व भव्य मंदिरें बांधिलीं, कालीच्या वसुलाचा

उत्तम प्रकारें बंदोबस्त केला, शहराची तटबंदी केली; अशा बऱ्याच लोकोपयोगी गोष्टी घडवून आणल्या.

इंग्रजांनीं या संस्थानांत अंजनगांव येथें १६८४ त आपली वखार स्थापून व्यापारास सुरुवात केली. १७९५ सालीं इंग्रज व त्रावणकोरचे राजे यांत तह झाला. कर्नाटकांत १८ व्या शतकांत इंग्रजांच्या व इतर राजांच्या ज्या लढाया झाल्या त्या सर्वांत त्रावणकोरच्या राजांनीं इंग्रजांना मदत केल्यामुळें या राजास इंग्रजांचें दोस्त म्हटलें आहे. १८६२ सालीं लॉर्ड कॅनिंग यांनीं औरस वारस नसल्यास दत्तक घेण्याबद्दल सनद दिली. आज हें संस्थान हिंदुस्थानांत क्रमांकानें तिसरें (पहिलें हैद्राबाद व दुसरें म्हैसूर) आहे.

उत्पन्न सुमारें नऊ कोटी शहात्तर लक्ष रुपये आहे. संस्थानिक क्षत्रिय वर्णाचे असून प्राचीन चेर राजांचे वंशज म्हणवितात. पहिला राजा मार्तंडवर्मा यानें संस्थान श्रीपद्मनाभस्वामी देवाला अर्पण केलें असून संस्थानचे राज्यकर्ते हे देवाचे सेवक म्हणून राज्य करतात. आजचे संस्थानिक बालरामवर्मा हे बारा वर्षांचे असतांना १९२४ सालीं गादीवर आले. हे चांगले सुविद्य असून परदेश फिरलेले आहेत. यांना लष्करी हुद्दे आहेत.

त्रावणकोर संस्थानचा वारसा मातृकन्यापरंपरेप्रमाणें चालतो. राजाभागून त्याच्या बहिणीचा मुलगा गादीवर बसतो. राजाच्या बहिणीला महाराणी म्हणतात.

**त्रिकोणमिति**—(ट्रिगॉनॉमेट्री). त्रिकोणाचे भाग तीन बाजू व तीन कोन आहेत. तीन बाजू, दोन बाजू व मधला कोन, एक बाजू व दोन कोन दिले असतां त्रिकोणाची रचना करतां येते. त्रिकोणाच्या बाजू व कोन यांचे संबंध दर्शविणारीं सूत्रें काढणें हा त्रिकोणमितीचा एक महत्त्वाचा भाग आहे. त्रिकोणाचे कोन अंशांमध्यें मोजतात व बाजू इंच, फूट, वगैरे लांबीच्या परिमाणांत असतात. ह्या मापाचा सरळ संबंध काढतां येत नाहीं तर बाजू आणि कोनांचीं विशिष्ट फलें (फंक्शन्स) गुणोत्तरामध्यें येतात. हीं कोनांचीं गुणोत्तरें नुसत्या भूमितींतच नव्हे तर ज्या ठिकाणीं कोनमापन येतें अशा अनेक शास्त्रांत उपयोगी पडतात. एका कायम रेषेंतील एका स्थिर बिंदूमधून काढलेली फिरती रेषा जो कोन करील तो दर्शविणारें कोनाचे माप वाटेल तेवढें मोठें असूं शकेल. वाटेल तेवढ्या मोठ्या कोनाला अनुलक्षून ह्या गुणोत्तराची व्याख्या करावी लागते. हे कोन अधिक किंवा उणे होऊं शकतात. एका ओ बिंदूतून क्षओक्ष आणि यओय अशा काटकोन करणाऱ्या मापनरेषा काढा. ओ मध्य घेऊन एक वर्तुळ काढा. ते मापनरेषांस अ, च, क बिंदूंमध्यें कापील. ओअ रेषेभोंवतीं त्रिज्या घड्याळाचे कांटे फिरण्याच्या विरुद्ध दिशेनें फिरविली तर ओअ रेषेशीं होणारा अधिक कोन समजतात. परंतु घड्याळाच्या कांट्यांचे दिशेनें जर त्रिज्या फिरविली तर ओअ शीं होणारा उणा कोन समजतात. वर्तुळावरील प बिंदूपासून पम हा ओअ ला लंब काढा व मधला कोन A ए ह्या इंग्रजी अक्षरानें दाखवा.

ज्या A (Sin A) $= \frac{\text{म प}}{\text{ओ प}}$

कोज्या A (Cos A) $= \frac{\text{ओ म}}{\text{ओ प}}$

भा A (Tan A) $= \frac{\text{म प}}{\text{ओ म}}$

हीं तीन कोणगुणोत्तरें व त्यांचे तीन व्युत्क्रम (रेसिप्रोकल) मिळून सहा कोणगुणोत्तरें त्रिकोणमितीचीं मूलतत्त्वें आहेत. ह्या कोणगुणोत्तरांचा उपयोग त्रिकोणाचे कोन व बाजू ह्यांचे संबंध दर्शविण्यामध्यें होतो. जसें:

$\frac{\text{ब क}}{\text{ज्या (Sin)} \angle \text{बअक}} = \frac{\text{क अ}}{\text{ज्या (Sin)} \angle \text{कबअ}} = \frac{\text{अ ब}}{\text{ज्या (Sin)} \angle \text{अकब}}$

= २ त्रि. त्रि ही अ, ब, क बिंदूंमधून जाणाऱ्या वर्तुळाची त्रिज्या आहे.

अशा तऱ्हेचीं कित्येक सूत्रें त्रिकोणाचे जरूर ते भाग दिले असतां राहिलेल्या भागांचें गणित करण्यास उपयोगी पडतात. उच्च ज्योतिर्गणिताला त्रिकोणमिति लागते.

हिप्पार्कस (ख्रि. पू. १२०) या ग्रीक ज्योतिषानें प्रथम त्रिकोणमितीचें शास्त्र निर्माण केलें. नंतर टॉलेमीनें (इ. स. १३९) हें शास्त्र बरेंच पूर्णत्वास नेलें. अरब शास्त्रज्ञांनीं गोलीय त्रिकोणमितीचीं कांहीं नवीं सूत्रें बसविलीं. आपल्याकडे भास्कराचार्यानें गोलाध्यायांत या त्रिकोणमितीचें विवेचन दिलें आहे. गेल्या शतकांत उच्च त्रिकोणमितीसंबंधीं बरेच शोध लागले आहेत.

**त्रिकोमाली**—सिलोन, ईशान्येकडील मोठें बंदर व ब्रिटिशांचा नाविक तळ. नुकतेंच आगीनें उध्वस्त झालें. लो. सं. १०,०००.

**त्रिगंधित अंज**—(स्टिब्नाइट). अँटिमनीची खनिज धातु. हिच्यांत ५ भाग अँटिमनी आणि २ भाग गंधक असतें. ही धातु शिशाच्या रंगाची असून बहुतेक अँटिमनी याच धातूपासून तयार केलेलें असतें.

**त्रिचनापल्ली**—मद्रास, कावेरी नदीच्या त्रिभुजावर दक्षिण तीरावर वसलेलें जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें मद्रासहून रेल्वेनें २५० मैल व सडकेनें १९५ मैल लांब आहे. दोन हजार वर्षांपूर्वी द्राविडी लोकांनीं निसर्गतः बनलेल्या एका अत्युच्च खडकावर हें शहर वसवलेलें आहे. हें शहर चोल राजांची राजधानी होतें. १६ व्या शतकांत हें शहर मदुरेच्या नायक राजांच्या ताब्यांत गेलें. या घराण्याचा मूळपुरुष विश्वनाथ यानें येथील किल्ला बांधला असें म्हणतात. किल्ल्याच्या मध्यभागीं पण शहराच्या उत्तरेस २७३ फूट उंचीचा खडकाचा उंच सुळका असून त्यावर मध्यभागीं शिवमंदिर बांधलेलें आहे. हें मंदिर १७ व्या शतकांत बांधलें असून त्याच्याभोंवतींहि तटबंदी केली आहे. या खडकाच्या पश्चिम भागीं पायथ्याशीं एक सुंदर तलाव असून त्याच्या मध्यभागीं एक सुंदर दगडी मंडप बांधलेला आहे. पूर्वेकडे दोन मैलांवर नारळांच्या बागांनीं वेष्टित असें भव्य श्रीरंगमचें देवालय असून त्याच्या पूर्वेस सुमारें मैल दीड मैलावर जंबुकेश्वराचें प्रसिद्ध देवालय आहे. सातव्या शतकांत खडकांत खोदलेलीं देवळेंहि पुष्कळ आहेत. हीं देवालयें द्राविड संस्कृतीचे उत्तम नमुने होत.

अठराव्या शतकांत त्रिचनापल्लीला अनेक वेढे पडले. त्यांत १६५१ त क्लाइव्हनें अर्काटवर स्वारी करून चंदासाहेबाचा त्रिचनापल्लीस पडलेला जो वेढा उठविला त्याचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. १७५९ त पुन्हां फ्रेंच गव्हर्नर लाली यानें त्रिचनापल्ली घेण्याचा प्रयत्न केला. पण १७६० त वॉंदिवॉशच्या लढाईत त्याचा पराभव झाला. १७६८ पासून हैदर व टिपू यांची इंग्रजांबरोबर युद्धें होऊन त्यांत १७९१ अखेर इंग्रजांचा दक्षिण हिंदुस्थानांत सर्वत्र विजय होऊन त्रिचनापल्ली इंग्रजांच्या ताब्यांत गेलें.

जिल्ह्याचें क्षे. फ. ४,३२९ चौ मै. व लो. सं. २१,९४,०९१ आहे. सरासरी वार्षिक उष्णतामान ८२° पर्यंत असून पाऊस ३३ इंचांपर्यंत पडतो. हवामान समशीतोष्ण व दमट आहे. जमीन सुपीक आहे व पाटाचें पाणी मिळाल्यानें येथे दुष्काळ कधींच पडत नाहीं. येथील मुख्य पिकें तांदूळ, रागी, वरगू, चोलम्, तंबाखु व नारळ हीं असून येथें जिल्ह्यांतून बाहेरगांवीं रवाना होण्याकरितां डाळी, मिरची, नारळ, केळीं, सुपारी, साखर, कमावलेलीं कातडीं, इ. पदार्थ येतात. यामुळें त्रिचनापल्ली ही एक मोठी व्यापारी पेठ बनलेली आहे.

येथें रेशमी, सुती व जरीकांठी तलम कापड, सोन्यारुप्याचीं भांडीं, तांब्यापितळेचे पत्रे व भांडीं व हस्तिदंती काम उत्कृष्ट होतें. त्रिचनापल्लीचे चिरूट व विड्या दरसाल रु. दोन-तीन लाखांहून अधिक किंमतीचे परदेशीं रवाना होतात. याची लोकसंख्या १,५९,५६६ असून तें मद्रास इलाख्यांतील दुसरें मोठें शहर आहे. शहरांत तामिळ भाषा बोलतात. शिक्षणाचें केंद्रस्थान म्हणून त्रिचनापल्ली प्रसिद्ध आहे.

**त्रिचूर**— मद्रास, कोचीन संस्थानमधील त्रिचूर तालुक्याचें मुख्य ठाणें. क्षेत्रफळ ३॥ चौ. मै.. पश्चिम किनाऱ्यावरील त्रिचूर हें अतिशय जुन्या शहरांपैकीं एक होय. परशुरामानें या शहराची स्थापना केली अशीहि दंतकथा आहे. स. १७६० मध्यें झामोरिन यानें तें काबीज केलें होतें. हैदर व टिपू यांची नजर त्रिचूरकडे गेली होती. आरमारी दळणवळण व रेल्वे–स्टेशन यांमुळें त्रिचूर व्यापारी पेठ झालेली आहे. येथें ख्रिस्ती वस्ती बरीच असल्यानें येथील व्यापारी वर्गांत ख्रिस्ती व तिन्नेवेल्लीचे ब्राह्मण मुख्यत्वें मोडतात. त्रिचूरास राजवाडा, रेसिडेंटचा बंगला, वडकुनाथाचें देऊळ, सरकारी कचेऱ्या, हायस्कुलें व इतर शाळा आहेत. व शंकराचार्यांच्या शिष्यांनीं स्थापन केलेले तीन मठ प्रसिद्ध असून पाहण्यासारखे आहेत. वडकुनाथाच्या मंदिराचें सालिना उत्पन्न रु. अर्धा लाखाजवळ आहे. मठांना मोठा आश्रय देणगीरूपानें आहे.

**त्रिदल**— कांहीं वनस्पतींस तीन दलांनीं युक्त अशीं पानें असतात त्यांस त्रिदल अथवा तिपानी वनस्पती म्हणतात. उदा., बेल, चवळी, घेवडा, वगैरे.

**त्रिदोष**—आर्यवैद्यकांत कफ, वात आणि पित्त हे तीन दोष (म्हणजे शरीरांत बिघाड करणारे रोग) सांगितले आहेत. शरीरांत कोणताहि बिघाड जेव्हां होतो तेव्हां तो या दोषांमुळें होतो असें वैद्यक सांगतें. कफ, वात व पित्त जेव्हां बिघडले नसतील तेव्हां शरीराची सुस्थिति राखणाऱ्या या त्रयीस त्रिधातु म्हणतात. पुष्कळ वेळां दोष आणि धातु हे दोन्ही शब्द चुकीनें समानार्थक वापरले जातात. या त्रिदोषांचा जेव्हां एकत्र होऊन क्षोभ होतो तेव्हां माणूस वांचत नाहीं.

**त्रिपाठी, सूर्यकांत रामसहाय** ('निराला') (जन्म स. १८९९)—हिंदी भाषेंतील एक कवि व लेखक. यांचा जन्म महिषादल (मेदिनीपूर–बंगाल) राज्यांत झाला. बंगालमध्यें राजाश्रयानें व राजाच्या सहवासांत यांचें शिक्षण झाल्यानें यांच्यांत प्रथमपासून स्वतंत्र वृत्ति उत्पन्न झाली. प्रथम

हे बंगालींत कविता करीत. पण पुढें यांना हिंदीची आवड उत्पन्न होऊन हे खडी बोलींत कविता करूं लागले.

कल्पनाप्रधान रहस्यवादी कवींत यांचे बरेंच वरचें स्थान आहे. यांनीं कांहीं छंद स्वतः निर्माण केले आहेत. यांना हिंदींतील मुक्तक काव्याचे जनक मानण्यांत येतें. बंगालींतील मुक्तक कवितेप्रमाणे यांच्या मुक्तक काव्यांत ताल व लय यांकडे विशेष लक्ष दिलेलें असतें. यांनीं अनेक लहानमोठीं सरस काव्यें लिहिलीं आहेत. सांगोपांग रूपक व निसर्गाचें यथार्थ चित्रण हे यांच्या काव्यांतील विशेष होत. तसेंच भावमय उच्च कल्पना हाहि यांचा विशेष मानण्यांत येतो. सरस रहस्यवाद, मधुर प्रेम, ओजस्वी देशभक्ति, व अदम्य उत्साह या गुणांनीं यांचें काव्य नटलेलें असतें.

यांचें गद्य लिखाणाहि बरेंच असून तेंहि यांच्या स्वतंत्र वृत्तीचें द्योतक आहे. आचार, विचार, मांडणी, वगैरे सर्वच बाबतींत हे अगदीं क्रांतिकारक व स्वतंत्र वृत्तीचे असल्यानें यांनीं आपणांस घेतलेलें 'निराला' हें टोपण नांव सार्थ आहे.

यांचें प्रसिद्ध वाङ्मय— १ अनामिका (निर्यमक मुक्तक काव्य), २ परिमल (कविता-संग्रह), ३ गीतिका (गीत-संग्रह), ४ तुलसीदास (काव्य), ५ बादल-राग (.च. को.).

**त्रिपार्श्व भिंग**— (प्रिझम्). दृक्शास्त्रामध्यें त्रिपार्श्व भिंग हें कांचेचें त्रिकोणाकृती भिंग असून अनेक उपकरणांमध्यें त्याचें महत्त्वाचें कार्य असते. जेव्हां एखादा प्रकाशकिरण अशा त्रिपार्श्वावर पडतो तेव्हां तो त्या त्रिपार्श्वातून जात असतांना त्याच्या पायाच्या दिशेकडे वळतो. याच वेळीं पृथक्करणहि होतें. कारण या किरणाचें खालीं वांकण्याचें प्रमाण त्याच्या रंगावर अवलंबून असतें. या त्रिपार्श्वावर प्रकाशकिरण पडत असतां तो किरण जो आगमकोन करतो तो त्या त्रिपार्श्वांतील लंब आणि त्रिपार्श्वामधील किरणाचा मार्ग यांमधील कोनापेक्षां कमी असतो; तसेंच तो किरण बाहेर पडतांना पुन्हां लंबाशीं जो कोन करतो तो कोनहि त्या किरणाच्या लंबाशीं होणाऱ्या निर्गमकोनापेक्षां कमीच असतो.

**त्रिपालिका वर्ग**—(त्रिलोबाइट्स्). हा एक पूर्वजीवक (पॅलीओझोइक) कालांतील नष्ट झालेल्या पण सर्वत्र आढळणाऱ्या संधिपाद प्राण्यांचा वर्ग आहे. या जातीचे प्राणी विशेषतः कॅम्ब्रीयन ऑर्डोव्हेसियन आणि सिल्यूरियन थरांत आढळतात. यांच्या कांहीं जाती डेव्होनियन थरांतहि दृष्टीस पडतात. परंतु कार्बोनिफेरस किंवा कर्बयुक्त थरांत फारच थोड्या नजरेस पडतात. यांचें शरीर सरळ उभ्या समांतर रेषांत असलेल्या तीन ग्रंथींचें किंवा पाकळ्यांचें बनलेलें असतें. म्हणून त्यांस हें नांव देण्यांत येतें.

**त्रिपुर**—त्रिपुर किंवा त्रिपुरासुर असें बाणासुराला नांव होतें असें हरिवंशपुराणांत आहे; पण महाभारतांत पुढील माहिती आढळते. पूर्वीं देवदानवांचा दीर्घकाल संग्राम होऊन दानवांचा पराभव झाल्यावर मयासुरानें तप करून ब्रह्मदेवाजवळ वर मागितला कीं, 'मला शत शत योजनांच्या अंतरावर देवांस अभेद्य अशीं तीन फिरतीं पुरें करतां यावीं व तीं ब्राह्मणांच्या शापास अभेद्य असून महादेवाच्या बाणानें कदाचित् त्यांचा नाश झाला तरी त्यांतून जें पुर अवशेष राहील त्याचा नाश होऊं नये.' ब्रह्मदेवानें 'तथास्तु' म्हटल्यानंतर मयासुरानें पुण्यनक्षत्रांवर लोह, रजत आणि सुवर्ण यांचीं एकावर एक अशीं तीन पुरें निर्माण केलीं आणि त्यांचें आधिपत्य आपल्या तीन पुत्रांस दिलें. याशिवाय त्या तीन पुरांच्या आसमंतात् आणखीहि कित्येक अंतरिक्षपुरें निर्मून त्यांत अन्य असुरांची राहण्याची व्यवस्था केल्यावर सर्वांच्या ऊर्ध्वप्रदेशीं अति दिव्य पुर निर्मून त्यांत स्वतः आपण राहिला.

अशी व्यवस्था करून सर्वांस मयासुरानें सांगितलें कीं, तुम्ही देवांच्या वाटेस जाऊं नका व ईश्वरोपासनेचा अनादर करूं नका. पण थोड्याच काळानें असुरांनीं हे नियम मोडले. तेव्हां देवांनीं असुरांचा नाश केला. पण मयासुर ईश्वरोपासक असल्यामुळें वांचला. शंकरानें त्रिपुराचें दहन केलें म्हणून त्याला त्रिपुरारि म्हणतात.

त्रिपुरांत चांगलें धर्माचरण होतें तेव्हां तें नष्ट करून पाप माजविण्यासाठीं विष्णूनें जिन किंवा बुद्ध यांच्या रूपानें अधर्म पसरविला अशा कथा पुराणांतून सांपडतात. बाणासुर पाहा.

**त्रिपुर**—कलचुरी राजांची राजधानी. हे गांव जबलपुराजवळ आहे. कलचुरी पाहा.

**त्रिपुरा संस्थान**—पूर्व बंगाल आणि आसाम यांच्या दक्षिणेस हें डोंगरी संस्थान आहे. क्षे. फ. ४,११६ चौ. मै. व लो. सं. ५,१३,९५२. लोकसंख्येंत ७० टक्के हिंदू व २६ टक्के मुसलमान आहेत. ३ टक्के बौद्धधर्मीय आहेत. येथें बंगाली भाषा चालते. संस्थान चांगलें सुधारलेलें असून प्राथमिक शिक्षण मोफत आहे. तांदूळ, ताग, ऊंस, कापूस, गळिताचीं धान्यें हीं मुख्य पिकें असून चहा पुष्कळ होतो. संस्थानांत ५२ चहाचे मळे आहेत. घरीं काढलेल्या सुताचें कापड विविध प्रकारचें असून हा धंदा मोठ्या प्रमाणावर चालतो. खनिज द्रव्यें जमिनींतून काढलीं तर संस्थानला चांगलें उत्पन्न होईल.

अगरताळा हें राजधानीचें ठिकाण असून तेथें उत्कृष्ट बांधणीचा 'उज्जयंत' राजवाडा आहे. चौदा देवतांचें देवालय प्रसिद्ध आहे. राजघराणें जगांतील अति प्राचीन घराण्यांपैकीं आहे असें समजतात. द्रुह्यु राजाच्या चंद्रवंशीय कुळांतील त्रिपुराचे राजे आहेत. सध्यांच्या महाराजांची १८४ वी पिढी मानतात. राजांचें उपनांव वर्मा असें आहे. या राजघराण्याचा ब्रिटिशांशीं मुळींच लेखी तह झालेला नाहीं, हें विशेष होय. सध्यांचे महाराज सर वीरविक्रम किशोरदेव वर्मा हे १९२३ सालीं गादीवर आले. यांनीं विलायतचा पुष्कळ प्रवास केला असून त्यांचा लष्करी हुद्दाहि मोठा आहे. पूर्वबंगाल संस्थानी राजमंडळाचे ते अध्यक्ष होते; तसेंच नरेंद्रमंडळाचे कार्यकारी सदस्यहि होते.

संस्थानचें उत्पन्न ५३ लक्ष रु. आहे. अद्यापि हें संस्थान कोठें सामील किंवा विलीन झालेलें नाहीं.

**त्रिफळा चूर्ण**—हिरडा, बेहडा व आंवळकाठी हीं यांतील मुख्य औषधें होत. आयुर्वेदाचें हें एक अतिशय सुप्रसिद्ध औषध आहे. नेत्ररोग, डोळ्यांची जळजळ, जीर्ण ज्वर, शौचाला साफ न होणें, पोटांत दुखणें, पोटांत वात धरणें, इत्यादि रोगांवर या चूर्णाचा अतिशय चांगला उपयोग होतो. निरनिराळ्या अनेक रोगांत हें औषध वापरण्यांत येतें. ३ ते ६ मासे गरम पाण्याबरोबर घेतात.

**त्रिंबकजी डेंगळे** ( मृत्यु १८२९ )—मराठेशाहींतील एक सरदार. हा आरंभीं दुसऱ्या बाजीरावाच्या पदरीं जासूद होता. पुढें त्यास बाजीरावानें खास तैनातींत घेतलें. तेथें त्रिंबकजीची हुषारी, तडफ, तरतरी व कामांतील दक्षता दिसून तो बाजीरावाचा विश्वासू बनला. पेशव्यानें तोफखान्यावरील सरदार पानसे यांची जहागीर जप्त करून त्यांच्या जागेवर त्रिंबकजीची नेमणूक केली. त्रिंबकजी प्रथम सदाशिवभाऊ माणकेश्वर व खुश्रूशेट मोधी यांची मर्जी संपादन करण्याची खटपट करीत होता. पण त्यांचा कल इंग्रजांकडे दिसूं लागल्यामुळें ही गोष्ट लागलीच बाजीरावास कळविली. पुढें माणकेश्वराच्या जागीं तो स्वतःच बाजीरावाचा मंत्री झाला. त्रिंबकजी हा इंग्रजांचा द्वेष्टा होता. इंग्रजांचा कावा ओळखून त्याला तोंड देणारा व मराठी साम्राज्य टिकविण्यासाठीं धडपडणारा हा पेशवाईंतील शेवटचा पुरुष म्हणतां येईल. वसईच्या तहानें बाजीराव आपलें स्वातंत्र्य घालवून बसला. तें परत मिळविण्यासाठीं त्याची धडपड सुरू होती. पण स्वतः कर्तबगार व धाडसी नसल्यानें त्याला कोणाची तरी मदत लागे. बहुतेक सरदारांनीं इंग्रजांशीं स्वतंत्र तह करून आपला स्वार्थ साधला होता. म्हणून पेशव्यानें त्रिंबकजीस हाताशीं धरलें. त्रिंबकजीनें फौज जमवून इंग्रजांशीं दोन हात करण्याचा उद्योग आरंभला. त्रिंबकजीचें हें कृत्य इंग्रजांच्या हेतूच्या आड येऊं लागल्यामुळें त्यांनीं त्रिंबकजीचा कांटा काढण्याचें ठरविलें. नाना फडणीसानंतर त्रिंबकजीचाच धाक इंग्रजांना होता.

१८१४ सालीं त्रिंबकजीनें गुजराथेंत सरकारी फौज पाठवून गायकवाडांकडे इजाऱ्यानें असलेले प्रांत ताब्यांत घेतले. कारण गुजराथच्या इजाऱ्याचा करार संपला होता व नवीन करार करण्याची गायकवाडांची इच्छा होती व त्यासाठींच त्यांचा वकील गंगाधरशास्त्री पटवर्धन पुण्यास आला. शास्त्री फार हट्टी, हेकट व इंग्रजांच्या बळावर सर्वांस तुच्छ लेखणारा होता. गायकवाडाकडे सरकारची बाकी १ कोटी निघाली. ती दिल्यानंतर पुनः इजारा देण्यांत येईल असें दरबारांत ठरलें. परंतु शास्त्र्यानें तें नाकारलें. इतक्यांत पंढरपुरास शास्त्र्याचा खून झाला. या खुनाचा आरोप इंग्रजांनीं त्रिंबकजीवर ठेवला. अलीकडील ऐतिहासिक पुराव्यांवरून हा खून त्रिंबकजीनें केला नाहीं; उलट गायकवाडींतील शास्त्र्याच्या विरुद्ध पक्षांतील लोकांनींच केला, असें वाटत आहे.

त्रिंबकजीनें आपला खुनाशीं कांहीं संबंध नाहीं असें चक्क सांगितलें. तथापि इंग्रज रेसिडेंटानें त्रिंबकजीस स्वाधीन करण्याविषयीं बाजीरावाच्या मागें लकडा लावला. नाइलाजानें बाजीरावानें त्यास वसंतगड येथें कैदेंत ठेवलें. तरीहि इंग्रजांचें समाधान न होतां त्यांनीं त्रिंबकजीस आपल्याच हवालीं करण्याचा तगादा लाविला. तेव्हां गांगरून बाजीरावानें त्यास इंग्रजांच्या स्वाधीन केलें ( २५ सप्टेंबर १८१५ ). इंग्रजांनीं त्रिंबकजीस ठाण्याच्या किल्ल्यांत ठेवलें. तेथून त्यानें सप्टेंबरच्या १२ व्या तारखेस ( १८१६ ) आपली सुटका करून घेतली. नंतर त्रिंबकजीनें पुनः फौज जमवून इंग्रजांच्या विरुद्ध खूप दंगा उसळून दिला. त्याला पकडण्यासाठीं इंग्रजांनीं फार खटपट केली. परंतु पुष्कळ दिवस ती सिद्धीस गेली नाहीं. त्याचा पत्ताच लागेना. तो आपल्या सासुरवाडीस ( नाशिक जिल्हा, निफाड तालुका, निफाडहून वायव्येस ५ कोसांवर ) अहिरगांवीं गुप्तपणें राहिला होता.

या वेळीं कोरेगांवची लढाई होऊन एल्फिन्स्टननें आपला जाहीरनामा प्रसिद्ध केला होता. त्याप्रमाणें पेशवाईंतील सर्व मराठे सरदार, इनामदार इंग्रजांना मिळाले होते व बाजीराव एकटा पडला. तशाहि स्थितींत त्रिंबकजी धुमाकूळ घालीत असल्यानें त्याला पकडण्यासाठीं मोठमोठीं बक्षिसें लाविलीं. तेव्हां एका स्त्रीनें व त्रिंबकजीचा नोकर नाना यानें फितुर होऊन कॅ. ब्रिग्ज़ यास त्रिंबकजीच्या ठिकाणाची माहिती दिली. कॅ. स्वान्स्टन एक हजार घोडदळाची पलटण घेऊन अहिरगांवीं आला. या वेळीं त्रिंबकजी तेथें एकटाच होता. गांवची नाकेबंदी करून

इंग्रजांनीं पहांटे त्रिंबकजीच्या वाड्यास वेढा घातला. वाडा दोनदां तळघरें—वळदांसकट शोधला. परंतु त्रिंबकजी सांपडेना. शेवटीं तिसऱ्यानें शोधला तेव्हां मात्र सांपडला. एका वळदांत एका लोखंडी चोरदाराच्या पलीकडे बुरजावर जाण्याचा एक जिना होता. तेथील भिंत त्रिंबकजी फोडीत बसला होता. त्याला धरण्यास जात असतां जिन्यावरील एका मराठ्यानें त्यांना अडथळा केला. त्यानें जवळजवळ तीस माणसें आपल्या भाल्यानें ठार केलीं. शेवटीं त्यावर गोळ्या झाडल्या तेव्हां तो मराठा पडला. तो मराठा म्हणजे त्रिंबकजींची पत्नी होती! पुढें त्रिंबकजी आपण होऊन इंग्रजांच्या स्वाधीन झाला. त्यास नंतर चुनार येथें किल्ल्यांत अखेरपर्यंत कैदेंत ठेविलें. तेथें तो ता. १६ ऑक्टोबर १८२९ रोजीं सकाळीं ८ वाजतां मरण पावला.

ह्याचें मूळ ठिकाण संगमनेर तालुक्यांत निंबगांवजाळी. तेथें अद्याप ह्याचे वंशज नांदत आहेत. त्रिंबकजीस एकंदर १२ बायका होत्या व गणपतराव नांवाचा एक मुलगा होता.

**त्रिंबक भास्कर**—एक मराठेशाहींतील सरदार. हा शिवाजी-महाराजांचा पुरंदर किल्ल्यावरील सुभेदार होता. सिद्दी जोहारनें पन्हाळ्यास वेढा दिला असतां नेताजी पालकरानें पन्हाळ्यास मदत पोंचविण्याचा प्रयत्न केला. तो फसला तेव्हां याला मुख्य सेनापति नेमून शिवाजी किल्ल्यावरून निसटला (१६६०). पुढें यानें शिवाजीच्या आज्ञेनें पन्हाळा सिद्दी जोहाराच्या ताब्यांत दिला. नंतर हा राजगडास निघून आला. पुढें यानें शृंगारपूरच्या स्वारींत चांगला पराक्रम केला (१६६१). म्हणून याला प्रभावली प्रांताचा अधिकारी नेमलें. हा कुशल योद्धा होता.

**त्रिंबकराव दाभाडे** (मृत्यु १७२९)—१. मराठेशाहींतील एक सेनापति. हा सेनापति खंडेराव दाभाडे याचा मुलगा. स. १७२९ त सरबुलंदखानाकडून मराठ्यांस गुजराथची चौथाई व सरदेशमुखी मिळाली. त्याचा मोकासा दाभाड्यास दिला. पुढें बाजीरावानें आपल्या प्रांतांत ढवळाढवळ केली व शाहूचें मन कलुषित केलें असा अंदेशा येऊन त्रिंबकरावाचें बाजीरावाशीं वितुष्ट आलें. त्रिंबकरावानें बाजीरावाचा पाडाव करण्यासाठीं निजामाशीं सख्य केलें. शेवटीं डभईस ह्या दोघांची लढाई होऊन तींत त्रिंबकराव मारला गेला.

२. (मृ. १७६६). हा यशवंतराव दाभाड्याचा मुलगा व वरील त्रिंबकरावाचा पुतण्या. हा निजामाच्या आश्रयास गेल्यामुळें त्याचीं वतनें पेशव्यांनीं जप्त केलीं व तीं गायकवाडांस दिलीं. तेव्हां हा विरक्त होऊन घृष्णेश्वरास जाऊन राहिला व तेथेंच मरण पावला.

**त्रिंबकरावमामा पेठे** (मृ. १७७४)—मराठ्यांचा एक ब्राह्मण सेनापति. बाळाजी विश्वनाथ पेशवे याची मुलगी अनुबाई ही इचलकरंजीकर व्यंकटराव नारायण यास दिली होती. त्यांची मुलगी वेणूताई ही त्रिंबकरावमामाची बायको. शिवाय मामाची बहीण चिमाजीआप्पा पेशवे याची पहिली बायको (रखमाबाई) होती; त्यामुळें मामाचें पेशव्यांशीं दोन्हीकडून नातें होतें. या नात्यावरून पेशवे घराण्यांत त्रिंबकरावास मामा असें टोपण नांव मिळालें व तेंच रूढ झालें. मामाचे वडील विसाजी कृष्ण पेठे हे नागपूरकरांच्या पदरीं होते. पुढें नागपूरकरांनीं त्रिंबकराव विश्वनाथ यास आपला वकील म्हणून शाहूच्या दरबारीं ठेविलें होतें. नंतर पेशव्यांनीं त्यास आपल्याकडे घेतलें.

शाहूच्या मृत्यूनंतर मामा हा पेशव्यांच्या कारभारांत त्यांचा मुख्य हस्तक होता. बाळाजी विश्वनाथाच्या नंतर बाजीरावास पेशवाई मिळवून देण्याच्या कामीं ज्यांनीं खटपटी केल्या त्यांत विसाजीपंत पेठे होता. पुरंदरे हे पेशव्यांचे पुण्याचे कारभारी असत. नानासाहेबाच्या वेळीं पुरंदरे (महादोबा) रुसला तेव्हां त्याच्या जागीं पेशव्यानें मामाला नेमिलें (१७५१ फेब्रु.). परंतु पुढें महादोबाची समजूत झाल्यावर मामाला साताऱ्यास ताराबाईच्या बंदोबस्तास ठेविलें. थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दींत मामानें कर्नाटकावर स्वाऱ्या केल्या. मामानें या स्वाऱ्यांत (मुख्यतः मोतीतलावाच्या लढाईत) हैदराची खूप खोड मोडली. इतकी कीं, पेशवे थेऊरास फार आजारी असल्याचें ऐकून मामा परतला तरीहि हैदरानें २६ लक्ष खंडणी व १४ लक्ष स्वारीखर्च व कोल्हार, वगैरे पांच प्रांत मामाच्या हवालीं केले. नारायणरावाच्या खुनानंतर नदीवर ज्या मंडळींनीं (नाना, बापू, हरिपंत तात्या, इ.) नानासाहेबांचा वंश चालविण्याबद्दल गुप्तपणें शपथा घेतल्या त्यांत मामाहि होता. दादासाहेबांच्या कारकीर्दींत बारभाईंच्या कारस्थानांत मामा प्रमुख असे. तोच या वेळीं पेशव्यांच्या फौजेचा सेनापति होता. पुढें कर्नाटकांत राघोबादादानें मोहीम केली. त्या वेळीं एक एक मंडळी त्यास सोडून पुण्यास आली. पुढें दादास ही मसलत (बारभाईंचें कारस्थान) समजल्यावर तो परतला. मामाला भोंसल्यावर दादानें पाठविलें होतें. तो तिकडे न जाता दादावर स्वारी करण्याची वाट पाहत बसला (१७७३). कारभाऱ्यांनीं दादावर भोसले, फडके व मामा यांना पाठविलें. त्यांची गांठ पंढरपुराजवळ कासेगांव येथें पडली. मामानें घाई व उतावीळ करून दादावर हल्ला केला. त्यांत मामाचा मोड झाला व फार जखमी होऊन दादाच्या हातीं लागला (२६ मार्च १७७४). लवकरच जखमा असाध्य होऊन मरण पावला.

मामाचा एंकंदर सरंजाम मोठा होता. पेशवाईंत पुढील मान पेठ्यांना असत : १ छत्रपतीकडून पेशवाईंचीं वस्त्रें आणणें. २ छत्रपति पुण्यास आल्यास त्यांची वडदास्त ठेवणें. ३ दसऱ्याचीं ३०० रुपये मानाचीं वस्त्रें पेशव्यांकडून यास मिळत. ४ सरकारांतून हत्ती–पालखीचा मान असे. पुणें येथें मामाचा एक वाडा कसबा पेठेंत तांबटाच्या हौदाजवळ होता. व भांबुर्ड्यास आजच्या कॉंग्रेस हाउसजवळ दुसरा होता.

**त्रिंबक सदाशिव (नाना) पुरंदरे**—एक ब्राह्मण मुत्सद्दी. हा सासवडच्या अंबाजी पुरंदऱ्याचा पुतण्या साताऱ्यास राहून पेशव्यांची चांगली कामगिरी बजावीत असे. तसेंच नेहमीं स्वारीवर जात असे. स. १७६४ त माधवरावाच्या स्वारीबरोबर हा कर्नाटकांत गेला होता.

**त्रिंबक सोनदेव डबीर**—हा शिवाजीचा एक मंत्री सोनोपंत डबीर याचा मुलगा होता. हा शिवाजीबरोबर आग्र्यास गेला होता. शिवाजी तेथून आल्यानंतर त्याची सुटका झाली. (१६६९). याचा मुलगा रामचंद्र हा राज्याभिषेकाच्या वेळीं शिवाजीचा सुमंत होता. हा शिवाजीच्या अत्यंत विश्वासांतील होता.

**त्रिभुजप्रदेश**—(डेल्टा). मोठ्या नदीच्या मुखाशीं पुळणाची माती सांचून समुद्राला मिळूं जाणाऱ्या नदीच्या प्रवाहाचे दोन तीन फांटे होतात व ग्रीक 'डी' (डेल्टा) या आकाराचा प्रदेश बनतो. प्रथम नाइल नदीच्या मुखप्रदेशाला हें नांव ग्रीक लोकांनीं दिले. पुढें याच आकाराच्या नदीमुखांनाहि हें नांव वापरूं लागले. गंगा आणि ब्रह्मपुत्रा नद्यांचा असा त्रिभुजप्रदेश सुमारें ५०,००० चौरस मैलांचा आहे; मिसिसिपीचा १२,००० चौ. मैल आहे. डॅन्यूब आणि ऱ्होन यांनाहि असेच त्रिभुजप्रदेश आहेत.

**त्रिभुवनकीर्ति**—एक आयुर्वेदीय औषध. यांत हिंगूळ, बचनाग, सुंठ, मिरें, पिंपळी, टांकणखार व पिंपळमूळ हीं मुख्य औषधें असून तुळस, आल्याचा रस व धोतऱ्याच्या पाल्याचा रस या प्रत्येकाच्या तीन तीन भावना दिल्या असतात. हें आयुर्वेदांतील ज्वरावरचें अतिशय प्रभावी औषध आहे. हातांपायांतून चमका निघणें, अंग मोडून येणें, डोकें अतिशय दुखणें, जोराचें पडसें येणें, तोंडाला चव नसणें, थोडासा खोकला असणें, पिंढऱ्या वळणें, घसा दुखणें, इत्यादि विकारांवर या औषधाचा फार चांगला उपयोग होतो. इन्फ्लुएंझावर हें एक रामबाण औषध आहे. ।· ते १ गुंज आल्याचा रस, मध, किंवा गरम पाणी यांबरोबर देतात.

**त्रिमूर्ति**—त्रिमूर्ति मत हें हिंदु अगर ईजिप्शियन अगर इतर कांहीं धर्म यांत आढळत असलें तरी ख्रिस्ती धर्मात याला विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. हिंदु धर्मात ही त्रिमूर्ति–कल्पना प्रथमतः मैत्रायणोपनिषदांतील दोन मंत्रांत आढळून येते. एका मंत्रांत निर्गुण, निराकार अशा ब्रह्माच्या ब्रह्मा, विष्णु, महेश या तीन सगुण मूर्ति होत असें म्हटलें आहे; व दुसऱ्या मंत्रांत प्रकृति ही सत्त्व, रज व तम या तीन गुणांनीं युक्त असून सत्त्व म्हणजे विष्णु, रज म्हणजे ब्रह्मा, व तम म्हणजे शिव होय, अशी कल्पना आढळते. या उपनिषदांतील प्राचीन तत्त्वाचें पुढें सांप्रदायिक स्वरूप जाऊन, ज्याचा जो देव असेल त्यानें त्यास मुख्य परमेश्वर समजून त्याचे ब्रह्मा, विष्णु, महेश हे व्यक्त अंश होत, असें प्रतिपादन करण्यास सुरुवात झाली. उदाहरणार्थ, वैष्णव लोक विष्णु हा ब्रह्म असून त्याचे ब्रह्मा, विष्णु, महेश असे तीन अवतार मानितात. अशांप्रमाणें ही त्रिमूर्तीची कल्पना केवळ धर्मग्रंथांतच आढळून येते असें नाहीं तर तिला शिल्पांमध्येंहि स्थान मिळालें आहे. घारापुरीच्या लेण्यांमध्यें त्रिमूर्तीची शिल्पमूर्ति आढळून येते. तथापि, त्रिमूर्ति तत्त्वाला हिंदु धर्मात विशेष प्राधान्य दिलेलें दिसत नाहीं. त्रिमूर्ति दत्त फार जुना दिसत नाहीं. एकमुखी दत्ताच्याच मूर्ती जुन्या दिसतील.

ईजिप्शियन धर्मग्रंथांत ऑसिरीस, इसिस व होरस या त्रिमूर्तीची कल्पना आढळून येते. निओप्लेटॉनिक पंथामध्यें ही कल्पना तत्त्वज्ञानाच्या स्वरूपांत आढळून येते. पण ख्रिश्चन धर्मामध्यें मात्र या तत्त्वाला प्राधान्य आलेलें आहे; व याचें कारण ख्रिस्ती धर्मांतील अवताराची कल्पना हें होय, असें ख्रिस्ती धर्मपंडित म्हणतात. इतर धर्मांमध्यें जरी अवतारकल्पना आढळते तरी त्या कल्पनेला धर्मतत्त्वांत थारा मिळालेला नाहीं. उलट पक्षीं परमेश्वर हा ख्रिस्ताच्या रूपानें या जगतीतलावर प्रत्यक्ष अवतीर्ण झाला आहे व चर्चमध्यें अद्यापिहि त्याचा साक्षात्कार होणें शक्य आहे, हें ख्रिस्ती धर्माचें आद्यतत्त्व आहे. जुन्या करारांत या तत्त्वाची कल्पना आढळून येत नाहीं व नव्या करारांतहि या कल्पनेला मूर्त स्वरूप आलेलें दिसत नाहीं. पण पुढें मात्र चर्चच्या इतिहासांत या त्रिमूर्ति–तत्त्वाची कल्पना प्रामुख्यानें उदयास येत चालली. तत्पूर्वी परमेश्वरच बाप, मुलगा व आत्मा हीं तीन रूपें धारण करतो अशी कल्पना होती. पण पुढें ख्रिस्ती तत्त्ववेत्त्यांनीं असें प्रतिपादन करण्यास सुरुवात केली कीं, परमेश्वर प्रेमस्वरूपी असून, त्याच्यामध्यें तीन वस्तू राहतात. या तिन्ही वस्तू स्वतंत्र असून त्या प्रत्येक वस्तूमध्यें परमात्मतत्त्व सारख्या अंशांनीं भरलेलें आहे. या तीन वस्तूंपैकीं एक वस्तु जगाची निर्मात्री असून तिला 'बाप' असें नांव देण्यांत आलेलें आहे. दुसरी वस्तु जगाची उद्धारक आहे; तिला 'मुलगा' असें नांव दिलें आहे. तिसरी वस्तु आत्मा (पवित्र भूत) ही होय. हिचें मुख्य कार्य 'पवित्रीकरण' होय. आत्म्याला परमात्मास्वरूपी बनविणें हें तिसऱ्या वस्तूचें कार्य आहे.

आता अशी एक शंका उपस्थित होईल कीं, जर ख्रिस्ती धर्म एकेश्वरी आहे तर त्रिमूर्ति-तत्त्वाला मान्यता दिल्यास त्याला अनेकेश्वरी धर्माचें स्वरूप प्राप्त होईल. पण ख्रिस्ती धर्मज्ञांनीं खालील विवेचनानें या शंकेचे समाधान केलें आहे. या त्रिमूर्ति-तत्त्वाप्रमाणें एका परमेश्वरामध्यें या तीन स्वतंत्र वस्तू आहेत तरी एकच परमात्मतत्त्व या तिन्हीमध्यें सारख्या अंशांनीं व्याप्त असल्यामुळें त्या तिन्ही वस्तूंचें त्याच्या ठायीं ऐक्यच आहे; व अशा दृष्टीने पाहिल्यास ख्रिस्ती धर्म एकेश्वरीच आहे.

मग अनेकदेवतात्मक हिंदु धर्महि निराळें काय सांगतो! तोहि या तर्कवादाप्रमाणें एकेश्वरीच ठरतो.

**त्रिरश्मी**—नाशिकजवळच्या एका बौद्धकालीन डोंगराचें नांव. यांत लेण्ीं आहेत. त्यांना पांडव लेण्ीं म्हणतात. हीं लेण्ीं सुमारें २४ आहेत. त्यांपैकीं ३ रें, १० वें व २० वें हीं फार मोठीं असून तींत लेख आहेत. हीं लेण्ीं बौद्ध असून ख्रि. पू. २५० ते इ. स. ६०० या कालांत कोरलेलीं दिसतात.

**त्रिलोकेकर, सोकर बापूजी** (१८३६–१९०८)—मराठींतील पहिले संगीत नाटककार. यांचा जन्म मुंबई येथें झाला. थोडेंसें मराठी शिक्षण झाल्यावर हे एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें इंग्रजी शिकूं लागले. तेथील परीक्षेंत उत्तम तऱ्हेनें उत्तीर्ण होऊन हे तेथील नॉर्मल स्कॉलर झाले. त्यामुळें त्यांना थोडा पगार मिळून शिक्षकाचें काम शिकण्यास मिळूं लागलें. नंतर 'प्रभु सेमिनरी' व 'एल्फिन्स्टन इन्स्टिटयूट' ह्या शाळांतून यांनीं शिक्षकाचें काम केलें. सन १८५७ पासून १८६४ पर्यंत हे एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें होते. पुढें यांना हायकोर्टांत ट्रान्स-लेटरची जागा मिळाली. यांना मराठी, इंग्रजी, गुजराथी, वगैरे भाषा चांगल्या येत. ही नोकरी १८९७ पर्यंत करून हे सेवानिवृत्त झाले.

यांना गाण्याची विशेष आवड असल्यामुळें गायनशास्त्राचा शास्त्रोक्त अभ्यास करून यांनीं संगीत नाटकें लिहिण्यास सुरुवात केली.

मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं स. १८७१ त संस्कृत गद्यपद्यात्मक 'शाकुंतल' नाटकाचा जो संगीत प्रयोग करून दाखविला तो पाहून मराठींतहि ही प्रथा सुरू करण्याचें यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें यांनीं स. १८७९ त प्रसिद्ध केलेल्या 'नलदमयंती' या नाटकाचे प्रयोग उत्कृष्ट वठले. यावरून मराठींतील आद्य संगीत नाटकाचार्यांचा मान यांनाच द्यावा लागेल. नलदमयंती या नाटकाशिवाय 'हरिश्चंद्र' (स. १८८०), 'सावित्री' (स. १८९२), इत्यादि गद्यपद्यात्मक नाटकें यांनीं लिहिलीं.

आणासाहेब किर्लोस्करांच्यापूर्वी यांनीं संगीत नाटक तयार केलें व पदे त्या त्या पात्रांकडून म्हणविण्याची पद्धत सुरू केली. यांच्या नाटकांत आर्या, दिंड्या, श्लोक व क्वचित् जुन्या चालींवर पदें आहेत. यांचीं नाटकें 'हिंदु सन्मार्गबोधक मंडळी' नांवाची हौशी मंडळी करीत असे.

**त्रिलोचन**—एक हिंदी संत कवि. हा हरद्वार-सहारणपूरकडील रहिवासी असावा. हा पंजाबांतील नामदेवाचा मित्र असून याचें नांव नामदेवाच्या पद्यांतून येतें. कबिरानें देखील नामदेव आणि त्रिलोचन यांचे संवाद दिले आहेत. या त्रिलोचनाच्या कथा नाभाजीनें भक्तमालेंत दिल्या आहेत. शीखांच्या ग्रंथसाहेबांत याचीं ४ पद्यें आहेत.

**त्रिलोचनपाल शाही** (राज्य. १००९–२१)— पंजाबांतील शाही घराण्यापैकीं जयपालाचा हा दुसरा मुलगा स. १००९ मध्यें गादीवर आला. यानें गझनीच्या महमदाविरुद्ध लढण्याकरितां काश्मीरच्या संग्रामराज लोहरची मदत मागितली. त्याप्रमाणें त्यानें तुंग नांवाचा आपला प्रधान मदतीस पाठविला. पण त्यानें गनिमी कावा सोडून तुर्कांना उघड तोंड दिल्यामुळें पराजय पावून यास पळून जावें लागलें. पुढें गांधार मुसलमान झाल्यामुळें शाही घराण्याचें नांवहि नष्ट झालें. रुद्रपाल, वगैरे याचे मुलगे काश्मीरच्या राजाच्या आश्रयास होते, असें 'राजतरंगिणी'-वरून दिसतें.

काश्मीरच्या सरहद्दीपर तौशीच्या लढाईंत पराभव झाल्यावर त्रिलोचनपाल हा कनोजचा राजा राज्यपाल याच्या आश्रयास येणें शक्य आहे. अल्बेरुणीनें त्रिलोचनपाल स. १०२१ (हि. ४१२) त मरण पावला, असें म्हटलें आहे. राहिब नदीवरील लढाई त्या सालीं झाली असावी आणि त्रिलोचनपाल हा या लढाईंत शौर्यानें लढून पडला असावा.

**त्रिवंग भस्म**— एक आयुर्वेदीय औषध. यांत कथील, शिसें, व जसद हीं मुख्य औषधें असतात. हें औषध नपुंसकत्व-नाशनाकरितां फार प्रसिद्ध आहे. मधुमेह, लालामेह, इत्यादींवर याचा उपयोग होतो. स्वप्नावस्था, अतिवीर्यपात, अतिस्त्रीसेवन, इत्यादींमुळें आलेलें नपुंसकत्व या भस्माच्या सेवनानें नाहींसें होतें. गर्भाशय, योनिमार्ग, स्त्रीबीजाशय, इत्यादि ठिकाणीं सूज असल्यास या औषधाचा उपयोग करतात. १ ते २ गुंजा दूध-खडीसाखर किंवा लोणी-खडीसाखर यांतून देतात.

**त्रिवर्गात्मक**—(ट्रिआसिक). त्रिस्तर—उरगस्तर युग. मेसोझोइक युगाच्या व तत्कालीन प्रस्तराच्या आरंभींच्या कालास व थरास त्रिवर्गात्मक म्हणतात. ब्रिटनमधील या थरास नवीन तांबडे वाळुकामय प्रस्तर म्हणतात. या कालांत सरपटणारे प्राणी उत्पन्न झाले. मध्यजर्मनींतील समुद्रकांठीं याचे थर आढळतात.

**त्रिवेणी**—हा राग पूर्वी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहांत मध्यम स्वर वर्ज्य आहे. म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय सायंकाळ सर्वसंमत आहे. हा राग श्रीरागाच्या अंगानें गातात. गांधार व पंचम या स्वरांची संगति चित्ताकर्षक आहे. यांत देशकार, गौरी व पूर्वी या रागांची छाया दृष्टीस पडते.

**त्रिवेणी**— १. बंगाल, हुगळी जिल्हा व पोटविभाग यांतील एक खेडें. बांसबेरिया म्युनिसिपल हद्दींत याचा समावेश होतो. गंगा, यमुना, सरस्वती या तीन नद्यांचा संगम येथें झाला आहे, म्हणून यास त्रिवेणी म्हणतात. सरस्वतीच्या उत्तरेस त्रिवेणी घाट आहे. ओरिसाच्या गजपती राजांपैकीं शेवटचा राजा मुकुंददेव यानें तो घाट बांधला असें म्हणतात. घाटाच्या दक्षिणेस त्रिवेणी गांव आहे. हें क्षेत्र असें मानतात. येथें प्राचीन काळीं एक विद्यापीठ तसेंच ३० संस्कृत शाळा होत्या आणि तेथील व्यापारहि नांवाजलेला होता. त्रिवेणीच्या दक्षिणेस एक मोठी मशीद आहे. तींत जाफरखान याचें थडगें आहे. त्रिवेणीस मकर-संक्रांतीचा मेळा, संपात मेळा, वारुणी मेळा, दशहारमेळा व कार्तिकपूजा मेळा असे मेळे भरतात.

२. अलाहाबादेस (प्रयाग येथें) गंगा, यमुना आणि सरस्वती या पवित्र नद्यांचा संगम झाला आहे. या स्थानास त्रिवेणी संगम म्हणतात. या ठिकाणीं श्राद्धकर्में करतात व सुवासिनी वेणीदान करतात. पुराणकालापासून हें तीर्थस्थान प्रसिद्ध आहे.

**त्रिवेंद्रम्**—(मूळ शब्द तिरु-अनंतपुरम् = अनंताचें पवित्र शहर). मद्रास, त्रावणकोरची राजधानी. क्षेत्रफळ ९ चौ. मै.. हें त्रावणकोर संस्थानांत सर्वांत मोठें शहर आहे. येथून समुद्र २ मैल आहे. या ठिकाणीं एक किल्ला असून त्याच्याजवळच्या गांवांत लोकवस्ती फार दाट आहे. मध्यभागीं महाराजांचा राजवाडा आहे. किल्ल्यात अनंत पद्मनाथस्वामींचें देवालय आहे. यामुळें त्रिवेंद्रम् हें क्षेत्राचें स्थान बनलेलें असून हिंदुस्थानच्या दरएक भागांतून येथें यात्रेकरू येतात. देवालयाचें उत्पन्न लाखावर आहे. किल्ल्यापासून एक मैलावर दिवाण-कचेरी व वरिष्ठ कोर्ट असून कचेरीच्या उत्तरेस मुलांच्या शाळा आहेत. लगतच व्हिक्टोरिया ज्युबिली हॉल, औद्योगिक शाळा, सार्वजनिक वाचनालय, खिस्ती देऊळ व लष्करी छावणी हीं आहेत. येथें एक विद्यापीठ व कॉलेजें आहेत. विमानानें मुंबई, मद्रास व कोलंबो येथून जातां येतें. लो. सं. १,२८,३६५.

**त्रिशंकु**—१. इक्ष्वाकुकुलोत्पन्न अरुणराजाचा पौत्र, व निबंधन राजाचा ज्येष्ठ पुत्र. याचें मूळचें नांव सत्यव्रत. हा दुर्मार्गी असून विवाहित ब्राह्मण स्त्रिया हरण करी. उपदेशाचा कांहीं परिणाम होत नाहीं हें पाहून निबंधनानें त्याला राज्याबाहेर घालविलें व आपण सचिवाच्या हातीं राज्य सोंपवून अरण्यांत तप करूं लागला. राजा नसल्यामुळें अयोध्येंत प्रजा अधर्मानें वागूं लागली. अवर्षण पडलें व मनुष्यास अन्न मिळेनासें झालें. त्यांत विश्वामित्राची स्त्री व तीन पुत्र हे सांपडले होते. पण त्यांस त्रिशंकूनें प्रत्यहीं कांहीं मांस आणून देऊन वांचविलें. पुढें त्यानें वसिष्ठ ऋषीची गाय मारली. तेव्हां त्यानें शाप दिला कीं, तीन शंकू (पातकां)स्तव सत्यव्रत त्रिशंकु नांव पावो. तेव्हांपासून बुद्धिभ्रंश होऊन हा अरण्यांत पिशाचाप्रमाणें फिरूं लागला. नंतर त्यास निबंधनानें अयोध्येस परत नेलें व राज्यावर बसविलें. त्रिशंकूनें पुष्कळ काळ चांगल्या नीतीनें राज्य केलें. सदेह स्वर्गास जाऊन तेथील दिव्य भोग भोगावेत म्हणून यज्ञ करण्याची इच्छा त्यानें वसिष्ठाजवळ प्रगट केली. असें होणें शक्य नाहीं म्हणून वसिष्ठानें उत्तर दिल्यावर आपली गाय मीं मारली म्हणून द्वेषानें आपण असें बोलतां, मी दुसरा उपाध्याय पाहून स्वर्गास जातों कीं नाहीं तें पाहा, असें त्रिशंकु म्हणाला. वसिष्ठानें 'तूं चांडाळ हो!' असा शाप देताच हा काळा व कुरूप बनला. पुढें हा विश्वामित्रास भेटला व आपली इच्छा त्याज-पाशीं निवेदन केली. विश्वामित्रानें त्याची विनंति मान्य करून यज्ञाची तयारी करण्यास सांगितलें. परंतु चांडाळ यजमान व क्षत्रिय उपाध्याय अशी वसिष्ठानें निंदा केल्यावरून बहुतेक ब्राह्मणांनीं यज्ञास येण्याचें नाकारलें व देवहि हविर्भाग घेण्यास येईनात. हें पाहून विश्वामित्र म्हणाला, "आतां कांहीं स्वार्जित पुण्य असेल तर तूं स्वर्गास जाशील." इतके म्हणतांच त्रिशंकु पक्ष्याप्रमाणें उडून स्वर्गी जाऊं लागला. त्यावरून रागावून इंद्रानें त्रिशंकु वर येतांच त्यास सांगितलें, "तूं गुरुशापानें दग्ध झालेला आहेस, तुला सदेह स्वर्गास येण्याचा अधिकार नाहीं, म्हणून खालीं जा!" तेव्हां त्रिशंकु खालीं पडूं लागला व ओरडूं लागला. तें ओरडणें ऐकून विश्वामित्र, "तिष्ठ! तिष्ठ! (थांब, थांब)" असें म्हणाला. तेणेंकरून हा अंतरिक्षांतच स्थिर झाला. नंतर विश्वामित्रानें प्रतिसृष्टि व स्वर्ग निर्माण करून इष्टि आरंभिली व कांहीं पदार्थहि उत्पन्न केले. तेव्हां इंद्रानें त्याची समजूत करून मर्त्य देहाचा त्रिशंकूकडून त्याग करवून त्यास दिव्यदेही केल्यावर स्वर्गास नेलें.

२. (सदर्न क्रॉस). द. गोलार्धातील एक तारापुंज किंवा नक्षत्र. यांत चार तारे असून त्यांपैकीं एक पहिल्या प्रतीचा (तेजामध्यें) व दोन दुसऱ्या प्रतीचे आहेत. ध्रुवाच्यावर असतांना हे चार तारे स्वस्तिकाप्रमाणें दिसतात.

**त्रिसुपर्ण**—जेवणाच्या अगोदर पानावर बसून ब्राह्मण त्रिसुपर्ण मंत्र म्हणतात. ते नारायणीय उपनिषदांत ४८, ४९

५० व ६४ या अनुवाकांत सांगितले आहेत. नारायणीय उपनिषद् तैत्तिरीय आरण्यकाच्या दहाव्या प्रपाठकांत आहे. पापक्षालनार्थ हे मंत्र म्हणावयाचे असतात. ब्रह्महत्या, भ्रूणहत्या व वीरहत्या या तीन पापांचें क्षालन तीन सुपर्ण मंत्रांच्या पाठानें होतें असें या मंत्रांत सांगितलें आहे. यज्ञीय कर्मांत सांगितलेल्या प्रार्थना करण्यांत जर चूक झाली तर ब्रह्महत्या, यज्ञीय कर्मांत दीक्षा घेतलेल्या अवधींत रेतःस्खलन झालें तर भ्रूणहत्या व अग्निसेवेंत कांहीं अंतर पडलें तर वीरहत्या होत असते, असा अर्थ कांहीं पंडित घेतात ( उदा., प्रा. गं. वा. लेले—त्रिसुपर्ण ).

त्रिसुपर्ण मंत्रांत ब्रह्मस्वरूपाचें वर्णन आहे. ब्रह्मज्ञानाला आवश्यक अशीं साधनें मिळावींत अशी प्रार्थना पण आहे. या मंत्रांची योग्यता इतकी आहे कीं, ते कोणीं ब्राह्मणानें शिकवा असें म्हटलें नाहीं तरी त्याला ते शिकवावेत, असें यांत मंत्रांच्या शेवटीं बजाविलें आहे.

**त्रूबादूर**—फ्रान्समध्यें ११ व्या शतकापासून १४ व्या शतकापर्यंत जे मध्ययुगीन कवी प्रसिद्धि पावले, त्या सर्वांना हें सामुदायिक नांव आहे. हे सर्व कवी राजदरबारच्या आश्रयाला होते, आणि त्यांच्या काव्याचा विषय प्रेम हा असे. त्यांनीं आपली कविता आपल्या वरिष्ठाच्या सेवेला सादर केलेली आहे. त्यांत कांहीं शोकगीतें आहेत, व कांहीं आपसांतील कलहविषयक कविता आहेत. या कवींची एकंदर संख्या ४०० असून त्यांच्यापैकीं सर्वांत श्रेष्ठ कवी म्हणजे जिऑफ्रे रुडेल, बर्नार्त द व्हेन्तादूर, बर्त्रोन्द द बोर्न व पेईर सेर्देनाल हे होत.

या कवींच्या काव्याचा परिणाम मध्ययुगीन इंग्लिश काव्यावरहि झालेला दिसतो.

**त्रैलोक्यचिंतामणि**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें ताम्रभस्म, सुवर्णभस्म, अभ्रकभस्म, लोहभस्म, प्रवाळभस्म, मौक्तिकभस्म व रससिंदूर, हीं असून कोरफडीच्या रसांत खल करतात. हें औषध वीर्यवर्धक, ओजप्रद व जीवनीय असें आहे. हातापायाला मुंग्या येणें, अंग जड होणें, तोंडाला पाणी सुटणें, ज्वरानंतर आलेला अशक्तपणा, इत्यादि विकारांवर हें औषध चांगलें उपयोगी पडतें. पक्षाघात, अर्दित, आक्षेपक, इत्यादि वातरोगांवर या औषधाचा उपयोग होतो. छातींत धडधडणें, हृदयाची दुर्बलता, इत्यादि विकारांवर हें चांगलें औषध आहे. ·।· ते २ गुंजा दूधसाखर, लोणी, मध, किंवा आल्याचा रस यांबरोबर देतात.

**त्र्यंबकराज**—हा एक ब्राह्मण नामांकित वैद्य होऊन गेला. हा विद्वान् व पद्महस्ती असल्यामुळें यास लोक धन्वंतरि असें म्हणतात. यानें शेंकडों लोकांचे असाध्य रोग बरे केले. यानें अनेक प्रकारचे नवे नवे औषधिकल्प अनुभवून व योजून त्यांवर त्र्यंबकी नांवाचा एक ग्रंथ रचिला व तो आपल्या स्त्रीस पढविला. यानें कारण त्यास पुत्र नव्हता. रसायनें व त्याच्या सिद्ध कृतीहि त्यानें आपल्या पत्नीस शिकविल्या. त्र्यंबकराज मरण पावल्यावर त्याच्या स्त्रीनें वैद्यक्रिया बहुत दिवसपर्यंत उत्कृष्ट रीतीनें केली. व कोणाकडून पैसाहि घेतला नाहीं. त्र्यंबकराज कोल्हापुरास राहत असे. हा शालिवाहन शके १५५० त होता असें वाटतें.

'त्र्यंबकी' ( वैद्यकीवरील ग्रंथ ) करणारा त्र्यंबक व 'बालबोध' करणारा त्र्यंबक यांचें वर्णन बहुतेक जुळतें; तेव्हां हे एक असावेत असें वाटतें. तसें असल्यास बालबोधकार त्र्यंबक आपले गुरु कमलाकर असें सांगतो. याचा काल १४९० च्या पूर्वीचा. शिवणकल्याणाचा पणजा कमलाकर होता त्याचाहि तोच काल येतो. परंतु त्या दोन्ही व्यक्ती एकच कीं काय हें निश्चित नाहीं.

**त्र्यंबकेश्वर**— मुंबई, नाशिक जिल्हा. हें सुमारें चार हजार वस्तीचें गांव असून प्रसिद्ध यात्रेचें ठिकाण आहे. हें नाशिकाच्या नैर्ऋत्येस २० मैलांवर सह्याद्रीच्या एका फांट्यावर वसलेलें आहे. पावसाळ्यामध्यें व त्यानंतर कांहीं दिवस त्र्यंबकेश्वराच्या कड्यावरून, एका कोनाड्यांत असलेल्या एका देवीच्या मूर्तीच्या खालच्या बाजूस असलेल्या गायमुखांतून, पाणी पडतें. हाच गोदावरीचा मूळ उगम समजतात. गांवांतील रस्ते बहुतेक फरसबंदी आहेत. गांव खोलांत असल्यामुळें हवा निरोगी नाहीं. येथें आठ तळीं असून त्यांपैकीं दोहोंतील पाण्याचा उपयोग पिण्याच्या कामीं करतात. यांपैकीं गंगातलाव फार मोठा असून यांतून वाहून जाणाऱ्या पाण्यानेंच पुढील गोदावरीचा प्रवाह बनतो. हा प्रवाह एका देवळाजवळून जाऊन कुशावर्त कुंडांत पडतो. हें कुंड फार पवित्र मानतात. येथें १८६६ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

गांवाच्या तोंडाशीं असलेलें त्र्यंबकेश्वराचें देऊळ बाळाजी बाजीराव पेशव्यानें पूर्वींच्या जुन्या लहान देवळाच्या जागीं बांधलें. त्याच्यावर पुष्कळ नक्षीकाम आहे. या देवळास कांहीं जमीन इनाम असून १२ हजार रुपयांचें वर्षासन आहे. विंचुरकरांनीं एक रथ दिला आहे. या देवळाची व्यवस्था जोगळेकर नांवाच्या ब्राह्मण कारभारी घराण्याकडे आहे. देवाला तीन वेळां नैवेद्य होतो व दर सोमवारीं पालखी निघते. हें प्रसिद्ध ज्योतिर्लिंग आहे. कार्तिक शु॥ १५ (त्रिपुरी पौर्णिमा), माघ व॥ १४ ( महाशिवरात्रि ) व पौष व॥ ११ ( निवृत्तिनाथाची पुण्यतिथि ) या तीन प्रसंगीं येथें त्र्यंबकेश्वराच्या देवळाजवळ वार्षिक जत्रा भरतात. सिंहस्थामध्यें गोदावरीच्या उगमाजवळ मोठी जत्रा भरते.

येथील किल्ला समुद्रसपाटीपासून ४,२४८ फूट उंच असून हा अजिंक्य असल्याबद्दल १८१८ सालीं म्हटलें आहे. हा डोंगर १० मैल घेराचा असून वरच्या माथ्याचा घेर ४ मैल

त्रिवेंद्रम — देवालय व पुष्करणी (पृ. ११२३)

दार्जिलिंग — लामा घूम मठ (पृ. ११७८)

दिल्ली — हिंदुस्थान सरकारचें विधिमंडळ (पृ. ११८८)

तील नांव संज्ञा) विवस्वान् आदित्यास दिली होती. म्हणूनच यानें विवस्वानाचें शरण्यूस सहन न होणारें तेज न्यून केलें. यानेंच दधीचि ऋषीच्या अस्थींचें वज्र इंद्रास करून दिलें होतें. कांसारांतील एक वर्ग आपणांस त्वष्टाकांसार म्हणवितो; कारण त्वष्ट्यापासून हे आपली उत्पत्ति सांगतात.

**त्वारेग**—तवारेक. आफ्रिकेंतील एक जात. साहारा वाळवंटाच्या पश्चिमेकडील मध्यवर्ती प्रदेशांत राहणारे आदिवासी बर्बर ( हेमिटिक ) जातीचे हे लोक आहेत. ११ व्या शतकांत उत्तर आफ्रिका सेमिटिकवंशीय अरब लोकांनीं जिंकली व त्या प्रदेशांत वस्ती केली; त्यामुळें फिरत्या जीवनक्रमाचा अवलंब करून हे राहूं लागले. हे लोक स्वतःला इमोशाघ आणि आपल्या भाषेला तमशेक हें नांव वापरतात. ही त्यांची भाषा मूळच्या बर्बर भाषेची अगदीं शुद्ध बोलभाषा आहे. त्वारेग जमातीनें १०,००,००० चौ. मैलांहून अधिक प्रदेश व्यापला असून त्यांची लो. सं. ४,००,००० आहे.

**त्सुशिमा**—हें जपानी बेट कोरिया आणि क्युशु ( इकि ) यांच्यामध्ये कोरियाच्या किनाऱ्यापासून ५० मैल दूर आहे. इझुगाहारा हें मुख्य शहर. क्षे. फ. २६२ चौ. मैल व लो. सं. ५४,४०० आहे. रूसो-जपानी युद्धांत १९०५ सालीं टोगोच्या जपानी आरमारानें रोझडेस्ट व्हेन्स्कीच्या रशियन आरमाराचा त्सुशिमाच्या लढाईत पराभव केला.

---

## थ

**थ**—या अक्षराची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, आणि दुसरी व तिसरी अवस्था राजा यशोधर्मन् ( विष्णुवर्धन ) याच्या वेळच्या मंदसोर येथील शिलालेखांत ( स. ५३२ ) आढळते. चौथी अवस्था थोड्याशा फरकानें देवल, धार व उज्जनी येथील लेखांत आढळते. देवल येथील लेख छिंदवंशी लल्ल राजाचा ( स. ९९२ ) आहे.

**थॅकरे, विल्यम मेकपीस** ( १८११ - १८६३ )—एकोणिसाव्या शतकांतील एक नामांकित इंग्लिश कादंबरीकार. याचा जन्म कलकत्ता येथें झाला. १८१७ सालीं थॅकरेला शिक्षणासाठीं इंग्लंडला पाठविण्यांत आलें. १८२९ सालीं ट्रिनिटी कॉलेजमध्यें त्यानें प्रवेश केला. पण त्याचें कॉलेजमधील शिक्षण पुरें झालें नाहीं. मात्र त्यानें चांगला मित्रपरिवार जोडला.

कॉलेज सोडल्यावर कांहीं काळ थॅकरेनें प्रवास केला. प्रवासांतून परत आल्यावर कायद्याचा अभ्यास करण्यास सुरवात केली. पण तोहि त्यानें पुरा केला नाहीं. अशा वेळीं त्याचे सर्व पैसे आकस्मिकपणें एका धंद्यांत बुडाले, तेव्हां कायदा, कला, वगैरे विषयांस रामराम ठोकून त्यानें वाङ्मयीन यश मिळविण्याची महत्त्वाकांक्षा धरली. १८३७-३८ सालीं तो टाइम्सचा एक बातमीदार होता. हळूहळू त्यानें जॉर्ज फिट्झ बूडल, मिचेल, वगैरे नांवांखालीं व्याजोक्तिपूर्ण टीकालेख, कविता व कादंबऱ्या फ्रेझर मॅगेझिनला पाठविण्यास सुरवात केली. या लेखांमुळें थॅकरेचें नांव साहित्यक्षेत्रांत एकदम पुढें आलें. इ. स. १८४६ पर्यंत याच्या प्रसिद्ध साहित्यकृती म्हणजे 'दि ग्रेट होगार्टी डायमंड', 'बॅरी लिंडन', 'जोनाथन वाइल्ड', 'दि पॅरिस स्केच-बुक', 'दि आयरिश स्केच-बुक.' १८४७ सालीं 'व्हॅनिटी फेअर' या कादंबरीच्या प्रसिद्धीकरणानें थॅकरेच्या कीर्तीत मोठी भर पडली. ह्या कादंबरीनें त्यास डिकन्सच्या पंक्तींत नेऊन बसविलें. १८५१ सालीं अठराव्या शतकांतील विनोदी इंग्लिश लेखक या विषयावर थॅकरेनें अनेक व्याख्यानें दिलीं. तीं अत्यंत सुंदर व मार्मिक आहेत. १८५२ सालीं 'दि हिस्टरी ऑफ हेन्री. एसमंड' ही नवी कादंबरी प्रसिद्ध केली. थॅकरेची ही सर्वोत्कृष्ट कादंबरी आहे, असें अनेक विद्वानांचें मत आहे.

१८५५ ते १८५६ सालीं, युनायटेड स्टेट्समध्यें 'फोर जॉर्जेस' (चार जॉर्ज) या विषयावर त्यानें सुंदर व्याख्यानें दिलीं.

इंग्लिश कादंबरीकारांत थॅकरेचें स्थान बऱ्याच वरच्या दर्जाचें आहे. त्यानें कविता थोड्याच केल्या; पण ज्या केल्या त्या अमर झाल्या आहेत. विशिष्ट वातावरण आणण्यांत व उत्कृष्ट स्वभावदिग्दर्शन करण्यांत थॅकरेचें कमालीचें नैपुण्य दिसून येतें. त्याच्या कादंबरींतील पात्रें इतकीं उत्कृष्ट तऱ्हेनें चित्रित केलीं आहेत कीं, कादंबरी वाचल्यावरहि आपण त्यांच्याशीं गप्पाविनोद करीत आहोंत असा भास होतो. थॅकरेच्या विनोदांत चिमटे, कोपरखळ्या, जशा सांपडतात तसे व्याजोक्ति, उपहास, वगैरे प्रकारहि आढळतात. मानवी स्वभावांतील प्रमाद त्यास पुरेपूर माहीत होते; यामुळें ते यथायोग्य तऱ्हेनें दाखवून वाचकांच्या भावना आपल्याकडे ओढून घेण्याचें विलक्षण सामर्थ्य त्याच्या लेखणींत दिसून येतें. तत्कालीन समाजाचें चित्र त्यानें हुबेहुब वठविलें आहे.

**थटोन**—ब्रह्मदेशांतील तेनासरीम विभागाचा समुद्रालगत एक जिल्हा. ह्या जिल्ह्यांत साल्विन नदीच्या दोन्ही थडींवल प्रदेशाचा समावेश होतो. क्षेत्रफळ ५०७९ चौ. मै. आहे. या जिल्ह्यांत डोंगर पुष्कळ असून नौन्गिन, हेत्यावे, साल्विन आणि चिलिन या नद्या आहेत. थटोन येथें पाऊस दोनशें इंच पडतो.

ह्या जिल्ह्यांत प्राचीन तलैंग राज्याचा बराच भाग येतो. पाली वाङ्मयांत यास "रमण्णदेश ही संज्ञा होती. ब्रह्मदेशांत बौद्ध धर्मोचा प्रवेश थटोन येथें प्रथम झाला. ब्रह्मी व सयामी लोकांत जीं युद्धें झालीं त्यांत राजधानीवर बऱ्याच वेळां हल्ले चढविले गेले. हें शहर ब्रह्मी युद्धांत (१८२४) इंग्रजांनीं सहज घेतलें. पण नंतर परत केलें. दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत जनरल गॉडविनच्या सैन्यानें सन १८५२ मध्यें मार्तबान शहर घेतलें. युद्धसमाप्ती-नंतर सर्व जिल्हाच त्यांच्या ताब्यांत आला. स. १८९५ मध्यें थटोनचा एक वेगळा जिल्हा करण्यांत आला. लोकसंख्या ५३२,६२८. थटोन व किंयकतो हीं दोन मोठीं गांवें असून खेडीं ११७३ आहेत. बहुतेक लोक बौद्धधर्मी आहेत. सुमारें ⅓ लोक ब्रह्मी व करेण भाषा बोलतात. तलैंग व टौन्गथु ह्या भाषाहि कांहीं लोक बोलतात.

मुख्य उत्पन्न तांदुळाचें आहे. शानसव, तवल व परा असा तीन तऱ्हेचा तांदूळ होतो. मुख्यत्वेंकरून भात बाहेर पाठवितात. तंबाकूचेंहि पीक चांगलें होतें. थटोन गांव हें पूर्वी भरभराटीचें बंदर असून 'रमणप्रदेश' या नांवाचें स्वतंत्र राज्याच्या राजधानीचें ठिकाण होतें. लोकसंख्या १६,८५१.

**थत्ते, मल्हार नारायणशास्त्री** (१८४०–१९१५)—एक ज्योतिषी व संशोधक. यांचें वेदाध्ययन व शास्त्राध्ययन ग्वाल्हेरीस झालें. पुढें हे काशीस गेले. तेथें प्रसिद्ध बापूशास्त्री यांजपाशीं गणिताचा व थोडा इंग्रजीचा अभ्यास केला. स. १८६३ मध्यें यांनीं ग्वाल्हेरीस नोकरी धरली. हे सरदार बाबासाहेब आपटे यांच्या मदतीनें घोड्यावर बसण्यास शिकले. निशाणावर अचूक गोळी मारण्यासंबंधींचा 'गोलगतिप्रकाश' नांवाचा ग्रंथ यांनीं लिहिला. यांच्या 'करणग्रंथा'ची हस्तलिखित प्रत बापूदेवशास्त्र्यांनीं पाहिली होती. ज्ञानप्रकाश (५–८–१८६७) व इंदुप्रकाश (३०–३–१८६८) या पत्रांत यांच्या 'ग्रहप्रकाश' व 'नवीन पंचांग' या ग्रंथांवर चर्चा झाली आहे. युद्धविषयक हालचाली निशाणांनीं सूचित करण्यासंबंधींचा 'फ्लॅग सिग्नल' नांवाचा ग्रंथ यांनीं लिहिला व त्याप्रमाणें काम करणारी शिपायांची पलटण तयार केली. स. १८८० मध्यें यांची विद्वत्ता पाहून शिंदे सरकारकडून यांना सालिना ९०० रुपये उत्पन्नाची जमीन मिळाली व ५०० रु. रोख मिळाले. यांनीं आरशांतून सूर्यप्रकाशाचे कवडासे पाहून विशिष्ट संकेत व्यक्त करणारें 'हेलिओग्राफ' यंत्र तयार केलें. तसेंच दूरचे पदार्थ नक्की किती अंतरावर आहेत हें दाखविणारें यंत्र यांनीं तयार केलें. व त्यामध्यें दुरुस्त्या करून स. १९१० मध्यें शिंदे सरकारमार्फत बादशहा पंचम जॉर्ज यांस नजर केलें. स. १९१२ सालच्या ग्वाल्हेरच्या दरबारांत यांना 'विद्यासागर' ही बहुमानाची पदवी मिळाली. यांचा शेवटचा अप्रकाशित ग्रंथ 'दृगज्ञानानंद' होय. हे अत्यंत सात्त्विक, प्रेमळ व रामभक्त होते.

**थयेतम्यो**—दक्षिण ब्रह्मदेश, पेगू विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ ४,७५० चौ. मैल. ह्या जिल्ह्याचा पूर्वेतिहास फारसा उपलब्ध नाहीं. ब्रह्मदेशाच्या इतिहासांत ह्या जिल्ह्याचें नांव फार क्वचित् येतें. येथील लोक बौद्धधर्मी झाल्यानंतर ह्या जिल्ह्याच्या दक्षिण भागाचा थरेखेत्र राज्यांत समावेश होत असे व उत्तर भागाची व्यवस्था 'पगन'कडे होती. १८५२ सालीं हा जिल्हा ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आला व त्या वेळीं हा फक्त प्रोम जिल्ह्याचा एक पोटविभाग होता. थयेतम्यो गांवाच्या उत्तरेस कांहीं मैलांवर श्वेनडव देवालयें आहेत. इ. स. १०० मध्यें बांधलेलें श्वेमिमडीन देवालय आहे. हें आन्हाच्या राजानें बांधलें. लोकसंख्या २,७४,१७७. जिल्ह्यांत थयेतम्यो व अलनम्यो हीं दोन गांवें व खेडीं १,२७५ आहेत. बहुतेक लोक बौद्धधर्मी आहेत. स्त्रियांची संख्या पुरुषांहून अधिक आहे. शेंकडा ८९ लोक ब्रह्मी भाषा बोलतात. दुसरी भाषा चिन होय.

थयेतम्यो गांव व अलनम्यो अशा दोन म्युनिसिपालट्या आहेत. येथें एक जुना किल्ला आहे. शेंकडा ५० लोकांस लिहितां-वाचतां येतें. थयेतम्यो जिल्ह्याचें हें गांव मुख्य ठिकाण आहे. हें गांव इ. स. १३०६ च्या सुमारास 'पगन'च्या शेवटच्या मुलानें वसविलें. यांत बौद्ध लोकांचें एक भव्य मंदिर असून तें अशोक राजानें बांधलें आहे असें म्हणतात. या गांवांत एक लहानसा किल्ला आहे. येथील नांवाजलेला धंदा म्हटला म्हणजे चांदीचें काम हा आहे. लो. सं. ९,२७९.

**थरवड्डी**—खालच्या ब्रह्मदेशांतलि पेगू विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ २,१२,८५१ चौ. मै.. उत्तरेस प्रोम जिल्हा; पूर्वेस पेगूयोमा; दक्षिणेस इन्थवड्डी जिल्हा; व पश्चिमेस इरावती नदी. नदीकांठचा प्रदेश पाणथळ आहे. मुख्य नदी म्यिनमका हिचा उगम प्रोम जिल्ह्याच्या दक्षिणेस असलेल्या इनमा तलावापासून होतो. पुढें रंगून नदी हें नांव तीस प्राप्त होऊन शेवटीं ती समुद्रास मिळते. ह्या नदीच्या पात्रांतून इमारतीच्या लांकडाचा व्यापार चालतो.

१८ व्या शतकांत इरावती व पेगूयोमामधलि प्रदेशास थरवड्डी ही संज्ञा होती. दुसऱ्या ब्रह्मी युद्धानंतर जेव्हां पेगूचा प्रांत घेण्यांत आला तेव्हां थरवड्डी व हेन्झड ह्या दोन जिल्ह्यांचा 'थरवाव' नांवाचा एक जिल्हा बनविण्यांत आला होता. पेगूचा प्रांत ब्रिटिश राज्यास जोडण्यापूर्वी थरवड्डी हा पेगूच्या तलैंग राज्याचा एक भाग होता. १९ व्या शतकांत येथील लोकांनीं बराच त्रास दिला. त्यांचा मुख्य कोणी गांगगई म्हणून होता. पहिल्यानें ह्यानें कर देण्याचें नाकारिलें व सरकारनें नेमलेल्या

माणसास हांकून लाविलें. ह्यास ब्रह्मी सरकारची आंतून फूस होती. १८५५ सालीं त्यास ब्रह्मी राज्यांत हांकून लाविलें. सध्यांचा जिल्हा १८७८ सालीं बनविण्यांत आला. साऱ्या ब्रह्मदेशांत थरवड्डी जिल्ह्याची लोकसंख्या सर्वांत अधिक आहे. मोठीं गांवें लेटपडन, ग्योबिओगाक, थोन्झ, झिगन, व मिन्हल. पैकीं पहिल्या तीन गांवीं म्युनिसिपालिट्या आहेत. बहुतेक लोक बौद्धधर्मी आहेत.

ब्रह्मी व करेण ह्या दोन भाषा आहेत. खेडीं १,८१९ व टौनशिप ६. लोक ब्रह्मी, करेण व शान असे तीन तऱ्हेचे आहेत. लो. सं. ५,०८,३१९. ग्योबिओगाक हें मुख्य ठिकाण आहे.

येथें पाऊस नियमित व पुरेसा पडतो. म्हणून जमीन अत्यंत सुपीक आहे. येथें तांदुळाची लावणी करतात. मुख्य पिकें तांदूळ, वाटाणे, तंबाखू, ऊंस, व मका हीं आहेत.

रंगून ही मुख्य बाजारपेठ आहे. आंत येणारा माल—सर्व तऱ्हेचा परदेशी माल, कापड, सुकी मच्छी, तेल, वगैरे. दळणवळण रेल्वेनें आणि इरावती व म्यिनमका नद्यांच्या पात्रांतून चालतें. रंगून ते प्रोमला जाणारी रेल्वे ह्या जिल्ह्यांतून जाते. शिक्षणाच्या बाबतींत जिल्हा बराच पुढें सरसावत आहे. येथें रुग्णालयें व बऱ्याच शिक्षणसंस्था आहेत.

थरवड्डी हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. यांत मामुली कचेऱ्या, जंगलशाळा व इतर इमारती आहेत. येथें पाण्याचा पुरवठा चांगला असल्यामुळें हें गांव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण केलें आहे.

**थर पारकर**—पाकिस्तान, सिंध प्रांतांत पूर्वेकडील एक जिल्हा. क्षेत्रफळ १३,६४९ चौरस मैल. ह्या जिल्ह्याचे दोन भाग केले आहेत. पैकीं एकास 'पाट' म्हणतात. ह्या विभागांत नारा या पाटपोटविभागाचा समावेश होतो. दुसऱ्या भागास 'थर' म्हणतात. थर म्हणजे 'ओसाड प्रदेश'. ह्या जिल्ह्याचा पूर्वेतिहास उपलब्ध नाहीं. १२२६ सालीं उज्जनकडून ह्या भागांत परमार सोद लोक आले व येथील राजांस हांकून देऊन आपण प्रदेश बळकाविला. १६ व्या शतकारंभीं त्यांनीं सुम्राज (सुमेरा) जवळून हा प्रांत विकत घेतला असें म्हणतात. १७५० त ह्या विभाग सोदजवळून कल्होळांनीं घेतला. कल्होळांनंतर हात्तालपुरांच्या हातीं गेला. ह्यांनीं ह्या प्रदेशांत बरेच किल्ले उठविले. १८५६ सालीं हा जिल्हा सिंध प्रांतांत घेण्यांत आला.

जिल्ह्याच्या पारकर विभागांत कांहीं प्राचीन देवालयांचे अवशेष दिसतात. पैकीं वीरवाहच्या वायव्येस एक जैन देवालय आहे व जवळच्या पुरातन पारीनगरच्या अवशेपखुणा दृग्गोचर होतात. हें शहर ४५६ सालीं बालमीरच्या जेसो परमारनें बांधलें असें म्हणतात.

सुंदर नक्षीकामाची साक्ष पटविणारे येथें अजूनहि कांहीं ५-६ जुन्या जैन देवालयांचे अवशेप आहेत. क्षिप्रा शहराच्या दक्षिणेकडील दुसरें नामशेष झालेलें शहर गतकोट हें होय.

अगदीं मोडकळीस आलेलें पुरातन ब्राह्मणाबाद शहर १८ व्या शतकांत भूकंपाच्या धक्क्यामुळें नाश पावलें. त्या काळचे अजूनहि कांहीं अवशेप आहेत. लो. सं. ५,८१,००४. पंजाबांतून व राजपुतान्यांतून शेतकी करण्याच्या उद्देशानें बरेच लोक येऊन वसाहत करूं लागल्यानें लोकसंख्या वाढली. भाषा सिंधी व कच्छी; पैकीं शेंकडा ६३ लोक सिंधी बोलतात. मुसलमानांत कच्छी लोकांचाच भरणा अधिक आहे. जमीन अस्सल काळीहि नाहीं व रेताडहि नाहीं; मध्यम आहे. उमरकोट, मिथि व मिरपूरखास येथें म्युनिसिपालिट्या आहेत. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा फारच मागासलेला आहे.

**थर्मापिली**—ग्रीस, लॉक्रीस व थेसली यांच्या दरम्यान असलेली एक खिंड. स्पार्टाचा राजा लीओनिडास यानें आपल्या ३०० सैनिकांसह क्सर्क्सीझ या इराणच्या राजाच्या अवाढव्य सैन्याचा येथें पराभव केल्याबद्दल (ख्रि. पू. ४८०) या खिंडीची फार प्रसिद्धि आहे. इ. स. २७९ या वर्षी अथेन्सच्या कॅलिपसनें गॉल लोकांना या ठिकाणीं थोपवून धरलें होतें. लीओनिडासच्या वेळीं ही खिंड म्हणजे निरुंद असें सुमारें १४ यार्ड रुंदीचें स्थळ होतें. सध्यां १॥ मैलांपासून ३ मैलांपर्यंत याची रुंदी वाढलेली आहे. या घाटाला ज्या गरम पाण्याच्या झऱ्यावरून थर्मापिली हें नांव पडलें आहे तो झरा टेंकडीच्या पायथ्याच्या लगतच असून तेथील पाण्यांत स्नान केल्यानें गालगुंडें, जंघापृष्ठशूल व संधिवांत यांसारखे रोग बरे होतात असें म्हणतात.

**थर्मास बाटली**—आंतील पदार्थ उष्ण राहावा म्हणून

या बाटलीचा उपयोग करतात. थर्मासमध्यें एकावर एक

अशीं दोन आवरणें असलेलें रुपेरी कांचेचें भांडें असतें. या दोन आवरणांमधील जागा निर्वात केलेली असते. त्यामुळें बाहेरच्या हवेचा परिणाम आंतील पदार्थावर होत नाहीं. सर जेम्स डयुवारनें (१८४२-१९२३) या बाटलीची कल्पति शोधून काढली.

**थापाथली**—नेपाळ, राजधानीजवळचें एक गांव. हें वाग्मती व रुद्रमती या नद्यांच्या संगमावर वसलें आहे. या ठिकाणीं शेवटच्या बाजीराव पेशव्याची बायको सईबाई ही स्वतःचा वाडा बांधून राहत होती. तिनें येथें एक लक्ष्मी-नारायणाचें मंदिर बांधून (शके १८१४) त्याच्या पूजअर्चेची नरतूद करून ठेवली आहे. सईबाई इ. स. १८९६ त येथेंच वारली. येथें कांहीं दाक्षिणी लोक आहेत.

**थॉमस अक्वायनस, सेंट** (मृ. १२७१)—हा एक साधु, तत्त्वज्ञ व ईश्वरशास्त्रज्ञ होता. याचा जन्म एका थोर घराण्यांत इटलीमध्यें मौंट कॅशिनोजवळ सन १२१६ मध्यें झाला. यानें डॉमिनिकन साधु होण्याच्या उद्देशानें ऐहिक जगाचा त्याग केला व तत्कालीन श्रेष्ठ सृष्टिशास्त्रज्ञ व तत्त्वज्ञानी सेंट आल्बर्टस मॅग्नस याजवळ विद्याभ्यास केला.

हा एक कॅथॉलिक मंडळींतील तेजस्वी पुढारी होता. यानें कॅथॉलिक मतांचें दिग्दर्शन करण्याकरितां आरिस्टॉटलच्या तत्त्व-ज्ञानपरिभाषेचा व पद्धतीचा उपयोग केला. आणि कॅथॉलिक प्रगटीकरणांतील सत्याचें स्पष्टीकरण व ग्रथन केलें. आजहि कॅथॉलिक मंडळीचीं श्रद्धास्थानें व शिकवण यांचें संपूर्ण ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें असेल, त्यांतील तत्त्वांची घडण कशी बनली आहे हें पाहावयाचें असेल तर सेंट थॉमस याच्याच ग्रंथांचा विशेषतः त्याच्या थिऑलॉजिकल सुम्म यांचा अभ्यास करावा लागतो.

**थॉमसन, जेम्स** (१८२२-१८९२)— या ब्रिटिश शास्त्रज्ञाचा जन्म बेलफास्ट येथें झाला. याने विश्वविद्यालयाची पदवी मिळविल्यानंतर एंजिनिअरिंगचा अभ्यासक्रम घेण्याकरितां कित्येक कारखान्यांत काम केलें. पण प्रकृति अशक्त असल्या-मुळें हा नाद त्यानें सोडला व सिद्धान्तविषयक आणि यांत्रिक शोध लावण्याचें काम हातीं घेतलें. त्यानें गत्युष्णतेसंबंधाने शोध करून व कार्नोच्या तत्त्वाचा उपयोग करून एक महत्त्वाचा सिद्धांत मांडला. थिजत असतांना जर एखाद्या द्रव्याचें आकार-मान वाढत असलें तर त्या द्रव्यावर दाब आणला असतां त्याचा थिजण्याचा बिंदु खालीं उतरतो; व जर तें द्रव्य थिजतांना कमी आकाराचें होत असेल तर दाबानें त्यांचा थिजण्याचा बिंदु वर चढतो; व किती दाबाच्या योगानें थिंजण्याचा बिंदु किती खालीं किंवा वर होतो याची त्यानें गणना केली. पाणचक्की-संबंधानें प्रयोग करून त्यानें नवीन पाणचक्की बनविली व तिचें पेटन्ट मिळविलें. १८५७ सालीं बेलफास्ट येथील क्वीन्स कॉलेजांत त्याला सिव्हिल एंजिनिअरिंगचा प्रोफेसर करण्यांत आलें. १८८९ सालीं त्याची दृष्टि जाऊन तो अंध झाला व त्यामुळें त्याला अध्यापकाचें काम सोडावें लागलें. तो ग्लासगो येथें मृत्यु पावला. भूस्तरशास्त्रांतहि यानें बरीच भर घातली आहे.

**थॉमसन, जेम्स** (१७००-१७४८)—एक स्कॉटिश कवि. एडनॅम पॅरीशच्या उपाध्यायाचा मुलगा. त्याचें शिक्षण एडिं-बर्ग युनिव्हर्सिटींत झालें. तेथें त्याची 'विंटर' (हिंवाळा) ही ऋतुवर्णनपर पहिली कविता १८२६ मध्यें प्रसिद्ध झाली. नंतर त्याच्या कविता प्रसिद्ध झाल्या त्या—'समर' (उन्हाळा) (१७२७); 'पोएम टु दि मेमरी ऑफ सर आयझॅक न्यूटन' (न्यूटनच्या स्मरणार्थ कविता), 'स्प्रिंग' (वसंत, १७२८); आणि 'ऑटम' (पावसाळा १७३०). १७४६ सालीं त्यानें आपली 'कॅसल ऑफ इंडोलन्स' ही कविता प्रसिद्ध केली. पण थॉमसनची कीर्ति त्याच्या 'सीझन्स' (ऋतू) या कवितांमुळें झालेली आहे. कारण त्या कवितांत सृष्टिवर्णनपर सौंदर्यस्थळें विपुल आहेत. थॉमसननें जीं दुःखान्त नाटकें लिहिलीं तीं:— 'सोफोनिजवा', 'आगॅमेमनॉन', 'एडवर्ड ॲन्ड एलिनोरा', आणि 'टॅनक्रेड ॲन्ड सिगिस्मंडा'. पण हीं नाटकें लोक बहुधा विसरले आहेत.

**थॉमसन, जोसेफ** (१८५८-१८९५)—आफ्रिकेंतील एक स्कॉटिश भूसंशोधक. हा पेनपॉट येथें जन्मला. एडिंबर्ग युनिव्ह-र्सिटींतून तो १८७८ सालीं पदवीधर झाला. भूगर्भशास्त्रज्ञ म्हणून त्यास रॉयल जिऑग्रफिकल सोसायटीमार्फत पूर्व आफ्रिकेंत जाण्याची संधि मिळाली. कीथ जॉन्स्टनच्या मृत्यूनंतर न्यासा, टॉगानिका, वगैरे ठिकाणीं झालेल्या सफरींचें नेतृत्व थॉमसन-कडेच होतें. अनेक सफरी करून तो १८८० सालीं इंग्लंडास गेला. व त्यानें 'टु दि सेंट्रल आफ्रिकन लेक्स अँड् बॅक' (मध्य आफ्रिकेंतील सरोवरांकडे व परत) नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. यानंतर त्याने मसाइलंड येथें सफर केली. या धाडसी प्रवासाचें वृत्त स. १८८४ मध्यें त्यानें 'थ्रू मसाइलंड' या पुस्तकांत प्रसिद्ध केलें आहे. नॅशनल आफ्रिकन कंपनीतर्फे त्यानें १८८५ मध्यें सोकोटोकडे सफर काढली; व सोकोटो व ग्यानडो येथील सुलतानांकडून तहाबद्दल मान्यता मिळविली. नायगेरिया येथें ब्रिटिशांचें हित साधण्यास या तहामुळें फार मदत झाली. सन १८८८ मध्यें दक्षिण मोरोक्कोत प्रवास करून त्यानें 'ट्रॅव्हल्स इन् दि ॲटलास अँड सदर्न मोरोक्को' (ॲटलास आणि दक्षिण मोरोक्को येथें प्रवास) नांवाचें पुस्तक लिहिलें. हा शोधक लंडन् येथें मरण पावला. थॉमसन हा मोठा धाडसी, निश्चयी व दम-

दार असा होता. पुढारी होण्याचे गुण त्याच्या अंगांत होते, त्यामुळें पहिल्या प्रतीच्या संशोधकांत थॉमसनची गणना करण्यांत आली आहे.

**थॉमसन, सर चार्लेस** (१८३०–१८८२)—एक ब्रिटिश सृष्टिशास्त्रज्ञ. त्यानें १८६८–६९ सालांतील संशोधनार्थ गेलेल्या सफरींत भाग घेतला, आणि १८६९ मध्यें 'दि डेप्थ्स ऑफ दि सी' (समुद्राच्या खोली) हें पुस्तक प्रसिद्ध केलें; त्यांत अटलांटिक महासागरांतील प्राण्यांसंबंधीं त्यानें केलेल्या संशोधनाची थोडक्यांत माहिती दिली होती. १८७५ मध्यें 'चॅलेंजर' या जहाजांतून जी संशोधनविषयक सफर काढण्यांत आली, त्या सफरीचा त्याला शास्त्रीय प्रमुख नेमण्यांत आलें; त्या कार्यासंबंधीं 'दि व्हॉएज ऑफ दि चॅलेंजर' (चॅलेंजरचा प्रवास) व 'दि अॅटलांटिक्' (१८७६–१८७८) हीं पुस्तकें त्यानें प्रसिद्ध केलीं.

**थॉमसन, सर जोसेफ जॉन** (१८५६–१९४०)—एक ब्रिटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. त्यानें १८८० मध्यें 'सेकंड रँगलर' ही उच्च पदवी मिळविली. तो १८८४ पासून १९१८ पर्यंत केंब्रिज येथील ट्रिनिटी कॉलेजांत पदार्थविज्ञान विषयाचा प्रोफेसर होता. आणि १९१८ सालीं त्या कॉलेजचा मास्टर झाला तो शेवटपर्यंत होता. त्यानें रॉयल मेडल व ह्यूजेस मेडल आणि १९०६ मध्यें नोबेल प्राइझ मिळविलें. १९०८ मध्यें त्याला 'नाइट' आणि १९१२ मध्यें ओ. एम्. ही पदवी मिळाली. १९१५ मध्यें तो रॉयल सोसायटीचा अध्यक्ष झाला. त्यानें पदार्थविज्ञान विषयाचीं पाठ्य पुस्तकें लिहिलीं आहेत. शिवाय ग्रंथ लिहिले आहेत ते— 'रीसेंट रिसर्चेस इन् इलेक्ट्रिसिटी अॅन्ड मॅग्नेटिझम्' (विद्युत् आणि चुंबकशास्त्र यांमधील अलीकडील शोध) आणि 'कन्डक्शन् ऑफ इलेक्ट्रिसिटी थ्रू गॅसेस' (वायुमधून विद्युद्वहन).

**थॉम्पसन, फ्रॅन्सिस** (१८५९–१९०७)— एक इंग्रज कवि. त्याचा पहिला कवितासंग्रह 'पोएम्स्' १८९३ सालीं प्रसिद्ध झाला. त्या कवितांपैकीं अतिशय उज्ज्वल कविता 'दि हाउंड ऑफ हेवन्' (स्वर्गीय श्वान) ही होय. १८९५ सालीं त्याचा 'सिस्टर सॉंग्ज' (भगिनीगीतें) आणि १८९७ सालीं 'न्यू पोएम्स्' (नवीन कविता) हे कवितासंग्रह प्रसिद्ध झाले. थॉम्पसननें गद्यलिखाणहि बरेंच लिहिलें, त्यांपैकीं 'हेल्थ अँड होलीनेस' (आरोग्य आणि पावित्र्य) हें १९०५ सालीं, आणि 'एसे ऑन शेले' (शेलेवर निबंध) हें थॉम्पसनच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालें.

**थॉर्नडाइक, एडवर्थ ली** (१८७४–      )—एक अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञ आणि मानसशास्त्रज्ञ. यानें कोलंबिया विद्यापीठांत १९०६ ते १९२३ या कालांत शैक्षणिक मानसशास्त्र या विषयाचें व १९२३ सालीं शिक्षणविषयाचें प्राध्यापकाचें काम केलें. १९२१ सालीं यास शैक्षणिक संशोधन संस्थेच्या मानसविज्ञानशाखेचे प्रमुख नेमण्यांत आलें. यानें 'शैक्षणिक मानसशास्त्र', 'मनुष्याचा मूळ स्वभाव', 'बुद्धिमापन' आणि प्रौढ शिक्षण' हे ग्रंथ लिहिले आहेत.

**थॉर्नहिल, सर जेम्स** (१६७६–१७३४)—एक नामांकित इंग्लिश चित्रकार. यानें तत्कालीन राजवाडे व सार्वजनिक इमारती यांत कलाकुसरीचीं अनेक कामें केलीं आहेत. त्यांपैकीं कित्येक आजहि पाहावयास मिळतात. तीं सर्व प्रेक्षणीय आहेत. सेंट पॉलचा घुमट, ग्रीनविच हॉस्पिटलमधील एक भव्य हॉल व उपाहारगृहे, तसेंच हॅम्प्टन कोर्टांतील कांहीं खोल्या यांतील चित्रकाम उत्कृष्ट प्रकारचें झालें आहे. दृष्टान्तात्मक चित्रें काढण्यांत त्याचा हातखंडा होता.

**थॉर्नीक्रॉफ्ट, सर विल्यम हॅमो** (१८५०–१९२५)—एक ब्रिटिश शिल्पकार. जनरल गॉर्डनचा पुतळा राष्ट्रीय स्मारक म्हणून ट्राफल्गार स्क्वेअरमध्यें (लंडन) जो ठेवलेला आहे, तो यानेंच केला. याशिवाय 'लोटची बायको' आणि 'चुंबन' हे त्यानें केलेले प्रमुख पुतळे आहेत.

**थॉर्वाल्डसेन, आल्बर्ट बार्थोलोम्यु** (१७७०–१८४४)—एक डॅनिश शिल्पकार. त्यानें धार्मिक पुतळे केले ते—ख्रिस्त आणि चार प्रवक्ते, अरण्यांत उपदेश करीत असलेला सेंट जॉन व चार थोर पैगंबर, यांचे होत. या मूर्तींत भव्यपणा हा गुण चांगला प्रत्ययास येतो. त्यानें केलेले इतर पुतळे आहेत, त्यांत गॅलिली व कोपर्निकस, आणि ल्यूसर्ननजीक मोठ्या आकाराचा सिंह (ट्यूलियर्स वेढ्यांत पतन पावलेल्या स्विस गार्डसचें स्मारक), हे पुतळे प्रसिद्ध आहेत.

**थाल्ल**—(थॅलिअम्). एक धातु द्रव्य. परमाणुभारांक २०४. ३०१° श. ला हा धातु वितळतो. रुप्यासारखा हा पांढऱ्या रंगाचा असून चकाकी मात्र त्यापेक्षां कमी असते. ह्याचे कांहीं गुणधर्म शिशासारखे आहेत. हा धातवीय अम्लामध्यें विरघळतो व ह्याचीं लवणें अत्यंत विषारी आहेत.

**थाळनेर**—मुंबई, जिल्हा पश्चिम खानदेश. शिरपूर तालुक्यांतील तापी नदीवर वसलेलें हे एक खेडें आहे. ११२८ सालांत हे खेडे गौळी किंवा अहीर लोकांच्या ताब्यांत होतें. १४ व्या शतकांत फरुकी राजानें हें आपलें मुख्य ठिकाण केलें. पुढें १६ व्या शतकांत तें मोंगलांच्या ताब्यांत जाऊन १७७० सालीं हें गांव पेशव्यांना मिळालें. पुढें कांहीं दिवस होळकरांकडे राहून हें १८१८ मध्यें इंग्लिशांकडे गेलें. येथें एक मजबूत किल्ला आहे.

**थिऑसफी**— एक अर्वाचीन धर्मपंथ. थिऑसफी हा प्राचीन ग्रीक शब्द असून त्याचा अर्थ स्थूलमानानें आत्मज्ञान असा आहे. थिऑसफी हा स्वतंत्र विषय नाहीं, तर सर्व क्षेत्रांकडे पाहण्याची ती एक विशेष प्रकारची दृष्टि आहे. मनोऱ्यावरून जसें सभोंवारच्या सर्व क्षेत्रांकडे पाहतां येतें, तद्वत् सर्व विषयांकडे पाहण्याची ही एक दृष्टि असल्यामुळें ते सारे विषय थिऑसफीच्या कक्षेंत येत असतात. ही दृष्टि आजच्या बदललेल्या काळास अनुरूप अशी आहे. जगांतील नाना प्रकारचे विषय थिऑसफी नामक नवीन दृष्टीनें जगासमोर नवीन रीतीनें मांडलेले आहेत. सायन्स जसें दृश्य सृष्टीच्या अवलोकन–निरीक्षणाच्या आधारावर उभारलेलें असतें तद्वत् अदृश्य सृष्टीचें अवलोकन–निरीक्षण करून जें अदृश्य सृष्टीचें शास्त्र निर्माण होतें त्याला खरोखरी धर्म म्हणतात, असें थिऑसफीचें सांगणें आहे. माणसाच्या इंद्रियशक्ती अधिक कुशाग्र करतां येतात; त्या इंद्रियांना सभोंवतालची अदृश्य सृष्टि प्रत्यक्ष तपासून पाहतां येते; जगांतील सर्व धर्म मुळांत असत्य प्रयोगांवर आधारलेले आहेत आणि म्हणूनच चालीरीती व भोळसट गोष्टी सोडून मूलभूत गोष्टींचा विचार केला तर त्या सर्व धर्मांत एकच आहेत; अशी थिऑसफीची शिकवण आहे. थिऑसफीच्या कित्येक पुढाऱ्यांनीं राजयोगाचा अभ्यास करून व स्वतःचीं इंद्रियें कुशाग्र करून त्यांच्या साहाय्यानें सभोंवतालच्या अदृश्य सृष्टीचें पद्धतशीर निरीक्षण केलें आहे; जगांतील सर्व धर्मांची नवीन मांडणी जनतेसमोर ठेविली आहे; व मरणोत्तर स्थिति, पुनर्जन्म, माणसाचे सूक्ष्मदेह, कर्मविपाक, सप्तलोक, देवदेवता, वगैरे अनेक विषयांवर या संशोधनाचा नवा प्रकाश पाडला आहे. सर्वच धर्म मुळांत खरे आहेत, असें थिऑसफीचें म्हणणें आहे. आणि त्यामुळें जगांतील धार्मिक वैमनस्यें मोडण्याबाबत जगाला थिऑसफीचा पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. थिऑसफीला एक विशिष्ट दृष्टिकोण असल्यामुळें शिक्षणशास्त्र, अर्थशास्त्र, राजकारण, कला, तत्त्वविचार, वगैरे सर्व क्षेत्रें त्या दृष्टीच्या टप्प्यांत थिऑसफीनें आणून त्यांची एक अभिनव मांडणी जगासमोर ठेविली आहे. या मांडणींत दोन मुद्दे मूलभूत व अत्यंत महत्त्वाचे आहेत. सृष्टींतील सर्व व्यापारांच्या व घडामोडींच्या पाठीशीं एक सुबुद्ध व प्रभावी अशी योजना असून सर्व सृष्टि त्या योजनेनुसार विकासमार्गानें पुढें जात आहे, हा पहिला मुद्दा होय. आजहि पृथ्वीवर मानव्याच्या पराकोटीस गेलेले श्रीकृष्ण–बुद्धादि जीवन्मुक्त पुरुष वास्तव्य करून आहेत व जरुर ती योग्यता अंगीं असलेल्या माणसाला आजहि त्यांच्याशीं शिष्य म्हणून ऋणानुबंध जोडतां येतो, हा दुसरा मुद्दा होय.

**थिऑसफिकल सोसायटी**—ही थिऑसफीच्या प्रसारार्थ स्थापलेली संस्था आहे. ती १८७५ सालीं मॅडम एच्. पी. ब्लॅव्हॅट्स्की व कर्नल एच्. एस्. ऑलकॉट या दोघांनीं स्थापिली. जगांतील सर्व सुधारलेल्या देशांत तिच्या शाखा सध्यां पसरलेल्या आहेत व सभासदांची संख्या सुमारें पस्तीस हजार आहे. (१) एक केंद्र बनवून जगांत विश्वबंधुत्वाची सुरुवात करणें, (२) धर्म, तत्त्वविचार व शास्त्र यांचा तुलनात्मक अभ्यास करणें, व (३) सृष्टींतील व मनुष्याच्या अंतर्यामांतील गूढ गोष्टींचें संशोधन करणें, असे या सोसायटीचे तीन उद्देश आहेत. सोसायटीचें आंतरराष्ट्रीय मुख्य पीठ मद्रासजवळ अड्यार (पाहा) येथें आहे. हिंदी विभागाचें मुख्य पीठ श्रीक्षेत्र काशी येथें आहे. सोसायटीच्या सर्व सभासदांस पूर्ण मतस्वातंत्र्य असतें. कर्नल ऑलकॉट हे सोसायटीचे पहिले अध्यक्ष होते. त्यांच्यामागें डॉ. ॲनी बेझंट व डॉ. अरुंडेल हें क्रमानें अध्यक्षपदावर निवडण्यांत आले. सध्यांचे अध्यक्ष सी. जिनराजदास हे आहेत. ह्या सोसायटीनें उत्कृष्ट प्रकारचें वाङ्मय प्रसिद्ध केलें आहे.

**थिएर्स, लुई अडोल्फ** (१७९७–१८७७)—एक फ्रेंच मुत्सद्दी आणि इतिहासकार. यानें प्रथम राजकारणी वृत्तपत्रांत लेखन केलें. नंतर लुई फिलिपच्या कारकीर्दींत अनेक सरकारी हुद्यांच्या जागांवर काम केलें. आणि अखेर १८४० मध्यें प्रधानमंडळांत तो मुख्य प्रधान झाला. परंतु थोड्याच महिन्यांनीं हें काम सोडून तो सेवानिवृत्त झाला. १८४८ च्या राज्यक्रान्तीनंतर लुई नेपोलियनला फ्रान्सचा अध्यक्ष नेमावें म्हणून त्यानें अनुकूल मत दिलें. पण नंतर मात्र नेपोलियनला त्यानें सतत तीव्र विरोध केला; आणि त्यामुळें १८५१ डिसेंबर ता. २ रोजीं त्याला कैद करून हद्दपार करण्यांत आलें. पुढें १८७०–७१ सालीं फ्रान्समधील अत्यंत भयंकर आणीबाणीच्या काळांत थिएर्स फ्रान्सच्या सर्व पुढाऱ्यांत पुन्हां अग्रभागीं चमकूं लागला, त्यानें शांततेचा तहनामा तयार केला; कम्युनिस्ट लोकांचें बंड मोडून टाकलें, आणि जर्मनीला द्यावयाची युद्धखंडणी अगदीं कल्पनातीत इतक्या अल्प अवधींत देऊन टाकली; त्यामुळें फ्रेंच असेंब्लीनें त्याच्या अधिकाराची मुदत आणखी वाढविली. आणि त्याला फ्रान्सचा अध्यक्ष केलें. १८७३ च्या मे महिन्यांत त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. त्यानें फ्रेंच क्रांतीच्या इतिहासाचें सहा भाग लिहिले असून कॉन्सुलेट आणि साम्राज्य यांच्या इतिहासाचे वीस भाग लिहिले.

**थिओक्रीटस**—एक ग्रीक गोपगीतकार. हा ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत झाला; याच्याबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाहीं. यानें 'आयडील्स' नामक लहान कवितासंग्रह लिहिला आहे; त्यावरून तो सिरॅक्यूझन असावा असें दिसतें. डोरिअन भाषेंत त्यानें ब्यूकॉलिक कविता लिहिल्या. 'स्टोरी ऑफ हेलाज

अँड दि निंफस' हें त्याचें वीररसप्रधान काव्य प्रसिद्ध आहे. ब्यूकॉलिक व माइम्स असे त्याच्या काव्याचे दोन विभाग पडतात. पहिल्यांत खेडेगांवांतील देखाव्यांचीं वर्णनें असून दुसऱ्यांत शहारांसंबंधीं माहिती दिली आहे. त्यानें एक महाकाव्य लिहिलें आहे. 'हिरॅक्लीज दि लायन स्लेयर' नांवाचें त्याचें काव्य मोठें मनोरंजक आहे. हा कवि स्वतंत्र बुद्धीचा असून ब्यूकॉलिक काव्याचा आद्यजनक होय. व्हर्जिल, स्पेन्सर, गे, इ. त्याचे अनुकरण करणारे बरेच कवी आहेत, पण गाण्यांतलि माधुरी, सृष्टीचें यथार्थदर्शन, व मोहक भाषा या बाबतींत कोणीहि त्याच्या तोडीचा झाला नाहीं.

**थिओग्निस** (मेगाराचा) (ख्रि. पू. ६ वें शतक)—शोकगीतें लिहिणारा एक ग्रीक कवि. त्याच्या चरित्राबद्दल खरी माहिती फारच थोडी मिळते, तथापि त्याचीं अनेक काल्पनिक चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत. त्याच्याविषयीं निश्चित माहिती त्याच्याच कवितांत मिळते व त्याच्या कविता सुमारें १,४०० ओळी फक्त आज उपलब्ध आहेत. पण त्याहि सर्व त्याच्याच आहेत किंवा नाहींत याच्याबद्दल मतभेद आहे. त्याच्या बहुतेक कविता ईश्वरी आज्ञा व नीतिनियम अशा स्वरूपाच्या आहेत. वास्तविक त्यांना ख्रि. पू. ६ व्या शतकांतील आभाणकी तत्त्वज्ञान (प्रॉव्हर्बियल फिलॉसफी) असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण त्याच्या काव्यांत उच्च काव्यगुण मुळींच नाहीं.

**थिओडोरा** (मृ. ५४७)—रोमन सम्राट् जस्टिनिअनची पत्नी. सहाव्या शतकारंभीं कॉन्स्टॅन्टिनोपल किंवा सायप्रस येथें ही जन्मास आली. प्रोकॉपिअसच्या मतें लहानपणींच ती नाटकांत गेली होती. नृत्यगायन तिला मुळींच येत नव्हतें; पण छचोरपणा व विनयशून्यता यांच्या जोरावर ती प्रसिद्धीस आली. पुढें हेसेबोलस नांवाच्या एका अधिकाऱ्याबरोबर ती आफ्रिकेंत गेली व तेथें भांडण करून परत कॉन्स्टॅन्टिनोपल शहरीं परत आली. तेथें जस्टिन बादशहाचा पुतण्या जस्टिनिअन याचें मन तिच्यावर गेलें. जस्टिनच्या संमतीनें त्यांचें लग्न झालें व बादशहाच्या पश्चात् थिओडोरा रोमन सम्राज्ञी बनली. जस्टिनिअन यास तिनें आपल्या मुठींत ठेविलें होतें व ती राज्यकारभारांत मुखत्यारीनें ढवळाढवळ करीत असे. थिओडोरा फार नाजूक प्रकृतीची असून मोठी रूपवती होती. जस्टिनिअनपासून तिला एक मुलगी झाली होती.

**थिओफिलस मार**—हा जाकोबाइट पॅट्रिआर्कची सत्ता अमान्य करणाऱ्या मलबारमधील जाकोबाइट लोकांचा तिरुवल्ल येथील बिशप होता व तो बल्लारी येथील आर्चबिशप इव्हॅनिअस मार याचा दुय्यम होता. हा मार इव्हॅनिअसबरोबरच १९३० मध्यें कॅथॉलिक झाला. याला प्रथम आराद येथील बिशपच्या पदावर स्थापन केलें व नंतर तिरुवल्ल येथील स्थायिक बिशप म्हणून याची नेमणूक करण्यांत आली. त्या ठिकाणीं तो त्रिवेंद्रम् येथील आर्चबिशप मेट्रोपॉलिटन मार इव्हानिअस याचा दुय्यम म्हणून होता. हे पश्चिम सीरिअन ॲंटिओकन अथवा मलचारमधील मलनकराइस पंथाचे संस्कार करतात.

**थिओफ्रेस्टस** (ख्रि. पू. ३७२–२८७)—एक ग्रीक तत्त्ववेत्ता. आरिस्टॉटल हा प्रसिद्ध तत्त्ववेत्ता अथेन्स शहर सोडून चेल्सिस येथें गेला (ख्रि. पू. ३२२), त्यानंतर थिओफ्रेस्टस हा पेरीपॅटिक स्कूलचा प्रमुख झाला आणि मरेपर्यंत तो त्याच जागेवर होता. शास्त्रामध्यें नवीन शोधांची भर त्यानें घातलेली नसून फक्त शास्त्राध्ययनाची आवड लोकांमध्यें उत्पन्न करण्याचें काम त्यानें केलें. त्याचे ग्रंथ वनस्पतिशास्त्र व अध्यात्मविद्या यांवरचे आज उपलब्ध आहेत. तथापि थिओफ्रेस्टसचे वनस्पतिशास्त्रविषयक ग्रंथ हल्लीं क्वचितच वाचले जातात. त्याची मुख्य कीर्ति त्याच्या 'कॅरॅक्टर्स' या ग्रंथामुळें बहुतांशीं झालेली आहे. या ग्रंथांत त्यानें निरनिराळ्या स्वभावांच्या मनुष्यांचे ३० प्रातिनिधिक नमुने थोडक्यांत आणि सूत्रमय वाक्यांत वर्णिले आहेत. या पुस्तकाचें अनुकरण अलीकडील ग्रंथकार हॉल (१६०८), सर थॉमस ओव्हरबेरी (१६१४), बिशप अर्ल (१६२८) आणि ला ब्रूये (१६८८) यांनीं केलें आहे.

**थिबा**—१. ब्रह्मदेशांतील उत्तर शान संस्थानांपैकीं एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ४,५२४ चौ. मैल आहे. याच्या उत्तरेस मॉंगामिट व ट्वांगपेंग हीं संस्थानें आहेत. पूर्वेस सेनवी हें ठिकाण आहे. दक्षिणेस शान संस्थानें असून पश्चिमेस मंडाले जिल्हा आहे. थिबाचीं चार पोट–संस्थानें आहेत. १८८६ मध्यें हें संस्थान ब्रिटिशांच्या स्वाधीन झालें. स. १८९३ मध्यें येथील माजी संस्थानिक इंग्लंडला गेला होता. स. १९०२ मध्यें त्याचा मुलगा गादीवर बसला. या राजाचें शिक्षण इंग्लंडांत झालें. थिबा संस्थान मंडालेपासून १३४ मैलांवर आहे. तीळ, तांदूळ, कापूस, चहा, वगैरे पदार्थ तेथें होतात.

२. ब्रह्मदेशाचा शेवटचा राजा. हा १८५८ त गादीवर आला. राजानें ८ राण्या व सरदार नजर करतील तितक्या रखेल्या बाळगावयाच्या, ही पूर्वापारची चाल या थिबा राजानें मोडल्यावरून त्याच्या सनातनी प्रजेला फार वाईट वाटलें. मुंबई व ब्रह्मदेश येथील इंग्रज कंपन्यांवर २३ लाखांचा कर बसवून व कंपनींतील लोकांना कैद करण्याचा हुकूम करून, थिबानें आपला इंग्रजांविषयींचा तिरस्कार व्यक्त केला. फ्रेंचांच्या चिथावणीमुळें अफगाणिस्तान व दक्षिण आफ्रिका या ठिकाणीं १८७९ त व १८८० सालीं इंग्रजांना पेच पडला आहे हें समजल्यामुळें थिबा चढून गेला. व १८८५ सालीं त्यानें फ्रेंच सरकारशीं तह केला

लॉर्ड डफरीन यानें थिबावर सैन्य पाठवलें व शेवटीं इंग्रजांनीं मंडाले शहर हस्तगत केलें. थिबा व त्याची राणी यांना पदच्युत करून रत्नागिरीस ठेवण्यांत आलें व १८८६ सालीं इंग्रजांनीं ब्रह्मदेश खालसा केला. हा दुर्दैवी राजा रत्नागिरीस मरण पावल्यावर त्याच्या कुटुंबाची व अनुयायांची फार वाताहात झाली. थिबाचें तक्त इंग्रजांनीं कलकत्त्याला आणलें होतें. तें १९४८ सालीं ब्रह्मदेशाला स्वातंत्र्य मिळाल्यावर स्वतंत्र हिंदुस्थान सरकारनें परत केलें.

**थिबिस**—ग्रीस, बिओशिया प्रांतांतील एक प्राचीन ग्रीक शहर. हें सीथेरॉन पर्वताच्या उत्तरेस असून अथेन्सपासून ४४ मैलांवर आहे. अथेन्सपासून थिबिसपर्यंत दोन गाडी रस्ते व व एक लोहमार्ग (रेलवे) १९०४ सालीं करण्यांत आले. येथें सुमारें ४,८०० लोकवस्ती असून बिशप येथेंच राहत असतो. प्राचीन बालेकिल्ला क्याडमिआ या ठिकाणीं हें शहर वसविलें असून प्राचीन भिंतींचे दोन अवशेष अजून दृष्टीस पडतात. थिबिस हा जवळजवळ निर्झरमय प्रदेश आहे. आणि प्राचीन वाङ्मयांत त्याचें असेंच वर्णन आलेलें आहे. क्याडमिआ दुर्गाच्या आग्नेय दिशेला सेंटल्यूकचें प्रार्थनामंदिर आहे. या प्रदेशांत पाणी मुबलक असल्यामुळें हा फार सुपीक असून बागबगीचे करण्याकरितां सोईस्कर आहे. तथापि लोकसंख्या फार नसून सध्यां या शहराला कांहीं फारसें महत्त्व नाहीं.

निरनिराळ्या दंतकथांच्या जाळ्यांतून थिबिसचा प्राचीन इतिहास हुडकून काढणें हें फार कठिण काम आहे. होमरनें या शहराचा उल्लेख न केल्यामुळें तर हें काम अधिकच कठिण झालें आहे. तथापि इतकें म्हणावयास हरकत नाहीं कीं, ग्रीसच्या अनेक प्राचीन जातींपैकीं ज्या कित्येक तटबंदीच्या शहरांत येऊन वस्ती करून राहिल्या त्यांमध्यें थिबिस येथील लोकांना अग्रेसरत्व देतां येईल.

**थुर**—(थोरिअम्). एक क्षकिरणविसर्जक धातु. परमाणुभारांक २३२·१५. मोनाझाइट वाळूंत किंवा थोराइट खनिजांत हा सांपडतो. गॅसच्या दिव्याच्या मॅटल्समध्यें थुरप्राणिद (थोरियम ऑक्साइड) किंवा थोरिया आणि श्रीकप्राणिद (सीरियम ऑक्साइड) किंवा सीरिया असतात.

**थुरिंजिआ**—हें जर्मनींत जर्मन रीशच्या अमलाखालील एक संस्थान आहे. याचें क्षे. फ. ४,५४२ चौ. मै. आणि लो. सं. १७,६०,५९५ आहे. या संस्थानांत मुख्य शहरें गेरा, जेना, गोथा, वीमर राजधानी, एसनॅक आणि आल्टेनबर्ग हीं आहेत. जेना येथें विद्यापीठ आहे. येथील प्रदेशांपैकीं ४४ टक्के सुपीक जमीन, ३३ टक्के अरण्यमय प्रदेश आणि १० टक्के कुरणांचा प्रदेश आहे. येथें गहूं, राय, ओट व बटाटे हीं मुख्य पिकें होतात. येथें मिठाच्या खाणी आहेत. आणि जवखारा (पोटॅश)चे मोठाले कारखाने आहेत. १९१८ च्या राज्यक्रांतीनंतर जर्मन राजघराणें नष्ट झाल्यामुळें थुरिंजिआ हें स्वतंत्र संस्थान बनलें आणि १९२१ मध्यें या संस्थानची स्वतंत्र राज्यघटना तयार होऊन अमलांत आली. या संस्थानच्या कायदेमंडळाला 'डायेट' हें नांव आहे. दुसऱ्या महायुद्धांत ता. ५ जून १९४५ रोजीं जर्मनी शरण आला, आणि सर्व जर्मन प्रदेशावर युनायटेड स्टेट्स, युनायटेड किंगडम, सोव्हियट युनियन व फ्रान्स यांची संयुक्त सत्ता सुरू झाली. आणि पॉट्सडॅम परिषदेंतील दोस्त राष्ट्रांच्या निर्णयामुळें (१७ जुलै १९४५) थुरिंजिआ हा प्रदेश रशियन अमलाखालीं गेला आहे.

**थुसिडाइडीझ** (खि. पू. ४७१–३९९)— जगांतील एक विख्यात ग्रीक इतिहासकार. यास इतिहासाचा जनक म्हणून समजण्यांत येतें. याचा जन्म एका उच्च अथेनियन कुलामध्यें झाला. त्याच्या बालपणासंबंधीं फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. अशी एक दंतकथा आहे कीं, इतिहासकार हिरोडोटस हा एकदां आपण लिहिलेल्या इतिहासांतील एक भाग चार–चौघांत वाचीत असतां श्रोतृवर्गांत एका कोपऱ्यांत बसलेल्या एका मुलाच्या डोळ्यांत अश्रू चमकले व 'मी इतिहासाचा अभ्यास करणार' अशी भीष्मप्रतिज्ञा त्यानें केली. हा मुलगा म्हणजे थुसिडाइडीझ हा होय. खि. पू. ४३१ तें ४०४ पर्यंत पेलोपोनियन युद्धासंबंधीं त्यानें जो इतिहास लिहिला आहे त्यावरून त्याचें नांव अजरामर झालें आहे. कोणताहि एक पक्ष न घेतां पुरावा शास्त्रीय पद्धतीनें तावून-सुलाखून घेऊन अत्यंत समतोल वृत्तीनें केलेली ऐतिहासिक घटनांची चर्चा त्यांत सांपडते. या ग्रंथाचें हें वैशिष्ट्य होय. या ग्रंथांत ठिकठिकाणीं वीरांचीं भाषणें सांपडतात. त्यांत पेरिक्लेसचें भाषण वाङ्मयांत अढळपद घेऊन राहिलें आहे. त्याच्या वर्णनशैलीबद्दल व एकंदर लेखनकलेबद्दल त्यास 'गद्यांतील होमर' ही संज्ञा प्राप्त झाली.

**थूरे, गस्टॅव्ह ॲडॉल्फे** (१८१७–१८७५)—एक फ्रेंच वनस्पतिशास्त्रज्ञ. प्रथम यानें कायद्याचा अभ्यास केला. पण वनस्पतिशास्त्राची आवड असलेल्या एका गवई मित्राच्या संगतीनें त्याला वनस्पतिशास्त्राची गोडी लागली. हा फ्रेंच वकिलाबरोबर दोनदां कॉन्स्टांटिनोपल येथें जाऊन आला. १८४१ सालीं सीरिया व ईजिप्त येथें प्रवास केला. १८४० सालीं त्यानें आपलें वनस्पतिशास्त्रावरील पुस्तक प्रसिद्ध केलें. बॉरने व थूरे यांनीं वनस्पतिसृष्टींतहि स्त्री-पुरुष भेद असून त्यांच्यामुळेंच झाडांची उत्पत्ति होते असें प्रतिपादन केलें आहे. १८५३ व १८५५ सालीं थूरेनें एतद्विषयक पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं. १८५७ सालीं थूरे हा मेडिटरेनिअन किनाऱ्याजवळ ॲंटिबोस

गांवीं जाऊन राहिला व तेथें त्यानें एक वनस्पतीची बाग तयार केली. त्याच्या मृत्यूनंतर हें स्थान संशोधकांची संस्था म्हणून प्रसिद्धि पावलें.

**थेऊर**—मुंबई, पुणें जिल्हा. पुण्याच्या पश्चिमेस सुमारें तेरा मैलांवर हें लहानसें खेडेगांव असून येथील गणपतीचें देवस्थान अष्टविनायकांपैकीं एक आहे. चिंचवड, आळंदी, देहू, जेजुरी, मोरगांव, इत्यादि पुणें प्रांतांतील क्षेत्रस्थानांमध्यें थेऊरची गणना होते. येथील गणपतीची स्थापना चिंचवडचे सत्पुरुष चिंतामण देव यांनी केली असें म्हणतात.

येथील मूळचें देऊळ चिंतामण देवांनीं सुमारें ४०,००० रुपये खर्च करून बांधिलें. त्यानंतर सुमारें शंभर वर्षांनी थोरला माधवराव पेशवा यानें देवालयाचा सभामंडप नवीन करून देवालय बरेंच विस्तीर्ण केलें. त्यानंतर हरिपंत फडके, इत्यादि गणपतिभक्तांनीं त्यामध्यें बरेच फेरफार करून तें विशेष भव्य व शोभिवंत केलें.

थोरला माधवराव पेशवा याला हें स्थान फार आवडे; म्हणून त्यानें येथें राहण्यास एक वाडा बांधला. राज्यकारभाराच्या दगदगीमुळें त्रस्त झाला म्हणजे तो विश्रांतीसाठीं मधूनमधून येथें येऊन राहत असे. त्याची या देवस्थानावर अत्यंत भक्ति होती. म्हणून इ. स. १७७२ त क्षयरोगानें तो फार आजारी पडला तेव्हां मुद्दाम येथें येऊन राहिला. येथें त्यास कार्तिक वद्य ८ शके १६९४ बुधवारीं (ता. १८ नोव्हें. १७७२) देवाज्ञा झाली. त्याची पत्नी रमाबाई ही त्याच्याबरोबर सती गेली.

ज्यां ठिकाणीं रमाबाईनें सहगमन केलें ती जागा अद्यापि नदीतीरीं दृष्टीस पडते. तेथें जें जुने सतीचें वृंदावन होतें त्याचा सांप्रत जीर्णोद्धार करण्यांत आला आहे. चिंचवड संस्थानकडून थेऊर येथील देवस्थानास हल्लीं दोन हजार रुपयांची वार्षिक नेमणूक मिळत असते व त्याची व्यवस्थाहि चिंचवड संस्थानाकडून होत असते. याशिवाय चौघड्याकरितां व दिवाबत्तीकरितां कांहीं वेगळी नेमणूक मिळत असते. येथील पेशव्यांचा वाडा हल्लीं पडला असून त्याच्या भिंती व कुसूं मात्र राहिले आहे. हा वाडा आतां मुंबई सरकारनें माधवराव–रमाबाई यांची दरसाल पुण्यतिथि साजरी करणाऱ्या 'रमामाधव स्मृतिमंडळा'च्या हवालीं केला आहे.

**थेमिस्टोक्लीज** (खि. पू. ५१४–४४९)—एक अथीनिअन मुत्सद्दी. इराणच्या क्सर्सेस बादशहानें ग्रीसवर दुसरी स्वारी केली त्या वेळीं थेमिस्टोक्लीज हा अथीनिअन आरमाराचा मुख्य झाला, आणि सालेमिस येथील लढाईंत (खि. पू. ४८०) त्यानें इराणी आरमाराचा बहुतेक पूर्ण नाश केला आणि ग्रीस देशाचें संरक्षण केलें. ह्या विजयाचें मुख्य श्रेय थेमिस्टोक्लीजला आहे. पुढें थेमिस्टोक्लीजवर लांचलुचपत घेऊन श्रीमंत झाल्याचा आरोप ठेवण्यांत आला म्हणून तो आश्रयार्थ इराणच्या दरबारीं जाऊन राहिला.

**थेम्स**—१. ग्रेट–ब्रिटनमधील ही सर्वांत लांब नदी, कॉट्सवोल्ड या डोंगराळ प्रदेशांत उगम पावून उत्तर समुद्राला मिळते. थेम्स नदी इसिस, चर्न, कोलने, आणि लीच या नद्या मिळून झालेली आहे. ती ऑक्सफर्ड, रीडींग विंडसर आणि लंडन यावरून वाहत जाते. थेम्स नदींतून लेकलेडपर्यंत मालाचीं जहाजें जातात. या नदीची एकंदर लांबी २५० मैल असून तिला विंडरश, चेरवेल, थेम्, कोलने, ब्रेंट, ली आणि रीडिंग ह्या नद्या डाव्या बाजूनें, व केनेट, लोडीन, ली, आणि मोल, या नद्या उजव्या बाजूनें मिळतात. लंडन भागांत थेम्सवर अनेक पूल आहेत. तसेच खालून बोगदेहि काढले आहेत.

२. कानडामध्यें याच नांवाची नदी असून तिच्यावर लंडन नांवाचेंच शहर आहे. ओन्टारिओ द्वीपकल्पांत ही उगम पावून सेंट क्लेअर सरोवराला मिळते. हिची लांबी १६० मैल आहे.

३. न्यू झीलंड, एक बंदर. हें ऑकलंडपासून ४० मैलांवर आहे. जवळ सोन्याच्या खाणी आहेत. जवळून थेम्स नदी वाहते.

**थेलीज** (खि. पू. सु. ६४०–५४६)—थेल्स. एक ग्रीक तत्त्ववेत्ता व आयोनिअन संप्रदायाचा संस्थापक. त्यानें आपणासभोंवार प्रत्यहीं घडत असलेले नानाविध जन्ममरणादि चमत्कार पाहिले तेव्हां या सर्व चराचर सृष्टीच्या मुळाशीं कांहीं तरी एक तत्त्व असलें पाहिजे असें त्यास वाटूं लागलें. पुढें हें तत्त्व जल असावें असें त्यानें ठरविलें.

थेलीज यास आकाशांतील ताऱ्यांकडे पाहण्याचा फार नाद असे व असाच एके दिवशीं वर पाहत चालला असतां एका विहिरींत पडून तो मरण पावला. विश्वाच्या बुडाशीं एखादी चालकशक्ति आहे व ती आत्मा आहे असें त्याचें मत होतें. सर्वांभूतीं परमेश्वर आहे असें यास वाटत असे.

विश्वात्मा एकच असून सर्व जिवंत प्राण्यांचे आत्मे त्याचे सूक्ष्म विभाग आहेत व ते सर्व शेवटीं त्या विश्वात्म्यांतच विलीन होतात, असें त्यास वाटे. या विश्वात्मवादास जर्मन भाषेंत 'यूवरसीले' असें नांव आहे. थेलीजची 'ग्रीसच्या सात शहाण्या' लोकांत गणना केली जाते.

**थोथ**—ही इजिप्शियन देवता ग्रीक लोकांच्या हर्मीस (मर्क्युरी) या देवतेसारखीच आहे. लिपी, वाङ्मय, कला, विद्या आणि शास्त्रें यांमधील सर्व नवेनवे शोध हा देव लावतो, अशी समजूत असे. हा आत्म्यांचें मापन करतो असेंहि मानीत.

**थोरात घराणें**—मुंबई प्रांतांत अहमदनगर जिल्ह्यांतील अकोले तालुक्यांत वीरगांवीं एक थोरातांचें घराणें आहे. त्यास

दिनकरराव ही पदवी आहे. ती थोरल्या शाहूनें या घराण्यांतील शकोजी यास दिली असें म्हणतात. परंतु उपलब्ध माहितीवरून ती पदवी राजारामानें दिली असें दिसतें. शकोजीस मोकासा जहागीरहि त्याच वेळीं मिळाली होती. या वंशांतील आनंदराव हा सन १८५१ त हयात होता.

शाहू व कोल्हापूरचा संभाजी यांच्या झगड्यांत अनेक मराठे सरदारहि बंडाळी करूं लागले. अशांपैकींच एक सिधोजी थोरात होता. त्यानें शाहूची कामगिरी चांगली केल्यामुळें त्याला शाहूनें शाबासकी दिली होती. सिधोजीचा भाऊ सुभानजी यानें अट्ट्याचें ठाणें घेतलें. सिधोजी हा नारोपंत घोरपडे इचलकरंजीकर याच्या पदरीं होता. त्याला मिरज प्रांतीं सरंजाम मिळाला. सिधोजीचा बाप शिवाजी हाहि पुढें आलेला होता. हिंगणगांवच्या दमाजी थोरातासंबंधीं 'दमाजी' पाहा.

**थोरो, हेन्री डेव्हिड** (१८१७–१८६२)—एक विख्यात अमेरिकन निसर्गप्रेमी लेखक. जन्म मॅसेचुसेट्स या संस्थानांतील कॉकॉर्ड या गांवीं झाला. याचें शिक्षण हार्वर्ड विद्यापीठांत झालें. इ. स. १८३७ त तो पदवीधर झाला. हार्वर्ड विद्यापीठांत असतां प्रसिद्ध तत्त्वज्ञानी व लेखक इमर्सन याच्याशीं त्याची मैत्री जमली.

शिक्षण संपल्यावर थोरोनें कांहीं महिने आपल्या गांवीं शिक्षकाचें काम केलें. पण त्याचा कल संन्यस्त वृत्तीनें राहण्याकडे असल्यानें त्यानें शिक्षकाचें काम सोडलें व जॉर्ज रिप्ले, इमर्सन, वगैरे तत्त्वज्ञान्यांचा संन्यस्त मार्ग स्वीकारला. निर्वाहापुरता वाडिलांचा पेन्सिलीचा धंदा करून बाकीचा वेळ वाचन, लेखन, भाषण व मनन यांत तो घालवूं लागला. इ. स. १८४५–४७ अखेरपर्यंत वॉल्डन सरोवराच्या कांठीं त्यानें आपला आश्रम थाटला. इ. स. १८४७ पासून मरेपर्यंत तो इमर्सन याच्याकडे राहिला. थोरो हा गुलामगिरीच्या विरुद्ध होता. तो नाटकें, कादंबऱ्या, वगैरे कधींहि वाचीत नसे. त्यानें भगवद्गीता, मनुस्मृति, वगैरे संस्कृत ग्रंथांचें चांगलेंच अध्यायन केलें होतें. त्याच ग्रंथांचें तो वारंवार पठण व मनन करी. याशिवाय होमर, व्हर्जिल, मिल्टन, वर्डस्वर्थ, कार्लाइल यांचे ग्रंथहि त्यास फार आवडत असत. 'कॉकॉर्ड आणि मेरिमॅक नद्यांकांठचा एक आठवडा', 'जंगलांतील आयुष्य', 'जंगल आणि शेतें यांतून सफरी', 'कानडांतील यांकी' हे थोरोचे महत्त्वाचे ग्रंथ होत. थोरोच्या आचारविचारांचा व लेखनाचा म. गांधींवर फार परिणाम झाला होता.

**थ्रेस**— ईस्टर (डान्यूब) नदी व हेमस यांमधील मोएशिआ प्रांताला, व स्ट्रीमन आणि नेसटस नद्यांमधील प्रदेशाला हें नांव आहे. युरोपच्या आग्नेय भागांत, बाल्कन द्वीपकल्पाचा पूर्व देश म्हणजे जुनें थ्रेस होय. यांत सध्यांचें युरोपियन तुर्कस्तान सामावतें. हा प्रदेश बहुतांशीं खडकाळ व विषम असा आहे. येथील हवामान ग्रीक लोकांना फार प्रखर भासत असे. युक्झाइनकडील किनाऱ्याला नाविक लोक फार भीत. परंतु दक्षिण किनाऱ्याकडे तशी भीति नसल्यामुळें त्या ठिकाणीं ग्रीक लोकांच्या वसाहती होत्या. दरायस व त्याचे सेनापती यांनीं थ्रेसवर पुष्कळ स्वाऱ्या केल्या. थ्रेसियन जातींपैकीं अत्यंत शक्तिमान् जात म्हणजे ओड्रिसी लोकांची होय. या जातीच्या टेरीज या राजानें ख्रिस्तपूर्व ५ व्या शतकांत आपल्या राज्याचा बराच विस्तार केला. पेलापोनेसिअन युद्धांत टेरीजच्या मुलानें मॅसिडोनियाच्या विरुद्ध अथेन्सला मदत केली. सर्सोब्लेप्टीज या राजानेंहि हेंच धोरण चालू ठेवलें. व्हेसपेसिअन राजाच्या अमदानींत थ्रेस रोमचें अंकित राष्ट्र बनलें. यानंतर गॉथ व हूण लोकांनीं थ्रेसवर पुष्कळ स्वाऱ्या केल्या. इ. स. १४५३ त सबंध थ्रेस तुर्कांच्या ताब्यांत जाऊन इ. स. १८७८ पर्यंत त्यांच्याकडे राहिला. त्या वर्षी बर्लिनच्या तहान्वयें थ्रेसच्या उत्तर भागाचें पूर्व रुमोलिआ या नांवाखालीं नवीन राज्य बनविण्यांत आलें. १९१३ त बाल्कन युद्धानंतर बल्गेरियाला नैर्ऋत्येकडील थ्रेसचा भाग मिळाला. १९१९ च्या सेव्हेसच्या तहानें हा भाग ग्रीसकडे गेला, पण १९२३ च्या लोसानच्या तहान्वयें पूर्व थ्रेस तुर्कांनीं मिळविला. आज ग्रीसमध्यें जो थ्रेस प्रांत आहे त्यांत हेब्रॉस व ऱ्होडोप हे दोन जिल्हे समाविष्ट आहेत. व लो. सं. सु. ४२,००० आहे.

थ्रेसमधील मूळ रहिवाशांची नीतिमत्ता फारच हलक्या दर्जाची होती. लग्न होईपर्यंत ते आपल्या मुलींना वाटेल तसें आचरण करण्याची मुभा देत असत. थ्रेसियन लोक आपलीं अंगें गोंदून घेत असत.

---

# द

द—या वर्णाच्या आकृतीच्या एकंदर सात अवस्था दृष्टीस पडतात. पहिली अशोककालीन गिरनार लेखांत, दुसरी पभोसा लेखांत (खि. पू. १ लें शतक), तिसरी मथुरेच्या जैनलेखांत, चौथी तेथीलच पण इ. स. १।२ व्या शतकांतील लेखांत, पांचवी इ. स. ५३२ च्या मंदसोर लेखांत, व सहावी जपानांतील होर्युजी मठांत मिळालेल्या इ. स. ६ व्या शतकांतील ताडपत्रावरील ग्रंथांत दिसून येते. सातवी म्हणजे आजचा द पहिल्या अवस्थेच्या अगदीं उलट आकाराचा आहे.

**दगड**—भूस्तरशास्त्रांत दगड हा लहान खडकाचा तुकडा मानला जातो. हवापाण्याचे परिणाम होऊन खडक फुटतात व त्यांचे दगड होतात. दगडाचे पुष्कळ प्रकार आहेत. वाळूचा, चुन्याचा, लोहाचा, तुरटीचा, इ.. रत्नें हे देखील दगडच आहेत. रंग, आकार व गुण यांवरून त्यांना किंमत आली आहे. दगडाचा बहुंशीं उपयोग घरें बांधण्याकडे होतो.

दगडाची इमारत बांधावयाची असल्यास जो दगड वापरावयाचा तो टिकाऊ असून निरनिराळ्या प्रकारच्या हवामानांत खराब होणार नाहीं असा असला पाहिजे. हवा दमट असली किंवा कांहीं वायूंनीं दूषित असली तर दगड फार दिवस टिकत नाहीं. इमारतीस बाहेरच्या बाजूनें लावावयाचा दगड घट्ट, छिद्ररहित, स्फटिकमय असल्यास सर्वांत उत्तम असतो. दगडांत जर लोहाचा अंश बराच असेल तर तो चांगला नाहीं. इमारतीकरितां लागणारा दगड घडण्यास सोपा असला पाहिजे, परंतु कांहीं ठिकाणीं कठिण दगडच वापरावा लागतो. इमारतीच्या दगडांचे मुख्य प्रकार म्हटले म्हणजे सिकतामय अथवा वाळूचे बनलेले, चुनखडीचे, रवेदार (ग्रॅनाइट), पाटीचे (स्लेट) व वलयाकृति दगड हे होत. यांपैकीं चुनखडीच्या दगडांचे प्रकार पुढील होत: संगमरवरी दगड हा फक्त आंतील बाजूस शोभेकरितां वापरण्यांत येतो. पोर्टलँड दगड हा दर्शनी भागास वापरण्यांत येतो. रवेदार दगड हा सुद्धां बहुतेक नक्षीकरितां वापरतात. पाटीचा दगड छपराकरितां वापरण्यांत येतो. तसेंच त्याच्या टांकी, उंबरठे, वगैरे करण्यांत येतात. दगडाचें हवामानापासून रक्षण करणें हा शहरामध्यें मोठा महत्त्वाचा प्रश्न असतो. याकरितां दगडावर पालाश किंवा सिंधु याचे सिकितेत (पोटॅश, सेडियम सिलिकेट) याच्या द्रवाचा दगडावर लेप देतात. याला कुल्हमनपद्धति म्हणतात. दुसऱ्या सॅन्सम पद्धतीमध्यें वरीलप्रमाणेंच कृति करून नंतर त्यावर खटहरिदाचा (कॅलशियम क्लोराइड) लेप देतात. यामुळें दगड अधिक काठिण व टिकाऊ होतो. इतरहि कांहीं सिकिताचे रंग निघाले आहेत.

**दगडी कोळसा**—(अॅन्थ्रॅसाइट) अंगारप्रस्तर. हा एक अज्वालाग्राही चकचकीत दगडी कोळसा असून हा जळत असतां धूर होत नाहीं व ज्वालाहि निघत नाहीं. यानें हात काळे होत नाहींत. परंतु उष्णता मात्र फार असते. यामध्ये शेंकडा ९० कर्ब, २ प्राण, ३ उज्ज आणि ५ राख असते. हा इंग्लंड, स्कॉटलंड, व आयर्लंड यांमध्यें आणि संयुक्त संस्थानांत आढळतो. कोळसा पाहा.

**दगडी गोळे**—महाराष्ट्रांत व कोंकणांत गांवाबाहेर देऊळ असल्यास त्या देवळाच्या बाहेरच्या बाजूस लहान–मोठे दगडी गोळे ठेवलेले पुष्कळ ठिकाणीं पाहण्यांत येतात. जेथें दर वर्षाला यात्रा भरते अशा देवळाजवळ तर बहुतकरून अशा प्रकारचे लहान–मोठे दगडी गोळे ठेवलेले दिसतात. देवाच्या दर्शनास जाणारी मंडळी सहज गमतीनें म्हणून हे गोळे उचलतात. यात्रेच्या वेळीं तर सर्वांत जास्त वजनाचा गोळा कोण उचलतो याबद्दलची चढाओढ लागते. लहान–मोठे गोळे असल्यानें प्रत्येकास आपल्या शक्तीप्रमाणें गोळे उचलण्याची संवय करतां येते. आपल्या शक्तीचें प्रदर्शन करण्याची संधि या गोळ्यांमुळें मिळते. म्हणून गांवांतील तरुण मंडळी हे गोळे उचलण्याची संवय करतात. क्रमाक्रमानें जास्त जास्त वजनाचे गोळे उचलण्यानें उचलणारांची शक्ति वाढते व त्याचें आरोग्य सुधारतें. हा मेहनतीचा एक चांगला प्रकार आहे. मोठ्या वजनाचे गोळे उचलण्यानें वजनाच्या प्रमाणांत हातांत व पायांत चांगली ताकद येते. (व्यायाम ज्ञानकोश पाहा.)

**द गॉल, चार्लस** (१८९०— )—एक फ्रेंच सेनापति. हा पहिल्या महायुद्धांत मोहिमांवर होता व १९१६ त कैद झाला. त्या युद्धानंतर हा सिरियांत अधिकारी होता. नंतर त्याला लष्करी मंत्रिमंडळांत घेण्यांत आलें. त्यानें १९३० सालीं यांत्रिक युद्धपद्धतीची कल्पना काढली, पण ती सरकारकडून स्वीकारण्यांत आली नाहीं; पण १९४० त दुसऱ्या महायुद्धांत त्यालाच सेनापति करून ती अमलांत आणण्यास सांगितलें; पण तेव्हां फारच उशीर झाला होता व लवकरच फ्रेंच सरकार जर्मनीला शरण गेलें. तेव्हां ही शरणागति न आवडून गॉल इंग्लंडांत जाऊन फ्रेंच राष्ट्रातर्फे दोस्तांना मदत करीत राहिला. 'स्वतंत्र फ्रेंच लोकांचा पुढारी' असें म्हणवून घेऊन त्यानें ब्रिटनमध्यें फ्रेंच लष्कर उभारलें. दुसरें महायुद्ध संपल्यावर तो फ्रान्समध्यें विजयी सेनापति म्हणून गेला व लोकांनीं त्याचा मोठा गौरव केला. पण त्याला राज्यसूत्रें मात्र हातीं घेतां आलीं नाहींत.

**दग्धव्रण**—भाजल्यामुळें होणारे व्रण. हे ज्या मानानें लहान-मोठे असतील त्या मानानें त्यांपासून कमीअधिक भीति असते. शरीर भाजलें असतां पहिल्या २४ तासांत मृत्यूची भीति, विशेषतः लहान मुलांस फार असते. कारण भाजल्याबरोबर मनुष्यास धक्का बसतो. याकरितां रोग्यास शक्य तितकी कमी हालचाल पडेल व वारा न लागेल अशी तजवीज केली पाहिजे. रोग्यास तावडतोब बिछान्यावर निजवावें व त्यास ऊब लागेल असें करावें. त्यास इच्छा असेल तितकें थंड पेय पाजावें, आवश्यकता वाटल्यास उत्तेजक औषधें व प्राणवायु देण्यांत यावा. तसेंच नाडी मंद पडूं लागल्यास मिठाचें पाणी शिरांतून टोंचण्यांत यावें. यानंतर भाजलेल्या ठिकाणीं संसर्गापासून विषार होण्याचा संभव असतो व त्यामुळें संसर्गजन्य फुप्फुसदाह किंवा उदरगुल्म होण्याचा संभव असतो. भाजल्याबरोबर भाज-

लेल्या जागीं ईथर तेलाची पट्टी किंवा युकॅलिप्टस तेल व व्हॅसालिन, एखादें कृमिघ्न औषध, तसेंच पिक्रिक किंवा कॅरबॉलिक ॲसिड लावण्यांत यावें. टॅनिक ॲसिड हें देखील उपयुक्त आहे. पण त्याबद्दल फार काळजी घ्यावी लागते. तात्काळ उपचार करून मोठ्या भाजण्याच्या अपघातांत रोगी डॉक्टरला दाखविणें अगत्याचें असतें. भाजलेली मोठी जखम बरी झाल्यावर मूळचें कातडें गेलेलें असतें त्या जागीं दुसरें कातडें बसवितात.

**दंड**—१. याचा अर्थ सोटा असा आहे. या शब्दाचा सामान्यपणे जनावरांना हांकण्याची काठी अथवा शस्त्र या अर्थानें उपयोग केला आहे. राक्षसांना घालवून देण्यासाठीं अभिमंत्रित केलेली काठी यज्ञकर्त्या यजमानास देत असत, असा शतपथ व तैत्तिरीय या ब्राह्मणग्रंथांत उल्लेख आहे. उपनयनप्रसंगीं या दण्डाचें घरेंच महत्त्व असे. थोड्या फरकानें पळीसारख्या वस्तूची मूठ ( स्रुवदंड ) असाहि याचा अर्थ होतो. या शब्दावरून राजसत्तेचाहि बोध होतो व राजाचा शिक्षा करण्याचा अधिकार ध्वनित होतो ( राजप्रोपितो दण्डः ). अलीकडील भाषेंत बोलावयाचें म्हणजे त्या वेळीं राजा फौजदारी कायद्याचें उगमस्थान गणला जाई आणि पुढेंहि सत्ता त्यानें सर्वस्वीं आपल्याकडे ठेविली होती. पंचविंश ब्राह्मणांत निरपराधी ( अदण्ड्य ) लोकांना शिक्षा करणें हें ब्राह्मणेतर मात्यांचें लक्षण समजलें जाई.

' पाश्चात्य राजदंड ( मेस ) हा गदेसारख्या हत्यारांचेंच प्रतीक आहे. मध्ययुगांत ख्रिस्ती आचार्य तरवारीऐवजीं दंड वापरीत. त्यानें रक्त निघत नसे. दंड धार्मिक विधींत आल्या वेळीं त्याला अलंकार–शिल्पकर्म लाभलें. कायदेमंडळांत अध्यक्ष स्थानापन्न असतांना राजदंड टेबलावर ठेवण्यांत येतो.'

२. व्यायामाचा एक प्रकार. जोर. देशी व्यायामपद्धतींत व्यायामाच्या ज्या उत्तम तऱ्हा आहेत त्यांपैकींच दंडाची मेहनत ही एक आहे. कोणत्याहि कृत्रिम साधनाशिवाय घरच्या घरीं व सर्वांगास थोड्या वेळांत मेहनत देणारी दंडासारखी उत्तम मेहनत नाहीं. एकाच वेळीं शरीरांतील निरनिराळ्या अनेक मुख्य मुख्य स्नायूंस मेहनत दंडामुळें होते. प्रथम शक्तीच्या मानानें थोडे दंड काढून नंतर योग्य प्रमाणानें दंडाची संख्या वाढविल्यास त्यामुळें नुकसान न होतां उलट फारच फायदा होईल. हिंदुस्थानांतील सर्व नामांकित पहिलवान दंडाचे मेहनतीनेंच आपलीं शरीरें उत्तम बनवितात. याचे अनेक प्रकार आहेत. दंड किंवा जोर काढणारानें आपल्या दोन्ही हातांत एक हात व चार बोटांचें अंतर ठेवावें. त्याचप्रमाणें पायांच्या अंगठ्यांपासून हातांच्या तळव्यापर्यंत आपल्या हातानें दोन हातांचें अंतर ठेवावें. दोन्ही पायांच्या टांचा जमिनीस टेकाव्या. नंतर ढुंगण मागें नेऊन कोपरें वांकवावीं व डोकें खालीं जमिनीजवळ न्यावें. नंतर आपली मान व छाती वर करावी. नंतर ढुंगणाचा भाग वर घेऊन व डोकें खालीं आणून पूर्वस्थितींत राहावें. जोर काढते वेळीं गुढघे ताठ ठेवावे. ( व्या. ज्ञा. )



**दंडक**—१. इक्ष्वाकूच्या शतपुत्रांतील तिसरा. यानें गुरुकन्येस भ्रष्ट केल्यामुळें गुरूच्या शापामुळें याचा नाश झाला. याच्या नांवावरूनच दंडकारण्य नांव पडलें ( रामायण, उत्तर सर्ग ७९–८१ ).

२. या नांवाचा कोंकणपट्टींत प्राचीन कालीं एक देश होता. सहदेवानें पश्चिम किनाऱ्याचे जे देश जिंकले त्यांत शूर्पारक, दंडक, करहाटक या तीन देशांचीं नांवें आहेत. दंडक म्हणजे सध्यांचें दंडकारण्य नव्हे तर शूर्पारकाच्या दक्षिणेचें जें कोंकण तें. हा सध्यां डंडाराजापुरी किंवा दंटाराजापुरी ह्या शब्दांत आढळतो. दंडक ह्या संस्कृत शब्दाचें दंडअ हें प्राकृत महाराष्ट्रीय रूप असून डंडअ हें शौरसेनी रूप आहे, आणि या दोहोंचीं डंडा आणि दंडा हीं गुजराथी व मराठी रूपें विद्यमान आहेत. दंडा किंवा डंडा हा शब्द कोंकणांतील व सह्याद्रि पर्वतावरील मूळच्या लोकांचा असून ह्याचा अर्थ डोंगराचा उतरता लांब फांटा आहे. दांड, डांड, डांग, डंग, डुंग, डोंगर, डोंगरी, वगैरे शब्द सह्याद्रींतील कोळी लोकांत अद्यापहि प्रचलित आहेत. हे कोळ ऊर्फ कोल लोक सह्याद्रि पर्वतावरील मूळचे रहिवासी असावे व कोल्हापूर भागांत हे राहत असावेत. दंडाराजापूर प्रांतांतून घाटानें वर चढलें म्हणजे करहाटक प्रांत लागतो.

**दंडकारण्य**—हिंदुस्थानांत दक्षिणेंत नर्मदा आणि गोदावरी या नद्यांमधील मोठ्या प्रदेशांत रामाच्या काळीं वस्ती नव्हती. घोर अरण्य होतें. या भागास दंडकारण्य म्हटलें आहे. पूजादिकांच्या संकल्पांत ' दंडकारण्ये गोदावर्याः दक्षिणे तीरे, कृष्णावेण्याः उत्तरे तीरे ' असा पाठ महाराष्ट्रांत म्हटला जातो.

**दण्डी**— एक संस्कृत कवि. माधवकृत शंकरविजयांत याचा उल्लेख बाणभट्ट व मयूर कवि यांच्याबरोबर केलेला आहे. हा ब्राह्मण असून अवंतीस राहत असावा. निबंधमालाकारांनीं बाणभट्टाचा काळ शके ५७२ हा ठरविला आहे. दण्डी हा बाणापूर्वी ११२ वर्षें होता म्हणतात. दण्डी हा भवभूतीच्या समकालीन असावा असे कै. चिपळूणकरांनीं दशकुमारचरित्रांतील अंतःप्रमाणावरून सिद्ध केलें आहे. दशकुमारचरितांत बौद्धांचा उल्लेख आहे. कालिदास, सुबंधु व बाण यांच्या ग्रंथांत बौद्धांचा उल्लेख नाहीं. तो फक्त दण्डी व भवभूति यांच्या काव्यांत आढळतो.

प्रतिहारेन्दुराम यानें प्रथमच दण्डीचा निर्देश केला आहे. नवव्या शतकांतील अलंकारांवरील एका ग्रंथांत दण्डीचा उल्लेख सांपडतो. कविराजमार्ग नामक एका कानडी काव्यांत दण्डीच्या कवितांचें हुबेहुब भाषांतर केलेलें आढळतें.

वामनापूर्वी दण्डी झाला व नववें शतक हाच दण्डीचा काल होय असें कित्येकांचें मत आहे. दण्डीची काव्यरीति अथवा मार्ग यांत वामनानें पूर्ण प्रगति केलेली आढळते. दण्डीनें दोनच प्रकारचे 'मार्ग' सांगितलेले आहेत; परंतु वामनानें 'रीती'चा नवीन उपक्रम केला. तो आठव्या शतकाच्या अखेरीस व नवव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला असावा असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे.

ख्रिस्ती शकानंतर ६०६–६४७ सालीं हर्ष राजाच्या कारकीर्दीत बाण होऊन गेला. बाण व दण्डी समकालीन होते. दण्डी व माघ यांमध्यें विलक्षण साधर्म्य असल्याचें याकोबीनें दाखविलें आहे. पाठकांच्या मतें दण्डीकृत 'कर्मांचे' तीन विभाग भर्तृहरीच्या वाक्यपदीची स्मृति करून देतात. एतावता बाण, भर्तृहरि व माघ हे एकाच काळांत झाले असून सातव्या शतकाच्या मध्यास त्यांचा उत्कर्ष झालेला होता.

काव्याचे गद्य, पद्य व मिश्र असे भेद कल्पून दण्डीनें संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व मिश्र असे चार भाषाभेदहि सांगितले आहेत. त्यानें चार प्रकारचे काव्यप्रबंध सांगितले आहेत. सर्गबंध (महाकाव्य) हा संस्कृतांत असतो, स्कंधक प्राकृतांत, ओसर अपभ्रंशांत व नाटकाची भाषा मिश्र असते असें दण्डीनें प्रतिपादन केलें आहे. काव्यास अलंकाराची जरूरी आहे, परंतु त्यांत गुणहि असले पाहिजेत. रीतीबद्दल दण्डीनें मार्ग हा शब्द वापरला आहे. वैदर्भ व गौड असे दोन मार्ग सांगून वैदर्भ मार्गच श्रेष्ठ असें त्याचें मत होतें. श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सुकुमारता, अर्थव्यक्ति, उदारत्व, ओज, कांति व समाधि असे वैदर्भी मार्गाचे दशप्राण आहेत. शब्दालंकार व अर्थालंकार हे महत्त्वाचे असून त्यांपैकीं अर्थालंकाराचे ३५ प्रकार व त्यांचे उपभेद त्यानें दाखविले आहेत. शिथिल, व्युत्पन्न, वैषम्य, दीप्त, अत्युक्ति, नेयत्व, इ. काव्यदोषांची दण्डीनें चर्चा केलेली आहे. काव्यगुण वैदर्भरीतींत असून दोष गौडीरीतींत सांपडतात, असें त्यानें म्हटलें आहे. पददोष, पदार्थदोष, वाक्यदोष, वाक्यार्थदोष असेहि त्यानें विभाग कल्पिले आहेत.

काव्यादर्शाशिवाय दण्डीचा दुसरा ग्रंथ 'दशकुमारचरित' हा होय. हा ग्रंथ अपूर्ण असून तो दुसऱ्यानें पुरा केलेला आहे. या उत्तर भागाचें नांव 'दशकुमारचरितशेष' असें आहे. सबंध कुमारचरितांत शृंगार व वीर रस मुख्य आहेत. 'दण्डिनः पदलालित्यं' ही गोष्ट प्रसिद्ध असून त्याचा निर्देश कालिदास, भारवी, माघ, वगैरे कवींबरोबर करण्यांत येतो, व यावरून हा कवि फार उच्च दर्जाचा होता असें दिसतें. दशकुमारचरितावरून आढळून येतें कीं, गद्यरूप कविता लिहिण्याचा प्रकार यानेंच सुरू केला. त्याची कीर्ति होण्याचें एक कारण असें आहे कीं, त्याच्या दशकुमारचरितांत तत्कालीन स्थितीचें चित्र प्रतिबिंबित झालें आहे. दशकुमारचरित लिहिणारा व काव्यादर्श लिहिणारा असे दोन निरनिराळे दण्डी नांवाचे कवी होऊन गेले, असा एक वाद हल्लीं उपस्थित झाला आहे.

**दंतमंजन**—दांत स्वच्छ राखण्यासाठीं वापरलें जाणारें पूड, लेप, इ. साधन. दांतांत अन्नाचे कण सांचतात व इतर प्रकारे ते घाण होतात म्हणून रोज ते धुणें जरूर असतें. ते धुण्यासाठीं कांहीं पदार्थ जाळून केलेली राखुंडी किंवा कांहीं औषधांचें केलेलें मिश्रण वापरतात. या दंतमंजनाच्या अंगीं १ दांत शुभ्र व स्वच्छ करण्याचा गुण असावा; २ दांतांतील कीड नाहींशी करण्याची शक्ति असावी; ३ त्यांतलि घटक द्रव्यांमुळें दांतांवर वाईट परिणाम होऊं नये; व ४ त्याला चव व वास चांगला असावा. बहुतेक दंतमंजनांत खडू असतो. त्यांत कांहीं जंतुघ्न आणि शोधक औषधांचें मिश्रण करतात. काळ्या दंतमंजनांत कोळसा असतो.

**दंतवैद्यक**—दंतवैद्यकाचे मुख्य दोन भाग आहेत. एक दांतावर शस्त्रक्रिया किंवा उपचार करणें आणि दुसरा कृत्रिम दांत बसविणें. दांतावरील शस्त्रक्रियेमध्यें मुख्य क्रिया म्हणजे दांतावर जें एक प्रकारचें कीट किंवा वेष्टण जमलेलें असतें तें काढणें हें होय. तसेंच दांत जर एकमेकांवर आले असतील किंवा आपल्या स्थानावरून च्युत झाले असतील तर त्यांस योग्य ठिकाणीं बसविणें, कुजलेल्या दांतामधील पोकळी भरून काढणें, कुजलेला भाग काढून टाकणें, दांत उपटून काढणें, इत्यादि गोष्टी असतात. दांत उपटून काढण्यास बरेंचसें कौशल्य आणि ताकद लागते. कृत्रिम दांत तयार करणें ही एक कला आहे व ते दंतवैद्याच्याऐवजीं कारखानदारहि तयार करतात. मग दंतवैद्याचें काम फक्त त्यांतील योग्य दांत निवडून बसविण्याचें असतें.

हें वैद्यक प्राचीनच म्हणतां येईल. ९ व्या शतकापासून दंतवैद्य दांत भरण्याचें काम करूं लागले आहेत. सोन्याचें वेष्टण दांतावर बसविण्याची रीत १६ व्या शतकांतहि दिसते. १७२८ त फोशार्द या फ्रेंच वैद्यानें या वैद्यकावर एक ग्रंथ लिहिला. या वैद्यकासाठीं विशेष ज्ञान पाहिजे असें त्यानें दाखवून दिलें. लहानपणापासून दांतांची काळजी घेण्याचें महत्त्व पाश्चात्य देशांत पटवून देण्यांत येऊं लागलें. व शाळांतून दांतांची निगा ठेवण्याचें शिक्षण मिळत चाललें. दांताच्या रोग्यांचीं स्वतंत्र इस्पितळें लंडनसारख्या मोठाल्या शहरांतून स्थापण्यांत आलीं आहेत.

पुढें दंतवैद्य म्हणून स्वतंत्र धंदा करणारे वैद्य निघाले. इंग्लंडांत १८७८ त त्यांच्यासाठीं एक कायदा करण्यांत आला; व अशा

दंतवैद्यांची नोंदणी सक्तीची ठेविली. न नोंदलेल्यांना बंदी करण्यांत आली. विद्यापीठें व स्वतंत्र संस्था दंतवैद्यांच्या परीक्षा घेऊन त्यांना पदव्या व प्रशस्तिपत्रें देऊं लागल्या.

**दंतहीन प्राणी**— ( एडेन्टाटा ). हें एका प्राथमिक सस्तन प्राणिवर्गाचें नांव आहे. हे सामान्यतः दक्षिण गोलार्धातील नवीन आढळणाऱ्या उष्णकटिबंधांतील भूप्रदेशांत राहतात. दक्षिण आशियांत व दक्षिण आफ्रिकेमध्येंहि यांच्या कांहीं जाती आहेत. यांच्या शरीरावर शृंगमय खवले आढळतात. यांच्या पायांचीं बोटें पंजासारखीं एकत्र असतात आणि दांत अर्धवट असतात किंवा मुळींच नसतात. या वर्गांत मुंगीभक्षक, 'स्लॉथ' आस्वलें, आर्माडिलो, वगैरे प्राणी मोडतात. या वर्गांतलि कांहीं प्राणी (उदा., मेगॅथेरीयम मायडोलन, क्लासाडेन आणि ग्लिक्टोडन) हे नष्ट झाले आहेत. अर्डव्हर्क आणि खवलेदार मुंगीभक्षक प्राणी हे जुन्या जगांत आढळतात.

**दंतिदुर्ग राष्ट्रकूट** (राज्य. ७४५–७५८)—मालखेडच्या राष्ट्रवंशांतील पहिल्या इंद्राचा पुत्र. हा स. ७४५ च्या सुमारास गादीवर आला असावा. राज्यावर आल्यावर यानें कांची, कलिंग, श्रीशैल, कोसल, मालव, लाट, टंक व सिंध येथील राजांचा पाडाव केला. पहिल्या इंद्राच्या वेळीं सर्वांत बलिष्ठ असलेलें जें दक्षिणेंतील चालुक्य राज्य त्याच्या मुळावर घाव घालून तें खिळखिळें करण्यास व पुढें कोसल राज्याचा पाडाव करून आपलें राज्य वाढविण्यास त्यानें सुरुवात केली.

पूर्व दिशेला विजय संपादन केल्यावर त्याचें लक्ष भडोच व गुर्जर चालुक्य या राज्यांकडे वळलें. हीं दोन्ही राज्यें आधींच मुसलमानी स्वाऱ्यांमुळें कमजोर झालीं होतीं. त्यामुळें यानें अनायासें तीं खालसा करून आपल्या राज्यास जोडलीं. गुजराथच्या राज्यावर दंतिदुर्गानें दुसरा कर्क नांवाच्या आपल्या नातलगास सुभेदार नेमलें.

एकंदरींत पाहतां याची कारकीर्द अत्यंत धामधुमीची झाली. त्यांतहि विशेष हें कीं, प्रत्येक लढाईंत याला जयच मिळत गेला. पराक्रम व मुत्सद्देगिरी यांबरोबर कालाची अनुकूलताहि असल्यानें दिग्विजयाचें काम याला फार सोपें झालें होतें.

याचीं धार्मिक मतें अत्यंत कर्मठ व जहाल होतीं. उज्जयिनीस असतांना यानें स्वर्गप्राप्त्यर्थ हिरण्यगर्भ महादानाचा समारंभ मोठ्या थाटानें केला. तसेंच स. ७५४ सालीं त्यानें रथसप्तमीला सुवर्णतुलेचें दान केलें होतें. तसेंच हा अत्यंत मातृभक्तिपरायण होता. आईच्या स्मरणार्थ यानें बरीच जमीन ब्राह्मणांस दान दिली होती.

हा स. ७५४ ते ७५८ या दरम्यान केव्हां तरी मरण पावला असावा. मरणकाळीं याचें वय तीस वर्षांचें असावें. एवढ्या लहान वयांत यानें जी अतुल कीर्ति संपादन केली तीवरून त्याच्या कर्तबगारीची कल्पना येते. याच्यामागून याला पुत्रसंतान नसल्यानें याचा चुलता पहिला कृष्ण हा गादीवर आला.

**दतिया संस्थान**—मध्य हिंदुस्थान, जुन्या बुंदेलखंड एजन्सीपैकीं एक संस्थान. क्षेत्रफळ ९१२ चौ. मैल. ग्वाल्हेर व इतर संस्थानांचे भाग यांत असल्यामुळें हा प्रदेश बराच तुटलेला आहे. सिंद व बेटवा या नद्यांमधील सपाट प्रदेशांत हें संस्थान वसलेलें असून यांतून सिंद व तिला मिळणारी पहूज या नद्या वाहतात. दतिया संस्थानिक ओर्छा घराण्यांतील बुंदेल रजपूत आहेत. १६२६ त ओर्छाच्या वीरसिंग देवानें आपला मुलगा भगवानराव याला दतियाचें संस्थान दिलें. मूळच्या प्रदेशांत जिंकलेल्या व दिल्लीच्या बादशहाकडून मिळालेल्या प्रदेशाची भर पडून अखेर उत्तरेस चंबळा व पूर्वपश्चिम बेटवा आणि सिंद यांच्या दरम्यानचा मुलूख या संस्थानांत समाविष्ट झाला. या घराण्यांतील चौथा राजा रामचंद्र याच्या मरणानंतर गादीसंबंधीं भांडण उपस्थित झालें, त्या वेळीं ओर्छाचा राजा उद्योतसिंग यानें रामचंद्राचा नातू याचा पक्ष धरून त्यास गादी मिळवून दिली. ह्या सुमारास मराठ्यांनीं बुंदेलखंडावर स्वारी करण्यास सुरुवात केली. १८०४ मध्ये येथील राजानें ब्रिटिशांबरोबर तह केला. येथील राजाला वंशपरंपरागत लोकेंद्र अशी पदवी आहे. राजाला संस्थानांत सर्व प्रकारचे अधिकार आहेत. राजे सर गोविंदसिंग बहादूर इ. स. १९०७ मध्यें गादीवर आले. दतिया संस्थानची लोकसंख्या १,७४,०७२ आहे. शेंकडा ९५ वर हिंदू आहेत. भाषा बुंदेलखंडी आहे. संस्थानची जमीन निकस आहे. येथें द्विदल धान्यें, गहूं, ज्वारी, कापूस, वगैरे पिकें होतात. ग्वाल्हेर–झांसी हा मोठा रस्ता व जी. आय्. पी. रेल्वेची शाखा ह्या जिल्ह्यांतून गेलेली आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न वीस लक्षांचें आहे. संस्थान आतां विंध्यप्रदेशसंघांत सामील झालें आहे.

दतिया हें राजधानीचें शहर आहे. हें झांशीहून १६ मैलांवर आहे व समुद्रसपाटीपासून ९८० फूट उंच आहे. लोकसंख्या सुमारें वीस हजार. हा गांव लहान टेंकड्यांवर वसलेला असून एका टेंकडीवर राजा वीरसिंग देव याचा भव्य राजवाडा आहे. ह्या वाड्यावरील नक्षीकाम व एकंदर शिल्पकाम फार प्रेक्षणीय आहे. लॉर्ड हार्डिंज इस्पितळ, स्त्रियांचें (महाराणी मोहनकुंवर) इस्पितळ, लॉर्ड रीडिंग हायस्कूल, लेडी विलिंग्डनच्या नांवानें असलेली मुलींची शाळा, टाउन हॉल, इ. इमारती प्रेक्षणीय आहेत.

**दत्त** (सुमारें स. १७७२)—एक हिंदी कवि. हा माढी येथील राहणारा असून चरखारीच्या खुमानसिंह राजाच्या

शकते, पण तसें करण्यास पतीची परवानगी पाहिजे. पत्नी स्वतःकरितां केव्हांहि दत्तक घेऊं शकत नाहीं.

विधवेचा दत्तक घेण्याचा हक्क—यासंबंधीं भिन्न भिन्न प्रांतांत भिन्न प्रकारचा कायदा आहे. मिथिला प्रांतांत विधवेला दत्तक घेण्याचा कोणत्याहि परिस्थितींत अधिकार नाहीं. पतीनें आपल्या हयातींत जरी पत्नीला दत्तक घेण्याचा अधिकार देऊन ठेवला असला तरीहि त्याच्या पश्चात् ती त्या अधिकारान्वयें दत्तक घेऊं शकत नाहीं. बंगाल व बनारस या प्रांतांत पतीनें आपल्या हयातींत दिलेल्या अधिकारान्वयें त्याची विधवा त्याच्याकरितां दत्तक घेऊं शकते. मद्रास इलाख्यांत पुढील तीन बाबतींत दत्तक घेण्याचा अधिकार आहे: (अ) पतीनें आपल्या हयातींत दिलेल्या अधिकारान्वयें विधवेला दत्तक घेतां येतो. (आ) पति आपल्या निधनसमयीं आपल्या सहभागीदारांपासून विभक्त झाला असेल तर त्याच्या अनुज्ञेच्या अभावीं त्याच्या सपिंडांच्या संमतीनें त्याची विधवा दत्तक घेऊं शकते. (इ) तो अविभक्त स्थितींत मेला असेल तर त्याच्या अनुज्ञेच्या अभावीं त्याच्या सहभागीदारांच्या संमतीनें ती दत्तक घेऊं शकते. मुंबई इलाख्यांत पतीनें आपल्या हयातींत दिलेल्या अनुज्ञेनें विधवा दत्तक घेऊं शकते. अशा प्रकारची अनुज्ञा नसली तरी ती कोणाच्याहि संमतीवांचून दत्तक घेऊं शकते; मग तिचा पति अविभक्त कुटुंबांत मरण पावलेला असो अथवा विभक्त होऊन मरण पावलेला असो.

वयाचीं पंधरा वर्षें पुरीं झालेला कोणीहि हिंदु आपल्या पत्नीला आपल्या पश्चात् दत्तक घेण्याचा अधिकार देऊं शकतो. मात्र तो देते वेळीं आपण काय करीत आहोंत हें समजण्याची मानसिक पात्रता त्याला असली पाहिजे. हा अधिकार तोंडीं किंवा लेखी देतां येतो.

एकवार दत्तक घेतलेला मुलगा मरण पावल्यास दुसरा मुलगा दत्तक घेतां येतो. विधवा सज्ञान नाहीं, एवढ्यावरूनच तिनें योग्य रीतीनें घेतलेला दत्तक बेकायदेशीर ठरत नाहीं; तिच्या वयाला पंधरा वर्षें पूर्ण झालीं असलीं म्हणजे झालें. विधवेनें पुनर्विवाह केला तर तिला आपल्या पहिल्या पतीकरतां दत्तक घेतां येत नाहीं. नवरा मरणसमयीं आपल्या सहभागीदारापासून विभक्त राहत असल्यास विधवा पुढील परिस्थितींतच दत्तक घेऊं शकते: (अ) नवरा निपुत्रिक वारला, (आ) त्याला मरणसमयीं पुत्र होता, पण तो आपल्या आईच्या हयातींतच मरण पावला; यांपैकीं पहिल्या बाबतींत पति निपुत्रिक वारल्यामुळें त्याची मिळकत वारस नात्यानें तिला मिळते. दुसऱ्या बाबतींत मुलग्याची वारस म्हणून तिला मिळकत मिळते—या दोन बाबीं-व्यतिरिक्त इतर कोणत्याहि बाबतींत विधवेला दत्तक घेण्याचा अधिकार नाहीं.

दत्तक देणाराची पात्रता—पुत्र दत्तक देण्याची पात्रता पित्याला व मातेला असते. इतरांना नसते. भाऊ भावाला, सावत्र आई सावत्र मुलग्याला, आणि आजा नातवाला दत्तक देऊं शकत नाहीं. मातापितरांतहि पुत्र दत्तक देण्याचा अग्राधिकार पित्याचा. पिता जिवंत असून संमति देण्याची पात्रता त्यास असेल तर त्याच्या संमतीविना माता पुत्र देऊं शकत नाहीं. पुढील बाबतींतच फक्त मातेला पुत्र दत्तक देण्याचा अधिकार आहे: (अ) संमति देण्यास पिता अपात्र झाला आहे. (आ) त्यानें सर्वसंगपरित्याग करून चतुर्थाश्रम स्वीकारला आहे. (इ) किंवा तो मरण पावला आहे (मात्र त्यानें आपल्या पत्नीनें आपला मुलगा दत्तक देऊं नये म्हणून हरकत नमूद करून ठेवली नाहीं तर).

दत्तक जाणाऱ्याची पात्रता—कोणीहि हिंदु पुरुष दत्तक जाण्यास पात्र आहे. मात्र (अ) तो दत्तक बापाच्या जातीहून भिन्न जातीचा नसला पाहिजे. म्हणून ब्राह्मण मनुष्य क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र मुलगा दत्तक घेऊं शकत नाहीं. दत्तक बाप व दत्तक पुत्र हे एकाच जातीच्या भिन्न शाखेचे असले तरी चालतात. (आ) ज्या स्त्रीशीं दत्तक बाप तिच्या कौमार्यावस्थेंत कायदेशीरपणें लग्न करूं शकला नसता तिचा मुलगा दत्तक होण्यास पात्र नाहीं; पण हा निषेध मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा, आणि आईच्या बहिणीचा मुलगा यांच्यापुरताच मर्यादित असल्याविषयीं अलीकडे निर्णय झाले आहेत. शूद्रांना हा नियम लागू नाहीं. (इ) दत्तक जाणाऱ्या मुलाचें वय किती असावें याविषयीं हिंदु व्यवहारधर्मशास्त्राच्या शाखांत मतभेद आहे: (१) बंगाल, बनारस व ओरिसा या प्रांतांत मुलाचें उपनयन होण्यापूर्वीच दत्तक घेतला पाहिजे. (२) मद्रास इलाख्यांतहि हाच नियम लागू पडतो; परंतु दत्तक-पिता व दत्तक घ्यावयाचा मुलगा हे एकाच जातीचे असतील तर उपनयनानंतरहि दत्तक घेतां येतो; मात्र मुलग्याचा विवाह होण्यापूर्वी दत्तक घेतला पाहिजे. (३) मुंबई इलाख्यांत दत्तक मुलग्याच्या वयाविषयीं निर्बंध नाहीं. कोणत्याहि वयाचा, विवाहित असून मुलेंबाळें झालेला देखील गृहस्थ दत्तक जाण्यास पात्र आहे. आपल्या आईबापांचा एकुलता एक मुलगा दत्तक देतां येतो, घेतां येतो. एकाच वेळीं दोन मुलगे दत्तक घेतल्यास दोघांचेंहि दत्तविधान बेकायदेशीर आहे. एकच मुलगा दोन भिन्न व्यक्ती कायदेशीर-रीत्या दत्तक घेऊं शकत नाहींत; त्यांनीं तसा घेतल्यास दोन्ही बाबतींत दत्तविधान बेकायदेशीर आहे. (४) दान व स्वीकार—दत्तविधान कायदेशीर होण्यास प्रत्यक्ष पुत्रदान (मातेकडून

अंगर पित्याकडून ) व त्याचा स्वीकार ( दत्तक घेणाऱ्याकडून ) होणें अवश्य आहे. हा विधि सर्वांना अवश्य आहे. दत्तविधान मुख्यतः या विधींतच सामावलेलें आहे. हा विधि न करतां दुसरा कोणताहि विधि जरी केला तरी दत्तविधान पूर्ण झालें असें कायदा मानीत नाहीं. नोंद, दत्तकपत्र जरी केलें असलें तरी हा विधि आवश्यक आहेच.

( ५ ) दत्तहोम—दत्तक जाणाऱ्या मुलाचें जनक घराण्याचें व दत्तक घराण्याचें गोत्र एक असेल तर द्विजातीमध्यें दत्तविधानाची आवश्यकता नाहीं. एरवीं दत्तहोम अवश्य आहे, असें मुंबई हायकोर्टानें ठरवलें आहे. दत्तहोम करावयाचा तो दानप्रतिग्रह झाल्यानंतर कोणत्याहि वेळीं केला तरी चालेल; दत्तक पिता अथवा जनकपिता यांच्या निधनानंतरहि दत्तहोम केला तरी चालतो.

दत्तक पुत्राचे कायदेशीर हक्क—दत्तक पुत्राला दत्तक घराण्यांत, कांहीं अपवाद वगळून, औरस पुत्राचे हक्क प्राप्त होतात. जनक घराण्यांतील औरस पुत्राचे त्याचे सर्व हक्क नष्ट होतात. दत्तक पित्याला त्यानें दत्तक घेतल्यानंतर पुत्र झाल्यास दत्तक पुत्राला औरस पुत्राच्या बरोबरीनें हिस्सा मिळत नाहीं. बंगाल प्रांतांत त्याला दत्तक पित्याच्या मिळकतींत एक–तृतीयांश हिस्सा मिळतो; बनारस प्रांतांत एक–चतुर्थांश व मुंबई व मद्रास प्रांतांत एक–पंचमांश असा त्याला हिस्सा मिळतो.

हिंदुस्थानांतील इंग्रज न्यायाधीशांनीं या दत्तक कायद्याला विपर्यस्त स्वरूप दिलेलें आढळतें.

**दत्तक माता**— पाश्चात्य राष्ट्रांत 'वेट नर्सेस' म्हणून एका प्रकारचें काम करणाऱ्या दाया असतात. परंतु आपल्या लहान मुलांसाठीं अशा दाया ठेवणें फार महाग पडतें म्हणून बाळंतीण झालेल्या स्त्रियांचें दूध ( त्यांच्या बालकांना पाजून झाल्यावर उरणारें ) एकत्र सांठवूनहि ठेवतात. अशा दत्तक माता घरोघर जाऊन दुसऱ्यांच्या मुलांना दूध पाजतात. दर औंस( अडीच तोळ्या )ला दहा सेंट या दरानें असें दुग्धपान देऊन एका बाईनें लॉस एंजल्स या गांवीं दोनतीन वर्षांत नऊ हजार रुपये मिळविले !

**दत्ताजी त्रिमल**—हा शिवाजीचा वाकनवीस अष्टप्रधानांतील एक होता. याचा हुद्दा मंत्री असा असे. रोज जी कांहीं हकीकत खास छत्रपतींविषयीं घडून येईल ती यानें लिहून ठेवावयाची, व छत्रपतींच्या सर्व खाजगी खात्यावर देखरेख करावयाची, ही याची कामगिरी असे. अठरा कारखाने, बारा महाल, हुजूरपागा व जिलबीचें पायदळ, खाजगी दप्तर व पत्रव्यवहार (मुदबकखाना), आमंत्रणें करणें, हा सर्व कारभार त्याच्याकडे असे. छत्रपतीनें दिलेल्या (इनामाच्या) राजपत्रांवर 'संमत मंत्री' व 'बार' या (अक्षरांच्या) निशाण्या त्यानें स्वहस्तानें करावयाच्या असत. दत्ताजी हा शिवाजीबरोबर आग्र्यास गेला असून तेथें चांगली कामगिरी बजावली म्हणून परत आल्यावर ही जागा त्याला दिली. हा प्रथम पागेकडे नोकर होता. हा दरबारांत छत्रपतीच्या उजव्या हातास बसत असे. शिवाजी दक्षिणदिग्विजयास गेला असतां दत्ताजीस देशीं देशरक्षणासाठीं मोरोपंत पेशव्याबरोबर ठेविलें होतें.

शिवाजीच्या कारकीर्दींत प्रसंगीं दत्ताजीनेंहि मोहिमेचें काम केलें होतें. त्यानें ही हकीकत लिहून ठेविली होती, परंतु ती उपलब्ध नाहीं. तिचा सारांश म्हणून एक नव्वद कलमी बखर प्रसिद्ध झालेली आहे. संभाजीनें जुने अधिकारी काढले होते, परंतु दत्ताजीस काढलें नाहीं. शाहूनें सातारा राजधानी केल्यावर दत्ताजी हा तेथेंच राहत असे. तेथें त्याचा वाडा होता. १७५३ सालीं होळीच्या दिवशीं ( २० मार्च ) साताऱ्यास जी प्रचंड आग लागली तींत, पेशवे, पुरंदरे, चिटणीस यांच्या वाड्यांबरोबर दत्ताजीचाहि वाडा जळून गेला. दत्ताजीनें समर्थांचा गुरुपदेश घेतला होता.

**दत्ताजी शिंदे** (मृ. १७६० )—हा राणोजीचा दुसरा मुलगा. जयाप्पा मारला गेल्यावर ( १७५५ ) शिंदे घराण्याची सरदारी जयाप्पाचा पुत्र जनकोजी यास मिळाली. परंतु तो लहान होता म्हणून दत्ताजीच कारभार पाही. कुकडीच्या लढाईंत ज्या अकरा शूर असामींनीं थेट निजामाच्या हत्तीवर चाल करून त्याची डोलाची अंबारी खालीं पाडली त्यांपैकीं दत्ताजी हा एक होता ( १७५१ ). पुढें निजामानें पुनः उपसर्ग दिल्यानें पेशव्यांनीं दत्ताजीस मुख्य सेनापति करून व बरोबर विश्वासरावास देऊन निजामावर पाठविलें. त्यानें शिंदखेड येथें निजामाला गांठून पूर्ण मोड केला व पंचवीस लक्षांचा प्रांत व नळदुर्ग किल्ला मिळविला ( १७५७ ). विजेसिंगाच्या मोहिमेंत तो होता. जयाप्पाचा खून झाल्यावर दत्ताजीनें तें दुःख मागें सारून शत्रूचा मोड केला ( १७५५ ). पुढें दत्ताजीनें सर्व मारवाडचें राज्य घेऊन त्याचा तिसरा हिस्सा मराठी साम्राज्यांत दाखल करून पांच कोट रुपये खंडणी मिळविली ( १७५६ ). नंतर बुंदीच्या राणीस मदत करून व तिचा मुलगा गादीवर बसवून दत्ताजीनें ४० लाख रुपये मिळविले व सरकारचें बरेंच कर्ज फेडलें ( १७५६ ). पुढील सालीं दादासाहेब अब्दालीवर गेला. मल्हारराव होळकर, हिंगणे, राजेबहादुर, वगैरे मंडळी त्याला मदत करण्यास कुचराई करूं लागली. तेव्हां त्यानें दत्ताजीस उत्तरेंत धाडण्याबद्दल अनेक पत्रें पेशव्यांस लिहिलीं; १७५८ सालीं लग्न उरकून दत्ताजी उज्जयिनीस आला. तेथें मल्हाररावानें त्याचा भोळा स्वभाव पाहून त्यास दादा-

साहेबानें सांगितलेल्या नजीबखानाचें पारिपत्य करण्याच्या कामगिरीपासून परावृत्त केलें. भोळ्या दत्ताजीनें हा सल्ला स्वीकारला व नजीबास राखलें; पण त्याच नजीबानें विश्वासघातानें त्याचा प्राण घेतला.

यानें लाहोरचा बंदोबस्त केल्यावर मराठ्यांचें वर्चस्व दिल्लींत कायमचें बसणार असें नजीबखानास वाटून त्यानें दत्ताजीस गंगेवर पूल बांधण्याचें आमिष दाखविलें व दुसरीकडे अहमदशाह अब्दालीस हिंदुस्थानांत येण्याची निकड लावली. या मुदतींत नजीबखानानें सुजावर स्वारी करण्याचें ठरविलें. तेव्हां जनकोजीला हें आवडलें नाहीं. परंतु गोविंदपंत बुंदेल्यानें मात्र दुजोरा दिला. शेवटीं दत्ताजी स्वस्थ आहे असें पाहून नजीबानें मुसलमानांची जूट केली व अब्दालीस दत्ताजीवर आणून त्यास कैचींत पकडलें. तेव्हां नजीबाचें कपट ध्यानांत आलें. ह्या दोघांची लढाई शुक्रतालच्या पुलावर सुरू झाली. प्रथम शिवाजी शिंदे व त्याचा मुलगा हणमंतराव पडला. नंतर अब्दाली कुरुक्षेत्रावर आला. तेव्हां २२ डिसेंबरास अब्दालीशीं याची झटापट सुरू झाली. दत्ताजीस त्या वेळेस जयपुरास निघून जातां आलें असतें, पण त्यास तें भ्याडपणाचें वाटलें. यानें पाठविलेल्या भोईटे, बुंदेले व अंताजीपंत यांना अब्दालीनें उलट खाऊन यमुनेच्या अडचणींत लोटलें व त्यांचें सैन्य कापून काढलें. या भयंकर कत्तलीमुळें दत्ताजीचें देहभान सुटलें आणि पुढील लढाईचा प्रसंग अवेळीं उद्भवला. शुक्रतालवर अब्दाली, अहमदखान, बंगष, सुजा व नजीबखान एकत्र झाले. मल्हारराव होळकर जयपूरच्या हद्दींत होता. त्यास येण्याबद्दल दत्ताजीचें पत्र गेलें होतें. तो येण्यास निघाला होता. पण प्रसंग विशेष बांका नाहीं असें दत्ताजीनें कळविल्यावर त्यानें जयपूरकडील आपला मुक्काम वाढविला. भागीरथीबाईनें (दत्ताजीची पत्नी) दत्ताजीस युद्धापासून निवृत्त करण्याचा किंवा दमानें घेण्याचा सल्ला पुष्कळांकरवीं देऊन पाहिला, पण उपयोग झाला नाही. १–१०–१७६० रोजी तीन घटका दिवस आला तेव्हां संक्रांतीचा तिळगूळ वांटून यानें अब्दालीवर चाल केली व शेवटीं बदाऊच्या घाटावर घनघोर संग्राम झाला.

गिलच्यानें आपल्या तोंडावर असलेल्या जानराव वाबळे, बयाजी शिंदे व गोविंदपंत बुंदेले या सर्वांना मागें रेटून यमुना उतरून पांच घटकांत पांचशें मराठे ठार मारून थेट जरीपटक्यावरच चाल केली. तेव्हां सर्वत्र धुंद झाली. गिलच्याच्या तोफांचा व बंदुकांचा मारा फार होऊं लागला. तेव्हां जिवाची तमा सोडून उभयतां पाटीलबावा निशाण बचावण्यासाठीं झोंबूं लागले. जागा फार अडचणीची, नदी तीर, बेरणीचीं बेटें, ह्यांत मराठे अडकले. हत्तीवरील आठवी घटका वाजली तों जनकोजीच्या दंडास गोळी लागून तो बेशुद्ध पडला. तें पाहतांच दत्ताजीनें जोरानें गिलच्यांवर घोडे घातले. इतक्यांत यशवंत जगदळे पडला. त्याचें प्रेत काढण्यास दत्ताजी गेला, तों उजव्या बरगडींत गोळी लागून हा ठार झाला. ह्याचा नोकर राजाराम चोपदार यानें यमुनेच्या कांठीं दत्ताजीचें शव दहन केलें. मराठ्यांच्या इतिहासांत जे हृदयद्रावक व शौर्याचे प्रसंग घडले, त्यांपैकीं दत्ताजीचा हा प्रसंग होय. पानपतच्या प्रचंड संहारानें दत्ताजीचें हें अचाट कृत्य लोपून गेलें आहे. गनिमी कावा सोडला व जनानखाना बरोबर बाळगला ह्यामुळें हा शत्रूच्या तावडींत सांपडला. जखमी होऊन मृत्युमुखीं पडल्यावर दुराणी सेनापति कुतुब यानें दत्ताजीस हिणवून विचारलें, "पटेल! हमारे साथ लढेंगे?" यावर "हां! बेशक! बचेंगे तो और भी लढेंगे!" असें या वीरानें उत्तर दिलें व प्राण सोडला, अशी आख्यायिका आहे. (मृत्युकाल पौष वद्य १ संक्रांति, शके १६८१).

**दत्तात्रेय**—एक देवता. अत्रि ऋषीस अनसूयेपासून झालेल्या दहा मुलांपैकीं एक मुलगा. हा ब्रह्मदेव, विष्णु व शिव यांच्या अंशापासून झाला. या अवताराचा विशेष गुण म्हणजे क्षमा हा होय. यानें यज्ञक्रियांसहित वेदांचें पुनरुज्जीवन केलें. चातुर्वर्ण्याची पुनर्घटना केली व सर्वत्र अधर्माचा अंधःकार होता, त्याचा समूळ नाश केला. हेंच त्याचें अवतारकार्य होय. यानें संन्यासपद्धतीचा प्रसार केला.

हा ब्रह्मनिष्ठ होता. याला धर्माचें दर्शन झालें होतें. याचे अलर्क, प्रल्हाद, यदु व सहस्रार्जुन हे शिष्य होते. त्यांना यानें ब्रह्मविद्येचें ज्ञान दिलें. यानें अलर्कास आत्मनिरूपण, योगनिरूपण, योगधर्म, योगिचर्या, योगिसिद्धि व निष्कामबुद्धि यांसंबंधीं उपदेश केला.

दत्ताचे आश्रम गिरिनार व सह्याद्रि पर्वतावर आहेत. याच्या नांवावर 'दत्तगीता' नांवाचा वेदांतविषयक ग्रंथ आहे. सध्यां ब्रह्माविष्णुमहेशात्मक व परब्रह्मस्वरूप अशा प्रकारें दत्ताची उपासना चालते. याला निमि नांवाचा पुत्र होता. हा सह्याद्रि पर्वतावर राहत असे. तेथें यानें सहस्रार्जुनास माघस्नानाचें माहात्म्य सांगितलें.

सध्यां दत्तजयंती मार्गशीर्ष शु॥ चतुर्दशीला दुपारीं व रात्रीं, पौर्णिमेला पहांटे, तिन्हीसांजा व रात्रीं बारा वाजतां अशी वेगवेगळी करण्याचा प्रघात आहे. गुरुवार हा दत्ताचा वार मानून दत्तभक्त त्या दिवशीं उपास व पूजाअर्चा करतात.

दत्ताचे दासोपंत संप्रदाय, महानुभाव संप्रदाय, गोसावी संप्रदाय व गुरुचरित्र संप्रदाय असे वेगवेगळे संप्रदाय आहेत. आज दत्तात्रेयाला तीन तोंडें व सहा हात दाखवितात, पण नेपाळ,

वगैरे ठिकाणीं त्याला एक तोंड व दोन हात आहेत. महानुभावांतदेखील असेंच ध्यान आहे. दत्तभक्त 'गुरु-चरित्र' वाचतात व औदुंबर, गाणगापूर व नरसोबाची वाडी या क्षेत्रांची यात्रा करतात.

**दधीचि**—एक ऋषि. याचीं दध्यच् व दधीच हीं नांवें रूढ आहेत. हा अथर्वकुलांतील होता. इंद्रानें दध्यच् ऋषीला प्रवर्ग्य विद्या व मधुविद्या शिकविल्या व ह्या विद्या कोणाला शिकविल्यास तुझा शिरच्छेद करीन असें त्यानें सांगितलें.

अश्विदेवांनीं दध्यच् ऋषीचें मस्तक तोडून तेथें घोड्याचें मस्तक बसविलें व त्यापासून सर्व विद्या संपादन केल्या. तेव्हां इंद्रानें दध्यच्चें मस्तक तोडिलें, पण अश्वींनीं त्याचें पहिलें मस्तक त्याला जोडिलें. हा एक ज्ञाता आचार्य म्हणून याची माहिती पुष्कळ ठिकाणीं आली आहे.

वृत्रासुराला मारण्यासाठीं स्वतःचीं हाडें देणारा हा ऋषि. वृत्रासुराला कसें मारावें, याबद्दल देव विष्णूला विचारावयास गेले असतां विष्णूनें त्यांस सांगितलें कीं, इंद्रानें दधीचीचीं हाडें मागून त्वष्ट्याकरवीं त्याचें वज्र करून त्यास मारावें. तीं हाडें अश्विनीकुमारांनीं मागावीत, अशी विष्णूची सूचना होती. कांहीं पुराणांत देव वृत्रास मारण्यासाठीं शस्त्रें मागण्यास आले असतां 'मीं तीं गिळून टाकलीं आहेत. यास्तव तुम्ही माझीं हाडें घ्या', असें हा म्हणाल्याची माहिती आहे. नंतर देवांनीं प्रार्थना केल्यावरून दधीचीनें योगबलानें प्राणत्याग केला. पण त्याचीं हाडें काढण्याकरितां त्वष्टा त्याजवर हत्यारें चालवीना. तेव्हां गाईचें तोंड वज्रासारखें कठिण करून तिजकरवीं त्याचें मांस खावविलें. नंतर त्वष्ट्यानें हाडें घेऊन षट्कोणी वज्र व इतर हत्यारें बनविलीं.

**दधीन**—(केसीन). अम्ल पदार्थांमुळें दूध नासून जो सांका तयार होतो तो. दुधांतील नत्रयुक्त पदार्थ बहुतेक केसीनमध्यें असतात. ह्यांत कर्ब शेंकडा ५३·१३, उज्ज ७·०६, नत्र १५·७८, प्राण २२·४०, गंधक ०·७७, आणि स्फुर ०·८६ या प्रमाणांत असतात.

**दनु**—दक्षाची मुलगी व कश्यपाची स्त्री. हिच्या शंभर पुत्रांस दानव असें म्हटलेलें आहे. त्यांचीं इंद्रजित्, एकचक्र, अश्वशिरा, वातापि, वृषपर्वा, शकुनि, शंबर, हिरण्यकशिपु, इत्यादि नांवें आहेत.

**दनु**—वरचा ब्रह्मदेश व शान संस्थानें यांमधील प्रदेशांत राहणारे मिश्र शान-ब्रह्मी लोक. बहुतेक लोक मंडाले जिल्ह्यांत व उत्तर आणि दक्षिण शान संस्थानांत राहतात; व त्यांच्या बोलण्याच्या भाषेवरून या लोकांचे 'ब्रह्मी दनु' व 'शान दनु' असे दोन भाग पडले आहेत. राहणींत व इतर बाबतींत हे लोक शान व ब्रह्मी लोकांसारखेच दिसतात, व थोडे थोडे बौद्ध लोकांसारखेहि आहेत.

**दप्तरदार, विठोबाअण्णा** (१८१३-१८७३)—एक मराठी कवि, प्रवचनकार व ग्रंथकार. हे मोगलाईतील गुलबर्ग्याजवळच्या बेदरचे राहणारे म्हणून हे आपलें नांव बेदरे लावीत. यांचे आजे बाळाजीपंत यांना दप्तरदारीची सनद मिळाली व मग यांचें आडनांव 'दप्तरदार' पडलें. गुंडाचार्य घळसासी व नारायणाचार्य गजेंद्रगडकर हे यांचे गुरु होत.

यांनीं मराठीपेक्षां संस्कृतमध्येंच जास्त ग्रंथ केलेले आहेत. मोरोपंतांच्यानंतर जुन्या पद्धतीनें कविता करणाऱ्यांत यांचाच क्रमांक वर लागेल. यांच्या 'सुश्लोकलाघवां'तील श्लोकांच्या साहाय्यानें हरदास लोक कीर्तनाला फार रंग आणतात. संस्कृताप्रमाणें मराठींत यांनीं जरी मोठें काव्य लिहिलें नाहीं तरी यांच्या उपलब्ध मराठी कवितांच्या अवलोकनावरून मराठी कवि या नात्यानें यांची योग्यता श्रेष्ठ आहे. यांच्या कवितेंत विद्वत्ता, रसिकता, प्रेम, भक्ति, कोटिबाजपणा, वगैरे गुण असल्यामुळें ती वाचतांना रसिकांच्या चित्तवृत्ती आकर्षिल्याखेरीज राहत नाहींत.

'विधवाविवाह सशास्त्र कीं अशास्त्र' या स. १८६८ त शंकराचार्यांच्यापुढें झालेल्या वादांत यांनीं प्रामुख्यानें भाग घेऊन त्याकरितां श्रुतिस्मृतींतील वचनांनीं युक्त असा 'विवाहतत्त्व' नांवाचा ग्रंथ तयार केला. 'पदसंग्रह' हाहि यांनीं प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांपैकींच एक ग्रंथ आहे.

यांचे संस्कृत ग्रंथ—१ शिवस्तुति, २ गजेंद्र चंपू, ३ सुश्लोकलाघव, ४ हेतुरामायण, ५ प्रबोधोत्सवलाघव, ६ प्रयोगलाघव, ७ नित्यक्रमलाघव, ८ संकल्प, ९ रामतापिनी, १० साधुपार्षदलाघव, ११ एकादशीविचार, व १२ विवाहतत्त्व.

**दप्तरी, डॉ. केशव लक्ष्मण** (इ. स. १८८०- )—एक हिंदी गणितज्ञ, लेखक, संशोधक व बुद्धिप्रामाण्यवादी ग्रंथकार. हे नागपूरचे राहणारे. बी. ए., एल्‌एल्‌.बी. झाले असून धंदा होमिओपाथी वैद्यकीचा करितात. ह्यांनीं संशोधनपूर्ण ज्ञानांत भर घालणारे ग्रंथ पुष्कळ लिहिले आहेत. उपनिषदांचा अभ्यास करून त्यांनीं उपनिषदांवर आणि व्याससूत्रावर टीका लिहिली आहे व उपनिषदांवर एक निबंध लिहून त्याचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. यांचे बरेच ग्रंथ अप्रकाशित आहेत. सूक्ष्म गणितांत यांची गति अकुंठित चालते. यांचा 'भारतीय युद्धकालनिर्णय' हा प्रबंध स. १९१८ सालीं विविधज्ञानविस्तारांतून प्रसिद्ध झाला. आणि यांच्याकडे लो. टिळक व श्री. कृ. कोल्हटकर यांच्यासारख्यांचें लक्ष वेधलें. लो. टिळकांनीं आपल्या शुद्धपंचांगाकरितां 'करणकल्पकता' नांवाचा संस्कृत ग्रंथ यांना करण्यास

सांगितला ( १९२० ) व तो ग्रंथ दत्तरींनीं चांगला तयार करून दिला.

शं. बा. दीक्षित यांच्या 'भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास' या महत्त्वाच्या ग्रंथांत कालनिर्णयाच्या दृष्टीनें अनेक हस्तलिखित ग्रंथांची पाहणी केलेली असली तरी त्यांतील ज्योतिर्गणिताचें सांगोपांग विवेचन त्यांत केलेलें नाहीं. तें काम 'भारतीय ज्योतिःशास्त्र निरीक्षण'. या आपल्या ग्रंथांत यांनीं केलें. यांच्या विद्वत्तेचा गौरव नागपूर विद्यापीठानें यांना एल्एल्. डी. पदवी देऊन केला.

हे पूर्ण बुद्धिवादी सुधारक आहेत. धर्मनिर्णय मंडळाचे ते प्रमुख कार्यकर्ते आहेत. त्यांची रोगचिकित्साहि परिणामकारक असते.

**दफन**—माणूस मेल्यावर त्याला जमिनींत पुरण्याची पद्धति फार प्राचीन व स्वाभाविक आहे. रानटी लोक अद्यापि प्रेतें तशींच टाकून देऊन हिंस्र पशुपक्ष्यांकडून खाववितात. पारशांसारख्या कांहीं सुधारलेल्या समाजांतहि ही चाल अद्यापि टिकून आहे. चांगल्या तऱ्हेनें मसाला भरून प्रेतें पुरण्याची प्रथा मिसरी लोकांत असे. त्यांच्या 'ममी' प्रसिद्धच आहेत. रोमन आणि ग्रीक लोकांनीं दफनाबरोबर दहनाचीहि चाल पाडली. ख्रिस्ती धर्माच्या वाढीबरोबरच पुरण्याच्या स्वतंत्र जागा राखून ठेवण्यांत येऊं लागल्या. देवळाच्या आवारांतच ही जागा नियुक्त होऊं लागली. मुसलमान लोकांतहि सर्रहा पुरण्याची चाल आहे. हिंदू लोकांत कांहीं खालच्या जातींतून प्रेतें पुरतात. दांत न आलेल्या सर्व मुलांचीं प्रेतें पुरण्यांतच येतात. अलीकडे पुरण्यापेक्षां जाळण्याकडे सुधारलेल्या समाजांची प्रवृत्ति होत आहे. ( प्रेतदहन पाहा ).

**दमण**—मुंबई इलाख्यांतील खंबायतच्या आखाताच्या मुखाशीं असलेली पोर्तुगीज वसाहत. हींत दमण व नगरहवेली असे दोन एकमेकांपासून तुटलेले भाग आहेत. ही वसाहत मुंबईच्या उत्तरेस १०० मैल असून नगरहवेली परगणा धरून क्षेत्रफळ १४९ चौ. मै. भरेल. उत्तरेस भगवान् नदी, पूर्वेस ब्रिटिश सरहद्द, दक्षिणेस कलेम नदी, व पश्चिमेस खंबायतचें आखात आहे. दमण हें गांव पोर्तुगीजांनीं १५३१ सालीं लुटलें, पण तेथील रहिवाशांनीं तें पुनः वसविलें व पुनः १५५८ सालीं पोर्तुगीजांनीं घेतलें. खुद्द दमणचें क्षेत्रफळ २२ चौ. मैल असून २६ खेड्यांचा ह्यांत समावेश होतो. लोकसंख्या ( १९३१ ) १९,७४१. नगरहवेली परगणा पूर्वेस वसलेला असून क्षेत्रफळ ६० चौ. मैल आहे. लोकसंख्या ( १९३१ ) ३८,२६०. हा परगणा मराठ्यांनीं पोर्तुगीजांस दिला.

जमीन ओलसर असून सुपीक आहे. नगरहवेली परगण्यांतील जमीन तर चांगल्यापैकींच आहे. तांदूळ व गव्हाचें पीक मुख्य आहे. नगरहवेली परगण्यांत चांगलें जंगल आहे. ह्या जंगलांत ⅔ भागांत सागवान लांकूड आहे. पोर्तुगीज लोकांची हिंदुस्थानांतील सत्ता कमी होण्याच्यापूर्वी दमण हें व्यापारी दृष्टीनें फार भरभराटीचें ठाणें होतें व बहुतेक सर्व व्यापार आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्याशीं चालत असे. १८१७–१८३७ सालीं चीन देशाशीं मोठ्या प्रमाणावर अफूचा धंदा सुरू करण्यांत आला. परंतु सिंध प्रांतावर इंग्रजांचा ताबा बसल्यामुळें त्यांनीं अफूचा व्यापार बंद केला. व तेव्हांपासून दमणची सांपत्तिक स्थिति खालावली.

राज्यकारभारासाठीं हा सर्व प्रदेश एकच जिल्हा मानिला आहे. ह्या भागावर पोर्तुगीज गव्हर्नरची नेमणूक असून त्याच्यावरचा अधिकारी गोव्याचा गव्हर्नर जनरल आहे. नगरहवेली परगण्याचा कांहीं भाग ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत आहे. येथें दोन किल्ले असून दमणगंगा नदीच्या दोन्ही तीरांवर दोन असे आहेत. पैकीं एकांत गव्हर्नरचें राहण्याचें ठिकाण, मिलिटरी बराकी, दवाखाना, कोर्टहाउस, जेल, वगैरे आहेत. दुसऱ्यांत एक चर्च, एक पाद्री–घर व एक मृतांस मूठमाती देण्याची जागा आहे. दुसरा किल्ला पहिल्यापेक्षां लहान आहे. दोन्ही किल्ल्यांच्या तटावरून पितळेच्या व लोखंडी तोफा रोवून ठेवलेल्या आहेत.

**दमयंती**—एक पौराणिक राज्ञी. विदर्भदेशाधिपति भीमराजास संतति नव्हती. दमन नामक ऋषीच्या आशीर्वादानें भीमराजास तीन पुत्र व दमयंती नांवाची कन्या झाली. दमयंतीनें आपल्या अद्वितीय सौंदर्यानें सर्व सुंदर स्त्रियांचा गर्व हरण केला, म्हणून हिला दमयंती नांव पडलें. एका सुवर्णवर्ण हंसाकडून हिनें नल राजाचे गुण ऐकले व त्या हंसामार्फत हिनें आपलें प्रेम नलाला कळविलें. पुढें स्वयंवर होऊन त्यांत जमलेल्या इंद्र, वरुण, अग्नि, यम, वगैरे देवांना सोडून हिनें नलाला वरिलें. त्यापासून हिला इंद्रसेन व इंद्रसेना हीं दोन मुलें झालीं. पण हिला व नलाला राज्यसौख्य फार वर्षे लाभलें नाहीं. कारण पुढें द्यूतामध्यें नल आपलें सर्व ऐश्वर्य व राज्य हरला. त्यामुळें नल व दमयंती यांना एका वस्त्रानिशीं वनांत जावें लागलें. या वनवासांतहि यांच्यावर अनेक संकटें आलीं. यामुळें वैतागून नल दमयंतीला, ती निजली असतां, सोडून गेला. पुढें हिला एका अजगरानें गिळिलें असतां एका भिल्लानें सोडविलें. नंतर ही एका सार्थवाहांच्या तांड्याबरोबर चेदीपुरास आली व सैरंध्री हें नांव धारण करून राहूं लागली. इकडे भीमराजानें नल-दमयंतीच्या शोधार्थ दूत रवाना केले होते. त्यांपैकीं एक चेदीपुरास आला होता. त्यानें दमयंतीस ओळखलें व तिला विदर्भ देशांत नेलें. नल परत यावा म्हणून हिनें दुसरे स्वयंवर जाहीर केलें. त्या प्रसंगीं नल व दमयंती यांचें पुनर्मीलन झालें व यांचें पुढील आयुष्य पूर्ण सुखांत गेलें.

नल-दमयंती कथानकावर अनेक कवींचीं काव्यें आहेत. मराठींत रघुनाथ पंडितांचें काव्य प्रसिद्धच आहे.

**दमा**—या रोगांत मनुष्यास श्वास घेण्यास अडचण वाटूं लागते व पुन्हां पुन्हां छातीमध्यें बांध बसल्यासारखें वाटून फुफ्फुसामध्येंहि बांध बसल्यासारखा वाटतो. तसेंच खोकला येऊं लागून तो प्रथम घोगरा व नंतर अधिकाधिक मोकळा येऊं लागतो. आणि अखेरीस कफाचा बेडका बाहेर पडून घसा मोकळा झाल्यासारखा वाटतो; या लक्षणांस दमा म्हणतात. हा विकार लघुश्वासनलिकेचे जे स्नायू आहेत त्यांस आंचके बसल्यामुळें होतो. हा विकार बहुधा उतारवयांतील लोकांना होतो. व कांहींस तो वंशपरंपरेनें येतो. या रोगानेंच केवळ मृत्यु येत नाहीं; परंतु त्यापासून उदर, क्षय, वगैरेसारखे रोग उत्पन्न होतात.

दम्याचा झटका कांहीं मिनिटांइतका लहान तर कांहीं दिवस टिकणारा मोठा असतो. प्रोत( प्रोटीन )युक्त खाद्यपदार्थांपासून कांहींना झटका येतो. तर कांहींना दुसऱ्याच पदार्थांपासून येतो. रोग्यानें खाणें बेतानें ठेवणें बरें. कांहींना शहरांत बरें वाटतें तर कांहींना खेड्यांत राहण्यानें गुण येतो. एकाचें औषध दुसऱ्याला लागू पडत नाहीं. लहान वयांत दमा झाल्यास ग्लूकोज उपयोगी पडतें. क्ष-किरण, अति नील किरण, नाकांतील त्वचा जाळणें, आंतडीं शुद्ध करणें, इ. उपाय करतात.

**दमाजी गायकवाड** ( मृत्यु १७२० )—१. हा गायकवाड घराण्याचा मूळ पुरुष. याचें राहण्याचें गांव पुणें जिल्ह्यांत दावडी हें असून हा दाभाड्याच्या सैन्यांत एक सरदार होता. स. १७२० त बाळापूर येथें झालेल्या लढाईंत विशेष पराक्रम केल्यामुळें यास शाहूमहाराजांनीं 'समशेरबहाद्दर' ही पदवी दिली. त्याचप्रमाणें सेनापतीच्या मुतालकीच्या कामावर याची नेमणूक केली.

२. ( मृ. १७६८ )—पहिल्या दमाजीचा पुतण्या पिलाजी याचा हा मुलगा. डभईच्या लढाईंत हा होता. यानें पिलाजीच्या मृत्यूनंतर गुजराथचे पश्चिम जिल्हे काबीज केले व जोधपूरपर्यंत स्वाऱ्या केल्या. यानें कंठाजी बांडे यास गुजराथेंतून हांकून लाविलें व गुजराथच्या सुभेदारास मदत करून अहमदाबादेचा अर्धा वांटा मिळविला व काठेवाडांतहि हक्क ठेवला. दमाजीनें माळव्यावर स्वारी करून पेशव्यांची कांहीं खंडणी वसूल केली होती व तीबद्दल पेशवे असंतुष्ट होते. तसेंच दमाजी हा ताराबाईच्या पक्षास मिळाला होता. तेव्हां नानासाहेबानें त्याला सहकुटुंब कैद केला ( १७५२ ). तेव्हां दमाजीनें पेशव्यांशीं तडजोड करून घेतली ( १७५४ ). या तडजोडीमुळें गायकवाडी मुलुखांतील अर्धा हिस्सा पेशव्यांस मिळाला. दमाजी पानपतावर होता व तेथून होळकरामागून त्यानेंहि पाय काढला. पुढें मात्र हा राघोबाच्या पक्षास मिळाला नाहीं.

**दमाजी थोरात**—एक मराठा सरदार. हा हिंगणगांवचा राहणारा. हा रामचंद्रपंत अमात्याच्या पदरीं लष्करांत नोकर होता. जिंजीच्या वेढ्याच्या प्रसंगीं अमात्यानें त्याला सुपे व पाटस प्रांतीं जहागीर दिली. शाहूच्या वेळीं हा कोल्हापूरच्या पक्षांत गेला. पुण्याच्या पूर्वेस २० कोसांवर पाटसजवळ हिंगणगांव ( हिंगी ) येथें हा राही; व सभोंवतालच्या १५।२० कोसांत कोल्हापूरच्या नांवानें धुमाकूळ घालून खंडणी वसूल करी ( १७१३ ). पुढें बाळाजी विश्वनाथ यास शाहूनें याच्यावर धाडलें असतां यानें त्याला बेलभंडार देऊन घरीं बोलाविलें व विश्वासघातानें कैद केलें. त्याच्याजवळून खंडणी काढण्यासाठीं राखेचे तोबरे त्याला दिले. पुढें पुरंदरे व पिलाजी जाधव यांनीं जामीनकी भरून व खंडणी देऊन बाळाजीस सोडविलें. या कैदेंत बाळाजीचीं बायकामुलेंहि होतीं ( १७१४ ). पुढें शाहूनें नारोपंत सचिवास दमाजीवर पाठविलें, परंतु दमाजीनें त्यालाहि कैद केलें. शाहूनें दंड भरून त्याला सोडविलें. अखेर शाहूनें दमाजीस आपल्या भेटीस जेजुरी येथें बोलवून त्याची समजूत करण्याचा फार प्रयत्न केला, पण त्यानें उलट उद्दामपणा दाखविला. विश्वास दाखवून त्याला आणल्यानें कैद न करतां शाहूनें त्याला निरोप दिला ( १७१६-१७ ). शेवटीं बाळाजीनें सय्यदांची कुमक आणून दमाजीवर स्वारी केली व त्याचा पराभव केला. दमाजीस कैद करून पुरंदरच्या किल्ल्यावर ठेवण्यांत आलें. हिंगणगांवची गढी पाडून गांवावर गाढवाचा नांगर फिरविला ( १७१८ ). पुढें शाहूच्या इच्छेवरून याला सोडून दिलें. परंतु पुनः यानें बंड केल्यामुळें यास परळी येथें ठेविलें व शेवटीं तेथेंच हा मरण पावला.

**दमास्कस**—हें सीरियांतील मुख्य शहर असून त्याच नांवाच्या प्रांताची राजधानी आहे. सध्यां अस्तित्वांत असलेल्या सर्वांत जुन्या शहरांपैकीं दमास्कस हें एक होय. आब्राहामच्या संबंधांत या शहराचें नांव जुन्या करारांत येतें. खिस्तपूर्व ३३३ त हें शहर फितुरीनें अलेक्झांडरचा सेनापति पारमेनिओ याच्या ताब्यांत गेलें. तेथेंच दरायसचा खजिना व जनानखाना होता. अलेक्झांडरनंतर गादीबद्दल तंटे सुरू झाले त्या वेळीं हें शहर इजिप्शियनांच्या ताब्यांत होतें. ख्रि. पू. ६३ त सीरिया हा रोमन प्रांत झाला. नव्या करारांत सेन्ट पॉलच्या संबंधांत या शहराचा उल्लेख आहे. ख्रिस्ती धर्मस्थापना झाल्यावर दमास्कस येथें बिशप नेमण्यांत आला. आर्केडियसनें येथील मोठ्या देवळाचें चर्च बनविलें. इ. स. ६३५ त दमास्कस हें खालिद इब्न वालीदनें जिंकिलें. चौथा खलीफ अली याचा खून झाल्यावर त्याच्यानंतरच्या खलीफ मोआवियानें खलीफची गादी मक्केहून दमास्कसला आणिली. या उमयीद घराण्यानें ९० वर्षे राज्य

केल्यावर अब्बासी घराणें आलें. त्यानें मेसापोटेमियांत राजधानी नेली. ११२६ त क्रूसेडर धर्मयोद्धयांनीं दमास्कसवर हल्ला केला. हें सलादिनचें फ्रँक लोकांबरोबरच्या युद्धाच्या वेळीं मुख्य ठाणें होतें. १३९९ त तैमूरनें हें शहर लुटलें. १५१६ त सुलतान सेलिमनें हें शहर जिंकून ओटोमन साम्राज्यास जोडलें. १८३२ त ईजिप्तचा इब्राहिम पाशा यानें दमास्कस घेतलें. १८४० त मित्रसंघानें इजिप्शियनांना हांकून दिलें. १८६० त मुसलमानांनीं ख्रिस्ती लोकांची येथें कत्तल केली होती.

दमास्कस शहराची लो. सं. (१९४३) २,८६,३१० आहे. हें ॲंटीलेबाननच्या पायथ्याशीं समुद्रसपाटीपासून २,२५० फूट उंच वसलेलें आहे. बरदा नदी दमास्कसच्या मधून वाहत जाते. येथील जमीन फार सुपीक आहे. येथें एल्-मलिक एल् अश्रफनें १२१९ त बांधलेला एक किल्ला आहे. आर्केडियसनें, सेंट जॉन दि बॅप्टिस्टच्या नांवानें बांधलेल्या चर्चचें मशिदींत रूपांतर पहिला खलीफ वालिद ह्यानें (इ.७०५-७१७) केलें. व्यापारांत अजून देखील दमास्कसचें महत्त्व आहे. सीरियांतून मक्केला जाणारे यात्रेकरू येथूनच जातात. येथें रेशीम, कापड, सोन्या-चांदीचे दागिने, व इतर नक्षीचें काम तयार होतें. हें बैरुट व मेझ यांशीं रेल्वेनें जोडिलें आहे. १९२३ मध्यें स्थापलेलें सीरियन विद्यापीठ आहे. तसेंच एक अरबी विद्यामंदिरहि आहे. १९२५ सालीं फ्रेंचांनीं यावर तोफांचा भडिमार करून शहर उध्वस्त केलें. हें मुसलमानांचें एक क्षेत्र आहे.

**दमास्कस पोलाद**—हें एक प्रकारचें पोलाद असून पूर्वी दमास्कस येथें होत असे. याच्या तलवारी चांगल्या होत. शुद्ध लोखंड आणि पोलाद यांपासून बनलेला हा कातळी (लॅमिनेटेड) धातु असून नेहमीच्या प्रमाणापेक्षां यांत कर्ब बराच ज़ास्त असतो.

**दमो**—मध्यप्रांत, सागर जिल्हा, एक तहशील. १९३२ पर्यंत दमो जिल्हा होता. हा जिल्हा मध्यप्रांताच्या अगदीं उत्तरेकडे असून विंध्य पठाराचा एक भाग आहे. उत्तरेकडील बाजूला दमो हा जिल्हा उतरता होत गेला असून त्याच बाजूला सर्व नद्या वाहतात. जिल्ह्यांत गोंड लोकांची वस्ती आहे.

दहाव्या शतकात हा जिल्हा महोबा घराण्यांतील चंदेल रजपुतांच्या ताब्यांत होता व नोहता त्यांची राजधानी होती. दमो गांवांतील एका दरवाजावरच्या फारसी लेखावरून १३८३ सालीं हा जिल्हा दिल्लीच्या तुघलख घराण्याच्या ताब्यांत होता असें दिसतें. अकबराच्या वेळीं हा जिल्हा मोगलांच्या ताब्यांत गेला; नव्वद वर्षांनंतर येथील मोगल सैन्य मराठ्यांच्या विरुद्ध लढण्याकरितां गेलें असतां पन्नाच्या बुंदेल राजानें सागर व दमो हे जिल्हे आपल्या विस्तीर्ण राज्यास जोडले. बुंदेल्यांचें राज्य येथें सुमारें ६० वर्षे होतें, परंतु दक्षिणेकडील लोधी व गोंड सरदार बहुतेक स्वतंत्रच होते. १७२९ सालीं छत्रसाल यानें राज्यावर स्वारी येईल या भीतीनें पेशव्यांची मदत मागून त्यांना राज्याचा तिसरा हिस्सा देऊं केला. त्यामध्यें सागर जिल्हा मराठ्यांस मिळाला. पुढें सागरचा सुभेदार गोविंदपंत बुंदेले यानें आपली सत्ता दमोवर स्थापन केली. मराठ्यांचें राज्य खालसा झाल्यावर (१८१८) हे दोन्ही जिल्हे ब्रिटिश सरकारकडे आले.

रजपूत, गोंड, मुसलमान व मराठे या लोकांनीं बांधलेल्या किल्ल्यांचे अवशेष या जिल्ह्यांत आहेत. बहुतेक सर्व लोक बुंदेली भाषा बोलतात. दमोची मातीचीं व कांशाचीं भांडीं प्रसिद्ध आहेत. विड्याचीं पानें व शिंगाडे होतात. गहूं व गळिताचीं धान्यें हे येथील मुख्य निर्गत जिन्नस आहेत. सागवानी लांकूड, लाख व तूप हेहि जिन्नस बाहेर पाठविले जातात. सुती कापड, केरोसिन तेल, मीठ व साखर हे मुख्य आयात जिन्नस आहेत. दमो हें गांव तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. हें बीना-कटनी रेल्वेवर आहे. मुंबईहून ७०२ मैल दूर आहे. नरवरचा राजा नल ह्याची पत्नी दमयंती हिजवरून दमो नांव पडलें असावें असें वाटतें. लोकसंख्या सु. वीस हजार.

**द म्वाव्रे, आब्राहाम** (१६६७-१७५४)— एक फ्रेंच गणितशास्त्रज्ञ. एडिक्ट ऑफ नांतेस् रद्द झाल्यावर तो लंडनमध्यें येऊन राहिला. याच्या नांवाचा सिद्धान्त पृथक्करणात्मक त्रिकोणमिति (ॲनालिटिकल ट्रिगॉनॉमिट्री) या गणितक्षेत्रांतील एक महत्त्वाचा सिद्धान्त आहे. त्याचे बरेच ग्रंथ आहेत. त्यांपैकीं 'दि डॉक्ट्रिन ऑफ चान्सेस, ऑर ए मेथड ऑफ कॅल्क्युलेटिंग दि प्रॉबॅबिलिटीज् ऑफ इव्हेंट्स' (प्रसंगांची संभाव्यता मोजण्याची एक तऱ्हा) हा एक आहे.

**दयानंद सरस्वती** (१८२४-१८८३)— आर्यसमाजाचे संस्थापक व एक हिंदुधर्मोद्धारक. यांचा जन्म मोर्वी संस्थानांतील औदिच्य ब्राह्मण कुळांत झाला. यांचें मूळ नांव मूलशंकर. यांचे वडील अंबाशंकर हे चांगले जमीनदार असून सावकारी करीत. ते कट्टे शैवमतानुयायी असून स्वभावानें निग्रही व सत्यप्रिय होते. वडिलांच्या शिकवणीनें मूलशंकर हा निःसीम शैवपंथीय बनला. पण वयाच्या तेराव्या वर्षी, माघ वद्य चतुर्दशीस शिवरात्रीच्या दिवशीं प्रचलित मूर्तिपूजेचें वैयर्थ्य पटण्यासारखा दाखला त्यास मिळाला. त्या रात्रीं त्यास शिवाच्या मूर्तीवर उंदीर संचार करीत असलेले आढळले. त्यावरून 'ज्याची आपण दिवसभर कथा ऐकली तो पुराणवर्णित देवांचा देव कैलासपति विश्वकर्ता महादेव वेगळा असला पाहिजे व त्याचीच पूजा प्रत्येकानें करावयाची आहे,' अशी त्यास स्फूर्ति झाली. त्याचप्रमाणें पुढें लवकरच त्याची बहीण व प्रेमळ चुलता वारला.

त्यामुळें आपण कोण, आलों कशाकरितां, जायचें कुठें, अमरत्व कशानें प्राप्त होईल, वगैरे अनेक प्रश्न मूलशंकराच्या मनापुढें राहिले. शेवटीं या सर्वांचीं उत्तरें वेदाध्ययनानें मिळतील अशी त्याची ठाम खात्री झाली व त्याप्रमाणें आजन्म ब्रह्मचारी राहून वेदाध्ययन करण्याचा बेत त्यानें आपल्या वडिलांस कळविला. वडिलांना हा बेत पसंत पडला नाहीं. त्यांनीं त्याला धाकदपटशा दाखविल्यावर त्याचा विवाहहि ठरवून टाकला, पण मूलशंकरानें कांहींहि न जुमानतां गृहत्याग केला. त्यानें काशी, बडोदें, अहमदाबाद, वगैरे अनेक ठिकाणीं सद्गुरूचा शोध चालविला व ज्याच्यापासून जितकें शिकतां येईल तितकें निस्सीम आस्थेनें हस्तगत केलें. लवकरच स्वामी पूर्णानंद नांवाच्या एका विद्वान् महाराष्ट्रीय संन्याशाच्या हस्तें संन्यासदीक्षा घेतली व 'स्वामी दयानंद' हें नांव धारण केलें.

सद्गुरूचा शोध करतां करतां शेवटीं त्यांस मथुरेस विरजानंद नांवाचे एक विद्वान् संन्यासी लाभले. दयानंदांनीं या गुरुजींचें शिष्यत्व पत्करतांच त्यांनीं त्यास प्रथम आज्ञा केली ती— "तुला सत्यासत्याची जर खरी चिकित्सा करावयाची असेल तर महाभारतापूर्वीचें जें संस्कृत वाङ्मय आहे तें अत्यंत उच्च दर्जाचें असून तें निर्विकारी, निःपक्षपाती मुनींच्याद्वारें प्रकट झालें आहे, त्याचा संपूर्ण अभ्यास कर." दयानंदांनीं स्वामींची आज्ञा शिरसावंद्य मानून गुरुजींजवळ वेदाचा अभ्यास अडीच वर्षें केला. विद्या संपवून दयानंद निघून जातांना गुरुजींनीं त्यास पुढील-प्रमाणें उपदेश केला—"अज्ञानानें, दुःखानें आणि पाखंडीपणानें मनुष्यसमाज जातीजातीच्या अहंकारांत व मतवैचित्र्यांत फसून सर्वस्वीं छिन्नभिन्न झाला आहे, तो अधःपातास गेला आहे, त्याला सत्याची चाड वाटेनाशी झाली आहे, तरी तूं येथून जाऊन जगाला आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक ज्ञानाची पाणपोई दाखवून शुद्ध, सच्चिदानंद एकच जो परमेश्वर त्याची स्तुति, प्रार्थना व उपासना शिकीव. त्याचें शुद्ध, पवित्र व मोक्षदायक तेजस्वी असें जे सनातन ज्ञान वेद त्याची ओळख करून दे."

आणि स्वामी दयानंदांनीं आपल्या आयुष्यांत हेंच करण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं सर्व उत्तर हिंदुस्थानांत प्रवास करून आपल्या अगाध विद्वत्तेनें व प्रभावशाली वक्तृत्वशक्तीनें वैदिक ज्ञानाचें उज्ज्वल स्वरूप लोकांपुढें मांडून, धर्माच्या नांवाखालीं चाललेलीं दुष्कृत्यें उजेडांत आणून तीं काढण्याची प्रवृत्ति लोकांत निर्माण केली. त्यांनीं प्रचलित मूर्तिपूजेविरुद्ध शस्त्र उगारलें, गोवधाविरुद्ध चळवळ केली व अनेक ख्रिश्चन मिशनरी व मुसलमान मौलवी यांना वादांत जिंकून आर्यधर्माचें श्रेष्ठत्व मुद्देसूदपणें पटवून दिलें. 'शुद्धी'ची पहिली चळवळ त्यांनीं केली व तीहि प्रत्यक्ष कांहीं लोकांची शुद्धि करून.

दयानंदांनीं १८८३ पर्यंत अनेक महत्त्वाच्या गोष्टी केल्या: (१) आर्यधर्माचा उपदेश करीत सर्व हिंदुस्थानभर हिंडले. (२) इ. स. १८७५ च्या १० एप्रिल रोजीं आर्यसमाज स्थापन केला. (३) इ. स. १८७८–१८८१ या कालांत आर्यसमाजाचा संबंध थिऑसफी, प्रार्थनासमाज, व ब्राह्मोसमाज यांच्याशीं मुख्यत्वें आला. यांपैकीं प्रत्येकाचा हेतु आर्यसमाज आपल्या समाजांत समाविष्ट करून घ्यावा असा होता. पण स्वामींनीं तो मोठ्या मुत्सद्दीगिरीनें वेगळा राखून आर्यसमाजाचें वैशिष्ट्य राखलें. (४) १८८२–१८८३ सालीं स्वामींनीं राजपुतान्यास भेट दिली. तेथें अनेक संस्थानिकांचे धार्मिक सल्लागार म्हणून त्यांनीं अत्यंत निःस्पृहपणें काम केलें. जोधपूरच्या राजाची त्यांनीं बदफैली वर्तनाबद्दल चांगलीच कानउघाडणी केली.

स्वामी इ. स. १८८३ च्या ३० ऑक्टोबर रोजीं अजमीर येथें मरण पावले. आर्यसमाजाची स्थापना, सत्यार्थप्रकाश, वेदांवरील भाष्य, वगैरे कांहीं पुस्तकें त्यांनीं लिहिलीं. हिंदु समाजावर पर-धर्मीयांपासून जे अनेक हल्ले होत आहेत त्यांवर रामबाण उपाय शोधून काढण्याचें श्रेय स्वामी दयानंदांस दिलें पाहिजे.

सद्गुणाबरोबर कांहीं दोषहि त्यांच्या अंगीं होते. वेदांमध्यें सर्व कांहीं आहे, असें सांगतांना अगदीं अलीकडील शास्त्रीय शोधहि त्यांत आहेत हें सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं वेदांतील अनेक ऋचांचे विक्षिप्त अर्थ लाविले आहेत. तसेंच हिंदुस्थाना-ला परत वैदिक मार्गावर जाऊनच उद्धार करून घेतां येईल हें सांगतांना त्यांचा युक्तिवाद लटपटीत असे. केवळ वक्तृत्वाच्या जोरावर त्यांनीं अनेक धाडसी विधानें केल्याचा प्रत्यय येतो.

**दयाबहादूर**—माळव्याचा एक सुभेदार. याचें दयाराम असेंहि नांव होतें. राजा गिरिधरचा हा दयाबहादूर चुलतभाऊ. सन १७२८ च्या अखेरीस चिमाजी आप्पानें अमरेझजवळच्या लढाईंत गिरिधरास ठार केल्यावर बादशहानें दयाबहादुरास माळव्याचा सुभा नेमिलें. यानंतर महिन्यांतच आप्पानें दयाबहादुरालाहि ठार केलें. या वेळीं दयारामानें इंदूरकर, नंदलाल, मंडलोई, वगैरे सर-दार मराठ्यांच्या विरुद्ध फोडण्याचा प्रयत्न केला होता. परंतु जयपूरकर जयसिंग व होळकर यांनीं त्याचा प्रयत्न हाणून पाडला. या कामीं नारो शंकर, उदाजी पवार व खुद्द पेशवे हेहि खटपट करीतच होते. मालकम म्हणतो कीं, दयाबहादुरानें रय-तेस इतकें पिळून काढलें कीं, तिनें व ठाकूर जमीनदार यांनीं थेट बादशहाकडे अनेकदां दाद मागितली; परंतु त्यांचा उपयोग होईना; म्हणून जयसिंगामार्फत ते सर्व मराठ्यांस मिळाले. गिरिधर व दयाबहादूर यांना नामोहरम करून माळवा मोकळा करण्याचें श्रेय चिमाजीस आहे. "दयाबहादूर त्या प्रांते मोहोरा सामान्य नव्हता त्यासच मोडिला. या उपरी पृथ्वी स्वामीस

वस्य आहे" असें कृष्णराव महादेव चिमाजीस लिहितो (पे. द. १३·१७).

**दयाराम**—पश्चिम हिंदुस्थानांत शूर आणि धाडसी योद्धा म्हणून याचें नांव प्रसिद्ध आहे. याच्या अंगचें असामान्य धैर्य, अद्वितीय पराक्रम, इत्यादि गुण वाखाणण्याजोगे होते. हा जातीनें गवळी असून फरुख-सियर बादशहाच्या कारकीर्दीत उदयास आला. हिंदुस्थानांतील कित्येक भागांतून दयारामाचे असामान्य पराक्रमविषयक पोवाडे गाऊन दाखविण्यांत येतात. इ. स. १८३३ मध्यें कलकत्ता येथे प्रसिद्ध झालेल्या 'बंगाल ॲन्युअल' मध्यें या योद्धयाविषयीं संपूर्ण माहिती आली आहे.

**दयाळनाथ** (१७८८–१८३६)—एक महाराष्ट्र कवि. हा वऱ्हाडांतील सुर्जीअंजनगांवच्या देवनाथाचा शिष्य व मूर्तिझापूरचा रहिवासी. गौतम गोत्री यजुर्वेदीय ब्राह्मण. याचें मूळचें नांव हरि. सहाव्या वर्षींच याच्या बापानें याला देवनाथाच्या स्वाधीन केलें. देवनाथानें दयाळ हें नांव ठेविलें. देवनाथानेंच त्याची मुंज व लग्न केलें. याच्या स्त्रीचें नांव राधा. याची कविता मराठी व ऊर्दू भाषेंत आहे. एलिचपूरचा नबाब, हैद्राबादचा निजाम, दिवाण चंदुलाल, वगैरे मोठे लोक त्याच्या कथेस जमत. पेंढाऱ्यांचा एक बनसिंग नांवाचा नाईक पश्चात्ताप पावून याचा शिष्य झाला होता. दयाळानें आपल्या गुरूचें बरेचसें कर्ज स्वतः फेडिलें. चंदुलालादि श्रीमान् गृहस्थ त्याला इनाम, वगैरे देत असतां त्यानें तें घेतलें नाहीं. याचा औरस वंश नाहीं. यानें १८३६ सालीं समाधि घेतली. याची समाधि निजाम हैद्राबादेस आहे. याच्या (मुक्ताबाई नांवाच्या) मुलीचा वंश नागपूरजवळचें रामटेक येथें आहे.

**दरक, दरकदार**—दरक हा शब्द अरबी असून त्याचा अर्थ वंशपरंपरागत मोठ्या दर्जाचा सरकारी नोकर असा आहे. यांत बहुधा पुढील अधिकाऱ्यांचा समावेश होतो: (१) कारभारी किंवा दिवाण, (२) मुजुमदार, (३) फडनवीस, (४) सबनीस, (५) कारखानवीस, (६) चिटणीस, (७) जामदार, व (८) पोतनीस. दरकदारांना दरकी असामी असेहि म्हणतात. या दरकदारांपासून दर दहा वर्षांनीं एकदां त्यांच्या शेतावरील सरकारी सारा वसूल करतात त्यास दरकपट्टी म्हणतात.

**दरंग**—आसामांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ २,८०४ चौ. मै.. या जिल्ह्यांत डोंगर फार थोडे आहेत. बहुतेक भाग सपाट मैदान असून त्यांतून ब्रह्मपुत्रेला मिळणाऱ्या पुष्कळ नद्या वाहतात.

श्रीकृष्णानें ज्याचा पराभव केला त्या बाणराजाच्या राज्यांत हा जिल्हा होता अशी दंतकथा आहे. जवळपास आढळून येणाऱ्या मोठमोठ्या दगडी इमारतींच्या अवशेषावरून येथें पूर्वी प्रबळ व सुधारलेल्या राजांची राजधानी असावी व तें राजघराणें इ. स. १,००० च्या सुमारास भरभराटीस आलेल्या पालराजांचें असावें असें वाटतें. ऐतिहासिक काळांत सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धांत भरभराटीस आलेला कामरूपचा कोच राजा, नरनारायण याच्या राज्यांत दरंगचा समावेश झालेला होता. दरंग आणि आसामचा उरलेला भाग इ. स. १८२६ त ब्रिटिशांच्या हातांत गेला.

तेझपूर येथील कोरीव दगडी स्तंभ व शेजारच्या टेंकडीवरील दगडी देवालय यांचे अवशेष, यांशिवाय दुसरे प्राचीन अवशेष या जिल्ह्यांत फारसे नाहींत. १९४१ सालीं या जिल्ह्याची लो. सं. ७,३६,७९१ होती. पैकीं शेंकडा ७१ हिंदू व शेंकडा २३ वन्य हिंदू टोळ्या व शेंकडा ५ मुसलमान आहेत. ह्या जिल्ह्यांत परकी लोकांचें प्रमाण बरेंच आहे. यांपैकीं बहुतेक चहाच्या मळयावर मजूर असलेले असून करार संपल्यावर येथील स्थानिक रहिवासी झालेले आहेत.

तांदूळ व चहा हीं येथील मुख्य पिकें आहेत. बहुतेक राखलेलीं जंगलें उत्तर सरहद्दीवर डोंगराच्या पायथ्याशीं आहेत. यांत रबर, साल, खैर, गुनसेराई व साग हीं झाडें आढळतात. ब्रिटिश अमलापासून नदीच्या वाळूंतून सोनें काढण्याचा धंदा पार बुडाला आहे.

**दरद**—गिलजितभोंवतालच्या प्रदेशांत काश्मीर व हिंदुकुश यांमध्यें दरद लोक राहतात. हे आर्यवंशाचे असून संस्कृत ग्रंथांतून ज्यांना पिशाची लोक म्हटलें आहे त्यांचेच हे वंशज असावेत. यांची भाषा मूळ आर्य असली तरी भारतीय किंवा इराणी शाखेची नाहीं. हिरोडोटसनें यांचा उल्लेख केलेला आहे व संस्कृत ग्रंथकारहि दरदाः असा उल्लेख करतात. आजचे बहुतेक दरद मुसलमान आहेत.

हे लोक घोड्यांवरून चेंडू–दांडूचा खेळ (पोलो) खेळतात. हे गोळीबार करण्याचेहि फार शोकी आहेत. हे लोक शिकार करतात. सतार, वगैरे तंतुवाद्येहि वाजवतात. यांच्यामध्यें नाचण्याचेहि पुष्कळ प्रकार आहेत. त्यांतील एक बारा जणांनीं तरवारी घेऊन नाचण्याचा नाच प्रेक्षणीय होतो.

दरदांना गाईचा मोठा तिटकारा आहे. ते गाईस शिवत देखील नाहींत. गाईचें दूध किंवा कांहींहि पदार्थ ते खात नाहींत. कारण त्यापासून वेड लागतें अशी त्यांची वेडी समजूत आहे.

**दरबान**—दक्षिण आफ्रिकेंतील नाताळ प्रांतांतलें मुख्य बंदर. येथें पुष्कळ सुंदर इमारती असून हें शहर रेल्वेनें मारिझबर्ग शहराला व अंतर्गत भागाला जोडलेलें आहे. या बंदरांत २०,००० टन वजनाच्या बोटी येऊं शकतात. बोटी दुरुस्त करण्याच्या सोयी येथें चांगल्या आहेत. १९४१ सालीं युरोपि-

यन वस्ती १,१२,८९० इतकी होती. १९३६ सालीं युरोपियन ९५,०३३ व इतर १,६४,५७३ होते. शहरांत बागा पुष्कळ आहेत. देवमासे पकडण्याचा धंदा मोठा आहे. १८२४ सालीं या शहराची स्थापना झाली व पहिला गव्हर्नर सर बी. डी. उरबन यावरून शहराला नांव मिळालें.

**दरबारी कानडा**—हा राग आसावरी थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोह सातहि स्वरांनीं होतो व अवरोहांत धैवत वर्ज्य असतो म्हणून याची जाति संपूर्ण–पाडव आहे. वादी ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय मध्यरात्र सर्वसंमत आहे. आरोहांत गांधार स्वर दुर्बल असून जलद तानांत तर तो वर्ज्य करतात. गांधार स्वरावरील आंदोलनानें या रागास विशेष वैचित्र्य आलें आहे. निषाद व पंचम स्वरांची संगति या रागांत मनोवेधक आहे. या रागाची प्रकृति गंभीर असून तो आलापाई आहे. याचें मुख्यतः चलन मंद्र व मध्य स्थानांत असतें. हा राग मिया तानसेन यानें प्रचलित करून अकबर बादशहास सुप्रसन्न केलें, अशी आख्यायिका आहे.

**दरवडा**—दरवडेखोरांना 'डाकाइत' असा हिंदी शब्द असून त्यापासून 'डेकाइट' हा इंग्रजी शब्द बनला आहे. 'डेकाइटी' याचा पीनल कोडांतील अर्थ, पांच किंवा अधिक इसमांनीं धाकदपटशा देऊन मारहाण करून चोरी करण्याचा केलेला कट किंवा प्रत्यक्ष कृत्य असा आहे. मराठी अमलानंतर ब्रिटिश अमलाच्या संधिकालांत या डकैत लोकांचा त्रास विशेष वाढला होता. पण त्याच्यापूर्वीं डकैत लोकांची एक जातच होती. दरवडे घालणें हा त्यांच्या जातीचा एक धार्मिक वंशपरंपरागत धंदा होता. अयोध्या संस्थानांत (तें खालसा होण्यापूर्वीं) या जातीचें प्राबल्य फार वाढलें होतें. त्या संस्थानिकाला व ई. इं. कंपनीलाहि त्यांचा बंदोबस्त करतां आला नाहीं. इतर संस्थानांतहि हे लोक थोडेफार असत. आपल्या राहत्या संस्थानी प्रजेवर हे डकैत बहुधा हल्ला करीत नसत. त्यामुळें संस्थानी प्रजा ह्या डकैतांकडे साधारण दुर्लक्ष करी. हे लोक आपल्या दरवड्यांचे बेत मोठ्या कुशलतेनें पार पाडीत. यात्रेकरूंच्या, कावडवाल्यांच्या किंवा लमाणांच्या वेषानें लहान टोळ्या करून हे हिंडत व दरवडा घातल्यावर फार दूर पळून जंगलां–डोंगरांतील आपआपल्या निवासस्थानांत लपून बसत. हे लोक हलक्या जातीचे असत. ते काली देवी व सूरज देवता यांची पूजा करीत. देवीची प्रार्थना करून व चांगले शकुन पाहून ते दरवडा घालण्यास निघत. धर्मसमजुती व इंग्रजांची नुकतीच बसणारी घडी यांमुळें यांचा धंदा निर्धोक चालू असे. म्हणूनच ब्रिटिश सरकारास डकैत लोकांचा बंदोबस्त करण्यास बरींच वर्षें लागलीं. अयोध्या संस्थान खालसा झाल्यावर त्यांचा मुख्य आधार तुटला आणि १८५७ च्या बंडानंतर लौकरच त्यांचा बहुतेक नायनाट झाला.

**दरवेशी**—हा फारसी शब्द असून याचा अर्थ भिक्षेकरी असा आहे. हे मुसलमान व कांहीं ख्रिश्चन जातीचे असून काम न करतां भिक्षावृत्तीवर चरितार्थ चालविणें हा त्यांचा धंदा असतो. पांचव्या व सहाव्या शतकाच्या फारसी वाङ्मयावरून असें दिसतें कीं, दरवेशी हा संसारापासून मुक्त झालेला साधु म्हणून मानण्यांत येत असे. सुफी लोक विशिष्ट तत्त्वज्ञान सांगत असत व दरवेशी त्याचें प्रत्यक्ष आचरण करीत असत. सहाव्या शतकांत साधु लोकांचा एक संप्रदाय स्थापन झाला. अबदल कादीर व अहंमद रिफा हे या संप्रदायाचे आद्य प्रवर्तक होत. हे संप्रदाय ३६ असून ओटोमन साम्राज्यापूर्वी १२ व नंतर २४ असे हे अस्तित्वांत आले. आचार व भक्ति हे या संप्रदायाचे गुण असून 'ला इलह इला लहू' या मंत्राचा निरनिराळ्या आवाजांत जप करण्यांत येतो. मौलवी दरवेशी ताल–सुरावर प्रार्थना करतात. कांहीं दरवेशी लोकांत गूढ सामर्थ्य असतें असें म्हणतात. झाविया हें या संप्रदायाचें केंद्रस्थान आहे. या संप्रदायाच्या संस्थापकाचें नांव शेखे असें असून त्याच्या वारसांना खलीफ म्हणतात. इस्लामधर्मप्रसारकाचें कार्य करण्याकरितां हा पंथ निघाला आहे, व आशिया व आफ्रिका या खंडांतून युरोपियनांचें उच्चाटण करण्याकरितांच या संप्रदायाचा प्रसार करण्यांत येत असतो, असेंहि कांहीं लोकांचें भाबडें मत आहे.

**दरायस**—हें नांव अनेक इराणी बादशहांना आहे. पहिला दरायस (दि ग्रेट) याच्याबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाहीं. इराणी लोकांच्या साहाय्यानें त्यानें गादी मिळविली (ख्रि. पू. ५२१). सुसिॲना, बाबिलोन, मिडिया, सर्गातिया, इत्यादि ठिकाणीं त्याला शत्रु उत्पन्न झाले. दरायसनें लवकरच सर्व बंडें मोडून टाकिलीं व आपली सत्ता सर्वत्र स्थापन केली. त्यानें ग्रीसवर मोहीम नेली, पण थ्रेसियन लोकांनीं त्याच्या सैन्याचा मोड केला. दुसऱ्या स्वारीचाहि अथेनियनांनीं पराभव केला (ख्रि. पू. ४९०). शिलालेखावरून दरायस हा झरथुष्ट्र धर्मानुयायी होता असें दिसतें. हा मोठा मुत्सद्दी व कर्तृत्ववान् पुरुष होता. त्यानें इराणी साम्राज्याचा विस्तार कॉकेशस पर्वतापर्यंत केला. त्यानें डॅरिकचें सोन्याचें नाणें आपल्या राज्यांत सुरू केलें. काबूल व सिंधु यांच्या पलीकडे मोहीम पाठविली. नाइल ते सुएजपर्यंत एक कालवा खोदविला. कार्थेजशीं त्याचा संबंध असून सिसिली व इटलीचा किनारा यांची त्यानें पाहणी केली होती. जेरुसलेमचें देऊळ बांधण्यास त्यानें ज्यू लोकांना परवानगी दिली. ईजिप्तमधील देवळांतून दरायसचें नांव कोरलेलें आहे. छत्तीस वर्षें राज्य करून दरायस हा सुमारें ख्रि. पू. ४८५

सालीं मरण पावला. त्याच्या पश्चात् दुसरा व तिसरा दरायस असे राजे झाले.

तिसरा दरायस (मृ. ख्रि. पू. ३३०)—हा इराणचा बारावा व शेवटचाच बादशहा होय. याचा अलेक्झांडर दि ग्रेट यानें तीनदां पराभव केला, तेव्हां याला पळून जावें लागलें (३३१). अलेक्झांडरनें सर्व इराण पादाक्रांत केलें तेव्हां यानें त्याला तोंड देण्यासाठीं कांहीं सैन्य जमा केलें. पण याच्याविरुद्ध कट उद्भवून त्यांत त्याला जिवासहि मुकावें लागलें.

**दरेकसा जमीनदारी**—मध्यप्रांत, जिल्हा भंडारा. ही इस्टेट बिजलीच्या जमीनदारीच्या ताब्यांत आहे. खैरागड संस्थान आणि सालेकसा जमीनदारी यांच्या दरम्यान् टिरोरा तहशिलीच्या पूर्वेस ही जमीनदारी असून तिचें क्षेत्रफळ ४५ चौ. मैल आहे. त्यापैकीं बहुतेक भाग डोंगराळ असून जंगल आहे. येथील घराणें गोंडांचें आहे. दरेकसा हें रेल्वे-स्टेशन आहे. जवळच एक धबधबा असून तो पाहण्यालायक आहे. जवळच चांदसूरज येथें कचागड म्हणून लेणीं आहेत.

**दर्जी**—शिवणकाम करणारी एक जात. संयुक्त प्रांत व मुंबई इलाखा यांतून यांची मोठी वस्ती आहे. मध्यप्रांतांत व वऱ्हाडांत यांतील निरनिराळ्या वर्गांत रोटीबेटी व्यवहार होत नाहींत, कारण यांची उत्पत्ति फारच मिश्र आहे. हे लोक धार्मिक वृत्तीचे असून नामदेवाची पूजा करतात.

पंजाबांतील दर्जी मुख्यत्वें हिंदु व मुसलमान धर्माचे आहेत. येथे दर्जी हा धंदावाचक शब्द असे. परंतु हल्लीं हा जातिवाचक झाला आहे.

या लोकांमध्यें १८ कुळें आहेत. यांच्यांत मामेबहिणीशीं लग्न करतां येतें, परंतु मावसबहीण व आतेबहीण यांच्याशीं करतां येत नाहीं. प्रौढविवाह या लोकांत रूढ असून पुनर्विवाह व घटस्फोट या दोन्ही चालीहि यांमध्यें आहेत. सुरत भागांतील दर्जी लोकांखेरीज इतर दर्जी शाकाहारी आहेत. हे कुंभार व लोहार यांच्या हातचें जेवण जेवतात. रामानंदी, मध्वाचार्य, स्वामीनारायण पंथ या व इतर पंथांचे असून यांचा वारसासंबंधीं कायदा हिंदूंप्रमाणेंच आहे. हिंगलाज देवीची हे विशेषेंकरून पूजा करतात. पुष्कर्ण ब्राह्मण हे त्यांचे उपाध्याय आहेत. यांच्यांत पंचायत संस्था आहेत. सुरत शहरामधील दर्जी लोकांतील जातीसंबंधीं प्रश्नांचे निकाल जातीच्या लोकांनीं निवडलेल्या पुढाऱ्यांकडून दिले जाऊन दंडाचें उत्पन्न व्याजीं लाविलें जातें व त्याचें व्याज जातीच्या जेवणानिमित्त खर्चिलें जातें.

**दर्द** (मृ. १७८५)—एक उर्दू कवि. याचें नांव ख्वाजा महंमद मीर. हा आपल्या काळांतील मोटा कवि होता व जानजाना मजहर याच्या समकालीन होता. हा गायनविद्येंत चांगला प्रवीण होता. शिष्टाचाराविषयीं हा फार दक्ष असे. दिल्ली पडली असतां हा तो सोडून गेला नाहीं.

१ दीवान (उर्दूमध्यें गजल, तरजी अवन्द आणि रुबाइया), २ दीवान फार्सी, ३ आली नाल-व-दर्द, ४ दर्दे दिल, ५ इल्मुल्किताब, ६ थालीसर्द, इत्यादि त्याचे ग्रंथ आहेत.

**दर्दी जानबाई**—मुंबई इलाख्यांत काठेवाडामध्यें बाबर ठाण्यांतील एक लहानशी जहागीर. येथील जहागीरदार चारण जातीचा आहे. भाडळीच्या रावानें हें गांव एका चारणास इनाम दिलें. फत्तेसिंग गायकवाडानें जहागिरदारास खंडणी माफ केली होती (१८०३). त्या वेळीं तेथील एक चारण जातीची संतीण जानबाई ही प्रख्यातीस आली होती. तिला तिकडील लोक फार पवित्र मानीत. तिनें फत्तेसिंगास कांहीं चमत्कार करून दाखविल्यावर त्यानें तिला ५०० रु. नजर करून गांवास खंडणी माफ केली. या वेळेपासून या गांवास जानबाईनी (ची) दर्दी म्हणतात. ती मेल्यावर फत्तेसिंगानें तिची समाधि बांधून सालिना १२५ रु. नेमणूक करून दिली. तेथें तिची मूर्ति असून, आसपासचे लोक तिची पूजा-अर्चा करतात. तिचा नवरा भगत कानथड नांवाचा होता व राणू आणि भाऊ नांवाचे तिला दोन पुत्र होते. त्यांचा वंश हल्लीं तेथें नांदत आहे.

**दर्भ**—कुश नांवाच्या गवताला हें धर्मग्रंथांत नांव आहे. ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांत हा शब्द गवताचें नांव म्हणून आला आहे. अथर्ववेदामध्यें याचा उपयोग 'मन्युशमन' म्हणून व केंस कापले जाणें किंवा छाती बुडविली जाणें यांवर तोडगा म्हणून सांगितला आहे. याला भूरिमल (फार मुळे असलेला), सहस्रपर्ण (हजार पानें असलेला) व शतकंद (शंभर कांदे असलेला) अशीं नांवे दिलीं आहेत. धार्मिक संस्कारांत दर्भ लागतात.

**दर्भंगा**—बिहार, तिरहुत विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,३४० चौ. मैल. या जिल्ह्यांत गंगा, छोटी गंडक व कमला-तिलजूगा या मुख्य नद्या आहेत. प्राचीन काळीं मिथिलेच्या राज्यांत या जिल्ह्याचा समावेश होत होता. पुढें पाल व सेन या घराण्यांच्या हातांतून गेल्यावर १२०३ सालीं महमद-इ-बख्त्यार खिलजी यानें तो जिंकून घेतला. चौदाव्या शतकाच्या मध्यापासून १५५६ सालीं मोगल घराण्याकडे जाईपर्यंत हा जिल्हा एका ब्राह्मणी राजघराण्याकडे होता. १७६५ सालीं हा जिल्हा इंग्रजांच्या ताब्यांत आला; त्या वेळीं तो बिहार सुभ्यांत मोडत असे. जयनगर, बेरौतपूर, भवार, बलराजपूर व मंगल येथें जुने किल्ले आहेत.

१९४१ सालीं या जिल्ह्याची लो. सं. ३४,७७,०७० होती. येथें बिहारी भाषेची मैथिली नांवाची पोटभाषा चालते. तांदूळ,

नीळ, हरभरा, मोहरी, जवस, गळिताचीं धान्यें, तंबाखू, कातडीं, इमारती लांकूड, वगैरे पदार्थ येथून बाहेर जातात, व तांदूळ आणि इतर धान्यें, मीठ, केरोसीन तेल, पोतीं, कोळसा, विलायती कापड व कापूस हे जिन्नस बाहेरून येतात. दर्भंगा, समस्तीपूर, मधुबनी, रुसेरा, पूसा, कमतौल, दलसिंग सराई, नरहिया, आणि झंजारपूर हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण दर्भंगा आहे. हें छोट्या बाघमती नदीच्या डाव्या तीरावर आहे. दर्भंगीखान नांवाच्या एका लुटारूच्या नांवावरून हें नांव पडलें असावें. लो. सं. ६९,२०३. यांत हिंदूंची संख्या अधिक आहे.

मोंगल अमदानींत हें लष्करी ठाणें होतें. अठराव्या शतकांत महाराज प्रतापसिंह यानें येथें राजधानी केली, तेव्हांपासून शहर वाढूं लागलें. १८८४ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली. अनेक राजवाडे, कचेऱ्या, दवाखाने, गोशाळा, कॉलेज, इ. इमारतींनीं शोभा आली आहे. लहानमोठे तलाव आहेत. लहेरिया सराय हें उपनगरहि वाढत आहे. येथील राजग्रंथालय फार समृद्ध व चांगलें ठेवलें आहे. येथें मिथिला विश्वविद्यालय काढण्याचें घाटत आहे.

**दर्भंगाराज**—बिहारमधील एक छोटेंसें राज्य. १६ व्या शतकाच्या आरंभीं महेशठाकूर हा विद्वान् ब्राह्मण जबलपूरहून आला व त्यानें हें मिळविलें, असें सांगतात. जबलपूरहून आल्यानंतर तो राजा शिवसिंगच्या येथें पुरोहित म्हणून राहिला त्या वेळीं मुसलमानी सत्तेच्या उदयकालामुळें ह्या राज्यास उतरती कळा लागली होती. तेव्हां ह्या संधींत महेशठाकूरनें अकबर बादशहाकडून दर्भंगा जहागिरी मागून घेतली. त्यानें व त्याच्या पुत्रपौत्रांनीं राज्याची फार चांगली काळजी घेतली व जरी कायमधाराबंदी पद्धतीच्या वेळीं त्यांच्या राज्यापैकीं कांहीं भाग सरकारजमा झाला होता तरी त्यांस तो परत देण्यांत आला. राज्याचें दर्भंगा हें १७६२ सालापासून मुख्य ठिकाण असून त्यापूर्वी मधुबनी हें होतें. सध्यांचे राजे कामेश्वरसिंग गादीवर आहेत. दर्भंगा, मुझफरपूर, गया, मोंगिर, पूर्णिया व भागलपूर इतक्या जिल्ह्यांत ह्या राजाच्या जमिनी आहेत. एकंदर क्षेत्रफळ २,४१० चौ. मै.. महाराजाच्या खुद्द मालकीचे बंगले दर्भंगा, मुझफरपूर, पाटणा, बनारस, कलकत्ता, अलाहाबाद, दार्जिलिंग व सिमला येथें आहेत. सालिना उत्पन्न सु. दहा लाखांचें आहे.

**दर्यापूर**—वऱ्हाड, उमरावती जिल्ह्याचा हा पश्चिमेकडील तालुका आहे. क्षेत्रफळ ५०५ चौ. मै.. लो. सं. सु. दीड लक्ष. हा तालुका पूर्वी एलिचपूर जिल्ह्यांत होता. परंतु १९०५ सालीं जिल्ह्याच्या इतर भागाबरोबर उमरावती जिल्ह्यांत सामील करण्यांत आला. या तालुक्यांत एकंदर २४५ गांवें आहेत. हा तालुका पाइनघाटच्या सुपीक खोऱ्यांत आहे.



कापूस, ज्वारी, गहूं, जवस, तूर, खाण्याचीं पानें हे जिन्नस येथें होतात. या तालुक्यांत बागाईत जमीन फारच थोडी आहे.

गांवची लोकसंख्या सुमारें आठ हजार आहे. हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून चंद्रभागा नदीच्या कांठीं मूर्तिजापूरपासून १८ मैलांवर आहे. हें कापसाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण असून येथें सरकी काढण्याचे व रुई दाबण्याचे कारखाने आहेत. वऱ्हाडचा तिसरा स्वतंत्र राजा दर्याइमादशहा (इ. स. १५२९–१५६०) यानें हें वसविल्यावरून या गांवास दर्यापूर असें म्हणतात.

**दर्याबाई निंबाळकर**— दुसऱ्या शिवाजीची मुलगी व रामराजाची बहीण. पेशव्यांनीं हिला आपल्याकडे वळवून घेतलें. शाहूहि हिचा उदारपणें परामर्श घेत असे. ही बरीच कारस्थानी होती. रामराजाला पेशव्याविरुद्ध सल्ला देण्याचें काम ही करूं लागली म्हणून हिला पेशव्यांनीं साताऱ्याहून सक्तीनें घालवून दिलें होतें.

**दर्याबाई भोंसले**—ही जानोजी भोंसल्याची स्त्री असून फार कारस्थानी होती. जानोजीच्या मृत्यूनंतर (१७७२) मुधोजी व साबाजी यांचा गादीबद्दल तंटा लागला होता. त्यांत दर्याबाई साबाजीच्या बाजूची होती. वास्तविक जानोजीनें मुधोजीच्या मुलाला दत्तक घेतलें होतें. पुढें लढाई होऊन तींत साबाजी पडला व मुधोजी कारभारी झाला. जानोजीच्या वेळीं पेशव्यांनीं साबाजीशीं त्याच्याविरुद्ध संगनमत चालविलें असतां हिनेंच त्याची समजूत केली होती. जानोजीच्या पश्चात् दर्याबाई आपल्या दत्तक (रघूजी) पुत्रासह अकोटास राही. तिनें या रघूजीला गादी मिळूं नये म्हणून आपण गरोदर असल्याचेंहि खूळ पिकविलें होतें. मुधोजी–साबाजी तंटा एलिचपूरच्या नबाबानें मिटविला होता. या दिरांच्या भांडणांत दर्याबाई कधीं कधीं दोहींकडेहि मिळे. तिच्यामुळें भोंसल्यांच्या घरांत गृहकलह शिरला. बारभाईच्या कारभारांत दर्याबाई व रघूजी यांनीं भाग घेतला होता. त्या वेळीं रुक्नुद्दौला यानें बाई पुण्याकडे जात असतां वाटेंत बऱ्हाणपुर येथें तिला लुटलें.

**दर्यावाहतूक**—माणसें आणि माल जहाजांतून नेण्याआणण्याचा व्यापार व अशा व्यापाराचीं जहाजें यांना इंग्रजींत 'शिपिंग' अशी संज्ञा आहे. व्यापारी जहाजांत लायनर, ट्रॅम्प, ऑइल–टॅंकर, प्लेझर क्रॅफ्ट, ड्रेजर, टग, कोस्टर, मच्छीमारी बोटी, इ. प्रकार आहेत. लायनरमध्यें माणसें आणि माल भरत असून तीं ठराविक मार्गानें व वेळेला जातात. ट्रॅम्प जेथें जास्त पैसा मिळेल तेथें जात असतात. अशा जहाजांची आणि वाहतुकीची नीट

व्यवस्था असावी म्हणून सरकारी कायदे केले आहेत. जहाजां-वरील अधिकारी बोर्ड ऑफ ट्रेड खात्याच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले असतात.

गेल्या महायुद्धांत अनेक जहाजांचा चुराडा झाला असलां तरी त्या महायुद्धामुळेंच जहाजांच्या टनेजमध्यें कल्पनातीत वाढ झाली आहे. अमेरिका आज सर्व जगांत अग्रेसर असून एकंदर जगांतील जहाजांच्या टनेजपैकीं निम्में एकट्या अमेरिकेचें आहे. तथापि ग्रेट-ब्रिटननें व्यापारी जहाजें बांधण्याचा आज मोठा सपाटा लावला आहे. नौकानयन पाहा.

स्वातंत्र्य मिळेपावेतों हिंदुस्थानचा दर्यावर्दी व्यापार व वाह-तूक ब्रिटिशांकडे होती. आज हिंदी जहाजांचें टनेज ३ लाख आहे. तें २० लाखांपर्यंत नेण्याचा हिंद सरकारचा विचार आहे. किनाऱ्यावरील वाहतूक संपूर्णपणें व महासागरावरील कांहीं यापुढें हिंदी जहाजांतून होत जाईल. यासाठीं बरेच नाविक संघ काढण्याचें सरकारनें ठरविलें आहे.

**दर्यासारंग**—शिवाजीच्या आरमारावरील एक मुख्य अधि-कारी. हा कोळी जातीचा होता. कांहीं ठिकाणीं हा मुसलमान असल्याचें आढळतें. कोळ्यांत सारंग ही एक कुळी किंवा आड-नांव आहे. ह्या कुळींतील हा दर्या नांवाचा एक पुरुष होय. या घराण्यांतील वंशज अलिबागेस आहेत. हें घराणें सोनकोळी जातींत बरेंच वरच्या दर्जाचें मानतात. दर्या याचें दुसरें नांव लाय पाटील असावें. त्यानें जंजिरे राजापुरीच्या मसलतीच्या कामीं मोठी मदत केली. ही मोहीम मोरोपंत पेशव्याच्या देख-रेखीखालीं झाली होती ( १६७६ ). या घराण्यास आदिलशाही-पासून इनामाच्या बाबतींत हक्काच्या सनदा मिळाल्या होत्या. लाय पाटिलाच्या स्वाधीन शिवाजीनें आरमाराचा कारभार दिला होता. यास पालखी—छत्रीचा मान असून शिवाय शिवाजीनें पालखी नांवाचें एक लष्करी जहाज ( महागिरी ) बांधवून तें खास लाय पाटिलास दिलें होतें. हें घराणें पुष्कळ काळपर्यंत मराठी आरमारांत प्रमुख होतें. आंग्रे हे आरमारी सुमेदार असतांना त्यांच्या हाताखालीं या घराण्यांतील पुरुषांनीं कामें केलीं आहेत.

**दर्श**—सौरमासाप्रमाणें महिन्याच्या शेवटीं येणाऱ्या अमा-वास्या तिथीस दर्श अशी संज्ञा आहे. या दिवशीं पितृगणांपैकीं पितृत्रयी व मातृत्रयी यांना उद्देशून श्राद्ध करावयाचें असतें. याच दिवशीं अग्निहोत्र्यानें पितरांना उद्देशून पिंडपितृयज्ञ करा-वयाचा असतो. हा विधि मात्र गृह्यसूत्रविहित आहे. स्मार्ताग्नि धारण करणारेहि पिंडपितृयज्ञ स्मार्ताग्नीवर करतात. अमावास्येच्या दर्शश्राद्धास पार्वणश्राद्ध असें म्हणतात. पार्वणश्राद्धविधि सर्व गृह्यसूत्रग्रंथांत दिला आहे व पर्वदिवशीं केलें जाणारें श्राद्ध तें पार्वणश्राद्ध—दर्शश्राद्ध होय, अशी स्मृतिग्रंथांत याची संगति लावली आहे.

दर्श याचा धात्वर्थ दिसणें असा आहे. दर्श म्हणजे पूर्ण मासाच्या दिवसाच्या उलट अमावस्येचा दिवस होय. हा शब्द नेहमीं ‘ दर्शपूर्णमासौ ’ असा द्वंद्व समासांत येतो. व हे दिवस व्रताला मोठे महत्त्वाचे गणले आहेत. या द्वंद्व समासांत दर्श शब्दाला जें अग्रस्थान दिलेलें आहे तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कारण त्यावरून पूर्वी महिन्याचा आरंभ अमावास्येच्या दुसऱ्या दिवसापासून होऊन शेवट अमावस्येस होई, पौर्णिमेस नव्हे—ही गोष्ट पूर्णपणें जरी सिद्ध झाली नाहीं तरी उघडपणें सुचविली जाते.

**दर्शक**—( इंडिकेटर ). रसायनशास्त्रांत दोन पदार्थांची क्रिया पूर्ण झाली किंवा नाहीं हें दाखविण्यासाठीं त्यांच्या मिश्र-णांत घातलेला तिसरा पदार्थ. ह्या तिसऱ्या पदार्थाच्या किंवा दर्शकाच्या रंगावरून क्रिया पूर्ण झाली आहे किंवा नाहीं तें कळतें.

**दर्शकयंत्र**—इंजन-पंचपात्रांतील वाफ, वायु, इ. च्या भार-विस्तारा( प्रेशर व्हॉल्यूम )चे फरक लेखचित्रद्वारां दाखविण्याचें हें एक यंत्र असून जेम्स वॉटनें याचा शोध लाविला. इंजिनच्या दट्टयावरील सरासरीचा दाब किती आहे हें समजण्यासाठीं व चक्रांतील प्रवेश, निर्गम, इ. यांच्या क्रियेस लागणारा वेळ काढण्यासाठीं दर्शकयंत्राचा उपयोग करतात.

**दर्शक संज्ञा**—( कोऑर्डिनेट्स ). पृथ्वीवरील कोणतेंहि स्थल रेखांश व अक्षांश ठाऊक असल्यास निश्चित होतें. समपृष्ठावर एकमेकांस लंब असे **ओ** बिंदूतून **क्षओक्ष'** व **यओय'** अक्ष काढा. कोठेंहि घेतलेल्या **व** बिंदूतून **वम** रेषा **ओक्ष**ला लंब काढा. **ओम** व **मव** हीं अंतरें ठाऊक असल्यास **व** बिंदु निश्चित होतो.

**यओक्ष**च्या समपृष्ठाला **झ'ओझ** हा लंब काढा. पूर्वी-प्रमाणेंच **व** बिंदु घेऊन **वम क्षओय** या पृष्ठावर लंब काढा. **मव** हा **ओय**ला लंब काढा. **मल** हा **ओक्ष**ला लंब काढा. **ओल, लम** व **मव** हीं अंतरें ठाऊक असल्यास **व** बिंदु निश्चित मिळतो. डेकार्ट ह्या तत्त्वज्ञान्यानें ही पद्धत प्रचारांत आणून भूमितीच्या प्रश्नांना उपयोगी पडणारी केली. अशा अनेक दर्शकसंज्ञापद्धती आहेत.

**दर्शनें**—दर्शन शब्द संस्कृत वाङ्मयांत पारमार्थिक ज्ञान या अर्थी उपयोजिला आहे. दर्शनें सहा असून त्यांचीं नांवें-न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा हीं होत. वरील सहा दर्शनांशिवाय निरनिराळ्या संप्रदायानुसार पारमार्थिक ज्ञान उपबृंहिणारीं चार्वाकदर्शन, बौद्धदर्शन, अर्हत-

दर्शन, रामानुजदर्शन, पूर्णप्रज्ञदर्शन, नकुलीशपाशुपतदर्शन, शैवदर्शन, प्रत्यभिज्ञादर्शन, रसेश्वरदर्शन, औलुक्यदर्शन, अक्षपाददर्शन, पाणिनिदर्शन, शांकरदर्शन, इत्यादि दर्शनें प्रचलित आहेत. यांतील कांहीं शैव व कांहीं वैष्णव मतानुसारी आहेत. दर्शनें हीं पारमार्थिक ज्ञान देणारीं असल्यामुळें त्यांत रसेश्वर या वैद्यक शास्त्रविषयाचा व पाणिनि या शब्दशास्त्रविषयाचा दर्शनांत संग्रह असल्याचें पाहून शंका येते. परंतु वरील रसदर्शन व पाणिनिदर्शन यात रस व शब्द हे ब्रह्मरूप असून त्या ब्रह्माचें ज्ञान होणारा ब्रह्मज्ञानी होतो असा विषय प्रतिपादिला आहे. म्हणून त्यांचा दर्शनांत अंतर्भाव केला आहे. माधवाचार्यांनीं सर्व दर्शनांचा साररूप असा सर्वदर्शनसंग्रह नामक एक ग्रंथ लिहिला आहे.

**दर्शपूर्णमास**—अमावास्या व पौर्णिमा ह्या दिवशीं अन्वाधान करून दुसऱ्या दिवशीं प्रतिपदेला इष्टि करतात. ह्या कर्माला दर्शपूर्णमास ही संज्ञा आहे. सध्यां पौर्णिमेची इष्टि जवळजवळ बंद आहे. ह्या दोन तिथी मिळून अन्वाधान, पिण्डपितृयज्ञ, दर्शश्राद्ध व इष्टि इतकीं कर्मे करावयाचीं असतात. ह्या कर्मांचा आतां लोप झाला आहे.

**दलदल**—१. (इं. बॉग). या मऊ स्पंजासारख्या ओल्या जमिनींत कुजलेलीं झाडेंझुडपें असतात. यांची खोली कधीं कधीं ४० फुटांवरहि असते. प्रथम पाण्याचें डबकें तयार होतें व नंतर त्यांत झाडें उगवतात, त्याभोंवतीं माती सांठते व शेवाळ उगवून दलदल बनतें. तीवर पुन्हां झुडपें उगवतात व खालचीं कुजत राहतात. अशा जमिनी पिकांना निरुपयोगी ठरतात. युरोपमध्यें अशी जमीन एकंदर २,१२,७०० चौ. मैल आहे. कानडांत ४५,००० चौ. मैल, तर अमेरिकेंत (सं. संस्थानें) ३१,२५० चौ. मैल आहे. या दलदलींतील पदार्थ जळणाला उपयोगी पडतात.

२. उथळ जागेवर पाणी सांचून चिखल होतो त्यास दलदल म्हणतात. तिचे ३ प्रकार आहेत: १ समुद्रसपाटीबरोबर जमीन असल्यानें होणाऱ्या समुद्रालगतच्या दलदली. उदा., कच्छचें रण. २ समुद्र गोठल्यानें नद्यांचें पाणी त्यांत न पडतां मुखांजवळ सांचून दलदल होते. उदा., रशियांतील तुंड्रा प्रदेश. ३ पर्वताच्या पायथ्याशीं लवणांत पाणी सांचून दलदल होते. उदा., हिमालयाच्या पायथ्याशीं असलेली तराई.

**दलपतिराज** (सु. १४९०–१५१२)—एक संस्कृत ग्रंथकार. हा भारद्वाजगोत्री ब्राह्मण वल्लभाचा पुत्र होता. अहमद किंवा पहिला बुर्हाण निजामशहा याचा हा प्रधान होता. यास महाराजाधिराज अशी पदवी होती. यानें 'नृसिंहप्रसाद' नांवाचा धर्मशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला असून त्याचे बारा भाग आहेत. त्याच्या 'संस्कारसारा' मध्यें संवत्सर व कालदीप यांविषयीं व 'तीर्थसारा' मध्यें तीर्थक्षेत्रांविषयीं माहिती दिली आहे; 'आन्हिका' मध्यें दिनचर्येविषयीं विवेचन आहे.

**द ला मेर, वॉल्टर** (१८७३– )—एक इंग्रज कवि व अद्भुतकथा-लेखक. यानें १९०२ सालीं 'बालपणचीं गीतें' व १९०४ सालीं 'हेन्री ब्रॉकेन' प्रसिद्ध केलें. त्यांच्या 'दि रिटर्न' या कादंबरीला बक्षीस मिळालें. 'मेमॉयर्स ऑफ मिड्जेट' व 'दि कॉनोसर' हीं पुस्तकेंहि लोकप्रिय आहेत.

**दलाल**—माल विकणारा आणि माल घेणारा याच्यामधला व्यवहार जमवून देणारा अडत्या. हे दलाल विशिष्ट माल खपवून देतात. उदा., रोखे दलाल, धातू दलाल, भाजी दलाल, इ.. यांचा मेहनताना शेंकड्यावर ठरविलेला असतो (इतके टक्के दलाली याप्रमाणें). गहाणाचा व्यापार करणारेहि दलाल असतात. अडत्या (एजंट) पाहा..

दलाल कांहीं ठराविक दलाली घेऊन आपल्या अशीलाकरितां सवदे करतात. ही दलाली सवद्याच्या रकमेच्या प्रमाणांत असते. दलाल व्यापाऱ्याशीं अथवा जॉबरशीं आपल्या अशीलांच्या कामाचा ठराव करतो. वर सांगितल्याप्रमाणें दलाल कांहीं ठराविक धंद्यांतच दलाली करतात. जसे, हुंड्यांचे दलाल, परस्पर देवघेव चालते अशा देशी–परदेशी हुंड्या विकतात किंवा विकत घेतात. विमादलाल, जहाजाचे मालक व माल रवाना करणारे व्यापारी यांचा व विमा कंपन्यांचा व्यवहार जुळवून देतात. नौकादलाल, एका बंदरापासून दुसऱ्या बंदरापर्यंत जहाजाचे मालक व माल पाठविणारे यांचे सवदे, भाडें, वगैरे संबंध घडवून आणतात.

ठेवी दलाल, समाईक भांडवलावर चाललेल्या कंपन्यांचे भाग व सरकारी रोखे आपल्या गिऱ्हाइकांकरितां विकतात किंवा विकत घेतात.

**दंव, दहिंवर**—गवत, पानें, फुलें, इ. जमिनीवरच्या पदार्थांवर केव्हां केव्हां रात्रीच्या वेळीं पाण्याचे जे थेंब दिसतात त्यांना म्हणतात. हिंवाळ्यांत जमीन थंड असते व लगतची हवाहि तशीच होऊं लागते. हवा थंड होतांना घन बनते व तींत सर्व वाफ मावूं शकत नाहीं. न मावणारी ही वाफ द्रवरूप पावते व जलबिंदू थंड पृष्ठभागावर सांचतात. ज्या वेळीं वाफेचें दंव बनतें तेव्हां त्या विशिष्ट उष्णमानाला 'दंवबिंदु उष्णमान' म्हणतात. हा दंवबिंदु ३२° फारेनच्या खालीं जेव्हां जातो तेव्हां वाफेचें घनरूप होऊन बर्फ सांचतें.

डॉ. ऐटकिनसारखे संशोधक असें सिद्ध करतात कीं, वनस्पतीवरचें दंव पुष्कळ वेळां वरून न येतां वनस्पतींतूनच बाहेर पडतें.

**दवणा**—दवण्याचें झाड वीत–दीड वीत उंच वाढतें. याचीं पानें कांहींशीं गाजराच्या पानांसारखीं असतात, परंतु थोडीं अरुंद असतात. दवण्याच्या झाडास वास फार उग्र येतो. तथापि दुरून मात्र बरा वाटतो. यास तुरे येतात. त्यांसहि झाडाप्रमाणें वास येतो. दवण्याचा सुगंधी पदार्थांत पुष्कळ उपयोग होतो. दवण्याचीं झाडें घराच्या आसपास लावल्यानें घरांत सर्प येत नाहींत. दवणा तिखट, शीतल, कडू, तुरट व सुगंधी असून कुष्ठ, कंडू, संग्रहणी यांचा नाश करतो. सर्पाच्या विषावर दवण्याच्या मुळ्या व पानें देतात अगर त्यांचा रस काढून देण्यांत येतो. गुरांसहि हें औषध दिल्यानें गुण येतो. गर्मीवर दवणा व मरवा यांचा रस काढून प्यायला दिला असतां गुण येतो.

**दशग्रंथ**—एखादी वेद संहिता, तिचें ब्राह्मण व आरण्यक, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंटु, निरुक्त, छंद व ज्योतिष; किंवा संहिता, पद, क्रम, ब्राह्मण, व्याकरण, शिक्षा, ज्योतिष, कल्प, छंद व निरुक्त हे जे दहा वैदिक ग्रंथ यांचें अध्ययन किंवा पारायण केलेल्यास दशग्रंथी म्हणतात.

**दशपादवर्ग**—( डेक्यापोडा ). कवचधर प्राण्यांतील सर्वांत वरच्या दर्जाचे प्राणी या वर्गात मोडतात. यांचें आंखूड शेपटीचे खेकड्यासारखे प्राणी ( ब्रॅच्यूरा ), झिंगे, लॉब्स्टर मासे यांसारखे दीर्घपुच्छी प्राणी ( मॅक्रूरा ), योगी खेकड्यासारखे प्राणी ( अनोम्यूरा ), इत्यादि प्रकारांनीं वर्गीकरण करण्यांत येतें. मावली किंवा माकणी यामध्येंहि एक दशपादवर्ग आहे.

**दशमानपद्धति**—( मेट्रिक सिस्टिम ). लांबीचें परिमाण ( मीटर = ३९.२४ इंच ) घेऊन त्यावर बसविलेली वजन, क्षेत्र, आकार ( व्हाल्यूम ) मोजण्याची ही दशमानपद्धति आहे. आपल्याकडे ही दशमानपद्धति ऋग्वेदकालीं प्रचारांत होती असें दिसतें ( ऋ. २.१८, ४–६ ). वाजसनेयी संहितेंत ( १७.२ ) "एका च दश च दश च शतं च शतं च सहस्त्रं च सहस्त्रं चायुतं च अयुतं नियुतं च नियुतं च प्रयुतं च अर्बुदं च न्यर्बुदं च समुद्रश्च मध्यं च अंतश्च परार्धश्च" असे उल्लेख सांपडतात. पाश्चात्य देशांत या पद्धतीचा प्रारंभ फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं झाला. पुष्कळशा देशांत ह्या पद्धतीचा स्वीकार व्यवहारांत आवश्यक आहे. परंतु ग्रेट ब्रिटन, जपान, अमेरिकन संयुक्त संस्थानें, इत्यादि देशांत तिचा संपूर्ण स्वीकार झालेला नाहीं. मीटरच्या मागें पुढील संख्यावाचक उपसर्ग लावितात : डेक्या = १०, हेक्टो = १००, किलो = १०००, मिरिया = १०,०००; डेसी = $\frac{१}{१०}$, सेंटि = $\frac{१}{१००}$, मिलि = $\frac{१}{१०००}$.

| | |
|---|---|
| १ इंच = २.५४ सेंटिमीटर. | १ किलोमी. = .६२१ मैल. |
| १ पौंड = ४.५४ ग्रॅम. | १ किलोग्रॅम = २.२ पौंड. |
| १ मीटर = १.०९ यार्ड. | १ लिटर = .२२ गॅलन. |
| | १ लिटर = १००० घ. सें. मी. |

**दशमूलारिष्ट**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें म्हणजे सालवण, पिठवण, रिंगणी, डोरली, गोखरू, बेल, ऐरण, टेंटू, पहाड, शिवण यांचीं मुळें, पोखरमूळ, लोध्र, गुळवेल, आंवळकाठी, धमासा, खैराची साल, असण्याची साल, हिरडेदळ, कोष्ठ, मंजिष्ठ, देवदार, वावडिंग, ज्येष्ठमध, भारंगमूळ, कवठाचा आंतला गीर, बेहडा, पुनर्नवा, चवक, जटामांसी, गव्हला, उपळसरी, शहाजिरे, निशोत्तर रेणुकबीज, रास्ना, पिंपळी, इत्यादि आहेत.

सर्व तऱ्हेच्या वातरोगांवर हें एक उत्तम औषध आहे. पक्षघात, आमवात, अंग कांपणें, हातापायाला मुंग्या येणें, कमर दुखणें, बारीक ताप, इत्यादि विकारांवर हें औषध अतिशय गुणकारी आहे. स्त्रियांना बाळंतपणानंतर आलेला अशक्तपणा, ताप, तहान, तगमग, डोकें दुखणें, स्त्राव नीट न होणें, बडबड, इत्यादि विकारांवर या औषधाचा चांगला उपयोग होतो. मूळव्याध, प्रमेह, मंदाग्नि, उदररोग, लघवीला साफ न होणें, धातुक्षय, ओकारी, भगंदर, इत्यादि रोगांवरहि या अरिष्टाचा उपयोग होतो. याच्या सेवनानें शुक्रवृद्धि होऊन बल व तेज हीं वाढतात, व कृश असतात ते पुष्ट होतात, असें वैद्यकशास्त्रांत सांगितलें आहे. पाण्याबरोबर १। ते २।। तोळे, दिवसांतून तीन वेळां घेतात.

**दशरथ**—रघुकुलांतील हा अयोध्येचा राजा अज राजाचा पुत्र असून अतिरथि, यज्ञयाग करणारा व धर्मनिष्ठ होता. याला कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या तीन बायका होत्या. कैकेयी ही म्हातारपणची बायको दिसते. यानें शंभर अक्षौहिणी सैन्यासह सुमानस नगरीवर चाल केली व तेथील राजा साध्य याच्याशीं एक महिना युद्ध करून त्याला बंदीवान् केलें. तेव्हां त्याचा अल्पवयी पुत्र भूषण दशरथाबरोबर युद्धास आला; परंतु त्याचा पराभव झाला. युद्ध संपल्यावर हा तेथें एक महिनाभर राहिला असता साध्य व भूषण यांचें परस्परांवरील प्रेम पाहून आपणांसहि भूषणासारखे गुणवान् पुत्र व्हावेत असें त्याच्या मनांत आलें. यानें साध्य राजास पुत्रप्राप्तीचा उपाय विचारला असतां त्यानें त्याला विष्णूला संतुष्ट करण्यास सांगितलें. नंतर सुमानस नगर साध्य राजास देऊन दशरथ अयोध्येस परत आला व अनेक व्रतें केल्यावर यानें पुत्रकामेष्टि नांवाचा यज्ञ केला. तेव्हां विष्णु प्रगट होऊन त्यानें दशरथास वर मागण्यास सांगितलें असतां, यानें दीर्घायुषी, धार्मिक व लोकांवर उपकार करणारे चार पुत्र मागितले. त्याप्रमाणें विष्णूनें वर दिला. यानंतर यास राम, लक्ष्मण,

भरत व शत्रुघ्न असे चार पुत्र झाले. याला शांता नांवाची एक मुलगी होती; ती ऋष्यशृंगाला देऊन पुत्रकामेष्टि यज्ञ केला अशीहि कथा आहे.

आपलें म्हातारपण झालें असें जाणून यानें रामास यौवराज्याभिषेक करण्याचें ठरविलें. पण या गोष्टीस कैकेयीनें मोडता घातला व रामास यौवराज्याऐवजीं वनवास देवविला. या पुत्रविरहामुळें राजाला अतिशय दुःख होऊन त्यांतच त्याचा अंत झाला. दशरथ हा अति विषयी असल्यानें त्यावर संकटें ओढवलीं असें एक मत आहे.

**दशरथ मौर्य** ( खि. पू. २२५–२२६ )— मौर्य वंशांतील अशोकाचा नातू व कुणालाचा पुत्र. याच्या वेळेस याचा भाऊ संमति हाच राज्यकारभार पाहत असल्यानें यास बंधुपालित असें म्हणत असल्याचें दिसून येतें. याच्या वेळीं चैत्रराज नामक राजानें कलिंग देशाचें गेलेलें स्वातंत्र्य परत मिळवलें असा उल्लेख हाथिगुम्फेंतील खारवेलच्या शिलालेखांत आहे. गयेजवळच्या नागार्जुन डोंगरांवरील तीन लेखांत यानें कोरलेल्या गुहा दान दिल्याचे उल्लेख आहेत. हा परधर्मसहिष्णु असे. आजीवकांनाहि त्यानें देणग्या दिलेल्या आढळतात.

**दशांगाच्या गोळ्या**— विस्तवावर घालून जाळल्यानें सुवास निघावा म्हणून या गोळ्या केलेल्या असतात. बहुतेक उदबत्तीच्या मसाल्याच्याच या करतात. त्या मसाल्यांत साखरपाक घालून गोळया बांधतात. दशांगाच्या जातीच्या पाश्चात्य प्रकारच्या गोळ्या ज्या असतात त्यांना 'पॅस्टिल्स' म्हणतात.

**दशावतार**— ( अवतार पाहा ). आजपर्यंत नऊ अवतार झाले आहेत व आणखी एक अवतार होणार आहे अशी हिंदुधर्माची कल्पना आहे. दहा अवतारांची ही कल्पना गौतम बुद्धानंतर प्रचारांत आली असली पाहिजे. पण अवतारांची कल्पना मात्र बुद्धाच्यापूर्वी अनेक शतकें अस्तित्वांत असावी. कारण भगवद्गीतेंत कृष्ण म्हणतो—

> यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
> अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥
> परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।
> धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥
>
> ( अध्याय ४, श्लोक ७–८ ).

या श्रीकृष्णाच्या उद्गारांत परमेश्वर अवतार घेतो, तो कां घेतो, केव्हां घेतो, व अवतार घेण्यांत काय हेतु असतो, याची फोड झाली आहे.

हे दहा अवतार पुढीलप्रमाणें मानले आहेत— १ मत्स्य, २ कूर्म, ३ वराह, ४ नरसिंह, ५ वामन, ६ परशुराम, ७ राम, ८ कृष्ण, ९ बुद्ध, १० कल्की. या अवतारांची माहिती त्या त्या नांवाखालीं दिलेली सांपडेल.

पहिला अवतार म्हणजे मत्स्यावतार–जलमय पृथ्वी व त्या जलांत विहरणारे जलचर प्राणी ही पहिली पायरी–टप्पा व त्या कालची परिस्थिति. दुसरा कूर्मावतार–कांसव हें जमिनीवर चालूं शकतें व राहतें त्याप्रमाणेंच तें पाण्यांतहि राहूं शकतें; म्हणजे निवळ जलमय परिस्थितीपेक्षां जमीन व पाणी या दोन गोष्टींचा उल्लेख व पाण्यांत व जमिनीवर राहणारे प्राणी यांचा उल्लेख, या अवतारावरून स्पष्ट होतो. तिसरा वराहावतार—डुक्कर हें जनावर केवळ पृथ्वीवरच राहतें. अर्थात् वराहावताराच्या वेळचा काळ म्हणजे सर्व प्राण्यांनीं पृथ्वी व्यापिली तो काळ होय. यानंतरची, धड पशु नाहीं किंवा धड मानव नाहीं अशी ही नरपशूची स्थिति आणि पशुनिदर्शक सिंह म्हणून नरसिंहावतार होय. या वेळची अर्धमानव स्थिति म्हणजे सुसंस्कृततेचा व सुधारणेचा वारा न लागलेला काल होय. यानंतरचा वामनावतार–संस्कृतीच्या परमोच्च कालाच्या मानानें हा काल म्हणजे नुसती सुरुवात होय. म्हणून हा वामन( लहान )अवतार झाला. यानंतरचा कालखंड म्हणजे परशुरामाच्या पराक्रमाचा, केवळ शक्तीच्या जोरावर पृथ्वी जिंकण्याचा म्हणजे केवळ शारीरिक व शस्त्रबळावर जगणाऱ्या मानवांच्या इतिहासाचा काल होय. यानंतर रामावतार म्हणजे तत्त्वज्ञान, न्याय, राजशासन, इत्यादींच्या उत्कर्षाचा व वाढीचा काल होय. कृष्णावतार हा पूर्णावतार समजला जातो. श्रीकृष्णाच्या गीतेंतील तत्त्वज्ञानाचा पगडा आज हजारों वर्षे हिंदु संस्कृतीवर आहे ही एकच गोष्ट कृष्णाला पूर्णावतार कां मानतात हें समजण्यास पुरेशी आहे. कृष्णावतारानंतर बुद्धावतार समजला जातो. अहिंसात्मक तत्त्वज्ञानाचा जो परिणाम हिंदी जनतेवर झाला व त्यामुळें स्वतंत्र धर्म निघून त्या काळीं सर्व जगभर त्याचा जो प्रसार झाला त्यामुळेंच त्या कालाला एका स्वतंत्र युगाची पात्रता येऊन बुद्धावतार मानला गेला. शेवटचा अवतार कल्की किंवा कलंकी. हा अद्याप व्हावयाचा आहे. म्हणजे सध्यां बुद्धावतार चालू आहे.

सर्वसाधारणपणें बुद्धिवादानुसार केलेलें हें विवेचन आहे. ( सुलभ विश्वकोशाच्या पहिल्या विभागाची प्रस्तावना पाहावी. ) मानवी इतिहासाची आणि जगद्विकासाची शास्त्रीय ( पाश्चात्य ) कल्पना लक्षांत घेतली तरीहि आरंभींच्या पांच अवतारांपर्यंतची स्थिति तिच्याशीं बहुशीं जुळते.

**दशाहार**—ज्येष्ठ महिन्यांतील प्रारंभींच्या दहा दिवसांस दशाहार म्हणतात. गंगेचा जन्म शुक्र पक्षाच्या दशमीस झाला म्हणून या दशमीस दशाहरा ( जीवितचक्रदशा हरण करणारी ) असें नांव पडलें आहे. दशाहारांत, मोठ्या भाविकतेनें गंगेची

पूजाअर्चा, स्तवन, वगैरे विधी मोठ्या प्रमाणांत गंगातीरीं करण्यांत येतात. धर्मसिंधु, निर्णयसिंधु, वगैरे ग्रंथांत हे विधी कसे करावयाचे व त्यांचें महत्त्व काय आहे यासंबंधीं विवेचन केलेलें आहे.

**दशाज्ञा**—ख्रिस्ती संप्रदायांतील परमेश्वराच्या आज्ञा. कॅथॉलिक संप्रदायामध्यें आज्ञा हा शब्द परमेश्वराच्या दहा आज्ञा व कांहीं सांप्रदायिक आज्ञा यांस लावण्यांत येतो. दहा आज्ञा अथवा दशाज्ञा या सर्वसामान्य व महत्त्वाचे नैतिक आदेश असून ते परमेश्वरानें स्वतः लिहिले व सिनाई पर्वतावर मोझेसच्या स्वाधीन केले (प्रयाण, प्र. २०, २-७). या दहा आज्ञांची योजना अशी केली आहे कीं, पहिल्या तीन आज्ञांमध्यें मनुष्यास त्याचें परमेश्वराबद्दलचें कर्तव्य सांगितलें आहे व पुढील सात आज्ञांत मनुष्याचें स्वतःबद्दलचें व आपल्या सहवासीयांबद्दलचें कर्तव्य सांगितलें आहे. या दहा आज्ञा अशा : मी तुझा प्रभु परमेश्वर आहें : १ तूं आपल्यापुढें विचित्र देवता ठेवूं नको. २ तूं व्यर्थ परमेश्वराचें नांव घेऊं नको. ३ तूं विश्रांतीचा पवित्र दिवस पाळण्याचें स्मरण ठेव. ४ आपल्या पितरांस मान दे. ५ तूं हिंसा करूं नको. ६ तूं व्यभिचार करूं नको. ७ तूं चोरी करूं नको. ८ तूं आपल्या सहवासीयांविरुद्ध खोटी साक्ष देऊं नको. ९ तूं परदारेचा अभिलाष धरूं नको. १० तूं परधनाचा अभिलाष धरूं नको.

या आज्ञा ज्या नैतिक आधारावर आधारलेल्या आहेत तो असा : परमेश्वरानें सृष्टींतील प्राणी निर्माण केले असून त्यांस बुद्धि व स्वतंत्र इच्छा दिली आहे. यामुळें हे सर्व प्राणी परमेश्वराच्या आधारावर अवलंबून आहेत आणि याकरितां त्यांनीं त्याची आज्ञा मानली पाहिजे. परमेश्वराची अशी इच्छा आहे कीं, प्राण्यांनीं त्याचें ज्ञान करून घ्यावें, त्यावर प्रेम करावें व सर्व आयुष्यभर त्याची सेवा करावी व मृत्यूनंतर शाश्वत सुखाचा अनुभव घ्यावा. या मुख्य गोष्टींवर या दहा आज्ञा आधारलेल्या आहेत आणि म्हणून त्या केवळ ख्रिस्ती लोकांवरच बंधनकारक आहेत असें नसून सर्वच लोकांस लागू होतील अशा आहेत. मात्र तिसरी आज्ञा ही विशेष असून तीमध्यें विश्रांतीचा दिवस हा परमेश्वराचें पूजन करण्यांत घालवावा असें सांगितलें आहे. याकरितां या दहा आज्ञांचा आदेश देणें ही गोष्ट अगदीं अपरिहार्य होती असें नव्हे. कारण या दहा आज्ञा मनुष्याला आपल्या स्वभावाचें नीट पृथक्करण करूनहि काढतां आल्या असत्या. परमेश्वराने या दशाज्ञा सिनाई पर्वतावर इस्राएल लोकांस देण्यापूर्वीच जे लोक स्वाभाविकपणेंच नैतिक आचरण ठेवीत होते त्यांच्या आचरणांत होत्याच. अर्थात् येशू ख्रिस्तानें या दहा आज्ञांचें आधारभूत महत्त्व पुन्हां मान्य केलें व या सर्व दहा आज्ञा पुढील दोन तत्त्वांवर आधारलेल्या असून त्यांवर सर्व नियम बसविलेले आहेत असें सांगितलें यांत कांहीं नवल नाहीं. हीं तत्त्वें म्हणजे परमेश्वरावर प्रेम करणें व आपल्या सहजनांवर प्रेम करणें, हीं होत (तुलना—शुभ. मत्तय, प्र. २२ व ४०).

सांप्रदायिक आज्ञा—संप्रदायांतील समासदांच्या सर्वसामान्य हिताकरितां जे नियम करण्यांत येतात ते नियम म्हणजे सांप्रदायिक आज्ञा होत. परंतु 'सांप्रदायिक आज्ञा' हे शब्द कांहीं विशिष्ट मर्यादित व सर्वगामी स्वरूपाच्या आज्ञांसच लावण्यांत येतात व त्यांचें स्वरूप धर्मतत्त्वांऐवजीं नीतितत्त्वांवर आधारलेलें असतें. या आज्ञा फक्त संप्रदायांतील समासदांवरच बंधनकारक असतात. अशा सांप्रदायिक आज्ञा पुढीलप्रमाणें आहेतः—१ विश्रांतीच्या दिवशीं व सणाच्या दिवशीं मिस्सामध्यें साहाय्य करणें व कोणत्याहि तऱ्हेचें शारीरिक श्रमाचें काम न करणें. २ संप्रदायामध्ये नेमून दिलेल्या दिवशीं उपवास करणें व मांसाशन न करणें. ३ प्रतिवर्षी निदान एकदां तरी पातकोच्चार करणें. ४ ईस्टर कालामध्यें निदान एकदां तरी पवित्र सहभोजन करणें. ५ संप्रदायास व धर्मोपदेशकांच्या धारणपोषणास मदत करणें. ६ विवाहाचें पावित्र्य रक्षण्याकरितां संप्रदायानें जे नियम केले आहेत ते पाळणें.

**दसपल्ला**—ओरिसांतील एक मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ ५६८ चौ. मैल. उत्तरेस अंगुल जिल्हा, व नरसिंगपूर संस्थान, पूर्वेस खंडपारा व नयागड, दक्षिणेस मद्रासेंतील गंजम जिल्हा, व पश्चिमेस बौध. दसपल्लाच्या पश्चिमेस व दक्षिणेस इमारती लांकडें असलेलीं जंगलें आहेत. नयागड व खंडपारा येथील राजांनीं देणग्या दिल्यामुळें हें संस्थान बनलें आहे. १४९५ सालीं सालभंजनें येथें गादी स्थापिली. येथील राजास राजा जोरेमुड दसपल्ला म्हणण्याची चाल आहे. मराठे राजे ह्या राजाकडून खंडणी घेत नसत. कारण येथील राजा जगन्नाथ येथील रथ तयार करण्याकरितां प्रतिवर्षी लांकूड फुकट पुरवीत असे. लो. सं. ५३,८३३. येथें बहुतेक हिंदूंचीच वसति आहे. शिवाय खोंड, चास व गौर, इत्यादि जातींचे लोक येथें राहतात. खेडीं ४८५. त्यांपैकीं कुंजबन हें मुख्य होय. सध्यांचे राजे किशोरचंद्रदेव भंज हे १९१३ सालीं अज्ञान असतांनाच गादीवर आले. हें संस्थान १९४८ सालीं ओरिसा प्रांतांत विलीन करण्यांत आलें.

**दसरा**—हिंदूंचा एक महत्त्वाचा सण. 'दशाह' = दहा दिवस, या संस्कृत शब्दापासून हा शब्द आला आहे. आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून नवरात्र झाल्यावर दहावे दिवशीं हा सण येतो. हा शक्तिदेवतेचा उत्सव आहे. भजन, पूजन, कीर्तन, वगैरे मार्गांनीं तिची उपासना केल्यानें ती प्रसन्न होऊन आपणास ऐहिक

व पारमार्थिक संकटें नाहींशीं करण्याचें सामर्थ्य देते, अशी कल्पना आहे.

आश्विन शु॥ प्रतिपदेला देवीची स्थापना करावयाची. नऊ दिवस (नवरात्रांत) तिचें भजन, पूजन, कीर्तन, वगैरे प्रकारांनीं तिची आराधना करावयाची, व दहाव्या दिवशीं गांवाबाहेर शस्त्रास्त्रें वगैरे नेऊन शांततेनें पूजन करावयाचें. याच दिवशीं पांडवांनीं शमीवर ठेवलेलीं हत्यारें परत ग्रहण करून कौरवांच्या तावडींतून उत्तराच्या गाई परत आणल्या, म्हणून या दिवशीं शमी वृक्षाचीहि पूजा करण्यांत येते व त्या झाडाचीं किंवा आपट्याचीं पानें 'सोनें' म्हणून वांटतात. हल्लीं आपट्याचीं पानेंच विशेषतः या कामीं वापरतात.

मराठ्यांच्या राज्यांत हा सण मोठ्या कडाक्यानें करण्यांत येई. सडकेवर दुतर्फा सशस्त्र लष्करी शिपाई उमे असत व मधून सजवलेले शेंकडों हत्ती, घोडे, पालख्या यांच्यासह मोठमोठे सरदार, मानकरी, अमीरउमराव लष्करी थाटानें मिरवीत जात असत. ही मिरवणूक दोनतीन कोस चालत असे. हा सण आटपून मराठे लोक मोहिमेवर निघत; यामुळें या सणास सीमोल्लंघन, शिलंगण अशींहि नांवें पडलीं आहेत.

दहीं— 'नासकें दूध' अशा अर्थानें सं. दधि. हा शब्द वारंवार ऋग्वेदामध्यें व पुढील ग्रंथांत आलेला आहे. शतपथ ब्राह्मणांत घृत, दधि, मस्तु (दह्याचें पाणी) व आमीक्षा (दहीं) असे शब्द क्रमानें आलेले आहेत. दधि ह्याचा अर्थ अनेकदां दहीं असाहि आहे व तें सोमरसांत मिसळीत असत.

दह्यापासून लोणी, ताक, मठ्ठा, श्रीखंड, वड्या इ. करतात. दह्याचे घटक पाणी, स्निग्धांश, मांसजनक पदार्थ, दुग्धशर्करा, दुग्धाम्ल व निरिंद्रियक्षार हेच मुख्य आहेत. यांशिवाय दह्यांत दुग्धाम्लजंतू व कर्बाम्लवायू हे जास्त असतात. दहीं हें आरोग्यकारक व औषधी आहे.

दुधाचें दहीं बनण्यास आपल्या देशांतील हवामान व परिस्थिति बरीच अनुकूल असल्यामुळें, दुधाचें दहीं बनविणें बहुतेक वेळां मुळींच कठिण पडत नाहीं. कोणालाहि तें सहज साधतें. ही आपल्या नेहमींच्या परिचयाची गोष्ट झाली आहे. दुधाचें दहीं करणारांना, दहीं लाळेसारखें झालें किंवा चक्का, लोणी, तूप, वगैरे पदार्थांना वाईट वास येऊं लागला, किंवा चवीला तें स्वादिष्ट लागलें नाहीं तर दुधाला लावावयाच्या विरजणांत बिघाड झाला आहे याची जाणीव होते व आपलें विरजण बदललें पाहिजे हें त्यांच्या लक्षांत लागलेंच येतें.

दुधाचें दहीं होतें म्हणजे काय होतें? दूध पाहिलें तर प्रवाही असें दिसतें. दुधाच्या रुचीमध्यें थोडा गोडपणा, थोडी पिठुळपणाची झांक व थोडी मलईची चव, वगैरे गोष्टी ध्यानांत येतात. परंतु दुधाला विरजण लावलें म्हणजे कांहीं वेळानें ह्या प्रवाही दुधाचें घट्ट दहीं होतें. म्हणजे दह्यामध्यें घनता आलेली प्रामुख्यानें दिसते. हें दहीं 'दह्याची कवडी' या नांवानें पुष्कळांना माहिती आहे. चाखून पाहिलें तर तें वेताचें आंबट असतें. ताजें दहीं फार आंबट असत नाहीं. त्यामध्यें थोडासा विशिष्ट स्वादहि आढळतो व त्यांत एक तऱ्हेची रुचिहि निर्माण झालेली असते. दुधामध्यें एवढा बदल कसा होतो? दुधाला आपण विरजण लावतों म्हणजे काय करतों? तर भांड्यांतील किंवा चरणींतील दुधामध्यें लहानसा चमचाभर दहीं घालतों. विरजण लावल्यावर दुसऱ्या दिवशीं पाहावें तों एवढ्याशा चमचाभर दह्यानें चरणीभर दहीं झालेलें आपल्याला दिसतें. चमचाभर दह्यानें दुधांत रासायनिक फरक होत जातो. ह्या रासायनिक फरकामुळेंच थोडेंसें दहीं पुष्कळ दुधाचें दहीं बनवतें. पण दुधाचें दहीं होणें ही क्रिया केवळ रासायनिकच नव्हे, तर ती 'जंतुनिर्मित' आहे.

विरजणांतील जंतू हे केवळ वनस्पतिरूप पेशी असून ते अनेक दृष्टींनीं माणसांना हितकर आहेत. हे दहीं बनविणारे जंतू विरजणाबरोबरच दुधांत सोडले तर कांहीं तासांनीं ते दुधाचें दहीं बनवूं शकतात. म्हणजे दुधाचें दहीं होण्यास जंतूंचें साह्य लागतें. दूध जर जंतुविरहित वातावरणांत ठेवतां आलें तर दुधाचें दहीं बनण्याची किंवा दूध नासण्याची भीति नाहीं. पण घरांत नेहमींच्या परिस्थितींत जंतुविरहित वातावरण ठेवणें व टिकविणें अशक्य आहे. म्हणूनच तर भांड्यांत दूध तसेंच ठेवले व विरजण लावलें नाहीं तर सामान्यतः १२–१४ तासांनीं व क्वचित् प्रसंगीं यापेक्षां लवकरहि तें नासून जातें. याकरितांच दूध नासून फुकट जाऊं नये म्हणून दुधाचें दहीं करण्यासाठीं दुधामध्यें दह्याचे जंतू घातले पाहिजेत. विरजण लावणें म्हणजेच दह्याच्या जंतूंना दुधांत सोडणें व स्वैरसंचार करूं देणें. मग ह्या जंतूंची तेथें वाढ होते व दुधाचें चरणीभर दहीं बनतें. कारण या जंतुरूप सूक्ष्म वनस्पति-पेशींची वाढ योग्य उष्णतामान, भरपूर अन्न व अनुकूल परिस्थिति असली तर मोठ्या झपाट्यानें होत असते. एका जंतूपासून भूमितिश्रेणीनें वाढ होत जाऊन दहा तासांत २० लाख जंतुपेशी तयार होतात व म्हणूनच तर थोड्या वेळांत विरजणांतील जंतूंना चरणीभर दहीं करतां येतें. दह्याच्या जंतूंना दुधामध्यें भरपूर अन्न, मर्यादित प्रमाणांत इष्ट तीं जीवनसत्त्वें व योग्य वातावरण ह्यांचें साह्य मिळतें. दुधांत असलेल्या साखरेचें, दुग्धशर्करेचें दह्यांतील जंतूंमुळें दुग्धाम्ला(लॅक्टिक ॲसिड)मध्यें रूपांतर होतें. हे 'दुग्धाम्ल जंतू' दुधांत सोडल्यामुळेंच दुधाची चव बदलून, दूध थोडें थोडें आंबट लागावयाला सुरुवात होते. म्हणजेच दुधाचें दहीं बनूं लागतें.

कांहीं प्रकारच्या जंतूंमुळें दुधाचें दहीं बनतें, पण तें लाळेसारखें असतें. त्याला चमचा लावून वर काढलें तर दोरीसारखी त्या दह्याची तार निघते. कांहीं वेळां दह्यांतून बुडबुडे निघत असतात; म्हणजे दहीं फसफसतें. कित्येक वेळां तर दहीं एकसंधी म्हणजे चांगल्या खरवसाप्रमाणें घट्ट न राहतां त्याचें चोथापाणी होतें. योग्य व इष्ट जंतूंच्या अभावीं दुधापासून उत्तम दह्याऐवजीं अशा प्रकारचीं निरनिराळीं स्वरूपें आणण्याससुद्धां निरनिराळ्या प्रकारचे जंतूच कारणीभूत होतात. या जंतूंचीं अनेकविध रूपें असतात. हे जंतू चांगलें दहीं करणाऱ्या जंतूंहून वेगळ्या प्रकारचे असतात.

दुग्धाम्ल— दह्याचीं भांडीं साफ करून, स्वच्छ रीतीनें धुऊन, निर्मळ केलेलीं व नंतर चांगलीं वाळवून ठेवलेलीं असलीं, आणि दुधाचें उष्णतामान योग्य असलें म्हणजे सामान्यतः दहीं वाईट होत नाहीं. पण आपल्या देशांत तूर्त चांगलें दहीं देणारे इष्ट व योग्य प्रकारचे जंतू असलेलें हुकमी विरजण मिळविणें मात्र सोपें काम नाहीं. आपल्याकडील चांगल्या विरजणांत साधारणपणें दुग्धाम्ल जंतू व सूक्ष्म जीव मिळून तीन प्रकार आढळतात. हे दुग्धाम्ल जंतू नव्या जोमाचे व प्रभावी असले तर, इतर जंतू (मग ते रोगांचे असोत कीं रोगांना अडथळा करणारे असोत) त्यांच्या सान्निध्यांत जिवंत राहूंच शकत नाहींत. निदान त्यांच्या सान्निध्यांत इतर जंतूंची वाढ होऊं शकत नाहीं. हवेंतील एकाएकीं बदलणाऱ्या उष्णतामानामुळें किंवा संसर्गानें विरजणांत नकळत विकृति उत्पन्न होते व त्यांतील दुग्धाम्ल जंतू कांहीं काळ कमजोर व निष्प्रभ होतात. त्यांच्या अशा अवस्थेंत संसर्गानें विरजणांत शिरलेल्या अनिष्ट जंतूंना वाढ होण्यास मुभा मिळते व एका रात्रींत चांगलें विरजण लावलेल्या दुधाचें खराब दहीं झालेलें आपल्याला आढळून येतें.

आपल्या देशांतील चांगल्या विरजणांतील जंतूंपैकीं दोन प्रकारचे जंतू दुधाचें दहीं करण्यास कारणीभूत होत असतात. दुग्धशर्करेचा ते आपल्या पोषणासाठीं, आपल्या पेशींच्या शरीरवाढीसाठीं व संख्यावृद्धीकरितां उपयोग करतात व त्या साखरेपासून अम्ल तयार होतें व तें जसजसें सांचूं लागतें तसतसें दुधाचें दहीं होतें. हें 'दुग्धाम्ल' बेतशीर प्रमाणांत असलें म्हणजे चवीला चांगलें असतेंच. पण त्याच्या सान्निध्यांत नैसर्गिकरीत्या असलेले किंवा मुद्दाम ठेवलेले पदार्थ नासत नाहींत. मीठ, साखर अगर शिरका वापरून लोणचीं, मुरांबे, वगैरे पदार्थ टिकवितात. निरनिराळे पदार्थ आंबवण्यास लागणारे जंतू जरी 'दुग्धाम्ल जंतू' म्हणून ओळखले गेले तरी ते निरनिराळ्या प्रकारचे असतात. ज्या जंतूंमुळें हें अम्ल तयार होतें ते जंतू प्रभावी व नव्या जोमाचे असले, त्यांच्या वाढीस अनुकूल परिस्थिति, उष्णतामान, वगैरे असलीं तर ते अधिक प्रमाणांत अम्ल तयार करतात.

किण्व—चांगल्या विरजणांत असलेल्या तिसऱ्या जंतूंचा ह्या अम्ल तयार करणाऱ्या जंतूंशीं असलेला संबंध 'परस्परोपजीवी', 'अन्योन्यजीवी', 'सहजीवनात्मक' किंवा 'परस्परपोषक' स्वरूपाचा आहे. हा सूक्ष्म जीव 'किण्व' (यीस्ट) जातीचा आहे. हें किण्व विरजणांत नसलें तरी पूर्वी वर्णन केलेले दोन प्रकारचे दुग्धाम्ल जंतू उत्तम दहीं बनवूं शकतात. पण विरजणांतील ह्या तिसऱ्या प्रकारच्या सूक्ष्म जीवानें म्हणजे किण्वानें, एकट्याच्या जीवनक्रियेनें दुधाचें दहीं कधींच बनूं शकणार नाहीं. दह्यांतील किण्व त्यांतील अम्लाचा उपयोग आपल्या उपजीविकेकरितां करतें व ह्याबद्दल एक पदार्थ आपल्या पेशीबाहेर टाकतें. त्या पदार्थाचे गुणधर्म एका विशिष्ट जीवनसत्त्वासारखे आहेत व ह्या जीवनसत्त्वाचा दुग्धाम्ल जंतूंना फार उपयोग होतो, किंबहुना यामुळेंच त्यांचे शारीरिक जीवनव्यापार अव्याहतपणें चालतात, व विरजणांत या किण्वाच्या अस्तित्वामुळें दुग्धाम्ल जंतूंची आयुर्मर्यादा वाढते.

विरजण नळ्या—विरजण निरुपयोगी किंवा अयोग्य व अनिष्ट ठरेपर्यंत त्याच विरजणानें केलेल्या दह्याचें पुढें अनेक प्रकार झालेले असतात. त्या दह्यांतून लोणी निघून त्याचें तूप बनलेलें असतें. ह्या तुपांत चिघडलेल्या विरजणाचा अंश राहिल्यानें त्याला वाईट वास येऊं लागतो. म्हणून खात्रीलायक विरजण वापरणें आवश्यक आहे. हें खात्रीलायक विरजण चांगल्या दह्यांतील दुग्धाम्ल-जंतूंची कांचनळींत पूर्ण वाढ होऊं देऊन त्या कांचनळीचें तोंड दिव्यावर तापवून बंद करून ठेवलें म्हणजे हवें तेव्हां उपलब्ध होतें. ह्या कांचनळींतील विरजण, नळी फोडून वाटेल तेव्हां उपयोगांत आणतां येतें. अशाच तऱ्हेचीं किंवा अन्य तऱ्हेनें वाळवून उपयोगांत आणण्याजोगीं विरजणें किंवा विरजणाच्या पुड्या व वड्या, युरोप–अमेरिकेंत विक्रीस ठेवलेल्या असतात व त्यांचा जरूर लागेल तेव्हां आयत्या वेळीं तावडतोब उपयोग करतां येतो.

दुधाचें दहीं बनविणें हें चांगल्या विरजणाप्रमाणें योग्य परिस्थितीवरहि कांहीं अंशीं अवलंबून आहे. दुधाचें दहीं बनण्यास लागणाऱ्या उष्णतामानाच्या किमान आणि कमाल मर्यादा आहेत; म्हणून निरनिराळ्या ऋतूंत निर्माण होणाऱ्या उष्णतामानाप्रमाणें विरजावयाच्या दुधाचें उष्णतामानांत थोडाफार फरक करावा लागतो. थंडीच्या दिवसांत बोटाला सहन होईल इतकें दूध तापवून तें विरजावें लागतें. तें भांडें चुलीच्या उबाऱ्याजवळ ठेवल्याशिवाय ठराविक मुदतींत दुधाचें दहीं होत नाहीं. उन्हाळ्याच्या दिवसांत थंड दूध विरजलें तरी चालतें. कांहीं

वेळेस अति उन्हाळा असल्यास फार आंबट दहीं होऊं नये म्हणून दूध विरजलेलें भांडें थंड पाण्यांत ठेवावें लागतें. त्याचप्रमाणें विरजणाचें प्रमाणहि बदलावें लागतें. थंडीच्या दिवसांत लागणारें विरजण उन्हाळ्यांतील विरजणापेक्षां दुपटीतिपटीनें जास्त असतें (आहार, २.१०).

**दळण**—अगदीं प्राचीन काळीं म्हणजे नवपाषाणयुगांत पीठ करण्यासाठीं पाटा-वरवंटाच असे. पुढें दोन चपट्या दगडांत दाणे ठेवून पीठ करण्याची कल्पना आली; व त्यासाठीं जात्याची युक्ति निघाली. जातें पाहा.

**दळवणपूरचे गंग राजे**—या गंग राजाना कोंगु असेंहि दुसरें नांव होतें. कांहींच्या मतें चेर व कोंगु एकच असावेत. चेरांच्या उत्तरेकडे गंग अथवा कोंगु हे राज्य करीत असत व त्या देशास कोंगु देश म्हणत. कांहींचें म्हणणें हे गंग ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून इ. स. ८९४ पर्यंत राज्य करीत होते; परंतु फ्लीटच्या मतें ते इतके जुने नाहींत. एका ताम्रपटांत या राजांचीं १७ नांवें आलीं असून, त्यांचा काळ इ. स. ९६८-१०८० असा निघतो.

एक सूर्यवंशी कोंगु राजवंश आढळतो; त्यापैकीं कन्नडदेव राजाचा मंत्री एक नागनंदी नांवाचा जैन होता. याची राजधानी स्कंदपुर होती. यानें चोल, पाण्ड्य, केरळ, मलयालम, कर्नाटक, वगैरे देश जिंकले. याला आद्य शंकराचार्यांनीं जैन धर्मापासून परावृत्त करून वैदिक धर्मानुयायी बनविलें. या वंशांत सात राजे झाले; ते कोंगु देशाचे प्राचीन राजे होत. यानंतर जे गंग राजे आले त्यांचा वंश निराळा होता म्हणतात.

जाह्नवी गंग वंशांतील कण्वायन शाखेचा स्कंदपूरचा पहिला राजा कोंगणीवर्मा होय. त्याचा पुत्र माधव व त्याचा हरिवर्मा; त्यानें आपली राजधानी कर्नाटकांत दळवणपूर येथें केली. यापुढें दळवणपूर येथेंच हें घराणें राज्य करीत होतें. या वंशांत वीस राजे झाले. मरकारा ताम्रपटावरून या घराण्यास ख्रि. श. च्या पहिल्या शतकापासून प्रारंभ होतो; पण फ्लीटच्या मतें दहाव्या शतकापासून. या घराण्यास होयसळ बल्लाळांनीं (१०८० चा सुमार) जिंकिलें व दळवणपुरास राजधानी केली. दळवणपूर म्हणजे तळकाड होय. म्हैसूर राज्यांत नीलगिरीच्या माथ्यावर हें गांव आहे. विजयानगरचें साम्राज्य नष्ट झाल्यावर एका गंग राजानें दळवणपूरच्या ईशान्येस शिवसमुद्र येथें एक लहानसें राज्य स्थापिलें. त्याचा नाश १७ व्या शतकाच्या आरंभीं झाला. ते आपणास महाधिराय म्हणवीत.

**दळवाई**—म्हैसूरच्या वडेयर राजघराण्याच्या सेनापतींना दळवाई ही पदवी असे. हे फार प्रबळ असत. राजा दुर्बळ असल्यास सैन्याच्या जोरावर राज्याचा सर्व कारभार हे दळवाईच पाहत. दोड्ड कृष्णराज मेल्यावर हे विशेष प्रसिद्धीस आले. यानीं मुसलमानांपासून आपल्या राज्याचें बरेच दिवस रक्षण केलें होतें. पहिल्या कृष्णराजानंतर तीन दळवाई भावांनींच राज्य संभाळिलें होतें. हे दळवाई बहुधा राजघराण्यांतील असत. राजाखालोखाल हेच राज्यांतील मुख्य अधिकारी असत. मारनायक नांवाच्या एका दळवाईनें बंड केल्यामुळें कांहीं दिवस ही जागा खालसा केली होती. परंतु हैदरानें राज्य बळकावण्यापूर्वी कांहीं दिवस दळवाईची नेमणूक पुनः केली होती. करिकल मल्लराजय या दळवाईनेंच हैदरास मदत करून वडेयर घराणें नामशेष केलें. त्या वेळीं देवराज ऊर्फ नंदराज नांवाचा दळवाई होता. त्याच्याच हाताखालीं हैदर होता. पुढें हैदरानें आपल्या मालकास बाजूस सारून कांहीं दिवस आपण दळवाईपण भोगिलें व शेवटीं राजास पदच्युत करून गादी बळकाविली. राजघराण्यांतील दळवाई न नेमतां बाहेरचे नेमल्यास राज्याचा फायदा होई; राजघराण्यांतील दळवाई राजांना चैनींत गुंतवून आपण कारभार बळकावीत. ही गोष्ट ओळखून कंठीरव नांवाच्या एका राजानें बाहेरचे दळवाई नेमण्याची वहिवाट पाडली होती. जुलमी दळवाईंत कठीय, नंजराज (नंदराज), बसव, दुसरा नंज, व वीरराज हे प्रमुख होते. यांच्या हातीं इतकी सत्ता (लष्कराच्या बळावर) होती कीं, त्यांना राजकर्ते म्हणत.

**दक्ष**—पुराणांत दक्ष हा ब्रह्म याचा एक पुत्र व प्रजापतींपैकीं एक असें सांगितलें आहे. दक्षाबद्दल उल्लेख ऋग्वेद, शतपथ ब्राह्मण, रामायण, महाभारत व अनेक पुराणें यांत आहे; त्याची बायको प्रसूति ही मनूची नात असून त्यांना चोवीस, पन्नास किंवा साठ कन्या झाल्या असा निरनिराळा उल्लेख आढळतो. या कन्यांपैकीं दहा धर्माला, तेरा कश्यपाला दिल्या व त्यांच्यापासून देव, दैत्य, मानव, पक्षी, सर्प व इतर प्राणी उत्पन्न झाले. सत्तावीस कन्या चंद्राला व एक सती नांवाची शिवाला दिली. पुढें हा दक्ष एकदां कैलासास गेला असतां शंकरानें त्याचा सत्कार केला नाहीं त्यामुळें यानें त्याची फार निंदा केली व त्या दिवसापासून दक्ष शंकराचा व सतीचा द्वेष करूं लागला.

दक्षानें यज्ञ केला त्यांत शिवाला निमंत्रण दिलें नाहीं. त्यामुळें रागावून शिवानें यज्ञाचा विध्वंस केला व दक्षाला शाप दिला. दक्षाला ठार मारलें असेंहि कांहीं पुराणांत आहे. या कथेचें मूळ तैत्तिरीय संहितेंत असून रामायण, महाभारत व पुराणें यांत ही कथा विस्तृत आहे. शिवाच्या शापामुळें दुसऱ्या मन्वंतरांत दक्ष पुनः जन्मला व त्याला क्रोध, तमस, दम, विकृत, अंगिरस, कर्दम व अश्व असे सात मुलगे झाले. दक्ष हा अठरा स्मृतिकारांपैकीं एक आहे असें मानतात.

याशिवाय प्राचेतस् नांवाचा एक दक्ष होता. तो उत्तान-

कांहीं प्रकारच्या जंतूंमुळें दुधाचें दहीं बनतें, पण तें लाळेसारखें असतें. त्याला चमचा लावून वर काढलें तर दोरीसारखी त्या दह्याची तार निघते. कांहीं वेळां दह्यांतून बुडबुडे निघत असतात; म्हणजे दहीं फसफसतें. कित्येक वेळां तर दहीं एकसंधी म्हणजे चांगल्या खरवसाप्रमाणें घट्ट न राहतां त्याचें चोथापाणी होतें. योग्य व इष्ट जंतूंच्या अभावीं दुधापासून उत्तम दह्याऐवजीं अशा प्रकारचीं निरनिराळीं स्वरूपें आणण्यासुद्धां निरनिराळ्या प्रकारचे जंतूच कारणीभूत होतात. या जंतूंचीं अनेकविध रूपें असतात. हे जंतू चांगलें दहीं करणाऱ्या जंतूंहून वेगळ्या प्रकारचे असतात.

दुग्धाम्ल— दह्याचीं भांडीं साफ करून, स्वच्छ रीतीनें धुऊन, निर्मळ केलेलीं व नंतर चांगलीं वाळवून ठेवलेलीं असलीं, आणि दुधाचें उष्णतामान योग्य असलें म्हणजे सामान्यतः दहीं वाईट होत नाहीं. पण आपल्या देशांत तूर्त चांगलें दहीं देणारे इष्ट व योग्य प्रकारचे जंतू असलेलें हुकमी विरजण मिळविणें मात्र सोपें काम नाहीं. आपल्याकडील चांगल्या विरजणांत साधारणपणें दुग्धाम्ल जंतू व सूक्ष्म जीव मिळून तीन प्रकार आढळतात. हे दुग्धाम्ल जंतू नव्या जोमाचे व प्रभावी असले तर, इतर जंतू (मग ते रोगांचे असोत कीं रोगांना अडथळा करणारे असोत) त्यांच्या सान्निध्यांत जिवंत राहूंच शकत नाहींत. निदान त्यांच्या सान्निध्यांत इतर जंतूंची वाढ होऊं शकत नाहीं. हवेंतील एकाएकीं बदलणाऱ्या उष्णतामानामुळें किंवा संसर्गानें विरजणांत नकळत विकृति उत्पन्न होते व त्यांतील दुग्धाम्ल जंतू कांहीं काळ कमजोर व निष्प्रभ होतात. त्यांच्या अशा अवस्थेंत संसर्गानें विरजणांत शिरलेल्या अनिष्ट जंतूंना वाढ होण्यास मुभा मिळते व एका रात्रींत चांगलें विरजण लावलेल्या दुधाचें खराब दहीं झालेलें आपल्याला आढळून येतें.

आपल्या देशांतील चांगल्या विरजणांतील जंतूंपैकीं दोन प्रकारचे जंतू दुधाचें दहीं करण्यास कारणीभूत होत असतात. दुग्धशर्करेचा ते आपल्या पोषणासाठीं, आपल्या पेशींच्या शरीरवाढीसाठीं व संख्यावृद्धीकरितां उपयोग करतात व त्या साखरेपासून अम्ल तयार होतें व ते जसजसें सांचूं लागतें तसतसें दुधाचें दहीं होतें. हें 'दुग्धाम्ल' बेतशीर प्रमाणांत असलें म्हणजे चवीला चांगलें असतेंच. पण त्याच्या सान्निध्यांत नैसर्गिकरीत्या असलेले किंवा मुद्दाम ठेवलेले पदार्थ नासत नाहींत. मीठ, साखर अगर शिरका वापरून लोणचीं, मुरांबे, वगैरे पदार्थ टिकवितात. निरनिराळे पदार्थ आंबवण्यास लागणारे जंतू जरी 'दुग्धाम्ल जंतू' म्हणून ओळखले गेले तरी ते निरनिराळ्या प्रकारचे असतात. ज्या जंतूंमुळें हें अम्ल तयार होतें ते जंतू प्रभावी व नव्या जोमाचे असले, त्यांच्या वाढीस अनुकूल परिस्थिति, उष्णतामान, वगैरे असलीं तर ते अधिक प्रमाणांत अम्ल तयार करतात.

किण्व—चांगल्या विरजणांत असलेल्या तिसऱ्या जंतूंचा ह्या अम्ल तयार करणाऱ्या जंतूंशीं असलेला संबंध 'परस्परोपजीवी', 'अन्योन्यजीवी', 'सहजीवनात्मक' किंवा 'परस्परपोषक' स्वरूपाचा आहे. हा सूक्ष्म जीव 'किण्व' (यीस्ट) जातीचा आहे. हें किण्व विरजणांत नसलें तरी पूर्वी वर्णन केलेले दोन प्रकारचे दुग्धाम्ल जंतू उत्तम दहीं बनवूं शकतात. पण विरजणांतील ह्या तिसऱ्या प्रकारच्या सूक्ष्म जीवानें म्हणजे किण्वानें, एकट्याच्या जीवनक्रियेनें दुधाचें दहीं कधींच बनूं शकणार नाहीं. दह्यांतील किण्व त्यांतील अम्लाचा उपयोग आपल्या उपजीविकेकरितां करतें व ह्याबद्दल एक पदार्थ आपल्या पेशीबाहेर टाकतें. त्या पदार्थाचे गुणधर्म एका विशिष्ट जीवनसत्त्वासारखे आहेत व ह्या जीवनसत्त्वाचा दुग्धाम्ल जंतूंना फार उपयोग होतो, किंबहुना यामुळेंच त्यांचे शारीरिक जीवनव्यापार अव्याहतपणें चालतात, व विरजणांत या किण्वाच्या अस्तित्वामुळें दुग्धाम्ल जंतूंची आयुर्मर्यादा वाढते.

विरजण नळ्या—विरजण निरुपयोगी किंवा अयोग्य व अनिष्ट ठरेपर्यंत त्याच विरजणानें केलेल्या दह्याचें पुढें अनेक प्रकार झालेले असतात. त्या दह्यांतून लोणी निघून त्याचें तूप बनलेलें असतें. ह्या तुपांत बिघडलेल्या विरजणाचा अंश राहिल्यानें त्याला वाईट वास येऊं लागतो. म्हणून खात्रीलायक विरजण वापरणें आवश्यक आहे. हें खात्रीलायक विरजण चांगल्या दह्यांतील दुग्धाम्ल-जंतूंची कांचनळींत पूर्ण वाढ होऊं देऊन त्या कांचनळीचें तोंड दिव्यावर तापवून बंद करून ठेवलें म्हणजे हवें तेव्हां उपलब्ध होतें. ह्या कांचनळींतील विरजण, नळी फोडून वाटेल तेव्हां उपयोगांत आणतां येतें. अशाच तऱ्हेचीं किंवा अन्य तऱ्हेनें वाळवून उपयोगांत आणण्याजोगीं विरजणें किंवा विरजणाच्या पुड्या व वड्या, युरोप-अमेरिकेंत विक्रीस ठेवलेल्या असतात व त्यांचा जरूर लागेल तेव्हां आयत्या वेळीं तावडतोब उपयोग करतां येतो.

दुधाचें दहीं बनविणें हें चांगल्या विरजणाप्रमाणें योग्य परिस्थितीवरहि कांहीं अंशीं अवलंबून आहे. दुधाचें दहीं बनण्यास लागणाऱ्या उष्णतामानाच्या किमान आणि कमाल मर्यादा आहेत; म्हणून निरनिराळ्या ऋतूंत निर्माण होणाऱ्या उष्णतामानाप्रमाणें विरजावयाच्या दुधाचें उष्णतामानांत थोडाफार फरक करावा लागतो. थंडीच्या दिवसांत घोटाला सहन होईल इतकें दूध तापवून तें विरजावें लागतें. तें भांडें चुलीच्या उबाऱ्याजवळ ठेवल्याशिवाय ठराविक मुदतींत दुधाचें दहीं होत नाहीं. उन्हाळ्याच्या दिवसांत थंड दूध विरजलें तरी चालतें. कांहीं

वेळेस अति उन्हाळा असल्यास फार आंबट दहीं होऊं नये म्हणून दूध विरजलेलें भांडें थंड पाण्यांत ठेवावें लागतें. त्याचप्रमाणें विरजणाचें प्रमाणहि बदलावें लागतें. थंडीच्या दिवसांत लागणारें विरजण उन्हाळ्यांतील विरजणापेक्षां दुपटीतिपटीनें जास्त असतें ( आहार, २.१० ).

**दळण**—अगदीं प्राचीन काळीं म्हणजे नवपाषाणयुगांत पीठ करण्यासाठीं पाटा-वरवंटाच असे. पुढें दोन चपट्या दगडांत दाणे ठेवून पीठ करण्याची कल्पना आली; व त्यासाठीं जात्याची युक्ति निघाली. जातें पाहा.

**दळवणपूरचे गंग राजे**—या गंग राजाना कोंगु असेंहि दुसरें नांव होतें. कांहींच्या मतें चेर व कोंगु एकच असावेत. चेरांच्या उत्तरेकडे गंग अथवा कोंगु हे राज्य करीत असत व त्या देशास कोंगु देश म्हणत. कांहींचें म्हणणें हे गंग ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून इ. स. ८९४ पर्यंत राज्य करीत होते; परंतु फ्लीटच्या मतें ते इतके जुने नाहींत. एका ताम्रपटांत या राजांचीं १७ नांवें आलीं असून, त्यांचा काळ इ. स. ९६८-१०८० असा निघतो.

एक सूर्यवंशी कोंगु राजवंश आढळतो; त्यापैकीं कन्नडदेव राजाचा मंत्री एक नागनंदी नांवाचा जैन होता. याची राजधानी स्कंदपुर होती. यानें चोल, पाण्डय, केरळ, मलयालम्, कर्नाटक, वगैरे देश जिंकले. याला आद्य शंकराचार्यांनी जैन धर्मापासून परावृत्त करून वैदिक धर्मानुयायी बनविलें. या वंशांत सात राजे झाले; ते कोंगु देशाचे प्राचीन राजे होत. यानंतर जे गंग राजे आले त्यांचा वंश निराळा होता म्हणतात.

जाह्नवी गंग वंशांतील कण्वायन शाखेचा स्कंदपूरचा पहिला राजा कोंगणीवर्मा होय. त्याचा पुत्र माधव व त्याचा हरिवर्मा; त्यानें आपली राजधानी कर्नाटकांत दळवणपूर येथें केली. यापुढें दळवणपूर येथेंच हें घराणें राज्य करीत होतें. या वंशांत वीस राजे झाले. मरकारा ताम्रपटावरून या घराण्यास ख्रि. श. च्या पहिल्या शतकापासून प्रारंभ होतो; पण फ्लीटच्या मतें दहाव्या शतकापासून. या घराण्यास होयसळ बल्लाळांनीं ( १०८० चा सुमार ) जिंकिलें व दळवणपुरास राजधानी केली. दळवणपूर म्हणजे तळकाड होय. म्हैसूर राज्यांत नीलगिरीच्या माथ्यावर हें गांव आहे. विजयानगरचें साम्राज्य नष्ट झाल्यावर एका गंग राजानें दळवणपूरच्या ईशान्येस शिवसमुद्र येथें एक लहानसें राज्य स्थापिलें. त्याचा नाश १७ व्या शतकाच्या आरंभीं झाला. ते आपणांस महाधिराय म्हणवीत.

**दळवाई**—म्हैसूरच्या वडेयर राजघराण्याच्या सेनापतींना दळवाई ही पदवी असे. हे फार प्रबळ असत. राजा दुर्बळ असल्यास सैन्याच्या जोरावर राज्याचा सर्व कारभार हे दळवाईच पाहत. दोड्ड कृष्णराज मेल्यावर हे विशेष प्रसिद्धीस आले. यांनीं मुसलमानांपासून आपल्या राज्याचें बरेच दिवस रक्षण केलें होतें. पहिल्या कृष्णराजानंतर तीन दळवाई भावांनींच राज्य संभाळिलें होतें. हे दळवाई बहुधा राजघराण्यांतील असत. राजाखालोखाल हेच राज्यांतील मुख्य अधिकारी असत. मारनायक नांवाच्या एका दळवाईनें बंड केल्यामुळें कांहीं दिवस ही जागा खालसा केली होती. परंतु हैदरानें राज्य बळकावण्यापूर्वी कांहीं दिवस दळवाईची नेमणूक पुनः केली होती. करिकल मल्लराजय या दळवाईनेंच हैदरास मदत करून वडेयर घराणें नामशेष केलें. त्या वेळीं देवराज ऊर्फ नंदराज नांवाचा दळवाई होता. त्याच्याच हाताखालीं हैदर होता. पुढें हैदरानें आपल्या मालकास बाजूस सारून कांहीं दिवस आपण दळवाईपण भोगिलें व शेवटीं राजास पदच्युत करून गादी बळकाविली. राजघराण्यांतील दळवाई न नेमतां बाहेरचे नेमल्यास राज्याचा फायदा होई; राजघराण्यांतील दळवाई राजांना चैनींत गुंतवून आपण कारभार बळकावीत. ही गोष्ट ओळखून कंटीरव नांवाच्या एका राजानें बाहेरचे दळवाई नेमण्याची वहिवाट पाडली होती. जुल्मी दळवाईत कंठीय, नंजराज ( नंदराज ), बसव, दुसरा नंज, व वीरराज हे प्रमुख होते. यांच्या हातीं इतकी सत्ता ( लष्कराच्या बळावर ) होती कीं, त्यांना राजकर्ते म्हणत.

**दक्ष**—पुराणांत दक्ष हा ब्रह्मा याचा एक पुत्र व प्रजापतींपैकीं एक असें सांगितलें आहे. दक्षाबद्दल उल्लेख ऋग्वेद, शतपथ ब्राह्मण, रामायण, महाभारत व अनेक पुराणें यांत आहे; त्याची बायको प्रसूति ही मनूची नात असून त्यांना चोवीस, पन्नास किंवा साठ कन्या झाल्या असा निरनिराळा उल्लेख आढळतो. या कन्यांपैकीं दहा धर्माला, तेरा कश्यपाला दिल्या व त्यांच्यापासून देव, दैत्य, मानव, पक्षी, सर्प व इतर प्राणी उत्पन्न झाले. सत्तावीस कन्या चंद्राला व एक सती नांवाची शिवाला दिली. पुढें हा दक्ष एकदां कैलासास गेला असतां शंकरानें त्याचा सत्कार केला नाहीं त्यामुळें यानें त्याची फार निंदा केली व त्या दिवसापासून दक्ष शंकराचा व सतीचा द्वेष करूं लागला.

दक्षानें यज्ञ केला त्यांत शिवाला निमंत्रण दिलें नाहीं. त्यामुळें रागावून शिवानें यज्ञाचा विध्वंस केला व दक्षाला शाप दिला. दक्षाला ठार मारलें असेंहि कांहीं पुराणांत आहे. या कथेचें मूळ तैत्तिरीय संहितेंत असून रामायण, महाभारत व पुराणें यांत ही कथा विस्तृत आहे. शिवाच्या शापामुळें दुसऱ्या मन्वंतरांत दक्ष पुनः जन्मला व त्याला क्रोध, तमस, दम, विकृत, अंगिरस, कर्दम व अश्व असे सात मुलगे झाले. दक्ष हा अठरा स्मृतिकारांपैकीं एक आहे असें मानतात.

याशिवाय प्राचेतस् नांवाचा एक दक्ष होता. तो उत्तान-

पाद वंशीय प्राचीनबर्हि राजाचा नातू व दहा प्रचेत्यांचा पुत्र असल्यामुळें त्यास प्राचेतस् म्हणत. हा पूर्वीच्या दक्षाचाच अवतार होता असे म्हणतात. याला हर्यश्वप्रमुख दहा हजार पुत्र झाले. नारदानें त्यांना ब्रह्मतत्त्वोपदेश करून निवृत्तिपर बनविल्यामुळें यानें दुसरे दहा हजार पुत्र निर्माण केले. परंतु त्यांनाहि नारदाने संसारपराङ्मुख केलें. तेव्हां त्यानें नारदास देहपाताचा शाप दिला.

**दक्षिण**—दख्खन प्रदेश. दख्खन हा 'दक्षिण' या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश होय. नर्मदेच्या दक्षिणेकडील सर्व हिंदुस्थान म्हणजे सामान्य अर्थी दख्खन. संस्कृत ग्रंथांत 'दक्षिणापथ' शब्द विशेष येतो. पेरिप्लसचा कर्ता यास दखिनबदेश म्हणतो.

नर्मदेच्या दक्षिणेकडील सर्व हिंदुस्थानास पूर्वी दक्षिणापथ म्हणत. प्राचीन चेर, चोल, पाण्ड्यादि राज्यांचा समावेश दक्षिणापथांत केल्याचा उल्लेख मार्कंडेय, मत्स्य, वायु, महाभारत, वगैरे पुराणांत आढळतो. सहदेव दक्षिणापथांत आला होता. अलीकडील कालांत नर्मदा–कृष्णा दुआबास हा शब्द लावितात. रत्नकोशांत, महाराष्ट्र देश हा वैदर्भ, तापीतट, नर्मदातट, व कोंकण यांपासून निराळा असल्याचें म्हटलें आहे.

आर्यांनीं पूर्व अफगाणिस्तान, पंजाब, ब्रह्मावर्त अशा क्रमानें उत्तर हिंदुस्थानांत वसाहती केल्या. पुष्कळ काळपर्यंत त्यांची दक्षिण मर्यादा विंध्य पर्वत असावी. मनूनें (२·२३) व पतंजलीनें (२·४·१०) हिमविंध्यमध्य देशालाच आर्यावर्त म्हटलें आहे. प्रथम विंध्य ओलांडून दक्षिणेंत येणारा आर्य अगस्ति ऋषि होय. त्यानें विदर्भ राजाची मुलगी आपणांस केली होती; यावरून आर्यांची दक्षिणेकडील पहिली वसाहत विदर्भा (वऱ्हाड)ची होय.

अशोकाच्या शिलाशासनांत (ख्रि. पू. ३ रें शतक) दख्खनमधील पुढील नांवें येतात: रास्टिक (राष्ट्रिक, राष्ट्रकूट), पेटनिक (पेठणचे), अपरांत (उत्तर कोंकण). राष्ट्रकूट हे महाराष्ट्रांत होते. यांनींच पुढें सौंदती, मालखेड, वगैरे ठिकाणीं राज्यें स्थापिलीं. हेच मूळचे रठ्ठ होत. रठ्ठांनीं नंतर आपणांस महारठ्ठ म्हणविलें. त्यांचा देश तो महाराष्ट्र. मौर्य चंद्रगुप्ताचें (ख्रि. पू. ३२०) राज्य काठेवाडपर्यंत होतें. तर त्याचा नातू अशोक याचें सोपारा, म्हैसूर, मोंगलाई यांपर्यंत पसरलें होतें.

पुराणांत ज्यांना आंध्रभृत्य म्हणतात तेच शातवाहन होत. यांचा अमल ख्रि. पू. ७३ ते इ. स. २१८ पर्यंत महाराष्ट्रांत होता. शातवाहनांच्या राजवटींत महाराष्ट्र संपन्न होतें. शातवाहन हेंच शालिवाहन होत. हे नांव राजघराण्याचें आहे; एका राजाचें नव्हे.

आंध्रभृत्यानंतरच्या दख्खनमध्यें बरेच राजवंश होऊन गेले. या अवधींत क्षत्रप राजे होऊन गेले. त्यांचा पहिला राजा विजयसाह (इ. २२२) व शेवटचा विश्वसाह (३०२). यांचीं नाणीं सांपडलीं आहेत. याच वेळीं आभीर (गवळी) राजांनीं ६७ वर्षें राज्य केल्याबद्दल वायुपुराण सांगतें. भोज, रठ्ठी, महारठ्ठी, वगैरे घराणींहि प्रख्यातीस आलीं होतीं. या रठ्ठांनीं आपला एक संघ (कूट) स्थापन करून बराच प्रदेश (राष्ट्रकूट) आक्रमिला होता.

या राष्ट्रकूटांनीं तीनशें वर्षें राज्य केलें. यांचा शेवटचा राजा कृष्णपुत्र इंद्र. त्याला अयोध्येकडून आलेल्या जयसिंह चालुक्यानें जिंकून तेथें आपलें राज्य स्थापिलें (५५०).

जयसिंहानें आपलें राज्य बरेंच वाढविलें. त्यानंतर या घराण्यांत पहिला पुलकेशी, कीर्तिवर्मा, मंगलीश, दुसरा पुलकेशी, वगैरे प्रख्यात राजे झाले. या घराण्यांतील शेवटचा राजा दुसरा कीर्तिवर्मा याला दंतिदुर्ग राष्ट्रकूटानें जिंकलें. या घराण्यांत १९ राजे झाले.

दंतिदुर्गानें कांची, कलिंग, कोसल, मालव, वगैरे देश जिंकून तो दख्खनमध्यें सार्वभौम बनला. याच्यामागून कृष्णराज, ध्रुवराज, तिसरा गोविंद, कृष्ण अकालवर्ष, तिसरा अमोघवर्ष, तिसरा कृष्ण, वगैरे प्रख्यात राजे झाले. या वंशांतील शेवटचा राजा कक्कल याला तैलप चालुक्यानें जिंकून पुनः चालुक्यांची सत्ता दख्खनवर स्थापिली (९७३).

तैलपानंतर पुढील राजे प्रख्यातीस आले: जगदेकमल्ल, सोमेश्वर, विक्रमादित्य पहिला व तिसरा सोमेश्वर. शेवटचा राजा दुसरा तैलप हा दुर्बळ होता. त्याचा सेनापति कलचुरी वंशाचा बिज्जल यानें त्याचें राज्य बळकाविलें.

बिज्जलाचा प्रधान बसव होता. त्याने बिज्जलाला ठार मारून गादी बळकाविली (११६७). पुढें कलचुरीचा शेवटचा राजा संगम याच्यापासून दुसऱ्या तैलपाचा मुलगा चौथा सोमेश्वर यानें आपलें राज्य हिसकावून घेतलें (११८२). पुढें थोड्याच दिवसांत दख्खनचा वीर बल्लाळ यादव यानें सोमेश्वर चालुक्यास हुसकावून लाविलें (११९०).

यादवांचा मूळपुरुष सुबाहु, त्याचा मुलगा दृढप्रहार. त्याची राजधानी चांदा (मध्यप्रांत) किंवा चांदोर (नाशिक जिल्हा.) येथे होती. त्याचा पुत्र सेऊणचंद्र हा देवगिरीचा पहिला राजा (८००). दृढप्रहारापासून सोमेश्वरास हुसकून लावणाऱ्या भिल्लमपर्यंत २२ पुरुष झाले. हे प्रथम चालुक्यराष्ट्रकूटांचे मांडलिक होते. बिज्जलाच्या गडबडींत ते स्वतंत्र बनले. भिल्लमाचा नातू सिंघण यानें अनेक राजे जिंकून तो सार्वभौम बनला. याच्या वेळीं विद्येला उत्तेजन मिळालें. खुद्द त्यानेंहि ग्रंथ लिहिले. त्याचा मुलगा कृष्ण हाहि फार शूर होता. त्याचा पुत्र प्रख्यात रामदेव. दख्खनच्या स्वतंत्र राजांमध्यें हाच शेवटचा

राजा होय. रामदेवाच्या पश्चात् मालिक काफरनें स्वारी करून देवगिरीचें राज्य बुडविलें (१३३४).

कोल्हापूरच्या शिलाहारांचीं तीन घराणीं दख्खनमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं राज्यें करीत होतीं. शिलाहारांचीं तीन महामंडलेश्वर घराणीं राष्ट्रकूट राजांच्या अमदानींत स्थापन झालीं. एक उत्तर कोंकण, दुसरें दक्षिण कोंकण व तिसरें कोल्हापूर, मिरज, वगैरे भागांवर राज्य करीत असे.

मुसलमानी झाल्यावर महंमद तुघ्लकाच्या वेळीं दख्खन पूर्णपणें त्यांच्या ताब्यांत गेलें. पण थोड्याच दिवसांत बंड होऊन बाहामनी राज्य स्थापिलें गेलें व त्यामुळें दिल्लीकरांचा अमल नर्मदेच्या खालीं नाहींसा झाला. बाहामनी राज्यस्थापनेच्या सुमारासच विजयानगर येथें हिंदूंचेंहि एक मोठें राज्य स्थापन झालें.

बाहामनी राजांनीं तेलंगणाच्या राज्यांतील प्रदेश घेऊन १३७३ सालीं गोवळकोंड्यापर्यंत, स. १४२१ त वारंगळपर्यंत व १४७२ सालीं बंगालच्या उपसागरापर्यंत आपलें राज्य वाढविलें. पण स. १४८२ पासून हें राज्य विस्कळीत होण्यास सुरुवात होऊन अखेर विजापूर, गोवळकोंडा, अहमदनगर, बेदर व वऱ्हाड अशीं त्याचीं पांच राज्यें झालीं. विजयानगरचें मोठें हिंदुराज्य मुसलमानांनीं आपसांत एकी करून १५६५ सालीं मोडून टाकिलें.

बाहामनी राज्यापासून झालेल्या पांच राज्यांपैकीं बेदर व वऱ्हाड हीं राज्यें स. १६३० पूर्वींच नाहींशीं झालीं. उरलेलीं तीन राज्यें अकबर, शहाजहाँ व औरंगज़ेब यांनीं जिंकून दिल्लीस जोडलीं. याप्रमाणें दख्खनमध्यें पुनः दिल्लीचा अंमल सुरू झाला. पण तो फार काळ टिकला नाहीं. शिवाजीनें मराठी राज्याची स्थापना केली व १७०६ सालीं मराठ्यांनीं दक्षिणेंत खंडणी वसूल करण्याचा हक्क संपादन केला. निजामानें दक्षिणेंतील मुसलमानांच्या मदतीनें हैद्राबाद येथें राज्य स्थापन केलें. हैदरअली यानें म्हैसूर येथें राज्य स्थापिलें. बाकीचा प्रदेश तुंगभद्रेच्या दक्षिणेस किंवा उत्तरेस असेल त्याप्रमाणें निजाम किंवा पेशवे यांच्या वर्चस्वाखालीं होता. पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रज यांनीं किनाऱ्यावर वस्ती केली होती. दक्षिणेंत झालेल्या भांडणांत फ्रेंचांविरुद्धच्या पक्षास इंग्रज मदत करीत. त्यांत अखेर इंग्रजांची सरशी होऊन हैद्राबाद येथें त्यांचें वर्चस्व स्थापन झालें. म्हैसूरच्या टिपूचा त्यांनीं मोड केला, व १८१८ सालीं पेशव्यांचें व १८४८ सालीं साताराच्या छत्रपतींचें राज्य खालसा केलें. तसेंच १८५४ सालीं नागपूरकर भोसल्यांचें राज्य खालसा केलें. हल्लीं दख्खनमध्यें मद्रास इलाखा, मध्यप्रांत, मुंबई इलाख्याचा कांहीं भाग आणि हैद्राबाद, म्हैसूर व दुसरीं देशी संस्थानें यांचा समावेश होतो.

**दक्षिण अमेरिका**—(अमेरिका पाहा). दक्षिण अमेरिका खंडाची जास्तींत जास्त लांबी ४,५०० मैल व जास्तींत जास्त रुंदी ३,२०० मैल आहे. पूर्वेस ॲटलांटिक महासागर व पश्चिमेस पॅसिफिक महासागर असून क्षेत्रफळ सुमारें ७५,००,००० चौ. मैल आहे. याच्या उत्तरेस कॅरिबिअन समुद्र व मेक्सिकोचें आखात आहे. उत्तर आणि मध्य अमेरिका याला हें पनामाच्या निरुंद संयोगभूमीनें पूर्वीं जोडलेलें होतें. पण आतां पनामाचा कालवा झाल्यानें दक्षिण व उत्तर अमेरिका हीं दोन्ही खंडें विभक्त झालीं आहेत. याच्या उत्तर भागांतून भूमध्य रेषा जाते व तेवढा प्रदेश उष्ण कटिबंधांत येतो. यांत कित्येक जागीं महान् अरण्यें असून त्यांत अद्याप कोणाचाहि शिरकाव झालेला नाहीं. ॲंडीज पर्वत पश्चिम किनाऱ्याच्या बाजूनें दक्षिणोत्तर गेला आहे. तीन देशांच्या ताब्यांतील ग्वायानाखेरीज बाकीचा सर्व खंड लहान लहान व कांहीं मोठ्या स्वतंत्र लोकसत्ताक संस्थानांत विभागला गेला आहे. एके काळीं हें सर्व खंड स्पॅनिश किंवा पोर्तुगीज यांच्या ताब्यांत असल्यानें ठिकठिकाणीं ह्याच दोन भाषा जास्त बोलल्या जातात. या खंडांत ब्राझील, अर्जेंटायना, पराग्वे, युराग्वे, बोलिव्हिया, पेरू, इक्वाडोर, चिली, कोलंबिया, व्हेनेझुएला हीं प्रमुख संस्थानें आहेत. यांची माहिती त्या त्या नांवाखालीं दिलेली आहे.

**दक्षिण आफ्रिका** (युनियन)—ब्रिटिश साम्राज्यांतील एक स्वयंशासित वसाहती राज्य. १९१० मध्यें हें स्थापन झालें. केप ऑफ गुड होप, नाताळ, ट्रान्सव्हाल व ऑरेंज फ्री स्टेट हे त्याचे चार प्रांत आहेत. एकूण क्षेत्रफळ ४,७२,५५० चौ. मै. व लो. सं. सुमारें एक कोटी आहे. एकूण लोकवस्तींत ¼ पेक्षां कमी युरोपियन आहेत व ¾ पेक्षां जास्त मूळचे स्थानिक रहिवासी (बहुधा बंटु लोक) आहेत. प्रिटोरिया हें राजधानीचें शहर आहे. पण सर्वांत मोठें शहर जोहान्सबर्ग आहे. युनियन ही जागतिक संयुक्त राष्ट्रसंघाची सदस्य आहे. चलन इंग्रजी पद्धतीचें आहे. वजनें-मापें इंग्रजी व दशमान अशीं दोन्ही पद्धतींचीं आहेत. १०० पौंडांचा एक सेन्टल हें एक वजन आहे. खनिजांमध्यें सोनें आणि हिरे यांचें उत्पादन मोठें आहे. हवा साधारण उष्ण असून फळें, ऊंस, तंबाखू, कापूस, गहूं, धान्यें, वगैरे पिकें निघतात. युनियन दोन्ही महायुद्धांत ब्रिटिशांच्या बाजूनें लढलें.

दक्षिण आफ्रिका (ब्रिटिश)—यांत उत्तर आणि दक्षिण ऱ्होडेशिया, बसुटोलंड, बेचुआनालंड व स्वाझीलंड हे देश येतात (आफ्रिका पाहा).

**दक्षिण ऑस्ट्रेलिया**—ऑस्ट्रेलियन-कॉमनवेल्थमधला एक प्रदेश. हा व्हिक्टोरिआ व पश्चिम ऑस्ट्रेलिआ यांच्या दरम्यान समुद्रकिनाऱ्यावर आहे. १८३६ मध्यें येथें वसाहतीस सुरुवात झाली. हवा समशीतोष्ण. मुख्य व्यवसाय शेती व जनावरांची

जोपासना. गहूं व लोंकर यांचें उत्पादन विशेष. दारूहि मोठ्या प्रमाणावर काढतात. क्षेत्रफळ ३,८०,०७० चौरस मैल. ॲडिलेड येथें राजधानी. लो. सं. (१९४५) ६,२७,४९०. क़ायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटकडे आहे. यावर इंग्लंडच्या राजानें नेमिलेला एक गव्हर्नर असतो. सर्व धर्मांचे लोक या प्रांतांत आहेत. शिक्षण धर्मातीत (सेक्युलर) असून १४ वर्षें वयापर्यंत सक्तीचें व मोफत आहे. ॲडिलेड येथें एक विद्यापीठ आहे. औद्योगिक आणि यांत्रिक शिक्षणाच्या पुष्कळ शाळा आहेत. १९४४ मध्यें २१४९ कारखाने होते. यांत अनेक चांगलीं बंदरें आहेत.

**दक्षिण कॅरोलिना**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील पहिल्या १३ पैकीं एक. ॲटलांटिक महासागराच्या कांठीं हें आहे. क्षेत्रफळ ३१,०५५ चौरस मैल. समुद्रकिनारा सुमारें २०० मैलांचा आहे. लो. सं. १८,९९,८०४. समुद्राकडील भाग सखल असून पश्चिमेकडे उंची वाढत गेली आहे. पश्चिमेकडील पर्वतांत अत्युच्च शिखर ३,५४८ फूट उंच आहे. हवा शीत (मध्यम), उष्ण आणि सर्द अशी ठिकठिकाणीं अलग आढळते. वृष्टि विपुल होते. मधून मधून वादळेहि मोठ्या प्रमाणावर होतात. बंदरें अनेक आहेत. त्यांत चार्लस्टन महत्त्वाचें आहे. समुद्रावरील व्यापार मोठा आहे. कोलंबिया मुख्य ठिकाण आहे. मुख्य व्यवसाय शेती. कापूस, मका, गहूं, तंबाखू, ओट, वगैरे पिकें निघतात. खनिज उत्पादनांत फॉस्फेट्स दगड व चिकण माती हीं विशेष निघतात. जंगले पूर्वीपेक्षां फार कमी झालीं आहेत. तरी अद्याप लांकूड बरेंच निघतें. कापसाचें कापड व कापसाचेंच तेल यांची पैदासहि मोठी आहे. कोलंबिया येथें संस्थानाचें विद्यापीठ आहे.

ज्याला हल्लीं साउथ कॅरोलिना म्हणतात त्यांत प्रथम प्रवेश स्पॅनिश लोकांनीं केला. अगदीं पहिली वसाहत किनाऱ्यापासून जरा दूर असलेल्या बेटावर करण्यांत आली. इंग्लंडच्या राजानें (चार्लस २ रे) आठ इंग्रज जमीनदारांस इकडची जमीन दिली व पुढें १७१९ मध्यें सर्व कारभार आपल्याकडे घेतला. स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळीं या कॅरोलिनाची महत्त्वाची मदत झाली. या संस्थानांत प्रथम गुलामगिरी बेकायदेशीर नव्हती व यादवी युद्धा- (सिव्हिल वॉर)मध्येंहि या संस्थानांतच प्रथम गोळीबार झाला. आणि नंतरहि पुष्कळ चकमकी झाल्या. १७८७ मध्यें घटनेंत फेरफार करून तें युनियनमध्यें सामील झालें.

**दक्षिण डाकोटा**—उत्तरमध्य भागांतलें एक अमेरिकन संस्थान. क्षेत्रफळ ७७,०४७ चौ. मैल. लो. सं. ६,४२,९६१. हवामान समशीतोष्ण. नैर्ऋत्य भागांत ब्लॅकहिल हा डोंगर आहे. हार्नें नांवाचें शिखर ७,४०० फूट उंच आहे. बाकीचा भाग बहुतेक पायऱ्यापायऱ्यांनीं उतरत्या प्रेअरी गवताळ चराऊ मैदानांनीं व्यापलेला असून उतरत उतरत ईशान्य भागांत सखल होत गेला आहे. मिसूरी व तिच्या उपवाहिन्या या मुख्य नद्या आहेत. ईशान्येस 'बिगस्टोन' नांवाचें एक सरोवर आहे.

शेती हा प्रधान व्यवसाय आहे. गहूं, बार्ली, ओट, राय, वगैरे मुख्य पिकें आहेत. जनावरांची पैदास फार मोठी आहे. खनिज उत्पादनांत सोनें, कोळसा, जिप्सम, खडू, रुपें, वगैरे महत्त्वाचे पदार्थ येतात. लीड येथें सोन्याची मोठी खाण आहे. पिवळा पाइन व स्प्रूस यांचीं जंगलें बरींच आहेत. व्हर्मिलियन येथें संस्थानचें विद्यापीठ आहे.

लेविस आणि क्लार्क यांनीं १८०४ मध्यें या भागांत प्रवेश केला. १७९४ मध्यें एक वसाहत या भागांत झाली होती; तथापि वरील दोघांनीं जास्त संशोधन केलें. १८६१मध्यें काँग्रेसनें 'टेरिटरी' म्हणून एक विभाग बनविला. १८८९ मध्यें दक्षिण व उत्तर डाकोटा अशीं दोन संस्थानें होऊन तीं युनियनमध्यें सामील झालीं.

**दक्षिण ध्रुवप्रदेश**—दक्षिण ध्रुवप्रदेशाकडे संशोधकांचें लक्ष बरेंच अलीकडेच गेलेलें दिसून येतें. एकोणिसाव्या शतकापूर्वी कोणी शोधक या बाजूस गेल्याचें आढळत नाहीं. प्रथम केप ऑफ गुडहोपला वळसा घातल्यानें व मॅगेलन सामुद्रधुनींतून प्रवास केल्यामुळें दक्षिण ध्रुवाच्या बाजूस जमीन असली तर ती आफ्रिका व अमेरिका या खंडांपासून अलग आहे हें कळून आलें. त्याप्रमाणेंच पुढें ती ऑस्ट्रेलिया या खंडापासूनहि अलग असली पाहिजे हेंहि लवकरच कळून आलें. त्यानंतर अनेक शोधक निरनिराळ्या सरकारांमार्फत, खासगी संस्थांमार्फत किंवा स्वतःच्या हिंमतीवर दक्षिण ध्रुवप्रदेशाच्या शोधाकरितां निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या प्रकारचीं साधनें घेऊन जाऊं लागले. अनेक संशोधकांनी निरनिराळीं बेटें किंवा भूखंड शोधून काढले व आपल्या देशावरून किंवा राजावरून किंवा स्वतःचीं नांवें या भूखंडांस किंवा कांहीं ठिकाणीं दिसणाऱ्या पर्वतशिखरांस दिलीं. या भूखंडांत आढळणाऱ्या वनस्पती, प्राणी, वगैरेंचे नमुनेहि अनेकांनीं आणले. एकानें तर समुद्राच्या तळाच्या गाळांतील फरकाचा अभ्यास केला. निरनिराळ्या ठिकाणच्या समुद्रांचे, प्रदेशांचे नकाशे तयार करण्यांत आले; पाण्याची खोली मोजण्यांत आली; उष्णमानाचें मापन करण्यांत आलें. दक्षिण चुंबकीय ध्रुव व दक्षिण ध्रुव यांचीं स्थानें निश्चित करण्यांत आलीं व अनेक शास्त्रीय संशोधनांस उपयुक्त असें साहित्य व माहिती गोळा करण्यांत आली. या कामीं अनेक संशोधकांनीं

कोणीं एकदां तर कोणीं दोन-तीनदां सफरी केल्या व कित्येकांनीं तर या कामीं प्राणार्पणहि केलें.

अशा संशोधकांपैकीं कांहींचीं नांवें द्यावयाचीं तर जेम्स कुक, वेडेल, बिस्को, रॉस, स्कॉट, ब्रूस, शॅकल्टन, अमुंडसेन, इत्यादि सांगतां येतील.

या प्रदेशाचा शोध लावण्याचा प्रयत्न आतांपर्यंत अनेकांनीं केला आहे. तथापि इतर संशोधकांपेक्षां कॅप्टन स्कॉट हा १९०४ सालीं ३०० मैल पुढें गेला. १९११ मध्यें दोन गटांनीं दक्षिण ध्रुव गांठण्याचा प्रयत्न केला. एका गटाचा प्रमुख कॅप्टन स्कॉट हा होता व दुसऱ्याचा रोनाल्ड अमुंडसेन हा नॉर्वेजियन गृहस्थ होता. यांपैकीं अमुंडसन यास यश येऊन तो १४ डिसेंबर १९११ या दिवशीं दक्षिण ध्रुवावर पोंचला. तेथें जाण्यास त्यास ५५ दिवस लागले. परंतु परत येण्यास ३८ च दिवस लागले. स्कॉटचा गट १८ जानेवारी १९१२ या दिवशीं दक्षिण ध्रुवावर पोंचला. त्यास एकंदर ६९ दिवस प्रवास करावा लागला. शेवटचे ५०० मैल तर त्यास आपल्या बर्फावरून सरकणाऱ्या गाड्या स्वतः ओढून न्याव्या लागल्या. दक्षिण ध्रुवावर जाऊन पाहतात तों अमुंडसन तेथें आधींच जाऊन पोहोंचल्याचें दिसलें. परतीच्या प्रवासांत थंडी, भूक व श्रम यांमुळें स्कॉटच्या गटांतील सर्व मृत्यु पावले व पुढील वर्षी त्यांचीं मृत शरीरें आढळून आलीं.

१९२८ सालीं सर हर्बर्ट विल्किन्स यानें दक्षिण ध्रुवावरील उत्तर व दक्षिण ग्रॅहॅम या दोन मुख्य बेटांवरून यशस्वी रीतीनें विमानोड्डाण केलें. या दोन बेटांमध्यें ४० मैल रुंदीची खाडी आहे असें त्यास आढळून आलें. याच वर्षी बर्ड या नांवाच्या गृहस्थानें रॉस बॅरियरच्या पूर्वेकडील टोंकाजवळ लहान अमेरिकेची स्थापना केली. १९२९ मध्यें नोव्हेंबर महिन्याच्या २८ व २९ या तारखांस तीन सहकाऱ्यांबरोबर त्यानें दक्षिण ध्रुवावर उड्डाण केलें. त्या वेळीं त्यानें दुसऱ्या एका टोळीपासून आपल्या विमानाकरितां पेट्रोल घेतलें. लहान अमेरिकेच्या पूर्वेकडील प्रदेशावर उड्डाणें करण्यांत येऊन रॉकफेलर पर्वत व मेरी बर्ड लँड या प्रदेशाचा शोध लावण्यांत आला. लॉरेन्स गुल्ड या भूस्तरशास्त्रवेत्त्यानेंहि कांहीं मंडळी घेऊन या भागांतील बरेंच संशोधन केलें आहे. १९३३ ते १९३५ या सालीं बर्ड यानें दुसरी सफर करून लहान अमेरिकेमध्यें तळ ठेवून बरेंच संशोधन केलें. १९३४ सालीं बर्ड यानें स्वतः आपल्या तळापासून ९५ मैलांवर हिंवाळ्यांत मुक्काम केला व बरीच हवामानशास्त्रविषयक माहिती जमविली. त्यांत एकदां त्याच्या प्राणावर प्रसंग गुदरला होता. या सफरीच्या वेळीं पेट्रोलनें चालणाऱ्या गाड्यांचा उपयोग करण्यांत आला. याच सुमारास लिंकन एल्सवर्थ यानें दक्षिण ध्रुवप्रदेशाच्या संशोधनांत बराच काळ घालविला. परंतु त्यास बरींच विघ्नें आलीं. १९३५ सालीं त्यानें हर्बर्ट हॉलीक केनीयन याच्यासह दक्षिण द्वीपसमूहांतील डंडी बेटापासून २,१०० मैल दूर असलेल्या रॉस नांवाच्या समुद्राकडे तेरा दिवसांत उड्डाण केलें. या उड्डाणांत शीत वादळामुळें त्यास अनेकदां खालीं उतरावें लागले. अखेरीस त्यांनीं लहान अमेरिकेमध्यें आश्रय घेतला व तेथें त्यास अन्न व निवाऱ्याची जागा मिळाली. तेथून त्यास परत आणण्यांत आलें. जून १९३९ मध्यें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या कॉंग्रेसनें दक्षिण ध्रुवप्रदेशावर जाण्याकरितां वाहतूक सुरू करावयाचें ठरविलें व त्या कामावर रीयर ॲडमिरल बर्ड याची नेमणूक केली व चौतीस हजार डॉलर खर्च करावयाचें ठरविलें. यांत त्यांचा हेतु दक्षिण ध्रुवप्रदेशावरील कांहीं भागावर आपला ताबा बसविण्याचा होता व त्या प्रदेशावर तीन कायमचे तळ स्थापन करून त्या ठिकाणीं चिलखती गाड्या, विमानें व बर्फातून चालणारीं गलबतें ठेवावयाचें ठरलें होतें.

तथापि या सर्व संशोधनांची शास्त्रीय दृष्ट्या फलश्रुति अद्यापि सर्व माहितींचें एकीकरण झाल्याशिवाय सांगतां येणार नाहीं. मात्र सामान्यतः एवढें सांगतां येईल कीं, उत्तर ध्रुवापेक्षां इकडील स्थिति अगदीं निराळी आहे. हा प्रदेश उंच पठारासारखा असून भोंवतीं द्वीपसमूहहि असावा; मात्र मध्यंतरींचे समुद्र नेहमीं बर्फाच्छादित असल्यामुळें सर्व मिळून एकच प्रदेशासारखा वाटतो. या निरनिराळ्या प्रदेशांस ग्रॅहॅमलँड, लुइफिलिपलँड, जॉइनव्हिली आयलंड, पामर आर्चिपेलेगो, कैसर विल्हेल्मलँड यांसारखीं नांवेंहि दिलीं गेलीं आहेत.

या प्रदेशांतील हवामान स्थिर नसतें. परंतु थंडीचें प्रमाण उत्तर ध्रुवापेक्षां त्या त्या अक्षांशावर कमी असतें. सर्वांत कमी उष्णमान—६६·८ इतकें लेफ्ट. बार्ननें १९०३ मध्यें नमूद केलें आहे. हिंवाळ्यांत २४ तास सतत सूर्य क्षितिजावर आहे असे दिवस २४६ असतात. तरी चांगला सूर्यप्रकाश फक्त १२७५ तास असतो. या दिवसांत फार उकडतें. पण उष्णमान शून्याच्या खालीं असतें. ७८° अक्षांशावरील प्रदेशांत आकाश अगदीं निरभ्र असतें, पण ६६° अक्षांशावर इतकें धुकें असतें कीं, प्रवास करणें किंवा सभोंवतीं अवलोकन करणें अशक्य असतें.

उन्हाळ्यांत उष्णमान शून्यांशाखालीं असलें तरी कांहीं प्रदेशांत शेवाळ वगैरेंसारख्या वनस्पती आढळतात. एकहि फूलझाड आढळत नाहीं. जलचर प्राणी मात्र पुष्कळच उपलब्ध झाले आहेत. मासे अनेक प्रकारचे आढळतात. पण पशू मुळींच नाहींत. बिनपंखांचे कीटक व गोड्या पाण्याच्या डबक्यांत सूक्ष्म जीव आढळतात.

या प्रदेशावरहि स्वतःचा ताबा बसविण्यासाठीं अमेरिका व युरोप यांमधील निरनिराळीं राष्ट्रें यांच्यांत स्पर्धा चालू आहे.

**दक्षिण सातारा**— मुंबई प्रांत, एक नवा जिल्हा. मुंबई प्रांतांत दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानें विलीन झाल्याकारणानें कांहीं नवे जिल्हे पाडावे लागले त्यांपैकीं हा एक जिल्हा आहे. याला सांगली जिल्हा असेंहि कोणी म्हणतात व तेंच नांव योग्य आहे. सदर जिल्ह्यांत सांगली, मिरज, बुधगांव, जत, व कुरुंदवाड या संस्थानांचा नजीकचा भाग व सातारा जिल्ह्यापैकीं तासगांव, वाळवें, खानापूर हे तालुके आणि शिराळा महाल यांचा अंतर्भाव करण्यांत आला आहे—

या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण (केंद्र) सांगली असून त्या खालोखाल मिरज आणि खानापूर हीं उपकेंद्रें आहेत. या जिल्ह्यांत पुढील ५ तालुके व १ महाल आहे.

| तालुके | मुख्य ठिकाण | गांवें |
|---|---|---|
| १ मिरज | मिरज | ७४ |
| २ तासगांव | तासगांव | ९५ |
| ३ वाळवें | इस्लामपूर | ५७ |
| ४ खानापूर | विटें | १३० |
| ५ जत | जत | ९८ |
| महाल— | | |
| १ शिराळा | शिराळा | ८१ |

या सहा पोटविभागांत शेजारचें औंध संस्थान, विजापूर आणि बेळगांव जिल्हे यांतील कांहीं गांवें समाविष्ट केलीं आहेत.

या नव्या जिल्ह्यांतील तालुक्यांची इतर माहिती—

| तालुके | लोकसंख्या | क्षेत्रफळ(एकर) | जमीनमहसूल(रु.) |
|---|---|---|---|
| १ मिरज | १,८८,८१६ | २,६०,४५६ | ३,०६,६९१ |
| २ तासगांव | १,०७,९०५ | ६,३७,८८९ | २,५८,५०२ |
| ३ खानापूर | १,५०,०५१ | ३,२४,९३५ | ४,१८,६१७ |
| ४ वाळवे | १,४७,४६६ | १,९७,७१२ | ५,९७,४८५ |
| ५ जत | १,४४,९२७ | ५,३८,६२४ | ३,००,४४३ |
| ६ शिराळा | ६६,४६१ | १,५७,२७२ | ९८,२८० |
| | ८,०५,६२६ | २१,२६,८८९ | १९,८०,०१८ |

**दक्षिणा**— कर्माचें फळ प्राप्त होण्यासाठीं कर्त्यानें करावयाचें दान. दक्षिणा शब्दाचा उल्लेख ऋग्वेदापासून आढळतो. तैत्तिरीय संहितेंत याचा स्पष्टार्थानें उपयोग केलेला आहे. यज्ञाच्या आरंभीं 'या यज्ञांत अमुक गाई दक्षिणेसाठीं दिल्या जातील,' असा संकल्प केला जातो. दर्शपूर्णमास, काम्येष्टि, वगैरेमध्यें मुख्य यागानंतर दक्षिणा दिली जाते. सूत्रकालीं यज्ञाचें निमंत्रण आलें असतां, 'या यज्ञांत यजमान काय दक्षिणा देणार आहे ?' असें ऋत्विज विचारीत असत व हा प्रकार अद्याप रूढ आहे. स्मृति व पुराण-कालांत होमहवनांच्या कार्यबाहुल्याप्रमाणें दक्षिणेचें प्रमाण ठरूं लागलें. ऋत्विजास कर्मांत विशेष श्रम व काल खर्चावा लागत असल्यास दक्षिणा जास्त द्यावी, असें स्मृतिग्रंथांत सांगितलें आहे. दक्षिणा न दिल्यास कर्माची फलप्राप्ति होत नाहीं. संपन्न असतां दक्षिणेच्या बाबतींत कुचराई करतो तो अधम होय, असें स्मृतिग्रंथांत वर्णिलें आहे.

इतिहास-पुराणांतून राजेरजवाड्यांनीं व धनिकांनीं धार्मिक विधींतून दक्षिणा दिल्याचे असंख्य उल्लेख आहेत.

शिवाजी श्रावणमासीं कोटिलिंगार्चन करी व ब्राह्मणांस धान्य व नक्त दक्षिणा देत असे. समर्थ रामदासांनीं त्यास ही गोष्ट करावयास सांगितलें होतें. संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दींत ही रीत थोडीबहुत प्रचारांत होती. पुढें शाहूनें हें काम खंडेराव दाभाडे सेनापति याजकडे सोंपविलें (१७१८). त्रिंबकराव दाभाडे मेल्यावर (१७३१) ही दक्षिणा देण्याची कामगिरी पेशव्यांकडे आली आणि पेशवाईअखेरपर्यंत ती त्यांच्याकडे राहिली. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत दक्षिणेची रक्कम ८ ते १० लाखांपर्यंत गेली होती. या दक्षिणा देण्याच्या पद्धतीमुळें विद्येस उत्तेजन मिळत असे.

पेशवाई गेल्यानंतर एकदोन वर्षें इंग्रजांनीं ही दक्षिणा थोडीबहुत चालू ठेविली होती. त्यानंतर तिचें रूपांतर झालें. १८२१ त एल्फिन्स्टननें पुणें येथें एक दक्षिणा संस्कृतपाठशाला नांवाची संस्था स्थापून तींत शिकणारांना शिष्यवृत्त्या ठरविल्या. त्या पाठशाळेंत मुख्यतः संस्कृत वाङ्मयास उत्तेजन देण्यांत येत होतें. याच पाठशाळेचें रूपांतर पुढें डेक्कन कॉलेजांत झालें व पाठशाळेच्या उरलेल्या पैशांतूनच दक्षिणा फेलोशिप व दक्षिणा प्राइझ फंड ह्या आजहि चालू असणाऱ्या दोन बाबी निघाल्या.

**दक्षिणापथ**— (दक्षिण पाहा). ह्याचा जुना अर्थ दक्षिण देश, दक्षिणेकडील मार्ग असा असून हा शब्द ज्याला आपण सध्यां 'दख्खन' असें म्हणतों त्या महाराष्ट्रास लागू लागला. हा शब्द सुराष्ट्र शब्दाबरोबर बौधायन धर्मसूत्रकालापासून महाराष्ट्रास लावलेला सांपडतो.

**दक्षिणायन**— कर्क संक्रांतीपासून मकर संक्रांतीपर्यंतचा काळ. कर्क राशीपासून दक्षिणेकडे सूर्याचें जाणें याला दक्षिणायनमार्ग अथवा धूमादिमार्ग असेंहि नांव आहे. दक्षिणायनमार्ग हा पितृलोकास नेणारा आहे. तो अर्चिरादि मार्गाच्या उलट आहे. दक्षिणायनांत देव निजलेले असतात, मार्गांत सर्वत्र अंधार असतो; त्यामुळेंच भीष्माचार्यांनें दक्षिणायनांत प्राण न सोडतां उत्तरायण लागल्यावर प्राण सोडला अशी कथा आहे. या दोन काळांस देवयान (शुक्ल) व पितृयाण (कृष्ण) अशीं नांवें वेद-

उपनिषदें यांत आलीं आहेत. उत्तरायण हा देहपात करण्यास योग्य काल होय असें भारतकालीं मानीत असत.

दक्षिणायनाच्या प्रारंभीं कर्क संक्रांतीस मकर संक्रांतीप्रमाणेंच पर्व समजून स्नान, दान, अयनश्राद्ध, इ. करण्याचें धर्मग्रंथांत सांगितलेलें आहे व त्याप्रमाणें आचरणाची रूढि आहे.

**दाऊदखान कुरेशी**— एक अरब सरदार. हा जयसिंग व दिलेरखान यांबरोबर दक्षिणेंत आलेला मातबर मोगल सरदार असून पुरंदरच्या वेढ्यांत दिलेरखानाच्या हाताखालीं होता. पुढें हा काम करण्यांत कुचराई करूं लागल्यामुळें यास सिंहगड, रायगड, रोहिडा, वगैरे किल्ले घेण्याच्या कामगिरीवर पाठविलें. आणि ते किल्ले घेऊन तो यशस्वी झाला. पुढें दाऊदखान ता. १९ मे १६६५ रोजीं पुण्यास आला. स. १६७० त शिवाजीची मोहीम सुरू होतांच हा आपल्या ७,००० सैन्यासह निघाला व २८ मार्च १६७० ला तो अहमदनगरला आला; आणि शिवाजीनें काबीज केलेलीं पारनेर व जुन्नर हीं ठाणीं परत घेतलीं. याबद्दल याची तारीफ होऊन यास बऱ्हाणपूरचा सुभेदार नेमण्यांत आलें. दिंडोरीच्या लढाईंत शिवाजीनें याचा पराभव केला (१७ ऑक्टोबर १६७०). सालेरचा किल्ला मराठ्यांनीं घेतल्यावेळीं (१६७१) दाऊदखान जवळ असतांनाहि बऱ्हाणपूरला निघून गेला.

**दाऊदखान पन्नी** — एक मोगल सरदार. खिझिरखान पन्नी या पठाण शिपायाचा हा मुलगा. याच्या अंगच्या धैर्यादि गुणांमुळें हा आपल्या समकालीन योद्ध्यांत प्रमुख गणला जात असे. औरंगजेबाच्या पदरीं यानें बरींच वर्षें नोकरी केली होती. दक्षिणेंतून परत फिरते वेळीं बहादुरशहानें दाऊदखान ह्याजकडे दखखन प्रांताची दिवाणी व वसुली सोंपविली होती (१७०८–१३). फरुखसियर बादशहाच्या कारकीर्दींत दखखनचा सुभेदार हुसेनअल्ली यास वाटेंतच अडवून ठार मारण्याची कामगिरी बादशहानें दाऊदखानास सांगितली होती. या सूचनेप्रमाणें हुसेनअल्ली दिल्लीहून बऱ्हाणपुरास आला असतां त्यास दाऊदनें तोंड दिलें. दोन्ही पक्षांमध्यें लालबागेंत तुंबळ युद्ध सुरू असतां दाऊदखानास बंदुकीची गोळी लागून तो आपल्या अंबारींत मरून पडला (सप्टेंबर १७१५).

दाऊद हा बऱ्हाणपुरास सुभेदार असतांना त्यानें मराठ्यांस चौथाई देण्याचें कबूल केलें. तो मराठ्यांचा बराच पक्षपाती होता. त्याच्याच मध्यस्थीनें दखखनमधील सहा सुभ्यांवर चौथाई वसूल करण्याची परवानगी शाहूस मिळाली.

**दाऊल मलक**— वऱ्हाडांत एलिचपूर तालुक्यांत उपराई गांवीं हा मुसलमान साधु होऊन गेल्याला बरींच वर्षें झालीं. हा नवसास पावतो म्हणतात. नवसाचे प्रकार दोन आहेत : पहिल्या प्रकारास 'बैठी कंदुरी' व दुसऱ्यास 'फिरती कंदुरी' असें म्हणतात. 'बैठी कंदुरी' म्हणजे ज्ञातिभोजन आणि 'फिरती कंदुरी' म्हणजे आपल्याबरोबर स्वजातीय, स्वगोत्री जे येतील त्या मंडळीसह थोडे दिवस गांवांत व इतर गांवीं जाऊन भिक्षा मागून जें थोडेंफार मिळेल त्यापैकीं रोजच्या भोजनास खर्च करून जें शिल्लक राहील तें शेवटीं भंडारा म्हणून खर्चणें. धनगर, तिळोरे, धनोजे कुणबी, तेली, भोई, महार, मांग, वगैरे लोक हे नवस करतात.

**दांगट**— महाराष्ट्रांतील एक जात. ही बहुतेक नामशेष होत चालल्यानें हिच्याविषयीं फारशी कोणाला माहिती नाहीं. सिंघण राजाच्या वेळीं (सुमारें १३ वें शतक) हल्लीं सिंगणापूर गांव ज्या ठिकाणीं आहे तेथें दाट झाडी असे व त्या वेळीं या जंगलांत दांगट लोकांची वस्ती असे. सिंगणापुराजवळच्या शंभुमहादेवाच्या दर्शनास येणाऱ्या यात्रेकरूंस या जंगलांतून सुरक्षित नेण्याचें काम हे लोक करीत असत. या जातींत जाधव, भोंसले, यांसारखीं आडनांवें आहेत. कांहीं ठिकाणीं दांगटांना अस्पृश्य मानलें जातें. सध्यां या लोकांचा मुख्य धंदा लावण्या, पोवाडे म्हणण्याचा आहे. पुष्कळसे मोलमजुरी करून राहतात. पुण्याजवळच्या हडपसर गांवीं दांगटांची कांहीं वस्ती आहे.

**दाग्वार, लुई जाकेज मॉंड** (१७८९–१८५१)— हा एक फ्रेंच चित्रकार आणि पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता होऊन गेला. प्रथमतः हा चितार्‍याचा धंदा करूं लागला. परंतु पुढें हा फोटोग्राफीची कला शिकला. जे. नैसफोर निएप्स यानें १८१४ सालापासून प्रकाशाच्या साहाय्यानें चित्रें तयार करण्याचा प्रयत्न केला होता. १८२९ सालीं त्यानें दाग्वार याला या संबंधानें माहिती करून दिली. या उभयतांनीं याविषयीं एकत्र प्रयोग केले. सन १८३३ मध्यें जे. नैसफोर निएप्स मृत्यु पावल्यानंतर दाग्वार यानेंच पुढें प्रयोग चालू ठेविले. १८३९ सालीं अरागो यानें 'अॅकॅडेमी ऑफ् सायन्सेस' नांवाच्या संस्थेंत दाग्वारच्या प्रकाशलेखनपद्धतीचें महत्त्व शास्त्रज्ञांच्या नजरेस आणलें. दाग्वार याचा पुढें सन्मान करण्यांत आला. व फ्रेंच सरकारनें त्याला व निएप्स याच्या वारसाला कांहीं वर्षासन करून दिलें. यानें नवीन टाइपांचा शोध लाविला. त्या टाइपाला याचेंच नांव आहे.

**दाजीबा जोशीराव** (सुमारें स. १८००–१८६५)—एक मराठी ग्रंथकार. हा कोल्हापूरचा राहणारा. मोठा संस्कृतज्ञ व ज्योतिषशास्त्रज्ञ होता. यानें बरेच संस्कृत व प्राकृत ग्रंथ लिहिले. संस्कृत ग्रंथांत यात्रावर्णनें, माहात्म्यें व स्तोत्रें आहेत. याचे मराठी ग्रंथ पुढीलप्रमाणें आहेत :—

१ करवीरमाहात्म्य, २ मल्हारीमाहात्म्य, ३ कार्तिकमाहात्म्य, ४ गालवाख्यान, ५ ईशस्तोत्र, ६ वीरभद्रमाहात्म्य, ७ सीताजन्म;

८ एकादशीमाहात्म्य, ९ सुलोचनाख्यान, १० शिवपार्वतीसंवाद, ११ मारुतिबलरामयुद्ध, १२ वीरभद्रमाहात्म्य, १३ रामअंजनीभेट, १४ चोपडाईजोतीचा, १५ कृष्णदान, १६ अहिमह्याख्यान, १७ वत्सलाख्यान, १८ मयूरध्वजाख्यान, १९ श्रियाळाख्यान, २० चंद्रहासचरित्र, २१ अंबाबाईवर आर्या, २२ अद्‌भुतनारायण (आर्या), २३ मारुतिस्तुति, २४ लहुकुशाख्यान (आर्या), व २५ केदारमाहात्म्य (आर्या). याचे हे ग्रंथ अप्रसिद्ध आहेत व याच्याच वंशजांच्या संग्रहीं आहेत.

**दाढी**—ही एक पुरुषाची वैशिष्टयदर्शक खूण आहे. प्राचीन काळीं दाढीस फार पावित्र्य असे. यहुदी लोकांत दाढी ही फार पवित्र मानण्यांत येई, व ते लोक ईजिप्तमध्यें असतांना ईजिप्ती लोक जरी दाढी काढून टाकीत असत तरी यहुदी लोक ती राखून ठेवीत. ग्रीक व रोमन लोकांत प्राचीन काळीं बहुधा दाढी काढून टाकण्याचा प्रघात होता. दाढीवाला (बार्बरस) हा शब्द बहुधा अडाणी अथवा असंस्कृत लोकांस लावण्यांत येत असे. तथापि ग्रीक–रोमन काळांतहि बरेच लोक दाढी ठेवीत असत. एवढेंच नव्हे तर दाढीवाला मनुष्य शहाणा समजण्यांत येत असे. अलेक्झांडर दि ग्रेट यानें आपल्या सैन्यांत दाढी राखण्याची मनाई केली होती. कांहीं देशांतून दाढीवर कर ठेवण्याची प्रथा आढळून येते. उदा., प्रशियामध्यें पीटर दि ग्रेटनें दाढीवर कर बसविला होता. तसाच इंग्लंडमध्येंहि प्राचीन काळीं दाढीवर कर असे.

हिंदुस्थानांत ऋषींना दाढी असे. पुढें श्मश्रु करण्याचा गृहस्थांत प्रघात पडला. मुसलमानांचें पाहून कांहीं शिवाजीसारखे हिंदु राजे दाढी राखीत. पण अशीं उदाहरणें फार क्वचित् सांपडतात. आज शीख लोक सर्रहा दाढी ठेवतात. तशी त्यांना धर्माज्ञाच आहे.

**दांत**—प्राण्याच्या निरनिराळ्या दांतांचे त्यांच्या उपयोगाप्रमाणें निरनिराळे आकार असतात. मनुष्य व इतर उच्च वर्गांतील सस्तन प्राण्यांमध्यें दोन प्रकारचे दांत येतात. पहिल्या प्रकारास प्राथमिक दुधाचे किंवा पडणारे दांत म्हणतात व दुसऱ्या प्रकारचे दांत कायमचे असतात. माशाचे दांत वरचेवर पडतात व पुन्हा नवीन येतात. दांत हे अस्थिपंजराचा किंवा हाडांच्या सांपळ्याचा भाग म्हणून नसतात तर ते कातडीचा भाग असून केंसासारखेच असतात. मनुष्यप्राण्यांस एकंदर ३२ दांत असून ते प्रत्येक जबड्यांत १६ याप्रमाणें असतात. सर्वांत मागून अक्कलदाढा येतात. प्रत्येक दांताच्या मध्यभागीं पोकळी असून त्या ठिकाणीं मऊ असा मांसल भाग असतो व त्यांत रक्तपेशी आणि मज्जातंतू असतात. या पोकळीच्या सभोंवार दंतद्रव्य असतें. हें सामान्यतः चुन्याचे स्फुरित आणि कर्बित (फॉस्फेट अँड कार्बोनेट ऑफ लाइम) यांचें बनलेलें असतें. या दंतद्रव्याच्या

**सामान्य प्रौढ माणसाच्या दांतांची रचना:**

फाळे: १ मधले; २ बाजूचे. सुळे: ३ दाढांच्या आधींचे; ४ पहिले; ५ दुसरे. दाढा: ६ पहिल्या किंवा सहा वर्षांच्या; ७ दुसऱ्या किंवा १२ वर्षांच्या; ८ तिसऱ्या दाढा किंवा अक्कलदाढा.

बाहेरील अंगास एक प्रकारचें हाडासारखें दिसणारें कुकण असतें व दांतांच्या वरच्या भागाभोंवतीं एक प्रकारचें कांचद्रव्य असतें. दांतांतील कांहीं अंश झिजूं किंवा कुजूं लागला असतां दंतशूळ उत्पन्न होतो.

**दांत येणें**—दुधाचे दांत मूल सहा महिन्यांचें झालें म्हणजे येऊं लागतात. व कायमचे दांत सहाव्या वर्षी येतात. दुधाच्या दांतांची ते पडणारच असल्यानें काळजी घेण्यास नको ही समजूत चुकीची व घातकहि आहे. कायमच्या दांतांचें आरोग्य याच दांतांवर अवलंबून असतें. दुधाच्या दांतांच्या निर्गेसाठीं 'डी' जीवनसत्त्व व खट (कॅल्शिअम) उपयुक्त असतें. त्याची स्वच्छता राखणेंहि अवश्य आहे.

मुलाला दांत येऊं लागले म्हणजे प्रथम खालचे मधले सुळे व नंतर वरचे मधले सुळे; वरच्या बाजूच्या सुळ्यानंतर खालच्या बाजूचे सुळे; यानंतर एकामागून एक दाढा येतात. हा अनुक्रम बदलतोहि. दांत येण्याच्या वेळीं ताप येतो व पचनेंद्रियाचे विकार होतात; कधीं इतरहि विकार होत असतात. तेव्हां या दिवसांत मुलाला फार जपावें लागतें. हिरड्या सुजतात तेव्हां लिंबाचा रस त्या जागीं बोटानें चोळल्यास बरें वाटतें.

**दांतिवरें किल्ला**—मुंबई, माहिमच्या दक्षिणेस १० मैलांवर हा किल्ला पडक्या स्थितींत आहे. हा पोर्तुगीज लोकांनीं बांधला असावा.

**दांते-कुत्रें**—(रॅचेट अँड पॉल). पुढेंमागें होणाऱ्या गतीचें परिवर्तन वर्तुलगतीमध्यें करण्याकरितां या योजनेचा उपयोग करण्यांत येतो. घड्याळाच्या लंबकापासून जी घड्या-

ळांतील चाकास गति मिळते ती अशाच प्रकारच्या योजनेमुळे

[ क दांड्याच्या मागेंपुढें होणाऱ्या सरळ रेषात्मक गतीपासून ड या हेलकावणाऱ्या दांड्यामुळें आणि च या कुत्र्यामुळें अ चाकाला बाणाच्या दिशेनें अंतरितवर्तुल गति मिळते. इ हें कुत्रें चाकाला मागें जाऊं देत नाहीं. ]

मिळत असते. अशा तऱ्हेनें या योजनेचा एकाच दिशेनें वर्तुळाकार गति मिळण्याकरितां उपयोग करण्यांत येतो.

**दातेगड**— सुंदरगड. मुंबई, सातारा जिल्हा. पाटणच्या ईशान्येस ३ मैलांवर पायथ्यापासून २००० फूट उंचीवर हा किल्ला असून त्याची चढण तीन मैल आहे. किल्ला चौकोनी ६०० फूट लांब व १८० फूट रुंद आहे. खडक फोडून २० पायऱ्या केलेल्या आहेत. एक मारुतीचें देवालय आहे. किल्ल्यांत एक अंधारकोठडी व खडकांत खोदलेली विहीर आहे व इतर पांच टांकीं आहेत. येथें एका गायमुखांतून विपुल पाणी येतें.

**दांतेयंत्र, दंतुरचक्र**—(मिलिंग मशिन). यामध्यें लेथप्रमाणेंच एक शंकुकप्पी (कोनपुली) असते व त्याचा दंड (शाफ्ट) लांब नेलेला असतो. या दंडावर निरनिराळे कर्तक ( कटर ) बसवितां येतात. दंडाच्या खालील बाजूस पुढेंमागें व उभीआडवी चालणारी सरकणी (स्लाइड) बसविलेली असते. या सरकणीवर पदार्थ धरला जातो. दांतेयंत्रामध्यें कर्तक ( कटर ) जागेवरच फिरत असतो. पदार्थ मात्र जरूरीप्रमाणें मागेंपुढें होत असतो. दांतेयंत्रामध्यें चक्रांना दांते पाडण्याचेंच काम बहुतेक होत असतें. पृष्ठभाग सारखा करणें, वगैरेहि बरेंचसें काम या यंत्रावर होऊं शकतें.

**दादाजी कृष्णाजी लोहोकरे**—शिवाजीचा एक सरदार. हा तळेगांव ढमढेऱ्याचा रहिवासी. प्रथम हा शहाजीच्या पदरीं असे. शहाजीनें बंगरूळकडे महाराष्ट्रांतून जी मंडळी नेली त्यांपैकींच हा असून, त्याच्या स्वराज्य-स्थापनेच्या मसलतींत दादाजींचें मूळपासून अंग होतें. शहाजीला मुस्ताफाखानानें जेव्हां पकडलें, त्या वेळीं त्यालाहि त्याच्याबरोबर कैद केलें. याचा मुलगा रत्नाकर हा याच सुमारास संभाजी( शहाजीचा वडील पुत्र )सह मुसलमानांशीं लढत असतां, कनकगिरीस मेला ( १६४८ ). पुढें शहाजीस आदिलशहानें मोकळें केलें, त्याबरोबर यालाहि सोडलें. तेव्हांच शहाजीनें दादाजीकडून स्वराज्यस्थापनेच्या कामीं ' चिरंजीव सिऊबा 'स जमावा ( फौज )निशीं मदत करण्याबद्दल बेलरोटीवर हात ठेवून शपथ घेवविली व सरदारीचीं वस्त्रें दिलीं. यापुढें दादाजीनें शिवाजीस मावळचे देशमुख मिळवून देऊन बरीच मदत केली. कल्याण घेतल्यावर शिवाजीनें तेथील सुभेदारीवर दादाजीचीच नेमणूक केली ( १६५७ ). तत्पूर्वी तो पायदळावरील एक सेनापति होता. दादाजीचा भाऊ सखोपंत हा कारीचे देशमुख जेधे यांच्याकडे नोकर होता. त्याला भिवंडी येथें नायब सुभेदारी दिली. पुढें अफजल-प्रकरणांत दादाजीप्रमाणेच त्याचा दुसरा मुलगा रखमाजी यानेंहि कामगिरी बजावली होती ( १६५९ ).

**दादाजी कोंडदेव** ( मृ. १६४७ )— शहाजीच्या पदरचा एक विश्वासू ब्राह्मण कारभारी. पुण्यांत राहत असलेली शहाजीच्या कुटुंबाचीं माणसें व त्याची तेथील जहागीर यांवर देखरेख ठेवण्याकरितां याची नेमणूक करण्यांत आली होती ( १६३७ ). हा जमाबंदीच्या कामांत फार निपुण होता. याच्या देखरेखीखालीं पुणें प्रांतांतील शेतींत पुष्कळ सुधारणा घडून आली, व एकंदर लोकसंख्या वाढली. पुण्याची वसाहतहि त्यानें केली.

दादाजीचें मूळगांव भोंसल्यांच्या जहागिरीपैकीं मलठण देऊळगांव ( पुणें जिल्हा ) हें होय. तेथील हा कुलकर्णी. शहाजीनें त्याला निवडून पुणें प्रांताची जहागीर पाहण्यास एक हजार पागेसह नेमलें. शहाजीनेंच शिवाजीला पुढे करून स्वराज्यस्थापनेचा उद्योग गुप्तपणें आरंभला होता व त्या कामीं त्यानें दादाजीस मुखत्यार नेमिलें. दादाजीच्या हाताखालीं सिद्दी हिलाल हा फौजदार होता. सिंहगड हा पंताच्या दिमतीस दिला होता. त्यास सुभेदार ( कलेक्टर ) किल्ले कोंढणा व मुजुमदार सुभे जुन्नर असे अधिकार ( लष्करी व मुलकी ) होते. दादाजी हा लढण्यांतहि कमी नव्हता; बांदल व इतर देशमुख यांना त्यानें प्रसंगीं लढाई करूनच नमविले होते. याप्रमाणें शिवाजीच्या स्वराज्यस्थापनेच्या पायाचें काम दादाजीनेंच प्रथम केलें. शिवाजीला राजकारभाराचें शिक्षण दादाजीनें दिले व १६४० त पुण्यास त्याचें लग्नहि करून दिलें. दादाजीच्या मृत्यूनंतर शिवाजी स्वतंत्रपणें आपला कारभार पाहूं लागला.

दादाजीने रयत सुखी केली. वन्य पशू मारून अरण्यें तोटविलीं. मावळचे देशमुख-देशपांडे बंडाळी माजवीत ती मोडली व जे स्वराज्यस्थापनेस अनुकूल होतील असें वाटलें त्यांना अनुकूल करून घेतलें. दादाजीनें तोडलेले अनेक वाद पाहतां तो फार न्यायनिष्ठुर दिसतो. तो १६४७ सालीं वारल्यावर त्याचा मुलगा कृष्णाजी यासहि शिवाजीनें योग्यतेस चढविलें.

**दादाजी नरस प्रभु**—हिंदवी स्वराज्य स्थापण्याच्या कामीं शिवाजीचा पहिला मदतनीस. १६४५ त शिवाजीनें या स्वराज्याची योजना आंखली. या वेळीं त्यानें रोहिडखोऱ्यांतील किल्ला घेऊन त्याला राजगड हें नांव दिलें. दादाजीनें आदिलशाहीच्या

नोकरींत असतांहि शिवाजीस मदत केल्यामुळें बादशहाच्या वजिरानें त्याला राजनिष्ठ राहण्याविषयीं बजावलें. तसा राहिल्यास त्याचें वतन चालू ठेवण्याचीहि लालूच दाखविली. पण दादाजी वळला नाहीं. हा रोहिडखोरें आणि वेळवंडखोरें यांवरचा देशपांड्या होता.

**दादाभाई नवरोजी** (१८२५-१९१०).— हिंदुस्थानचा

एक श्रेष्ठ पुढारी. मुंबई प्रांतांत रानडे, गोखले, टिळक, मेथा, वाच्छा, इत्यादि लोकहितार्थ झटणाऱ्या व्यक्तींप्रमाणे दादामाई फार मोठ्या दर्जाचे श्रेष्ठ पुरुष होते. व या सर्वांच्या पूर्वीच ते राजकीय आघाडीवर होते. त्यांचा जन्म ४ सप्टेंबर १८२५ रोजीं झाला. वयाच्या ४ थ्या वर्षी वडील वारले. त्यांच्या मातोश्रीनें त्यांना शक्य तितकें उच्च शिक्षण दिलें. दादाभाईंची बुद्धिमत्ता, कर्तृत्वशक्ति व विद्वत्ता हीं फार प्रशंसनीय होतीं. त्यांना चरितार्थाकरितां नोकऱ्या कराव्या लागल्या. ते प्रथम प्रोफेसर, फर्मचे म्यानेजर, वगैरे होते. मुंबईस असतांनाच दादाभाईंनीं 'स्टुडंट्स लिटररी अँड सायन्टिफिक सोसायटी' व तिच्या गुजराथी व मराठी 'ज्ञानप्रसारक मंडळी' अशा शाखा काढल्या. मुंबईस प्रथमतः यांनींच मराठी व पारशी मुलींच्या शाळा सुरू केल्या. तसेंच बाँबे असोसिएशन, इराणी फंड, पारशी जिमखाना, विडो मॅरेज असोसिएशन, फ्रामजी इन्स्टिट्यूट, व्हिक्टोरिया अँड आल्बर्ट म्यूझियम या संस्था स्थापण्यांतहि त्यांचें प्रत्यक्ष साहाय्य होतें. शिवाय १८५१ सालीं 'रास्तगोफ्तार' (खरें सांगणारा) नांवाचें गुजराथी पत्र काढलें. इंग्लंडमध्येंहि गेल्याबरोबर त्यांनीं राजकीय कामास सुरुवात केली. प्रथम आय्. सी. एस्. परीक्षा इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशांत एकदम व्हावी अशाबद्दल खटपट केली; तिला अखेर यश येऊन १८९३ सालीं ब्रिटिश पार्लमेंटनें तसा ठराव केला. इंग्लिश लोकांना हिंदुस्थानविषयक माहिती देऊन त्यांची सहानुभूति मिळविण्याच्या उद्देशानें 'लंडन इंडियन सोसायटी' स्थापन केली. तीच पुढें 'ईस्ट इंडिया असोसिएशन' झाली. इंग्लंडमध्यें हिंदुस्थानच्या प्रश्नासंबंधीं व्याख्यानें दिलीं. १८६९ सालीं दादाभाई परत मुंबईला आले. दादाभाई पुढें पुन्हां इंग्लंडला फासेट कमिटीपुढें साक्ष देण्याकरितां गेले व त्यांत त्यांनीं हिंदुस्थानचें दारिद्र्य व त्या मानानें करांचा असह्य बोजा असल्याचें सप्रमाण सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. हिंदुस्थानांत दरमाणशीं उत्पन्न २० रु. फक्त आहे, ह्या दादाभाईच्या विधानामुळें पुष्कळ सरकारी अधिकारी रागावले व त्याबद्दल वाद माजविला. त्यामुळें १८७३ सालीं 'हिंदुस्थानचें दारिद्र्य' नांवाचें स्वतंत्र पुस्तक दादाभाईंनीं प्रसिद्ध केलें. सरकारनेंहि पुष्कळ माहिती मिळविल्यानंतर माणशीं उत्पन्न रु. २७ असल्याचें जाहीर केलें.

१८७४ त दादाभाई बडोद्यास दिवाण म्हणून गेले. तेथें संस्थानांतील घोंटाळा दूर केला. त्या कामीं त्यांचा त्या वेळच्या रेसिडेंटशीं मतभेद झाला. स्टेट सेक्रेटरीपर्यंत हें प्रकरण त्यांनीं नेऊन आपली बाजू खरी केली. दादाभाई परत मुंबईस आले. १८८५ पर्यंत ते मुंबई म्युनिसिपालिटीचे सभासद होते. १८८५ मध्यें मुंबई कायदे कौन्सिलचे सभासद झाले. १८८७ त इंडियन नॅशनल काँग्रेस (राष्ट्रीय सभे)चे अध्यक्ष झाले. १८९२ त पुन्हां इंग्लंडमध्यें जाऊन पार्लमेंटांत सभासद झाले. लाहोरच्या काँग्रेसचें अध्यक्षपद १८९३ त दादाभाईंनाच देण्यांत आलें. १८९६ सालीं ते रॉयल कमिशनचे एक सभासद होते व वेल्बी कमिशनपुढेंहि दादाभाईंनीं आपली साक्ष दिली. १८९८ सालीं इंडियन करन्सी (हिंदी चलन) समितीपुढें त्यांची साक्ष झाली. १९०२ सालीं त्यांनीं आपले 'पॉव्हर्टी अँड अनब्रिटिश रूल इन् इंडिया' (दारिद्र्य आणि ब्रिटिश इभ्रतीला न शोभणारा हिंदुस्थानांतील राज्यकारभार) हें पुस्तक प्रसिद्ध केलें; त्यांत त्यांनीं हिंदुस्थानचें दारिद्र्य, इंग्लंडला दरसाल तीन कोटी पौंड बिनमोबदला जात असल्यानें, वाढत आहे हें सिद्ध केलें आहे. १९०५ सालीं आमस्टरडॅम (हॉलंड) येथें भरलेल्या सोशल डेमोक्रॅटपक्षाच्या इन्टर-नॅशनल काँग्रेसला हजर राहून त्यांत त्यांनीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्य-पद्धतीचा निषेध केला. १९०६ सालीं कलकत्त्यास भरलेल्या राष्ट्रीय सभेचे ते पुन्हां अध्यक्ष झाले. याच सभेंत दादाभाईंनीं स्वराज्य, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण अशीं तीन स्वराज्य-प्राप्तीचीं निश्चित साधनें सांगितलीं. १९१६ त त्यांना मुंबई युनिव्हर्सिटीनें एल्एल्. डी. ची पदवी अर्पण केली. यानंतर वयोवृद्धत्वामुळें त्यांना स्वस्थ राहावें लागलें. अशा प्रकारें स्वदेशाकरितां देह झिजविणारे महर्षि दादाभाई १९१७ सालीं

जूनच्या ३० तारखेस मुंबईजवळ वेसोंवा येथें परलोकवासी झाले. हिंदुस्थानच्या स्वराज्यविषयक चळवळीचे ते अग्रणी होते.

**दादू पंथ**—अहमदाबाद येथील पिंजारी दादू यानें हा पंथ स्थापिला. दादू १५२४ त जन्मला व १६०३ मध्यें त्यानें समाधि घेतली. तो अंबेरला बरीच वर्षे होता. तेथें त्याचा एक मठ आहे. त्याच्या उपदेशाचा संग्रह 'बाणी' ग्रंथांत आहे. यांत ५००० पद्यें आहेत. दादू कबिराचा परंपरागत शिष्य होता. दादू वेदान्ती असून तत्त्वज्ञानाचा उपदेश करीत असे. या पंथाचे लोक रामोपासक आहेत. रामच परब्रह्म आहे, असें या पंथाचे लोक मानतात. हे जपमाळ धारण करतात. या पंथाच्या ५२ शाखा आहेत. त्यांच्यांत विरक्त व कौपिन आणि कमंडलू धारण करणारे असतात. नरैन येथें या पंथाचा मुख्य मठ आहे. या पंथाच्या लोकांचा भरणा सैन्यात असतो. हे चांगले लढवय्ये म्हणून त्यांची ख्याति आहे. मारवाड, वगैरे भागांत या पंथाचे लोक आढळतात. बहुतेक दादू पंथी लोक राजपुतान्यांतच आहेत. त्यांची संख्या सुमारें आठ हजार आहे.

**दानधर्म**—अनाथ, पंगू, गरजू यांसारख्या लोकांना द्रव्यसाहाय्य करण्याची बुद्धि समाजांत फार पूर्वीपासूनच आहे यांत शंका नाहीं. तथापि दानाचा उपयोग नीट व्हावा व त्यासाठीं कांहीं विशिष्ट पद्धती किंवा संस्था हव्या ही कल्पना फार पुढें आली. बौद्ध आणि खिस्ती संप्रदायांतून मठांच्या द्वारें दानांचा विनियोग करण्याचे प्रकार सुरू झाले. खिस्ती मिशनरी संस्थांनीं दवाखानें, इस्पितळें, अनाथालयें, शाळा, इ. चालविलेल्या माहीतच आहेत.

इंग्लंडांत १८१९ सालीं रेव्ह. डॉ. चामर्स यानें नवीन दानपद्धतीचा पाया घातला. गरिबांना स्वावलंबी करण्याकडे व खऱ्या अनाथ-पंगूंनाच साहाय्य करण्याकडे त्यानें जनतेचें लक्ष वेधलें. पुढें १८६९ सालीं लंडनमध्यें अशी एक दान-संस्था (चॅरिटी ऑर्गॅनिझेशन सोसायटी) निघाली. पुढें अनेक ठिकाणीं अशा संस्था निघून लोकांच्या दानधर्माचा विनियोग या संस्थांमार्फत चांगल्या प्रकारें होऊं लागला. घरोघरीं जाऊन, ठिकठिकाणीं फिरून संस्थेचे कार्यकर्ते दानांची जरूरी असणारांची माहिती जमवूं लागले, बेकारांना काम लावून देऊं लागले व अनाथांना सुखांत ठेवण्याची खटपट करूं लागले. यासाठीं तिकडे सरकारनें कायदे केले व भिक्षेकऱ्यांची संख्या नाहींशी केली. दानशास्त्राचें शिक्षण देणाऱ्या संस्था अमेरिकेंत आहेत.

हिंदुस्थानांत प्राचीन काळापासून किती तरी दानधर्म होत आहे; पण तो पद्धतशीर नसल्यानें त्याचा गरजू समाजाला फार थोडा उपयोग होतो व भलतेच पोसले जातात.

दान देण्याचा प्रघात ऋग्वेदकाळापासून आढळतो. त्या वेळचे दान देणारे राजे व घेणारे ऋषी यांचीं नांवें सांपडतात. दानाच्या वस्तूहि समजून येतात. या काळात भूमिदान मात्र नाहीं; तें स्मृतिपुराणकाळांत आढळतें. भगवद्गीतेंत दानाचे सात्त्विक, राजस, व तामस असे तीन भेद पाडले आहेत. अग्नींत आहुति देणें हाहि एक दानाचा प्रकार पूर्वी समजत. तसेंच मृतात्म्यास प्रिय असलेल्या वस्तू त्याला स्वर्गांत मिळाव्यात म्हणूनहि त्या दान देण्याची कल्पना दृष्टीस पडते. पराशराच्या मतें दान देणें तें घरीं नेऊन द्यावें. याचा असा अर्थ लावतां येईल कीं, ज्यांना शारीरिक व्यंगांमुळें घराबाहेर जातां येत नाहीं त्यांनाच दान देत जावें. विद्यादानाची महती विशेष मानण्यांत येई. ऐतिहासिक कालांत राजे, धनिक, इ. नीं दान दिल्याबद्दलचे ताम्रपट, शिलालेख, सनदा, इ. संशोधिल्या गेल्या आहेत. अग्रहार पाहा.

**दानव**—याचा सामान्य अर्थ देवशत्रु, दैत्य असा आहे. पण दनु, दानु, किंवा दानव हा शब्दहि नाग, गोप, वगैरे शब्दांप्रमाणें विशिष्ट लोकांचा वाचक असावा. रावणाची बहीण कुंभनसी ही मधु नांवाच्या एका दानवास दिली होती. तेव्हां राक्षसांचा व दानवांचा शरीरसंबंध होत असे, असें वाटतें. राक्षस, दानव व असुर हे मूळचे निरनिराळे होत. पुढें संस्कृत भाषेंत हे शब्द एकाच अर्थी वापरण्यांत येऊं लागले. दानु शब्द दारु असाहि होऊन पुढें द्रविड शब्दाची प्रकृति झाली असावी. दारु शब्द संस्कृतांत लांकडास लाविला जातो, तेव्हां दानु किंवा दारु हे मूळचे जंगली लोक असण्याचा संभव आहे. (वि. वि. पुस्तक २३, पान ५३)

**दानियल मिर्झा** (१५५७-१६०५)—अकबर बादशहाचा हा तिसरा मुलगा अजमीर येथें जन्मला. शील जातीच्या दानियल नामक एका प्रसिद्ध दरवेशाच्या घरीं याचा जन्म झाल्यामुळें त्यास दानियल असें नांव प्राप्त झालें. हा फार दारूबाज होता. सुलतान मुरादच्या मृत्यूनंतर अकबरानें दानियल यास निजामशाही जिंकण्याकरितां बरोबर मोठी फौज देऊन दक्षिणेंत पाठविलें. इ. स. १६०० त मोंगलांनीं अहमदनगरचा किल्ला घेतला. ता. ८ एप्रिल १६०५ रोजीं बऱ्हाणपूर येथें दानियल हा मद्यपानाच्या अतिरेकामुळें मरण पावला. त्याच्या मृत्यूची वार्ता ऐकून, दिवसेंदिवस क्षीण होत चाललेल्या अकबर बादशहास मोठा धक्का बसला. अकबराची त्याच्यावर फार प्रीति होती, त्यामुळें त्याची प्रकृति अधिकच बिघडून दीड वर्षाच्या अवधींतच तो मरण पावला. आपल्या पश्चात् दानियल यास दिल्लीची गादी मिळावी अशी अकबराची इच्छा होती. खानदेशास त्यानें दानदेश असें नांव दिलें होतें. दानियल हा वऱ्हाड व खानदेश येथील सुभा होता. त्याचें लग्न विजापूरच्या आदिलशहाच्या मुलीशीं पैठण येथें झालें होतें. हिच्याशिवाय जानबेगम नांवाची त्याची एक बेगम होती. तीस तहमूर,

बायसंगर, व हुशंग असे तीन पुत्र व ४ मुली झाल्या. पैकीं मुलांस पुढें शहाजहाननें ठार मारिलें.

**दापोली**—मुंबई, रत्नागिरी जिल्ह्याच्या वायव्येकडील एक तालुका. क्षेत्रफळ सुमारें ५०० चौ. मैल. लो. सं. १,२३,८३८. मंडणगड पेट्याचाहि ह्यांत समावेश होतो. दापोली व हर्णई हीं दोन गांवें असून २४३ खेडीं आहेत. समुद्रकांठच्या खेड्यांत लोकवस्ती बरीच दाट असते. हर्णई हें किनाऱ्यावरच असून त्यासमोरच किल्लेवजा सुवर्णदुर्ग नांवाचें बेट आहे. एकंदर तालुका समुद्रकिनारा सोडतां रुक्ष व खडबडीत आहे. हवामान समशीतोष्ण असून आरोग्यदायक आहे. पाऊस दापोली येथें १३१ इंच व मंडणगड येथें १६६ इंच पडतो.

दापोली हें तालुक्याचें मुख्य ठिकाण, समुद्रतीरापासून ५ मैल दूर आहे. १८१८ सालीं दापोली हें दक्षिण कोंकणाचें लष्करी ठाणें करण्यांत आलें होतें. पण १८५७ सालीं सर्व सैन्य तेथून नेण्यांत आलें. येथें एक हायस्कूल व शिल्पशाळा आहे.

**दाबलेली हवा**—अलीकडे निरनिराळ्या उद्योगधंद्यांमध्यें दाबलेल्या हवेचा उपयोग पुष्कळच मोठ्या प्रमाणांत करण्यांत येतो. ही दाबलेली हवा फार जड दाबाची (दर चौरस इंचास १०० ते ५००० पौंड) किंवा हलक्या दाबाची (दर चौरस इंचास १५ ते २० पौंड) असूं शकते. सामान्यतः हवेच्या साहाय्यानें चालणारीं हत्यारें दर चौरस इंचास ८० पौंडांच्या दाबानें चालू शकतात. हलक्या दाबाची हवा समुद्रांत बुडालेलीं गलबतें वर काढण्याच्या कामीं किंवा बोगदे वगैरे खोदण्याच्या कामीं उपयोगांत आणतात. तसेंच भट्टीमध्येंहि हलक्या दाबाची हवा वापरण्यांत येते. बुडालेलें गलबत वर काढण्याकरितां त्यांत पाडलेल्या छिद्रांतून मोठमोठ्या नळ्या आंत घालण्यांत येतात व त्यांतून हवा आंत सोडण्यांत येते. या हवेमुळें त्या गलबतांतील पाणी बाहेर पडून जातें व यामुळें तें गलबत हलकें होऊन तरंगूं लागतें. वायूच्या झोताच्या भट्ट्यांमध्ये पुरविण्याची हवा सामान्यतः दर चौरस इंचास १० ते १५ पौंड दाबाची सोडण्यांत येते. या कामास लागणारी हवा बायसिकलच्या पंपासारख्याच पण मोठ्या आकाराच्या पंपांच्या मार्फत इंजिनांच्या–बहुधा वाफेच्या इंजिनांच्या–साहाय्यानें भरण्यांत येते.

भारी दाबाची हवा बहुधा हवेनें चालणाऱ्या हत्यारांस पुरविण्यांत येते. अशीं हत्यारें म्हटलीं म्हणजे रिवेट ठोकणारे हातोडे, फवारे सोडणाऱ्या नळ्या, वगैरे. तसेंच लहान यंत्रें, खडकास भोंकें पाडणारे सामते, याप्रमाणेंच टार्पेडोस गति देणारीं यंत्रें व पाणबुडींतील यंत्रें या सर्वांच्या बाबतींत भारी दाबाची हवा उपयोगांत आणावी लागते. सामान्यतः साध्या हत्यारांना दर चौरस इंचास ८० पौंड दाब पुरतो तर पाणबुडीस ४००० पौंडांचा दाब लागतो. अशा हत्यारांस वाफेच्या शक्तीनें चालणाऱ्या यंत्राप्रमाणे हवेनें चालण्याकरितां योग्य अशी रचना जोडलेली असते.

टार्पेडोमध्यें तिच्या मध्यभागीं एक भारी दाब असलेली हवा भरून ठेवण्याकरितां कोठीसारखा भाग असतो. या कोठीच्या मागील बाजूस हवेचें एंजिन असतें. त्याच्या योगानें टार्पेडोचें सुकाणूं चालतें. जेव्हां टार्पेडो सोडतात तेव्हां ती गलबतांतून एका नळीच्या द्वारें हवेच्या दाबानें बाहेर लोटण्यांत येते व त्याच वेळीं टार्पेडोमधील दाबलेल्या हवेचें कार्य चालू होतें व ती पाण्यांत पडल्यावर तिला या दाबलेल्या हवेमुळें गति मिळते व ही गति सामान्यतः दर तासीं ३५ ते ४० सामुद्रिक मैल असून ७ मैलपर्यंत पुरते.

पाणबुडीमध्यें अनेक कोठ्या असून त्यांच्या चाव्या बाहेरच्या समुद्राकडे उघडणाऱ्या बाजूस असतात. जेव्हां पाणबुडी पाण्यांत बुडते तेव्हां या कोठ्या अथवा टांकीं पाण्यानें पूर्ण किंवा अर्धवट भरलेलीं असतात. जेव्हां पाणबुडीस वर यावयाचें असतें त्या वेळीं या टाक्यांतील पाणी दाबलेल्या हवेच्या साहाय्यानें बाहेर काढून टाकण्यांत येतें. दाबलेली हवा फार भारी दाबाची सुद्धां बाटल्यांत भरून ठेवतां येते. आणि या बाटल्या दाबलेल्या हवेनें भरण्याकरितां पाणबुडीमध्येंच एक यंत्र ठेवलेलें असतें. हवेवर भारी दाब घातला असतां ती उष्ण होते व अशी उष्णता फार वाढूं नये म्हणून ही दाबण्याची क्रिया निरनिराळ्या पंचपात्रांत व निरनिराळ्या अवस्थांमध्यें करण्यांत येते व प्रत्येक अवस्थेंतून दुसऱ्या अवस्थेंत जातांना ती थंड करण्यांत येते. थंडीच्या दिवसांत दाबलेल्या हवेच्या यंत्रांस धोका असतो. कारण हवेंतील बाष्प थंड होऊन त्यापासून त्यांस इजा होण्याचा संभव असतो.

**दाभाडे घराणें**—हें ऐतिहासिक घराणें पुणें जिल्ह्यांत तळेगांव (दाभाडे) येथें होतें. संस्थापक खंडेराव हा राजारामाच्या वेळीं सेनापति होता. त्याचा मुलगा त्रिंबकराव यालाहि शाहूनें सेनापतीचीं वस्त्रें दिलीं. पेशवे आणि दाभाडे यांत वितुष्ट येऊन लढाया झाल्या. त्यांत त्रिंबकराव पडला. त्याची बायको उमाबाई व मुलगे यशवंतराव आणि बाबूराव हे सर्व शूर होते. त्यांनीं सुरत आणि गुजराथ आपल्या छापाखालीं ठेविलीं होतीं. त्यांच्यानंतर दाभाडे घराणें खालावत गेलें व नामशेष झालें. खंडेराव, त्रिंबकराव, उमाबाई यांवरचे लेख पाहा.

**दाभोळ**—मुंबई इलाखा, रत्नागिरी जिल्हा, दापोली तालुक्यांतील एक बंदर. एके काळीं दाभोळ ह्या गांवास ऐतिहासिक महत्त्व असून १४ व्या ते १६ व्या शतकांत दक्षिण कोंकणांत दाभोळ हें मुख्य बंदर होतें व तेथून तांबड्या समुद्रांतील बंदरांशीं व्यापार चालत असे. दक्षिण कोंकणांत एकच प्रसिद्ध अस-

लेली 'सारासिन' पद्धतीची येथें एक मशीद आहे. इ. स. ५५०-७८ मध्यें बांधलेलें चंडिकेचें येथें एक देवालय आहे. युसफ आदिलशहाच्या वेळीं विजापूरच्या राज्यांतील एका प्रांताचें दाभोळ हें मुख्य ठिकाण होतें व या प्रांतांत सावित्री नदीपासून तों देवगड किल्ल्यापर्यंतच्या सर्व प्रदेशाचा समावेश होत असे. शिवाजीनें १६६० त हें काबीज केलें. व तें आपल्या आरमाराचें एक ठिकाण केलें; शिवाय मुलकी खात्यांत दाभोळ हा एक सुभा केला. दाभ्य जंगल किंवा दाभिलेश्वर ह्या नांवावरून हें नांव पडलें असावें. सध्यां दाभोळ येथून आसपासच्या समुद्रकिनाऱ्याशीं व्यापार चालतो. पोलकेश्वर पॉइन्टवरील दीपगृहांतून १५ मैल लांब उजेड पडतो. स. १६८० सालीं (श्रावणांत) येथें मोत्याची वृष्टि झाल्याचा एक उल्लेख आढळतो.

**दाम**—हें एक तांब्याचें छोटेंसें नाणें होतें. त्याचें प्रमाण निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें (१/३० आणा, १/४० आणा, १/३२ आणा) आढळतें. प्राचीन द्रम्म नाणें हेंच बहुधा दाम असावें मध्ययुगांत हिंदुस्थानांत द्रम्म नाणें होतें. त्याचे दोन प्रकार होते. आदिवराह द्रम्म व विग्रहपाल द्रम्म. आदिवराह हा कनोजचा प्रतिहार भोजराज होय. सियाडोणी शिलालेखांत या द्रम्मांचा उल्लेख येतो (इ. स. ९०३). द्रम्म हा शब्द परकीय, अर्थात् तें नाणेंहि परकीय होतें असें चिंतामणराव वैद्य म्हणतात (म. भा. पु. २). वरील काळीं अर्ध द्रम्म असेंहि एक नाणें होतें. वैद्यांच्या मतें १/२० रुपया म्हणजे एक दाम.

अकबराच्या वेळीं दामाचें वजन १ तोळा, ८ मासे व ७ रती होतें; व ४० दामांचा एक रुपया मानला जाई. औरंगजेबाच्या वेळीं ४६३/४ दामांचा रुपया मानीत. त्यानंतर ८० ते ९० दाम म्हणजे रुपया असा दर पडलेला दिसतो.

**दामले, मोरो केशव** (१८६८-१९१३)—एक मराठी व्याकरणकार. हे कवि केशवसुताचे बंधु. १८९३ सालीं इतिहास व तत्त्वज्ञान हे विषय घेऊन मुंबई विद्यापीठाचे एम्. ए. झाले. पुढें १८९४ ते १९०७ पर्यंत उज्जयिनीच्या माधव कॉलेजमध्यें तत्त्वज्ञान विषयाचे हे प्राध्यापक होते; पुढें तें कॉलेज बंद पडल्यामुळें नागपूरच्या सरकारी सिटी हायस्कूलवर यांची नेमणूक झाली. परंतु स. १९१३ च्या मे महिन्यांत नागपूरहून पुण्यास येत असतां रेल्वे-अपघातानें यांचा अंत झाला.

यांनीं 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ स. १९११ त लिहिला. हा ग्रंथ ९९० पानांचा असून मराठी व्याकरणाची शास्त्रीय पद्धतीनें रचना होण्याच्या उद्देशानें लिहिला आहे. पूर्ववैयाकरणांच्या कृतींचें यांत परीक्षण केलेलें आहे. इतिहास-संशोधक वि. का. राजवाडे यांनीं या पुस्तकावर परीक्षणात्मक, सूचनात्मक व संशोधनात्मक असा एक निबंध लिहिला आहे.

'बर्कक्रुत आधुनिक असंतोष', 'विचारपरिभ्रमण', व 'शुद्धलेखन व सुधारणा' हे यांचे तीन निबंध ग्रंथमाला मासिकांतून प्रसिद्ध झाले. न्यायशास्त्रावरहि यांनीं एक पुस्तक लिहिलें असून तें गायकवाड सरकारनें दोन भागांत प्रसिद्ध केलें.

**दामाजीपंत**—एक साधु पुरुष. हा एक भगवद्भक्त असून याच्यावर संकट आल्या वेळीं विठोबानें याची सुटका केली, अशी जुनी व प्रसिद्ध कथा आहे (भक्तिविजय अ. ४०). पण इतिहासाचार्य राजवाडे यांना सातारकर महाराजांच्या दप्तरांत एक महजर सांपडला, त्यामध्यें शहरांत व खेड्यांत महारांना कोणकोणते हक्क पूर्वापार आहेत त्यांची याद दिलेली आहे. मूळ महजर बेदरची पातशाहत असतांना झाला व तो दामाजीपंत मंगळवेढेकर यांच्या हातचा होता. महजरांतील हकीकतीवरून असें दिसतें कीं, मंगळवेढ्यास दामाजीपंत कमाविसदार असतांना विठया नांवाचा एक सधन महार मंगळवेढ्यास होता. दामाजीपंतांच्या कारकीर्दींत दुर्गादेवीचा (१४६८-७५) दुष्काळ पडला त्या वेळीं, दामाजीनें सरकारी कोठारें लुटविलीं. त्या काळीं वसूल धान्याच्या रूपानें घेत असत व धान्य विकून येईल तो पैका रसद म्हणून राजधानीस पाठवीत.

कोठारें लुटविल्याचें चुगलखोरांनीं बेदरास बादशहास कळविलें. दामाजीजवळ रसद भरण्यास पैका नव्हता. रसदीकरितां बादशहाचें धरणें पंतांवर आलें. पंत विवंचनेंत पडले. त्या वेळीं गांवांतील विठू महारानें आपल्या बापजाद्यांनीं पुरून ठेवलेलें किंवा इतर कोणत्या तरी कारणांनीं जमा केलेलें द्रव्य घेऊन बेदरास जाऊन रसद भरली व पावती पंतांस आणून दिली. विठ्यानें परमेश्वरी प्रेरणेनें हें काम केलें, अशी ऐतिहासिक हकीगत प्रस्तुत महजरावरून उपलब्ध होते. भगवान् श्रीविठ्ठल यानें महाराचें रूप घेऊन दामाजीची रसद भरली व तो मग गुप्त झाला, ही हकीगत वरील ऐतिहासिक हकीगत उपलब्ध झाल्यावर काल्पनिक ठरते. दामाजींचें थोडें काव्य प्रसिद्ध आहे. (भा. इ. सं. मं. चतुर्थ संमेलन वृत्त पाहा).

**दामोदर**—एक भारतीय ज्योतिषी. याचा 'भटतुल्य' नांवाचा ग्रंथ आहे. दामोदराच्या पित्याचें नांव पद्मनाथ होतें व गुरुहि तोच होता. दामोदराचा ग्रंथ शके १३३९ मधील आहे. या ग्रंथांत दामोदरानें अयनगति वर्षास ५४ विकला घेतली आहे.

**दामोदर नदी**—बंगालयांतील एक नदी. हिचा छोटानागपूरमध्यें उगम झाला आहे. ही हुगळीस मिळते. लांबी ३६८ मैल. नदीचा पूर्वार्ध-प्रवाह अगदीं जोराचा आहे. ह्यामुळें बराच गाळ प्रवाहाबरोबर आणला जातो. हजारीबागजवळील

संगमाजवळ नदीची उंची समुद्रसपाटीपासून १३२६ फूट आहे. दक्षिण बरद्वान व हुगळी यांमध्यें नदीचा जोर इतका नाहीं. हुगळी नदीस ही नदी कलकत्त्याच्या खालीं ३५ मैलांवर फलटा येथें मिळते. दामोदर नदी हुगळी नदीस पूर्वी कलकत्त्याच्यावर ३९ मैलांवर नया सराई येथे मिळत असे. दामोदर नदीस कधीं कधीं जोराचा पूर एकदम येतो व त्यामुळें बरद्वान जिल्ह्याची फार नुकसानी होते. १८२३ व १८५५ सालीं नदीकांठचीं गांवेंच्या गांवें वाहून गेलीं आहेत. सन्ताळ लोक दामोदर नदीस पृथ्वीवरील सर्व नद्यांत फार मान देतात.

दामोदर नदीला ८ बंधारे घालून दक्षिण बिहार आणि पश्चिम बंगाल यांना पिकांसाठीं पाणी आणि धंद्यांना वीज पुरविण्याची हिंदुस्थान सरकारनें मोठी योजना आंखली आहे. अमेरिकेंतील टेनेसी खोऱ्यांतील योजनेप्रमाणें ही मोठी दामोदर खोऱ्याची योजना आहे. तिच्या कामालाहि सुरुवात झाली आहे.

**दामोदर पंडित**— हा महानुभाव पंथातील एक विद्वान् व गायनपटु गृहस्थ होता. ह्याची स्त्री हिरांबा हीहि विदुषी होती. वृद्धपणीं दोघेंहि संन्यास घेऊन नागदेवाचार्याजवळ राहिलीं. यानें 'वत्सहरण' कथेवर ग्रंथ लिहिला व त्याचप्रमाणें याचे आणखी पांचसहा मराठी, हिंदीमिश्रित, हिंदी व संस्कृत ग्रंथ आहेत.

दामोदर पंडितानें शके ११९४ मध्यें महानुभाव पंथाचा स्वीकार केला व पुरंदर मार्गानें तो वैरागराकडे जाऊन तिकडेच मृत्यूपर्यंत (सु. शके १२२६) राहिला. केशवपंडित व दामोदर पंडित यांचा इतका स्नेह कीं परस्परांनीं आपलीं काव्यें एकमेकांच्या नांवावर घातलीं आहेत.

**दाय**—ऋग्वेदांत हा शब्द पारितोषिक—आणि तेंहि श्रमाबद्दल—या अर्थानें आलेला आहे व पुढील ग्रंथांत वडिलांनीं संपादन केलेली आणि त्यांच्या हयातींत अगर पश्चात् मुलांमध्यें विभागली जाणारी दौलत अशा अर्थानें आढळतो. ही दौलत कुटुंबांतील सर्व मंडळींची आहे ही कल्पना ऋग्वेदांत कोठेंहि मान्य नाही. या दौलतीवर फक्त कुटुंबांतील कर्त्या माणसाची सत्ता असे. व तें कर्तें माणूस बहुतकरून बाप असे. इतरांचा या दौलतीवर फक्त नैतिक हक्क असे. हा नैतिक हक्क बाप एखाद्या वेळीं बाजूला ठेवूं शके; पण मुलें जर बलवान् असतील तर तीं दौलतीचा भाग देण्यास बापास भाग पाडीत. दाय ही कुटुंबांतील सर्व मुलांनीं वांटून घेण्याची दौलत असा अर्थ लवकरच रूढ झाला असेल. त्या वेळीं कदाचित् जमिनीची वांटणी होत नसावी. पण जीं गुरेंढोरें व इतर जंगम दौलत यांची वांटणी होऊं लागली तशी जमिनीची वांटणीहि होण्याचा प्रघात पडत चालला व हा प्रघात वाढण्याचें कारण लागवडीस आणतां येणाऱ्या जमिनीचें क्षेत्र आकुंचित होऊं लागलें हें होय.

आज हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें दाय हें पितृधन असून तें वारसांत वांटलें जातें. त्याचे अप्रतिबंध आणि सप्रतिबंध असे दोन प्रकार आहेत. समायिक कुटुंबाच्या मिळकतींत हिस्सा असणाऱ्यास दायाधिकारी म्हणतात.

**दारव्हा**—वऱ्हाडांतील यवतमाळ जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ १०६४ चौ. मै., खेडीं ३८५ व दारव्हा व डिग्रस हीं दोन गांवें आहेत. लो. सं. सुमारें दीड लक्ष आहे. हा तालुका बालाघाटांत म्हणजे वऱ्हाडच्या दक्षिण डोंगरसपाटींत आहे. जिल्ह्यांतील इतर तालुक्यांपेक्षां हा सुपीक आहे.

दारव्हा गांव तालुक्याचा मुख्य गांव असून पूर्वी येथें साबाजी भोंसले राहत असे. मूर्तिजापूर—यवतमाळ आगगाडीचा फांटा यावरून जातो. येथें विड्यांचीं पानें चांगलीं होतात.

**दारा शुकोह** (१६१५–१६५९)—शहाजहान बादशहाचा थोरला व आवडता पुत्र. मुमताजमहाल ही दाराची आई. हा देखणा व उमद्या स्वभावाचा होता. हा सर्व धर्म सारखे लेखी. यानें औरंगजेबावर प्रथम लढाईत विजय मिळविला. पण पुढें रजपुतांनीं याला सोडलें व याचें सैन्य फितूर झाल्यामुळें यास पळून जावें लागलें. आणि शेवटीं देशद्रोही व धर्मद्रोही म्हणून यास औरंगजेबानें क्रूरपणें ठार मारलें.

हा विद्वान् होता. यानें महंमद पैगंबराचें 'सफीनत–उल्–औलिया' नांवाचें चरित्र लिहिलें आहे. हा कविहि होता. हा मोठा विद्याप्रेमी असून यानें मुसलमानी धर्माचें शिक्षण [illegible] नांवाच्या मुसलमान फकिरापासून मिळविलें होतें. तसेंच

हिंदूंच्या वेदान्ताचा अभ्यास लालदास नांवाच्या एका हिंदु योग्यापाशीं केला होता. बायबलच्या नव्या व जुन्या करारांचेंहि यानें अध्ययन केलें होतें. याला मुसलमान व हिंदु अशा दोन्ही धर्मांत सत्यांश दिसत असे. हें त्याच्या 'मजमूअह-इ-बाह-रियान' (समुद्रसंगम) या नांवाच्या ग्रंथावरून दिसून येतें. यानें पंडितांच्या साहाय्यानें अनेक उपनिषदांचें फार्सीत भाषांतर केलें होतें. यानें केलेल्या पंचवीस उपनिषदांच्या भाषांतरांचें नांव 'सिर्र-उल्-असरा' असें होतें. बाबा लालदासाशीं याच्या ज्ञानविषयक गोष्टी होत. त्या 'बाबा लालसे बातचीत' या नांवानें प्रकाशित झाल्या आहेत. मुसलमान संतांच्या चरित्र-संग्रहाला 'सफीनत-उल्-औलिया' असें नांव असून दाराचा धर्मगुरु मियामीर याचें जीवनचरित्र 'सफीनत-उल्-औलिया' याच नांवानें प्रसिद्ध आहे.

**दारिलीन**—(असेटिलीन). कर्ब आणि उज्ज यांच्या मिश्रणानें तयार झालेला वायु. हा अनेक उज्जकर्बें आणि कोळशाचा वायु यांच्या अपूर्ण ज्वलनानें तयार होत असतो. तसाच हा आज बहुतेक खटकार्बिदा(कॅल्शिअम कार्बाइड)पासून तयार करतात. प्रकाशासाठीं या वायूचा उपयोग करतात. याचा प्रकाश पांढरा असून साध्या वायूपेक्षां पंधरा पट जास्त असतो. प्राणवायूशीं संयोग करून प्राण-दारिलीन ज्योत तयार करतात. ही अत्यंत उष्ण असते. उष्णमान ३५०० शतांशांपर्यंतहि असून लोखंड आणि पोलाद कापण्यास व धातु झाळण्याचें काम करण्यास ही ज्योत वापरतात.

**दारू**—हें मादक पेय फार प्राचीन आहे. सुरा हें याचें नांव आहे. हा शब्द ऋग्वेद व तदुत्तर वैदिक वाङ्मयांत नेहमीं येतो. कांहीं ठिकाणीं या पेयाचा निषेध केलेला आहे. अथर्ववेदामध्यें मांसभक्षण, द्यूत या महापातकांबरोबर याची गणना केलेली आहे. व द्यूताबरोबर याचा उल्लेख आलेला आहे. सोम याच्या उलट सुरा ही नित्य पिण्यापैकीं एक पेय गणली गेली होती. सभेंतल्या लोकांचें हें एक पेय होतें व त्यामुळें नेहमीं भांडणें होत. ही सुरा कशा प्रकारची होती हें सांगणें कठिण आहे. ह्या सुरेचा उल्लेख मधूबरोबर कधीं कधीं येतो. ही चामड्यांत ठेवींत असत व ही निरनिराळे लोक पीत. प्राचीन मिसरी, ज्यू, असुर (असीरियन), ग्रीक व रोमन वाङ्मयांत दारूचा उल्लेख अनेक ठिकाणीं सांपडतो.

दारू ही मुख्यतः द्राक्षादि रस आंबवून तयार होते. पाश्चात्य देशांत उत्कृष्ट दारू तयार होण्यासाठीं द्राक्षांच्या हंगामाच्या वेळीं व पुढें तीं आंबवतांना हवा गरम व कोरडी लागते. द्राक्षें हीं चांगलीं टपोरीं पाहिजेत व त्यांवर विपाकक्रिया (फर्मेंटेशन) घडवून आणतांना उष्णतामान समशीतोष्ण पाहिजेच पाहिजे. दारूच्या कित्येक प्रकारांत द्राक्षांच्या साली, देंठ व बिया यांचा रस व तीं स्वतः समाविष्ट असतात. तांबड्या दारूंत द्राक्षाची साल प्रामुख्यानें असते; पण उत्कृष्ट प्रकारच्या दारूंत फक्त द्राक्षांचा रस असतो. साली, बिया, देंठ, वगैरे जिन्नस समाविष्ट केल्यानें त्या प्रकारच्या दारूंत टॅनिन वगैरे अम्लें तयार होतात.

विपाकक्रिया दोन प्रकारांनीं होऊं शकते. निसर्गतः व कृत्रिम उपायांनीं. कृत्रिम उपायांनीं तयार केलेल्या विपाकक्रियानुसार बनलेल्या दारूंत विशेष गुणधर्म येतात.

'गंधकीकरण' हा एक दारू तयार करण्याचा दुसरा प्रकार आहे. यांत ज्या भांड्यांत (पिपांत) दारू शेवटीं ठेवावयाची असते त्या भांड्यांत गंधक घालून तो जाळतात. अशा तऱ्हेनें तें भांडें निर्जंतुक करण्यांत येतें. दारू ही प्रथम चार वर्षेंपर्यंत भांड्यांत बरीचशी पक्व होण्यासाठीं तशीच ठेवण्यांत येते. यानंतर भांड्याचें तोंड बंद करून ती ठेवतात. अशा तऱ्हेनें तोंड बंद करून ठेवलेल्या दारूंतील अल्कोहोल, ॲसेटिक, ब्यूटिरिक, इत्यादि अम्लें निर्माण करून दारूची पक्वता वृद्धिंगत करीत असतो. या अम्लामुळें एस्टर नांवाचीं कांहीं द्रव्यें दारूमध्यें निर्माण होतात व त्यामुळेंच दारूस उग्र पण मधुर वास व रुचकर चव हीं येतात. एस्टरमुळेंच दारूस चोके म्हणजे सुवासिक पुष्पगुच्छ यांतील विशिष्ट गुणधर्म प्राप्त होतात. चोके हा दारूंतील एक महत्त्वाचा भाग आहे. द्राक्षांतील अंगभूत गुण व बंद स्थितींत ठेवलेल्या दारूचें आयुर्मान यांवर हा सुवास अवलंबून असतो.

ठराविक अवधीनंतर बंद दारू मोकळी करून ती संपवून टाकलीच पाहिजे. त्यानंतर ती तशीच बंद स्थितींत राहूं दिली असतां ती बिघडूं लागून तिच्यांतील गुणधर्म नष्ट होऊं लागतात. शेरी व पोर्ट ४० ते ५० वर्षांपर्यंत टिकते; शॅंपेनचें आयुर्मान १० ते १३ वर्षें आहे व क्लॅरेटचें २५ ते ३० वर्षें आहे.

द्राक्षांशिवाय इतर कांहीं फळांचाहि दारू काढण्याकडे उपयोग होतो.

आपणांकडे तांदूळ, उंसाचा रस, मोहाचीं फुलें, वगैरेसारख्या पदार्थांपासून दारू काढतात. हे पदार्थ आंबवून दारू काढण्यांत येते. ताडीसारखी दारू झाडाचा चीक अथवा रस धरूनच मिळते.

दारू पिण्यामुळें गुंगीपासून बेहोष स्थिति येण्यापर्यंतचे सर्व परिणाम होतात. एकदां दारू पिण्यास सुरवात केली कीं तिची संवय जडते व मग ती संवय सुटणें अशक्यप्राय होतें. शारीरिक व मानसिक शक्ति कमी होत जाते. दारूमुळें तात्पुरतें उत्तेजन मिळतें खरें, पण त्यामुळेंच तिची संवय जडते. दारू चढली म्हणजे मनुष्याचा आपल्या शरीरावर व मनावर ताबा

संगमाजवळ नदीची उंची समुद्रसपाटीपासून १३२६ फूट आहे. दक्षिण बरद्वान व हुगळी यांमध्यें नदीचा जोर इतका नाहीं. हुगळी नदीस ही नदी कलकत्त्याच्या खालीं ३५ मैलांवर फलटा येथें मिळते. दामोदर नदी हुगळी नदीस पूर्वी कलत्त्याच्यावर ३९ मैलांवर नया सराई येथे मिळत असे. दामोदर नदीस कधीं कधीं जोराचा पूर एकदम येतो व त्यामुळें बरद्वान जिल्ह्याची फार नुकसानी होते. १८२३ व १८५५ सालीं नदीकांठचीं गांवेंच्या गांवें वाहून गेलीं आहेत. सन्ताळ लोक दामोदर नदीस पृथ्वीवरील सर्व नद्यांत फार मान देतात.

दामोदर नदीला ८ बंधारे घालून दक्षिण विहार आणि पश्चिम बंगाल यांना पिकांसाठीं पाणी आणि धंद्यांना वीज पुरविण्याची हिंदुस्थान सरकारनें मोठी योजना आंखली आहे. अमेरिकेंतील टेनेसी खोऱ्यांतील योजनेप्रमाणें ही मोठी दामोदर खोऱ्याची योजना आहे. तिच्या कामालाहि सुरुवात झाली आहे.

**दामोदर पंडित**— हा महानुभाव पंथातील एक विद्वान् व गायनपटु गृहस्थ होता. ह्याची स्त्री हिरांबा हीहि विदुषी होती. वृद्धपणीं दोघेंहि संन्यास घेऊन नागदेवाचार्याजवळ राहिलीं. यानें 'वत्सहरण' कथेवर ग्रंथ लिहिला व त्याचप्रमाणें याचे आणखी पांचसहा मराठी, हिंदीमिश्रित, हिंदी व संस्कृत ग्रंथ आहेत.

दामोदर पंडितानें शके ११९४ मध्यें महानुभाव पंथाचा स्वीकार केला व पुरंदर मार्गानें तो वैरागराकडे जाऊन तिकडेच मृत्यूपर्यंत (सु. शके १२२६) राहिला. केशवपंडित व दामोदर पंडित यांचा इतका स्नेह कीं परस्परांनीं आपलीं काव्यें एकमेकांच्या नांवावर घातलीं आहेत.

**दामोदर महादेव हिंगणे** (मृ. १७५७)— एक ब्राह्मण मुत्सद्दी व सरदार. हा नाशिकच्या क्षेत्रोपाध्याय घराण्यांतील असून रजपूत राजांचें नाशिकचें उपाध्येपण या घराण्याकडे असे. हा व याचे बंधू मोठे मुत्सद्दी व पराक्रमी निघाले. यांनीं सन १७५० ते १७६० या मुदतींत दिल्लीकडील झालेल्या उलाढालींत आपल्या कर्तृत्वानें नांव मिळवलें. दिल्लीची वकिलात भरभराटीस आणण्याचें श्रेय यांनाच आहे. यांचें रोहिले, रजपूत, जाट, नबाब व वजीर यांच्यावर चांगलेंच वजन असे. पेशव्यांच्या पदरीं असलेला अंताजी माणकेश्वर याच्याशीं यांचें सख्य न जमल्यानें रघुनाथरावाच्या मनांत यांच्याबद्दल अढी राहिली. दामोदर महादेव यांस दादासाहेब या नांवानेंहि संबोधीत. रामराजाच्या राज्यारोहण-प्रसंगीं साताऱ्यास हा हजर होता.

या हिंगण्यांचे वंशज हिंगणीस अद्यापि असून त्यांच्या संग्रहांतील ऐतिहासिक कागदपत्र 'हिंगणे दप्तर' या नांवानें भारत इतिहास संशोधक मंडळानें प्रसिद्ध केले आहेत.

**दाय**—ऋग्वेदांत हा शब्द पारितोषिक—आणि तेंहि श्रमाबद्दल—या अर्थानें आलेला आहे व पुढील ग्रंथांत वडिलांनीं संपादन केलेली आणि त्यांच्या हयातींत अगर पश्चात् मुलांमध्यें विभागली जाणारी दौलत अशा अर्थानें आढळतो. ही दौलत कुटुंबांतील सर्व मंडळींची आहे ही कल्पना ऋग्वेदांत कोठेंहि मान्य नाहीं. या दौलतीवर फक्त कुटुंबांतील कर्त्या माणसाची सत्ता असे. व तें कर्तें माणूस बहुतकरून बाप असे. इतरांचा या दौलतीवर फक्त नैतिक हक्क असे. हा नैतिक हक्क बाप एखाद्या वेळीं बाजूला ठेवूं शके; पण मुलें जर बलवान् असतील तर तीं दौलतीचा भाग देण्यास बापास भाग पाडीत. दाय ही कुटुंबांतील सर्व मुलांनीं वांटून घेण्याची दौलत असा अर्थ लवकरच रूढ झाला असेल. त्या वेळीं कदाचित् जमिनीची वांटणी होत नसावी. पण जीं गुरेंढोरें व इतर जंगम दौलत यांची वांटणी होऊं लागली तशी जमिनीची वांटणीहि होण्याचा प्रघात पडत चालला व हा प्रघात वाढण्याचें कारण लागवडीस आणतां येणाऱ्या जमिनीचें क्षेत्र आकुंचित होऊं लागलें हें होय.

आज हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें दाय हें पितृधन असून तें वारसांत वांटलें जातें. त्याचे अप्रतिबंध आणि सप्रतिबंध असे दोन प्रकार आहेत. समायिक कुटुंबाच्या मिळकतींत हिस्सा असणाऱ्यास दायाधिकारी म्हणतात.

**दारव्हा**—वऱ्हाडांतील यवतमाळ जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ १०६४ चौ. मै., खेडीं ३८५ व दारव्हा व डिग्रस हीं दोन गांवें आहेत. लो. सं. सुमारें दीड लक्ष आहे. हा तालुका बालाघाटांत म्हणजे वऱ्हाडच्या दक्षिण डोंगरसपाटींत आहे. जिल्ह्यांतील इतर तालुक्यांपेक्षां हा सुपीक आहे.

दारव्हा गांव तालुक्याचा मुख्य गांव असून पूर्वी येथें साबाजी भोंसले राहत असे. मूर्तिजापूर—यवतमाळ आगगाडीचा फांटा यावरून जातो. येथें विड्यांचीं पानें चांगलीं होतात.

**दारा शुकोह** (१६१५-१६५९)—शहाजहान बादशहाचा थोरला व आवडता पुत्र. मुमताजमहाल ही दाराची आई. हा देखणा व उमद्या स्वभावाचा होता. हा सर्व धर्म सारखे लेखी. यानें औरंगजेबावर प्रथम लढाईंत विजय मिळविला. पण पुढें रजपुतांनीं याला सोडलें व याचें सैन्य फितूर झाल्यामुळें यास पळून जावें लागलें. आणि शेवटीं देशद्रोही व धर्मद्रोही म्हणून यास औरंगजेबानें क्रूरपणें ठार मारलें.

हा विद्वान् होता. यानें महंमद पैगंबराचें 'सफीनत-उल्-औलिया' नांवाचें चरित्र लिहिलें आहे. हा कविहि होता. हा मोठा विद्याप्रेमी असून यानें मुसलमानी धर्माचें शिक्षण सरमद नांवाच्या मुसलमान फकिरापासून मिळविलें होतें. तसेंच

हिंदूंच्या वेदान्ताचा अभ्यास लालदास नांवाच्या एका हिंदु योग्यापाशीं केला होता. बायबलच्या नव्या व जुन्या करारांचेंहि यानें अध्ययन केलें होतें. याला मुसलमान व हिंदु अशा दोन्ही धर्मांत सत्यांश दिसत असे. हें त्याच्या 'मजमूअह–इ–बाह-रियान' (समुद्रसंगम) या नांवाच्या ग्रंथावरून दिसून येतें. यानें पंडितांच्या साहाय्यानें अनेक उपनिषदांचें फार्सीत भाषांतर केलें होतें. यानें केलेल्या पंचवीस उपनिषदांच्या भाषांतरांचें नांव 'सिर्रे–उल्–असरा' असें होतें. बाबा लालदासाशीं याच्या ज्ञानविषयक गोष्टी होत. त्या 'बाबा लालसे बातचीत' या नांवानें प्रकाशित झाल्या आहेत. मुसलमान संतांच्या चरित्र-संग्रहाला 'सफीनत–उल्–औलिया' असें नांव असून दाराचा धर्मगुरु मियामीर याचें जीवनचरित्र 'सफीनत–उल्–औलिया' याच नांवानें प्रसिद्ध आहे.

**दारिलीन**—(असेटिलीन). कर्ब आणि उज्ज यांच्या मिश्रणानें तयार झालेला वायु. हा अनेक उज्जकर्बें आणि कोळशाचा वायु यांच्या अपूर्ण ज्वलनानें तयार होत असतो. तसाच हा आज बहुतेक खटकार्बिदा (कॅल्शिअम कार्बाइड) पासून तयार करतात. प्रकाशासाठीं या वायूचा उपयोग करतात. याचा प्रकाश पांढरा असून साध्या वायूपेक्षां पंधरा पट जास्त असतो. प्राणवायूशीं संयोग करून प्राण–दारिलीन ज्योत तयार करतात. ही अत्यंत उष्ण असते. उष्णमान ३५०० शतांशांपर्यंतहि असून लोखंड आणि पोलाद कापण्यास व धातु झाळण्याचें काम करण्यास ही ज्योत वापरतात.

**दारू**—हें मादक पेय फार प्राचीन आहे. सुरा हें याचें नांव आहे. हा शब्द ऋग्वेद व तदुत्तर वैदिक वाङ्मयांत नेहमीं येतो. कांहीं ठिकाणीं या पेयाचा निषेध केलेला आहे. अथर्ववेदामध्यें मांसभक्षण, द्यूत या महापातकांबरोबर याची गणना केलेली आहे. व द्यूताबरोबर याचा उल्लेख आलेला आहे. सोम याच्या उलट सुरा ही नित्य पिण्यापैकीं एक पेय गणली गेली होती. सभेंतल्या लोकांचें हें एक पेय होतें व त्यामुळें नेहमीं भांडणें होत. ही सुरा कशा प्रकारची होती हें सांगणें कठिण आहे. ह्या सुरेचा उल्लेख मधूबरोबर कधीं कधीं येतो. ही चामड्यांत ठेवीत असत व ही निरनिराळे लोक पीत. प्राचीन मिसरी, ज्यू, असुर (असीरियन), ग्रीक व रोमन वाङ्मयांत दारूचा उल्लेख अनेक ठिकाणीं सांपडतो.

दारू ही मुख्यतः द्राक्षादि रस आंबवून तयार होते. पाश्चात्य देशांत उत्कृष्ट दारू तयार होण्यासाठीं द्राक्षांच्या हंगामाच्या वेळीं व पुढें तीं आंबवतांना हवा गरम व कोरडी लागते. द्राक्षें हीं चांगलीं टपोरीं पाहिजेत व त्यांवर विपाकक्रिया (फर्मेंटेशन) घडवून आणतांना उष्णतामान समशीतोष्ण पाहिजेच पाहिजे. दारूंच्या कित्येक प्रकारांत द्राक्षांच्या साली, देंठ व बिया यांचा रस व तीं स्वतः समाविष्ट असतात. तांबड्या दारूंत द्राक्षाची साल प्रामुख्यानें असते; पण उत्कृष्ट प्रकारच्या दारूंत फक्त द्राक्षांचा रस असतो. साली, बिया, देंठ, वगैरे जिन्नस समाविष्ट केल्यानें त्या प्रकारच्या दारूंत टॅनिन वगैरे अम्लें तयार होतात.

विपाकक्रिया दोन प्रकारांनीं होऊं शकते. निसर्गतः व कृत्रिम उपायांनीं. कृत्रिम उपायांनीं तयार केलेल्या विपाकक्रियानुसार बनलेल्या दारूंत विशेष गुणधर्म येतात.

'गंधकीकरण' हा एक दारू तयार करण्याचा दुसरा प्रकार आहे. यांत ज्या भांड्यांत (पिपांत) दारू शेवटीं ठेवावयाची असते त्या भांड्यांत गंधक घालून तो जाळतात. अशा तऱ्हेनें तें भांडें निर्जंतुक करण्यांत येतें. दारू ही प्रथम चार वर्षेंपर्यंत भांड्यांत चरीचशी पक्क होण्यासाठीं तशीच ठेवण्यांत येते. यानंतर भांड्याचें तोंड बंद करून ती ठेवतात. अशा तऱ्हेनें तोंड बंद करून ठेवलेल्या दारूंतील अल्कोहोल, ॲसेटिक, ब्यूटिरिक्, इत्यादि अम्लें निर्माण करून दारूची पक्वता वृद्धिंगत करीत असतो. या अम्लामुळें एस्टर नांवाचीं कांहीं द्रव्यें दारूमध्यें निर्माण होतात व त्यामुळेंच दारूस उग्र पण मधुर वास व रुचकर चव हीं येतात. एस्टरमुळेंच दारूस बोके म्हणजे सुवासिक पुष्पगुच्छ यांतील विशिष्ट गुणधर्म प्राप्त होतात. बोके हा दारूंतील एक महत्त्वाचा भाग आहे. द्राक्षांतील अंगभूत गुण व बंद स्थितींत ठेवलेल्या दारूचें आयुर्मान यांवर हा सुवास अवलंबून असतो.

ठराविक अवधीनंतर बंद दारू मोकळी करून ती संपवून टाकलीच पाहिजे. त्यानंतर ती तशीच बंद स्थितींत राहूं दिली असतां ती बिघडूं लागून तिच्यांतील गुणधर्म नष्ट होऊं लागतात. शेरी व पोर्ट ४० ते ५० वर्षांपर्यंत टिकते; शँपेनचें आयुर्मान १० ते १३ वर्षें आहे व क्लॅरेटचें २५ ते ३० वर्षें आहे.

द्राक्षांशिवाय इतर कांहीं फळांचाहि दारू काढण्याकडे उपयोग होतो.

आपणांकडे तांदूळ, उंसाचा रस, मोहाचीं फुलें, वगैरेसारख्या पदार्थांपासून दारू काढतात. हे पदार्थ आंबवून दारू काढण्यांत येते. ताडीसारखी दारू झाडाचा चीक अथवा रस धरूनच मिळते.

दारू पिण्यामुळें गुंगीपासून बेहोष स्थिति येण्यापर्यंतचे सर्व परिणाम होतात. एकदां दारू पिण्यास सुरुवात केली कीं तिची संवय जडते व मग ती संवय सुटणें अशक्यप्राय होतें. शारीरिक व मानसिक शक्ति कमी होत जाते. दारूमुळें तात्पुरतें उत्तेजन मिळतें खरें, पण त्यामुळेंच तिची संवय जडते. दारू चढली म्हणजे मनुष्याचा आपल्या शरीरावर व मनावर ताबा

राहत नाहीं. वाटेल ते वेडेचार सुरू होतात. दारू फार प्यालेला मनुष्य सुंद होतो व पडून राहतो. त्याचें तारतम्य ज्ञान नाहींसें होतें व शरीरांतील उष्णता वाढते. हिंदुधर्मशास्त्रांत दारू पिणें अगदीं गर्हणीय मानलें आहे. हिंदुसमाजांतहि दारू घेण्याचा युरोपियन समाजांतल्याप्रमाणें शिष्टाचार नाहीं. दारूचे दुष्परिणाम अगदीं उघड आहेत. तेव्हां काँग्रेस सरकारचें दारूबंदीचें धोरण योग्य आहे. दारूबंदी, मद्यें, मद्यार्क पाहा.

दारूसारख्या मादक पदार्थांपासून मिळणारें उत्पन्न सरकार घेतें. अबकारी खातें पाहा.

**दारू (बंदुकीची)**—बंदुकीची दारू प्रथम चीन देशांतील लोकांनीं तयार केली, पण तिचा त्यांनीं फटाक्यांपलीकडे उपयोग केला नाहीं. रॉजर बेकननें बंदुकीची दारू शोधून काढली असें कांहींचें म्हणणें आहे. कांहीं बर्थोल्ड श्वार्ट्झ नांवाच्या एका जर्मन भिक्षूनें दारूचा शोध लावला असें म्हणतात. रॉजर बेकनच्या लिखाणांतून दारूचा उल्लेख आढळतो. इलिझाबेथ राणीच्या काळांत हिचा मोठ्या प्रमाणावर उपयोग होऊं लागला.

या दारूमध्यें सूर्यक्षार (सॉल्टपीटर), कोळसा व गंधक यांचें मिश्रण निरनिराळ्या प्रमाणांत असतें. अग्निशस्त्रांसाठीं विशिष्ट प्रकारची विनधुराची दारू तयार करतात. सुरुंगाच्या दारूंत वरील मिश्रणच असतें.

**दारूकाम**—(अग्निक्रीडा पाहा). निरनिराळ्या प्रकारची शोभा म्हणून आनंदाच्या प्रसंगीं दारूकाम किंवा आतषबाजी करण्यांत येते. फार पूर्वीपासून प्राच्य देश असल्या कामाविषयीं प्रसिद्ध असून युरोपमध्यें १२ व्या शतकांत ही कला माहीत झाली. १७ व्या शतकांत ती चांगली वाढली; पण १९ व्या शतकात पालाशहरित (क्लोरेट ऑफ पोटॅश), मग्न (मॅग्नेशियम) आणि ॲल्युमिनियम या रासायनिक द्रव्यांनीं जेव्हां रंगांचा प्रभाव आणि चकचकाट निर्माण केला तेव्हांच दारूकामाची मोठी प्रगति झाली असें म्हणतां येईल.

शोभेच्या दारूंत कोळसा आणि गंधक यांचा प्राणवायूशीं संयोग होऊन जाळ आणि आवाज निघतो. सोरा, गंधक, कोळसा व धातूंचें चूर्ण यांच्या मिश्रणानें दारूंत जोरदारपणा येतो व ठिणग्याहि उडतात. हरिताशीं इतर कांहीं द्रव्यांचा संयोग करून जाळ निवण्याची तरतूद होते. धातूंच्या क्षारांमुळें रंग निघतात.

**दारूचा बाण**—(रॉकेट). एका लोखंडाच्या नळकांड्यामध्यें दारू भरण्यांत येते, व ती पेटविली असतां तें नळकांडें हवेंत वर उंच उडविलें जातें. यास बाण म्हणतात. दारूच्या बाणाचा पूर्वीं युद्धामध्येंहि उपयोग करीत. त्यास तरवारीसारखीं पातींहि जोडण्यांत येत असत. अद्यापि कांहीं खुणा करून संदेश पाठविण्याकरितां दारूचे बाण उडविण्यांत येतात. शोभेच्या दारूकामांतहि बाणांचा उपयोग करण्यांत येतो. परंतु या बाणांचा विशेष उपयोग समुद्रकिनाऱ्यावर समुद्रांत बुडणाऱ्या लोकांचे जीव वांचविण्याच्या कामीं फार होतो. या बाणांत एक दोरी घालून ती खवळलेल्या समुद्रांतील गलबतावरून किनाऱ्यावर किंवा किनाऱ्यावरून गलबतावर फेंकण्यांत येते आणि अशा रीतीनें गलबताचा बचाव करण्यांत येतो. कॅप्टन मॅबी यानें १८०७ सालीं शोधून काढलेल्या बाणांचा अद्यापहि या कामीं उपयोग करण्यांत येतो.

युद्धोपयोगी दारूचे बाण १९ व्या शतकाच्या आरंभीं सर विल्यम कॉन्ग्रीव्ह यानें शोधून काढले. वेढ्यामध्यें यांचा चांगला उपयोग होई. दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीनें इंग्लंडवर एका विशिष्ट तऱ्हेचे वैमानिक बाण सोडले होते व युद्धास्त्र म्हणून त्यांचा विनाशक गुण सिद्ध झाला होता.

**दारूबंदी**—मादक पेय म्हणून पिण्याच्या दारूच्या उत्पादनाला व विक्रीला सरकारी कायद्यानें मनाई करणें याला दारूबंदी म्हणतात. दारूबंदीची कल्पना जुनी म्हणजे दारूच्या मूळ निर्मितीच्या काळापासूनची असून इंग्लंडच्या पार्लमेंटनें आतांपर्यंत दारूसंबंधीं सुमारें ४०० कायदे केले आहेत. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचे कायदे पुढील होत—मेट्रोपोलिटन पोलिस ॲक्ट (१८३९), वेल्श सन्डे क्लोझिंग ॲक्ट (१८८१), प्रोटेक्शन ऑफ चिल्ड्रेन ॲक्ट (१८८९), इंटॉक्सिकेटिंग लिकर्स ॲक्ट (१९०१), टेंपरन्स (स्कॉटलंड) ॲक्ट (१९१९), इत्यादि.

अमेरिकेंतील सं. संस्थानांत संपूर्ण दारूबंदीची चळवळ १९ व्या शतकाच्या आरंभीं सुरू झाली आणि पुष्कळ संस्थानांनीं दारूबंदीचा कायदा केला. मेन संस्थानांत प्रथम १८५१ सालीं दारूबंदीचा कायदा झाला; आणि संयुक्त संस्थान सरकारच्या काँग्रेस या कायदेमंडळानें १९२० सालीं संपूर्ण दारूबंदीचा कायदा (प्रोहिबिशन एन्फोर्समेंट ॲक्ट) जारी केला. पण अव्यवहार्य म्हणून १९३३ सालीं तो रद्द करावा लागला. १९१९ सालीं नॉर्वे देशांत दारूबंदी आली, पण १९२६ सालीं प्रजाजनांच्या बहुमतानें हा दारूबंदीचा कायदा रद्द झाला.

हिंदुस्थान—दारूबंदीचा उल्लेख भारतीय वाङ्मयांत अगदीं आरंभापासून आढळतो. समुद्रमंथनांतून चौदा रत्नांपैकीं एक सुरा निघाली व ती देवांनीं घेतली नाहीं, दानवांनीं घेतली; म्हणजे देव सुरापान करीत नसत. वेदवाङ्मयांत समाजाचे ब्राह्मणादि चारहि वर्ण मद्यपान करीत असत, असा उल्लेख आहे; पण शुक्राचार्यांपासून ब्राह्मणवर्गानें पूर्ण सुरापानबंदी स्वीकारली, व ती बंदी परंपरागत धर्मशास्त्रानुसार अद्यापहि चालू आहे. तथापि

ब्राह्मणेतर हिंदु समाजांत विशेषतः राज्यकर्त्या क्षत्रिय वर्गांत मद्यपान रामायण-महाभारत काळापासून ब्रिटिश अमदानीपर्यंत चालू असल्यामुळें संपूर्ण दारूबंदीचा पुरस्कार पूर्वी कोणीं केलेला आढळत नाहीं. ब्रिटिश अमदानींत हें व्यसन फारच वाढलें; कारण राज्यकर्ते इंग्रज हे स्वतः दारूबाज असून अबकारी खात्याचें उत्पन्न ही सरकारची एक महत्त्वाची उत्पन्नाची बाब होऊन बसली व त्याकरितां सरकारी अबकारी खातें निर्माण झालें; व या खात्याकडून सरकारी उत्पन्नांत वाढत्या प्रमाणांत भर पडत गेली. याप्रमाणें इंग्रज अमदानींत दारूचें व्यसन शहरांत व अगदीं खेड्यापाड्यांतहि फार पसरलें. त्यामुळें 'अँग्लो-इंडियन टेंपरन्स असोसिएशन' या संस्थेनें १८८८ पासून सार्वत्रिक मितपानाच्या चळवळीला सुरुवात केली व त्या संस्थेच्या २५० शाखा १९२१ सालीं हिंदुस्थानांत होत्या. १९१९ च्या 'इंडियन रिफॉर्म्स ॲक्टा' प्रमाणें सरकारचें अबकारी खातें प्रांतिक दिवाणांच्या ताब्यांत देण्यांत आलें. १९२१ सालापासून महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रीय सभेनें संपूर्ण दारूबंदीचा पुरस्कार सुरू केला, आणि प्रांतिक राज्यकारभार कांग्रेसपक्षीय मंत्रिमंडळानें हातीं घेतल्यावर साहाजिकच संपूर्ण दारूबंदीचा कायदा करण्याचें धोरण कॉंग्रेस सरकारनें प्रांतोप्रांतीं स्वीकारलें. मुंबई सरकारनें मुंबई प्रांतांत संपूर्ण दारूबंदीचें धोरण स्वीकारलें असून ही बंदी ४ वर्षांच्या आंत घडवून आणण्याचा आपला निर्णय ह्या सरकारनें १ एप्रिल १९४६ रोजीं प्रथम अधिकार-स्वीकार केल्यानंतर थोड्याच काळांत जाहीर केला. १९४९ सालीं ७५ टक्के दुकानें बंद होतील व आणखी एक वर्षानें प्रांतांतील सगळींच दुकानें बंद होऊन संपूर्ण दारूबंदी अमलांत येईल. मुंबई प्रांताचें दारूचें उत्पन्न सातआठ कोटी रुपयांचें आहे. 'अबकारी खातें' पाहा.

दारूबंदीचा इतिहास—महात्मा गांधींनीं देशापुढें संपूर्ण दारूबंदीचा कार्यक्रम सुमारें ३० वर्षांपूर्वी ठेविला. कॉंग्रेसच्या विधायक कार्यक्रमाचें दारूबंदी हें एक मुख्य अंग होतें. या ३० वर्षांत हा कार्यक्रम पार पाडण्याबाबत कॉंग्रेस कार्यकर्त्यांकडून व जनतेकडूनहि बरेच प्रयत्न झाले. परंतु त्या वेळचें ब्रिटिश सरकारचें धोरण दारूबंदीस फारसें अनुकूल नव्हतें. त्या सरकारला त्या वेळीं मुंबई प्रांतांत सुमारें ४ कोट रुपये अबकारी उत्पन्न असे. हें उत्पन्न हातचें घालविण्यास तें सरकार तयार नव्हतें. १९३६ सालीं ज्या वेळीं प्रथम कॉंग्रेसचें म्हणजे जनतेचें सरकार ह्या प्रांतांत प्रस्थापित झालें त्या वेळीं कॉंग्रेसचा दारूबंदीचा कार्यक्रम अमलांत आणण्यास सुरुवात झाली. १९३८ सालीं मुंबई, अहमदाबाद यांसारख्या मोठ्या शहरांत संपूर्ण दारूबंदी सुरू झाली व पुढील सालीं २-३ जिल्ह्यांतहि ती लागू करण्यांत



आली. इतक्यांत दुसरें जागतिक युद्ध सुरू झालें व कॉंग्रेस सरकारनें आपलीं अधिकारसूत्रें खालीं ठेविलीं. त्यामुळें हा कार्यक्रम तसाच पडून राहिला.

युद्धोत्तरकाळ—१९४६ सालीं ज्या वेळीं कॉंग्रेसनें प्रांतिक सरकारचा कारभार आपल्या हातीं घेतला, त्या वेळीं त्यानें संपूर्ण दारूबंदीबाबतचें आपलें धोरण पुन्हां जाहीर केलें व युद्धापूर्वीचे कार्यक्रमाचे धागेदोरे सांधण्यास पुन्हां सुरुवात केली. युद्धोत्तर काळांत आपल्या देशांतच नव्हे तर जगांत सर्वत्र अत्यंत अडचणीची परिस्थिति उत्पन्न झाली आहे. त्यामुळें बाहेरील देशांतून १५-१६ कोटी रुपयांचें धान्य आपल्या प्रांतांत आणावें लागतें. प्रथम हा सर्व खर्च मध्यवर्ती सरकार सोसत असे. परंतु ह्या वर्षापासून धान्याबाबतच्या खर्चाचा चौथा हिस्सा म्हणजे ४ कोटी रुपये मुंबई सरकारनें सोसावयाचे आहेत. एका बाजूस दारूबंदीचा कार्यक्रम अमलांत आणणें व दुसऱ्या बाजूस धान्यखरेदी, धान्यपैदास, सार्वत्रिक शिक्षण, कालवे, विजेचें उत्पादन, वगैरेसारख्या मोठमोठ्या योजनांकरितां कोट्यवधि रुपयांचा वाढता खर्च करणें, असा सरकारपुढें प्रश्न होता व आहे. या बाबतींत पूर्ण विचार करून उत्पन्नाकडे लक्ष न देतां लोकहिताच्या दृष्टीनेंच सरकारनें निर्णय घेतला.

दारूबंदीचा नवा कायदा—मागच्या अबकारी कायद्याखालीं संपूर्ण दारूबंदीचा कार्यक्रम अमलांत आणणें फारसें शक्य नव्हतें म्हणून सरकारनें नुकतेंच कायदेमंडळापुढें एक दारूबंदीचें बिल आणून तें पसार करून घेतलें. या प्रकारचा सर्वसंग्राही कायदा अखिल हिंदुस्थान देशांत मुंबई प्रांतानेंच प्रथम पसार केला. ह्या कायद्याखालीं दारू व इतर मादक द्रव्यें तयार करणें किंवा त्यांची विक्री करणें, किंवा असले पदार्थ इकडून तिकडे नेणें किंवा वापरणें या सर्व बाबी गुन्हे ठरविण्यांत आल्या आहेत. व त्या गुन्ह्यांकरितां सक्त शिक्षाहि ठेवण्यांत आल्या आहेत. कांहीं तऱ्हाच गुन्ह्यांना कोर्टानें कमींत कमी काय शिक्षा द्यावी हेंहि ह्या कायद्यानें ठरविलें आहे. या कायद्याखालीं जर एका व्यक्तीकडून दुसऱ्यानदां अगर तिसऱ्यानदां तोच गुन्हा घडला तर त्या गुन्ह्यांबातत शिक्षेचें प्रमाणहि वाढविण्यांत आलें आहे. दारूबंदीच्या या कार्यांत व दारूबंदी कायद्याच्या अमलबजावणींत जनतेचें सहकार्य मिळावें म्हणून कायद्यानें जनतेच्या पुढाऱ्यांच्या सल्लागार समित्या नेमण्याची व्यवस्था केली आहे.

कामकऱ्यांच्या श्रमपरिहाराकरितां मनोरंजनाचीं साधनें आवश्यक असतात. दारू पिणारा इसम मुख्यतः श्रमपरिहाराकरितां म्हणूनच दारू पीत असतो. परंतु जर त्याला श्रमपरिहाराकरितां व आपल्या जीवनांत एक उच्च आनंद अनुभवण्याकरितां दुसरीं साधनें मिळालीं तर त्याची प्रवृत्ति दारूसारख्या

वस्तूंकडे होणार नाहीं. या दृष्टीनें दारुबंदीच्या कार्यक्रमाबरोबर शहरांतून व खेड्यांतून कल्याणकेंद्रें उघडण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. आतांपर्यंत प्रांतांत ठिकठिकाणीं अशीं ६६ केंद्रें उघडण्यांत आलीं आहेत. त्यांपैकीं १५ शहरांत व ४१ खेडेगांवांत आहेत. या केंद्रांमार्फत मनोरंजनाचे कार्यक्रम, देशी व परदेशी खेळ, पर्यटनें व सहली वगैरेंची व्यवस्था करण्यांत आली आहे. त्याचप्रमाणें स्वस्त दरांत स्वच्छ व सात्त्विक खाद्य व पेय पदार्थंहि मन रमेल अशा पद्धतीनें व अशा ठिकाणीं पुरविण्याची व्यवस्थाहि झाली आहे.

**दारूहळद**— यास संस्कृतमध्यें दारुहरिद्रा व लॅटिनमध्यें मॉरिंडा अंगुस्तिफोलिया म्हणतात. हे नेहमीं हिरवेंगार दिसणारें झुडुप हिमालयाच्या पूर्वेकडील भागांत वाढलेलें आढळतें. याच्या कोंवळ्या मुळ्यांपासून एक प्रकारचा पिंवळा रंग काढतात. पूर्व बंगाल आणि दार्जिलिंग यांमधील रहिवासी सूत रंगविण्याच्या कामीं या रंगाचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करतात. आसाम व ब्रह्मदेश यांतील लोकहि ह्या रंगाचा अलीकडे थोड्याफार प्रमाणावर उपयोग करूं लागले आहेत. सूत अगर कापसाचें कापड रंगवितांना, रंग पक्का होण्याकरितां या रंगांत कांहीं दुसरीं अम्लें मिसळतात.

**दारेसलाम**— आफ्रिका, टॅंगानिकाची राजधानी. हे पूर्व आफ्रिकेचे मुख्य बंदर आहे. या बंदरांत तरती गोदी आहे. शहर बंदराच्या उत्तरेस असून ते युरोपियन पद्धतीनें वसविलेलें आहे. येथील सार्वजनिक इमारतींत सरकारी आणि जकातीच्या कचेऱ्या, रुग्णालय आणि लष्करी चाळी आहेत. येथील गव्हर्नरच्या वाड्याजवळ वनस्पतींचे बगीचे आहेत.

जर्मनांनी हें घेतलें त्या वेळेस तें फार लहान खेडें होतें. १८६२ सालीं झांजिबारचा सुलतान सय्यद मजीद यानें शहर वसविण्याचा बेत केला. परंतु १८७१ त त्याच्या मरणामुळें तें घडलें नाहीं. दारेसलाम हें मुख्य बंदर करण्याच्या हेतूनें विल्यम मॅकिनॉननें येथून व्हिक्टोरिया नायंझापर्यंत सडक बांधण्यास सुरुवात केली, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. १८८७ सालीं डॉ. कार्ल पिटरनें जर्मन कंपनीच्या वतीनें ते आपल्या ताब्यांत घेतलें आणि १८८९ सालीं जर्मन साम्राज्य सरकारास दिलें. १८९१ सालीं हें वसाहतीच्या राजधानीचें शहर झालें. महायुद्धानंतर हें ब्रिटिशांच्या ताब्यांत मॅंडेटनें आलें आहे. मोगोरोला येथूनच रेल्वे जाते. समुद्रांतून नेलेल्या तारेनें हे झांजिबारला जोडलें आहे. हस्तिदंताचें सामान, रबर व राळ या ठिकाणाहून परदेशास जातात. या शहरांत हिंदी लोकांची वस्ती बरीच आहे. लो. सं. ७४,०३६.

**दार्जिलिंग**—बंगाल प्रांतांतील थंड हवेचें ठिकाण. हे हिमालयाच्या दक्षिण पायथ्याशीं वसलेलें आहे. येथील लोकसंख्या सुमारें वीस हजार आहे. उन्हाळ्यामध्यें कलकत्त्याचें सरकार आपल्या कचेऱ्यांसह येथें राहण्यास जात असे. याची उंची ७,४३२ फूट असून तें कलकत्त्यापासून रेल्वेनें ३८० मैल लांब आहे. ही गाडी फार लहान आहे. गाडी घाटाघाटानें चक्राकार वर जाते. वर जात असतां ४,००० फुटांपर्यंत दाट झाडी लागते; पण पुढें जातांच झाडांची जात बदलून सूचिपर्णी अरण्यांतील, शंक्वाकृति झाडांचीं अरण्ये लागतात. उत्तरेकडील गौरीशंकर, कांचनगंगा हीं बर्फानें आच्छादलेलीं अत्युच्च शिखरें दिसतात व एकंदर देखावा रम्य व नयनमनोहर भासतो.

दार्जिलिंगचें सरासरी उष्णतामान सुमारें ४२° असतें. हिंवाळ्यांत तें ३०° पेक्षां कमी होत नाहीं. सरासरी वार्षिक पाऊस १२२ इंच पडतो. डिसेंबर–जानेवारीमध्यें बर्फहि पडतें. दार्जिलिंगच्या आसपास चहाची लागवड करतात. कोयनेलहि बरेंच होतें. चिनी मातीचीं भांडीं, माळेचे मणी, पोवळीं, पितळी सामान यांचा येथें मोठा व्यापार चालतो. दार्जिलिंग हा गांव व आसपासच्या टेंकड्या, वार्षिक ३०० रु. देण्याचें ठरवून लॉर्ड विल्यम बेंटिकनें १८३५ सालीं सिकीमच्या राजाकडून मिळविल्या व तें उन्हाळ्यांत सरकारचें ठाणें व सैनिकांकरितां हवेचें ठिकाण करण्यांत आलें. १८४९ सालीं खंडणी बंद करून हा प्रदेश इंग्रजी राज्यास जोडण्यांत आला. येथें लष्करी छावणीहि आहे. १८९७ सालीं येथें एक भूकंपाचा धक्का बसला. १८९९ सालीं बर्फवृष्टीनें व चक्रवातानें शहराची बरीच नासाडी आली.

**दार्दिस्तान**— सिंधु नदीच्या उगमाकडील एक डोंगराळ प्रदेश. या प्रदेशांत दार्द किंवा दरद व इतर जमातींचे लोक राहतात, आणि ते लोक कोणाचेंच वर्चस्व मानीत नाहींत.

**दालचिनी**— [ सिनामोनम झेलानिकम ]. याचा तमाल वृक्षापेक्षां मोठा वृक्ष असून याची साल सुगंधी असते. हा वृक्ष ६,००० फूट उंचीपर्यंतच्या प्रदेशांत वाढतो. याची लागवड उत्पन्नाकरितां कोणीहि करीत नसून केवळ शोभेकरितां म्हणून मुंबई, मद्रास व बंगाल यांमध्यें हे वृक्ष लावतात.

हीं झाडे दक्षिण हिंदुस्थान, तेनासरीम व सिलोन या भागांत वाढतात. सिलोनांत मात्र हीं झाडें मुद्दाम मोठ्या प्रमाणांत सुगंधी सालीसाठीं लावतात.

दालचिनीच्या झाडाचें फळ तमालफळापेक्षां मोठें असतें. दालचिनीचीं पानें लांबट गोल असून तमालपत्राच्या दीडपट मोठीं असतात. या झाडाचीं पानें वाळल्यावर लवंगेप्रमाणें त्यांस वास येतो. दालचिनीला फळें करवंदाप्रमाणें येतात.

या फळांचा तेल, अर्क व अत्तर या वस्तू बनविण्यासाठीं उपयोग करतात.

वैद्यकीय दृष्टीनें हें झाड फार. महत्त्वाचें आहे. अतिसार, संग्रहणी, मुरडा या रोगांवर दालचिनी दिली तर चांगलीच उपयोगी पडते. रक्तांतील श्वेतकण वाढविण्याचें काम दालचिनी चांगलें करतें. क्षयरोगाच्या जंतूंवर दालचिनीच्या तेलाचा उपयोग होतो. ऊर्ध्वमार्गानें अथवा अधोमार्गानें होणारा रक्तस्राव हिच्या उपयोगानें थांबतो. हिच्यामुळें गर्भाशय आकुंचन पावतो. कृमी, हृद्रोग यांसारख्या रोगांवर हिचा चांगला उपयोग होतो.

**दाल तलाव**—काश्मीर संस्थानांतील श्रीनगरजवळील एक तलाव. लांबी ४ मैल व रुंदी २॥ मैल आहे. सर्व जगांत ही जागा अतिशय रमणीय आहे. कांठावरील डोंगरांच्या सुळक्यांचें व वृक्षांचें प्रतिबिंब पाण्यांत रमणीय दिसतें. मोठें गगनचुंबित हिंवर वृक्षहि किनाऱ्यावर दृष्टीस पडतात. येथील लव्हाळें लालसर सोनेरी दिसूं लागलें म्हणजे एकंदर देखावा फारच मनोरम दिसतो. डाव्या हातास प्रसिद्ध तख्त-इ-सुलेमान टेंकडी असून उजव्या हातास इरि पर्वत व त्यावरील किल्ला आहे. ह्या दोन टेंकड्यांमध्यें श्रीनगर वसलेलें असून पलीकडे पश्चिमेस बर्फमय पर्वत आहे. मोंगल राजांनीं ह्या जागेची रमणीयता वाढविण्याकरितां बरीच मेहनत घेतली. येथें सर्वांत मनोहर असा एक अकबर बादशहाच्या वेळीं लावलेला नसिम बाग आहे. झिबंवन पर्वताच्या एका कोंपऱ्यावर असलेला पुरीमहाल दारा शुकोहनें आपला शिक्षक मुल्लाशहा याकरितां बांधला असें म्हणतात. ह्या तलावांत दोन लहान बेटें असून त्यांचीं नांवें 'सोनलंका' व 'रूपलंका' अशीं आहेत. काश्मिरी भाषेंत दाल ह्या शब्दाचा अर्थ 'तलाव' असा आहे.

**दालादिएर, एदुअर्द** (१८८४-)—हा फ्रेंच मुत्सद्दी एका रोटीवाल्याचा मुलगा असून त्यानें प्रथम शाळेंत शिक्षकाची नोकरी केली. पहिल्या महायुद्धांत (१९१४-१८) तो कॅप्टनच्या हुद्यावर होता. १९१९ सालीं तो फ्रेंच पार्लमेंटांत रॅडिकल-सोशॅलिस्ट पक्षातर्फें सभासद निवडून आला. त्याला १९२४ सालीं वसाहतमंत्री, १९२५ सालीं युद्धमंत्री आणि १९२६ सालीं शिक्षणमंत्री नेमण्यांत आलें. १९२७ सालीं तो रॅडाकिल पक्षाचा हेरियटनंतर अध्यक्ष झाला. १९३३ सालीं तो १० महिने मुख्य प्रधान होता. नंतर १९३४ सालीं तो पुन्हां कांहीं काल मुख्य प्रधान होता. १९३६ पासून पाप्युलर फ्रंट पक्षाच्या प्रधानमंडळांत तो अनेक वेळां युद्धमंत्री होता. १९३८ एप्रिल ते १९४० मार्चपर्यंत त्यानें पुन्हां मुख्य प्रधानाचें काम केलें आणि त्यावेळींहि तो युद्धमंत्री होता. त्यानें फ्रान्स देशाची आर्थिक स्थिति आणि जमाखर्चपद्धति सुधारण्याचा अतिशय प्रयत्न केला व त्याकरितां त्यानें जुन्या (कॉन्झरव्हेटिव्ह) उपाययोजनांचा अवलंब केला. १९३८ च्या सप्टेंबर महिन्यांत त्यानें म्यूनिक करारावर सही केली. तो आपल्या पक्षामध्यें डाव्या गटाचा पुढारी असे. त्याला फ्रान्स देशाचा स्ट्रॉंगमॅन (पोलादी इसम) मानण्यांत येतें. त्यानें आपला राज्यकारभार मंत्रिमंडळाच्या हुकमांनीं चालविला आणि १९३९ च्या जुलै महिन्यांत व्हावयाची फ्रेंच पार्लमेंटची निवडणूक दोन वर्षें पुढें ढकलली. या काळांत त्याला स्वतःच्या पक्षाचें बहुमत अनुकूल नव्हतें. त्याऐवजीं उजव्या गटाच्या सभासदांनीं त्याच्या धोरणाला पाठिंबा दिला. त्यामुळें कायदेमंडळांत त्याच्याहुकूमशाही धोरणावर कडक टीका होऊं लागली आणि महायुद्ध अधिक नेटानें चालवावें अशी विरोधी पक्षानें मागणी केली. त्यामुळें १९४० च्या मार्च २१ तारखेस त्यानें आपल्या मुख्य प्रधानपदाचा राजीनामा दिला, तथापि त्याला रेनोद प्रधानमंडळांत प्रथम युद्धमंत्रिपदावर व नंतर वसाहतमंत्रिपदावर कायम ठेवण्यांत आलें. महायुद्धांत फ्रान्सचा पाडाव झाल्यावर पेतॉंच्या सरकारनें त्याला बंदीवासांत ठेवलें.

**दावर बक्ष** (मृ. १६२८)— जहांगीरचा नातू व खुश्रूचा मुलगा. याला मिर्झा बुलाकी असेंहि नांव आहे. १६२७ त जहांगीर वारल्यावर आसफखान वझिरानें याला तुरुंगांतून बाहेर काढून गादीवर बसविलें. पण शहाजहाननें राज्य बळकावल्यावर याला जीवें मारलें. कोणी इतिहासकार म्हणतात कीं, हा इराणला पळून गेला.

**दावर मलिक**— घियासुद्दीन तुघ्लखचा नातू. घियासुद्दीन तुघ्लक वारल्यावर आपल्या मुलास गादी मिळावी म्हणून याच्या आईनें सरदार लोकांचें मन वळविण्याचे प्रयत्न करून पाहिले. पण त्यांचा कांहीं उपयोग न होऊन त्यांनीं फेरोझशहास गादीवर बसविलें. तेव्हां हिनें त्यास घरीं मेजवानीस बोलावून ठार मारण्याचा कट केला, पण दावर यास आपल्या आईचें कृत्य पसंत न पडल्यानें तो कट उघडकीस आणला; तो गादीस मुकला,

**दावलजी सोमवंशी**— एक मराठा सरदार. हा शाहूच्या कारकीर्दीत प्रसिद्धीस आला. शाहूने यास सरलष्करपद दिलें होतें. स. १७१७ मध्ये दाभाड्यानें मोंगलांचा पूर्ण पराभव केला त्या वेळीं हा दाभाड्याचा मदतनीस होता. माळवा प्रांत जिंकण्याच्या कामांत यानें बाजीरावास पुष्कळ मदत केली.

**दास**—एक जात. यांचें वसतिस्थान कर्नाटक आणि दक्षिण महाराष्ट्र असून विशेषतः कर्नाटकांत आणि कोल्हापूर संस्थानांत दासांची वस्ती बरीच आहे. म्हैसूरमध्येंहि यांची वस्ती बरीच आहे. हा एक भिकारी वर्ग असून, हिंदु आणि लिंगायत धर्मांच्या हलक्या दर्जाच्या जातींत यांची गणना होते. लिंगायत जातीचे दास शैवपंथी व तद्व्यतिरिक्त दास वैष्णवपंथी असतात. तिरुपतीचा व्यंकटरमण हें त्यांचें आराध्य दैवत होय. हे वंशपरंपरा तिरुपतीच्या वार्षिक वाऱ्या करतात. दासांचा जरी एकच धार्मिक पंथ आहे तरी त्यांच्यांत वेगवेगळ्या जातिशाखा पडल्या आहेत. एका शाखेंतील लोक दुसऱ्या शाखेंतील लोकांशीं रोटीव्यवहार अगर बेटीव्यवहार करीत नाहींत. दास हे भिक्षा मागून आपली उपजीविका करतात. शनिवारीं, अमावास्येच्या दिवशीं आणि उपोषणाच्या दिवशीं हे मद्यमांसास स्पर्श करीत नाहींत. म्हैसूरमध्यें हे भिक्षुकी करतात व स्वतःजवळ शंख, घंटा, वगैरे बाळगतात.

भिक्षावृत्तीशिवाय दास लोक गाणेंबजावणें आणि नाटकी खेळ वगैरे करून पोट भरतात. दास स्त्रिया बहुधा वेश्यांचा धंदा करतात. कांहीं स्त्रिया वंशपरंपरा देवळांतून राहतात. अशा स्त्रियांना सारा माफ असलेली जमीन इनाम मिळते. देवळें झाडण्यासारवण्याचें काम यांच्याकडे सोंपविलेलें असतें. तथापि देवळाच्या गाभाऱ्यांत जाण्यास यांना मज्जाव असतो. इनाम जमिनीच्या उत्पन्नाशिवाय खेडेगांवांतील मारुतीस अर्पण केलेल्या अन्नवस्त्रावर यांचा हक्क असतो.

**दासगणू** ( १८६३- )—एक आधुनिक मराठी संतकवि. नगर जिल्ह्यांतील अकोळनेर गांवीं यांचा जन्म झाला. यांचें पूर्ण नांव गणेश दत्तात्रय सहस्रबुद्धे. पंढरपूरच्या विठोबाच्या पायांवर देह अर्पण केल्यापासून हे स्वतःस दासगणू किंवा गणू असें म्हणवून घेऊं लागले. विशेष शिक्षणाच्या अभावीं दरमहा १३ रुपये पगारावर यांनीं पोलिस खात्यांत नोकरी धरली व तेथेंच प्रथम त्यांना लावण्या करण्याचा नाद लागला. परंतु आपल्या लावण्याच्या नादामुळें एका शिक्षकास दंड झाल्याचें कळतांच यांनीं आपलें लावणी वाङ्मय फाडून टाकलें. पुढें शिर्डीच्या साईनाथांवर यांची भक्ति जडली व त्यांच्याच अनुज्ञेवरून यांनीं आपल्या नोकरीस रामराम ठोकला. यानंतर कीर्तन व भक्तिपर वाङ्मयाचा यांना छंद लागला. सरस कवित्व, साधी व सर्वांना समजणारी भाषा यांमुळें जशी खेड्यांत त्याचप्रमाणें शहरांतहि यांची कीर्तनें लोकप्रिय होऊं लागलीं. एक लाखाहूनहि अधिक इतकी प्रचंड काव्यरचना यांनीं केली आहे. तसेंच महीपतीनंतर झालेल्या आतांपर्यंतच्या अनेक संतांचीं चरित्रें लिहिण्याची कामगिरीहि यांनीं केली आहे. या संतचरित्रें लिहिण्याच्या हौसेमुळें 'आधुनिक महीपति' या नांवानेहि हे ओळखले जातात.

( १ ) भक्तलीलामृत, ( २ ) भक्तिसारामृत, ( ३ ) भावार्थ मंजिरी, ( ४ ) सुभाषितशतक, ( ५ ) एकनाथ–चरित्र, ( ६ ) विष्णुसहस्रनामबोधिनी, ( ७ ) संतकथामृत, वगैरे ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**दास, चित्तरंजन** (१८७०–१९२५)—एक हिंदी पुढारी. यांचा जन्म श्रीमंत, कुलीन व दानशूर अशा वैद्य घराण्यामध्यें

झाला. यांचे वडील भुवनमोहनबाबू हे कलकत्ता हायकोर्टात ॲटर्नी होते व चांगले लेखकहि होते. दासबाबू वयाच्या विसाव्या वर्षी बी. ए. होऊन नंतर विलायतेस जाऊन आय्. सी. एस्. परीक्षा उत्तीर्ण झाले. १८९२ साली दादाभाई नौरोजी यांच्या पार्लमेंटांतील निवडणुकीकरितां यांनीं अनेक व्याख्यानें दिलीं म्हणून यांचा क्रमांक वर असतांहि यांस आय्. सी. एस्. अधिकाऱ्यांमध्यें निवडण्यांत आलें नाहीं. म्हणून १८९३ मध्यें हे बॅरिस्टर होऊन आले व त्यांनीं कलकत्त्यास वकिली सुरू केली. या धंद्यांत त्यांनीं कीर्ति व पैसा चांगला मिळविला. बंगालफाळणीच्या चळवळींत यांनीं अरविंद घोष यांची खटल्यांतून सुटका केली व अनेकांस सल्लामसलत दिली. ते राजकारणांत लो. टिळक यांचे अनुयायी असून १९१६ पासून राजकीय चळवळींत प्रमुख भाग घेऊं लागले. अमृतसरच्या कॉंग्रेसमध्यें मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा असमाधानकारक आहेत हा ठराव यांनींच

मांडला. पुढें नागपूर कॉंग्रेसमध्यें असहकारितेचा ठराव महात्मा गांधींकडून पाहिजे तसा बदलून घेऊन त्यास अनुसरून वकिली सोडली. १९२१ सालीं कायदेभंगांत यांस सहा महिन्यांची शिक्षा झाली. तेथून सुटल्यावर हे गया कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले व पुढें यांनीं स्वराज्य पक्ष स्थापन केला व कौन्सिलांत शिरून असहकार करण्याचें ठरविलें. नंतर मध्यवर्ती असेंब्लीमध्यें हे निवडून आले, परंतु लवकरच दिवंगत झाले. हे कवि होते. यांनीं 'नारायण' नांवाचें मासिक चालविलें होतें. हे ब्राह्मो पंथाचे होते. यांनीं आपली सर्व संपत्ति सार्वजनिक कार्यास देऊन टाकली. त्यांचें स्मारक म्हणून चित्तरंजन सेवासदन स्थापण्यांत आलें आहे.

**दास, जतीन्द्रनाथ** (१९०४-१९२९)— एक हिंदी तरुण देशभक्त. याचा जन्म कलकत्ता येथें १९०४ सालीं झाला. १९२१ मध्यें असहकारितेच्या चळवळींत त्यानें आशुतोष कॉलेजला रामराम ठोकला व तो कॉंग्रेसचें कार्य करूं लागला. १९२४ पूर्वी कायदेभंगाबद्दल त्याला तीन वेळां शिक्षा झाली होती. यानें 'दक्षिण कलकत्ता तरुण समिति' नांवाची एक संस्था स्थापन केली. त्यामुळें त्यास १९२५ च्या बंगाल ऑर्डिनन्सप्रमाणें स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें. त्याचा तुरुंगामध्यें मनस्वी छळ झाला. तेव्हां त्यानें २३ दिवस उपोषण केलें. त्यामुळें त्याच्या तक्रारी दूर झाल्या. व त्याची २७ सप्टेंबर रोजीं मुक्तता झाली. पण पुन्हां १९२९ मध्यें लाहोर कटाच्या खटल्यांत त्याला आरोपी म्हणून पकडण्यांत आलें. तुरुंगांतील अन्याय्य वागणुकीबद्दल त्याचे सहकारी भगतसिंग व बटुकेश्वर दत्त यांनीं अन्न-सत्याग्रह सुरू केला. त्यांस सहानुभूति दाखविण्यासाठीं ता. १३ जुलैपासून यानेंहि अन्नत्याग केला. त्यास कृत्रिम उपायांनीं अन्न घालण्याचा प्रयत्न करण्यांत आला. पण तो यशस्वी झाला नाहीं. त्यास सशर्त मुक्त करण्याची सरकारची तयारी होती, पण बिनशर्त मुक्तता होत नाहीं म्हणून त्यानें अन्नत्याग चालू ठेवला. अखेरीस ६२ दिवस प्रायोपवेशन केल्यावर १३ सप्टेंबर १९२९ रोजीं त्याचें देहावसान झालें. याच्या प्रायोपवेशनाची आयरिश देशभक्त टेरेन्स मॅक्स्विनी याच्या उपवासाबरोबर तुलना केली जाते व या देशभक्तीच्या विक्रमाबद्दल त्याची अखिल भरतखंडांत कीर्ति राहिली आहे.

**दास, पंडित नीळकंठ** (१८८४- )—एक उडिया पंडित. यांचें शिक्षण पुरी जिल्हा शाळेंत व कटक येथील रॅव्हेनशा कॉलेजमध्यें झालें. यांनीं गोपबंधु दास यांच्या सहकार्यानें सत्यवादी येथें एक मोकळया जागेंतील रहिवासी शाळा काढली व तिचे ८ वर्षे ते रहिवासी हेडमास्तर होते. १९१९ मध्यें यांनीं पुरी जिल्ह्यांतील दुष्काळनिवारणाचें कार्य केलें. १९२० मध्यें ते कलकत्ता विद्यापीठामध्यें पोस्ट-ग्रॅजुएट प्रोफेसर झाले. १९२१ मध्यें त्यांनीं संबळपूर येथें कॉंग्रेसचें कार्य व एक राष्ट्रीय शाळा आणि 'सेना' या नांवाचें पत्र सुरू केलें. पुरी येथील जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे ते कांहीं काळ चिटणीस असून उत्कल प्रांतिक कमिटीचे अध्यक्ष होते (१९२२). १९२३ मध्यें त्यांस चार महिन्यांची शिक्षा व २०० रु. दंड झाला. १९२४-३० पर्यंत हे मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. ते उत्कल प्रांतिक कॉंग्रेसचे चिटणीस व उत्कल सर्व पक्षीय परिषदेचे अध्यक्ष होते. गोपबंधु सेवक समाजाचे ते अध्यक्ष आहेत. पुरी येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेचे ते स्वागताध्यक्ष होते. १९३५ मध्यें ते पुन्हां मध्यवर्ती असेंब्लींत गेले व तेथें ते कॉंग्रेस पक्षाचे चिटणीस होते. लहान व घरगुती धंदेसंघाचे ते चिटणीस होते. 'नवभारत' या उडिया भाषेंतील श्रेष्ठ मासिकाचे ते संपादक आहेत. यांनीं 'प्रणयिनी' या नांवाचें सहा सर्गांचें काव्य, कोनार्क, मायादेवी, खारवेला (सर्ग-ऐतिहासिक), दासनायक, इत्यादि काव्यें व आर्यजीवन हा आर्य संस्कृतीवरील ग्रंथ व इतर अनेक प्रकारची ग्रंथरचना केली आहे. यांनीं मुलांकरितांहि अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

**दासवर्ग**—वेदकालीं हिंदुस्थानांत दस्यु किंवा दास हा काळया आर्यशत्रु लोकांचा वर्ग होता, ही युरोपियन संशोधकांची जुनी कल्पना त्याज्य ठरली आहे. दास म्हणजे द्राविड लोक हा तर्कहि बरोबर नाहीं (ज्ञानकोश वि. ३, पृ. २८ पासून पुढें). इंग्लंडांत मध्ययुगीन कालांत (इ. स. ५०१ ते१५००) आणि अनेक देशांत अलीकडील काळापर्यंत शेतकरी लोकांतील जो खालचा वर्ग स्वतंत्र दर्जाचा नव्हता, अशा परदास्यांतील लोकांना इंग्लंडांत सर्फ किंवा व्हिलीन म्हणत असत. सर्फ आणि व्हिलीन ह्यांच्या स्थितींत थोडा फरक असे. सर्फ या नांवाचे इसम पूर्णपणें गुलाम असत, आणि व्हिलीन इसम पूर्ण गुलाम आणि स्वतंत्र इसम यांच्या दरम्यानच्या स्थितींत असत. फ्यूडल सिस्टीमच्या आरंभींच्या काळांत हा फरक होता. तथापि डूम्सडे बुकांत ह्याचा फारसा उल्लेख नाहीं. व्हिलीन हा इसम त्याचा जमीनदार मालक याच्यावर पूर्ण अवलंबून असे. व्हिलीन या व्यक्तीचा आणि त्याच्या मालमत्तेचा मालक सदर जमीनदार असे, आणि सदर जमीनदार व्हिलीनची खरेदी-विक्री करूं शकत असे. १४ व्या शतकांत यांची संख्या दारिद्र्यामुळें फार कमी झाली व ब्लॅकडेथ या रोगालाहि ते फार बळी पडले, त्यामुळें शेतीच्या कामाला मजूर मिळेनात म्हणून जमीनदारांनीं पूर्वीची व्हिलीन उर्फ गुलाम पद्धति अमलांत आणण्याचा प्रयत्न केला, पण त्यामुळें १३८१ सालीं शेतकऱ्यांचें बंड झालें. एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत इंग्लंडांत सुमारें २५० व्हिलीन कुटुंबें होतीं. गुलामगिरी पाहा.

कालिदासानें मेघदूताच्या चौदाव्या श्लोकांत (दिङ्नागानां पथि परिहरन्) दिङ्नागाचा निर्देश केला आहे, असें दक्षिणावर्त व मल्लिनाथ यांनीं म्हटलें असलें तरी तसें वाटत नाहीं. सतीशचंद्र विद्याभूषण व प्रि. मिराशी यांचेंहि असेंच मत आहे.

डॉ. कीथ, प्रो. मॅक्डोनेल वगैरेंच्या मतें दिङ्नाग स. ४०० च्या सुमारास होऊन गेला.

याचे ग्रंथ—१ प्रमाणसमुच्चय, २ न्यायप्रवेश, ३ हेतुचक्रडमरु, ४ प्रमाणसमुच्चयवृत्ति, ५ प्रमाणशास्त्रप्रवेश, ६ आलंबनपरीक्षा, ७ आलंबनपरीक्षावृत्ति, ८ त्रिकालपरीक्षा, व ९ कुंदमाला (नाटक).

**दिंडू किल्ला**—मुंबई, ठाणें जिल्हा. दिंडू हें खेडें उंबरगांवच्या उत्तरेस १३ मैलांवर असून तेथें एक पडका किल्ला आहे. हा पोर्तुगीजांनीं बांधलेला असावा. १७५७ मध्यें चांच्यांचा उपद्रव होऊं नये म्हणून मराठ्यांनीं याची दुरुस्ती केली होती.

**दिंडोरी**—मुंबई इलाखा, नाशिक जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ५३२ चौ. मैल. लो. सं. ७९,६८४. खेडीं १२८ असून मोठें गाव वणी आहे. तहसिलीचें मुख्य ठाणें दिंडोरी आहे. हा प्रदेश डोंगराळ असून पाऊसपाणी विपुल असतें. एप्रिल-मेमध्यें जरी हवा शुद्ध व प्रकृतीला आरोग्यदायक असते तरी इतर महिन्यांत ती मलेरियाकारक असते. यांत कादवा ही एक नदी आहे.

**दिंदिगल**— मद्रास, मदुरा जिल्ह्याच्या उत्तर भागांत असलेल्या दिंदिगल पोटविभागांतील एक तालुका. क्षेत्रफळ ८९३ चौ. मैल. दिंदिगल गांव तालुक्याचें व पोटविभागाचें मुख्य ठिकाण. हें साउथ इन्डियन रेल्वेचें एक स्टेशन आहे. येथें म्युनिसिपालिटीची स्थापना १८६६ सालीं झाली. हें गांव समुद्रसपाटीपासून ८८० फूट उंच आहे. हवा उष्ण पण प्रकृतीला मानवेल अशी आहे. चामडें, तंबाखू, कॉफी व वेलदोडे ह्या मालाचा व्यापार चालतो. दिंदिगल हें पूर्वी एका विवक्षित प्रदेशाच्या राजधानीचें शहर असून हें राज्य मदुरा नांवाच्या राज्याच्या स्वामित्वाखालीं होतें. येथील किल्ला समुद्रसपाटीपासून १२२२ फूट उंच असून चांगल्या स्थितींत असल्यामुळें ह्या किल्ल्यास फार महत्त्व होतें. सन १६२३ ते १६५९ च्या दरम्यान येथें मराठे व म्हैसूरकर यांच्यामध्यें अनेक चकमकी उडाल्या होत्या. १८ व्या शतकांत हा किल्ला वेगवेगळ्या वेळीं चंदासाहेब, मराठे व म्हैसूरकर यांच्या सैन्यानें आपल्या ताब्यांत ठेवला होता. म्हैसूरशीं झालेल्या युद्धांत कर्नल वुडनें हा किल्ला १७६७ त घेतला, पण १७६९ सालीं तहानंतर तो परत दिला. पुनः १७८३ सालीं तो कर्नल लँन्ग यानें घेतला. पण पुनः १७८४ सालीं मंगळूरच्या तहाबरहुकूम तो परत केला. सरतेशेवटीं स. १७९० मध्यें तो स्टुअर्टसाहेबानें घेतला व १७९२ सालीं कंपनी सरकारच्या ताब्यांत दिला.

**दिनकर**—पुण्यांतील एक भारतीय ज्योतिषी. यानें केलेले व पुणें येथील माधवराव पेंडसे यांनीं लिहिलेले बरेच ग्रंथ पुण आनंदाश्रमांत आहेत. दिनकराचे गणितग्रंथ ग्रहलाघवानुसार ग्रहगणित सुलभ रीतीनें करतां यावें म्हणून केलेले आहेत. ते बहुतेक सारणीरूप आहेत. दिनकर हा चांगला कल्पक गणिती होता व त्यास वेधाचें ज्ञान होतें. ग्रहलाघवावरून कोणतेंहि गणित करण्यास आणि मुख्यतः मध्यम आणि स्पष्टग्रह करण्यास दिनकरकृत सारण्या फार उपयोगी पडतात.

दिनकराचे ग्रंथ— ग्रहविज्ञानसारणी, मासप्रवेश, स्तरणी, लग्नसारणी, क्रांतिसारणी, चंद्रोदयांकजाल, दृक्कर्मसारणी, ग्रहणांकजाल, इत्यादि. [दीक्षित—भारतीय ज्योतिषशास्त्र.]

**दिनकर रामदासी**—एक समर्थशिष्य ग्रंथकार. हा नगराजवळील भिंगारचा जोशी. यानें वृद्धेश्वर अथवा म्हातारदेव येथें तपश्चर्या केली. यास समर्थांचा अनुग्रह शके १५७६ मध्यें झाला. याचा ग्रंथ 'स्वानुभवदिनकर' (रचना शक १६१६) प्रसिद्ध असून आणखी अभंग, पदें, सवाया, वगैरे आहेत.

**दिनाजपुर**— बंगाल, राजशाही विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ३९५३ चौ. मैल. दिनाजपूर प्राचीन अवशेषांविषयीं प्रसिद्ध आहे. कांतनगर व गोपाळगंज येथील १८ व्या शतकांतील सुंदर देवालयांखेरीज, दंतकथांवरून अति प्राचीन समजले जाणारे तलाव व मोडकळीस आलेल्या इमारती येथें पुष्कळ आहेत. नबाबगंज ठाण्यांत तर्पण घाटावर वाल्मीकि ऋषि स्नान व तर्पण करीत असत व जवळच असलेल्या सीताकोट नांवाच्या किल्ल्यांत रामानें परित्याग केलेली सीता राहत होती, अशी दंतकथा आहे. पांडवांनीं विराट राजाच्या ज्या मत्स्य देशांत अज्ञातवासाचे दिवस काढले तो हाच देश होय, असाहि लोकांचा समज असून घोराघाटाजवळचे अवशेष विराटाची गोशाळा या नांवानें प्रसिद्ध आहेत. हा जिल्हा वारेंद्र व पुढें पौंड्रवर्धन यांच्या राज्यांत मोडत असे. ९ व्या शतकांत दिनाजपूर पाल राजांच्या हातांत गेलें. पाल घराण्यांतील सर्वांत बलिष्ठ राजा महीपाल याच्या नांवाचें एक मोठें तळें असून महीपालाच्या नांवाचा लोकांना अद्याप विसर पडला नाहीं. पंधराव्या शतकाच्या आरंभीं राजा गणेश (यानें पुढें मुसलमानी धर्म स्वीकारला) यानें दिनाजपूरचें राज्य स्थापन केलें व बंगालच्या मुसलमान राजाचा पराभव करून स. १४०४ मध्यें सिंहासन बळकाविलें. त्यानें १० वर्षें राज्य केल्यावर त्याचा मुलगा जलालुद्दीन महंमदशहा व नातू अहंमदशहा यांनीं स. १४४२ पर्यंत राज्य केलें. मोंगलाच्या वेळीं देवीकोट व घोराघाट हीं महत्त्वाचीं लष्करी ठाणीं होतीं. ह्या जिल्ह्यांतील

रहिवाशांची दंगेखोरपणाबद्दल ख्याति होती व जिल्ह्याची व्यवस्था चांगली राखतां यावी म्हणून मोल्दा व बोग्रा हे जिल्हे आणि महादेवपूर ठाणें या जिल्ह्यापासून निराळे करण्यांत येऊन तो आटपसर करण्यांत आला.

लोकसंख्या (१९४१) १९,२६,८३३. राजवंशी लोकांची संख्या एकंदर जिल्ह्यांतील लोकसंख्येच्या तृतीयांश असून ते निःसंशय उत्तर बंगालच्या मूळ रहिवाशांचे वंशज आहेत; व मुसलमानहि त्यांच्यांतूनच बहुधा बाटून झालेले असावेत. संताळ लोकांची संख्या सुमारें पाऊण लाख आहे.

पूर्व बंगालांत तांदूळ पिकणाऱ्या मुख्य जिल्ह्यांपैकीं दिनाजपूर हा एक आहे. लागवडीच्या जमिनींपैकीं शेंकडा ८५ भागांत तांदुळाचें पीक होतें. यांशिवाय सरसू, मोहरी आणि ताग हे जिन्नसहि होतात.

येथील लोक जाडेंभरडें गोणपाट हातांनीं विणतात. बाह्य व्यापार बहुधा कलकत्त्याशीं होतो. तांदूळ, ताग व गोणपाट हे मुख्य निर्यात जिन्नस व विलायती कापड, मीठ, रॉकेल, दगडी कोळसा व साखर हे आयात जिन्नस होत.

दिनाजपूर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण पूर्णभवा नदीच्या पूर्व तीरावर आहे. येथे सन १८६९ मध्यें म्युनिसिपालिटीची स्थापना करण्यांत आली. येथें हायस्कूल व इतर शाळा आहेत.

**दिब्रूगढ**—आसाममधील लखिमपूर जिल्ह्याचा एक पोटविभाग. हा ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्याच्या पूर्व टोंकावर आहे. क्षेत्रफळ ३२५४ चौ. मैल. हा विभाग ब्रह्मपुत्रा नदीच्या दोन्ही तीरांवर वसलेला असून तिन्ही बाजूंनीं टेंकड्यांनीं वेष्टिलेला आहे. यांत एक गांव (दिब्रूगढ) व खेडीं ३४८ आहेत. पाऊस ९५ ते ११२ इंच पडतो.

[illegible]गांव—आसाममधील लखिमपूर जिल्ह्याचें हें मुख्य ठिकाण दिब्रू नदीच्या डाव्या तीरावर आहे. कलकत्त्याहून ब्रह्मपुत्रेच्या प्रवाहांतून वर येणाऱ्या बोटी येथेंच थांबतात. आसाममधील हें चांगल्यापैकीं ठिकाण आहे. पाऊस ११२ इंच पडतो. म्हणून येथील हवा थंड व मनाला आल्हाददायक असते. येथें पायदळाची व घोडेस्वाराची एक तुकडी असते. धान्य, वगैरे कलकत्त्याहून येथें येतें व भोंवतालच्या चहाच्या मळ्याकडे रवाना होतें. गांवांत बरेच छापखाने असून वृत्तपत्रें निघतात. येथें दोन-तीन हायस्कूलें चालतात. एक पोलिस ट्रेनिंग स्कूल आहे. लो. सं. १८,७३४.

**दिमापूर**—आसाममध्यें सिबसागर जिल्ह्यांतील एक खेडें. धनसिरी नदीच्या उजव्या तीरावर हें आहे. पूर्वीं ही काचारी राजांची राजधानी होती. पण १५३६ सालीं आहोम राजांनीं हें गांव लुटलें. अजूनहि मोडकेतोडके जुने अवशेष व तलाव दृष्टीस पडतात. ही जागा नाम्बरच्या दाट जंगलांत आहे. निर्मळ पाण्याचे पुष्कळसे तलाव येथें आहेत व पडक्या भिंतीवरून पूर्वी येथें किल्ला असावा असें वाटतें. किल्ल्याच्या आंत तीन तलाव आहेत. वेगळी वेगळी नक्षी काढलेली आहे असे वेगवेगळ्या आकाराचे स्तंभ आहेत. हे स्तंभ V या आकाराचे असून अशा आकाराचे स्तंभ नाग लोक मोठ्या मेजवानीच्या प्रसंगीं उभारतात. ह्या स्तंभांवर लेख, वगैरे कांहीं नाहींत.

**दिलपसंत**—(धेंडस). ही एक भोपळ्याची जात आहे. महाराष्ट्रांत दिलपसंताचे वेल खरबुजवाडींत लावितात. त्यांस उन्हाळ्यांत फळें येतात. खरबुजवाडींतील वाळकांप्रमाणेंच याची लावणी व मशागत करतात. फळें गोल, हिरवट, पांढऱ्या रंगाचीं, बसकीं व २–४ इंच व्यासाचीं असतात. गर काशीफळाप्रमाणें अगर दुध्या भोपळ्याप्रमाणें पांढरा स्वच्छ असतो. आंत भोपळ्यासारख्या पण त्यांहून लहान बिया असतात. दिलपसंताची भाजी होते. याचीं फळें लवकर जून होतात, सबब लवकर लवकर तोडा करावा लागतो.

**दिलरुबा**—एक वाद्य. ताऊस या वाद्यांतील मोर काढून टाकला म्हणजे दिलरुबाच राहतो. अर्थात् मोराच्या पाठीवर दिलरुबा ठेविला म्हणजे ताऊस झाला. ह्यांतहि २० पडदे असतात. ह्याच्या काठ्याची उंची सुमारें ४० इंच, रुंदी ६ इंच व बुडापासून दांडीच्या जोडापर्यंत उंची सुमारें सात इंच असते. हें वाद्य गजानें वाजवायाचें असतें. हें स्वतंत्रपणें वाजवितात. ह्याचा व ताउसाचा बाज सारखाच आहे.

**दिलवाडा**—(देऊळवाडा). अबू पाहा. अबूच्या पहाडावर देलवाडा गांवाशेजारीं जीं जैन देवालयें आहेत त्यांना विशेषेंकरून नांव आहे. येथें पांच देवळें आहेत. त्यांपैकीं दोन—आदिनाथाचें व नेमिनाथाचें—शिल्पकलेच्या दृष्टीनें अतिशय प्रेक्षणीय आहेत. आदिनाथाचें गुजराथचा सुभेदार विमलशहा यानें १०३२ त बांधलें व दुसरें वस्तुपाल आणि तेजपाल या बंधुद्वयानें १२३१ त बांधलें. हीं दोन्ही देवळें संपूर्ण संगमरवरी असून चांगलीं अलंकृत आहेत. यांतील घुंबराची नक्षी अप्रतिम आहे. नेमिनाथाच्या देवळांत हत्तीखाना आहे; त्यांत दहा हत्ती सालंकृत कोरले आहेत. हत्तीखान्यासमोर जी दगडी जाळी आहे तीहि फार सुंदर आढळेल. देवळांतून जिकडेतिकडे नक्षी आढळून मन थक्क होतें.

आदिनाथाचें देऊळ बांधण्यासाठीं डोंगरावर जी सपाट जागा केली तिलाच ५६ लाख रुपये लागले म्हणतात. जवळपास ३०० मैलांवर संगरवमरी दगडाची खाण नसतांना देऊळ या दगडांचें बांधलेलें आहे.

येथें बरेच जैन यात्रेकरू येत असल्यानें त्यांच्यासाठीं कित्येक धर्मशाळा बांधल्या आहेत.

**दिलावरखान** (मृ. १४०५)— माळव्याच्या मुसलमानी राज्याचा संस्थापक. दिल्लीचा शहा घियासुद्दीन बल्बन (१३१०) याच्या वेळीं माळवा प्रांत मुसलमानांनीं प्रथम जिंकला. तेव्हांपासून स. १३८७ पर्यंत प्रत्यक्ष दिल्लीकरांचा अमल तेथें होता. या वेळींच दिलावरखानास माळव्याचा सुभा नेमिलें असतां त्यानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. याची आई शहाबुद्दीन घोरीच्या घराण्यांतील होती. तैमूरलंगाच्या स्वारीमुळें दिल्लीचा महंमूदशहा हा तीन वर्षें माळव्यांत येऊन राहिला होता. तो पुन्हां दिल्लीस परतल्यावर दिलावरनें तख्तारोहण केलें (१४०१) व धार ही आपली राजधानी केली; परंतु तो पुष्कळ दिवस मांडवगड येथें राहत असे. तो १४०५ सालीं मेला.

त्याच्या मागून अल्फखान हा सुलतान होशंगशहा नांव घेऊन गादीवर आला. दिलावरनंतर अकबरानें माळवा प्रांत खालसा करीपर्यंत एकंदर ११ मुसलमान राजे माळव्यांत झाले.

**दिलीप**—प्राचीन भारतवर्षांतील एक सम्राट्. याला बरेच दिवस पुत्रप्राप्ति न झाल्यामुळें तो वसिष्ठ ऋषीच्याकडे गेला. वसिष्ठानें "पूर्वी तूं इंद्राकडे गेला होतास, तेथून घाईनें घरीं परत येतांना कल्पवृक्षाखालीं कामधेनु उभी होती तिला नमस्कार वगैरे न करतां पुढे निघून आलास; म्हणून तिनें तुला शाप दिला आहे. तिच्या सांगण्याप्रमाणें तूं तिच्या मुलीची—नंदिनीची—सेवा कर म्हणजे तुला मूल होईल" असें सांगितलें. त्याप्रमाणें राजानें नंदिनीची सेवा सुरू केली. एके दिवशी मायावी सिंह उत्पन्न करून नंदिनीनें राजाची परीक्षा पाहिली. त्यानें सिंहाला स्वदेहार्पण करून धेनूचें प्राणरक्षण करण्याची तयारी दाखविली; तेव्हां नंदिनी प्रसन्न झाली. तिच्या वरानें दिलीपास पुत्र झाला; तोच पुढें रघु नांवानें लोकविख्यात असलेला राजा होय.

**दिलीपसिंग** (१८३८–?)—पंजाबचा शेवटचा राजा व महाराजा रणजितसिंगाचा मुलगा. दुसऱ्या शीख युद्धानंतर डलहौसीनें याचें राज्य खालसा केलें (१८४९). त्याच्या आधीं तीन वर्षे राज्य वस्तुतः ब्रिटिशांच्याच ताब्यांत होतें. तेव्हां शीक्ष–उठावणीची जबाबदारी या अज्ञान राजावर नव्हती. पुढें त्याला फत्तेगड येथें ख्रिस्ती मंडळींत ठेवून १८५३ सालीं वयांत आला नसतांनाच ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. पुढील सालीं त्याला इंग्लंडला पाठविलें व त्याची व आईची ताटातूट करण्यांत आली. महाराणी जिंदकुंवर १८६३ सालीं वारल्यानंतर दिलीपसिंगानें आपल्या वारसाच्या व इस्टेटीच्या हक्काबद्दल ब्रिटिश सरकारशीं वाद चालविला. इंग्लंडांत वृत्तपत्रांतूनहि सरकारचें अन्यायी वर्तन जाहीर केलें. रणजितसिंगाची खासगी मालमत्ता व राजघराण्यांतील इतरांची इस्टेट फार मोठी असली तरी ती सिद्ध न करतां आल्यामुळें कायदेशीर इलाज चालेना. पेशव्यांच्या खाजगी इस्टेटीचें असेंच झालें होतें. ज्या दिलीपसिंगानें कोह-इ-नूर हिरा व्हिक्टोरिया राणीला नजर केला होता, त्याला दुसरी कांहींच मालमत्ता असूं नये हें आश्चर्य! पंधरा कोटी रुपयांच्यावर महाराज दिलीपसिंगाची रक्कम सरकारकडे १८८५ सालीं फिरत होती. पण ब्रिटिश सरकार बेपर्वा झालें होतें. दिलीपसिंगाला चार-पांच लाख रुपये सालीना पेन्शन मिळे. तेव्हां १८६२ सालीं इंग्लंडमध्यें सफोक येथें मालमत्ता खरेदी करण्यास त्याला सरकारकडून पांच टक्के व्याजानें कर्ज काढावें लागलें. पण या मालमत्तेला त्याच्यामागून त्याचीं मुलें वारस होणार नव्हती; तर ही इस्टेट त्यांनीं विकून वांटून घ्यावी. या सर्व गोष्टींमुळें वैतागून दिलीपसिंगानें हिंदुस्थानला जाण्याचें ठरविलें. पण सरकारनें आडकाठी घातली. नंतर बरीच वाटाघाट होऊन त्यानें पंजाबांत पाऊल टाकतां कामा नये, तर उटकमंडलाच राहावें, असें सरकारनें सांगितलें.

१८८६ सालीं इंग्लंडचा किनारा सोडण्यापूर्वी त्यानें आपल्या पंजाबांतील प्रजेला उद्देशून एक पत्रक काढलें. तें सरकारनें राज्यद्रोही ठरविलें. या वेळीं त्यानें ख्रिस्ती धर्म सोडून पुन्हां तो शीख झाला. वाटेत त्याला एडनला अटक करण्यांत आली. तेव्हां बायका–मुलें व पेन्शनहि सोडून तो मध्य युरोपांत गेला. १८९० पर्यंत तो अमेरिकेंत होता असें म्हणतात. त्याची मुलगी राजकुमारी बंबा सदरलंड ही आज हयात आहे.

**दिलेरखान**—एक मोगल सरदार. याचें नांव अब्दुल रौफ वल्द अब्दुल करीम. हा पूर्वी विजापूरच्या राज्यांत नोकर होता. आदिलशाही बुडाल्यानंतर हा औरंगजेबाच्या पदरीं राहिला. त्या वेळीं त्याला दिलेरखान ही पदवी व सप्तहजारी मनसब मिळाली. हा मराठ्यांच्याविरुद्ध औरंगजेबाच्या मोहिमांत पुष्कळदां लढला होता.

१६६५ सालीं हा जयसिंगाच्या हाताखालीं राहून शिवाजीस नामोहरम करण्याच्या प्रयत्नांत होता. पुढल्या सालीं औरंगजेबानें याला माळव्यांत ठेवून जयसिंग व राजपुत्र मुआज्जिम (दख्खनचा सुभेदार) यांवर पाळत ठेवण्यास सांगितलें. १६७१ त बहादुरखान व दिलेरखान यांना सालेरचा वेढा उठवावा लागला. १६७५ त मराठ्यांनीं त्याचा पराभव करून ते माहूरपर्यंत खालीं सरकले. पुढें शिवाजीनें त्याला दक्षिणेंतून हांकून लावलें. पण दिलेरखान धूर्त व कावेबाज होता. त्यानें इकडे विजापूरकरांशीं व तिकडे संभाजीशीं संधान बांधिलें. संभाजी १६७८ त त्याच्याकडे परळीहून पळून गेला. या दोघांनीं शिवाजीस त्रास देण्याचा

पुढें उद्योग चालविला. दिलेरखाननें छत्रसालाशीं औरंगजेबाच्या वतीनें दोस्तीचा तह केला व त्याचा विरोध बंद पाडला. बहादुरशहाच्या वेळीं हा दख्खनमध्यें आपल्या जहागिरीच्या गांवीं मेला.

**दिल्ली**— हिंदुस्थान, एक प्रांत. १९११ सालीं दिल्ली ही हिंदुस्थानची राजधानी म्हणून पंचम जॉर्ज बादशहाकडून जाहीर करण्यांत आल्यानंतर मध्यवर्ती सरकारच्या अधिकाराखालीं पुढील सालीं एक स्वतंत्र प्रांत करण्यांत आला व त्यावर एका कमिशनरची नेमणूक केली. त्यापूर्वी दिल्ली पंजाब प्रांतांत होती. या प्रांताचें क्षे. फ. ५७४ चौ. मैल असून यांत ९ शहरें व ३०५ गांवें आहेत. लो. सं. (१९४१) ९,१७,९३९ आहे. शहादरा, नवी दिल्ली व कॅन्टोन्मेंट मिळून दिल्ली शहराची लो. सं. १९४१ मध्यें ५,२१,८४९ होती.

दिल्ली शहर—यमुना नदीच्या उजव्या तीरावर हें शहर वसलें आहे. कराचीहून ९०७, मुंबईहून ९८२ व कलकत्त्याहून ९५६ मैल दूर हें शहर आहे. १९१२ पासून ब्रिटिश हिंदुस्थानची ही राजधानी बनली. नव्या व जुन्या शहराचे मिळून २५ चौ. मैल क्षेत्रफळ आहे. सर्व जातींचे, धर्मांचे व पंथांचे लोक येथें राहतात. मुसलमानांची संख्या इतरांपेक्षां जास्त आहे. समुद्रसपाटीपासून सुमारें ७१८ फूट उंचीवर हें शहर वसलें असून समुद्रापासून सुमारें ६०० मैल लांब आहे व त्यामुळें हवा विषम व कोरडी आहे. हिंवाळ्यांत कडक थंडी व उन्हाळ्यांत तीव्र उन्हाळा असतो. पाऊस सरासरी २६ इंच पडतो. शहराच्या आसपासची जमीन सुपीक असून यमुनेच्या कालव्याच्या पाण्यावर गहूं, कापूस, नीळ व गळिताचीं धान्यें यांचीं मोठीं पिकें होतात.

जवाहिरांचें व हस्तिदंताचें काम, कातकाम, चांदी, तांबें व पितळ यांचीं भांडीं, जरतारी कापड, गालिचे, जीग, शाली, वगैरे मौल्यवान् व कौशल्यपूर्ण कारागिरीच्या जिनसांविषयीं दिल्ली शहराची प्राचीन कालापासून ख्याति आहे. येथून सर्व दिशांस आगगाडी गेली आहे व त्यामुळें हें गाड्यांचें केंद्र बनलें असून व्यापाराची मोठी मध्यवर्ती पेठहि बनलें आहे.

शहराभोंवतीं पूर्वेकडून यमुना नदीचा वेढा व इतर तिन्ही बाजूंना तीन मैल लांबीचा उंच तट आहे. या तटांतच काश्मीर, अजमीर, दिल्ली, इत्यादि दरवाजे आहेत. शहराच्या उत्तर भागांत रेल्वेचें स्टेशन आहे. स्टेशनला लागूनच दक्षिणेला राणीचा बाग आहे. यापलीकडे चांदणी चौक असून चांदणी चौकापासून सरळ पूर्वेकडे किल्ल्यापर्यंत जाणारा रुंद मोठ्या रहदारीचा रस्ता आहे. या किल्ल्यापासून पूर्व-पश्चिम जाणारा लाहोर दरवाजाजवळील फत्तेपुरी मशिदीपर्यंत रस्ता आहे. हा किल्ला शहाजहानें बांधला. (१६३८ ते १६४८). या किल्ल्याच्या प्रवेशद्वाराला लाहोर दरवाजा म्हणतात. जगांतील कोठल्याहि राजवाड्याचें प्रवेशद्वार इतकें सुंदर नाहीं असें म्हणतात. या किल्ल्याची पूर्व-पश्चिम रुंदी १,६०० फूट असून दक्षिणोत्तर लांबी ३,२०२ फूट आहे. यांत दिवाण-इ-आम व दिवाण-इ-खास, व इतर प्रेक्षणीय इमारती आहेत. किल्ल्याच्या नैर्ऋत्येस जुम्मा मशीद नांवाची भव्य मशीद आहे.

दिल्लीच्या दक्षिणेस फिरोझाबाद आहे. दिल्ली दरवाजापासून तीन मैलांवर हुमायुनाची कबर आहे व निजामुद्दीन या मुसलमानी साधूचा दर्गा येथून पुढें दक्षिणेस (दिल्लीपासून ११ मैलांवर) आहे. ११९३ मध्यें दिल्ली घेतल्यानंतर कुतुबुद्दिनानें बांधलेली 'कुवाल-उल्-इस्लाम' या नांवाची मशीद आहे. या मशिदीच्या आवारांतच ५३ फूट उंच असलेल्या एका मध्यवर्ती कमानीसमोर १६ इंच व्यासाचा व २३ फूट ८ इंच उंचीचा लोहस्तंभ आहे. हा लोहस्तंभ सन १५०२ मध्यें अनंगपाल या राजानें मथुरेहून आणून आपल्या किल्ल्यांत उभा केला. तो अनंगपालाच्या किल्ल्यांतून आणून कुतुबुद्दिनानें वरील मशिदींत उभा केला असावा असें म्हणतात. नव्या दिल्लीची रचना व बांधणी १९२१ मध्यें सुरू झाली व वसाहत १९२७ सालीं झाली. जुन्या दिल्लींतून नव्या दिल्लीकडे जातांना राजा जयसिंगानें १७२४ मध्यें बांधलेली वेधशाळा (सध्यां पडक्या स्थितींत असलेली व दिल्लींत 'जंतर मंतर' म्हणून ओळखली जाणारी) लागते. नव्या दिल्लींतील प्रशस्त रस्ते, विशिष्ट हेतूनें व विशिष्ट दर्जाच्या नोकरवर्गासाठीं बांधलेल्या नव्या पद्धतीच्या इमारती, असेंब्ली हाऊस, सेक्रेटरीएटीची इमारत, व्हाइसरॉयचें निवासस्थान, त्यांभोंवतींच्या बागा, समोरचें मेमोरियल, इत्यादि स्थळें पाहण्यासारखीं आहेत.

दिल्लीच्या प्रदेशास नैसर्गिकरीत्या उत्कृष्ट स्थान मिळाल्यानें या ठिकाणीं प्राचीन काळापासून एकामागून एक अशीं अनेक शहरें होऊन गेलीं आहेत. त्यांपैकीं सर्वांत जुनें शहर म्हणजे युधिष्ठिरानें स्थापन केलेलें इंद्रप्रस्थ हें होय. सध्यां तेथें इंद्रपत नांवाचें एक खेडें दिसतें आहे. दिल्लीचें ऐतिहासिक अस्तित्व, अनंगपाल या तोमर वंशीय रजपुतानें अकराव्या शतकांत हल्लीं कुतुबमिनार आहे तेथें एक तांबडा किल्ला बांधून गांव वसविलें तेव्हांपासून मानलें जातें. त्याच्या घराण्यानें १०० वर्षें राज्य केल्यावर त्याच्या जागीं अजमीरचा चव्हाण वीसलदेव यानें आपलें राज्य स्थापन केलें. वीसलदेवाचा नातू पृथ्वीराज चव्हाण यानें दिल्ली व अजमीर यांवर राज्य करून दिल्ली येथें पृथ्वीपूर नांवाचें गांव वसविलें. ११९२ त पृथ्वीराजाचा तिरावारी येथे महंमद घोरीनें पराभव केला. ११९३ त महंमदाचा गुलाम कुतुबुद्दीन यानें दिल्ली शहर सर केलें. यानें येथें मशीद, कुतुब-

मिनार व बारा कमानी बांधल्या. १२९० पर्यंत गुलाम घराण्यानें राज्य केल्यावर दिल्लीचा ताबा खिलजी घराण्यांकडे गेला. १३२१ त घियासुद्दीन तुघलखानें आपलें घराणें स्थापन करून पूर्वेस चार मैलांवर तुघलखाबाद येथें नवीन राजधानी स्थापिली. पुढें फिरोजशहा तुघलखानें फिरोजाबाद हें शहर दक्षिणेस वसवून तेथें राजधानी नेली. या राजाच्या राजवाड्याच्या अवशेषांमध्यें अशोकानें इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत उभारलेला स्तंभ आहे; यास फिरोजशहाची लाट असें म्हणतात. याची लांबी '४२ फूट असून तो गुलाबी रंगाच्या दगडांचा केलेला आहे व त्यावर पालीमध्यें अशोकाचीं १ ते ७ शासनें कोरलेलीं आहेत.'

१३९८ त तैमूरलंगानें दिल्लीवर स्वारी करून पांच दिवस-पर्यंत शहरांत लूट व कत्तल केली; व पुष्कळ स्त्री-पुरुषांना गुलाम करून बरोबर नेलें. पुढें महंमदशहानें १४१२ पर्यंत तेथें राज्य केलें. त्याच्या मरणानंतर सय्यद घराण्यानें १४५० पर्यंत राज्य केल्यावर येथें लोदी घराणें स्थापन झालें. १५२६ त बाबरानें पानपत येथें इब्राहिम लोदीचा पराभव केला. पण बाबर हा दिल्लीस न राहतां आग्र्यासच राहत असे. हुमायुनानें दिल्लीस राहून इंद्रप्रस्थाचा जुना किल्ला दुरुस्त केला. १५४० त शेरशहानें हुमायुनास पळावयास लावून शहराचा ताबा घेतला व त्यास भक्कम तटबंदी केली. त्याच्या मुलानें सलीमगडचा किल्ला बांधला. अकबर व जहांगीर हे दिल्लीस क्वचित् राहत असत. पुढें शहाजहानानें आपलें ठाणें येथें ठेवून त्याच्यासभोंवतीं पुनः तटबंदी बांधून त्यास शहाजहानाबाद असें नांव दिलें व तेव्हांपासून अखेरपर्यंत मोंगलांची दिल्ली हीच राजधानी होती. १७३९ त नादिरशहानें दिल्लींत शिरून तैमूरलंगाप्रमाणें लूट व कत्तल केली; व अपार संपत्ति लुटून ५८ दिवसांनीं शहर सोडलें. यानंतरचे मोंगल बादशहा कमकुवत निपजले; त्यांना आपल्या हातीं सत्ता राखतां येईना. तेव्हां १७५९ मध्यें मराठ्यांनीं दिल्ली काबीज केली व भाऊसाहेब पेशव्यानें १७६१ मध्यें दिल्लीच्या बादशहाचें तख्त असलेल्या दिवाणखान्याचें चांदीचें छत फोडून काढलें. पुढें १८०३ पर्यंत दिल्ली मराठ्यांच्याच ताब्यांत होती. या शहरांत १७७८ पासून मराठ्यांची शिबंदी कायम ठेवण्यांत आली व ब्रिटिश येईपर्यंत शहाअलम बादशहा हा शिंद्यांचा ताबेदार होऊन राहिला होता. १८०३ मध्यें लॉर्ड लेक यानें मराठ्यांचा पराभव करून दिल्लींत प्रवेश केला व बादशहाला आपल्या संरक्षणाखालीं घेतलें. १८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धांत हें शिपाई लोकांच्या ताब्यांत सहा महिनेपर्यंत होतें. नंतर पुनः इंग्रजांच्या आधिपत्याखालीं गेलें. येथें १८७७ त व्हिक्टोरिया राणीनें 'हिंदुस्थानची बादशाहीण' हा किताब घेतला. १९०३ सालीं सातव्या एडवर्डच्या राज्यारोहणाच्या वेळीं येथें दरबार भरला होता. त्याचप्रमाणें १२ डिसेंबर १९११ रोजीं पंचम जॉर्ज यांनीं या ठिकाणीं दरबार भरवून हिंदुस्थानची दिल्ली ही राजधानी म्हणून जाहीर केलें. त्यापूर्वी कलकत्ता हीच ब्रिटिशांची राजधानी होती.

दिल्ली ही हिंदुस्थान सरकारची राजधानी झाल्यापासून तिची नवीन रचना करण्याची मोठी योजना झाली व १९४५-४६ पर्यंत सुमारें २२ कोटी रुपये खर्च करण्यांत आले. १९४१ त नवीन वाढलेल्या शहराची लोकसंख्या ९३,७३३ होती. १९३२ सालीं नव्या दिल्लीसाठीं नवीन म्युनिसिपालिटी स्थापन झाली. १९३७ सालीं इंप्रूव्हमेंट ट्रस्टची स्थापना केली.

दिल्लीस अनेक संस्था व त्यांच्या इमारती आहेत. १९२२ सालीं येथें एका विद्यापीठाची स्थापना झाली. मुंबई, कलकत्ता, लाहोर, कराची व मद्रास या शहरांशीं आगगाड्यांच्या व आतां विमानांच्या योगानें प्रत्यक्ष संबंध ठेवलेला आहे.

१९४७ सालीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाल्यापासून या राजधानीचें महत्त्व अतिशयच वाढलें व त्याचबरोबरच अतिशय गर्दीहि झाली आहे. त्यांतून पाकिस्तानच्या विघटनेमुळें असंख्य निर्वासित दिल्लीस येऊन राहिले आहेत. दिल्लीच्या लाल किल्ल्यालाहि बरीच प्रसिद्धि मिळाली आहे.

**दिवस**—शास्त्राप्रमाणें किंवा कायद्याप्रमाणें सूर्योदयापासून सूर्योस्तापर्यंत किंवा एका मध्यरात्रीपासून दुसऱ्या मध्यरात्रीपर्यंत चोवीस तासांचा काल. हा सौर दिवसाचा काल झाला. नाक्षत्र दिवस २३ तास, ५६ मिनिटें व ४.०९८ सेकंदें इतका नेहमीं असतो. स्थलाच्या अक्षांशाप्रमाणें व ऋतुमानाप्रमाणें दिवस-रात्रींची कालमर्यादा बदलत असते. हिंदूंची तिथि सूर्योदयापासून सुरू होते. प्राचीन बाबिलोनी लोकांतहि असेंच असे. ज्यू लोक सूर्योस्तापासून दिवस मोजतात. मिसरी आणि रोमन लोक मध्यरात्रीपासून दिवस धरीत. आज बहुतेक देश असेंच करतात.

**दिवा**—ज्यापासून प्रकाश व उष्णता मिळते अशा साधनास दिवा म्हणतात. आपल्या देशांत निरनिराळ्या प्रकारच्या तेलाचे दिवे फार प्राचीन काळापासून प्रचारांत होते. रॉकेल आल्यानंतर हे दिवे मागें पडले. पण या दिव्यांचे अनेक आकारांचे नमुने अद्यापहि दृष्टीस पडतात. आपल्या इकडे रॉकेलचे अर्गनी नांवाचे वाटोळ्या वातीचे टांगण्याचे दिवे मध्यंतरीं प्रचारांत होते. ते प्रथम १७८४ मध्यें होमे अर्गंड यानें जिनेव्हा येथें तयार केले. यामध्यें दिव्याच्या खालून, मध्यें असलेल्या नळींतून वातीच्या आंतल्या बाजूस व बाहेरून असा दुहेरी हवेचा पुरवठा होत असे. यावर वातीभोंवतीं कांचेची उंच नळी बसविल्यामुळें तेलाचें ज्वलन चांगलें होत असे. अलीकडच्या बहुतेक दिव्यांतील बर्नर या दिव्याच्या बर्नरवरूनच बनविलेले असतात. अलीकडे

ल्ली — संगमरवरी खिडकी ( दिवाण-इ-खास ) ( पृ. ११८८ )

दिल्ली — कुतुबमिनार व लोहस्तंभ ( पृ. ११८७ )

परावर्तक दुर्बीण ( पृ. ११९८ )
[ विल्सन पर्वतांतील ( कॅलिफोर्निआ ) वेधशाळा — ही जगांतील मोठी दुर्बीण आहे. ]

कांहीं ठिकाणीं प्रकाश उत्पन्न करण्याकरितां तेलाचें आंशिक वाष्पीभवन करण्यांत येतें. तेलाचें जेव्हां वायूमध्यें पूर्णतः रूपांतर होतें तेव्हां बन्सेन बर्नरसारख्या बर्नरच्या ज्योतीचा, एखादी जाळी ( मेंटल ) प्रकाश देण्याइतक्या स्थितींत येईपर्यंत तापवून तीपासून प्रकाश देण्याची सोय करण्यांत येते. जेथें गॅस किंवा वीज मिळत नाहीं तेथें दीपगृहा( लाइटहाउस )मधूनहि असले दिवे वापरण्यांत येतात. किटसनचे दिवे या प्रकारचे होत. हे मिरवणुकीकरितां वगैरे सोयीचे असतात. असिटिलिनचा गॅस पेटवून उजेड देणारे दिवे सायकली–मोटारींकरितां वापरण्यांत येतात. या दिव्यांत खट कर्बिद (कॅल्शियम कार्बाइड ) भरून त्यावर थेंब थेंब पाणी गाळण्यांत येतें व त्यापासून निघणारा वायु नळींतून शुद्ध करून बर्नरकडे नेण्यांत येतो. अलीकडे विजेचे दिवे अधिकाधिक प्रचारांत येत आहेत. व बाकीचे सर्व मागें पडत आहेत. यांत कांहीं धातूंची तार उजेड देण्याइतकी तापवून प्रकाशदायक करण्यांत येते. आज निऑन किंवा फ्लुरोसेंट लाइट, या प्रकारचे नवीन जास्त उजेडाचे दिवे वापरांत येऊं लागले आहेत.

**दिवाकर**—एक भारतीय ज्योतिषी. हा एका प्रसिद्ध गोल ग्रामस्थ विद्वान् कुलांत शके १५२८ मध्यें जन्मला. यानें ‘ जातकमार्गपद्म ’ नांवाचा जातकग्रंथ केला. त्याला पद्मजातक असेंहि नांव आहे. केशवी जातक पद्धतीवर प्रौढमनोरमा नांवाची टीका यानें शके १५४८ त केली. तसेंच आपल्या जातक पद्धतीवर ‘ गणिततत्त्वचिंतामणि ’ नांवाची सोदाहरण टीका शके १५४९ त केली. पंचांगसाधक मकरंदावर याची ‘ मकरंद–विवरण ’ नांवाची सोदाहरण टीका आहे. व्याकरण, न्याय व काव्यसाहित्य यांतहि हा प्रवीण होता.

**दिवाकर पुरुषोत्तम चोरघडे** ( १७०१–१७८१ )—याला देवाजीपंत चोरघडे असेंहि म्हणत. हा महाराष्ट्रांतील साडेतीन शहाण्यांपैकीं एक असून नागपूर प्रांतांतील नरखेडचा राहणारा होता.

हा प्रथम कोन्हेरराम कोल्हटकराकडे राहून अंगहुशारीनें भोंसल्यांच्या कारभारांत उदयास आला. भोंसले हे नेहमीं पैशाच्या अडचणींत असत. दिवाकर पुरुषोत्तमानें अनेक सावकार आपल्या लगामीं ठेवून भोंसलेशाहीचा सर्व कारभार मोठ्या चातुर्यानें आपल्या ताब्यांत ठेवला होता.

हा जानोजी भोंसल्याचा मुख्य कारभारी होता. हा जानोजी भोंसल्यास रघुनाथदादाशीं व निजामाशीं कारस्थानें करण्याचा सल्ला देतो म्हणून जेव्हां हा भोंसल्याच्या तर्फेनें पेशव्यांशीं बोलणें करण्यासाठीं आला, तेव्हां पेशव्यांनीं याला पकडून कैदेंत ठेविलें. पण तेथेंहि जानोजी पुण्यावर चाल करणार असा खोटा पत्रव्यवहार माधवरावाच्या हातीं पडेल असा तयार करून यानें आपली सुटका करून घेतली. इंग्रज नेहमीं यास जाळ्यांत पकडण्यास पाहत असत. पण हा कसलेला मुत्सद्दी त्यांच्या जाळ्यांत सांपडला नाहीं. पुढें हा मुधोजीचा कांहीं दिवस कारभारी झाला. हा वयाच्या ८० व्या वर्षी मरण पावला. ‘ सखा देवा विठ्ठल ’ या तीन शहाण्यांच्या नामावळींत देवा हें याजबद्दल आहे.

**दिवाकर, रंगराव रामराव** ( १८९४- )—कर्नाटकांतील राजकीय, सांस्कृतिक व भाषिक चळवळीचे अध्वर्यू, कानडींतील उत्कृष्ट लेखक व आजच्या हिंदुस्थान सरकारचे एक मंत्री. हे हुबळीचे माध्व वैष्णव ब्राह्मण. बी. ए. झाल्यावर कांहीं दिवस हुबळीच्या कर्नाटक एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलमध्यें शिक्षक होते. एम्. ए. झाल्यानंतर हे कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजांत व नंतर क. ए. सो. च्या कॉलेजांत इंग्रजीचे प्राध्यापक झाले. एल्एल्. बी. असूनहि ह्यांनीं वकिली कधींच केली नाहीं. असहकारितेच्या चळवळींत तर हे सुरुवातीपासूनच पुढें असत. त्यासाठीं १९२१ सालीं यांना पहिली शिक्षा झाली. त्यानंतरहि ते अनेक वेळां तुरुंगांत गेले. यांची अत्यंत साधी राहणी, संग्राहक वृत्ति आणि कष्टाळू स्वभाव यांमुळें यांना ‘ कर्नाटक गांधी ’ असें लोक म्हणतात.

कानडी, इंग्रजी, हिंदी व मराठी या भाषा यांना चांगल्या येतात. तथापि आपल्या कानडी या मातृभाषेचे हे निष्ठावंत सेवक आहेत. ‘ संयुक्त कर्नाटक ’ या दैनिक पत्राच्या संस्थेची स्थापना करून तिचे हे विश्वस्त झाले. या संस्थेतर्फे ‘ कर्मवीर ’ हें कानडी साप्ताहिक निघत असतें. यांचें कानडी भाषेंतील लेखन अत्यंत लोकप्रिय आहे. राष्ट्रीय वृत्ति व भक्तिमार्गी आध्यात्मिकता यांचा यांच्या ग्रंथांत सुंदर मिलाफ झाला आहे. यांना बल्लारी कर्नाटक साहित्य परिषदेचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें. हे कर्नाटक–एकीकरण चळवळीचेहि फार मोठे पुरस्कर्ते आहेत.

यांचे कानडी ग्रंथ—१ हरिभक्तिसुधे, २ उपनिषद्रहस्य, ३ कर्मयोग, ४ उपनिषत्कथावली, ५ उपनिषत्प्रकाश, ६ अन्तरात्मनिगे, ७ गीतेय गुट्टु ( गीतेचें मर्म ), ८ भक्तिसूत्रगळु ( नारद व शांडिल्य या सूत्रांवरील टीका ), ९ सत्याग्रह ( इतिहास मत्तु तंत्र ), १० राष्ट्रीय शिक्षण ( वर्धायोजना मत्तु प्रौढर शिक्षण ), व ११ वचनशास्त्र ( लिंगायत धर्मग्रंथावर पुस्तक ).

**दिवाण चमनलाल** ( १८९२– )—एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण कांहीं मरी येथील कॉन्व्हेंटमध्यें व कांहीं रावळपिंडी येथील गॉर्डन मिशन कॉलेजमध्यें झाल्यावर ते युरोपांत गेले व तेथें त्यांनीं फोक्स्टन, लंडन व पॅरिस येथें खासगी शिक्षकांजवळ अभ्यास केला. पुढें ते १९१४ मध्यें बॅरिस्टर झाले. १९१८–१९ मध्यें त्यांनीं लोकमान्य टिळक यांच्यासह होमरूल लीगच्या शिष्ट-

मंडळांतील प्रतिनिधि म्हणून सर्व इंग्लंडभर प्रचार व प्रवास केला. त्यांची कांहीं काल 'कोटेरी' नांवाच्या कला व शास्त्र विषयाच्या नियतकालिकाचे संपादक म्हणून नेमणूक झाली होती. १९२० मध्यें ते हिंदुस्थानास परत आले व 'बाँबे क्रॉनिकल'चे दुय्यम संपादक म्हणून राहिले. १९२० मध्यें त्यांनीं 'ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस'ची स्थापना केली. १९२३ ते १९३० पर्यंत ते मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. यांनीं 'नेशन' या नांवाचें एक दैनिक व साप्ताहिक पत्र सुरू केलें. जिनिव्हा येथें १९२८ मध्यें भरलेल्या सार्वराष्ट्रीय कामगार परिषदेच्या हिंदी शिष्टमंडळाचे हे सल्लागार होते. त्याच वर्षी कानडामध्यें जें हिंदी प्रतिनिधिमंडळ गेलें होतें त्यांत हे पार्लमेंटरी प्रतिनिधि होते. १९२९-३१ मध्यें नेमलेल्या 'रॉयल कमिशन ऑन इंडियन लेबर' याचे ते सभासद होते. १९३० मध्यें भरलेल्या गोलमेज परिषदेचें सभासदत्व यांनीं नाकारलें. जकातीच्या धोरणासंबंधानें मतभेद झाल्यामुळें त्यांनीं मध्यवर्ती असेंब्लीचा राजीनामा दिला. १९२९ मध्यें भरलेल्या सिंध प्रांतिक परिषदेचे ते अध्यक्ष होते. १९३० मध्यें ते भारतीय पोस्टल व आर्. एम्. एस्. असोसिएशनचे अध्यक्ष होते. ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस सोडून देऊन त्यांनीं नवीन ऑल इंडिया ट्रेड युनियन फेडरेशन काढण्याच्या कामीं मदत केली. १९३२ मध्यें इंटर नॅशनल लेबर कॉन्फरन्स ब्यूरोवर त्यांची कामगारांचे प्रतिनिधि म्हणून नेमणूक झाली. यांनीं 'कूली' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. नुकतेंच त्यांना सरकारनें जपानची औद्योगिक पाहणी करण्यास पाठविलें होतें. या पाहणीचें त्यांनीं एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे.

**दिवाणी कायदा**—हा एक कायद्याचा भाग आहे. मनुष्याचा दुसऱ्या मनुष्याशीं जेथे संबंध येतो तेथें सरकार इतकेंच पाहतें कीं, ही दोन माणसें परस्परांशीं न्यायानें वागत आहेत. फौजदारी कायद्यांत नागरिकांच्या संरक्षणाचा प्रश्न असतो. रोमन लोकांनीं असे कायद्याचे विभाग पाडले. दिवाणी कायद्याखालीं येणारे अनेक कायदे या कोशांत स्वतंत्रपणें विवेचिले आहेत.

आपल्याकडे मराठ्यांच्या अमदानींत पैसा व वतन ह्यांबद्दलचेच दावे बहुशः असत. सरकारच्या परवानगीवांचून कोणालाहि दत्तक घेतां येत नसे. सरकारकडून हरकत दूर करून मागण्याचे दावेहि अपरिचित नव्हते. मनाईहुकमाची दाद मागण्यापर्यंत लोकांची मजल गेली होती. कोणी बिनवारस मयत झाल्यास त्याची मिळकत सरकारकडे जावयाची. दिवाणी दाव्याचा अखेरचा निकाल हुजूरकडून लावून घेत. दिवाणी व फौजदारी खटले चालविण्याचा अधिकार जहागीरदारांनाहि असे. कब्जा हरणारांपासून सरकार कर घेई त्यास हरकी म्हणत.

**दिवाळखोर**—ज्याला कायद्यानें आपलें कर्ज निवारण्याच्या कामीं असमर्थ ठरविलें आहे असा माणूस. आपण दिवाळखोर आहों असें ठरवून घेण्यास त्या माणसानें स्वतः कोर्टाकडे अर्ज करावा किंवा त्यांच्या धनकोंनीं करावा. कोर्ट चौकशी करून त्याची मालमत्ता धनकोमध्ये प्रमाणशीर वांटून देतें व त्याला कर्जांतून मोकळा करतें.

**दिवाळी**—हिंदूंचा एक महत्त्वाचा सण. दीपावली या शब्दाचा अपभ्रंश दिवाळी असा झाला आहे. हा सण आश्विन वद्य चतुर्दशीपासून कार्तिक शुद्ध द्वितीयेपर्यंत म्हणजे चार दिवस असतो. कित्येक धनत्रयोदशी म्हणजे आश्विन वद्य त्रयोदशीहि या सणांत धरतात; यामुळें हा सण पांच दिवसांचा होतो.

मुख्य पिकें निघून व पाऊस उघडून थंडीस सुरवात होते अशा उत्तेजक, उत्साहक वेळीं हा सण येतो. यामुळें एकंदर वातावरण आनंदमय असतें. या सणांतील एकंदर कार्यक्रम सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें असतो: आश्विन वद्य त्रयोदशीस सायंकाळीं घराच्या बाहेर यमदेवाप्रीत्यर्थ दीपदान करण्यांत येतें. या दिवशीं आतेष्टांना धन, धान्य व गूळ देण्याची चाल आहे. आश्विन वद्य चतुर्दशीस नरकासुराचा वध श्रीकृष्णानें केला; त्या दिवशीं पहाटें उठून लोक तेलें, उटणीं लावून अभ्यंगस्नान करतात. अमावास्येच्या दिवशीं लक्ष्मीपूजन व कुबेरपूजन हे विधी होतात. व्यापारी लोकांचें हिशोबी वर्ष या दिवशीं संपून कार्तिक शु. प्रतिपदेस नव्या वर्षास आरंभ होतो; हा दिवस म्हणजे विक्रम संवताचा पाडवा असतो. या दिवशीं बलीच्या राज्यास सुरवात झाली असें म्हणतात. म्हणून यास बलिप्रतिपदा म्हणतात. दानधर्म करून गाईंना सजवून त्यांची पूजा करणें वगैरे विधी या दिवशीं होतात. कांहीं व्यापारी लोक या दिवशीं आपल्या नव्या वहीची पूजा करतात. कार्तिक शुद्ध द्वितीयेस यमद्वितीया म्हणतात. भाऊबीज याच दिवशीं असते. त्या दिवशीं बहिणीनें भावाचें सत्कारस्वागत करावयाचें व भावानें तिला ओवाळणी घालावयाची असा प्रकार असतो.

याशिवाय रोज लाडू, करंज्या, चकल्या, वगैरेंचा फराळ, पक्वान्नांनीं युक्त असें भोजन, शोभेची दारू उडविणें, वगैरे आनंदप्रदर्शक गोष्टी घरोघर चालतात. महाराष्ट्रांत मुलें शिवाजीच्या पराक्रमाची आठवण म्हणून किल्ले करतात.

**दिविदिवी**—[ सिसाल्पिनिआ केरिआरिआ ]. एक झाड. हें मूळचें दक्षिण अमेरिकेंतील असून १८३४ सालीं याचा हिंदुस्थानांत प्रवेश झाला. हें कुंपणास उपयोगी पडणारें झाड असून व्यापारीदृष्ट्या उपयुक्त आहे. या झाडांचीं तयार रोपें मिळतात. याचें बी एक औंस घेतलें असतां सुमारें १०० झाडें तयार होतात. याच्या शेंगांत टॅनिक व गॅलिक अम्लाचें प्रमाण बरेंच

असतें म्हणून चामडें रंगविणें व लांकडास लावण्याचें रोगण तयार करणें या कामीं या झाडाचा फार उपयोग होतो. मुंबई इलाख्यांतील धारवाड जिल्ह्यांत या झाडाच्या फळांपासून बरेंच उत्पन्न होतें. याचा औषधी उपयोगहि आहे.

**दिवोदास**—एक वैदिक राजा. याचा पुत्र किंवा नजीकचा वंशज सुदास होय. पुराणांतून दुसरा एक दिवोदास राजा आढळतो. हा काशीपति सुदेव राजाचा पुत्र. याचें दिवोदास असें नांव असतांहि यास पित्याच्या नांवावरून सौदेव असें म्हणत असत. यानें इंद्राच्या अनुग्रहावरून भागीरथीच्या उत्तर तीरीं व गोमतीच्या दक्षिण तीरीं वाराणसी नांवाची पुरी निर्माण करून तेथें वास्तव्य केलें होतें. यास हैहयकुलोत्पन्न राजांनीं अतिशय त्रास दिला तेव्हां हा भारद्वाज ऋषीस शरण गेला, व प्रार्थना करून म्हणाला कीं, हैहयांस जिंकील असा मला पुत्र व्हावा. तेव्हां भारद्वाजानें त्याच्याकडून पुत्रकामेष्टि करविल्यावर यास प्रतर्दन नांवाचा पुत्र झाला. पुढें प्रतर्दनानें हैहय राजांस जिंकून दिवोदासास सुखी केलें.

**दिव्य**—एक खऱ्याखोट्याचा निर्णय करण्याची जुनी पद्धति. हा शब्द अथर्ववेद व मागाहून झालेल्या वाङ्मयांत (उदा., पंचविंश ब्राह्मण) आलेला आहे. पण वैदिक वाङ्मयांत दिव्य करण्याच्या चालीचे कित्येक उल्लेख आलेले आहेत. अथर्ववेदामध्यें अग्नीचें दिव्य केल्याबद्दल उल्लेख आहे. पंचविंश ब्राह्मणांत ह्या अग्नीच्या दिव्याचा उल्लेख आलेला आहे. आणि तो तेजोमय परशूसह दिव्याचा उल्लेख आहे. व तें दिव्य चोरीच्या आरोपाच्या बाबतींत केलेलें आहे.

रोमन कायदेपद्धतींत हा प्रकार मुळींच नव्हता. ग्रीकांना माहीत होता, पण न्यायदानांत त्याचा ते उपयोग करीत नसत. चिनी व अमेरिकन इंडियन लोकांत या पद्धतीची वाढ झाली नाहीं. कुराणांत दिव्याचा स्पष्ट निषेध केला आहे. दिव्यांचा विशेष प्रचार हिंदु, आफ्रिकन व ट्युटॉनिक या लोकांतच आढळतो. आफ्रिकेंत विषदिव्य विशेष रूढ आहे.

सुमेरो-बाबिलोनियन या प्राचीन संस्कृतीच्या लोकांत कायदेशास्त्र बरेंच वृद्धि पावलें असल्यामुळें दिव्यांना महत्त्व नव्हतें; पण मानवी पुरावा हतबल ठरल्यास एका जलदिव्याचा उपयोग करण्याबद्दल खमुरब्बीच्या कोडांत उल्लेख आहे. एखाद्या नदींत उडी घालण्यास सांगून त्यांतून आरोपी वांचल्यास त्याच्यातर्फे निकाल देत.

रोमन कायद्यांत दिव्याला स्थान नव्हतें, तथापि प्राचीनतम रोमन समाजांत दिव्यें करीत असत. त्यांपैकीं अग्नींतून चालत जाणें हा एक प्रकार असे. जादूनें भारलेली भाकर खावयास दिल्यावर ती ज्याच्या घशांत अडकेल तो खरा गुन्हेगार होय असा एक दिव्याचा प्रकार असे. तिसरा प्रकार द्वंद्वयुद्धाच्या दिव्याचा. वादविषयाचा निर्णय द्वंद्वयुद्धानें करण्याची चाल युरोपांत खिस्तोत्तर १४-१५ व्या शतकापर्यंतहि फार रूढ होती. आणि तिचा थोडाफार अवशेष अजून सांपडतो.

अवेस्ता ग्रंथांत सुमारें ३३ प्रकारचीं दिव्यें दिलीं आहेत, त्यांत उष्ण व थंड अशा दोन जाती आहेत. अग्नि, उकळणारें पाणी, वगैरे उष्ण, आणि विषप्राशन वगैरे थंड दिव्यांचे प्रकार होत.

कुराणपूर्वकालीन अरबांत अग्निदिव्य प्रचलित होतें. त्याकरितां तरवार, चमचा, किंवा दुसरा एखादा धातूचा जिन्नस खूप तापवीत व तो आरोपीकडून जिभेनें चाटवीत. ज्याची जीभ भाजेल तो हरला असें समजत. कुराणांत ह्या प्रकाराचा निषेध असल्यामुळें तदनंतर दिव्यें बंद झालीं. मात्र जारकर्मांत आणि खुनांत शपथ करविण्याची पद्धत अद्याप चालू आहे.

इंग्रजी होण्यापूर्वीं मराठी व मुसलमानी राज्यांत व तत्पूर्वींहि दिव्य करण्याचा प्रघात होता. तंटाभांडणाचा निकाल या दिव्य पद्धतीनें होई. वाक्पारुष्य, दंडपारुष्य व स्तेय इत्यादि व्यवहारनिर्णयाच्या बाबतींत दिव्य करीत.

दिव्य केव्हां करावयाचें याबद्दल नियम असे. ज्या वेळीं लेखी व तोंडी पुरावा मुळींच मिळत नसेल त्या वेळीं मात्र दिव्य करावें, नाहीं तर करूं नये (याज्ञवल्क्य स्मृति, अ. २. श्लो. २२). तसेंच ज्या ग्रामसभेपुढें निर्णय होई तींतील गोतसभासदांची खात्री जर नुसत्या तोंडी पुराव्यावरून होत नसेल तर दिव्य करीत.

या दिव्याचे प्रकार अग्नि, जल, तुला, विष, इत्यादि असत. ऋग्वेद (१.१५८.४), पंचविंश ब्राह्मण (१४-६-६), छांदोग्य उपनिषद् (६-१६) व कौशिक सूत्र (५२-८) यांत अग्निदिव्याचा आणि शतपथ ब्राह्मण (११-२-७) यांत तुलादिव्याचा उल्लेख आहे. आपस्तंबाखेरीज इतर धर्मसूत्रांत दिव्यासंबंधीं उल्लेख नाहीं. मनुस्मृतींत दिव्यांचा उपयोग व्यवहार निर्णयांत करण्याबद्दल स्पष्ट सांगितलें आहे.

महाराष्ट्रांत दिव्य करण्याचीं ठिकाणें पुढीलप्रमाणें होतीं: पैठण येथील एकनाथाचें देऊळ, रांजणगांव (निजामशाही) येथील मशीद, खेडशिवापूर येथील महादेवाच्या देवळासमोरील पिंपळाचें झाड; कऱ्हाड येथील कृष्णा—कोयना संगम, माहुली येथील कृष्णा—वेण्या संगम, रहिमतपूरचें कृष्णाकांठाचें शिवनाथाचें देऊळ, निंब (सातारा जिल्हा) येथील सदानंद गोसाव्याचा मठ, पंढरपूरच्या सभामंडपांतील रंगशिळा, (खंडोबाच्या) पालीचें (सातारा जिल्हा) खंडेरावाचें मंदिर, पुण्यास नागेश्वराचें व ओंकारेश्वराचें देऊळ व शेखसल्ला मशिदी, इ. जुन्या कागदपत्रांतून अशा दिव्यांचे उल्लेख अनेक सांपडतात.

**दिशा**—दिश् या संस्कृत शब्दाचा अर्थ दिशा असा असून तो ऋग्वेदामध्यें व पुढें झालेल्या ग्रंथांतहि आकाशाचा चतुर्थ भाग या अर्थानें वारंवार आलेला आहे. सामान्यतः पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण अशा चार दिशांचा उल्लेख येतो. पण कधीं कधीं या दिशांत अधिक दिशांची भर पडून एकंदर संख्या १० पर्यंत गेलेली आहे.

चार दिशांचे कोपरे आग्नेय, नैर्ऋत्य, वायव्य, आणि ईशान्य व ऊर्ध्व आणि अधर मिळून दहा दिशा मानण्यांत येतात. हिंदु ज्योतिषपुराणांतून दिशांचे स्वामी ठरविलेले असून अष्टदिग्पाल व अष्टदिग्गज मानले आहेत.

**दीपक**—हा पूर्वी थाटाच्या जन्य रागांपैकीं एक आहे. याच्या आरोहांत ऋषभ वर्ज्य आहे, व अवरोहांत निषाद वर्ज्य आहे म्हणून याची जाति षाडव आहे. वादी षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय दिवसाच्या चौथ्या प्रहरचा शेवट युक्त समजतात. कांहींहि कारण असो ; पण एवढें खरें कीं, हा राग गाण्याचें गायकांनीं आज वर्ज्य केल्याचें आढळतें.

**दीपकर**—अतीश पाहा.

**दीपगृह**—समुद्रांतून प्रवास करणाऱ्या गलबतांस विशिष्ट ठिकाणचें नक्की ज्ञान व्हावें किंवा जेथें खडक असेल तें ठिकाण दुरून दिसून तें टाळतां यावें, याकरितां दीपगृहाची योजना केलेली असते. दीपगृहांतील प्रकाश प्रथम लांकडें जाळूनच उत्पन्न करण्यांत येत असे. नंतर दगडी कोळसा वापरण्यांत येऊं लागला. कांहीं दिवसांनीं फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी परवलयात्मक ( पॅरॅबोलिक ) पृष्ठभाग असलेले आरसे वापरण्यांत येऊं लागले. यानंतर फिरते दिवे व त्यांची फिरती रचना प्रचारांत आली. ऑगस्टस फ्रेनेल यानें १८१९ मध्यें प्रथम भिंगांची ( लेन्सेस ) योजना केली. यामध्यें स्टीव्हन्सननें कांहीं सुधारणा घडवून आणल्या. नंतर स्थिरदिवे, चमक मारणारे दिवे, चमक मारणारे दीपसमूह, मध्येंच थांबून थांबून प्रकाश देणारे दिवे, वगैरे निरनिराळे प्रकार दीपगृहांतून दिसूं लागले. कांहीं दीपगृहांतून निरनिराळ्या रंगांचे तांबडे, हिरवे, वगैरे दिवे वापरण्यांत येतात. अत्यंत तीव्र प्रकाश मिळावा याकरितां भिंगांच्या ( लेन्सेस ) रांगा करण्यांत येतात व प्रत्येक भिंगाच्या केन्द्रांत एक एक दिवा लावण्यांत येतो.

कांहीं दिव्यांत साधी तेलवात लावण्यांत येते. कांहींत रक्तोष्ण जाळी वापरण्यांत येते. कांहींत तेलाचा, असिटिलीनचा किंवा कोळशाचा धूर ( गॅस ) वापरण्यांत येतो. कांहीं तरंगत्या भोंवऱ्यांत तेलाचा धूर दाबून भरून ठेवून त्यापासून तीनचार महिने प्रकाश मिळेल अशी व्यवस्था करण्यांत येते. अनेक दीपगृहांत अलीकडे विजेच्या दिव्यांची योजना करण्यांत आली आहे.

अर्वाचीन तऱ्हेचें पहिलें दीपगृह फ्रान्समध्यें गॅरोन नदीच्या मुखाजवळ तूर द कोरदान यानें ( १५८६–१६१० ) सालीं बांधून पूर्ण केलें. प्रथम प्रथम दीपगृहें खासगी मालकीचीं असत. त्यानंतर याकरितां संस्था स्थापन करण्यांत आल्या. हिंदुस्थानांत या कामावर देखरेख करण्याकरितां एक समिति नेमण्यांत आलेली असते.

**दीपवंश**— एक बौद्ध महाकाव्य. सिंहली अठ्ठकथांमध्यें दिलेल्या परंपरेवरून महाकाव्य रचण्याचा हा पहिलाच परंतु अर्धवट प्रयत्न म्हटला म्हणजे, दीपवंशामध्यें दिलेला त्या बेटाचा इतिहास होय. या काव्याच्या कर्त्याचें नांव दिलेलें नाहीं. परंतु बहुतकरून त्यानें हें काव्य ख्रिस्ती शकाच्या चौथ्या शतकाचा आरंभ आणि पांचव्या शतकाचा एक–तृतीयांश यांच्या दरम्यान लिहिलें असावें.

**दीपाबाई**— १. दीपांबा. ही तंजावरकर थोरल्या व्यंकोजी राजाची राणी. ही फार शहाणी, चतुर व दक्ष होती. व्यंकोजी जेव्हां आपल्या वडिलार्जित जहागिरीचा वांटा शिवाजीस देईना व आपल्याला मुसलमानी नोकर म्हणविण्यातच समाधान मानूं लागला, तेव्हां हिनें जुना मुत्सद्दी रघुनाथपंत हणमंते याच्या मध्यस्थीनें या सर्व प्रकरणाचा समाधानकारक निकाल लाविला. खुद्द शिवाजीनें तिची स्तुति केली एवढेंच नव्हे तर जहागिरीची वांटणी झाल्यावर पांच लाख होनांचे प्रांत तिला ‘ चोळीबांगडी ’-साठीं दिले.

दीपाबाई ही सरदार इंगळ्याची मुलगी. हिच्या पोटीं शहाजी, सरफोजी व तुकोजी असे तीन पुत्र झाले. व्यंकोजी वारल्यावर हिनें शहाजीस गादीवर बसवून स्वतः राज्यकारभार हाकला ( १६८२ ). कवि चिंदडशंकर यानें हिच्या स्तुतिपर अभंग रचलेले आढळतात.

२. शिवाजीला सोयराबाईपासून झालेली मुलगी. ही विश्वासराव घराण्यांत दिली होती. हिचा भाऊ राजाराम.

**दीप्पे**—हे फ्रान्समध्यें इंग्लिश खाडीच्या किनाऱ्यावर एक बंदर आहे. बंदर मोठें असून येथें मोठ्या बोटी येऊं शकतात. येथें जरतार, लोंकर व मातीचीं भांडीं होतात. तसेंच हस्तिदंत, शिंगें आणि हाडें यांचे जिन्नस व साखर शुद्ध करण्याचे कारखाने आणि जहाजें बांधण्याचे कारखाने आहेत. येथें मच्छीमारीचा धंदा मोठा चालतो, आणि परदेशाशीं व्यापारहि बराच मोठा आहे. हें बंदर आणि इंग्लंडमधील न्यू हॅवन बंदर यांच्या दरम्यान आगबोटींची वाहतूक नियमित चालू असते. लोकसंख्या २५,११७.

**दीर**—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील प्रांतांत असलेल्या दीर, स्वात, चित्रळ एजन्सींतील एक राज्य. दीर नदीवर असलेल्या दीर खेड्यावरून हें नांव पडलें आहे असें म्हणतात. दीरच्या खोऱ्यास कष्कार हें नांव आहे. मैदान-खोरें व जन्डोल ह्यांचाहि समावेश दीरमध्यें होतो. क्षेत्रफळ (दीर कोहिस्तान धरून) ५,००० ते ६,००० चौ. मैल. लो. सं. अंदाजें १,००,०००. पंजिकोरचें खोरें स्वातच्या खोऱ्याएवढें रुंद नाहीं. कोहिस्तानच्या जंगलांत देवदार लांकूड विपुल आहे.

दीर येथील अधिपति नवाब सर शहाजेहानखान हे आहेत. उत्पन्नाचा दहावा हिस्सा साऱ्यादाखल आकारिला जातो. शक्य तितक्या ठिकाणीं जमिनींत लागवड केली आहे. दीर हे युसुफझई पटाणांच्या ताब्यांत आहे. बष्कार व कष्कार यांमध्यें गुजर लोक पुष्कळ आहेत. पठाणांची भाषा युसुफझई पुश्तु असून गुजर लोक पंजाबी भाषा बोलतात.

**दीर्घवर्तुल**—(एलिप्स). दीर्घवर्तुल हा एक शंकुच्छेद आहे.

ज्या पृष्ठावर लंब वर्तुल किंवा दीर्घवर्तुल काढावयाचें असेल त्यावर दोन टांचण्या (अ, ब) घट्ट बसवा. व त्यांतून टोंकें जोडलेली अबपेक्षां मोठी दोरी जाऊं द्या. व दोरीमध्यें एके ठिकाणीं (क) पेन्सिलीचें टोंक ठेवून दोरी घट्ट ताणा व पेन्सिलीचें टोंक फिरवा म्हणजे दीर्घवर्तुल निघेल. अबचा ड मध्य दीर्घवर्तुलाचाहि मध्य आहे. अब रेषेनें दीर्घवर्तुलाला इ, फमध्यें छेदलें तर इफला मोठा अक्ष (मेजर ॲक्सिस) म्हणतात. डमधून इफला (गह) लंब काढा व तो वर्तुळाला ग, हमध्यें छेदील. तेव्हां गह हा दीर्घवर्तुलाचा छोटा अक्ष (मायनर ॲक्सिस) होय. $\frac{\text{अ ड}}{\text{इ ड}}$ = दीर्घवर्तुलाची केंद्रच्युति (एक्सेन्ट्रिसिटि).

**दीर्घवर्तुलगोल**—(एलिप्साइड). जसा गोल व वर्तुल यांचा संबंध आहे तसाच दीर्घवर्तुलगोलाचा व दीर्घवर्तुलाचा संबंध आहे. टरबुजासारखा आकार असलेल्या दीर्घवर्तुलीय भरीव आकारास दीर्घवर्तुलगोल म्हणतात. त्याचा छेद घेतल्यास दीर्घवर्तुल मिळतें. फक्त दोनच दिशांचे छेद वर्तुल येतात.

**दीर्घवर्तुलफलें**—(एलिप्टिक फंक्शन्स). त्रिकोणमितींतील वृत्तफलें (सर्क्युलर फंक्शन्स) ज्या (साइन) व कोज्या (कोसाइन) फलांचीं सामान्य स्वरूपें होत. वरील वृत्तफलाचा आवर्त (पीरियड) २ π आहे. परंतु दीर्घवर्तुल फलांचा आवर्त दोन तऱ्हेचा आहे: एक सत्य आणि दुसरा पूर्णपणें कल्पित. भोंवऱ्याची व लंबकाची गति यांसंबंधीं प्रश्नांत ह्या फलांचा उपयोग होतो.



**दीव**—हें पोर्तुगाल राष्ट्राच्या ताब्यांतील बेट पश्चिम हिंदुस्थानांत काठेवाड द्वीपकल्पाच्या दक्षिण टोंकाला आहे. याची सर्वांत जास्त पूर्व-पश्चिम लांबी ७ मैल व दक्षिणोत्तर रुंदी २ मैल आहे. याचें क्षे. फ. २० चौ. मै. आहे. दीव बेटाची लोकसंख्या (१९४०) १९,७३१ आहे. पैकीं ख्रिस्ती काय ते अदमासें ३५० च आहेत.

दीव गांव हें बेटाच्या पूर्व टोंकाला नवि बंदरापासून पांच मैलांवर आहे. मागें भरभराटीच्या वेळीं त्याची लोकसंख्या ५०,००० होती असें म्हणतात. एके वेळीं सधन व व्यापाराकरितां प्रसिद्ध असलेल्या या शहराला हल्लीं कांहींच महत्त्व उरलेलें नाहीं. दीवखेरीज ह्या बेटावर दुसरीं तीन मोठीं खेडीं आहेत.

पूर्वी कापड विणणें व रंगविणें हे येथील लोकांचे धंदे असून येथील मालाला परक्या देशांत चांगली किंमत येत असे. हल्लीं मासे मारणें हा मुख्य धंदा आहे.

हें बेट प्रथम गुजरातच्या सुलतानाकडून पोर्तुगीजांनीं घेतलें. त्या वेळीं याचें व्यापारास फार महत्त्व होतें. लोकसंख्या अर्ध्या लाखावर होती. पण पुढें याला पडता काळ आला.

गोव्याच्या गव्हर्नर जनरलच्या हाताखालीं असलेल्या गव्हर्नरकडे दीवचे सर्व मुलकी व लष्करी अधिकार आहेत. जूझ म्युनिसिपालिटीकडे न्यायखातें आहे. गव्हर्नरच्या जागेवर नेहमीं युरोपियन असतो.

भव्य इमारतींनीं पूर्वी यास शोभा आलेली होती. अद्यापि उभ्या असलेल्या इमारतींत १६०१ मध्यें बांधलेलें जेसुइट लोकांचें कॉलिज मुख्य आहे. हल्लीं त्या इमारतींत ख्रिस्ती देवालय असून त्याला 'स मेट्रिझ' असें म्हणतात. सेंट फ्रान्सिसच्या मठांत हल्लीं लष्करी रुग्णालय आहे. सेंट जॉन ऑफ गॉडच्या मठाचा प्रेतें पुरण्याकरितां उपयोग करितात व सेंट डॉमिनिकचा मठ मोडकळीस आला आहे. ह्यांशिवाय येथें गव्हर्नरचा बंगला, तुरुंग, शाळा, वगैरे इमारती आहेत. पोर्तुगीज सत्तेच्या भरभराटीच्या वेळीं येथें सर्व प्रकारचीं नाणीं पाडलीं जात असत.

**दीक्षित, चिंतामणि** (शके १६५८-१७३३)—हा ज्योतिषी पेशवाईत होऊन गेला. याचें वसतिस्थान सातारा. यानें सूर्य सिद्धांताची सारणी केली आणि गोलानंद नांवाचा एक ग्रंथ शके १७१३ मध्यें रचिला. त्यावर टीका यज्ञेश्वर ऊर्फ बाबा जोशी रोडे यांनीं केली. चिंतामणीचे वंशज सांप्रत सातारा येथें आहेत.

**दीक्षित, शंकर बाळकृष्ण** (१८५३-१८९८)—एक महाराष्ट्रीय ज्योतिर्विद्. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत दापोली तालुक्यांत मुरुड गांवीं झाला. मूळचें आडनांव वैशंपायन असून

**दिशा**—दिश् या संस्कृत शब्दाचा अर्थ दिशा असा असून तो ऋग्वेदामध्ये व पुढें झालेल्या ग्रंथांतहि आकाशाचा चतुर्थ भाग या अर्थानें वारंवार आलेला आहे. सामान्यतः पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण अशा चार दिशांचा उल्लेख येतो. पण कधीं कधीं या दिशांत अधिक दिशांची भर पडून एकंदर संख्या १० पर्यंत गेलेली आहे.

चार दिशांचे कोपरे आग्नेय, नैर्ऋत्य, वायव्य, आणि ईशान्य व ऊर्ध्व आणि अधर मिळून दहा दिशा मानण्यांत येतात. हिंदु ज्योतिषपुराणांतून दिशांचे स्वामी ठरविलेले असून अष्टदिग्पाल व अष्टदिग्गज मानले आहेत.

**दीपक**—हा पूर्वी थाटाच्या जन्य रागांपैकीं एक आहे. याच्या आरोहांत ऋषभ वर्ज्य आहे, व अवरोहांत निषाद वर्ज्य आहे म्हणून याची जाति षाडव आहे. वादी षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय दिवसाच्या चौथ्या प्रहरचा शेवट युक्त समजतात. कांहींहि कारण असो; पण एवढें खरें कीं, हा राग गाण्याचे गायकांनीं आज वर्ज्य केल्याचें आढळतें.

**दीपकर**—अतीश पाहा.

**दीपगृह**—समुद्रांतून प्रवास करणाऱ्या गलबतांस विशिष्ट ठिकाणचे नक्की ज्ञान व्हावें किंवा जेथें खडक असेल तें ठिकाण दुरून दिसून ते टाळतां यावें, याकरितां दीपगृहाची योजना केलेली असते. दीपगृहांतील प्रकाश प्रथम लांकडें जाळूनच उत्पन्न करण्यांत येत असे. नंतर दगडी कोळसा वापरण्यांत येऊं लागला. कांहीं दिवसांनीं फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी परवलयात्मक (पॅरॅबोलिक) पृष्ठभाग असलेले आरसे वापरण्यांत येऊं लागले. यानंतर फिरते दिवे व त्यांची फिरती रचना प्रचारांत आली. ऑगस्टस फेरनेल यानें १८१९ मध्यें प्रथम भिंगांची (लेन्सेस) योजना केली. यामध्ये स्टीव्हन्सनने कांहीं सुधारणा घडवून आणल्या. नंतर स्थिरदिवे, चमक मारणारे दिवे, चमक मारणारे दीपसमूह, मध्येंच थांबून थांबून प्रकाश देणारे दिवे, वगैरे निरनिराळे प्रकार दीपगृहांतून दिसूं लागले. कांहीं दीपगृहांतून निरनिराळ्या रंगांचे तांबडे, हिरवे, वगैरे दिवे वापरण्यांत येतात. अत्यंत तीव्र प्रकाश मिळावा याकरितां भिंगांच्या (लेन्सेस) रांगा करण्यांत येतात व प्रत्येक भिंगाच्या केन्द्रांत एक एक दिवा लावण्यांत येतो.

कांहीं दिव्यांत साधी तेलवात लावण्यांत येते. कांहींत रक्तोष्ण जाळी वापरण्यांत येते. कांहींत तेलाचा, असिटिलीनचा किंवा कोळशाचा धूर (गॅस) वापरण्यांत येतो. कांहीं तरंगत्या भोवऱ्यांत तेलाचा धूर दाबून भरून ठेवून त्यापासून तीनचार महिने प्रकाश मिळेल अशी व्यवस्था करण्यांत येते. अनेक दीपगृहांत अलीकडे विजेच्या दिव्यांची योजना करण्यांत आली आहे.

अर्वाचीन तऱ्हेचें पहिलें दीपगृह फ्रान्समध्यें गॅरोन नदीच्या मुखाजवळ तूर द कोरदान यानें (१५८६-१६१०) सालीं बांधून पूर्ण केलें. प्रथम प्रथम दीपगृहें खासगी मालकीचीं असत. त्यानंतर याकरितां संस्था स्थापन करण्यांत आल्या. हिंदुस्थानांत या कामावर देखरेख करण्याकरितां एक समिति नेमण्यांत आलेली असते.

**दीपवंश**— एक बौद्ध महाकाव्य. सिंहली अठ्ठकथांमध्यें दिलेल्या परंपरेवरून महाकाव्य रचण्याचा हा पहिलाच परंतु अर्धवट प्रयत्न म्हटला म्हणजे, दीपवंशामध्यें दिलेला त्या बेटाचा इतिहास होय. या काव्याच्या कर्त्याचें नांव दिलेलें नाहीं. परंतु बहुतकरून त्यानें हें काव्य ख्रिस्ती शकाच्या चौथ्या शतकाचा आरंभ आणि पांचव्या शतकाचा एक-तृतीयांश यांच्या दरम्यान लिहिलें असावें.

**दीपाबाई**— १. दीपांबा. ही तंजावरकर थोरल्या व्यंकोजी राजाची राणी. ही फार शहाणी, चतुर व दक्ष होती. व्यंकोजी जेव्हां आपल्या वडिलार्जित जहागिरीचा वांटा शिवाजीस देईना व आपल्यांला मुसलमानी नोकर म्हणविण्यातच समाधान मानूं लागला, तेव्हां हिनें जुना मुत्सद्दी रघुनाथपंत हणमंते याच्या मध्यस्थीनें या सर्व प्रकरणाचा समाधानकारक निकाल लाविला. खुद्द शिवाजीनें तिची स्तुति केली एवढेंच नव्हे तर जहागिरीची वांटणी झाल्यावर पांच लाख होनांचे प्रांत तिला 'चोळीबांगडी'-साठीं दिले.

दीपाबाई ही सरदार इंगळ्याची मुलगी. हिच्या पोटीं शहाजी, सरफोजी व तुकोजी असे तीन पुत्र झाले. व्यंकोजी वारल्यावर हिनें शहाजीस गादीवर बसवून स्वतः राज्यकारभार हाकला (१६८२). कवि चिंदडशंकर यानें हिच्या स्तुतिपर अभंग रचलेले आढळतात.

२. शिवाजीला सोयराबाईपासून झालेली मुलगी. ही विश्वासराव घराण्यांत दिली होती. हिचा भाऊ राजाराम.

**दीप्पे**—हे फ्रान्समध्यें इंग्लिश खाडीच्या किनाऱ्यावर एक बंदर आहे. बंदर मोठें असून येथें मोठ्या बोटी येऊं शकतात. येथें जरतार, लोंकर व मातीचीं भांडीं होतात. तसेंच हस्तिदंत, शिंगें आणि हाडे यांचे जिन्नस व साखर शुद्ध करण्याचे कारखाने आणि जहाजें बांधण्याचे कारखाने आहेत. येथें मच्छीमारीचा धंदा मोठा चालतो, आणि परदेशाशीं व्यापारहि बराच मोठा आहे. हें बंदर आणि इंग्लंडमधील न्यू हॅवन बंदर यांच्या दरम्यान आगबोटींची वाहतूक नियमित चालू असते. लोकसंख्या २५,११७.

**दीर**—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील प्रांतांत असलेल्या दीर, स्वात, चित्रळ एजन्सींतील एक राज्य. दीर नदीवर असलेल्या दीर खेड्यावरून हें नांव पडलें आहे असें म्हणतात. दीरच्या खोऱ्यास कष्कार हें नांव आहे. मैदान-खोरें व जन्डोल ह्यांचाहि समावेश दीरमध्यें होतो. क्षेत्रफळ (दीर कोहिस्तान धरून) ५,००० ते ६,००० चौ. मैल. लो. सं. अंदाजें १,००,०००. पंजिकोरचें खोरें स्वातच्या खोऱ्याएवढें रुंद नाहीं. कोहिस्तानच्या जंगलांत देवदार लांकूड विपुल आहे.

दीर येथील अधिपति नवाब सर शहाजेहानखान हे आहेत. उत्पन्नाचा दहावा हिस्सा साऱ्यादाखल आकारिला जातो. शक्य तितक्या ठिकाणीं जमिनींत लागवड केली आहे. दीर हे युसुफझई पठाणांच्या ताब्यांत आहे. बष्कार व कष्कार यांमध्यें गुजर लोक पुष्कळ आहेत. पठाणांची भाषा युसुफझई पुश्तु असून गुजर लोक पंजाबी भाषा बोलतात.

**दीर्घवर्तुल**—(एलिप्स). दीर्घवर्तुल हा एक शंकुच्छेद आहे. ज्या पृष्ठावर लंब वर्तुल किंवा दीर्घवर्तुल काढावयाचें असेल त्यावर दोन टांचण्या (अ, य) घट्ट बसवा. व त्यांतून टोकें जोडलेली अयपेक्षां मोठी दोरी जाऊं द्या.

व दोरीमध्यें एके ठिकाणीं (क) पेन्सिलीचें टोंक ठेवून दोरी घट्ट ताणा व पेन्सिलीचें टोंक फिरवा म्हणजे दीर्घवर्तुल निघेल. अयचा ड मध्य दीर्घवर्तुलाचाहि मध्य आहे. अय रेषेनें दीर्घवर्तुलाला इ, फमध्यें छेदलें तर इफला मोठा अक्ष (मेजर ॲक्सिस) म्हणतात. डमधून इफला (गह) लंब काढा व तो वर्तुळाला ग, हमध्यें छेदील, तेव्हां गह हा दीर्घवर्तुलाचा छोटा अक्ष (मायनर ॲक्सिस) होय. $\frac{\text{अ ड}}{\text{इ ड}}$ = दीर्घवर्तुलाची केंद्रच्युति (एक्सेंट्रिसिटि).

**दीर्घवर्तुलगोल**—(एलिप्साइड). जसा गोल व वर्तुल यांचा संबंध आहे तसाच दीर्घवर्तुलगोलाचा व दीर्घवर्तुलाचा संबंध आहे. टरबुजासारखा आकार असलेल्या दीर्घवर्तुलीय भरीव आकारास दीर्घवर्तुलगोल म्हणतात. त्याचा छेद घेतल्यास दीर्घवर्तुल मिळतें. फक्त दोनच दिशांचे छेद वर्तुल येतात.

**दीर्घवर्तुलफलें**—(एलिप्टिक फंक्शन्स). त्रिकोणमितींतील वृत्तफलें (सर्क्युलर फंक्शन्स) ज्या (साइन) व कोज्या (कोसाइन) फलांचीं सामान्य स्वरूपें होत. वरील वृत्तफलाचा आवर्त (पीरियड) २ π आहे. परंतु दीर्घवर्तुल फलांचा आवर्त दोन तऱ्हेचा आहे: एक सत्य आणि दुसरा पूर्णपणें कल्पित. भोंवऱ्याची व लंबकाची गति यांसंबंधीं प्रश्नांत ह्या फलांचा उपयोग होतो.



**दीव**—हें पोर्तुगाल राष्ट्राच्या ताब्यांतील बेट पश्चिम हिंदुस्थानांत काठेवाड द्वीपकल्पाच्या दक्षिण टोंकाला आहे. याची सर्वांत जास्त पूर्व-पश्चिम लांबी ७ मैल व दक्षिणोत्तर रुंदी २ मैल आहे. याचें क्षे. फ. २० चौ. मै. आहे. दीव बेटाची लोकसंख्या (१९४०) १९,७३१ आहे. पैकीं ख्रिस्ती काय ते अदमासें ३५० च आहेत.

दीव गांव हें बेटाच्या पूर्व टोंकाला नचि बंदरापासून पांच मैलांवर आहे. मागें भरभराटीच्या वेळीं त्याची लोकसंख्या ५०,००० होती असें म्हणतात. एके वेळीं सधन व व्यापाराकरितां प्रसिद्ध असलेल्या या शहराला हल्लीं कांहींच महत्त्व उरलेलें नाहीं. दीवखेरीज ह्या बेटावर दुसरीं तीन मोठीं खेडीं आहेत.

पूर्वी कापड विणणें व रंगविणें हे येथील लोकांचे धंदे असून येथील मालाला परक्या देशांत चांगली किंमत येत असे. हल्लीं मासे मारणें हा मुख्य धंदा आहे.

हें बेट प्रथम गुजरातच्या सुलतानाकडून पोर्तुगीजांनीं घेतलें. त्या वेळीं याचें व्यापारास फार महत्त्व होतें. लोकसंख्या अर्ध्या लाखावर होती. पण पुढें याला पडता काळ आला.

गोव्याच्या गव्हर्नर जनरलच्या हाताखालीं असलेल्या गव्हर्नरकडे दीवचे सर्व मुलकी व लष्करी अधिकार आहेत. जूझ म्युनिसिपालिटीकडे न्यायखातें आहे. गव्हर्नरच्या जागेवर नेहमीं युरोपियन असतो.

भव्य इमारतींनीं पूर्वी यास शोभा आलेली होती. अद्यापि उभ्या असलेल्या इमारतींत १६०१ मध्यें बांधलेलें जेसुइट लोकांचें कॉलेज मुख्य आहे. हल्लीं त्या इमारतींत ख्रिस्ती देवालय असून त्याला 'स मेट्रिझ' असें म्हणतात. सेंट फ्रान्सिसच्या मठांत हल्लीं लष्करी रुग्णालय आहे. सेंट जॉन ऑफ गॉडच्या मठाचा प्रेतें पुरण्याकरितां उपयोग करितात व सेंट डॉमिनिकचा मठ मोडकळीस आला आहे. ह्यांशिवाय येथें गव्हर्नरचा बंगला, तुरुंग, शाळा, वगैरे इमारती आहेत. पोर्तुगीज सत्तेच्या भरभराटीच्या वेळीं येथें सर्व प्रकारचीं नाणीं पाडलीं जात असत.

**दीक्षित, चिंतामणि** (शके १६५८-१७३३)—हा ज्योतिषी पेशवाईत होऊन गेला. याचें वसतिस्थान सातारा. यानें सूर्य सिद्धांताची सारणी केली आणि गोलानंद नांवाचा एक ग्रंथ शके १७१३ मध्यें रचिला. त्यावर टीका यज्ञेश्वर ऊर्फ बाबा जोशी रोडे यांनीं केली. चिंतामणीचे वंशज सांप्रत सातारा येथें आहेत.

**दीक्षित, शंकर बाळकृष्ण** (१८५३-१८९८)—एक महाराष्ट्रीय ज्योतिर्विद्. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत दापोली तालुक्यांत मुरुड गांवीं झाला. मूळचें आडनांव वैशंपायन असून

यांच्या निपणजांनीं यज्ञ केल्यामुळें हें घराणें दीक्षित या आडनांवानें प्रसिद्धि पावलें. मुरूड येथें मराठीचा अभ्यास संपवून शंकरराव पुण्यास ट्रेनिंग कॉलेजांत शिकावयास आले (१८७०). ट्रेनिंग कॉलेजांत असतांनाच ते सकाळच्या शाळेंत इंग्रजी शिकत. १८७४ त त्यांनीं मॅट्रिक परीक्षा दिली. यानंतर ते रेवदंडा, ठाणें, बार्शी, धुळें व पुणें या ठिकाणीं शाळेवर शिक्षक होते. यांचा गणिताचा व ज्योतिषाचा विशेष व्यासंग असे. यांनीं रा. जनार्दन बाळाजी मोडक यांच्याबरोबर सायनाचा पुरस्कार केला व सायनमानाचें एक पंचांगहि सुरू केलें. 'ज्योतिर्विलास', 'सृष्टचमत्कार', 'सायन पंचांग', 'हिंदु पंचांग' व 'भारतीय ज्योतिःशास्त्र' हे दीक्षितांचे ज्योतिषग्रंथ होत. भारतीय ज्योतिःशास्त्राच्या तोडीचा या विषयाचें संपूर्ण ज्ञान देणारा दुसरा ग्रंथ नाहीं. नुसत्या या ग्रंथावरून दीक्षितांचें नांव अजरामर राहील. याशिवाय 'भारत-भूवर्णन', 'धर्ममीमांसा', 'सोपपत्तिक अंकगणित', वगैरे यांचे ग्रंथ आहेत. डॉ. फ्लीट याच्या 'गुप्तांचे शक' या ग्रंथास दीक्षि-तांची मदत आहे. शंकरराव मराठी व इंग्रजी नियतकालिकांतून लिहीत. दीर्घाभ्यासाचा परिणाम यांच्या प्रकृतीवर होऊन ते विषमज्वरानें २७ एप्रिल १८९८ रोजीं वारले. यांचे चिरंजीव रामचंद्रपंत यांनीं 'जोतिर्विलासा'ची सुधारून वाढविलेली आवृत्ति १९४८ सालीं काढली.

**दुकान नोकर कायदा**—(शॉप ॲक्ट). दुकानांत नोकर नेमण्यासंबंधीं, त्यांच्या कामासंबंधीं व वेळेसंबंधीं नियंत्रण घालणारे कायदे इंग्लंडांत १८९२ पासून अनेक झाले असून १९१२ सालीं पूर्वीचे सर्व कायदे एकत्र करून शॉप्स ॲक्ट तयार करण्यांत आला. त्या कायद्यांत पुढील नियम आहेत—(१) १८ वर्षांच्या आंतील मुलांना कोठल्याहि दुकानांत दर आठवड्यास ७४ तासांहून अधिक तास काम सांगू नये. त्यांतच त्यांचा जेवणाचा वेळ धरावा. (२) दर आठवड्यास प्रत्येक नोकराला अर्धा दिवस सुट्टी द्यावी, आणि त्या दिवशीं दुपारीं १॥ वाजल्यानंतर त्याला काम सांगूं नये. (३) प्रत्येक आठवड्यांत एक दिवस दुपारीं १ वाजल्यानंतर दुकानांत विक्रीचें काम बंद ठेवावें. इतर फेरीवाल्यांनींहि सदर वेळीं बाहेर विक्रीचा धंदा करूं नये.

हिंदुस्थानांत मुंबई इलाख्यांत प्रथम १९३९ सालीं असा कायदा करण्यांत आला. नंतर बंगाल, पंजाब व सिंध प्रांतांनीं कायदे केले. मध्यवर्ती सरकारनें १९४२ सालीं कामकऱ्यांना आठवड्यांतून एक दिवस सुट्टी देण्याचा कायदा केला. मुंबईच्या कायद्याप्रमाणे नोकराचे कामाचे तास दिवसाचे जास्तींत जास्त ९½ असावे; आठवड्यांतून एक दिवस पगारी रजा द्यावी; रोज अर्धा तास कामाच्या वेळांत सुट्टी द्यावी; दुकानें रात्रीं ९ वाजतां बंद करावीं; हॉटेलें व करमणुकीच्या जागा जास्तींत जास्त १४ तास उघड्या ठेवाव्यात व नोकरांना १० तासांवर काम देऊं नये; १२ वर्षांच्या खालील मुलांना नेमूं नये; जास्त कामाचे जास्त पैसे द्यावेत. याप्रमाणे या कायद्यांत अटी घातल्या आहेत.

**दुग्धशर्करा**—(लॅक्टोज). हा एक दुधाचा उपपदार्थ आहे. गाईच्या दुधांत शेंकडा ४·७५ इतकी दुग्धशर्करा असते. उंसाच्या साखरेइतकी ही साखर गोड नसते व लवकर विरघळतहि नाहीं. स्वित्झर्लंड, न्यूझीलंड, वगैरे देशांत व्यापारा-साठीं हा पदार्थ तयार करतात.

**दुग्धाम्ल**—(लॅक्टिक ॲसिड). ताकांत असलेलें अम्ल द्रव्य; हें दुधांत असलेल्या साखरेच्या आसवनानें तयार होतें. मोठ्या प्रमाणावर हें धान्यसत्त्वा(स्टार्च)पासून दुग्धजंतूंच्या (लॅक्टिक बॅक्टेरियाच्या) साहाय्यानें तयार करतात. हें पांढरें शुभ्र असून ह्याची अम्लता तीव्र आहे. हें कापडावर रंगकाम करण्यासाठीं व कातडें कमविण्यासाठीं उपयोगांत आणतात. जशद दुग्धेत(झिंक लॅक्टेट), लोह दुग्धेत(आयर्न लॅक्टेट) आणि खट दुग्धेत(कॅल्शियम लॅक्टेट), वगैरे लवणें उद्योगधंद्यांत नेहमीं उपयोगी पडणारीं आहेत.

**दुंदुभि**—एक वाद्य. हा ध्वन्यनुकारी शब्द असून याचा अर्थ पडघम असा आहे. व त्याचा उपयोग लढाईच्या व शांततेच्याहि वेळीं करावयाचा असे. हा शब्द ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांत आलेला आहे. भूमिदुंदुभि नांवाचा एक विशिष्ट प्रकारचा पडघम पूर्वीं होता. तो असा कीं, जमिनींत एक खड्डा करून त्यावर एक कातडें पसरावयाचें. अशा तऱ्हेचा पडघम महाव्रत नांवाच्या एका यागाच्या वेळीं दक्षिणायनांत सूर्य परत फिरण्याच्या समयास जीं विघ्नें येतील तीं निवारण्यास उपयोगांत आणिला जात असे. पृथ्वीवर कांहीं आनंददायक महत्त्वाच्या गोष्टी घडल्या तर स्वर्गांत दुंदुभि वाजत, अशाबद्दल पुराणांतून उल्लेख आहेत.

**दुंदेखान रोहिला**—एक रोहिला सरदार. रोहिलखंडांतील रोहिले हे दिल्लीच्या पातशहास फार त्रास देत. अली महंमदखान या रोहिल्यानें प्रथम स्वातंत्र्य जाहीर केलें (१७४४). तो मेल्या-वर त्याचा पुत्र सादुल्ला हा गादीवर आला आणि दुंदेखान व हाफीझ रहिमत हे सरदार कारभारी झाले. चरित्रग्रंथकार बील म्हणतो, दुंदेखान हा अलीचाच मुलगा व तोच त्याच्या मागून गादीवर आला. महंमदशहा(दिल्लीचा पातशहा)नें अखेर रोहिले, अब्दली, सिंधचे अमीर, वगैरेंच्या त्रासापासून मोकळे होण्याकरितां मराठ्यांशीं एक तह करून (१७५०), त्यांना रोहिलखंड वगैरे प्रांतांची चौथाई दिली. त्यामुळें मराठ्यांनीं रोहिल्यांवर स्वाऱ्या करून त्यांचा पुष्कळ प्रांत खालसा केला (१७५१), आणि ५० लाख खंडणी वसूल केली. रोहिले पूर्वींपासून दिल्लीच्या पातशाही-विरुद्ध असत. त्यामुळें त्यांनींच अब्दलीस हिंदुस्थानांत बोला-

विलें. पानपत–प्रकरणांत व वरील सर्व गोष्टींत हाफीज रहिमत-प्रमाणेंच दुंदेखानाचा हात होता. रोहिलखंडाची वांटणी झाली, तींत याच्या वांट्यास बिसौली, मुरादाबाद, चांदपूर व संबळ हे जिल्हे आले. हा स. १७७३ च्या सुमारास मेला. त्याच्यानंतर तीन मुलांपैकीं वडील मोहिबुल्लाह हा गादीवर आला.

**दुधांवी एंजिन**—(टू स्ट्रोक एंजिन). चार धांवांत होणारी क्रिया दोन धांवांतहि करतां येते. एंजिनमधील कार्यक्षेपा(पॉवर स्ट्रोक)च्या वेळेस मिश्रण पेटलें असतां त्या जोरानें दट्टया (पिस्टन) पुढें जात असतो. धांव (स्ट्रोक) पुरी होण्याच्या सुमारास दट्टयानेंच जळलेले वायू बाहेर जाण्याचें द्वार उघडून ते वायू एकदम बाहेर जातात. याच वेळेस त्याच्या उलट दिशेच्या बाजूनें कांहींशी बाहेरील हवा सिलिंडरमध्यें जोरानें घुसते. त्यांतील जळलेले वायू पुढें निघून जाण्यास या हवेची मदतहि होते. या तऱ्हेनें या जातीच्या एंजिनमध्यें धांवेच्या अगदीं थोड्या वेळांत जळलेले वायू बाहेर जाणें व नवीन हवा आंत येणें, अशा क्रिया घडून येतात. दट्टया परत जातांना चार धांवीप्रमाणेंच ही हवा दाबली जाण्यास संकोचाला एक धांव पुरी मिळते. त्याचप्रमाणें कार्यक्षेपा(पॉवर स्ट्रोक)लाहि एक धांव पुरी मिळते.

**दुनीचंद, लाला** (१८७३- )—एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण फोरमन ख्रिश्चन कॉलेज व ओरिएंटल कॉलेज (लाहोर) मध्यें झालें.१९२१ पर्यंत यांनीं वकिली केली; नंतर यांनीं असहकारितेच्या चळवळींत भाग घेतला व तुरुंगवास पत्करला. १८९९ पासून हे आर्य समाजाच्या चळवळींत कार्य करीत आहेत. अंबाला येथील अँग्लो–संस्कृत कॉलेजचे हे व्यवस्थापक होते (१९०६–२१). हे लाहोर येथील दयानंद अँग्लो–वेदिक कॉलेजच्या व्यवस्थापकमंडळांत आहेत. १९२३ मध्यें यांनीं पुन्हां वकिलीस सुरुवात केली. १९२० पासून हे ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे सभासद आहेत. १९२२ मध्यें यांस क्रिमिनल लॉ अमेंडमेंट कायद्याखालीं ६ महिन्यांची शिक्षा झाली. हे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें स्वराज्य पक्षातर्फे निवडून आले. १९३० मध्यें यांनीं पुन्हां वकिली सोडून दिली. त्या वेळीं यांस काँग्रेस वर्किंग कमिटीवर सभासद घेण्यांत आलें. १९२९ मध्यें पंजाब जेल–चौकशी समितीवर यांस नेमण्यांत आलें. १९३० मध्यें हे पंजाब प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. कॉंग्रेस वर्किंग कमिटी १९३० मध्यें बेकायदा ठरविण्यांत आल्यामुळें यांस पुन्हां ६ महिने तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३५ मध्यें पुन्हां डॉ. सत्यपाल यांच्या गैरहजेरींत पंजाब प्रांतिक काँग्रेस कमिटीचे यांस तात्पुरते अध्यक्ष निवडण्यांत आलें. काँग्रेसच्या कामांत अधिक लक्ष घालतां यावें म्हणून यांनीं चांगली चालणारी वकिली सोडून दिली.

**दुबळे**—एक जात. यांची बहुतेक वस्ती मुंबई इलाखा व बडोदें संस्थान यांतून आहे. भडोच, सुरत व ठाणें जिल्ह्यांत हे मुख्यत्वेंकरून आढळतात. आपण रजपूत घराण्यांतील असून राठोड घराण्याशीं आपला निकट संबंध आहे असें हे म्हणतात. कोळी जातीप्रमाणेंच या जातींत इतर लोकांचें बरेंच मिश्रण आहे. या जातींत लोकांच्या राहण्याच्या ठिकाणावरून ५० पोटविभाग झाले असून त्यांत तालविया पोटविभागाचे लोक श्रेष्ठ समजले जातात.

मुलांचीं लग्नें १० ते २० व मुलींचीं १० ते १८ वर्षांपर्यंत होतात. मुलाचा बाप मुलीबद्दल १५ ते २० रु. देतो. या दानास ते देज असें म्हणतात. खंडालिया (सासऱ्याच्या घरीं कांहीं वर्षें नोकरी करून मग त्याच्या मुलीशीं लग्न लावणें) ही विवाहपद्धत यांमध्यें प्रचलित आहे. पुनर्विवाह, घटस्फोट, व दिराशीं लग्न करणें या सर्व चाली यांमध्यें आहेत. हे लोक मांसाहारी असून यांना घोरपडी फार आवडतात. हे दारू फार पितात. हे चोध्रा वगैरे खालच्या जातीच्या हातचें अन्न खात नाहींत.

हे लोक वन्य हिंदु आहेत. भूतपिशाचाशिवाय ते हनुमान, शिकोत्री, अंबाशी या देवतांची पूजा करतात. हे ब्राह्मणांना मानतात व विवाहसंस्कार व नामसंस्कार त्यांच्याकडून करवितात.

**दुमाला**—[मूळ फारशी शब्द दुंबाला. मागील बाजू, पिछाडी, पाठपुरावा असा धात्वर्थ; रूढार्थ हवाला, ताब्यांत देणें, दोन धनी असणें.] खालीं केलें असतां ज्याचा ताबा सरकारकडे जातो तें गांव. दुमालें गांव म्हणजे दोन अमली (सरकार व जहागीरदार) गांव. दुमालदार म्हणजे वरील गांवचा जहागीरदार. या गांवचा हिशेब तो दुमालझाडा. येथील अमल तो दुमाल अमल. पण हल्लीं सामान्यपणें इनाम या अर्थी दुमाला शब्द वापरतात.

दुमाल्याचे इनाम, सरंजाम, इसाफत, अग्रहार, पासोडी, हाडवळा, खैरात, बाल परवर्षी, नान परवर्षी, सरदेशमुखी, चौथाई, जहागीर, मोकासा, साहोत्रा, वेचणी, गिराणी, पसाइत, चाकराइत, वजिफा, गिरास, सौंदिया, इ. बावीस प्रकार आहेत.

**दुय्यम वाढ**—वनस्पतींमध्यें दरवर्षी त्यांच्या खोडामध्यें व मुळांमध्यें काष्ठमय पेशींच्या क्रियेमुळें जी जाडीमध्यें व घेरामध्यें वाढ होते तीस दुय्यम वाढ म्हणतात. ही वाढ बहुतेक द्विदल वनस्पतींपैकीं आवृत्तबीज (अँगिओस्पर्म) आणि सूचिपर्णी (कोनिफर) वृक्षांमध्यें थोड्याफार प्रमाणांत दिसून येते; पण विशेषतः बहुवार्षिक वनस्पतींपैकीं ज्यांस काष्ठमय खोडें व मुळें असतात त्यांच्यामध्यें अधिक प्रमाणांत आढळतें.

**दुय्यम विद्युद्घटमाला**—जेव्हां एखाद्या विद्युद्घटाची अथवा घटमालेची अशा तऱ्हेची योजना केलेली असते कीं, त्यांतील विद्युद्भार नाहींसा झाला असतां तो दुसऱ्या एखाद्या विद्युद्भारजनक यंत्रामार्फत पुन्हां उत्पन्न करतां येतो, अशा योजनेस दुय्यम घटमाला म्हणतात. प्राथमिक विद्युद्घटमालेंत जीं द्रव्यें वापरण्यांत येतात त्यांचा हळूहळू क्षय किंवा नाश होतो. परंतु अशा तऱ्हेच्या दुय्यम घटमालेमध्यें होणारी रासायनिक क्रिया उलटसुलट करतां येते. साध्या शिशाच्या विद्युत्संचायकामध्यें धनपत्रा शिशाच्या परप्राणिदाचा (पेरॉक्साइडचा) केलेला असतो. आणि ऋणपत्रा शिशाचाच पण त्यास स्पंजासारखें स्वरूप देऊन अधिक रासायनिक कार्यक्षम केलेला असतो. विद्युद्विच्छेदक म्हणून मंद गंधकाम्लाचा उपयोग करण्यांत येतो. जेव्हां अशा घटमालेंत विद्युद्भार उत्पन्न करण्यांत येतो तेव्हां क्रियाकारक द्रव्याचें रूपांतर सीस गंधकितामध्यें होतें. उलट याच घटमालेंतून एखाद्या विद्युज्जनक यंत्रांतून निघणारा विद्युद्प्रवाह चालू केला तर या सीस गंधकिताचें पुन्हां मूळच्या पदार्थांत रूपांतर होतें. ४० ॲम्पीयर तास शक्तीची घटमाला दहा तासांच्या गतीनें दहा तासपर्यंत दर तासास चार ॲम्पीयरप्रमाणें सतत शक्ति देत राहील व अशा वेळीं तिची शक्ति दर घटास १·८ इतकी व्होल्ट असेल इतकें काम झाल्यावर त्या घटमालेंतील शक्ति पूर्णपणें नाहींशी न करतां तीमध्यें पुन्हां शक्तीचा भार उत्पन्न करावा. अशा तऱ्हेनें दुय्यम घटमाला ९० ते ९५ टक्के पुन्हां शक्ति देऊं शकते.

**दुरुस्ती**—कायद्यामध्यें याचा अर्थ असा आहे कीं, घराचा मालक किंवा भाडेकरी, तसेंच जमिनीचा मालक किंवा खंडकरी कूळ, घराची किंवा जमिनीची भाडेपट्टयाच्या मुदतींत दुरुस्ती करतात ती दुरुस्ती. इंग्लंडांत असा सामान्य नियम आहे कीं, कबुलायतींत कांहीं उल्लेख नसेल तर कोणीहि जमिनींत दुरुस्ती करण्यास जबाबदार नाहीं. परंतु आतां कायद्यानें असें ठरविलें आहे कीं, कामकरी वर्गाकरितां जीं घरें बांधण्यांत येतात त्यांत मनुष्याला राहण्याला आवश्यक इतकी दुरुस्ती वेळोवेळीं मालकानें केलीच पाहिजे. इतर भाडेकऱ्यांच्या बाबतींत मात्र दुरुस्ती कोणीं करावी याबद्दल स्पष्ट उल्लेख भाडेचिठ्ठींत केलेला असतो.

हिंदुस्थानामध्यें वरील स्वरूपाचाच कायदा लागू आहे.

**दुर्गा**—१. हा राग खमाज थाटांतून निघतो. ह्या रागांत ऋषभ आणि पंचम हे स्वर वर्ज्य असल्यानें याची जाति औडुव–औडुव होय. वादी स्वर गांधार व संवादी निषाद आहे. गानसमय दुसरा प्रहर आहे. या रागांत दोन्हींहि निषादांचा प्रयोग करतात. धैवत आणि मध्यम स्वरांची संगति फार वैचित्र्यदायक आहे. हा राग आधुनिक रागांपैकीं एक आहे.

२. हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत म्हणून याची जाति औडुव–औडुव होय. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. याचा गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर आहे. या रागाला मल्लार रागाच्या अंगची दुर्गा असें म्हणतात. यांत मध्यम सुटा ठेवितात.

**दुर्गादास राठोड**—एक रजपूत वीर. जोधपूरचा राणा जसवंतसिंह याचा हा अत्यंत विश्वासू सरदार होता. हा जोधपूर राज्यांत लूनी नदीच्या कांठीं गंगनी ठाकुरातीचा मालक होता. तो कर्णावती शाखेचा रजपूत होता. दुर्गाच्या बापाचें नांव आस्तेराज.

जसवंतसिंह काबूल येथें मेल्यावर (१६७८) त्याच्या राणीवर व मुलांवर सूड उगविण्याचें औरंगजेबानें ठरविलें व त्याप्रमाणें जोधपूरच्या गादीवर आपल्या हस्तकास बसवून राणी व मुले यांना आपल्या ताब्यांत देण्याबद्दल त्यानें तगादा चालविला. अनेक वेळां त्यांना पकडण्याचे प्रयत्नहि त्यानें केले (१६७९). परंतु ते सर्व ज्यानें विफळ केले तो हा दुर्गादास होय. त्यानें अनेक युक्त्या करून त्या मंडळीस जोधपुरास सुरक्षित पोहोंचविलें. नंतर जसवंतचा पुत्र अजित हा गादीवर बसला व दुर्गादास हा त्याचा प्रधान झाला. दुर्गादासानें उदेपूरच्या राजसिंहाचें साहाय्य घेतलें, व बहुतेक रजपुतांना एक करून औरंगजेबास त्रास देण्यास सुरुवात केली. औरंगजेब स्वतः आपल्या सर्व मुलांसह राजपुतान्यांत आला (१६८०). परंतु त्याच्यानें रजपुतांचा पराभव करवला नाहीं. इतक्यांत दुर्गादासानें औरंगजेबाचा मुलगा अकबर ह्यासच त्याच्याविरुद्ध उठविलें. पण औरंगजेबानें कपटयुक्तीनें रजपुतांत व अकबरांत विवाड आणला. मागून औरंगजेबाची ही लुच्चेगिरी उघडकीस आली. पुढें दुर्गादासानें अकबरास औरंगजेबाच्या सर्वत्र पसरलेल्या सैन्यांतून सुरक्षित दक्षिणेंत संभाजी छत्रपतीच्या दरबारीं आणून सोडिलें (१६८१). चार वर्षें रजपुतांचा व औरंगजेबाचा झगडा चालला होता; पण अखेरपर्यंत औरंगजेबास जय मिळाला नाहीं. उलट अपमानकारक अटी कबूल करून त्यांच्याशीं तह करणें भाग पडलें (१६८१).

दुर्गादास हा मुत्सद्दी, स्वामिनिष्ठ व स्वदेशाभिमानी होता. औरंगजेब दख्खनमध्यें शिवाजीस व उत्तरेकडे दुर्गादासास भीत असे, असें म्हणतात. अकबराकडून फोडण्यासाठीं व चंद्रावती व अजितसिंह यांना आपल्या स्वाधीन करण्यासाठीं औरंगजेबानें त्याला पुष्कळदां लांच (एकदां ८ हजार सोन्याच्या मोहरा) देऊं केली, पंचहजारी मनसबदारीहि देऊं केली; पण तो फितला

नाहीं. अद्यापि सुद्धा त्याला राजपुतान्यांत फार मान देतात. त्याच्याबद्दल पुढील दोहा प्रसिद्ध आहे—

"ए माता, पुत ऐसा जीव। जैसा दुर्गादास ॥
बंद मुद्रा रोखियो। बिन खंबा आकाश ॥"

(हे आई, तूं दुर्गादासासारखा पराक्रमी पुत्र प्रसव).

**दुर्गादेवी**—इ. स. १४६८ मध्यें महाराष्ट्रांत जो सात वर्षांचा मोठा दुष्काळ पडला होता त्यास 'दुर्गादेवी' या नांवानें संबोधण्यांत येतें. सात वर्षांनंतर (१४७५) पुन्हां पाऊस वेळच्या वेळीं पडूं लागला. परंतु या दुष्काळांत सर्व देश उजाड झाला असल्यामुळें, गोदावरी व कृष्णा या दोन नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशांतून तिसाहूनहि अधिक वर्षेंपर्यंत फारच थोडा वसूल गोळा केला जाई. या दुष्काळांत मोंगलाईतील गोदावरीकडील पुष्कळ घराणीं वरघाटीं आलीं. त्या वेळच्या कागदांतून या दुष्काळास दुर्गाडी म्हणत. त्यांत सर्व देश उजाड झाला, सरकारी वसूल थकला, पैठण व पुणतांबें येथें असलेलीं प्राचीन संस्कृत विद्यापीठें बंद पडलीं. त्यामुळें महाराष्ट्रांतील अनेक पंडित घराणीं काशीस गेलीं. हल्लीं काशी यथील महाराष्ट्रीय पंडित घराण्यांचा पूर्वेतिहास असा आहे. वतनें बंद पडल्यामुळें जुनीं देवस्थानें लयास गेलीं. सारांश, त्या वेळीं महाराष्ट्राची फार हलाखी झाली. ती सांवरण्यास २५-३० वर्षें लागलीं. हल्लींच्या महाराष्ट्रांतील पाटिलक्या, देशमुख्या, वगैरे अधिकार दुर्गाडीनंतरचे आहेत, असें इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात.

**दुर्गापूजा**—आपल्याकडील नवरात्राप्रमाणें हा सण बंगाल्यांत हिंदूंमध्यें असतो. महिषासुरमर्दिनी दुर्गा वर्षांतून तीन दिवस कैलासाहून कार्तिकस्वामी आणि गणपति हे मुलगे व लक्ष्मी आणि सरस्वती या दोन मुली यांसह मृत्युलोकीं जनांच्या उद्धारार्थ येते, असें मानून तिची पूजा-अर्चा करतात. चौथ्या दिवशीं देवीला पाण्यांत बुडवितात. याच दिवशीं रामचंद्रानें तिची उपासना करून रावणवध केला व मोठा विजय मिळविला. म्हणून या दिवसाला विजयदिन (आपली विजयादशमी) म्हणतात.

**दुर्गाबाई**—राघोबादादा पेशव्याची जानकीबाई नांवाच्या पहिल्या बायकोपासून झालेली कन्या. ही बाबूजी नाईक बारामतीकरांच्या पांडुरंगराव नांवाच्या मुलास दिली होती. दुर्गाबाईचें लग्न ७ फेब्रु. १७७३ रोजीं झालें. आपल्या आईबापांनीं नारायणरावास मारिलें हें कृत्य हिला आवडलें नाहीं म्हणून हिनें त्यांची निर्भर्त्सना केली. ही बारभाईंच्या पक्षाची असल्यामुळें सवाई माधवरावाच्या जन्माच्या वेळीं हिला नाना फडणिसानें मुद्दाम पुरंदर किल्ल्यावर गंगाबाईच्या जवळ ठेवलें होतें. आनंदीबाई हिची सावत्र आई असल्यानें व हिनें नानाचा पक्ष स्वीकारल्यानें आनंदीबाईनें बाजीरावास बारामतीकरांना त्रास देण्यास सांगितलें होतें व त्याप्रमाणें पुढें बाजीरावानें त्यांचा सरंजाम जप्त केला.

**दुर्गाबाई भोसले**—कोल्हापूरच्या छत्रपति संभाजीची ही बायको. संभाजी मृत्यु पावल्यावर त्याची दुसरी बायको जिजाबाई हिनें स. १७६२ त दत्तक घेऊन कोल्हापूरच्या गादीवर बसविलेला शिवाजी केवळ पांच वर्षांचा होता. ता. १७-२-१७७३ रोजीं जिजाबाई वारली तोंपर्यंत तेथील कारभार तीच करीत होती.

जिजाबाईच्या मरणसमयीं शिवाजी जरी पंधरा वर्षांचा होता तरी राज्याचें काम पालक या नात्यानें दुर्गाबाई पाहूं लागली होती व तिच्या हुकमतीखालीं कच्चा कारभार येसाजी कुसाजी शिंदे पाहत होता. स. १७७७ मध्यें महादजी शिंद्यानें कोल्हापूरकरांच्या राज्यावर स्वारी केली. राणी दुर्गाबाई कोल्हापुरांत राहून महादजीशीं टक्कर देण्याची कसून मेहनत करीत होती. ही मरण पावली तेव्हां शिवाजीचें वय २१ वर्षांचें असून, पुढे त्यानेंच सर्व कारभार आपल्या हातीं घेतला.

**दुर्गावती राणी**—चन्देल रजपूतवंशीय महाबोचा राजा सालवाहन याची ही कन्या. गढामंडळ येथील रजपूत कच्छवाह शाखीय दलपत या राजास ही दिली होती. ही फार सुंदर होती. कांहीं ठिकाणीं, दलपतनें दुर्गावतीच्या संमतीनें तिला तिच्या बापाच्या घरून जबरीनें नेलें व तो संगलगर्द येथील राजा होता, असें म्हटलें आहे. लग्नानंतर चार-पांच वर्षांनीं दलपत मेला व दुर्गावतीनें आपल्या लहान वीर नारायण नांवाच्या मुलाच्या नांवानें राज्यकारभार चालविला. अकबरास राज्यलोभ सुटून व राज्य चालविणारी बाई आहे असें पाहून आपला सेनापति असफखान यास ६ हजार घोडदळ, १२ हजार पायदळ व तोफखाना यांसह राणीवर पाठविलें. राणीनें आपल्या थोड्याशा सैन्यानिशीं त्याला तोंड दिलें. मोठ्या शौर्यानें हत्तीवर बसून ती लढत होती. इतक्यांत एक तीर लागून तिच्या डोळ्यास भयंकर जखम झाली. तरीहि ती लढतच होती. वीर नारायणासहि भयंकर जखम झाली. एवढ्यांत पुन्हां दुसरा तीर राणीच्या मानेत घुसला. या वेळीं तिचे बहुतेक लोक ठार झाले होते. शत्रु जवळ येत आहेत असें पाहून तिनें महाताजवळील खंजीर हिसकावून घेऊन आपल्या छातींत खुपसला. याप्रमाणें शत्रूच्या हातीं जिवंत सांपडून अप्रतिष्ठा होण्यापेक्षां तिनें मरण पत्करिलें. वीर नारायणास त्याच्या सरदारांनीं चूडागड येथें नेलें. परंतु असफखानानें तेथें जाऊन वेढा दिला. अठरा वर्षांच्या वीर नारायणानें आईप्रमाणें शेवटपर्यंत लढून आपला प्राण रणांगणांतच सोडला. नंतर मुसलमानांच्या हातीं लागूं नये

म्हणून तेथील सर्व राजस्त्रियांनीं जोहार केला. याप्रमाणें गढमंडलाचें राज्य मुसलमानांच्या हातीं गेलें ( १५६४ ).

दुर्गावतीचा हा राजमहाल मदनमहाल या नांवानें प्रख्यात असून हल्लींच्या जबलपूर ( मध्यप्रांत ) जिल्ह्यांत आहे. या वंशांतील एक पुरुष बिहारमध्यें गेला. हल्लींचा गिधूर ( मोंगीर जिल्हा, बिहार प्रांत ) येथील राजा या पुरुषाचाच वंशज होय असें म्हणतात.

**दुर्द्राव्यें**—( रिफ्रॅक्टरीज् ). न वितळतां किंवा मऊ न होतां अतिशय उष्णतामानांत टिकणारे पदार्थ. ह्यांचे अम्ल, क्षार आणि उदासीन ( न्यूट्रल ) असे तीन प्रकार आहेत. पहिल्यांत गारे( सिलिका )चें प्रमाण जास्त असून त्यांत अग्निमृत्तिका ( फायर–क्ले ) येते. क्षारांत मॅग्नेसाइट आणि डोलोमाइट येतात आणि शेवटच्यांत शीसक ( ग्रफाइट ) आणि क्रमित ( क्रोमाइट ) येतात.

**दुर्बीण**—( टेलेस्कोप ). दूरच्या वस्तू, विशेषतः आकाशांतील ग्रह-तारे पाहण्यासाठीं केलेलें एक यंत्र. गॅलिलिओनें १६०९ सालीं तयार केलेल्या दुर्बिणींत एक सरळ नळी असून तींत एका टोंकास द्वि–बाह्यगोल ( डबल कॉन्व्हेक्स ) भिंग व दुसऱ्या टोंकास एक अंतर्गोल ( कॉन्केव्ह ) भिंग बसविलें होतें. यांतील बाह्यगोल भिंग पदार्थाभिमुख कांचेप्रमाणें व अंतर्गोल भिंग हें पाहण्याचें भिंग म्हणून योजलें होतें. या दुर्बिणीनें वस्तु तीस पट मोठी दिसे व यामुळें गॅलिलिओला गुरूचे चार चंद्र शोधतां आले. आजच्या दुर्बिणीचे दोन प्रकार असतात : परावर्तनकारी व वक्रीभवनकारी दुर्बीण. परावर्तनकारी दुर्बिणींत पदार्थाभिमुख कांचेच्या जागीं एक अंतर्गोल आरसा ठेवतात. यामुळें रंगाचा दोष टाळतां येतो. वक्रीभवनकारी दुर्बिणींत भिंगांमुळें जीं एकामागून एक वक्रीभवनें होतात त्यांमुळें वस्तु स्पष्ट पाहतां येते. जगांत सर्वांत मोठ्या दुर्बिणी अमेरिकेंतील लिक आणि येर्केस वेधशाळांत आहेत. क्षेत्रदुर्बीण ( फील्ड ग्लास ) व नाट्यदुर्बीण ( ऑपेरा ग्लास ) हीं, दोन समांतर दुर्बिणी एकत्र करून तयार केलेलीं असतात.

क्षेत्र किंवा हात दुर्बीण ( फील्ड ग्लास ) ही एक आंखूड दुहेरी दुर्बीण असते. या दुर्बिणींतील दोन्ही रचनांमधील भाग अगदीं सारखे असतात व ते एकमेकांशीं समांतर बसविलेले असतात. त्यामुळें त्यांत बसविलेल्या दोन्ही भिंगांच्या अक्षरेषांमध्यें पाहणाऱ्याच्या डोळ्यांतील बुबुळांत जेवढें अंतर असते तितकेंच अंतर असतें. गॅलीलीपद्धतीच्या दुर्बिणीमध्यें डोळ्याजवळचीं भिंगें अंतर्गोल असतात व दूरचीं किंवा वस्तूकडचीं भिंगें बहिर्गोल असतात. यामुळें ही दुर्बीण आंखूड असते. ज्या दुर्बिणीमध्यें डोळ्याजवळील भिंगें बहिर्गोल असतात त्यांमध्यें त्रिपार्श्व भिंगांची योजना केलेली असते.

**दुर्योधन**—सुयोधन. धृतराष्ट्र व गांधारी यांचा ज्येष्ठ पुत्र व कट्टा पांडवशत्रु. हा चांगला रथी, सारथी व गदायुद्धांत मोठा निपुण होता. यानें पांडवांच्या नाशासाठीं त्यांना अनेक संकटांत घातलें, पण शेवटीं पांडव त्यांतून सुखरूप पार पडून कौरवांशीं लढले. या भारतीय युद्धांत शेवटीं दुर्योधन पडला. याला लक्ष्मण व लक्ष्मणा म्हणून पुत्र व कन्या होतीं. महाभारत काव्यांतील मुख्य ( खल ) नायक दुर्योधन यासच म्हणतां येईल. व्यासानें याचें चित्र फार कुशलतेनें रंगविलें आहे.

**दुर्वास**—एक ऋषि. अत्रि व अनसूया यांचा पुत्र. हा अत्यंत कोपिष्ट असल्यानें याच्यासारख्या कोपिष्ट माणसास दुर्वास म्हणतात. यानें अंबरीश राजाला छळिलें. एकदां दुर्योधनाच्या सांगण्यावरून हा पांडवांचें सत्त्व घेण्याकरितां मध्यरात्रीं हजारो शिष्यांसह पांडव वनवासांत असतां त्यांच्याकडे भोजनास गेला ; पण श्रीकृष्णकृपेनें पांडव सत्त्वापासून ढळले नाहींत. शकुंतलेला जो दुर्वासाचा शाप झाला, त्याचा उल्लेख महाभारतांत नाहीं. दुर्वासाबद्दल नारदाप्रमाणेंच बऱ्याच कथा आहेत.

**दुल्हादेव**—नवऱ्या मुलाची देवता. उत्तर व मध्य हिंदुस्थानांतील रानटी जातींतील ही एक प्रमुख देवता आहे. दुल्हादेव हा एक दुर्दैवी नवरा मुलगा असून तो लग्नांतच वीज पडून मरण पावला होता. तो आणि त्याचा घोडा दगडाचें रूप पावले असा समज आहे. त्या वेळेपासून त्याची पूजा करण्यांत येत असते. नवरी मुलगी आणण्याकरितां जात असलेल्या नवऱ्या मुलाचा विशेष मानमरातब राखण्यांत येतो, याचें कारण दुल्हादेव नवरा मुलगा होता हें होय.

रानटी, डोंगरी लोकांची ही गृहदेवता असून माघ महिन्याच्या शेवटच्या दिवशीं दुल्हाची फुलांनीं पूजा करण्यांत येते, व लग्नाच्या वेळीं त्याला बकरें अर्पण करण्यांत येतें. त्याची आवडती वस्तु परशु होय. याला ईश्वररूप देण्याचें कारण लग्नसमारंभांतील त्याच्या आकस्मिक मृत्यूमुळें त्याच्या आप्तेष्टांना झालेलें दुःख असावें.

**दुष्काळ**—दुष्काळ पडण्याचीं कारणें दैवी आणि मानवी अशीं दोन प्रकारचीं असतात. पाऊस कमी पडणें किंवा फार पडणें, पिकांवर कीड पडणें, टोळधाड येणें हीं कारणें दैवी म्हणतां येतील. पण राजकीय परिस्थिति, लढाया, लुटालूट, लोकवस्तींत वाढ हीं मानवी मानावीं लागतील. अशा दुष्काळामुळें लोकांची उपासमार होऊन असंख्य लोक मृत्युमुखीं पडतात. फार प्राचीन काळापासून दुष्काळाची आपत्ति ओढवत आली आहे. महाराष्ट्रांत दुर्गादेवीचा दुष्काळ प्रसिद्धच आहे. ( दुर्गादेवी

पाहा). हिंदुस्थानांतील अलीकडचे दुष्काळ म्हणजे (१) वायव्य प्रांतांतील १८३७–३८ सालामधील; यांत सुमारें आठ लाख लोक मेले. (२) बंगाल–ओरिसामधील १८६५–६६ चा; सुमारें दहा लाख मृत्यु. (३) मुंबई, मद्रास आणि म्हैसूर प्रांतांतील १८७७ चा. (४) १९०० मधील मुंबई, पंजाब, इ. प्रांतांतील. (५) गेल्या महायुद्धकाळांतील बंगालमधील (१९४३); पंधरा लाख मृत्यु. याच वेळीं विजापूर जिल्ह्यांत व मद्रास प्रांतांतील समर्पित (सीडेड) जिल्ह्यांत दुष्काळ पडले. तथापि बंगाल्यांत तर कहरच उडाला होता. तेव्हां या दुष्काळचौकशीसाठीं एक कमिशन नेमण्यांत आलें.

चीनमध्यें १८७७–७८ सालांत मोठा दुष्काळ पडून नव्वद लाखांवर लोक मृत्युमुखीं पडले. दुसरा दुष्काळ १८८८–८९ सालांत पीत नदीच्या पुरामुळें पडला होता. आयर्लंड देशांत बटाट्यांचें पीक बुडाल्यामुळें १८१४, १८१६, १८२२, १८३१ व १८४६ या सालांत दुष्काळ पडले होते. १९२२ सालीं राशियांत गव्हाचें पीक आलें नाहीं म्हणून लाखों लोक मेले.

सुधारलेल्या देशांत आगगाड्यांची वाहतूक, कालवे, पाटबंधारे, रोगराईवर औषधें, पिकांची वाढ करण्याचीं साधनें, यांमुळें दुष्काळ बहुधा पडत नाहींत. चीन आणि हिंदुस्थान यांची परिस्थिति अगदींच वेगळी आहे. लोकसंख्या फार व राज्यव्यवस्था नीट नाहीं; यांमुळें वारंवार दुष्काळ पडून लाखों लोकांची प्राणहानि होते. हिंदुस्थानांतील मध्यवर्ती आणि प्रांतिक सरकारें दुष्काळनिवारणासाठीं बाहेरून धान्य आणविणें, शेतकऱ्यांना तकवी व डोल देणें, दुष्काळी कामें काढणें, वगैरे प्रकारें इलाज करीत असतात. दुष्काळनिधि जमवून तो स्वतंत्र ठेवण्याची पद्धत कांहीं काळ अमलांत होती.

गेल्या महायुद्धानंतरची परिस्थिति सर्वत्रच दुष्काळाहून जास्त तापदायक आहे. देशांत अन्नाचें उत्पादन लोकांना पुरेल इतकें नाहीं. हिंदुस्थानांत चार-पंचमांश शेती पावसावर अवलंबून आहे. अवर्षणाबरोबरच पूर, भूकंप, काळाबाजार, इ. गोष्टी दुष्काळाला मदत करीत आहेत.

**दुष्यंत**—एक पौरव कुलोत्पन्न राजा. एकदां हा मृगयेकरितां भटकत असतांना कण्वऋषीच्या आश्रमाजवळ आला व त्या ठिकाणीं कण्वाची मानीव कन्या जी शकुंतला तिला त्यानें गांधर्वविवाहपद्धतीनें वरिलें. पुढें शकुंतलेस भरत नांवाचा मुलगा झाला. नंतर दुष्यंतानें शकुंतलेशीं विवाह झाल्याचें नाकारिलें, पण जेव्हां आकाशवाणीनें भरत हा तुझाच मुलगा आहे असें सांगितलें, तेव्हां त्यानें पुत्राचा स्वीकार केला. कालिदासानें या कथानकाचा उपयोग करून आपलें जगप्रसिद्ध शाकुंतल नाटक रचिलें आहे. पण त्यांत त्यानें दुर्वासशाप, अंगठी हरवणें, वगैरे घटना नवीनच घातल्या आहेत.

**दूध**—सस्तन वर्गाच्या स्त्री जातीच्या प्राण्यांमध्यें ज्या स्तनग्रंथी असतात त्या ग्रंथींत हा पदार्थ तयार होतो. यांपैकीं गायीम्हशीचें, शेळीचें, वगैरे दूध आपल्या परिचयाचें आहे. गायीच्या दुधाचें विशिष्टगुरुत्व १.०२८ ते १.०३४ (सरासरी १.०३२) असतें. गाय सामान्यतः व्यायल्यापासून ४२ आठवडे दूध देते. गाईच्या दुधांत सामान्यपणें दर शेंकडा पुढील द्रव्यें असतात: स्नेह (लोणी) ३.७५; घनपदार्थ (केसीन) ३; बलक (अल्ब्युमेन) ०.४; दुग्धशर्करा (लॅक्टोज) ४.७५; राख ०.७५; व पाणी ८७.३५. यांपैकीं लोणी किंवा स्नेह यांचें प्रमाण फार बदलणारें असतें. याचे $\frac{1}{५०००}$ इंच व्यासाचे कण असतात. सामान्यतः दुधामध्यें कमींत कमी तीन टक्के स्नेह अथवा लोण्याचा अंश असला पाहिजे. शेंकडा साडेआठ टक्के इतर घन द्रव्यें असलीं पाहिजेत. बिनमलईच्या दुधांत घन द्रव्यांचें हेंच प्रमाण असलें पाहिजे.

(सूक्ष्मयंत्रांतून दिसणारें दूध)

दूषित दूध शुद्ध दूध

दूध नुसतें न हालवितां स्थिर ठेवलें तर त्यावर एक थर येतो त्यास मलई म्हणतात. मलईचें विशिष्टगुरुत्व तींतील लोण्याच्या अंशाप्रमाणें बदलतें.

हिंदुस्थानांत प्राचीन काळापासून दूध पिण्याचा प्रघात आहे व त्याचें फार महत्त्व मानण्यांत येतें. आशिया खंडांतील इतर देशांत दुधाचा उपयोग अन्न म्हणून फारसा माहीत नाहीं. त्यामुळें दुधासाठीं गुरें पाळीत नसून तीं खाण्यासाठीं व शेतीसाठीं पाळतात. दुधापासून दहीं, ताक, लोणी, मलई, चीज, वगैरे पदार्थ तयार होतात. सुधारलेल्या मनुष्याच्या अन्नांत दुधाला विशेष स्थान आहे.

दुधाचा उल्लेख ऋग्वेदांत असून त्याला क्षीरनांवाखेरीज़ गो अथवा पयस् देखील म्हणतात. हा वैदिक आर्य लोकांचा अतिशय उपयोगाचा गृहव्यवस्थेंतील पदार्थ होता. ते धारोष्ण दूध (पक्व) सेवन करीत असत, अथवा ओदन 'दुधांत शिजविलेला

पदार्थ' (क्षीरपाकम् ओदनम्) तयार करीत. त्याचें सोमांतहि मिश्रण करीत. दूध विरजण्याकरितां दुसऱ्या कित्येक वनस्पतीबरोबर पूतीका आणि फल वनस्पतीहि उपयोगांत आणीत. दह्याचा उपयोग अन्नासारखा करीत असत. ऋग्वेदांत एका ठिकाणीं चक्क्याचाहि उल्लेख आला आहे. अजक्षीर ह्यांचाहि उल्लेख आला आहे.

ताजें दूध घेतलें तर तें पांढरें स्वच्छ दिसतें, त्याला किंचित् गोडपणा असतो आणि एक विशिष्ट वास त्याला येतो. दुधाला गोडपणा येण्याचें कारण हें कीं, दुधांत 'लॅक्टोज्' ही शर्करा असते. दूध जर तापविलें तर नैसर्गिक स्थितींत त्याला जो वास येत असतो तो नाहींसा होतो. दुधामध्यें 'कॅल्शियम् कॅसिनेट्' म्हणून जे द्रव्य असतें त्यामुळें त्याला पांढरा रंग येतो. या द्रव्यामुळें आणि दुधांतील चरबीमुळें दूध पारदर्शक असूं शकत नाहीं. पुष्कळ वेळां दूध किंचित् पिवळट रंगाचें असतें. दुधांतल्या चरबीचा जो एक विशिष्ट रंग (लॅक्टोक्रोम) असतो त्यामुळें हा पिवळेपणा येत असतो. रंगाची ही छटा निरनिराळ्या प्राण्यांच्या दुधांत निरनिराळी असते. गायीच्या दुधांत ती पिवळटसर असली तर मानवी दुधांत तांबूस असते. कांहीं वेळां प्रसूतीपूर्वी किंवा दूध आटण्याच्या जरा आधींसुद्धां दुधाला किंचित् खारट चव येते व विशिष्ट वास येतो. दुधाची रुचि किंचित् खारट असूं शकेल, किंचित् कडवट असूं शकेल, किंवा ती अगदीं जाणवण्याइतकीहि कडू असूं शकेल. कांहीं वेळां गुरांच्या दुधाला अतिशय चमत्कारिक चव आलेली असते. दुधांत जर जंतूंची अतिशय वाढ झालेली असेल तर त्याला अतिशय चमत्कारिक वास येऊं शकतो. त्याचप्रमाणें उलट दुधाला चांगलीहि रुचि वा स्वाद येऊं शकतो. गाईम्हशींना किंवा शेळ्यांना कोबी, बीट, गाजरें, वगैरे भरपूर प्रमाणांत नियमित खावयाला घातलीं तर दुधाला ते ते विशिष्ट स्वाद कांहीं प्रमाणांत येतात.

दूध जर न हालवितां बराच वेळ ठेवून दिलें तर मलई पृष्ठभागाशीं वर येते आणि उरलेला भाग खालीं राहतो. मलई किती वेळांत निराळी होते हें दुग्धद्रवां(मिल्क प्लॅस्मा)ची घनता, दुधाचें उष्णतामान आणि चरबीच्या कणां(ग्लोबूल)चा आकार यांवर अवलंबून असतें. दूध जर गरगरां वाटोळें फिरविलें तर केन्द्रोत्सारक (सेंट्रिफ्यूगल) शक्तीमुळें हलका मलईचा भाग लवकर पृष्ठभागाशीं येऊन इतर दुधापासून निराळा होतो.

दूध एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत ओतलें तरी पहिल्या भांड्याच्या कडेला तें चिकटलेलें राहतें. यावरून त्याच्या अंगचा चिकटपणा लक्षांत येतो. दुधाला हा चिकटपणा त्याच्यांतील घन घटकामुळें, विशेषतः केसीनमुळें येत असतो. जितकें दूध अधिक घट्ट असेल तितक्या प्रमाणांत चरबीचा भाग निराळा होण्यास वेळ लागेल. या गुणधर्मामुळेंच लोणी निघतें. दूध जर हालविलें तर किंचित् पातळ होतें आणि संथ ठेवून दिलें तर जरा घट्ट होतें. कोमट दुधापेक्षां थंड दुधाला घट्टपणा जास्त असतो. दुभतीं गुरें जसजशीं जून होत जातात तसतसें त्यांचें दूध घट्ट घट्ट होत जातें. दूध घट्ट होण्याचें आणखी एक कारण म्हणजे थंड हवामान. दूध आंबवलें किंवा विरजलें तरीहि त्याचा घट्टपणा वाढतोच. त्याचप्रमाणें दुधांत घन घटकांचें किंवा चरबीचें प्रमाण जास्त असल्यास ते साहजिकच अधिक घट्ट होतें. निर्जंतुकपणाची (पाश्चरायझेशन) क्रिया दुधावर केल्यास दुधाचा व त्यांतील मलईचाहि घट्टपणा कमी होतो.

हिंदुस्थानांत दुधांतील भेसळीचें प्रमाण फारच आहे. पांच वर्षांच्या अवधींत मुंबई शहरांत तपासलेल्या १३६३ नमुन्यांत फक्त २८२ नमुने निर्भेळ होते. पुण्यांत ८० टक्के दूध भेसळीचें आढळतें. दुधांतील मलई काढणें अनिष्ट तर खरेंच, पण दुधांत जंतू प्रमाणाबाहेर असणेंहि अत्यंत घातक आहे. मुंबईत ७० तपासनीस दूध तपासण्यासाठीं नेमलेले आहेत. नुसते गोठे तपासण्यासाठींहि तीन पशुवैद्य आहेत. दुधांत पाणी जितकें जास्त तितका जास्त दंड ठोठावण्याचें अधिकाऱ्यांचें धोरण आपल्या देशांत आढळून येतें. मुंबईत म्हशीच्या दुधांत शेंकडा १५ टक्के पाणी घातलें तरीसुद्धां तें ओळखूं येत नाहीं. म्हणजे तेथें बिनपाण्याचें दूध निम्मेसुद्धां मिळत नसेल असें वाटतें. आतां सरकारनें दूध पुरविण्याची निराळी व्यवस्था केली आहे.

भेसळ थांबविण्याचा राजमार्ग म्हणजे दुग्धव्यवसाय किफायतशीर पद्धतीनें चालवून दूध स्वस्त भावानें विकणें हाच होय. हल्लीं भेसळीच्या गुन्ह्यासाठीं ठेवलेल्या शिक्षेची अमलबजावणीच नीट होत नाहीं. खटलेहि कसोशीनें भरले जात नाहींत.

मेथिलीन ब्ल्यू हा रंग मिसळल्यावर तो ४ तें ८ तास टिकून राहिल्यास दूध साधारण उत्कृष्ट समजावें. १ ते २ तास निळेपणा राहिल्यास दूध साधारण बरें समजावें. २० मिनिटांत रंग गेल्यास दूध रोगट समजावें. कारण त्याचा अर्थ त्यांत रोगजंतू फार असून ते दुधांतील प्राणवायु (ऑक्सिजन) चटकन् फस्त करतात. आणि मेथिलीन ब्ल्यू फक्त ऑक्सिजनच्या सहवासांतच निळा राहतो.

**दूधदुभतें**—दूध आणि दुधापासून काढले जाणारे लोणी, चीज यांसारखे पदार्थ यांचा संबंध दुग्धालयाशीं येत असल्याकारणानें त्यांचें नीट उत्पादन कसें होईल याकडे गो–शाळेला विशेष लक्ष द्यावें लागतें. जेथें दुधाचा पुरवठा जास्त पाहिजे तेथें जास्त दूध देणारीं जनावरें निवडण्यांत येतात; पण लोणी आणि चीज यांसाठीं दुधाचा कस पाहावा लागतो. गुरांचे गोठे आरोग्याला पोषक असे असावेत, गुरें तपासून घ्यावींत व दूध पार-

खून विकारें या गोष्टींचें महत्त्व सर्वांना पटलेलें आहे व पाश्चात्य देशांत तर सर्व यांत्रिक सुधारणा आणि सोयी असणारीं मोठीं दुग्धालयें सर्वत्र सांपडतात. गुरांची पैदास हा विषयहि फार महत्त्वाचा आहे. जेर्स आणि ग्वेर्न्से या बेटांतील गायी आदर्श म्हणून समजल्या जातात. चांगली दुधाळ गाय दरसाल सुमारें ६०० ते ७०० गॅलन दूध देते. गुरांना वेळेवर योग्य चारा घालणें अत्यावश्यक आहे. चाऱ्याच्या प्रकारावर दूध अवलंबून असतें. दूध पुष्कळ यावें म्हणून सरकी, कोंबी, व इतर आंबोण घालवें लागतें. गोठे स्वच्छ ठेवणें फार जरूरीचें आहे; कारण दुधामार्फतच सर्व प्रकारचे रोगजंतू फैलावत असतात. गायींची वेळेवर धार काढण्याचेंहि महत्त्व आहे.

हाताप्रमाणें यंत्रानेंहि धारा काढतात. हातांनीं गायी पिळण्याचे श्रम वांचविण्यासाठीं व दुधाच्या शुद्धतेसाठीं या प्रकारचें यंत्र तयार करण्यांत आलें आहे. पिळणाऱ्याच्या हातांनीं जी क्रिया होते तीच क्रिया निर्वातयंत्रानें होत असते. गायींच्या सडांना लावलेल्या बंद चरव्यांच्या नळ्या या यंत्राला जोडलेल्या असतात. ज्या ठिकाणीं फार गाई पिळावयाच्या असतील तेथें हें यंत्र ठेवणें परवडतें. अद्यापि तें घरगुती झालेलें नाहीं.

दूध काढून झाल्यावर तें चांगल्या स्वच्छ दुभत्याच्या घरांत नेतात व कृत्रिम उपायांनीं थंड करून रतिवासाठीं बाहेर पाठवून देतात. इंग्लंडसारख्या देशांत एक स्वतंत्र डेअरी कमिशनर नांवाचा अधिकारी असतो. डेन्मार्क आणि हॉलंड हीं युरोपांतील लहान राष्ट्रें गो-शालांच्या बाबतींत पूर्वीपासून फार नांवाजलेलीं आहेत. अमेरिका (सं. संस्थानें) तर सर्व जगांत या धंद्यांत पुढारलेली आहे. पण हिंदुस्थान या व्यवसायांत फार मागासलेला आहे. येथें गवळ्यांच्या जुन्याच पद्धतीनें सर्व गोष्टी चालतात. शेतकी कॉलेजांतून हा विषय ठेवलेला आहे व बंगळूर येथें एक सरकारी संस्था आहे. तथापि चांगल्या लोकांच्या हातीं हा धंदा गेला नसल्यानें व सरकार फारसें लक्ष घालण्यास तयार नसल्यानें दुग्धोत्पादन निकृष्ट स्थितींत आहे.

गुरानें दूध पुष्कळ द्यावें म्हणून पुढील खाण्याचे उपाय करतात: (१) कथल्या गोंद व बाजरी एकत्र करून खाण्यास द्यावी. इसबगोल, दूध व गूळ हीं एकत्र करून द्यावीं. बाजरीचें पीठ व गूळ हीं एकत्र करून द्यावीं. बाजरीचें पीठ व गूळ यांचा गोळा अर्धा शेरपर्यंत रोज चारावा. (२) शहाजिरें, गूळ व तूप यांचे लाडू करून सकाळ-संध्याकाळ एकेकप्रमाणें कांहीं दिवस द्यावे. लिंबें किंवा आंबट लिंबारे यांचा रस काढून त्यांत साखर व पाणी घालून सरबत करून अनुकूलतेप्रमाणें दोनचार दिवसांनीं पाजीत जावें. (३) गुळवेल मिळेल तितकी व ढोराच्यानें खाववेल तितकी पेंडींत मिसळून देत जावी. ढोरांस कधीं कधीं सरकी चारीत असावें. सरकीनें कसदार दूध मिळतें. दुभत्या ढोरांचीं शिंगें कापल्यानें व त्यास डागल्यानें दूध कमी होतें. सबब शिंगें कापूं नयेत व त्यांस डागूं नये. येणेंप्रमाणें उपाय केल्यास ढोर कमताकद न होतां दूध पुष्कळ देतें.

हिंदुस्थान सरकारच्या ॲग्रिकल्चरल मार्केटिंग खात्याचा हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांतील दुधाच्या धंद्यासंबंधींचा अहवाल कांहीं वर्षांमागें प्रसिद्ध झाला आहे. १९३५ सालीं गुरांची जी खानेसुमारी झाली तिच्याप्रमाणें हिंदुस्थानांत जवळजवळ २३ कोटी गुरें आहेत. म्हणजे सबंध जगांत जितकीं गुरें आहेत त्याचा तिसरा भाग एकट्या हिंदुस्थानांत आहे. यांपैकीं तीन वर्षांच्या ४ कोटी ५५ लक्ष गाई व २ कोटी ३ लक्ष म्हशी यांची दुधासाठीं जोपासना करण्यांत येते. बकऱ्यांची संख्या ५ कोटी ७२ लक्ष असून त्यांपैकीं ८८ लक्ष बकऱ्यांचें दूध हातानें काढण्यांत येतें.

हिंदुस्थानांतील सर्व दुभत्या गुरांपासून अंदाजें १ अब्ज ७५ कोटी रु. किंमतीचें सुमारें ७४ कोटी ३६ लक्ष मण दूध पैदा होतें. यांतील जवळजवळ १२ कोटी ३८ लक्ष मण दूध वासरें, करडीं, वगैरेंच्या पिण्याकडे खर्च होतें व बाकीचें सुमारें ६१ कोटी ९८ लक्ष मण माणसांच्या उपयोगासाठीं शिल्लक राहतें. या दुधांत म्हशी, गाई व बकऱ्या यांच्या दुधाचें प्रमाण अनुक्रमें शेंकडा ५०, ४७ व ३ असें आहे.

दुधाच्या पैदाशीकडे पाहतां हिंदुस्थानांतील कांहीं गुरें भरपूर दूध देत असलीं तरी एकंदरीनें दुधाची सरासरी निपज कमीच आहे असें दिसून येतें. रशियासुद्धां युरोपांत जितकीं दुभतीं गुरें आहेत तितकींच हिंदुस्थानांतहि आहेत. पण हिंदुस्थानांतील दुधाची एकंदर पैदास मात्र युरोपच्या पैदाशीच्या फक्त पांचवा हिस्साच आहे. कानडाची दुधाची निपज हिंदुस्थानच्या पाव पटीनें आहे; परंतु ही निपज करणाऱ्या तेथील दुभत्या जनावरांची संख्या हिंदुस्थानांतील दुभत्या गुरांच्या संख्येचा अवघा सहावा भाग आहे.

गाई व म्हशी यांतील अनुक्रमें शेंकडा ३५ : ५ गाई व म्हशी शहरविभागांत राखल्या जातात. शहरांत खूप दाटी असल्यामुळें शहरविभागांत गुरें राखण्याची ही पद्धति गुरांच्या, तसेंच शहरांच्याहि आरोग्याला विघातक आहे. पण शहरविभागांतील लोकांना वेळेवर व कांहींसें खात्रीचें दूध मिळण्याच्या उद्देशानें ही पद्धत पडली आहे.

सामान्यतः म्हैस गायीपेक्षां अधिक व सकस दूध देते. तीन वर्षांच्या दुभत्या गुरांच्या दुधाची निपज लक्षांत घेतली तर गायीचें हातानें काढलेल्या दुधाचें प्रमाण वर्षास सरासरीनें ५२५ पौंड व म्हशीचें १२७० पौंड पडतें. कांहीं काठेवाडी म्हशी तर प्रत्येकीं वर्षास २५०० पौंड दूध देतात. तसेंच पंजाबांतहि

१४४५ पौंड दूध देणाऱ्या कांहीं गाई आहेत. बकरी सरासरीनें वर्षास १७० पौंड दूध देते.

इतर देशांतील गुरांच्या दुधाची निपज पाहतां, हिंदुस्थानांतील दुधाच्या पैदाशीचें हें प्रमाण कमी आहे हें स्पष्टच आहे. पण दुधांतील चरबीच्या प्रमाणाचा विचार केला तर अमेरिका व युरोप यांतील गायीपेक्षां हिंदुस्थानांतील गायीचें दूध ५० टक्के अधिक सकस असतें; व म्हशीच्या दुधांत तर दुपटीनें चरबी असते.

हिंदुस्थानांत १९३८–३९ सालीं सुमारें ८० लक्ष रु. किंमतीच्या दूधदुभत्या पदार्थांची आयात झाली; व त्याच अवधींत अवघ्या ४२ लक्ष रु. किंमतीच्या पदार्थांची बाहेरदेशीं निर्यात झाली. यावरून दुधाच्या धंद्याच्या क्षेत्रांत हिंदुस्थानला प्रगति करायला अद्यापि केवढा वाव आहे हें दिसून येईल.

**दूमरोवनराज**—बिहारमधील शहाबाद जिल्ह्यांतील एक इस्टेट. क्षेत्रफळ ७५८ चौ. मैल. येथील महाराजा विक्रमादित्य राजाच्या वंशांतील आहे असें म्हणतात. ह्याच्या पूर्वजांनीं बरीच वर्षेंपर्यंत माळव्यांत उज्जयिनी नगरींत राज्य केलें. राजा शंतनशाहीनें शहाबाद जिल्ह्यांत राज्य स्थापिलें. कारूर खेड्यांत तो १३२० सालीं येऊन राहिला. हुमायून व शेरखान यांमधील युद्धांत ( १५३४–१५४० ) गजनशाही व दल्पतशाही हे दोघे वेगळ्या बाजूस मिळाले होते. शेरशहाकडून गजनशाहीस रोहता व शहाबाद आणि राजा ही पदवी मिळाली. राजा नारायणमल्लाच्या ताब्यांत भोजपूर व जगदीशपूर हे होते (१६०७–२१). त्याचा बंधु राजा प्रताप हा नवीन भोजपुरास जाऊन राहिला. १७४५ सालीं दूमरोवन हें मुख्य गांव करण्यांत आलें. राजा महाराजा महेश्वर बक्षसिंग यानें १८५७ च्या बंडांत सरकारास चांगलीच मदत केली. त्याच्या पश्चात् राधाप्रसादसिंग गादीवर आला. पण १८९४ सालीं तो मरण पावला. त्याची विधवा राणी आपल्या मुलीच्या वतीनें राज्यकारभार पाहूं लागली. बरहपूर येथें फाल्गुन मासांत व वैशाख मासांत अशा दोन जत्रा भरतात. त्या वेळीं शेतकीचें व उद्योगधंद्याचें प्रदर्शन होतें. खालच्या ब्रह्मदेशांतील टैंगु जिल्ह्यांतील १५०० एकर जमीन जहागिरीच्या मालकीची व माफीची आहे.

**दूरध्वनिशास्त्र**—( टेलेफोनी ). टेलेफोन हें दूर असणाऱ्या माणसाशीं संभाषण करण्याचें एक साधन आहे. विद्युच्चुंबकीय टेलेफोनचा शोध १८७६ त अमेरिकेंत ग्रॅहम बेलनें काढला. या यंत्रांत एक चुंबक असून त्याच्या एका टोंकाशीं वलय ( कॉइल ) बसविलेलें असतें. त्याच्यापुढें एक नरम लोखंडाची पातळ तबकडी घट्ट अडकविलेली असते. बोलणाऱ्याच्या शब्दध्वनीमुळें ही तबकडी आंदोलन पावते; व चुंबक आणि तबकडी यांमधील चुंबकक्षेत्राची विभागणी हीं आंदोलनें करतात. वलयाच्या द्वारें चुंबकीय प्रवाहांत यामुळें हालचाल होऊन वलयाला जोडलेल्या तारांतून चुंबकाच्या दुसऱ्या टोंकाशीं प्रवाह पोंचतात. तेथें चुंबकीय कार्य सुरू होऊन तेथील दुसरी तबकडी या पहिल्या तबकडीप्रमाणेंच आंदोलन पावते व जे ध्वनिप्रेषक (ट्रॅन्समिटिंग) स्थानीं काढले गेले असतात तेच ग्राहक ( रिसीव्हिंग ) स्थानीं उमटतात. याप्रमाणें या यंत्राची रचना असते.

रेडियो तारायंत्रांत अशीं जोडयंत्रें कानकर्ण्यांत (हेडफोन) असतात. टेबलावरच्या टेलेफोनमध्यें हातकर्ण्यांत (हँडफोन) सूक्ष्मश्रावक( मायक्रोफोन ) प्रेपक व घटिका( वॉच )ग्राहक असतो.

अनेक ठिकाणच्या लोकांना एकमेकांशीं बोलतां यावें म्हणून या यंत्राच्या तारा एका मध्यवर्ती कचेरींत ( टेलेफोन एक्स्चेंज ) आणून एका चावीफलका( स्विचबोर्ड )वर अडकविण्यांत येतात. तेथील विनिमयकर्ता ( एक्स्चेंज ऑपरेटर ) लागेल त्या दोन तारामार्गांची गांठ घालून देतो व नंतर संभाषण सुरू होते. स्वयंचालक टेलेफोनमध्यें चावीफलकांत आपोआपच मार्गजोडणी होते; पण फार दूरच्या संभाषणासाठीं हे स्वयंचालक टेलेफोन निरुपयोगी ठरतात.

टेलेफोनला लागणारी वीज ही विनिमयकार्यालयातील संचायक विद्युन्मालेपासून ( स्टोअरेज बॅटरी ) मिळत असते. टेलेफोनचें प्रेपकयंत्र बोलणाऱ्यानें उचलल्याबरोबर बॅटरी सुरू होते व दर्शकानें विनिमयकर्त्याला ही गोष्ट समजते. दोन गांवांमधील टेलेफोनवरचें संभाषण मुख्य फांद्यावरून ( ट्रंकलाइन ) होत असतें. हजारों मैलांवरच्या माणसाशीं आतां टेलेफोननें बोलतां

येतें, ही केवढी सोय झालेली आहे. राज्यकारभाराच्या आणि व्यापाराच्या कामीं या संभाषणयंत्राचा फार मोठा उपयोग होतो. एकाच तारेवरून एकाच वेळीं तारा (टेलेग्राफ) आणि टेलेफोन संदेश जाऊं शकतात, एवढी या शास्त्रांत प्रगति झाली आहे.

**दूरवस्तुदर्शनकला**—(टेलेव्हिजन). दूर अंतरावर घडणाऱ्या एखाद्या प्रसंगाचें दृश्य दृष्टीस पाडण्याच्या कलेला हें नांव आहे. १९२७ सालच्या मे महिन्यांत स्कॉटलंडमधील हेलेन्सबर्ग येथील जॉन बेअर्ड यानें लंडनहून ग्लासगो येथें कांहीं व्यक्तींच्या चेहऱ्यांचीं चित्रें अशा पद्धतीनें पाठविलीं. पुढें फेब्रुवारी १९२८ मध्यें लंडन येथून न्यू यॉर्क येथें त्यानें कांहीं चित्रें अशींच पाठविलीं. यानंतर कांहीं अमेरिकन संशोधकांनीं या कलेचें प्रात्यक्षिक दाखविलें. अशीं चित्रें पाठविण्याकरितां दूरध्वनियंत्राचा किंवा बिनतारी संदेशयंत्राचा उपयोग करण्यांत येतो. असें चित्र पाठवितांना त्यांतील लहान लहान भागांवर अति त्वरेनें प्रकाश पाडण्यांत येतो आणि या प्रकाशाच्या परावर्तनामध्यें जो फरक असतो त्यामुळें विजेच्या वाहणाऱ्या प्रवाहाच्या तीव्रतेमध्यें फरक पडत जातो व त्यामुळें कमीअधिक छायेचें चित्र ग्राहकावर उठवितां येतें. म्हणजे प्रकाशाचें विद्युच्चुंबकीय लहरींत परिवर्तन व पुन्हां लहरींचें प्रकाशांत परिवर्तन या क्रियांनीं हें दूरदर्शन होत असतें. पहिला या प्रकारचा बोलपट लंडन शहरांत मार्च १९३० मध्यें दाखविण्यांत आला. बी. बी. सी. नें या पद्धतीचे कार्यक्रम १९४६ पासून आतां सुरू केले आहेत.

**दूर वास**—(ॲब्सेंटीइझम्). जे जमीनदार जमिनी असतील त्या गांवीं न राहतां दूर कोठें तरी राहून जमिनीच्या उत्पन्नाचा पैसा दुसरीकडे खर्च करितात त्यांना हा शब्द योजतात आणि व्यापक अर्थानें या शब्दांत जे इसम आपल्या स्वतःच्या देशांत न राहतां परदेशांत जाऊन राहतात व आपल्या मूळ देशांतल्या उत्पन्नाचा सर्व पैसा परदेशांत खर्च करतात त्यांचाहि अंतर्भाव होतो. अशा परस्थलनिवासामुळें अनेक सामाजिक, आर्थिक, राजकीय आणि नैतिक दुष्परिणाम होतात. अशा लोकांबद्दल अगदीं प्रथम कायदा १३७९ सालीं इंग्लिश पार्लमेंटनें केला. १८०० सालीं आयर्लंड व ग्रेट ब्रिटन यांचें संयुक्तीकरण (युनियन) झाल्यावर अनेक आयरिश सरदार व जमीनदार परदेशीं राहावयास गेले आणि तेथून इंग्लंडला अनेक प्रकारें उपद्रव देऊं लागले. त्यापूर्वी अनेक आयरिश इसम अमेरिकेंत गेले होते. म्हणून १७२९ सालीं अशा इसमांचा जो पैका आयर्लंडमधून परदेशीं नेण्यांत येई त्यावर कर बसविण्यांत आला.

हिंदुस्थानांत अलीकडे कॉंग्रेस सरकार आल्यापासून गैरहजर मालकांचे हक्क कमी करून प्रत्यक्ष जमिनी कसणाऱ्या लोकांस शाश्वती आणि सुरक्षितता येईल असे कायदे करण्यांत येत आहेत. 'कसेल त्याची जमीन' ही म्हण यापुढें सार्थ होईल.

**दूरविचारवहन**—(टेलेपथी). अन्तःसंनिवेदन, अतींद्रियज्ञान, अतींद्रियसंवेदन. याचा अर्थ एकाच्या मनांतले विचार, विकार, भावना, वगैरेंचें दुसऱ्या इसमाला ज्ञान होणें व तें ज्ञान ज्ञानेंद्रियांच्या ठराविक मार्गावांचून होणें. १८७६ सालीं प्रोफेसर सर डब्ल्यू. एफ्. बॅरट यांनीं असें निदर्शनास आणून दिलें कीं, कांहीं माणसांना आपल्या स्वतःच्या मनांतील कल्पना आणि मतें दुसऱ्या इसमांना ज्ञात करून देण्याची शक्ति असते; ही शक्ति जन्मजात असते किंवा मागाहून हेतुपुरस्सर संपादन करतां येते. सायकिकल रीसर्च सोसायटी स्थापन झाल्यापासून त्या संस्थेनें सतत अशा प्रकाराबाबतचा पुरावा गोळा करणें व त्याची चिकित्सा करणें, हें कार्य चालू ठेवलें आहे. 'टेलेपथी' हा शब्द प्रथम मायर्स यानें १८८२ सालीं वापरण्यास सुरुवात केली. हें अन्तर्ज्ञान इंद्रियविज्ञानशास्त्रानुसार होतें असें कांहींचें मत आहे आणि कांहींचें मत सदर ज्ञान मानसशास्त्रानुसार होतें आणि इतर कांहीं विद्वानांचें म्हणणें असें कीं, असें सामर्थ्य प्राप्त होण्यास कांहीं अतिमानवी शक्ति मनुष्यांत उत्पन्न व्हावयास पाहिजे. सर ऑलिव्हर लॉज वगैरे कांहीं शास्त्रज्ञ असें म्हणतात कीं, माणसाच्या मनाचा 'प्रसुप्त मन' (सब्कॉन्शस माइंड) असा एक भाग असतो. सर डब्ल्यू क्रुक्स वगैरे विद्वानांचें म्हणणें असें कीं, मेंदूंतून विचारांच्या लाटा किंवा कंपनें उत्पन्न होऊन त्या एका माणसाच्या मनांतून दुसऱ्या माणसाच्या मनावर आघात करतात. म्हणजे 'टेलेपथी' हा इंद्रियविज्ञानशास्त्रांतलाच एक चमत्कार आहे.

**दूरीयुति**—(डिचोगमी). कांहीं फुलांमध्यें पुंकेसरावरील रेणूंची व गर्भाशयांतील स्त्रीयोनीची उत्पत्ति निरनिराळ्या वेळीं होते, त्यामुळें एकाच फुलामध्यें अन्तर्जनन होऊं शकत नाहीं; या पद्धतीस दूरीयुति म्हणतात.

**दूर्वा**—या तृणाचा उल्लेख ऋग्वेदापासून आढळतो. हें गवत सर्व हिंदुस्थानभर सर्व ऋतूंत आढळतें. देवपूजेच्या वेळीं फुलाप्रमाणें दूर्वांकुर वाहण्याची चाल आहे. दूर्वा गणपतीला फार प्रिय आहेत. भाद्रपद शु. ८ स वांझ स्त्रिया दूर्वांची पूजा करतात. मृतांचा आत्मा शांत करण्यासाठीं दूर्वांची पूजा करण्याची चाल गुजराथेंत आहे.

दाहशामक पेय व औषध या दृष्टींनींहि यांच्या मुळ्यांचा उपयोग होतो. नाकांतून उष्णतेनें रक्त पडत असल्यास दुर्वांचा रस नाकांत पिळावा. उचकीवर दूर्वांच्या मुळ्यांचा रस एक मासा व मध एक तोळा एकत्र करून देतात.

**दूषित रक्तनलिका**—ज्या शिरांस विकृति झाल्यामुळें त्यांचें प्रसरण होऊन त्यांचा आकार अनियमित होतो व त्यामुळें शरीरामध्यें विशेषतः शरीराच्या खालील भागांतील गात्रांमध्यें कठिण अशा गांठी दिसूं लागतात. त्या विकृतीस दूषित शिरा किंवा रक्तनलिका म्हणतात. याच दोषाच्या एका प्रकारामुळें मूळव्याधि उत्पन्न होते. रुधिराभिसरण क्रियेमध्यें कांहीं स्थानिक कारणामुळें प्रतिरोध झाला असतां अशा तऱ्हेनें शिरा दूषित होतात. तसेंच गर्भावस्थेमध्यें लठ्ठ शरीराच्या माणसामध्यें आणि ज्यास सतत उभें राहून काम करावें लागतें अशा लोकांत हा रोग विशेषें करून आढळतो. यावर उपचार म्हणजे योग्य प्रकारचे पट्टे वापरणें व विकार झालेलीं गात्रें उंचावर ठेवून त्याच्या खालीं आधार देणें, इत्यादि होत. हल्लीं यावर शस्त्रक्रियाहि करण्यांत येते.

**दृग्गोचरता**—वातावरणाची ज्या वेळीं अशा प्रकारची विशिष्ट परिस्थिति असते कीं, त्या वेळीं दूर अंतरावरचे पदार्थ दृष्टीस पडतात त्या वेळीं तीस दृग्गोचरता असें म्हणतात. जेव्हां वातावरणांत कांहीं आगंतुक पदार्थांचे कण असतात तेव्हां दृग्गोचरता कमी होते. कारण त्या कणांचा प्रकाशकिरणांस अडथळा होतो आणि प्रकाशाचें अधिक विकीरण होऊन प्रकाश आणि छाया यांमधील भेद दृष्टीस पडण्यास अवघड होतें. केव्हां केव्हां वातावरणाचा दाब अस्थिर व निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळा असतो तेव्हां विशिष्ट ठिकाणीं कांहीं कालपर्यंत हवा स्वच्छ व कोरडी असून पारदर्शक असते; परंतु एकदम तिच्यामध्यें फरक पडून काळोखी येऊन पाऊस पडूं लागतो. यामुळें दूरच्या टेंकड्या व झाडें जवळ दिसूं लागलीं किंवा फार स्पष्ट दिसूं लागलीं म्हणजे लवकरच पाऊस येणार असें समजण्यांत येतें.

**दृढप्रहार यादव**—सेऊण देशाच्या म्हणजे खानदेशाच्या यादव घराण्याचा हा संस्थापक (इ. स. ८८०). द्वारावतीहून येऊन यानें चंद्रादित्यपूरची (चांदूर) स्थापना केली असें सांगतात. हा प्रथम गिरनार येथें होता. याचा बाप सुबाहु. नाशिकजवळील श्रीनगर ऊर्फ सिन्नर येथें यानें आपली राजधानी ठेवली. देवगिरीस राज्य स्थापन करणारा भिल्लम हा याच्यापैकींच होय. सेऊण देश म्हणजे सध्यांचा खानदेश होय.

**दृढीकरण**—(कॉन्फर्मेशन). एक ख्रिस्ती संस्कार. या संस्काराच्या योगानें जे श्रद्धाळू असतात त्यांस आपल्या धर्माप्रमाणें वागण्यास शक्ति मिळते आणि त्यांस ख्रिस्ती धर्मप्रमाणें आपलें कर्तव्य करण्यास बल प्राप्त होतें. या संकारामध्यें संस्कार्य व्यक्तीच्या डोक्यावर बिशप हात ठेवतो आणि त्याच्या कपाळास अंजनाचा (ऑलिव्ह तेल व मलम यांचें मिश्रण) लेप करतो व त्या वेळीं पुढील शब्द उच्चारतो: "मी तुला पिता, पुत्र व पवित्र आत्मा यांच्या नांवानें क्रूसाच्या चिन्हानें अंकित करतों आणि मोक्षाच्या अंजनानें अभ्यंजन करतों. तथास्तु." हा संस्कार बिशप करतो. परंतु एखाद्या विशेष प्रसंगीं इतर धर्मोपदेशकास हा संस्कार करण्याचा अधिकार देण्यांत येतो. हा संस्कार करून घेण्यास पात्रता येण्याकरितां पुढील गोष्टींची आवश्यकता असते: १. बाप्तिस्मा झालेला असणें, २. (पात्रता येण्यास) कृपेंत असणें म्हणजे कोणत्याहि कृपाजीवननाशक पातकापासून-अलिप्त असणें. या संस्काराचा परिणाम म्हणजे श्रद्धावान् लोकांस ख्रिस्ती संप्रदायास अनुसरून आपला आयुष्यक्रम चालविण्यास बल प्राप्त करून देणें हा होय. बाप्तिस्मा हा नवीन जीवन प्राप्त करून देणारा एक पुनरुज्जीवन संस्कार आहे. त्याप्रमाणें दृढीकरण हा या नवजीवनास प्रौढत्व आणून देणारा आहे.

**दृशद्वती**—'दगडांनीं भरलेली' अशा अर्थाचें हें एका नदीचें नांव असून ही नदी कांहीं भागांतून सरस्वती नदीला समांतर वाहत जाऊन शेवटीं तिला मिळते. हिचें नांव ऋग्वेदामध्यें सरस्वती व आपया ह्यांच्याबरोबर भरत राजांचें कार्यक्षेत्र म्हणून आलेलें आहे. पंचविंश ब्राह्मण व मागाहून झालेले ग्रंथ ह्यांमध्यें दृशद्वती व ह्या नद्या यांजवळ मोठे यज्ञ झाले असा उल्लेख आलेला आहे. या दोन नद्यांमधील प्रदेशास ब्रह्मावर्त म्हणत. ब्रह्मावर्त हा मध्यदेशाचा केवळ एक भाग होता.

**दृष्ट**—कांहीं माणसांमध्यें नुसत्या पाहण्यानें दुसऱ्याचें वाईट करण्याची शक्ति असते, ही कल्पना फार प्राचीन आहे. प्राचीन भारतीय, मिसरी लोक, हीब्रू, ग्रीक यांच्यापासून ते थेट मध्ययुगापर्यंत युरोपांतहि ही कल्पना पुष्कळ रूढ होऊन बसली होती. अद्यापिहि इटालियन आणि आयरिश लोक हिच्या आहारीं जातात. सर्व असंस्कृत समाजांत दृष्टीची कल्पना दृढमूल आहेच. या दृष्टीमुळें वाईट होऊं नये म्हणून मंत्र, तंत्र, ताईत, इ. तोडगे करण्यांत येतात. आपल्याकडे लहान मुलांना दृष्ट लागली असतां त्यांच्यावरून मीठ-मोहऱ्या ओवाळून चुलींत टाकतात; दृष्टीचा अंगारा लावतात. दृष्टीसंबंधी गाणीं व गोष्टीहि पुष्कळ आहेत. अंगारा पाहा.

**दृष्टान्तकथा**—दृष्टान्त किंवा रूपककथांतून सत्यसृष्टींतील घटनाच काल्पनिक गोष्टी रचून दाखविलेल्या असतात व त्यांपासून माणसानें बोध घ्यावा म्हणून तात्पर्य काढलेलें असतें. प्राच्य देशांतून जुन्या वाङ्मयांत अशा कथा अनेक आहेत. पंचतंत्र, हितोपदेश, बौद्धजातकें, वगैरे ग्रंथ अशा कथांनीं भरलेले आहेत. भारतीय तत्त्वज्ञानाची शिकवण दृष्टान्त घेऊनच दिली जाते. जुन्या करारांतील नाथन-दाविद कथा (२ सॅमु १२) रूपकच आहे. तालमुद धर्मग्रंथांतहि अशा दृष्टान्तकथा सांपडतात. ईसापनीति तर याविषयीं प्रसिद्धच आहे.

**दृष्टिक्षीणत्व**—(ॲमोरॉसिस). हा एक अंधत्वाचा प्रकार आहे. हा दृष्टीच्या मज्जातंतूंस विकार झाल्यामुळे उत्पन्न होतो.

यास पूर्वी कांचबिंदु (गटासेरेना) म्हणत असत. यांत बाहेरच्या डोळ्यास कांहींहि झालेलें नसतें. मिल्टन या कवीस या रोगामुळे अंधत्व आलें होतें.

**देऊळगांव राजा**—वऱ्हाडांतील बुलढाणा जिल्ह्याच्या चिखली तालुक्यांतील एक गांव. सिंधखेडच्या जाधवरावावरून हें नांव पडलें. जाधवांचा किल्ला व राव जगदेव याची बायको दुर्गाबाई हिची 'मोतीसमाध' येथें अजून दृष्टीस पडते. येथें एक बालाजीचें मंदिर असून आश्विनांत वऱ्हाडांतील सर्वांत मोठी जत्रा येथें भरते.

**देऊळघाट**—वऱ्हाड, बुलढाणा जिल्हा, चिखली तालुक्यांत एक गांव. हल्लीं येथें एक नबाब घराणें नांदत आहे. हे मूळचे दिल्लीचे पठाण होत. नादिरशहाच्या स्वारीनंतर दिल्लीहून निघून हैद्राबादेस हे निजामाकडे नोकर राहिले. असईच्या लढाईच्या वेळीं महंमद रहीम हा हैद्राबादेहून देऊळघाट येथील किल्ल्यांत किल्लेदारीच्या जागेवर आला. यानें असईच्या लढाईत मराठ्यांविरुद्ध वेलस्ली याला मदत केली. त्यामुळें वेलस्लीनें त्याला निजामाकडून चार गांवें जहागीर देवविलीं. हल्लीचे नबाब हा वरील महंमदचे वंशज होत. घाट बुलढाण्याजवळ आहे. त्यास देऊळघाटची वेस असेंहि म्हणतात. खंडेराव काशी न्यायाधीश यास या परगण्याचा मोकासा स. १७५२ त मिळाला होता. येथें पोलादी काम चांगलें होतें.

**देणगी**— इंग्लंडांतील 'कॉमन लॉ' कायद्यांत 'ग्रँट' शब्दाचा अर्थ असा आहे कीं, ज्याचा ताबा प्रत्यक्ष देतां येत नाहीं, अशा अव्यक्त (इन्कॉर्पोरल) स्वरूपाच्या हक्कांची मोबदला घेतल्याशिवाय केलेली देवघेव. अशा देणग्या बक्षीसपत्र-दस्तऐवज करून देणें कायद्यानें आवश्यक ठरवलें आहे. हिंदुस्थानांतला यासंबंधींचा कायदा 'ट्रान्सफर ऑफ प्रॉपर्टी ॲक्ट' या क़ायद्यांतील कलम १२२ यांत दिला आहे तो असा—जंगम किंवा स्थावर मिळकत मोबदला घेतल्याशिवाय स्वखुषीनें एका इसमानें दुसऱ्या इसमाला संपूर्ण मालकी हक्कानें तबदील करणें याला 'देणगी' (गिफ्ट) म्हणतात; स्थावर मिळकतीची देणगी रजिस्टर केलेल्या दस्तऐवजानेंच देतां येते. जंगम मालाची देणगी तोंडी वचन आणि प्रत्यक्ष कबजा दिला म्हणजे कायदेशीर ठरते.

**देरूलेद, पॉल** (१८४६–१९१४)—एक फ्रेंच राजकारणी व चळवळ्या कवि. तो १८९३–१८९५ आणि १८९८–१८९९ सालीं चेंबर ऑफ डेप्युटीज या फ्रेंच कायदेमंडळाचा सभासद होता. १९०० सालीं त्यानें रिपब्लिक सरकारविरुद्ध कट केला व तें सरकार बेसनदशीर मार्गांनीं एकदम उलथून पाडण्याचा प्रयत्न केला. या गुन्ह्याची न्यायकोर्टांत चौकशी होऊन तो दोषी ठरला व त्याला १० वर्षें हद्दपारीची शिक्षा देण्यांत आली. परंतु १९०५ सालीं त्याला फ्रान्समध्यें परत येण्याची परवानगी मिळाली. त्याचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते—'शान्ट द्यु सोल्दांत' व 'शान्त द्यु पायसाम' हे होत.

**देलवाड**—राजपुतान्यांतील उदेपूर संस्थानामधील एक इस्टेट. ह्या इस्टेटींत ८६ खेड्यांचा समावेश होतो. ही इस्टेट मेवाडच्या एका सरदाराकडे असून त्यास राजराणा म्हणतात. गांवच्या दक्षिण भागीं महाराजांचा भव्य व रमणीय वाडा असून त्याच्या दक्षिणेस राष्ट्रसेनदेवीचें भव्य देवालय आहे. देलवाडाचे राजराणे झाला रजपूत आहेत. १६ व्या शतकांत काठेवाडाहून आलेला व १५३४ सालीं जो चितोडच्या वेढ्यांत मारला गेला त्या अज्जबंधु सज्ज याच्या वंशांत हे लोक जन्म पावलेले आहेत. मुख्य गांव देलवाड. हें उदेपूर शहराच्या उत्तरेस १४ मैल अरवली टेकड्यांच्या पूर्व भागांत आहे. लोकसंख्या सुमारें दोन हजार.

**देलाव्हिन्य, जीन** (१७९३–१८४३)—एक फ्रेंच कवि आणि नाटककार. त्याचीं प्रसिद्ध नाटकें मारिनो फेलिरो, ११ वा लुई, डॉन ज्वान, इ. आहेत.

**देव**—देव, ईश्वर, परमेश्वर, ब्रह्म, इत्यादि शब्द सर्वशक्तिमान, अद्वितीय असें जें सृष्टीचें आदिकारण त्याला लावतात. देवकल्पनेचा विकास मानवजातीच्या विकासाबरोबर होत गेला. वन्य समाजांत भूत–पिशाच्चें ह्यांच्यामध्यें मनुष्याला त्रास देण्याची शक्ति आहे; तींच रोग उत्पन्न करतात, अशी समजूत असते व मेलेलीं माणसें भुतें होतात असा त्यांचा विश्वास असतो. वेदांमध्यें सर्व भौतिक गरजा देव पुरवूं शकतात, अशी समजूत असलेली दिसते. उपनिषत्कालीं ब्रह्माची कल्पना प्रसृत आली. ब्रह्म आनंदमय, निरुपाधिक, अनादि असून ईश्वर मायाजन्य सृष्टींतील आहे; मात्र तो मायेच्या अधीन नाहीं हें मत प्रचलित झालें. जगांतील बरेच लोक ईश्वर हा आकाशांत असणाऱ्या स्वर्गांत असतो व तो तेथून जगाचें नियमन करतो असें मानणारे आहेत. हे सर्व द्वैती. मनुष्याच्या शरीराचा आश्रय करून असणारा जीव हाच ब्रह्म आहे असें मानणारे अद्वैती लोक फार थोडे आहेत. ईश्वर न मानणारे लोक तर फारच थोडे आहेत. संघरूपानें ते अद्यापि जगांत पुढें आले नाहींत; म्हणजे त्यांचा पंथ आज अस्तित्वांत नाहीं. आपणच ब्रह्म असल्यावर ईश्वराला निराळें स्थान नाहीं. हिंदूंचा देव, ईश्वर अथवा परमेश्वर त्यांच्या भावनेंतून निर्माण झाला आहे. तो साकार आहे. राष्ट्रध्वज चार दिडक्या किंमतीच्या चिंध्यांचा असेल, पण त्याला आपण सर्वोच मान देतों; प्रणाम करतों, त्यासाठीं प्राणहि खर्चीं घालतों.

तसेंच हिंदूंच्या ईश्वराचें आहे. परमेश्वर ही एक पराकोटीची कल्पना आहे.

परमेश्वराविषयीं निरनिराळ्या काळीं आणि निरनिराळ्या देशांत व लोकांत निरनिराळ्या कल्पना रूढ होत्या. कोणी त्यास क्रूर मानीत तर कोणी दयाळू म्हणत. तो सर्वांत श्रेष्ठ असा शास्ता व सर्वनियंत्रक आहे ही भावना सार्वत्रिक आहे. परमेश्वराच्या पूजेचे व आराधनेचे प्रकारहि क्रमानें सुधारत गेले. भूतपिशाच्च देवता मानण्याप्रमाणें बळी देण्याची चाल जाऊन यज्ञयागादि आले व पुढें नामसंकीर्तन—पुराणपठणांचा व जपजाप्याचा काळ येऊन पुढें नुसत्याच पद्यात्मक वा गद्यात्मक प्रार्थना सुरू झाल्या.

थिऑसफीच्या दृष्टीनें पाहतां ईश्वर म्हणजे सर्व सृष्टीच्या अंतर्यामीं सर्वत्र अनुस्यूत असलेली एक ज्ञानगर्भ शक्ति होय. बाह्य सृष्टींत जी नियमबद्धता आहे (जी रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, वगैरेंत दिसते), निसर्गांत जी क्रमवार उत्क्रांति आहे (जी प्राणिशास्त्र, इतिहासशास्त्र, वगैरेंत दिसते), सजीव प्राण्याच्या देहांत डोळ्यासारख्या योजकतेनें निर्मिलेल्या व मोराच्या पिसासारख्या सौंदर्यानें भरलेल्या ज्या चिजा आहेत, त्या पाहिल्या म्हणजे सृष्टीच्या पाठीशीं असलेली ही ईश्वर नामक शक्ति सुबुद्ध आहे असें दिसून येतें. नुसत्या ह्या शक्तीचाच विचार केल्यास तिला निर्गुण म्हणावें लागेल. ही शक्ति उच्च प्रकारच्या व्यक्तींमधून जास्त जास्त प्रमाणांत प्रकट होत असल्यामुळें त्या व्यक्तींनाहि ईश्वर म्हणतां येईल. या दृष्टीनें जीवन्मुक्त पुरुष, अवतार हेहि ईश्वर होत. ते सगुण होत. आपल्या सूर्यमालेंत अशा प्रकारची जी परमोच्च दर्जाची व्यक्ति आहे, जी सबंध सूर्यमालेचे नियमन करते तिला थिऑसफींत लोगॉस किंवा सोलर लोगॉस अशीं नांवें आहेत. यालाच निरनिराळ्या धर्मांत ईश्वर असें नांव दिलेलें आहे. या शक्तीचा सूर्यबिंबाशीं निकट संबंध आहे व त्या हिरण्मय स्वरूपांतून ती विपुलतेनें प्रकट होत असते असें थिऑसफिस्ट मानतात.

सृष्टीचा निर्माता व शास्ता जो असेल त्याला देव हें नांव आहे. देव मानणारे जसे आहेत तसे न मानणारेहि लोक आहेत; त्यांना नास्तिक म्हणतात. कांहीं जण असे असतात कीं, त्यांना देवाचें अस्तित्व मान्य नसतें; पण अमान्यहि नसतें; कोणालाहि देवाविषयीं नक्की कांहीं सिद्ध करतां येत नाहीं, असें ते म्हणतात. या लोकांना अज्ञेयवादी असें नांव आहे. आस्तिक्यवादी लोकांचें म्हणणें असें कीं, सर्व विश्व व त्याचे सर्व घटक हीं ज्या अर्थीं नियमबद्ध आहेत त्या अर्थीं त्यांचें नियमन करणारा मागें कोणी असलाच पाहिजे. माणसामध्यें नीतिधर्म ज्या अर्थीं वास्तव्य करतो, त्या अर्थीं कांहीं एक उच्च नीतिबल असलेंच पाहिजे. या सृष्टींत जीवाचे जे वेगवेगळे प्रकार आहेत ते सभोंवतालच्या परिस्थितीला अनुरूप असेच आहेत असें दिसतें. तेव्हां ही रचना परमेश्वरावांचून होणें कसें शक्य आहे? सर्वत्र मनुष्यजातीचा विश्वास आधिदैविक गोष्टींवर बसलेला असून या विश्वासाच्या अधिष्ठानाला लोकांना प्रत्यक्ष पुरावे शोधण्याची जरूरीच वाटत नाहीं.

प्रत्येक धर्मांत देवदेवता आहेत. अनेकेश्वरवादांतून एकेश्वरवाद निघाला. देवतोपासनेचे संप्रदाय अनेक आहेत.

आज देव हा शब्द ईश्वरवाचक आहे, पण हा मूळचा विशिष्ट लोकांचा वाचक असावा असें कांहीं पंडितांचें म्हणणें आहे. कारण "देव आणि मनुष्य हे शेजारी असून तपोबलानें देवांचा उत्कर्ष झाला आणि मनुष्यांचा अपकर्ष होत तसाच राहिला", असें आपस्तंब म्हणतो. ऋग्वेदांत व विशेषतः ब्राह्मणांत देव आणि असुर हीं राष्ट्रें असून त्यांचीं युद्धें झाल्याबद्दलचे उल्लेख अनेक आढळतात. देव शब्द अवेस्तामध्यें शत्रुवाचक आहे. देवांस बायका होत्या, मुलेंहि होतीं, देवांच्या बागा होत्या वे राजधान्या होत्या; देवांचा राजा होता त्यास इंद्र म्हणत. देवांचा जसा मंत्रि होता तसा सेनापतिहि होता. इतकेंच नव्हे, तर देवांच्या कुळी देखील होत्या. देवांच्या कुळी तेहतीस होत्या. यावरून देव शब्द मूळचा विशिष्ट लोकांचा वाचक असावा असें अनुमान निघतें.

शालिवाहनच्या चौथ्या शतकांत देवराष्ट्र हा प्रांत सुप्रसिद्ध होता. आज आपल्या लिपीस देवनागरी हें नांव आलें आहे. सुर्या हें सुरांचें म्हणजे देवांचें राष्ट्र असावें, असेंहि एक संशोधक सुचवितो.

**देव, शंकर दत्तात्रेय** (१८९४– )—महात्मा गांधींचे एक महाराष्ट्रीय अनुयायी, व राष्ट्रीय सभेचे निष्ठावंत कार्यकर्ते. यांचें शिक्षण पुणें व बडोदें येथें झालें. हे १९१७ सालीं बी. ए. झाल्यावर यांनीं देशकार्यांत भाग घेण्यास सुरुवात केली. प्रथम बिहारमधील चंपारण्यांत म. गांधींना मदत करण्याकरितां स्वयंसेवक म्हणून हे गेले. तेव्हांपासून म. गांधींच्या प्रतिपादनांचा पुरस्कार करण्याचें काम यांनीं अखंड चालविलें आहे. महाराष्ट्रांत म. गांधींच्या असहकारितेच्या कार्यक्रमाला जुन्या पुढाऱ्यांचा सर्वस्वीं विरोध असतांना आणि नवी पिढी 'त्या कार्यक्रमाबद्दल साशंक असतांना यांनीं त्याचा मोठ्या तडफदारपणें आणि युक्तिवादपूर्वक पुरस्कार केला. यांना संघटित आणि समर्थ अशा विरोधांतून मार्ग काढावा लागला. प्रथम ते मुळशी सत्याग्रहांत पडले. राष्ट्रीय सत्याग्रहांचे १९३० व १९३२ चे लढे झाल्यानंतर १९३४ सालीं महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमेटीच्या अध्यक्षपदावर यांची निवडणूक झाली. पूर्ण त्याग, कमालीची काँग्रेसनिष्ठा आणि संघटनासामर्थ्य यांच्या जोरावर यांनीं पक्षसंघटना करून

खानदेशांत फैजपूर येथें राष्ट्रीय सभेचें पहिलें ग्रामीण अधिवेशन यशस्वीपणें भरविलें. तेथें हे स्वागताध्यक्ष होते (१९३६). तेव्हांपासून हे राष्ट्रीय सभेच्या कार्यकारिणी सभेंत आहेत व गेलीं चार वर्षें तर मुख्य चिटणीस आहेत. यांनीं अनेक वेळां तुरुंगवास भोगला आहे. हे उत्कृष्ट वक्ते व सर्वांशीं मिळते घेऊन कार्य करणारे आहेत.

**देव, शंकर श्रीकृष्ण** (१८८१– )—रामदासी वाङ्मयाचे महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध संग्राहक व त्या वाङ्मयाचे सूक्ष्म अभ्यासक. हे बी. ए., एलएल्. बी. आहेत. बी. ए. झाल्यानंतर तावडतोब यांनीं सत्कार्योत्तेजक सभेची स्थापना केली (१८९३). ७५ ग्रंथांचें व जुनें 'इतिहास व ऐतिहासिक' आणि आज चालू असणारें 'रामदास व रामदासी' या मासिकांचें प्रकाशन, इतकें कार्य करून या संस्थेच्या सुवर्ण–महोत्सवाच्या वेळीं यांनीं तिला विश्वस्तांच्या ताब्यांत दिली (१९४३).

संशोधन आणि प्रकाशन या कार्यांबरोबरच जांब, चाफळ, सज्जनगड, मसूर, शहापूर, शिवथर, इत्यादि समर्थपुनीत ठिकाणीं जीर्णोद्धाराचीं कामें यांनीं केलीं. पण सगळ्यांत महत्त्वाचें जीर्णोद्धाराचें कार्य म्हणजे जांबेचें श्रीसमर्थमंदिर होय. निजाम इलाख्यांत जांब येथें श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं १९३२ सालीं सभेनें एक टोलेजंग आणि सुंदर श्रीसमर्थमंदिर बांधलें. या मंदिराच्या बांधकामाकरितां ४०-५० हजार रु. लागले. हा सारा पैसा सर्वत्र हिंडून, व्याख्यानें देऊन त्यांनीं जमा केला.

सत्कार्योत्तेजक सभेच्या संशोधनाचें फळ म्हणजे यांनीं केलेल्या सुमारें तीन हजार हस्तलिखित बाडांचा आणि तितक्याच ऐतिहासिक कागदपत्रांचा संग्रह होय. अशा या अमोल संग्रहाचें संरक्षण व्हावें आणि तो पूर्णपणें जनतेच्या मालकीचा व्हावा म्हणून १९३५ सालीं 'श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर' म्हणून धुळें येथें एक इमारत बांधून ती इमारत व वरील संग्रह विश्वस्तपत्रानें विश्वस्तांच्या हवालीं करण्यांत आला. मंदिराचा वार्षिक खर्च देणग्यांनीं व मुंबई सरकारच्या मदतींतून चालतो.

यांनीं श्रीसमर्थांच्या तत्त्वाचा विचार, आचार आणि प्रचार करण्याच्या उद्देशानें 'श्रीसमर्थसंघ' नांवाची संस्था धुळें येथें काढली. हा सर्व व्याप सांभाळून ते देशकार्यांत, प्रत्येक चळवळींत आपल्या वैशिष्ट्यानें चमकल्याशिवाय राहत नाहींत.

आस्थेवाईक व चिरस्थायी वाङ्मयेतिहास–संशोधकांत यांचें नांव कोणालाहि नमूद करावें लागेल. यांची त्यागी वृत्ति आणि जन्मभर एका दिशेनें, एका निष्ठेनें परिश्रम करून मिळविलेलें साहित्य लोकांपुढें व्यवस्थितपणानें ठेवण्यांतली यांची योजकता ध्यानांत घेण्यासारखी आहे.

**देवकी**—कृष्णाची माता, वसुदेवाची पत्नी व कंसाची बहीण म्हणून महाभारतांत हिचा निर्देश आहे. छांदोग्य उपनिषदांत (३·१७·६) 'देवकीपुत्र' असें कृष्णाचें मातृकनाम आलें आहे. हिचा पिता देवक असून तो गंधर्वांचा राजा होता, असें भारतांत वर्णन आढळतें. देवकीला कधीं कधीं अदितीचा अवतार मानलें आहे. ही पूर्वजन्मीं राजा सुतपा याची पृश्नी नांवानें पत्नी होऊन राहिल्याची कथा आहे.

**देवकीनंदन** (ग्रंथकाल स. १७८३–९९ चा सुमार)—एक हिंदी कवि. हा कनोजजवळच्या मकरंदनगर गांवचा राहणारा. याच्या बापाचें नांव सबली शुक्ल असें होतें. यानें स. १७८४ मध्यें 'शृंगारचरित्र' आणि स. १८०० मध्यें 'अवधूतभूषण' असे ग्रंथ लिहिले. याशिवाय यानें 'सरफराजचंद्रिका' हा ग्रंथ लिहिला. रुद्दामऊ (जि. हरदहि) चा राजा अवधूतसिंह याच्या पदरीं असताना यानें 'अवधूतभूषण' हा ग्रंथ केला. 'शृंगारचरित्रां' त रसभाव, नायिकाभेद आणि अलंकारहि आलेले आहेत.

**देवकें**—हिंदुस्थान, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका, ओशियाना, वगैरे देशांतून जुन्या लोकांत अशी समजूत आहे कीं, एखाद्या कुटुंबाचा, वर्गाचा किंवा जातीचा एखाद्या विशिष्ट प्राण्याशीं किंवा वनस्पतीशीं रक्ताचा संबंध असतो व म्हणून त्या प्राण्याविषयीं आदर दाखविण्यासाठीं त्याला ते खात नाहींत; व वनस्पति असेल तर तिचा वापर करीत नाहींत. एकच देवक असलेल्यांत लग्नव्यवहार होत नाहींत. आपल्याकडे ब्राह्मणेतरांत आंबा, चिंच, मोर, वगैरे वनस्पति–प्राणी देवकें असतात व त्यांचा विचार करूनच लग्नव्यवहार करतात. लग्नादि संस्कारांत प्रथम देवकांची पूजा होते व शेवटीं उत्थापन करतात.

**देवगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ५२५ चौ. मै.. लो. सं. १,७४,८०९. विजयदुर्ग व देवगड हे प्रसिद्ध किल्ले तालुक्यांत आहेत. पाऊस सरासरी ८० इंच पडतो. हवा निरोगी आहे. जमीन नापीक आहे.

तालुक्याचें मुख्य ठिकाण देवगड. हें चांगलें सुरक्षित बंदर आहे. समुद्रकांठीं किल्ला आहे. येथील बंदरास कोंकणच्या बोटी लागतात व जलमार्गानें व्यापार मोठा चालतो. खाडींत बारीक मोतीं सांपडतात.

**देवगड किल्ला**—१. संयुक्त प्रांतातील झांशी जिल्ह्याच्या ललितपूर तहशिलीमध्यें मोडकळीस आलेला हा किल्ला बेटवा नदीच्या उजव्या तीरावर आहे. किल्ल्यांत ईशान्य कोपऱ्यांत १६ जैन मंदिरें आहेत. किल्ल्याच्या खालीं देवगड गांव असून गुप्त वंशाच्या वेळचें एक सुंदर देवालय आहे. किल्ल्याच्या

दक्षिणेकडील वटाच्या भिंतींत सिद्धगुंफा नांवाचें लेणें आहे. १८११ सालपर्यंत हा किल्ला बुंदेल्यांच्या ताब्यात होता.

२. विजयदुर्गाच्या दक्षिणेस १२ मैलांवर देवगडच्या दक्षिणेस हा किल्ला आहे. क्षेत्रफळ १२० एकर आहे. सुमारे १७५ वर्षांपूर्वी तो आंग्र्यांनीं बांधला असावा. हल्लीं याचा मागमूस नाहीं.

**देवगांधार**— हा राग आसावरी थाटाच्या जन्य रागांपैकीं एक आहे. याच्या आरोहांत ऋषभ व धैवत स्वर वर्ज्य होतात व अवरोह सातहि स्वरांनीं होतो म्हणून याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादी षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर सर्वसंमत आहे. या रागाच्या पूर्वांगांत धनाश्री व उत्तरांगांत आसावरी या रागांची छाया दृष्टीस पडते.

**देवगांव**— १. वऱ्हाड–मध्यप्रांत, जिल्हा उमरावती, तालुका एलिचपूर. हें लहान खेडेगांव आहे. यावरूनच एलिचपूर चिखलदाला जवळचा रस्ता आहे. किल्ला आणि देवगांव यांच्या दरम्यान एक प्रवाशांच्या घोड्यांकरितां तबेला बांधलेला आहे. वेल्स्लीनें गाविलगडचा किल्ला घेतल्यावर चार दिवसांनीं म्हणजे ता. १९ डिसेंबर १८०३ रोजीं ईस्ट इंडिया कंपनी व भोंसले यांमध्यें जो तहनामा झाला, त्यावरील सह्या या गांवीं झाल्या म्हणून हें देवगांव प्रसिद्ध आहे.

२. संयुक्त प्रांतांतील अझमगड जिल्ह्याची दक्षिणेकडील एक तहशील. हींत देवगांव, बेल–दौलताबाद, व बेल्हाबाच परगण्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ३८५ चौरस मैल. खेडीं ७०२. मंगई, बेसू व गांजी ह्या तीन नद्या ह्या तहशिलींतून वाहतात. तांदळाचें पीक सर्वांत जास्त होतें.

**देवगिरी**—१. मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा, बंकापूर–राणेबिन्नूर रस्त्यावर करजगीच्या पश्चिमेस सहा मैलांवर दोन हजार वस्तीचा एक गांव. येथें हनुमान, बसवम्मा व येलम्मा यांचीं देवळें आहेत. पैकीं येल्लमाचें देऊळ जखनाचार्यानें बांधलें असें म्हणतात. यांत १५३८ सालचा एक शिलालेख आहे. देवगिरी येथील एका तलावांत खणीत असतांना १८७५–७६ सालीं तीन ताम्रपट सांपडले आहेत. त्यांची जुनी (हळे) कानडी लिपि असून भाषा संस्कृत आहे.

२. दौलताबाद पाहा. येथें यादवांची राजधानी होती.

**देवगिरी विलावल**—हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय सकाळचा पहिला प्रहर मानितात. अवरोहांत गांधार व धैवत स्वर दुर्बल ठेवितात. अवरोहांत कोमल निषादाचा प्रयोग धैवतांशीं करण्याचा प्रचार आहे. मध्यम स्वर आरोहांत दुर्बल ठेवितात. पूर्वांगांत कल्याण आणि उत्तरांगांत अलैय्या असें मिश्रण या रागांत दृष्टीस पडतें. हा एक बिलावल प्रकार आहे.

**देवगुप्त** (सु. सातवें शतक)— माळव्याचा एक राजा. माळव्याचे गुप्त राजे हे कनोजच्या मौखरी राजांचे पिढीजाद शत्रू होत. हूणांनीं ठाणेश्वराच्या राज्यावर स्वारी केली त्या वेळीं तेथील राजा प्रभाकरवर्धन मेला व राज्यवर्धन दुसरीकडे अडकला, असें पाहून देवगुप्तानें कनोजवर हल्ला चढविला. त्यांत तेथील राजा ग्रहवर्मा ठार झाला व त्याची राणी (राज्यवर्धनाची बहीण) राज्यश्री ही देवगुप्ताच्या हातीं लागली. तिला त्यानें कैदेंत ठेविलें. नंतर त्यानें ठाणेश्वराकडे मोर्चा फिरविला. त्या वेळीं त्याला बंगाल-(कर्णसुवर्ण)चा राजा शशांकगुप्त (हा त्याचा मित्र होता) यानें मदत केली. कनोजच्या मौखरींचे मालवीय गुप्तांसारखेच हे वंगीय गुप्तहि शत्रू होते. कारण मौखरींनीं त्यांचें राज्य हिसकावून घेतलें होतें. राज्यवर्धन हूणांवर गेला असतां, त्यास ही बातमी समजतांच तो तातडतोब देवगुप्तावर चालून आला व लढाई देऊन त्यानें देवगुप्तास ठार केलें आणि त्याच्या कुटुंबास कैद करून राज्यश्रीस सोडविलें. देवगुप्ताचे सावत्र भाऊ कुमार व माधव हे राज्यवर्धनास जाऊन मिळाले होते.

**देवटेक**—मध्यप्रांत, चांदा जिल्हा, ब्रह्मपुरी तहशील, एक गांव. येथें एक लहानसें देऊळ असून दुसऱ्याचे कांहीं अवशेष दिसतात. येथें एक शिळा असून तीवर दोन लेख आहेत. त्यांपैकीं एकाची लिपि अशोककालीन असून दुसरी गुप्तांच्या काळांतील आहे. दोन्ही लेख अपुरे आहेत. परंतु त्यांत चिकंबरी नांवाचा लेख असून इतिहाससंशोधक देवटेकजवळ असलेल्या चिकमारा या खेड्याशीं त्याचा संबंध लावतात. यावरून चिकमारा गांव २००० वर्षांपूर्वींचें असावेंसें दिसतें. देवटेकपासून दोन मैलांवर असलेल्या चिकमारा आणि पानोरी येथें पुष्कळ प्राचीन दगड वगैरे दृष्टीस पडतात. पूर्वीं हीं तीन खेडीं मिळून एक मोठें नगर असावें.

**देवणभट्ट** (सु. ११२५–१२२५)—एक धर्मशास्त्रकार. याचा 'स्मृतिचंद्रिका' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ धर्मशास्त्रावर लिहिला आहे. यामध्यें संस्कार, व्यवहार, श्राद्ध, अशौच, वगैरेविषयीं माहिती दिलेली आहे. यानें प्रायश्चित्तावरहि बरेंच लिहिलें आहे. यानें स्मृतिचंद्रिकेंत पुष्कळ ग्रंथांची व ग्रंथकारांची चिकित्सा करून त्यांच्या तत्त्वांचा नीट विचार करून नंतर आपलीं मतें दिलेलीं आहेत.

हा दक्षिणेकडील ग्रंथकार होता. दक्षिणेंत याच्या ग्रंथास न्यायखात्यांत फार मान दिला जातो. मुलाच्या पश्चात् आईबाप वारस ठरतात हें मिताक्षरेंतील मत यास पसंत नसून त्यावर त्यानें टीका केली आहे.

**देवदत्त**—हा कोलीय वंशांतील असून त्याची बहीण यशोधरा ही सिद्धार्थ गौतम याची पत्नी होती. लहानपणापासून सिद्धार्थ व देवदत्त हे एकत्र वाढले होते. सिद्धार्थानें बुद्धत्वप्राप्तीनंतर नवा पंथ काढला व त्याचा प्रथम स्वीकार देवदत्तानें केला. पुढें बुद्धाचा उत्कर्ष सहन न होऊन देवदत्त स्वतंत्र पक्ष काढण्याच्या विचारास लागला. आपणांस पट्टशिष्यत्व मिळावें अशीहि त्यानें बुद्धाजवळ खटपट केली. पण सारिपुत्त व मोग्गलान हे विद्यमान आहेत तोंपर्यंत मुख्य कारभार कोणावरहि टाकणार नाहीं असें बुद्धानें देवदत्तास उत्तर दिलें. पुढें देवदत्तानें मगध देशाचा युवराज अजातशत्रु, याला आपलासें करून घेऊन बुद्धाचा खून करण्याचा प्रयत्न केला, पण तो फसला. अजातशत्रूनें राजा बिंबिसार यास मारलें. ती मसलतहि देवदत्ताचीच होती. पुढें अजातशत्रूनें बौद्ध धर्माची दीक्षा घेतल्यामुळें देवदत्ताचा आधार नाहींसा झाला. संघांत भेद उत्पन्न करून कोकालिक, कतमोरतिस्स, खण्डदेवसुत व समुद्रदत्त असे चार शिष्य संघांतून फोडून तो बुद्धाकडे गेला. भिक्षूंनीं अरण्यांत राहावें, त्यांनीं भिक्षावृत्तीचा अवलंब करावा, हलकें वस्त्र वापरावें, वृक्षाखालीं शयन करावें व मांस व मत्स्य खाऊं नयेत, असे पांच नियम संघांत असावे अशी त्यानें बुद्धाजवळ मागणी केली. बुद्ध या गोष्टीस कबूल न झाल्यामुळें त्यानें स्वतंत्र धर्म काढला; पण त्याचे सर्व शिष्य त्यास सोडून गेले व त्याचा चोहोंकडे दुर्लौकिक झाला. जातकांतून देवदत्ताची निंदा केलेली आढळते.

**देवदार**—१. [लॅ. सेड्रस लिबानी, किंवा सेड्रस देवदार; इं. सेडर]. देवदाराचीं झाडें हिंदुस्थानांत हिमालय पर्वतावर वाढतात. हीं १५० फूटपर्यंत उंच वाढतात व त्यांचा घेर ३० फूटपर्यंत भरतो. याचीं पानें झुबकेदार किंवा एकेरी असतात. हीं लेबानन पर्वतांतील देवदारां( सेडार )पेक्षां मोठीं व दाट असतात. याचा रंग काळसर व निळसर हिरवा असतो व त्यावर एक प्रकारची तकाकी असते. याचें लांकूड इमारतीकरितां वापरण्यांत येतें. हें घट्ट व टिकाऊ असतें. देवदार हें नांव या झाडाशीं कांहीं संबंध नसलेल्याहि अनेक झाडांस लावण्यांत येतें. व तीं निरनिराळ्या देशांत आढळतात.

२. [वर्ग-यूफोर्बियासी—बॅक्सस सेंपर व्हिरेन्स. इं. बॉक्स ट्री]. एक झुडपासारखें नेहमीं हिरवें राहणारें १२ ते १५ फूट उंच वाढणारें झाड. याचें मूलस्थान युरोप व आशियाचा दक्षिण भाग होय. इंग्लंडमध्यें एके काळीं हें इतकें सामान्य होतें कीं, त्यापासून अनेक गांवांस ( वडगांव पिंपळगांवप्रमाणें ) नांवें पडलीं आहेत (उदा., बॉक्स हिल, बॉक्स ले, इ. ). याचें लांकूड पिवळट असून त्याचे रवे घट्ट असतात व ते मजबूत व जड असून त्यावर चकाकी ( पॉलिश ) चांगली आणतां येते. याचा उपयोग कातारी, लांकूड-खोदकाम ( कोरींव ) करणारे, चित्रें कोरणारे व गणिताचीं साधनें ( हत्यारें ) करणारे करतात. या लांकडापासून बांसरी व इतर फुंकून वाजवावयाचीं वाद्यें, बुद्धिबळें, वगैरेहि होतात. काळा समुद्र व कास्पियन समुद्र या भागांतून बहुतेक देवदाराचें लांकूड येतें.

३. [ जाति अबिस. इं. फर. ] पाइन झाडासच केव्हां केव्हां फर म्हणतात. वास्तविक अबिस या जातीच्या झाडांस फर म्हणतात. या जातींत सिल्व्हर फर, बाम ऑफ गिलिअड, इत्यादि झाडें येतात.

**देवदासी**—दक्षिण हिंदुस्थानांत देवस्थानांतून देवास दासी अर्पण करून तिजकडून मंदिरांत देवाची सेवा करविण्याची चाल आज वरींच शतकें रूढ आहे. गरीब किंवा देवभोळे आईबाप आपल्या लहान मुली देवदासींच्या अड्डयावरील मुख्य बाई जी व्यासमाता तिला विकतात. अविवाहित राहून देवाची सेवा करण्यांत या मुलींना पुढें सर्व जन्म काढावा लागतो. यांनीं देवास चवरी वारावी, त्याच्यासमोर नृत्य करावें, देवाचा रथ किंवा दिंडी निघाली तर त्या समारंभास यांनीं देवासमोर नाचत जावें, व देवास कुंभारती ओवाळावी, अशीं त्यांचीं कामें आहेत.

महाराष्ट्रीय मुरळ्यांप्रमाणें या देवदासी उघडपणें व्यभिचार करतात. इ. स. १००४ मध्यें कोरलेल्या शिलालेखांत तंजावर येथील राजराज देवालयांत ४०० देवदासी असल्याचें लिहिलें आहे, व त्यांच्या निर्वाहास जमिनी तोडून दिलेल्या आहेत, असेंहि म्हटलें आहे. अजूनहि मदुरा, कांजीवरम् व तंजावर येथील मंदिरांत अनेक देवदासी आहेत. १५ व्या शतकांत अब्दुल रझाक नांवाचा विजयनगरच्या दरबारांतील तुर्की वकील लिहितो कीं, देवदासी सरकारी संस्थेंत राहतात. त्यांची सर्व व्यवस्था सरकार करतें व त्यांच्यापासून होणाऱ्या उत्पन्नाचा विनियोग पोलिस खात्याकडे करण्यांत येतो.

देवदासींची चाल जुन्या ग्रीक लोकांतहि होती व ईस्टर देवतेच्या मंदिरांत बाबिलोनियामध्येंहि होतीच. हिरोडोटस म्हणतो कीं, बाबिलोनियांत जन्मलेल्या प्रत्येक स्त्रीनें आयुष्यांत एक वेळ तरी अफ्रोडीटीच्या मंदिरांत जाऊन बसलें पाहिजे व परपुरुषाशीं संग केला पाहिजे असा निर्बंध होता. मंदिरांत जाऊन ती बसली म्हणजे जो पुरुष प्रथम चांदीचें नाणें तिच्यापुढें टेवील त्याच्याबरोबर मंदिराबाहेर जाऊन त्यास तृप्त केलें म्हणजे देवी प्रसन्न होते अशी त्यांची समजूत असे. मनुष्यास स्त्रीसंगापासून जो आनंद होतो तोच देवास अर्पण करावा अशा कल्पनेनें सुद्धां देवदासींची चाल पडली असेल. स्कंदपुराणांत कार्तिकेयाला दक्षाचा विध्वंस करण्यास बापानें पाठविलें असतां

वाटेंत सुंदर स्त्रियांनीं जाऊन व नृत्य करून त्याचें मनोरंजन केलें अशी कथा आहे; व यावरूनच देवदासींचीं लग्नें प्रथम देवाबरोबर लावून मग वेश्यावृत्ति करण्यास त्यांना मोकळीक मिळत असावी. अशा अनीतिकारक धंद्यांत पडलेल्या स्त्रियांची सुधारणा करून त्यांना सन्मार्गाला लावण्यासाठीं मद्रास येथें कांहीं वर्षांपूर्वी 'हिंदु-युवती-शरणालयम्' नांवाची संस्था निघाली आहे.

**देवदूत**—( एन्जल ). ईश्वराहून कमी पण मानवाहून उच्च दर्जाची अशी एक अतिमानुष कोटि. इस्लामी, यहुदी, ख्रिस्ती या एकेश्वरी धर्मांत व झरथुष्ट्रपंथ वगैरे आणखी कित्येक धर्मपंथांत ही कोटि मानतात. अनेकेश्वरी धर्मांत मानवाहून उच्च अशा अनेक कोट्या मानतात; व त्यांमधून जात जात मनुष्य अखेर प्रत्यक्ष परमेश्वरस्वरूप पावूं शकतो. असें मत हिंदुधर्मांतहि आहे. पण एकेश्वरी धर्मांत ईश्वर व देवदूत यांत स्पष्ट व कायमचा भेद असून देवदूत हा ईश्वरस्वरूप कधींहि पावणार नाहीं असें मानतात. एन्जल हा शब्द मूळ मेसेंजर ( दूत ) या अर्थाच्या ग्रीक शब्दापासून झाला आहे. एन्जलपैकीं गॅब्रिएल, मायकेल, वगैरे प्रमुख आहेत. त्यांच्यामध्यें चांगले एन्जल व वाईट एन्जल असे दोन प्रकार असून वाईट एन्जलांमध्यें बालझेबब व सेटन हे प्रमुख आहेत. एन्जल हेच देवाचे दरबारी व सैनिक होत. त्यांच्यामार्फत ईश्वर सर्व सृष्टीवर व मानवजातीवर तावा चालवितो, मानवप्राण्यांचेहि संरक्षक एन्जल असतात, अशी समजूत असे.

ख्रिस्ती कल्पना अशी आहे कीं, देवदूत हे परमेश्वरानें आपल्या सेवेकरितां निर्माण केलेले शुद्ध आत्मे होत. सृष्टीच्या रचनेमध्यें जो भौतिक आणि आध्यात्मिक अंश असतो त्यांतील सर्वोत्तम अंश देवदूतांच्या ठिकाणीं असतो; कारण त्यांच्यामध्यें जड द्रव्याचा अंश मुळींच असत नाहीं. देवदूत अनेक असून त्यांच्या ठिकाणीं कमीजास्त पूर्णत्वाचा अंश असल्यामुळें त्यांची एक स्वतंत्रच अधिकारपरंपरा असते. सर्व देवदूत प्रथम सत्स्वरूपीच निर्माण करण्यांत आले होते. त्यांस परमेश्वरापासून प्राप्त होणारें सर्व सुख व प्रत्यक्ष दर्शन घडत असे व त्यांच्याकडे परमेश्वराची अखंड सेवा करण्याचें काम असे. परंतु त्यांपैकीं कांहींनीं पातक केलें व त्यांनीं परमेश्वराची सेवा करण्याऐवजीं ते स्वतःवरच प्रेम करूं लागले. यामुळें त्यांस परमेश्वराचें दर्शन मना करण्यांत आलें व त्यांस नरकांत फेंकून देण्यांत आलें. त्यांस राक्षस, पिशाचें किंवा दुष्ट देवदूत म्हणतात. या दुष्ट देवदूतांचा जगावर होणारा वाईट परिणाम हा परमेश्वराच्या योजनेच्या मानानें दुर्बल व कमी प्रतीचा असतो. मानवाची परीक्षा पाहण्याकरितां त्यांस कांहीं इजा करण्याचें व मनुष्यास भुरळ पाडण्याचें किंवा लोभविण्याचें सामर्थ्य दिलेलें आहे; परंतु जगाच्या अंताच्या वेळीं सर्व दुष्ट शक्तींचें पूर्णपणें निरसन होऊन परमेश्वराच्या राज्यामध्यें दुष्टाव्याचा लेशहि राहणार नाहीं. चांगले देवदूत परमेश्वराचीं कामें करतात व त्याचे निरोप पोंचवितात. प्रत्येक मनुष्याचा एक संरक्षक 'कैवारी देवदूत' असतो तो त्यास मार्ग दाखवितो व आयुष्यक्रमांतील संकटांपासून त्याचें रक्षण करून त्यास अंतिम मोक्षाप्रत नेतो. बायबल म्हणतें : 'ते काम करण्यास योग्य असे आत्मे असून परमेश्वर त्यांस मुमुक्षूंना जेव्हां त्यांची जरूर भासते तेव्हां पाठवितो' ( हि. १·१४ ). याकरितां ख्रिस्ती लोकांत देवदूतांची प्रार्थना करण्यांत येते व त्यांचे विशेष उत्सव करण्यांत येतात.

**देवदूत मासा**—( एन्जल फिश् ). हा शार्क माशाच्या जातीचा मासा असून दिसण्यांत अगदीं बेढब दिसतो व अतिशय खादाड आहे. हा ६ ते ८ फूट लांब असतो व याला पाठीवर दोन पंखांसारखे कल्ले असतात; त्यांवरून यांत देवदूत मासा असें म्हणतात. याचें तोंड शार्कमाशासारखें आंत नसून डोक्याच्या अखेरीस मात्र असतें. हा ब्रिटिश बेटांच्या दक्षिणेस आढळतो व यास भिक्षु मासा ( मंक फिश् ) किंवा फिडल मासा असेंहि म्हणतात.

**देवधर ( ढमढेरे )**—पेशवाईतील एक सरंजामदार घराणें. रामचंद्र आबा देवधर-ढमढेरे यास नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दीत दफ्तरांत असामी मिळाली. तेथें त्यानें १५ वर्षें काम केलें. पुढें थोरल्या माधवरावानें त्यास पेशवाईची दफ्तरदारी दिली ( १७६२ ). आबा वारल्यावर ( १७८५ ) त्याचा मुलगा मोरोपंत तात्या हा त्या जागेवर आला. तो १७८९ सालीं वारला. त्याच्यामागें पांडुरंग आण्णा हा दफ्तरदार झाला. पुढें त्याची पुतणी कुसाबाई ही बाजीरावास दिली होती. ही बाजीरावाची पांचवी बायको. नंतर पेशव्यानें पांडुरंगरावास कर्नाळा, राजमाची, बेलापूर, वगैरेंच्या मामलती सांगितल्या व दफ्तरदारीचें उत्पन्न कमी आल्यानें निराळा सरंजामहि दिला. बाजीराव पुण्याहून निघून शेवटीं बऱ्हाणपुराकडे जात असता पांडुरंग व त्याचा मुलगा रामचंद्र हे त्याबरोबर खानदेशपर्यंत गेले होते. परंतु पुढें इंग्रजांचा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यावर पांडुरंग पेशव्यास सोडून परत पुण्यास आला व रामचंद्र मात्र त्याच्याबरोबर ब्रह्मावर्तास गेला. पांडुरंगानें पेशव्याचा पक्ष सोडला त्याबद्दल एल्फिन्स्टननें त्याचा २० हजारांचा व रामचंद्राचा १५ हजारांचा जातीचा सरंजाम कायम केला. नंतर रामचंद्रपंत हा १८२९ सालीं पुण्यास परत आला. पांडुरंगपंत हा वारल्यावर त्याचा १६ हजारांचा सरंजाम जप्त करून फक्त ४ हजारांचा रामचंद्राकडे कायम केला. आज हें ढमढेरे घराणें पुण्यास नांदत आहे.

**देवधर, गोपाल कृष्ण** ( १८७१–१९३७ )—एक सामाजिक व सहकारी चळवळींतील प्रमुख कार्यकर्ते. यांचें शिक्षण न्यू इंग्लिश स्कूल ( पुणें ) व विल्सन कॉलेज मुंबई, येथें झालें. प्रथम हे मुंबई येथील आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या शाळेचे कांहीं दिवस प्रिन्सिपॉल होते. १९०४ मध्यें हे कै. गोपाल कृष्ण गोखले यांच्या कार्यास येऊन मिळाले व १९०५ मध्यें सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे पहिले सभासद झाले. प्रथमपासून ते या संस्थेच्या मुंबई शाखेचे मुख्य होते. १९१८ मध्यें हिंदी वर्तमानपत्रकर्त्यांच्या शिष्टमंडळांत यांस इंग्लंड व युरोप यामध्यें जावयास मिळालें. १९०९ मध्यें यांनीं पुणें सेवासदन संस्थेची स्थापना केली व तिचे ऑ. ऑर्गेनायझर व सर्वसाधारण चिटणीस होते. तसेंच ते राष्ट्रीय सामाजिक परिषदेचे चिटणीस होते. १९२० मध्यें सोलापूर येथें इलाखा सामाजिक परिषदेचे अध्यक्ष होते व लखनौ येथील राष्ट्रीय सामाजिक परिषदेचे १९२४ मध्यें अध्यक्ष होते. १९२१ मध्यें यांनीं मलबार मोपला बंड दुःखनिवारक फंड काढून त्याची सर्व व्यवस्था पाहिली. १९२४ मध्यें दक्षिण हिंदुस्थान मलबार जलप्रलय–निवारण फंडाचे हे उत्पादक व व्यवस्थापक होते. १९२७ मध्यें या प्रकारेंच गुजराथ जलप्रलय–निवारण फंडाची व्यवस्था पाहिली. म्हैसूर व मद्रास सरकारनें नेमलेल्या सहकारी चळवळीच्या चौकशी–समितीवर काम केलें. मुंबई सहकारी इन्स्टिटयूटचे अध्यक्ष, इंपीरिअल कौन्सिल ऑफ ॲग्रिकलचरल रीसर्चचे सभासद व सेंट्रल बँकिंग इन्कायरी कमिटीचे सभासद होते. १९२७ सालीं हे भारत सेवक समाजाचे अध्यक्ष झाले.

**देवधर, बाळंभटदादा जनार्दनबावा** (१७८०–१८५२)–एक महाराष्ट्रीय मल्लविद्याविशारद. यांचें घराणें नाशिक जिल्ह्यांतील निफाड तालुक्यांतील कोटुरें गांवीं बर्वे जहागिरदारांच्या आश्रयानें असे. बर्वे हे पेशव्यांचे आप्त म्हणून हे पेशवाईच्या अखेरच्या काळात वडिलांच्याबरोबर पुण्यास आले ( १७९६ ). त्या वेळीं त्यांचें वेदाध्ययन झालेलें होतें. पुण्यास हे राघोबा वस्तादाच्या तालमींत जात. पेशव्यांच्या आश्रित बावन पहिलवानांत राघोबा प्रमुख होता. त्याचा चेला यदु तेली यानें दुसऱ्या पक्षास मिळून राघोबास कुस्तीस आव्हान दिलें. राघोबा थकलेला असल्यानें त्यानें बाळंभटास त्याच्याशीं कुस्ती खेळण्यास तयार केलें. आणि यांनीं ती कुस्ती जिंकली. तेव्हां यांचें नांव विख्यात झालें आणि पहिलवान म्हणून यांना राजाश्रय मिळाला.

पुढें अली व गुलाब नांवाचे निजामाचे आश्रय असलेले दोघे पहिलवान अजिंक्यपत्रें घेत पुण्यास आले. त्यांनाहि बाळंभटांनीं चीत केलें. मलखांबाचा व्यायाम यांनींच सुरू केला म्हणतात.

हिंदु–मुसलमान अशा दोन्ही जातींच्या यांच्या शिष्यशाखा आजहि सर्वत्र वावरत आहेत. त्यांत काशीचे कोंडभट गोडबोले, अच्युतानंद स्वामी व त्यांचे चिरंजीव नारायण गुरु ही एक व टक्के जमाल व त्यांचे शिष्य जुम्मादादा ही दुसरी परंपरा प्रमुख आहे. ( च. को. )

**देवनाथ** ( १७५४–१८२१ )—एक महाराष्ट्रीय संतकवि. वऱ्हाडांत सुर्जी अंजनगांव हें इतिहासप्रसिद्ध स्थळ आहे, त्यांतील सुर्जी गांवीं देवनाथ जन्मला. आरंभीं त्यास तालमीचा नाद असे. पुढें कांहीं कारणावरून वैराग्य उत्पन्न होऊन तो जामोद–जळगांवजवळील बारीगांवच्या मारुतीची भक्ति करूं लागला. पुढें त्यास कवित्वाची स्फूर्ति झाली; आणि कविता करीत सर्व हिंदुस्थानभर त्यानें प्रवास केला. ग्वाल्हेर येथें कीर्तन करीत असतां मंडपास आग लागून देवनाथ जळून मेला. देवनाथाच्या कवितेंत बहुतेक पदें व कटिबंध आहेत. उत्तर वऱ्हाड व बऱ्हाणपूर-ग्वाल्हेर या प्रांतांत त्याचें शिष्यमंडळ पसरलेलें आहे. याचें मूळ नांव देवराव असून त्याच्या बापाचें नांव राजोपंत व बायकोचें नांव रमा होतें. एकनाथाच्या संप्रदायांतील तेरावा पुरुष गोविंदनाथ हा त्याचा गुरु. देवनाथाची कविता रा. अच्युत सीताराम साठे यांनीं प्रसिद्ध केली आहे.

**देवपाल** ( सु. ९ व्या शतकाचा मध्य )—बंगालमधील पाल घराण्यांतील एक राजा. धर्मपालाचा हा पुतण्या त्याच्या पश्चात् गादीवर आला. पाल घराण्यांतील हा तिसरा राजा असून यानें ४८ वर्षें राज्य केलें. धर्मपाणि हा याचा प्रधान. यानें आसाम व कलिंग देश स्वारी करून जिंकले. तसेंच ओरिसावरहि यानें आपली हुकमत स्थापली. याच्या पदरीं लोकेश्वर शतकाचा लेखक वज्रदत्त हा होता. हा बुद्ध धर्माचा उपासक होता. याच्या कारकीर्दींत वीरदेव नांवाच्या बौद्ध भिक्षूनें एक इंद्रशिला पर्वतावर व दुसरें वज्रासन पर्वतावर अशीं भव्य देवळें बांधलीं.

**देवपाल परमार** ( सु. १२१८–४३ )—माळव्याच्या परमार घराण्यांतील एक राजा. अर्जुनवर्मा हा निपुत्रिक असल्यानें या घराण्याच्या धाकट्या पातींतील महाकुमार हरिश्चंद्र वर्मा याचा पुत्र देवपाल हा माळव्याच्या गादीवर आला. यानें साहसमल्ल असें बिरुद धारण केलें. याच्या कारकीर्दींत वि. सं. १२८८–८९ मध्यें दिल्लीच्या शमसुद्दिन अल्तमश सुलतानानें माळव्यावर स्वारी केली व ग्वाल्हेर येथें जय मिळवला. भेलसा व उज्जयिनी येथील मंदिर फोटलें व लूट मिळवली. तथापि माळव्याचा राजा देवपालच राहिला. यानें 'जिनयज्ञकल्प', 'त्रिषष्टिस्मृति' व 'सटीक धर्मामृतशास्त्र' या ग्रंथाची रचना केली. यांच्यानंतर याचे पुत्र जयतुगीदेव व जयवर्मा हे अनुक्रमें माळव्याचे अधिपति झाले.

**देवप्रयाग**— संयुक्त प्रांतांतील टेहरी संस्थानांतील एक खेडें. हें अलकनंदा व भागीरथी यांच्या संगमावर वसलेलें आहे. येथें दरवर्षी यात्रेकरू लोक येतात. येथें रामचंद्राचें मोठें देवालय आहे. जो कोणी दक्षिणेंतील द्रविड किंवा तेलंग ब्राह्मण पहाडी ब्राह्मणकन्येशीं लग्न लावून या क्षेत्रीं राहील त्यानेच देवाची पूजा करावी. अशा पुजाऱ्याला जी कन्यासंतति होईल तिचा क्रम सरदहूप्रमाणेंच चालतो. पुरुषसंतति उपाध्येगिरी करून उदरनिर्वाह करिते. ही प्राचीन रीत आहे. देवप्रयागाचें माहात्म्य केदारखंडांत वर्णन केलें आहे. धार्मिक विधि वसिष्ठ-कुंड व ब्रह्मकुंड या दोन ठिकाणीं होतो.

**देवभात**— हें तांदुळाच्या जातीचें एक धान्य असून त्याचा समावेश उपधान्यांत होतो. तळावाच्या कांठीं अथवा पाणथळ जागेंत हें फार पिकतें. उपवासाच्या दिवशीं हें खाण्याचा प्रघात कांहीं ठिकाणीं आहे. ऋषिपंचमीच्या दिवशीं देवभात खातात.

**देवमासा**—ही एक सस्तन प्राण्याची जात आहे. याच्या शरीराचा पुढचा भाग कल्ल्यांसारखा असतो व शरीराच्या मागील बाजूस कोणताच मोठासा अवयव नसून एक सपाट कल्ल्यासारखीच लांब शेपटी असते. थंड प्रदेशांतील समुद्रांतच हा सांपडतो, त्यामुळें हिंदी महासागरांत दिसत नाहीं. त्याचे नाक पाठीच्या बाजूस असतें. तो पाण्याच्या पृष्ठभागावर येऊन श्वासोच्छ्वास करीत असल्यामुळें भोंवतालच्या थंड हवेमुळें श्वासां-तील उष्ण हवेचे तुषार बनतात व कारंजें उडत आहे असा चमत्कार दिसतो. याच्या पोटाखालीं दोन स्तन असतात. या माशास दरवेळीं एकच पोर होतें. याच्या एका मुख्य जातीस दांत नसतात, पण एक मजबूत हाड असतें; त्यासच देवमाशाचें हाड म्हणतात. या जातीचे प्राणी ग्रीनलंडच्या बाजूस आढळतात. त्यांच्यापासून प्रसिद्ध तेल व हाडें मिळतात. याची लांबी सामा-न्यतः ६० फूट असते व त्याच्या एकंदर जाडीचा वेढा ३० ते ४० फूट असतो. दुसऱ्या एका जातीस दांत असतात. यांची लांबी ५० ते ७० फूट असते. यांच्यापैकींच एका जातीचे देव-मासे लहान असून त्यांस चोंचीसारखा अवयव असतो. यांचें तेल व हाडें यांचा एके काळीं फार मोठा व्यापार चालत असे, पण अलीकडे तो मंदावला आहे.

**देवयान**—याचा प्राचीन वैदिक अर्थ देवाकडे नेणारा मार्ग असा आहे. कांहीं ग्रंथांतून देव ज्या मार्गानें पृथ्वी आणि स्वर्ग यांमध्यें प्रवास करीत तो मार्ग असा अर्थ निघतो. पुढें या शब्दाला पारिभाषिक अर्थ येऊन, धार्मिक विचारांत याला स्थान मिळालें. याच्या उलट पितृयान शब्द आहे. वाढत्या ज्ञानाचे व प्रकाशाचे प्रदेश देवयानाच्या मार्गांत येतात; तर पितृयानमार्गांत अंधकार व नाश यांचे एकामागून एक प्रदेश भेटतात, असा उपनिषदांवरून निष्कर्ष निघतो. उत्तरायण व दक्षिणायन या अर्थांच्याच देवयान व पितृयान या संज्ञा आहेत. कै. लो. टिळ-कांच्या ओरायन ग्रंथांत (प्र. २ रें) यांचें स्पष्टीकरण केलेलें आहे.

**देवयानी**—वारुणी भृगूचा पुत्र शुक्र, याची कन्या. ही बालपणापासून तपस्विनी, विद्यासंपन्न व पित्यास परमप्रिय अशी असे. शुक्राचार्यांकडे बृहस्पतीचा पुत्र कच संजीवनी विद्येच्या गुप्त हेतूनें अध्ययन करीत राहिला असतां त्यावर हिचें प्रेम बसले व तो कित्येक वेळां दैत्यदानवांच्या हातून मरण पावला असतां पित्याला भीड घालून हिनें त्याला वांचविलें होतें. पण गुरुभगिनी म्हणून कचानें हिला वरिलें नाहीं. कच–देवयानीच्या प्रेमकथेवर बरींच आख्यानें व नाटकें झालीं आहेत.

एकदां देवयानी व वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा आपल्या सख्यांसहित जलक्रीडेस गेल्या असतां शर्मिष्ठा चुकून देवयानीचें वस्त्र नेसली. देवयानीस राग येऊन त्या दोघींची दुरुत्तरें झाल्यावर शर्मिष्ठेनें देवयानीस नग्न स्थितींत एका कूपांत लोटून दिलें. तेव्हां ययाति राजानें तिला वर काढिलें. नंतर त्याच्याशीं देवयानीचा विवाह झाला.

**देवराय संगम**—१. (१४०४–१४१०)—विजयानगरचा एक राजा. दुसऱ्या हरिहर संगमाचा हा पुत्र. आपला भाऊ दुसरा बुक्कराय याच्यानंतर विजयानगरच्या गादीवर आला. 'हेमाम्बिका' व 'मल्लयव्वी' या नांवाच्या यास दोन बायका होत्या. एका शेतकऱ्याच्या सुंदर मुलीसाठीं यानें सुलतानाशीं लढाई दिली. त्यांत यास त्या मुलीची प्राप्ति न होतां सुलतानाशीं अपमानास्पद तह करण्याची मात्र पाळी आली; व आपली मुलगी फिरोजशहा बहामनी सुलतानाच्या जनान्यात पाठवावी लागली. वीरविजय नांवाचा याचा मुलगा याच्यानंतर गादीवर बसला.

२. (१४२४–४७)–विजयानगरच्या वीरविजय संगमाचा हा पुत्र. याला सिद्धला व पोन्नला अशा दोन बायका होत्या. हा अल्पवयींच गादीवर बसला. याला महाराजाधिराज, राजपरमेश्वर अशीं पूर्ण सम्राट्पदद्योतक बिरुदें लावलेलीं कांहीं शिलालेखांत सांपडतात. याच्या कारकीर्दींत संगम घराणें वैभवशिखरास पोंचलें होतें.

याच्या कारकीर्दींत फार लढाया झाल्या. हा गादीवर आल्यावर अहंमदशहा बहामनीबरोबर युद्ध सुरू झालें. सुलतानानें पानगळ किल्ल्यावर हल्ला करून लढाईस सुरुवात केली. शेवटीं उभय पक्षांची लढाई होऊन तींत मुसलमानांचा पूर्ण पराभव झाला. पण पुढील लढाईत राजाचा पराभव होऊन त्याला दिल्लीच्या सुलतानास मोठा नजराणा पाठवावा लागला.

नंतर यानें विद्वान् लोकांची सभा बोलाविली. "मुसलमानांचें सैन्य थोडें असतांहि आपणांस वेळोवेळीं हार खावी लागते, असें कां?" हा विषय चर्चेचा होता. मुसलमानांचे घोडे मजबूत व बळकट असतात, आणि त्यांच्या सैन्यांत तिरंदाज लोक आहेत व याच्या उलट आपली परिस्थिति आहे, असें सर्व लोकांचें मत पडलें. हें मत ऐकल्यावर यानें आपल्या सैन्यांत मुसलमान तिरंदाज घेण्याचा हुकूम फर्माविला व आपल्या सैन्यास तिरंदाजीचें शिक्षण देण्याचे प्रयत्न सुरू केले. निकोलो कॅंटी हा इटालियन प्रवासी व अबदुल रझाक हा मुसलमान प्रवासी हे याच्या कारकीर्दीत विजयानगरास येऊन गेले. मुसलमानांशीं लढण्यांत याची सबंध कारकीर्द गेली.

**देवराव महादेव हिंगणे** (मृत्यु १८०७)— मराठ्यांचा एक वकील. महादेवभट हिंगण्याचा स. १७४४ त खून झाल्यावर त्याचे चार मुलगे दामोदर, बापूजी, पुरुषोत्तम व देवराव दिल्लीस व इतर ठिकाणीं वकिलातीच्या कामावर होते.

महादेवभटाचे हे चारहि मुलगे मोठे पराक्रमी निघाले. रघुनाथरावाशीं त्यांचें वांकडें आल्यामुळें त्यांची बरीच वाताहत झाली. तथापि हिंगण्यांशिवाय पेशव्यांचें चालणारें नव्हतें म्हणून माधवराव पेशव्यानें पुरुषोत्तम व देवराव यांस पुनः स. १७६९ त दिल्लीच्या वकिलातीवर स्थापिलें.

देवराव महादेव हा अहल्याबाई व तुकोजी होळकर यांचा तंटा मिटविण्याकरितां नाना फडणिसाच्या सांगण्यावरून महेश्वरास गेला होता. त्या वेळीं त्यानें केलेल्या कामाचीं पत्रें 'होळकर दरबारांतील हिंगण्याची वकिली' या नांवानें 'इतिहाससंग्रहां'त प्रसिद्ध झालीं आहेत. मराठ्यांचा वकील या नात्यानें देवराव स. १७६९ च्या सप्टेंबरांत बादशहासंबंधीं बोलणें करण्याकरितां सुजाउद्दौल्याकडे गेला होता.

देवराव व पेशवे ह्यांच्यांत विरोध आल्यानें देवराव चंद्रचूडाकडे निंबगांवीं जाऊन राहिला; व तेथेंच समाधिस्थ झाला. निंबगांवास याची समाधि आहे.

याचे वंशज नाशिक जिल्ह्यांत चांदोरी येथें आहेत. पेशवाईतील साडेतीन शहाण्यांत नागपूरकर देवाजीपंत चोरघोडे याची गणना नसून देवराव हिंगणे याची आहे, असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे. भारत इतिहास संशोधक मंडळानें हिंगणे दप्तराचे दोन भाग प्रसिद्ध केले आहेत त्यांत देवरावविषयीं बरीच माहिती सांपडेल.

**देवराष्ट्र**—मुंबई इलाखा, सातारा जिल्हा. खानापूर तालुक्यांत विट्याच्या नैर्ऋत्येस १२ मैलांवर हा गांव आहे. गांवाच्या वायव्येस दोन मैल अंतरावर महादेवाचीं पुष्कळ देवळें असून त्या सर्वांत जुनें देऊळ समुद्रेश्वर महादेवाचें आहे. देवळाच्याजवळ एक समुद्रेश्वर नांवाचें कुंड आहे; त्यांतील पाणी गुणकारी आहे असें मानतात.

या समुद्रेश्वर देवळाचा आणि मुहमद गिझनीनें जें सोरटी सोमनाथाचें प्रसिद्ध देऊळ फोडिलें त्याचा कांहीं संबंध दिसतो. यांतील गुहा हिंगणदेव (ज्यानें म्हसुर्ण्यास किंवा हिंगणखाडींत विहीर बांधिली) राजानें बांधिल्या असें म्हणतात. व त्याच्याच नांवावरून याच्याजवळील एका खेड्याचें नांव हिंगणगड असें पडलें असावें. त्याची राजधानी कौंडिण्यपूर होती. हेंच पंतप्रतिनिधींचें कुंडल खेडें आहे असें म्हणतात.

**देवरूख**—मुंबई इलाख्यांतील रत्नागिरी जिल्ह्याच्या संगमेश्वर तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या सुमारें ४०००. येथील हवापाणी उत्तम आहे व गांवची रचनाहि चांगली आहे.

**देवल**—सिंध प्रांतांतील एक प्राचीन बंदर. हें सिंधु नदीच्या कांठीं होतें. याचें नक्की स्थान आढळत नाहीं. टंगमार नांवाचे लुटारू येथें होते, त्यांनीं अरब (तेर नदीपलीकडील) व्यापाऱ्यांचीं गलबतें लुटलीं. हे लुटारू कराची व लार बंदर यांच्या दरम्यान राहत असत. त्यावरून या दोहोंच्या दरम्यान बघार व धारा यांच्या संगमावर, लारच्या उत्तरेस २॥ कोस व भांबुराच्या नैर्ऋत्येस ८॥ कोसांवर हें येतें. इब्नबतूता यानें लारीच्याजवळ हें असल्याचें लिहिलें आहे. येथें प्राचीन अवशेष बरेच आहेत, पण त्यांचें संशोधन झालेलें नाहीं.

महंमद कासीम यानें आठव्या शतकाच्या आरंभीं देवल बंदर जिंकून घेऊन तेथील हिंदूंना बाटविलें व धर्मांतरास कबूल नसणाऱ्यांची कत्तल केली.

**देवल, गोविंद बल्लाळ** (मृ. १९१६)—एक महाराष्ट्रीय नाटककार. यांचा जन्म सांगलीजवळील हरिपूर गांवीं झाला. लहानपणापासून यांना नाटकाचा नाद होता तरी १८७९ सालीं हे मॅट्रिक पास झाले. १८८४ सालीं ॲग्रिकल्चर (शेतकी)ची परीक्षा उत्तीर्ण झाले. ॲग्रिकल्चर कॉलेजांत असतांना 'आर्योद्धारक मंडळी'त गोविंदराव काम करीत असत. तेव्हांच त्यांचा उत्तम नट म्हणून लौकिक झाला. कांहीं दिवस सरकारी नोकरी केल्यानंतर ती कायमची सोडून ते नाट्यवाङ्मयांत भर घालूं लागले. किर्लोस्करांच्या खालोखाल नाट्यकवि म्हणून यांचें नांव पुढें येऊन बऱ्याच नाटक मंडळ्यांना यांच्या नाटकांवर गुजर होतां आलें. देवलांनीं एकंदर संगीत व गद्य मिळून सात नाटकें लिहिलीं आहेत तीं:— सं. विक्रमोर्वशीय, सं. मृच्छकटिक, सं. शापसंभ्रम, सं. शारदा, दुर्गा, फाल्गुनराव व झुंझारराव. यांपैकीं पहिलीं तीन संस्कृत नाटकांचीं व शेवटचीं तीन इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें आहेत. शारदा नाटक काय तें एकच त्यांचें स्वतःचें व तत्कालीन समाजांत क्रांति करून सोडणारें

नाटक होतें. 'जरठ-तरुणी विवाह' हा या नाटकाचा सामाजिक विषय असून नाटककारानें आपल्या कवित्वानें तो उत्कृष्ट रंगविला आहे. त्यामुळें बराच काळ महाराष्ट्रीयांच्या मनावर याचा पगडा बसला होता. मरणसमयीं यांचें वय सुमारें ६० वर्षांचें होतें.

**देवलदेवी**—गुजराथचा राजा कर्ण (करण वाघेला) याची मुलगी. कर्ण हा व्यभिचारी, अविचारी आणि दुर्बल असल्यानें त्याची राणी कमलदेवी (देवलदेवीची आई) अल्लाउद्दिनानें आपल्या जनानखान्यांत नेली. ही कमलदेवी आणि अल्लाउद्दिन यांनीं देवलदेवीचा शोध चालविला; व मोठ्या प्रयासानें तिला मिळवून तिचें लग्न शहाजादा खिजरखान याच्याशीं लावून दिलें. पुढें तिला दोघातिघांनीं पळविली. शेवटीं ग्यासुद्दिन तुघलखनें तिचा नीट बंदोबस्त करून दिला. अमीर खुश्रू या कवीनें हिच्यावर एक 'इष्किया' नांवाचें प्रेमकाव्य रचलें आहे.

**देवलस्मृति**— देवल या ऋषीचा अस्तित्वाबरोबर वैदिक वाङ्मयांत उल्लेख येतो. सर्वानुक्रमणीप्रमाणें हा कश्यप कुलांतील असून ऋग्वेदाच्या नवव्या मंडलांतील ५ ते २४ या सूक्तांचा द्रष्टा आहे. वैदिक देवल व स्मृतिकार देवल यांचा संबंध जोडणारा स्पष्ट आधार नाहीं. देवलस्मृतींत, ती सिंधु नदीच्या कांठीं रचली गेल्याबद्दल उल्लेख आहे. या स्मृतीचा काल सुमारें ७३२ असावा. कारण सिंधु देश मुसलमानांनीं जिंकून तेथील हिंदूंना भ्रष्ट केल्यावर कांहीं कालानें म्हणजे सुमारें २० वर्षांनीं रजपुतांनीं मुसलमानांना तेथून घालवून दिल्यावर ही स्मृति रचली गेली असावी. कारण या स्मृतींत (श्लोक ५३) धर्मांतर केलेल्यास २० वर्षांनीं पुनः धर्मांत घेतां येतें, असें वचन आहे. इतर स्मृतींहून हींत विशेष हा आहे कीं, या स्मृतीच्या आरंभीं प्रस्तावनेंतच देवलास ऋषींनीं, म्लेच्छांनीं धर्मभ्रष्ट केलेल्या अशा ब्राह्मणक्षत्रियादि चतुर्वर्णीयांना शुद्ध कसें करून घ्यावें याबद्दल प्रश्न विचारला असून, त्यासंबंधींच विवेचन मुख्यत: या स्मृतींत आहे. या देवलस्मृतींतील व कांहीं अन्यस्मृतींतील वचनाधारें धर्मांतर केलेल्या त्रैवर्णिकांना शुद्धिसंस्कार करून धर्मांत घेण्याचा प्रघात शंकराचार्यांच्या संमतीनें अलीकडे चालू झाला आहे. सदर शुद्धिसंस्काराचा प्रयोग पुस्तकरूपानें विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनीं छापिला असून त्या पुस्तकास भाषांतरासह देवलस्मृति जोडली आहे.

**देवसमाज**—या समाजाची स्थापना १८८७ सालीं झाली. समाजाची नीति सुधारावी, धार्मिक दृष्ट्या उच्चतम तत्त्वें ग्राह्य मानावीं व सर्वांनीं बंधुभावनेनें वागावें या तत्त्वांवर या समाजाची स्थापना झाली आहे. विद्येचा प्रसार करणें व प्रसंगविशेषीं दुःखनिवारण करण्यासाठीं साहाय्य करणें, हेंच या समाजाचें मुख्य कार्य आहे. मुलांमुलींसाठीं या समाजानें पंजाबांत बऱ्याच शाळा चालविल्या आहेत. याशिवाय अस्पृश्यांसाठीं व चोरींदरोडे घालणाऱ्या जातींसाठीं शाळा उघडून खालच्या वर्गांच्या लोकांत नीतिशिक्षणाचा प्रसार करण्याचें कार्य समाजानें चालविलें आहे. या तऱ्हेनें धार्मिक, नैतिक, बौद्धिक व सामाजिक उन्नति घडवून आणण्याचें महत्त्वाचें कार्य हा समाज करीत आहे.

**देवसाख**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सात स्वरांनीं होत असल्यामुळे याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी मध्यम आहे. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर युक्त मानितात. या रागांत गांधार व धैवत हे स्वर दुर्बल ठेवितात. या रागांत गांधार स्वरावर होणारें आंदोलन रक्तिदायक असतें. या रागांत धैवत स्वर कोमल आहे. कानडा व मेघ यांचें मिश्रण या रागांत दृष्टीस पडतें. हा राग सारंगांगानें गाण्यांत येतो. मध्यम हा या रागाचा न्यासस्वर होय. हा एक कानडाचा प्रकार आहे.

**देवसूरि** (स. १०८६–११६९)—हा जैनधर्मी श्वेतांबरपंथी असून मुनिचंद्रसूरीचा शिष्य होता. यानें तर्कशानावर 'प्रमाणनयतत्त्वालोकालंकार' नांवाचा ग्रंथ लिहून त्यावर स्वतःच 'स्याद्वाद–रत्नाकर' नांवाची टीका लिहिली. गुजराथेंत अनहिलपुर-पट्टण येथें जयसिंहदेवाच्या दरबारीं याचा व दिगंबरपंथी कुमुदाचार्य याचा वायकांना निर्वाणपद मिळवितां येतें कीं नाहीं यावर वादविवाद होऊन त्यांत देवसूरीनें कुमुदाचार्यांचा पराभव केला; व स्त्रियांनाहि निर्वाण मिळवितां येतें असें सिद्ध केलें (उपदेशमालाटीका). स. ११४७ मध्यें यानें एक मंदिर (चैत्य) बांधून (फलवर्धिग्राम) येथें मूर्ति स्थापन केली व अरसाणा येथें नेमिनाथाची मूर्ति बसविली. याच्या ग्रंथाची मांडणी माणिक्यनंदाच्या 'परीक्षामुखसूत्र' व 'प्रमेयकमलमार्तंड' या ग्रंथांप्रमाणें आहे.

**देवळाली**—मुंबई, नाशिक जिल्हा, नाशिकजवळच एक हवेचें ठिकाण व लष्करी ठाणें. मुंबईच्या व्यापाऱ्यांनीं राहण्यासाठीं लोणावळ्याप्रमाणें येथें बंगले बांधले आहेत. युद्धकालांत लष्करी अधिकाऱ्यांचा मोठा तळ या ठिकाणीं असे. निरनिराळ्या धर्मीयांचीं आरोग्यभुवनें आहेत. गोल्फखेळ खेळण्याची व्यवस्था आहे. वीज कंपनी, दारूभट्टी, नोटा छापण्याचा कारखाना, हायस्कूल, इ. च्या इमारती आहेत. लो. सं. सु. सोळा हजार.

**देवळें**—देवालयांचा प्रसार मूर्तिपूजक लोकांच्या देशांतच फार आढळतो; तथापि मूर्तिपूजाविहीन अशा ख्रिस्ती व मुसलमानी धर्मांतहि देवालयांसारखीं पवित्र गृहें असतात व त्यांत प्रत्यक्ष देवाची मूर्ति नसली तरी तेथें ईश्वर अदृश्य रूपानें वास करतो

किंवा तेथें मधून मधून भेट देतो असें मानतात व अशा गृहांचा सार्वजनिक प्रार्थना करण्याच्या कामीं उपयोग करतात. ख्रिस्ती धर्मातील चर्चें व इस्लामी धर्मांतील मशिदी अशा प्रकारच्या होत.

ऐतिहासिक दृष्ट्या पाहतां वारंवार स्थानांतर करणाऱ्या भटक्या जातीच्या लोकांत देवतांची पूजा असली तरी देवालयें असणें शक्य नाहीं. बहुधा त्यांचे धार्मिक विधी उघड्या जागेंत होतात. मूर्तिपूजेचा अवलंब केल्यावरहि देवांच्या मूर्ती ते स्थानांतर करतांना बरोबर घेतात व त्यांना झोपडींत किंवा तंबूंत तात्पुरत्या स्थापन करतात. याच्यापुढील पायरी म्हणजे स्थायिक एके ठिकाणीं राहणाऱ्या रानटी जातींची. ज्या ठिकाणीं मृत पूर्वजांचे आत्मे किंवा देव प्रादुर्भूत होतात अशी समजूत असते अशा पवित्र स्थानांना भोंवतालीं दगडांचें कोंडाळें करून मध्यें मूर्ती किंवा इतर देवतादर्शक दगड वगैरे ठेवतात. नंतर अशा पवित्र स्थानीं लहानसें झोंपडें बांधण्याची चाल पडली. देवळांचा एक नैसर्गिक प्रकार म्हणजे गुहा. अशा गुहांमध्यें दैवतें मांडून त्यांना पवित्र पूजा-प्रार्थनास्थानांचें स्वरूप देणाऱ्या रानटी जाती पुष्कळच आहेत. हा प्रकार ईजिप्त, अरबस्तान, अमेरिकेंतील पेरू व इतर देश यांत आढळतो.

उच्च संस्कृतीच्या लोकांत धार्मिक बाबतींत देवळांना मोठें महत्त्व असतें आणि ती शिल्पकलेच्या मानवी प्रगतीच्या दृष्टीनें फार महत्त्वाचीं असतात. कारण त्यांवरून त्या त्या समाजाच्या धार्मिक विधींची व त्याचप्रमाणें त्यांच्या औद्योगिक प्रगतीची व सौंदर्यविषयक कल्पनांची माहिती मिळते. ईजिप्त-मध्यें प्राचीन काळचीं मोठालीं देवालयें आहेत. बाबिलोनियांत जुन्या काळचीं कांहीं देवालयें जमिनीखालून उकरून काढलीं आहेत, तींहि फार मोठालीं आहेत. ईजिप्तमधील देवळांचें क्षेत्र-फळ किंवा भोंवतालचें आवार फार विस्तृत असतें. ईजिप्त व बाबिलोनिया या दोन्ही देशांतील देवळांस पुष्कळ जमिनी इनाम दिलेल्या असत आणि बाबिलोनियांत तर देवळांतील पुरोहितांकडेच न्यायमनसुब्याचें काम असे व तें देवालया-भोंवतालच्या इमारतींत चाले. त्यामुळें त्या राष्ट्रांत देवालयें ही फार मोठी महत्त्वाची संस्था होती. ग्रीक लोकांतील प्राचीन देवळाचा मुख्य भाग म्हणजे एक चाकोनी लांबट खोली असून तिच्याभोंवतीं अनेक खोल्या असत. हीं देवळें साधारणपणें लहानच असत. पण तीं चांगलीं रंगीत व शोभिवंत केलेलीं असत.

वैदिक काळांत मूर्तिपूजा व देवळें नव्हतीं. बुद्धपूर्व काळांतील देवालयांचे अवशेष मुळींच उपलब्ध नाहींत. त्या वेळीं मूर्ती-पूजा हिंदूंत नव्हती. किंवा त्या काळच्या देवालयांचे अवशेष आज मुळींच उपलब्ध नसतील. देवळें म्हणून मोठाल्या दगडी इमारती बांधण्याची पद्धत बौद्ध काळांत सुरू झाली. पण बौद्धांच्या देवळांत देवाच्या मूर्ती नसून बुद्धाच्या शरीराचे अवशेष ठेवण्या-ची पद्धत होती. अशा स्थानाला प्रथम स्तूपाचा म्हणजे वाटोळ्या झांकणाचा आकार देत. चैत्य या नांवाचा पवित्र स्थानाचा दुसरा एक प्रकार आहे. तिसरा प्रकार विहार ऊर्फ बौद्ध भिक्षूंना राहण्याकरितां बांधलेल्या, खडकांत खोदून तयार केलेल्या लहानमोठ्या खोल्या, स्तूप, चैत्य व विहार हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं आहेत.

हिंदूंचीं जीं देवळें सर्व हिंदुस्थानभर आहेत त्यांची मूळ कल्पना, आकार व शोभा या बाबतींत बौद्धांच्या उपर्युक्त पवित्र स्थानांचें अनुकरण बरेंच झालें आहे. तथापि हिंदु देवालयपद्ध-तींचे मुख्य दोन प्रकार आहेत : एक दक्षिण हिंदुस्थानांतील द्राविडी व दुसरा बाकीच्या भागांतील सर्वसामान्य. दक्षिणेकडील देवळें चौरस असून त्यांचा वरचा भाग मनोऱ्याप्रमाणें उंच व कित्येक मजले देऊन केलेला असतो. शैव व वैष्णव या दोन्ही पंथांचीं देवळें सारखींच असून फक्त मूर्ती व खोदकाम निर-निराळ्या प्रकारचें असतें. उत्तरेकडील देवळांचा खालचा आकार बहुकोनी असून वरील शिखर वाटोळें व निमुळतें होत गेलेलें असतें व त्याला मजले नसतात.

बहुतेक सर्व धर्मांत सर्व श्रेष्ठ असें एक देवालय असतें. ख्रिस्ती धर्मातील रोम येथील पॅंथिऑन, मुसलमानांचें मक्का येथील काबा, हिंदूंचें काशी येथील विश्वेश्वराचें देवालय, बौद्धांचें गया येथील बोधिवृक्षाचें स्थान, हीं स्थानें अशा प्रकारचीं होत. प्राचीन काळापासून मुख्य यात्रेचीं हीं ठिकाणें असून गुन्हेगारांना संरक्षक स्थळें म्हणूनहि उपयोगी पडत.

**देवांग**—एक कोष्टी जात. या लोकांची संख्या सुमारें साडे-चार लाख आहे. ब्रह्मदेश, वऱ्हाड, कूर्ग, मद्रास इलाखा, निजा-माचें राज्य, कोचीन व कोंकण या भागांतून हे लोक आहेत. विशेषतः मद्रास इलाख्यांत हे फार आहेत. हे कोष्टी असून सुती व रेशमी अशीं दोन्ही कापडें विणतात. परदेशी व मुंबईतील गिर-ण्यांचा माल निघूं लागल्यापासून यांचा धंदा फार खालावला व हे कर्जबाजारी झाले. नाशिक येथील मराठे साळी या पोटभागां-तील लोकांत आडनांवांखेरीज गोत्रेंहि आहेत. खंडोबा, बहि-रोबा, जोतीबा, नरसोबा, इत्यादि देवतांची हे लोक पूजा करतात. यांचे उपाध्ये देशस्थ ब्राह्मण आहेत. सोलापूर जिल्ह्यांतील खेड्यांतील कोष्टी लोकांचे सामाजिक प्रश्न जातिसभेपुढें मांडले जाऊन निकाल दिला जातो. सातारा व पूर्व खानदेश येथेंहि अशाच पंचायती आहेत.

धारवाडच्या बाजूस यांना हटगर म्हणतात. त्यांच्यांत कांहीं जंगमपंथी (शिवाचारी) आहेत व कांहीं रामानुजी ऊर्फ कुला-

चारी आहेत. देवांगांहून भिन्न परंतु त्यांना सदृश अशी जात म्हणजे विश्वकर्मा किंवा पंचायत होय.

**देवार**—हे गाणारे व भिक्षा मागणारे द्रविड जातीचे लोक आहेत. यांची वस्ती बहुधा वऱ्हाड प्रांतांतच असून लो. सं. सु. अडीच हजार आहे. यांच्या कुलांचीं नांवें कांहीं गांवांवरून पडलीं आहेत; जसें, रायपुरिया, रतनपुरिया. रायपुरिया नारळाचा तुंबा लावलेली सारंगी वाजवितात तर रतनपुरिया लोक बांसाला भोपळयाचा तुंबा लावून तांतीच्या दोऱ्यांनीं वाजवितात. देवारांच्या वर्गाचीं नांवें बहुतेक द्राविड शब्दांचींच आहेत. कांहीं गोंड नांवें आहेत व कांहीं कवार शब्द आहेत. विवाह प्रौढ दशेंतच होतात.

हे ब्राह्मणांच्या हातचें जेवत नाहींत किंवा स्वतः आपल्या जातीच्या हातचें खात नाहींत. पण गोंडांच्या हातचें खातात; एवढेंच नव्हे तर ते त्यांचें उष्टें देखील खातात. हे लोक डुकरें पाळतात. व गाऊन भिक्षा मागतात. रतनपुरी देवार गोपाल-रायाची प्रशस्ति गातात.

रायपुरी देवार गुर्जर गीत गातात. यांत गौळणी व श्रीकृष्णाचीं गाणीं असतात. हे लोक सूत काढणें, वानरें शिकविणें, अस्वलें व वाघ पाळून त्यांच्यावर पैसा मिळविणें आणि शिशाचे व कथलाचे दागिने विकणें हे धंदे करतात. रायपुरींच्या बायका जुनीं वस्त्रें घेऊन गोंदण्याचा धंदा करतात.

**देवास संस्थानें**—मध्य हिंदुस्थान, माळवा पठार. सेंट्रल इंडिया एजन्सीच्या माळवा पोलिटिकल चार्जमधील हें जोड-संस्थान होतें. १९४८ सालीं मध्य भारत संस्थान संघांत विलीन झालें. धाकटी पाती व मोठी पाती अशा दोन शाखा आहेत. जरी या दोन्ही पात्यांवर निरनिराळे संस्थानिक आहेत व त्यांचा कारभारहि निरनिराळा व बहुतेक बाबतींत एकमेकांपासून स्वतंत्र आहे तरी त्यांची राजधानी देवास ही एकच असून एकाच प्रदेशांतील भाग त्यांना वांटून देण्यांत आलेले आहेत.

येथील संस्थानिक मराठे असून त्यांचें उपनांव पवार आहे. धारचा मूळ पुरुष उदाजीराव व देवासचे मूळ पुरुष तुकोजीराव आणि जिवाजीराव हे सख्खे चुलत बंधू होत. तुकोजीराव व जिवाजीराव हे पहिल्या बाजीरावाबरोबर सन १७२५ मध्यें मध्य हिंदुस्थानांत आले. त्या वेळीं त्यांनीं बजाविलेल्या कामगिरीबद्दल पेशव्यांकडून त्यांना देवास, सारंगपूर, अलोर, वगैरे परगणे इनाम मिळाले. त्यांपैकीं कांहीं अद्यापिहि त्यांच्या वंशांत चालू आहेत. तुकोजी व जिवाजी यांचें जमेना म्हणून पुढें ते विभक्त झाले व संस्थानहि वांटलें गेलें. इ. स. १८३६-३७ पासून प्रत्येक संस्थान ब्रिटिश सरकारला वार्षिक १४,२३७ रु. खंडणी देत असे. येथील संस्थानिकांना दत्तक घेण्याची सनद मिळालेली आहे. सारंगपूर ही बाझबहादूरच्या वेळीं माळव्याची राजधानी होती. देवासच्या दक्षिणेस तीन मैलांवर नागडा ही पूर्वीची राजधानी होती असें म्हणतात.

प्रत्येक संस्थानावर स्वतंत्र संस्थानिक आहे व शिक्षण, आरोग्य, चुंगी (म्युनिसिपल हद्दींत येणाऱ्या मालावरील जकात) व अबकारी या बाबतींशिवाय त्यांचा इतर कारभार स्वतंत्र असतो. येथें ब्रिटिश नाणें चालतें. फक्त तांब्याच्या नाण्यावर 'देवास संस्थान' हीं मराठी अक्षरें असून 'ज्यूनिअर' किंवा 'सीनिअर' अशीं इंग्रजी नांवें असतात. न्यायाच्या व सर्वसाधारण बाबतींत संस्थानिकांच्या हातांत पूर्ण सत्ता आहे. धान्य, कापूस व अफू हे निर्गतीचे मुख्य जिन्नस आहेत. गहूं, ज्वारी, मका, तूर, ऊंस, तंबाखू, अफू, वगैरेंची येथें पैदास होते. आग्रा-मुंबई-देवास-उज्जनी, आणि देवास-भोपाळ हे दळणवळणाचे मुख्य मार्ग आहेत.

मोठी पाती—हिचा मूळ पुरुष पहिला तुकोजी हा होय. सांप्रतचे महाराज कृष्णाजीराव हे १९४७ सालीं यांचे वडील विक्रमसिंह यांना कोल्हापूरची गादी मिळाल्यानें अचानक गादीवर आले. यांना राजा अशी पदवी असून १५ तोफांची सलामी मिळते. येथील लो. सं. (१९४१) ८७,४७९ आहे. लोकसंख्येपैकी शेंकडा ८५ हिंदु व १२ मुसलमान आहेत. येथें राजस्थानी भाषेची माळवी पोटभाषा चालते. या पातीचें क्षे. फ. ४४९.५ चौ. मै. आहे. त्यांत देवास, अलोट, सारंगपूर, राघोगड व बागौद हे परगणे आहेत. एकंदर उत्पन्न १५ लक्ष रुपये आहे. तें जमिनीवरील कराचें उत्पन्न, जकातीपासून होणारें उत्पन्न व अफूवरील कराचें उत्पन्न यांच्या वसुलाचें आहे. अलोट येथें साखरेचा कारखाना आहे. इतर लहान कारखाने चालतात. तथापि ८० टक्के लोक शेतकरीच आहेत. भोजाखेडी, जवाजा व पठाडी असे तीन गांवचे टाकेदार ठाकूर आहेत. त्यांचें उत्पन्न २४ हजार आहे.

धाकटी पाती—याचा मूळ पुरुष जिवाजीराव १७७५ त मरण पावला. येथील संस्थानिकालाहि राजा ही पदवी व १५ तोफांची सलामी आहे. १९१८ सालीं वंशपरंपरा महाराज हा किताब मिळाला. सध्यांचे महाराज श्रीमंत यशवंतराव हे १९४३ सालीं गादीवर आले. हे चांगले सुविद्य आहेत. या संस्थानची लोकसंख्या ६६,९९८. त्यांत शेंकडा ८५ हिंदू व १० मुसलमान आहेत. येथेंहि माळवी भाषा चालते. संस्थानचें क्षे. फ. ४२२,५३ चौ. मैल. लो. सं. ८४,००० व वार्षिक उत्पन्न २० लक्ष रुपये आहे. या संस्थानांत पुढील सहा परगणे आहेत—देवास, बघावद, बदगुचा, रिंग्नोद, सारंगपूर,

आणि अकबरपूर. साचण, साखर, बिस्किटें, वगैरे तयार करण्याचे कारखाने व सुताची गिरणी व किरकोळ धंदे संस्थानांत दिसतात.

देवास ही वरील दोन संस्थानांची राजधानी असून इंदूरहून २४ मैल आहे. लो. सं. सु. आठ हजार. चामुंडा पहाडाच्या पायथ्याशीं हा गांव वसलेला आहे व त्यावरून ह्या गांवाचें नाव देवीवासिनी पडलें. राजवाडे, दोन हायस्कुलें, एक मोठें इस्पितळ, व कांहीं कारखाने गांवांत आहेत.

**देवी**—सामान्यतः याचा अर्थ स्त्रीदेवता किंवा देवपत्नी असा होतो. पण विशेषतः शिवपत्नी हैमवतीला हें नांव लावितात. महाभारतांत हिचीं नुसतीं निरनिराळीं नांवें व स्वरूपें वर्णिलीं आहेत. पण पुढील काळांतील पुराणांतून हिची फार प्रतिष्ठा वाढविलेली दिसते. शक्ति या शिवस्त्री–स्वरूपांत हिचे एक उग्र व दुसरा सौम्य असे दोन प्रकार पाहावयास सांपडतात. उमा, गौरी, पार्वती, हैमवती, जगन्माता, भवानी हीं सौम्य अवतारांचीं नांवें असून दुर्गा, काली, चंडी, भैरवी यांसारखीं नांवें हिचें रौद्ररूप प्रगट करितात. चंडीमाहात्म्यांत हिनें असुरांवर मिळविलेले विजय वर्णिले असून त्या त्या अनुपंगानें हिला प्राप्त झालेलीं नांवें दिलेलीं आहेत; उदा., दुर्गा, दशभुजा, इ.. हिच्या रौद्र स्वरूपाला भिऊन भक्त हिला प्राण्यांचे बळी अर्पण करतात व तांत्रिक ( शाक्त ) पद्धतीनें आराधना करतात.

**देवी**—१. ( काउ–पॉक्स ). हा रोग गाईच्या स्तनावर प्रथम उत्पन्न होतो. त्याच्या प्रथम निळसर पुटकुळ्या असून त्या पुढें तांबड्या होतात. या पुटकुळ्या कांठांवर उंच असून मध्यभागीं खोल असतात. या पुटकुळ्यावरती सूज आलेली असते व त्यांमध्यें लस असते. या लसीमुळें मनुष्यास देवीचा रोग होतो. व ही लस आधींच टोंचली असतां हा रोग होत नाहीं, किंवा झाला तरी त्याचें स्वरूप तीव्र नसतें.

२. (स्माल–पॉक्स). हा एक अतिशय सांसर्गिक तीव्र प्रकारचा, माणसाला होणारा रोग असून त्यामध्यें शरीरावर पुटकुळ्या उठतात व त्यांचे फोड होऊन शेवटीं खपल्या धरतात. हा जगांतील सर्व प्रदेशांत आढळतो, व कोणत्याहि वयांत हा होऊं शकतो. या रोगाचा संसर्ग कोणत्याहि अवस्थेंत होतो. परंतु विशेषतः खपली धरण्याच्या अवस्थेमध्यें जास्त होतो. याच्या गर्भावस्थेचा काल बारा दिवसांचा असून याचा उद्भव एकदम होतो. प्रारंभीं थंडी येऊन डोकें दुखूं लागतें, पाठ दुखूं लागते, आणि ताप भरतो. अंगावर थोडा थोडा पुरळ उठूं लागतो. परंतु तिसऱ्या दिवशीं स्पष्ट फोड दिसूं लागतात. प्रथम लहान तांबडे ठिपके दिसूं लागतात व त्यांचे फोड होऊन बाराव्या दिवशीं खपल्या धरतात. या खपल्या पडल्या म्हणजे त्या जागीं खोल वण राहतात. या वणांची



खोली ज्या मानानें फोडांत पूं झाला असेल त्या मानानें असते. देवीच्या रोग्यास इस्पितळांत ठेवण्यांत यावें हें बरें. या रोगावर प्रत्यक्ष कोणत्याहि औषधाचा उपयोग होत नाहीं; परंतु त्यांतील लक्षणांची तीव्रता कमी करतां येते. ज्या ठिकाणीं देवी टोंचून घेण्याचा प्रघात असतो तेथें हा रोग फार कमी प्रमाणांत होतो.

देवी टोंचणें— देवीचा रोग उत्पन्न होऊं नये म्हणून मनुष्याला देवीची लस टोंचण्याच्या पद्धतीस देवी टोंचणें असें म्हणतात. ही पद्धति इंग्लंडमध्यें जेन्नर यानें १७९६ मध्यें प्रचारांत आणली. परंतु त्यापूर्वींहि ही पद्धति वेगळ्या रीतीनें अस्तित्वांत होती. कांहीं देशांत देवी टोंचणें सक्तीचें असतें. परंतु अलीकडे या सक्तीपासून मुक्तता किंवा सूट देण्याचा प्रघात वाढत आहे. कांहीं देशांत पुन्हां पुन्हां देवी टोंचून घेणें सक्तीचें असतें. तसें हिंदुस्थानांत किंवा इंग्लंडमध्यें नाहीं. देवीची लस टोंचतांना कातडीवर ओरखडे काढण्यांत येतात, आणि त्यांवर लस घासण्यांत येते. केवळ एकदां देवी टोंचल्यानें या रोगापासून पूर्णपणें मुक्तता होण्याचा संभव असतो असें नाहीं, तर तीनदां देवी टोंचून जर त्या आल्या नाहींत तरच या रोगापासून पूर्णांशानें मुक्तता मिळते. देवी टोंचण्याची पद्धति अमलांत येण्याच्या पूर्वी सामान्यतः सर्व मुलांस लहानपणीं देवी येत असत व सुमारें बारा मुलांपैकीं एक मूल देवीनें मृत्यु पावत असे. अलीकडे लहान मुलांस सहसा देवी येत नाहींत व देवींच्या दवाखान्यामध्यें आढळणारे रोगी बहुधा प्रौढ असतात. तसेंच ज्या मुलांस देवी टोंचलेल्या असतात त्यांस देवी आल्या तरी न टोंचलेल्या मुलांपेक्षां त्यांचें स्वरूप कमी तीव्र असतें. तसेंच देवीच्या सांथीमध्यें न टोंचलेल्या व टोंचलेल्या लोकांस देवी येण्याच्या प्रमाणांत फार अंतर असतें.

देवी टोंचण्याचा कायदा—हिंदुस्थानांत हा कायदा १८८० सालीं होऊन त्यांत १८९८, १९०२ व १९२० सालीं दुरुस्त्या करण्यांत आल्या; शिवाय या कायद्याअन्वयें नियम करण्याचा अधिकार प्रांतिक सरकारांना देण्यांत आला असून त्याप्रमाणें प्रांतिक सरकारांनीं वेळोवेळीं नियम व त्यांत दुरुस्त्या केल्या आहेत. या कायद्याचा उद्देश मुलांना सक्तीनें देवी टोंचवणें हा आहे. या कामाकरितां स्थानिक सरकार देवी डॉक्टर नेमतें, आणि जरूर तर खासगी डॉक्टरांना देवी टोंचण्याचा अधिकार देतें. सहा महिने वयाच्या वरील आणि १४ वर्षांच्या आंतील मुलगा आणि ८ वर्षांच्या आंतील मुलगी यांना त्यांच्या आईबापांनीं किंवा पालकानें डॉक्टरकडे जाऊन किंवा डॉक्टरला घरीं बोलावून देवी टोंचल्याच पाहिजेत; मात्र मूल अशक्त असेल तर देवी काढणें डॉक्टरनें जरूर मुदतीपर्यंत तहकूब ठेवावें; आणि ती मुदत संपल्यावर पालकानें किंवा आईबापांनीं देवी टोंचवाव्या;

किंवा जरूर तर डॉक्टरानें तें काम पुन्हां तहकूब ठेवावें (कलम ९।१३). देवी टोंचल्यानंतर डॉक्टर सांगेल त्या दिवशीं पालकानें त्या मुलाची डॉक्टरकडून तपासणी करावी, आणि देवी टोंचण्याचें काम यशस्वी झालें नाहीं, असें डॉक्टरनें मत दिल्यास लगेच त्या मुलाला पुन्हां देवी टोचवाव्या (कलमें १०।१२). डॉक्टरच्या दवाखान्यांत देवी टोंचवल्यास फी पडणार नाहीं, पण दुसरीकडे देवी टोंचविल्यास फी दिली पाहिजे. या कायद्याविरुद्ध वागणारांस शिक्षा होते.

**देवीदास**—(देवदास). हा प्रसिद्ध मराठी व्यंकटेश-स्तोत्राचा कर्ता. याची संतमालिकाहि प्रसिद्ध आहे. हा चैतन्यसंप्रदायी (१५८०-१६८०) असून यानें गरुडाख्यान, करुणामृतसार (रचना श. १६०८), प्रार्थनासात्त्विक, व्यंकटेश-स्तुति (?), भामावर्णन, वगैरे ग्रंथ केले आहेत.

**देवी भागवत**—अठरा पुराणांची जी *नाममालिका आहे* तींत या पुराणाचा उल्लेख नाहीं. परंतु शैव व पद्म पुराणांत अष्टादश महापुराणांत याची गणना केली आहे. व खुद्द या पुराणांतच पहिल्या स्कंधांत या पुराणास महापुराण म्हटलें आहे. कांहींच्या मतें वैष्णव भागवत हें महापुराण नसून एक वैष्णव तंत्र आहे व देवी भागवत हेंच महापुराण आहे. आणि या मतास पोषक आधार म्हणजे शैवपुराणानें अठरा पुराणांत वैष्णव भागवत वगळिलें आहे व देवी भागवताचा समावेश केला आहे. देवी भागवतावर नीलकंठाची टीका आहे. तो शैवमताचा असल्यामुळें देवी भागवत महापुराण ठरविण्याचा त्यानें बराच प्रयत्न केला आहे. देवी भागवतावर आपल्या टीकेपूर्वी दुसऱ्या कोणाची टीका नव्हती असे नीलकंठ टीकाकार म्हणतो. पद्म पुराणांत देवी भागवताबरोबर दुर्गा भागवताचाहि उल्लेख येतो. देवी भागवताचे बारा स्कंध असून सर्वांचे मिळून अध्याय ३१८ आहेत.

**देश**—हा शब्द उपनिषदांच्या व सूत्रग्रंथांच्या कालापर्यंत प्रचारांत आलेला नव्हता. तो फक्त एकदांच ऐतरेय ब्राह्मणाच्या शेवटल्या भागांत व वाजसनेयी संहितेच्या (३५, ११) एका विशेष वादविषयभूत मंत्रांत आलेला आहे. भूमीचा एक लहान भाग आणि मोठा भाग अशा दोन अर्थी हा शब्द असून त्या दोन्ही तऱ्हांनीं त्याचा उपयोग केलेला आहे.

हर्षकाळीं एका राज्यांत मोडणाऱ्या सर्व प्रदेशाला देश म्हणत. वराह मिहिर व इतर ग्रंथकार यांनींहि याच अर्थानें त्याचा उपयोग केला आहे. पूर्वी या अर्थी जनपद हा शब्द वापरीत. देश *या अर्थी मंडल (उदा., कोंगमंडल, चोलमंडल) शब्द दक्खनमध्यें* प्रचलित असे. देशाचे भाग उत्तरेकडे 'भुक्ति' व दक्खनकडे 'वाड' (हल्लींचे जिल्हे) असत व त्यांचे पुन्हां 'विषय' (तालुका), 'नाड', 'अहार' असत व त्यांचे शेवटचे घटक 'ग्राम' असत. सोळाव्या व सतराव्या शतकांत महाराष्ट्रांत देश शब्द तालुका किंवा जिल्हा या अर्थींहि वापरीत. उदा., वांयदेश (वाई तालुका), माणदेश, मिरजदेश, वगैरे. सह्याद्रि, बालाघाट, कर्नाटक व गोदावरी यांमधील जो प्रदेश तो देश. देश, प्रांत, सुभा, परगणा, तालुका, जिल्हा, महाल, कसबा, पेटा, संमत, तर्फ, मौजा, वगैरे नांवें देश व त्याचे भाग यांचीं वाचक आहेत.

**देशकार**—हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. या रागांत मध्यम व निषाद हे स्वर वर्ज्य असल्यानें याची जाति औडुव औडुव आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर आहे. या रागाचें सामान्य स्वरूप भूपाळी रागासारखें दिसतें. परंतु हा उत्तरांगप्रधान आणि भूपाळी पूर्वांगप्रधान, यामुळे दोन्ही एकमेकांहून भिन्न राहूं शकतात. या रागाची प्रकृति गंभीर आहे.

**देशपांडे, देशमुख, देसाई**—*दक्षिणेंत मुसलमानी अमलांत* साधारणतः रयतवारी पद्धतिच अमलांत होती. सरकार व रयत यांच्या दरम्यान मालगुजार, जमीनदार, तालुकदार, अशांसारखे मध्यस्थ फारसे नसत. पाटील-कुलकर्णी गांवचा वसूल करीत व आपलें वेतन काढून घेऊन तो सरकारी कमावीसदार किंवा सुभेदार यांच्या स्वाधीन करीत. प्रत्येक परगण्यास देशमुख-देशपांडे हे अधिकारी असत. हेहि वतनदारच असून वंशपरंपरा आपलें काम करीत. हे परगण्यांतील सर्व जमाबंदीचा हिशेब ठेवीत व वसुलीवर देखरेख करीत. त्यासाठीं यांच्याजवळ थोडी-फार शिबंदी असे आणि तिच्या जोरावर (गढ्या, कोट बांधून) गढीबंद राहून आसपासच्या मुलुखांत दंगा करीत किंवा मध्यवर्ती सरकार दुर्बल असल्यास आपली सत्ता फैलावीत. यासाठींच शिवाजीनें यांचीं ठाणीं स्वतःच्या ताब्यांत घेतलीं होतीं व कांहीं पाडूनहि टाकलीं होतीं. वंशपरंपरा अधिकार चालविल्यानें यांचें त्या त्या भागीं बरेंच वर्चस्व असे. यामुळेंच शिवाजीनें राज्यस्थापनेच्या प्रारंभीं यांना आपल्या काबूंत आणलें होतें.

सरकारी शेतसाऱ्यावर शेंकडा दोन ते पांचपर्यंत यांचा हक्क असे. त्यास रसूम म्हणत. कोठें कोठें धान्यावर शेंकडा तीन व रोख पैशांवर शेंकडा सात घेत. त्याशिवाय त्यांना इनाम जमिनी असत. ग्रामपंचायतींतील पाटील-कुलकर्ण्यांप्रमाणेंच परगण्याच्या पंचायतींत त्यांना हक्काची असत. भेट, तोरण, घट, जोडा, पासोडी, तूप, तेल, वगैरे वस्तू बलुत्यांप्रमाणेंच त्यांनाहि (जास्त प्रमाणांत) मिळत. सांप्रत यांचे पूर्वीचे अधिकार काढून घेतले *असून त्यांचा रसूम मात्र चालू आहे. त्यामुळें हे हल्लीं गरीब* स्थितींत आले आहेत व कांहीं कर्जबाजारीहि झाले आहेत. पूर्वी जमाबंदीचे त्या त्या परगण्यांतील सर्व कागदपत्र (दसरच) देशपांड्यांच्या ताब्यांत असत. त्यांच्या हाताखालीं मोहरीर

नांवाचा कारकून ( सांप्रतचा रेकॉर्ड कीपर ) असे. देशपांडे हा निरनिराळया गांवांच्या कुलकर्ण्यांनीं पाठविलेले हिशेब एकत्र करून सर्व परगण्यांचा हिशेब तयार करीत.

देशपांड्याप्रमाणेंच कोंकणांत व कर्नाटकांत देसाई हाहि एक अधिकारी असे. त्याचें काम देशपांड्याचेंच असे. अधिकारावरून सांप्रत देशमुख, देशपांडे व देसाई हीं आडनांवें झालीं. देशपांडे हा देशमुखाच्या हाताखालचा असे. गांवचा जसा कुलकर्णी तसा परगण्याचा देशपांडे. देशपांड्यासच देशकुलकर्णी असे म्हणत.

इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मतें मुसलमानी अमलापूर्वी ब्राह्मणांकडे देशमुख्या नव्हत्या. देशमुखी म्हणजे लष्करी व फौजदारी अधिकार. गांवचें संरक्षण जसा पाटील करी, तसें परगण्याचें संरक्षण देशमुख करी. लढाईच्या प्रसंगीं पाटील व देशमुख-देशपांडे यांनीं अमुक सैनिक सरकारास पुरवावे असे करार असत. मुसलमानी अमलांत वतनाच्या घालमेली झाल्या. त्यांत मराठे पाटील व मराठे देशमुख हे बरेचसे स्थानभ्रष्ट होऊन त्यांच्या जागीं ब्राह्मण देशमुख आले.

**देशपांडे, गंगाधरराव बाळकृष्ण** (१८७० - )—कर्नाटकांतील एक पुढारी व बेळगांव येथील प्रमुख हायकोर्ट वकील. हे लोकमान्य टिळकांचे सहकारी होते. यांनीं होमरूल चळवळींत व कॉंग्रेसच्या असहकारितेच्या चळवळींत फार प्रामुख्यानें भाग घेतला व महात्मा गांधींनीं दिलेल्या स्फूर्तीमुळें सत्याग्रहाच्या चळवळींतहि ते नेहमीं पुढें असत. यांना अनेक वेळां करावासाची शिक्षा झाली आहे. हे ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सभासद आहेत. कर्नाटक प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे ते अध्यक्ष आहेत. सत्याग्रह चळवळीमध्यें १९३२ सालीं मे ते ऑगस्टमध्यें ते राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. लोकमान्य टिळक ज्या वेळीं (१९१९) होमरूल लीग व कॉंग्रेसचे शिष्टमंडळ यांचे नेते म्हणून इंग्लंडमध्यें गेले होते त्या वेळीं त्यांनीं यांस आपल्यामागें आपले अधिकार दिले होते. म. गांधींच्या सर्व चळवळींत यांनीं मोठा भाग घेतला होता. यांना कर्नाटकाचे सिंह म्हणतात.

**देशपांडे, रामचंद्र भोजराव** (मृ. १७७८)—एक शिपाई पेशाचे मराठी कवि. हे दक्षिण महाराष्ट्रांत पाच्छापूर येथें होऊन गेले. बापू गोखले यांच्या लष्करांत राहून स्वराज्यरक्षणासाठीं यांनीं मोठमोठ्या लढाया मारल्या होत्या. रामचंद्र भोजराव यांचे मूळ पुरुष थवरस हे पूर्वी मोंगलाईंत बेदर येथें राहत असत. रामचंद्रपंतांचा संस्कृत भाषेचा अभ्यास चांगला असून संस्कृतांत व मराठींत कविता करण्याचा नाद यांना बालपणापासून होता. पेशव्यांच्या पदरीं लष्करांत बरेच दिवस नोकरी करून ते यड्डूर येथें विरूपाक्षेश्वराच्या दर्शनास गेले. तेथें असतां रामचंद्रपंतांनीं 'श्रीवीरभद्रक्षेत्रवर्णन' नामक ८६ ओव्यांचें एक प्रकरण लिहिलें. यड्डूराहून स्वग्रामीं आल्यावर कोठें तरी निवांतस्थळीं राहून परमार्थसाधन करावें, अशी इच्छा त्यांना झाली. नंतर शीगेहोळी येथें एक वाडा बांधून त्यांत आपल्या परिवारासह रामचंद्रपंत जाऊन राहिले. रोज त्रिकाळ स्नानसंध्या, होमहवन व ईश्वरभजन, इत्यादि सत्कर्मांत ते आपला कालक्षेप करीत असत. फुरसतीच्या वेळीं कविता लिहिण्याचा क्रमहि यांनीं चालू ठेवला होता. पंतांनीं संस्कृत आणि मराठी मिळून जे ग्रंथ लिहिले आहेत ते येणेंप्रमाणें—(संस्कृत) सिद्धेश्वराष्टक, रामदीक्षितस्तोत्र, आरत्या व पदें, चिंदंबर गीति. (मराठी) गंगास्तवन आर्या (अपूर्ण), वीरभद्रक्षेत्रवर्णन व श्रीगणेशचरित्र. वयाच्या ७९ व्या वर्षी यांस देवाज्ञा झाली.

**देशपांडे, सूर्याजी आनंदराव** (१८२८-१८८८)—एक मराठी-पोर्तुगीज कोशकार व व्याकरणकार. गोमान्तकांत मंगेशक्षेत्रीं यांचे आजोबा राहत. वडील १० व्या वर्षी वारल्यानें सरकारी दुभाष्ये सखारामपंत वाघ यांच्याकडे हे राहिले व त्यांच्यापाशीं यांना अनेक भाषा शिकतां आल्या. पुढें यांनीं लिसेवांत मराठी भाषेचे शिक्षक म्हणून काम केलें (१८४७-१८५४). या काळांत यांनीं दोन शालोपयोगी मराठी क्रमिक पुस्तकें लिहिलीं व तीं गोवा सरकारनें प्रसिद्ध केलीं. वाघांच्या मृत्यूनंतर सूर्याजीपंतांना मराठीचे मुख्य शिक्षक व सरकारी दुभाष्ये म्हणून नेमण्यांत आलें. नंतर यांनीं मराठी-पोर्तुगीज भाषा सुलभतेनें यावयात म्हणून एक व्याकरण व मराठी-पोर्तुगीज कोश तयार केला. त्यामुळें विद्वान् लोकांत व सरकारांत त्यांची अत्यंत वाहवा झाली आणि यांना लिसेवाचे मुख्याध्यापक नेमण्यांत आलें.

**देशमुख, (सर) चिंतामण द्वारकानाथ** (१८९६-)—एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ अधिकारी. यांचा जन्म रायगडजवळच्या नातें गांवीं झाला. यांनीं मॅट्रिक परीक्षेंत पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळविली. इंग्लंडला जाऊन बी. ए. व आय्. सी. एस्. झाले व सरकारी नोकरींत चढत चढत ते रिझर्व्ह बॅंकेचे गव्हर्नर झाले. जागतिक सांपत्तिक परिषदेंत हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून होते (१९४४). पैंल्यांच्या व्यवहारासंबंधांत हे प्रमुख हिंदी तज्ज्ञ म्हणून मानले जातात. देशांच्या पुनर्रचनेसाठीं आणि प्रगतीसाठीं स्थापन झालेल्या आंतरराष्ट्रीय पेढीचे ते सध्यां अध्यक्ष आहेत. तथापि यांचा संस्कृतचा व्यासंग सुटलेला नाहीं. मेघदूताचें छंदोबद्ध मराठी भाषांतर यांनीं केलेलें आहे.

**देशमुख, गोपाळ हरि** (१८२३-१८९२)—'लोकहितवादी' या नांवानें प्रसिद्धीस आलेले अर्वाचीन महाराष्ट्राचे एक आद्य लेखक, सुधारक व अनेक संस्थांचे जनक. शालेय विद्या-

वादचे प्रसिद्ध वकील जयंतीलाल नरभेराम ठाकोर हे यांचे मामा. गुजराथ विद्यापीठांत तीन वर्षे व कुमार कार्यालयांत दोन वर्षे चित्रकलेचें शिक्षण घेतल्यानंतर हे गुजराथ विद्यापीठाची शिष्यवृत्ति घेऊन रवींद्रनाथांच्या शांतिनिकेतनांत चित्रकलेचा अधिक अभ्यास करण्यासाठीं गेले. तेथील कलाभवनांत नंदलाल बोस याच्या हाताखालीं शिक्षण घेतल्यानंतर यांनीं स्वतंत्रपणें चित्रें काढण्यास सुरुवात केली. नृत्यकलेचाहि यांनीं अभ्यास केला आहे.

हिंदुस्थानांतील प्रमुख चित्रकारांत यांची गणना होते. म. गांधींच्या जीवनावरील जलरंगामध्यें किंवा पेन्सिलीनें काढलेलीं यांचीं चित्रें उत्कृष्ट समजण्यांत येतात. या चित्रसंग्रहाची प्रस्तावना फादर एल्विन यांनीं लिहिली असून याची परदेशी आवृत्तिहि इंग्लंडमधील एका प्रकाशनसंस्थेनें काढली आहे. यांच्या 'बुद्ध का प्रत्यागमन' सारख्या चित्रांना अशीच आंतरराष्ट्रीय प्रसिद्धि मिळाली असून त्यांतील भव्यता व कलात्मकता यांबद्दल सर्वत्र प्रशंसा झाली आहे.

मुंबईच्या प्रकाश फिल्म कंपनीनें तयार केलेल्या भरतभेट, रामराज्य, विक्रमादित्य, वगैरे चित्रपटांचें कलादिग्दर्शन यांनीं केलें.

यांचे चित्रसंग्रह पुढीलप्रमाणें आहेत:— (१) सत्तर छायाचित्रें, (२) भारतपुण्यप्रवास, (३) म. गांधी, (४) नृत्यलेखा, (५) मंगलशतक, (६) लग्नोत्सव, (७) रूपलेखा, (८) श्रीरेखा, (९) मीराबाई, (१०) हिंदी निसर्गदृश्यें, (११) जलरंगांतील चित्रें, इत्यादि.

**देसाई, भुलाभाई जीवनजी** (१८८७–१९४६)—

एक हिंदी कायदेपंडित व पुढारी. यांचें शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें झालें व ते कांहीं काळ गुजराथ कॉलेजमध्यें इतिहास व अर्थशास्त्र यांचे प्राध्यापक होते. नंतर त्यांनीं एल्एल्. बी. ची परीक्षा देऊन ते हायकोर्टांत ॲडव्होकेट (ओ. एस्.) झाले. त्यांनीं होमरूल लीगच्या चळवळींत प्रथम बराच भाग घेतला, पण १९१९ मध्यें ती सोडून दिली. १९२६ मध्यें ते कांहीं काळ ॲडव्होकेट जनरल होते. बार्डोली सत्याग्रहांत सामील झालेल्या शेतकरीवर्गातर्फे ब्रूमफील्ड समितीपुढें (१९२५) त्यांनीं काम चालविलें व पुन्हां त्याच समितीपुढें गांधी–इर्विन–करारानंतर १९३१ मध्यें त्यांनीं शेतकऱ्यांचें गाऱ्हाणें मांडलें. सत्याग्रह चळवळ चालू असतां त्यांनीं स्वदेशी सभा स्थापन केली (१९३०). कॉंग्रेसनें नेमलेल्या राष्ट्रीय कर्ज–समितीवर त्यांनीं काम केलें (१९३१). १९३२ मध्यें ते प्रत्यक्ष सत्याग्रह चळवळींत पडले व त्यास इमर्जन्सी पॉवर्स ऑर्डिनन्सखालीं एक वर्ष कारावास व १०,००० रुपये दंडाची शिक्षा झाली. तुरुंगांत त्यांची प्रकृति खालावल्यामुळें ते सुटून आल्यावर कांहीं काळ युरोपमध्यें प्रवास करून आले. १९३४ मध्यें कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्ड स्थापन करण्याची बरीच खटपट केली व त्याचे ते प्रथम मुख्य चिटणीस व पुढे अध्यक्ष झाले. ते गुजराथतर्फे मध्यवर्ती असेंब्लीमध्ये फार मोठ्या बहुमतानें निवडून आले व तेथें ते कॉंग्रेस असेंब्ली पक्षाचे अध्यक्ष असून विरोधी पक्षाचे पुढारी होते. ते बराच काळ कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे सभासद होते. गेलें महायुद्ध संपल्यावर जपानशीं संगनमत करून सुभाषचंद्र बोस यांनीं उभारलेल्या हिंदी राष्ट्रीय सेनेंतील प्रमुखांवर झालेले खटले भुलाभाईंनीं चालवून त्यांना निर्दोषी ठरवून घेतलें. पण देशाला स्वातंत्र्य मिळालेलें पाहण्यास ते जिवंत राहिले नाहींत.

**देसाई, महादेव हरीभाई** (१८९२–१९४३)—महात्मा गांधींचे चिटणीस व गुजराथी लेखक. हे जातीनें अनाविल ब्राह्मण; यांच्या वडिलांचें पूर्ण नांव हरीभाई सुरभाई देसाई; ते महालक्ष्मी येथील स्त्रियांच्या ट्रेनिंग कॉलेजचे हेडमास्तर होते. महादेवभाईंचें प्राथमिक शिक्षण सुरत व कॉलेज–शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई, येथें झालें. बी. ए., एल्एल्. बी. झाल्यावर हे अहमदाबादेस वकिली करूं लागले. पुढें सहकारी खात्यांत नोकरीस असतां यांची वृत्ति साहित्याकडे वळली. यांनीं रवीन्द्रनाथ टागोरांच्या 'चित्रांगदा' या नाटकाचें गुजराथी भाषांतर केलें. यांना बंगाली भाषा सुद्धां गुजराथीप्रमाणें उत्तम येत असे.

यांच्या भाषेंत रस आणि माधुर्य यांचा उत्तम संगम आढळे. अर्थवाहक शब्दयोजना करून हे वाचकांच्या मनावर आपल्या प्रतिपादनाचा ठसा उमटवीत. 'नवजीवन' या गुजराथी पत्रांतील यांचें लिखाण याबाबत प्रमाण म्हणून दाखवितां येईल. यांचें लेखन जीवनांत नवचैतन्य उत्पन्न करणारें असल्यामुळेंच म.

गांधींचा यांच्यावर अत्यंत लोभ जडला. हे त्यांचे अनन्य शिष्य होते. महात्माजींचेंहि यांच्यावर असाधारण प्रेम होतें. महादेवभाईंनीं देशाकरितां सर्वस्वाचा त्याग केला होता. ८ ऑगस्ट १९४२ च्या धरपकडींत हे अटकेंत असतां पुणें येथें यांचा एकाएकीं अंत झाला. म. गांधींनीं यांच्याकरितां २५ लाखांचा निधि उभारण्याचा संकल्प केला. आगाखान यांनीं दहा हजार रुपये दिले. महादेवभाई व नंतर वारलेल्या म. गांधींच्या पत्नी कस्तुरबा यांच्या समाधि आगाखान राजवाड्याच्या आवारांत बांधल्या आहेत.

**देसाई, रमणलाल वसंतलाल** ( १८९२- )—एक गुजराथी ललित-लेखक. हे एम्. ए. झाल्यानंतर बडोदें संस्थानांत नोकरीस लागले. विद्यार्थिदशेंत यांनीं लिहिण्यास सुरुवात केली असली तरी नोकरी करीत असतांनाच यांचें बहुतेक सर्व लेखन झालेलें आहे.

यांनीं 'संयुक्ता' व 'शंकित हृदय' हीं नाटकें प्रथम लिहिलीं असलीं तरी 'दिव्यचक्षु' या कायदेभंगावरील कादंबरीनें यांचें नांव सर्वश्रुत झालें ( १९३१ ). यांनीं सत्तावन सालच्या बंडावर 'भारेलो अग्नि' ही कादंबरी लिहिली. ही त्यांची आवडती कादंबरी होय. यांचें लेखन ठराविक ठशाचें नसतें. मध्यमवर्गीय गुजराथी समाजाचें चित्र रेखाटण्यांत हे प्रवीण आहेत. यांच्या लेखनांत विविधता असून प्रगतिशील तरुण पिढीशीं समरस होण्याचाहि गुण आहे.

१ जयंत, २ शिरीष, ३ कोकिला, ४ हृदयनाथ, ५ दिव्यचक्षु, ६ स्नेहयज्ञ, ७ बंसरी, ८ ग्रामलक्ष्मी, ९ पूर्णिमा, १० पत्रलालसा, व ११ भारेलो अग्नि, या यांच्या कादंबऱ्या आहेत; व १ संयुक्ता, २ शंकित हृदय हीं दोन नाटकें आहेत. निहारिका हा काव्यसंग्रह व जीवनसाहित्य हा लेखसंग्रह आहे. कोकिला व पौर्णिमा या चित्रपटांच्या कथा त्यांच्या आहेत.

**देसी**—हा राग आसावरी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत, व अवरोह सातहि स्वरांनीं होतो म्हणून याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. या रागाच्या पूर्वांगांत सारंग व उत्तरांगांत आसावरी या रागाच्या छाया दृष्टीस पडतात. गांधार स्वरावर या रागांत कंपन आहे. ऋषभ व मंद्र स्थानांतील निषाद या स्वरांची संगति फार रक्तिदायक आहे.

**देहांत शासन**—फौजदारी कायद्यांत गुन्हेगाराला सर्वांत मोठी शिक्षा मरण ही सांगितलेली आहे. सर्व काळीं व सर्व देशांत ही देहांत शासनाची पद्धति अमलांत आहे. प्राचीन काळीं व मध्ययुगांत पुष्कळ गुन्हेगारांचा अत्यंत क्रूरपणें छळ करून ही मरणाची शिक्षा देण्यांत येत असे. चामडी सोलून काढून ठार करणें, जिवंत जाळणें, सुळावर चढविणें, उकळत असलेल्या तेलांत बुडविणें, हत्तीच्या पायाशीं बांधून ठार मारणें, उंच कड्यावरून ढकलून देणें, भिंतींत चिणून प्राण घेणें, इत्यादि अनेक प्रकारें ही शिक्षा देण्यांत येत असे. अलीकडे गळ्याला फांस आवळून फांशीं देणें ही पद्धति अमलांत असून अगदीं अलीकडे फांशीऐवजीं विजेच्या धक्क्यानें जीव घेण्याची नवीन सुधारणा कांहीं देशांत अमलांत आहे. इतकेंच नव्हे तर देहांत शिक्षा मुळींच देऊं नये अशीहि चळवळ चालू असून रुमानिया, हॉलंड, स्वित्झर्लंड, पोर्तुगाल, वगैरे देशांत हें शासन दूर करण्यांत आलें आहे.

इंग्लंडमध्यें १७६४ सालपर्यंत १६० गुन्ह्यांना मरणाची शिक्षा कायद्यानें सांगितली होती. १८२० सालीं ३७ प्रकारच्या गुन्ह्यांना मरणाची शिक्षा देण्याचा कायदा झाला आणि १८६१ सालीं फक्त चार गुन्ह्यांना–सरकारी गोद्यांना ( एच्. एम्. डॉक यार्ड्स ) किंवा युद्धसाहित्य निर्माण करणाऱ्या कारखान्यांना आग लावणें, राजद्रोह, खून, समुद्रावर अत्याचार करून चांचेगिरी करणें ( पायरसी विथ व्हायोलन्स )–मरणाची शिक्षा देण्याचा कायदा करण्यांत आला आहे. देहान्त शासनाच्या शिक्षेचें समर्थन, जिवास जीव घेण्याची मोकळीक पाहिजे, या मुद्यावर अनेक मोठाल्या तत्त्ववेत्त्यांनीं ( प्लेटो, ग्रोटीअस, मॉंटेस्क्यू, हॉब्ज, रूसो, बेंथॅम्, रोमीली, वगैरेंनीं ) केलें आहे.

हिंदुस्थानांत मनुस्मृतींत ब्रह्महत्या हें एक महापातक असून त्या गुन्हेगाराचें सर्वस्व हरण करून त्याला देशांतून घालवून देणें, अगर ठार मारणें, हें शासन सांगितलें आहे. मनुस्मृति अध्याय ९ मध्यें ( १ ) खोट्या राजाज्ञा लिहिणें, ( २ ) अमात्यांत भेद पाडणें, ( ३ ) स्त्री, बालक व ब्राह्मण यांस ठार मारणें, व ( ४ ) शत्रूस फितूर होणें, या अपराधांबद्दल देहान्त शासन सांगितलें आहे. ( १ ) ब्राह्मणास मारणारा, ( २ ) मद्यपान करणारा, ( ३ ) गुरुपत्नीगमन करणारा, व ( ४ ) ब्राह्मणांचें सुवर्ण हरण करणारा असा मनुष्य ब्राह्मणेतर असेल व त्यानें हेतुपूर्वक गुन्हा केला असेल तर त्यास देहान्त शासन द्यावें व तो जर ब्राह्मण असेल तर त्याला हद्दपार करावें. ( ५ ) वस्त्रांत बांधलेलें सुवर्ण गांठ सोडून घेणें हा अपराध तीनदां केल्यास त्यास देहान्त शासन करावें. ( ६ ) जलाशय फोडणाऱ्यास पाण्यांत बुडवून मारावें ( तो जर पुन्हां बांधून देईल तर माफी करावी ). ( ७ ) राजभाण्डार, आयुधागार, देऊळ हीं फोडणारास व हत्ती घोडे व रथ चोरणारास देहान्त शासन द्यावें. ( ८ ) जातीच्या व श्रीमंतीच्या अभिमानानें जी स्त्री पतीचें उल्लंघन करून व्यभिचार करील तिला कुत्र्याकडून खाववावें व तिच्या

जाराला जिवंत जाळावा (अध्याय ८–७१·७२). कोणत्याहि अपराधाबद्दल ब्राह्मणास देहान्त शासन देऊं नये; त्यास हद्दपार करावें (अ. ८). कुलीन स्त्रिया व उत्तम रत्नें यांचा अपहार करणारास देहान्त शासन द्यावें (८·३२३).

याज्ञवल्क्य— (१) युद्धांत जिंकून आणलेले हत्ती, घोडे, वगैरे चोरणारे व खुनी यांस देहान्त शासन द्यावे. (२) भ्रूणहत्या करणारी, गर्भपात करणारी, पति किंवा गुरु यांस मारणारी, विष घालणारी, आग लावणारी, जलाशय फोडणारी अशी स्त्री गर्भिणी नसल्यास तिला बुडवून किंवा फरपटत नेऊन मारावी.

मराठी रियासतींत खून करणारास ठार मारण्याची शिक्षा क्वचितच देण्यांत येत असे. याचें कारण असें दिसतें कीं, हिंदुस्थानांत मुसलमानी अमल सुरू झाल्यानंतर खुनाचा गुन्हा करणाराकडून खून झालेल्या इसमाच्या आतिष्टांस नुकसानीबद्दल द्रव्य देऊन खून करणाराची मुक्तता करून घेण्याचा जो मार्ग कुराणास संमत आहे त्या तत्त्वास अनुसरून खुनाबद्दल द्रव्य घेण्याचा प्रघात सुरू झाला व पुढें मराठी रियासतींतहि तो प्रघात कायम राहिला असावा असें दिसतें. राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल मात्र सदर दोन्ही रियासतींत वर दिलेल्या देहान्त शासनाच्या पद्धतीप्रमाणें अत्यंत क्रूरपणानें ठार मारण्यांत येत असे. चालू कायद्यांत देहांत शासनाची शिक्षा आहे (इंडियन पीनल कोड कलमें ५४।३०२।३०३).

सध्यां हिंदुस्थानांत पुढील गुन्ह्यांसाठीं फांशी देण्यांत येतें: (१) *काळे पाण्याची शिक्षा भोगीत असलेल्या माणसानें* खून केला तर त्यास देहान्त शासन दिलेंच पाहिजे (इं. पी. को., सेक्शन ३०३); (२) बादशहाविरुद्ध युद्ध करणें (सेक्शन १२१); (३) घडलेल्या बंडास प्रत्यक्ष मदत करणें (सेक्शन १३२); (४) निरपराध्यास देहान्त शासन होईल अशा तऱ्हेचा खोटा पुरावा देणें किंवा बनविणें (सेक्शन ११४); (५) खून करणें (सेक्शन ३०२); (६) अज्ञान, वेडे किंवा भ्रमिष्ट यांना आत्महत्येस मदत करणें (सेक्शन ३०५); (७) ज्यांत खून झाला आहे अशा दरवड्यांत साथीदारी (सेक्शन ३९६); (८) काळे पाण्याची शिक्षा भोगणाऱ्या माणसानें खुनाचा प्रयत्न करून प्रत्यक्ष इजा करणें (सेक्शन ३०७). या आठ गुन्ह्यांना फांशीची शिक्षा देतां येते.

**देहू**— मुंबई, पुणें जिल्हा. हवेली तालुक्यांत भीमेस मिळणाऱ्या इंद्रायणी नदीच्या दक्षिण तीरावर हें खेडें आहे. हें पुण्याहून पंधरा मैल किंवा देहूरोड (शेलारवाडी) स्टेशनहून फक्त तीन मैलच दूर आहे. येथें संत तुकारामाचा जन्म झाला. येथें प्रतिवर्षी फाल्गुनमासीं कृष्ण पक्षांत द्वितीयेस मोठी जत्रा भरते. खुद्द देहू येथेंहि एक विठोबाचें देवालय असून येथें दर महिन्याच्या शुक्ल व कृष्ण पक्षांतील एकादशीस देवदर्शनार्थ हजार दोन हजार भक्त लोटतात.

**दैत्य**—दैत्य, असुर, दानव, वगैरे शब्द वैदिक व पौराणिक (संस्कृत) वाङ्मयांत फार येतात व देवांचे प्रतिस्पर्धी व शत्रू या नात्यानें दैत्य आणि देव यांचे पुष्कळ सामने झालेले त्यांत वर्णिले आहेत. असुरिया (असीरिया), बाबिलोनिया, इराण, या देशांच्या प्राचीन वाङ्मयांत, तसेंच ज्यू व ख्रिस्ती लोकांच्या धर्मग्रंथांत देव (गॉड) व दैत्य (डीमन) यांचीं भांडणें वर्णिलीं आहेत. सर्व धर्मांत देव म्हणजे ईश्वर (गॉड) हा सर्व विश्वाचा उत्पादक व चालक असा मानला जातो. पण देव याचा प्राचीन संस्कृत वाङ्मयांतील अर्थ 'एक प्राचीन समाज' असा असला पाहिजे, असें अनेक संस्कृत पंडितांचें मत आहे (देव पाहा). तसेंच दैत्य, राक्षस, असुर, दानव, वगैरे शब्दहि प्राचीन लोकसमाजवाचक असून ते सर्व देवांचे शत्रू होते, अशी उपपत्ति अलीकडे विद्वानांनीं लाविली आहे.

भरतखंडांत दैत्य, असुर, वगैरेंचीं देवांशीं अनेक भांडणें व युद्धें झालीं, अशाबद्दल अनेक पुराणांत वर्णनें आहेत. दैत्य हे कश्यप ऋषीला दिती नांवाच्या स्त्रीपासून झालेले पुत्र, अशी त्यांची उत्पत्ति दिली आहे. ऋषींच्या यज्ञांना ते फार उपद्रव देत. कित्येक हिंदु देवतांना, ज्या दैत्यांना त्यांनीं ठार मारलें त्यांच्या नांवावरून नांवें पडलीं आहेत: उदा०, इंद्राला वृत्रहन्, *विष्णूला कैटभजित् व मधुसूदन, देवीला महिषासुरमर्दिनी, कृष्णाला केशिनिषूदन, वगैरे. हिंदूंच्या दशावतारांपैकीं* बहुतेक त्या त्या वेळीं फार बलाढ्य व जुलमी झालेल्या दैत्यांना मारण्याकरितां झाले असें वर्णन आहे.

ख्रिस्ती धर्मग्रंथांतील कल्पना अशी आहे कीं, एन्जल कोटीमध्यें कांहीं चांगले व कांहीं वाईट निघाले व त्यामुळें वाईट एन्जलांचा ऊर्फ दैत्यांचा स्वर्गांतून पाताळांत अधःपात झाला. सैतान हा त्यांच्यांतील मुख्य दैत्य होय (देवदूत पाहा). सैतान व त्याचे अनुयायी यांचा मुख्य अपराध म्हटला म्हणजे परमेश्वराचा मत्सर. याबद्दलची कथा मिल्टन नामक इंग्रज कवीनें आपल्या 'पॅराडाइज लॉस्ट' (स्वर्गपदच्युति) नांवाच्या महाकाव्यांत वर्णिली आहे.

**दैवघटित**—ख्रिस्ती धर्मांत ज्यास 'प्रॉव्हिडेन्स' म्हणतात तें दैवघटित, म्हणजे विश्वाची उत्पत्ति ज्या हेतूनें करण्यांत आली आहे तो हेतु साध्य होण्याकरितां जगांतील सर्व घटना ज्या विशिष्ट क्रमानें व दैवी सुज्ञतेनें घडून येतात ती घटना होय. परमेश्वरानें स्वतःच्या ठायीं वास करीत असलेलें पूर्णत्व प्राणिमात्रास प्राप्त व्हावें या हेतूनें विश्वाची उत्पत्ति केली. याकरितां प्रत्येक व्यक्तीनें आपल्या सामर्थ्याप्रमाणें परमेश्वराच्या

पूर्णत्वामध्यें अंशभाक् व्हावें व स्वतःस सुख प्राप्त करून घ्यावें हें व्यक्तिमात्राचें कर्तव्य आहे. हा हेतु साध्य होण्याकरितां परमेश्वर प्रत्येक प्राणिमात्रास अवश्य तें साहाय्य करीत असतो. या दृश्य जगामध्यें मानव हा सर्वांत श्रेष्ठ प्राणी असल्यामुळें सर्व सृष्टिक्रम मनुष्याच्या अंकित आहे आणि त्यामुळें त्यास ज्ञान प्राप्त व्हावें व परमेश्वराशीं ऐक्य व्हावें हाच त्यांत हेतु आहे. जगांतील दुष्टपणा, मानवाचें स्वातंत्र्य आणि त्यामुळें त्याच्या हातून पातक घडून येण्याचा संभव, या गोष्टी परमेश्वरी योजनेच्या आड येत असतात. परंतु दैवी घटितामध्यें दुष्टपणासहि स्थान आहे. त्याचा हेतु मनुष्याचीं सत्कृत्यें करण्याकडे अधिक प्रवृत्ति व्हावी किंवा मनुष्याचें परमेश्वरावर किती उत्कट प्रेम आहे याची परीक्षा व्हावी किंवा परमेश्वरानें अधिक स्पष्टपणें व अधिक मोठ्या प्रमाणांत आपलें मनुष्यावरील प्रेम व कृपा उघड करावी, हा आहे. परमेश्वराचें सर्वरूप ज्ञान व प्रज्ञा यांस जगांतील सर्व चांगल्या व वाईट गोष्टींचें पूर्वज्ञान असतें व त्याच्या योजनेशीं त्यांस अनुकूल करून घेतां येतें.

याकरितां प्रत्येक मनुष्यानें आपल्या जीवितांतील विशिष्ट परिस्थितीचा विशेषतः आपल्या आवांक्याबाहेरील घटनांचा निमूटपणें स्वीकार करणें हें त्याचें कर्तव्य आहे व त्या घटनांकडे त्यानें आपणांस मिळालेली विशेष संधि या दृष्टीनें पाहिलें पाहिजे व त्यांचा शक्य तितका आपल्या जीविताचें जें अंतिम ध्येय तें म्हणजे परमेश्वराचें ज्ञान व त्याबद्दलचें प्रेम हीं साधण्याकडे उपयोग केला पाहिजे, असें ख्रिस्ती धर्मशास्त्र सांगतें.

**दैववाद**—या तत्त्वाचा अर्थ असा कीं, त्रैलोक्यांतील सर्व गोष्टी एका बलिष्ठ अतिमानुष शक्तीच्या अनुलंघनीय हुकुमानुसार घडत असतात. दैववाद व हेतुमूलकतावाद (डिटरमिनिझम) यांचा पुष्कळदां परस्पर घोटाळा करण्यांत येतो; पण वास्तविक हेतुमूलकतावादाचा अर्थ अगदीं भिन्न आहे. दैववादाचें मुख्य मर्म असें आहे कीं, त्यांत मानवी प्रयत्नाला (प्रयत्नवादाला) यत्किंचितहि वाव नसतो. ख्रिस्ती व इस्लामी धर्मांतहि दैववाद आहे. चांगल्या चांगल्या ख्रिस्ती पंडितांनीं ईश्वराचें सर्वसत्ताधीशत्व मान्य करतांना पौरस्त्य देशांतला निर्भेळ दैववाद मान्य न करतां प्रयत्नवादाचाहि पुरस्कार केला आहे. इस्लामी धर्मांत मात्र किस्मत किंवा नशीब हीच सर्व कर्तुमकर्तुम शक्ति आहे, असें मत आहे.

संस्कृत भाषेंत दैव या अर्थाचे काल, विधि, अदृष्ट, कर्म, वगैरे शब्द आहेत. भारतीय दैववाद हा हिंदु धर्मांतील पुनर्जन्माच्या तत्त्वावर उभारलेला आहे. दैव किंवा अदृष्ट म्हणजे पूर्वीच्या सर्व जन्मांत प्राण्यानें जीं पाप-पुण्याचीं कृत्यें केलेलीं असतात त्यांचें फल म्हणून चालू जन्मांत त्या प्राण्याच्या आयुष्यांतील प्रत्येक गोष्ट घडत असते. आधुनिक हिंदु धर्मपंथांपैकीं शीखपंथ हा सर्वांत कट्टा दैववादी आहे. सनातन हिंदु किंवा भागवत धर्मांत दैववादाला कर्मवादाचें व इतर धर्मपंथांतल्यापेक्षां जरा निराळें स्वरूप प्राप्त झालें आहे. कर्मवाद पाहा.

**दैवज्ञ**— सुवर्णकारांची, सोनारांची एक जात. दैवज्ञ (कोंकणस्थ) ज्ञातीची लोकसंख्या सुमारे ५० हजार असून त्यांची वस्ती महाराष्ट्रांत दमणपासून कारवारपर्यंत आहे. ज्ञातीच्या मालकीचीं प्रत्येक तालुक्यांतून एकदोन देवळे याप्रमाणें अनेक देवळें असून प्रत्येक देवळास दरसाल शेतजमिनीचें वगैरे १००-१५० रु. चें उत्पन्न असतें व त्यावर त्या त्या गांवांतील दैवज्ञ ब्राह्मण ज्ञातीची सत्ता असते. गोमांतक प्रांतांत ज्ञातीच्या मालकीचें कासारपाली येथे देवीचें संस्थान आहे. तसेंच पुणें येथें दुर्गादेवीचें देवालय ज्ञातीच्या मालकीचे असून त्यास पेशवाईपासून वतन चालू आहे.

गोमांतकांतून १६ व्या शतकांत पोर्तुगीजांच्या धर्मच्छलास कंटाळून रत्नागिरी व साष्टी प्रांतांतून व अष्टागरांतून व नंतर रत्नागिरी जिल्ह्यांतून ह्या ज्ञातीचे लोक मुंबई शहरांत व्यापारधंद्यानिमित्त येऊन राहिले. या ज्ञातींत विधवापुनर्विवाहाची चाल केव्हांहि प्रचलित नसून कित्येक विधवांस व मुलांस ज्ञातीकडून सवडीप्रमाणें मदत केली जाते.

**दोआब**—म्हणजे दोन नद्यांचा संगम अथवा एकमेकांस मिळणाऱ्या दोन नद्यांच्या मधील प्रदेश. पंजाबांतील दोआब प्रसिद्ध आहेत. त्यास अरब ग्रंथकार दोश-इ-आब असें म्हणत. चीनाब, झेलम, रावी, बिआस व सतलज यांचा सिंधूशीं संगम होण्याच्या पूर्वी, त्यामधील प्रदेशास दोआब म्हणतात. दक्षिण हिंदुस्थानांत कृष्णा व तुंगभद्रा यांमधील दुआब प्रसिद्ध आहे. गंगा आणि यमुना यांच्यामधील अंतर्वेदी प्रांतासहि दोआब म्हणतात. यमुनेचे कांहीं मोठमोठे कालवे काढलेले आहेत, त्यांच्यामधील प्रांतासहि कधीं दोआब म्हणतात. शिवालिक पहाडापासून तों खालीं अलाहाबादपर्यंतच्या सर्व प्रदेशास हेंच नांव आहे. इटावा ते अलाहाबादपर्यंत अन्तर्वेदी म्हणण्याची चाल आहे.

या दोआबमध्यें सहराणपूर, मुझफ्फरनगर, मीरत, बुलन्दशहर, अलिगड, मथुरा व आग्र्याचा कांहीं भाग, मैनपुरी, इटावा, कानपूर, फत्तेपूर ह्यांचा समावेश होतो. येथील जमीन फार सुपीक आहे व वरचा गंगेचा कालवा, खालचा गंगेचा कालवा व पूर्व यमुना कालवा ह्यांनीं आणखी त्यांत भर घातली आहे. एकमेकांना मिळणाऱ्या मोठमोठ्या दोन नद्यांच्या मधील प्रदेश या अर्थानें जगांत बरेच दोआब आढळतात.

**दोडका**—ही एक भाजीची वेल आहे. हीस लॅटिनमध्यें लुफ्फा ॲक्युटँगूला, संस्कृतमध्यें कोशातकी, मराठींत दोडका,

किंवा शिराळें, हिंदींत–गुजराथींत तुरिक, इत्यादि नांवें आहेत. दोडके उंसांत लावतात. तेव्हां त्यांची लागण उन्हाळ्यांत होते. कोणी फळबागेंत लावतात, तेव्हां फळझाडांस पाणी देतांना दोडक्याचीं आळीं मोकळ्या जागेंत लावितात. परंतु स्वतंत्र लागण उन्हाळा व पावसाळा या दोन्ही काळांत करितात. थंडींत दोडक्याचे वेल चांगले वाढत नाहींत. वेल जमिनीवर, कुंपणावर, मांडवावर, झाडावर अगर छपरावर चढवितात. दोडक्याचें बीं लावतांना तें गोडव्या जातीचें आहे अशाबद्दल खात्री करून घ्यावी. कडू दोडका औषधाशिवाय कोणत्याहि उपयोगाचा नाहीं. ज्या वेलास गोडीं फळें येत आहेत तो वेल म्हैस किंवा इतर ढोरानें चावल्यास त्याला चावल्यानंतर येणारीं सर्व फळें कडू होतात हा अनुभव आहे. म्हणून दोडकींचा वेल म्हैस अगर ढोर न चावील असा बंदोबस्त ठेवावा लागतो. दोडक्याची मोकळी व पातळ भाजी अगर चटणी करतात. दोडक्याची भाजी जास्त खाल्ल्यानें कित्येकांस आमांश होतो.

**दोदवाडचा किल्ला**—मुंबई प्रांत. हा धारवाडच्या उत्तरेस १४ मैलांवर आहे. हा एका खडकाळ टेंकाडावर व दरडीवर बांधलेला आहे. तटाच्या भिंती २० फूट उंच असून भोंवतीं खंदक आहे. हा प्रथम विजापूरकरांकडे असून त्याचें नांव हिसार असावें. त्यांच्याकडून हा सावनूरकरांकडे गेला. १७५६ त बाळाजी बाजीरावानें घेतला, पण नवाबास पुन्हां परत दिला; तो त्यानें गोपाळराव पटवर्धन यास १७६९ मध्यें इनाम दिला. १७९२ त तो टिपूनें घेतला होता; पण १७९३ मध्यें तो परत पटवर्धनास मिळाला व १८०१ मध्यें तो सांगलीकरांच्या ताब्यांत आला.

**दोदे, आल्फोन्स** (१८४०–१८९७)—एक फ्रेंच कादंबरीकार. त्याचे 'जॅक', 'लेत्र द मॉ मूलँ', 'साफो', 'तार्तारँ स्युर् ले आल्प्स', इ. ग्रंथ प्रसिद्ध आहेत. कांहीं कादंबऱ्या आत्मचरित्रपर आहेत. त्याचा मुलगा लेऑं दोदे हा संपादक व वृत्तपत्रलेखक असून राजपक्षांत होता. पण त्या पक्षाच्या पुरस्कारामुळें त्याला कैदहि भोगावी लागली होती.

**दोर, दोरखंडें**—एक इंचापेक्षां कमी व्यास असलेल्या दोरास दोरी म्हणतात व इंचापेक्षां अधिक व्यास असलेल्या दोरास दोरखंड म्हणतात. ताग, आंबाडी, कापूस, काथ्या, घायपात, वगैरे अनेक तंतुमय पदार्थांपासून दोरखंडें तयार करण्यांत येतात. तसेंच पोलाद, तांबें किंवा इतर धातूंच्या तारांपासूनहि दोरखंड तयार करण्यांत येतें. दोरखंडांत वापरण्यांत आलेले पदार्थ, त्याची जाडी, त्यांत असलेल्या पेडांची संख्या, वगैरेवरून त्याचे निरनिराळे वर्ग करण्यांत येऊन त्याचें प्रमाण ठरविण्यांत येतें. अलीकडे मोठमोठ्या जहाजांकरितां व विजेचे प्रवाह नेण्याकरितां तारांचीं दोरखंडें वापरण्यांत येतात. काथ्याचे दोर पाण्यांत कुजत नसल्यामुळें गलबतावर वगैरे विशेष वापरण्यांत येतात. परंतु ते तागाच्या दोरखंडांइतके मजबूत नसतात.

दोराची शक्ति, त्याचा आकार व ज्यापासून तो केला असतो तो पदार्थ, यांवर अवलंबून असते. १·५३ इंच परिघ असलेला अंबाडीचा दोर १,६७० पौंड व २·७ इंच व्यासाचा दोर ३३,८०० पौंड वजन तोलूं शकतो.

**दोरा**—एक किंवा अधिक सुतें, पीळ भरून एकत्र करून तयार केलेल्यास दोरा म्हणतात. याचा उपयोग कांहीं वस्तु विणण्याच्या कामीं करतात; पण मुख्यतः शिवण्याकडे याचा उपयोग होतो. सामान्यतः आपण शिवण्याकरितां जो दोरा वापरतों तो सहा पदरी असतो. कांहीं तीन पदरी असतो. इंग्लंडमध्यें मँचेस्टर येथें व स्कॉटलंडमध्यें पेझली येथें दोरा तयार होतो. तागाची सुतळी आयर्लंड व स्कॉटलंड यांमध्यें तयार होते.

**दोरे, पॉल** (१८३३–१८८३) एक फ्रेंच चित्रकार. पुस्तकांतील चित्रें काढणारा म्हणून त्याची प्रसिद्धि आहे. त्यानें पेरॉल्टचें 'टेल्स', सूचें 'वाँडरिंग ज्यू', डांटेचें 'डिव्हाइन कॉमेडी' आणि सर्व्हँटर्सचें 'डॉन क्विक्झोट', या पुस्तकांतील चित्रें काढलीं आहेत. शिवाय 'बायबल', ऑरिओस्टोचें 'ओर्लेंडो फ्युरिओसो' आणि मिल्टनचें 'पॅराडाइज लॉस्ट' यांतील चित्रें काढलीं आहेत. हीं सर्व चित्रें फार उत्तम असून त्यांत चित्रकाराची कल्पकता व नावीन्य हे गुण चांगले दिसून येतात.

**दोशी, वालचंद हिराचंद** (१८८२– )—एक मोठे देशभक्त हिंदी व्यापारी. यांचें शिक्षण सोलापूर, पुणें व मुंबई येथें झालें. प्रथम हे ठेकेदार होते. नंतर व्यापारांत पडले. हे शिंद्या स्टीम नॅव्हिगेशन कंपनी व प्रीमिअर कन्स्ट्रक्शन कंपनी यांचे अध्यक्ष आहेत. रावळ शुगर फार्म लि. कंपनी यांच्या मालकीची असून इतर साखर–कारखान्यांतहि यांचा हितसंबंध आहे. १९२७ सालीं मुंबईच्या इंडियन मर्चंट्स चेंबरचे हे अध्यक्ष होते. १९२७ ते १९३६ पर्यंत हे महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्सचे अध्यक्ष होते. १९३२–३३ मध्यें हे फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्सचे अध्यक्ष होते. १९३२–३३ मध्यें इंटर नॅशनल चेंबर ऑफ कॉमर्सच्या इंडियन नॅशनल कमिटीचे हे अध्यक्ष होते. १९३३–३४ मध्यें ऑल इंडिया ऑर्गनायझेशन ऑफ इंडस्ट्रिअल एम्प्लॉयर्स या संस्थेचे ते अध्यक्ष होते. यांचा अनेक कारखान्यांशीं व कंपन्यांशीं संबंध असून यांनीं विजगापट्टम (विशाखापट्टण) येथें एक गलबतें काढण्याचा कारखाना काढला आहे. तसेंच एक मोठ्या प्रमाणावर मोटारी बांधण्याचा कारखानाहि काढण्याचा यांचा बेत होता; परंतु परकीय सरकारच्या

विरोधामुळे तो यशस्वी होऊं शकला नाहीं. ह्यूम नळ तयार करण्याचे त्यांचे कारखाने ठिकठिकाणीं ३८ वर आहेत. इंटर नॅशनल चेंबर ऑफ कॉमर्सचें १९३७ त बर्लिन येथें व १९३९ त कोपनहेगन येथें जें अधिवेशन भरलें त्यांत हिंदी प्रतिनिधींचे हे पुढारी होते.

**दोस्तअल्ली**—कर्नाटकचा एक नबाब. वाधिणगिऱ्याच्या नायकास हुकमतींत आणण्याकरितां इसवी सन १७०६ त औरंगजेबानें दाऊदखानास कर्नाटकांतून वर बोलाविलें तेव्हां दाऊदखानानें आपल्यामागें कर्नाटक पैनघाटाचा कारभार पाहण्यासाठीं सादतउल्लाखान नांवाच्या सरदाराची नेमणूक केली होती. दोस्तअल्ली हा या सादतखानाचा पुतण्या होता. १७३२ सालीं दोस्तअल्ली हा आपल्या काकाच्यामागून कर्नाटक प्रांताचा नबाब झाला. परंतु यानें अधिकारसूत्रें हातीं घेण्याकरितां निजामउल्मुल्क किंवा मोंगल बादशहा यांपैकीं कोणाचीच परवानगी घेतली नाहीं. पुढें १७४० सालीं मराठ्यांनीं कर्नाटकांत स्वारी करून दामुळचेरी घाटाजवळ दोस्तअल्लीवर हल्ला केला व त्याला ठार करून त्याच्या सैन्याचा पराभव केला. दोस्तअल्लीचा दिवाण मीर असीद यास या हल्ल्यांत मराठ्यांनीं कैद केलें.

दोस्तअल्लीस सफदरअल्ली नांवाचा एक मुलगा असून त्याची मुलगी चंदासाहेबास दिली होती. बापाच्या मृत्यूनंतर सफदरअल्लीनें मराठ्यांस पैसा देऊन त्यांच्याशीं स्नेह करून घेतला.

**दोस्त महंमदखान** (मृ. १८६३)—एक अफगाणिस्तानचा अमीर. हा बुद्धिमान् व शूर असा बरकझै वंशाचा राजा होता. पेशावर प्रांत रणजितसिंहाकडे होता, तो परत घेण्याची खटपट महंमदनें इंग्रज व रशिया यांकडे चालविली. रशियानें मदत देण्याचें कबूल केलें. इराणहि त्यांत सामील झाला. तेव्हां हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल ऑक्लंड यानें अफगाणिस्तानावर स्वारी करण्याचें ठरविलें. रणजितसिंग, इंग्रज व शहासुजा एक झाले व अफगाणिस्तानवर जाऊन (१८३९) कंदाहारास इंग्रजांनीं शहासुजास गादीवर बसविलें. पुढें महंमद इंग्रजांच्या स्वाधीन झाला, त्याला त्यांनीं कलकत्त्यास आणून ठेविलें (मे १८४१). तिकडे अफगाणांनीं बंड करून (नोव्हेंबर) महंमदाचा पुत्र अकबर यास पुढारी करून तेथील सर्व इंग्रजांची (बायकामुलें सोडून) कत्तल केली. पुढच्या वर्षी (१८४२ सप्टेंबर) इंग्रजांनीं पुन्हां अकबराचा पराभव केला व काबूल घेतलें, पुढें महंमद पुन्हां गादीवर बसला तो शेवटपर्यंत राज्य करून १८६३ सालीं वारला.

**दोस्तोइव्हस्की, फेओदोर** (१८२१–१८८१)—एक रशियन कादंबरीकार. त्याची पहिली कादंबरी 'पुअर पीपल' (गरीब लोक) १८४६ सालीं प्रसिद्ध झाली. त्यानंतर इंग्रजी भाषेंत त्याच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांतील कांहीं 'क्राइम अँड पनिशमेंट' (गुन्हा आणि शिक्षा); 'इंजरी अँड इन्सल्ट' (दुखापत आणि अपमान); 'दि फ्रेंड ऑफ दि फॅमिली' (कुटुंबमित्र); 'दि गॅम्लर' (जुगारी); 'दि ईडियट' (खुळा); 'प्रिझन लाइफ इन् सायबेरिया' (सायबेरियांतील तुरुंगवास); 'दि पर्मनंट हजबंड' (कायम नवरा) या होत.

**दोहद**—मुंबई इलाख्यांतील पंचमहाल जिल्ह्याचा पूर्वेकडील एक तालुका. ह्यांत झालोद पेट्याचा समावेश होतो. क्षेत्रफळ ६०० चौ. मैल. लो. सं. १,२२,१४६. यांत दोहद गांव व ११८ खेडीं आहेत. तालुक्यांत दाट जंगलें असून प्रदेश पहाडी आहे. हिंवाळ्यांत कधीं कधीं बर्फ पडतें. अनास नदी पूर्व सरहद्दीवरून वाहते.

दोहद शहर—हें गुजराथ व माळवा यांमधील मुख्य घाटाजवळ असून याच्या चारी बाजूंस लहान टेंकड्यांची रांग आहे. हें हमरस्त्यावर असल्यामुळें या शहरीं बराच व्यापार चालतो. लो. सं. सुमारें चौतीस हजार.

या शहराचे पूर्व दोहद व पश्चिम दोहद असे दोन भाग करतात. त्यांपैकीं पूर्व दोहद नवीन वसलेलें असून पश्चिमेकडील वस्ती जुनाट आहे. जुन्या दोहदमध्यें एक सुंदर तलाव असून त्यामधील दोन बेटांवर दौलतराव शिंद्यांचे व्याही बापूसाहेब पाटणकर यांनीं दोन क्रीडाभुवनें बांधलीं होतीं. तलावाच्या पूर्वेस डोंगरवाडा नांवाचा बाग आहे. तेथें पूर्वी एका रजपूत सरदाराचा वाडा होता. याशिवाय चंदन तलाव, घांचिवाडा, मशीदा वगैरे ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. नवीन दोहदमध्यें स. १६१९ त शहाजहान बादशहानें औरंगजेबाच्या जन्मानिमित्त बांधलेली धर्मशाळा व पाटणकरांनीं बांधलेली तीन मजली बारद्वारी इमारत हीं प्रेक्षणीय आहेत.

**दौंड**—मुंबई, पुणें जिल्हा, भीमथडी तालुक्यांतील दौंड पेट्याचें मुख्य गांव. पेट्याची लो. सं. सु. पाऊण लाख आहे. दौंड हें पुण्याच्या पूर्वेस ४८ मैल आहे. येथें भैरवदेव व विठोबा अशीं दोन देवालयें आहेत. दोन्ही देवालयें महादजी शिंदे यानें बांधलीं. एप्रिलमध्यें दरवर्षी यात्रा भरते. दौंड-मनमाड रेल्वे, बारामती रेल्वे व ग्रेट इंडियन पेनिन्शुला रेल्वे या शाखांचें हें जंक्शन आहे. येथें म्युनिसिपालिटी व एक हायस्कूल आहे. लो. सं. सु. तेरा हजार. दौंड ही मोठी बाजारपेठ आहे.

**दौलतराव शिंदे** (१७८०–१८२७)—शिंदे घराण्यांतील एक संस्थानिक. महादजी शिंद्याचा तुकोजी म्हणून सावत्र भाऊ होता. तो पानपतांत ठार झाला. त्याचा पुत्र आनंदराव व त्याचा दौलतराव. याच्या आईचें नांव मैनाबाई. महादजीस मुलगा

न झाल्यानें त्यानें याला दत्तक घेण्याचें ठरविलें; परंतु महादजी एकाएकीं वारल्यामुळें (१७९४) दत्तविधान झालें नाहीं व त्यामुळें दौलतरावास सरदारीचीं वस्त्रें पेशव्यांकडून मिळालीं. तेव्हां महादजीची बायको लक्ष्मीबाई हिनें हरकत घेतली होती. या वेळीं दौलतराव १४ वर्षांचा होता.

खर्ड्याच्या लढाईंत दौलतराव हजर होता (१७९५). तिकडून परत आल्यावर तो पुण्याहून उत्तरेकडे निघाला. इतक्यांत सवाई माधवरावानें प्राणत्याग केला. तेव्हां अडचणीचा प्रसंग जाणून नानानें त्याला ताबडतोब परत बोलाविलें. उद्देश हा कीं, त्याच्यासारख्या फौजबंद सरदारास आपल्या बाजूस ओढून, स. माधवरावाच्या बायकोच्या–यशोदाबाईच्या–मांडीवर एखादा दत्तक देऊन राज्य चालवावें. पण या मसलतीस दौलतरावाचा दिवाण बाळोबातात्या प्रतिकूल होता. बाजीरावानें बाळोबास प्रथम फोडून त्याच्यामार्फत दौलतरावासहि फोडलें आणि आपल्यास गादीवर बसविल्यास त्याला ४ लाखांचा मुलूख व पुण्यास असेपर्यंतचा सैन्यखर्च देण्याचें कबूल केलें.

दौलतराव बाजीरावास गादीवर बसविणार हें कळतांच नानानेंच बाजीरावास पुण्यास आणलें. इतक्यांत दौलतराव पुण्यास आला व बाजीरावानें त्याला नानाला कैद करण्यास सांगितलें. हें समजतांच नाना महाडकडे निघून गेला. वास्तविक बाळोबाच या कारस्थानाचा कर्ता होता. त्याच्या मनांत नानाचा कारभार आपल्या हातीं घ्यावयाचा होता.

बाजीराव गादीवर आल्यावर तो पुन्हा नानाकडे संधान बांधूं लागला व कबूल केलेला पैसा देईना म्हणून बाळोबानें परशुरामभाऊस नानाच्या विरुद्ध फोडून बाजीरावास कैद केलें व चिमाजीआप्पास यशोदाबाईस दत्तक देऊन राज्याचा कारभार आपल्या हातीं घेतला (मे १७९६).

लगेंच नानानें कारस्थान करून बाजीराव व दौलतराव यांना बाळोबाविरुद्ध आपल्याकडे वळवून घेतलें. दौलतरावास बरीचशी रक्कम कबूल केली व बाजीरावास गादीवर बसविण्याचें ठरविलें. तेव्हां दौलतरावानें बाळोबास कैद केलें. मात्र चिमाजीआप्पा व परशुरामभाऊ हे पळून गेले. पुन्हां बाजीराव गादीवर आला. याच वेळीं नानाला न समजतां बाजीरावानें दौलतरावाशीं एक गुप्त तह केला होता कीं, नानापासून आमचें रक्षण सतत करावें. त्याबद्दल आम्ही दोन कोट रुपये देऊं आणि सर्जेराव घाटग्याची मुलगी तुम्हांस करून देऊं. त्याप्रमाणे हें लग्न होऊन सर्जेरावास दौलतरावाची दिवाणगिरीहि मिळाली.

नंतर शिंदे हा नानानें कबूल केलेली रक्कम व नगरचा किल्ला आणि १० लाखांचा मुलूख मागूं लागला. नानानें बरीच रक्कम भरली व उत्तरेकडे कूच केल्यास किल्ला देण्याचेंहि मान्य केलें. कसेंहि करून शिंदा पुण्याहून लवकर हालावा असें नानास वाटत होतें. कारण क्षणैकबुद्धि बाजीराव त्याच्या साहाय्यानें नानास अपाय करण्यास टपला होता. परंतु शिंदा जाईना. या वेळीं अनेक मसलती झाल्या. अखेर अभयवचन देऊनहि शिंद्यानें नानास आपल्या गोटांत आणवून विश्वासघातानें (बाजीरावाच्या सांगण्यावरून) कैद करून नगरास पाठविलें (३१ डिसेंबर १७९७).

कबूल केलेलें काम (नानास कैद करण्याचें) पार पाडल्यामुळें शिंद्यानें पेशव्याजवळ दोन कोट रकमेची मागणी केली. खजिन्यांत इतका पैसा नव्हता; व तो कसा उभारावा ही नानाची कर्तबगारीहि बाजीरावांत नव्हती. तेव्हां त्यानें सर्जेरावाकडून पुण्याच्या लोकांपासून परभारें पैका वसूल करण्यास शिंद्यास परवानगी दिली. पुढें या दोघांत वांकडें येऊन परक्या राजांकडे दोघांनीहि मदत मागितली होती. शेवटीं पेशव्यास शह देण्यास म्हणून शिंद्यानें नानास सोडलें.

नाना वारल्यावर (१८००) त्याच्या संपत्तीवर शिंदे व पेशवे या दोघांनींहि चांगला हात मारला. पुढें पेशव्यांकडून ४७ लाखांच्या वराता उत्तरेकडील सरदारांवर घेऊन एकदांचा शिंदा तिकडे वळला. वाटेंत त्याचा यशवंतराव होळकरानें पराभव केला (१८०१). या वेळेपासून दौलतरावाचें लक्ष युद्धशास्त्राकडे जास्त लागलें; तरी पण तो उतावळा असल्यानें उत्तम सेनापति बनला नाहीं. या वेळीं शिंदे–होळकरांनीं परस्परांच्या राजधान्या जाळल्या. होळकरानें तर पुणेंहि जाळलें. त्या वेळीं बाजीराव पळून इंग्रजांकडे गेला आणि वसईस त्यानें मराठी राज्याच्या बेदाव्याचा तह लिहून दिला (१८०२).

या तहामुळें सर्व मराठ्यांचे डोळे उघडले. दौलतरावानें होळकरास व भोंसल्यास घेऊन इंग्रजांस हांकलून लावण्याचा प्रयत्न चालविला. परंतु एकमेकांचीं मनें शुद्ध नसल्यानें व इंग्रजांची युद्धसामुग्री उत्तम दर्जाची असल्यानें मराठ्यांचा सर्वत्र पराभव होत गेला. त्याच्या (शिंद्याच्या) सैन्यावरील अधिकारी इंग्रज-फ्रेंच होते; त्यांनीं आयत्या वेळीं फितुरी केल्यानें दौलतरावाचा नाश झाला. सुर्जी–अंजनगांवचा नामुष्कीचा तह होऊन त्यांत त्याचा अर्ध्यापेक्षां जास्त मुलूख इंग्रजांना मिळाला.

इतक्यांत होळकरानें इंग्रजांचा पराभव केल्यानें दौलतराव त्यास जाऊन मिळाला (१८०४); परंतु लवकरच होळकरास त्यानें सोडलें. कार्नवालीसनें या वेळीं नवीन तह करून ग्वाल्हेर किल्ला दौलतरावास देऊन त्याला व त्याच्या कुटुंबाला जहागिरी वगैरे दिल्या-(१८०५). पुढें १२ वर्षें दौलतरावानें गडबड केली नाहीं. नंतर पेंढाऱ्यांना मिळून पुन्हां इंग्रजांविरुद्ध काहूर उठविण्याची खटपट त्यानें केली; परंतु इंग्रजांच्या चातुर्यामुळें ती साधली नाहीं (१८१७). मात्र या वेळीं झालेल्या तहानें दौलत-

राव नाखुषीनें इंग्रजांचा मांडलिक बनला. बाजीरावाच्या शेवटच्या कारस्थानांतहि दौलतरावानें भाग घेतला होता, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं (१८१८); उलट त्याचा मुलूख व सत्ता जास्त संपुष्टांत आली. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर मराठयांचें राज्य लवकर लयास जाण्यास बाजीरावाबरोबरच दौलतरावहि कारण झाला, असें म्हणावें लागेल.

पेशवाई गेल्यावर नऊ वर्षे दौलतराव जिवंत होता. त्या वेळीं त्याचें राज्य दीड कोटीचें होतें. त्याची बायको प्रसिद्ध राजकारणी व रूपवती बायजाबाई. त्याला पुत्र नसल्यानें दत्तक घेऊन बाईनें बरेंच दिवस राज्य चालविलें.

**दौलताबाद**—ऊर्फ देवगिरि. हैद्राबाद संस्थान, औरंगाबाद जिल्ह्यांतील व त..ुक्यांतील एक किल्ला. हा किल्ला पूर्वी यादवांच्या कारकीदात राजधानीचें गांवच होता. पहिला भिल्लम यानें देवगिरीची स्थापना केली असें हेमाद्रीचें म्हणणें आहे. अल्लाउद्दीन खिलजीनें हा किल्ला १२९४ सालीं घेतला, पण राजानें खंडणी देण्याचें कबूल केल्यावर त्यास किल्ला परत करण्यांत आला. मलिक काफरनें देवगिरी १३०७, १३१० व १३१८ सालीं घेतली. महमद तुघ्लखचा विचार तर दौलताबाद हीं आपल्या राज्याची राजधानी करण्याचा होता. १३३९ सालीं दिल्लीची सर्व लोकवस्ती येथें आणण्याचा त्याचा विचार कायम ठरला व त्यानेंच देवगिरीचें नांव दौलताबाद ठेविलें.

उत्तरेकडे कांहीं गडबड उपस्थित झाल्यामुळे बादशहास तिकडे राहावें लागलें व त्याच्यामागें नवीन जिंकलेल्या प्रांतांच्या अधिकाऱ्यांनीं बंड पुकारलें. व या एकंदर धामधुमींत झाफरखानानें (गुलबर्ग्याचा अधिकारी) दौलताबाद आपल्या ताब्यांत घेतलें. तो किल्ला बहामनी राजांच्या हातीं १५२६ पर्यंत राहिला. नंतर तो किल्ला निझामशाहीच्या ताब्यांत गेला व तेथून तो अकबराच्या ताब्यांत गेला. औरंगजेबाच्या निधनकालापर्यंत तो मोंगलांच्या ताब्यांत होता. पण नंतर तो हैद्राबादचा निझाम असफजाह ह्याच्या ताब्यांत गेला.

हा किल्ला एका खडकावर बांधला असून नुसत्या खडकाचीच उंची १५० फूट आहे. टेकडीची उंची ६०० फूट आहे. तटाच्या आंत देवगिरी शहर होतें; पण सध्यां तेथें एक लहानसें खेडें आहे. किल्ल्याच्या तटबंदीशिवाय आणखी चंदमिनार, चिनीमहाल यांसारख्या कांहीं चांगल्या इमारतीहि तेथें आहेत. चंदमिनार हा अल्लाउद्दीन बहामनीनें उभारला. चिनीमहालमध्यें औरंगजेबानें कुतुबशाहीचा शेवटचा राजा अबुल हसन ह्यास कैद करून ठेवलें होतें. किल्ल्यांत आठ दरवाजे आहेत. याच ठिकाणीं एका बुरजावर 'मेंढा' नांवाची पंचरसी धातूची तोफ आहे. किल्ल्यामध्यें जनार्दन स्वामींची समाधि आहे. येथें द्राक्षें चांगलीं होतात. जुन्या काळचा दौलताबादी कागद प्रख्यात आहे.

**द्युपोंत द् नेमूर्स, पिएर सॅम्युएल** (१७३९–१८१७)—एक फ्रेंच अर्थशास्त्रज्ञ. त्यानें प्रथम व्यापार या विषयावर लेख लिहून प्रसिद्धि मिळविली. त्यानें फ्रान्समधील फिझिओक्रॅट या पंथाच्या अर्थशास्त्रज्ञांच्या मताचा आविष्कार व पुरस्कार केला. तो दोन वेळां नॅशनल असेंब्लीचा अध्यक्ष होता. त्याचे प्रसिद्ध ग्रंथ आहेत ते जागतिक तत्त्वज्ञान व टर्गोचें चरित्र या विषयांसंबंधीं आहेत.

**द्युपोंत, पिएर** (१८२१–१८७०)— एक फ्रेंच कवि व गीतकार. 'सॉंग ऑफ ब्रेड' (भाकरीचें गाणें) व 'सॉंग ऑफ दि वर्कर्स' (कामकऱ्यांचें गाणें) या अर्थाच्या त्याच्या पदांत समाजवादी मतांचा पुरस्कार असल्यामुळें फ्रेंच सरकारला तीं पदें नापसंत झालीं. त्याचे कांहीं कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत.

**द्युप्युयित्रां, ग्विलोम बॅरन** (१७७७–१८३५)—एक फ्रेंच शस्त्रक्रियाकुशल व शारीरशास्त्रज्ञ. तो तत्कालीन शस्त्रक्रियेंतला सर्वोत्तम डॉक्टर गणला गेला होता. त्यानें शस्त्रक्रियोपयोगी अशीं बरींच नवीं हत्यारें बनविलीं; आणि विकृतशारीर (मॉर्बिड ॲनॉटमी) या विषयांत महत्त्वाचे शोध लावले.

**द्युफ्रेनॉय, पिएर आर्मांद** (१७९२–१८५७)—एक फ्रेंच भूस्तरशास्त्रज्ञ व खनिजशास्त्रज्ञ. त्यानें १८४१ सालीं फ्रान्स देशाचा भूस्तरशास्त्रीय नकाशा काढून त्यासंबंधीं माहितीचीं तीन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यानें खनिज द्रव्यांच्या वर्गीकरणाची जी एक नवीन पद्धति पुरस्कृत केली, ती स्फटिकशास्त्रावर आधारलेली आहे.

**द्युब्वा, पोल** (१८२९–१९०५)—एक फ्रेंच शिल्पकार. त्यानें अर्धपुतळे पुष्कळ केले. व मोठाले पुतळे सेंट जॉन, 'ईव्ह अवेकनिंग टु लाइफ्' (भानावर येणारी ईव्ह), 'मिलिटरी करेज्' (लष्करी धैर्य), 'चॅरिटी' (दानधर्म), 'फेथ्' (श्रद्धा), आणि 'मेडिटेशन' (चिंतन) असे कांहीं व्यक्तींचे व प्रसंगांचे केले.

**द्युमोंत, ज्यूल्स** (१७९०–१८४२)—एक फ्रेंच जलपर्यटनकार. १८२६ ते १८२९ पर्यंत तो आस्ट्रोलेब जहाजाचा कमांडर होता व त्यानें ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड यांच्या किनाऱ्याची पाहणी केली; व तत्संबंधीं एक ग्रंथ प्रसिद्ध केला. १८३७ सालीं त्यानें ॲन्टार्क्टिक प्रदेशाच्या संशोधनार्थ सफर केली, व तत्संबंधींहि त्यानें १८४० सालीं एक ग्रंथ प्रसिद्ध केला.

**द्रवगुरुत्वमापक**—(हायड्रोमीटर). द्रवपदार्थाचें विशिष्टगुरुत्व मोजण्याकरितां वापरण्यांत येणाऱ्या यंत्रास द्रवगुरुत्व-

मापक असें म्हणतात. त्यांपैकीं निकलसनचा द्रवगुरुत्वमापक हा घनपदार्थांचें विशिष्टगुरुत्व मोजण्याकरितांहि उपयोगांत आणतां येतो. याची सामान्यतः अशी रचना असते कीं, एका कांचेच्या नळीस एका टोंकास एक मोठा व एक लहान असे गोळे असतात. या नळीवर प्रमाणरेखा काढलेल्या असतात व अखेरच्या धाकट्या गोळयांत पारा किंवा शिशाच्या बारीक गोळया ठेवलेल्या असतात. त्यामुळें हें मापकयंत्र एखाद्या द्रवपदार्थांत उभें केलें असतां तें उभ्या स्थितींत राहतें. आर्किमिडीजच्या सिद्धांताप्रमाणें एखादा पदार्थ जितकें पाणी किंवा द्रवपदार्थ अपसारीत करतो तितक्या पाण्याच्या अथवा द्रवपदार्थाच्या वजनाइतकें त्याचें वजन असतें. यामुळें एखाद्या जड द्रवपदार्थांत हा गुरुत्वमापक ठेवला असतां त्याची नळी बरीच उंच वर राहते. परंतु हलक्या द्रवपदार्थांत ती बरीच खालीं बुडते. या मापकाच्या बुडालेल्या भागाचें घनफळ त्या द्रवपदार्थाच्या गुरुत्वाशीं व्यस्त प्रमाणांत असतें. या मापकावर ज्या प्रमाणरेषा आंखलेल्या असतात त्यांवर अशा रीतीनें आंकडे घातलेले असतात कीं, द्रवपदार्थाच्या पृष्ठभागाशीं जो आंकडा येईल तें त्या द्रवपदार्थाचें गुरुत्व असतें. अशा तऱ्हेचें द्रवगुरुत्वमापक दुधाचें गुरुत्व दाखविण्याकरितां दुग्धमापक म्हणून उपयोगांत आणण्यांत येतें. तसेंच मद्यामधील मद्यार्काचें प्रमाण पाहण्याकरितांहि अशाच गुरुत्वमापकाचा उपयोग करतात. तसेंच विद्युत्संचायक घटमालेंतील अम्लाचें गुरुत्व मोजण्याकरितांहि अशाच तऱ्हेच्या गुरुत्वमापकाचा उपयोग करण्यांत येतो.

**द्रवणांक**—( मेल्टिंग पॉइंट ). कोणताहि घनपदार्थ ज्या उष्णमानामध्यें वितळतो अथवा द्रवरूप पावतो त्या उष्णमानास द्रवणांक असें म्हणतात. हा द्रवणांक साध्या पाऱ्याच्या उष्णमानमापकानें किंवा उष्णताविद्युद्युक्त उष्णतामापकानें किंवा विसर्जक उष्णतामापकानें मोजतां येतो.

**द्रावण**—( सोल्यूशन ). पाण्यांत साखर टाकली म्हणजे कांहीं वेळानें साखर विरघळून नाहींशी होते. हें जें साखरेचें पाणी होतें त्याला साखरेचा विद्राव म्हणतात. या ठिकाणीं साखर विद्राव्य ( सोल्यूट ) आणि पाणी विद्रावक ( सॉल्व्हंट ) होय. विद्रावक सामान्यतः द्रवरूप असतात. विद्राव्य घन, द्रव किंवा वायुरूप असूं शकतात.

**द्राविड भाषा व संस्कृति**— द्राविड भाषावर्गांत दक्षिण हिंदुस्थानांतील प्रमुख भाषांचा समावेश होतो. या भाषा बोलणारांची संख्या ठोकळ मानानें सहा कोटी ऐंशीं लक्ष इतकी आहे. या भाषावर्गाला द्राविडी हें नांव केवळ सांकेतिक अर्थानें दिलेलें आहे. हा शब्द संस्कृत द्रविड शब्दापासून बनलेला असून तोहि जुन्या द्रमिळ, दमिळ, तामिळ, अशा मूळ शब्दांपासून होत गेलेला आहे. हिंदुस्थानांत द्रविड या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. उदा., पंचद्रविड असें जे म्हणतात त्यांत तेलगू, कानडी, मराठी, गुजराथी व तामिळ इतक्यांचा समावेश होतो. या द्राविड भाषांनीं सर्व दक्षिण हिंदुस्थान व सिलोनचा उत्तरार्ध व्यापिला आहे. अगदीं वायव्येस बलुचिस्तानांतहि एक द्राविडी भाषा चालू आहे. उत्तरेकडील हे द्रविड जातीचे लोक झपाट्यानें आर्य बनत चालले व त्यांच्या भाषेवर आर्य भाषेचा परिणाम होतां होतां शेवटीं तिच्या जागीं आर्य भाषा आली आहे. अनेक जातींचे लोक पूर्वीं द्राविडी भाषा बोलत असलेले हल्लीं आर्य भाषा बोलूं लागले आहेत. कित्येक द्राविड भाषांत आर्य भाषांची मिसळ होऊन त्या मिश्र भाषा बनल्या आहेत. आर्य लोकांमधील मूर्धन्यवर्ण द्राविडी भाषेंतून आलेले आहेत, किंवा संस्कृतमध्यें मूळ ते होतेच, याबद्दल बराच वाद माजलेला आहे. हे मूर्धन्यवर्ण इंडो-युरोपियन भाषांत असल्याचें दिसत नाहीं. द्राविडी भाषांत मात्र ते प्रमुखत्वानें आहेत. प्रत्ययांच्या बाबतींत द्राविडी भाषांचा आर्य भाषांवर परिणाम झालेला आहे. तो वरच्यापेक्षां अधिक महत्त्वाचा आहे.

द्राविड लोकांची हिंदुस्थानांत वस्ती किती काळ आहे तें नक्की माहीत नाहीं. तथापि आर्य लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वींच ते हिंदुस्थानांत होते यांत शंका नाहीं. परंतु द्राविडी लोक हिंदुस्थानांतील मूळचे रहिवासी आहेत किंवा दुसऱ्या ठिकाणाहून ते हिंदुस्थानांत आलेले आहेत, हेंहि सांगतां येत नाहीं. पण असा द्राविडी एक स्वतंत्र भाषावर्ग कल्पिणें प्राप्त आहे. द्राविडी वर्गाचा मुंडावर्गाशीं संबंध आहे. द्राविडी भाषावर्गांतील तामिळ, मल्याळी, कानडी व तेलगू या प्रमुख भाषा आहेत. बऱ्याच काळापासून त्यांत वाङ्मय होत आहे. तथापि या वाङ्मयीन भाषा त्या त्या लोकांच्या बोलण्यांतील भाषांहून भिन्न आहेत.

द्राविडी भाषा मूळ ज्या भाषेपासून निघाल्या त्या भाषेंतील पुष्कळशा गोष्टी जिच्यांत अद्यापिहि कायम आहेत अशी एकच भाषा आहे व ती म्हणजे तामिळ होय. तेव्हां या भाषेच्या आधारानें इतर भाषांचें वर्गीकरण करणें युक्त आहे. मल्याळी भाषेंतील वाङ्मयावर तामीळचा फार परिणाम झालेला आहे आणि या

दोन्ही भाषांमध्यें साम्य फारच आहे. पण दोन्ही भाषांत स्वतंत्र व निरनिराळें वाङ्मय झालेलें असल्यामुळें त्यांना दोन निराळ्या भाषा मानणें भाग आहे. कानडी भाषाहि तामिळशीं फार समान आहे.

संस्कृति—द्राविड संस्कृतीविषयीं अद्यापि पद्धतशीर विवेचन झालें नाहीं. आज ही संस्कृति हिंदुस्थानांत प्रामुख्यानें आहे व इतर भारतीयेतर तत्सदृश जे लोक असतील त्यांचा भारतीय द्राविडांशीं कितपत ऐतिहासिक संबंध जोडतां येईल हा मुख्य प्रश्न होय. ज्या वंशांशीं द्राविड वंशाचा संबंध जोडण्यांत येत आहे असे वंश म्हटले म्हणजे हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील ब्राहुई, इराणांतील लुरी व प्राचीन तुर्कस्तानांतील सुमेरियन हे होत. यापेक्षां दूरचा संबंध लावणाऱ्या मंडळींनीं त्यांचा सेमिटिक लोकांशीं वांशिक संबंध लावला आहे. आणि कित्येकांनीं तर ऑस्ट्रेलियांतील वन्य लोकांशीं संबंध दाखविला आहे. प्राचीन द्राविडांचें वाङ्मय शिल्लक नाहीं. हिंदुस्थानांतील सर्वांत जुनें वाङ्मय जें तामिळ त्यांतील जुन्यांतले जुने ग्रंथ जरी घेतले तरी ते ग्रंथ संस्कृत भाषेनें तामिळवर परिणाम केल्यानंतरच्या काळांतले आहेत; आणि त्यांमुळें हिंदुस्थानामध्यें द्राविडी संस्कृतीला जें स्वरूप प्राप्त झालें तें केवळ आर्यन संस्कृतीची रूपांतर पावलेली शाखा या नात्यानेंच झालें.

द्राविडांचा विशिष्ट कायदा देखील हिंदु कायद्याची उपशाखा या नात्यानें अस्तित्वांत आहे. द्राविडांचा विशिष्ट असा जो मातृकन्यापरंपरेचा कायदा तो देखील औदीच्यांच्या धर्मकल्पनांपासून अस्पृष्ट राहिला नाहीं. कायद्यावर जसा परिणाम घडला तसा दुसऱ्या अनेक आचारांवरहि परिणाम घडला आहे. द्राविड संस्कृतीवर वैदिक संस्कृतीचा जरी मोठा परिणाम झाला तरी त्या योगानें तिचें वैशिष्ट्य नष्ट न होतां तें जास्त प्रगट करावयास एक दिशा मिळाली आणि तिनें हिंदु संस्कृतीस वैचित्र्य आणलें.

तें वैचित्र्य आपणांस द्राविडी कलाकौशल्यांत व वास्तुशिल्पशास्त्रांत पूर्णपणें आढळून येतें. द्राविडी संस्कृतीचा हिंदु संस्कृतीशीं मिलाफ जितका उत्तम तऱ्हेनें झाला तितका दुसऱ्या कोणत्याहि संस्कृतींशीं झाला नाहीं. हिंदुस्थानांतील द्राविडांमध्यें जरी हिंदुत्व पूर्णपणें शिरलें तरी कित्येक आचार जुनेच राहिले.

सुमेरियन व सेमेटिक लोकांशीं द्राविडांचा संबंध कितपत आहे हें त्या त्या लेखांत दिलेंच आहे.

**द्राविड वेद**—द्राविड भाषेंत नम्माळवार यानें जे ग्रंथ केले आहेत त्या सर्वांना द्राविड वेद असें म्हणतात. तिरुवोयमोळी यांत सामवेदाचा सारांश १ हजार पद्यांत आहे. तिरुविरुत्तम यांत १०० पद्यें (सारांश) ऋग्वेदाचीं, तिरुवशिरीयम यांत ७ पद्यें यजुर्वेदाचीं, व पेरियतिरुवंदादि यांत १०७ पद्यें अथर्ववेदाचीं आलीं आहेत. हीं पद्यें त्या त्या वेदांतील मजकुराचें तामिळ भाषेंत (सारांशरूपाचें) भाषांतर आहे. मधुरकवि यानें तिरुवोयमोळी हें प्रसिद्धीस आणलें. पाण्ड्य राजांच्या कारकीर्दीत संगम या कविसमाजांत त्यास अग्रमान मिळाला.

**द्राव्य**—(फ्यूझिबल मेटल). ही मिश्र धातु बहुधा शिसें, जस्त आणि बिसमथ या धातूंपासून होते. विशिष्ट अशा कमी उष्णमानांत ही वितळावी अशा बेतानें वरील धातूंचें मिश्रणांत प्रमाण ठेवतात. बाष्प इंजनांत, अग्निपेटिकेच्यावर द्रावक धातूचा दट्टया पिळून बसवितात; म्हणजे 'क्राउन'च्याखालीं पाणी येईल तेव्हां हा दट्टया वितळेल व वाफेच्या योगानें आग विझेल. सरकारी इमारतींतून पाण्याच्या तोट्यांमध्यें या धातूचे संरक्षक दट्टये घालतात. याचा असा उपयोग होतो कीं, आग लागली असतां उष्णतेमुळें हे दट्टये वितळतात व तावडतोब खोलीमध्यें पाण्याचा शिडकाव होतो.

**द्राक्ष**—[वर्ग–व्हिटासी. इं. व्हाइन]. हा एक चढणारा वेल आहे. याचा देंठ काष्ठमय असतो. पानें साधीं किंवा संयुक्त असतात. यांस कांहीं ठिकाणीं तंतू फुटतात. यांस लहान लहान हिरवीं फुलें येतात व वाटोळीं फळें येतात. या वर्गांतील महत्त्वाची जात (व्हिटिराव्हेनिफेरा) द्राक्षवेल ही होय. हिचेहि अनेक प्रकार आहेत. निरनिराळ्या देशांत हिच्या भिन्न भिन्न प्रकारांची लागवड करण्यांत येते.

मूळ वेल पश्चिम आशिया, दक्षिण युरोप, अल्जीरिया व मोरोक्को यांच्या समशीतोष्ण भागांतील आहे. वायव्य हिंदुस्थानांत पुष्कळ लागवड केली जाते. हिंदुस्थानांत द्राक्षें प्राचीन काळापासून माहीत आहेत. याला संस्कृत नांव मृद्विका असें आहे. वैद्यकांत मनुका, बेदाणा, द्राक्षाचें मद्य, वगैरे याचे उपयोग सांगितले आहेत. मुसलमानी धर्मांत दारू निषिद्ध असल्यामुळें द्राक्षांच्या लागवडीवर फार निर्बंध होते. दौलताबादी द्राक्षांचे मळे तुघ्लखांच्या वेळेपासून उल्लेखिलेले आढळतात. अकबराच्या कारकीर्दीत उत्तर व पश्चिम हिंदुस्थानांत फार लागवड होती. पण पुढें कमी होऊं लागली. आज अफगाणिस्तान, बलुचिस्तान, पंजाब, काश्मीर, या भागांत द्राक्षें चांगलीं होतात. महाराष्ट्रांत नाशिक जिल्ह्यांत पुष्कळ द्राक्षें होतात. यांतील साहेबी व फकडी या जाती उंची आहेत. हिंदुस्थानांत द्राक्षाची दारू अमेरिका, फ्रान्स, इटली, बेलजम व जर्मनी या देशांतून येते.

द्राक्षें पचनाला जड असतात. पण खोकला, दमा, क्षय, रक्तपित्त, इ. रोगांत हितावह असतात.

**द्राक्षशर्करा**—( ग्लूकोज ). रासायनिक दृष्ट्या हा एक कर्बोज्जेत ( कॉर्बोहायड्रेट ) असून द्राक्षें, मध व कांहीं फळें यांतून सांपडतो. तसेंच मधुमेह असणाऱ्यांच्या लघवींत हा असतो. बटाटे, मका, इ. मधील पिष्ठ कमजोर तेजाबांत मिसळून उकळवितात. नंतर चुन्यानें तेजाब काढून टाकतात व उरलेला द्रव घट्ट करतात. म्हणजे ही साखर तयार होते. ही साखर मिठाईवाले व जॅम ( मोरंबे ) करणारे वापरतात.

या साखरेंत बरेचसे औषधी गुणधर्म आहेत. मधांतल्या औषधी गुणधर्मांशीं त्यांची तुलना करतां येते. समुद्रांत फुटलेलीं, बुडालेलीं जहाजें, आगबोटी, विमानें, इ.त्यावरील माणसें पाण्यांत कशाच्या तरी आधारानें जीव धरून असतात. यांना कित्येक वेळां तीनतीन चारचार दिवस मदत मिळूं शकत नाहीं. त्यांना शक्य तर अन्नपाणी यांचा पुरवठा करावयाचा असतो. विमानांतूनहि अशी मदत नेमकी पोंचवतां येत नाहीं. खाऱ्या पाण्याचा थेंबहि पोटांत घेतां येत नाहीं. अशा वेळीं त्या लोकांकडे ग्लूकोजचे डबे टाकतात. ग्लूकोजनें पाणी व अन्न या दोहोंचें कार्य होतें. डॉ. जेम्स एल्. गॅम्बल यांच्या या शोधामुळें सागरावर कित्येक लोक जगले व जगतात.

**द्राक्षक्षीर**—(क्रीम ऑफ टार्टर). द्राक्षें, चिंच व इतर कांहीं फळें यांतून हें अम्ल ( पोटॅशिअम बायटार्ट्रेट ) सांपडतें. ज्या भांड्यांत द्राक्षाचा रस आंबवितात त्यावर बसलेल्या खाळ पापुद्र्यापासून हें बनवितात. याच्या रेचक, मूत्रक आणि शीतक गुणांमुळें औषधांत हें वापरतात. लोंकर रंगविण्यासाठीं बंधक म्हणून व भर्जतचूर्णांत ( बेकिंग पावडर ) एक घटकद्रव्य म्हणून क्रीम ऑफ टार्टरचा उपयोग आहे.

**द्राक्षाम्ल**—( टार्टारिक ॲसिड ). वनस्पतिद्रव्यांतून तयार होणारें एक महत्त्वाचें अम्ल. हें द्राक्षांत आणि चिंचेंत असतें. औषधांत ह्याचा उपयोग होतो. सिडलिझ पावडरमध्यें ह्याचीं सिंधु ( सोडियम ) आणि पालाश ( पोटॅशिअम ) लवणें असतात. कॅलिको प्रिंटिंगमध्यें आणि बेकिंग पावडरमध्येंहि ह्याचा उपयोग करतात.

**द्राक्षासव**—एक आयुर्वेदीय औषध. काळ्या मनुका, लवंग, जायफळ, मिरें, दालचिनी, वेलची, तमालपत्र, नागकेशर, पिंपळी, चित्रक, चवक, पिंपळमूळ, रेणुकबीज हीं यांत मुख्य औषधें असतात.

हें औषध अतिशय सुप्रसिद्ध आहे. अग्निमांद्य, अन्नपचन न होणें, पोटांत गुबारा धरणें, गुल्मरोग, जंत, शौचाला गांठी होणें, बारीक ताप, हातापायाची जळजळ, डोकें दुखणें, कसेंसें वाटणें, कमर दुखणें, हातपाय गळल्यासारखें वाटणें, घसा दुखणें, डोळे वारंवार येणें, इत्यादि अनेक रोगलक्षणांवर या औषधाचा उत्कृष्ट उपयोग होतो. खोकला, वारंवार पडसें येणें, त्यामुळें डोकें दुखणें, इत्यादि विकारांवरहि याचा चांगला उपयोग होतो. १ ते २ तोळे दिवसांतून तीनदां व लहान मुलांना अर्धा चमचा पाण्याबरोबर देतात.

**द्रुग**— मध्यप्रांताच्या छत्तीसगड विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ४,८३० चौ. मैल. १९०६ सालीं रायपूर व बिलासपूर जिल्ह्यांचे कांहीं भाग तोडून घेऊन हा नवीन जिल्हा निर्माण करण्यांत आला. या जिल्ह्याच्या दक्षिण भागीं १६४ चौ. मैल सरकारी जंगल आहे. येथील हवा फार उष्ण आहे. वार्षिक पाऊसपाणी ४७½ इंच. या जिल्ह्यांत द्रुग हा एकच मोठा गांव असून २,०४७ खेडीं आहेत. मालगुजारी व खालसा भागांत लोकवस्ती दाट आहे. बऱ्याच भागांत काळी उत्तम पिकाऊ जमीन आहे. तांदूळ, गहूं, कोद्रू व अळशी यांचें उत्पन्न होतें. द्रुग व भिलई हीं दोन स्टेशनें बंगाल-नागपूर रेल्वेवर आहेत. ह्या जिल्ह्यांत ९ जमिनदारी आहेत. त्यांचें क्षेत्रफळ १,०४० चौ. मैल आहे. जिल्ह्याची लोकसंख्या ( १९४१ ) ९,२८,८५१.

द्रुग हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बंगाल-नागपूर रेल्वेवर आहे. मुंबईहून ६८५ मैल. येथें एक मोडकळीस आलेला किल्ला आहे. त्याचा उपयोग मराठ्यांनीं १७४१ सालीं जेव्हां छत्तीसगडावर स्वारी केली होती तेव्हां केला होता. येथें काशाचीं भांडीं तयार करतात. तसेंच सुती कापडहि येथें विणलें जातें. जवळच विड्याच्या पानांचे मळे आहेत.

**द्रुपद**—एक पुरुकुलोत्पन्न राजा. यास पार्षत व पांचाल असेंहि म्हणत. यास चार पुत्र व शिखंडिनी नामक कन्या प्रथम झाली होती. नंतर अग्निकुंडांतून द्रोणाचार्यांच्या वधार्थ धृष्टद्युम्न झाला. द्रौपदी नामक कन्याहि त्यांतून उत्पन्न झाली. भारतीय युद्धामध्यें हा सर्व सैन्यासह पांडवांकडे होता. द्रोणाचार्यांच्या हातून यास मृत्यु आला. यानें माकंदी, छत्रवती, कांपिल्य, अहिछत्रा, इत्यादि नगरें वसविलीं होतीं.

**द्रोण**—भरद्वाजपुत्र. भरद्वाजाला घृताची नामक अप्सरेपासून हा झाला. हा वेदवेदांग, धनुर्विद्या, कवचविद्या व अस्त्रविद्या यांत प्रवीण होता. याचा पुत्र सप्तचिरंजिवांपैकीं अश्वत्थामा होय. द्रोणानें कौरवपांडवांना धनुर्विद्या शिकविली. भारतीय युद्धांत कौरवांतर्फे हा पांच दिवस मोठ्या शौर्यानें लढला; पण नंतर आपला पुत्र मेला अशी खोटीच उठविलेली वार्ता ऐकून यानें शस्त्रत्याग केला. तेव्हां धृष्टद्युम्नानें याचा शिरच्छेद केला.

**द्रौपदी**—महाभारतांतील मुख्य नायिका व पांडवपत्नी. ही द्रुपद राजाची कन्या कृष्णा नांवाची असून हिला पांचाली, याज्ञसेनी व पार्षती अशींहि नांवें आहेत. ही द्रुपद राजाच्या यज्ञांत शचीच्या अंशानें अग्नींतून निर्माण झाली. उपवर झाली असतां स्वयंवरांत हिला पांडवांनीं वरिलें. कृष्ण हिला तिच्या सुस्वभावामुळें भगिनी मानीत होता. हिला पांच पुत्र होते. ते महारथी होते. वनवासांत व अज्ञातवासांत ही पांडवांच्याबरोबर होती. द्रौपदी ही परम पतिव्रता, सद्गुणी व क्षमाशील पण मोठी मानी असे. हिला धर्मराजानें पणास लाविल्यानंतर हिची विटंबना करण्यासाठीं हिला दुःशासनानें सभेंत आणली व हिचें तो वस्त्रहरण करूं लागला. तेव्हां हिनें कृष्णाचा धांवा केला असतां कृष्णानें हिची अब्रू वांचविली. या रोमांचकारी प्रसंगावर अनेक काव्यें-नाटकें झालीं आहेत. अरण्यवासांत असतांना दुर्वासानें हिचें सत्त्वहरण करण्यासाठीं अपरात्रीं आपल्याबरोबरच्या सर्वांना भोजन मागितलें. त्या वेळींहि कृष्णानें थाळींत उरलेलें भाजीचें पान खाऊन द्रौपदीला सर्वांना पंचपक्वान्नाचें भोजन घालण्यास समर्थ केलें. सत्त्वधीर पंचकन्यांत द्रौपदी एक असून हिचें बहुपतित्व हा एक नेहमींचा वादाचा विषय आहे.

**द्वंद्वयुद्ध**—मूळ अर्थ दोघांमध्यें युद्ध. मोठें युद्ध चालू असतां दोन समान दर्जाच्या योद्धयांनीं परस्परांना गांठून युद्ध करणें ही प्रथा फार प्राचीन असून कथापुराणांतून वर्णिलेली आढळते. अर्वाचीन कुस्तीप्रमाणें बाकीच्या मंडळींनीं या द्वंद्वयुद्धाकडे नुसतें पाहत बसावयाचें असे. रजपुतांतहि राजांचीं द्वंद्वयुद्धें होत. युरोपांत मात्र द्वंद्वयुद्ध हें दिव्याप्रमाणें न्याय मिळवून घेण्याचा एक मार्ग समजतात. ग्रीक-रोमन काळापासून हा प्रकार चाललेला आहे. या युद्धाचे कांहीं नियमहि आहेत. खाजगी भांडणें किंवा मतभेद यांचा निर्णय करण्यासाठीं अशीं युद्धें होतात. याला साक्षीदार (सेकंड्स) लागतात व ते युद्धाची वेळ, जागा व शस्त्रें हीं ठरवून देतात व युद्ध बरोबर होतें कीं नाहीं हें पाहतात. आज कायद्यानें असें युद्ध बंद केलें आहे. तरी सैनिक, विद्यापीठांतील विद्यार्थी, व मुत्सद्दी यांमध्यें केव्हां केव्हां द्वंद्वयुद्धें होतातच. वॉरन हेस्टिंग्सनें आपल्या सहमंत्र्याशीं केलेलें द्वंद्वयुद्ध प्रसिद्धच आहे.

द्वंद्वयुद्धाचा प्रकार प्रथम फ्रान्स देशामध्यें उत्पन्न झालेला आढळतो. १६ व्या शतकामध्यें सामान्यतः तो सार्वत्रिक असलेला दृष्टीस पडतो. विशेषतः पहिल्या फ्रॅन्सिस बादशहाचें जे पांचव्या चार्लस राजाशीं सन १५२८ मध्यें आव्हानपूर्वक द्वंद्व झालें तेव्हांपासून हा प्रकार फ्रान्समध्यें विशेष सार्वत्रिक झाला असावा असें वाटतें. पहिल्या जेम्सच्या कारकीर्दींत हा द्वंद्वयुद्धाचा प्रकार फ्रान्समधून इंग्लंडमध्यें आला, परंतु या देशांत तो फ्रान्सइतका सार्वत्रिक केव्हांच झाला नाहीं. जसजशी समाजामध्यें अधिकाधिक सभ्यता व सौजन्य यांची वाढ होत गेली तसतशी द्वंद्वयुद्धाची प्रथा वाढत गेली व ही प्रथा तिसऱ्या जॉर्जच्या कारकीर्दींत अगदीं कळसास पोहोंचली. या कालांतील कांहीं प्रसिद्ध द्वंद्वयुद्धांचीं उदाहरणें द्यावयाचीं झाल्यास चार्लस, जेम्स, फॉक्स, शेरिडन, पिट, कॅनिंग, कॅसलेरे, यॉर्कचा ड्यूक, रिचमंडचा ड्यूक व लॉर्ड कॅमेलफोर्ड यांचीं देतां येतील. इंग्रजी कायद्याप्रमाणें द्वंद्वयुद्धांत मृत्यु घडून आल्यास तो खून समजण्यांत येतो; मग तें द्वंद्वयुद्ध कोणत्याहि स्वरूपाचें का असेना! तसेंच द्वंद्वयुद्धांतील दुय्यम साथीदारास मुख्य इसमाइतकीच शिक्षा ठेवलेली आहे. तसेंच सैन्यांतील एखादा अधिकारी द्वंद्वयुद्धांत भाग घेईल तर त्यास सैन्यांतून काढून टाकण्यांत येतें.

**द्वादशविध पुत्र**—हिंदुधर्मशास्त्रांत पुढील बारा प्रकारचे पुत्र सांगितले आहेत—औरस, क्षेत्रज, दत्तक, कृत्रिम, गूढोत्पन्न, अपविद्ध, कानीन, सहोढ, क्रीत, पौनर्भव, स्वयंदत्त, शौद्र हे शास्त्रोक्त बारा पुत्र (औरसः क्षेत्रजश्चैव दत्तः कृत्रिम एव च। गूढोत्पन्नोपविद्धश्च दायादबांधवाश्च षट्॥ कानीनश्च सहोढश्च क्रीतः पौनर्भवस्तथा। स्वयंदत्तश्च शौद्रश्च षड्दायादबांधवाः।).

**द्वार**—१. पूर्वद्वार—आसाम प्रांतांतील गोलपारा जिल्ह्यामधील एका भागास ही संज्ञा आहे. क्षे. फ. १,५७० मैल. लो. सं. सुमारें एक लाख. पूर्वद्वार हा भाग १८६५ सालीं ब्रिटिशांनीं घेतला. १८६६ सालीं पूर्वद्वार गोलपारा जिल्ह्यांत घेण्यांत आला. येथें तांदुळाचें उत्पन्न मुख्य आहे.

२. पश्चिमद्वार—बंगाल, जलपैगुरी जिल्ह्याचा ईशान्येकडील प्रदेश. हा हिमालयाच्या पायथ्याशीं आहे. क्षे. फ. १,८६२ चौ. मैल आहे. पूर्वद्वार व दार्जिलिंग जिल्ह्याच्या कालिमपांग पोटविभागाबरोबर पश्चिमद्वारहि १८६५ सालीं ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आला. ह्या प्रदेशाच्या उत्तर भागांत जंगली प्रदेश बराच आहे. जमीन लालसर काळ्या रंगाची आहे. पाऊसपाणी १८० इंच असतें. तिस्ता व रेना नद्यांच्यामधील प्रदेशांत चहाच्या झाडांची लागवड केली आहे. व्यापाराचीं अलिपूर, बकसा, फालाकाता व मैनागुरी हीं मोठीं गांवें आहेत.

**द्वारका**—बडोदें संस्थानांतील अमरेळी प्रांतांत, उखामंडळ तालुक्यांतील एक गांव व बंदर. अहमदाबादेच्या नैर्ऋत्येस २३५ मैल व बडोदा शहराच्या पश्चिमेस २७० मैल आहे. लो. सं. सुमारें आठ हजार. ही आनर्त देशाची राजधानी असून हिला द्वारावती असेंहि नांव होतें. येथें संपूर्ण यादवांसहित, कृष्ण व बलराम राहत असत. ही नगरी प्रथमतः भूमीवरच होती. परंतु जरासंध व कालयवन, हे वारंवार येऊन त्रास देत, त्यामुळें विश्वकर्म्याकडून हिची स्थापना कृष्णानें समुद्रांत करविली होती,

हिंदुस्थानांत हें अत्यंत पवित्र स्थान समजलें जात असून येथें नेहमीं हिंदु यात्रेकरू जातात. गोमतीच्या तीरावर द्वारकानाथजीचें देवालय आहे. दरसाल दर्शनार्थ १०,००० भक्त तरी लोटत असावेत. येथें शंकराचार्यांचा मठ आहे. येथून बंदर (रूपन नांवाचें) गांवाच्या उत्तरेस एक मैलावर आहे. आंत येणारा माल—तांदूळ, गहूं, ज्वारी, साखर, कापड-चोपड, वगैरे. बाहेर जाणारा माल—बाजरी, तेल, तूप, वगैरे. मुंबई, सुरत, कराची व झांझिबार ह्या बंदरांशीं येथून दळणवळण चालतें. उखाबंदर वाढल्यापासून द्वारकेचें बंदर या दृष्टीनें महत्त्व कमी झालें.

**द्वारसमुद्र**—कर्नाटकांत असणारें नंदीदुर्गाच्या पश्चिमेकडील २० कोसांवरील जुनें शहर. हें होयसळ बल्लाळ राजांची राजधानी होतें. यास दोरासमुद्र व द्वारावती अशींहि नांवें आहेत. सांप्रत याचें नांव हळेबीड (पाहा) असून येथें अति सुंदर अशीं कांहीं देवळें व अनेक शिलालेख आहेत. मलिक काफरनें यावर १३११ त स्वारी करून मोठी लूट नेली. पंधरा वर्षांनीं पुन्हां महंमद तुघलखच्या फौजेनें तेंच केलें. १३४२ सालीं मदुरेच्या सुलतानानें तिसऱ्या बल्लाळ राजास ठार केल्यानंतर या स्थळाचें राजकीय महत्त्व गेलें.

**द्विअजीव संयुक्तें**—(डायअझो कॉम्पाउंड्स). N : N– हा समूह असलेलीं संयुक्तें; उदा., $C_6H_5$ N : N Cl डायअझो बेंझीन क्लोराइड. सुगंधी अमिना (ॲरोमॅटिक अमाइन्स) वर नत्रसाम्ल (नायट्रस ॲसिड)ची अतिशय कमी उष्णतामान ठेवून क्रिया केली म्हणजे हीं संयुक्तें तयार होतात. हीं स्फटिकमय असून पाण्यांत विरघळतात; पण अल्कोहोलमध्यें फारशीं विरघळत नाहींत. हीं अस्थिर असून त्यांच्यावर आघात केला किंवा त्यांना एकदम आंच दिली म्हणजे त्यांचा स्फोट होतो. पाण्यांत विरघळलीं असलीं तरी उष्णतामान चढूं लागलें म्हणजे तीं विघटन पावतात व उत्प्राणिल (हायड्रोक्सील) संयुक्तें तयार होतात. अझो रंग तयार करण्यासाठीं ह्या डायअझो संयुक्तांचा अतिशय उपयोग होतो.

**द्विकर्बेत**—(बायकार्बोनेट). याला कर्बेताम्ल असेंहि म्हणतात. सिंधुकर्बित (कार्बनेट ऑफ सोडा) किंवा सज्जीखार अनम्लीकरणासाठीं वापरतात व त्याचा द्राक्षाम्ला (टार्टारिक ॲसिड)सारख्या अम्लाशीं संयोग करून फसफसणारें द्रव तयार करतात. भर्जतचूर्णांत (बेकिंग पावडर) हेंच प्रधान द्रव्य असतें. मग्नकर्बेत आणि खटकर्बेत हीं अनेक झऱ्यांच्या पाण्यांत विरलेलीं आढळतील व त्यामुळें तें पाणी जड लागतें.

**द्विदल**—(डायकोटिलेडन). ज्या वनस्पतींच्या बियांमध्यें दोन पाकळ्या असून दोन गर्भपर्णें असतात तो वनस्पतींचा वर्ग. हीं दलें अथवा गर्भपर्णें एकासमोर एक असतात. यांच्या पानांत शिरांचें जाळें असतें व त्यात रसवाहक ग्रंथी असून त्यांमध्यें काष्ठद्रव्यमय पेशी असतात. यांच्या फुलांचे भाग (चौकड्यांमध्यें) चतुष्कांमध्यें किंवा पंचकांमध्यें असतात. बेंथाम व हूकर यांनीं यांचे चार पोटवर्ग पाडले आहेत: १ थालिम फ्लोरी, २ कॅलिसि फ्लोरी, ३ कोरोली फ्लोरी आणि ४ मोनो क्लॅमिडी. एंग्लेर यानें फक्त दोन पोटवर्ग मानले आहेत: १ आर्चिक्लॅमिडी व २ सिंपेटाली.

**द्विदलधान्य-रोग**—(अर्गो). राय व इतर प्रकारच्या गवतावर क्लॉव्हिसेप्स पर्पुरिया या नांवाचा एक बुरशीसारखा-किण्व-रोग पडला असतां त्याच्या धान्याच्या स्वरूपांत फरक पडून जे निराळयाच प्रकारचे दाणे तयार होतात ते. मूळ धान्याचें अशा परिस्थितींत रूपांतर होऊन त्याच्याऐवजीं एक प्रकारची तेलकट पेशीमय बुरशी त्याच्या जागीं उत्पन्न होते. याची पूर्ण वाढ झाल्यास त्यास अंकुर फुटून त्यापासून पुनरुत्पादन होऊन त्याचें बीं तयार होतें. अशा तऱ्हेचें रोगट राय धान्य अन्नामध्यें खाण्यांत आलें तर त्यापासून एक प्रकारचा रोग होऊन शरीरांतील पेशी मृत होतात. प्रसूतीनंतर योनीचें आकुंचन होण्याकरितां अर्गोचा उपयोग करतात.

**द्विदलधान्यवर्ग**—[वर्ग-लेग्युमिनोसी]. कडदण. हा एक वनस्पतींचा मोठा व सर्वत्र पसरलेला वर्ग आहे. यामध्यें सुमारें सात हजार जाती आहेत. त्यांत कांहीं झाडें, झुडपें व वनस्पतीहि येतात. या जातीमध्येंहि नाना तऱ्हेचे फरक फार मोठ्या प्रमाणावर आढळतात. यांची फुलें सुंदर व शोभायमान दिसतात. फुलांनंतर शेंगा येतात व त्यांत बीं असतें. याचे मुख्य उपवर्ग (१) पापिलिओनासी. (२) सिसालपिनी, व (३) मिनोसी हे आहेत. आपल्याकडील नेहमींचीं द्विदल धान्यें म्हणजे मूग, मठ, उडीद, तूर, मसूर, हरभरा, पावटा, इ. होत.

**द्विधातुवाद**—(बायमेटॅलिझम्). याला द्विचलनपद्धति असेंहि नांव आहे. यांत सोनें आणि चांदी या दोन धातूंच्या नाण्यांना सरकारी मान्यता मिळालेली असते. अशा दोन धातूंचीं नाणीं जेव्हां चलनांत असतात तेव्हां सरकारला या दोघांच्या किंमतीचें प्रमाण कांहीं तरी निश्चित करावेंच लागतें. अशीं दोन धातूंचीं नाणीं निश्चित किंमती ठरवून प्रचारांत असलीं म्हणजे धातूंच्या किंमतींत चढउतार होत नाहीं व जिनसांचे भाव साधारण स्थिर राहतात, असें या पद्धतीचे पुरस्कर्ते अर्थशास्त्रज्ञ सांगतात. इंग्लंड, फ्रान्स, बेल्जम, इटली, वगैरे युरोपांतील राष्ट्रें आणि अमेरिकन संयुक्त संस्थानें या सर्वांनीं द्विधातुपद्धति कधींच टाकली आहे. पण १९३१-३२ मध्यें पुन्हां या वादानें डोकें वर काढलें होतें.

प्रत्येक देशांत पदार्थांच्या किंमतीचें मापन करण्याकरितां कांहीं तरी माप पाहिजे असतें. हें माप म्हणजे पैसा होय. कोणत्याहि वस्तूंच्या किंमती या पैशानें मोजून ठरविल्या जातात. पूर्वकालीन समाजांत अनेक तऱ्हेचे पैसे असत. परंतु अर्वाचीन समाजांत गेलीं दोन हजार वर्षें किंमती ठरविण्याच्या कामीं मौल्यवान् धातूंचाच उपयोग करितात. या धातू अर्थातच सोनें व रुपें ह्या होत. यांपैकीं कोणती तरी एक धातु मुख्य नाण्यांकरितां वापरण्याची पद्धति पुष्कळ देशांत हल्लीं प्रचलित आहे. परंतु या पद्धतीपासून पुष्कळ तोटे होतात असें दृष्टोत्पत्तीस आल्यावरून गेल्या पाऊणशें–ऐंशीं वर्षांत पुष्कळ अर्थशास्त्रज्ञांनीं एका नवीनच पद्धतीचा अंगीकार करावा अशी सूचना केली आहे. ही नवी पद्धति म्हणजे द्विधातुवाद किंवा द्विचलनपद्धति होय.

ज्या पद्धतींत मुख्य नाण्याकरितां सोनें व रुपें या दोनहि धातूंचा सारखाच उपयोग करितात व ह्या दोन्ही धातूंचीं नाणीं टांकसाळींत वाटेल तितकीं पाडून मिळतात व दोन्ही धातूंच्या किंमतीमधील परस्पर प्रमाण कायद्यानें नियमित केलेलें असतें त्या पद्धतीस द्विचलनपद्धति म्हणतात. द्विचलनपद्धतीमध्यें दोन्ही धातूंचीं नाणीं मुख्य असल्यामुळें कोणत्याहि धातूच्या नाण्याचा वाटेल तेवढें कर्ज फेडण्याकडे उपयोग करतां येतो. दोन्ही धातूंच्या किंमतींमध्यें कायद्यानें ठरविलेलें प्रमाण असलेंच पाहिजे. द्विचलनपद्धतीमध्यें एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, पैसे भरतांना सोन्याचीं नाणीं देणें किंवा रुप्याचीं नाणीं देणें हें देणाऱ्याच्या इच्छेवर असतें. पैसे घेणारास अमुकच जातीचीं नाणीं दे, असें म्हणतां येत नाहीं. शिवाय दोन्ही नाणीं मुख्य नाणीं केल्यामुळें कागदोपत्रीं १० पौंड असें लिहिलें असलें तरी कर्ज देणाऱ्याच्या मर्जीस येईल तर त्याऐवजीं १३० किंवा असेच कांहीं रुपये दिले तरी चालतें. तसेंच रक्कम केवढीहि असली तरी आपल्या इच्छेप्रमाणें कोणत्याहि जातीच्या नाण्याच्या रूपानें देतां येते. लोकांनीं वाटेल त्या वेळेस मागणी केली तरी दोन्ही धातूंचीं नाणीं टांकसाळींत पाडून देणें ही गोष्ट द्विचलनपद्धतींत अत्यंत महत्त्वाची आहे. असा नाणीं पाडून घेण्याचा हक्क प्रत्येकास असणें ही गोष्ट या पद्धतींत आवश्यक आहे.

एकचलनपद्धतीमध्यें देशांतील सर्व व्यवहार एकाच धातूच्या नाण्यांच्या द्वारें चालत असल्यामुळें ती धातु देशांत कमी किंवा जास्त झाल्यास देशांतील सर्व पदार्थांच्या किंमतीवर त्याचा परिणाम होतो.

द्विचलनपद्धतीच्या पुरस्कर्त्यांचें असें म्हणणें आहे कीं, दोन्ही धातू मुख्य नाण्याच्या कामीं उपयोगांत आणल्यास देशांतील पैसा विपुल होऊन आजच्याप्रमाणें एकाच धातूवर अवलंबून राहावें लागणार नाहीं. सोनें कमी झाल्यास रुपें वापरांत आणतां येईल; रुपें कमी पडल्यास सोनें उपयोगांत आणतां येईल. अशा रीतीनें देशांतील मुख्य नाण्यांची संख्या वाढल्यामुळें किंमती वारंवार न बदलतां स्थिर राहतील. व्यापारामध्यें जास्त स्थिरता येईल व पैशाच्या तुटवड्यामुळें वारंवार होणारी व्यापाराची मंदी टाळतां येईल. द्विचलनपद्धतीचा आणखी एक फायदा असा आहे कीं, भिन्न देशांतील हुंडणावळीचा प्रश्न जो हल्लीं बिकट झाला आहे तो आयताच सोडवला जाईल. हल्लीं अशी स्थिति आहे कीं, कांहीं देशांत सोन्याचें नाणें प्रचलित असतें. त्यामुळें एका देशास दुसऱ्या देशाचें कर्ज फेडण्याकरितां नेहमीं जास्त कमी रकमा तयार कराव्या लागतात. हुंडणावळींत नेहमीं बदल झाल्यामुळें हिंदुस्थान सरकारची पूर्वीं फार त्रेधा होत असे; व इंग्लंडचें कर्ज देण्याकरितां अगणित रुपये येथें जमा करावे लागत. कारण एखाद्या वेळीं दर पौंडाबदल १० रु. च्याऐवजीं १५ रुपये या प्रमाणात रुपये पाठवावे लागत. कधीं कधीं रुपें जास्त स्वस्त झालें तर पौंडामागें वीस रुपयेहि द्यावे लागत, म्हणजे पूर्वीच्या दुप्पट रक्कम देण्याची पाळी येई. इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशांत द्विचलनपद्धति असती तर हीं सर्व संकटें टळलीं असतीं. एकचलनपद्धतीमुळें अलीकडे रुपें वापरणाऱ्या देशांचा अतिशय तोटा होतो. कारण आज बहुतेक देशांनीं सोन्याचें नाणें मुख्य केल्यामुळें सोनें महाग होत चाललें आहे व त्या मानानें रुपें स्वस्त झालें आहे. अर्थात् जो देश नुसतें रुप्याचें नाणें वापरतो त्याला सोनें वापरणाऱ्या देशातील व्यापाऱ्यांचें देणें घेण्याकरितां जास्त रुपये द्यावे लागतात. शिवाय सोनें वापरणाऱ्या देशांतील माल आणला म्हणजे तो कधीं कमी किंमतीस तर कधीं जास्त किंमतीस विकावा लागतो. यामुळें गिऱ्हाइकाची गैरसोय होऊन व्यापारासहि अस्थिर रूप येतें.

द्विचलनपद्धतीसंबंधानें मोठा महत्त्वाचा आक्षेप हा आहे कीं, दोन नाण्यांमध्यें कायद्यानें जें प्रमाण ठरविलें जाईल तें कायम राहील अशी खात्री नसते आणि जर बाजारांतील प्रमाण सरकारनें ठरविलेल्या प्रमाणापेक्षां कमी–जास्त झालें तर लोक जी धातु स्वस्त असेल ती व्यवहारांत आणून महाग झालेली धातु आटवून बाहेर देशीं पाठवतील व अशा रीतीनें द्विचलनपद्धति अशक्य होईल. हा आक्षेप खरा आहे. परंतु ह्या सर्व आपत्ती फक्त एकाच देशांत द्विचलनपद्धति सुरू केल्यामुळें होतात. जर पुष्कळ देशांत ही पद्धति सुरू केली तर वर वर्णन केलेली स्थिति फार दिवस टिकणें शक्य नाहीं.

आतां द्विचलनपद्धतीचा पदार्थांच्या किंमतीच्या चढउतारावर काय परिणाम होईल हें पाहिलें पाहिजे. पुष्कळ लोकांना

याविपयीं संशय वाटतो. या पद्धतीच्या पुरस्कर्त्यांचें असें मत आहे कीं, या पद्धतीनें एकंदर पैशाची संख्या वाढल्यामुळें पैशाच्या कमी–जास्त पुरवठ्यामुळें होणारे परिणाम फार थोड्या प्रमाणावर होतील. नुसत्या सोन्याचें नाणें असलें म्हणजे सोन्याची तूट आली कीं किंमतींत एकदम फेरबदल होतो; परंतु दोन्ही धातूंचीं नाणीं चालू असल्यावर एकाच धातूच्या तुटवड्याचा कांहींच परिणाम होऊं शकणार नाहीं.

कांहीं ग्रंथकारांचें असें म्हणणें आहे कीं, या पद्धतीपासून ऋणकोंस फायदा होऊन उत्तरोत्तर त्यांच्या ऋणाचा बोजा कमी होत जाईल. कारण किंमती वाढल्यामुळें त्यांना पूर्वीच्या मानानें कमी माल विकूनच कर्जाची ठरलेली रक्कम मिळूं शकेल. परंतु वर लिहिल्याप्रमाणें पैदास जास्त होऊन पुन्हां किंमती उतरल्या म्हणजे ऋणकोंचें नुकसान होईल. द्विचलनपद्धतीपासून सर्वच धनकोंना व सर्वच ऋणकोंना सारखाच फायदा किंवा तोटा होईल असें सिद्ध होत नाहीं. *द्विचलनपद्धतीपासून किंमती* एकसारख्या कमी होत जाणें थांबेल व हलके हलके किंमती वाढतील, हें मात्र निर्विवाद आहे.

द्विचलनपद्धतीमुळें पहिलीं दहा वर्षें व्यापारास पैशाच्या विपुलतेमुळें तेजी होईल, हें अगदीं निश्चित आहे. परंतु ही व्यापाराची स्थिति सर्व काल टिकेल असें अनुमान करतां येत नाहीं. कारण, हल्लींच्या नोटा, चेक, इत्यादि प्रतिनिधिभूत पैशाच्या पद्धतीमुळें पैदाशीला एकदम उत्तेजन मिळून कारखानदार लोक वस्तू अमर्याद रीतीनें उत्पन्न करतील; व त्यामुळें जास्त पैसे असूनहि वस्तूंच्या मानानें ते कमी पडतील व पुन्हां पूर्ववत् स्थिति येईल. ही मालाची अमर्याद पैदास करण्याची प्रवृत्ति जर एखाद्या कारणानें बंद करण्यांत येईल तर द्विचलनपद्धतीपासून कायमचा फायदा होईल.

आतां प्रश्न एवढाच उरतो कीं, द्विचलनपद्धति एकदम सुरू होणें शक्य आहे काय? सर्व देशांमध्यें एकमेकांविषयीं इतका मत्सर आहे कीं, हें घडवून आणणें दुरापास्त आहे. प्रत्येक राष्ट्राला असें वाटतें कीं, आपल्या स्वतःच्या देशांतील नाणें इतर सर्व राष्ट्रांनीं स्वीकारावें. इंग्लिश लोक म्हणतात कीं, सर्वांनीं सॉव्हरिन स्वीकारावा व एकचलनपद्धतिच कायम करावी. अमेरिकन लोक म्हणतात कीं, द्विचलनपद्धति असावी. परंतु डॉलर हें नाणें सर्वांनीं वापरावें. शिवाय दोन धातूंमध्यें प्रमाण काय ठेवावें यासंबंधीं वाद आहेच.

सन १८७० च्या सुमारास पुष्कळ राष्ट्रांनीं एकचलनपद्धति स्वीकारून सोनें ही मुख्य नाण्याची वस्तु ठरविली त्या वेळेस सर्वांना सोनें पुरेसें होईल किंवा नाहीं अशी भीति पडूं लागल्यामुळें कांहीं लोकांनीं द्विचलनपद्धतीचा स्वीकार केला. खाणींतून निघणाऱ्या सोन्याचें प्रमाण अतिशय वाढल्यामुळें त्या वेळीं सोन्याची टंचाई इतकी भासली नाहीं. त्यामुळें हा प्रश्न एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं पुन्हां थंड पडला. हल्लीं युद्धांमुळें सोन्याची टंचाई पडूं लागली आहे व कोट्यवधि पैसे लढण्यांत खर्च झाल्यामुळें भांडवल कमी पडून मालाच्या पैदाशीस धोका येण्याचा संभव आहे. अशा वेळीं द्विचलनपद्धतीचा विचार करण्याची जरूरी उत्पन्न झाली आहे.

हिंदुस्थानामध्येंहि कर्ज फेडतांना सॉव्हरिन किंवा रुपये देतां येतात व त्यांचें परस्पर प्रमाणहि सरकारनें ठरविलें आहे. प्रथमदर्शनीं ही पद्धत द्विचलनपद्धति आहे असें वाटेल. परंतु वस्तुतः ती तशी नाहीं. वाटेल तेव्हां दोन्ही नाणीं टांकसाळींत पाडून घेण्याचा हक्क लोकांस असणें हें ह्या पद्धतींत जरूर असतें. हा हक्क हिंदुस्थानांत नाहीं. येथें सॉव्हरिन मुळींच पाडीत नाहींत. ते इंग्लंडमधून सरकारी खजिन्यांत किंवा खाजगी लोकांकडे *येतात व ते त्यांना चलनांत आणण्याची कायद्यानें परवानगी* आहे. कोणाजवळ सॉव्हरिन असतील तर त्यानें ते द्यावे. परंतु कोणास सॉव्हरिन पाहिजे असतील तर ते मिळण्याची सोय नाहीं. शिवाय हिंदुस्थानांत लोकांच्या इच्छेप्रमाणें टांकसाळींत हक्कानें रुपये पाडून मिळत नाहींत. रुपये मिळण्याकरितां सोनें किंवा सॉव्हरिन द्यावे लागतात. परंतु रुपें देऊन रुपये पाडून मिळत नाहींत. या दोन कारणांमुळें हिंदुस्थानांत द्विचलनपद्धति आहे असें म्हणतां येत नाहीं. हिंदुस्थानांतील पद्धतीचें यथार्थ नांव 'सोन्याची हुंडणावळ ठरविलेली पद्धति' (गोल्ड एक्स्चेंज स्टॅन्डर्ड) असें देतां येईल.

**द्विपक्षी कोटकवर्ग**—(डिप्टेरा). हा एक दोन पंख असलेल्या माशांचा वर्ग आहे. या वर्गांत निरनिराळ्या चाळीस हजार जातींस स्वतंत्र नांवें देण्यांत आलीं आहेत. इतर कीटकांस जे पुढचे पंख असतात त्यांच्या जागींच यास दोन पारदर्शक पंख असतात व मागच्या दोन पंखांच्या जागीं दोन मुद्गलाच्या आकाराचे खुंटे असतात. यास दोन संयुक्त डोळे असतात व तोंडाची रचना टोंचण्याच्या आणि शोषणाच्या दोन्हीहि क्रियांस अनुरूप बनलेली असते. यांच्या प्रथम किडीसारख्या अळ्या असून नंतर त्यांचें रूपांतर होऊन माशा बनतात. यांपैकीं कांहीं माशा पिकांस व फळझाडांस फार नुकसानकारक असून कांहीं रोगाच्या प्रसारक म्हणून प्रसिद्ध आहेत.

**द्वि भार्यात्व–पतित्व**—युरोपांतील बहुतेक देशांतून एक बायको किंवा नवरा जिवंत असतांना, किंवा घटस्फोट घेतला नसतांना दुसऱ्यांदा लग्न करणें हा गुन्हा ठरतो. इंग्लिश कायद्याप्रमाणे अशा गुन्ह्याला जास्तींत जास्त सात वर्षें सश्रम कारावासाची शिक्षा सांगितली आहे. पण जर सात वर्षें नवरा किंवा

चायको बेपत्ता असेल व तो किंवा ती जिवंत आहे अशी माहिती नसेल तर दुसरें लग्न करण्यास हरकत नसते. हिंदुस्थानांत असा कायदा नव्हता. पण १९४६ सालीं मुंबई सरकारनें द्वि-भार्या-प्रतिबंधक कायदा केला व पुढील सालीं घटस्फोटाचाहि कायदा केला. बहुपतित्व, बहुपत्नीत्व पाहा.

**द्विराग स्फटिक**—( डायक्रोइक क्रिस्टल्स ). ज्या स्फटिका-वर ज्याप्रमाणें विशिष्ट दिशेनें प्रकाशाचे किरण पडतील त्याप्रमाणें निरनिराळे रंग धारण करण्याची शक्ति असते अशा स्फटिकास ही संज्ञा देण्यांत येते. जेव्हां ध्रुवीभूत प्रकाशकिरण अशा तऱ्हेच्या पारदर्शक स्फटिकामधून आरपार पाडण्यांत येतात तेव्हां प्रकाशलहरींच्या दिशेप्रमाणें त्या स्फटिकाचा रंग बदलण्याची क्रिया होत असते.

**द्विवेदी, महावीरप्रसाद** ( १८६४–१९३८ )—एक सुप्रसिद्ध हिंदी संपादक, कवि व भारदस्त लेखक. यांचा जन्म अवध प्रांतांत दौलतपूर गांवीं ( जि. रायबरेली ) कान्यकुब्ज ब्राह्मणाच्या कुळांत झाला. घरच्या गरिबीमुळें हायस्कूलमधील शिक्षण पुरें न करतांच यांना रेल्वेंत नोकरी पत्करावी लागली. हे तारेचें काम शिकले व टेलिग्राफ इन्स्पेक्टरहि झाले होते. पण वरच्या अधिकाऱ्यांशीं न जमल्यानें यांना ती नोकरी सोडावी लागली.

यांनीं स्वतःच्या परिश्रमानें चांगली विद्वत्ता संपादन केली होती. गद्य व पद्य हे सफाईदार लिहीत. भाषांतर, रूपांतर व स्वतंत्र अशीं यांनीं पुस्तकें लिहिलीं. हिंदीच्या खडी बोलींत सरळ लिहिण्याकडे लोकांचें लक्ष वेधणें आणि नवशिक्षितांमध्यें हिंदी भाषेंत लिहिण्याविषयीं आदर उत्पन्न करणें, हें यांचें महत्त्वाचें जीवितकार्य होय.

यांनीं २० वर्षेंपर्यंत सरस्वती मासिकाचें संपादन करून हिंदी प्रांतांत नवें द्विवेदीयुग निर्माण केलें. या त्यांच्या सेवेचा गौरव करण्याकरितां बनारसच्या नागरी प्रचारिणी सभेनें 'द्विवेदी-गौरव-ग्रंथ' प्रसिद्ध करून यांना अर्पण केला ( १९३२ ).

यांचे ग्रंथ—गद्य अनुवाद: १ कुमारसंभवसार ( सर्ग १–५ ), २ रघुवंश, ३ किरातार्जुनीय, ४ मेघदूत, ५ हिंदी महाभारत ( बंगालीवरून ), ६ बेकन विचाररत्नावली, ७ स्पेन्सरची ज्ञेय व अज्ञेय मीमांसा, ८ स्वाधीनता, ९ संपत्तिशास्त्र. काव्य: १० कविता-कलाप, काव्यमंजूषा, सुमन. समालोचना: ११ हिंदी भाषाकी उत्पत्ति, १२ कालिदासकी निरंकुशता, १३ मिश्रबंधुका हिंदी नवरत्न, १४ लो. तिलकका गीताभाष्य, इत्यादि.

**द्विवेदी, ( महामहोपाध्याय ) सुधाकर कृपालदत्त** ( १८६०–१९१० )—एक हिंदी गणित-ज्योतिषी व कवि. जात-शरयुपारीण ब्राह्मण. यांचे पूर्वज काशीस गेले व तेथेंच यांचा जन्म, बाळपण व शिक्षण झालें. बनारस संस्कृत कॉलेजमध्यें हे पुस्तकालयाचे अध्यक्ष होते. त्या कॉलेजमधील प्राध्यापक बापुदेवशास्त्री सेवानिवृत्त झाल्यावर यांची गणित व ज्योतिष विषयांचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली.

हे गणित-ज्योतिषाप्रमाणें हिंदी भाषेचे व्यासंगी होते. तुलसी-दास, सूरदास, कबीर व अन्य हिंदी कवी यांच्या काव्यांत यांची चांगली प्रगति असे. यांनीं हिंदी भाषेंत १७ पुस्तकें लिहिलीं आहेत. यांनीं 'भाषाबोधक' नांवाचा संस्कृत ग्रंथ भाषेविषयीं केला आहे. हिंदी भाषेंत गणिताचीं चलनकलन नांवाचीं दोन पुस्तकें केलीं आहेत, आणि हिंदीचें व्याकरण रचिलें आहे. याचा 'गणक-तरंगिणी' ग्रंथ उपयुक्त आहे. त्यावरून यांचें देशी-परदेशी गणित-ज्योतिषज्ञान उत्कृष्ट दिसून येतें.

**द्वीपें**—बेटासारख्या भूमिखंडाला द्वीप हें नांव असून जुन्या काळीं पृथ्वीवर अशा अनेक तऱ्हेचीं अनेक द्वीपें असल्याचें पुराणें सांगतात. सर्व द्वीपांचा केंद्र मेरुपर्वत असून कमलपत्रा-प्रमाणें तीं त्यापासून निघून समुद्राच्यायोगें वेगवेगळीं राहिलीं आहेत. हीं द्वीपे बहुधा सात आहेत—जंबु, प्लक्ष किंवा गोमेदक, शाल्मक, कुश, क्रौंच, शाक व पुष्कर. यांना वेढणारे समुद्र म्हणजे लवण, इक्षु, सुरा, घृत, दधि, दुग्ध व जल हे होत. महाभारतांत भद्राश्व, केतुमाल, जंबुद्वीप व उत्तरकुरु हीं चार द्वीपें सांगितलेलीं आहेत. विष्णुपुराणांत भारतवर्ष ( हिंदुस्थान ) नऊ द्वीपांचें मिळून बनलें असल्याचा उल्लेख आहे.

**द्वैताद्वैत संप्रदाय**— या संप्रदायाचे प्रवर्तक भास्कराचार्य. यांचा जन्म सिंहाद्रिनजीक बेदर येथें शके १०८४ त झाला. हे जातीचे ब्राह्मण होते. वैष्णव संप्रदायाचे ते पुरस्कर्ते होते. त्यांनीं संन्यास घेतला तेव्हां निंबार्क किंवा निंबादित्य ह्या नांवानें प्रसिद्ध झाले; यामुळें त्यांच्या संप्रदायास निंबार्कसंप्रदाय असेंहि म्हणतात. निंबार्काचें मत असें आहे कीं, जीव, जगत् व ईश्वर यांचे व्यापार व अस्तित्व स्वतंत्र नसून ईश्वरेच्छेवर अवलंबून आहेत आणि मूळ परमेश्वरांतच जीव व जगत् यांचीं सूक्ष्म तत्त्वें अंतर्भूत असतात. हें मत सिद्ध करण्यासाठीं निंबार्कानीं वेदान्त सूत्रावर एक स्वतंत्र भाष्य लिहिलें आहे व या संप्रदायांतील काश्मीर भट्टाचार्य यांनीं भगवद्गीतेवर 'तत्त्वप्रकाशिका' नांवाची एक टीकाहि लिहिली असून तींत गीतार्थ यांच संप्रदायास अनुकूल आहे असें दाखविलें आहे. रामानुजाचार्यांच्या विशिष्टा-द्वैतापासून या संप्रदायाचा भेद दाखविण्यास यास कोणी द्वैताद्वैती संप्रदाय म्हणतात. ( हिंदुधर्मदीपिका ).

**द्व्याश्रय काव्य**—एक जैन इतिहासग्रंथ. सिद्धराज व कुमारपाल यांच्या कारकीर्दींत प्रसिद्ध हेमराजानें या ग्रंथास सुरुवात केली. याचें हें नांव असण्याचें कारण असें कीं, या

ग्रंथाच्या रचनेचे हेतू दोन होते : संस्कृत व्याकरण शिकविणें व अनहिलवाडपट्टणच्या राजांचा इतिहास सांगणें.

लक्ष्मीतिलक कवि यानें या ग्रंथावर टीका लिहिली. हा ग्रंथ वि. सं. १३१२ (इ. स. १२५६) मध्यें श्रीप्रल्हादपट्टण येथे दिवाळीच्या दिवशीं पुरा झाला.

---

## ध

**ध**—या वर्णाला चार अवस्थांतून जावें लागलें. पहिली नेहमींची अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी मेवाडचा गुहिलवंशी राजा अपराजित याच्या काळच्या कुंडेश्वर लेखांत (इ. स. ६६१), तिसरी उदयादित्याच्या वेळच्या (११ वें शतक) उज्जनी येथील लेखांत, व शेवटची अवस्था अबूचा परमार राजा धारावर्ष याच्या वेळच्या ओरिसा लेखांत (१२०८) दृष्टोत्पत्तीस येते.

**धकचा किल्ला**—मुंबई, कुलाबा जिल्हा. कर्जतच्या पूर्वेस सुमारें पांच मैलांवर २,८९८ फूट उंचीच्या सह्याद्रीच्या शिखरावर हा किल्ला आहे. ज्या टेंकडीवर हा किल्ला आहे त्याच्या वायव्य उतरणीवर कांहीं कोरीव लेणीं आहेत.

**धक्का**—१. (डाइक). समुद्राचें किंवा नदीचें पाणी जमिनींत शिरून जमीन वाहून जाऊं नये म्हणून ज्या समुद्रकिनाऱ्यावर किंवा नदीकांठीं भिंती घालण्यांत येतात त्यांस धक्का म्हणतात. असे धक्के हॉलंडमध्यें फार आहेत. कारण तेथील बरीचशी जमीन समुद्रसपाटीच्याहि खालीं आहे. हे धक्के सर्वांत मोठ्या भरतीचें पाणी चढतें त्या उंचीवरहि चाळीस फूटपर्यंत उंच बांधलेले असतात व त्यांचा माथा इतका रुंद असतो कीं, त्यामध्यें कालवा काढतां येतो किंवा त्यावर रस्ता तयार करतां येतो.

२. (पीयर). होड्या, बोटी, वगैरे पाण्यांतून येणाऱ्या-जाणाऱ्या वाहनांसाठीं जो ओटा बांधतात त्याला पाण्यांतील धक्का असें म्हणतात. हा सर्व ठिकाणीं सारखाच नसतो. पाण्याची खोली, माणसांची रहदारी, तेथें येणारीं-जाणारीं वाहनें म्हणजे होड्या, पडाव, मचवे, बोटी, इ. हीं ज्या तऱ्हेची असतील त्याप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेचा असतो.

विलायतेहून येणाऱ्या बोटींचे धक्के प्रचंड, मोठाले, केव्हां केव्हां दुमजली असावे लागतात. तसेंच या धक्क्यांवर यार्‍या वगैरेंची जय्यत तयारी ठेवावी लागते. केव्हां केव्हां समुद्राची किंवा नदीची खोली तीराजवळ फार नसते; अशा वेळेस समुद्रांत उंच खांब बसवून त्यांवर धक्का बांधावा लागतो. कांहीं ठिकाणीं तरते धक्के असतात. त्यांचें एक टोंक एका ठिकाणीं जोडलेलें असतें व दुसरें टोंक पाण्यांत असतें.

**धक्काभाडें**—(डेमरिज). नाविक कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, बोटीमध्यें माल चढविणें किंवा बोटींतला माल उतरून घेणें याची जबाबदारी ज्या इसमावर कायद्याप्रमाणें असते त्याला हें काम करण्यास जी मुदत दिलेली असते त्या मुदतीपेक्षां जास्त दिवस लागल्यास त्याबद्दल बोटीच्या मालकाला जी रक्कम द्यावी लागते ती रक्कम.

आगगाड्यांच्या कंपन्या व इतर कारखानेहि त्यांच्या हद्दींत ठराविक दिवसांपेक्षां जो माल पडून राहील त्यांबद्दल मालकांकडून भाडें घेतात.

**धडगांव किल्ला**—मुंबई इलाखा, पश्चिम खानदेश, तळोदें तालुक्यांत तळोद्याच्या उत्तरेस, सातपुड्यांत २० मैलांवर हा किल्ला आहे. हें पोलिस फौजदाराचें एक ठाणें आहे.

**धंधुका**—मुंबई, अहमदाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. ह्यांत गोवा पेट्याचा समावेश होतो. क्षेत्रफळ १,३०७ चौ. मै.. धंधुका, गोध्रा, रणपूर हीं मोठीं गांवें असून खेडीं २०४ आहेत. लोकसंख्या (१९४१) १,१५,११८. धंधुका हेंच या तहशिलीचें मुख्य ठाणें असून तें सुरतेच्या वायव्येस ५० कोसांवर आहे. याची लोकसंख्या ११,५६०. गांवास पाणीपुरवठा चांगला नाहीं. बोहरी व मोढवाणी यांची वस्ती पुष्कळ आहे. कापड, मातीचीं भांडीं व सुतारकाम चांगलें होतें. प्रख्यात जैन पंडित हेमचंद्र येथेंच जन्मला (१२ वें शतक). त्याच्या स्मरणार्थ कुमारपालानें येथें एक देऊळ बांधलें आहे.

**धनककट**—(अर्वाचीन बेझवाडा). आंध्र देशापासून जंगलांतून व ओसाड मैदानांतून १६७ मैलांवर हा देश होता. कान्हेरी आणि कार्लें येथील लेण्यांतील कोरीव लेखांत चार ठिकाणी धनककट असा उल्लेख आहे, तें व हें एकच होय असें कांहीं संशोधक मानतात. धनककट आणि कृष्णानदीवरील धरणीकोट किंवा अमरावती एकच होय असें कनिंगहॅम म्हणतो. सिलोन आणि सयाम येथील बौद्ध दंतकथा अशी आहे कीं, सिंहलद्वीप यामध्यें माजेरिका या देशांत नाग राहत होते. त्यांस मिळालेले बुद्धाचे एक किंवा दोन द्रोण अवशेष त्यांनीं एका अति भव्य व सुंदर अशा स्तूपांत ठेविले. हें स्थान हिरे सांपडतात त्या प्रदेशाजवळ होतें. माजेरिका देश गोदा नदीवरील दंतपुराच्या दक्षिणेस हिऱ्याच्या प्रदेशाजवळच होता, असें एका बौद्ध ग्रंथावरून दिसतें. या दोन प्रमाणांवरून तें स्थान कृष्णा नदीवरील धरणीकोटाच्या जवळ असावें. हिऱ्यांच्या खाणीचा प्रदेश धरणीकोटाच्या अगदीं जवळ उत्तरेस आहे. बौद्ध ग्रंथांत माजेरिका येथील

स्तूपाचें अतिशय वर्णन केलें आहे. हें धरणीकोट येथील स्तूपास मात्र लागतें. ह्युएनत्संगहि तो स्तूप पाहून चकित झाला. हल्लीं जे अवशेष आहेत त्यांचें कामहि फार सुंदर आहे. सदरील स्तूप इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांतला आहे. ह्या देशाचा घेर १,००० मैल सांगितला आहे. सांप्रत हें गांव गुंटूर तालुक्यांत आहे.

या ठिकाणीं अनेक प्राचीन मठांचे अवशेष दिसतात. ह्युएनत्संग या ठिकाणीं कित्येक महिने होता. या मठांतून बौद्धधर्माचा अभ्यास करण्यासाठीं भिक्षू राहत. भावविवेक हा बौद्ध पंडित येथलाच.

**धनगर**— यांची एकंदर लोकसंख्या १९११ सालीं ६,७३,४३९ होती. कोंकण व दक्षिण महाराष्ट्र, निजामचें राज्य, मध्यप्रांत, वऱ्हाड व मध्यहिंदुस्थान यांमध्यें हे लोक आढळतात. गुरें विकणें व घोंगड्या विकणें हे त्यांचे धंदे असून ते खिल्लारें पाळून त्यावर उदरनिर्वाह करतात. उत्तर हिंदुस्थानांतील धनगर हे मजुरी व हलालखोरांचींहि कामें करतात.

यांच्यामध्यें २२ कुळ्या असून एका कुळींतील लोक दुसऱ्या कुळींतील लोकांशीं विवाहसंबंध करीत नाहींत. यांच्या आडनांवांप्रमाणें यांचीं कुळें ठरलीं जातात. हे मांसाहारी असून बुरूड, परीट, इत्यादि जातींच्या हातचें जेवत नाहींत. हे हिंदु धर्मीय असून ह्यांचे उपाध्याय ब्राह्मण आहेत. सातारा जिल्ह्यांतील धनगर लोकांची एक मध्यवर्ती संस्था असून तिचा मुख्य अधिकारी गावडा कुळांतला असतो व तो कऱ्हाडास राहतो. सोलापूर व अहमदनगर जिल्ह्यांतहि अशाच पंचायती आहेत. पुण्यांत या लोकांचे सामाजिक प्रश्न यांच्या सभेंत सोडविले जातात. नागपूर, वर्धा, चांदा, वऱ्हाड व नेमाड इकडील यांची संख्या ९६,००० आहे. धनगरांचे मुख्य देव महादेव व खंडोबा आहेत. नाचणगांवचा बहराम हा वर्ध्यांच्या धनगरांचा मुख्य देव आहे. कुणबी, फुलमाळी व सोनार यांच्या हातचें हे लोक जेवतात. कुणबी लोक यांच्या हातचें पाणी पितात. हे बकरीचें दूध विकतात, व मेंढराच्या लोंकरीचीं कांबळीं करतात. यांच्यांतील गवळी धनगर हे गाई-म्हशींचीं खिल्लारें बाळगतात. मेंढे धनगर असतात ते मेंढरें किंवा बकरीं बाळगंतात व चारतात. ठाणें जिल्ह्यांतील खटेकरी धनगर हे घोंगड्या विणतात. पावसाचें भविष्य वर्तविण्याबद्दल यांची प्रसिद्धि आहे. जेथें जेथें खंडोबाचें महास्थान असतें तेथें तेथें पूजा धनगराची असते. तेव्हां खंडोबा हा मूळचा धनगरांचाच देव असावा.

मराठा धनगर, हे लोक धनगरांचा एक मोठा वर्ग असून हे मराठी जिल्ह्यांत वसलेले आहेत. हेटकर ही कुळी वऱ्हाड व वाशिमनजीकचा डोंगराळ प्रदेश यांमध्यें आहे.

**धनपत्र**—( ड्राफ्ट ). एका गांवाहून दुसऱ्या गांवाला पैसे पाठविण्यास मदत करणें हा एक पेढी( बँके )च्या रोजच्या व्यवहाराचा भाग असतो. एखाद्या व्यक्तीला जर दुसऱ्या गांवीं पैसे पाठवावयाचे असतील तर त्या गांवीं जी पेढी असेल त्या पेढीवर एक धनपत्र( ड्राफ्ट ) घेतलें असतां काम होतें. अशी पाठवावयाची रक्कम ज्या वेळेला बरीच मोठी असेल त्या वेळेला ती पोस्टानें पाठविणें खर्चाचें होतें. याकरितां बँकेचा ड्राफ्ट हा सोयीचा मार्ग होय. बँकेचा ड्राफ्ट म्हणजे त्या बँकेच्या मुख्य कचेरीनें आपल्या एका शाखेवर किंवा या उलट एखाद्या शाखेनें तिच्या मुख्य कचेरीवर किंवा एका शाखेनें दुसऱ्या शाखेवर लिहिलेली दर्शनी हुंडीच होय. या ड्राफ्टमध्यें दर्शविलेल्या इसमास किंवा तो सांगेल त्यास अमुक एक रक्कम द्या, तितकी रक्कम आमच्याकडे जमा केली आहे, अशा प्रकारची सूचना या ड्राफ्टअन्वयें एक शाखा दुसऱ्या शाखेला करीत असते. या ड्राफ्टचें स्वरूप चेकसारखेंच असतें. परंतु चेक व ड्राफ्ट यांमध्यें मुख्य भेद म्हटला म्हणजे बँकेचा ड्राफ्ट केव्हांहि धनीजोग ( बेअरर ) असा असूं शकत नाहीं. बँका जर धनीजोग धनपत्रें काढूं लागल्या तर लोक त्यांचा उपयोग चलनी नोटांसारखा करूं लागतील. इंग्लंडमध्यें बिल्स ऑफ एक्स्चेंज ॲक्टमध्यें एका नवीन कायद्यानें रेखांकित हुंडी(क्रॉस चेक)संबंधींचे सर्व नियम पेढ्यांच्या धनपत्रांनाहि पूर्णपणें लागू होतील असें स्पष्टपणें ठरवण्यांत आलें आहे. अशा प्रकारची स्पष्टता हिंदी निगोशिएबल इन्स्ट्रुमेंट ॲक्टमध्यें केलेली नाहीं. तरी हिंदुस्थानांत असे ड्रॉफ्ट चेकप्रमाणें मानतां येतात व ते 'क्रॉस' करण्याची पद्धत रूढ झाली आहे.

**धनपाल**—एक जैन पंडित. यानें 'ऋषभपंचाशिका' नामक पुस्तक लिहिलें. 'तिलकमंजरी' नांवाचें दुसरें पुस्तक त्याचें आहे. 'पाइलच्छी नाममाला' ग्रंथ धनपालनें संवत् १२२९ मध्यें लिहिला. हा कवि मुंज व भोजराजा यांचा आश्रित होता. धनपाल याच्या ग्रंथावरून असें दिसतें कीं, यानें आपल्या घरांतील माणसांसुद्धां जैन धर्माची दीक्षा घेतली होती. हेमचंद्रानें याला देशी कोशाचा कर्ता म्हटलें आहे.

**धनवार**—ही जात मुख्यत्वें मध्यप्रांतांत आढळते. हिची एकंदर लो. सं. सु. वीस हजार. तींत पंधरा हजार हिंदू व बाकीचे वन्य आहेत. धनवार म्हणजे धनुर्धारी. अजूनहि धनुष्यानें केलेल्या शिकारीवर त्यांचा बहुतेक निर्वाह होतो. हे छत्तीसगडी हिंदी बोलतात. लग्नांत बाणांचा अहेर करितात. व प्रत्येक घरीं रोज धनुष्याची पूजा करतात.

कवार व गोंड यांच्या संकरापासून बहुधा प्रथम हे झाले असावेत. मागाहून इतरांच्या रक्ताचेंहि मिश्रण यांच्यांत झालें.

ग्रंथाच्या रचनेचे हेतू दोन होते : संस्कृत व्याकरण शिकविणें व अनहिलवाडपट्टणच्या राजांचा इतिहास सांगणें.

लक्ष्मीतिलक कवि यानें या ग्रंथावर टीका लिहिली. हा ग्रंथ वि. सं. १३१२ (इ. स. १२५६) मध्यें श्रीप्रल्हादपट्टण येथें दिवाळीच्या दिवशीं पुरा झाला.

---

## ध

**ध**—या वर्णाला चार अवस्थांतून जावें लागलें. पहिली नेहमींची अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी मेवाडचा गुहिलवंशी राजा अपराजित याच्या काळच्या कुंडेश्वर लेखांत (इ. स. ६६१), तिसरी उदयादित्याच्या वेळच्या (११ वें शतक) उज्जनी येथील लेखांत, व शेवटची अवस्था अबूचा परमार राजा धारावर्ष याच्या वेळच्या ओरिसा लेखांत (१२०८) दृष्टोत्पत्तीस येते.

**धकचा किल्ला**—मुंबई, कुलाबा जिल्हा. कर्जतच्या पूर्वेस सुमारें पांच मैलांवर २,८९८ फूट उंचीच्या सह्याद्रीच्या शिखरावर हा किल्ला आहे. ज्या टेंकडीवर हा किल्ला आहे त्याच्या वायव्य उतरणीवर कांहीं कोरीव लेणीं आहेत.

**धक्का**—१. (डाइक). समुद्राचें किंवा नदीचें पाणी जमिनींत शिरून जमीन वाहून जाऊं नये म्हणून ज्या समुद्रकिनाऱ्यावर किंवा नदीकांठीं भिंती घालण्यांत येतात त्यांस धक्का म्हणतात. असे धक्के हॉलंडमध्यें फार आहेत. कारण तेथील बरीचशी जमीन समुद्रसपाटीच्याहि खालीं आहे. हे धक्के सर्वांत मोठ्या भरतीचें पाणी चढतें त्या उंचीवरहि चाळीस फूटपर्यंत उंच बांधलेले असतात व त्यांचा माथा इतका रुंद असतो कीं, त्यामध्यें कालवा काढतां येतो किंवा त्यावर रस्ता तयार करतां येतो.

२. (पीयर). होड्या, बोटी, वगैरे पाण्यांतून येणाऱ्या-जाणाऱ्या वाहनांसाठीं जो ओटा बांधतात त्याला पाण्यांतील धक्का असें म्हणतात. हा सर्व ठिकाणीं सारखाच नसतो. पाण्याची खोली, माणसांची रहदारी, तेथें येणारीं-जाणारीं वाहने म्हणजे होड्या, पडाव, मचवे, बोटी, इ. हीं ज्या तऱ्हेचीं असतील त्याप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेचा असतो.

विलायतेहून येणाऱ्या बोटींचे धक्के प्रचंड, मोठाले, केव्हां केव्हां दुमजली असावे लागतात. तसेंच या धक्क्यांवर याऱ्या वगैरेंची जय्यत तयारी ठेवावी लागते. केव्हां केव्हां समुद्राची किंवा नदीची खोली तीराजवळ फार नसते; अशा वेळेस समुद्रांत उंच खांब बसवून त्यांवर धक्का बांधावा लागतो. कांहीं ठिकाणीं तरते धक्के असतात. त्यांचें एक टोंक एका ठिकाणीं जोडलेलें असतें व दुसरें टोंक पाण्यांत असतें.

**धक्काभाडें**—(डेमरिज). नाविक कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, बोटीमध्यें माल चढविणें किंवा बोटींतला माल उतरून घेणें याची जबाबदारी ज्या इसमावर कायद्याप्रमाणें असते त्याला हें काम करण्यास जी मुदत दिलेली असते त्या मुदतीपेक्षां जास्त दिवस लागल्यास त्याबद्दल बोटीच्या मालकाला जी रक्कम द्यावी लागते ती रक्कम.

आगगाड्यांच्या कंपन्या व इतर कारखानेहि त्यांच्या हद्दींत ठराविक दिवसांपेक्षां जो माल पडून राहील त्यांबद्दल मालकांकडून भाडें घेतात.

**धडगांव किल्ला**—मुंबई इलाखा, पश्चिम खानदेश, तळोदें तालुक्यांत तळोद्याच्या उत्तरेस, सातपुड्यांत २० मैलांवर हा किल्ला आहे. हें पोलिस फौजदाराचें एक ठाणें आहे.

**धंधुका**—मुंबई, अहमदाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. ह्यांत गोवा पेट्याचा समावेश होतो. क्षेत्रफळ १,३०७ चौ. मै.. धंधुका, गोघ्रा, रणपूर हीं मोठीं गांवें असून खेडीं २०४ आहेत. लोकसंख्या (१९४१) १,१५,११८. धंधुका हेंच या तहशिलीचें मुख्य ठाणें असून तें सुरतेच्या वायव्येस ५० कोसांवर आहे. याची लोकसंख्या ११,५६०. गांवास पाणीपुरवठा चांगला नाहीं. बोहरी व मोढवाणी यांची वस्ती पुष्कळ आहे. कापड, मातीचीं भांडीं व सुतारकाम चांगलें होतें. प्रख्यात जैन पंडित हेमचंद्र येथेंच जन्मला (१२ वें शतक). त्याच्या स्मरणार्थ कुमारपालानें येथें एक देऊळ बांधलें आहे.

**धनककट**—(अर्वाचीन बेझवाडा). आंध्र देशापासून जंगलांतून व ओसाड मैदानांतून १६७ मैलांवर हा देश होता. कान्हेरी आणि कार्लें येथील लेण्यांतील कोरीव लेखांत चार ठिकाणीं धनककट असा उल्लेख आहे, तें व हें एकच होय असें कांहीं संशोधक मानतात. धनककट आणि कृष्णानदीवरील धरणीकोट किंवा अमरावती एकच होय असे कनिंगहॅम म्हणतो. सिलोन आणि सयाम येथील बौद्ध दंतकथा अशी आहे कीं, सिंहलद्वीप यामध्यें माजेरिका या देशात नाग राहत होते. त्यांस मिळालेले बुद्धाचे एक किंवा दोन द्रोण अवशेष त्यांनीं एका अति भव्य व सुंदर अशा स्तूपांत ठेविले. हें स्थान हिरे सांपडतात त्या प्रदेशाजवळ होतें. माजेरिका देश गोदा नदीवरील दंतपुराच्या दक्षिणेस हिऱ्याच्या प्रदेशाजवळच होता, असें एका बौद्ध ग्रंथावरुन दिसतें. या दोन प्रमाणांवरून तें स्थान कृष्णा नदीवरील धरणीकोटाच्या जवळ असावें. हिऱ्यांच्या खाणीचा प्रदेश धरणीकोटाच्या अगदीं जवळ उत्तरेस आहे. बौद्ध ग्रंथांत माजेरिका येथील

स्तूपाचें अतिशय वर्णन केलें आहे. हें धरणीकोट येथील स्तूपांस मात्र लागतें. ह्युएनत्संगहि तो स्तूप पाहून चकित झाला. हल्लीं जे अवशेष आहेत त्यांचें कामहि फार सुंदर आहे. सदरील स्तूप इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांतला आहे. ह्या देशाचा घेर १,००० मैल सांगितला आहे. सांप्रत हें गांव गुंटूर तालुक्यांत आहे.

या ठिकाणीं अनेक प्राचीन मठांचे अवशेष दिसतात. ह्युएनत्संग या ठिकाणीं कित्येक महिने होता. या मठांतून बौद्धधर्माचा अभ्यास करण्यासाठीं भिक्षू राहत. भावविवेक हा बौद्ध पंडित येथलाच.

**धनगर**— यांची एकंदर लोकसंख्या १९११ सालीं ६,७३,४३९ होती. कोंकण व दक्षिण महाराष्ट्र, निजामचें राज्य, मध्यप्रांत, वऱ्हाड व मध्यहिंदुस्थान यांमध्यें हे लोक आढळतात. गुरें विकणें व घोंगड्या विकणें हे त्यांचे धंदे असून ते खिल्लारे पाळून त्यावर उदरनिर्वाह करतात. उत्तर हिंदुस्थानांतील धनगर हे मजुरी व हलालखोरांचींहि कामें करतात.

यांच्यामध्यें २२ कुळ्या असून एका कुळींतील लोक दुसऱ्या कुळींतील लोकांशीं विवाहसंबंध करीत नाहींत. यांच्या आडनांवांप्रमाणें यांचीं कुळें ठरलीं जातात. हे मांसाहारी असून बुरुड, परीट, इत्यादि जातींच्या हातचें जेवत नाहींत. हे हिंदु धर्मीय असून ह्यांचे उपाध्याय ब्राह्मण आहेत. सातारा जिल्ह्यांतील धनगर लोकांची एक मध्यवर्ती संस्था असून तिचा मुख्य अधिकारी गावडा कुळांतला असतो व तो कऱ्हाडास राहतो. सोलापूर व अहमदनगर जिल्ह्यांतहि अशाच पंचायती आहेत. पुण्यांत या लोकांचे सामाजिक प्रश्न यांच्या सभेंत सोडविले जातात. नागपूर, वर्धा, चांदा, वऱ्हाड व नेमाड इकडील यांची संख्या ९६,००० आहे. धनगरांचे मुख्य देव महादेव व खंडोबा आहेत. नाचणगांवचा बहराम हा वर्ध्याच्या धनगरांचा मुख्य देव आहे. कुणबी, फुलमाळी व सोनार यांच्या हातचें हे लोक जेवतात. कुणबी लोक यांच्या हातचें पाणी पितात. हे बकरीचें दूध विकतात, व मेंढराच्या लोंकरीचीं कांचळीं करतात. यांच्यांतील गवळी धनगर हे गाई-म्हशींचीं खिल्लारें बाळगतात. मेंढे धनगर असतात ते मेंढरें किंवा बकरीं बाळगतात व चारतात. ठाणें जिल्ह्यांतील खटेकरी धनगर हे घोंगड्या विणतात. पावसाचें भविष्य वर्तविण्याबद्दल यांची प्रसिद्धि आहे. जेथें जेथें खंडोबाचें महास्थान असतें तेथें तेथें पूजा धनगराची असते. तेव्हां खंडोबा हा मूळचा धनगरांचाच देव असावा.

मराठा धनगर, हे लोक धनगरांचा एक मोठा वर्ग असून हे मराठी जिल्ह्यांत वसलेले आहेत. हेटकर ही कुळी वऱ्हाड व वाशिमनजीकचा डोंगराळ प्रदेश यांमध्यें आहे.

**धनपत्र**—( ड्राफ्ट ). एका गांवाहून दुसऱ्या गांवाला पैसे पाठविण्यास मदत करणें हा एक पेढी( बँके )च्या रोजच्या व्यवहाराचा भाग असतो. एखाद्या व्यक्तीला जर दुसऱ्या गांवीं पैसे पाठवावयाचे असतील तर त्या गांवीं जी पेढी असेल त्या पेढीवर एक धनपत्र( ड्राफ्ट ) घेतलें असतां काम होतें. अशी पाठवावयाची रक्कम ज्या वेळेला बरीच मोठी असेल त्या वेळेला ती पोस्टानें पाठविणें खर्चाचें होतें. याकरितां बँकेचा ड्राफ्ट हा सोयीचा मार्ग होय. बँकेचा ड्राफ्ट म्हणजे त्या बँकेच्या मुख्य कचेरीनें आपल्या एका शाखेवर किंवा या उलट एखाद्या शाखेनें तिच्या मुख्य कचेरीवर किंवा एका शाखेनें दुसऱ्या शाखेवर लिहिलेली दर्शनी हुंडीच होय. या ड्राफ्टमध्यें दर्शविलेल्या इसमास किंवा तो सांगेल त्यास अमुक एक रक्कम द्या, तितकी रक्कम आमच्याकडे जमा केली आहे, अशा प्रकारची सूचना या ड्राफ्ट-अन्वयें एक शाखा दुसऱ्या शाखेला करीत असते. या ड्राफ्टचें स्वरूप चेकसारखेंच असतें. परंतु चेक व ड्राफ्ट यांमध्यें मुख्य भेद म्हटला म्हणजे बँकेचा ड्राफ्ट केव्हांहि धनीजोग ( बेअरर ) असा असूं शकत नाहीं. बँका जर धनीजोग धनपत्रें काढूं लागल्या तर लोक त्यांचा उपयोग चलनी नोटांसारखा करूं लागतील. इंग्लंडमध्यें बिल्स ऑफ एक्स्चेंज ॲक्टमध्यें एका नवीन कायद्यानें रेखांकित हुंडी(क्रॉस चेक)संबंधींचे सर्व नियम पेढ्यांच्या धनपत्रांनाहि पूर्णपणें लागू होतील असें स्पष्टपणें ठरवण्यांत आलें आहे. अशा प्रकारची स्पष्टता हिंदी निगोशिएबल इन्स्ट्रुमेंट ॲक्टमध्यें केलेली नाहीं. तरी हिंदुस्थानांत असे ड्रॉफ्ट चेकप्रमाणें मानतां येतात व ते 'क्रॉस' करण्याची पद्धत रूढ झाली आहे.

**धनपाल**—एक जैन पंडित. यानें 'ऋषभपंचाशिका' नामक पुस्तक लिहिलें. 'तिलकमंजरी' नांवाचें दुसरें पुस्तक त्याचें आहे. 'पाइलच्छी नाममाला' ग्रंथ धनपालनें संवत् १२२९ मध्यें लिहिला. हा कवि मुंज व भोजराजा यांचा आश्रित होता. धनपाल याच्या ग्रंथावरून असें दिसतें कीं, यानें आपल्या घरांतील माणसांसुद्धां जैन धर्माची दीक्षा घेतली होती. हेमचंद्रानें याला देशी कोशाचा कर्ता म्हटलें आहे.

**धनवार**—ही जात मुख्यत्वें मध्यप्रांतांत आढळते. हिची एकंदर लो. सं. सु. वीस हजार. तींत पंधरा हजार हिंदू व बाकीचे वन्य आहेत. धनवार म्हणजे धनुर्धारी. अजूनहि धनुष्यानें केलेल्या शिकारीवर त्यांचा बहुतेक निर्वाह होतो. हे छत्तीसगडी हिंदी बोलतात. लग्नांत बाणांचा अहेर करितात. व प्रत्येक घरीं रोज धनुष्याची पूजा करतात.

कवार व गोंड यांच्या संकरापासून बहुधा प्रथम हे झाले असावेत. मागाहून इतरांच्या रक्ताचेंहि मिश्रण यांच्यांत झालें,

हे गायीस देव समजून ती मेल्यास आपल्या घरांतील मडकीं फोडून टाकतात. हे गोमांसभक्षण करीत नाहींत. मात्र दसवार नांवाची यांची एक पोटजात रानगोमांस खाते. यांचे मुख्य देव ठाकूरदेव व दुल्हादेवः पहिला शेतीचा व दुसरा कुळाचा.

गाय किंवा मांजर याची न जाणून हत्या झाली, घरच्या बैलाचें नाक किंवा कान तुटला, त्याच्या जखमेंत किडे पडले, सरकारी अधिकाऱ्यांखेरीज इतरांच्या हातचा मार मिळाला, बायकोनें नवऱ्याचें नांव घेतलें तर यांसारख्या गोष्टींमुळें बहिष्कार पडतो. गोंदणें हें पवित्र मानलें आहे. गोंदलेल्या माणसाची व त्याच्या आत्म्याची ताटातूट होत नाहीं असा समज आहे. हे विनगोंदलेल्या व्यक्तीच्या हातचें पाणीहि पीत नाहींत.

**धनाजी जाधव** ( सु. १६५०–१७१० )—एक मराठा वीर. लखूजी जाधव याचा हा पणतू. उंबराणीच्या लढाईत हा प्रसिद्धीस आला. धनाजी हा हंबीरराव मोहिते याच्या हाताखालीं ( १६७४ ) होता. विजापूरच्या लढाईत यानें विशेष शौर्य दाखविल्यामुळें यास बढती मिळाली. ती लढाई विजापूरच्या सेनापति अबदुल करीम याच्याशीं झालेली नेसरीची होय. पुढें सावनूरच्या लढाईत यानें हुसेनखान मायणा याचा पुरा मोड केला. त्या वेळीं शिवाजीची यावर मर्जी बसली ( इ. स. १६७९ ).

संभाजीच्या वधानंतर पुढें काय करावें हें ठरविण्याकरितां रायगडावर जी मुख्य मराठे मंडळी जमली त्यांत धनाजी जाधव होता. त्यानें साताऱ्यास सर्जाखानाचा पराभव केला. पुढें धनाजी राजारामाबरोबर जिंजीस गेला ( १६९० ). तेथें त्यानें इस्मायलमकाचा पराभव केला. महादजी नाईक पानसंबळ याच्या मृत्यूनंतर संताजी घोरपडे यास सेनापति नेमण्यांत येऊन त्याच्याबरोबर धनाजीस जयसिंगराव ही पदवी देऊन महाराष्ट्रांत पाठविण्यात आलें ( १६९० ). १६९२ सालीं महाराष्ट्रांत वांई-कडील व गोदेच्या उत्तर तीरीं मोहिमेंत संताजीबरोबर धनाजी होता. धनाजीच्या सैन्यांत संताजीच्या सैन्याइतकी शिस्त नव्हती, परंतु धनाजी आपल्या लोकांत फार प्रिय होता. धनाजीनें अमात्य व सचिव यांच्याबरोबर पन्हाळा घेतला. धनाजी हा पुन्हां संताजीबरोबर महाराष्ट्रांतून कर्नाटकांत गेला. तेथें १६९५ अखेर होता. परंतु पुढें संताजीचें–धनाजीचें जमेना. दोघां सरदारांत वैमनस्य फारच वाढलें. धनाजीनें संताजीच्या कांहीं लोकांस फितविलें. एके दिवशीं विजापुराजवळ संताजीवर एकदम हल्ला झाला. संताजी कसा तरी पळाला. धनाजीनें कांहीं लोक त्याच्या पाठलागार्थ पाठवून, कांहींना साताऱ्यास राजारामाकडे रवाना करून धनाजी अर्ध्या लोकांसह म्हणजे दहा हजार फौजेसह झुल्फिकारखानाचा समाचार घेण्याकरितां पुन्हा कर्नाटकांत आला. त्यानंतर कर्नाटकांत व महाराष्ट्रांत बरेच नांवाजण्यासारखे पराक्रम केले, व औरंगजेबास जेरीस आणलें ( १७०३–०५ ). धनाजीनें आपलीं बायकामुलें वाघिणगिरें येथें आणून ठेविलीं होतीं. त्या गांवच्या गढीस औरंगजेबानें वेढा घातला हें धनाजीस कळतांच त्यानें मोंगलांच्या सैन्यास इतकें सतावलें कीं, मोंगल स्वार घोडा पाणी पितांना थांबला तर 'तुला पाण्यांत धनाजी दिसतो कीं काय?' असें घोड्यास म्हणत. शेवटीं मोंगलांनीं वेढा उठविला. १७०७ त घोरपड्यांनीं ताराबाईच्या मुलखांत लुटालूट मांडली. त्याच्या पारिपत्यास धनाजी गेला. घोरपड्यांनीं झुल्फिकारखानाची मदत घेऊन धनाजीस कृष्णेपार काढून दिलें. नंतर पुणें येथील लोदीखान याचा पराभव धनाजीनें करून चाकण किल्ला परत घेतला. पुढें मोंगलांच्या छावणींतून शाहू सुटून आल्यावर ताराबाईनें धनाजीस शाहूवर पाठविलें. परंतु धनाजीनें शाहू हा तोतया नसून खरा राज्याचा वारस आहे हें ओळखून तो शाहूस मिळाला. शाहू गादीवर आल्यावर त्यानें धनाजीस सेनापति केलें ( १७०८ ) व त्याकडे कांहीं जिल्ह्यांच्या वसुलीचें काम दिलें. कोल्हापूरकरांनीं मात्र धनाजीस वळविण्याचा फार प्रयत्न केला. कोल्हापूरकरावरील रांगण्याच्या मोहिमेवरून परत येत असता वाटेंत वारणा नदीच्या कांठीं वडगांव येथें मे १७१० त धनाजी मरण पावला. त्याला कित्येक दिवसांपूर्वीं झालेली जखम पुन्हां वाहूं लागल्यानें तो जास्त आजारी झाला व तेंच त्याच्या मरणास कारण झालें. वसुलाच्या कामावर त्यानें बाळाजी विश्वनाथ भट याची नेमणूक केली होती. धनाजीची स्त्री गोपिकाबाई ही धनाजीबरोबर सती गेली. धनाजी हा शिवाजीच्या तालमींत तयार झालेला शेवटचा पुरुष शाहूच्या कारकीर्दींत होता.

**धनाश्री**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत ऋषभ व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोह सातहि स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर मानितात. अवरोहांत पंचम व गांधार या स्वरांची संगति फार मनोहर भासते.

**धनिष्ठा**—( डेल्फिनस ). एक तारकापुंज. २७ नक्षत्रांपैकीं २३ वें. याच्या कोणी पांच तर कोणी सहा तारा मानितात. धनिष्ठापंचकांत धनिष्ठा ते रेवती या पांच तारका येतात व हें पंचक अशुभ मानतात. या पांच तारका अगदीं जवळ जवळ आहेत व श्रवण नक्षत्राच्या पूर्वेस त्यांचा पुंज दिसतो. या तारकापुंजांत सहाव्या प्रतीपर्यंत असणाऱ्या तारका ११ आहेत.

**धनुर्मास**—धन राशींत सूर्य असतो तो काल धनसंक्रांतीचा काल. या मुदतींत सकाळीं सूर्योदयाबरोबर धनुर्लग्न आहे तोंपर्यंत

त्याला तूप, खिचडी, गुळाची पोळी यांचा नैवेद्य अर्पण करून भोजन करण्याची चाल आहे. याला छुंछुरमास असेंहि नांव आहे.

**धनुर्वात**— हा रोग सामान्यतः मातींत असणाऱ्या एक प्रकारच्या जंतूंपासून होतो. थोडी माती प्राण्याच्या त्वचेखालच्या भागांत टोंचली तर धनुर्वात होतो असा अनुभव आहे. एखादें काम करतांना किंवा चालतांना खरचटलें किंवा जखम झाली व तींत माती शिरली तर जखमेंत जंतुप्रवेश होऊन रोगाचा उद्भव होतो. सामान्यतः या रोगांत दांताखिळी बसते. मान व पाठ ताठ होते व भयंकर वेदना होतात. कारण स्नायूंचें आकुंचन होतें. तथापि मेंदु व संज्ञाशक्ति कायम असते. उष्णकटिबंधांत हा रोग विशेषेंकरून होतो. या रोगाचे जंतू इतर रोगाच्या जंतूंप्रमाणें रक्तांत प्रवेश करून शरीरभर पसरत नाहींत. परंतु जखमेच्या ठिकाणीं तीव्र विष उत्पन्न करतात व तें मज्जातंतुमार्गानें पृष्ठवंशरज्जूंत प्रवेश करतें; त्यामुळें वायूच्या झटक्याप्रमाणें झटके येऊं लागतात. प्रथम पाठींत चमक भरल्यासारखें वाटतें. नंतर जबडा उघडत नाहीं असें दिसून येतें. पुढें दांताखिळी बसते व त्यामुळें पोटांत कांहीं घालणें अशक्य होतें. तसेंच स्नायूंस काठिण्य येतें व रोगी धनुष्याच्या आकाराप्रमाणें वांकडा होतो. छातीचे स्नायू ताठल्या-मुळें श्वास घेतां येत नाहीं व जीव गुदमरतो. जखम झाल्यापासून दहा दिवसांच्या आंत विकार झाल्यास बहुधा असाध्य असतो. परंतु पंधरा दिवसांनंतर झाल्यास साध्य असतो. सूतिकावस्था, गर्भपात, मोठाल्या जखमा, वगैरेंतील विकार असाध्य, पण हाता-पायांवरील जखमांपासून झालेला साध्य असतो. प्रथम जखम जंतुघ्न औषधानें शुद्ध करावी अगर कॅर्बॉलिक ॲसिडनें जाळून टाकावी. नंतर रोग्यास अंधाऱ्या जागेंत ठेवावें. सर्वत्र शांतता राखावी. झटक्यांचा जोर फार असल्यास मॉर्फिया टोंचून घालावा. या रोगावर लस टोंचल्यास उपयोग होतो. याशिवाय झटके शमन करणारीं औषधें द्यावीं.

**धनुष्यबाण**—धनुस् हा शब्द ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ ह्यांत वारंवार आलेला आहे. हें धनुष्य वैदिक काळच्या लोकांचें मुख्य शस्त्र होतें. एखाद्या माणसाचें शेवटलें और्ध्वदेहिक कृत्य होत असे त्या वेळीं त्याच्या उजव्या हातांतून धनुष्य काढून घेत असत. हें धनुष्य एक बळकट लांकूड वांकवून बनविलेलें असे. धनुष्याचीं दोन टोंकें जोडणारी 'ज्या' गायीच्या कातड्याची असे. दोरी बांधल्यावर धनुष्याच्या दोन्ही टोंकांना 'आर्त्नी' असें म्हणत. प्रत्यक्ष उपयोगांत जेव्हां हें धनुष्य नसे तेव्हां त्याची 'ज्या' दुसऱ्या टोंकाशीं बांधलेली नसे. परंतु बाण सोडण्याच्या वेळीं ती दुसऱ्या टोंकास ताणून बांधीत. वाजसनेयि संहितेंत धनुष्याचा उपयोग करण्याच्या वेळच्या एकापुढील एक क्रिया सविस्तर दिल्या आहेत. उदाहरणार्थ, धनुष्यावर गुण चढविणें (आतन्), बाण लावणें (प्रतिधा), धनुष्य वांकविणें (आयम्) आणि बाण सोडणें (अस्). दोरी आकर्ण म्हणजे कानापर्यंत ओढल्यावर बाण सोडीत म्हणून त्याला कर्णयोनि (कर्ण हेंच ज्याचें उगमस्थान आहे) असें म्हटलें आहे.



धनुष्यबाणाचा उपयोग शिकारीकरितां किंवा युद्धामध्यें फार प्राचीन काळापासून करण्यांत आला आहे. भरतखंडांत रामानें असंस्कृत लोकांस धनुष्यबाणाच्या साहाय्यानें जिंकल्याचा उल्लेख आढळतो. वेदकालापासून धनुर्विद्या आर्य लोकांस ठाऊक होती. यजुर्वेदाचा धनुर्वेद हा उपवेद मानण्यांत येतो. अग्निपुराणादि ग्रंथांतून धनुर्विद्येची माहिती दिलेली आहे. प्राचीन ईजिप्ती लोक, असुर, इराणी, पार्थियन, वगैरे सर्व लोकांत धनुष्यबाण वापरण्याचा प्रघात होता. ग्रीक व रोमन लोक स्वतः धनुष्यबाण फारसा वापरीत नसत, तर ते आपल्या सैन्यांत परकीय धनुर्धाऱ्यांचा उपयोग करीत. बंदुकी प्रचारांत येईपर्यंत युद्धामध्यें पायदळाचें एक महत्त्वाचें शस्त्र म्हणून धनुष्यबाणाचें महत्त्व होतें. उंटां-वरूनहि शत्रूवर बाणांचा वर्षाव करीत असत. बंदुकीमुळें धनुष्य मागें पडलें. सध्यां हें फक्त रानटी लोकांच्या हातांत दिसतें, किंवा सुधारलेल्या लोकांत करमणुकीचा एक खेळ होऊन बसला आहे, व त्याच्या शिक्षणासाठीं व सामन्यासाठीं संस्था निघाल्या आहेत.

**धने**—कोथिंबिरीच्या झाडास जें बीं येतें त्यास धने म्हणतात. यांचा उपयोग स्वयंपाकांत, भाजींत, कढींत, वगैरेंत घालण्यासाठीं होतो. धने मसाल्यांत घालतात. हा पदार्थ स्वादिष्ट, थंड, पित्तशामक आहे. धने कोथिंबिरीकरितां सर्वत्र सर्वकाळ पेरितात.

**धन्ना**—एक जाट साधु. हा रामानंदाचा समकालीन होता. यानें लहानपणापासूनच भगवद्भक्ति आरंभिली व महान् भक्त म्हणून प्रसिद्धीस आला. राजपुतान्यांतील जाट लोक याला भजतात. याचें स्मारक जोधपूर संस्थानांत असून तेथें दरसाल मोठी जत्रा भरते. नाभाजीच्या भक्तमालेंत याची कथा असून महिपतीनें तीच दिली आहे. धन्ना नामदेवाचा उल्लेख आदरानें करतो. याचीं कांहीं पद्यें ग्रंथसाहेबांत आहेत.

**धन्य त्रयी**—खिस्ती धर्मांतील पवित्र त्रयीचें (ट्रिनिटीचें) तत्त्व म्हणजे पिता, पुत्र व पवित्र आत्मा या तिहींमध्यें एकाच दैवी प्रकृतीचा वास असतो. म्हणजे ईश्वर एकच आहे, तथापि तो तीन स्वरूपांत व्यक्त होतो. यांपैकीं प्रत्येक स्वरूप हें दुसऱ्या दोन स्वरूपांहून भिन्न आहे. परंतु त्याचें परमात्म्याशीं ऐक्य आहे. खिस्ती संप्रदायांतील हें एक मोठें अतर्क्य गूढ तत्त्व आहे.

हीं तीन स्वरूपें एकरूपात्मक आहेत असें म्हणणें यांत विरोधोक्ति आहे, असें कधीं कधीं म्हणण्यांत येतें. परंतु वास्तविक हें तत्त्व असें म्हणत नाहीं कीं, तीन व्यक्ती या एक व्यक्ति आहेत, किंवा त्रिस्वभावात्मक स्वरूपें एकस्वभावात्मक आहेत. ज्या अर्थी स्वभावाची कल्पना आणि स्वरूपाची किंवा व्यक्तीची कल्पना एक नव्हत त्या अर्थी भिन्न व्यक्ती मिळून एक प्रकृति होते, असें म्हणण्यांत कांहीं विरोध होत नाहीं.

ही धन्य त्रयी आणि हिंदु धर्मातील त्रिमूर्ति या एक नव्हत. कारण त्रिमूर्तीमध्यें एकाच परमेश्वराचीं तीन प्रकारचीं स्वरूपें दृग्गोचर होतात. तीं म्हणजे उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं होत. त्रयीमध्यें तीन दैवी व्यक्तींमध्यें वास्तविक भेद असलेला व्यक्त होतो.

**धन्वंतरि**—१. समुद्रमंथनानंतर त्यांतून अमृताचा कलश घेऊन निघालेला हा आयुर्वेदाचा प्रवर्तकाचार्य होय. (लक्ष्मीः कौस्तुभपारिजातकसुराधन्वन्तरिश्चंद्रमा।)

२. विक्रमादित्य राजाच्या सभेंत जीं नऊ पंडित रत्नें होतीं त्यांतील हा एक कवि होता. हा महाविद्वान् व नामांकित वैद्य होता.

यांखेरीज या नांवाच्या अनेक व्यक्ती पुराणांतून आढळतात. तथापि त्या सर्व वैद्यकविद्यासंपन्न अशा दाखविल्या आहेत.

धन्वंतरीच्या नांवावर पुष्कळ वैद्यकग्रंथ मोडतात. उदा., चिकित्सा–तत्त्व–विज्ञान–दर्शन–कौमुदि–सारसंग्रह, इ.

**धमकी**—(थ्रेटनिंग). इंग्लंडांत कॉमन लॉ कायद्यांत शारीरिक इजा करण्याची धमकी देणें हा फौजदारी गुन्हा नसून तें दिवाणी स्वरूपाचें अपकृत्य (पाहा) आहे. म्हणजे अशा धमकीबद्दल दिवाणी कोर्टांत नुकसानभरपाईचा दावा लावतां येतो. मजुरांना धमकी देणें हा १८७५ च्या कायद्यानें गुन्हा असून त्याला वीस पौंडांपर्यंत दंड किंवा तीन महिनेपर्यंत कैद अशी शिक्षा सांगितलेली आहे. १९२७ च्या ग्रेड ट्रेड डिस्प्यूट्स अँड ट्रेड युनियन्स ॲक्ट या कायद्यांनीं अनेक प्रकारच्या धमक्या देण्याला प्रतिबंध केला आहे. परंतु शांततेनें निरोधन करणें (पीसफुल पिकेटिंग) हें कृत्य १९०६ च्या ट्रेड्स ॲक्टनें कायदेशीर मानलें आहे.

हिंदुस्थानांत इंडियन पीनल कोडांत या धमकीच्या गुन्ह्याला 'क्रिमिनल इंटिमिडेशन' असें नांव असून एखाद्याला त्याच्या शरीराला किंवा मिळकतीला किंवा नांवलौकिकाला इजा करण्याची धमकी देणें किंवा त्या इसमाचा हितसंबंध असलेल्या इसमाला वरील प्रकारें इजा करण्याची धमकी देणें हा गुन्हा आहे. मृत माणसाची बेअब्रू करण्याच्या धमकीनेंहि हा गुन्हा होतो (कलम ५०३). साध्या धमकीच्या गुन्ह्याला शिक्षा दोन वर्षेंपर्यंत कैद, किंवा दंड, किंवा दोन्ही शिक्षा आहेत. पण खून किंवा मोठी दुखापत करण्याची, किंवा आग लावण्याची, किंवा एखादी स्त्री बदफैली आहे अशी तिची बेअब्रू करण्याची धमकी असेल तर त्या गुन्ह्याला सात वर्षें कैद, किंवा दंड, किंवा दोन्ही शिक्षा आहेत (कलम ५०६).

**धमणार**—इंदूर संस्थानांतील एक खेडें. येथें बौद्ध पद्धतीचीं व हिंदु पद्धतीचीं लेणीं कोरलेलीं आहेत. त्यांत कांहीं राहण्याच्या जागा, कांहीं विहार व कांहीं चैत्य (दिवाणखाने) आहेत. चौदा गुहा महत्त्वाच्या व पाहण्यालायक आहेत. ५ व्या ते ७ व्या शतकाच्या दरम्यानचें हें शिल्पकृत्य असावें, असा अंदाज आहे.

**धमनिशोथ**—(ॲन्युरिझम्). एखादी रक्तवाहिनी प्रसरण पावली असतां त्यास धमनिशोथ अथवा रक्तवाहिनीशोथ असें म्हणतात. अशा तऱ्हेचा विकार बहुधा हृदयाच्या जवळच्या प्रदेशांत रक्ताशयाच्या कमानींत किंवा अखेरच्या भागांत रक्तवाहिनींत इजा झाली असतां उत्पन्न होतो. अशी इजा रक्तवाहिनीवर फार ताण पडल्यामुळें किंवा अतिशय श्रम केल्यामुळें, एखादा धक्का लागल्यामुळें, पडल्यामुळें अथवा अवयव मुरगळल्यामुळें होण्याचा संभव असतो. बाहेरच्या अवयवांवर हा रोग असेल तर शस्त्रक्रिया हा उपाय आहे. पण जर छाती, पोट, वगैरेंच्या आंत असेल तर विश्रांति, पथ्य व औषधें देणेंच बरें असतें.

**धमन्या**—रक्तवाहिन्या पाहा.

**धमासा**—या झाडावर लांब कांटे असून झाडाची उंची सुमारें एक हात असते. या झाडावर उन्हाळ्यांत एक प्रकारची साखर तयार होते. तिला तुरंबीन असें फारसी नांव आहे. अशी साखर अरबस्तानांतून इकडे येते व हकीम रेंच होण्यासाठीं ती देतात. धमासा आयुर्वैद्यकांत औषधी म्हणून धरला असून शीतपित्त, मूत्राघात, विषबाधा, उचकी, इ. रोगांवर काढ्यांत घालतात. खोकल्यावर याचें धूम्रपान करतात; शस्त्राच्या जखमेवर अंगरस पिळतात.

**धम्मपद**—बौद्धांच्या पाली धर्मशास्त्राचा सुत्तपिटक म्हणून त्रिपिटकांपैकीं एक भाग आहे. या सुत्तपिटकांतील पांच निकायांपैकीं खुद्दक एक आहे व त्यांत धम्मपद हा एक पोटवर्ग आहे. या धम्मपदांत नीतिविषयक सुभाषितांचा संग्रह आहे. हीं सुभाषितें बौद्ध संप्रदायांत फार रूढ आहेत. यांतील कांहीं बौद्ध संप्रदायाच्या बाहेरील वाङ्मयांतून घेतलेलीं दिसतात व पुढें हींच पंचतंत्रादि सुभाषित ग्रंथांत घेतलीं गेलीं असावींत. या धम्मपदाचीं युरोपीय भाषांत भाषांतरें झालेलीं आहेत.

**धम्मपाल**—एक बौद्ध ग्रंथकार. यानें थेरीगाथांवर टीका लिहिलेली आहे. या टीकेंत कांहीं गोष्टी सुंदर आहेत तरी कांहीं

ठिकाणीं या गोष्टी अगदीं बालिश, नीरस व चातुर्यरहित दिसतात. थेरीगाथांशीं यांची तुलना केली असतां एकदम रसभंग झाल्याचा भास होतो. या टीकेंतील भद्दा कुंडलकेसा हिच्या गोष्टीवरून बुद्ध व त्याचे पहिले शिष्य यांच्या वेळीं निरनिराळ्या मताचे लोक अनेक विद्वान् साधूंबरोबर तत्त्वज्ञानासंबंधीं वादविवाद करून त्यांना हरविण्याकरितां ठिकठिकाणीं कसे फिरत असत, याची कल्पना येते. हा बुद्धघोषानंतर लवकरच होऊन गेला असावा.

**धर, नीलरतन** (१८९६- )—भारतीय वास्तवरसायनाच्या व प्रकाशरसायनाच्या जनकत्वाचा मान मिळवणारे एक हिंदी रसायनशास्त्रज्ञ. बंगालमध्यें यांचा जन्म झाला. कलकत्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें प्रफुल्लचंद्र रे व सर जगदीशचंद्र बोस याच्या हाताखालीं शिक्षण घेण्याची संधि यांना मिळाली व हे एम्. एस्सी. ची परीक्षा पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले. १९१२ सालीं प्रफुल्लचंद्र रे यांच्याबरोबर अमोनियम नत्रिताच्या बाष्पघनत्वावर यांनीं आपलें पहिलें संशोधन केलें. त्यानंतर सरकारी शिष्यवृत्ति यांना मिळाली व विलायतेस जाऊन यांनीं लंडनच्या विश्वविद्यालयांतून व पॅरिसच्या सारबोन विश्वविद्यालयांतून आचार्याची पदवी मिळवली. नंतर अलाहाबादच्या मूर सेन्ट्रल कॉलेजमध्यें प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाली. १९३३-३४ सालीं 'इंडियन केमिकल सोसायटी'च्या अध्यक्षपदाचा मानहि यांना लाभला.

सूर्यप्रकाश, ओजोद्रव्य, प्रकाशाचा रासायनिक परिणाम, रासायनिक क्रियेची गति, प्रकाशाची तीव्रता, प्रकाश-संश्लेषण, यांसारख्या विषयांवर अनेक यशस्वी प्रयोग करून हिंदुस्थानचा जगांतील शास्त्रीय दर्जा वाढविण्याची कामगिरी यांनीं केली आहे. कलिलरसायनांतील यांचें संशोधनहि महत्त्वाचें आहे. अलाहाबाद हें वास्तवरसायना(फिझिकल केमिस्ट्री)चें केंद्र होण्याला यांचेच परिश्रम कारणीभूत झाले आहेत.

**धरणगांव**— मुंबई, पूर्वखानदेश, एरंडोल तालुका, एक गांव. लो. सं. १२९८९. १६७४ सालीं येथें इंग्रज व्यापाऱ्यांनीं वखार घातली. त्या वेळीं हा गांव 'जिरीफाफ' व 'भिरान' या नांवाच्या कापडाकरितां प्रसिद्ध होता. पूर्वी येथील कागद व कापड नामांकित असे. आतां कागद होत नाहीं, पण हातमागावर जाडेंभरडें कापड व लुगडीं काढतात. येथें सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने बरेच आहेत. जवस, कापूस, वगैरेचा बराच व्यापार येथें चालतो.

**धरमपुर संस्थान**— मुंबई इलाखा, सुरत पोलिटिकल एजन्सींत हें संस्थान होतें. क्षे. फ. ७०४ चौ. मैल, एकंदर खेडीं २७२ व लो. सं. १२३३२६ आहे, पैकीं शें. ९५ पेक्षां अधिक हिंदू आहेत. जंगल २२९ चौ. मैल आहे. मोहाचीं फुलें, सागवान, शिसवीचें लांकूड, वगैरे जंगलांतील उत्पन्न आहे. मुख्य पिकें, तांदूळ, कडधान्यें, हरभरा व ऊंस हीं आहेत. दमणगंगा, कोलक, पार, औरंग व अंबिका या नद्या आहेत. पाऊस ७५ इंच पडतो. या संस्थानाला पूर्वी रामनगर म्हणत असत. येथील राजे सिसोदिया वंशांतले आहेत. हल्लींचे राजे महाराणा श्रीविजयदेवजी मोहनदेवजी १९२१ सालीं गादीवर आले. या राजांना ९ तोफांच्या सलामीचा मान वंशपरंपरा आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारें ११ लाख रुपये आहे. राजधानी धरमपुर. तेथील लो. सं. सुमारें ७०००; त्यांपैकीं बहुतेक हिंदू आहेत. प्राथमिक व दुय्यम शिक्षण मोफत आहे. एक हायस्कूल धरमपूरला आहे. संस्थानांत प्रजेला औषधोपचार मोफत आहेत. एक ग्रंथालय व पदार्थसंग्रहालय आहे. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**धर्म आणि धर्मशास्त्र**—धर्म म्हणजे कर्तव्य. हिंदुधर्माप्रमाणें चार वर्णांचीं व चार आश्रमाचीं कर्तव्यें ज्यांत सांगितलीं आहेत त्यास धर्मशास्त्र म्हणतात. स्मृति म्हणजे धर्मशास्त्रग्रंथ होय. निराळ्या परिस्थितींतील समाजाचीं निरनिराळीं कर्तव्यें असतात. एवढेंच नव्हे तर प्रत्येक माणसाचीं वेगवेगळ्या अवस्थांत कर्तव्यें पालटत असतात असें आमच्या शास्त्रकारांचें मत आहे आणि ह्यांतच इतर धर्मांहून हिंदुधर्माचें वैशिष्ट्य आहे. ईश्वर आणि पुनर्जन्म हीं ज्यांना मान्य नाहींत त्यांना धर्माचें बंधन नसणार; कारण, या दोहोंपैकीं निदान एकाची तरी धर्मकल्पनेला आवश्यकता असते. आपण चांगलें कां वागावें याचें समाधानकारक उत्तर पुनर्जन्म अथवा ईश्वर यांचा आधार सोडल्यास कोणालाहि देतां येणार नाहीं. ख्रिस्ती धर्म पुनर्जन्म मानीत नसला तरी ईश्वर मानतो. आमच्या धर्मशास्त्रकारांनीं ईश्वराचें अस्तित्व मान्य केलें आहेच, पण कर्माचा सिद्धांत स्वीकारल्यामुळें पुनर्जन्महि त्यांनीं मान्य केला आहे व त्यांचा त्यावर विशेष भर आहे. आमच्या धर्मांत आचाराला प्राधान्य आहे. हे आचार कालांतरानें बदलत असल्यानें बदललेल्या आचारांचें समर्थन करण्याकरितां त्या त्या प्रसंगीं विद्वान् ऋषींनीं स्मृति लिहिल्या. मीमांसकांचा शब्दप्रामाण्याचा नियम स्मृतींना लागत नसल्यामुळें ऋषींनीं वेळोवेळीं निराळे धर्म सांगितले आहेत. ह्यास्तव कुराण व बायबल ह्याप्रमाणें आमचा एक धर्मग्रंथ नाहीं. आणि म्हणून धर्माचा संस्थापकहि कोणी नाहीं. ह्यासाठींच आमच्या धर्माला सनातन धर्म म्हणतात. आचार व तत्त्वज्ञान ह्या धर्माच्या दोन बाजू असतात. ईश्वर, सृष्टि व जीव यांच्या स्वरूपाविषयीं जो तात्त्विक विचार झालेला आहे त्यामध्यें पुष्कळच मतभेद दिसून येतो, तसेंच एका वेळीं, एकाच काळांत

निरनिराळ्या समाजांचे निरनिराळे आचार अनुभवास येत असल्यामुळें हिंदुधर्माचें व्यावर्तक लक्षण कांहींच सांगतां येत नाहीं.

धर्मविधि निषेधात्मक असतो. स्वेच्छेनें कोणी जें करणार नाहीं तें त्यास करावयास लावणें यास विधि म्हणतात. आणि जें करावयास नको तें करूं नको म्हणून सांगणें हा धर्माचा निषेधात्मक भाग होतो. विधीचा संबंध विशेषतः परलोकाशीं असतो. निषेधात्मक धर्म सामाजिक स्वरूपाचा असतो. व्यवहारांत समाजाचें स्वास्थ्य व उत्कर्ष साधण्यासाठीं हा दुसऱ्या तऱ्हेचा धर्म पाळणें अवश्य आहे. आणि त्यामुळें व्यवहारतः त्याचें महत्त्व फार. हळूहळू यापुढें आचारधर्माचा लोप होऊन व्यवहारांत न्यायानें वागणें हें धर्माचें स्वरूप राहील.

जगांतील सर्व लोक आणि जाती कोठल्या ना कोठल्या तरी धर्माप्रमाणें चालत असतात. या धार्मिक लोकांचे दोन ढोबळ विभाग पाडतात: एकेश्वरी पंथाचे व अनेकेश्वरी पंथाचे. तथापि पुढील चार वर्गांत सर्व धर्मीयांची विभागणी करतां येईल:

१. रानटी लोकांचे धर्मसंप्रदाय.

२. आद्य मानवसंस्कृतीचे संप्रदाय. उदा., मेक्सिको, पेरू, दक्षिण समुद्रांतील द्वीपें यांतील प्राचीन लोकांचे धर्म.

३. बाबिलोनिया, ॲसिरिया, ईजिप्त, ग्रीस, रोम, भरतखंड, इ. देशांतील सुसंस्कृत लोकांचे धर्म.

४. जीवितक्रमाबरोबरच वाढत जाणारे धर्म. उदा., ज्यू धर्म, बौद्ध धर्म, इस्लामी धर्म, व ख्रिस्ती धर्म.

पहिल्या दोन वर्गांत सृष्टवस्तूंची (उदा., खगोल, पर्वत, ओढे, इ.) व भूतपिशाचांची उपासना असते. मंत्रतंत्रांचा तींत फार वापर असून देव आणि माणसें यांमधील मध्यस्थ उपाध्या असतो. तिसऱ्यामध्यें पुराणांप्रमाणें उपासना होत असून उपाध्याय वर्ग समाजनीतिरक्षणाचें काम करतो. चौथ्या वर्गांत धर्माचा व्यक्तींवर आणि वंशांवर फार परिणाम होत असून माणसांतील आध्यात्मिक वृत्तींवर आणि दैवी संबंधावर विशेष भर देण्यांत येत असतो. या धर्मीयात विशिष्ट नीतिमूल्यें असून त्यांचें पालन होत असतें.

| जगांतील धर्म | लोकसंख्या |
|---|---|
| ख्रिश्चन— | ६९,२०,००,००० |
| रोमन कॅथॉलिक | ३३,१५,००,००० |
| प्रॉटेस्टंट | २०,६९,००,००० |
| कॉन्फ्यूसियन आणि ताओपंथी | ३५,०६,००,००० |
| हिंदू | २३,००,००,००० |
| मुसलमान | २१,००,००,००० |
| बौद्ध | १५,००,००,००० |
| ज्यू | १६,००,००,०० |

**धर्मशिला**—आपल्या पतीबरोबर सती जाणारी स्त्री ज्या दगडावर उभी राहून सौभाग्यवायनें वांटून चितेंत प्रवेश करते तो दगड. या ठिकाणीं उभी राहून ती सौभाग्यवायनें वांटते व शेवटचा निरोप घेते. धर्मशिलेवर उभी असतांना थोरल्या माधवराव पेशव्याची स्त्री रमाबाई हिनें दीर नारायणराव याचा हात राघोबादादाच्या हातीं दिल्याचें प्रसिद्धच आहे.

**धर्मसुधारणा**—(रिफॉर्मेशन). सोळाव्या शतकांत पश्चिम युरोपमध्यें ही धार्मिक चळवळ सुरू झाली व तिचा बाह्यतः उद्देश जरी ख्रिस्ती मंडळीचें अन्तःशोधन करण्याचा होता तरी तिचा परिणाम एक प्रकारचें तिच्याविरुद्ध बंड करण्यामध्यें झाला.

प्रॉटेस्टंट बंडाचा पुरस्कर्ता मार्टिन लूथर या नांवाचा एक ऑगस्टिनियन धर्मोपदेशक होता (१४८३–१५४६). यानें स्थापन केलेल्या मताचा प्रसार डेन्मार्क, नॉर्वे, स्वीडन या देशांत झाला. झ्विंग्लियन याच्या मताचा प्रसार स्वित्झर्लंडमधील जर्मनभाषी प्रांतांत झाला. फ्रान्समधील नवमतप्रसारक जॉन कॅल्व्हिन (१५०९–१५६४) यानें प्रथम प्रॉटेस्टंट मताचें ईश्वरशास्त्र निर्माण केलें; इंग्लंड देशांत उपभोगासक्त आठवा हेन्री यानें देशामध्यें भिन्नमतप्रसार केला. सहाव्या एडवर्डनें प्रॅटेस्टंट मतास इंग्लंडमध्यें वाव दिला. मेरी ट्यूडर हिनें कठोरतेनें व घाईघाईनें पुन्हां कॅथॉलिक मताची स्थापना केली व तिच्यानंतर एलिझाबेथ राणीनें अनेक लोकांचा वध करून व ख्रिस्ती मंदिरांच्या व मठांच्या जमिनी खालसा करून अँग्लिकन मताची स्थापना केली. स्कॉटलंड व नेदर्लंड्स या देशांतील सरदार वर्गानें कॅल्व्हिनच्या मताचा प्रसार केला.

प्रॉटेस्टंट धर्मसुधारणेमुळें ख्रिस्ती देशांत सर्वत्र द्वैत, यादवी व दुःख यांची छाया पसरली व तीमध्यें कॅथॉलिक मत मागें पडून इतर अनेक मतांची व पंथांची स्थापना झाली. लूथरच्या मताकडे पाहिलें असतांहि आपणांस असें दृष्टीस पडतें कीं, या चळवळीमुळें खरोखर धर्मसुधारणा घडून आलीच नाहीं. कारण त्यानेंच असें म्हटलें आहे कीं, रोमन कॅथॉलिक संप्रदायापेक्षां प्रॉटेस्टंट लोकामध्येंच अधिक अनीति, दुर्गुण, लांचखाऊपणा, वगैरे दोष आढळून येत. याच्या उलट सुधारणा कॅथॉलिक मंडळीनें सुरू केली. याचा परिणाम अन्तर्गत आयुष्यक्रमांत अधिक धार्मिकता उत्पन्न होण्यांत व बाह्यतः या मंडळीची सत्ता व वर्चस्व वाढण्यांत झाला.

**धर्मसूत्रें**—वैदिक वाङ्मयांत कल्पसूत्रांचा एक भाग आहे. त्यांत पुन्हां धर्मसूत्रांचा एक पोटवर्ग आहे. 'सामयाचारिका' (सामान्य रीतीभाती) हा धर्मसूत्रांचा विषय आहे. कृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीय शाखेचीं आपस्तंब, हिरण्यकेशी व बौधायन

हीं तीन धर्मसूत्रें आहेत. शिवाय गौतम धर्मसूत्र व वसिष्ठ धर्मसूत्र हीं दोन मनुस्मृतिपूर्वकालीन दिसतात. वसिष्ठ धर्मसूत्राचा अभ्यास फक्त ऋग्वेदीय शाखांचे लोक करतात.

**धर्मांतर**— एक धर्म सोडून देऊन दुसऱ्या धर्माचा स्वीकार करणें यास धर्मांतर म्हणतात. ज्या अर्थी धर्म म्हणजे मनुष्य व परमेश्वर यांमधील संबंध होय व ज्या अर्थी मनुष्यानें परमेश्वराची भक्ति व उपासना करावयाची असते त्या अर्थी मनुष्यानें त्याच्या सदसद्विवेकबुद्धीस पटेल अशाच धर्माचा स्वीकार करणें ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. तेव्हां मनुष्यास ज्या धर्मामध्यें जन्म प्राप्त होतो तो धर्म सोडून दुसऱ्या धर्मात प्रवेश करणें हें मनुष्याच्या वैयक्तिक मताच्या निश्चयावर, परमेश्वर व ती व्यक्ति यांच्यामधील संबंधाबद्दलच्या अकृत्रिमतेवर अवलंबून आहे. अशा या वैयक्तिक संबंधाच्या बाबतींत कोणतेंहि बाह्य दडपण अथवा सरकारी हस्तक्षेप या गोष्टी गैरवाजवी होत. कॅथॉलिक संप्रदायप्रवेशाच्या बाबतींत पुढील गोष्टींकडे लक्ष देण्यांत येतें. प्रथम या धर्मासंबंधीं बाह्य दिग्दर्शन व शिक्षण व तें ख्रिस्ताच्या पुढील शब्दांवरून देण्यांत येतें : 'जा आणि सर्व राष्ट्रांस शिकवा' (मत्तय. २८ : १८). नंतर परमेश्वरानें दाखविलेला आत्म्याच्या ठिकाणीं अन्तःप्रकाश व आकर्षण; आणि तिसरी गोष्ट म्हणजे हा धर्म खरा आहे आणि त्याचा स्वीकार करण्यावर परमेश्वराच्या इच्छेमुळें श्रद्धा बसली आहे अशी मनाची खात्री.

धर्मांतराची कल्पना हिंदूंची नाहीं. धर्मशास्त्रकारांना धर्मांतर हा शब्दहि माहीत नाहीं. ह्याचें कारण आमची धर्माची कल्पना अत्यंत व्यापक आहे. ईश्वरविषयक निष्ठा आणि सदाचरण ह्यांच्या बलावर कोणत्याहि धर्मातील माणसाला सद्गति प्राप्त होते असें आम्ही मानतों. म्हणून हिंदु मनुष्य कोणालाच बाटविण्याचा प्रयत्न करीत नाहीं. सच्छील मुसलमानाला अथवा ख्रिस्त्याला आपल्या धर्मात राहून सद्गति मिळेल इतका उदात्त विचार हिंदुधर्माचा आहे. आपआपल्या धर्माप्रमाणें न वागणारा फार तर पतित होईल. पतिताला प्रायश्चित सांगितलें आहे. ह्यास्तव कोणताहि हिंदू कधींच मुसलमान अगर ख्रिस्ती होत नाहीं. तो हिंदूच राहणार. मुसलमान व ख्रिस्तीसुद्धां हिंदू नाहींत का ? मुसलमान व ख्रिस्ती होणें म्हणजे धर्मांतर करणें नव्हे. पक्षांतर करणें होय. परमेश्वर एकच हें सर्व धर्मांना मान्य आहे. केवळ उपासनापद्धति निराळी म्हणून धर्मांतर करण्याला कोणतेंच कारण नाहीं. मुसलमानांनीं बाटविलें म्हणून आम्ही खरोखरीच बाटलों असें मानणें अज्ञानमूलक आहे. तसेंच ख्रिस्ती झाल्यानें सद्गति मिळेल अशा समजुतीनें स्वधर्मत्याग करणेंहि मूर्खपणाचेंच गणलें पाहिजे.

**धवलधार**—पंजाब. ही कांग्रा जिल्ह्यातील एक पर्वताची ओळ असून ह्या ओळीच्या पलीकडच्या अंगास चंबा संस्थान आहे. या रांगेंतील सर्वांत उंच शिखराची उंची १५,९५६ फूट आहे. धरमशाळा हें कांग्रा जिल्ह्याचें मुख्य गाव धवलधारच्या उतारावरच आहे.

**धाकड**—एक मजूर जात. लो. सं. दीड लाखावर असून ती मुख्यतः मध्यहिंदुस्थान व राजपुताना यांत आहे. धाकड या शब्दांत गोळक अर्थाचा बोध होतो. धाकड लोक शेतकीचें व मजुरीचें काम करतात. ही धाकड जात ब्राह्मण किंवा रजपुत पुरुष यांच्यापासून स्थानिक स्त्रियांच्या पोटीं जी संतति झाली ती होय, अशी समजूत आहे.

**धाडी**—मुसलमानी गायक. हे भाटासारखे मोठमोठ्या सरदारांच्या व राजांच्या पदरीं असत. समारंभाच्या मिरवणुकींत किंवा लढाईच्या स्वारींत हे लोक आपापल्या मालकापुढें त्यांचीं स्तुतिस्तोत्रें गात गात चालत. मराठी राज्यांत छत्रपति, पेशवे व इतर मोठमोठे सरदार यांच्या पदरीं हा मुसलमान भाटवर्ग होता.

**धातुखोदकाम**—(एन्ग्रेव्हिंग). धातूवरून ठसे घेण्याकरितां जी कृति करावी लागते तिला धातुखोदकाम म्हणतात. लांकडाचे जे ठसे करण्यांत येतात त्यांस ठसे किंवा इंग्रजींत 'वुडकट' म्हणतात. सामन्यतः धातूच्या पत्र्यावरून ठसे किंवा छाप घ्यावयाचे असले म्हणजे आकृतीच्या रेघा धातूच्या पत्र्यांत खोदण्यांत येतात व त्यांत शाई भरून बाकीचा पत्रा साफ पुसून काढण्यांत येतो. म्हणजे फक्त खोदलेल्या रेघांत शाई राहते; नंतर एक कागद ओलसर करून त्यावर ठेवण्यांत येतो व नंतर तो पत्रा कागदासकट दाबांत घालून ठसे घेण्यांत येतात. याप्रमाणें प्रत्येक छापाकरितां ही कृति करावी लागते. लांकडाच्या ठशामध्यें जी आकृति छापावयाची असेल तिच्या रेघा लांकडावर काढण्यांत येतात व त्या रेघा कायम ठेवून बाकीचा लाकडाचा भाग खोदून काढण्यांत येतो; म्हणजे रेघा उठावदार वर राहतात. यावरून छपाईचें काम अधिक लवकर होतें.

धातुखोदकामाची कला प्रचारात येण्यापूर्वीच लांकडाच्या ठशांवरून छापण्याची कला फार दिवस प्रचारांत होती. ही कला पूर्वेकडील देशांतून युरोपमध्यें गेली. दहाव्या शतकापासून लांकडी ठशावरून छापण्याचें काम चीनमध्यें सर्वत्र करण्यांत येत होतें. ही कला प्रथम इटालियन व जर्मन लोकांनीं कापडावर छाप उठविण्याकरितां युरोपमध्यें प्रचारांत आणली. परंतु कागदावर छापलेले नमुने चौदाव्या शतकापूर्वीचे आढळत नाहींत. प्रथम प्रथम ठशांचा उपयोग पुस्तकाचीं पानेंच्या पानें ठसे करून छापणें, पत्ते किंवा धार्मिक आकृतीचे ठसे, वगैरे करण्या-

कडेच होत असे. सुमारें १४६० मध्यें धातुखोदकामावरून छापण्याची कला फ्लॉरेन्समध्यें मेसोफिनिग्वेरा यानें शोधून काढली असें म्हणतात.

परंतु या कलेची यानंतर व्हेनिसमध्यें वाढ झाली. विशेषतः राफेलच्या हाताखालीं काम करणारा मार्क अँटोनियो रायमाँडी (१४७५-१५३४) यानें या कलेंत पुष्कळच प्रगति केली. यानें राफेलचीं बरींच चित्रें या पद्धतीनें छापलीं. जर्मनीमध्यें आल्बर्ट ड्यूरेर (१४७१-१५२८) यानें तांब्याच्या पत्र्यावरील खोदकाम व लाकडी ठसे या दोन्हीहि बाबतींत, विशेषतः दुसऱ्या बाबतींत बरेंच प्रावीण्य संपादन केलें. फ्लेमिश व डच कलावंतांमध्यें ल्युकार फॉन लेडेन यानें याच कालांत या कलेची पुष्कळ प्रगति घडवून आणली. सतराव्या शतकाच्या अखेरीस रेंब्राँ वगैरे चित्रकारांनीं आपलीं चित्रें छापण्याकरितां धातूच्या पत्र्यावर अम्ललेखनपद्धतीचा पुष्कळच उपयोग केला. फ्रान्समध्यें सोळाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास नोएल गार्निएर यानें या कलेची एक शाळा काढली पण या कलेची चौदाव्या लुईच्या कारकिर्दीपर्यंत फारशी प्रगति झाली नाहीं. या वेळीं अनेक कारागिरांनीं या पद्धतीनें चित्रें छापलेलीं आढळतात. इंग्लंडमध्यें पहिला धातुखोदकाम करणारा मनुष्य विल्यम होगार्थ (१६९७ ते १७६४) हा होऊन गेला. सर रॉबर्ट स्ट्रेंज (१७२१-१७९२) यानें या पद्धतीनें कांहीं ऐतिहासिक चित्रें छापलीं. यानंतर व्हॅलेंटाइन ग्रीन व जे. आर्. स्मिथ यांनीं धातूचा पत्रा खरबरीत करून छायाप्रकाश साधणारीं धातुखोदन चित्रें छापलीं (मेझोटिंट). यानंतर या कलेंत अनेक कारागिरांनीं प्रगति केली. पुढें १८२०-३० या काळांत तांब्याच्या पत्र्याऐवजीं पोलादाचा पत्रा वापरण्यांत येऊं लागल्यानें पुष्कळ प्रमाणावर प्रती छापतां येऊं लागल्या. तसेंच चित्रांची सफाईहि वाढली. याच सुमारास निसर्गचित्रें काढण्याच्या कामांत फारच प्रगति झाली. या वेळीं टर्नर याचीं चित्रें त्याच्या देखरेखीखालीं उत्कृष्ट रीतीनें छापण्यांत आलीं. १८७० नंतर अम्ललेखनपद्धतीनें चित्रें कोरण्यांत येऊं लागलीं.

धातूच्या पत्र्यावर ठिपके ठिपके उठवून छापण्याची एक पद्धति आहे (स्टिपल). परंतु अलीकडे रेषा व ठिपके यांचें मिश्रण करूनच छापण्याची पद्धति विशेष प्रचारांत आहे. या पद्धतीनें खरबरीत पद्धतीपेक्षां अधिक चांगल्या प्रती काढतां येतात.

लांकडी ठसे—लांकडी ठसे कोरण्याकरितां 'बॉक्स वुड' नांवाचें लांकूड पसंत करण्यांत येतें. याचे खिळयांच्या उंचीचे आडवे काप कापण्यांत येतात. हें एका पद्धतीनें मुरवण्यांत येतात व नंतर गुळगुळीत करून उपयोगांत आणतात. या लांकडाच्या तुकड्यावर कोरावयाची आकृति पेन्सिलीनें काढावी लागते व हा काढलेला भाग कायम ठेवून कोरा भाग खोदून काढावयाचा असतो. या कायम ठेवलेल्या उठावदार भागामध्यें छायाप्रकाशाप्रमाणें रेषा ठेवण्याची किंवा खोदण्याची कृति करावयाची असते. अलीकडे लांकडी तुकडे यांवर चित्र किंवा आकृति काढण्याऐवजीं तिचा फोटोग्राफ घेण्यांत येतो. परंतु अशा वेळीं त्यांत खोदावयाच्या रेषा कारागिरास आपल्या कौशल्याप्रमाणें बसवाव्या लागतात. त्या पेन्सिलीनें काढलेल्या आकृतीप्रमाणें स्पष्ट नसतात. हे खोदकाम करावयास लागणारीं हत्यारें धातूवर खोदकाम करण्याकरितां लागणाऱ्या हत्यारांप्रमाणेंच बरींच अधिक असतात.

**धातुप्रकृतिविद्या**—(मेटॅलोग्राफी). शुद्ध धातू किंवा त्यांच्यापासून बनविलेल्या मिश्र धातू यांची अंतर्गत रचना, त्यांचें मिश्रणाचें प्रमाण व त्यांचे स्वाभाविक व यांत्रिक गुणधर्म यांचें विवेचन करणारी धातुविद्येची ही एक शाखा आहे. या विद्येमध्यें अलीकडे धातुपरीक्षेच्या निरनिराळ्या पद्धती यांचा अन्तर्भाव करण्यांत येतो व सध्या या विद्येमध्यें धातू व त्यांचीं मिश्रणें यांच्या सर्वांगीण अभ्यासाचा समावेश होतो. सध्यां धातूंची परीक्षा करण्याची पद्धति म्हणजे एक अत्युष्णमान पद्धतीचे निरनिराळे प्रकार होत. या पद्धतींत मिश्रधातू घनस्थितींत केव्हां जातात व थंड केव्हां होतात यांचे आंकडे बरोबर येतात. दुसरी सूक्ष्मदर्शक यंत्रानें परीक्षण करण्याची पद्धति आहे. या पद्धतींत परीक्षण करावयाच्या मिश्र धातूचे पत्रे घेऊन त्यांस खूप जिल्हई देण्यांत येते व त्यांवर योग्य जातीच्या रासायनिक द्रव्यांनीं आकृती खोदण्यांत येतात व नंतर ते पत्रे सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं ठेवून त्यांची परीक्षा करण्यांत येते. या पद्धतीनें मिश्रधातूंची घटना कशी आहे याचें निश्चित ज्ञान होतें. आणि या पद्धतीनें विशिष्ट धातूपासून कोणत्या मिश्रधातू उत्तम प्रकारच्या बनवितां येतात तें कळतें. उदाहरणार्थ, लोखंड आणि पोलाद यांच्या मिश्र धातू फेराइट, सिमेंटाइड, ऑस्टेंटाइट, मार्टेनसाइट, ट्रूस्टाइट, सोर्बाइट व पर्लाइट या निरनिराळ्या धातूंशीं संयोग झाल्यानें उत्पन्न होतात.

**धातुप्लावनी**—(फ्लोटेशन ऑफ मिनरल्स). खनिज धातूं-(ओर) मधील धातूंचें प्रमाण वाढविण्याची पद्धत. त्यांत पाणी आणि तेल ह्यांच्या मिश्रणाचा उपयोग केला असतो. प्रथम खनिज धातूंची पूड करून ती वरील मिश्रणांत चांगली घुसळतात. त्यामुळें धातुयुक्त खनिज वर येतें व बाकीची घाण खालीं राहते. एक टन खनिज धातु शुद्ध करण्याला १ पौंडापेक्षां कमीच तेल लागतें. ह्या पद्धतीने दर वर्षी लाखों टन खनिज धातू शुद्ध करतात.

**धातुविद्या**—(मेटॅलर्जी). अशुद्ध धातूपासून धातू शुद्ध करून घेऊन त्यांचा उद्योगधंद्यांमध्यें उपयोग करण्याच्या कलेस धातु-

विद्या म्हणतात. अशा तऱ्हेनें धातु शुद्ध करण्याच्या अगदीं भिन्न भिन्न पद्धती प्रचारांत आहेत. या पद्धती विशिष्ट धातु कोणत्या ठिकाणीं आढळते व तिचे रासायनिक व स्वाभाविक गुणधर्म काय आहेत यांवर अवलंबून असतात. पुष्कळदां धातू-सोनें, चांदी, तांबें, वगैरे-स्वाभाविक शुद्ध स्थितींत आढळतात. लोखंड, तांबें, कथिल, वगैरे धातू प्राणिदसंयुक्तांत आढळतात. कांहीं तांबें, शिसें, जस्त, वगैरेसारख्या धातू गंधकितांच्या स्वरूपांत आढळतात तर कांहीं सिकतित (सिलिकेट), कर्बित (कार्बोनेट), गंधाकित (सल्फेट), तालिद (आर्सेनाइड), वगैरे संयुक्तांमध्यें आढळतात. कांहीं धातू शुद्ध करण्याकरितां केवळ कुटणें व बारीक करणें याच क्रिया कराव्या लागतात. कांहीं बाबतींत अशुद्ध धातूचे तुकडे प्रथम अवश्य तितके बारीक करून घेऊन धुतले असता त्यांतील अनवश्यक तेवढा भाग काढून टाकतां येतो. कथिल, शिसें, वगैरेंच्या अशुद्ध धातूंपासून धुण्याच्या पद्धतीनें शुद्ध धातू तयार करतां येतात. कांहीं बाबतींत लोहचुंबकाच्या साहाय्यानें अशुद्ध धातूंतील शुद्ध धातूचा अंश एका ठिकाणीं आणण्याची क्रिया महत्त्वाची असते. कांहीं धातूंच्या बाबतींत अशुद्ध धातु तेलामध्यें तरंगत ठेवण्याची पद्धति वापरण्यांत येते. बहुधा दुसरी कोणतीहि क्रिया करण्यापूर्वी अशुद्ध धातु प्रथम भाजण्यांत येते. यामुळें तिच्या गुणधर्मांत कांहीं बदल होतात. अशुद्ध धातु वितळवून शुद्ध धातु काढण्यामध्यें बहुधा प्रथम त्या धातूचें गंधकायित (सल्फाईट) किंवा तालिद (आर्सेनाइड) तयार करण्यांत येतें व त्यापासून नंतर ती धातु काढण्यांत येते. राहिलेल्या अशुद्ध धातूस गाळ (स्लॅग) म्हणतात. हा गाळ बनण्याचें कारण मुख्यतः धातु वितळण्याकरितां वापरलेलीं द्रव्यें होत. धातु वितळण्याच्या बाबतींत जळण व भट्टीचा प्रकार हीं महत्त्वाचीं असतात.

धातु गाळण्याकरितां जें जळण वापरावयाचें तें घन (कोळसा, कोक, किंवा दगडीकोळसा), द्रव (तेलें-खनिज किंवा उद्भिज), अथवा वायुरूप (कोलगॅस, प्रोडयूसरगॅस) यांपैकीं कोणत्याहि प्रकारचें असूं शकतें. विजेच्या भट्टीमध्यें उष्णता देण्याकरितां विजेचाहि उपयोग करण्यांत येतो. दुसऱ्या एका द्रावण पद्धतीमध्यें अशुद्ध धातु एखाद्या द्रवामध्यें विरघळविण्यांत येते. या क्रियेंत आपणांस पाहिजे ती धातु विरघळते व इतर धातू घन स्थितीमध्येंच गाळांत राहतात. सामान्यतः वितळण्याच्या पद्धतीइतक्या विरघळण्याच्या पद्धती चांगलें काम देत नाहींत. परंतु या नियमास कांहीं अपवाद आहेत. विशेषतः सोनें काढण्यामध्यें हीच पद्धति अधिक उपयुक्त आहे. या पद्धतींत सोन्याच्या अशुद्ध धातूचें प्रथम चूर्ण करण्यांत येतें व तें सैन्धव (सोडियम) किंवा पालाश (पोटॅशियम) यांच्या सायानिदांत (सायनाइड) विरघळविण्यांत येतें. त्यामुळें त्या द्रवांत सोनें विरघळून जातें. या द्रावणांतून नंतर आपणांस इष्ट असलेली धातु सांकारूपानें पुन्हां मिळूं शकेल, या गोष्टीची तजवीज करावी लागते. ही क्रिया रासायनिक किंवा वैद्युतिक पद्धतीनें करण्यांत येते. तांबें, कथिल, शिसें, वगैरे शुद्ध करण्याची साधी पद्धति म्हणजे त्यांस खूप उष्णता देणें ही होय. तसेंच तांबें, शिसें व सोनें शुद्ध करण्याकरितां वैद्युतिक पद्धति उपयोगांत आणण्यांत येते. उष्णता देण्याच्या पद्धतींत धातु वितळते व इतर पदार्थांची हवेंतील प्राणवायूमुळें प्राणिदें बनतात. वैद्युतिक पद्धति ही बहुतेक विजेच्या साहाय्यानें मुलामा चढविण्याच्या पद्धतीसारखीच असते. कच्च्या लोखंडाचें पोलाद किंवा इतर प्रकारचें लोखंड तयार करणें ही धातुशोधनाची क्रिया आहे. उद्योगधंद्यामध्यें सामान्यतः शुद्ध स्वरूपांत फारच थोड्या धातू वापरण्यांत येतात. याकरितां त्यांच्या मिश्रणामध्यें धातूंचा परस्परांवर काय परिणाम होतो हें पाहावें लागतें.

**धातुसंस्था**—(टिश्यूज). प्राण्याच्या शरीरामध्यें जीं निरनिराळीं इंद्रियें असतात तीं ज्यांच्या संघांचीं बनलेलीं असतात, त्यांस धातू म्हणतात. उदा., स्नायुमय धातु अथवा मांस; अस्थिमय धातु अथवा हाड; स्नेहयुक्त धातु अथवा चरबी; कूर्चामय धातु अथवा कोंवळें हाड (ग्रिस्टल); रंजकधातु अथवा कातडीचें रंगद्रव्य; वगैरे. अशा तऱ्हेच्या अनेक धातू व धातुसंस्था हीं सर्व शरीरभर पसरलेलीं असतात व त्यांपासूनच शरीराची रचना झालेली असते.

वनस्पतिशास्त्रामध्यें धातूंचें वर्गीकरण त्यांच्या निरनिराळ्या क्रियांप्रमाणें करण्यांत येतें. उदा., १. रसवाहिनी धातू-या सामान्यतः नलिकाकार असतात. २. यांत्रिक अथवा आधारधातू-यामुळें सामान्यतः मुळें, अंकुर, वगैरेंची यांत्रिक क्रिया चालते व त्यांस आधार मिळतो. ३. रक्षक धातू-यांमध्यें अंतस्त्वचा, बुचासारखा भाग, वगैरे मोडतात. ४. पोषण धातू-या मुळांमध्यें असतात. ५. पोषक धातू-या वाटोळ्या, लांबट किंवा निरनिराळ्या आकारांच्या असून त्यांची अन्नसंचयन, कर्बग्रहण, वगैरे निरनिराळीं कार्यें असतात.

**धातू**—रसायनशास्त्रामध्यें सर्व मूलद्रव्यांचे धातू व अधातू असे दोन प्रकार करण्यांत येतात. परंतु या दोन वर्गांतील भेद तितका निश्चित नाहीं. या दोहोंच्यामध्यें पडणाऱ्या ताल (आर्सेनिक) आणि अंज या द्रव्यांत धातुदें (मेटॅलॉइड) म्हणतात. धातूंचे गुणधर्म सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें असतात:—धातू अपारदर्शक असून त्यांस एक प्रकारची चकाकी असते. त्यांना उष्णता दिली असतां वितळतात. त्या चांगल्या उष्णतावाहक व विद्युत्वाहक असतात. यांचीं प्राणिदें अम्लांशीं संयुक्त झालीं

असतां त्यांपासून लवणें तयार होतात. म्हणजे धातूंचीं प्राणिदें हीं मूल प्राणिदें ( मस्में-वेसिक ) असून त्यांच्या संयुक्तांचें विद्युद्विश्लेषण केलें असतां विद्युद्घटमालेच्या ऋण ध्रुवाशीं दृश्यमान होतात. बहुतेक धातू घनवर्धनीय असतात. त्यामुळें त्यांचे पत्रे किंवा बारीक तारा काढतां येतात. सर्व धातूंचा निरपवादकपणें प्राणवायूशीं संयोग होतो. त्याप्रमाणें गंधक व हर यांच्यांशीं संयोग होऊन प्राणिदें, गंधकिदें व हरिदें होतात व त्यांपैकीं बऱ्याच ब्रुम (ब्रोमिन), अद (आयोडीन), प्लव (फ्लुओरिन) यांच्याशींहि संयुक्त होतात. अलीकडे सांपडलेल्या बऱ्याच धातू फार थोड्या प्रमाणांत उपलब्ध होतात व त्या केवल वर्णपटपृथक्करण (स्पेक्ट्रम अनॅलिसिस) पद्धतीमुळें ज्ञात झाल्या. या दिशेनें अधिक संशोधन केल्यास अशा प्रकारच्या आधिक धातू मिळण्याचाहि संभव आहे.

**धानी**—हा राग काफी थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहांत ऋषभ व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत. म्हणून याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर गांधार आणि संवादी निषाद आहे. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर मानितात. याला सार्वकालिकहि समजतात. हा क्षुद्रगीताई राग आहे.

**धानुक**—एक जात. यांना धानाक, धानक किंवा धानकिया असेंहि म्हणतात. यांची लो. सं. सुमारें नऊ लाख असून हे लोक बंगाल, बिहार, ओरिसा, मध्यप्रांत, वऱ्हाड, पंजाब, सं. प्रांत, बडोदें संस्थान, राजपुताना इतक्या ठिकाणीं आढळतात. हे लोक शेती व मजुरी करतात. आसामांतील चहाच्या मळयांत हे लोक काम करतात. हे लोक तिरंदाज असतात. या जातींत हिंदु, शीख, मुसलमान व वन्य जाती असे निरनिराळे लोक आहेत.

**धान्य**—हा शब्द नपुंसकलिंगी असून तो 'धाना' शब्दापासून झालेला आहे. ह्याचा अर्थ मराठींत प्रसिद्धच आहे. हा शब्द ऋग्वेद व उत्तरकालीन ग्रंथ ह्यांत आलेला आहे. बृहदारण्यकोपनिषदांत दहा प्रकारचीं ( जमीन नांगरून काढलेलीं ) धान्यें ( ग्राम्याणि ) आहेत. ते दहा प्रकार म्हणजे तांदूळ, यव (व्रीहियवः), तिल, उडीद (तिलमाषाः), अणु, प्रियंगव, मका (गोधुमाः), मसुर (मसुराः), खल्व व खालकुल असे होत. ऐतरेय व शतपथ ब्राह्मण ह्यांत घोड्याला धान्याद म्हणजे धान्य खाणारा असें म्हटलें आहे. ऋग्वेदांत माणसांना धान्य करणारे ( धान्यकृत् ) असें म्हटलें आहे.

धान्याचे तृणधान्य व द्विदलधान्य असे सामान्य दोन प्रकार आहेत. भात, गहूं, ज्वारी, बाजरी हीं तृणधान्यें होत. हरभरा, तूर, मूग, उडीद, इत्यादिकांस द्विदलधान्यें, व करडई, तीळ, जवस, वगैरेस तैलधान्यें म्हणतां येईल. तृणधान्याची पेरणी वगैरे करण्यास फारसा त्रास पडत नसल्यानें व तें साधारण खडकाळ जमिनीवरहि उगवत असल्यानें प्राचीन लोकांना आपल्या निवासस्थानीं त्याची सहज लागवड करतां येई. अठरा धान्यें व उपधान्यें यांची यादी अठरा शब्दांत दिली आहे. प्रत्येक धान्यांची माहिती त्या त्या नांवाखालीं दिलेली आढळेल.

दुसऱ्या महायुद्धापर्यंत हिंदुस्थानाला कधीं बाहेरून धान्य मागवावें लागलें नाहीं. पण युद्धपरिस्थितीमुळें ती वेळ आली. १९४३ सालीं ३,२८,६८६ टन, १९४४ सालीं ६,५३,००० टन, १९४५ सालीं ८,५६,७२६ टन व १९४६ सालीं २५ लाख टन धान्य बाहेरून आणलें व त्यासाठीं ७७ कोटी रुपये द्यावे लागले. जानेवारी ते जून १९४७ पर्यंत ११,५७,००० टन धान्य बाहेरून आलें; तरी दरसाल ३० कोटी रुपये अधिक धान्यें पिकविण्याच्या प्रचारासाठीं खर्च होत आहेत. इतकेंहि करून वरील आयात होतच आहे.

सुमारें १,००० दशलक्ष एकर जमिनीपैकीं ३०० दशलक्ष एकरच फक्त लागवडीखालीं आहे; त्यामुळें धान्य पुरें पडत नाहीं. मुंबई सरकारनें १९४४ त अन्नधान्य पिकांचा कायदा केला व जास्त जमिनीवर धान्य पिकविण्यासाठीं खटपट चालू केली आहे. यांत्रिक आणि शास्त्रीय साधनांनीं भरपूर पिकें काढण्याची तयारी केल्याखेरीज जरूर तो पुरवठा पडणें कठीण.

**धामण**—ही सापाची जात फार लांब असते. धामणीचा रंग तुळतुळीत, पिवळट, अथवा पिवळाधमक असतो. ही जात विषारी नसते. धामण आपली शेपटी गुराच्या नाकांत घुसवून ती जोरानें बाहेर काढते व त्यामुळें गुरूं मरतें, असें म्हणतात.

**धामणवर्ग**—(टिलिआसी). हा एक विभक्त पुष्पमुकुट असलेल्या द्विदल वनस्पतींचा वर्ग आहे. या वर्गांत कांहीं वृक्ष व झुडपें येतात. यांचीं पानें साधीं, दंतुर, एकाआड एक अशीं असून त्यांस उपपर्णें असतात. यांची अंतर्साल चिवट असते. तिला घनपेशीतंतु ( बास्ट ) म्हणतात. या वर्गांत धामण वगैरे झाडें व ताड वगैरे वनस्पती येतात.

धामण—या झाडांच्या एका वर्गांत ६० जाती आहेत. त्यांपैकीं १२ जातींचीं झाडें असतात व बाकीच्या जातींच्या वेली व झुडपें असतात. या जातींपैकीं ३६ जाती हिंदुस्थानांत आहेत. हीं झाडें डेहराडून ते आसामपर्यंतच्या हिमालयाच्या पायथ्याशीं आढळतात. धामणची दुसरी जात हजारा व पंजाबचे मिठाचे डोंगर यांपासून सिक्कीमपर्यंतच्या ३ ते ६ हजार फूट उंचीवर आढळते. या वर्गाच्या बहुतेक जातींच्या झाडांच्या अंतर्सालीपासून तंतू निघतात; त्यांचा दोर करण्याकडे व कागद करण्याकडे उपयोग करतात. या लांकडांत लवचिकपणा व बळकटी असल्यामुळें बाण, भालकाठी, वगैरे तयार करण्याकरितां या

लाकडाचा उपयोग करतात. या वर्गाच्या बऱ्याच जातींच्या झाडांचीं फळें खाण्यासारखीं असतात.

**धायटी**—एक वृक्ष. याचीं फळें लवंगेप्रमाणें व तांबडीं असतात. फुलांचा औषधाकडे व रंगासाठीं उपयोग होतो. याला कोंकणांत धावशी म्हणतात. रक्तपित्त, अतिसार, विष यांवर फुलांचा उपयोग होतो.

**धार संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतील एक संस्थान. क्षेत्रफळ १८०० चौ. मैल. आतां हें मध्यभारत संस्थानात सामील झालें आहे. परमार रजपुतांची प्रसिद्ध राजधानी जें धार शहर त्यावरून या संस्थानचें नांव पडलें आहे. या संस्थानांत एकंदर २२ जहागिऱ्या आहेत. या संस्थानांत साग, शिसू, तेह्न, सादडा, अंजन, वगैरे झाडें होतात. जंगलांत वाघ, चित्ता, सांबर, वगैरे प्राणी आढळतात. यांत विंध्य व सातपुडा हे दोन पर्वत आहेत. माळवा पठाराची हवा समशीतोष्ण आहे. पाऊस सरासरी २६ इंच व नेमाडमध्यें २५ इंच होतो. येथील लो. सं (१९४१) २,५३,२५८ आहे व शें. ६६ हिंदू आहेत. येथें ज्वारी, गहूं, मका, हरभरा, तीळ, बाजरी, तांदूळ, वगैरे धान्यें पिकतात. धारच्या आसपास व मांडव आणि नालछा येथें पुष्कळ तलाव आहेत. मांडवगड पाहण्यासारखा आहे. राज्यव्यवस्थेकरितां या संस्थानचे ७ परगणे केलेले आहेत. एकंदर उत्पन्न हल्लीं तीस लाखांचें आहे. हल्लींचे संस्थानिक महाराज आनंदराव पवार १९४० सालीं राज्यकारभार पाहूं लागले. इंग्रज सरकारास ६,६०० रुपये वार्षिक खंडणी मिळत असे व संस्थानच्या जहागिरदारांकडून ७६,५०० रुपये टाका (खंडणी) दरसाल संस्थानिकास मिळे. धारला एक कॉलेज, हायस्कूल आणि मराठी, हिन्दी, उर्दू व संस्कृत पाठशाळा आहेत. संस्थानांत रुग्णालयें व दवाखानें बरेच आहेत. छापखाने, जिनिंगचे कारखाने, ओंऱ्याच्या फुलांचे कारखाने, वगैरे उद्योगधंदे चालतात. मुख्य धंदा शेतीचा आहे. धार संस्थानचा मूळ पुरुष उदाजी व त्याचा भाऊ आनंदराव यांची माहिती स्वतंत्र दिली आहे.

गांव—धार संस्थानच्या राजधानीचें ठिकाण. धार हें नांव 'धारा' नगरी या नांवापासून आलें आहे. उत्तरेस तांबड्या दगडांचा किल्ला आहे. यांत दुसऱ्या बाजीराव पेशव्याचा जन्म झाला. जुन्या गांवाभोंवतीं प्राचीन काळीं बांधलेला धुळकोट आहे. हें गांव जुनें असून ५ शतकेंपर्यंत माळव्याच्या परमार रजपुतांच्या राजधानीचें ठिकाण होतें. ह्या घराण्याची पहिली राजधानी उज्जनी येथें होती. मुंज वाक्पति (९७४ ते ९९५), सिंधु राजा (९९५–१०२०) व भोज यांच्या कारकीर्दींत धार हें सर्व हिंदुस्थानांत विद्येचें मुख्य पीठ समजलें जात असे आणि येथील राजे स्वतः लेखक व चांगले विद्वान् होते. १३०० सालीं अल्लाउद्दीनानें धारपर्यंत सर्व माळवा जिंकला, त्या वेळीं धारमध्यें मुसलमानांचा प्रथम प्रवेश झाला. स. १३९९ त धारचा सुभेदार दिलावरखान हा बहुतेक स्वतंत्र झाला; त्याचा मुलगा होशंगशहा हा माळव्याचा पहिला मुसलमान राजा होय. त्यानें मांडू ही आपली राजधानी केल्यामुळें धारचें महत्त्व अर्थातच कमी झालें. अकबराच्या कारकीर्दींत धार हें माळवा सुभ्यांत, मांडू सरकारींतील एका महालाचें मुख्य ठिकाण होतें. धारचा किल्ला १७३० सालीं मोंगलांकडून मराठ्यांकडे आला. लो. सं. दहा हजार, पैकीं शें. ७५ हिंदू व १९ मुसलमान आहेत. गांवच्या उत्तरेस उंचवट्यावर असलेला किल्ला लाल दगडांचा असून महंमद तुघलखाच्या वेळीं बांधलेला असावा. देवगिरीची खंडणी सुखरूप दिल्लीस जाण्यासाठीं हा बांधला. येथील स्तंभ भोज परमारच्या कारकीर्दींत त्रिपूरीचा भेदिराज गांगेयदेव व तेलंगणचा राजा यांच्यावरील विजयाचें स्मारक म्हणून उभारण्यांत आला. जवळच असणाऱ्या २४ फूट लांब व ४ फूट घेर असलेल्या चौकोनी दगडी तुकड्याला तेलणीची लाठ म्हणतात. कमालमौला हें लहानसें आवार असून त्यांत चार थडगीं आहेत. या आवाराजवळच जुनी भोजशाला नांवाची इमारत हल्लीं मशिदीच्या स्वरूपांत आहे. प्रख्यात राजा भोजानें (१०२०–१०५५) शहराच्या एका मध्यचौकांत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या शास्त्रीपंडितांशीं वादविवाद करण्यास हें सरस्वती मंदिर बांधलें. तेथून जवळच मुंजराजानें बांधलेला मुंजसागर नांवाचा तलाव व राजघराण्याच्या छत्र्या व धारेश्वराचें देऊळ आहे.

सु. वि. भा. ३–४०

**धारण**—ह्याचा अर्थ जिनसांच्या किंमती किंवा बाजारभाव. किंमती वाढण्याचीं बाह्य कारणें असतात तीं—(१) जगांतील बाजारांत जिनसांना वाढती मागणी. मागणी वाढण्याचें कारण लोकांची शैक्षणिक व आर्थिक सुधारणा होय. (२) खाद्येतर अनेक जिनसा तयार करण्याकरितां धान्यांचा उपयोग. उदा., कापडाच्या गिरण्यांत खळीकरतां तांदूळ, मका, वगैरेंच्या पिठांचा उपयोग; कृत्रिम रबराकरितां कणिकेचा उपयोग; यंत्राकरितां तेलांचा उपयोग, वगैरे. (३) जगांतील दळणवळणाचीं साधनें वाढल्यामुळें नफ्याच्या आशेनें जिनसांची परदेशांत निर्यात. (४) जगांत वारंवार होणारीं युद्धें व त्याकरितां लागणारें युद्धसाहित्य तयार करण्याकरितां लोखंडादि धातू व लांकूड यांचा खप. (५) जगांतील खाणींतून सोन्याचा व रुपयाचा पुरवठा वाढल्यामुळें पौंडाची व रुपयाची किंमत कमी झाली; म्हणूनच त्या मानानें जिनसांच्या किंमती वाढल्या.

किंमती वाढण्याचीं अंतर्गत कारणें येणेंप्रमाणें—(१) धान्यांच्या निपजीचें प्रमाण वाढत नाहीं, पण लोकसंख्या मात्र वाढते.

त्यामुळें धान्यांच्या किंमती वाढतात. मालथस या पाश्चात्य अर्थशास्त्रज्ञानें हाच महत्त्वाचा सिद्धान्त पुढें मांडला. (२) पर्जन्याची अनिश्चितता. (३) धान्यांऐवजीं धान्येतर कापूस, ताग, तैलधान्यें, वगैरेंची लागवड वाढल्यामुळें व खाद्यधान्यें कमी उत्पन्न झाल्यामुळें भाव वाढतात. ब्रिटिश अमदानीपूर्वी हिंदुस्थानांत दळणवळणाचीं साधनें हल्लींच्यासारखीं नसल्यामुळें, आणि मालाची निर्गत हिंदुस्थानाबाहेर हल्लींच्याइतकी होत नसल्यामुळें धान्यांच्या व जिनसांच्या किंमती फार कमी होत्या. सदर किंमतींचें तुलनात्मक कोष्टक येणेंप्रमाणें :—

( एका रुपयास भाव )

| काळ | गहूं | हरभरा | तांदूळ | बाजरी | तूप | तेल |
|---|---|---|---|---|---|---|
| अल्लाउद्दीनाचा काळ | ४८ पायली | ७२ पायली | ७२ पायली | ... | ... | ... |
| अकबराचा काळ | ३६ पायली | ... | २४ पायली | ४८ पायली | ... | ... |
| पेशवाई अमल | ५ पायली | ४॥ पायली | ३ पायली | ६ पायली | २। शेर | ५॥ शेर |
| ब्रिटिश अमल १९२९ | ४॥ शेर | ५॥ शेर | ३॥ शेर | ६ शेर | ॥। शेर | १॥ शेर |
| चालू ,, १९४९ | २ ,, | ३॥ ,, | २ ,, | २॥ ,, | ३ छटाक | ॥। ,, |

ब्रिटिश अमदानींत पूर्वीच्या मुसलमानी व पेशवाई अमदानीपेक्षां भाव १९१० पर्यंत सारखे वाढतच गेले. १९१४ सालीं महायुद्ध चालू झाल्यावर भाव इतके विलक्षण वाढले कीं, दुष्काळाच्या काळासारखी स्थिति दरसाल चालू राहिली. १९३० च्या पुढें कांहीं वर्षें हे भाव उतरले; पण १९३९ सालीं दुसरें महायुद्ध सुरू होतांच पुन्हां विलक्षण महागाई सुरू झाली. तेव्हां सरकारनें साखर, रॉकेल, तांदूळ, गहूं, जोंधळे, बाजरी, वगैरे आवश्यक जिनसांचें नियंत्रण (रेशनिंग) सुरू केलें. पण त्यामुळें व्यापारी वर्गांत काळा बाजार वाढला आणि गरीब लोकांची उपासमार होऊं लागली. महायुद्ध संपून पांच वर्षें झालीं तरी धारण वाढतच आहे. आवश्यक खाद्य जिनसांचा देशांत भयंकर तुटवडा असून अशाहि परिस्थितींत व्यापारी अमानुष नफेबाजी करीत आहेत.

**धारणी**—या नांवाचें बौद्ध वाङ्मय महायान पंथाचा मोठा व महत्त्वाचा भाग आहे. अथर्ववेदांत जसे अनेक प्रकारचे मंत्रतंत्र दिले आहेत, तसे बौद्ध लोकांनींहि मंत्रतंत्र तयार केले ते या धारणीनामक ग्रंथांत दिलेले आहेत. त्यांत प्रतिकूल ग्रहपीडानिवारक मंत्र, रोगनाशक मंत्र, विषबाधानिवारक यंत्र, सर्प व पिशाचें यांच्यावरील मंत्र, आयुष्यवृद्धिकारक मंत्र, युद्धांत विजयप्राप्ति होण्याचे मंत्र, सुखावती स्वर्गांत पुन्हां जन्म प्राप्त होण्याचे मंत्र, वाईट जन्म न येण्याबद्दलचे मंत्र, वगैरे अनेक मंत्र आहेत. धारणींचा प्रयोग पंचमहाभूतांवर चालतो; इतकेंच नव्हे तर त्यांच्या योगानें गरोदर स्त्रीला पुत्र अथवा कन्या तिच्या इच्छेनुरूप प्राप्त होऊं शकते. कांहीं धारणी तत्त्वज्ञानविषयक सूत्रांचा एक प्रकारचा संग्रह असून त्यांमध्यें तत्त्वांच्या सारांशापेक्षां गूढार्थक व दुर्बोधार्थक शब्दांना अधिक महत्त्व दिलेलें असतें. सद्धर्मपुंडरिकाच्या प्रकरणामध्यें धारणी आढळतात; तसेंच लंकावताराच्या शेवटच्या दोन भागांत आढळतात.

**धारवाड**— मुंबई इलाख्याच्या दक्षिण भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ४,५७६ चौ. मैल व लो. सं. १२,०१,१०६. पैकीं शें. ८६ हिंदू, शें. १२ मुसलमान व शें. १ जैन आहेत. येथें लिंगायतांची संख्या बरीच मोठी आहे. यांत मलप्रभा, वेणीहक्क, तुंगभद्रा, वरदा, कुमुद्वती, धर्मानदी व गंगावळी या नद्या आहेत. येथील जंगलांत साग, खैर, बाभूळ, शिसव, नांदूरकी, हिरडा, उंबर, चंदन, चिंच, बांबू, वगैरे झाडें आहेत. पाऊस सरासरी ३३ इंच पडतो. येथें गहूं, कापूस, तूर, हरभरा, कुळीथ, ऊंस, मिरची, वगैरे पिकें होतात. मुख्य पिकें ज्वारी व भात हीं आहेत. येथील कापूस चांगल्या प्रतीचा असतो. येथील घोडे पूर्वी चांगल्या जातीचे असत. पण हल्लींची जात खुजट, बेढब व हलक्या दर्जाची आहे. येथें टांकीं व तलाव पुष्कळ असून ते फार जुने आहेत. धर्मा नदीचा कालवा मुख्य असून इतर कालवेहि आहेत. पूर्वी येथें सोनें पुष्कळ सांपडत असे व अद्याप थोडेंबहुत सांपडतें.

सुती व रेशमी कापड, घरगुती कामास लागणारीं नेहमींचीं भांडीं व दागिने हे जिन्नस तयार होतात. नवलगुंद येथें सुंदर गालिचे तयार करतात. धारवाड येथें कांचेच्या बांगड्या तयार होतात. हुबळी व गदग येथें सरकी काढण्याच्या, कापूस दाबण्याच्या आणि सूत काढण्याच्या गिरण्या आहेत.

धारवाड तालुक्याचें क्षे. फ. ४३२ चौरस मैल आहे. या तालुक्यांत धारवाड व हुबळी हीं दोन मोठीं गांवें असून खेडीं १२९ आहेत. लो. सं. १,३०,०७०. येथें पाऊस ३४ इंच पडतो.

गांव—हें गांव मद्रास सदर्न मराठा रेल्वेच्या फांट्यावर आहे. लो. सं. सु. चाळीस हजार. येथें एक जुना पडीक किल्ला आहे. बालेकिल्ला व मुख्य किल्ला या दोहोंभोंवतीं खंदक होता. उंच जागीं असलेल्या कलेक्टर कचेरीजवळ उल्वी बसाप्पाचें देवालय व त्याच्या पलीकडे धारवाड किल्ल्याचें जणुं नाकच अशी मैलारलिंग टेंकडी आहे. पूर्वी गांवाभोंवतीं तट व पांच दरवाजे होते. विहिरींचें पाणी खारें असल्यामुळें नळ येण्यापूर्वी तलावाचें पाणी पीत. सर्वांत मोठा हिरेकेरी तलाव असून कोपडकोरी, हळकेरी, लाल, परमनकट्टी हे लहान तलाव आहेत. येथें पुष्कळ देवळें असून सर्वांत जुनें व्यासरायाचें रायर हनुमानाचें देऊळ आहे. इ. स. १५१० च्या सुमारास विजयानगरकरांनीं जीं सर्वत्र ३६० मारुतीचीं देवळें बांधलीं त्यांपैकीं हें एक आहे. नुकत्या स्थापन झालेल्या कर्नाटक विद्यापीठाचें हें मुख्य ठिकाण आहे. धारवाडमध्यें दोन कॉलेजें व ६ हायस्कुलें आहेत. कर्नाटक संशोधन संस्था सरकारच्या पुरस्कारानें चालली आहे. महाराष्ट्रांत पुण्याला जें महत्त्व आहे तें कर्नाटकांत धारवाडला सर्व दृष्टींनीं आहे.

धारवाडचा किल्ला धारराव नांवाच्या एका अधिकाऱ्यानें १४०३ मध्यें बांधला असें सांगतात. याच्या एका दरवाजावर फारसी लेख आहे. शिवाजीनें १६७४ त धारवाड जिंकलें; तें १६८५ त मोंगलांकडे गेलें. १७५३ त पेशव्यांनीं जिंकून घेतलें. त्यानंतर कांहीं काळ हैदर-टिपूकडे होतें. १७९१ त परशुरामभाऊ पटवर्धनानें टिपूपासून किल्ला घेतला; तो पुढें इंग्रजांकडे गेला.

**धारावर्ष परमार** (११६२-१२१८)—अबूच्या परमारांपैकीं यशोधवलाचा हा थोरला मुलगा महापराक्रमी निपजला. नाडोळच्या केल्हण चौहानाच्या शृंगारदेवी व गीगादेवी या दोन मुली याच्या बायका होत्या. गुजराथचा राजा कुमारपाल व उत्तर कोंकणचा राजा मल्लिकार्जुन शिलाहार यांच्यांत परस्पर झालेल्या झगड्यांत यानें कुमारपालच्या बाजूस राहून चांगला पराक्रम गाजवला. अबूच्याखालीं कायद्राजवळ शहाबुद्दिन घोरी व कुतुबुद्दिन ऐबक यांच्याशीं झालेल्या लढायांत यांचें शौर्य दृष्टोत्पत्तीस आलें. दक्षिणचा यादवराजा सिंघण व दिल्लीचा शमसुद्दिन अल्तमश यानीं गुजराथवर स्वारी केली असतां यानें तेथील राजास बहुमोल मदत दिली. हा एका बाणानें तीन म्हशी मारीत असे अशी ख्याती आहे.

शिलालेखावरून उपलब्ध झालेल्या माहितीप्रमाणें याचा राज्यकाल सत्तावन्न वर्षांचा ठरतो.

**धारावी किल्ला**—मुंबई, ठाणें जिल्हा. वसई खाडीच्या तोंडाशीं धारावी बेटांतील एका टेंकडीवर बांधलेला किल्ला. यांत पूर्वी पोर्तुगीज लोकांचें देऊळ होतें. १७३९ सालीं हा किल्ला चिमणाजीआप्पानें पोर्तुगीजांपासून जिंकून घेतला. येथें उत्तम दगडाच्या खाणी आहेत व डोंगरात पुष्कळ गोड्या पाण्याचे झरे आहेत.

**धारीवाल**—पंजाब, गुरुदासपूर जिल्ह्यांतील व तालुक्यांतील एक गांव. येथें कापड, फ्लानेल, साटीन, वगैरेंच्या गिरण्या आहेत. चांगलीं ब्लँकेटें व धाबळ्याहि तयार होतात.

**धार्मिक उत्सव**—प्रत्येक राष्ट्रांत बऱ्याच महिन्यांतून उत्सव असतात, व त्यांना धार्मिक स्वरूप असल्यामुळें ते बहुधा सर्वांकडून पाळले जातात. हिंदुस्थानांत वैदिक काळांत चातुर्मास्य उत्सव, सोमयज्ञ, अश्वमेधयज्ञ, अयनोत्सव, द्वादशरात्र्युत्सव व इतर अनेक प्रकारचे यज्ञ होत असत. तेथें धार्मिक विधी व गार्गी-संवाद, वीररसपरकाव्यें म्हणणें, गायन, इ. होत असे. अर्वाचीन काळांत उत्तर हिंदुस्थानांत वसंतोत्सव व बंगाल्यांत दुर्गादेवी ऊर्फ महाकाली उत्सव फार महत्त्वाचा आहे. दक्षिणेंत दिवाळीचा उत्सव मोठा असतो. सर्वसामान्यपणें हिंदू लोकांत चैत्रांत पाडवा, संक्रांत व रामनवमी, श्रावणांत गोकुळअष्टमी व नागपंचमी, भाद्रपदांत गणेशचतुर्थी, आश्विनांत विजयादशमी व दिवाळी, फाल्गुनात होलिकोत्सव ऊर्फ होळी हे उत्सव आहेत. शिवाय निरनिराळ्या स्थानिक देवतांचे सार्वजनिक उत्सव आणि जत्रा मोठ्या थाटानें होतात. महत्त्वाच्या सणांवर या कोशांत स्वतंत्र लेख दिलेले आढळतील.

बौद्ध लोकांत वस्स, पवारणा, कठिण, तीन ऋतूत्सव व संगीतें हे उत्सव होत असत. जैन लोकांत पज्जुसन, सिद्धिचक्रोत्सव, ऋतूत्सव, ज्ञानपंचमीचा उत्सव, मौन्यारसोत्सव, आंबेलोत्सव, गोमटेश्वर स्नानयात्रा, इत्यादि उत्सव साजरे करतात.

मुसलमानांचा सर्वांत मोठा सण अल्ईद अल्फगीर हा होय. रमजानचा महिना उपवासाचा पाळल्यानंतर हा तीन दिवसांचा उत्सव फार थाटानें केला जातो. याशिवाय लैलत अलकद्र, मोहरमचे सहा दिवस, महमदाचा जन्मदिन व मृत्युदिन, हसन-हुसेनचे जन्म-मृत्युदिन, इत्यादि उत्सव साजरे केले जातात.

प्राचीन ग्रीक लोकांमध्यें लेनैया, डायोनिशिया, पनथेनैया हे उत्सव, तसेंच ऑलिंपिक उत्सव, डेल्फाय येथील अपोलो देवतेचा उत्सव, हे उत्सव अतिशय थाटांत होत असत व त्या वेळीं मिरवणुकी, खेळ, नाटकें, वगैरे केलीं जात असत.

ख्रिस्ती लोकांत ईस्टर, ख्रिसमस, होली वीक, ट्रिनिटी सन्डे, असेन्शनडे, सेंट जॉन दि बॅप्टिस्ट व सेंट मायकेल यांचे उत्सव, पेंटेकॉस्ट, ॲडव्हेंट, कार्पस ख्राइस्टी, इत्यादि महत्त्वाचे सण आहेत.

**धार्मिक संस्थांचा कायदा**—रिलिजिअस सोसायटीज् ॲक्ट, ह्या कायद्याचा उद्देश, धार्मिक पूजाअर्चा वगैरे कामें करणाऱ्या ज्या मंडळ्या ( बॉडीज् ) आहेत, त्या मंडळ्यांतील इसमांनीं सदर धार्मिक कार्याकरितां मिळवलेली मिळकत कोणत्या नियमांप्रमाणें वहिवाटावी, तसेंच अशा मंडळ्या कोणत्या रीतीनें रद्द कराव्या, आणि नंतर त्या मंडळ्यांचीं कामें कशीं चालवावीं, वगैरेंबाबत नियम करणें, हा आहे. अशा धार्मिक संस्थांची मिळकत विश्वस्तां( ट्रस्टी )च्या ताब्यांत देण्यांत यावी, आणि मिळकतीची देणगी देणाऱ्यानें विश्वस्त नेमण्याबद्दलची योजना केलेली नसेल, तर सदर मंडळ्यांनीं आपल्या बहुमतानुसार विश्वस्त नेमावे ( कलम २ ). मिळकत विश्वस्तांच्या ताब्यांत देण्याचा कायदेशीर दस्तैवज करण्याची आवश्यकता नाहीं. अशी एखादी मंडळी तीन-पंचमांश सभासदांनीं मान्य केलेल्या ठरावानें रद्द करतां येते व त्यांनीं सदर मंडळीच्या मिळकतीची विल्हेवाट कशी करावयाची तें ठरवावें. त्यांच्यांत मतभेद झाल्यास त्याचा निर्णय दिवाणी कोर्टाकडून घ्यावा. अशी मंडळी रद्द झाल्यावर सदर संस्थेचें देणें देऊन जी मिळकत उरेल ती फायदा म्हणून सभासदांनीं वांटून घेतां कामा नये; तर ती उरलेली मिळकत तशाच प्रकारचें धार्मिक कार्य करणाऱ्या दुसऱ्या एखाद्या मंडळीला द्यावी ( कलम ७ ).

**धार्मिक संस्थांच्या देणग्यांचा कायदा**—( रिलिजिअस एन्डौमेंट ॲक्ट ). हा कायदा १८६३ सालीं झाला. याचा उद्देश, हिंदु देवळें, मुसलमानांच्या धार्मिक मशिदी, वगैरे संस्थांच्या मिळकतीच्या उत्पन्नाची व्यवस्था व व्यय योग्य प्रकारें व्हावा म्हणून व्यवस्था करणें हा आहे. अशा कामाकरितां ट्रस्टी, मॅनेजर, किंवा सुपरिटेंडंट नेमलेला नसेल तर अशा धार्मिक संस्थेशीं हितसंबंध असलेल्या कोणाहि इसमानें दिवाणी कोर्टाकडे अर्ज करून तशी नेमणूक करून घ्यावी ( कलम ५ ). शिवाय प्रांतिक सरकारनें अशा संस्थांवर देखरेख ठेवण्याकरितां प्रत्येक जिल्ह्यांत किंवा प्रादेशिक विभागांत एक किंवा अनेक कमिट्या नेमाव्या. त्या कमिटींत तीन किंवा अधिक सभासद असावे व ते सभासद त्या त्या धर्माचे असावेत व त्यांची निवड त्या धार्मिक संस्थेशीं हितसंबंध असणाऱ्या इसमाकडून करवावी ( कलमें ७।८ ). ही नेमणूक तहाहयात असावी. या कमिटीचा सभासद ट्रस्टी किंवा मॅनेजर नसावा. ट्रस्टीनें किंवा मॅनेजरनें त्याच्या ताब्यांतील मिळकतीच्या जमाखर्चाचे व्यवस्थित हिशोब ठेवले पाहिजेत; आणि सदर कमिटीनें ते हिशोब दरसाल तपासले पाहिजेत ( कलम १३ ). ट्रस्टींनीं अन्याय्य कृत्य केलें तर ज्या इसमाला सदर देवळांत किंवा मशिदींत जाऊन धार्मिक कृत्य करण्याचा किंवा धार्मिक कृत्यात भाग घेण्याचा हक्क आहे अशा कोणा हितसंबंधी इसमानें ट्रस्टींविरुद्ध दिवाणी कोर्टांत दावा लावावा ( कलम १४ ).

**धांव**—( टायर ). गाडीच्या चाकावर लोखंड, पोलाद किंवा रबर याची जी पट्टी बसविलेली असते तिला धांव असें म्हणतात. हिच्या योगानें चाकाची झीज कमी होते. रबरी धांवेच्या योगानें झटकेहि कमी बसतात व त्यामुळें चाकें जलद फिरूं शकतात. स्वारीच्या गाड्या, मालाच्या गाड्या, रेल्वेचे डबे, वगैरेंस लोखंडी किंवा पोलादी धांवा बसविलेल्या असतात. या धांवा बसवितांना प्रथम तापवून लाल करितात म्हणजे त्या प्रसरण पावलेल्या असतात. व नंतर निवाल्यावर त्या आकुंचन पावून चाकावर घट्ट बसतात. रबराच्या धांवा दोन प्रकारच्या असतात. एकामध्यें हवा भरलेली असते व दुसऱ्या भरीव असतात. मोटारगाड्या वगैरेंना हवा भरलेल्या धांवा बसवितात व ही हवा एका पडदा बसविलेल्या नळींतून भरण्यांत येते. मोटारच्या चाकावर रबराप्रमाणेंच जाड दोऱ्यांचे थर एकाआड एक घट्ट दिलेले असतात व त्या सर्वांचें रबर पातळ करून ( व्हल्कनाइझ्ड ) एकीकरण केलेलें असतें. ओझ्याच्या गाड्यांना पूर्वी भरीव रबराच्या धांवा बसवीत असत. परंतु अलीकडे मजबूत पोकळ धांवा बसविण्यात येऊं लागल्या आहेत.

**धावडशी**—मुंबई, सातारा जिल्हा. हें गांव साताऱ्याच्या वायव्येस सहा मैलांवर आहे. ब्रह्मेंद्रस्वामी ऊर्फ भार्गवराम यांची समाधि व मठ येथें आहे. स्वामींचा व तत्कालीन सर्व प्रमुख मराठे ( छत्रपति, पेशवे व इतर सरदार या ) मुत्सद्यांचा परस्पर गुरुशिष्य संबंध असे. येथील भार्गवरामाचें देऊळ, दोन तलाव, स्वामींची गुहा व कांहीं वस्तू पाहण्यासारख्या आहेत. देवळांत एक शिलालेख आहे.

**धावडा**—रावी नदीपासून पूर्वेस मध्य व दक्षिण हिंदुस्थानभर हीं झाडें आहेत. धावड्याचा डिंक हा चिटे छापण्याच्या कामीं उपयोगांत आणतात. हा डिंक परदेशीं पुष्कळ पाठविला जातो. या झाडाच्या पानांपासून काळा रंग काढितां येतो. पानांपासून रांपट द्रव्यहि काढितात. या झाडाचें लांकूड मजबूत व चिवट असतें. परंतु हें कमावतांना अथवा सुरवतांना त्याला

भेगा पडतात. कुऱ्हाडीचे दांडे, आंस, इत्यादि वस्तू, लांकडी सामान व जहाजें हीं करण्याच्या कामीं या लांकडाचा उपयोग होतो. फळें कफ व पित्त यांचा नाश करतात. जखम भरून येण्यास साल कुटून घोड्याच्या मुतांत कालवून जखमेला लावतात.

**धांवरें**—(इं. एरिसिपेलस. सं. विसर्प). हा एक संसर्गजन्य त्वग्रोग असून श्रेणिचक्रिका (स्ट्रेप्टो कॉकस) नांवाच्या जंतूचा संसर्ग होऊन हा उत्पन्न होतो. थंड, दमट हवा या रोगास पोषक असते. हा १५ वर्षांखालील लहान मुलांस क्वचित् होतो व पुरुषांपेक्षां स्त्रियांमध्यें हा अधिक आढळतो. याचीं पूर्व लक्षणें म्हणजे थंडी वाजून शहारे येणें, डोकें दुखणें, वांति होणें, घसा दुखूं लागणें हीं होऊन शरीरावर किंवा विशेषतः चेहऱ्यावर पुटकुळ्या दिसूं लागतात व तो भाग तांबडा होऊन सुजतो आणि चकाकीत व नरम दिसूं लागतो. यावर उपाय म्हणून एक प्रकारची लस टोंचण्यांत येते; परंतु या रोगाबद्दल अजून एकमत आढळत नाहीं. हा रोग वाढूं नये म्हणून रोग झालेल्या भागाच्या कडा कांहीं औषधानें रंगवितात. हा रोग फार सांसर्गिक आहे; तेव्हां याचा दुसऱ्यास संपर्क न होईल यासाठीं फार जपावें लागतें. या रोगाची सांथहि उद्भवते.

**धिंग्रा, मदनलाल** (मृ. १९०९)—एक हिंदी स्वातंत्र्य-वीर. हे पंजाबमधील एका क्षत्रिय घराण्यांत जन्म पावले होते. त्यांचे वडील संपन्न असून ते अभ्यासाकरितां आपल्या एका बंधूसह इंग्लंडमध्यें गेले होते. मदनलाल हे स्वतः १९०६ सालीं आगबोटीवर काम करून स्वकष्टानें मिळविलेल्या पैशावर इंग्लंडला गेले होते व तेथें इंजिनिअरिंगचा अभ्यास करीत होते. त्या वेळीं त्यांचें वय अवघें २१ वर्षांचें होतें; तरी त्यांचा विवाह झालेला असून त्यांस एका पुत्ररत्नाचा लाभहि झालेला होता. लंडनमध्यें त्यांचा बॅ. सावरकर, पं. शामजी कृष्णवर्मा, वगैरे क्रांतिकारक देशभक्तांशीं सहवास घडला व त्यांच्या अंगांतील पूर्वजांचें क्षात्रतेज जागृत झालें. लवकरच त्यांनीं एक पिस्तुल विकत घेऊन नेमबाजीचें शिक्षण घेतलें व त्यांत प्रावीण्य मिळविलें. लंडन येथें होणाऱ्या नॅशनल इंडियन असोसिएशनच्या वार्षिक समारंभाच्या दिवशीं १९०९ च्या जानेवारींत त्यांनीं इंडिया ऑफिसचे कर्झन वायली याच्यावर पिस्तुलानें गोळ्या झाडून त्यांस यमसदनीं पाठविलें. याकरितां त्यांस १७-८-१९०९ रोजीं पेंटनव्हिल तुरुंगांत फांशी देण्यांत आलें.

**धुकें**—जमिनीजवळच्या ढगांचा एक प्रकार. हवेंत जे धुळीचे कण असतात त्यांभोंवतीं हवा थंड झाली असतां पाण्याचें आवरण चढतें. वारा वाहत नसला म्हणजे असे थेंब हवेंत लोंबत राहतात. व त्यामुळें पांढरें धुकें दिसतें. शहरांत धुरामुळें काळें धुकें जमतें. दिवसांतून जेव्हां हवामानांत निरनिराळ्या वेळीं पुष्कळ फरक पडतात त्या ऋतूंत नेहमीं अशीं धुकीं तयार होतात. धूर सांठल्यामुळेंहि धुकें बनतें. जमिनीवरची हवा या धुक्यामुळें वर जाऊन गरम होत नाहीं व सूर्याचे किरणहि वरून जमिनीवर पडूं शकत नाहींत.

धुक्याचा इषारा—समुद्रावर जेव्हां धुकें पडतें तेव्हा त्याबद्दल जहाजांना इषारा मिळावा म्हणून आवाज काढण्याची योजना केलेली असते. हा आवाज घंटा, ढोलकें, तास, तोफ, शिटी, कर्णा, वगैरे कोणत्या तरी साधनानें काढण्यांत येतो. शिटी वाजविण्याकरितां केलेल्या योजनेंत छिद्रें असलेली एक तबकडी दुसऱ्या तसल्या तबकडीसमोर फिरण्याची योजना केलेली असते. या छिद्रांतून दाबलेली हवा किंवा वाफ सोडण्यात येते; म्हणजे त्यांतून आवाज निघूं लागतो. असा आवाज समुद्रावर २० पासून ३० मैलांवरहि ऐकूं जातो. रेल्वेमध्येंहि असे धुक्याचे इषारे देण्याची योजना असते. ती अशा प्रकारची असते कीं, एका पेटींत कांहीं स्फोटक द्रव्य भरून ती पेटी रुळांवर ठेवण्यांत येते. एंजिनाचा धक्का त्या पेटीस लागतांच एक बार उडतो. अलीकडे बिनतारी तारायंत्रानें असे संदेश देण्याची पद्धति रूढ झाली आहे.

**धुरंधर, (रा. ब.) महादेव विश्वनाथ** (१८७१-१९४४)—एक महाराष्ट्रीय चित्रकार. यांचे चित्रकलेंतील आद्यगुरु सुविख्यात चित्रकार आबालाल रहिमान हे होत. सन १८९० मध्यें कोल्हापुरच्या 'स्कूल ऑफ आर्ट्स' मध्यें प्रवेश करून यांनीं आपल्या कलानैपुण्यानें मेजर ग्रिफिथ व मेजर ग्रीनवुड या प्रिन्सिपॉलांकडून वाहवा मिळवली. तसेंच कलानिपुण विद्यार्थ्यांसाठीं ठेवलेलें मेयोपदकहि यांना मिळालें. पुढें अनेक वर्षें अध्यापक, इन्स्पेक्टर, व्हाइस प्रिन्सिपॉल, इत्यादि नात्यांनीं यांनीं स्कूल ऑफ आर्ट्समध्यें यशस्वी कामगिरी केली.

चित्रकलेंतील चित्ररचना (पिक्चर कांपोझिशन) या विभागांतील प्रावीण्याबद्दल यांची विशेष ख्याती होती. तसेंच यांचें स्त्री-व्यक्तिरेखनहि अत्यंत कुशलतेनें केलेलें असे. १९३२ सालीं लंडनमध्यें यांनीं आपल्या चित्रांचें प्रदर्शन भरवलें होतें. नव्या दिल्लींतील इंपीरियल सेक्रेटरीएटच्या इमारतींतील चित्रें रंगविण्याची कामगिरी यांच्याकडेच सोंपवण्यांत आली होती.

१९०३ सालीं मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियमचे विश्वस्त व १९३४ सालीं नागपूर आर्ट सोसायटीच्या परीक्षकांचे प्रमुख म्हणून यांचीच निवड झाली. प्रकाशक व लेखक या नात्यांनींहि हे लोकांपुढें आले. किंकेडचें 'डेक्कन नर्सरी टेल्स', आटो रॉथफिल्डचें 'वीमेन ऑफ इंडिया'; एस. एम. एडवर्डचें 'ब्रायवेज

ऑफ बाँचे' यांसारखीं व इतर मराठी, हिंदी व गुजराथी पुस्तकें यांना प्रसिद्धि देण्याची कामगिरी यांनीं केली.

जुन्या पिढींतील चित्रकार असूनहि नवीन कल्पनांचें हे स्वागतच करीत व उदयोन्मुख चित्रकारांना मार्गदर्शन करीत.

**धुराचें इंजिन**—(गॅसोलाइन एंजिन). ज्या इंजिनामध्यें पेट्रोल किंवा दुसरें एखादें हलकें तेल घालून त्याचें तुषारांत रूपांतर करून नंतर त्याचा स्फोट करून त्याच्या जोरानें पंच-पात्रांतील दट्ट्या पुढें-मागें सरकवून गति उत्पन्न करतां येते, त्या यंत्रास हें नांव देण्यांत येतें. या पद्धतीस अंतर्ज्वलनपद्धति असें म्हणतात. अंतर्ज्वलन यंत्र पाहा.

**धुराडें**—तापका (बॉयलर)मध्यें जळलेल्या कोळशाचा धूर उंच हवेंत सोडून द्यावा लागतो; कारण तो मनुष्याच्या जीविताला अपायकारक असतो. म्हणून हा धूर हवेंत उंच जाण्याकरितां उंच नळाचें धुराडें बांधतात. धुराड्याची उंची म्युनिसिपालिटीच्या कायद्यावर अवलंबून असते. शिवाय धुराड्यामुळें कोळसा पेटण्यास मदत होते; कारण धूर हलका असल्यामुळें वरवर जातो व त्याच्या जागीं दुसरी ताजी हवा बॉलयरमधील भट्टींत शिरते व कोळसा चांगला जळतो. धुराडें चांगलें अघळपघळ बांधावें, म्हणजे कोळसा जास्तींत जास्त जळण्यास अडचण पडत नाहीं. धुराडें आंतून सारख्या व्यासाचें बांधावे किंवा खालीं व्यास कमी ठेवून वर जास्त ठेवावा.

**धुरी**—(फ्युमिगेशन). खोली, कपडे, बिछाना, वगैरे रोगजंतुरहित करण्याकरितां त्यांस औषधी धूर देण्याच्या क्रियेस धुरी देणें असें म्हणतात. अशी धुरी सामान्यतः पुढील पदार्थांची देण्यांत येते:— १ गंधक (उघडा जाळून किंवा गंधकस अम्ल वायु नळकांड्यांत भरून); २ हरवायु (चुन्यांत मिसळून केलेल्या मिश्रणापासून); पिपील मद्यानार्द्र (फॉर्मलडिहाइड). या पदार्थांनीं ही धुरीची क्रिया करण्यांत येते. पिपील मद्यानार्द्राचें द्रावण सर्वांत चांगलें. कारण त्यामुळें धातूंच्या जिनसांना डाग पडत नाहींत. धुरी दिल्यानंतर जागा सहा तास बंद ठेवावी लागते.

**धुळप**—एक मराठे सरदार घराणें. धुळप यांचें मूळचें उपनांव मोरे. हे मूळ उत्तर हिंदुस्थानांतील रहिवासी. ह्या घराण्यांतील परसोजी बाजी व जयाजी बाजी या उभयतां बंधूंनीं सह्याद्रीच्या पूर्वेस कृष्णा व वारणा या दोन नद्यांच्यामध्यें जावळी व त्याच्या सभोंवतालचा मुलूख काबीज करून, जावळी हें आपल्या राहण्याचें ठिकाण केलें. या मोरे घराण्यांतील मंडळी स्वसंरक्षणार्थ विजापूरच्या बादशहाच्या आश्रयास जाऊन राहिली. विजापूरकरांच्या वतीनें समशेर गाजविल्यामुळें बादशहानें खुष होऊन मोऱ्यांना 'धुळप' असा बहुमानांचा किताब दिला. विजापूरकर व शिवाजी यांच्या झटापटींत या मोऱ्यांपैकीं-धुळपांपैकीं बरीच मंडळी कामास येऊन शेवटीं छत्रपतींच्या धाकानें अवशिष्ट मंडळी वाट फुटेल तेथें जाऊन राहिली. इ. स. १७६४ मध्यें हणमंतराव मोरे याचे वंशज आनंदराव धुळप (पाहा) या दर्यायुद्धांत नाणावलेल्या सरदाराकडे मराठ्यांच्या आरमाराचें आधिपत्य आलें. आनंदरावाप्रमाणेंच हरबाजीराव, जानोजीराव, इत्यादि धुळप मंडळींनीं आरमाराची उत्कृष्ट कामगिरी करून पेशव्यांकडून वेळोवेळीं बक्षिसेंहि मिळविलीं. ले.प्रूएन वगैरे इंग्रजांशीं झालेल्या दर्यायुद्धांत (१७८३ एप्रिल) धुळपांनीं फार पराक्रम केला. त्याबद्दल पेशव्यांनीं त्यांस फार गौरविलेहि. इ. स. १८१८ मध्यें पेशवाई नष्ट झाल्यानंतर त्यांच्या वंशजांस इंग्रजांनीं 'पोलिटिकल पेन्शन' (राजनैतिक वेतन) करून दिलें. पुण्यांत सदाशिव पेठेंत चिमण्या गणपतीजवळ धुळपांचा वाडा होता.

**धुळें**—मुंबई, पश्चिम खानदेश जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ७६० चौ. मैल. लो. सं. १,८०,४४९. यांत दोन शहरें व १५१ खेडीं आहेत. यांतून पांजरा व बोरी या नद्या वाहतात. पाऊस २२ इंच पडतो. धुळें गांव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. सु. चाळीस हजार आहे. लळिंगचा किल्ला येथून ६ मैलांवर आहे. येथें कापसाचा मोठा व्यापार चालतो. उत्तरेकडून आलेले मोमीन अथवा जुलाही हे येथील मुसलमान लोक उत्तम साड्या व लुगडीं विणतात. गांवास पांझरा नदीचे पाट असल्यामुळें बागायती बरीच आहे. धुळ्यानजीक खंडोबाचें, देवीचें, व महादेवाचें ही हेमाडपंती जुनीं देवळें आहेत. दर मंगळवारीं येथें मोठा बाजार भरतो. धुळ्यांतून मुंबई-आग्रा सडक गेली आहे. येथें दवाखाने, हायस्कुलें, मराठी अध्यापन शाळा, उद्योग शाळा, एक कॉलेज, राजवाडे संशोधनमंदिर, समर्थ वाग्देवता मंदिर, वगैरे संस्था आहेत. कांहीं गिरण्या आहेत व कापसाची मोठी पेठ आहे.

**धूप**—एक सुगंधी राळ, ऊद. हा अनेक वृक्षांपासून काढतात. पण सामान्यतः यांसाठीं गुग्गुळाचें झाड प्रख्यात आहे. हें झाड सोमालिलँड व अरबस्तानचा किनारा या ठिकाणीं होतें; तेथून हिंदुस्थानांत त्याचें आगमन झालें असावें. धार्मिक विधींत व पूजार्चनांत धूप लागतो. बायबल (जुना करार) मध्यें याचा उल्लेख आहे.

**धूपारती**—देवापुढे सुवासासाठीं धूप जाळण्याचा म्हणजे धूपारती करण्याचा प्रकार आपल्या इकडल्याप्रमाणें ईजिप्त, बाबिलोनिया, असीरिया, ग्रीस, रोम, वगैरे प्राचीन राष्ट्रांतूनहि होता. आज कॅथॉलिक देवस्थानांत मोठमोठ्या प्रार्थनांच्या वेळीं धूप जाळतात पण इतर ख्रिस्ती चर्चमधून याचा क्वचित् उपयोग

करतात. तथापि धूप जाळूं नये असा निर्बंध मात्र कोठें नाहीं. महाराष्ट्रांत संध्याकाळच्या आरतीला धूपारती म्हणतात. त्या वेळीं सकाळप्रमाणें सर्व पूजा नसते; नुसतें निरांजन-उदबत्ती लावतात व दूध-साखरेचा नैवेद्य दाखवितात. पूजेंत धूप-दीप-नैवेद्य हे प्रकार असतात व धूपाऐवजीं उदबत्ती लावतात. धूप जाळण्याच्या पात्राला धुपाटणें म्हणतात. मुसलमानी प्रार्थनामंदिरांतून लोभान (ऊद-धूप) एकसारखा धुपाटण्यांत जळत असतो.

**धूमकेतु**—एक आकाशस्थ ज्योति. धूमकतूची माहिती फार प्राचीन काळापासून लोकांना दिसते. वराह मिहिरानें ६२ श्लोकांचा एक सबंध अध्याय (बृ. सं. ११) धूमकेतूकडे खर्च केला आहे. इ. स. च्या आरंभापासून आजपर्यंत ५०० वर धूमकेतू नुसत्या डोळ्यांनीं दिसल्याचे उल्लेख सांपडतात. मागें मोठमोठीं अरिष्टें आलीं त्या वेळीं धूमकेतू आकाशांत दिसले असें आढळून येतें. पण पाश्चात्य ज्योतिषशास्त्रज्ञ हॅले व न्यूटन यांच्या वेळेपासून धूमकेतूंबद्दलची नियमबद्धता सिद्ध झाली. धूमकेतूचे तीन भाग असतात. अग्रभागीं एक तारा व त्याभोंवतीं धुरासारखी लहानशी शेंडी ऊर्फ शिखा असते, व मागील बाजूस पताकेसारखें एक मोठें शेपूट असतें. त्याला केतु अथवा पुच्छ असें म्हणतात. कांहीं धूमकेतूंना दोनतीन पुच्छें असतात. कांहीं धूमकेतू सूर्यापेक्षांहि मोठे असतात. त्यांचें पुच्छ लक्षावधि मैल असतें.

लांबलचक पुच्छ असलेले व ताऱ्यासारखें तेजःपुंज डोकें असलेले धूमकेतू कधींकाळीं आकाशांत दिसतात. ग्रहांचे भ्रमणाचे नियम निश्चित ठाऊक असल्यामुळें ते आकाशांत कधीं व कोठें दिसतील हें गणितानें काढतां येतें. परंतु धूमकेतूंचे प्रदक्षिणाकाल वगैरे माहीत नसल्यामुळें ते अनियमित काळीं आढळतात. कांहींच्या कक्षा परवलयित (पॅराबोलिक) आहेत. तेव्हां त्यांचें आयुष्यांत एकदां दर्शन झालें कीं संपलें. परंतु कांहींच्या कक्षा लंबवर्तुळाकार आहेत. ते कांहीं काळानंतर उगवतात.

कांहीं धूमकेतू दुर्बिणींतूनच दिसतात, तर कांहीं साध्या डोळ्यांनीं दिसतात. या दुसऱ्या प्रतीच्या धूमकेतूचें पुच्छ कधीं लहान तर कधीं अर्धे आकाश व्यापणारें असतें. सूर्याच्या विरुद्ध दिशेनें पुच्छाचा विस्तार होतो, व धूमकेतु सूर्यापासून किमान अंतरावर, रविनीच (पेरिहेलिअन) आल्यावर पुच्छाची स्थिति अतिशय वेगानें बदलते. धूमकेतूच्या शीर्षाचा तेजस्वीपणा सर्व ठिकाणीं सारखा नसतो. मध्यगाभा (न्यूक्लस) जितका तेजस्वी असतो तितकें भोंवतालचें आवरण (कोमा) तेजस्वी नसतें.

टायको ब्राहीनें धूमकेतूचें दर्शन म्हणजे केवळ दैवी चमत्कार आहे ही समजूत प्रथम घालविली आणि १५७७ सालचा धूमकेतु आकाशांत पृथ्वीपासून चंद्रापेक्षां जास्त अंतरावर आहे, असें अनुमान काढलें. १६८० सालच्या धूमकेतूसंबंधीं वेध घेऊन न्यूटननें असें दाखविलें कीं, हे दुसऱ्या ग्रहांप्रमाणें सूर्य एका केंद्रांत आहे अशा लंबवर्तुळांत फिरतात, त्या लंबवर्तुळाची केंद्रच्युति (एक्सेंट्रिसिटी) फार असते व त्याचा सूर्यापासून कमाल अंतरावर असलेला बिंदु अंतरिक्षांत फार दूर असतो. ही सूचना हॅलेनें उचलली व टिपणें व्यवस्थित ठेवलेल्या २४ धूमकेतूंच्या अभ्यासावरून १४५६, १५३१, १६०७, १६८२ सालीं दिसलेले धूमकेतू एकच होते हें विलक्षण अनुमान काढलें. हा धूमकेतु सूर्याभोंवतीं लंबवर्तुळ कक्षेंत फिरतो व ही फेरी ७६ वर्षापेक्षां थोडी जास्त व ७५ वर्षापेक्षां थोडी कमी 'एवढया मर्यादेंत राहते. त्याचें जास्तींत जास्त सूर्यापासून अंतर ३,३०,००,००,००० व कमींत कमी ५,५०,००,००० मैल असतें. यावरून हा धूमकेतु सूर्यमालेंतील आहे व त्यावर सूर्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि ताऱ्याच्या आकर्षणाचा लक्षांत येण्याइतका परिणाम नाहीं असें सिद्ध केलें. दुसरे धूमकेतू असेच असतील असाहि तर्क करण्यांत आला. वरील धूमकेतु १८३५ सालीं पुनः परत आला व १९१० सालानंतर त्याचे अद्यापि आगमन झालेलें नाहीं. सूर्य आणि पृथ्वी यांमध्यें त्याचें शिर पृथ्वीपासून १,५०,००,००० एवढ्या अंतरावर होतें व पुच्छ शरीरापासून तुटलें असा तर्क करण्यांत आला.

'एन्के'च्या धूमकेतूचा शोध १८४८ सालीं लागला. १७८६, १७९५, १८०५ सालीं दिसलेल्या धूमकेतूशीं याचें एकत्व सिद्ध झालें व तो पुनः पुनः दिसला आहे. सूर्याभोंवतीं ३½ वर्षांत हा फिरतो व ही धूमकेतूच्या फेरीची किमान मर्यादा आहे.

बाएलच्या धूमकेतूचा १८२६ सालीं शोध लागला. १७७२, १८०६ सालीं दिसलेले धूमकेतू आणि हा एकच आहे हें सिद्ध केलें गेलें. १८३२, १८३९, १८४६ व १८५२ सालीं तो दिसला, परंतु शेवटच्या दोन वेळीं त्याचे दोन भाग दिसले. पण तो पुढें कधींहि दिसला नाहीं. यावरून तो विरला असावा असा तर्क आहे. १८७२ व १८८५ सालीं उल्कांचा जो वर्षाव झाला त्याच्याशीं ह्या विलयाचा संबंध जोडला आहे. डोनटीचा धूमकेतु फ्लारेन्सच्या डोनेटीनें १८५८ सालीं शोधून काढला.

पृथ्वी ज्या क्रांतिवृत्तांत फिरते त्या पातळींत धूमकेतूचे मार्ग नाहींत. पृथ्वीच्या कक्षेच्या पातळीला ३½° कोन करणाऱ्या समपृष्ठांत बहुतेक ग्रह फिरतात. बुधाची कक्षापातळी ७° कोन करते. लहान ग्रह बरेच मोठे कोन करणाऱ्या कक्षांतून फिरतात. परंतु धूमकेतूंच्या कक्षा शक्य तितक्या अंशांचा कोन पृथ्वीच्या

कक्षेशीं करतात. जवळजवळ ⅓ धूमकेतूंचें सूर्यापासून किमान अंतर पृथ्वीच्या किमान अंतरापेक्षां कमी आहे. १२ धूमकेतू सूर्यापासून ५,०००,००० मैलांपेक्षां कमी अंतरांत, सूर्याजवळ आहेत आणि १८४३ व १८८२ सालचे धूमकेतू सूर्यपृष्ठापासून १,००,००० मैलांपेक्षां कमी अंतरावर आले. फक्त ११ पृथ्वीच्या सरासरी किमान अंतराच्या दुपटीएवढ्या सूर्यापासून किमान अंतरावर आहेत. फक्त एकाचेंच किमान अंतर पृथ्वीच्या किमान अंतराच्या चौपटीएवढें आहे.

मोठ्या व दूरच्या ग्रहांशीं संबंध असलेली कित्येक धूमकेतूंचीं 'कुटुंबें' आहेत. तीन वर्षांपासून तों आठ वर्षांपर्यंत प्रदक्षिणेचा काल असलेले धूमकेतू गुरूच्या कक्षेच्या जवळ असलेल्या एका बिंदूपाशीं आपल्या कक्षेंत फिरत असतां येतात व गुरूच्या आकर्षणाचा परिणाम त्यांच्या कक्षेवर होतो. हर्षल, वरुण व शनि यांच्याशीं कांहींचा संबंध आहे. हर्षलाच्या सहा धूमकेतूंच्या प्रदक्षिणेचा काल सुमारें ७५ वर्षांचा आहे. हॅलेचा प्रसिद्ध धूमकेतु या सहांपैकीं एक आहे. अशींच अजून शोध न लागलेल्या ग्रहाशीं संबंध असलेल्या मोठ्या प्रदक्षिणाकाळाचीं धूमकेतूंचीं कुटुंबें आहेत असा समज आहे. ज्या वेळीं ग्रह सूर्यासारखे तेजस्वी होते अशा प्राचीन काळीं हे धूमकेतू ग्रहांतून तुटून पडलेले आहेत अशी एक विचारसरणी आहे. ग्रहांशीं संबंध असलेल्या कुटुंबसंस्थेशिवाय एकमेकांशीं निगडित झालेल्या धूमकेतूंचीं मंडळें आहेत; कारण तीं जवळजवळ एकरूप असलेल्या कक्षांतून फिरतात. १६६८, १८४३, १८८० १८८२ मधील धूमकेतू एकाच कक्षेंतून फिरतांना आढळले. यांपैकीं निदान तीन तरी निराळे असले पाहिजेत. कारण त्यांचा प्रदक्षिणा काल दीर्घ होता.

जरी धूमकेतू अतिशय विरल द्रव्याचे बनलेले असले तरी त्यांचा आकार अतिविशाल असतो. सूर्यापेक्षांहि कांहींचा आकार मोठा आहे. पुष्कळशा धूमकेतूंचें शिर पृथ्वीपेक्षांहि मोठें असतें. एका धूमकेतूचें पुच्छ १,००,००,००० मैल लांब आहे व तें याच्या दसपटहि असूं शकेल. कारण टोंकाकडे त्याचा व्याप वाढत असल्यामुळें सूर्यापेक्षांहि त्याचा व्याप विशाल असूं शकेल. सूर्याकडे धूमकेतु जसा जसा जातो तसतसें त्याचें पुच्छ वाढतें व दूर जातो तसें आंखूड होतें.

प्रकाशपृथक्करणसाधनानें असें दिसतें कीं, धूमकेतू अंशतः सूर्याच्या किरणाच्या परावर्तनानें प्रकाशतात; पण विशेषतः सूर्याजवळ असतांना स्वतेजानें प्रकाशतात. उत्कर्बा (हायड्रोकार्बन)सारखीं कर्बाचीं संयुक्तें, सिंधु (सोडिअम), लोह, वगैरे धातू यांच्यामध्यें आढळतात. कांहीं धूमकेतूच्या कक्षा कांहीं उल्कांच्या वर्षावाच्या कक्षांमध्यें मिसळलेल्या आहेत.

१९४८ च्या जानेवारींत एक धूमकेतु ऑस्ट्रेलिया, अमेरिका, आफ्रिका व हिंदुस्थान या देशांत कोठें कोठें दिसला. तो फार वेगानें सूर्याजवळ जात होता. तो पुढें मार्च महिन्यांत न दिसल्यानें सूर्याच्या सान्निध्यामुळें त्याचे दोन तुकडे झाले, असें अनुमान करण्यांत आलें.

**धूमकेतु** (१८९२- )—एक गुजराथी कादंबरीकार व लघुकथा-लेखक. हे काठेवाडांतील गोंडल खेडावल ब्राह्मण असून यांचें पूर्ण नांव गौरीशंकर गोवर्धनराम जोशी असें आहे. १९२० सालीं जुनागड कॉलेजमधून बी. ए. ची पदवी यांनीं मिळवली. साहित्य व इतिहास हे यांचे आवडते विषय होत. खेड्यांतील वातावरणावर यांची लेखणी विशेष चालते. खेड्यांतील प्रसंग रंगवून व त्यांवर करुण रसाची छटा देऊन वाचकांच्या हृदयांना पाझर फोडण्यांत यांचा हातखंडा आहे.

१ तणखा, २ अवशेष, ३ पडछाया हे यांचे कथासंग्रह अत्यंत लोकप्रिय झाले आहेत. १ राजमुकुट, २ राजकन्या, ३ कर्णावती, ४ मशहूर गवय्या, इत्यादि यांच्या सुप्रसिद्ध कादंबऱ्या होत. १९४३ सालीं बडोदें येथें भरलेल्या गुजराथी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना लाभला होता.

**धूळ**—घनपदार्थांच्या अति बारीक कणाला म्हणतात. वातावरणांत धूळ जी जमते तिला अनेक कारणें होतात. कोरड्या जमिनीवरची माती वाऱ्यानें वर उडते. ज्वालामुखींतून धुळीचे लोट उठतात. दररोज लाखों उल्का पृथ्वीच्या संघर्षानें फुटून त्यांचें उंच हवेंत धुळीच्या रूपांत विसर्जन होतें. समुद्रजलाचें बाष्पीभवन सारखें चालू आहे, व समुद्रफेस वाऱ्यावर इतस्ततः उडताहेत. त्यांतून विरलेलें मीठ कणरूपानें बाहेर पडतें व हवेंत मिसळतें. वनस्पतींचे बीजकण आणि सूक्ष्म जंतू हीं आहेतच. जळणाच्या धुरांतून असंख्य धूलिकण तयार होतात.

संशोधकांनीं एखाद्या जागेंत किती धुळीचे कण सांचतात याचीहि मोजदाद केली आहे. वेगवेगळ्या महासागरांवर याचें वेगवेगळें प्रमाण आहे. हिंदी महासागरावर सुमारें एका घनसेंटिमीटरला ५०० तर अॅटलांटिक महासागरावर २,००० कण असतात. शहरांवर बहुधा नेहमीं १,००,००० असतात. सिगारेटच्या धुराच्या एका फुंकाऱ्यांत ४,००,००,००,००० कण असल्याचा हिशेब एकदां काढला होता.

हवेंतील धुळीचा फार उपयोग आहे. संधिप्रकाश त्यामुळेंच पडतो. पाऊस, दंव, धुकें हीं धुळीच्या कणांभोंवतीं वाफ जमून तयार होतात.

**धृष्टद्युम्न**—पुरुकुलोत्पन्न अजमीढवंशीय पांचाल राजा द्रुपद याचा पुत्र. याचा जन्म अग्निकुंडांतून (द्रोणाचार्यास मारण्याकरितां) झाला. हा धनुर्विद्येंत द्रोणाचार्यांचाच शिष्य होता.

भारतीय युद्धारंभीं (भीष्मपर्वी) कृष्णाच्या सल्ल्यानें हा पांडवांचा सेनापति झाला होता. हा द्रौपदीचा भाऊ म्हणजे पांडवांचा मेव्हणा होता. अश्वत्थामा मरण पावला असें ऐकून द्रोणाचार्यांनें आपलीं शस्त्रास्त्रें भूमीवर ठेविलीं व योगसाधनानें प्राणोत्क्रमण करीत असतां धृष्टद्युम्नानें जाऊन त्याचा शिरच्छेद केला. पुढें युद्धाच्या अठराव्या दिवशीं हा शिबिरांत निद्रित असतां अश्वत्थाम्यानें याचा शिरच्छेद केला.

**धेड**—ही जात गुजराथ, राजपुताना, काठेवाड व कच्छ या प्रांतांत मुख्यतः आहे. लोकसंख्या एक लाखावर आहे. धेड हे आपण क्षत्रिय कुलांतील आहोंत, असें म्हणतात; पण महार-मांगांप्रमाणेंच या लोकांचा समाज मूळच्या अनार्य जातीचा असावा. जाडेंभरडें कापड विणणें, ओझीं वाहणें, वाटा दाखविणें, हे यांचे मूळचे धंदे होते. हे लोक मांसाहारी असून मेलेल्या गायीम्हशींचेंहि मांस खातात. यांच्या देवता मुख्यत्वें-करून गणपति, मारुति, नरसिंह व माता या असून यांचे उपाध्ये गारुड असतात. सुरत जिल्ह्यांत यांची मोठी जातिपंचायत आहे. घटस्फोट व विधवाविवाह या चाली या जातींत आहेत. राजपुतान्यांतील धेड जातींतल्या चावड, च्यासिया, चौहान, वगैरे उपनांवावरून ते अंशतः रजपूत बीजाचे असावेत, असें दिसतें. गुजराथेंतील धेड कांहीं मारवाडांतून व कांहीं कोंकणांतून आलेले आहेत. यांची भाषा अशुद्ध गुजराथी आहे. पूर्वी ते खादी विणीत व सरकारी खजिन्याची नेआण करीत. हल्लीं गिरण्यांत किंवा शेतात मजुराचा धंदा करतात. रस्ते झाडणें वगैरे कामें धेड करतात. यांच्यांत खिमो व शीवो हे साधु. होऊन गेले.

**धेंडा**—नवरी मुलगी वराच्या घरीं (वरात) निघाली म्हणजे त्या वेळीं धेंडा नाचवितात. एक माणूस नवरानवरीस आपल्या दोन्ही खांद्यांवर घेऊन नाचतो व देवाचें गाणें म्हणतो. त्या वेळीं मंगलवाद्येंहि वाजतात. 'टाळ गेला मांदळ गेला माझा धेंडा नाचूं द्या' अशा पालुपदाचीं गाणीं म्हणतात. हा एक कुलाचार असून कांहीं खेडेगांवांत ब्राह्मणापासून खालच्या जातींपर्यंत तो पाळण्यांत येतो. मात्र वधूवर लहान वयाचीं असावयास पाहिजेत. पूर्वीप्रमाणें वधूवरें अल्पवयी नसल्यामुळें सांप्रत हा विधि सर्रास आढळत नसून कमी होत आहे. धेंडा हा शब्द मूळचा अरबी आहे. एकनाथाच्या रुक्मिणी स्वयंवरांत याचें वर्णन आढळतें.

**धेनकानाल संस्थान**—ओरिसामधील एक जुनें मांडलिक संस्थान. क्षे. फ. १,४२८ चौ. मैल. यांत २ शहरें व ८६० खेडीं आहेत. हें १७ व्या शतकांत अस्तित्वांत आलें. भगीरथ महेंद्र हा फार चांगला राजा होऊन गेला. लो. सं. (१९४१) ३,२४,२१२; पैकीं पावणेतीन लाख हिंदू आहेत. या संस्थानांत धेनकानाल व भूवन हीं मोठीं गांवें आहेत. या संस्थानांत लोखंड पुष्कळ सांपडतें. राजधानीचें नांव धेनकानाल. यास निजगड असेंहि नांव असून त्याची लोकसंख्या सहा हजारांपर्यंत आहे. १९४८ सालीं हें ओरिसांत विलीन झालें.

**धेनुकाकट**—धनककट पाहा.

**धेबर तलाव**—राजपुताना, उदेपूर संस्थानांतील एक मोठा तलाव. उदेपूर शहराच्या आग्नेयीस ३० मैल. याच्या पश्चिमेस ८०० ते १००० फूट उंचीचे डोंगर आहेत. याच्या उत्तरेकडील भागांत लहान लहान बेटेंहि आहेत. नैर्ऋत्येस गोमती नदीस बांध घालून पाणी अडविलेलें आहे. सन १६८५ व १६९१ च्या दरम्यान हा तलाव राजा जयसिंगानें बांधिला व त्यावरून ह्यास जयसमुद्र हें नांव पडलें. मध्यभागीं एक सुंदर नकशीकाम असलेलें हिंदु देवालय आहे व कांठावर कांहीं वाडे आहेत. यापासून निघालेल्या कालव्यांनीं सुमारें १९ चौरस एकर जागा भिजते.

**धोडप किल्ला**—मुंबई, नाशिक जिल्हा. चांदोरच्या वायव्येस १५ मैलांवर अजिंठा अथवा चांदोर टेंकड्यांमध्यें सर्वांत उंच (४,७७१ फूट) टेंकडीवर हा किल्ला आहे. येथें दोन फारसी शिलालेख आहेत. किल्ल्यांत किल्लेदारांचा पडका वाडा, एक देवीचें देऊळ, एक टांकें, कांहीं खडकांत खोदलेलीं तळघरें व गुहा आहेत. पूर्वेच्या बाजूच्या एका मशिदींत एक देवनागरी शिलालेख आहे. राघोबादादाचा थोरल्या माधवरावानें येथेंच पराभव केला (१७६८).

**धोडिया**—हे मूळचे अनार्य होत. यांची मुख्य वस्ती गुजराथेंत असून लोकसंख्या (१९११) ९,३०,१०५ होती. हे लोक चपळ, मजबूत व ठेंगू आहेत. ते झोंपड्यांतून राहतात. यांचा मुख्य धंदा शेती व मजुरी हा आहे. यांचे उपाध्याय नाईक असतात. ठाणें जिल्ह्यांत डहाणू तालुक्यांत यांची थोडीशी वस्ती आहे. राहणी गलिच्छ असते. बायकांच्या पायांत गुडघ्यांपर्यंत तांब्यापितळेचे वाळे असतात. जखाई-जोखाई हीं यांचीं कुलदैवतें होत.

**धोंडोपंत गोखले** (मृत्यु १८००)—एक ब्राह्मण सरदार. याचें मूळ गांव तळें खाजण. प्रथम परशुरामभाऊच्या हाताखालीं सैन्यांत नोकरी. नंतर कर्नाटकचा सरसुभेदार होता. बदामीच्या लढाईंत हा पहिल्यानें पुढें आला. धारवाडचा सुभेदार होता व नंतर धोंड्या वाघ या पुंड माणसाचा बंदोबस्त करण्यासाठीं पटवर्धनांनीं याला पाठविलें. पण यास धोंड्या वाघ यानेंच हलीहाळ येथें ठार केलें. याच्या खुनाबद्दल धोंड्या वाघास प्रायश्चित दिल्याशिवाय याची क्रिया करण्यास याची पत्नी

लक्ष्मीबाई हिनें हरकत घेतली. तेव्हां पुतण्या बापू गोखले यानें वाघास ठार करण्याची प्रतिज्ञा करून तसें केलें.

**धोंड्या वाघ** (पवार)—पेशवाईतील एक लुटारू. यानें प्रथम करवीरकर व नंतर पटवर्धन यांजकडे नोकरी केली. नंतर लक्ष्मेश्वरचे देसाई यांजकडे राहिला. देसायाची रक्षा केंचव्वा ही जवळ ठेवून तिच्यासाठीं शिरहट्टीचा किल्ला बांधला. धोंड्या हा बुद्धिमान् व धाडसी असल्यामुळें हैदराप्रमाणे स्वतंत्र राज्याचा राजा व्हावें या हेतूनें त्यानें नोकरी सोडून लोक गोळा केले; व टिपू व मराठे यांचीं गांवें लुटण्यास व तेथील लोकांकडून कर घेण्यास सुरुवात केली. हावेरी, सावनूर, इत्यादि गांवें त्यानें काबीज केलीं व कांहीं गांवें उध्वस्त केलीं. त्यामुळें मराठ्यांचा सरदार परशुरामभाऊ त्याच्यावर चालून गेला. तेव्हां त्यानें टिपूच्या पदरीं नोकरी धरली व मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली. पण कांहीं कारणानें टिपूची गैरमर्जी झाल्यामुळे त्याला बंदीवास भोगावा लागला. टिपूचें राज्य गेल्यावर इंग्रजांनीं १७९९ सालीं त्याची सुटका केली. पण पुन: तो लुटालूट करूं लागला. पेशव्यांनीं धोंडोपंत गोखल्यास त्याच्या पारिपत्यास पाठविलें. पण त्यांच्यामधील लढाईत धोंड्या वाघ विजयी झाला व गोखले मारला गेला. धोंड्याचें शिर आणून देणारास ज. वेलस्लीनें दहा हजार रुपयांचें बक्षीस जाहीर केलें होतें. अखेर मराठे व इंग्रज या दोघांनीं धोंड्यावर चाल केली व ज. वेलस्लीनें कोंगलजवळ धोंड्याच्या पांच हजार सैन्याचा मोड केला. त्या चकमकींत धोंड्या मारला गेला (१८००). याचा एक तोतया पुढें निघालेला दिसतो.

**धोतरा**—[वर्ग–सोलानासी]. या वनस्पतीला संस्कृतांत धत्तूर अथवा उन्मत्त हीं सार्थ नांवें आहेत. ही वनस्पति हिंदुस्थानांत सर्वत्र आढळते. या वनस्पतीचे कांटे धोतरा (दातुरा स्ट्रॅमोनियम) व काळा धोतरा (दातुरा फॅस्टुआसा) असे दोन प्रकार आहेत. पैकीं एकाला पेल्याच्या आकारासारखें पांढरें फूल येतें व दुसऱ्याला जांभळें फूल येतें. ह्याच्या फळांतील बीं विषारी असतें. भांग विशेष मादक व्हावी म्हणून तींत ह्याचें बीं घालतात. या विषानें माणूस मरतें. दारूसारख्या पेयांत ह्याचें मिश्रण केलें तर तें मिश्रण पिणारा इसम वेडा होतो. पण दम्यावर तंबाखूप्रमाणें बियांचा धूर ओढतात. कांटे धोतऱ्याचे अनेक औषधी गुण आहेत. विंचवाच्या विषावर धोतऱ्याचा पाला हातावर चोळून दंशाच्या ठिकाणीं लावतात. अर्धांगावर बियांचें तेल अंगास चोळतात.

**धोबी**—कपडे धुणारांची ही एक जात आहे. यांना धोबी, वरठी, बरेठा, चकला, रजक, परीट, धोबा, इत्याहि दुसरीं नांवें आहेत. लोकसंख्या सुमारें वीस लाख आहे. ही जात केवळ धंद्यावरून नांव मिळालेली आहे. मुसलमान धोब्यांची स्वतंत्र निराळी जात आहे. तिची संख्या तीन लाखांवर आहे. धोबी हे महार, चांभार व मांग यांचे कपडे धूत नाहींत. लग्नांत पायघड्या घालण्यास धोब्यास बोलावतात. काश्मीर–पंजाबांतील धोबी मुख्यत्वें मुसलमान आहेत. ते सर्व पंजाबभर आढळतात. आसामांतील या जातीची लोकसंख्या (१९११) ३३,९४३, बंगाल्यांतील २,३१,८९० व ओरिसांतील ४,२७,०७९ होती. गुजराथ, काठेवाड व कच्छ इकडील धोबी अस्पृश्यांखेरीज इतर सर्वांचे कपडे धुतात. येथील धोबी रामानुज, कबीर व वल्लभ या पंथांचे आहेत. यांच्यांत १२ कुळें आहेत. कुळांचीं नांवें गांवांवरून पडलीं आहेत तीं:–बाघमार, बाघचारिया, मराठा, खटनागर, मरालबत्ती, सोनवाणी व सोनसोनवाणी. सोनवाणी हें कुल सर्वांत उच्च आहे. हल्लीं धर्मविधींना ब्राह्मण बोलावूं लागले आहेत. हे मांस खातात.

धोबीकाम—देशी धोबी कपडे धुतांना सात गॅलन पाण्यांत पांच पौंड सोडा-खार घालून त्यांत कपडे उकळतात. ओपवावयाच्या वेळीं भाताची पेज किंवा कणिक कपड्यास लावतात. युरोपांत धुण्याची पद्धत इतकी पूर्णत्वाला गेली आहे कीं, शहरांतून व खेड्यांतून तर ती आहेच, पण आगबोटीवरसुद्धां तिचें अस्तित्व आहे. धुतांना रेशमी, जरीचे किंवा लोंकरीचे कपडे निरनिराळे काढतात. ते सांसर्गिक रोगाचे वगैरे असल्यास एका यंत्रांमध्यें घालून त्यांवर वाफ सोडून जंतू नष्ट करतात. नंतर दुसऱ्या यंत्रांत घालून मळ निराळा करतात.

हल्लीं नवीन फिरतीं धुण्याचीं यंत्रें असतात. एक जाळीदार पंचपात्राच्या आकाराचा पिंजरा असून त्यांत मळके कपडे घालतात. हा पिंजरा एका पेटींत बसविलेला असतो व त्या पेटींत साबणाचें पाणी असतें. कपड्यांतील पाणी बाहेर काढण्यासाठीं जलशोषक यंत्रें वापरतात व अखेरचें वाळवण कोरड्या वाऱ्याच्या पद्धतीनें करतात. कपड्यांना इस्त्री गॅस किंवा वाफ यांयोगें तापलेल्या रुळानें होते. अशा धोबीकारखान्यांची सरकारकडून आरोग्यविषयक तपासणी होत असते.

**धोलका**—मुंबई, अहमदाबाद जिल्ह्याचा मध्य तालुका. क्षेत्रफळ ६९० चौरस मैल. धोलका हा एक मोठा गांव असून शिवाय ११७ खेडीं आहेत. लोकसंख्या (१९४१) १,१७,९३४. तालुक्यांतून साबरमती नदी वाहते. पाऊस ३४ इंच पडतो. तालुक्याचें मुख्य ठिकाण धोलका हेंच आहे. लोकसंख्या (१९४१) १७,२२२. गांवाभोंवतीं कच्च्या मातीची भिंत आहे. गुजराथमध्यें हें सर्वांत जुनें गांव आहे. पूर्वीं पांडवांनीं ज्या विराटपुरांत वास्तव्य केलें होतें तें शहर येथेंच होतें व येथेंच सूर्यवंशी राजा कनकसेन व मैनलदेवी यांस आश्रय मिळाला

होता, असें लोक समजतात. येथील लोकांचा मुख्य धंदा लुगडीं तयार करण्याचा आहे. शिवाय लोखंड व पितळ वगैरे धातूंचें, मातीचें व लांकडाचें सामान तयार करतात. मराठ्यांनीं हा गांव १७३६ सालीं घेतला. नंतर हा गायकवाडाकडे १७५७ त आला व १८०४ सालीं इंग्रजांकडे आला.

**धोलपूर संस्थान**—राजपुतान्यांतील अगदीं पूर्वेकडचें संस्थान. क्षेत्रफळ १२२१ चौरस मैल आहे. वाघ, चित्ता, अस्वल, सांबर, नीलगाय, डुक्कर, खोकड, वगैरे श्वापदें या संस्थानांत आढळतात. पावसाचें सरासरी मान २५ किंवा २६ इंच आहे. संस्थानची लोकसंख्या (१९४१) २,८६,९०१ असून शेंकडा ९२ पेक्षां जास्त हिंदू व शेंकडा ६ मुसलमान आहेत. मुख्य पिकें बाजरी, मठ, ज्वारी, कापूस, गहूं व हरभरा हीं आहेत. या संस्थानांत पांच तालुके आहेत. व शीरमथुरा ही जहागीर आहे. संस्थानचें उत्पन्न सु. वीस लक्ष रु. आहे. खाणींतून तांबडा वाळूचा दगड पुष्कळ निघतो. पुणें–आग्रा रस्ता व जी. आय्. पी. रेल्वे फांटा संस्थानांतून जातो. संस्थानिक बामरावळिया जाट घराण्यांतील आहेत. १२ व्या शतकापासून हें घराणें अस्तित्वांत आहे. हल्लींचे महाराज उदयभागसिंहजी १९११ सालीं गादीवर बसले. संस्थानची राजधानी धोलपूर असून इंडियन मिडलंड सेक्शन रेल्वेवर ग्वाल्हेरच्या वायव्येस ४० मैलांवर आहे. लोकसंख्या सु. बावीस हजार. मुचकुंद नांवाचा तलाव जवळच आहे व तेथें वर्षांतून दोन वेळां यात्रा भरते. स्टेशनाजवळ बऱ्याचशा चांगल्या दगडाच्या खाणी आहेत. गांवांत विजेचे दिवे आहेत. इंग्रजी, ऊर्दू व हिंदी शाळा असून एक हायस्कूल आहे. टाउनहॉल, घंटाघर, अनाथालय, राजवाडा, वगैरे इमारती चांगल्या आहेत. आतां हें संस्थान मत्स्यसंघांत सामील झालें आहे.

**धोलेरा**—मुंबई, अहमदाबाद जिल्हा. धंधुका तालुक्यांतील एक बंदर. इंग्रजांच्या हातीं ह्या जिल्ह्यांतील हेंच बंदर पहिल्यानें आलें. लोकसंख्या सात-आठ हजार. येथें धान्याचा व तेलाचाहि व्यापार चालतो. गांवांत उंच देवळें व इमारती आहेत.

**धोम**—मुंबई, सातारा जिल्हा, वांई तालुका, एक गांव. हें वांईपासून पांच मैलांवर कृष्णातीरीं आहे. येथें एक महादेवाचें मोठें देऊळ असून त्याच्याभोंवतीं नरसिंह, गणपति, लक्ष्मी आणि विष्णु यांचीं देवळें आहेत. तीं सर्व पुण्याच्या महादेव शिवराम नांवाच्या सावकारानें बांधिलीं आहेत. शेजारचें रामाचें देऊळ दुसरा बाजीराव पेशवे यानें बांधिलें. नदीवरचें महादेवाचें देऊळ शाहूनें बांधिलें, असें म्हणतात. १९४८ च्या जानेवारीअखेर म. गांधी यांच्या वधाच्या निमित्तानें येथील ब्राह्मणांच्या घरांची साफ जाळपोळ झाली.

**ध्यान**—हा धर्माचरणाचा एक भाग आहे. संसारत्याग करून एकांतांत राहून एका विशिष्ट पारमार्थिक गोष्टीवर मन एकाग्र करणें याला ध्यान म्हणतात. भारतीयांच्या उपनिषदांत व तदुत्तर ग्रंथांत ध्यानमार्गासंबंधानें बरेंच विवेचन आहे. ॐ या पवित्र अक्षराचें ध्यान करावें असें सांगितलें आहे. मानवी मनाला ताब्यांत ठेवण्याकरितां जे अनेक प्रकारचे प्रयोग किंवा मार्ग आहेत त्यांना योग असा सामान्य शब्द असून, ध्यान हें योगमार्गाचें एक अंग आहे.

बौद्ध धर्मांत ध्यानाला फार महत्त्व दिलेलें आहे. ध्यान म्हणजे एखाद्या विषयावर मनाची एकाग्रता करणें आणि ध्यान करीत असतांना ध्यान करणारा व ध्यानाचा विषय यांची पूर्ण एकतानता झाली व इतर सर्व बाह्य गोष्टींची जाणीव नष्ट झाली म्हणजे त्या स्थितीला समाधि म्हणतात. बौद्ध धर्मांत अर्हत् पदापर्यंत पोंचण्यास समाधि लावतां यावी लागते. समाधि साध्य होण्याला ध्यान हें महत्त्वाचें साधन आहे.

**ध्रांगध्रा**— मुंबई, काठेवाडांतील उत्तरेकडील एक संस्थान. क्षेत्रफळ ११६७ चौरस मैल आहे. या संस्थानांत हलवाड व मानसर येथें विस्तीर्ण तलाव आहेत. शिवाय लहान तलाव पुष्कळ आहेत. पाऊस २४ इंच पडतो. ध्रांगध्राचा राजा झाला रजपूत वंशाचा असून त्या रजपूत जातीचा मुख्य आहे. झालाचें प्राचीन नांव मकवान होतें. हल्लींचे महाराज मयूरध्वज संजित १९४२ त गादीवर बसले. संस्थानची लोकसंख्या (१९४१) ९४,४१७. यांत दोन गांवें असून १३२ खेडीं आहेत. ध्रांगध्रा हा राजधानीचा गांव आहे. त्यांत जंगल नाहीं. बामभान, चंद्रभागा, विलगंगा व फालुका या नद्या आहेत. यांवर धरणें आहेत. हत्ती, उंट, वगैरे पाळीव जनावरें व डुकरें, चित्ते, काळवीट, नीलगाय हे रानटी पशू आहेत. येथें उत्तम प्रकारचा रंगीत नक्षीचा व इमारतीचा बराच दगड सांपडतो. वडगर येथें उत्तम मीठ पिकतें. संस्थानाच्या मालकीच्या कारखान्यांत मग्नहरिद (मॅग्नेशियम क्लोराइड) व मिठापासून होणारे रासायनिक पदार्थ तयार होतात. 'ध्रांगध्रा केमिकल वर्क्स' या सरकारी कारखान्यांत बरेच रासायनिक पदार्थ होतात. पितळेचीं व तांब्याचीं भांडीं, दगडी चक्क्या, कापड व मातीचीं भांडीं तयार करतात. ध्रांगध्रा हें काठेवाडांतील पहिल्या प्रतीचें संस्थान आहे. एकंदर संस्थानाचें उत्पन्न ३५ लाख रुपये आहे. येथील संस्थानिक जुनागडच्या राजास व ब्रिटिश सरकारास ४४,६७७ रुपये खंडणी देत. या संस्थानची राजधानी ध्रांगध्रा याच नांवाची आहे. येथील दगडाच्या खाणीबद्दल हें प्रसिद्ध आहे. गांवाभोंवतीं तट आहे. राजवाडा, तसेंच रामाचें, रणछोडचें, कृष्णाचें व स्वामीनारायणाचें

हीं मंदिरें पाहण्यासारखीं आहेत. आतां हें संस्थान सौराष्ट्रसंघांत सामील झालें आहे.

**ध्रुव**—ज्या आंसाभोंवतीं पृथ्वी फिरते त्याच्या दोन्ही टोंकांस ही संज्ञा आहे. आकाशांतील ध्रुव म्हणजे पृथ्वीचे ध्रुव लांबविले असतां आकाशांत जेथें मिळतील ते बिंदू होत. तारे या ध्रुवांभोंवतीं फिरतांना दिसतात. ख-स्वस्तिक आणि अधः-स्वस्तिक हे क्षितिजाचे ध्रुव समजले जातात.

पदार्थविज्ञानशास्त्रांत, पदार्थांच्या ज्या टोंकांशीं विरुद्ध गुणांच्या विद्युत् किंवा चुंबकीय प्रेरणा केंद्रित झालेल्या असतात त्यांना ध्रुव अशी संज्ञा आहे; उदा., चुंबकध्रुव, सूचीचा उत्तर ध्रुव, विद्युद्घटाचे ध्रुव, इ.

**ध्रुव, आनंदशंकर बापूभाई** ( १८६९-१९४६ )—एक गुजराथी विद्वान् व लेखक. हिंदुधर्म, नीतिशास्त्र व प्राचीन वाङ्मय इत्यादींचा यांचा सखोल अभ्यास होता व हे बनारस हिंदु विश्वविद्यालयाचे कुलगुरु होते. हे वडनगरा नागर ब्राह्मण जातीचे असून विद्यार्थिदशेपासूनच यांना संस्कृत भाषा व शास्त्रें यांच्या अभ्यासाची गोडी लागली. एम्. ए., एल्एल्. बी. पर्यंत शिक्षण झाल्यावर यांनीं कांहीं दिवस अहमदाबाद कॉलेज-मध्यें संस्कृतचे प्राध्यापक म्हणून काम केलें व नंतर मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत प्राध्यापक झाले. यानंतर यांचा अचाट विद्याव्यासंग व ज्ञानार्जनाची आवड यांमुळें यांना बनारसच्या हिंदु विश्वविद्यालयाकडून प्राचार्य ( प्रिन्सिपॉल ) व कुलगुरु ( व्हाइस चॅन्सलर ) या जागांसाठीं निवडण्यांत आलें.

गुजराथी भाषेंत, १९०२ सालीं 'वसंत' नांवाचें मासिक यांनीं सुरू केलें. त्यांतील यांच्या लिखाणावरून यांच्या प्रगतिपर विचारांची कल्पना येते. गुजराथी साहित्य परिषदेच्या व मद्रास येथें भरलेल्या चौथ्या तत्त्वज्ञान परिषदेच्या अध्यक्षपदाचा मान यांना मिळाला होता. तसेंच हिंदुस्थानांतील इंटर युनिव्हर्सिटी बोर्डाच्या अध्यक्षपदावरहि याची निवड झाली होती.

( १ ) श्रीभाष्य, ( २ ) धर्मवर्णन, ( ३ ) नीतिशिक्षण, ( ४ ) हिंदुधर्मवेद, ( ५ ) हिंदुधर्मनी बाळपोथी, यांसारखे अनेक ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**ध्रुवतारा**—ध्रुवमत्स्य किंवा लघुऋक्ष या तारकापुंजांतील हा तारा आहे. ध्रुवतारा तेजाच्या बाबतींत दुसऱ्या प्रतीचा असला तरी उत्तर गोलार्धांतील नौकानयनाला त्याचें फार महत्त्व आहे. सप्तर्षींमधील पुढच्या दोन दर्शक ताऱ्यांमधून सरळ रेषा काढली तर ती ध्रुवाशेजारून जाते, हें ध्रुवाला ओळखण्याचें सोपें गमक आहे. ध्रुवमत्स्य या तारकापुंजांत सात तारे आहेत; व त्यांत ध्रुव हें माशाच्या शेंपटाचें टोंक आहे.

सूत्रग्रंथांमध्यें ध्रुव शब्द ताऱ्याबद्दल आला असून विवाह-संस्कारांत अढळत्वाची खूण म्हणून वधूला हा तारा दाखवितात, असा उल्लेख आहे. त्याच्यामागून झालेल्या मैत्रायणी उपनिषदांत, ध्रुवाच्या गती( ध्रुवस्य प्रचलनम् )संबंधानें उल्लेख आहे. पण याचा अभिप्राय ध्रुवताऱ्याची प्रत्यक्ष अवलोकन केलेली गति असा घेतां येत नाहीं.

**ध्रुवपदगायन**—एक रागदारी संगीताचा प्रकार. हा फार जुना दिसतो. ध्रुवपद हें देवळांतून गातात. त्यांत मुख्यतः देवा-दिकांची स्तुति केलेली असते. सृष्टिवर्णनाचीं, पौराणिक कथांचीं व शृंगारिक ध्रुवपदेंहि आहेत, पण त्यांची गायनाची पद्धत निराळी असते. ग्वाल्हेरच्या मानसिंहानें ध्रुवपदाला प्रथम राग-दारीचें स्वरूप दिलें. तानसेन व त्याचे वंशज ध्रुवपदगायक होते. या ध्रुवपदांतूनच 'ख्याल' गीत निर्माण झालें व त्यानें ध्रुव-पदाला मागें टाकलें.

**ध्रुवप्रदेश-संशोधन**—माणसांनीं आजपर्यंत जीं अनेक

एस्किमो ( सील प्राण्यांची शिकार करतांना )

धाडसें केलीं त्यांपैकीं ध्रुवप्रदेश-संशोधनाचें धाडस एक प्रमुख गणतां येईल. व्यापारी हेतूसाठीं प्रदेशसंशोधनें झालीं, पण निव्वळ शास्त्रीय जिज्ञासेमुळे केलेल्या संशोधनांत ध्रुवप्रदेशसंशोधन गणतां येईल. अमेरिकन संशोधक रॉबर्ट पेरी यानें १८९१ सालापासून उत्तर ध्रुवप्रदेशाकडे फेऱ्या चालविल्या होत्या. शेवटीं ६ एप्रिल १९०९ या दिवशीं तो उत्तर ध्रुवावर पोंचला. उत्तर ध्रुवाजवळील

आर्क्टिक महासागर सुमारें १२,००० फूट खोल आहे व त्या भागांत मोठा जमिनीचा तुकडा असा नाहीं, हे महत्त्वाचे निष्कर्ष त्याच्या सफरींवरून निघाले. यापूर्वी १४९७ सालापासून व विशेषतः उत्तर अमेरिका खंडाचा शोध लागल्यासून उत्तर ध्रुवाकडे जाण्याची खटपट सुरू झाली. वायव्य आणि ईशान्य असे

एस्किमो मुलें (सील कातड्याचे कोट घातलेलीं)

दोन मार्ग पडून फ्रँकलिन, डॉ. केन, हाल, नोर्डेन्सजोल्ड, ड्यूक ऑफ ॲब्रूझी, अमुंडसेन, वगैरे संशोधक उत्तरध्रुवाच्या अलीकडे जाऊन आले होते. डॉ. कुक १९०८ सालीं उत्तरध्रुवप्रदेश शोधण्यासाठीं निघाला. त्याचा मार्ग पेरीच्या मार्गावरून निराळा होता व त्याला परत येण्यास वेळ लागल्यानें पेरीला उत्तरध्रुवसंशोधनाचें श्रेय मिळालें, असें म्हणतात. उत्तर ध्रुवप्रदेश पाहा.

उत्तर ध्रुवप्रदेशांतील एस्किमो लोकांविषयीं सर्वत्र बरेंचसें कुतूहल असून पाठ्य पुस्तकांतूनहि त्यांची माहिती येत असते. एस्किमो पाहा.

दक्षिण ध्रुवाभोवतीं थोडी ईशान्य बाजू सोडल्यास जमीन आहे. पण ती असंशोधित आहे. शॅकल्टन या ध्रुवापासून ९७ मैलांपर्यंत पोंचला होता. त्यांपूर्वी कुक (१७७४), रॉस (१८४२), वेडेल (१८२३), बिस्को व बालेनी या इंग्रज भूगोलसंशोधकांनीं ॲन्टार्क्टिक भूप्रदेशाची माहिती प्रत्यक्ष जाऊन गोळा केली होती. ड्युर्व्हील हा फ्रेंच व चार्लस विल्कीज हा अमेरिकन, या प्रवाशांनींहि आदेली लँड व विल्कीज् लँड हे भाग शोधून नांवें दिलीं होतीं. १९०१ सालीं रॉबर्ट स्कॉट हा दोन वर्षें जाऊन राहिला होता व त्याला शेवटीं संरक्षक जहाज पाठवून परत आणावें लागलें. याच सुमारास जर्मन आणि स्वीडिश मोहिमा दक्षिणध्रुवप्रदेशाच्या शोधासाठीं निघाल्या होत्या. १९०८ सालीं लेफ्टनंट शॅकल्टन बरेंच साहित्य घेऊन निघाला व ध्रुवापासून ९७ मैल पेंचेपर्यंत जवळचे खाण्याचे सर्व जिन्नस संपले, म्हणून त्याच्या गटाला परतावें लागलें. १९११ सालीं अमुंडसेन यानें मोहीम काढली व ध्रुवाजवळ तो जाऊन पोंचला; व तेथें त्यानें नॉर्वे राष्ट्राचें निशाण रोविलें व ध्रुवाभोंवतालच्या उंचवट प्रदेशाला ७ वा हॅकन या आपल्या राजाचें नांव दिलें.

१९१० च्या नोव्हेंबर महिन्यांत कॅ. स्कॉट हा पुन्हां मोठ्या तयारीनिशीं द. ध्रुवप्रदेशाच्या शोधार्थ निघाला. १९१२ च्या जानेवारींत (ता. ३) तो द. ध्रुवापासून १५० मैलांवर होता. या वेळीं त्याच्या गटांतील बरींच माणसें गळालीं. पण स्कॉट चार सोबत्यांसह पुढें निघाला. पुढें तो जेव्हां कांहीं आठवडे बेपत्ता दिसला तेव्हां त्याच्या शोधार्थ एक मोहीम निघाली. तिला ता. १२ नोव्हेंबर १९१२ रोजीं तिघांचीं प्रेतें सांपडलीं. स्कॉटच्या रोजनिशीवरून असें मात्र कळलें कीं, ता. १८ जानेवारीला ते द. ध्रुवाशीं पोंचले व त्यांनीं कॅ. अमुंडसेननें ठोकलेला तंबू तसाच उभा असलेला पाहिला होता. यानंतर डॉ. मॉसन आणि शॅकल्टन यांनीं तिकडे मोहिमा काढल्या व कांहीं नवीन माहिती मिळविली. १९२९ सालीं ॲडमिरल बिर्ड हा विमानानें द. ध्रुवावर उतरला.

उ. ध्रुवप्रदेश व द. ध्रुवप्रदेश यांमध्यें कांहीं प्राकृतिक फरक आहे. पहिला मोठा वर्फाचा समुद्र म्हणतां येईल, तर दुसऱ्यावर उंच पर्वत आहेत व कांहीं मृत ज्वालामुखी आहेत. अन्टार्क्टिक प्रदेशांत आर्क्टिकपेक्षां उष्णमान कमी आहे. द. ध्रुव प्रदेशांत प्राणिजीवन मुळींच नाहीं. पाण्याच्या कांठावर गल् व पेन्ग्विन यांसारखे पक्षी जे आहेत ते पाण्यांत भक्ष्य शोधतात.

**ध्रुवीभवन**— प्रकाश पाहा.

**ध्रुवीभवनदर्शक**— (पोलरिस्कोप). ध्रुवीभूत प्रकाशाचें प्रदर्शन करण्याकरितां किंवा पारदर्शक पदार्थांतील ध्रुवीभवनाच्या गुणधर्मांचें परीक्षण करण्याकरितां हें यंत्र उपयोगांत आणतात. या यंत्रांत एक ध्रुवीकारक (पोलरायझर–चित्रांतील अ) आणि एक पृथक्कारक (ॲनॅलायझर–चित्रांतील ब) बसविलेला असतो. या दोन कांचेच्या तबकड्या असतात. त्या ध्रुवीभवन कोनामध्यें म्हणजे कांचेच्या बाबतींत ५७॥ अंशांच्या कोनांत प्रकाशाचे परावर्तन होईल अशा तऱ्हेनें बसविलेल्या असतात.

एका (अ) तबकडींतून परावर्तित झालेला प्रकाश दुसऱ्या (ब) तबकडीकडे पाठविण्यांत येतो. या दुसऱ्या (ब) तबकडींतून परावर्तित होणाऱ्या प्रकाशाचें निरीक्षण करण्यांत येतें. ही दुसरी

तबकडी एका उभ्या आंसाभोंवतीं फिरविली असतां (बच्या) एका विशिष्ट ठिकाणीं प्रकाश अजीबात अदृश्य झालेला दिसून येतो. नंतर एखादा अभ्रक किंवा गारेचा तुकडा या प्रकाश-किरणाच्या मार्गांत धरला आणि तो एका (क) अडणीवर वाटोळा फिरवीत राहिलें तर दुसऱ्या (ब) तबकडींतून पुन्हां परावर्तित प्रकाश दिसूं लागतो व तो रंगीत असतो.

**ध्रोल**—मुंबई, काठेवाड, राजकोटच्या वायव्येस ३४ मैलांवर असलेलें एक लहान संस्थान. क्षेत्रफळ २८३ चौ. मै.. संस्थानांत १ शहर व ६७ गांवें आहेत. येथील जहागीरदार जाडेजा रजपुतांपैकीं आहेत. नवानगरच्या एका राजाचा भाऊ हा या संस्थानचा मूळपुरुष होय. येथे उंसाचें पीक मुख्य आहे. हवा उष्ण व आरोग्यदायक आहे. पाऊस २५–३० इंच पडतो. येथील जहागिरदारांस ठाकूर म्हणतात. राजधानीचा गांव ध्रोल हा नवानगरच्या ईशान्येस १२ कोसांवर आहे. लो. सं. ५॥ हजार. ध्रोल येथें म्युनिसिपालिटी आहे.

हें संस्थान काठेवाडांत दुसऱ्या प्रतीचें आहे. संस्थानचें उत्पन्न १। लाख रुपये आहे. जुनागडच्या नवाबास व बडोदें सरकारास येथील ठाकूर सालिना १०२३१ रु. खंडणी देत असे.

हें संस्थान आता सौराष्ट्र संघांत सामील झालें आहे.

**ध्वज**—ऋग्वेदांत लढाईत वापरलेल्या निशाणाच्या अर्थानें हा शब्द दोनदां आलेला आहे. ज्या ठिकाणीं हा शब्द आलेला आहे त्या दोन्ही ठिकाणीं 'योद्धे निशाणांवरहि बाण सोडून तीं पाडण्याचा (शत्रूंच्या सैन्यात गडबड उडावी म्हणून) प्रयत्न करीत असत', असा उल्लेख आलेला आहे. ही वैदिक काळची लढण्याची विशिष्ट तऱ्हा लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

ध्वजाचा उगम कसा झाला याविषयीं अनेक तर्क आहेत. प्रथम माणसें एकत्र जमूं लागलीं तेव्हां त्यांना आपल्या संघाचें एखादें विशिष्ट चिन्ह लागू लागलें असेल. लढायांतून तर निरनिराळे पक्ष व पथकें दाखविण्यासाठीं निशाणांची जरूरी होती. पुढें जाती, पंथ, देश, इ. चीं ध्वजचिन्हें तयार झालीं असावींत. प्राचीन शिल्पांतून अशीं चिन्हें पाहावयास मिळतात.

अगदीं प्राचीन काळींहि ध्वजांचा उपयोग करीत असत. ग्रीस, रोम, ईजिप्त, इराण, इत्यादि प्राचीन देशांत एका कांठीच्या टोंकाला विशिष्ट चिन्ह असलेला ध्वज सरकारी ध्वज म्हणून वापरण्यांत येत असे. मिसरी लोकांत पवित्र पशु, नौका, राजनामें किंवा कांहीं आकृति काढलेलीं निशाणें होतीं. असीरियन लोकांत, बैलावर चढून बाण मारणारा असें एक व दोन बैल दोन विरुद्ध दिशांनीं जात असलेले असें दुसरें चिन्ह असलेलीं निशाणें असावींत. बायबल ग्रंथांत हिब्रू व इतर राष्ट्रांचे ध्वज वारंवार उल्लेखिले आहेत. भाल्यावर बसलेला गरुड हें इराणी ध्वज-चिन्ह होतें; कधीं सूर्यहि काढलेला असे. ग्रीक आणि रोमन ध्वजांत विविध प्रकार दिसतील. देवतांचीं चिन्हें त्यांवर असत व त्यांच्या शपथा वाहून सैनिकांना सेनापति युद्धोत्सुक करी.

इंग्लंडमध्यें आरंभींचीं निशाणें राजा किंवा राजघराणें यांच्या इच्छेप्रमाणें बनविलेलीं असत. नॉर्मन राजांच्या कारकीर्दींत राज्याचा एक ध्वज निराळा असून शिवाय प्रत्येक सरदाराचे निरनिराळे ध्वज असत. मोठ्या लोकांनींहि खाजगी निशाणें वापरण्याची पद्धत अद्यापहि चालू आहे. युरोपांत क्रूसेड (धार्मिक) युद्धें ख्रिस्ती राष्ट्रें व मुसलमान राष्ट्रें यांच्यामध्यें सुरू झाल्यावर राष्ट्रीय ध्वज पद्धतशीर करण्यांत येऊं लागले. प्रथमतः डेन्मार्क देशानें तेराव्या शतकांत आपला विशिष्ट ध्वज तयार केला. नंतर इंग्लंड, स्कॉटलंड आणि आयर्लंड यांनीं आपले स्वतंत्र ध्वज तयार केले. ब्रिटिश साम्राज्याची वाढ होऊं लागल्यावर इंग्लंडच्या ध्वजांत अनेक वेळां सुधारणा करण्यांत आल्या. आणि इंग्लंडचें हल्लींचें 'युनियन जॅक' हें निशाण तांबडा, पांढरा आणि निळा अशा तीन रंगांचें आहे. इंग्लंडच्या वसाहतींपैकीं अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केल्यावर आपलें निराळें निशाण बनविलें. त्या निशाणावर अनुक्रमें तांबडे व पांढरे असे तेरा पट्टे होते आणि एका कोपऱ्यांत निळा रंग देऊन त्यांत तेरा ताऱ्यांचीं चिन्हें काढलेलीं होतीं. कारण आरंभीं संयुक्त संस्थानांत फक्त तेरा संस्थानें सामील झालीं होतीं. हल्लींचें निशाण तसेंच आहे; पण फक्त ताऱ्यांची संख्या ४८ आहे: कारण हल्लीं संयुक्त संस्थानांत ४८ संस्थानें आहेत.

राष्ट्रांच्या निशाणांखेरीज इतर अनेक प्रकारचीं निशाणें असतात. सैन्यांतलीं पथकांचीं निशाणें, आगबोटींवरील निशाणें, संस्थांचीं निशाणें, खाजगी व्यक्तींचीं निशाणें, संदेश–निशाणें, वगैरे अनेक प्रकारचीं निशाणें असतात.

हिंदुस्थानांत पौराणिक काळीं ध्वज असत हें राजांच्या नांवांवरूनच स्पष्ट होतें. उदा., गरुडध्वज, मकरध्वज, सीरध्वज, इ.. ध्वजावरील चिन्हावरून ध्वजाचें नांव पडलेलें असे व त्या चिन्हाचा ध्वज वापरणाराचें विशेषण म्हणून तें नांव येई: गरुडध्वज (विष्णु) वृषभध्वज (शंकर), हंसध्वज (ब्रह्मा), मकरध्वज (मदन), इ.

ऐतिहासिक काळांत निरनिराळ्या राजघराण्यांचे ध्वज असत. मुसलमानी राजांच्या ध्वजावर चांद काढलेला असे. निजामाचें निशाण पिवळें व बरीदशाहीचें तांबडें असे. मराठ्यांचें निशाण शिवाजीच्या काळीं भगवें होतें व पुढें त्याच्या जोडीला जरीपटका आला. आज हिंदराज्याचें निशाण काँग्रेसचेंच तिरंगी (पिवळा, पांढरा व हिरवा) असून मध्यें चरख्याऐवजीं अशोक काळचें एक चक्र (निळें) काढलेलें असतें. पाकिस्तानच्या

निशाणाला पांढरा (काठीजवळ) व हिरवा असे दोन उभे पट्टे असून हिरव्या पट्टयांत चांद व पांच तारा आहेत. जरीपटका, भगवा झेंडा पाहा.

**ध्वनि**—आपल्या कानावर जे आघात होतात व ज्यामुळें आपणांस ऐकूं येतें त्या आघातांस आणि त्या आघातांमुळें आपल्या श्रवणेंद्रियांत जी चेतना उत्पन्न होते तीस, या दोहोंसहि ध्वनि ही संज्ञा देण्यांत येते. ध्वनीचें संगीतोपयोगी नाद आणि आवाज अशा दोन प्रकारांत वर्गीकरण करण्यांत येतें. आणि प्रत्यक्ष केलेल्या प्रयोगावरून असें सिद्ध झालें आहे कीं, कांहीं नियमित कालाच्या अंतरानें गति अथवा कंप उत्पन्न करीत गेले तर या कालाचें प्रमाण त्वरित असेल तर त्यापासून संगीतोपयोगी नाद सुरू होतो. वाटोळी फिरणारी करवत व गिरणीची शिटी या गोष्टी या प्रकारच्या उदाहरणें होत. अशा नियतकालिक ध्वनीची किंवा गतीची एका सेकंदामध्यें जितक्या वेळां पुनरावृत्ति होईल तीस कंपनसंख्या असें म्हणतात. वर्तुलाकार फिरणाऱ्या करवतीची गति कमी झाल्याबरोबर तीपासून निघणाऱ्या ध्वनीची तीव्रताहि कमी होत जाते. यावरून ध्वनीची तीव्रता अथवा उच्चताहि ध्वनि उत्पन्न करणाऱ्या पदार्थाच्या कंपनसंख्येवर अवलंबून असते, ही गोष्ट दिसून येते. मनुष्याच्या कानास फक्त कांहीं विशिष्ट कंपनसंख्येच्या मर्यादेंतील ध्वनिच ऐकूं येतो. ही मर्यादा कमींत कमी तीस आणि अधिकांत अधिक चोवीस हजार अशी आहे.

ध्वनीची गतिहि नियमित असून ती प्रकाशापेक्षां कमी आहे. यामुळें आपणांस विजेचा प्रकाश प्रथम दृष्टीस पडतो आणि आवाज मागाहून ऐकूं येतो. ध्वनि प्रसृत होण्याचें सामान्य माध्यम हवा हें आहे. परंतु बहुतेक पदार्थांच्या मार्फत ध्वनीचें प्रसरण होतें. परंतु निर्वात अवकाशांत ध्वनि प्रसृत होत नाहीं. माध्यमांतून ध्वनि जात असतां तो एका तऱ्हेच्या माध्यमांतील अणूंच्या लहरींच्या साहाय्यानें जात असतो. संगीत नाद हे मोठेपणा, उच्चता व चांगलेवाईटपणा या बाबतींत परस्परांपासून भिन्न असतात. ध्वनीचा लहानमोठेपणा कंपाच्या लहानमोठेपणावर (विस्तृतीवर) अवलंबून असतो. स्वराचा उच्चनीचपणा कंपनसंख्येवर अवलंबून असतो, व त्याचा चांगलेवाईटपणा त्याच्या सुरेलपणावर किंवा बेसूरपणावर अवलंबून असतो. यास स्वराचा गुण म्हणतात. या स्वराच्या गुणामुळें एकाच उंचीवर किंवा एकसारखाच मोठा असलेला आवाज जरी आपल्या कानावर आला तरी आपण तो आवाज कशापासून आला तें ओळखतों किंवा अशा तऱ्हेच्या अनेक आवाजांतील फरक आपणास कळून येतो. उदा., आपण बांसरी, सतार, वगैरे निरनिराळ्या वाद्यांतून एकच सूर काढल्यास तो कोणत्या वाद्यापासून निघत आहे तें सहज कळून येतें. तसेंच निरनिराळ्या व्यक्तींचा आवाज आपणांस ओळखूं येतो त्याचें कारण त्यांतील हा गुण हेंच होय.

फ्लॉरेन्स येथील ॲकॅडमीनें जे प्रयोग केले त्यानंतर, तोफ डागल्यानंतर दिसणारा प्रकाश व त्यानंतर ऐकूं येणारा आवाज यांमधील अंतरावरून प्रकाशाची गति मोजण्याचे प्रयत्न व प्रयोग अनेकांनीं करून पाहिले. यांवरून असें आढळून आलें कीं, ध्वनीची गति दर सेकंदास ३३१ मीटर अथवा १०८७ फूट ०° शत. उष्णमानांत असते. या गतींत उष्णमानाबरोबर फरक पडत असतो. परंतु हवेच्या दाबाप्रमाणें फरक पडत नसतो असें प्रयोगावरून दिसून आलें आहे. ध्वनीची गति १° शतमानांत दर सेकंदास दोन फूट याप्रमाणें वाढत असते.

ध्वनीच्या लहरी या प्रकाशलहरींप्रमाणेंच व त्याच नियमांनीं परावर्तन आणि वक्रीभवन पावतात. परावर्तनामुळें आपणांस मोठमोठ्या दिवाणखान्यांत व खोल्यांत आवाजाचे होणारे प्रतिध्वनी ऐकूं येतात. ध्वनींचें वक्रीभवन आकाशामध्यें वातावरणाच्या निरनिराळ्या उंचीवर जो उष्णमानांत फरक पडत असतो, आणि जी वायूची गति बदलत असते त्यामुळें होत असतें. पृथ्वीपासून जसजसें दूर जावें तसतसें हवेंतील उष्णमान वाढत गेलें तर ध्वनीच्या लहरी खालीं वांकून दूर अंतरावर जाऊं लागतात. ही परिस्थिति विशेषतः सूर्यास्ताच्या वेळीं दिसून येते. परंतु जेव्हां जमिनीपासून दूर दूर अंतरावर उष्णमान कमी होत जातें त्या वेळीं ध्वनिलहरी उलट वरील बाजूकडे झुकूं लागतात, व त्यामुळें ध्वनि फार दूरवर ऐकूं जात नाहीं. अशी परिस्थिति आपणांस उन्हाळ्यामध्यें उष्णमान विशेष असतांना आढळून येते.

जेव्हां ध्वनिलहरींच्या दोन माला आपल्या कानावर येऊन आदळतात तेव्हां त्यांचा परिणाम त्या दोन ध्वनिलहरींच्या कंपनसंख्येंतील अंतरावर अवलंबून असतो. जर त्या दोन्ही मालांतील ध्वनिलहरींची लांबी सारखीच असेल तर त्यांचा एकत्र मिलाफ होऊन शांतता उत्पन्न होईल. परंतु त्यांच्या लहरींच्या लांबींत अंतर असेल तर आपणांस एक प्रकारचा ठेका अथवा ताल ऐकूं येऊं लागेल. या तालाचे ठोके त्या दोन ध्वनींच्या दर सेकंदास असणाऱ्या कंपनसंख्येंतील अंतराइतके आपणांस दर सेकंदास ऐकूं येतात. कोणत्याहि ध्वनीची कंपनसंख्या दर सेकंदास किती असते हें आपणांस ध्वनिमापकानें अथवा सायरेन–शिटीवरून जवळजवळ १-२ टक्क्यांच्या अंतरानें मोजतां येतें.

**ध्वनिशोधन**—पहिल्या महायुद्धामध्यें शत्रूच्या तोफांचें ठिकाण ओळखून काढण्याकरितां ध्वनिशोधक शाखा निर्माण करण्यांत आली. ध्वनिशोधनाकरितां निरनिराळीं श्रवणयंत्रें

अगोदर पाहणी करून ठेवलेल्या निरानिराळ्या ठिकाणीं ठेवण्यांत येतात. त्यांतून ऐकूं येणाऱ्या ध्वनीची एका केंद्रवर्ती ठिकाणीं फिरत्या प्रकाशलेखन–पट्टीच्या साहाय्यानें नोंद करण्यांत येते, आणि त्यावरून त्या ध्वनीच्या उगमांचें अंतर आणि दिशा व तीन निरनिराळ्या ठिकाणांहून तो ध्वनि ऐकूं येण्यास लागणारा काळ, यांवरून तोफांचें ठिकाण निश्चित करण्यांत येतें. या उपकरणास सूक्ष्मध्वनिदर्शक असें म्हणण्यांत येतें. अशा तऱ्हेचा सूक्ष्म-ध्वनिदर्शक (मायक्रोफोन) टकर आणि पॅरिस यांनीं तयार केलेला असून त्यांत उष्णता दिलेली तार एका अनुनादका-(रेझोनेटर)च्या तोंडांत बसविलेली असते. या तारेमधून एक विद्युत्प्रवाह सोडलेला असतो व त्यामुळें ती चकाकत असते. जेव्हां या तारेमध्यें अनुनाद उत्पन्न होतो तेव्हां अनुनादकाच्या तोंडांतील हवा गतिमान होऊन तारेचें वेष्टण थंड होतें. त्यामुळें त्याची विद्युद्रोधकता कमी होऊन विद्युन्मंडळांतील समतोलन बिघडतें आणि विद्युन्मापक सूचीची दिशा बदलते.

**ध्वनिमापक**—(सोनोमीटर). ताणलेल्या तारा अथवा तांती यांच्यामध्ये उत्पन्न होणाऱ्या कंपांचा अभ्यास करण्याकरितां हें उपकरण वापरण्यांत येतें. हें उपकरण म्हणजे एक लांकडाची लांब चौकोनी पेटी असून तीवर एक तार ताणून बसविलेली असते व या तारेवरील ताण एखाद्या वजनाच्या किंवा कमानी( स्प्रिंग )च्या तराजूच्या साहाय्यानें मोजण्यांत येतो.

**ध्वनिविज्ञान**—(आकूस्टिक्स). ही एक ध्वनिशास्त्राची शाखा आहे. या शाखेमध्यें श्रवणेंद्रियावर आघात करणारे जे निरानिराळे हवेमध्यें किंवा इतर द्रव्यांत कंप उत्पन्न होतात त्यांचें श्रवणेंद्रियद्वारां ज्ञान होणें या गोष्टींचा विचार करण्यांत येतो. सामान्यतः आपणांस जे ध्वनी ऐकूं येतात त्यांमध्यें कंप उत्पन्न होणारें माध्यम हवा असतें; परंतु माशांना पाण्यामध्यें उत्पन्न झालेले ध्वनी ऐकूं येतात. ह्याप्रमाणें कंप उत्पन्न होणाऱ्या कोणत्याहि द्रव्याचा ध्वनि उत्पन्न करण्याकडे व तो दूर नेण्याकडे उपयोग करितां येणें शक्य आहे. मोठमोठालीं प्रेक्षागृहें अथवा नाटकगृहें, ध्वनिक्षेपक स्थानें (रेडिओ स्टेशन), वगैरेमध्यें ध्वनीचें उत्पादन आणि प्रसरण अचूक रीतीनें होण्याकरितां अशा गृहांतील भिंतीचा वगैरे पृष्ठभाग योग्य अशा पदार्थांनीं आच्छादित करावा लागतो, किंवा योग्य पदार्थांचें त्यांना अस्तर द्यावे लागतें. अशा रीतीनें हे पदार्थ ध्वनींतील कांहीं कंपांचें योग्य प्रमाणांत शोषण करून ध्वनींतील विकृति व कर्कश मिश्रण, प्रतिध्वनि, वगैरे उत्पन्न होऊं देत नाहींत. पूर्वीं आवाज मोठा काढल्यास त्यामधील स्पष्टता कमी होत असे. परंतु अलीकडे मोठमोठ्या सभागृहांतून ध्वनिवर्धक व ध्वनिपुनरुत्पादक यंत्रें योग्य ठिकाणीं बसविण्यांत येऊं लागल्यापासून ही अडचण बरीचशी दूर झाली आहे. आंदोलनलेखक या यंत्राचा शोध व त्याची वाढ यांमुळें श्राव्य ध्वनींच्या लहरींचें पृथक्करण करण्याच्या कामीं बरेंच साहाय्य झालें आहे. या आंदोलनलेखकाच्या साहाय्यानें कोणत्याहि ध्वनिलहरींचें प्रत्यक्ष चित्र आपणांस पडद्यावर पाडून दाखविण्यांत येतें. या यंत्राच्या साहाय्यानें केवळ श्राव्य कंपनलहरींचाच नव्हे तर त्यांच्या पलीकडीलहि ध्वनिलहरींचा अभ्यास करणें शक्य झालें आहे.

---

# न

**न**—व्यंजनमालेंतील विसावें व्यंजन. याच्या अक्षरविकासाच्या तीन अवस्था पडतात. पहिली अशोककालीन, दुसरी इ. स. १ ल्या शतकांतील व तिसरी सातव्या शतकांतील आहे. आजचें वळण १२ व्या शतकांत आलेलें दिसतें.

**नकाशा**—एका पृष्ठभागावरील गोष्टींची दुसऱ्या पृष्ठभागावर काढलेली प्रतिकृति. पृथ्वी किंवा तिचा एखादा भाग, तसेंच आकाश, इ. यांची एखाद्या पृष्ठभागावर जेव्हां आकृति काढण्यांत येते तेव्हां ती तंतोतंत तशी येत नसते. हीच गोष्ट नकाशालाहि लागू आहे. ज्या पद्धतीनें नकाशावर याम्योत्तर वृत्तें आणि समांतरें काढलेलीं असतात तिला प्रत्यालेख (प्रोजेक्शन) म्हणतात. कांहीं नकाशांतून लहान जागेंतहि आकार तोच ठेवलेला असतो (ऑर्थोमॉर्फिक), तर कांहींत क्षेत्रफळाचें मान नकाशावर सर्व ठिकाणीं तेंच असतें (समक्षेत्रफळ). या दोन्ही गोष्टी एकत्र कोठेंच नसतात. पहिल्याला मर्केटर प्रत्यालेख म्हणतात व तोच रूढ आहे. यांत याम्योत्तरें आणि समांतरें या सरळ रेषा असून परस्परांशीं काटकोन करून असतात. यांत दोष असा कीं, उच्च अक्षांशांत समांतरें सारख्याच लांबीचीं असल्यानें क्षेत्रांचें परिमाण जास्त निघतें. तेव्हां उत्तर प्रदेशासाठीं या नकाशाचा मुळींच उपयोग होत नाहीं. या नकाशावरील सरळ रेषा याम्योत्तरांना ठराविक कोनानें छेदते. शंकूच्या प्रत्यालेखांत, एका केंद्राशीं मिळणाऱ्या सरळ रेषांनीं याम्योत्तरें दर्शविलीं जातात व समांतरें वरील रेषांशीं काटकोनांतून असणारीं समकेंद्री वर्तुळें म्हणून असतात. आणखीहि कांहीं प्रत्यालेख आहेत. नकाशाचा जसा उपयोग करावयाचा असेल तसा प्रत्यालेख घ्यावा लागतो. जर विभागणीचे आंकडे दाखवावयाचे असतील तर समक्षेत्रफळाचाच नकाशा पाहिजे. नकाशाचे राजकीय, प्राकृतिक, ऐतिहासिक, इ. प्रकार केलेले असतात. जमिनीचा उंचसखलपणा दाखविणारा, हवामान दाखविणारा, समुद्राची

खोली दाखविणारा, इ. आणखी कित्येक प्रकार गरजेप्रमाणें पाडावे लागतात.

**नकुल**— एक पांडव. हा पंडूच्या माद्री नांवाच्या धाकट्या स्त्रीच्या पोटीं अश्विनीकुमारापासून झाला. हा रूपानें अतिशय सुंदर होता. नकुलास द्रौपदीपासून शतानीक नांवाचा पुत्र झाला. याची दुसरी बायको शिशुपालाची कन्या. राजसूय यज्ञाच्या वेळीं हा पश्चिम दिशा जिंकण्यास गेला होता, तिकडे दिग्विजय करून यानें दहा हजार उंटभर द्रव्य आणलें. अज्ञातवासांत हा विराटगृहीं ग्रंथिक नांव धारण करून अश्वशाळेचा मुख्य बनला. भारतीय युद्ध समाप्त झाल्यावर पांडवांकडील जे अवशिष्ट सात वीर राहिले त्यांतील हा एक असून पुढें युधिष्ठिराबरोबरच हा (हिमालयाकडे) निजधामास गेला. याला अश्वशास्त्राचें ज्ञान व अश्वपरीक्षा चांगली असून शालिहोत्रावर याचा एक ग्रंथ आहे असें मानतात.

**नकुलवर्ग**—(इक्न्युमॉन). हे जवादी मांजराच्या जातीचे मांसाहारी सस्तन अंगुलिपाद प्राण्यांच्या जातीचे प्राणी आहेत. ईजिप्तमध्यें यांच्या एका जातीस फॅरोचे उंदीर असें म्हणत व ते मगराचे शत्रु म्हणून त्यांची पूजा करीत. कारण हे प्राणी मगरांचीं अंडीं खातात, तसेंच हे सापहि मारतात. हिंदुस्थानांत आढळणारें मुंगूस ही एक याच प्राण्याची जात आहे व दक्षिण आफ्रिकेमध्यें आढळणारे सुरी–केट अथवा मीरमांजर हे याच जातीचे प्राणी आहेत.

**नखुल्या**—एक मुलींचा खेळ. दोन मुलींनीं समोर उभें राहून एकमेकींच्या बोटांत बोटें अडकवावयाचीं व फुगडीप्रमाणें गोल फिरावयाचें. या खेळांत बोटें मजबूत असावीं लागतात. 'नखुल्याबाई नखुल्या। चंदनाच्या टिकुल्या।' इ. गाणें हा खेळ खेळतांना म्हणतात.

**नखें**—केंसाप्रमाणेंच नखेंहि त्वचेचा एक भाग आहे. हीं बाह्यत्वचेच्या पेशींच्या विशिष्ट व्यवस्थेमुळें तयार होतात. ज्या प्राण्यांना बोटें असतात त्या प्राण्यांच्या बोटांचें संरक्षण करण्याच्या कामीं नखांचा उपयोग होतो. कांहीं प्राण्यांच्या नखांस खूर म्हणतात. कांहीं प्राण्यांचीं नखें बाहेर काढतां येतात. भू-जलवासी प्राण्यांमध्यें बोटांच्या अखेरीस असलेलीं नखें केवळ कवचासारखीं किंवा घट्टयासारखीं असतात.

कांहीं प्राण्यांचीं नखें अतिशय तीक्ष्ण असून तीं स्वसंरक्षणार्थ त्यांना उपयोगी पडतात.

**नगरकोट**—पंजाब, कांग्रा जिल्ह्यांतील एक जुनें शहर. येथें ज्वालामुखी असल्यानें पूर्वीपासून यास पवित्रपणा आला आहे. येथें फार श्रीमंत देवालय होतें. तें गझनीच्या महंमुदानें लुटलें (१००५–०६) व अतोनात संपत्ति नेली. पुढें हिंदु



राजांनीं नगरकोटचा किल्ला मुसलमानांपासून जिंकून घेतला (१०४३).

**नगरदेवळें**—मुंबई, पूर्व खानदेश. पाचोरें तालुक्यात कजगांव रेल्वे स्टेशनच्या पूर्वेस ५ मैलांवर हा एक लहानसा गांव आहे. येथें एक महादेवाचें हेमाडपंती देवालय आहे. येथें पवार आडनांवाचे मराठे जहागिरदार असतात.

**नगरधन**—मध्यप्रांत, रामटेकच्या दक्षिणेस चार मैलांवर हें गांव आहे. लोकसंख्या तीन हजार. नंदिवर्धन या जुन्या नांवाचा नगरवर्धन–नगरधन हा अपभ्रंश असून वर्धा जिल्ह्यांत देवळी येथें सांपडलेल्या ताम्रपटांत नागपुराबरोबर याचा उल्लेख केला आहे. ताम्रपट इ. स. ९४० सालचा आहे. नंद नांवाच्या सूर्यवंशीय राजानें हा गांव वसविला अशी स्थानिक आख्यायिका आहे. येथें एक हेमाडपंती कोटेश्वर महादेवाचें देवालय आहे. शंखतीर्थ अथवा शुक्रतीर्थ नांवाचा तलाव या देवळाजवळ आहे. येथें एक किल्ला असून तो भोंसल्यांच्या वेळचा आहे असें म्हणतात.

**नगरपालिका**—एखाद्या शहराचा किंवा गांवाचा कारभार नगरपालिकेकडे असतो. हा कारभार कायद्यानें दिलेला असून अशी संस्था सरकारला जबाबदार असते. पाश्चात्य देशांत न्याय आणि संरक्षण यांबाबतचे अधिकारसुद्धां कांहीं नगरपालिकांना असतात. तिकडे नगरपालिकेचा प्रमुख एक मेयर असून त्याला एक सल्लागार मंडळ दिलेलें असतें. एक कार्यकारी मंडळ या दोघांनाहि जबाबदार ठेवलेलें असतें. अमेरिकेंत हा मेयर लोक निवडतात, तर युरोपांतील राष्ट्रांतून प्रतिनिधि मंडळ निवडतें. कांहीं नगरपालिकांच्या पेढ्या व कारखानेहि असतात. पण सामान्यपणें घरबांधणी, नगररचना, दिवे, पाणी, गटारें–ड्रेनेज, प्राथमिक शिक्षण, आरोग्य, करमणूक, इ. गोष्टीच नगरपालिकेकडे असतात.

हिंदुस्थानांत नगरपालिका कार्पोरेशनें सोडल्यास अद्यापि अप्रगत आहेत असें म्हणावें लागतें. स्थानिक स्वराज्य संस्थेचा कायदा करून हळूहळू स्थानिक कारभाराचे सर्व अधिकार ब्रिटिश सरकारनें लोकांना दिले होते.

स्थानिक स्वराज्यांतील प्रमुख संस्था म्युनिसिपालिटी किंवा नगरपालिका होय. म्युनिसिपालिटी अगर जिल्हा बोर्डें यांचा प्रचार ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानांत केला. कंपनी सरकारच्या अमदानींतच इलाख्यांच्या राजधानींच्या शहरांना म्युनिसिपालिट्या दिल्या होत्या. १६८७ सालीं मद्रासमध्यें म्युनिसिपल कार्पोरेशन स्थापन करण्यांत आलें होतें. १७२६ सालीं मुंबई व कलकत्ता या शहरांच्या व्यवस्थेसाठीं मेयर्स कोर्टें स्थापन झालीं होतीं व त्यांच्याकडे शहरांतील कांहीं गुन्ह्यांचा अगर फिर्यादींचा

निकाल देण्याचा अधिकार देण्यांत आला होता. त्याचप्रमाणें रेग्युलेटिंग ॲक्टानें त्यांना स्थानिक कारणांसाठीं मर्यादित स्वरूपांत कर बसविण्याचा हक्कहि मिळाला होता. १८४२ सालीं बंगालमध्यें म्युनिसिपालिट्या स्थापन करण्याचा कायदा झाला. पण त्याचा तादृश उपयोग झाला नाहीं. १८५० सालीं सर्व ब्रिटिश हिंदुस्थानासंबंधीं म्युनिसिपालिट्यांच्या बाबतींत एक कायदा (ॲक्ट) करण्यांत आला. या कायद्यान्वयें बऱ्याच ठिकाणीं म्युनिसिपालिट्या स्थापन झाल्या व त्यांच्यावर कमिशनर नेमण्यांत येऊन त्यांच्याकडे शहरव्यवस्था पाहण्याचे व तत्कार्यार्थ कर बसविण्याचे हक्क देण्यांत आले. हे अधिकारी सरकारनियुक्त असल्यानें लोकांना त्यांत मुळींच भाग नसे. १८७० च्या ॲक्टानें लॉर्ड मेयो यानें या संस्थांना थोडेंसें स्वातंत्र्य दिलें. व लोक जे कर देत असत त्यांची विल्हेवाट कशी करण्यांत येते हें पाहण्याचा अधिकार लोकांना देण्यांत आला. १८७१–७४ या सालांच्या दरम्यानच्या कायद्यांनीं म्युनिसिपालिटींत लोकनियुक्त सभासद फार थोड्या प्रमाणांत येऊं लागले. तथापि स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बाबतींत सरकारचें आणि लोकांचें खरें लक्ष १८८२ सालापासून लागण्यास सुरुवात झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. पुढें लॉर्ड रिपननें १८८३ सालीं व्यवस्थित पद्धतीवर स्थानिक स्वराज्य संस्थांचें धोरण आंखण्याचा प्रयत्न केला. १८८३–८४ सालीं जे म्युनिसिपल ॲक्ट करण्यांत आले त्या योगानें म्युनिसिपालिट्यांची घटना, हक्क व कार्यक्षेत्र यांच्यामध्यें महत्त्वाचे फेरफार झाले; निवडणुकीच्या तत्त्वाला स्पष्टपणें मान्यता देण्यांत आली; पुष्कळ म्युनिसिपालिट्यांत खाजगी नागरिकांना अध्यक्ष होतां येऊं लागलें; म्युनिसिपालिट्यांचें उत्पन्न वाढविण्याची योजना करण्यांत आली; व प्रांतिक महसुलापैकीं कांहीं बाबी म्युनिसिपालिटींकडे सोंपविण्यांत आल्या. तथापि लॉर्ड रिपनच्या या उदार धोरणाचा फारसा परिणाम घडून आला नाहीं. विशेषतः लॉर्ड कर्झनच्या अमदानींत अधिकारकेंद्रीकरणाचें तत्त्व अमलांत आल्यामुळें स्थानिक स्वराज्याच्या संस्थांना जे उदार हक्क मिळाले होते ते एका हातानें काढून घेण्यांत येऊं लागले. पण कर्झनसाहेबांच्या या घातक तत्त्वाचे अनिष्ट परिणाम लवकरच हिंदुस्थान सरकारच्या नजरेस आल्यामुळें १९०९ सालच्या अधिकारविभागणी कमिशननें अधिकारविभागणीची योजना तयार केली व त्यामुळें पुन्हां या स्थानिक स्वराज्याच्या संस्थांना थोडे–फार हक्क मिळाले. १९०८ सालीं स्थानिक स्वराज्याचें स्वतंत्र खातें हिंदुस्थान सरकारनें निर्माण केलें व या संस्थांवर देखरेख ठेवण्याकरितां एक स्वतंत्र सभासद वरिष्ठ कार्यकारी मंडळांत घेण्यांत आला. मॉंटेग्यु–चेम्सफोर्ड रिपोर्टामध्यें स्थानिक स्वराज्य संस्थांमध्यें लोकांना शक्य तितके अधिक हक्क व जबाबदारी देण्यांत आली पाहिजे असें तत्त्व नमूद करण्यात आलें आहे. १९१७ चा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यानंतर १९१८ सालीं चेम्सफोर्डनें एक ठराव करून म्युनिसिपालिट्यांचें कार्यक्षेत्र वाढविलें; सरकारी नियंत्रण पुष्कळच कमी करण्यांत आलें; लोकनियुक्त सभासदांची संख्या ¾ व सरकारी सभासदांची ¼ करण्यांत आली; व बहुतेक म्युनिसिपालिट्यांना लोकनियुक्त अध्यक्ष नेमण्याचा हक्क मिळाला. या सुधारणांनंतर स्थानिक स्वराज्य खातें दिवाणांच्या ताब्यांत सोंपीव खातें म्हणून देण्यांत आलें व त्यामुळें दिवाणांनीं या खात्यांत बऱ्याच महत्त्वाच्या सुधारणा करण्याचा उपक्रम केला आहे. पंजाब सरकारनें, संयुक्त प्रांत सरकारनें, व बहुतेक कायदे मंडळांनीं या बाबतींत नवीन कायदे केले आहेत. बंगाल कौन्सिलनें आपल्या प्रांतांतील म्युनिसिपालिट्या व कलकत्ता कार्पोरेशन यांची पुनर्घटना करण्याबाबत एक कायदा मंजूर केला.

लॉर्ड रिपननें स्थानिक स्वराज्यासंबंधानें जें धोरण घालून दिलें होतें तेंच आजतागायत अमलांत आहे. आतां देशाला स्वराज्य लाभलें आहे व नवीन राज्यकारभाराची घटना तयार होत आहे. तेव्हां प्रांतिक सरकार या नगरपालिकांना जास्त हक्क देतात कीं आहेत त्यांतलेच कांहीं काढून घेतात हें पाहणें आहे. अद्यापि बहुजनसमाजाची राज्यकारभार हुषारीनें आणि सर्व माहिती करून घेऊन चालविण्याची पात्रता नसल्यानें कांहीं नगरपालिकांचा कारभार सरकारी रीत्याच चालवावा लागतो आहे. लोकशाही पद्धतीचें बाळकडू आपल्या समाजाला नसल्यानें वैयक्तिक स्वार्थ आणि हेवेदावे अशा स्थानिक स्व. संस्थांतून बोकाळतात.

मुंबई, मद्रास, कलकत्ता, कराची यांप्रमाणेंच नागपूर, जबलपूर व पुणें यांचा दर्जा 'कार्पोरेशन'चा करण्याचें सरकारनें योजिलें आहे. स्थानिक स्वराज्य पाहा.

**नगररचना**—नगररचनेची कला किंवा शास्त्र भारतीयांस फार प्राचीन कालापासून ज्ञात असावें असें दिसतें. चाणक्यानें आपल्या अर्थशास्त्रामध्येंहि दासंबंधीं कांहीं विवेचन केलें आहे. यानंतर पुराणग्रंथांत, विशेषतः अग्निपुराणामध्यें, नगररचनेसंबंधीं नियम दिलेले आहेत. तसेंच नगराभोंवतीं तट कसा बांधावा, त्यास कोणत्या दिशांस व किती दरवाजे ठेवावे, रस्ते किती रुंद असावे, निरनिराळया जातींच्या व धंद्यांच्या लोकांनीं कोणत्या भागांत वस्ती करावी, अश्व, रथ, सैन्य, वगैरे कोठें असावें यांसंबंधीं विस्तृत विवेचन या ग्रंथांत केलेलें आहे.

अलीकडे मनुष्याचे व्यवहार बरेच व्यापक झाले असल्यामुळें व्यापार, उद्योगधंदे, सरकारच्या कचेऱ्या, मोठमोठे कारखाने, मजुरांची वस्ती, रेल्वेचीं स्टेशनें, बाजार, मालाच्या वखारी, वगैरे अनेक गोष्टींस सोयीस्कर ठिकाणें ठेवून नागरिकांच्या

आरोग्यास अपाय न होईल व त्यांचा नगरांतील निवास सुखावह होईल अशा तऱ्हेची आधुनिक नगरांची रचना करावी लागते. याकरितां स्थानिक संस्था वगैरेस कांहीं अधिकार दिलेले असतात व त्या संस्था कांहीं विशिष्ट योजनानुसार घरें वगैरे बांधण्यास, किंवा कारखाने, करमणुकीचीं स्थानें, वगैरे निर्माण करण्यास परवानगी देतात. नगररचनेमध्यें नगराची सुधारणा करणें, त्याची वाढ करणें, त्यांतील सुखसोयी योग्य प्रकारच्या होतील अशी दक्षता घेणें व नगराची वाढ योग्य तऱ्हेनें होईल व ही वाढ फायदेशीर रीतीनें होईल' याची काळजी अशा संस्था घेत असतात. याकरितां नवीन नवीन नगररचनेच्या योजना तयार करीत असतात. त्यांतील क्रिया सामान्यतः पुढीलप्रमाणें असतात :

''नवीन नगरयोजनेकरितां प्रथम योग्य तऱ्हेचे रस्ते आंखणें व त्यांची रुंदी वगैरे दळणवळणाच्या मानानें कमी-अधिक ठेवणें; त्यानंतर रेल्वे वगैरेशीं संबंध जोडणें; नंतर सांडपाणी वाहून जाण्याकरितां व पाणीपुरवठ्याकरितां योग्य मार्गांची तजवीज करणें; नंतर योग्य ठिकाणीं बाजार व दुकानांची सोय, त्याप्रमाणेंच शिक्षणसंस्था, वाचनालयें, पदार्थसंग्रहालयें, करमणुकीचीं स्थानें व उद्यानें, इत्यादि सर्वांची योजना करून नंतर नागरिकांचीं गृहें वगैरेची रचना यांकडे लक्ष देणें. त्याप्रमाणेंच सार्वजनिक सोयी, आग विझविण्याचीं साधनें, रहदारीचे मार्ग, वगैरे गोष्टींकडे लक्ष द्यावयाचें असतें.''

ज्या मानानें शहरांत दाट व पातळ वस्ती असेल किंवा ज्या भागांत लोकव्यवहार विशेष असल्यामुळें दाट वस्ती होणें अपरिहार्य असेल तेथें रस्ते मोठे ठेवून घरें उंच बांधण्यास परवानगी देणें अवश्य असतें. असे रस्ते स्वच्छ ठेवण्याचीहि तजवीज करावी लागते. लोकांच्या करमणुकीचीं स्थानें त्यांच्या वस्तीच्या मानानें वाटून देणें व मधून मधून मोकळीं उद्यानें, व जागा राखणें, इकडे लक्ष द्यावें लागतें. करमणुकीमध्यें बौद्धिक करमणूकहि उपलब्ध करून देणें व त्याकरितां अजबखाने वगैरे ठेवणें अवश्य असतें. घरें स्वच्छ व हवा, उजेड वगैरेंनीं युक्त असतील अशी रचना करणें अवश्य आहे. विशेषतः भाड्याकरितां बांधलेल्या घरांत सर्व सोयी उपलब्ध होतील अशी व्यवस्था झाली पाहिजे अशीहि दक्षता घेतली पाहिजे. सार्वजनिक आरोग्याच्या सोयी म्हणजे गटारें, पाणीपुरवठा व केरकचरा काढून टाकण्याची व्यवस्था योग्य प्रकारें झाली पाहिजे. व्यापार-उद्योगधंद्यांस उत्तेजन मिळेल याकरितां कारखाने, बाजार, मालाच्या वखारी, रेल्वेचे गोदाम, वगैरे योग्य तजविजी करून मजूर-वर्गास आरोग्यदायक अशा राहण्यास जागा मिळतील व त्या कारखान्याजवळच मिळतील अशी खबरदारी घेणें अवश्य आहे. अशा तऱ्हेनें अनेक गोष्टींकडे लक्ष पुरवून नगराची प्रमाणबद्ध रचना करणें हें आजच्या नगररचनाशास्त्राचें ध्येय समजलें जातें व या शास्त्राचा अभ्यास अलीकडेच पद्धतशीरपणें होत असल्याचें दिसून येतें.

**नंगापर्वत**—बाल्टिस्तानच्या नैर्ऋत्येस असलेलें हिमालयाचें एक शिखर. उंची २६,६२९ फूट. १९३२ सालीं डॉ. मर्क्ल या जर्मन संशोधकाच्या नेतृत्वाखालीं नंगापर्वतारोहणाची मोहीम निघाली. पण हवेमुळें या मोहिमेला यश आलें नाहीं. दोन वर्षांनीं पुन्हां यासाठीं सिद्धता झाली; या वेळीं पूर्वीपेक्षां जास्त तयारी ठेविली होती. २५,६०० फूट वर गेल्यावर मोठें वादळ होऊन बरीच मंडळी दगावली. १९३७ सालीं डॉ. वाएन या जर्मन संशोधकानें पुन्हां प्रयत्न केला, पण पुन्हां अशीच आपत्ति कोसळली. पुढल्या सालीं आणखी कांहीं जर्मन संशोधकांचा एक प्रयत्न झाला. परंतु २३,००० फूट गेल्यावर त्यांना परतावें लागलें. वाटेंत त्यांना मागील कांहीं संशोधकांचीं प्रेतें मात्र मिळालीं. १९३९ सालीं आणखी एका जर्मन संशोधकानें मोहीम नेली व नंगापर्वताच्या दिआ मिराई बगलेचा शोध लावला इतकेंच.

**नगारची**—या जातीची एकूण लोकसंख्या (१९११) ३४,७२९. त्यांत हिंदू (५,४९४), मुसलमान (२८,३९७) आणि बाकीचे इतर जातीचे लोक आहेत. त्यांची मुख्य वस्ती बंगालयांत (२४,९०२) असून बाकी आसाम, मध्यप्रांत व वऱ्हाड इकडे आहे. मध्यप्रांतांतील हे लोक गोंडांची शाखा असून किल्ल्यांच्या दरवाजांवर व देवळांत. नगारा वाजविणें हाच यांचा धंदा असे. कांहीं ठिकाणीं यांची स्वतंत्र जात बनत चालली आहे व ते आपसांतच लग्नें करतात.

**नगारा**—मूळ शब्द नकारा (अरबी) आहे. राज्यांतील अठरा कारखान्यांत याचा समावेश होतो. देवळांत पूजेच्या वेळीं अगर युद्धांत आणि दिवसाच्या ठराविक वेळेस काल दर्शविण्यासाठीं याचा उपयोग करतात. लढाईंत वाजविल्या जाणाऱ्या नगाऱ्यास नौबत म्हणत. ती हत्तीवर असे. मुख्य सेनापतीला खास छत्रपतीकडून जरीपटका व ही (साहेबी) नौबत देऊन मोहिमेवर पाठवीत. हा एक प्रकारचा मान असे. या कारखान्यास निराळा खर्च तोडून दिलेला असे. सैनिकास हुरूप येण्यास किंवा जय झाल्यानंतर अथवा सेनापतीचे निरनिराळे हुकूम सैन्यास समजण्यास (निरनिराळे आवाज काढून) नगाऱ्याचा उपयोग होई. नगारखाना किल्ल्याच्या, देवळाच्या किंवा राजवाड्याच्या प्रवेशद्वारावर असून यांत चौघडा असतो. चौघडा वाजवावयाचा तो अस्तमानीं, मध्यरात्रीं व प्रातःकाळीं दोन घटका रात्र राहिल्याचे पूर्वी इशारतीचा डंका करून, दोन घटका रात्र राहिल्यावर चौघडा सुरू करावा. तो दोन घटका दिवस आल्यानंतर अखेरीचा गजर व्हावा, असे नियम आहेत.

**नचिकेतस्**—हा गौतमगोत्रोत्पन्न आणि उद्दालक ऋषि याचा पुत्र. हा सुमारें पांच वर्षांचा असतांना याच्या पित्यानें एकदां उत्तम उत्तम गायी याच्यासाठीं निवडून ठेवून, बाकीच्या ब्राह्मणांस देण्यासाठीं ठेवलेल्या यानें पाहिल्या. हें न आवडून नचिकेता पित्यास पुन्हां पुन्हां विचारूं लागला कीं, आपण मला कोणत्या ब्राह्मणास दान देणार तें सांगा. तें ऐकून पित्यास क्रोध आला व त्यानें मी तुला मृत्यूप्रत समर्पण करणार म्हणून उत्तर केलें. तेव्हां हा यमलोकीं गेला. तेथें यमानें त्याला ब्रह्मविद्या देऊन आपल्या पित्याकडे परत पाठविलें. ही कथा तैत्तिरीय ब्राह्मणांत व कठोपनिषदांत आहे.

**नजीबउद्दौला** (मृ. १७७०)—एक रोहिला सरदार. याचें खरें नांव नजीबखान. हा अत्यंत कारस्थानी, कपटी व विश्वासघातकी असून हळूहळू यानें आपलें वर्चस्व वाढविलें. यानें मराठ्यांविरुद्ध दिल्लीच्या राजदरबारीं जो अफगाण पक्ष होता त्यांत शिरकाव करून घेतला. मनांतून हा मराठ्यांचा अत्यंत द्वेष्टा होता. परंतु वेळीं तो त्यांच्याशीं लुच्चेगिरीनें पड घेतल्यासारखा वागे. यानें स्वतःस मल्हारराव होळकराचा धर्मपुत्र म्हणविलें होतें. पेशवे वारंवार नजीबाची खोड मोडण्यास मल्हाररावास सांगत असतां मल्हाररावानें पेशवे आपल्याकडून धोतरें बडवून घेतील या खोट्याच भीतीनें नजीबास मुद्दाम खळी म्हणून राखलें. यामुळें मराठी राज्याची फार नुकसानी झाली. नजीबानेंच विश्वासघात करून दत्ताजी शिंद्यास ठार मारविलें व त्यानेंच दोनतीन वेळां अबदालीला हिंदुस्थानांत बोलावून आणून शेवटीं पानपत केलें. त्याच्याच कारवाईनें सुजाउद्दौला हा अबदालीस मिळाला व रजपूत राजे मराठ्यांस मिळाले नाहींत. नजीबाचा हा स्वभाव पेशव्यांनीं व शिंद्यानें ओळखला होता. ते त्याला मात्रागमनी या शब्दानें संबोधीत. एकदां तर (१७५७-५८) राघोबादादाच्या हातीं नजीब लागला होता व तो त्याचें कडक पारिपत्य करणार होता. परंतु त्या वेळींहि मल्हाररावानेंच त्याला वांचविलें. दिल्लीस हिंदुपतपातशाही स्थापण्याचें पेशव्यांचें धोरण होतें व त्याला दिल्ली दरबारांतील अफगाणपक्ष विरुद्ध होता. नजीब त्या पक्षाचाच प्रमुख बनला. नजीब जर नाहींसा झाला असता तर दिल्लीस हिंदुपातशाहीची स्थापना सुलभ झाली असती. पानपतानंतर अबदालीनें त्याला दिल्लीस ठेवून व वजीरी देऊन पातशाहीचें रक्षण करण्याचें काम त्याच्याकडे ठेविलें. हें काम त्यानें मरेपर्यंत केलें.

पानपतानंतर हा आणि सुरजमल जाट यांची लढाई होऊन तींत जाट पडला (१७६३). तेव्हा सुरजमलाचा मुलगा जवाहीरमल हा नजीबाच्या पाठीस लागला. त्या वेळेस होळकरानें नजीबाला पाठीशीं घातलें, नजीबाबाद येथें याची कबर आहे.

**नजीर अहमदखान, मौलाना** (मृ १९१२)—एक ऊर्दू साहित्यिक. यांचा जन्म उत्तर हिंदुस्थानांत बिजनोर गांवीं झाला. यांचें शिक्षण एका मौलवीजवळ झालें. पुढें दिल्ली कॉलेजांत अरबी वाङ्मयाचा यांनीं संपूर्ण अभ्यास केला. नंतर ते शिक्षक झाले. यांस पंजाबांतील गुजरातमध्यें जिल्हा व्हिजिटर (डे. इन्स्पेक्टर ऑफ स्कूल्स) म्हणून बढती मिळाली. नंतर अलाहाबादला बदली झाल्यावर (इ. स. १८५७) हे इंग्रजी शिकले. नंतर इं. पीनल कोडाचें ऊर्दू भाषांतर करण्यासाठीं यांस नेमण्यांत आलें. इतरहि कांहीं कायद्यांचीं यांनीं ऊर्दू भाषांतरें करून दिलीं आहेत. नंतर ते हैद्राबादेस निजामच्या नोकरींत राहिले. त्यांना १,७०० रु. दरमहा पगार मिळत असे. तेथें त्यांनीं ऊर्दू क्रमिक पुस्तकें तयार केलीं. 'मबादिए हिकमत' (तर्कशास्त्रावर ग्रंथ), 'मिर अतुल् अरूस' (गृहिणी दर्पण) कादंबरी (या कादंबरीचें मराठींत 'हिराबाई व ताराबाई' या नांवाचें भाषांतर झालें आहे), 'बन अतुन्नाश' (स्त्रीशिक्षण) कादंबरी, व अतिशय गाजलेली 'तौबतुन्नसूह' कादंबरी, इ. ग्रंथ लिहून यांनीं ऊर्दू वाङ्मयांत मोठी भर घातली. महाराष्ट्रांतील हरिभाऊ आपटे यांच्याप्रमाणेंच त्यांच्या सामाजिक कादंबऱ्या सुधारणावादी असतात. त्यांनीं कुराणाचें हिंदुस्थानींत केलेलें भाषांतर फार लोकप्रिय होऊन खपलें. ते चांगले कवि व वक्तेहि होते. एडिंबर्ग विद्यापीठानें त्यांना एलएल्. डी. व पंजाब विद्यापीठाने डी. ओ. एल्. पदवी अर्पण केली होती.

**नट**—हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोह सात स्वरांनीं होतो. पण अवरोहांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत, म्हणून जाति संपूर्ण-औडुव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर संमत आहे. या रागांत मध्यम स्वर सुटा ठेवितात. छायानट, कामोद व बिलावल या रागांचा भास यांत कोठें कोठें होतो.

**नटबिलावल**—हा राग बिलावल थाटांतून निघतो. याचा आरोहावरोह सात स्वरांनीं होतो म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय सकाळचा पहिला प्रहर मानितात. आरोहांत नट व अवरोहांत बिलावल असें मिश्रण यांत होत असल्यानें याचे 'नटबिलावल' हें नांव यथार्थ आहे. यांतील ऋषभ व धैवत स्वरांची संगति वैचित्र्यदायक आहे. हा एक बिलावल प्रकार आहे.

**नटमल्लार**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सात स्वरांनीं होतात. म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. या रागाचा अवरोह वक्र असून

यांत गांधार व मध्यम या स्वरांची संगति नेहमीं दृष्टीस पडते. मल्लार रागांत छायानट मिसळल्यानें हा राग उत्पन्न होतो.

**नटराज**—नटराज, नटेश, नटेश्वर, हीं नांवें एकाच तांडव-नृत्यकारी शिवमूर्तीला लावतात. अशा मूर्ती दक्षिण हिंदुस्थानांत फार आढळतात. प्राचीन समतट व वंग राज्यांत नटराज ही सर्व-सामान्य लोकप्रिय देवता असावी असें वाटतें. नृत्यकारी शिवाची मूर्ति कशी असावी याचें वर्णन मत्स्यपुराणांत आलेलें आहे. उत्तर हिंदुस्थानांत आढळणाऱ्या मूर्तींतून शिवाच्या पायाखालीं एक बैल असतो, व दक्षिणेंत अपस्मार पुरुष नांवाचा एक दैत्य असतो. चार, दहा, बारा, सोळा असे नटराजाच्या निरनिराळ्या मूर्तींना हात असतात.

**नटराजन्, कामाक्षी** ( १८६८–१९४७ )—एक हिंदी समाजसुधारणावादी पुढारी. यांचें शिक्षण मद्रास येथें प्रेसिडेन्सी कॉलेज व लॉ कॉलेजमध्यें झालें. प्रथम हे कांहीं दिवस मद्रास येथील ए. एच्. हायस्कूलचे मुख्याध्यापक होते. नंतर ते 'हिंदु' या प्रसिद्ध पत्राचे साहायक संपादक झाले. १९११ मध्यें ते कर्नूल येथील व १९१८ मध्यें मुंबई येथील प्रांतिक सामाजिक परिषदांचे अध्यक्ष होते. १९२१ मध्यें म्हैसूर येथील नागरिक व सामाजिक प्रागतिक परिषदेचे अध्यक्ष होते व त्याच वर्षी अहमदाबाद येथें भरलेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेचे अध्यक्ष झाले व पुन्हां १९२७ सालीं मद्रास येथेंहि त्यांस अध्यक्षपद मिळालें. हे 'इंडियन सोशल रिफॉर्मर' या पत्राचे पन्नास वर्षे ( १८९०–१९४० ) संपादक होते. यांनीं १९११ सालीं हैदराबाद संस्थानचा सेन्सस रिपोर्ट लिहिला. 'मदर इंडिया' या ग्रंथास उत्तरादाखल यांनीं एक ग्रंथ लिहिला आहे.

**नटेसन, जी. ए.** ( १८७३–१९४८ )— जी. ए. नटेसन आणि कंपनीचे प्रमुख आणि 'दि इंडियन रिव्ह्यू'चे संपादक. यांचा जन्म २५ ऑगस्ट १८७३ रोजीं झाला. शालेय शिक्षण कुंभ-कोणम् व त्रिचनापल्ली येथें व विश्वविद्यालयीन शिक्षण मद्रास येथें झालें. हे मद्रास विश्वविद्यालयाचे सदस्य व मद्रास नगरपालिकेचे कमिशनर होते. प्रथम राष्ट्रीय सभेंत पुढाकार घेत, परंतु १९१९ सालीं हे प्रागतिक पक्षांत शिरले. १९२२ सालीं नॅशनल लिबरल फेडरेशनचे जॉ. सेक्रेटरी होते. १९२३–३३ पर्यंत कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद होते. १९२८ सालीं एंपायर पार्लमेंटरी डेलिगेशनमधून कॅनडाला गेले होते. १९२९ च्या विश्वविद्यालय-परिषदेस हजर होते. १९३३ सालीं टॅरिफ बोर्डाचे सभासद व १९३८ सालीं मद्रासचे शेरीफ होते. २४ ऑगस्ट १९३३ रोजीं यांचा मद्रास येथें मोठा षष्ट्यब्दपूर्तिसमारंभ झाला. यांच्या प्रकाशनसंस्थेनें अनेक थोर पुरुषांचीं लहान चरित्रें प्रसिद्ध केलीं असून कांहींचीं भाषणेंहि छापलीं आहेत. 'हिंदु-स्थानाला काय पाहिजे ?', 'साम्राज्यांतर्गत स्वायत्तता' यां-सारखे ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**नडियाद**— मुंबई, खेडा जिल्ह्याच्या मध्यभागांतील तालुका. क्षेत्रफळ २२४ चौरस मैल. लोकसंख्या ( १९४१ ) १,८१,८४५. यांत खेडीं ९१ असून नडियाद व महुवा हीं दोन शहरें आहेत. नडियाद गांवाची लोकसंख्या सु. तीस हजार. येथें कापसाचें बरेंच पीक होत असे. शहराला लहानसा तट असून त्याला नऊ दरवाजे होते व पलीकडे एक कोरडा खंदक होता.

**नति**—( डेक्लिनेशन ). पृथ्वीवरील कोणत्याहि स्थळाचा निर्देश जसा रेखांशांनीं व अक्षांशांनीं केला जातो, त्याप्रमाणें खगोलावरील स्थळ विषुवांश ( राइट असेन्शन ) आणि नति यांनीं दाखविलें जातें. खगोल ध्रुव यामधून जाणाऱ्या महावृत्तावर अशा स्थळाच्या मध्यवृत्तापासूनच्या अंतरास नति म्हणतात.

लोहचुंबकाचा एखाद्या स्थळाच्या याम्योत्तर वृत्तापासून भ्रंश जो होतो, त्यासहि चुंबकनति म्हणतात. हा नतिकोण प्रत्येक स्थळीं भिन्न असतो त्याप्रमाणेंच कालाप्रमाणेंहि एखाद्या स्थळीं तो बदलतो.

| | | | |
|---|---|---|---|
| १५७६ सालीं लंडनचा नतिकोण | | ११° १५′ | पूर्व |
| १९०३ | ,, ,, | १६° १९′ | पश्चिम |
| १९२० | ,, ,, | १४° ८′ | पश्चिम |

**नत्र**—(नायट्रोजन). चिन्ह N. परमाणुभार १४·००८. स्वतंत्र-पणानें हें हवेंत असतें व तिच्यांत याचें प्रमाण शेंकडा ७८·०६ भाग असतें. संयुक्तावस्थेंतहि हें निसर्गांत पुष्कळ सांपडतें. हा वर्णहीन आणि रसहीन वायु असून उष्णतामान कमी करून व दाब वाढवून त्यास द्रवरूपांत आणतां येतें. ७६० मि. मी. दाब असतांना १९६° शत. (सें.) वर हें मूलद्रव्य उकळूं लागतें. स्वभावतः नत्र निष्क्रिय आहे. तथापि उष्णतामान अतिशय वाढविलें म्हणजे त्याचा धातूंबरोबर संयोग होऊन नत्रिदें (नायट्राइड्स) तयार होतात. नत्राचीं एकंदर पांच प्राणिदें होतात. त्यांपैकीं $N_2O_5$ हा पाण्यांत मिसळला म्हणजे नत्राम्ल तयार होतें. उज्जाबरोबर नत्राचा संयोग होऊन अमोनिया तयार होतो. नत्राच्या संयुक्तांपैकीं नत्रेत ( नायट्रेट ) आणि नत्राम्ल विशेष महत्त्वाचीं आहेत.

**नत्रामिद**—( अझोइमाइड ). अत्यंत घाण वास असलेला, तीव्र, स्फोटक द्रवरूप पदार्थ. हें अम्ल व ह्याचीं सिंधु ( सोडियम ) आणि पालाश ( पोटॅशियम ), शिवाय इतर लवणेंहि तशींच तीव्र स्फोटक असून तीं फार काळजीपूर्वक वापरावीं लागतात.

**नत्राम्ल**—( नायट्रिक ॲसिड ). नत्राचें अतिशय महत्त्वाचें संयुक्त. शुद्ध स्वरूपांत हें शुभ्र वर्णहीन द्रवरूप पदार्थ असून हवेंत त्याच्या विपुल वाफा ( फ्युमिंग ) तयार होतात व कातडी-

वर त्याची प्रखर क्रिया होते. ८०° शत. ला हें अम्ल उकळतें. ह्याचें विशिष्टगुरुत्व १·५२ आहे. नेहमीं बाजारांत येणाऱ्या अम्लाला तीव्रजल (ॲक्वाफोर्टीस) म्हणतात. तापविलेलें चिली साल्टपिटर (सिंधु नत्रेत–सोडियम नायट्रेट) आणि तीव्र गंधकाम्ल ह्यांच्यापासून हें तयार करतात. नत्राम्ल अतिशय जोरदार प्राणिदीकारक पदार्थ (ऑक्सडायझिंग एजंट) आहे. गनकॉटन (नायट्रोसेल्युलोज), नत्रमधुक (नायट्रो-ग्लिसरिन), ट्रायनायट्रोटोल्युईन (T. N. T.), वगैरे स्फोटक द्रव्यें तयार करण्यासाठीं ह्या अम्लाचा उपयोग होतो. नत्राम्ल आणि उज्ज-हरिकाम्ल यांच्या मिश्रणाला जलराज(ॲक्वारेजिया) म्हणतात. हें सोनें आणि प्लॅटिनम विरघळण्यासाठीं उपयोगांत आणतात.

चिली साल्टपिटरचा नैसर्गिक सांठा नियमित असल्यामुळें व तो आतां आणखी फार वर्षें पुरण्यासारखा नसल्यामुळें नत्राम्ल तयार करण्यासाठीं नवीन रीत शोधून काढण्याचे अनेक प्रयत्न चालू आहेत. सध्यां कृत्रिम नत्राम्ल तयार करण्याच्या दोन तऱ्हा आहेत : एक हवेंतील नत्र आणि प्राणवायु यांच्या मिश्रणापासून विजेच्या साहाय्यानें प्रथम नत्रक प्राणिद (नैट्रिक ऑक्साइड) तयार करून त्यापासून पुढें नत्राम्ल तयार करणें. दुसरी नत्र आणि उज्ज ह्यांपासून अमोनिया तयार करणें (हावर आणि क्लॉड ह्यांची पद्धत) व नंतर अमोनियापासून नत्राम्ल तयार करणें (ओस्टवाल्ड). पहिल्या महायुद्धात या कृत्रिम पद्धतींचा पुष्कळ उपयोग झाला.

**नत्रिल वानजावीन**—(नायट्रोबेन्झीन). पिवळट रंगाचा एक द्रवरूप पदार्थ. बेंझॉल, नत्राम्ल आणि गंधकाम्ल ह्यांचें मिश्रण करून त्याच्यापासून हा तयार करतात. रंगासाठीं व औषधासाठीं लागणारा मूळ पदार्थ जो नीलीन (अनीलीन) तो नत्रिल वानजावीनपासून तयार करतां येण्यासारखा असल्यामुळें हा मोठ्या प्रमाणावर तयार होऊं लागला आहे.

**नत्रीकरण**—(नायट्रिफिकेशन). विशिष्ट सूक्ष्म जीवां-(बॅक्टीरिया)च्या साहाय्यानें जमिनींतील अमोनियाचें नत्रेत (नायट्रेट) करण्याची पद्धत. वनस्पतींना लागणारा नत्र नेहमीं नत्रेतापासून मिळण्यासारखा असल्यामुळें निसर्गाच्या स्थैर्यासाठीं ही क्रिया विशेष महत्त्वाची आहे.

**नत्रेत**—(नायट्रेट). नत्राम्लाचें लवण. उत्तर हिंदुस्थानांत पालाश नत्रेत (पोटॅशियम नायट्रेट–सोरा) मोठ्या प्रमाणांत सांपडतो. उत्तर चिलींत सिंधु नत्रेत (सोडियम नायट्रेट–किंवा चिली साल्टपिटर) अशाच मोठ्या प्रमाणात सांपडतो. सर्व धान्यांच्या उत्पादनासाठीं नत्राची आवश्यकता असते व तो पुरविण्याचें सोपें आणि स्वस्त साधन म्हणजे सिंधु नत्रेत (सोडियम नायट्रेट). पालाश नत्रेता(पोटॅशियम नायट्रेट)चा स्फोटक द्रव्यें तयार करण्यासाठीं उपयोग होत असल्यामुळें शेतीच्या खतासाठीं सिंधु नत्रेता(सोडियम नायट्रेट)चाच उपयोग होऊं लागला आहे.

**नथुभाई, सर मंगळदास** (१८३२-१८९०)—एक दानशूर हिंदी व्यापारी. हें घराणें मूळचें दीवचें. तेथून मुंबईस राहावयास आलें. मंगळदास यांचे वडील अकराव्या वर्षीच वारल्यामुळें लहान वयांतच ते धंद्यांत शिरले व त्यांनीं पुष्कळ पैसा मिळविला. मंगळदास यांनीं बायको वारल्यावर तिच्या स्मारकार्थ कल्याणला एक मोफत दवाखाना काढला व पुण्याच्या डेव्हिड ससून हॉस्पिटलला एक स्वतंत्र स्त्रियांचा विभाग (फीमेल-वॉर्ड) जोडला. १८६२ सालीं मुंबई युनिव्हर्सिटींत एक फेलोशिप ठेवून युरोपांत कांहीं वर्षें राहण्याची सोय पदवीधर अभ्यासूंना करून दिली आणि मृत्युपत्रान्वयें अशाच कांहीं शिष्यवृत्ती मुंबई विद्यापीठांत ठेवल्या. १८७२ सालीं सी. एस्. आय्. आणि १८७५ सालीं नाइट बॅचलर या पदव्या सरकारनें त्यांना दिल्या. त्यांनीं हिंदी दुष्काळ फंडाला मोठी देणगी दिली व त्याखेरीज ५० लक्ष पौंड इतर दानधर्मांत खर्च केले.

**नंद**—गोकुळांतील गोपाळांचा प्रमुख. हा वसुदेवाचा परम मित्र असल्यानें वसुदेवानें आपली स्त्री रोहिणी व पुत्र बळराम आणि कृष्ण यांस गोकुळांत ठेविलें होतें. नंदास यशोदा नामक स्त्री होती. कृष्णचरित्रांत या यशोदा–नंदाविषयीं, त्यांची मोठी वत्सलता आणि ऋजुता दर्शविणारी माहिती येते. नंद इंद्रयाग करीत असे तो कृष्णानें बंद करविला, हें गोवर्धनोद्धाराच्या कथेवरून दिसतें.

**नंद**— तिरुनलैपोवर. हा एक पराया (अंत्यज) जातीचा साधुपुरुष सुमारें ६०० वर्षांपूर्वी मद्रासप्रांतीं होऊन गेला. नंदाला लहानपणींच देवतांच्या मृण्मय मूर्ती करून त्यांची पूजा-अर्चा करण्याचा नाद लागला. मोठा झाल्यावर परमेश्वराची कृपा संपादण्याकरितां देवळांतील नगाऱ्यांना वगैरे लागणारीं कातडीं स्वतः कमावण्याचा व्यवसाय त्यानें सुरू केला आणि अंगाला भस्म फासून शिवनामस्मरण करणें हा त्याचा नित्याचा व्यवसाय बनला. त्यानें केलेल्या चमत्कारांच्या अनेक दंतकथा आहेत. तो चिदंबर येथील शिवाचें दर्शन घेण्यास गेला त्या वेळीं तेथील दीक्षितांना (ब्राह्मणांना) स्वप्नांत नंदाला अग्निदिव्यानें शुद्ध करून ब्राह्मण जातींत घेण्याबद्दल दृष्टान्त झाला. तें कळल्यावर नंदानें स्वतःस अग्निपावन करून घेतलें व तो चिदंबरच्या देवालयांत गेला व तेथें नटराजाच्या मूर्तींत अंतर्धान पावला. त्यामुळें त्याला संतमालिकेंत स्थान मिळालें आहे.

**नंदकुमार**—हा बंगाली ब्राह्मण बंगालचा सुभेदार सुराज-उद्दौला ह्याच्या हाताखालीं फौजदार व नंतर दिवाण होता.

पण तो आंतून इंग्रजांना फितुर असे. इंग्रजांनीं आपणाला वजीर नेमावें अशी त्याची अपेक्षा होती, पण क्लाइव्ह व हेस्टिंग्ज या दोघांनींहि त्याची निराशा केली. त्यामुळें चिडून नंदकुमारानें हेस्टिंग्जवर लांच खाल्ल्याची फिर्याद कौन्सिलांत आणली. तो आरोप शाबीत धरून लांचाची रक्कम परत करण्याचा हुकूम कौन्सिलनें हेस्टिंग्जला केला. उलट हेस्टिंग्जनें नंदकुमारावर सहा वर्षांपूर्वी एक खोटा दस्तऐवज केल्याची फिर्याद आणली; तींत इंग्रज न्यायाधीश इम्पे यानें झटपट चौकशी करून नंदकुमारास दोषी ठरविलें व इंग्रजी कायद्याप्रमाणें फांशीची शिक्षा दिली (ता. ५ ऑगस्ट १७७५). त्या खटल्यांतील ज्यूरींचे बाराहि इसम युरोपियन होते. नंदकुमाराजवळ ५२ लाख रुपये रोकड व तितक्याच किंमतीचें जवाहीर होतें. ते सर्व कंपनी सरकारनें जप्त केलें.

**नंददास**—हा हिंदी कवि सूरदासजीचा समकालीन होता. सिंधुनद गांवांतील एका सुंदर मुलीवर याचें मन जडलें होतें. परंतु गोसावी विठ्ठलनाथांनीं याची त्या मोहांतून सुटका केली. नंददासानें पुढें यांनाच आपले गुरु केलें. यानें (१) रास-पंचाध्यायी, (२) हितोपदेश, (३) ज्ञान-मंजरी, (४) विरह-मंजरी, वगैरे एकोणीस ग्रंथ लिहिले आहेत.

**नंदप्रभंजन**— ओरिसा प्रांतांत राज्य करणाऱ्या गंग घराण्यांतील एक राजा. गंग लोक कारक व धाडसी असून समुद्रावरून दूरदूरच्या देशांशीं व्यापार करीत असत. प्राचीन शिलालेखांत या राजाचा उल्लेख आहे. गंग राजघराण्याबद्दल हिंदुस्थान व सिलोन यांमधील सर्वांत जुन्या बखरींतून उल्लेख आढळतो.

**नंद भाषा**—ही दलालांची जुनी सांकेतिक भाषा आहे. भुरका म्हणजे रुपया; ढोकला म्ह. पैसा; केवली म्ह. एक; आवारू म्ह. दोन; उधानु म्ह. तीन; पोक्रू म्ह. चार; मुळू म्ह. पांच; शेली म्ह. सहा; पवित्र म्ह. सात; मंगी म्ह. आठ; तेवसू अथवा लेवनु म्ह. नऊ; अंगुळू म्ह. दहा; एकड्ड म्हणजे अकरा; रेघी म्ह. बारा; ठेपरू म्ह. तेरा; चोपड्ड म्ह. चौदा; तळी म्ह. पंधरा. यापुढें तान लाविला म्हणजे सोळा, सत्रा, अठरा, एकोणीस होतात; जसें, भुरका तानतळी; आवारू तानतळी; उदानु तानतळी, पोक्रू तानतळी. काटी म्ह. वीस (जसें भुरकातान काटी, आवारू तानकाटी म्ह. एकवीस, बावीस, इत्यादि). चिटी म्ह. शंभर; डकार म्ह. हजार; फाटा म्ह. आणा; आवारू फाटे म्ह. दोन आणे; मंगी फाटे म्ह. आठ आणे; तळी फाटे म्ह. पंधरा आणे. दुकार म्ह. एक आणा; चकार म्ह. दोन आणे; पकार म्ह. चार आणे; टाली म्ह. अर्धा रुपया.

विसोबा खेचराचा या भाषेंत एक प्रख्यात अभंग आहे तो असा—मुळू (५) वदनाचा, उधानू (३) नेत्राचा। अंगुळू (१०) हातांचा, स्वामी माझा ॥ १ ॥ मुगुट जयाचा केवळया (१) आगळी काटी (२०)। पवित्र (७) तळवटी चरण ज्याचे ॥ २ ॥ ढकार (१०००) वदनाचा आला वर्णावया। जिव्हा त्याच्या चिरल्या वर्णवेना ॥ ३ ॥ शेलीं (६) वेडावली पोक्रू (४) मौनावली। अंगुळू मंगी (१८) थकली न कळे त्यांशीं ॥ ४ ॥ सद्भावें शरण आवारू (२) जोडून। खेचर वीसा म्हणे स्वामी माझा ॥ ५ ॥

**नंदलाल मंडलोई, चौधरीराव** (मृ. १७३१)— हा माळव्यांतील एक मोठा जमीनदार होता. मराठ्यांना माळवा जिंकण्यास यानें फार मदत केली. मोंगल अधिकाऱ्यांनीं त्यास सर्वस्वीं हैराण केल्यामुळें प्रथम सवाई जयसिंगाच्या सल्ल्यानें तो मराठ्यांस अनुकूल झाला. मंडलोई घराणें अद्यापि इंदुरास नांदत आहे. नंदलाल मरण पावल्या वेळीं त्याच्या पुत्रांचें समाधान स्वतः बाजीराव व चिमणाजीआप्पा यांनीं करून यांचें पुढें यथायोग्य चालविण्याविषयीं अभिवचन दिलें. मल्हाररावानें तेजकर्णास (नंदलालचा पुत्र) पालखी देऊन त्याच्या नेमणुकीबद्दल सालाचे ७०० रु. ठरविले.

**नंदवंश**— मगधराज्याच्या शिशुनाग वंशांतील शेवटचा राजा नंदिवर्धन अथवा महानंदिन् याला एका दासीपासून महापद्म नांवाचा मुलगा झाला. यानें बापाच्या पश्चात् गादी बळकाविली (खि. पू. ३७२). या कालापासून या नंदवंशास आरंभ झाला. हिंदुपुराणांत या नंदवंशाच्या नऊ राजांचीं नांवें आहेत. अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळीं नंदवंशांतला महापद्म राजा राज्य करीत होता. त्याच्या पदरीं २० हजार घोडदळ, २ लाख पायदळ, २ हजार रथी व ३ हजार गजदळ असून तो अत्यंत श्रीमंत होता. बौद्धांच्या महावंश या ग्रंथांत नंदवंशांतल्या धनानंद राजाचा उल्लेख आहे. त्यानें अगणित द्रव्य सांठविलें होतें. शेवटच्या नंदराजास प्रख्यात चंद्रगुप्तानें हांकलून त्याचें राज्य घेतलें (खि. पू. ३२२).

**नंदादेवी**—हिमालयाचें हिंदुस्थानांतील सर्वोच्च शिखर. उंची २५,६६० फूट. हें संयुक्त प्रांतांतील अलमोरा जिल्ह्यांतील अलमोरा तहशिलीमध्यें आहे. याचा आकार शंकू (पिरॅमिड)-सारखा आहे. येथून निघणाऱ्या ढगांना हिंदु लोक नंदादेवीच्या पाकघरांतील धूर असें म्हणतात. या शिखराच्या पायथ्याशीं बारा वर्षांनीं एक जत्रा भरते. पण स्थान फार दुर्गम असल्यानें थोडेच यात्रेकरू जमतात. १९३६ सालीं एक ॲंग्लो-अमेरिकन संशोधक टोळी हें शिखर गांठण्यांत यशस्वी झाली. त्यापूर्वी नंदादेवीच्या पायथ्यापावेतों ऋषिगंगेच्या वळणानें जाण्याचा मार्ग शोधला गेला होता.

**नंदिकेश्वर**—मुंबई, विजापूर जिल्हा. बदामी तालुक्यांतील एक खेडें. हें येथें असणाऱ्या महाकूटाऱ्या देवालयसमुच्चयाकरितां प्रसिद्ध आहे. येथील देवालयें चालुक्य किंवा द्राविड पद्धतीचीं असून येथें विष्णु-पुष्करणी नांवाचें कुंड आहे. या कुंडांत ब्रह्मयाची मूर्ति आहे. दरवाजाच्या ईशान्येस लज्जागौरीचें देवालय आहे. वांझ बायका या गौरीची पूजा करतात. जवळच एक पापविनाशी कुंड आहे. महापुरेश्वर देवळांत ६ लेख आहेत.

**नंदिदुर्ग**—म्हैसूर, कोलार जिल्ह्याच्या पश्चिम भागांत असणारी ४,८५१ फूट उंच व तटबंदी केलेली टेंकडी. हें ठिकाण बंगळूरपासून उत्तरेस ३१ मैल दूर आहे. यावर एक सपाट मैदान व अमृतसरोवर नांवाचें तळें आहे. येथून पालार व अर्कावती या नद्यांचा उगम होतो. येथें पूर्वी गंग राजाचें ठाणें असून तें आपल्याला नंदगिरीचे अधिपति म्हणवीत. पुढें चोलांनीं येथें येऊन नंदगिरीचे नंदीगिरि असें नांव ठेविलें. ही टेंकडी बराच काळ मराठ्यांच्या ताब्यांत होती. योगनंदीश्वराच्या देवळांत संभाजीचा शिलालेख आहे. १७७० सालीं ही टेंकडी हैदरकडे गेली. हैदर व टिपू सुलतान यांनीं येथें बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या. येथें एक 'टिपूज् ड्रॉप' नांवाचा कडा आहे. येथें अपराध्यांना टिपू कडेलोटाची शिक्षा देत असे, असें म्हणतात. १७९१ सालीं हें ठिकाण ब्रिटिशांनीं घेतलें व बरेच दिवस थंड हवेचें ठिकाण म्हणून येथें युरोपियन लोक उन्हाळ्यांत राहत असत. हल्लीं संस्थान सरकार याची व्यवस्था पाहतें. टेंकडीच्या पायथ्याशीं गांव असून त्यांत भोगनंदीश्वर व अरुणाचलेश्वर अशीं जुनीं देवळें आहेत.

**नदिया**—पश्चिम बंगाल इलाख्यांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ २,८७९ चौरस मैल. हा प्रदेश सुपीक असून येथें हिंवाळ्याचीं पिकें व तांदूळहि होतो. सर्व प्रदेशांत नद्यांचें जणुं काय जाळेंच पसरलें आहे. परंतु भागीरथी, जलंगी व मातागंगा या तिन्ही नद्यांना मिळून नदिया-नद्या असें नांव आहे. पाऊस सरासरी ५७ इंच पडतो. येथें पुरांपासून फार त्रास होतो. नदिया किंवा नवद्वीप हें फार जुनें आहे. लो. सं. १९४१ सालीं १७,५९,८४६ होती. शांतिपूर येथें पूर्वी मलमल फारच सुरेख होत असे. शांतिपूर व मुनशीगंज येथें खजुरांपासून साखर काढण्याचे हिंदी लोकांचे कारखाने आहेत. नवद्वीप व मेहरपूर येथें पितळेचीं भांडीं होतात. कृष्णनगर येथें मातीचीं चित्रें होतात. कुष्टिया येथें उंसाच्या चरकांची गिरणी आहे. या जिल्ह्याचे पांच भाग केले आहेत. त्यांचीं मुख्य ठिकाणें कृष्णनगर, कुष्टिया, राणाघाट, मेहरपूर व चौदांग. नदिया हें संस्कृत भाषेकरितां पूर्वीपासूनच प्रसिद्ध आहे. वासुदेव सार्वभौम या पंडितानें या ठिकाणीं विद्येचें केंद्र स्थापन करून मिथिलेचा वरचढपणा नाहींसा केला. येथें टोल नांवाच्या संस्कृत शाळा आहेत. नवद्वीप पाहा.

**नदी**—ऋग्वेदामध्यें व मागाहून झालेल्या वैदिक ग्रंथांत याचा अर्थ पाण्याचा प्रवाह असा आहे. नदीच्या पात्रांत ज्या उथळ जागा (गाध) असतात त्यांचा, त्याचप्रमाणें नदीच्या पलीकडील तीराचा (पाराचा) व नदींतील घोड्यांच्या स्नानाचा, असे तेथें उल्लेख आलेले आहेत. नद्यांचा पर्वतांशीं निकट संबंध दाखविलेला आढळून येतो. नदीपति ही पदवी समुद्राला किंवा त्याच्या पाण्याला एकदां दिलेली आहे.

पुराणकाळीं नद्यांना तीर्थांचें महत्त्व प्राप्त झालें व अद्यापिहि गंगा, गोदा, कृष्णा, इ. नद्यांना देवता मानून त्यांच्या पुण्योदकानें भाविक लोक आपल्याला पावन करून घेतात. नद्यांना घाट व पूल बांधणें हे एक मोठें पुण्य कर्म समजलें जाई. असे असंख्य घाट हिंदुस्थानांत पाहावयास सांपडतात.

नदीचा उगम साधारणतः एखाद्या डोंगरांत किंवा पर्वतांत होतो. कांहीं नद्या सरोवरांतून निघतात. कांहीं नद्या तात्पुरत्या निर्माण होतात. अशा प्रकारच्या नद्यांना हंगामी नद्या म्हणतात. या वर्षभर वाहत नाहींत. उंच भागांत पडलेलें पावसाचें पाणी ओहोळांनीं व ओढ्यांनीं वाहत येऊन त्यांचा एक मोठा प्रवाह बनतो व त्याला नदीचें स्वरूप येतें. पण पावसाळा संपतांच अशा प्रकारच्या नद्यांना होणारा पाण्याचा पुरवठा कमी पडतो. व पुढें पुढें तर पाण्याचा पुरवठा बंद पडल्यामुळें अशा प्रकारच्या नद्यांचें पात्र कोरडें ठणठणीत पडतें. बहुशः सर्वत्र नद्या उंचावरून खोलगट भागाकडे वाहत जात जात शेवटीं समुद्राला मिळतात. नद्यांना उतरणीवरून वाहत असतांना कित्येक वेळीं कड्यावरून एकदम उडी घेऊन पुढचा मार्ग आक्रमावा लागतो. अशा ठिकाणीं जो पाण्याचा प्रवाह उंचावरून उडी घेऊन खालीं पडतो त्यास धबधबा म्हणतात. नद्या वाहतांना ज्या ठिकाणीं प्रवाह जोराचा असेल तेथील माती वाहून नेतात व ही माती गाळाच्या रूपानें नदीच्या खालच्या भागावर पात्राच्या दोन्ही बाजूंस पसरून जाते व तो भाग सुपीक बनतो.

ज्या ठिकाणीं धबधबे असतात त्या ठिकाणीं यंत्रसाहाय्यानें वीज निर्माण करतां येते व अशा प्रकारानें वीज निर्माण केली तर तीसाठीं खर्चहि कमी येतो. नदीला धरणें बांधून व पाटबंधारे काढून आसपासच्या कित्येक मैलपर्यंतच्या जमिनीला पाण्याचा पुरवठा करतां येतो व वर्षभर जमिनीची लागवड करतां येते. नदीकांठच्या कित्येक खेड्यांना सहज पाणीपुरवठा होतो; इतकेंच नव्हे तर यंत्रसाहाय्यानें कित्येक मैल दूर असलेल्या शहरांनासुद्धां पाणीपुरवठा करतां येतो.

कांहीं नद्यांचें पात्र मैल दीड मैल रुंद असतें, तर कांहींचा प्रवाह अखेरपर्यंत एवढा वेगवान् असतो कीं, समुद्राला नदी मिळाली कीं तो जोरानें आंत घुसतो. नद्यांचें पात्र खोल असेल तर त्यांचा वाहतुकीसाठीं उपयोग होतो. नद्या समुद्रास मिळतांना कित्येक वेळीं त्रिभुज ( डेल्टा ) तयार करतात. अर्थात् हा त्रिभुज नदींतून वाहून आलेल्या गाळामुळेंच तयार होतो. हा भागहि चांगला सुपीक असतो. त्रिभुज प्रदेश पाहा.

पण कित्येक वेळीं नद्यांचें पात्रहि वारंवार बदलतें व त्यामुळें फार नुकसान होतें. साधारणतः नद्यांचें पात्र कालांतरानें हळूहळू बदलत असतें, पण कांहीं नद्यांचीं पात्रें थोड्या वर्षांच्या अंतरानें बदलतात व अनेक अनर्थ करतात. चीनमधील पीत नदी ही वारंवार पात्र बदलणारी म्हणून प्रसिद्ध आहे.

आपण गंगा नदीचा प्रवास,फार लांबचा म्हणतों, पण तो सारा १,५०० मैलच भरतो. जगांत पुढील नद्या २,००० मैलांहून जास्त प्रवास करतात—

| नांव | प्रदेश | मैल |
|---|---|---|
| मिसोउरी–मिसिसिपी | सं. संस्थानें, अमेरिका. | ४,२२१ |
| अमेझॉन | दक्षिण आफ्रिका | ४,००० |
| नाइल | उत्तर ,, | ३,६०० |
| यांगत्से | आशिया, चीन | ३,४०० |
| येनेसी | ,, सायबेरिया | ३,३०० |
| कॉंगो | आफ्रिका | ३,००० |
| नायगर | ,, | ३,००० |
| ओबी | आशिया, सायबेरिया | २,७०० |
| मेकॉंग | आशिया, इंडो-चीन | २,७०० |
| होआंगहो | ,, चीन | २,६०० |
| लेना | ,, सायबेरिया | २,६०० |
| आमूर | ,, चीन | २,५०० |
| व्होल्गा | युरोप, रशिया | २,४५० |
| मॅकेन्झी | अमेरिका, कानडा | २,३०० |

**नंदी**—नंदिक, नंदिकेश्वर. कामधेनूचा पुत्र व शिवगणांतील एक. याची सर्व आकृति मनुष्यासारखी असून फक्त मुख वानरासारखें आहे. भुज ऱ्हस्व आहेत. दक्षयज्ञविध्वंसकालीं यानें भग ऋत्विजास बद्ध केलें होतें. यानें रावणास शाप दिला होता. प्रत्येक शिवालयांत नंदीची मूर्ति असते. लिंगायतांचा बसव हा नंदीचा अवतार समजत असल्यानें ज्या प्रांतांत ( उदा., म्हैसूर ) लिंगायतांचा भरणा जास्त आहे त्यांतून देवळांत नंदीच्या मोठमोठ्या मूर्ती आहेत. एक नंदीपुराणहि आहे. बंगलूर येथें खुद्द नंदीचेंच देऊळ असून आंतला नंदी एका मोठ्या मजल्याइतका उंच आहे. म्हैसूरच्या चामुंडी टेंकडीवरील नंदी असाच मोठा व सुबक आहे. शंकराचें वाहन नंदी असल्यानें प्रत्येक शंकराच्या देवळांत लिंगापुढें नंदी असतोच.

**नंदुरबार**—मुंबई, पश्चिम खानदेशांतील एक तालुका. क्षेत्रफळ ९९२ चौरस मैल. यांत नंदुरबार हें एकच व मुख्य शहर असून २७५ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९४१ ).१,३३,२३६. सरासरी पाऊस २५ इंच पडतो. तापी व शिवा याच नद्यांना १२ महिने पाणी असतें. तालुक्यांत पाटाचेंहि पाणी असून थोड्याफार बागाइती जमिनी आहेत. जंगल बरेंच असल्यामुळें वाघांचा उपद्रव फार होतो. नंदुरबार हें तालुक्याचें ठाणें आहे. याचा नंदिगड या नांवानें कान्हेरी येथील लेण्यांतील शिलालेखांत उल्लेख आहे. हें गांव नंदगवळी यानें वसविलें असून मुसलमानांच्या स्वारीपर्यंत तें त्याच्या वंशजांच्या ताब्यांत होतें, असें म्हणतात. येथें कचेऱ्या, कोर्ट, हायस्कूल, मराठी शाळा, पोस्ट व म्युनिसिपालिटी आहे. येथील जुना किल्ला मोडकळीस आला आहे. त्यांत दोन विहिरी आहेत. एका जुन्या मशिदीचे अवशेष असून तिच्या एका मनोऱ्यावर एक फारशी शिलालेख आहे. उत्तरेच्या बाजूस जुम्मा मशीद असून ती एक देऊळ पाडून बांधली, असें म्हणतात. येथें एक रामाचें व एक विठ्ठलाचें देऊळ असून ४–५ तलाव आहेत. येथील सरदेसाई यांचें बरेंच जुनें घर आहे. लो. सं. बावीस हजार आहे. ताप्ती–व्हॅली रेल्वे झाल्यापासून येथील व्यापार वाढत आहे व स्टेशन महत्त्वाचें झालें आहे. कापूस पिंजण्याचे व गठ्ठे बांधण्याचे, तसेंच कातडीं कमावण्याचे व तेल काढण्याचे कारखाने आहेत.

**नॅन्टीज**—पश्चिम फ्रान्स, ल्वॉर इन्फेरीयर विभागाचें मुख्य शहर व बंदर. लो. सं. ( १९३६ ) १,९५,१८५. येथें जहाजें बांधण्याचा मोठा धंदा आहे. येथील डॉब्रे नांवाच्या पदार्थसंग्रहालयांत जुने ऐतिहासिक लेख व इतर वस्तू यांचा संग्रह असून तसबिरी वगैरेहि आहेत. येथें साखर शुद्ध करण्याचे, तांदूळ कांडण्याचे, साबू तयार करण्याचे व तेल काढण्याचे कारखाने मुख्य आहेत. रोमन लोकांच्या अमलाखालीं हें शहर व्यापाराचें व राज्यकारभाराचें केंद्र होतें. सेंट क्लेयर यानें तिसऱ्या शतकाच्या मध्यकालांत येथें ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला. 'एडिक्ट ऑफ नॅन्टीज' ही ह्युजेनॉट लोकांची स्वातंत्र्याची सनद असून तिच्यावर १५९८ सालीं येथील ड्यूकनें सही केली, पण १६८५ सालीं १४ व्या लुईनें ही सनद रद्द केली. स. १७८९ च्या राज्यक्रांतीस अनुकूल झाल्यामुळें स. १७९३ मध्यें या शहराला बराच त्रास पोंचला.

**नन्नयभट्ट**— एक तेलगू कवि. हा इ. स. ११ व्या शतकांत होऊन गेला. यानें प्रथमतः लहानपणीं वेदाध्ययन करून नंतर शास्त्राभ्यास केला. हा याज्ञिक क्रियेंत चांगला निष्णात असे.

यानें स्वतः सोमादि यज्ञहि केले होते. यानें एक तेलंगी भाषेचें जें व्याकरण केलें आहे त्यास 'आंध्र कौमुदी' असें नांव आहे. यानें नारायणभट्ट नामक एका तैलंग ब्राह्मणाच्या साहाय्यानें महाभारताच्या पहिल्या दोन पर्वांचें तेलंगींत जें भाषांतर केलें तें फारच उत्कृष्ट झालेलें आहे.

**नॅन्सी**— फ्रान्स देशाच्या ईशान्य भागांतील एक शहर. पूर्वी लोरेन प्रांताचें हें मुख्य शहर होतें. सांप्रत म्युर्थ-ए-मोझेल विभागाचें हे मुख्य शहर आहे. येथील लोकसंख्या १९३६ सालीं १,२१,३०१ होती. नॅन्सी हें धर्माधिकारी व प्रिफेक्ट यांचें राहण्याचें ठिकाण असून अपील कचेरी, अदालत कचेरी व विसाव्या पलटणीचें मुख्य ठाणें आहे. हें शहर शैक्षणिक विभागाचें मुख्य ठिकाण असून येथील विद्यापीठ १५७२ सालीं स्थापन झालेलें आहे. येथें कायदे, वैद्यक, शास्त्रें व वाङ्मय या शाखांचीं महाविद्यालयें आहेत. कनिष्ठ दर्जाची न्यायकचेरी व व्यापारी न्यायकचेरी, दलालमंडळ, प्रवचनमठ व शिक्षक तयार करण्याची शाळा, धर्मशिक्षणाची शाळा, शेतकीची शाळा, जंगल शिक्षणाची शाळा, वगैरे संस्था आहेत. १२ व्या शतकांत लोरेन ड्यूक याची राजधानी येथें स्थापन करण्यांत आली. १८७० सालीं प्रशियन लोकांनीं हें जिंकल्यावर खंडणी घेऊन तें पुन्हां फ्रेंचांच्या स्वाधीन केलें. येथें लोंकरी व सुती कापडाचे कारखाने, बूट, गवती टोप्या, मातीचीं भांडीं, वगैरे तयार करण्याचे कारखानेहि आहेत. कँब्रिक कापड आणि भरतकाम यांविषयीं नॅन्सी प्रसिद्ध आहे.

**नफा**—उत्पादनाचा खर्च वजा जाऊन उरलेल्या रकमेस व्यापारी भाषेंत नफा म्हणतात. मालकानें व्यापारांत गुंतविलेल्या भांडवलावरचें व्याज, तसेंच त्यानें धंद्यांत जे कांहीं श्रम केले असतील, व्यवस्था ठेवण्याचें काम केलें असेल त्यांबद्दल मिळालेला मुनाफा या गोष्टीसुद्धां नफ्यांत येतात. तेव्हां ही वजा करून उरणारी रक्कम तीच धंद्यापासून आलेलें उत्पन्न होईल.

या धंद्यांतील नफ्यामध्यें मालकांप्रमाणेंच मजुरांचा वांटा काढून ठेवण्याची पद्धत कांहीं कारखान्यांमधून असते. ती सार्वत्रिक असावी असा आग्रह समाजवादी मंडळींचा असतो. या पद्धतीमुळें मजुरांना धंद्यासंबंधीं आपुलकी वाटून ते कामें चांगलीं करतात; त्यांचें जीवन कांहींसें सुखी होतें; भांडवलवाले आणि मजूर यांत एकी राहते—यांसारखे विचार ते पुढें मांडीत असतात.

**नंबुद्री**—मद्रास इलाख्यांतील एक ब्राह्मण जात. यांना मलय ब्राह्मण म्हणतात. यांच्या बायका पडदा पाळतात. संस्कारविषयक कांहीं हक्कांवरून या ब्राह्मणांचे दहा पोटभाग पडले आहेत. त्यांपैकीं सर्वांत वरिष्ठ वर्गाला दहा हक्क आहेत. त्यांच्याहून हलक्या वर्गास नऊ, आठ, याप्रमाणें कमी कमी हक्क आहेत. फक्त पहिले सहा वर्ग वेदांचें अध्ययन करूं शकतात. या पोटवर्गांना अध्यन, अस्यन, स्मार्तन, सामन्यन, वाध्यन, इत्यादि नांवें आहेत. त्यांच्यांतील मुसद नांवाच्या पोटवर्गाचा वैद्यकी हा परंपरागत धंदा आहे. क्षत्रांगकार या पोटवर्गाचा धंदा लढाई होता. ग्रामी या पोटवर्गांतले लोक नंबूरी वसाहतीमध्यें कारभार पाहत असत. इतर ब्राह्मणांप्रमाणें नंबुद्री ब्राह्मणांमध्यें गोत्रें असून गोत्रान्तरविवाह प्रचलित आहे. ते वृद्धि व सुतक दहा दिवस पाळतात. वाध्यन पोटवर्गाचे लोक वेदशाळेचे मुख्य अध्यापक आहेत. स्मार्तन लोक पंचायतीचे अध्यक्ष असतात. यांच्यांत वडील मुलालाच फक्त आपल्या जातींतल्या मुलींशीं विवाह करतां येतो व वडिलोपार्जित मिळकत त्यालाच मिळते. बाकीचे मुलगे अनुलोम विवाह करतात. नायर या ब्राह्मणेतर जातीशीं नंबुद्रींचा फार संबंध येतो. नायर पाहा.

**नमदा**—फेल्ट, बुरणूस. हें एका जातीचें लोंकरीचें कापड आहे. लोंकर व कापूस यांच्या मिश्रणापासूनहि हें तयार करतात. हें लोंकर लाटून किंवा दाबून बनवितात. याचा उपयोग खोगीर वगैरेकरितां करतात. तसेंच यापासून टोप्या, तंबू, अंगरखे, वगैरेहि फार प्राचीन काळापासून तयार करण्यांत येतात.

**नमस्कार पद्धति**— हिंदुस्थानांत निरनिराळ्या लोकांच्या नमस्कार करण्याच्या पद्धती निरनिराळ्या असतात. वैष्णव हे 'जय श्रीकृष्ण' असें म्हणतात; वाण्यांनीं वैष्णव धर्म घेतल्यापासून ते 'जय गोपाळ' म्हणतात; बैरागी 'जय सीताराम' म्हणतात; शीख लोक 'वा गुरु' म्हणतात; स्वामी नारायणाचे पंथांतील सत्संगी लोक 'जय स्वामीनारायण' असें म्हणतात; कबीरपंथी जे आहेत ते 'सत्साहेब' म्हणतात; गोसावी व संन्यासी हे 'नमो नारायण' म्हणतात; ब्राह्मण हे ब्राह्मणांस 'नमस्कार' म्हणतात, व ब्राह्मणांखेरीज लोकांस 'आशीर्वाद' म्हणतात. पूर्वीं मराठे लोकांत 'जोहार (जय हर)' व 'दंडवत' म्हणण्याची चाल होती. परंतु शिवाजीच्या कालापासून मराठ्यांत 'रामराम' करण्याची चाल पडली व ती तशीच पुढें चालली आहे. महाराष्ट्र देशांत महार लोक मात्र अद्यापि 'जोहार' असे म्हणतात; परंतु इतर देशांत श्रावक, वाणी, वगैरेहि अद्याप 'जोहार' असेंच कागदोपत्रीं लिहितात. मुसलमान लोक 'कुर्निसात बंदगी', 'सलाम' असें म्हणतात. त्यांच्यांत आपसांत एक दुसऱ्यास 'सलाम अलेकुम' व दुसरा लगेच 'अलेकुम सलाम' म्हणतो. हिंदुस्थानांत हलक्या जातींतील लोक 'पावलगी' म्हणतात. युरोपियन लोकांत भेटींत हस्तांदोलन करण्याची पद्धति आहे. लष्करी सलामी वेगळीच असते. तसेंच बालवीरसंघ, राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, हिटलरचा नाझीपंथ, फॅसिस्टपंथ, इ. चे अभिवादनाचे प्रकार स्वतंत्रच आहेत.

नमस्कार हा व्यायामाचाहि एक प्रकार आहे. (सूर्यनमस्कार पाहा.)

**नमूचि**—इंद्रानें मारिलेला एक दैत्य. जेव्हां इंद्रानें सर्व असुरांना जिंकलें तेव्हां एकटा हाच जिंकण्याचा राहिला. दिवसां किंवा रात्रीं तसेंच ओल्यानें किंवा वाळलेल्यानें 'मी मारला जाऊं नये' हा वर त्यानें इंद्रापासून मिळविला. पुढें इंद्रानें संधिप्रकाशांत पाण्याच्या फेंसानें याचें मस्तक उडविलें. या कथेचें बीज प्रथम ऋग्वेदांत आढळतें. पुढें शतपथ ब्राह्मणांत व महाभारतांत या कथेचा विस्तार केला आहे.

**नम्माळवार**—हा वैष्णवपंथी तामिळ कवि ताम्रपर्णीच्या तीरावर थिरूक्कुरूहुर नांवाच्या गांवीं राहत असे. हा जन्मला तेव्हां डोळे उघडीत नसे, कीं हुं कां चूं करीत नसे. तसेंच आईच्या अंगावरचें दूधहि पीत नसे. म्हणून त्याच्या आईबापांनीं बाराव्या दिवशीं नदीच्या कांठीं विष्णूच्या देवळानजीक चिंचेच्या झाडाखालीं पाळण्यांत ठेवून दिला. अशा स्थितींत वाढून तो १६ वर्षांचा झाला. मधुर कवि नांवाचा एका विद्वान् सामवेदी ब्राह्मणास दृष्टांत होऊन तो त्या चिंचेच्या झाडाजवळ गेला, व त्यानें एक मोठा धोंडा घेऊन तेथें जोरानें आदळला. त्याबरोबर त्या मुलानें डोळे उघडले. तेव्हां मधुर कवीनें मुलाला एक प्रश्न विचारला. त्याचें मुलानें सूत्रबद्ध पण सुंदर उत्तर दिलें. त्या मुलाचा विचित्र जन्म, असाधारण विद्वत्ता व दैवी दृष्टि हीं पाहून मधुर कवि त्याचें शिष्यत्व पत्करून तेथें राहिला. त्या मुलाला काव्यस्फूर्ति होऊन तो कविता करूं लागला. तेव्हां त्या सर्व कविता मधुर कवीनें ताडपत्रावर लिहून पांड्य राज्याच्या दरबारांत म्हणून दाखविल्या. तामिळ भाषेंत गूढ व भावनामय काव्य करणारा हा पहिला कवि होय. त्यानें तामिळ प्रदेशांत वैष्णवपंथ स्थापला, व बौद्ध व जैन धर्मांचें उच्चाटन केलें. हा कवि इ. स. ७ व्या शतकाच्या सुमाराचा असावा, पण त्याचा काल अनिश्चित आहे.

**नम्युलाइट**—आकारानें $\frac{1}{2}$ इंचापासून १॥ इंचापर्यंत व्यास असलेल्या व अनेक छिद्रयुक्त कवचधारी प्राण्यांच्या अवशेषांच्या एका मोठ्या वर्गास ही संज्ञा देण्यांत येते. भूस्तरशास्त्रामध्यें या वर्गास फार महत्त्व आहे. कांहीं थरांमध्यें याचें प्रमाण इतकें मोठें आढळतें कीं, तेथील चुनखडीच्या थरास याचेंच नांव देण्यांत येतें. ईजिप्तमधील मनोरे बहुतेक याच प्रकारच्या दगडांचे बांधले आहेत.

**नयसेन**—बाराव्या शतकांतील एक कानडी जैन कवि. आपल्या 'धर्मामृत' (काव्यरत्न) या नीतिग्रंथांत यानें धैर्य, सत्य व न्याय यांबद्दल सुंदर विवेचन केलें आहे. हा ग्रंथ यानें मुळुगुंद येथें सन १११२ त लिहिला. गुणचंद्राचा हा शिष्य होता.

**नयागढ संस्थान**—ओरिसांतील एक मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ ५६२ चौरस मैल, व लोकसंख्या (१९४१) १,६१,४०९. खेडीं एकंदर ७७५ आहेत. हें संस्थान ५०० वर्षांपूर्वी रेवा येथील राजघराण्यांतील एका पुरुषानें स्थापिलें. नयागढचें एकंदर उत्पन्न सु. दोन लाख रुपये असून त्यापैकीं ५,५२५ रुपये ब्रि. सरकारला खंडणीच्या रूपानें द्यावे लागत. आतां हें संस्थान इतर लहान संस्थानांबरोबर ओरिसा प्रांतांत विलीन झालें आहे.

**नरक**—नरक ही एक परमेश्वरापासून निश्चितपणें विभक्ततेची अवस्था आहे व त्यामुळें ती अवर्णनीय दुःखमय असून जे, अक्षम्य पातक करतात त्यांस ती प्राप्त होत असते. पातकाचा आवश्यक परिणाम म्हणजे नरकप्राप्ति होय, व ती अवस्था जगांतील व्यक्तीबद्दल असाधारण प्रेमाकरितां परमेश्वरापासून विभक्त किंवा दूर होण्यामुळें प्राप्त होते. या अवस्थेमध्यें परमेश्वरापासून विभक्तता व ज्यास आपण दुःख दिलें असेल किंवा ज्याचा आपण अपराध केला असेल त्यापासून छल प्राप्त होत असतो. आपलें आयुष्य हेंच मोक्ष प्राप्त करून घेण्याचा काल आहे व नरक हा चिरंतन आहे, अशी खिस्ती धर्मांतील कल्पना आहे.

हिंदु पुराणांतून नरकपुरी किंवा यमनगरी हिचीं विस्तृत व भयंकर वर्णनें आढळतात. विष्ठा, रक्त, पू, इतर घाणीचे पदार्थ यांनीं समृद्ध अशा ठिकाणीं पापी लोकांना आपल्या दुर्वर्तनांबद्दल हाल भोगावे लागतात. या नरकलोकांत २१ विभाग असून त्या त्या विभागांत पापांच्या प्रकारांप्रमाणें हाल भोगावे लागतात.

**नरकासुर**—हा प्राग्ज्योतिषपूरचा एक बलाढ्य राजा होता व याचें राज्य नीलसमुद्राकडे होतें. यानें देव, दानव, गंधर्व, मानव, इ. समाजांतील सोळा हजार कन्यका हरण करून त्यांना बंदींत ठेविलें होतें. शिवाय यानें देवांस त्रास देण्याचें सोडिलें नव्हतें. तेव्हां इंद्रादि देवांनीं कृष्णाची प्रार्थना केली व या बलाढ्य पापी असुराचा वध करण्यास त्यास उद्युक्त केलें. कृष्णानें सत्यभामेसह प्राग्जोतिषपुराला जाऊन नरकासुराचा ससैन्य वध केला व सोळा हजार कुमारिकांना सोडवून त्यांचा पत्नी म्हणून आपणच स्वीकार केला.

आश्विन वद्य चतुर्दशीस नरकासुराचा कृष्णानें वध केला व सर्वांचें मंगल केलें म्हणून दिवाळीच्या या पहिल्या दिवशीं सूर्योदयापूर्वीं मंगलस्नान करण्याचा प्रघात पडला आहे.

**नरगुंद**— मुंबई, धारवाड जिल्हा, एक गांव. हें थंड हवेचें ठिकाण आहे. लो. सं. नऊ हजार. येथें एक पडका किल्ला आहे. येथें शंकरलिंग व महाबळेश्वर यांचीं देवळें असून जोड हनुमंताच्या लहानशा देवळांत स. ११४७ सालचा एक शिलालेख

आहे. येथील व्यंकटेशाचें देवालय रामदुर्ग संस्थानचा संस्थापक रामराव यानें एक लाख रुपये खर्च करून बांधलें (१७२०). १७९२ सालीं रामदुर्ग संस्थानाच्या वांटण्या झाल्या त्या वेळीं नरगुंद शाखेकडे हें देऊळ आलें. देवळास २२१० रुपयांची जमीन इनाम असून दरसाल १३२० रुपये नक्त इनाम आहे. सन १८५८ मध्यें देवळांतील देवाची मूर्ति भंगली व देवळाची पडझड झाली. नंतर रामदुर्गकरांनीं पुन्हां देवाची प्रतिष्ठापना केली.

येथील पूर्वींचे संस्थानिक भास्करराव भावे यांनीं हस्तलिखितांचा पुष्कळ संग्रह केला होता. पण इ. स. १८५८ च्या लुटींत या संग्रहाचा नाश झाला असें समजतें. १६७७ सालीं शिवाजीनें येथील किल्ला बांधला व त्याचें नांव महिलगड असें ठेविलें. १८५७ सालीं नरगुंदचा संस्थानिक भास्करराव आप्पासाहेब ऊर्फ बाबासाहेब (जन्म १८०५) हा होता. कर्नाटकांतील त्या वेळच्या संस्थानिकांमध्यें हा सर्वांत जास्त स्वाभिमानी व हुषार होता. त्यानें दत्तकाची परवानगी मागितली असता डलहौसीनें दिली नाहीं; त्यामुळें त्यानें त्या वेळच्या बंडाच्या धामधुमीचें अग्रेसरत्व पत्करिलें. मुंडर्गीच्या संस्थानिकानें बंड उभारिलें अशी बातमी आली तेव्हां भास्कररावानेंहि तयारी केली. दख्खनचा पोलिटिकल एजन्ट मॅन्सन हा सुरिवान गांवीं आहे अशी बातमी लागल्यावरून भास्करराव आठशें लोकांसमवेत तेथें गेला व रात्रीं छापा घालून त्यास ठार मारिलें व त्याचें शिरं नरगुंदच्या शिवेवर लटकत ठेविलें. ही बातमी कळतांच नरगुंदवर इंग्रजांनीं चाल केली. आंत लढाऊ सामान कांहींच नसल्यानें किल्ला लवकरच सर झाला, पण भास्करराव निसटला. परंतु त्यास तोरगळ जंगलांत पंढरपूरच्या यात्रेकरूंच्या वेषांत पकडण्यांत आलें. त्याची चौकशी बेळगांव येथें होऊन त्यास फांशीं देण्यांत आलें (१२ जून १८५८) व इंग्रजांनीं नरगुंद संस्थान खालसा केलें.

**नरनारायण**—ही प्राचीन ऋषींची जोडी असून त्यांचें उग्र तप व प्रभाव प्रसिद्ध होता. इंद्रानें यांना मोह घालण्यासाठीं अप्सरा पाठविल्या असतां, नारायण ऋषीनें आपल्या उरूपासून उर्वशी ही अत्यंत सुंदर अप्सरा निर्माण केली व त्यांना लाजविलें. या ऋषींचेच अवतार अर्जुन आणि कृष्ण होत. हे बदरिकाश्रमीं राहतात. यांची उपासना नारायणीय धर्मांत सांगितली असून याच धर्मांतून भागवत धर्म निघाला आहे.

**नरनाळा**—वऱ्हाड, अकोला जिल्हा, अकोट तालुका, अकोटच्या उत्तरेकडे ६ कोसांवरील अतिशय जुना किल्ला. येथें जाफराबाद, तेलियागड, नरनाळा असे तीन किल्ले आहेत. हा किल्ला मूळ गोंड राजांनीं बांधला असावा, असें कोणी म्हणतात. येथें दोन शिलालेख आहेत. या किल्यावरील पाणी मधुर आहे. एकंदर २२ तलाव येथें आहेत व पाण्याच्या सोईसाठीं ठिकठिकाणीं हौद बांधले आहेत.

**नरनौला**—पंजाब, पतियाळा संस्थानांतील एक तहशील. क्षेत्रफळ ५७६ चौरस मैल. लोकसंख्या सु. पावणेदोन लाख. यांत दोन शहरें व २८७ खेडीं आहेत. हें गांव छालक नदीवर वसलें आहे. लोकसंख्या पंचवीस हजार. हें शहर निःसंशय जुनाट आहे. दंतकथांवरून हें राजा लवणकर्ण यानें वसवून आपली बायको नारलवण हिच्या नांवावरून याचें नांव ठेविलें. महाभारतांत दिल्लीच्या दक्षिण भागाचें नरराष्ट्र असें नांव होतें व त्यांवरून नरनौल हें नांव पडण्याचा जास्त संभव आहे. स. १४११ त हें इस्लीमखान व बहादुर नादिर यांच्याकडे होतें. मोंगल सत्तेनंतर येथें जयपूरच्या महाराजांची सत्ता आली. इ. स. १८५७ च्या बंडाच्या वेळीं इंग्रजांना मदत केल्याबद्दल पतियाळाचे महाराज नरिंदरसिंग यांना २ लक्ष रु. वार्षिक उत्पन्न असलेली नरनौलची इतलाख मिळाली.

**नरमांसभक्षण**—माणसानें माणूस खाण्याची पद्धत पूर्वीं कांहीं रानटी जातींतून असे. वेस्ट इंडीजमध्यें जेव्हां स्पॅनिश प्रवासी प्रथम गेले तेव्हां त्यांना तेथील कॅरिब जातींत धार्मिक विधि करतांना मनुष्य मारून खाण्याची चाल दिसून आली. आपल्याकडील वैदिक काळच्या नरमेधाप्रमाणेंच हा नरमेध म्हणतां येईल. मलाया व त्या बाजूचीं बेटें यांत अद्यापि असे कांहीं नरभक्षक लोक असल्याचें सांगतात. कापालिकासारखे कांहीं संप्रदाय व शाक्तपंथी देवताराधनेसाठीं नरमांसाचा नैवेद्य घेतात.

**नरमेध**—बहुतेक सर्व धर्मांत व सर्व जातींत नरमेध करण्याची प्राचीन चाल आहे. हिंदुस्थान, ग्रीस, इटली, वगैरे देशांत व प्राचीन जपानी व कांहीं आफ्रिकन जातींत ही चाल होती. ब्राह्मणकालीन भारतवर्षापेक्षां वैदिककालीन भारतवर्षामध्यें नरमेध अगदीं कमी प्रमाणांत अस्तित्वांत होता. ज्या वेळीं समाजरचना धार्मिक तत्त्वावर झालेली असते त्या वेळीं न्याय व निष्ठा यांचा घोटाळा होऊन जातो. एकंदर समाजाचें कल्याण करणें हाच सर्व प्रकारच्या यज्ञाचा उद्देश असतो. युद्धांत पराभव होऊं नये म्हणून प्राचीन ग्रीक, गॉल, सेमाईट व हिंदु लोक नरमेध करीत असत. हिंदु लोकामधील सती जाण्याची चाल, युगांडा, ईस्ट इंडीज, फिजी व न्यू हेब्रिडीज या ठिकाणींहि आहे. हा आत्मयज्ञ विरक्तावस्थेसारखा असून परलोकसाधन हा त्याचा उद्देश असतो. नवीन इमारत बांधावयाच्या ठिकाणीं एखाद्या मनुष्यास बळी दिल्यास तो त्या इमारतीचा रक्षक बनतो अशीहि कल्पना होती. देव यज्ञामध्यें मनुष्याचा वध

करीत, असें ऐतरेय ब्राह्मणामध्यें सांगितलें आहे. ब्राह्मण जातीच्या देवतेला ब्राह्मण बळी व क्षत्रिय देवतेला क्षत्रिय बळी दिला पाहिजे, असें तैत्तिरीय ब्राह्मणांत सांगितलें आहे. हरिश्चंद्र राजानें आपला पुत्र वरुणास बळी देण्याची शपथ घेऊन ती मोडल्यामुळें त्या राजाला जलोदर झाला, वगैरे हकीकत ऐतरेय ब्राह्मणांत आहे. बंगालमधील स्त्रिया आपलें पहिलें मूल गंगेस अर्पण करीत असत. सर्व प्राणिमात्रावर वर्चस्व मिळविण्यासाठीं 'पुरुषमेध' करण्याची चाल हिंदुस्थानांत होती. तंजावर येथील शिवमंदिरांत कालीची एक मूर्ति आहे; त्या मूर्तीपुढें प्रत्येक शुक्रवारीं एका मुलाला बळी देत असत. सातारचा राजा दरवर्षी प्रतापगडावर जाई त्या वेळीं तेथील लोक एका वृद्ध स्त्रीला बळी देत असत. इराणमधील अवेस्ता लोकांमध्यें किंवा त्याच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांमध्यें नरमेध प्रचलित नसून तो सिरियन लोकांत प्रचलित होता असें दिसतें. जपानी व कोरियन लोकांत जलदेवता क्षुब्ध होऊं नयेत म्हणून त्यांच्यासाठीं नरमेध करण्याची चाल होती, असें प्राचीन दंतकथांवरून समजतें. बौद्ध धर्माचा प्रसार झाल्यावर ही चाल बंद पडली. जपानांत धनी किंवा पति मरण पावला असतां त्याचा नोकर किंवा त्याची स्त्री हीं स्वखुषीनें आत्मयज्ञ करतांना अद्यापि आढळतात. चीनमध्यें राजाच्या प्रेतयात्रेबरोबर शेंकडों लोकांना जिवंत पुरून घ्यावें लागे. ऐतिहासिक कालांत नरमेध अस्तित्वांत नव्हता, असें ग्रीक वाङ्मयावरून अनुमान काढतां येतें. रोममध्यें ईश्वराला प्रसन्न करण्यासाठीं सीझरनें दोन मनुष्यांना बळी दिलें. ईजिप्तच्या राजानें ताम्रवर्णाच्या लोकांना बळी दिलें, असें डायओडोरस सिक्युलसनें म्हटलें आहे. हिब्रू लोकांमध्येंहि नरमेधाची चाल होती. ट्यूटन लोक संकट टाळण्यासाठीं नरमेध करीत असत. सर्व जातीचे जर्मन लोक वोडन-मर्क्युरीला नरमेध करीत असत, असें टॅसिटसचें म्हणणें आहे. सॅक्सन व नॉर्मन लोकहि समुद्रापासून आपलें रक्षण करून घेण्यासाठीं नरमेध करीत.

**नरवर**—मध्य हिंदुस्थान, ग्वाल्हेर संस्थानांतील एक जिल्हा. यांत सिंधु, पार्वती, बेटवा या मुख्य नद्या आहेत. यांत चंदेरी व नरवर हीं दोन शहरें व १३४२ खेडीं आहेत. नरवर हें प्राचीन ठिकाण असून फार महत्त्वाचें होतें. याचा इतिहास मोठा खळबळीचा आहे. नरवर हें काल्पीकोटा रस्त्यावर सिंध नदीकांठीं आहे. हें कछवाह रजपुतांकडे १९ व्या शतकापर्यंत होतें. येथील किल्ला फार सुंदर असून याच्याभोंवतीं पांच मैलांवर असणारी भिंत आहे. फेरिस्ता म्हणतो कीं, हा तेराव्या शतकांत बांधला.

**नरवर्मा परमार** (मृत्यु ११३४)—माळव्याच्या परमारांपैकीं उदयादित्याचा हा दुसरा मुलगा आपला भाऊ लक्ष्मदेवानंतर गादीवर आला. हा विद्वान् असून यानें जैन पंडित समुद्रघोष व वल्लभसूरि यांचा सन्मान केला. सिद्धराज जयसिंह हा आपला मंत्री सांतू याजकडे आपला कारभार सोंपवून सोमनाथच्या यात्रेला गेला असतां नरवर्म्यानें गुजराथवर स्वारी केली. तेव्हां जयसिंहाचा मंत्री सांतू यानें यास परत जाण्याबद्दल कळविलें. 'राजाच्या यात्रेचें पुण्य मिळत असल्यासच आपण परत जाऊं' असें यानें उलट सांतूस कळविलें. या अटीस सांतूनें मान्यता दिली तेव्हां हा परत फिरला. जयसिंह यात्रेहून परत आला तेव्हां त्यास ही हकीगत कळली. त्यास हा अपमान सहन न होऊन त्यानें याजवर स्वारी केली. त्यांत नरवर्मा पराभूत झाला. ही मोहीम बारा वर्षे चालली होती. हा मृत्यु पावल्यावर याचा पुत्र यशोवर्मा गादीवर बसला.

**नरसिंगगढ संस्थान**—मध्य हिंदुस्थान, जुन्या भोपाळ एजन्सींतील एक संस्थान. क्षेत्रफळ ७३४ चौरस मैल. लो. सं. १,२५,१७८. हल्लींचे संस्थानिक राजा विक्रमसिंग १९२४ सालीं गादीवर बसले. हे चांगले सुविद्य आहेत. हे परमार रजपूत वंशाचे आहेत. संस्थानांत नरसिंगगढ हेंच काय तें मोठें शहर आहे; संस्थानांत रजपूत, चमार, ब्राह्मण व बेलेस या जाती आहेत. ज्वारी, कापूस, गहूं, मका, हरभरे व खसखस हीं मुख्य पिकें येथें होतात. प्राथमिक शिक्षण मोफत आहे. एक हायस्कूल आहे. संस्थानांत बऱ्याच सुधारणा चालू आहेत. उत्पन्न सु. दहा लाख रुपये आहे. आतां हें मध्यभारत संस्थान-संघांत सामील झालें आहे.

**नरसिंगदेव बुंदेला**—हा राजा मधुकरशहा बुंदेल्याचा मुलगा. हा अकबराच्या कारकीर्दींत शहाजादा सेलीम (जहांगीर) याचा नोकर होता. यानें सेलीमच्या आज्ञेनें अकबराचा मित्र वझीर अबुल फजल याला ठार मारिलें (१६०२). जहांगीरनें आपल्या कारकीर्दींत याला चार हजारी मनसबदार केलें होतें. यानें मथुरा येथें श्रीकृष्णाचें मोठें मंदिर बांधलें होतें. त्या मंदिराचीच पुढें औरंगजेबानें मशीद केली. नरसिंगदेव हा सन १६२६ त वारला.

**नरसिंगपूर** (नीरा)—पुणें जिल्ह्याच्या अगदीं आग्नेयीस इंदापूरपासून १२ मैलांवर भीमा व नीरा यांच्या संगमावर हें गांव आहे. येथें श्रीलक्ष्मीनरसिंहाचें प्रसिद्ध देवालय आहे. विंचूरकरांनीं हें देवालय शके १६७८ त बांधिलें. वैशाख शु. १४ पासून येथें दोन दिवस जत्रा भरते.

**नरसिंगपूर**— मध्यप्रांत, नर्मदाविभागांतील एक जुना जिल्हा. येथील जमीन चांगलीच सुपीक आहे. जंगलांत मोह, अचार, दमन, सालई, पळस, वगैरे झाडें व वाघ, चित्ता, डुक्कर, सांबर व नीलगाय हीं जनावरें आहेत. पाऊस सरासरी ५१ इंच

पडतो. जुन्या वस्तूंपैकीं बरिहटा येथें जुने शिलालेख आढळले होते; त्यांपैकीं कांहीं नरसिंगपूरच्या सार्वजनिक बागेंत आहेत व कांहीं विलायतेला गेले. नर्मदा व वराही या नद्यांचा बरचाहाण हा संगम पवित्र स्थान आहे. नद्यांवर देवळें व ठिकठिकाणीं घाट आहेत. धिलवर व छानवारपाठ येथें गोंड किल्ले आहेत. मुख्य ठिकाणें नरसिंगपूर, गाडरवाडा व छिंदवाडा हीं आहेत. येथे गोलापुरब म्हणून एक ब्राह्मणांची जात आहे. येथे तीळ, अऱ्हर किंवा तांदूळ, अऱ्हर, उडीद, मूग, मसूर, कापूस, वगैरेंचें पीक होतें. गाडवाड्यापासून १२ मैलांवर मोहपानी येथें कोळशाची खाण आहे. तेंदू खेड्याला लोखंडाच्याहि खाणी आहेत. बरह्मणमध्यें तांबें सांपडतें.

**नरसिंगराव वेरूळकर**— मराठ्यांचा एक वकील. हा हैदराच्या दरबारीं असे. तसेंच टिपूच्या वेळीं श्रीरंगपट्टणलाहि होता. फार्सी भाषेवर याचें प्रभुत्व होतें. आनंदराव नरसी हा याचाच मुलगा.

**नरसिंह**—विष्णूचा चौथा अवतार. हिरण्यकशिपु दैत्याच्या त्रासांतून जगाची मुक्तता करण्याकरितां हा अवतार होता. हिरण्यकशिपूचा पुत्र प्रल्हाद हा मोठा विष्णुभक्त होता, पण यासाठीं बाप त्याची निंदा व फार छळहि करी. एके दिवशीं त्याला तुझा विष्णु या दगडी खांबांत आहे का, असें विचारून त्या खांबाला लाथ मारतांच अर्धा मनुष्य व अर्धा सिंह या रूपानें विष्णु प्रकट झाला व त्यानें हिरण्यकशिपूला फाडून टाकिलें. नरसिंह-जयंती वैशाख शुद्ध १४ ला असते. अठरा उपपुराणांत नरसिंहपुराण नांवाचें एक उपपुराणहि आहे. नरसिंह देवतेच्या मूर्ती जुन्या ब्राह्मणी लेण्यांतून आढळतात. लक्ष्मीनृसिंह हा अनेक घराण्यांचा कुलस्वामी आहे.

**नरसिंह सरस्वती**—हा साधुपुरुष शके १३८० त होऊन गेला. हा दत्तभक्त असून, याचा शिष्य सरस्वती गंगाधर यानें याचे चरित्र 'गुरुचरित्र' या नांवाचें लिहिलें आहे. श्रीपाद श्रीवल्लभ याचा नरसिंह हा शिष्य होता. यानें महाराष्ट्रांत दत्तभक्ति सुरू केली.

**नरसी मेहता** (१४१५-१४८१)—एक गुजराथी संतकवि. महिपतीनें भक्तिविजयांत नरसी मेहत्याची सुरस कथा दिली आहे. हा जुनागडच्या नागर ब्राह्मणकुलांत जन्मला. घराणें शिवोपासक असून यानें कृष्णभक्ति स्वीकारली व तीपायीं छळ सोसला. याला जातिभेद व स्पृश्यास्पृश्यत्व मान्य नसे. यानें अनेक कविता, पदें रचिलीं. म. गांधींना प्रिय असलेलें 'वैष्णव जन तो तेने कहिये' हें पद याचेंच आहे. मीराबाईच्या पदांप्रमाणेंच याचीं पदें लोकांच्या तोंडीं असतात. गुजराथी वाङ्मयांत हा श्रेष्ठ कवींपैकीं गणला जातो. याची भाषा वेदान्तपर असूनहि सोपी आहे.

**नरसोबाची वाडी**—(शिरोळ). कोल्हापूर संस्थानांतील हें क्षेत्र पंचगंगा व कृष्णा नदी या दोन नद्यांच्या संगमावर वसलें आहे. मिरज-कोल्हापूर आगगाडीच्या फांट्यावरच्या जयसिंगपुर स्टेशनावर उतरून या ठिकाणीं जातां येतें. स्टेशनपासून वाडी ९ मैल आहे. श्रीपाद श्रीवल्लभ म्हणून लोक ज्यांना दत्तात्रेयाचा प्रथमावतार समजतात ते येथें होऊन गेले. या क्षेत्रास कुरुंदवाड संस्थान लागून आहे. येथील दत्ताच्या पादुकांची सेवा करण्याकरितां हजारों भक्त येतात. भूतबाधा व कुष्ठरोग जातो अशा समजुतीनें बरेच सेवेकरी येथें नेहमीं राहतातहि. दहा वर्षांपूर्वीपर्यंत गुरुद्वादशीला (आश्विन व॥ १२) मोठें अन्नदान केलें जात असे. त्या वेळीं दर वर्षी एक लाख यात्रा तरी या ठिकाणीं जमत असे.

**नरहरि** (जन्म सन १५०५)—एक हिंदी कवि. एकदां एक गाय कसायाच्या हातांतून सुटून याच्या आश्रयास आली. कसाई गायीस शोधीत याजकडे आला असतां यानें त्यास गाय परत देण्याचें नाकारलें. नंतर यानें एक कविता करून गायीसह हा अकबराकडे गेला. तेव्हांपासून अकबरानें गोवधास बंदी केली म्हणतात. यानें कांहीं ग्रंथहि लिहिले आहेत.

**नरहरि धुंडिराज माळू**—एक मराठी कवि. यानें 'माळुतारण' व 'भक्तिकथामृत' हे दोन ग्रंथ, कांहीं अभंग व पदें लिहिलीं आहेत. याच्या ग्रंथांतील बरीचशी माहिती कल्पित अशी आढळून येते.

**नरहरि महीपति** (समाधि सन १८२३)—एक मराठी संतकवि. याचें मूळ नांव सखाराम केरसुणे असें असून हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता. बालपणींच याचे आईबाप मरण पावल्यामुळें याचें पालनपोषण याच्या वडील बंधूनें केलें. वयाच्या बाराव्या वर्षी याचें लग्न झालें. परंतु बायको लवकरच वारल्याने याला वैराग्य आलें. पुढें हा आळंदीस राहिला. आपल्या तत्त्वज्ञानाची शिकवण कीर्तनद्वारां यानें जनतेला दिली. 'ढोलीबुवा' संप्रदायाचा हा संस्थापक व दौलतराव शिंद्याचा गुरु होता. पेशव्यांनीं याच्याकडे द्रव्य पाठवलें होते, परंतु तें यानें घेतलें नाहीं. यशवंतराव होळकरानें याला दोन गांवें व यशवंतरावाच्या भीमाबाई नांवाच्या मुलीनें एक गांव इनाम दिलें होतें. याचें अभंगात्मक भक्तचरित्र उपलब्ध झालें आहे. ग्वाल्हेर मुक्कामीं यानें समाधि घेतली.

**नरहरि मोरेश्वर देशपांडे** (१७२८-१७७१)— एक मराठी कवि. हा बीड परगण्याचा देशपांडे. याचें टोपणनांव बचाजी होतें व हा बीड मठपति भीमस्वामी रामदासी याचा शिष्य

होता. यानें महाभारताच्या कांहीं पर्वांवर मराठींत टीका केली आहे. त्यांतील उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण अशीं चार पर्वें उपलब्ध आहेत. यांखेरीज रामजन्म, शतमुखीरावण, अभंग, वगैरे यानें रचिले.

**नरहरि रुद्र**—एक शिवकालीन सरदार. शिवाजीनें वेलोर ताब्यांत घेतल्यावर तेथें साजिरा-गोजिरा हे दोन किल्ले बांधले. या किल्ल्यांवर नरहरि रुद्र हा हवालदार होता. पुढें राजारामाच्या कारकीर्दींत हा उदयास येऊन यानें आपल्या गुणांनीं सेनाकर्ते हें पद मिळवलें.

**नरहरि सोनार**—एक मराठी संतकवि. हा जातीचा सोनार असून प्रथम शिवभक्त होता. हा पंढरपुरास राहत असे. पण वीरशैव असल्यानें विठोबाचें दर्शन घेत नसे. पण कडदोऱ्याच्या निमित्तानें यानें विठोबाच्या मूर्तीचें दर्शन घेतलें व पुढें ज्ञानेश्वराच्या सांगण्यावरून शिव व विष्णु यांत अभेद मानून हा भागवतपंथी वारकरी बनला. हा शके १२३५ त पंढरपुरास वारला. याचे कांहीं अभंग उपलब्ध आहेत.

**नरिमन, खुरशेद फ्रामजी** ( १८८५–१९४९ )— एक हिंदी पुढारी. यांनीं आपल्या आयुष्यास प्रथम पोलिस कोर्टांत दुभाषी म्हणून आरंभ केला होता. परंतु त्यांनीं लवकरच ती नोकरी सोडून वकिलीस आरंभ केला. पुढें १९३२ मध्यें त्यांनीं वकिलीहि सोडून दिली. १९२४ पासून हे मुंबई म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे समासद होते. हे मुंबई कायदेमंडळाचेहि सभासद होते. तसेंच कॉंग्रेस स्वराज्य पक्षाचे हे नेते होते व विरोधी पक्षाचे प्रमुख होते. यांनीं मुंबई डेव्हलपमेंट खात्यांतील अनेक लबाड्या कायदेमंडळांत व बाहेर चव्हाट्यावर मांडल्या व त्यांबद्दल मि. हार्वे यांनीं यांच्यावर बेअब्रूचा खटला भरला असतां त्यांतून हे अनेक दिवस खटला चालून यशस्वी रीतीनें बाहेर पडले. मुंबई इलाख्यांतील तरुणांच्या चळवळीचे हे पुढारी असत. हे मुंबई इलाखा यूथ लीग, व ऑल इंडिया यूथ कॉंग्रेस (कलकत्ता) यांचे अध्यक्ष होते ( १९२९ ). १९३० पासून हे मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे अनेक वर्षें अध्यक्ष होते. सत्याग्रह चळवळींत यांनीं लागोपाठ १९३० ते ३३ मध्यें भाग घेतला. यांनीं सर्वांच्या अगोदर पहिला मिठाचा सत्याग्रह केला ( ६ एप्रिल १९३० ). यांस चार वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३० पासून अनेक वर्षें हे ऑल इंडिया कॉंग्रेस व वार्किंग कमिटीचे सभासद होते. मुंबई येथें निघालेल्या 'इंडिपेंडन्स ऑफ इंडिया लीग' ( स्वातंत्र्य चळवळ ) चे ते पुढारी होते. यांनीं नेहरू-कमिटीच्या निर्णयाविरुद्ध जोराची चळवळ केली, कारण त्यामध्यें फक्त डोमिनियन स्टेटस हेंच हिंदुस्थानांतील स्वातंत्र्याच्या चळवळीचें ध्येय म्हणून नमूद केलें होतें. १९३६ मध्यें त्यांनीं लिटररी असोशिएशन स्थापन केली व या संस्थेच्या मार्फत जनतेमध्यें साक्षरतेचा प्रसार करण्याचें कार्य सुरू केलें. तसेंच दाट वस्तींतील जागा स्वच्छ करण्याचें व आरोग्य सुधारण्याचें कार्य चालविलें. मुंबई येथील ( सिव्हिल लिबर्टी युनियन ) नागरिक हक्कसंरक्षक मंडळाची शाखा स्थापन करून तिचे ते प्रमुख मंत्री व फौजदारी बाबतींत सल्ला देणाऱ्या समितीचे सल्लागार बनले.

कौन्सिल ऑफ स्टेटच्या निवडणुकीच्या बाबतींत यांच्याकडून कांहीं गोष्टी घडल्यामुळें यांस महात्मा गांधींनीं माफी मागावयास सांगितलें, त्यामुळें पुष्कळ खळबळ उडाली. यांनीं राजकारणासंबंधीं व राष्ट्रीय सभेच्या पुढील धोरणासंबंधीं कांहीं प्रकाशन केलें आहे.

**नरेंद्र कवि**—एक महानुभाव संप्रदायी ग्रंथकार. शके १२१० मध्यें यानें 'रुक्मिणी–स्वयंवर' नांवाचा एक काव्यग्रंथ लिहून तो रामदेवराव जाधव यास वाचून दाखविला.

**नरेंद्र देव, आचार्य**—एक समाजवादी पुढारी. यांचा पाली भाषेचा विशेष अभ्यास आहे. १९१६ सालीं हे फैझाबाद होमरूल लीगचे मंत्री होते. १९२१ मध्यें बनारस येथें राष्ट्रीय विद्यापीठ स्थापन करण्यांत आलें त्याचे हे आचार्य होते व त्या वेळीं त्यांनीं विद्यापीठ त्रैमासिकाचें संपादन केलें. सत्याग्रहाच्या चळवळींत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला व त्यांस तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३० सालच्या चळवळींतहि त्यांनीं पुन्हां भाग घेतला व त्यांस दोन वेळां शिक्षा झाली. १९३४ सालीं ते अखिल भारतीय सोशालिस्ट परिषदेचे अध्यक्ष होते.

**नर्मदा नदी**—ही हिंदुस्थानांतील एक प्राचीन, प्रमुख व पवित्र मानली जाणारी नदी आहे. ही मध्यप्रांतांतील मंडला जिल्ह्यांत अमरकंटक पर्वतांत उगम पावते व ८०१ मैल वाहत जाऊन शेवटीं भडोचजवळ समुद्राला ( खंबायतच्या आखाताला ) जाऊन मिळते. समुद्रसपाटीपासून ३,००० फूट वर असणाऱ्या व ज्याभोंवतीं देवळें आहेत, अशा एका कुंडापासून हिचा उगम आहे. जवळच कपिलधारा नांवाचा ८० फूट उंचीचा एक धबधबा आहे. ४० मैलांनंतर ही मध्य प्रदेशांत शिरते, व मंडल्यावरून रामनगरच्याजवळ पोंचते. जबलपूर येथें दूधधारा नांवाचा ३० फूट उंचीचा धबधबा आहे. नंतर संगमरवरी खडकांतून ही आपला मार्ग काढते. येथें पात्र फक्त २० यार्ड रुंद आहे. मंधर व पुनासा येथें लहान लहान धबधबे आहेत. ही महेश्वराजवळून वाहत जाते. तेथें अहल्याबाईनें बांधविलेले घाट व देवळें वगैरेंच असून तिचेंहि स्मारक आहे. हिला गंजाल, शेरशक्कर व हिरस या नद्या मिळतात. या नदीवर जबलपूर, हुशंगाबाद व मोरटक्का येथें आगगाडीचे पूल आहेत. नर्मदाघाट

या पुस्तकांत १४,००० श्लोकांत या नदीचें विस्तृत वर्णन आहे. नर्मदा ही उत्तर व दक्षिण हिंदुस्थानाची सीमा आहे. हिंदुस्थान सरकारनें नर्मदा–तापी या नद्यांवर मोठीं धरणें बांधण्याची एक २०० कोटी रुपयांचा खर्च लागेल इतकी प्रचंड योजना आंखली आहे. ती पुरी झाल्यास मुंबई प्रांत आणि मध्य प्रांत यांत सुमारें अकरा लाख एकर जमीन भिजेल व उद्योगधंदेहि पुष्कळ चालतील.

**नर्मदा प्रदक्षिणा**—नर्मदा ही गंगेप्रमाणेंच पावन करणारी नदी मानली असून तिची प्रदक्षिणा पुण्यप्रद समजतात. ही यात्रा १,५०० कोसांची आहे. वाटेंत पुढील चार मोठ्या झाडी आहेत : शूलपाणि, ओंकार, छोटें महारण व मोठें महारण. हा मार्ग फार भयप्रद व त्रासदायक आहे, पण भाविक यात्रेकरू ही मोठी अवघड प्रदक्षिणा तीन वर्षांत पार पाडतात. आरंभ उत्तर तटापासून म्हणजे नर्मदेला उजवी करून पुन्हां तेथेंच परत यावयाचें असतें.

**नऱ्होजी जाचक**—पहिल्या रघूजी भोसल्याचा हा मराठा सरदार मूळचा वर्धा येथील राहणारा. रघूजीच्या पश्चात् त्याचे मुलगे जानोजी व मुधोजी यांच्यांत वांटणीबावत तंटे निर्माण झाले तेव्हां यानें जानोजीचा पक्ष घेतला. जानोजीनें सन १७५७ ते ५८ मध्यें निजामअल्लीशीं लढाई दिली तींत हा होता. बारभाटीच्या किल्ल्यावरील हा पहिला किल्लेदार होय.

**नल**—१. निषधराज वीरसेनाचा पुत्र. हा सुंदर, सत्यवादी व अश्वविद्येंत फार प्रवीण होता. विदर्भ देशाचा राजा भीमक याची कन्या दमयंती हिच्या सौंदर्यादि गुणांची महती ऐकून यानें तिच्याकडे पक्षिदूत (हंस) पाठविला. पुढें नल–दमयंती हीं दोघेंहि परस्परानुरक्त झालीं. दमयंतीच्या स्वयंवराच्या वेळीं देवांनीं नलरूप घेऊन तिची परीक्षा घेतली असतां तिनें खरा नल ओळखून त्याला माळ घातली. या नलदमयंती–स्वयंवरावर अनेक काव्यें–कथानकें झालीं आहेत. पुढें नलानें दायादांशीं द्यूत खेळून त्यांत आपलें राज्य गमाविलें. तेव्हां मुलें माहेरीं पोंचवून दमयंती नलाबरोबर अरण्यांत गेली. हिला सोडल्यास ही माहेरीं जाऊन सुखांत राहील अशा विचारानें नलानें अरण्यांत तिचा त्याग केला. नंतर ती चेदी राजाच्या आश्रयास गेली. इकडे नल हा अयोध्येच्या ऋतुपर्ण राजाकडे बाहूक नांव धारण करून सारथी म्हणून राहिला. दमयंतीच्या बापास तिचें वर्तमान समजल्यावर त्यानें तिचा शोध करून तिला माहेरीं आणविलें. नलाला कुंडणपुरास आणण्याच्या निमित्तानें दमयंतीनें आपण स्वयंवर करीत असल्याचें ऋतुपर्णास कळविलें. ऋतुपर्णानें नलास अक्षविद्या शिकविली व आपण त्याच्याजवळून अश्वविद्या शिकला. नंतर नलानें आपल्या राजधानीस येऊन आपल्या दायादांशीं पुन्हां द्यूत खेळून राज्य जिंकून घेतलें, व सुखानें आयुष्य घालविलें. पाकशास्त्र आणि अश्वविद्या यांवर नलाच्या नांवानें बरेच ग्रंथ आहेत.

२. राम–सैन्यांतील एक पराक्रमी वानर. यानें लंकेस जाण्यासाठीं समुद्रावर सेतु बांधला. त्याला रामसेतु किंवा नलसेतु असें म्हणतात. हा शेवटपर्यंत रामाजवळ होता.

**नलकूबर**— कुबेराचा पुत्र व मणिग्रीवाचा ज्येष्ठ भ्राता. नारदाच्या शापानें हे दोघे भाऊ गोकुळांत अर्जुन–वृक्ष झाले असतां, कृष्णानें यांचा उद्धार केला.

**नलिकोदर प्राणी**—(कोएलन्टराटा). हा एक प्राण्यांचा मोठा वर्ग असून या वर्गांतील प्राण्यांचें शरीर पेशींच्या दोन थरांनीं बनलेलें असतें : १ बहिस्तर (एक्टोडर्म) व दुसरा अंतस्तर (एन्डोडर्म). या प्राण्यांमध्यें रुधिराभिसरण-व्यूह नसतो; तसेंच बहुतेक प्राण्यांत मज्जातंतुव्यूहाचाहि मागमूस नसतो; परंतु त्यास दंश करण्याकरितां नांगीसारखा अवयव बहुतेक असतो. या प्राण्यांत पुनरुत्पादनाचीं इंद्रियें बहुतेक सर्व जातींत आढळतात. तथापि पेशीविभजनानेंहि पुनरुत्पादन होतें. या प्राण्यांचे मुख्यतः दोन वर्ग पाडण्यांत येतात : १ॲक्टीनोझोआ अथवा किरणशलाका वर्ग; २ हायड्रोझोआ–सर्पाकृति वर्ग. पहिल्या वर्गांत तारकांकित मासा व दुसऱ्या वर्गांत जेली मासा हे मोडतात. हे सर्व प्राणी बहुधा समुद्रांत आढळतात.

**नल्लमलियास**—ह्या टेंकड्या दक्षिणोत्तर कृष्णा नदीपासून पेन्नार नदीपर्यंत ९० मैल पसरल्या आहेत. यांची सरासरी उंची १५००–२००० फूट आहे. श्रीशैलम् हा फार सखल असल्यामुळें येथें जुन्या काळीं वस्ती असावी व पुराणवस्तूंचे भग्न अवशेषहि सांपडतात. या सर्व टेकड्यांवर बहुतेक ठिकाणीं जंगल आहे. पाऊस सरासरी ४० इंच पडतो.

**नवखंडें**—इलावृत्त, भद्राश्व, हरिवर्ष, किंपुरुष, केतुमाल, रम्यक, भरत, हिरण्मय व उत्तर कुरु हीं नऊ खंडें जंबुद्वीपाचीं आहेत. भरत, वर्त, राम, द्रमिल, केतुमाल, हीरक, विषिवस, मही व सुवर्ण हीं दुसरीं नांवें कांहीं ग्रंथांतून सांपडतात. 'नवखंड पृथ्वी व दहावें खंड काशी'. असे कथापुराणांतून उल्लेख येतात. महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश–नऊ पाहा.

**नवग्रह**—सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु व केतु हे नवग्रह होत.

**नवद्वीप**—बंगाल, नदिया जिल्ह्याचें पूर्वीचें मुख्य ठिकाण. हे भागीरथीच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलें आहे. लोकसंख्या सु. पंधरा हजार. येथें हिंदूंची वस्ती फार मोठी आहे. बंगालचा वल्लाळसेन याच्या मुलगा लक्ष्मणसेन यानें हें शहर इ. स. १२ व्या शतकांत वसविलें असावें. हें भागीरथी आणि जलांगी यांच्या संगमावर वसलें असून पूर्वी संयुक्त प्रांत आणि पूर्व बंगाल

यांच्याशीं मोठा व्यापार चाले. इ. स. १२०३ मध्यें बखत्यार खिलजीनें हें घेतलें. हें विद्वान् लोकाचें ठिकाण असून धर्माच्या बाबतींत येथल्या पंडितांचा सल्ला लोक घेतात. येथेंच चैतन्य (गौरांग प्रभु) या थोर साधुपुरुषाचा जन्म झाला व त्याच्या जन्मदिवसाप्रीत्यर्थ येथें जंगी यात्रा भरते. येथें तोल किंवा संस्कृत पाठशाळा आहेत. येथें पितळेचीं भांडीं तयार होतात.

विद्यापीठ—गौड देशाचा लक्ष्मणसेन राजा (११०६–११३८). याच्या कारकीर्दीत हें गांव फार भरभराटीस आलें. लक्ष्मणसेनाच्या दरबारीं हलायुधपंडित होता. 'गीतगोविंदाचा' जयदेव पंडित, 'पवनदूता'चा कर्ता धोयी, उमापति कवि, शूलपाणि, वगैरेंनीं नदियाचें वैभव वाढविलें. मुसलमानी अमलांतहि (११९८–१७५७) नदियाचा विद्येविषयीं लौकिक कमी झाला नाहीं हें विशेष. नालंदा आणि विक्रमशीला येथील विहारांचा नाश झाल्यावर तर नदियाला जास्त उठाव मिळाला. *मिथिलेच्या संकुचितपणामुळेंच तेथील न्यायशास्त्राचें पीठ मोडकळीस येऊन* वासुदेव सार्वभौमाच्या (१४५०–१५२५) विलक्षण स्मरणशक्तीमुळें तर त्याचें वैशिष्ट्य राहिलेंच नाहीं. त्यानें नदिया येथें नवें न्यायशास्त्राचें पीठ स्थापन केलें. त्याचा शिष्य रघुनाथ शिरोमणि तसाच गाढा पंडित होता. यांच्या परंपरेंत पुढें अनेक विद्वान् तयार झाले. गदाधरपंडित त्यातलाच एक होय.

न्यायशास्त्राखेरीज स्मृती, ज्योतिष, तंत्रवाङ्मय, इत्यादींचा अभ्यास येथील विद्यापीठांत होई. रुद्र राजाच्या कारकीर्दीत १६८० मध्यें ४,००० विद्यार्थी व ६०० आचार्य या ठिकाणीं होते. या विद्यापीठाला जोडलेल्या सु. २५० शाळा होत्या.

**नवनाग**—अनंत, वासुकि, शेष, पद्मनाभ, कंबल, शंखपाल, धृतराष्ट्र, तक्षक व कालिय हीं नवनागांचीं नांवें होत. हीं नांवें प्रातःस्मरणांत येतात. सर्पविषाची बाधा होऊं नये म्हणून नवनागांचें स्मरण करण्यांत येतें.

**नवनाथ**—नाथसंप्रदायांत नऊ नाथ व चौऱ्यायशीं सिद्ध सांगितले आहेत: (१) प्रकाशनाथ, विमर्शनाथ, आनंदनाथ, ज्ञाननाथ, सत्यानंदनाथ, पूर्णानंदनाथ, स्वभावानंदनाथ, प्रतिभावानंदनाथ, आणि सुभगानंदनाथ; किंवा (२) मच्छिंद्र, गोरक्ष, जालिंदर, कानीफा, चरपटी, नागेश, भरत, रेवण व गहिनी असे नवनाथांच्या नांवांचे पाठभेद आहेत. हे नवनारायणाचे अवतार मानतात.

**नवनारायण**—कवि, हरि, अंतरिक्ष, प्रबुद्ध, पिप्पलायन, आविर्होत्र, द्रुमिल, चमस व करभाजन.

**नवनिधि**—महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील व खर्व असे कुबेराचे नवनिधि आहेत.

**नवनूतन स्तर**—(प्लायोसीन). तृतीय युगीन अथवा कायनेझोइक भूस्तरांतील सर्वांत अर्वाचीन भूस्तररचनेस लायेल



यानें हें नांव दिलें आहे. लायेलनें अर्वाचीन प्लायोसीन भूस्तरामध्यें सिसिली येथील बऱ्याच भागाचा अंतर्भाव केला आहे. यामध्यें अर्वाचीन कालीं समुद्रांत आढळणाऱ्या कालवांसारखेंच कालवाच्या आकाराच्या प्राण्यांचे थर आढळतात. युरोपमधील या प्रकारच्या थरांचा अभ्यास करण्यास उत्तर इटली हा प्रदेश चांगला आहे. या कालामध्यें पृथ्वीचें अर्वाचीन भूखंड तयार होत होतें. या कालांतील सस्तन प्राणी अर्वाचीन कालांतील सस्तन प्राण्यांचे निकटचे पूर्वज दिसतात. या कालांत हत्ती आणि अश्व यांचें त्यांच्या पूर्वजांबरोबर समकालीन अस्तित्व आढळून येतें. उभा चालणारा मर्कट–मनुष्य अथवा जावामधील पिथेक्यॅन्थ्रोपस हा बहुधा उत्तर प्लायोसीन युगांतील असावा. ब्रिटनमध्यें या युगांतील थर फारसे चांगले आढळत नाहींत.

**नवपाषाण युग**—(नीऑलिथिक एज). पाषाणयुगापैकीं उत्तर कालामध्यें म्हणजे ज्या कालांत चांगलीं घासून तयार केलेलीं हत्यारें आढळण्यांत येतात त्या कालास नवपाषाणयुग अशी संज्ञा देण्यांत येत असे; व त्या पूर्वींच्या ओबडधोबड हत्यारांच्या कालास प्राचीन अथवा पूर्वपाषाण युग असें म्हणत. परंतु नवपाषाणयुग अथवा नवपाषाणयुगीन संस्कृति हे शब्द पश्चिम युरोपच्या बाबतींत अधिक सावधपणें वापरले पाहिजेत. कारण हा काल सर्वत्र एकाच वेळीं अस्तित्वांत नव्हता. या कालांत मनुष्य जीं दगडांचीं हत्यारें वापरी तीं घासून चांगलीं तयार केलेलीं असत. तसेंच मनुष्य अनेक माणसाळलेले प्राणी पाळूं लागला होता. तो धान्य पिकवीत असे व फळझाडांची लागवडहि करीत असे. तसेंच मातीचीं भांडीं तयार करी, कापड विणी, व नावा चालवी. त्याच्या ठिकाणीं कांहीं धार्मिक समजुतीहि उत्पन्न झाल्या होत्या. परंतु कांहीं ठिकाणीं दगडाचीं हत्यारें वाळगणारे लोक फारसे प्राणी पाळीत नसत किंवा शेतीहि करीत नसत. या कालांत स्पेनमध्यें पूर्वेकडील लोक येऊन कांहीं अशोधित धातू आपल्या देशांत गाळण्याकरितां नेत असत, किंवा दुसऱ्यास विकीत असत, असें लुई सायरेट यानें म्हटलें आहे. त्यांनीं स्पेनमध्यें ईजिप्तमधून गारांचीं उत्तम हत्यारें आणलीं होतीं, व त्यांच्याजवळहि कांहीं उत्तम गारांचीं हत्यारें असत. परंतु प्रत्यक्ष गारा त्या प्रदेशांत आढळत नसत. गारांचीं हत्यारें करण्याचा धंदा उत्तरेकडील समुद्रकिनाऱ्यावरील लोक करीत असत. अद्यापिहि अनेक असंस्कृत समाजांत नवपाषाणयुगीन संस्कृति टिकून आहे.

**नवप्लेटोवाद**—हा एक तत्त्ववेत्त्यांचा पंथ धार्मिक पायावर उभारलेला असून तो इ. स. ३ ऱ्या शतकांत उत्पन्न झाला आणि हेलास व रोम यांच्या सत्तेखालील मूर्तिपूजक समाजांत

पसरला. धार्मिक तत्त्वज्ञान ऊर्फ ईश्वरविज्ञानविषयक मतें व ग्रीक तत्त्वज्ञानानुसार बनवलेलीं मतें हीं प्रस्तुत करणें, हा या पंथाचा प्रयत्न होता. नवप्लेटो पंथाचें मुख्य तत्त्व असें असे कीं, मानवी इंद्रियज्ञानाहून जें उच्च व पलीकडे आहे तें केवल शुद्ध तत्त्व असून सर्व विश्वाचा मूलाधार पाया आहे, आणि त्या केवल तत्त्वाचें ज्ञान अन्तर्ज्ञानानें, अथवा अत्यानंदावस्थेंतील ध्यानानें होतें. या नवप्लेटोमतवादी तत्त्ववेत्त्यांमध्यें तीन पंथ होते : अलेक्झांड्रियन-रोमन, सीरियन आणि अथीनियन. अलेक्झांड्रियन पंथाचा संस्थापक आमोनियस सॅक्कस (इ. स. १७५-२४२) हा असून लाँगिनस, प्लॉटिनस, आणि पोर्फिरी या पंथांतले प्रमुख तत्त्ववेत्ते होत. सीरियन पंथाचा प्रतिनिधि आयांब्लीकस (३३०) हा ख्रिस्तीधर्मविरोधक होता, आणि प्रोक्लस (४११-४८५) याच पंथाचा होता. नवप्लेटोपंथ ख्रिस्तीधर्माशीं स्पर्धा करून टिकाव धरूं शकला नाहीं. तथापि नवप्लेटोवादाचा अभ्यास मध्ययुगांत पुन्हां सुरू झाला, व त्याची छाप जी. ब्रूनो आणि जेकब बोहमे यांच्या मतांवर पडली. फिश्ते, शेलिंग आणि हेगेल यांच्या मतप्रणालींचें नवप्लेटोवादाशीं साम्य आहे.

**नवयुग कला**--(फ्यूचॅरिझम्). इटलीमधील मिलान येथील कांहीं कवी, चित्रकार व शिल्पी यांनीं एफ्. टी. मारिनेट्टी याच्या नेतृत्वाखालीं एक जाहीरनामा काढला होता (१९०९) व त्यांत कांहीं तत्त्वें ग्रथित केलीं होतीं. यामध्यें कलेला जीवनाचें तत्त्वज्ञान लावण्यांत यावें व द्रव्य आणि शक्ति यांच्या उपपत्तींचें दिग्दर्शन कलेंत असावें; तसेंच अर्वाचीन जगामध्यें गति व संघर्ष यांचें प्रामुख्य दिसून येत आहे त्याचें प्रतिबिंब कलेंत उठलें पाहिजे, असें त्यांनीं प्रतिपादन केलें होतें. यास नवयुग कला असें नामाभिधान देण्यांत येतें. या तत्त्वाच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें असें आहे कीं, कलाकारानें प्रत्यक्ष जें डोळ्यांना दिसतें तें फक्त चित्रित करावयाचें नसून चलनाची संवेदना व वाढ हीं चित्रित करावयाचीं असतात. हें चित्रित करावयाचा एक प्रकार असा कीं, मनाच्या तत्कालीन अवस्थांचें चित्रण करावयाचें म्हणजे चित्रकारानें जें त्यास प्रत्यक्ष दिसत असेल तेवढ्याचेंच नव्हे तर त्यास त्या वस्तूबद्दल किंवा व्यक्तीबद्दल जें माहीत असेल किंवा स्मरत असेल त्या सर्वांचें एका फलकावर चित्रण करावयाचें. या पद्धतींतील प्रमुख लुइगि रुसोलो, कॉर्लो डी. कारा व गियाकोमो बाल्ला हे होत. परंतु यांनीं फक्त वर्णनात्मक यथार्थप्रमाणें चित्रें काढलीं आहेत. उंबर्टो बॉकिओनी हा चित्रकार व शिल्पकार असून तो यांच्याप्रमाणेंच आहे; पण त्याची रचना अधिक आकर्षक दिसते. गिनो सेव्हिरिनि हा या पद्धतीबद्दल विशेष प्रसिद्ध आहे; पण तो पूर्वी चित्रविचित्र व भडक रंगकामाबद्दल फार प्रसिद्ध होता.

**नवरत्न**--१. हिरा, माणिक, मोती, गोमेद, इंद्रनील, पाच, प्रवाळ, पुष्कराज व वैडूर्य किंवा तोरमल्ली.

२. विक्रम राजाच्या किंवा भोज राजाच्या दरबारांतील नऊ विद्वद्रत्नें म्हणजे धन्वन्तरि, क्षपणक, अमरसिंह, शंकु, वेतालभट्ट, घटकर्पर, कालिदास, वराह मिहिर व वररुचि हे पंडित होत. हे समकालीन नाहींत हें उघड आहे, पण आख्यायिकांतून यांचीं नांवें एकत्र येतात.

**नवरस**--शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत हे काव्यांतील नवरस आहेत.

**नवरात्र**--आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंतच्या नऊ दिवसांना नवरात्र असें म्हणतात. हें नवरात्र देवीविषयीं असून शरद् ऋतूमध्यें येत असल्यामुळें यास शारदीय नवरात्र असें म्हणतात. या वेळचा कुलाचार बहुतेक सर्व हिंदुमात्रांत आढळतो. आश्विन शुद्ध प्रतिपदेस मातीच्या लहानशा ढिगावर थोडे गहूं पेरून व त्यावर मातीचा घट स्थापून त्यावर देवीची प्रतिष्ठापना करतात. या विधीस घटस्थापना हें नांव आहे. देवीच्या पूजाघटावर नित्य पुष्पमाला बांधणें व अखंड-दीपस्थापना या गोष्टी नऊ दिवस चालतात. कोणी मार्कंडेय पुराणांतील देवीमाहात्म्य-सप्तशती नित्य पठण करतात. आठव्या दिवशीं सप्तशतींतील श्लोक म्हणून तिलहोम करतात. या होमानंतर प्राणिबलीच्याऐवजीं कोहळा फोडून देवीस बलिदान करतात. नऊ दिवस पूर्ण झाल्यावर १० व्या दिवशीं विसर्जन होतें (दसरा पाहा). या शारदीय नवरात्राशिवाय खंडोबाचें नवरात्र (सहा दिवस-मार्गशीर्ष शु. १ ते ६ पर्यंत), रामाचें नवरात्र (रामनवमीपूर्वीं), वगैरे नवरात्रें आहेत.

**नवरोझ**--पारशी वर्ष-प्रतिपदा. सूर्य मेष राशींत जातो तेव्हां (२० किंवा २१ मार्च) पारशी साल सुरू होतें. या सणाच्या दिवसाला जमशेदची ईद असेंहि म्हणतात. इराण मुसलमानी वर्चस्वाखालीं गेल्यावरहि हा दिवस पाळण्यांत येऊं लागला. मुसलमानी शियापंथी 'ईद-इ-खिलाफत' या नांवानें हा दिवस पाळतात. हिंदुस्थानांत अकबर बादशहा नवरोझ सण साजरा करूं लागला; तो मोंगलाईच्या अखेरपर्यंत होता. या दिवशीं नर्वी नाणीं पाडण्यांत येत; मीना बाजार भरवीत; व इतर विलास करीत. आजहि हैद्राबाद (दक्षिण) आणि मुर्शिदाबाद (बंगाल) येथें फार मोठ्या थाटानें हा सण पाळण्यांत येत असतो. इराण देशांत तर एका प्राचीन राष्ट्रीय घटनेची आठवण म्हणून नवरोझ साजरा होतो. पारशी लोक पटेटी सणाच्या खालोखाल या सणाला महत्त्व देतात.

**नवलगुंद**--मुंबई, धारवाड जिल्ह्यांतील वायव्येकडील तालुका. क्षेत्रफळ ५६५ चौरस मैल. लोकसंख्या ६८,२३५.

अण्णेगरी, नरगुंद व नवलगुंद हीं तीन शहरें व ८५ खेडीं या तालुक्यांत आहेत. पाऊस सरासरी २४ इंच पडतो. नवलगुंद हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या ७,०८२. हें शहर घोंगड्या, सुती सतरंज्या व उत्तम बैल यांकरितां प्रसिद्ध आहे. येथें औरंगजेबाच्या वेळेपासूनचें एक लिंगायत देसाई घराणें आहे. १८३८ सालीं या देसायाला व्यापारावरील जकात उठविण्याच्या अटीवर दत्तक घेण्याचा हक्क दिला आहे.

**नवलाख उंबरें**— मुंबई, पुणें जिल्हा. खडकाळ्याच्या ईशान्येस १० मैलांवर हें एक जुनाट गांव आहे. या गांवाची स्थापना सात-आठशें वर्षांपूर्वी झाली. येथें कांहीं प्राचीन इतिहासाचे अवशेष आहेत. येथें एक बहिरोबा नऊखंडीचें देवालय आहे. जवळूनच सुदा नदीचा उगम होतो. येथील कोणा मोंगल सरदाराच्या कन्येस भाऊबिजेच्या दिवशीं नऊ लाख टांक ओवाळणींत मिळाले, त्यावरून या गांवास हें नांव पडलें.

**नवलाखी**— मुंबई, काठेवाडांतील एक प्रमुख बंदर. हें मोरवी संस्थानांत असून येथपर्यंत आगगाडीचा फांटा आहे. धक्क्यापासून दोन मैल दूर समुद्रांत बोटी नांगरल्या जातात. या बंदरांत बारमास वाहतूक असते. गेल्या दहा वर्षांतच याची बरीच सुधारणा झाली.

**नवविधा भक्ति**—ईश्वरभक्तीचे नऊ प्रकार आहेत ते म्हणजे श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, व आत्मनिवेदन.

**नवसरी**—बडोदें संस्थानांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १८११ चौरस मैल. व लोकसंख्या सु. चार लाख आहे. मुख्य पिकें ज्वारी, भात, गहूं, बाजरी, नागली, तूर, वाल, वाटाणे, चणे, मूग, उडीद, कापूस, तमाखू, ऊंस, केळीं, वगैरे आहेत. येथें मुख्यतः कापडाचा व्यापार चालतो. नक्षीकाम, दागिने व धातूचें काम येथें होतें. नवसरी हें नवसरी प्रांताचें मुख्य शहर व रेल्वे-स्टेशन आहे. लोकसंख्या सु. पंचवीस हजार. ज्या पारशांनीं इस्लामधर्म स्वीकारण्याचें नाकारलें ते ११४२ सालीं इराणांतून हिंदुस्थानांत येऊन नवसरीला राहिले. हल्लीं येथें म्हातारपणीं नोकरी-धंदा संपल्यावर आरामानें राहणाऱ्या बऱ्याचशा पारशांचीं घरें आहेत. येथें ताडाचीं पुष्कळ झाडें असून येथील ताडी फारच स्वादिष्ट असते. मल्हारराव होळकराला येथें राहणें फार आवडत असे. येथें टॉवर ऑफ सायलेन्स (पारशी मृतांना पुरण्याची जागा) व अग्नीचें एक देवालय पाहण्यासारखें आहे.

**नवसागर**—(साल–अमोनिआक). दगडी कोळशाच्या डांबरांत हा मिळतो. लोखंडी पत्र्यावर जस्ताचा मुलामा (गॅल्व्हनायझिंग) देतांना, कापडावर रंगकाम करतांना, झाळतांना आणि विजेच्या बॅटरीसाठींहि याचा उपयोग होतो. अमोनिया पाहा.

**नवानगर संस्थान**—मुंबई प्रांत, काठेवाडांतील एक संस्थान. क्षेत्रफळ ३,७९१ चौरस मैल, व लो. सं. ५,०४,००६ आहे. मुख्य नद्या भादर, वर्तु, अजी व उंड या असून जोडीया, सलाया व नवानगर किंवा बेडी हीं बंदरें आहेत. येथें गिरनार जंगलांत सिंह आढळतात. पाऊस सरासरी २५ इंच पडतो. नवानगरचे जामसाहेब जातीनें जाडेजा रजपूत असून कच्छच्या राववंशांतील आहेत. १५४० सालीं मूळच्या जामरावळानें नवानगर वसविलें. सध्यांचे जामसाहेब दिग्विजयसिंग १९३३ सालीं गादीवर बसले. ते चांगले सुविद्य आहेत. प्रख्यात क्रिकेटपटु रणजितसिंग हे यांचे वडील होत. या संस्थानांत तीन शहरें व ६६६ खेडीं आहेत. मुख्य पिकें ज्वारी, बाजरी, गहूं, चणे, तांदूळ हीं आहेत. जोडियाजवळ मोठे पाटबंधारे आहेत. संस्थानाच्या सुमारें तीनशें बोटी व चार दीपगृहें आहेत. संस्थानचें उत्पन्न ९८ लाख रुपये आहे. शहर नवानगर संस्थानचें मुख्य ठिकाण आहे. याला जामनगरहि म्हणतात. लो. सं. ७१,५८८. येथें मोत्याच्या शिंपा मिळतात व जरीचें काम, सुगंधी तेलें व कुंकू तयार होतें. आयुर्वेदाचें महाविद्यालय येथें आहे. या संस्थानांत अनेक उद्योगधंदे असून विशेषतः दर्याव्यापारासाठीं संस्थान प्रसिद्ध आहे. जामनगर येथें विमानतळ आहे. संस्थान आतां सौराष्ट्र संघात सामील झालें आहे.

**नवापूर**—मुंबई, पश्चिम खानदेशांतील एक पेटा. यांत ८० गांवें असून लो. सं. ६४,६६१ आहे. येथें सुकवेल व जिरेसाळ नांवाचे तांदूळ फार प्रसिद्ध असून त्यांस कस्तूरीसारखा वास येतो. हा तांदूळ पूर्वीं इराणांत रवाना होत असे व पेशव्यांच्याकडेहि जाई. नवापूर द्राक्षाकरितां प्रसिद्ध असून येथें उंसाचे मळे व गुऱ्हाळें पुष्कळ आहेत. या तालुक्यांत वाघांचा उपद्रव फार आहे. नवापूरची लो. सं. ६,७३१ आहे. येथें एक किल्ला आहे.

**नवायस लोह**—एक आयुर्वेदीय औषध. सुंठ, मिरे, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, नागरमोथा, वावडिंक, चित्रक व लोहभस्म हीं यांत मुख्य औषधें आहेत. बारीक ज्वर, हातापायाची आग होणें, अंगांत रक्त नसणें, अतिशय अशक्तपणा, हातापायांवर थोडीशी सूज असणें, छातींत धडधडणें, पांडुरोग, ग्रहणी, अतिसार, इत्यादि रोगांवर हें औषध चांगलें आहे. जीर्ण झालेल्या पांडुरोगामध्यें याचा फार चांगला उपयोग होतो. १ ते ३ गुंजा आल्याचा रस, मध, किंवा आर्द्रकावलेह यांत घेतात.

**नॅश, थॉमस** (१५६७–१६०१)—एक इंग्रज कवि, नाटककार व निबंधलेखक. त्याचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते– 'दि टेरर्स ऑफ दि नाइट' (रात्रींचीं भयें); 'ख्राइस्ट्स टीयर्स ओव्हर जेरुशलेम' (जेरुशलेमबद्दल ख्रिस्ताचे अश्रू); 'लेन्टेन स्टफ'; 'दि अन्फॉर्चुनेट ट्रॅव्हलर, ऑर दि लाइफ ऑफ जॅक विल्टन' (दुर्दैवी प्रवासी जॅक विल्टन) कादंबरी आणि 'समर्स लास्ट विल अँड टेस्टामेंट', हें व्याजोक्तिपूर्ण प्रहसन, हे होत.

**नॅशनल गॅलरी**—हें ब्रिटिश राष्ट्रीय चित्रसंग्रहालय लंडन शहरांत ट्राफल्गार चौकामध्यें आहे. त्याची प्रथम स्थापना १८२४ सालीं अँगरस्टीन याचा चित्रसंग्रह ५७,००० पौंड किंमतीस विकत घेऊन ब्रिटिश सरकारनें केली. नंतर ब्रिटिश पार्लमेंटनें सरकारी खर्चानें वेळोवेळीं आणखी खाजगी चित्रसंग्रह विकत घेऊन त्यांत भर घातली आहे. १८७१ सालीं पीलचा संग्रह विकत घेतला. त्याशिवाय अनेकांनीं देणग्या देऊन हा संग्रह वाढविला आहे.

'ए नॅशनल गॅलरी ऑफ ब्रिटिश आर्ट' याची स्थापना सर हेन्री टेट यानें दिलेल्या देणगींतून १८२७ सालीं झाली.

'दि नॅशनल पोर्ट्रेट गॅलरी' हें चित्रसंग्रहालय वरील नॅशनल गॅलरीनजीकच आहे; पण ही संस्था स्वतंत्र असून ती १८५६ सालीं स्थापन झाली व त्यांत व्यक्तिचित्रे व अर्ध पुतळे मिळून २,००० वस्तूंचा संग्रह आहे.

'दि नॅशनल पोर्ट्रेट गॅलरी' आणि 'दि स्कॉटिश नॅशनल गॅलरी' हे संग्रह एडिंबर्ग येथें आहेत. मॅड्रिड आणि पॅरिस या शहरांतूनहि असेच मोठे चित्रसंग्रह आहेत.

**नॅशनल सेव्हिंग्ज सर्टिफिकेट**—मागच्या महायुद्धांत 'वॉर सर्टिफिकिटें' ब्रिटिश सरकारनें युद्धाचा खर्च भागविण्यासाठीं काढलीं. ७॥ रु. चे पांच वर्षांनीं १० रु. होत. पुढें हा दर कमी होत गेला. दुसऱ्या महायुद्धांतहि 'नॅशनल सेव्हिंग्ज सर्टिफिकिटें' काढण्यांत आलीं. त्यांची मुदत बारा वर्षें ठेवण्यांत आली. या सर्टिफिकिटांवर प्राप्तीचा कर माफ आहे. हिंदुस्थानांत १९१८ पासून चालू असलेलीं पोस्ट ऑफिस कॅश सर्टिफिकिटें १ ऑक्टोबर १९४३ पासून बंद करून हीं नॅ. से. सर्टिफिकिटें सुरू केलीं.

**नॅसमिथ, जेम्स** (१८०८–१८९०)—एक स्कॉटिश इंजिनियर. त्यानें १८३९ सालीं 'स्टीम–हॅमर' (वाफेचा हातोडा) चा शोध लावला, व त्याचा हल्लीं फार उपयोग होत आहे. त्याशिवाय 'स्टीम पाइल–ड्रायव्हर' आणि 'सेफ्टी फाउंड्री लॅडल्', वगैरे त्याच्या शोधांपैकीं महत्त्वाचे शोध आहेत.

**नसिराबाद**—१. बलुचिस्तान, सिबी जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ८२७ चौ. मैल, व लोकसंख्या सु. पस्तीस हजार. ह्यांत १७० खेडीं आहेत. येथील वाळवंटी कालवे (डेझर्ट कॅनॉल) पाणी पुरवितात. येथें हरचरे व नीळ हेंच काय तें उत्पन्न आहे.

२. पाकिस्तान, सिंध, लारखानाजिल्ह्यातील एक तालुका. क्षेत्रफळ ४१८ चौरस मैल व लोकसंख्या सु. साठ हजार. खेडीं ६५ असून मुख्य ठिकाण बारह आहे. येथें मुख्यत्वेंकरून तांदूळ होतो.

३. मुंबई, पूर्वखानदेश, जळगांव तालुक्यांतील एक शहर. लोकसंख्या सु. पंधरा हजार. हें शहर बांगड्यांकरितां प्रसिद्ध आहे. येथें बऱ्याचशा मशिदी आहेत. पुरंदऱ्यांनीं हें गांव वसविलें म्हणून हें त्यांना इनाम दिलें गेलें.

४. राजपुताना, अजमेर–मेरवाडमधील छावणीचें शहर. लो. सं. सु. बावीस हजार. १८५७ च्या बंडांत येथील बंगाली तुकड्यांनीं बंड करून त्या दिल्लीकडे निघाल्या. मुंबईचें घोडदळ सैन्य मात्र इमानानें राहिलें.

**नहपान क्षहरात** (राज्य. ८५–१०७)— हिंदुस्थानांतील एक शक राजा. आंध्र राजवंशांतील २३ वा राजा गौतमीपुत्र शातकर्णी व २४ वा राजा वासिष्ठीपुत्र पुलुमायी यांच्या वेळेस पश्चिम हिंदुस्थानांत बाह्य शकयवनादि टोळ्यांनीं धुमाकूळ घातला, व ते इंडोपार्थियन किंवा कुशान राजांच्या आश्रयानें राहिले, मुंबईकडच्या प्रदेशांतहि ते पसरले व त्यांनीं राज्यें स्थापलीं. शकांमध्यें पहिला क्षहरात ऊर्फ सत्रप भूमक हा १ ल्या शतकांत झाला असावा; दुसरा क्षहरात राजा नहपान होय. याचें मूळ नांव इराणी पद्धतीचें दिसतें, पण नंतर यानें महाक्षत्रप व राजा हीं उपपदें लावलीं. यानें आपलें राज्य दक्षिण राजपुताना तें नाशिक–पुणें यापर्यंत (सौराष्ट्र–काठेवाड धरून) वाढविलें होतें. याची राजधानी जुन्नर (पुणे जिल्हा) येथें होती. याची मुलगी दक्षमित्रा ही उषवदाताला दिली होती. उषवदात (पाहा) हा त्याचा सेनापति होता. याच्यानंतर ऋषभदत्त गादीवर आला. शकांवर गौतमीपुत्र शातकर्णी यानें स्वारी करून त्यांना हिंदुस्थानाबाहेर हांकलून दिलें व त्यांचें सर्व राज्य आपल्या राज्यांत सामील केलें (इ. स. १२६).

**नहाल**—एक भिल्ल पोटजात. भिल्लांत व या जातींत पुष्कळ बाबतींत फरक आहेत. सातपुड्याच्या सीमेवर, यालवाडी, पळसनेर, सिंदवा, चिरमिरा, वीरखड, वगैरे गांवीं या लोकांचें वास्तव्य आहे. भिल्लांत अत्यंत रानटी लोक कोण असतील तर ते हेच होत. यांचा वर्ण अत्यंत काळा, बांधा ठेंगणा व अवयव राकट असतात. हे पितळेचीं कर्णभूषणें घालतात. कंदमुळें,

फळें व बोरें यांवर मुख्यतः ते आपला उदरनिर्वाह करतात. हे इतरांशीं कोणत्याहि प्रकारची देवघेव अथवा व्यवहारसंबंध ठेवीत नाहींत. यांचा एक पिढीजात नायक असतो. १८२३ त या नहाल लोकांनीं खानदेशात बरेच दंगेधोपे केले होते.

**नहुष**—हा पौराणिक राजा पुरुरव्याचा नातू, आयूचा पुत्र व ययातीचा पिता होय. यास एकदां इंद्रपद प्राप्त झालें असतां यानें इंद्राणीचाहि अभिलाष धरिला. तिनें, 'आपण अपूर्व वाहनांत बसून आलांत तर मी तुमची होईन', असा त्याला निरोप पाठविल्यावरून नहुषानें सप्तर्षींचें वाहन केलें व या थोर ऋषींना लाथेनें मारून 'सर्प!' 'सर्प!' (चला, चला) असें म्हणूं लागला. तेव्हा अगस्त्य ऋषीला राग येऊन त्यानें तूं सर्प होशील असा शाप दिला. सर्प योनींत हा दहा हजार वर्षे होता. युधिष्ठिराच्या दर्शनानें त्याचा उद्धार झाला.

**नळ**—द्रव किंवा वायुरूप पदार्थ एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेण्यासाठीं नळाची योजना असते. हे नळ मातीचे किंवा धातूचे केलेले असतात. पाणी व तेलें नेण्यासाठीं नळ टाकतात. जेथें विशेष दाब नसेल अशा ठिकाणीं वाफ नेण्याकरितां बिडाच्या अथवा ओतीव लोखंडाच्या नळ्या वापरण्यांत येतात. परंतु अशा नळ्या अत्युष्ण वाफ नेण्याच्या कामीं कधींहि वापरूं नयेत. महत्त्वाच्या ठिकाणीं वाफ नेणाऱ्या नळ्या बहुधा मृदु पोलादाच्या घनस्वरूपाच्या अथवा सांधलेल्या आणि बाजूस पट्टे असलेल्या व त्या एकमेकांस स्क्रूनें जोडून किंवा सांधून बसविलेल्या अशा वापरण्यांत येतात. दिव्यांचा धूर नेण्याकरितां वडीव लोखंडाच्या व सांधलेल्या नळ्या वापरतात. तापकाच्या आंतील नळ्या घनस्वरूपाच्या व एकसंध असतात. सलोह संधानका(सीमेंट)च्या नळ्यांमध्यें जें पोलाद वापरण्यांत येतें तें उभा व आडवा दाब सहन करतें आणि संधानक हें फक्त जलाभेद्य म्हणून वापरण्यांत येतें. कॅनडा व अमेरिका यांमध्यें लोखंडी पट्ट्यांनीं जोडलेल्या लांकडी दांड्याच्या नळ्या फार मोठ्या प्रमाणांत वापरण्यांत येतात.

पाण्याचा सांठा जेथें केला असेल तेथून बरेंच लांब पाणी नेण्यासाठीं मोठमोठे नळ लांबवर टाकतात हें आपण पाहतोंच. याप्रमाणें पेट्रोल, रॅकेल यांसारखें तेलहि किती तरी लांब नळानें नेण्यांत येत असतें. अमेरिकेंत (सं. संस्थानांत) सु. एक लाख मैल लांबीचे व ४ ते १२ इंच व्यासाचे नळ जमिनीखालीं तेल नेण्यासाठीं टाकले आहेत. तसेंच इराणांतहि ओसाड अरण्यें आणि पर्वत यांतून १५० मैलांवर लांब नळ घालून तेल नेलें आहे.

**नळगुंडा**—हैद्राबाद संस्थान, एक जिल्हा. क्षेत्रफळ ६,१०४ चौरस मैल. मूसा, अलेर, हलिया, पेद्दावती व दंडी या नद्या मुख्य आहेत. गोवळकोंड्याचे हिरे येथील कडाप्पा-कर्नूल-सारख्याच दगडांपासून काढीत असत. येथील जंगलांत साग, शिसू, संद्रू, बाभूळ, आंबा, चिंच, तरवड, इत्यादि झाडें दिसतात. पाऊस सरासरी २६ इंच पडतो. हा पूर्वी वरंगळच्या राज्याचा भाग असून एका राजानें नळगुंडाच्या ईशान्येस २ मैलांवर पांगूळ किल्ला बांधून तें मुख्य ठाणें केलें; पुढें लगेच नळगुंडा येथें राजधानी झाली. पुराणवस्तूंपैकीं नळगुंडा, देवरकुंडा, ओलरकुंडा व भोनगीर हे किल्ले प्रेक्षणीय आहेत. पांगूळ, नागलवाद व पाललमरी येथील देवालयें हिंदूंच्या कारागिरीचीं साक्ष देतात. शहरें नळगुंडा व भोनगीर हीं दोन आहेत. येथील लोक तेलगू भाषा बोलतात. लोकसंख्या दहा लाखांवर आहे. पूर्वी चित्रळ येथें सोन्याची खाण होती पण ती बंद झाली.

नळगुंडा तालुक्यांत १६ जहागिरी आहेत. नळगुंडा गांवची लो. सं. सहा हजार आहे. उत्तर टेंकडीवर शहा लतीफचें थडगें व दक्षिणेकडील टेंकडीवर एक किल्ला आहे. पूर्वी याचें नांव नीलगिरि होतें.

**नळदुर्ग**—हैद्राबाद संस्थान, उस्मानाबाद जिल्हा, एक जुनें गांव. येथें एक पुरातन किल्ला आहे. हा किल्ला बोरी नदीच्या उंच थडीवर वसला आहे. बोरी नदीला बांध घालून किल्ल्यासाठीं सतत पाण्याचा पुरवठा करून घेतला आहे.

**नळदुर्ग किल्ला**—मुंबई, ठाणें जिल्हा. मुरबाडच्या आग्नेयीस ९ मैलांवर नारिवली नांवाच्या खेड्यांत हा किल्ला मोडतो. तो सह्याद्रीच्या एका फांट्यावर बांधलेला आहे.

**नक्षत्रगण**—स्थिर ताऱ्यांच्या समूहास नक्षत्रगण म्हणतात. टॉलेमीनें अशा ४८ समूहांची यादी दिली आहे. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ, व मीन, ह्या बारा राशी पृथ्वीच्या क्रांतिवृत्ताचे बारा भाग पाडतात. तशींच चंद्राच्या मार्गावर २७ नक्षत्रें अश्विनी, भरणी, आदिकरून आहेत.

उत्तर गोलार्धांत पुढील २१ नक्षत्रगण आहेत :

The Great Bear–सप्तर्षिमंडल, बृहदृक्ष.
The Little Bear–लघु (ध्रुव) मत्स्य.
Perseus–ययाति.
Dragon–कालिय; अजगर.
Cepheus–वृषपर्वा.
Cassiopeia–शर्मिष्ठा; कश्यपी.
Andromeda–देवयानी; उत्तरा भाद्रपदा.
Pegasus–उच्चैःश्रवा. –Alpha–पूर्वा भाद्रपदा.
The little horse–लघु अश्व.
Triangle–त्रिकोण.

Waggoner–सारथी; सूत.
Bootes–भूतप; स्वाति.
The Northern Crown–उत्तर मुकुट.
Ophiuchus–भुजंगधारी; सर्पधर.
Serpent–भुजंग; वासुकि.
Hercules–शौरी.
Arrow–शर.
Lyre–स्वरमंडळ; अभिजित्.
Swan–राजहंस.
Dolphin–धनिष्ठा.
Eagle–गरुड.

दक्षिण गोलार्धांतील १५ नक्षत्रगण—

Orion–भरत; मृग; मृगशीर्ष; अग्रहायण; प्रजापति; कालपुरुष.
Whale–तिमिंगल.
Eridanus–यमुना; वैतरणी.
Hare–शशक.
The Great Dog–बृहत् लुब्धक.
The Little Dog–लघु ,,
Hydra–आश्लेषा; वासुकि.
Cup ( Carler )–चषक.
Crow–ध्वांक्ष.
Centaur–नरतुरंग; नराश्व; किन्नर.
Wolf–वृक.
Alter ( Ara )–पीठ.
The Southern Fish–याममत्स्य.
The Argo–नौका.
The Southern Crown–दक्षिण मुकुट.

यांहून आणखी नक्षत्रगण दक्षिण गोलार्धांत नौकानयनाला जरूर असल्यामुळें वाढविले आहेत व त्यांना सर्व तऱ्हेच्या प्राण्यांचीं नांवें दिलीं आहेत. ग्रीक अक्षरांनीं नक्षत्रांतील निरनिराळे तारे दाखविले जातात. उदा., ∝ ( अल्फा ) म्हणजे सर्वांत तेजस्वी, B ( बीटा ) दुसऱ्या प्रतीचा, इ. क्रम स्थूलमानाचा आहे. डोळ्यांना दिसणारा अगदीं बारीक तारा सहाव्या प्रतीचा असतो ( तारे पाहा ).

मृत्युलोकींचे पुण्यात्मे हे स्वर्गीं नक्षत्ररूप होतात अशी उदात्त कल्पना आपल्या वैदिक वाङ्मयांत आहे. तसेंच नक्षत्रें हीं देवांचीं मंदिरें आहेत असेंहि म्हटलें आहे. भारतीयांस नक्षत्रज्ञान ख्रि. पू. ५,००० वर्षांपासून तरी असावें. दृष्टिवेधानेंच त्यांनीं नक्षत्रपद्धति अजमावली. क्रांतिवृत्ताचा २७ वा भाग म्हणजे ८०० कला हें नक्षत्रांचें मान सामान्यतः धरलेलें दिसतें. चैत्रादि माससंज्ञा पुढें नक्षत्रांवरूनच पडल्या.

भारतीयांप्रमाणेंच प्राचीन चिनी व अरबी लोकांत नक्षत्रपद्धति होती. तिचें भारतीय नक्षत्रपद्धतीशीं बरेंच साम्य आहे.

नक्षत्रें ओळखण्यासाठीं नॉटिकल अल्मनॅकवरून ताऱ्यांचे विषुवांश आणि क्रांति घेऊन एक सूक्ष्म पट तयार करतात. या पटावरून नक्षत्रें पाहणें फार सुलभ जातें.

## नक्षत्रांच्या योगतारा, शर, ध्रुवक व तारापुंज

| नक्षत्रें | योगतारा | शर | उत्तर कीं दक्षिण | ध्रुवक राशी | ध्रुवक अंश | ध्रुवक कला | तारापुंजांतील तारा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्विनी | बीटा एरैटिस | १० अंश | उत्तर | ० | ८ | ० | ३ |
| भरणी | ३५ एरैटिस | १२ अंश | उत्तर | ० | २० | ० | ३ |
| कृत्तिका | ईटाटारी | ४ अंश, ३० कला | उत्तर | १ | ७ | २८ | ६ |
| रोहिणी | आल्डिबरान् | ४ अंश, ३० कला | दक्षिण | १ | १९ | २८ | ५ |
| मृग | ११६ टारी | १० अंश | दक्षिण | २ | ३ | ० | ३ |
| आर्द्रा | १३२ टारी | ११ अंश | दक्षिण | २ | ७ | ० | १ |
| पुनर्वसु | पोलक्स | ६ अंश | उत्तर | ३ | ३ | ० | ४ |
| पुष्य | डेल्टाकांक्री | ० अंश | शर नाहीं | ३ | १६ | ० | ३ |
| आश्लेषा | ४९ कांक्री | ७ अंश | दक्षिण | ३ | १८ | ० | ५ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मघा | रेग्युलस | ० अंश | | ४ | १ | ० | ५ |
| पूर्वा | थीटालियानिस | १२ अंश | उत्तर | ४ | २७ | ० | २ |
| उत्तरा | डेनीबोला | ३ अंश | | ५ | ५ | ० | २ |
| हस्त | डेल्टाकाव्हि | ११ अंश | दक्षिण | ५ | २० | ० | ५ |
| चित्रा | स्पायका | १ अंश, ४५ कला | | ६ | ३ | ० | १ |
| स्वाती | आर्कट्यूरस | ३७ अंश | उत्तर | ६ | १९ | ० | १ |
| विशाखा | २४ लिब्रा | १ अंश, २० कला | | ७ | २ | ५ | ४ |
| अनुराधा | बीटा स्कार्पी | १ अंश, ४५ कला | | ७ | १४ | ५ | ४ |
| ज्येष्ठा | अंटारिस | ३ अंश, ३० कला | उत्तर | ७ | १९ | ५ | ३ |
| मूळ | ३४ स्कार्पी | ८ अंश, ३० कला | | ८ | १३ | ० | ११ |
| पूर्वाषाढा | डेल्टासानि | अंश, २० कला | | ८ | १४ | ० | ४ |
| उत्तराषाढा | फैसाजि | ५ अंश | उत्तर | ८ | २० | ० | ३ |
| अभिजित् | व्हीगा | ६२ अंश | | ८ | २५ | ० | ३ |
| श्रवण | आल्टेर | ३० अंश | उत्तर | ९ | ८ | ० | ३ |
| धनिष्ठा | आल्फाडेल्फी | ३६ अंश | | ९ | २० | ० | ४ |
| शततारका | लॅबडा आक्वेरियस | ० अंश, २० कला | दक्षिण | १० | २० | ० | १०० |
| पूर्वाभाद्रपदा | मार्काब | २४ अंश | उत्तर | १० | २६ | ० | २ |
| उत्तराभाद्रपदा | आल्जेनिका आल्फेराट | २६ अंश | | ११ | ७ | ० | २ |
| रेवती | झीटापीशियम | ० अंश | | ० | ० | ० | ३२ |

**नक्षत्रमासे**—तारामत्स्य पाहा.

**नक्षीचा माग**—( जाकार्ड लूम ). साध्या मागाच्या माथ्यावर एक जाकार्ड नांवाचें यंत्र बसविलें म्हणजे त्याला जाकार्ड माग म्हणतात. हें यंत्र जोसेफ मेरी जाकार्ड ( १७९२–१८३४ ) या फ्रान्समधील लिऑन्स शहरांतील मनुष्यानें शोधून काढलें म्हणून त्याचें नांव पडलें. याच्या साहाय्यानें गालिचे, बुट्टीदार कापड, चादरी, वगैरेंमध्यें नक्षी भरण्यांत येते. रेशीम, लोंकर, सूत व लिनन यांचें या जाकार्ड पद्धतीनें नक्षीदार विणकाम करतां येतें. कापडावर चित्रें, नांवें किंवा कांहींहि प्रतिमा चांगल्या भरतां येतात.

**नाइक**—नायक, नाइकडा. यांची लोकसंख्या सुमारें दीड लक्ष असून त्यांपैकीं ५० हजारांवर वस्ती गुजराथेंत आहे. भडोचकडे कोळी लोकांनाहि नाइक असें म्हणतात ; आणि नांवाचा घोटाळा होऊं नये म्हणून या लोकांना नाइकडे असें दुसरें नांव पडलें. प्रथम हे लोक रानवट स्थितींत होते, पण अलीकडे मजुरी, लांकूड तोडण्याचा उद्योग आणि शेतकी करूं लागल्यापासून सुधारूं लागले आहेत. हे लोक मांस खातात व मनस्वी दारू पितात. या जातींत काडीमोड व विधवाविवाहाची चाल आहे. भिल्ल लोक, कोळी व इतर कांहीं जाती नायकड्यांच्या जातींत येऊं शकतात. कालिका, अंबा व महाकाली या देवतांचें पूजन हे लोक करतात व वाघालाहि फार मानतात. आपले सामाजिक वाद पंचायत सभा भरवून निकालास लावतात. राजपुताना व पंजाब यांमध्येंहि यांची वस्ती आहे. तिकडेहि हे लोक शेतकी व मजुरी करतात.

**नाइट**—एक ब्रिटिश साम्राज्यांतील पदवी. मध्ययुगांत नाइट म्हणजे शिलेदार होय. त्याचा संबंध शिव्हलरी म्हणजे युरोपीय शिलेदारी संस्था हिच्याशीं होता. पण आतां नाइट ही एक बहुमानाची पदवी झाली असून ती ब्रिटिश बादशहा आपल्या साम्राज्यांतील सर्व भागांतल्या प्रजाजनांपैकीं कांहीं थोर व्यक्तींना देतो. ही पदवी मिळालेली व्यक्ति 'सर' आणि त्याची पत्नी 'लेडी' हें उपपद लावते. नाइटहूड या ब्रिटिश पदवीचे ९ प्रकार आहेत ते--( १ ) दि गार्टर, ( २ ) दि थिसल, ( ३ ) सेंट् पॅट्रीक, ( ४ ) दि बाथ, ( ५ ) दि स्टार ऑफ इंडिआ, ( ६ ) सेंट मायकेल ॲन्ड सेंट जॉर्ज, ( ७ ) दि इंडियन एम्पायर, ( ८ ) दि रॉयल व्हिक्टोरिअन ऑर्डर, आणि ( ९ ) दि ब्रिटिश एम्पायर. जो नाइट या कोणत्याच प्रकारचा नसतो त्याला नाइट–बॅचलर असें म्हणतात.

कडून जप्त करण्यांत येतो. अशा नाकेबंदीचे नियम १९०९ सालीं 'डिक्लरेशन ऑफ लंडन' या जाहीरनाम्यानें ठरविण्यांत आले. १९१६ सालीं या जाहीरनाम्याऐवजीं 'मॅरीटाइम राइट्स ऑर्डर' या नांवाचा जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत ग्रेट ब्रिटनमध्यें मिनिस्टर ऑफ ब्लॉकेड या हुद्याचा स्वतंत्र मंत्री नेमण्यांत आला होता.

पहिल्या महायुद्धांत जर्मनीनें ब्रिटनच्या किनाऱ्याची नाकेबंदी जेव्हां जाहीर केली तेव्हां ब्रिटननेंहि जर्मनीच्या बाबतींत तेंच धोरण ठेवलें. तथापि त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं.

**नॉक्स, जॉन** (१५०५–१५७२)—हा एक स्कॉटिश धर्मसुधारक असून त्यानें १५४२ मध्यें प्रॉटेस्टंट पंथाचा स्वीकार केला. अॅन्ड्र्यूज किल्ल्यांत कोंडलेल्या प्रॉटेस्टंट लोकांपुढें धर्मावर प्रवचनें दिलीं त्यामुळें त्याला फ्रेंच लोकांनीं पकडून इतर कैद्यांबरोबर फ्रान्समध्यें पाठवून दिला आणि तेथें त्याला सक्तमजुरीच्या कैदेची शिक्षा दिली. पुढें १५४९ मध्यें त्याला कैदेंतून मुक्त करण्यांत आलें. तो लंडनला परत आल्यावर त्याला प्रथम प्रीचर (धर्मोपदेशक) आणि नंतर १५५१ मध्यें ६ व्या एडवर्डचा चॅपलेन नेमण्यांत आलें. १५५४ मध्यें राणी मेरी गादीवर आल्यावर नॉक्स इंग्लंड सोडून जिनीवा येथें गेला. तेथें त्यानें पुष्कळ विवादात्मक आणि इतरहि ग्रंथ लिहिले. १५५९ मध्यें तो स्कॉटलंडांत परत आला आणि तेथें 'कन्फेशन ऑफ फेथ' हे लिहून काढण्यांत इतर पुढाऱ्यांना मदत केली. १५६१ मध्यें राणी मेरी स्कॉटलंडमध्यें आली असतांना नॉक्सनें तिचा जाहीर प्रवचनांत निषेध केला. १५६७ मध्यें राणी मेरी पदच्युत होऊन ६ वा जेम्स राज्यावर आल्यावर त्याच्या राज्यारोहणप्रसंगीं त्याचें धर्मप्रवचन झालें. सेंट बार्थोलोम्यू येथें झालेल्या कत्तलीमुळें त्याला धक्का बसून तो लवकर मरण पावला. त्याचीं पत्रें व प्रवचनें पुष्कळ असून महत्त्वाचा ग्रंथ 'हिस्टरी ऑफ दि रेफर्मेशन ऑफ रिलिजन विदिन् दि रेल्म ऑफ स्कॉटलंड' (स्कॉटलंड राज्यांतील धर्मसुधारणेचा इतिहास) हा आहे.

**नॉक्सव्हिले**—हें अमेरिकन सं. संस्थानांतील टेनेसी संस्थानांत एक महत्त्वाचें व्यापारी आणि कारखानदारी शहर आहे. तेथें 'ईस्ट टेनेसी' व 'नॉक्सव्हिले' हीं विद्यापीठें, सरकारी शेतकी कॉलेज आणि अनेक शिक्षणसंस्था आणि वाङ्मयसंस्था आहेत. येथें विणकामाचे आणि यंत्रकामाचे कारखाने आहेत. लोकसंख्या १,११,५८० आहे.

**नाग**—ही एक विषारी सापाची जात हिंदुस्थान, दक्षिण आशिया व आफ्रिका यांमध्यें आढळते. याचा दंश इतका भयंकर विषारी असतो कीं, दंश झालेला प्राणी कांहीं तासांच्या आंत मरतो. यावर उपाय म्हणून असणारें औषध तावडतोब टोंचून शरीरांत घातल्यासच तो प्राणी जगण्याची आशा असते. हा लहानसान प्राणी, पांखरें, बेडूक, मासे, वगैरेंवर निर्वाह करतो.

यास फार उत्तम पोहतां येतें. याचा शत्रु मुंगूस हा होय. गारुडी लोक हा साप बाळगतात. याला गाणें आवडतें असें म्हणतात. हा रागावला किंवा आनंदला म्हणजे आपली फणा उभारून डोलूं लागतो. याच्या फण्यावर १० सारखा आंकडा दिसतो.

हिंदू व कित्येक असंस्कृत लोक नागास देव मानून पूजा करतात. नागांचीं देवळेंहि असतात. आपल्याकडे 'नागपंचमी'चा सण आहेच. हा श्रावण शुद्ध पंचमीला असतो.

**नाग**—हा शब्द विशिष्ट लोकजातिवाचक आहे. पुराणांत नागकन्यांचे उल्लेख पुष्कळ आहेत. यादवांचा मूळपुरुष यदु, रामाचा पुत्र कुश, पांडवांपैकीं अर्जुन यांचा नागकन्यांशीं विवाह झाला; व कित्येक ऋषीहि नागकन्यांशीं विवाहबद्ध झाले. खांडववनांत नाग लोक राहत असत. पण मूळ हे लोक डोंगरांतले असावेत. कारण 'नग' म्हणजे डोंगर या शब्दापासून 'नाग' बनलेला दिसतो, खांडववनांतून हांकलल्यामुळें त्यांचा राजा तक्षक हा पांडवांचा शत्रु बनून भारतीय युद्धांत पांडवांविरुद्ध कर्णास त्यानें मदत केली. अर्जुनाचा नातू परीक्षित राजा यालाहि तक्षकानें मारलें. त्याचा सूड घेण्याकरितां परीक्षितपुत्र जनमेजय यानें सर्पसत्र केलें, व त्यानें नाग (सर्प) जातीचा संहार सुरू केला; तेव्हां इंद्राचा आश्रय घेऊन तक्षक वांचला. भगवद्गीतेंत "अनंतश्चास्मि नागानां" आणि "सर्पाणामस्मि वासुकिः" या वचनांवरून 'नाग' व 'सर्प' हे एकवंशी पण भिन्न जातीचे असावेत, व त्यांच्यापैकीं 'सर्प' हे सविष म्हणजे आर्यांना त्रास देणारे, आणि 'नाग' हे निर्विष म्हणजे त्रास न देणारे, असे भेद असावे असें वाटतें. वासुकि, तक्षक, वगैरे सर्प जातींतले, आणि अनंत, शेष, वगैरे नागजातींतले प्रसिद्ध पुरुष दिसतात. हे लोक हिंदुस्थानांत जिकडे-तिकडे पसरलेले असावेत. नागांचा 'नागलोक' खालीं पाताळांत आहे असें समजण्याचा संस्कृत वाङ्मयांत संप्रदाय आहे; त्यावरून हे लोक मूळचे दक्षिणेकडचे असून नंतर ते वर हिमालयापर्यंत व काश्मीरापर्यंत पसरले असावेत. नागराजांचीं नाणीं हल्लीं उपलब्ध आहेत, त्यांपैकीं गणपति नागराजा समुद्रगुप्ताचा

समकालीन ( ५ वें शतक ) होता. नागराजांची राजधानी नरवर किंवा नलवाडा माळव्यात आहे. काश्मीरचा पहिला राजा नील नांवाचा नागवंशीय असून ८ व्या शतकांतील राजवंश कर्कोट हा नागवंशाचाच समजला जातो. ( कर्कोट पाहों ). पूर्व किनाऱ्यावरील नागापट्टण, मध्यप्रांतांतलें नागपूर, आणि अनेक ठिकाणचीं 'नाग' शब्द अंतर्भूत असणाऱ्या नांवांचीं गावें, यांवरून हे नागलोक सर्वत्र पसरलेले होते, असें दिसतें. सांप्रत महारांच्या नांवास 'नाक' किंवा 'नाख' शब्द लावला जातो, त्यावरून महार हे मूळचे नागवंशांतलेच असावेत असें कांहीं समाजशास्त्रज्ञ समजतात.

**नागकेशर**—या झाडाच्या काळें व तांबडें अशा दोन जाती आहेत. तांबड्या झाडास 'धुल नागकेशर' म्हणतात. हें तांबडें नागकेशर लवंगेएवढें असून गुणानें उष्ण असतें. पण काळें थंड असून त्याचा मसाल्यांत उपयोग करतात. स्त्रियांच्या रोगांवर नागकेशर चांगलें औषधी आहे.

**नागचांपा**—हें फुलझाड फार मोठें होतें. कोंकण व कर्नाटक यांतून हीं झाडें फार दिसतात. झाडाला ७–८ वर्षांनीं सुंदर, सुवासिक फुलें येऊं लागतात. फूल तळहाताएवढें असतें; व त्याचा आकार नागफणीसारखा असतो. नागदवण्यासारखी दुसरी एक याची जात आहे. मूळव्याधीवर याच्या फुलांची धुरी देतात व कठिण गांठी पिकण्यास मुळी उगाळून लावतात.

**नाग जात**—आसामच्या पूर्व टेंकड्यांतून या लोकांची वस्ती असून त्यांची लो. सं. सु. दोन लाख आहे. त्यांचा रंग तपकिरी व नाक बहुतेक चपटें असतें; बायका पुरुषांपेक्षां फार ठेंगण्या पण मोहक असतात. त्यांचा मुख्य धंदा शेती. डोंगरांत पाटबंधारे घालून लांबून पाणी आणून हे शेती करतात. शिवाय शिकार, विणकाम, वगैरे धंदे करतात. यांचें मुख्य खाणें तांदूळ असून ते मांजराखेरीज करून सर्व प्राणी खातात. या लोकांत पूर्वी गांवांगांवात युद्धें होत असत.

**नाग टेंकड्या**—हा आसामधील एक जिल्हा आहे. क्षेत्रफळ ४,२८९ चौरस मैल व लो. सं. १,८९,६४१ आहे. कोहिमा हें एकच शहर असून बाकीचीं २९२ खेडीं आहेत. हा जिल्हा पर्वतांनीं व्यापलेला असून सर्वांत उंच शिखर कोहिमा ( उंची १०,००० फूट ) आहे. सर्वांत मोठी नदी दोयांग ही होय. पाऊस सरासरी ७६ ते १०० इंच पडतो. येथील मुख्य धंदा शेती असून भात, मका, मिरची, कापूस हीं येथील मुख्य पिकें होत. जाडेंभरडें कापड येथील लोक विणतात. लोखंडी भाले व इतर युद्धशस्त्रें तयार होतात.

**नागदवणा वर्ग**—[ लॅ. वर्ग–अमरिलिडासी ]. एक गर्भपर्णे असलेल्या रोपांचा एक वर्ग. याचे कांदे असतात. याचें खोड उंच, वाटोळें व कोरफडीसारखें काष्ठमय असतें. याच्या फुलास फार सुंदर रंग असतो व त्यांत सहा तंतू असून तीन पेशींचा गर्भकोश असतो. हीं रोपें युरोप व इतर उष्ण प्रदेश यांतून आढळतात. या वर्गांत इंग्रजी स्नो ड्रॉप, स्नो फ्लेक, डाफोडिल व बेलाडोना लिली हीं झाडें मोडतात.

नागदवणा औषधी आहे. सर्व प्रकारच्या विषांवर याचें मूळ थंड पाण्यांत उगाळून देतात. नारू, गुडघी, वगैरेवर याची पाती तेल लावून शेकून वर बांधतात. मुलांच्या कफविकारावर पातीचा रस काढून मधाबरोबर देतात.

**नागपूर**—मध्य प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,८३६ चौ. मै. व लो. सं. १०,५९,९८९ असून यांत १२ शहरें व १,६८१ खेडीं आहेत. यांत सातपुड्याच्या अंबागढ टेंकड्या असून त्यांवर रामटेकचें देवालय आहे. वर्धा, वैनगंगा, कन्हान व पेंच या नद्या आहे. येथें आंबे फार चांगले होतात. येथें जंगल दाट असून त्यांत साग, अचार, तेंडू, सालई व मोह हीं झाडें मुख्यत्वें होतात. नागपूर येथें सर्वांत अधिक उष्णतामान ११६ पर्यंत वाढतें. पाऊस सरासरी ४६ इंच पडतो. येथील जमीन काळी असून ज्वारी, कापूस, गहूं, तीळ, जवस, हरभरा, हीं मुख्य पिकें, व संत्रीं, चिंच, एरंडी, मिरची, इतर फळें व भाजीपाला होतो. रामटेकचीं विड्याचीं पानें प्रसिद्ध आहेत. येथें कपूरी व बंगाली पानेंहि होतात. येथें मँगेनीझ अनेक ठिकाणीं सापडतें. नागपूर व उमरेड येथें रेशीमकांठी धोतरें व उपरणीं उत्तम होतात. शिवाय लुगडीं, पातळें व इतर हलकें कापड तयार होतें, पितळकाम, अडकित्ते व चाकू नागपूर येथें होतात. रामटेक हें फार प्राचीन स्थान आहे व तेथें अद्यापि पुराणावशेष सांपडतात.

या भागांत नागवंशीय राजघराणें इ. स. पहिल्या-दुसऱ्या शतकांत नांदत होतें. नंतर वाकाटक राजे आले. पुढें राष्ट्रकूट, चालुक्य, परमार व यादव यांची सत्ता यांवर होती. १६ व्या शतकाच्या अखेरीस गोंड राज्य झालें. शेवटीं मराठ्यांकडे हा प्रदेश आला.

नागपूर शहराची लो. सं. ( १९४१ ) ३,०१,९५५ आहे. प्रथमतः गोंड राजांच्या प्राचीन किल्याभोंवतीं हा गांव वसलेला होता. नंतर ही भोसल्यांची राजधानी झाली. येथील जुम्मा तलाव मोठा व चौकोनी असून तो भोसल्यांनीं बांधला. येथील पशुपक्षी–संग्रहालय पाहण्यासारखें आहे. नागपूरचीं संत्रीं सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहेत. १९२३ सालीं नागपूर विद्यापीठ स्थापन झालें. ही मध्यप्रांताची राजधानी असल्यानें शहराला फार महत्त्व आहे. कापडाच्या गिरण्या, आगपेट्या, चरण्या, कांच, साबण, इ. मालांचे कारखाने आहेत.

हें जी. आय्. पी. आर्. व बी. एन्. आर्. या आगगाड्यांचें जोड स्टेशन (जंक्शन) असून येथून प्रांतांत लहान आगगाडीचे फांटे जातात. गांवांत व भोंवतीं पुष्कळ तळीं आहेत. त्यामुळें पाणी मुबलक आहे. गांवांत तीनचार मोठ्या बागा आहेत. दोनतीन ग्रंथालयेंहि जुनीं व चांगलीं चाललेलीं असून, येथें एक मोठा टाउन हॉल (नगर-भवन) हि आहे. पांच कॉलेजें, बरींच हायस्कुलें व प्राथमिक शाळा शिक्षण देण्याचें कार्य करीत आहेत. 'महाराष्ट्र' हें मराठी वर्तमानपत्र फार प्रसिद्ध व लोकप्रिय आहे व याखेरीज बरींच नियतकालिकें येथें निघतात. बाबा ताजुद्दिन अवलिया या मुसलमानी साधूचा मोठा उत्सव मोहरम महिन्यात होतो. त्याला हिंदुस्थानांतील अनेक ठिकाणांहून यात्रेकरू येतात.

सीताबर्डीवर आप्पासाहेब भोंसले आणि इंग्रज यांची शेवटची लढाई होऊन भोंसल्यांचें राज्य गेलें.

**नागपूरकर भोंसले**—हे आपल्यास उदेपूरकर राण्याचें वंशज म्हणवितात. मुसलमानींत हे खालीं दख्खनमध्यें आले. हे प्रथम निजामशाहींत नोकर होते व त्याना उमरावती व भाम हीं गांवें इनाम होतीं. यांचा मूळ पुरुष मुधोजी व त्याचा भाऊ रूपाजी यांनीं पुणें जिल्ह्यांतील मौजे हिंगणी ऊर्फ पाटस येथील पाटिलकी खरेदी केली. हे दोघे थोरल्या शिवछत्रपतीच्या हाताखालीं फौजेंत नोकर होते. मुधोजीस ७ पुत्र होते. रूपाजीस संतति नव्हती. या सात भावांपैकीं परसोजी व साबाजी हे बापाच्या म्हातारपणीं सरकारचाकरी करीत.

शाहू दक्षिणेंत येत असतां खानदेशांत परसोजी व त्याचा वडील भाऊ बापूजी हे १५ हजार फौजेसह त्याला येऊन मिळाले. शाहू तोतया नाहीं हें इतरांस कळविण्यासाठीं बापूजी हा त्याच्या पंक्तीस जेवला. शाहू गादीवर बसल्यावर त्यानें सेनासाहेबसुभा हें पद परसोजीकडे कायम केलें व वऱ्हाड-गोंडवन या प्रांतांत सहा सरकार (जिल्हे) खर्चास लावून दिले. नंतर परसोजी साताऱ्याहून वऱ्हाडकडे जात असता गोदावरी उतरून पलीकडे गेल्यावर मरण पावला (१७०९). परसोजीचें राहण्याचें ठिकाण भाम होतें.

पहिला रघूजी—परसोजीचा वडील भाऊ बापूजी याचा पुत्र बिंबाजी व त्याचा हा रघूजी. कर्नाटकाच्या स्वारींत रघूजीनें जाऊन उत्तम कामगिरी बजाविली. एकदां शाहू हा शिकारीस गेला असतां, नेम चुकल्यानें वाघानें त्याच्यावर चाल केली, तेव्हां रघूजीनें मध्यें घुसून वाघास ठार केलें. रघूजीची स्त्री सुकाबाई व शाहूची धाकटी राणी सगुणाबाई या चुलत बहिणी होत्या. अशा अनेक कारणांनीं शाहूची मर्जी रघूजीवर बसली व त्यास सेनासाहेबसुभा हें पद मिळालें. भंडाऱ्याच्या समर्थसंप्रदायी देवदासाचा रघूजीनें उपदेश घेतला होता.

शाहूनें बंगाल, बिहार व ओरिसा इकडील अमल (चौथाई-सरदेशमुखीचा) रघूजीस दिला (१७३८). तेव्हांपासून रघूजीनें नागपूर येथें आपलें ठाणें नेलें. नानासाहेबाला पेशवाई न देतां बाबूजी नायकास द्यावी असा आग्रह रघूजीनें धरला होता; पण शाहूनें तें ऐकिलें नाहीं (१७४०). नाईक पेशवा झाला कीं पुढें आपल्याला उत्तरेंत कारभार करण्यास कुलमुखत्यारी मिळेल व शाहूच्या मांडीवर आपला मुलगा देतां येईल असा बेत रघूजीचा होता पण तो फसला. रघूजीनें मिळविलेली सरकारी रसद तो साताऱ्यास पाठवीत नसे; त्यामुळें शाहूनें त्याला ऐवज लवकर न पाठविल्यास शासन केलें जाईल असा हुकूम पाठविला होता (१७३५). शाहूसहि तो जुमानीत नसे. मराठा मंडळांत फूट पाडणाऱ्या मंडळींपैकीं रघूजी हा एक प्रमुख होता. त्याला शाहूच्या राणीचेंहि पाठबळ होतें. त्यामुळें शाहूच्या हयातींत पेशव्यांना रघूजीचा बंदोबस्त करतां आला नाहीं. रघूजी दारू फार पीत असे. त्यानें स. १७४० त डयुमासकडून विलायती दारू घेऊन लढाई बिघडविली होती. पेशव्याना स्वाऱ्यांमुळें कर्ज होई; तर रघूजी स्वाऱ्यांतील लुटीनें गबर झाला होता. पण मिळालेला पैसा मात्र सरकारात तो भरीत नसे.

रघूजीनें बंगाल, बिहार व ओरिसा प्रांतांवर भास्करराम व तुळजोराम या ब्राह्मण वीरांच्या साहाय्यानें अनेक स्वाऱ्या केल्या व पुष्कळ किल्ले व प्रांत काबीज करून मोंगल व इंग्रज यांवर वचक बसविला. पेशव्यांच्या अखत्यारीखालीं वागावयास रघूजी कबूल नसे. पेशव्यांनीं उत्तरेकडे स्वाऱ्या केल्या असता रघूजी त्यांना अडथळा करीत असे. त्यामुळें पेशव्यांस कडकपणा धरणें भाग पडलें. भोपाळच्या लढाईंत त्याला पेशव्यांस मदत करण्यास शाहूनें सांगितले असतांहि तो गेला नव्हता. शेवटीं शाहूनें दोघांचा समेट केला. शाहू मृत्युशय्येवर असतां सकवारबाईनें व मुतालिकानें जें कारस्थान पेशव्यांच्या विरुद्ध उभें केलें त्यांत रघूजी होता; परंतु त्याला फौजेसह येण्यास उशीर झाल्यानें कारस्थान फिकें पडलें. पुढें राजारामानें सांगोल्यास पेशव्यांशीं रघूजीचा समेट करून दिला (१७५०). निजाम पुण्यावर आला असतां रघूजीनें मोंगलाईंत स्वारी केली होती (१७५१). यापुढें थोड्याच दिवसांत पोटदुखीनें रघूजी मरण पावला (१७५५ फेब्रु.). त्या वेळीं त्याच्या तेरा बायकांनीं सहगमन केलें. मरतांना रघूजीनें जानोजीस सेनासाहेबसुभ्याचें पद देऊन सर्व मुलांस राज्यांत कांहीं वांटणी करून दिली. जानोजी, साबाजी, बिंबाजी व मुधोजी असे रघूजीचे चार पुत्र होते.

जानोजी—पहिल्या रघूजीचा धाकटा पुत्र. नानासाहेब

पेशव्याचा ओढा जानोजीकडे होता. जानोजीनें सावनूर येथें लढाईंत पराक्रम केला होता. पुण्यास आल्यावर पेशव्यानें या भावांच्या (४५ लक्षांच्या दौलतीच्या) वांटण्या करून दिल्या. जानोजी हा सेनासाहेबसुभा झाला, मुधोजी सेनाधुरंधर झाला व त्यानें जानोजीच्या दौलतीचा कारभार करावा असें ठरलें. पानपत झाल्यावर नानासाहेब पेशवा उत्तरेकडे निघाला, तेव्हां जानोजी त्याला जाऊन मिळाला होता. जानोजीस मूल नसल्यानें त्यानें मुधोजीचा धाकटा पुत्र रघूजी यास दत्तक घेतलें. दत्तकमंजुरीस पुण्यास जाऊन परत येतांना बालेघाट प्रांतीं पोटशुळाच्या व्यथेनें जानोजीबावा वारला (१७७१ एप्रिल). त्याच्याबरोबर त्याच्या नाटकशाळाहि सती गेल्या. जानोजी भोसले पाहा.

रघूजी दुसरा—दर्याबाईनें प्रथम या दत्तक मुलास गादी न देता त्याला मुधोजीच्या हवालीं करून व मुधोजीला चांद्याकडे काढून देऊन आपण स्वतः राज्यकारभार हातीं घेतला. या कामीं साबाजीहि तिला मिळाला. पेशव्याकडून साबाजीच्या नांवें सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें तिनें आणविलीं. तेव्हां मुधोजीनें रघूजीला घेऊन साबाजीवर कुंभारी गांवीं चढाई केली (१७७३). शेवटीं समेट होऊन रघूजीस गादी प्राप्त झाली व साबाजी आणि मुधोजी कारभारी झाले. रघूजीच्या लहानपणांत त्याचा बाप मुधोजी व चुलता साबाजी हेच राज्यकारभार पाहत. त्यामुळें स. १७८८ पर्यंत त्याचें कांहींच वजन पडलें नाहीं. रघूजी हा मध्यंतरीं नाना फडणिसाच्या विरुद्ध हैद्राबादचा मशीरुन्मुल्क याच्या नादीं लागला होता. परंतु पुढें खर्ड्याच्या लढाईंत पेशव्यांच्या बाजूनें प्रत्यक्ष हजर राहून नानाची मर्जी त्यानें संपादिली. वसईच्या तहामुळें इंग्रजांच्या विरुद्ध जें मराठा मंडळ उठलें त्यांत रघूजीहि होता. असईच्या लढाईंत तो प्रत्यक्ष लढत होता (१८०३). परंतु तेथें मराठ्यांचा मोड झाला. नंतर अडगाव व गाविलगड येथें लढाया होऊन तेथेंहि भोंसल्यांचा पराभव झाला. यानंतर देवगड येथें तह होऊन ओरिसा, बागलाण, वऱ्हाड, वगैरे प्रांत इंग्रजांस मिळाले व भोंसल्यानें सर्व राजकारण इंग्रजांमार्फत करावें असें ठरलें. याप्रमाणें भोसल्यांचें स्वातंत्र्य नष्ट झालें (१८०३ डिसेंबर १७). पुढें पेंढाऱ्यांच्या बंदोबस्तास आम्ही येतों म्हणून इंग्रजांनीं आपण होऊन कळविलें. तेव्हां रघूजीस शंका आली; परंतु त्याचे कारभारी व जवळचे लोक यांनीं त्याची समजूत घातली. पुढें कॅप्टन क्लोज याच्या मदतीनें पेंढाऱ्यांचा दंगा मोडला. पुढें थोड्याच दिवसात रघूजी वारला (१८१६).

परसोजी—हा थोडासा भ्रमिष्ट व दुर्गुणी होता; त्यामुळें रघूजीचा लेकावळा धर्माजी व व्यंकोजीचा मुलगा मुधोजी या दोघांमध्यें कारभारीपणाबद्दल तंटा लागला. रघूजीची राणी बांकाबाई हिचा ओढा धर्माजीकडे होता. मुधोजीकडे सर्व सरदारमंडळ होतें. त्यामुळें अखेर मुधोजीच कारभारी झाला. परसोजी नांवाचाच राजा होता. कांहीं दिवसांनीं मुधोजी चंद्रपुराकडे गेला असतां इकडे एकाएकीं परसोजी वारला (१८११) व त्याची बायको काशीबाई सती गेली.

मुधोजी दुसरा—परसोजीच्या पश्चात् यानें सर्व कारभार हातांत घेतला. या वेळीं बाजीरावानें इंग्रजांविरुद्ध शेवटचा प्रयत्न आरंभला. त्यांत मुधोजी आप्पासाहेबाची मदत मागितली व ती त्यानें कबूल केली. त्यामुळें पेशव्यानें त्याला सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें पाठविलीं. आप्पासाहेबानें थोडीशी फौज जमविली. फौजेनें सीताबर्डी व नागपूर शहर यांदरम्यान नाकेबंदी करून रेसिडेन्सीवर तोफा चालू केल्या. परंतु फितुरीमुळें लढाई नासली. इंग्रजांनीं आप्पासाहेबास पदच्युत करून काशीकडे पाठविलें. तेव्हां तो वाटेंतच निसटून गेला (१८१७). आप्पासाहेबास जोधपूरच्या महाराज मानसिंगानें आपल्या राज्यांत आश्रय दिला. तिकडेच कांहीं दिवसांनीं तो मरण पावला.

तिसरा रघूजी—आप्पासाहेब गेल्यावर परसोजीच्या दुर्गाबाई नांवाच्या राणीच्या मांडीवर बाजीराव नांवाचा दत्तक मुलगा देऊन त्याचें नांव रघूजी ठेविलें. हा निपुत्रिक वारला (११ डिसें. १८५३) त्या वेळीं डलहौसीनें नागपूरचें राज्य खालसा केलें.
(या नागपूरच्या भोंसल्यांपैकीं कांहींचीं चरित्रें पुन्हां स्वतंत्र दिलीं आहेत.)

**नागफणी**—एक लहान झाड. याच्या अंगावर सापाच्या अंगावर असतात तसे खवले असतात व शेंड्याचा आकार नागाच्या फणीसारखा असतो. संस्कृतांत याला सर्पिणी असेंच नांव आहे. सापाच्या विषावर याच्या पानांचा रस देतात व मूळहि उगाळून देतात. स्त्रियांच्या स्तनांत दूध वाढविण्यासाठींहि देतात.

**नागभट** (राज्य. ७२५–४०)—कनोजच्या प्रतिहार राजघराण्याचा मूळपुरुष. यानें सिंधमधून पूर्वेकडे घुसणाऱ्या अरबांचा पुष्कळदां पराभव केला. याची राजधानी मंडोर (जोधपुराजवळील) होय. याच्या पुतण्याचा नातू दुसरा नागभट किंवा नागदेव हा फार प्रख्यात झाला. त्यानें कनोजचें साम्राज्य हर्षवंशाकडून घेऊन स्वतः सम्राट् बनला. या नागभटाबद्दल भोजलेखांत व 'बुचकला' शिलालेखांत उल्लेख आलेले आहेत. याचा काल इ. स. ८००–८२५ आहे. याचा पराभव राष्ट्रकूटांनीं केला, परंतु कनोज घेतलें नाहीं.

**नागभस्म**—एक आयुर्वेदीय औषध. नागभस्म सेवन केल्यानें शंभर नागांइतकें बल प्राप्त होतें, असें वैद्यकशास्त्रवचन आहे. हें भस्म अतिशय शक्तिदायक आहे. रोगी अतिशय शक्ति-

हीन झालेला असणें, त्याला गंडमाळा, किंवा अपचि, मधुमेह, कोष्ठशूल असणें, हाड्यात्रण असणें, इत्यादि दीर्घकालीन विकारांवर हें औषध चांगलें आहे. ।।· ते १ गुंज दूध, मध, किंवा आल्याचा रस यांतून घेतात.

**नागमणि**—मोठमोठ्या नागाच्या डोक्यांत माणि असतो अशी हिंदुस्थानांत सर्वत्र समजूत आहे; पण हा मणि अर्वाचीन संशोधकांना सांपडला नाहीं; म्हणून मणि असतो ही केवळ कल्पना आहे, असें संशोधकांचें मत झालें आहे. बेडकाच्या डोक्यांत अशा प्रकारचा मणि असतो, अशी इंग्लंडांत व आपल्याकडेहि कल्पना आहे. ग्रीक ग्रंथकार आपोलोनियस टिआनियस यानें हिंदूंची नागमाणि काढण्याची पद्धत येणेंप्रमाणें वर्णिली आहे— सर्पगुहेपुढें रेशमी जाळें पसरतात; त्यावर जादूचीं सोनेरी अक्षरें वसवलेलीं असतात. त्यांच्या योगानें व मंजुळ संगीताच्या योगानें नागास निद्रा येते, आणि मग नागास मारून त्याच्या डोक्यांतील मणि काढून घेतात.

**नांगर**—१. बंदरामध्यें गलबत एका जागीं स्थिर करण्या-

[ अ–दांडा.
ब–आडवा खुंटा.
क क–भुजा.
ड–जमिनींत शिरणारा भुजाचा एक फाळ. ]

करितां एक लोखंडाचा मोठा आंकडा वापरण्यांत येतो, त्यास नांगर असें म्हणतात. पूर्वी अशा आंकड्याच्याऐवजीं मोठा दगड, वाळूचें पोतें किंवा शिसें भरलेला लांकडाचा ठोकळा वापरीत असत. चिनी लोक अजूनहि लांकडी नांगराचा उपयोग करतात. लोखंडी नांगर प्रथम ग्रीक लोकांनीं वापरण्यास सुरुवात केली. पूर्वीं नांगराचा दांडा लांकडाचा करीत असत. परंतु अलीकडे सर्व भाग चांगल्या घडीव लोखंडाचा करितात.

२. औते पाहा.

**नागरमोथा वर्ग**—[ सायपरासी ]. हा एक एकदल वनस्पतींचा वर्ग आहे. यामध्यें सुमारें २,००० ज्ञात जातींचा अंतर्भाव होतो. ही वनस्पति गवतासारखी किंवा लव्हाळ्यासारखी असते. हिची वाढ बहुधा दमट जागेवर, तळ्याच्या किंवा ओढ्याच्या कांठीं होते. नागरमोथा सुवासिक व औषधी आहे.

**नागरिकत्व**— 'डोमिसाइल' किंवा 'सिटिझनशिप'. कायद्यामध्यें 'डोमिसाइल' याचा अर्थ माणसाचें घर किंवा कायमचें राहण्याचें ठिकाण, गांव किंवा शहर असा असून शहरांत राहणाराकरितां 'नागरिक व नागरिकत्व' (सिटिझन व सिटिझनशिप) हे शब्द योजतात. कायमचें नागरिकत्व हें जन्मस्थानावरून किंवा स्वतःच्या निवडीनें किंवा कायद्याच्या नियमानुसार ठरतें. या नागरिकत्वाच्या हक्कामुळें अनेक आनुषंगिक महत्त्वाचे हक्क प्राप्त होतात, ते—(१) तद्देशीय कायद्याचें संरक्षण व हक्क; (२) लोकनियुक्त संस्थांमध्यें मतदानाचा व सभासदत्वाचा हक्क; (३) कायद्याप्रमाणें विवाहित स्त्रीला तिच्या नवऱ्याचें नागरिकत्व प्राप्त होतें. पाश्चात्त्य देशांत नागरिकत्व प्राप्त होण्यास ठराविक काल वास्तव्य असावें लागतें. ही वास्तव्याची मुदत इंग्लंड, बेल्जम, व रशिया येथें पांच वर्षें; फ्रान्स, ग्रीस व स्वीडन येथें तीन वर्षें; यु. स्टेट्समध्यें चांगल्या वर्तणुकीनें पांच वर्षें आणि ज्या संस्थानचें नागरिकत्व पाहिजे असेल तेथें एक वर्ष, याप्रमाणें अटी आहेत. जर्मनी, ऑस्ट्रिया व इटली या देशांत वस्तीच्या मुदतीची अट मुळींच नाहीं. आतां दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेंत परकीयांना नागरिकत्वाचे हक्क देण्याच्या बाबतींत उदार धोरण ठेवण्यांत आलेलें आहे.

परकी इसमाला नागरिक करून घेणें, त्याला 'नॅचरलायझेशन' म्हणतात. इंग्लंडांत होम सेक्रेटरी नागरिकत्वप्राप्तीचा दाखला परकी इसमाला देतो, पण तत्पूर्वी त्या परकी इसमाला शर्ती पुऱ्या कराव्या लागतात त्या—(१) या परकी इसमाचें वास्तव्य ब्रिटिश साम्राज्यांत किमान पांच वर्षें असून शेवटचें वर्ष युनायटेड किंगडमध्यें वास्तव्य पाहिजे, (२) तो सद्वर्तनी पाहिजे व त्याला इंग्रजी भाषेचें पुरेसें ज्ञान पाहिजे, आणि (३) ब्रिटिश साम्राज्यांत कायम राहण्याचा किंवा सरकारी नोकरींत पुढें कायम राहण्याचा त्याचा उद्देश असला पाहिजे. या तीन शर्ती पुऱ्या केल्यावर दाखला मिळतो. शिवाय राजनिष्ठेची शपथ (ओथ ऑफ ॲलीजियन्स) त्यानें घेतल्यावर दाखला लागू होतो.

स्वतंत्र हिंदुस्थानाला आतां परकीयांना नागरिकत्व देण्याबद्दलचे असेच नवे कायदे करावे लागतील.

**नागली, नाचणी**— एक जंगली धान्य. रागी असेंहि नांव आहे. हिला अगदीं सरळ व वरींच कणसें येतात. हें पीक डोंगराळ प्रदेशांत उतारावर होतें. डोंगरी व पहाडी जातींचें हें मुख्य खाद्य आहे. संस्कृतांत याला राजिक व रागी हीं नांवें असून हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रदेशांत अनेक निरनिराळीं नांवें आहेत. कोंकणांत हिला नाचणी म्हणतात. हें पीक पावसाळ्यांत उथळ, खडकाळ व रेताड जमिनीवरहि येतें. जून–जुलै महिन्यांत पेरणी–लावणी होऊन ऑक्टोबर–नोव्हेंबरांत पीक तयार होतें. हें धान्य कीड लागल्याशिवाय अगर बुरसा आल्याशिवाय वरींच वर्षें राहूं शकतें. नागली दळून त्याच्या भाकरी व आंबील करतात. या धान्यापासून दारू करतात. तिला बोजा अगर बोजली म्हणतात. नागलीचें पीक दर एकरीं ५ ते १० मण

येतें. नागली थंड, रक्तपित्तनाशक व बलकारक आहे. हिचें सत्त्व लहान मुलांस शक्तीसाठीं देतात.

**नागवर्मा**— १. ( १० वें शतक–उत्तरार्ध ) वेंगी देशांत राहणारा एक कानडी जैन ग्रंथकार. त्याचे ग्रंथ 'छंदोम्बुधि' (यांत संस्कृत व कानडी वृत्तांची माहिती आहे) व 'कादंबरी' ( बाणाच्या ग्रंथाचें भाषांतर ) हे होत.

२. (११ वें शतक-पूर्वार्ध)—एक कानडी कवि. आदिपंथाचा हा शिष्य होता. 'चंद्र चूडामणि शतक' हा याचा ग्रंथ आहे.

३. ( १२ वें शतक–पूर्वार्ध )—हाहि एक कानडी ग्रंथकार आहे. यांचे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत : १. काव्यावलोकन — साहित्यशास्त्रावरील ग्रंथ. यांत पांच भाग आहेत ते : ( अ ) रीतिकर्म, ( आ ) रसनिरूपण, ( इ ) शब्दस्मृति, ( ई ) काव्यमालावृत्ति, व ( उ ) गुणविवेक. २. वस्तुकोश—हा शब्दकोश वररुचि, हलायुध, भागुरी व अमरकोश यांच्या साहाय्यानें रचला आहे. या ग्रंथांत कांहीं शब्दार्थ कानडींत दिले आहेत. यानें जिनेंद्र पुराण लिहिलें असावें.

**नागवेल**—विड्याच्या पानांचा वेल. यास ताम्बुली, ताम्बूल, नागवल्ली, पानवेल, वगैरे नांवें आहेत. पोर्तुगीज भाषेंत बेटर किंवा बेटल म्हणतात. या वेलींना सारखें उष्णतामान, हवेंतील आर्द्रता व नीट संगोपन यांची विशेष गरज लागते. मोठ्या झाडावर किंवा गवताचीं अथवा लव्हाळ्याचीं छपरें बांधून छायेखालीं या वेलीची वाढ करतात. या पानांच्या तीन जाती आहेत. चांगल्या वाढलेल्या वेलीपासून दर पंधरवड्यास सुमारें २०० पानें निघतात. दरसाल एक एकर जमिनींतून ८० लाख पानें निघतात. मुंबई, मद्रास, मध्यप्रांत, संयुक्त प्रांत, बंगाल, इतक्या प्रांतांत पानवेलींची लागवड होते. हिंदू व मुसलमान लोकांत या पानांचा विडा, चुना, सुपारी, कात, वगैरे घालून खाण्याची वहिवाट हिंदुस्थानांत व इंडो–चायनांत सर्वत्र फार जुनी आहे. संस्कृत वाङ्मयांत तांबूलाचा उल्लेख येतो. तांबूल रुचिकर व वीर्यवृद्धिकर आहे. इतर देशांत विडा खाण्याची पद्धत नसल्यामुळें या पानांचा व्यापार परदेशांशीं बिलकुल होत नाहीं.

रामटेकचीं पानें फार चांगलीं असून पुष्कळ दिवस टिकतात. नागवेल औषधीहि आहे. सर्पदंशावर मूळ विड्यांत घालून देतात म्हणजे उलटी होऊन विष उतरतें. काळ्या पानांचा रेचक देण्यास उपयोग होतो.

**नागाम संस्थान**—मुंबई. हे रेवाकांठामधील अगदीं लहान संस्थान आहे. क्षे. फ. फक्त ३ चौ. मैल. यांत चारच गांवें असून तीं चौघा भागीदारांकडे आहेत ; त्यामुळें हे संस्थानिक म्हणजे केवळ शेतकरी दिसतात. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**नागार्जुन**—हा बौद्ध ग्रंथकार, बौद्धधर्मप्रसारक, शिवाय भारतीय रसायनशास्त्रांतील एक मोठा संशोधक आहे. हा जातीचा मूळ ब्राह्मण कृष्णा नदीकांठीं शैल्य पर्वताजवळ जन्मला. याचा पहिला गुरु राहुलभद्र नांवाचा सनातनधर्मी ब्राह्मण असल्यामुळें याची गीतेवर श्रद्धा होती. त्यामुळें पुढें त्यानें प्रसृत केलेल्या बौद्ध धर्मांतील महायानपंथांत भक्तियोग आढळतो. नागार्जुन फार विद्वान् असून त्यानें पुष्कळ प्रवास केला. त्यानें चारहि वेदांचें व सर्व शास्त्रांचें अध्ययन केलें होतें ; शिवाय तो मोठा मांत्रिक होता. मंत्र–तंत्र–रसविद्या व 'पादुकासाधन' यांत प्रवीण होता. रसविद्येकरितांच तो सनातन धर्म सोडून जैन झाला. मंत्रविद्येच्या सामर्थ्यानें तो स्वतः अदृश्य होऊं शकत असे. एकदां त्यानें आपल्या तीन मित्रांसह मंत्रविद्येच्या साहाय्यानें राजाच्या राजवाड्यांत प्रवेश केला व तेथील स्त्रियांवर बलात्कार करण्यास सुरुवात केली. इतक्यांत त्याचें तें कृत्य उघडकीस आलें आणि त्याच्या तीन मित्रांना ठार मारून नागार्जुनाला मात्र भिक्षु होण्याच्या अटीवर सोडून देण्यांत आलें. त्याप्रमाणें तो बौद्धधर्मी बनला, व तिन्ही पिटकांचा अभ्यास नव्वद दिवसांत केला. नंतर इतर सूत्रग्रंथांचा तपास करीत तो हिमालयांत गेला व तेथें एका अति वृद्ध भिक्षूनें त्याला महायानसूत्र दिलें. नंतर त्यानें महायान पंथाचा प्रसार दक्षिणेंत केला व प्रज्ञापारमिता, माध्यमिकसूत्रें, 'अकुतोभया' नांवाची टीका, 'बुद्धाचा श्रेष्ठ मार्ग', 'भूतदयेची मीमांसा', इत्यादि ग्रंथ लिहिले.

नागार्जुन नांवाचें आणखी कांहीं पुरुष होऊन गेले ; त्यामुळें कोणाचें कर्तृत्व कोणतें याची निश्चिति नाहीं. महायान पंथांतील माध्यमिक तत्त्वज्ञानाचा संस्थापक वरील नागार्जुन हा कधीं होऊन गेला हें नक्की नाहीं. खि. पू. ३३ ते इ. स. ३०० पर्यंत याच्या काळाची ओढाताण चालते. सुश्रुतसंहितेचा प्रतिसंस्कर्ता नागार्जुन नांवाचाच आहे. चौऱ्यायशीं सिद्धांपैकीं सोळावा नागार्जुन आहे. हा कांचीकडचा रहिवासी होता.

नागार्जुन नांवाच्या एकानें कानडींत प्राचीन छंदःशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला आहे असें नृपतुंग कवि (नववें शतक) सांगतो.

**नागासाकी**—जपान, किऊशिऊ बेटांतलें शहर. लो. सं. २,११,७०२ आहे. दक्षिणेकडून येणाऱ्या गलबतांचें हें पहिलें बंदर असून येथें तीन गोद्या आहेत. त्यांत ६,००० टनांपेक्षां मोठीं जहाजें बांधण्यांत येतात. त्याच्याजवळ डंझेन येथें गंधकमिश्रित झरे आहेत. पूर्वी हें लहानसें खेडें होतें ; पण १६ व्या शतकानंतर खिस्ती धर्माचें केंद्र होऊन डच व चिनी व्यापाऱ्यांमुळें याची भरभराट झाली. मौंजु बंदर उघडल्यापासून व रशि-

यानें पोर्ट आर्थर आणि जर्मनीनें कियाचौ घेतल्यापासून या बंदराचें महत्त्व बरेंच कमी झालें.

**नागेली, कार्ल विल्हेम** (१८१७–१८९१)—हा स्विस वनस्पतिशास्त्रज्ञ जिनीवा येथें वनस्पतिशास्त्राचा अभ्यास करून झुरिच येथें पदवीधर झाला. आणि प्रथम झुरिच येथें, नंतर १८५२ साली फ्रीबुर्ग-इन-ब्रीसगौ येथें आणि १८५७ पासून अखेरपर्यंत म्यूनिक येथें वनस्पतिशास्त्राचा प्राध्यापक म्हणून नोकरी केली. सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें वनस्पतिशास्त्रांत अनेक नवे शोध लावून त्यानें अनेक निबंध लिहिले; ते स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले आहेत.

**नागेशभट्ट व्यंकटेशभट्ट** (१७४१–१७८२)—धर्मशास्त्र व ज्योतिषशास्त्र या विषयांचा एक ग्रंथकार. हा सारस्वत ब्राह्मण विद्वान् असून यानें धर्मशास्त्रविषयक 'स्मृत्यर्थमुक्तावलि', 'तांत्रिकमुक्तावलि', 'आगमग्रंथ' हे ग्रंथ व गणितविषयक 'आर्यातंत्र', 'आर्याकौतुक', व 'महाबलसिद्धान्त' हे ग्रंथ लिहिले. याच्या घराण्यांत मारुतीची उपासना चालत असून यानें स्वतः त्यांत व्यंकटेशाच्या उपासनेची भर घातली.

**नागेश भिंगारकर**—एक मराठी कवि. हा वामनपंडिताचा समकालीन (१६६५) व त्याच्याप्रमाणेंच श्लोकबद्ध रचना करणारा नगर जिल्ह्यांतील भिंगार गांवचा वृत्त्यंशीं जोशी होता. याचें आडनांव मुळे. तो पढीक विद्वान् नव्हता. त्याची कविता साधी, यमकपरिपूर्ण व मधुर आहे. त्यानें चंद्रावळी, सीतास्वयंवर, रसमंजरी, शारदाविनोद, वगैरे काव्यें केलीं आहेत.

**नागोजीभट्ट**—हा महाराष्ट्रीय ब्राह्मण काशीक्षेत्रीं राहत असे. लहानपणीं वेदाध्ययन करून मग तो याज्ञिकी शिकला, व त्यावर निर्वाह चालेना म्हणून बाईस त्यानें काव्याचें अध्ययन केलें. नंतर तो काशीस गेला, व तिकडे प्रख्यात कवि बनून श्रृंगवेरपुर येथील रामराजाच्या आश्रयास राहिला. तेथें त्यानें व्याकरण व इतर शास्त्रें यांवर पुढील कांहीं मोठाले ग्रंथ लिहिले: (१) भाष्यप्रदीपोद्योत; (२) लघुशब्देंदुशेखर; (३) बृहच्छब्देंदुशेखर; (४) प्रायश्चित्तेंदुशेखर; (५) परिभाषेंदुशेखर; (६) लघुमंजूषा; (७) बृहन्मंजूषा; (८) लघुशब्दरत्न; (९) बृहच्छब्दरत्न; (१०) अशौचनिर्णय.

**नागोजी माने**—एक मराठा सरदार. हा सातारा जिल्ह्यांतील म्हसवडकर माने यांचा मूळ पुरुष. त्याचा बाप रताजी हा विजापूरकरांचा नामांकित सरदार होता. दिलेरखान व जयसिंग यांच्या विजापुरावरील स्वारीच्या वेळीं रताजीनें चांगला प्रतिकार केला (१६६५). पुढें नागोजीस सरदारी मिळाली, पण बेबनाव झाल्यामुळें तो औरंगजेबास मिळाला, व त्यानें मराठ्यांविरुद्ध कारस्थानें केलीं. पण राजारामानें त्याची समजूत घालून त्याला आपल्याकडे घेतलें. संताजी घोरपडे यानें नागोजीच्या सासऱ्याच्या गैरवर्तनाबद्दल त्याला ठार मारलें; त्याचा सूड म्हणून नागोजीनें संताजीचा दग्यानें खून करून त्याचें डोकें औरंगजेबाकडे पाठविलें. त्यानंतरहि नागोजी राजारामास मिळाला.

**नागोद संस्थान**— मध्य हिंदुस्थानांतील एक संस्थान. क्षे. फ. ५३२ चौ. मैल व लोकसंख्या ८७,९११ आहे. हा प्रदेश बहुतेक वालुकामय आहे. येथें चुन्याच्या दगडाच्या टेकड्या असून येथून चुन्याचा दगड दूरवर जातो. यांत सतना नदी व तिला मिळणाऱ्या लहान नद्या वाहतात. येथें भात, हरभरे, ज्वारी, कोंदो, सामन व काकुन हीं पिकें होतात. नागोद हें संस्थानचें राजधानीचें शहर आहे. या संस्थानिकाच्या पूर्वजांनीं येथें 'नागवध' (नाग लोकांचा वध) केला, त्यावरून या शहराला हें नांव पडलें असावें. यांत ३२६ खेडीं असून वार्षिक उत्पन्न तीन लाख रु. आहे. हे संस्थानिक परिहार जातीचे, अग्निकुलांपैकीं आहेत. या संस्थानांत जुने अवशेष, बौद्ध स्तूप, गुप्तकालीन शिल्पपद्धतीचें देवालय, खोह नांवाची तेली राजाची जुनी राजधानी, जुने लेख, वगैरे अनेक आहेत. हें संस्थान आतां विंध्यप्रदेश संघांत सामील झालें आहे. सध्यां महेंद्रसिंग गादीवर आहेत.

**नागोया**—हें जपानमधील होन्शू बेटांत टोकिओ आणि ओसाका यांच्या दरम्यान सुमारें मध्यावर पांचव्या क्रमांकाचें शहर आहे. येथें रेशीम व कापूस यांच्या कापडाच्या गिरण्या आणि घड्याळांचे कारखाने आहेत. येथें शिन्टो धर्मपंथाचें एक मोठें देवालय आहे. येथील बंदर २३ फूट खोलीचें व चांगलें आहे. येथें मोठा व्यापार चालतो. लोकसंख्या १०,८२,८१६ आहे.

**नागौर**—जोधपूर संस्थानांतील नागौर जिल्ह्याचें ठिकाण. लो. सं. सु. पंधरा हजार आहे. हें शहर नाग रजपुतांनीं वसविलें असावें. या शहराभोंवतीं भिंत १७ फूट उंच व सुमारें ५ फूट रुंद आहे. तटबंदीवर बरेच मुसलमानी लेख आहेत. येथील देवळें पाहण्यासारखीं आहेत. किल्ल्याभोंवतीं दुहेरी भिंत आहे. येथील बैल फार प्रसिद्ध आहेत. येथून २० मैलांवर मंगलोद येथें संस्कृत लेख असलेले (इ. स. ६०४) एक देवालय आहे. येथें लोखंडी व पितळेचीं भांडीं, उंटांचीं खोगिरें, हस्तिदंती खेळणीं, वगैरे होतात.

**नाचाचीं सोंगें**—(इं. मास्क). आपल्याकडे जशीं शिमग्याचीं सोंगें येतात त्याप्रमाणें मुखवटे घालून नाचण्याचा एक करमणुकीचा प्रकार इंग्लंडांत सोळाव्या-सतराव्या शतकांत रूढ होता. यांत मुख्यतः एक किंवा अनेक नाच आठ ते सोळापर्यंत खेळ्ये करून दाखवीत. हे खेळ्ये बहुधा सरदारवर्गांतील स्त्रीपुरुष असत. यांतील गवई व सूत्रधार मात्र धंदेवाईक असत. या खेळासाठीं

अनेक लेखकांनीं लाळितें लिहिलीं आहेत. त्यांत बेन जॉन्सनचींच निम्म्यावर आढळतील. यादवी युद्धानंतर हा प्रकार बंद पडला.

**नाची**—ही प्रख्यात तेलगू पंडित इलेश्वरोपाध्याय याची मधली मुलगी असून बालविधवा होती. तिला बापानें केलेल्या ज्योतिष्मतीचा कल्प दिल्यापासून तिची बुद्धि फार तीव्र झाली, व अल्पकाळांत शास्त्रांत प्रावीण्य मिळवून ती व्याख्यानें देऊं लागली. तिनें संस्कृतांत एक नाटक लिहिलें, त्यांत स्वतःचीच हकीगत वीररसप्रधान वर्णनयुक्त लिहिली म्हणून तिच्या बापानें त्या नाटकाला 'नाची' हेंच नांव दिलें. तिनें काशी, मथुरा, दिल्ली, जयपूर, इत्यादि शहरांचा प्रवास केला, व अनेक राजांनीं तिला बक्षिसें दिलीं.

**नाझी**—जर्मन नॅशनल सोशालिस्ट या पक्षाचें नाझी हें संक्षिप्त नांव आहे, व आज हा नाझी शब्द कुत्सित अर्थानें योजला जातो. जर्मन सोशालिस्ट पक्षाला संक्षिप्त नांव 'सोझी' असें पडलें होतें. त्यावरून नंतर वरील पक्षाच्या विरोधकांनीं 'नाझी' हें नांव प्रतिपक्षाला दिलें. नॅशनल सोशालिस्ट पक्षाला प्रथम 'नाझी–सोझी' असें म्हणत असत, पण नंतर पुढला अर्धा भाग गाळून फक्त 'नाझी' एवढाच शब्द रूढ झाला, व 'नाझीझम' हा शब्द 'नॅशनल सोशालिझम' या शब्दाचा संक्षेप म्हणून रूढ झाला. १९२३ सालीं हा पंथ पुढें आला व याच्याशीं ॲडोल्फ हिटलरचें नांव निगडित झालें. या पंथाचीं तत्त्वें हिटलरनें आपल्या 'मीन कांफ' मध्यें ग्रथित केलीं आहेत. उदा., कांहीं मानववंश इतरांपेक्षां श्रेष्ठ असतात व जर्मन मानववंश सर्वांत श्रेष्ठ आहे; लोकराज्य हें अव्यवहार्य असून व्यक्तिदृष्ट्या ते अनीतिकारकच आहे, त्याऐवजीं नाझी पक्षाच्या नेतृत्वाखालीं चालणारें एकपक्षाचें राज्य चांगलें. जर्मनींत आपल्या बारा वर्षांच्या कारकीर्दींत या नाझी पक्षानें कडक शिस्त राखली; मुलांमुलींना लष्करी शिक्षण दिलें; वृत्तपत्रें, कला, वाङ्मय, नाट्य, संगीत, इ. चें स्वातंत्र्य काढून घेतलें व सर्व संस्थांनातून नाझी तत्त्वज्ञानाची शिकवण सुरू केली. इटलीसारख्या इतर कांहीं राष्ट्रांनींहि नाझींचा कार्यक्रम उचलला.

**नाट**—(नाटवा). या जातीची लो. सं. सुमारें सव्वा लाख असून त्यांची वस्ती संयुक्तप्रांत, बंगाल, मध्यहिंदुस्थान, वऱ्हाड नागपूर, वगैरे ठिकाणीं आहे. बादी, बाजीगर दांगचरहा, सपेरा, गारुडी, कोल्हाटी, बेडिया, यांनाहि 'नाट' म्हणतात. 'नाट' हें नांव कसरतीचे व दोऱ्यावर चालण्याचे खेळ करीत प्रवास करणाऱ्या अनेक जातींना दिलेलें आहे. हे लोक आपल्या बायकांना व्यभिचारावर पैसे मिळवण्याची परवानगी देतात. सपेरा, गारुडी हे साप धरतात, व सापाच्या विषावरचीं औषधें बाळगतात.



**नाटकें**— नाटक म्हणजे अभिनयरूपानें दृश्य स्वरूपांत निवेदन केलेली कथा होय. नाट्यकलेमध्यें नट व नटी निरनिराळ्या वास्तविक अथवा अवास्तविक पात्रांची भूमिका करून दाखवितात. या भूमिका करीत असतांना ते कांहीं मूक, कांहीं चिन्हमय व कांहीं शाब्दिक अशा क्रिया व अभिनय करतात, आणि त्यांस अनुसरून निरनिराळ्या तऱ्हेचे पोषाख व देखावे यांचा इष्ट तो परिणाम घडवून आणण्याकरितां उपयोग करितात. ख्रिस्तपूर्व ६ व्या शतकामध्यें ग्रीसमधील ॲटिका प्रांतांत गाड्यांमधून प्रवास करणारे नटसंच अथवा नाटकमंडळ्या असल्याचें आढळून येतें. हे नट अभिजात वाङ्मयांतील निरनिराळे नाट्यप्रसंग करून दाखवीत व त्या नाटकांतून काल, स्थल व क्रिया यांचें ऐक्य साधण्याचा प्रयत्न केलेला असे, व याच कल्पनांचा पुढील सर्व नाट्यकलेच्या वाढीवर परिणाम झालेला आढळून येतो. *या नाटकांमधून ज्या कथावस्तूचा उपयोग करण्यांत* आलेला असे, तिचा आविष्कार आरंभापासून परमोच्च बिंदूपर्यंत स्वाभाविकतेनें व अटळ रीतीनें, निदान संभाव्य तऱ्हेनें होत गेला असला पाहिजे, असें धोरण असे. या मुख्य कथावस्तूशीं जोडलेल्या ज्या इतर उपकथा अथवा प्रसंग असतील ते मुख्य कथानकाशीं निगडित झालेले असून मूळ कथासूत्राकडे प्रेक्षकांचें केव्हांहि दुर्लक्ष होणार नाहीं अशा तऱ्हेचेच असले पाहिजेत, असा निर्बंध असे. त्या वेळीं जे नाट्यविषय असत त्यांमध्यें तत्कालीन राष्ट्रीय अथवा पौराणिक कथा आणि प्रसंग; त्याप्रमाणेंच दंतकथा, ऐतिहासिक कथानकें अथवा घटना, लोकोत्तर पुरुषांचीं चरित्रें, वगैरे विषय असत. या विषयांवर नाटककार आपलें कौशल्य खर्च करून तत्कालीन वाङ्मयविषयक जी परिपाठी किंवा निर्बंध असत त्यास अनुसरून निरनिराळ्या तऱ्हेचीं पात्रें निर्माण करीत असत, व त्यांच्या स्वभावाचा व कृत्यांचा परिपोष करून नाट्यनिर्मिति घडवून आणीत असत.

ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार झाल्यानंतर प्रारंभींच्या कालांत या संप्रदायानें नाटकमंडळ्या व प्रहसनें, वगैरे करणारे नटसंच हे पूर्वीच्या रोमन अभिजात कृतींचेंच अनुकरण करूं लागल्यामुळें त्यांस उत्तेजन न देतां प्रतिबंधच केला. कांहीं अलौकिक चमत्कारविषयक व नीतिसंवर्धक खेळांस उत्तेजन मिळून त्यांच्या योगानें जनतेस कांहीं शिक्षण मिळून तिची करमणूक होत असे. परंतु हे नाट्यप्रसंग बहुतेक सांप्रदायी स्वरूपाचेच असून असांप्रदायिक अथवा लौकिक नाट्यप्रसंगास बहुधा बंदीच असे. यानंतर विद्यापुनरुज्जीवनकालामध्यें लौकिक नाटकांचें पुनरुज्जीवन झालें व त्यांस पुनः संधि मिळून त्या काळात सुप्रसिद्ध शेक्सपियर, लोपडीवेगा, कॉर्नेली आणि रॅसिन यांच्यासारखे नाटककार उदयास आले. या नाट्यप्रकारास इब्सेनसारख्या

नाटककारांनीं वास्तवतेचें वळण दिलें आणि मेटरलिंकसारख्या नाटककारांनीं लाक्षणिक अथवा सांकेतिक विषयांच्या दिग्दर्शनासाठीं उपयोगांत आणले. सामान्यतः नाटकांचे दुःखान्त, सुखान्त, प्रहसन, नक्कल, वगैरे प्रकार पाडण्यांत येतात. तसेंच गद्य व संगीत असेहि वर्ग पाडण्यांत येतात. मूकनाट्याचाहि एक प्रकार आहे.

भारतीय नाट्यांतील मुख्य प्रकारास नाटक ही संज्ञा आहे. या शब्दाचा मूळ अर्थ भरतः १९·११८ यांत दिला आहे. तेथें ग्रंथकार म्हणतो, " ज्यांत ऐहिक व्यवहार अंगाभिनयानें दाखविण्यांत येतात किंवा ज्यांत देव, ऋषी, राजे आणि सांसारिक मनुष्यें यांच्या चरित्रांचें चित्र रेखाटलें असतें त्यास नाटक म्हणावें." त्याचप्रमाणें नाटक लिहिणारानें सर्व ऐहिक व्यवहारांचें फार बारकाईनें अध्ययन करावें, असें (भरत. १९·१२३) ठासून सांगितलें आहे. भासाच्या 'चारुदत्त' नाटकांत वसंतसेना व वारांगनेस 'नाडयाथिया' म्हणजे नाटककुमारी असें म्हटलें आहे आणि बालरामायण यांत (४·१२·१३) इंद्राच्या रथावरील चित्रास मातली हा नाटक म्हणतो. चित्रांच्या प्रदर्शनानें आणि मूळ नाट्यानेंहि कधीं कधीं नाटकाची उत्पत्ति होते आणि त्यास संभाषणाची आवश्यकता नाहीं. भरत. १८·७ यांत नाटकांस सर्व वृत्ती अनुकूल असतात असें सांगितलें आहे.

नाटकाचें मुख्य लक्षण असें आहे कीं, त्याचें संविधानक प्रख्यात वस्तूनें (भ. ८ · १०) किंवा ख्यात वृत्तानें (साहि. द. ६ · ७; दश. ३ · २१) जमविलेलें असतें. प्रख्यात वस्तु किंवा ख्यात वृत्त याचा अर्थ प्रतापरुद्रीयकाराच्या मतानें इतिहासांतून घेतलेली गोष्ट, असा होतो. एकंदर संविधानकांत पांच संधी असतात आणि वीर व शृंगार हे मुख्य रस असतात (द. रू. ३ · ३०; सा. द. ६·१०). नाटकाच्या निर्वहरणांत शेवटीं अद्‌भुत रस असतो.

नाटकांतील नायक प्रख्यात असतो; तो राजा, राजर्षि किंवा मनुष्य–देहधारी देव असा असतो (भ. १८ · १०, १२; द. रू. ३ · २१; सा. द. ६ · ९). नाटकाच्या नांवावरून त्यांतील आशय प्रेक्षकांच्या मनांत उतरला पाहिजे. त्याचे अंक कमींत कमी पांच व जास्तींत जास्त दहा असावेत (भ. १८ · १०२; द. रू. १ · ३४; सा. द. ६ · ८). परंतु हा नियम सर्वत्र पाळण्यांत येत नाहीं. चार अंक असलेलींहि नाटकें दृष्टीस पडतात (उदा., मधुसूदनाचें 'जानकीपरिणय', नारायणशास्त्री याचें 'शर्मिष्ठाविजय', वंशमणि याचें 'गीतदिगंबर', श्रीनिवासाचें 'सौम्य सोम', इ.). तीन अंक असलेलींहि नाटकें आढळतात (उदा., घनश्यामाचें 'नवग्रहचरित्र'). दोन अंक असलेलींहि नाटकें कधीं कधीं दृष्टीस पडतात (उदा., वेदान्तवागीशाचें 'भोजचरित') आणि कधीं कधीं तर एकांकी नाटकें असतात (उदा., रविदासाचें 'मिथ्याज्ञानविडंबन'). तसेंच हनुमान नाटकाचे चौदा अंक आहेत. तथापि बहुतेक नाटकांत शास्त्रकारांनीं अंकांच्या संख्यामर्यादेसंबंधानें घालून दिलेले नियम पाळण्यांत येतात. दशांकी नाटकांत जर निरनिराळ्या पताका असतील तर त्यास महानाटक म्हणावें (सा. द. ६·२२३). नाटकांतील पात्रांची संख्या अतिशय मोठी असूं नये. चार किंवा पांच मुख्य पात्रें नाटकाला बेताचीं होतात (भ. १८·८९; सा. द. ६·११). नाटकाचा शेवट गोपुच्छासारखा असावा (भ. १८·९०; सा. द. ६·११; इ.). साहित्यदर्पणकारांचा टीकाकार याचा अर्थ पुढीलप्रमाणें करतो: ज्याप्रमाणें गाईच्या पुच्छाचे कांहीं केस लांब असतात व कांहीं आंखूड असतात त्याप्रमाणें नाटकांतील कारस्थानें कधीं एका संधींत तर कधीं दुसऱ्या संधींत दिलेलीं असतात. याचा मूळ अर्थ अंतिम साध्य होईपर्यंत नाटकांतील संविधानकाचा हळूहळू विकास होत जातो, असा असावा असें दिसतें.

नाटिका—भरताचार्यानें नाटिका म्हणून एक नाटकाचा प्रकार सांगितला आहे (भरत. १८·१०६; द. रू. ३·३९; सा. द. ६·२६९). नाटक व प्रकरण या दोहोंचें मिश्रण केलें म्हणजे तिला नाटिका म्हटलें आहे. भरताचार्यांच्या मतानें नाटिकेंतील संविधानक कांहीं प्रमाणांत आख्यायिकेपासून व कांहीं प्रमाणांत कविकल्पनेनें रचलेलें असतें, असें आहे; परंतु इतरांच्या मतानें तें सर्वस्वीं कविकल्पित असतें. यांतील वृत्ति कैशिकी असते. व संधीपैकीं विमर्शाचा उपयोग करीत नाहींत. यांतील मुख्य रस शृंगार असतो. त्यांतील नायक पौराणिक कथेंतून घेतलेला एखादा राजा असतो. यांतील नायिका अंतःपुरांत असणारी व जिला नृत्यगीतांत आपला वेळ घालविण्याची आवड आहे अशी राजकन्या असते. यांतील नायक आपल्या मत्सरग्रस्त राणीची काळजी करतो, परंतु ती राणी नायक–नायिकेच्या संयोगाला आपली संमति देते. यांत चार अंक असतात किंवा दशरूपककाराच्या मतानें (३·४०) ते तीन, दोन किंवा एकहि चालतात. नाटिकेचें नांव नायिकेच्या नांवावरून दिलेलें असतें.

नाटिका हा तिच्या नांवाप्रमाणें एक नाटकाचाच पोटविभाग आहे. खरें पाहूं गेलें तर 'मालविकाग्निमित्रा'सारखें नाटक व 'रत्नावली'सारखी नाटिका यांत वस्तुतः फारसा फरक नाहीं. परंतु नाटिका ही निराळ्या पोटविभागांत घालण्याचें कारण असें आहे कीं, भरताचार्यानें नाटकास निदान् पांच अंक तरी असावे, असें सांगितलें आहे. नाटकाप्रमाणें नाटिकेंतहि तिचा मूलार्थाशीं असलेला संबंध कधीं कधीं दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ, बालरामायणांत नाटिका याचा अर्थ 'विदूषकें' असा आहे.

संस्कृत नाटकें— हिंदुस्थानांत नाटकें फार प्राचीन काळापासून होत आहेत याविषयीं शंका नाहीं. वैदिक वाङ्मयांत त्यांचा उल्लेख आहे. कात्यायन व पाणिनि यांचीं त्यांसंबंधीं सूत्रें आहेत. भरतनाट्यशास्त्र तर प्रसिद्धच आहे. पहिलें प्रसिद्ध नाटक म्हणजे शूद्रक कवीचें 'मृच्छकटिक' होय. हें सामाजिक नाटक आहे. त्यांतील नाट्यकला वरीच प्रगत आहे असें दिसेल. यानंतर कालिदास आणि भवभूति यांचीं नाटकें येतात. मानवी स्वभावाचें अचूक ज्ञान, सृष्टिसौंदर्याचें वर्णन, रसांचा परिपोष, कल्पना–उपमा–अलंकार यांची अलोट सजावट, उदात्त कथानक व अचाट काव्यप्रतिमा या गुणांनीं कालिदासाचीं शाकुंतल, विक्रमोर्वशीय, मालविकाग्निमित्र, वगैरे नाटकें समृद्ध आहेत. 'शाकुंतला'चीं भाषांतरें अनेक भाषांतून झालेलीं आहेत. भवभूतीचीं 'मालतीमाधव' आणि 'उत्तररामचरित' हीं नाटकें विशेष अभ्यासलीं जातात; 'उत्तररामचरित' तर अप्रतिम करुणरसपूर्ण असून त्यांतील रामचंद्राची भूमिका अत्यंत कुशलतेनें रंगविली आहे. भवभूतीचा वाणीविलास पाहण्यासारखा आहे. भट्ट नारायणाच्या 'वेणीसंहारां'त रौद्ररस प्रतीत होतो; पण नाट्यगुण यथातथाच आहेत. हर्षाच्या नांवावर खपणारें 'रत्नावली' नाटक हें काश्मिरी कवि धावक याचें आहे, असें कांहीं अभ्यासक मानतात. धावकाचें दुसरें नाटक 'नागानन्द' होय. राजशेखराचें 'विद्धशालभंजिका' मृगांकावली म्हणूनहि ओळखलें जातें. 'बालरामायण' व 'बालभारत' या नांवाचींहि नाटकें झालीं. क्षेमीश्वराचें 'चंडकौशिक' मार्कंडेय पुराणांतील हरिश्चंद्राच्या कथेवरून रचलेलें आहे. जयदेवाचें 'प्रसन्नराघव' रामचरित्रपर आहे.

'हनुमन्नाटक' किंवा 'महानाटक' हा नाट्याचा वेगळाच प्रकार वाटतो. यांत बऱ्याच कविता, अभिनयाच्या सूचना, कांहीं अप्रस्तुत संभाषणें, वगैरे आढळतात. या नाटकाच्या उपलब्धीची कथाहि विलक्षण आहे. नाट्यकालारंभींचें हें प्राथमिक स्वरूपाचें नाटक असावें. यानंतर विशाखदत्ताचें 'मुद्राराक्षस' हें राजकारस्थानासंबंधींचें ऐतिहासिक नाटक पुढें येतें. यांतील भाषा आवेशपूर्ण आहे. यानंतर 'धनंजय' (कांचनाचार्यांचें), 'अनर्घराघव (कर्ता मुरारि), 'शारदातिलक', 'ययातिचरित्र', 'दूतांगद', 'मृगांकलेखा', 'विदग्धमाधव', इ. लहानमोठीं नाटकें व भाण यांची रचना दृष्टीस पडते. जुन्या कालिदासादि नाटककारांचें कौशल्य यांत नसल्यानें तीं नामशेष आहेत.

संस्कृत नाटकांतून बऱ्याचशा नाटकांचीं संविधानकें पौराणिक आहेत. प्रहसनाविषयीं स्वतंत्रपणें अन्यत्र लिहिलें आहे.

मराठी नाटकें— प्राचीन काळांतील संस्कृत नाटकें आणि आजचीं मराठी नाटकें यांच्या मध्यंतरींचा काल महाराष्ट्रीयांस बराच धामधुमीचा होता. त्या काळीं नाटकादि ललितकलांकडे लोकांचें लक्ष गेलें नाहीं. तंजावरच्या भोसले राजांनीं 'लक्ष्मीनारायणकल्याण' यांसारखीं कांहीं ललितासारखीं तोटकीं नाटकें करविलेलीं दिसतात. सुमारें नव्वद वर्षांपूर्वी महाराष्ट्रांतील लोकांना ललीत व तमाशा हे नाटकाचे दोन प्रकार माहीत होते. देवादिकांच्या उत्सवप्रसंगीं ललीत होत असे. ललितामध्यें आरंभीं देवादिकांचीं सोंगें आणून दशावतारांतील थोडथोडी ईश्वरलीला करून दाखवीत असत. तमाशे हे मुसलमानी अमदानींत सुरू झाले. तमाशाचें सामान्य स्वरूप म्हणजे पाठीमागें डफतुणतुण्यावर गाणें, पुढें नाचापोराचा नाच, आणि मधून मधून सोंगाची चतावणी हें होय. ललितें व तमाशे यांखेरीज गोंधळाचाहि थोडाबहुत संबंध मराठी रंगभूमीशीं पोहोंचतो. ललितांत बहुतकरून पौराणिक कथेवर खेळ करून दाखवीत. तमाशांत व गोंधळांत साधारणपणें त्या त्या वेळच्या स्थितीवर व माणसांवर कवनें करून चतावणी करीत असत. याप्रमाणें ललितें, तमाशे व कांहीं अंशीं गोंधळ आणि बहुरूप्यांचीं सोंगें हा मराठी रंगभूमीचा पाया होय. मराठी नाटकांस सुरुवात करण्याचा मान सांगली संस्थानाधिपति श्रीमंत आप्पासाहेब यांच्याकडे आहे. स. १८४१ त सांगलीस उत्तर कानडा प्रांतांतील भागवत नांवाची मंडळी आली होती. तिचे खेळ पाहून अशा प्रकारचे खेळ मराठींत झाले तर बरें होईल असें श्रीमंतांस वाटलें. त्यांचे आश्रित श्री. भावे यांनीं 'सीतास्वयंवर' हें पहिलें नाटक रचिलें. १८५७ सालीं मराठी नाटकांस सुरुवात झाल्यापासून आतांपर्यंत मराठी वाङ्मयाच्या इतर प्रकारांपेक्षां नाटकांचीच वाढ जास्त झाली आहे असें आपणांस दिसतें. स. १८८१–१८९० हा काळ मराठी नाटकांच्या इतिहासात विशेष महत्त्वाचा आहे. या दशकांत २०० हून जास्त नाटकें जन्मास आलीं. विश्वविद्यालयाची स्थापना झाल्यावर महाराष्ट्रांत कॉलेजमध्यें इंग्रजी आणि संस्कृत नाटकांचे प्रयोग होऊं लागले व तेव्हां लोकांमध्यें नाटकग्रंथ, नाटकप्रयोग, वगैरे विषयासंबंधीं चर्चा सुरू होऊन आमच्यांतील विद्वान् लोकांचें लक्ष तिकडे लागलें. पुण्यांत इ. स. १८७२ च्या सुमारास विश्रामबाग हायस्कूलच्या चौकांत त्या शाळेतील विद्यार्थ्यांनीं 'जुलिअस सीझर' नामक नाटकाचा प्रयोग इंग्रजी भाषेंत पहिल्यानें केला. इंग्रजी नाटकांच्या प्रयोगाप्रमाणेंच त्या वेळीं वेणीसंहार, मृच्छकटिक, मुद्राराक्षस, वगैरे संस्कृत नाटकांचेहि प्रयोग या उच्च प्रतीच्या पाठशाळांतून होऊं लागले.

मराठी नाटकांचे गद्य व संगीत नाटकें असे दोन मुख्य प्रकार आहेत. प्रो. केळकर यांनीं इंग्रजींतील बऱ्याच नाटकांचीं व प्रहसनांचीं मराठींत भाषांतरें केलीं आहेत. त्यांत 'त्राटिका' हें अत्यंत लोकप्रिय आहे. कृ. प्र. खाडिलकराच्या नाटकांपैकीं

'बायकांचें बंड' व 'प्रेमध्वज' हीं इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें आहेत. न. चिं. केळकरांचीं 'तोतयाचें बंड', 'चंद्रगुप्त', 'अमात्य माधव' व 'कृष्णार्जुन युद्ध' हीं नाटकें रंगभूमीवर लोकांच्या समोर आलीं आहेत. मराठी रंगभूमीवर संगीत नाटकें सुरू करण्याचें श्रेय त्रिलोकेकर व किर्लोस्कर या जोडीला दिलें पाहिजे. किर्लोस्करांची 'सौभद्र', 'शाकुंतल', व रामराज्य-वियोग' हीं संगीत नाटकें प्रसिद्ध आहेत. देवलांचें नांव 'शापसंभ्रम' व 'मृच्छकटिक' या दोन नाटकांपेक्षां 'शारदा' नाटकामुळें महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालें आहे. संगीत नाटककार म्हणून प्रसिद्धीस आलेले चौथे गृहस्थ श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे होत. कृ. प्र. खाडीलकरांचीं 'मानापमान', 'विद्याहरण', 'स्वयंवर' व 'द्रौपदी' हीं संगीत नाटकें रंगभूमीवर येऊन बरींच लोकप्रिय झालीं आहेत. राम गणेश गडकरी हे याच वेळीं नाटककार म्हणून प्रसिद्धीस आले होते. यांचें 'एकच प्याला' हें संगीत सामाजिक नाटक फारच परिणाम-कारक व इतर नाटकांपेक्षां चांगलें वठलें आहे. १९१६ सालीं 'हाच मुलाचा बाप' लिहून वरेरकरांनीं आपल्या सामाजिक नाटकांना प्रारंभ केला. १९२३ ते १९३१ या काळातील वरेरकरांचें यशस्वी नाटक 'करीन ती पूर्व' हेंच होते. ऐति-हासिक नाट्यक्षेत्रात त्यांनीं टाकलेलें हें पहिलें पाऊल असूनहि तें यशस्वी झालें. वरेरकरांइतका प्रगमनशील नाटककार मराठींत झाला नाहीं, असें म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाहीं.

नाटकाचा मुख्य हेतु मनोरंजन; तें योग्य मार्गानें होत असल्यास त्या नाटकाला वाङ्मयांत स्थान मिळण्यास हरकत नाहीं. नाटकांत चांगल्या चांगल्या कल्पना व तदनुकूल भाषा असल्या-शिवाय मनोरंजन होणारच नाहीं. भारदस्तपणा कायम राखून भाष-णांत व पदांत सुबोधता हा भाषेचा गुण 'शारदा' नाटकाइतका इतर ठिकाणीं क्वचित् आढळतो. नाटक हें संसाराचें चित्र असल्या-मुळें संसाराप्रमाणें तें स्त्रीपुरुषमिश्रित असणारच व त्यांत शृंगाराला अजीबात फांटा देणें शक्य नाहीं व योग्यहि नाहीं. 'मुद्राराक्षस' नाटकासारखें शृंगाररसहीन असूनहि लोकरंजन-क्षम नाटक क्वचित्. शृंगाराप्रमाणें हास्यरसहि आवश्यकच गणला पाहिजे. नाटकाचें कार्य जें मनोरंजन तें त्या रसावर बरेंच अवलंबून असतें. विनोदाचें उत्तम उदाहरण मृच्छकटिक नाटक व त्यांतील शकार, याचें होय. विनोदाच्या बाबतींत वरच्या दर्जाच्या मराठी नाटकात 'बायकांचें बंड', 'मानापमान', 'शारदा', 'तोतयाचें बंड', 'अमात्यमाधव', 'वधूपरीक्षा', वगैरे नाटकांची गणना होईल. संगीत नाटकांची लोकप्रियता वाढण्याचें संगीत हें एक मुख्य साधन आहे. नाटकांतील पद्यांसंबंधानें त्यांची संख्या, प्रसंग, चाली व भाषा हे प्रकार महत्त्वाचे मुद्दे आहेत. पद्याला योग्यायोग्य प्रसंग निवडण्यास कवीच्या अंगीं मार्मिकता चांगलीच पाहिजे. पदांची भाषा अत्यंत दुर्बोध म्हणून कोल्हटकरांच्या 'गुप्तमंजूष'वर नाट्यकलारुक्कुठारानें केलेली टीका संगीत नाटककारांस बरीच मार्गदर्शक झाली आहे. वरेरकरांचीं नाटकें अधिक सामाजिक आणि अधिक वास्तव-वादी पण गायकी चालीच्या वीस-पंचवीस पदांशिवाय त्यांचीं नाटकें रंगभूमीवर उभीं राहूं शकत नाहींत. संगीत नाटकानीं गद्य नाटकें मारलीं व संगीत नाटकांतील मुख्य भाग जो संगीत तो बोलपटांतून अधिक विविधतेनें ऐकायला मिळूं लागल्यामुळें संगीत नाटकेंहि मरणाच्या दारीं येऊन बसलीं. अगदीं पहिल्या मराठी नाटकांना कानडी नाटकांपासून स्फूर्ति मिळाली असली तरी वाङ्मय या दृष्टीनें त्यांचा मराठी नाट्यवाङ्मयावर कांहींच परिणाम झाला नाहीं. कालिदास—शूद्रक, शेक्सपियर—मोलियर, आणि अगदीं अलीकडे इब्सेन-शॉ यांनीं मराठी नाट्यवाङ्मयाच्या प्रवाहांत थोडाफार बदल घडवून आणला यांत मात्र शंका नाहीं.

इमारतीला आयता तयार असलेला पाया मिळावा त्याप्रमाणें पौराणिक कथेचा नाटककाराला उपयोग होतो. विविधरसपूर्ण, अद्भुतरम्य व उत्कट प्रसंग हें एक पौराणिक कथांच्या आकर्षणाचें दुसरें कारण आहे. संख्येच्या मानानें चांगलीं पौरा-णिक नाटकें कमी असलीं तरी 'चंद्रहास', 'कुंजविहारी', 'पहिला पांडव', 'वीरविडंबन', 'महारथी कर्ण', 'सुंदोपसुंद', 'ब्रह्मकुमारी', इत्यादि या विभागांतील इतर नाटकें कोणालाहि वाचनीय वाट-तील. संतचरित्रांतील नाटकें वास्तविक ऐतिहासिक, पण तीं अद्भुत चमत्कारांचा आश्रय करीत असल्यामुळें यांची गणना पौराणिकांतच करणें योग्य होईल.

ऐतिहासिक नाटकें म्हणजे पौराणिक व सामाजिक नाटकांना सांधणारा दुवाच म्हणावयाचा. भव्यता, उद्दीपकता, वैचित्र्य व उत्कटता ह्या दृष्टींनीं ऐतिहासिक कथानकें पौराणिक कथानकांची बरोबरी करूं शकतात. खाडीलकरांसारख्या कलावंत नाटक-काराच्या 'कांचनगडची मोहना' या पहिल्या कृतींत स्वाभि-मानाची ज्योत चेतविण्याचाच प्रकार दृष्टीस पडतो. 'तोतयाचें बंड', 'चंद्रगुप्त' व 'अमात्यमाधव' या केळकरांच्या तीन ऐतिहासिक नाटकांपैकीं शेवटच्या दोहोंना इंग्रजी कादंबऱ्यांचा आधार आहे. 'तोतयाचें बंड' यांतील कथानक पेशवाईतील असल्यामुळें 'चंद्रगुप्ता'पेक्षांहि रंगभूमीवर अधिक यशस्वी होऊं शकलें. यानंतरचे प्रमुख ऐतिहासिक नाटककार य. ना. टिपनीस व औंधकर हे होत. शॉच्या 'सेंट जोन'प्रमाणें ऐतिहासिक कथा-नकाच्या पार्श्वभूमीवर तत्त्वमूर्तीचें चित्र काढणारा कलावंत लेखक महाराष्ट्रांत अजून निर्माण झाला नाहीं.

पौराणिक व ऐतिहासिक नाटकांत कथानकांचीं बंधनें

फार, त्यामुळें स्वैरसंचार करणाऱ्या नाट्यप्रतिभेची कुचंबणा झाल्यावांचून राहत नाहीं. अशा वेळीं ती रम्य व स्वतंत्र कथानकाचा आश्रय करते. वीर वामनराव जोशी यांची 'राक्षसी महत्त्वाकांक्षा', 'रणदुंदुभि' व 'धर्मसिंहासन' हीं तिन्ही नाटकें कल्पनारम्यच आहेत. मात्र या सर्वांवर कर्त्याच्या जळजळीत देशाभिमानाची दाट छाया पडलेली असल्यामुळें तीं निराळ्या पद्धतीचीं वाटतात. सामाजिक नाटकांच्या मानानें कल्पनारम्य नाटक कृत्रिम वाटतें हें खरें. पण कल्पकता, काव्यात्मता, भव्यता व तत्त्वप्रतिपादन, इत्यादिकांच्या दृष्टीनीं त्याचा उपयोग कुशल लेखकाला निःसंशय करून घेता येईल.

कल्पनारम्य वातावरणांत विहार करणारी प्रतिभा सभोंवतालच्या परिस्थितीशीं समरस होऊं लागली कीं सामाजिक नाटकें जन्माला येतात. कोल्हटकरांच्या सामाजिक नाटकांपैकीं बहुतेकांत स्त्रीपुरुषांतील प्रेम, समता व स्वातंत्र्य यांचा पुरस्कार केलेला असून त्यांपैकीं 'मतिविकार' व 'जन्मरहस्य' हीं नाटकें मराठी भाषेला भूषणभूत होतील अशींच आहेत. 'प्रेमसंन्यास' व 'भावबंधन' यातहि गडकऱ्यांनीं सामान्यतः याच सुधारणांची आवश्यकता प्रतिपादन केली असून वाङ्मयीन गुणांमुळें त्यांचें महत्त्व चिरकाल टिकेल. 'म्युनिसिपालिटी'कर्ते माधवराव जोशी याचा पंथ तिसराच आहे. सुशिक्षित स्त्रिया, कॉलेजचे विद्यार्थी, प्रचलित प्रेमकल्पना, इत्यादिकांचें विडंबन त्यांच्या नाटकात प्रामुख्यानें आंढळतें व त्यामुळें सुधारणाविरोधी वर्गात त्यांचें नांव घालण्याचा मोह उत्पन्न होतो. इब्सेन, शॉ, गाल्सवर्दीप्रभृति युरोपियन नाटककारांचीं व त्यांसारखीं नाटकें मराठी नाट्यमंदिरांत असणें आवश्यक आहे. प्रेक्षकवर्गाची अभिरुचि व्यापक व सुसंस्कृत करण्याला अशा रूपांतरांची निःसंशय मदत होईल. आजकाल वर्तक, रांगणेकर, चेंडेकर, वगैरे कुशल लेखक यांकडे लक्ष देत आहेत खरें. बोलपटाशीं टक्कर मारण्याच्या कामीं नाट्यकलेला नाटिकाचा बराच उपयोग होण्यासारखा आहे. विषय, कथानकाची मांडणी, रचनापद्धति, इत्यादि सर्व अंगें वैशिष्ट्यपूर्ण असलीं तर नाटिका निःसंशय नाटकाइतकीच किंवा अधिकहि लोकप्रिय होते.

सुखान्त व दुःखान्त असें नाटकांचें वर्गीकरण करण्याचा सामान्य प्रघात आहे. आनंदप्रधान नाटकातला गंभीर भाग काढून टाकून खेळकरपणाला त्यांत पूर्ण वाव दिला कीं नाटक प्रहसनासारखें हास्यप्रधान होतें. 'वेड्यांचा बाजार', 'सहचारिणी', 'खडाष्टक', माधवराव जोशांचीं सर्व नाटकें, 'साष्टांग नमस्कार', 'पंताची सून', वगैरे नाटकें या वर्गांतील होत. आनंदप्रधान नाटकांत क्रूर खलपुरुष अगर विलक्षण प्रसंग घालून त्याला कल्पनारम्यता व कृत्रिम आकर्षकता आणण्याचा मोह नाट्यलेखकांना सहसा आवरतां येत नाहीं. अशा कृत्रिम नाटकांना (मेलोड्रामा सारख्या) भाळणारा असंस्कृत प्रेक्षकवर्ग आपल्याकडे मोठ्या प्रमाणांत आढळतो. त्यामुळें नाट्यवाङ्मयांत सामान्य लेखकांकडून जी भर पडते ती असल्याच नाटकांची. हा कृत्रिमपणाचा खडक टाकून अधिक खोल जाणाऱ्या नाटककाराला गंभीर स्वरूपाची रचना करतां येते. 'प्रेमशोधन', 'कीचकवध', 'एकच प्याला', वगैरे नाटकें या वर्गांत मोडतात. शृंगाराखालोखाल करुण व हास्य या दोन रसांचा उपयोग केलेला आढळतो. देवल, कोल्हटकर, खाडिलकर, गडकरीप्रभृतींच्या कुशलतेमुळें मराठी नाट्यवाङ्मयातील करुणरस विविधतेनें नटला आहे. पण हास्यरसाची व्हावी तितकी प्रगति झाली नाहीं. वीररसाची गोष्ट तर बोलायलाच नको. खाडिलकरांचीं थोडीं नाटकें व जोशी-सावरकरांचें कांहीं लिखाण सोडून दिल्यास मराठी नाट्यवाङ्मयांत वीररस औषधालाहि मिळणें कठिण आहे. आपल्याकडे येऊं घातलेल्या नव्या नाट्यतंत्राचा पहिला पुरस्कर्ता प्रख्यात युरोपियन नाटककार इब्सेन हा होय. अर्थातच इब्सेननें आपल्या सामाजिक नाटकांत स्वगत भाषणांवर कडक बहिष्कार घातला. नाटकांतील परिसीमेचा प्रसंग उत्कट करण्यांतहि त्याचा हातखंडा आहे. हे व अशाच प्रकारचे नाट्यनियम नवीन नाट्यतंत्रात आढळतात.

कोटि, विनोद, काव्य, भावनाविलास, स्वभावचित्रण, अद्‌भुतरम्यता, वास्तवता, रचना-कौशल्य, मानवी मनांचे विविध खेळ नाजुकपणानें चित्रित करण्याची शक्ति, नाट्यदृष्ट्या परिणामकारक प्रसंग सुंदर रीतीनें गुंफण्याची हातोटी, यांप्रमाणें जितके अधिक कलागुण नाट्यलेखकाच्या अंगीं असतील तितके इष्टच आहेत. ते संपादन करण्याला लेखकानें निसर्गदत्त प्रतिभेला परिश्रमांची जोड दिली पाहिजे. आतांपर्यंत मराठींत १२०० पेक्षां अधिक नाटकें झालीं असतील. पण शास्त्रशुद्ध व विचारप्रवर्तक असे नाट्य-टीकाग्रंथ हाताच्या बोटांवर मोजण्याइतके तरी सापडतील कीं नाहीं, याची शंकाच आहे. किर्लोस्करांपासून गडकऱ्यांपर्यंत मराठी नाटकांतील गद्य भरदार होत गेलें. चालींच्या दृष्टीनें किर्लोस्करांपासून संगीतांत अनेक स्थित्यंतरें झालीं. किर्लोस्कर-देवलांच्या प्रासादिक पद्यांचें सौंदर्य अगर कोल्हटकरांच्या कल्पकतापूर्ण पदांतील माधुर्य सध्यां तरी अतिशय दुर्मिळ होऊन बसलें आहे. संगीतप्रधान (ऑपेरासारख्या) नाटकांची प्रथा पडल्याखेरीज मराठी नाटकांतील पदाना बरे दिवस येतील असें वाटत नाहीं.

गुजराथी नाटकें—कोंकणांत ज्याप्रमाणें दशावतारी नटवर्ग अद्यापिहि आपलीं नाट्यें निरनिराळ्या देवमंदिरांत ठराविक दिवशीं करीत असतात त्याप्रमाणें गुजराथेंतहि तसाच एक

नटवर्ग आहे. भवय्यां नावानें तो ओळखला जातो. त्यांचें नाट्य जें भवई याचा उगम चौदाव्या शतकापर्यंत मागें नेण्यांत येतो. हे भवय्ये शाक्तपंथी असून ते गांवोगांव हिंडून आपलीं नाटकें करतात. या नाटकांत कथावस्तु एकच नसते. अनेकविध प्रसंग, ज्यांचा परस्परांशीं क्वचितच संबंध असतो, असे नाटकांत आणून हे लोक लोकांचें मनोरंजन करीत असतात. हे प्रयोग रात्रीं उघड्या जागेंत होतात. साधारणतः हंगाम सुरू झाला म्हणजे हीं लोकनाट्यें गांवोगांव करण्याचा प्रघात आहे. खेडेगांवांत भवय्ये आले म्हणजे सर्व खेडूत एकत्र येतात आणि या लोकनाट्यांत रात्रभर रंगून जातात. या नाटकांतील 'रंगलो' हें विदूषकी पात्र लहानथोर सर्वच प्रेक्षकांना भारी आवडतें. त्याचा ग्राम्य विनोद आणि हास्यास्पद चेष्टा यांवर हे ग्रामीण प्रेक्षक बेहद्द खुष असतात. नाटकांतील कथानक बहुधा पौराणिक असतें. असें असलें तरी मधूनच एखादा प्रसंग चालू जमान्यांतील घेऊन तो इतक्या उपहासात्मक रीतीनें नटविला जातो कीं, लोक तो प्रसंग पाहतांना देहभान विसरतात.

पण आतां ही भवई–परंपरा जवळजवळ नष्ट होत चालली आहे. तरी पण या परंपरेंतील कांहीं महत्त्वाच्या गोष्टी अद्यापिहि गुजराथी रंगभूमीवर दृष्टीस पडतात. इतकेंच नव्हे तर या भवई वर्गांतील नट गुजराथी रंगभूमीवर फार मोठा मान मिळवून प्रसिद्धि पावले आहेत.

जेव्हां पुढें पाश्चात्य लोक हिंदुस्थानांत आले त्यांबरोबर पाश्चात्य भाषा व पाश्चात्य संस्कृति हिंदुस्थानांत सर्वत्र परिचित झाली. गुजराथ प्रांत याला अपवाद नव्हता. विशेषतः इंग्रजी भाषेच्या अध्ययनामुळें गुजराथी नाट्यक्षेत्रांत बराच बदल होऊं लागला. नाट्यप्रेमी रसिकांना हा नवीन बदल फार आवडूं लागला व पटूं लागलाहि. अनेक गांवीं नाट्यसमाज स्थापन झाले. नाट्यकलेला एक प्रकारचें नवचैतन्य प्राप्त व्हावें अशी परिस्थिति निर्माण झाली. असें असलें तरी संस्कृत नाटकांतील कांहीं तंत्रें व कांहीं पात्रें अद्यापिहि रंगभूमीला चिकटून होतीं. सूत्रधार व विदूषक या जोडगोळीशिवाय नाटक रंगभूमीवर येत नसे. याच सुमारास मराठी व पारशी रंगभूमीचा व गुजराथी रंगभूमीचा संबंध आला व त्यामुळें गुजराथी रंगभूमींत डोळयांत भरण्याजोगा फरक पडला. इंग्रजी नाटकांच्या रूपांतरित नाटकांचे प्रयोग गुजराथी रंगभूमीवर होऊं लागले.

गेल्या पंचवीस वर्षांच्या कालावधींत गुजराथी रंगभूमि इतकी बदलली कीं, प्राचीन नाट्याच्या खाणाखुणाहि शिल्लक राहिल्या नाहींत. प्रतिभावान् नाटककारांनीं अनेक नवीन पद्धतीचीं नाटकें लिहिलीं व तीं लोकप्रियहि झालीं. कथानकांचें नावीन्य, नवीन नाट्यतंत्र, आकर्षक रचनापद्धति, वेषभूषेची आधुनिकता, रंगभूमीची वास्तव सजावट या सर्वच नाट्यघटकांत पाश्चात्यांचें अनुकरण स्पष्ट दिसून येतें. जुन्या जमान्यांत नाटकांत अनेक पद्यें असत, तीं जाऊन त्यांऐवजीं चटकदार, सुटसुटीत, परिणामकारी संवाद आले. प्राचीन पद्धतीप्रमाणें एखादा नट व्याख्यात्याप्रमाणें जें लांबलचक भाषण करी, या पद्धतीला फाटा मिळाला. आतां पात्राच्या तोंडीं लहानलहान पण मनाचा ठाव घेणारीं भाषणें असतात. जुनी भाषासरणी, अनुप्रास, उपमा, इत्यादि घवघवीत अलंकारांनीं नटलेली असे; आतां सांप्रतची भाषा साधी असून चटकन् समजेल अशी असते. नाटक म्हटलें म्हणजे तें पांचसात अंकांचें असावयाचें ही समजूत आजच्या एकांकी नाटकवाल्यांनीं पार बदलून टाकली. नाट्यदेवीचा हा कायापालट एकाएकीं झाला असें मात्र मुळींच नाहीं. अद्यापिहि कांहीं नाटकें नुसतीं वाचण्यापुरतींच लिहिलीं जातात. त्या नाटकांचे प्रत्यक्ष प्रयोग यशस्वी होत नाहींत. पण वाङ्मयदृष्ट्या हीं नाटकें मानाचें स्थान पटकावून बसलीं आहेत. याबरोबरच कांहीं नाटकें फक्त प्रयोगक्षम असल्यामुळें त्यांतील रसोत्कटता रंगभूमीवर प्रत्यक्ष पाहतांना आस्वादावी लागते. अद्यापि नाटकांत संगीतालाहि स्थान आहे. गुजराथी नाट्यदेवीचा हा कायापालट घडवून आणणारे पहिले मानकरी रघुनाथ ब्रह्मभट्ट आणि बॅरिस्टर विभाकर हे होत.

नाटककारांएवढाच नाट्यसंस्थांनाहि या बाबतींत श्रेयाचा वांटा द्यावा लागतो. या नाटकांत धंदेवाईक नटांप्रमाणें शोकी नटहि बऱ्याच मोठ्या संख्येनें वावरतांना दिसतो. सांप्रतचे प्रसिद्ध नाटककार म्हणजे चंद्रवदन मेथा, कन्हयालाल मुनशी, रमणलाल देसाई आणि पुरुषोत्तमदास त्रिकमदास हे होत. मुनशींचीं 'काकानी शशी', 'स्नेहसंभ्रम', 'नरसिंग'; मेथांचीं 'रंगलीला', 'आगगाडी,' 'नागबावा'; रमणलाल देसाई यांचं 'शंकित हृदय', हीं नाटकें आज गुजराथी वाङ्मयांत फार वरच्या दर्जाचीं मानलीं जातात. नाट्यतंत्र, नाट्यवस्तु, इत्यादींच्या कल्पनांत या नाटकांनीं फार मोठी क्रांति केलेली आहे.

जेव्हां पाश्चात्य वाङ्मयाची ओळख वाढूं लागली आणि पाश्चात्यांचे अनेक नाटकप्रकार देशी भाषांत अवतरूं लागले, तेव्हां प्रॉब्लेम प्ले, लिरिकल ड्रामा, वन् ॲक्ट प्ले या धर्तीवर गुजराथी नाट्यसृष्टींत निर्मिति होऊं लागली. नुसत्या कलाकाशांत विहार न करतां लेखकांची प्रतिभा सामान्य जनतेच्या झोंपड्यांत रमूं लागली. स्वप्नरंजन थांबलें व लेखक वास्तवतेचा विचार करूं लागले. मानवतेची जाणीव तीव्र होऊं लागली. श्रीमंतांच्या काल्पनिक प्रेमकथा बाजूला पडल्या आणि किसानाचें त्यागी जीवन, श्रद्धायुक्त प्रेम यांचें प्रतिबिंब नाटकांत पडूं लागलें.

विषयान्तराबरोबर भाषांतरहि आपोआपच आलें. वास्तव

वातावरण निर्माण करण्याचें भाषा हें एक मोठें अमोघ साधन आहे. नाटकांतील भाषा पात्राला शोभेशी स्थानिक विशेषांनीं युक्त झाल्यामुळें भाषेंत जिवंतपणा व ओज आलें. त्यामुळें रसवत्ता वाढली. या सर्वांचें श्रेय गुजराथेंतील पहिल्या श्रेणीचे साहित्यिक उमाशंकर जोशी, दुर्गेश शुक्ल, इत्यादींना द्यावें लागतें. बादुभाई, उमरवाडीया, यशवंत पंड्या, गोविंदभाई, अमीन, धूमकेतु याचाहि नामोल्लेख अटळ आहे. चालू शतकाच्या प्रारंभीं रमणभाई नीळकंठ व नानालाल कवि यांनीं नाट्याचें पुनरुज्जीवन आरंभिलें. मुनशी-मेथांनीं त्या कार्याला एकदम चालना दिली आणि आजची रंगभूमि सजविली.

राजकीय जाणिवेबरोबर सांस्कृतिक पुनरुज्जीवन होत गेलें व इतर प्रांतांप्रमाणें गुजराथेंतहि सृजनशील प्रतिभारत्नाचे नवीन पैलू चमकूं लागले. गुजराथी रंगभूमि व नाट्यकला यांच्या सेवेसाठीं रंगमंडळें स्थापन झालीं. या मंडळांत उत्साही तरुणांचा भरणा विशेष आहे. जुन्या जमान्यांत नाटक बसविणें, हावभावांचें मार्गदर्शन करणें, इत्यादि कामें एखादा मुरलेला नटच करीत असे. त्याच्या लहरीवर सर्व गोष्टी व्हावयाच्या. पण हा जमाना आतां बदलला. नाट्य ही एक प्रभावी कला आहे, इतर ललितकलांप्रमाणेंच या कलेचें प्रभुत्व संपादन करतांना तळमळीचा अभ्यास, तज्ज्ञांचें मार्गदर्शन, शिस्तवार तालिमी, इत्यादींची आवश्यकता आहे, याची पुरेपूर जाणीव रंगमंडळाच्या समासदांना आली व त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या कार्याला उत्साहानें आरंभ केला. या मंडळाच्या वतीनें आज एक नाट्यकलेच्या अभ्यासासाठीं स्वतंत्र मंदिर असून प्रत्यक्ष प्रयोग करून नाट्यकलेच्या तंत्राची व मंत्राची उपासना सुरू आहे. रंगमंडळाच्या सहकार्यानें अनेक उदयोन्मुख नट एकत्र येणें शक्य झालें. रंगमंडळ ही संस्था गुजराथेंत आज नांवारूपास आली असून अहमदाबाद येथील आपल्या केंद्रीय कार्यालयांतून नाट्यकलेची जोपासना मोठ्या तळमळीनें करीत आहे. [ 'थॉट' मधील कमलादेवी चटोपाध्याय यांच्या लेखाच्या आधारें ]

इतर भाषांतील नाटकांचें विवेचन त्या त्या भाषा-वाङ्मयाच्या लेखांत केलेलें आहे.

**नाटकगृह**—रंगभूमि पाहा.

**नॉटिंगहॅम**—हें शहर इंग्लंडमध्यें नॉटिंगहॅमशायर या परगण्याचें मुख्य ठिकाण आहे. इंग्लंडच्या राज्यांतील ती एक मोठी बाजारपेठ आहे. तेथें विल्यम दि कॉंकरर यानें बांधलेला किल्ला आहे. येथें विद्यापीठाचें कॉलेज, टेक्निकल स्कूल ( यांत्रिक शिक्षणाची शाळा ) व एक ब्ल्यू-कोट स्कूल ( आरमारी शिक्षणाची शाळा ) या महत्त्वाच्या शिक्षणसंस्था आहेत. येथें एक अठरा एकरांचें विस्तृत शास्त्रीय वृक्षसंशोधनालय आहे. येथें कलाबतू, पायमोजे, फ्रॉक, वगैरे जिन्नस करण्याचे कारखाने आहेत. शिवाय कापूस, लोंकर व रेशीम यांचें कापड करण्याचे आणि अनेक लोखंडी कामाचे कारखाने येथें आहेत. अँग्लो-सॅक्सन ऐतिहासिक काळांत या शहराला फार महत्त्व होतें, आणि हें शहर डेन्स लोकांनीं दोन-तीन वेळां जिंकून घेतलें होतें. लोकसंख्या २,६२,६२४ आहे.

**नाटेकर, बाळकोबा** (१८५५-१९१०)—महाराष्ट्रांतील एक प्रख्यात गवई व किर्लोस्कर कंपनींतलि आद्य व प्रमुख नट. यांनीं शाकुंतल नाटकांत कण्व, आणि सौभद्रांत नारद व कृष्ण या भूमिकांत उत्तम प्रकारचें नैपुण्य दाखविलें. विशेषतः कृष्ण व कण्व या परस्परविरोधी भूमिका ते उत्तम वठवीत असत. नाटेकर, वाघोलीकर व किर्लोस्कर या तिघांनीं मिळून महाराष्ट्रांत जी संगीतपरंपरा निर्माण केली, ती अतिशय लोकप्रिय झाली आणि नाट्यकलेला प्रौढपणा व भारदस्तपणा येऊन नामांकित गवईनाटक मंडळींत जाणें कमीपणाचें मानीत नाहींसे झाले.

**नाट्यप्रयोगाचा कायदा**—( ड्रॅमॅटिक परफॉर्मन्स ॲक्ट ). हा कायदा १८७६ सालीं मंजूर होऊन १९१४ व १९२० सालीं त्यांत दुरुस्त्या झाल्या. हा करण्याचा हेतु असा कीं, बेअब्रूकारक, राजद्रोहात्मक, अश्लील किंवा कुटाळकीचे नाट्यप्रयोग जाहीरपणें करूं न देणें. अशा प्रकारच्या नाट्यप्रयोगाला बंदी पोलिस-मॅजिस्ट्रेट किंवा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांनीं करावी ( कलम ३ ). अशा बंदीचा मनाईहुकूम नाट्यप्रयोगाच्या जागेच्या मालकावर बजावावा, आणि नाट्यप्रयोगांत कामें करणाऱ्यांना कळविण्याकरितां मनाईहुकुमाची प्रत जाहीर ठिकाणीं लावावी. हा हुकूम मोडून नाट्यप्रयोग केल्यास जागेच्या मालकाला तीन महिने कैद किंवा दंड, किंवा दोन्ही शिक्षा आहेत; आणि नाट्यप्रयोगांत काम करणारांना वरीलप्रमाणेंच शिक्षा आहे. असा प्रयोग होण्याचा संभव असेल त्या जागेंत शिरून तेथील सीनसीनरी, कपडेलत्ते व इतर सामान पोलिसकडून जप्त करण्याचा अधिकार मॅजिस्ट्रेटला आहे ( कलम ८ ). हा कायदा लागू करून लायसेन्स घेतल्याशिवाय प्रयोग करूं नये, आणि नाटकांची छापील किंवा हस्तलिखित प्रत मॅजिस्ट्रेटला प्रयोगाच्या अगोदर निदान तीन दिवस द्यावी, असा जाहीरनामा सरकारी गॅझेटमध्यें प्रांतिक सरकारनें प्रसिद्ध करावा ( कलम १० ). जत्रा व धार्मिक उत्सव यांना हा कायदा लागू नाहीं ( कलम १२ ).

**नाडगौडा**—नाड म्हणजे प्रांत, आणि गौडा-गांवडा म्हणजे अधिकारी. हा कानडी शब्द आहे. चोल साम्राज्यांत असे नाड ( प्रांत ) अनेक होते. तेथील अधिकारी नाडगौडा हा महाराष्ट्रांतील देशमुख-देशपांडे यांच्या दर्जाचा असे, व त्याला चौथाईच्या शेंकडा तीन टके इतकी रक्कम हक्काबाबत सरकारां-

तून मिळे; तिला 'नाडगौडी' म्हणत. नाडगौडाचा अधिकार खुद्द छत्रपती देत, व तो वाटेल त्याला मिळे व वाटेल तेव्हा काढून घेतां येई; हा हक्क वंशपरंपरेचा नसे.

**नाणकशास्त्र**—नाणीं, पदकें आणि शिक्के यांसंबंधींचें हें शास्त्र आहे. पूर्वी आणि आतां नाणीं कशीं पाडीत व कोण-कोणाचीं कशा प्रकारचीं व काय किंमतींचीं असत याचा इतिहास यांत दिलेला असतो. वैदिककालीं निष्क असा नाण्याला शब्द आढळतो. ग्रीक नाणीं ख्रि. पू. ८ व्या शतकापासूनचीं आहेत. चीनमध्येंहि याच वेळीं नाणीं होतीं असें दिसतें. नाण्यांवर प्रथम देवतांचीं व पवित्र प्राण्यांचीं चित्रें काढीत; पुढें राजांचे मुखवटे येऊं लागले. अलेक्झांडर आणि ज्यूलियस सीझर यांचे चेहरे नाण्यांवर पाहावयास मिळतात.

इतिहास समजण्याच्या कामीं नाण्यांचें विशेष महत्त्व आहे. प्राचीन लोकांतील कलाहि यांवरून समजते. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास पुष्कळसा सांपडलेल्या नाण्यांवरून तयार झाला आहे. अद्यापिहि ठिकठिकाणीं निरनिराळ्या जमिनीच्या थरांतून जुनीं नाणीं सांपडून इतिहासावर नवा प्रकाश पडत आहे.

सध्यां उपलब्ध असलेल्या नाण्यांत अत्यंत प्राचीन नाणीं ख्रि. पूर्व सातव्या शतकांत ग्रीक लोकांनीं पाडलेलीं होत. नाण्यांचे ठोकळ मानानें तीन वर्ग पाडण्यांत येतात : (१) प्राचीन ग्रीक व रोमन नाणीं; (२) मध्ययुगीन व अर्वाचीन कालांतील नाणीं; व (३) प्राच्य नाणीं. ग्रीक नाण्यांचा काल ख्रि. पूर्व ७०० पासून इ. स. २६८ पर्यंत म्हणजे जवळजवळ हजार वर्षांचा ठरतो. अथेन्समधील सामान्य 'टेट्रॅड्रॅकम्' या नाण्याच्या पुढील बाजूवर अथेनी देवतेचें मस्तक असून मागील बाजूस त्याच देवतेचा प्रिय असा घुबड पक्षी किंवा ऑलिव्हची खांदी दिसून येते. गॉल देशांत चार वर्गांचीं नाणीं आढळून येतात. इटलींतील प्राचीन नाणीं ६ व्या शतकाच्या आरंभापासून नंतरच्या ५०० वर्षांच्या कालांत पाडलेलीं दिसतात. रोमन सत्तेच्या विस्तारानंतर सर्व इटलीमध्यें रोमन नाणीं सर्रास चालू झालीं. सिसिलीच्या मुख्य नाण्याचें नांव टेरॅड्रॅकम (ड्राम) आहे. ह्या नाण्यांचा एक विशेष असा आहे कीं, बहुतेक सर्व नाण्यांवर कारागिरांच्या सह्या असून हें कौशल्य जडावकाम करणारांचें दिसतें.

ग्रेसमधील नाणीं अत्यंत चित्ताकर्षक आहेत. येथील अत्यंत जुनीं नाणीं ख्रि. पूर्व ५ व्या शतकांतील आहेत. मॅसिडोनियांतील अत्यंत जुनीं नाणीं रुप्याचीं व कांशाचीं असून ख्रि. पू. ४ थ्या शतकाच्या मध्यकालापासून सोन्याचींहि नाणीं दिसून येतात. थेसली येथील नाण्यांवर घोडा व घोडेस्वार यांचे ठसे सर्वसामान्य आढळून येतात. कांहींवर ओक वृक्षाचें शिरोभूषण घातलेलें 'झ्यूस' देवतेचें मस्तक, किंवा युद्ध करीत असलेल्या अथेना इटोनिया या देवतेचें चित्र कोरलेलें आढळतें.

अथेन्स—अथेनियन नाणकपद्धति सोलन यानें अमलांत आणली असून प्रारंभींचें डिट्रॅकम युबोइक धर्तीचें असूनहि अथेनियन नाण्यांच्या प्रसिद्धीमुळें त्यांनाहि ॲटिक हें नांव मिळालें. कॉरिंथमध्यें एक निराळीच नाणकपरंपरा अस्तित्वांत आली. क्रीट बेटांतील अत्यंत प्राचीन नाणीं ख्रि. पू. ५०० च्या सुमाराचीं आहेत.

*आशिया खंडांतील नाणकसंप्रदायाचा आरंभ आशियामायनर* प्रांतांतील नाण्यांपासून होतो. (१) सोनें व इलेक्ट्रमचीं प्राचीन नाणीं, (२) लीडियन् व ग्रीक नाणीं, व (३) नंतरचीं इलेक्ट्रम, सोनें व रुपें यांचीं नाणीं, हे तीन नाण्यांचे वर्ग आहेत. आयोनिया येथील नाणीं ख्रि. पू. ७००–५४५ च्या काळांत पाडलीं गेलीं. ह्यांपैकीं मुख्य महत्त्वाचीं नाणीं म्हणजे सोन्याचें ड्रॅकम् व टेट्रॅड्रॅकम् यांवर अपोलो देवतेचा दोन प्रकारचा मुखवटा खोदलेला असून त्याखालीं आशियांतील सुप्रसिद्ध शिल्पकार थिओडोटस् ह्याची सही आहे. इफेसस् येथील नाण्यांवर मधमाशीचा ठसा असून, कधीं कधीं काळवीट किंवा 'अर्टेमिस्' देवदेचा मुखवटा कोरलेला असतो. लीसियामधील नाण्यांवरील शिल्प ठराविक असून त्यावर निरनिराळ्या प्राण्यांचें आकार, व कांहींवर स्वस्तिकासारखीं त्रिकोणी चिन्हें आढळतात. जेरूसलेम येथील नाण्यांमध्यें, सातवा ॲंटिओकस याची कमळाची आकृति असलेलीं नाणीं, मॅकॅबिअन यांनीं पाडलेलीं नाणीं, रोमन वकिलांचीं नाणीं अशीं विविध नाणीं आहेत.

आफ्रिकेंतील नाणीं—आफ्रिकेंतील ग्रीक नमुन्याची 'सिरेनैका' नाणकपरंपरा ७ व्या शतकांत बॅटस वंशांत सुरू होऊन पुढें रोमन बादशहा ऑगस्टसपर्यंत हीं नाणीं चालू होतीं.

रोमन नाणीं—अत्यंत प्राचीन रोमन नाण्यांचा आरंभ ख्रि. पू. ४ थ्या शतकांतील मध्यापासून होतो. अतिप्राचीन दिनारी, क्विनारी व सेस्टरेटी ह्या नाण्यावर रथांत बसलेल्या डायना देवतेचें चित्र आढळतें. ऑगस्टस बादशहानें (ख्रि. पू. १६–१५) सोन्याचीं नाणीं बादशहानेंच पाडावयाचीं व रोमन सीनेट सभेनें फक्त कांशाचीं नाणीं पाडावयाचीं अशा अटी ठरविल्या.

मध्ययुगीन व पश्चात्कालीन युरोपियन नाणीं—बायझंटाइन नाणीं (इ. स. ४८१–५१८) तिन्ही धातूंचीं आहेत. ह्यांचे ठसे बहुतेक धार्मिक आहेत. जुन्या नाण्यांच्या मागील बाजूवर क्रॉस हातांत धरलेली विजयदेवता आहे. १५१८ सालीं जर्मनीमध्यें डॉलर नाणें पाडण्यास सुरुवात झाल्यापासून चांदीच्या नाण्यांना सार्वत्रिक महत्त्व आलें. सध्यांचें स्पेनमधील प्रमुख चलन 'पेसोटा' नांवाचें असून तें सोनें व रुपें ह्या दोन्ही

युरोपांतील नाणीं ( पृ. १३०४ )

निकाराग्वा — कोपन येथील शिल्पस्तंभ ( पृ. १३३

१. अथेन्सचा चतुर्द्राम ( ख्रि. पू. ५ वे शतक )
२. लिसिमॅकसचा चतुर्द्राम.
३. क्रीसस ( ख्रि. पू. ५६८–५५४ ) याचें सोन्याचे स्टेटर नाणें.
४. अलेक्झांडर दि ग्रेट याचें सोन्याचे स्टेटर नाणें.
५. ज्यूलिअस सीझर ( ख्रि. पू. ४४ ) याचें दिनार नाणें.
६. ऑक्टेव्हिअन ऑगस्टस ( सु. ख्रि. पू. ३६ ) याचें दिनार नाणे.
७. मार्कस ब्रूटस ( ख्रि. पू. ४२ ) याचे दिनार नाणें.
८. क्लाडिअसचे सोन्याचें नाणें.
९. ओफाची ॲंग्लो-सॅक्सन पेनी.
१०. आल्फ्रेडची ॲंग्लो-सॅक्सन पेनी.
११, १२. स्टीफनच्या अमलांतील अर्ध पेनी व पेनी.
१३. पहिल्या एडवर्डची पेनी.
१४. तिसऱ्या एडवर्डचें अर्धा नोबल नाणे.
१५. एलिझाबेथ राणीचा अर्धा सॉव्हरीन.

दौलताबाद — देवगिरी किल्ला ( पृ. १२२० )

धातूंचें पाडण्यांत येतें. फ्रान्स—फ्रान्समधील सांप्रतचें प्रमाणभूत चलन 'फ्रॅन्क' नाणें असून तें सोनें व रुपें या दोन्ही धातूंमध्यें पाडलें जातें. ग्रेट ब्रिटन—इंग्लंडमध्यें चांदीचें 'पेनी' नाणें प्रथम मर्सियाचा राजा ओफा यानें स. ७५७ च्या सुमारास प्रचारांत आणलें. इंग्लिश चलनाचा अत्युत्कृष्ट नमुना म्हणजे दुसऱ्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत पाडलेला 'पिटिशन क्राउन' होय. स्कॉटलंड व आयर्लंड या दोन्ही देशांत इंग्लंडचें नाणेंच सुरू आहे. बेल्जिअमच्या नाण्यांचा आरंभ ११ व्या शतकापासून झाला आहे. १८३२ सालीं बेल्जिअमनें पूर्णपणें फ्रेंच नाणकपद्धतीचा स्वीकार केला. सध्यांचीं स्वित्झर्लंडमधील नाणीं निकेलचें 'सेंटिम' व सोन्याचांदीचें 'फ्रँक' हीं होत. इटली व सिसिली—१८६५ सालीं तेथील प्रमाणभूत चलन, १०० सेंटिसिमीची किंमत असलेलें फ्रँकच्या बरोबरीचें 'लियर' नामक नाणें हें ठरविण्यांत आलें. अर्थातच हें नाणें सोनें, चांदी व कांसें या तिन्ही धातूंमध्यें पाडण्यांत येतें. जर्मनी—इ. स. १८७१ पासून जर्मन साम्राज्याच्या चलनाची बरीच पुनर्घटना करण्यांत आली. येथील 'क्राउन', 'डबल क्राउन', वगैरे सर्व नाण्यांच्या मागील बाजूस साम्राज्याचें चिन्ह गरुड पक्ष्याचें चित्र असून पुढील बाजूस राज्यावर असलेल्या राजा व राणी यांचे मुखवटे असत. ऑस्ट्रिया—ऑस्ट्रियन सोन्याच्या नाण्यांवर बादशहाचा मुखवटा व दोन शीर्षांचा गरुड याचें चित्र असतें. रशिया—प्राचीन रशियन नाण्यांचा आरंभ १० व्या शतकाच्या अखेरीस होतो. इ. स. १८८५ च्या पूर्वीच्या रशियन 'रूबल' नाण्याचें वजन २७८ ग्रेन होतें. तें १०० ग्रेन करण्यांत आलें. ह्या सोन्याच्या व चांदीच्या नाण्यावर पूर्वी बादशहाचा मुखवटा व गरुड असे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें—१८७३ सालीं सोन्याचा 'डॉलर' पाडला जाऊन त्याची किंमत २५.८ ग्रेन करण्यांत आली.

पौरस्त्य नाणीं—या नाण्यांचे एकंदर चार वर्ग पाडण्यांत येतात. प्राचीन इराणी व अरबी नाणीं—येथील 'डेरिक' हीं सोन्याचीं नाणीं पाडण्याचा अधिकार राजाचा असून 'सिग्लॉस' हीं चांदीचीं नाणीं प्रांताधिकाऱ्यांकडून पाडण्यांत येत. खरें मुसलमानी नाणें बसरा येथें ६६० सालीं 'अली' नामक खलिफानें पाडलें. मध्ययुगीन इराणी नाणीं व अफगाणी नाणीं—इराणच्या शहांनीं पाडलेल्या नाण्यांचा आरंभ स. १५०२ मध्यें राज्य करीत असलेल्या इस्माइलपासून होतो. इराणी सोन्याचें नाणें 'टोमन' हें असून त्याची किंमत १० क्रॉनबरोबर आहे. व चांदीचें 'क्रोन' नाणें तांब्याच्या २० शाही नाण्यांबरोबर आहे. चिनी, जपानी व इतर पौरस्त्य नाणीं—चीनमधील प्राचीन कांशाच्या नाण्यावर कुदळी, सुऱ्या, इत्यादि हत्यारांचीं चित्रें कोरलेलीं दिसतात. येथें ९ व्या शतकांत कागदी चलनाचा उपयोग करण्यांत आला. स. १८६६ मध्यें हाँगकाँग बंदरीं अमेरिकन संयुक्त संस्थानांच्या धर्तीवर चांदीचा 'ट्रेड डॉलर' पाडण्यांत आला. ह्या नाण्याच्या पुढील बाजूवर हातांत त्रिशूळ व ढाल घेतलेली 'ब्रिटानिया' व मागील बाजूस चिनी व मलाया भाषेंत नाण्याचें नांव आहे. जपान—येथें धातूंच्या चलनास पांचव्या शतकांत आरंभ झाला. सोळाव्या शतकाच्या शेवटीं म्हणजे 'टेनशू' कालांत सोनें, रुपें, तांबें व लोखंड ह्यांचें सुव्यवस्थित चलन सुरू करण्यांत आलें. सध्यांच्या सर्व नाण्यांच्या पुढील बाजूवर 'ड्रॅगन'चें चित्र असून मागील बाजूस फुलांची माळ व किंमतीची खूण असते. कोरियाची प्राचीन नाणीं चिनी पद्धतीची असून सन १९०५ पासून जपानी पद्धतीबरहुकूम नवीं नाणीं पाडण्यांत आलीं.

भारतीय नाणीं—हिंदुस्थानांत प्राचीन कालीं प्रसिद्ध किंवा माहीत असलेल्या नाण्यांचे मुख्यतः तीन विभाग पडतात: (१) प्राचीन भारतीय नाणीं; (२) उत्तरेकडील म्हणजे ज्या नाण्यांवर परकीय पद्धतीचा बराच परिणाम झाला अशीं; व (३) दक्षिणेकडील म्हणजे जीं नाणीं निव्वळ हिंदुस्थानांतील पद्धतीलाच अनुसरून काढलीं अशीं.

हिंदुस्थानांतील सर्वांत जुनें नाणें मनुस्मृतींत वर्णिलेल्या भारतीय (किंवा संस्कृत) पद्धतीस अनुसरून आहे व त्याच्यावर परकीय पद्धतीचा परिणाम झालेला दिसत नाहीं. या पद्धतीचें मूलमाप, रति (रक्तिका) अथवा गुंज हें होय. ८० रतींचें सोन्याचें नाणें (सुवर्ण = १४६ ग्रेन अथवा ९.४८ ग्रॅम) याचा नमुना कोठें आढळत नाहीं. परंतु ३२ रतींचें चांदीचें पुराण अथवा धरण व ८० रतींचें तांब्यांचें कार्षापण यांचे नमुने हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं सांपडले आहेत. ख्रि. पू. दुसऱ्या शतकामध्यें वायव्येकडून आलेल्या ग्रीक वसाहतवाल्यांमुळें या पद्धतींत बराच फरक पडला; परंतु हिंदुस्थानांतील इतर भागांमध्यें मात्र हीच पद्धत चालू राहिली. या नाण्यांचा आकार साधारणतः समचौकोन किंवा लांबट चौकोन असून तीं जवळजवळ धातूंचे विशिष्ट वजनांचे तुकडेच होत.

हिंदुस्थानांतील प्राचीन परकीय नाणीं—प्राचीन इराणी नाणीं एकिमेनियन साम्राज्याच्या (ख्रि. पू. ५०० ते ३३१) अमदानींत पंजाबांत आलीं. सोन्याचीं दोन्ही बाजूंनीं मुद्रित अशीं स्टॅटर नाणीं ख्रि. पू. ४ थ्या शतकांत हिंदुस्थानांत पाडलीं गेलीं. चांदीच्या सिग्लोइ नाण्यांपैकीं बऱ्याच नाण्यांत व ठसेमुद्रित भारतीय नाण्यांत पुष्कळसें साम्य आहे. अगदीं प्रथमतः व्यापाराच्या व्यवहारांत अथेन्सचें 'औल्स' नांवाचें नाणें हें पूर्वेकडे गेलें; आणि अथीनियन टांकसाळींतून पुरवठ्याचा जेव्हां तुटवडा पडूं लागला (ख्रि. पू. ३२२ च्या

अगोदर एक शतकापासून ) तेव्हां उत्तर हिंदुस्थानामध्यें त्या नाण्यासारखीं नाणीं होऊं लागलीं. हिंदुस्थानांतील समचौकोनी आकाराचीं तांब्याचीं कांहीं नाणीं बहुतकरून अलेक्झांडरनेंच पाडलीं असावीं. सेल्यूकसच्या पूर्वेकडील स्वाऱ्यांपासून सिरियामधील सेल्यूकसचें राज्य व उत्तर हिंदुस्थानांतील मौर्यांचें साम्राज्य यांमध्यें सारखें दळणवळण सुरू झालें, ही गोष्ट अशोकाच्या शिलालेखांमध्यें ग्रीक राजांचीं नांवें आलीं आहेत यावरून सिद्ध होतें. उत्तर हिंदुस्थानांतील नाण्यांचें रूप व आकार यांमध्यें विशेष असा फरक डायोडोसनें स्थापिलेल्या बॅक्ट्रियाच्या राज्याच्या अमलामुळेंच झाला. रोमन नाणीं दक्षिण व उत्तर हिंदुस्थानामध्यें पुष्कळ सांपडतात. ५ व्या शतकापासून एकीकडे राजाचा मुखवटा व दुसरीकडे अग्निकुंड असा सस्सानियन नाण्याचा नमुना हिंदुस्थानांतील कांहीं भागामध्यें रूढ झाला व तो कित्येक शतकेंपर्यंत चालला. डिमिट्रियसच्या नांवाचें एक नाणें असून तें ग्रीक व हिंदुस्थान यांच्या नाण्यांच्या पद्धतींतील एकीकरण दर्शविणारें पहिलेंच उदाहरण आहे. हीं नाणीं समचौकोन असून त्यांवर एका बाजूला दुसऱ्या बाजूवरील ग्रीक लेखांचें खरोष्ठी लिपीमध्यें भाषांतर आहे. यूक्रेटाइडीस याच्या हिंदुस्थानावर स्वाऱ्या खि. पू. १९०–१६० या कालामध्यें झाल्या. त्याचीं नाणीं बल्ख, सीस्तान, काबूल व क्वचित् पंजाब या ठिकाणीं सांपडतात. ग्रीक हिंदुस्थानी नाण्यांवरील काल समजण्याला प्लेटोचे टेट्रॅड्रॅम् पदक हें एक महत्त्वाचें साधन आहे. त्यावर सेल्युसिड् शकाचें १४७ वें वर्ष ( खि. पू. १६५ ) हा काल आहे. पँटालिऑन अँगॅथोक्लिस् हे यूक्रेटाइडीनच्या वेळेस होते आणि यांचीं नाणीं काबूल व पश्चिम पंजाब या प्रांतांत सांपडतात. हेलिओक्लिस ( खि. पू. १६०–१२० ) या राजाच्या कारकीर्दीत पुष्कळ ग्रीक राजांनीं बॅक्ट्रिया व हिंदुस्थान या दोन्ही देशांवर राज्य केलें होतें, आणि त्यांनीं ग्रीक अक्षरांनीं मुद्रित बॅक्ट्रियन कारागिरीचीं नाणीं, आणि द्विभाषामुद्रित हिंदुस्थानी कारागिरीचीं नाणीं अशीं दोन्ही प्रकारचीं नाणीं पाडलीं होतीं. हिंदुस्थानांतील शकांच्या पूर्वीच्या नाण्यांवर पार्थियन चिन्हें आहेत याचें कारण बहुधा त्यांची ही मैत्रीच असेल.

हिंदुस्थानांत शकांपैकीं सर्वांत पहिलें घराणें मॉएस किंवा मोगाचें आहे. तक्षशिला येथें तांब्याच्या पत्र्यावर भोज नांव आहे तें व हे नांव बहुतकरून एकच असावें आणि त्याचा काल खि. पू. १२० वर्षांपूर्वीचा असावा. मॉएसच्या घराण्याचीं नाणीं फक्त पंजाबमध्यें सांपडतात, त्यावरून असा तर्क निघतो कीं, शकांची ही जात हिंदुस्थानांत काराकोरम घाटानें शिरून काश्मीरमधून पंजाबमध्यें आली. मथुरेचे सत्रप हे बहुधा खि. पू. ५० पासून खिस्ती शकाच्या आरंभापर्यंत होते. त्यांच्या इतिहासावर मथुरेंतील सिंहाच्या मूर्तीवरील लेख व इतर नजीकचे शिलालेख यांनीं बराच उजेड पडतो. पहिला सत्रप रंजुबुल हा ग्रीक राजा दुसरा स्ट्रेटो याच्या नाण्यांसारखें नाणें पाडीत असे. पुढील सिथिक राजांचीं नाणीं पहिल्या शतकांतील उत्तर भागांतलींच असावींत. मॉएस नाण्याची कारागिरी व वरील चित्र हीं हिरकोडिसच्या नाण्यांच्यासारखींच आहेत.

काशगरच्या आसमंतात् कांहीं तांब्याचीं नाणीं सांपडलीं आहेत व त्यांच्यावर खरोष्ठी व चिनी लिपींतील अक्षरें आहेत. हिमालयांत अल्मोरा जिल्ह्यांत तीन प्रकारचे नमुने आढळले आहेत. रुपें व इतर कांहीं धातू यांच्या मिश्रणांपासून नाणीं बनविलेलीं दिसतात, व हिंदुस्थानांतील इतर नाण्यांपेक्षां तीं जड आहेत.

अपरान्त— या नाण्यांवर ‘ महाराजस अपलातस ’ हीं अक्षरें आहेत. आर्जुनायन– हीं नाणीं वरील नाण्यांच्या वर्गांतलींच आहेत. या नांवाचा उल्लेख अलाहाबाद येथील समुद्रगुप्ताच्या स्तंभावरील शिलालेखांत सांपडतो. औदुम्बर अथवा ओदुम्बर ह्याचा काल खि. पू. १०० वर्षें असावा. अयोध्या येथील जुनाट नाणीं केवळ ओतींव तुकडेच आहेत. त्यांचा काल बहुधा खि. पू. २०० वर्षें हा असावा. बुल्हरनें दाखविल्याप्रमाणें बारान या गांवाचें पहिलें नाव वरण होतें. हा गोमित्र व मथुरेच्या राजांपैकीं एक गोमित्र हे एकच समजले जातात. मध्यप्रांत, सागर, प्रदेशांतील या शहरांत सांपडलेलीं नाणीं एरण-ऐरकिन म्हणजे शुद्ध भारतीय नाण्यांचा नमुना म्हणून प्रसिद्ध आहेत. जनपद अशीं अक्षरें लिहिलेल्या नाण्यांबद्दल कांहीं समाधानकारक माहिती नाहीं. राजसत्ता असा त्यापासून अर्थ निघतो असें कित्येकांचें म्हणणें आहे. कोसाम्बी किंवा वत्स-पट्टण हीं नाणीं खि. पू. ३ ऱ्या शतकांतील असावींत. कुनिंद—सतलजच्या दोन्हीं बाजूंवरील डोंगराळ प्रदेश हा कुनिंदाचा प्रांत असावा. या नाण्याचे दोन निरनिराळे काल होते. ‘ मालवानां जय ’ अशीं अक्षरें असलेलीं नाणीं पूर्वीं जुनीं म्हणून समजलीं जात. मथुरेच्या आसपास खि. पू. निदान तिसऱ्या शतकापूर्वीचें एक जुनाट नाणें सांपडलें, त्यावर उपातिक्या हीं अक्षरें ब्राह्मी लिपीमध्यें आहेत. बलभूतींच्या नाण्यांवर खि. पू. २ ऱ्या शतकांतील ब्राह्मी लिपीचीं अक्षरें आहेत. बलभूतींचीं नाणीं व वहसतिमिताची ( सं. बृहस्पतिमित्र ) नाणीं यांच्यावर एक चैत्य वृक्ष आहे आणि त्यांच्यावरील अक्षरें सारखीं आहेत. पंचाल हीं नाणीं ‘ शुंग ’ किंवा ‘ मित्र ’ घराण्यांतील राजांनीं पाडलीं असें समजतात. या पंचाल नाण्यांवर ब्राह्मी अक्षरें आहेत.

ओरिसांतील पुरीमध्यें आणि त्यालगतच्या मद्रासमधील गंजम जिल्ह्यांत ब्राँझ ( कांसें ) धातूचीं कांहीं चमत्कारिक नाणीं

सांपडतात. त्यांच्यावर नांवनिशी कांहीं नाहीं; परंतु एका बाजूवर राजाची उभी मूर्ति आणि दुसऱ्या बाजूवर कोणत्या तरी देवतेची मूर्ति असते. सिबी हे चितोडच्या आसपासचे रहिवासी असून यांचीं नाणीं चितोडजवळ नगरी येथें सांपडतात.

ठशानीं नाणें पाडण्याची कला हिंदुस्थानांत तक्षशिलेस प्रथम माहीत झाली. या तक्षशिलेंतील समचौकोनी नाण्यांप्रमाणें, ग्रीक राजे पँटालिआन् व ॲगॅथोक्लिस (ख्रि. पू. १९०) यांनीं तांब्याचीं नाणीं पाडलीं; यांच्यावर दोन्ही बाजूंना ठसे होते. उज्जनीच्या पूर्वीच्या नाण्यांवर ख्रि. पू. २ ऱ्या शतकांतील ब्राह्मी लिपीमध्यें 'उजेनिया' असें नांव आहे. हल्लींचे भावलपूरचे जोहिये व यौधेय एकच असें समजतात. लहान व मोठीं तांब्याचीं नाणीं असे दोन भाग यांच्या नाण्यांचे पडतात. मोठ्या नाण्यावर सहा डोक्यांच्या देवतेचा–कदाचित् कार्तिकेयाचा–ठसा आहे.

इंडो–पार्थियन या घराण्यांतील गोंडोफेरीज हा पुरुष फार सुप्रसिद्ध झाला. गोंडोफेरीजच्या अगर त्याचा पुतण्या ॲब्दॅगेसीस यांच्या वेळच्या सुमारास त्यांचे तक्षशिलेच्या आसपास सुभेदार किंवा मांडलिक असलेले सस्सन, सपेदन, सतवस्त्र, इत्यादि राजांचीं रुप्याचीं नाणीं तक्षशिला येथील उत्खननांत अलीकडे उघडकीस आलेलीं आहेत. कुजुल कडफिसेसचें व हरमियसचें राज्य कुशानांनीं कसें घेतलें याचा पुरावा नाण्यांवरून मिळतो. पंजाब, कंदाहार व काबूल या ठिकाणीं सर्वत्र एका निनांवी राजाचीं पुष्कळशीं नाणीं सांपडतात. तो निनावी राजा जी खूण वापरतो तीच खूण हिमकडफिसेस व त्याच्यानंतरचे राजे यांचीहि आहे. एका नाण्यावर एका बाजूस दोन तोंडें असलेला मुखवटा आहे व एका तोंडापुढें निनांवी राजाचें व दुसऱ्यापुढें हिमकडफिसेसचें अशीं चिन्हें आहेत. हा निनांवी राजा व विक्रमादित्य हे एकच असाहि कित्येक संशोधकाचा तर्क आहे. हिमकडफिसेस यानेंच सुवर्णाचीं नाणीं प्रथम काढलीं व पुढें उत्तर हिंदुस्थानचीं मालकी गुप्तांकडे आल्यावर त्यांनींहि तीच पद्धत चालू ठेवली.

कनिष्क व हुविष्क यांचीं नाणीं फार महत्त्वाचीं आहेत. त्यांच्यावरून त्या काळीं पाहिजे त्या धर्मांतील पाहिजे तीं मतें व दैवतें घेण्याचें धर्मस्वातंत्र्य दिसून येतें, कारण त्यांच्या नाण्यांच्या उलट्या बाजूवर ग्रीक व सिथिक देवांच्या आणि बुद्धाच्या प्रतिमा आहेत. इ. स. १८० नंतर कुशानांचीं सुवर्णाचीं व तांब्याचीं नाणीं चालू राहिलीं. परंतु ग्रीक लेखांवरून यानंतर कांहीं माहिती मिळूं शकत नाहीं. सिथो–सस्सानियन पॅरोपेनिससच्या उत्तरेकडील ऑक्सस वरील प्रांतांतून बहुधा हीं नाणीं येतात; परंतु तीं काबूलमध्येंहि केव्हां केव्हां सांपडतात.

चिनी ग्रंथांवरून असें दिसतें कीं, किदार कुशान हे उत्तरेकडे सिंधूच्या पश्चिमेला चित्रळ व गिलजित यांमध्यें व पूर्वेस परस्वली व काश्मीर यांमध्यें गेले; त्यांचीं नाणीं काश्मीरमध्यें सांपडतात. किदार कुशानच्या नाण्यांच्या एका बाजूला एक बसलेली देवता आहे. सुराष्ट्राच्या सत्रप नाण्यांवरील सन रुद्रदामनच्या जुनागड येथील शिलालेखांतील ७२ व्या वर्षापासून सुरू होतात. पुराणांतील घराण्यांच्या यादीवरून व नाशिक येथील शिलालेखांवरून आभीर राजांचीं नावें आपणांस समजतात. यांचीं नाणीं आहेत. आंध्र नाण्यांचे दोन मुख्य वर्ग असून दोन्हींवर तींच नांवें आहेत. हीं सर्व नाणीं शिशाचीं किंवा तांब्याच्या विशिष्ट मिश्रणाचीं आहेत. या नाण्यांपैकीं तिसरा वर्ग सोपारा येथील स्तूपांत सांपडला. तीं नाणीं रुप्याचीं आहेत. या नाण्यांवर "सिरियञ गोतमीपुत्त सातकणि" हीं अक्षरें आहेत.

चंद्रगुप्ताच्या सुवर्ण नाण्यांवरील एका बाजूवर 'लिच्छवयः' हीं अक्षरें व त्याची राणी कुमारदेवी हिचें नांव आहे. सार्वभौम गुप्तांच्या राज्यातील मुख्य भागांतील नाणीं प्रथमतः सुवर्ण व तांबें यांचीं होतीं. सत्रपाचें राज्य आपल्या राज्याला जोडल्यानंतर गुप्तांनीं वर सन असलेलें असें एक रुप्याचें नाणें त्या राज्यांत चालू केलें. त्याच्या एका बाजूवर चैत्याऐवजीं गुप्तांचें नेहमींचें चिन्ह मोर याचें चित्र आहे. मध्यप्रदेशांतील नाणीं जाडीला कमी व अधिक सपाट असून अधिक काळजीपूर्वक केलेलीं आहेत. पुढील नाणीं कोणत्या वेळच्या गुप्त राजांचीं हें समजत नाहीं—(१) वीर (सेन किंवा सिंह) क्रमादित्य हें नांव असलेलीं सोन्याचीं नाणीं; काल बहुधा इ. स. ८ वें शतक; त्यांचें वजन १६०–१७० ग्रेन आहे. (२) जय (गुप्त) याचीं सोन्याचीं नाणीं. (३) रुप्याचीं नाणीं (काल १६६–इ. स. ४८५); त्यांच्यावर श्रीहरिकान्त हीं अक्षरें आहेत. पुराणामध्यें पद्मावतीचे पवायां (ग्वाल्हेर संस्थान) नाग व मगधाचे गुप्त यांची सांगड घातली आहे. या घराण्यांतील सहा पुरुषांचें पूर्ण नांव नाण्यांवर आढळतें, परंतु दुसऱ्या दोघांचीं फक्त पुसट पुसट नांवेंच दिसतात. वरील नाण्यासारखींच दुसरीं कांहीं नाणीं आहेत व त्यावर 'अच्यु' हीं अक्षरें आहेत. 'रात्रहस्ति' हीं अक्षरें वर असलेलीं कांहीं नाणीं पारिव्राजक महाराज हस्तिन् यानें पाडलीं असावीं. पुष्कळ प्रकारचीं अशीं हूण नाणीं सांपडतात कीं, त्यांच्यावर जीं पूर्ण किंवा अर्धवट नांवें असतात तीं दुसरीकडे कोठेंहि आढळत नाहींत.

हूणांच्या नाण्यांची कालमर्यादा इ. स. ५४४ पर्यंत आहे. कनोज–(कान्यकुब्ज) कनोजच्या मध्यकालीन राज्यांतील पुढील घराण्यांपैकीं राजांचीं नाणीं उपलब्ध आहेत: (१) रघु-

वंशी घराणें— श्रीमदादिवराह हीं अक्षरें असलेलीं रौप्य नाणीं भोजदेवानें पाडलीं होतीं (इ. स. ८५०–९००). (२) तोमर घराणें व राठोड घराणें यांचीं नाणीं एकाच सांचाचीं आहेत. (३) राठोड (गढवाल) व (४) मगधाचें पाल घराणें. काश्मीरच्या हर्षाच्या कांहीं सुवर्ण नाण्यांवर (इ. स. १०९०) दक्षिण हिंदुस्थानांतील नाण्यांची हुबेहुब नक्कल केली आहे.

नेपाळचीं अत्यंत प्राचीन नाणीं तांब्याचीं आहेत. दिल्ली व अजमीर येथील चव्हाणांच्या ज्या नाण्यांवरील नांवें नीट वाचतां येतात तीं शेवटचे दोन राजे सोमेश्वर व पृथ्वीराज (इ. ११६२ ते ११९६) यांचीं आहेत. चव्हाणांच्या नाण्यांचा सांचा 'बैल व घोडेस्वार' हाच आहे. कांगडा येथील राजांच्या नाण्याचा काल बहुधा इ. स. १३३० ते १६१० यांमधील असावा. बरींच अनिश्चित व अनामक नाणीं सांपडतात. सतलजपासून पूर्वेकडे व हिमालयापासून दक्षिणेकडे नर्मदेपर्यंत खालीं दिलेल्या तीन प्रकारचीं नाणीं पुष्कळच सांपडतात: (१) सस्सानियन तऱ्हेचीं पातळ रुप्याचीं नाणीं; (२) सस्सानियन सांचांतून काढलेलीं रुप्याचीं जाड नाणीं; (३) अतिशय ओबडधोबड कारागिरीचीं तांब्याचीं नाणीं.

दक्षिण हिंदुस्थानांतील नाणीं—पांड्य देशांतील नाण्यांचा आकार समचौकोनी असून एका बाजूवर हत्तीचा छाप किंवा सांचा आहे. सर्व पांड्यांचें, नंतरचें चिन्ह जो 'मासा' तो वर असलेलीं सोन्याचीं नाणीं इ. स. ७–१० या शतकांतील असावींत असें म्हणतात. केरळ या प्रांतावर राज्य करणाऱ्या घराण्याचें एक नाणें ब्रिटिश म्यूझियममध्यें आहे, व ११ व्या शतकांतील नागरी लिपींमध्यें 'श्री वीरकेरलस्य' हीं अक्षरें आहेत. इ. स. १०२२ पूर्वीच्या चोलांच्या नाण्यांवर नागरीमध्यें अक्षरें आहेत, आणि तीं चोल राजांच्या पदव्या किंवा नांवें आहेत. इ. स. १०२२ नंतरच्या नाण्यांवर सुलट्या बाजूवर उभ्या राजाचें चित्र व उलट्या बाजूला बसलेल्या राजाचें चित्र आहे. पल्लवांच्या नाण्यांचे दोन वर्ग होतात: (१) आंध्रांच्या नाण्यांसारखीं असलेली (इ. स. २ रें व ३ रें शतक). याच्या उलट्या बाजूवर एक जहाज आहे; (२) या दुसऱ्या वर्गांतील नाणीं नंतरच्या कालांतील असून सोनें व रुपें यांचीं आहेत. या सर्व नाण्यांवर पल्लवांचें निशाण 'आयाळ असलेला सिंह' हें आहे व वर कांहीं कानडी व संस्कृत अक्षरेंहि आहेत. चालुक्यांच्या दोन्ही शाखांतील सुवर्ण नाण्यांवर चिन्ह (उर्फ लांछन) वराह हें आहे, आणि तीं नाणीं हिंदुस्थानांतील ठसेपद्धतीचें एक विशिष्ट उदाहरण म्हणून प्रसिद्ध आहेत. पौरस्त्य चालुक्यांच्या उपलब्ध असलेल्या नाण्यांचा काल निश्चित झाला आहे. दुसऱ्या नाण्यांवर चालुक्य-चंद्र ऊर्फ शक्तिवर्मन् (इ. स. १०००–१०१२) व दुसरा राजराज (इसवी सन १०२१–१०६२) यांचीं नांवें आहेत. या नाण्यांवर अतिशय पातळ तुकड्यावर चालुक्यांचें वराह चिन्ह व नांवाचें एक अक्षर हीं पाठीमागून भिन्न भिन्न ठशांनीं उमटविलीं आहेत. कदंबांच्या सुवर्ण नाण्यांची कारागिरी व व कृति पाश्चात्य चालुक्यांच्या नाण्यांप्रमाणें आहे. त्यांवर राजाचें नांव व वर्ष कोरलेलें असे. कल्याणपुरच्या कलचुरी या घराण्यांतील दुसरा राजा सोमेश्वर (इ. स. ११६७–११७५) याचीं नाणीं प्रसिद्ध आहेत.

राष्ट्रकूटांच्या काळीं द्राम, सुवर्ण, गद्याणक, कळंजू, कासू, मंजडी व अक्कम हीं सोन्याचीं नाणीं होतीं. द्राम हें रुप्याचेंहि होतें व त्याची किंमत ६ आणे असे. सोन्याच्या द्रामाची किंमत ७ रु. असे. गद्याणक नाण्याची किंमत सर्वांत जास्त म्हणजे १० रु. होती. सर्वांत लहान सोन्याचें नाणें अक्कम त्याची किंमत २ आणे असे.

यादव काळांत द्राम, विश्वा, निष्क धरण यांसारखीं नाणीं आढळतात. नाण्यांचें कोष्टक असें:—

| | | |
|---|---|---|
| २० वराटका | = | १ काकिणी |
| ४ काकिण्या | = | १ पण |
| १६ पण | = | १ द्राम (दाम) |
| १६ द्राम | = | १ निष्क |

हीं नाणीं सोन्याचीं असत.

मुसलमानी—मुसलमानी अमदानींतील तुघ्लक घराण्याचीं नाणीं विशेषतः ग्यासुद्दिनचीं उपलब्ध आहेत. मोंगल बादशहांपैकीं अकबराच्या नाण्यांवर ससाणा, बदक, तिरंदाज, वगैरेचीं चित्रें आढळतात. जहांगीरनें स्वतःचाच मुखवटा छापला. त्याच्या कांहीं नाण्यावर बारा राशींचीं चित्रें आहेत. निसार हीं नाणीं गरिबांना वांटण्यासाठीं व उधळण्यासाठीं असत. औरंगजेबानें नाण्यांना मोठा आकार देऊन तीं स्वतःच्या तळघरांत सांठवून ठेविलीं. मोंगलांच्या वेळीं तांब्याचीं नाणीं फारशीं नव्हतीं. कवड्या, बदाम, वगैरे पदार्थहि उपयोगांत आणीत असावेत. चांदीसोन्याचीं नाणीं मात्र पुष्कळ होतीं. इंग्रज कंपन्या मोंगलांच्या नाण्यांसारखीं नाणीं आपल्या टांकसाळींत पाडीत व निर्वेध चालवीत, तेव्हां १७१७ त फर्रुखसेयर बादशहास फर्मान काढून संमति द्यावी लागली. आदिलशाही नाण्यांस लारी अशी संज्ञा आहे. दाभोळी व हुरमुजी असे दोन प्रकार या लाऱ्यांचे आहेत. या लाऱ्यांचा प्रचार कोंकणांत विशेष होता.

मराठे अमदानी—शिवाजीनें आपल्या नांवानें नाणें पाडण्यापूर्वीं विजापूरच्या पातशाहींत 'आदिलशाही' नाणें चालत असे. विशेषेंकरून मोहोरा व होन हे प्राचीन काळापासून

# नाणीं

बलबन

फिरोजशहा.

हिंदी पोर्तुगीज

हिंदी-पोर्तुगीज.

हिंदी-डच

हिंदी-डॅनिश.

हिंदी-फ्रेंच

हिंदी-इंग्लिश (एलिझाबेथनें पाडलेलें)

कदंबाचें पद्मटंक (इ.स.५ वें शतक.)

निजामउल्मुल्क (हिजरी १२८२)

शेवटचा शहाआलम (हिजरी ११८०)

शिवाजीचा होन

लारी (आरबी नाणें. आदिलशाही अर्धा रुपाया)

हिंदुस्थानांतील जुनीं नाणीं (पृ. १३०८)

चालत आहेत. शिवाजीच्या वेळेस जे होन चालत त्यांचीं नांवें सभासदाच्या बखरींत दिलीं आहेत तीं येणेप्रमाणें:— ( १ ) पातशाही, ( २ ) शिवराई, ( ३ ) कावेरीपाकी, ( ४ ) सणगरी, ( ५ ) अच्युतराई, ( ६ ) देवराई, ( ७ ) रामचंद्रराई, ( ८ ) गुत्ती, ( ९ ) धारवाडी, ( १० ) गंजीकोटी, ( ११ ) पाकनाईक, ( १२ ) आदवाणी, ( १३ ) जडमाल, ( १४ ) ताडपत्री, ( १५ ) आफराजी, ( १६ ) त्रिवाळुरी, ( १७) त्रिशुळी, ( १८ ) चंदावरी, ( १९ ) बिलदधी, ( २० ) उलफकरी, ( २१ ) महमदशाही, ( २२ ) वेरुळी, ( २३ ) कंठेराई, ( २४ ) देवनहळ्ळी, ( २५ ) रामनाथपुरी, ( २६ ) कुंदगोळी, इ..

ह्या जुन्या होनांखेरीज बहादुरी व सुलतानी नांवाचे दोन होन हैदर व टिपू यांनीं पाडले. त्याशिवाय अलमगिरी वगैरे होन दिल्लीच्या बादशहांनीं पाडले. शिवाजीच्या कारकीर्दीत शिवराई होन, शिवराई रुपये, शिवराई पैसे हीं नाणीं पाडण्यास सुरवात झाली. हे शिवराई होन व शिवराई रुपये सांप्रत फार क्वचित् दृष्टीस पडतात. जुने होन पुष्कळ दृष्टीस पडतात, पण त्यांच्यावरील अक्षरें बहुतकरून फारसी लिपींत अस्पष्ट अशीं आहेत. कित्येकांवर श्रीकृष्णाची मूर्ति व कोठें ( चालुक्यांच्या ) वराह अवताराचें चित्र दिसतें. पुढील माहितीसाठीं 'टांकसाळ' लेख पाहा.

प्रत्येक प्रांतामध्यें एकाच प्रकारचें नाणें पाडीत असत असें दिसत नाहीं. बागलकोट येथें मल्हार भिकाजी रास्ते हा पेशव्यांचा मुख्य सुभेदार होता. त्याच्या हुकुमानें जे रुपये पाडले जात त्यास मल्हारशाई रुपये म्हणत. त्याची किंमत १५ आणे असे. हे रुपये पेशव्यांनीं सर्व प्रांतांमध्यें चालू करण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं शेंकडा दोन रुपये बट्टा देऊन सर्व नाणें मल्हारशाही करावें असा विचार केला. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत अंकुशी रुपयांचें महत्त्व फार वाढलें होतें. अंकुशी अथवा चांदवडी रुपये एकाच प्रकारचे होते. हे पुण्यास पाडीत. या रुपयावर दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत मामलेदार लोक वाटेल तो बट्टा घेत असत. पुण्यास हे रुपये तीन प्रकारचे होते : कोरा निर्मळ छापी, मध्यमछापी व नारायणछापी. या रुपयांतील चांदीच्या शुद्धाशुद्ध प्रमाणांवरून हीं नांवें पडलीं होतीं. पुण्याची टांकसाळ सन १८२२ मध्यें बंद झाली असा चापलिन साहेबाच्या एका रिपोर्टांत उल्लेख आहे. नाण्यांची तूट आल्यामुळें पुन्हां तीं सुरू केलीं होतीं, पण सन १८३४ मध्यें तीं कायमचीं बंद झाला. बागलकोट, कोल्हापूर, कुलाबा, वगैरे बहुतेक ठिकाणच्या टांकसाळी ह्याच सुमारास बंद झाल्या. टांकसाळ पाहा.

मराठ्यांच्या राज्यामध्यें प्रांतोप्रांतीं निरनिराळें नाणें चाले. दक्षिण महाराष्ट्रामध्यें हुकेरी, निळकंठी, पन्हाळी, कितुरशहापुरी, गलपाडी, भूतपाडी, वगैरे रुपये चालत. निजामशाहीमध्यें बागचलनी, हुकूमचलनी आणि शेटचलनी असे तीन प्रकारचे रुपये असत. तेच निजामाच्या सरहद्दीवरील पेशव्यांच्या मुलखांतहि चालत असत. 'हल्ली शिक्का' व 'समशेरी' हें निजामशाही नाणें असे; हें पेशवाईच्या अखेरपर्यंत चालत होतें. खानदेश व नाशिक या प्रांतांत बेलापुरी, चांभारगोंदी, चांदवडी, बऱ्हाणपुरी, वाफगांवी, जरीपटका, वगैरे रुपये चालत. कुलाबा प्रांतांमध्यें आंग्र्यांचे कुलाबी रुपये विशेषेंकरुन चालत असत. रत्नागिरी प्रांतामध्यें चांदवडी, दौलताबादी, हुकेरी, चिकोडी, वगैरे नाणें चाले. दक्षिण कोंकणांत टांकसाळ स्थापन करण्यांत आली नाहीं. या सर्व रुपयांचे भाव निरनिराळे असत. थोरले माधवराव व सवाई माधवराव यांच्या कारकीर्दीत मल्हारशाही रुपयाप्रमाणें बट्टा कापून घेत असत. चांदवडी व अंकुशी हेंच पेशवाईअखेर सर्व महाराष्ट्रामध्यें प्रमुख ठरीव नाणें होतें.

रुपयांवर बहुतेक फारशी अक्षरें असत. शिवाजी व शाहू यांच्या शिक्क्यांवर मात्र मराठी नांवें उठविलेलीं असत. त्याचप्रमाणें आंग्र्यांच्या रुपयावर 'श्री' काढलेली असे. यशवंतराव होळकरानें आपल्या रुपयावर मराठी छाप उठविला होता. ह्याशिवाय मराठी शिक्क्याचे रुपये फारसे आढळण्यांत येत नाहींत. जरीपटका म्हणून नावाचा एक रुपया पेशव्यांनीं पाडला होता; तो हरिपंत फडक्याचा होता असें म्हणतात. शिवाजीच्या भगव्या झेंड्याप्रमाणें जरीपटक्याचें माहात्म्य पेशव्यांच्या कारकीर्दीत फार वाढलें होतें. त्याचें दर्शक हा रुपया असेल असें वाटतें. १८०३ सालीं सिधोजी नाईक निपाणकरानें आपल्या शिक्क्याचा रुपया तयार केला होता. बडोद्यास सयाशाही म्हणून पहिला सयाजीराव व बाबाशाही म्हणून पहिला फत्तेसिंगबाबा यांनीं रुपये पाडले होते. सयाशाही रुपयावर देखील तरवार, हिजरी सन आणि 'शिक्के मुबारिक सेना खासखेल समशेर बहादूर' असा फारशी लेख असे. तात्पर्य, मराठी अक्षरांचे रुपये फार क्वचित् दृष्टीस पडत. पेशव्यांच्या कारकीर्दीमध्यें पाडलेल्या बहुविध रुपयांवर प्रत्येक सालाचें हिजरी सन मराठीमध्यें घातले आहेत. पण त्यांवरील शिक्के फारसी आहेत. ह्यावरून फारसी शिक्के उमटविण्याची पूर्वापार चालत आलेली पद्धति पेशव्यांनीं बंद केल्याचें दिसत नाहीं.

पेशव्यांच्या राज्यामध्यें रुपयाच्या खालोखाल अधेल्या आणि चवल्या हीं नाणीं होतीं. रुपयाच्या नाण्याखेरीज सर्व महाराष्ट्रामध्यें तांब्याचें नाणें चालत असे व तें मात्र अगदीं एक प्रकारचें होतें. नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत शिवाजीचा शिवराई पैसा पुष्कळ प्रचारांत होता. ह्या पैशामध्यें कोठेंहि फेरबदल केल्याचें दिसून येत नाहीं. कुलाब्यास आंग्र्यांच्या, कोंकणांत पनवेलच्या व

कर्नाटकांत धारवाडच्या टांकसाळीमध्येंहि 'शिवराई' पैसे पाडीत.

साताऱ्याची टांकसाळ शाहूपासून शहाजीपर्यंत चालू असावी. प्रतापसिंहाच्या कारकीर्दीमध्यें येथें चांदवडी कोरे रुपये पाडीत असत. त्यानें आपल्या नांवाचा छाप निराळा केला नव्हता; पैसे शिवाजीच्या नांवाचेच पाडीत. प्रतापसिंहानें आपल्या राज्यांत सर्वच चांदवडी शिक्का कायम केला होता. सावकार लोकहि त्याच शिक्क्यावर इतर जातींच्या रुपयांचा वर्तावळा घेत. सरकारी नोकरांस पगारहि त्याच भावानें देत व शेंकडा २॥॥ बट्टा कापून घेत. १८३० सालापासून पुणें कोरे रुपये व चांदवडी अंकुशी रुपये ह्यांमध्यें बट्टा ठरल्यामुळें साताऱ्या राज्यांत ३४५७१ रुपये वर्तावळ्याची रक्कम जमा झाली, असा साताऱ्चा कमिशनर ओगल्वी याच्या एका रिपोर्टांत उल्लेख सांपडतो. शहाजीच्या कारकीर्दींत सर्व कामदारांकडून ४। रुपये बट्टा कापून घेत. दिवाण, फडणवीस, वगैरे मुख्य मुख्य कामदारांच्या पगारांतूनहि बट्टा वजा होत असे. सन १८३५ नंतर ईस्ट इंडिया कंपनीचे रुपये राज्यामध्यें चालू झाले.

साताऱ्याजवळ रहिमतपूर येथें एक टाकसाळ प्रतापसिंहाच्या कारकीर्दींत होती. तेथें शिवराई पैसे पाडीत असत. त्या टांकसाळीवर जे अधिकारी होते त्यांस टांकसाळे असें नांव असे.

ब्रिटिश अमदानींत हिंदुस्थानाला सोन्याचें नाणें लाभलें नाहीं. रुप्याचीं नाणीं दोन आण्यांपर्यंत होतीं. त्यांवर इंग्रज राज्यकर्त्यांचे मुखवटे असत. तांबें, ब्राँझ आणि निकल या धातूंचींहि नाणीं खालच्या प्रतीचीं होतीं. आतां हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर नवीन प्रकारचीं नाणीं काय सुरू करावींत याविषयीं विचार चालू आहे. टांकसाळ पाहा.

## ब्रिटिश वसाहतींतील विशिष्ट नाणीं

| देश | युनिट | सोन्याचीं नाणीं | रुपें व इतर धातू यांचीं नाणीं |
|---|---|---|---|
| एडन | ( हिंदुस्थान पहा ) | | |
| ऑस्ट्रेलेशिया | ब्रिटिश सॉव्हरिन | ब्रिटिश | रुपें व ब्राँझ |
| ब्रिटिश होंडयुरास | सोन्याचे डॉलर | ,, व यु. स्टेट्स | रुपें, निकल व ब्राँझ |
| ब्रिटिश उत्तर बोर्निओ | डॉलर | ... | निकल व ब्राँझ |
| कानडा | रुप्याचे डॉलर | कानडाचे व ब्रिटिशांचे | रुपें, निकल व ब्राँझ |
| सिलोन | रुपया | ब्रिटिश | रुपें, निकल व तांबें |
| सायप्रस | पीआस्टर | ,, | रुपें व ब्राँझ |
| फेडरेटेड मलाया संस्थानें | डॉलर | ,, | ( स्ट्रेट्स सेटलमेंट्स पाहा ) |
| हॉंगकॉंग व लाब्वन | डॉलर | ... | रुपें व ब्राँझ |
| हिंदुस्थान | रुपया | ब्रिटिश | रुपें, निकल व तांबें |
| केंनिया | शिलिंग | ... | रुपें, निकल व ब्राँझ |
| मॉरिशस व सैचेलस | हिंदुस्थानचा रुपया | ... | रुपें व ब्राँझ |
| मेसापोटेमिया | इराकी दिनार | | रुपें, निकल व ब्राँझ |
| न्यू फाउंडलंड | डॉलर | ... | रुपें व ब्राँझ |
| पॅलेस्टाइन | पौंड | | रुपें, निकल व ब्राँझ |
| स्ट्रेट्स सेटलमेंट्स | डॉलर | ब्रिटिश | रुपें व ब्राँझ |
| सुदान | सोन्याचा पौंड ( १०० पीआ. ) | ईजिप्शियन पौंड | रुपें |
| टांगानिका | रुप्याचा शिलिंग | | रुपें, ब्राँझ व तांबें |
| युगांडा | शिलिंग | | रुपें, व ब्राँझ |
| पश्चिम आफ्रिका | ब्रिटिश सॉव्हरिन | ब्रिटिश | रुपें अलॉय किंवा मिश्रधातु व निकल |

## परदेशांतील नाणीं

| देश | प्रमाणनाणें | सोन्याचें नाणें | रुप्याचें नाणें |
|---|---|---|---|
| अबिसीनिया | तालारी | | तालारी |
| अल्बेनिया | ( धातूचें नाणें नाहीं ) | | |
| अर्जेंटिना | | पेसो | पेसो व सेंटाव्होस |
| | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा पेसो | ... | ... |
| ऑस्ट्रिया | १०० क्रोन = १ हेलेर | क्रोन | क्रोन |
| बेल्जम | १०० सेंटाइम्स = १ फ्रँक | फ्रँक | फ्रँक व सेंटाइम्स |
| बोलिव्हिया | १०० सेंटाव्होस = १ बोलिव्हियानो | बोलिव्हियानो | सेंटाव्होस |
| ब्राझिल | मिलरिस | मिलरिस | मिलरिस व रेझ |
| बल्गेरिया | १०० स्टोटिनकी = १ लेव्ह | लेव्ह | लेव्ह व स्टोटिनकी |
| चिली | १०० सेंटाव्होस = १ पेसो | पेसो | पेसो व सेंटाव्होस |
| चीन | १०० सेंट्स = १ युआन | ... | युआन |
| कोलंबिया | १०० सेंटाव्होस = १ पेसो | पेसो | पेसेटा |
| कोस्टा-रिका | १०० सेंटेसिमॉस = १ कोलोन | कोलोन | सेंटेसिमॉस |
| क्यूबा | १०० सेंटाव्होस=१रुप्याचे पीआस्टर | चलन नाहीं | |
| | स्पेनचा सोन्याचा डॉलर | ... | ... |
| | यू. एस्. चा सोन्याचा डॉलर | ... | |
| चेको-स्लोव्हाकिया | फ्रँक | ... | |
| डेन्मार्क | १०० ओरे = १ सोन्याचा क्रोन | क्रोन | |
| इक्वेडोर | १०० सेंन्टाव्होस = १ रुप्याचें स्यूक्रे | स्यूक्रे | |
| ईजिप्त | १०० पीआस्टर = १ सोन्याचा पौंड | पौंड व पीआस्टर | |
| इस्तोनिया | मार्क | ... | |
| फिन्लंड | १०० पेनी = १ सोन्याचा मार्क | मार्क | |
| फ्रान्स | १०० सेंटाइम्स = १ फ्रँक | फ्रँक | |
| अल्जीरिया | ( फ्रान्सप्रमाणें ) | | |
| इन्डो-चायना | १०० सेंट = १ डॉलर | ... | |
| मादागास्कर | ( फ्रान्सप्रमाणें ) | | |
| ट्यूनिस | | | |
| जर्मन संस्थानें | | | |
| ग्रीस | | | |
| ग्वाटेमाला | | | |
| हायटी | | | |
| हॉंडुरास | | | |
| हंगेरी | | | |
| इटली | | | |

| | |
|---|---|
| ट्रिपोली | ( इटालीप्रमाणे ) |
| जपान | १०० सेन = १ ... येन |
| कोरिया | १०० चोन = |
| लाटव्हिया | १०० ग्रासर्च |
| लायबेरिया | १०० सेंट्स = |
| लक्झेंबर्ग | फ्रँक ( ८० पे. |
| मेक्सिको | १०० सेंटाव्हे |
| मोनाको | १०० ... |
| मॉटेनिग्रो | १ ऑस्ट्रियन |
| मोरोक्को | ५ फ्रँक = १ |
| नेदर्लंडस् | १०० सेंटस् |
| जाव्हा | सोन्याचा ड |
| क्यूराको | ( नेदर्लंडस् |
| निकारागुआ | १०० सेंट |
| नॉर्वे | १०० ओरे |
| ओमान | मेरिया थेरेसा |
| पनामा | २ पेसोचा एक |
| पाराग्वे | १०० सेंटाव्होस |
| प्रशिया | २० शाही = रुप |
| पेरू | १०० सोल = १ |
| पोलंड | ( १०० फेनीज = |
| पोर्तुगाल | एसक्यूडो |
| पोर्तुगीज हिंदुस्थान | ४०० रीस = १ रुपया |
| रुमानिआ | १०० बानी = १ सोन्याचा |
| रशिया | १०० कोपेक्स = १ सोन्याचा |
| साल्व्हाडोर | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा |
| सर्व्हिया | १०० पारा = दिनार |
| सयाम | १०० सटांग्ज = १ टिकल |
| स्पेन | रुप्याचा पेसोटा |
| स्वीडन | १०० ओरे = १ सोन्याचा क्रोन |
| स्वित्झर्लंड | १०० सेंटाईम्स = १ फ्रँक |
| तुर्कस्तान | १०० पीआस्टर = १ लिरा |
| युनायटेड स्टेट्स | १०० सेंट = १ डॉलर |
| फिलिपाईन्स | फिलिपिनो = ५० यू. एस्. सेंट |
| युरुग्वे | १०० सेंटिसिमॉस = १सोन्याचा पेसो |
| व्हेनेझुएला | १०० सेंटेसिमॉस = १ सोन्याचा बालिव्हर |
| युगोस्लाव्हिया | |

**नाणें घाट**—पुणें जिल्हा. जुन्नर तालुक्यांतील हा प्रसिद्ध घाट जीवधन किल्ल्याजवळ असून ठाणें जिल्ह्यांतील मुरबाडहून जुन्नरला जाणारा रस्ता या घाटांतून जातो. हा घाट फार जुना आहे. येथें बौद्ध लोकांनीं बांधलेलीं लेणीं आहेत. त्यांत आंध्र (भृत्य) शात(लि)वाहन राजांच्या मूर्ती व शिलालेख वगैरेच आहेत. त्या लेखांत शालिवाहन राजांचीं, त्यांच्या राण्यांचीं, व मोठमोठ्या पुरुषांचीं वर्णनें, आणि जमिनींच्या वगैरे देणग्यांचे उल्लेख आहेत. हे आंध्रभृत्य इ. स. १ ल्या व २ ऱ्या शतकांत राज्य करीत होते. या नाणें घाटांतून एकदम खालीं ठाणें जिल्ह्यांत समुद्रापर्यंत मालवाहतूक करण्यासाठीं रज्जुमार्ग (फ्यूनिक्युलर रेल्वे) तयार करण्यांत येत आहे.

**नाताळ**—(क्रिसमस). येशू ख्रिस्ताचा जन्मदिवस म्हणून २५ डिसेंबर मानतात. पण त्याची निश्चिति कांहींच नाहीं. कदाचित् ख्रिस्तीतर लोकांतील दक्षिणायनांतील सणांवरून या नाताळाच्या सणाचा परिपाठ ख्रिस्त्यांत पडला असावा. रोमन लोकांतहि ब्रमेलिया नांवाचा या दिवसांतला एक सण होता. इ. स. ४०० पासून ख्रिस्तजन्मदिवस पाळण्यास आरंभ झालेला आहे. या नाताळांत ख्रिस्ती लोक आपल्याकडील दिवाळीप्रमाणें मजा करतात. यामुळेंच प्यूरिटन लोकांना हा सण फारसा मान्य नाहीं. रोमन कॅथॉलिक देवळांतून ख्रिस्ताचा पाळणा पूजतात, तें पाहून आपल्या राम–कृष्ण–जयंतीची आठवण होते.

**नाताळ**—(इं. नेटल). दक्षिण आफ्रिका ब्रिटिश संघ (ब्रिटिश युनियन ऑफ् साउथ आफ्रिका) यांतील एक प्रांत. झूलूलँडसह याचें क्षेत्रफळ ३५,२८४ चौरस मैल आहे. याच्या पूर्वेस हिंदी महासागर व पश्चिमेस ड्रेकनबर्ग पर्वत आहेत. दरबान हें महत्त्वाचें बंदर आहे. कोळसा व लोखंड यांच्या मोठाल्या खाणी आहेत. सोनेंहि सांपडतें. संगमरवरी दगड निघतो. लांकूड, कॉफी, साखर, जनावरें, घोडे, वगैरेंची पैदास होते. वास्को–द–गामा यानें १४९७ मध्यें नाताळ (क्रिसमस) मध्यें याचा शोध लावला.

दरबान आणि पीटरमारिझबर्ग येथें नाताळ विद्यापीठ व कॉलेजें आहेत. नाताळची लो. सं. १९,४६,६४० असून फक्त १,९०,५५१ युरोपियन आहेत व सव्वादोन लाखांवर आशिया खंडातील लोक आहेत.

**नातू, बाळाजी नारायण** (१७७८–१८५०)—पेशवाईच्या अखेरचा एक राजकारणी पुरुष. बाळाजीपंत हा मूळ साळण (सावंतवाडी सं.) येथील राहणारा. पुण्यास येऊन रास्त्यांच्या पदरीं राहिला (१७९१). दु. बाजीराव व रास्ते यांचा बेबनाव झाल्यामुळे रास्ते पेशव्यांच्या भीतीनें इंग्रजांशीं दोस्तीनें वागत. संगमावर राहणाऱ्या ब्रिटिश रेसिडेंटाकडे रास्त्यांचा गुमास्ता म्हणून बाळाजीपंत जाऊं लागला (१८०३) व इंग्रजाना पेशव्यांकडील बातम्या देऊं लागला. प्रथम सर बॅरी क्लोज, व नंतर एल्फिन्स्टन रेसिडेंट होता. एल्फिन्स्टननें १८१६ सालीं बाळाजीपंतास आपल्या नोकरींत घेतलें. रेसिडेंटचा हुकूम रुजू करण्यास तो पेशव्यांकडे येई; आणि पेशव्यांकडील अंतस्थ बातम्या तो रेसिडेंटास सांगे. पेशव्यांनीं इंग्रज लष्करांत फितुरी आरंभिल्याची बातमी त्यानेंच रेसिडेंटास दिली, आणि पेशवे पुणें सोडून गेल्यावर बाळाजीपंतानेंच शनिवारवाड्यावर इंग्रजांचा बावटा लावला म्हणतात. त्याबद्दल त्याला इंग्रजांनीं पेन्शन चालू ठेवून शिवाय जहागीर दिली. ग्रँट डफच्या सांगण्यावरून त्यानें तत्कालीन हकीगतीची एक बखर लिहिली. तत्कालीन सरदारांचे इंग्रजांशीं तहनामे त्याच्यामार्फत ठरले. बाळाजीपंतानें श्रावणमास दक्षिणा व देवस्थानांच्या नेमणुका इंग्रजांकडून कायम करविल्या, आणि इनामदार व जहागीरदार यांच्या नेमणुका चालू ठेवण्याची खटपट केली. १८३८ ते १८४५ पर्यंत बाळाजीपंत साताऱ्यास कारभारी होता. पुढें तो सहकुटुंब काशीस जाऊन राहिला. त्याचे वंशज पुण्यास आहेत.

**नातेंपुतें**—हा गांव पुणें–सोलापूर सडकेवर माळशिरसच्या पश्चिमेस पांच मैलांवर आहे. हें पूर्वी खेडें असून बहामनी राजांचा दिवाण मलिकसुंदर याने हें गांव ऊर्जितावस्थेस आणलें. या गांवीं पूर्वीं गाणाऱ्या नायकिणींचीं घरें बरींच असत. येथें बुधवारीं मोठा बाजार भरतो. दोन महादेवाचीं देवळें व दोन तळीं आहेत. येथून जवळच गुप्तलिंग नांवाचें पवित्र क्षेत्र आहे, व त्याजवळच शिखरशिंगणापूर हें महादेवाचें प्रसिद्ध स्थान आहे.

**नाथदास** (सु. १६८०)—या मराठी कवीनें 'मनश्चंद्रबोध' हा ओवीबद्ध ग्रंथ लिहिला. 'विक्रमरास' या ग्रंथाचा कर्ता हरिदास व हा एकच असावेत, असें कांहीं मानतात. या कवीचें 'रामचंद्र नाहीं घरीं काय मी करूं।' हें पद फार प्रसिद्ध आहे.

**नाथद्वार संस्थान**—राजपुताना, उदेपूर संस्थान. नाथद्वार हें उदेपूरपासून ३० मैलांवर आहे. मथुरेस असलेली श्रीकृष्णाची मूर्ति १६७१ च्या सुमारास उदेपूरचा राणा राजसिंग यानें येथें आणून स्थापिली. १८०२ सालीं होळकरांनीं नाथद्वारावर स्वारी केली, त्या वेळीं तेथील मुख्य पुजारी दामोदरजी यानें श्रीनाथजीची मूर्ति हालवून गासीयार नांवाच्या डोंगरावर नेऊन ठेवली, व तेथें संरक्षणार्थ किल्ला बांधला. त्या मूर्तीच्या रक्षणार्थ चारशें स्वारांची तैनात राण्याकडून देण्यांत आली होती; याप्रमाणें हें नाथद्वार एक डोंगरी संस्थान बनलें. दामोदरजीनें ही सर्व व्यवस्था घडवून आणली, व तेथें राहून तो इतर देवळांवर देखरेख ठेवूं लागला.

| | | | |
|---|---|---|---|
| ट्रिपोली | ( इटालीप्रमाणें ) | | |
| जपान | १०० सेन = १ सोन्याचा येन | येन | सेन |
| कोरिया | १०० चोन = १ वोन | वोन | चोन |
| लाटव्हिया | १०० ग्रासची = १ सोन्याचा लाट | लाट | लाट व ग्रासची |
| लायबेरिया | १०० सेंट्स = १ यू. एस्. चा डॉलर | ... | सेंट |
| लक्झेंबर्ग | फ्रँक ( ८० फेनीज = १ फ्रँक ) | ... | ... |
| मेक्सिको | १०० सेंटाव्होस = १सोन्याचा डॉलर | डॉलर | डॉलर व सेंटाव्होस |
| मोनाको | १०० सेंटाइम्स = १ फ्रँक | फ्रँक | ... |
| मॉंटेनिग्रो | १ ऑस्ट्रियन क्रोन = १ पेर्पेर | पेर्पेर | पेर्पेर |
| मोरोक्को | ५ फ्रँक = १ रुप्याचें पीआस्टर | ... | पीआस्टर |
| नेदर्लंडस् | १०० सेंटस् = १ सोन्याचा फ्लोरिन अथवा गुल्डेन | फ्लोरिन | फ्लोरिन व सेंट |
| जाव्हा | सोन्याचा ड्यूकेट | ... | ... |
| क्यूराको | ( नेदर्लंडस्प्रमाणें ) | | |
| निकारागुआ | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा कोरडोवा | ... | सेंटाव्होस |
| नॉर्वे | १०० ओरे = १ सोन्याचा क्रोन | क्रोन | क्रोन व ओरे |
| ओमान | मेरिया थेरेसा डॉलर | ... | डॉलर व हिंदी रुपया |
| पनामा | २ पेसोचा एक सोन्याचा वलबोआ | वलबोआ | पेसो व सेंट |
| पाराग्वे | १०० सेंटाव्होस = १ पेसो | ... | पेसो व सेंटाव्होस |
| प्रशिया | २० शाही = रुप्याचा क्रान | टोमन व क्रान | क्रार |
| पेरू | १०० सोल = १ लिब्रा | लिब्रा | सोल, डिनेरो व सेंटाव्होस |
| पोलंड | ( १०० फेनीज = पोलस्का मार्क ) | धातूचीं चलनें नाहींत | |
| पोर्तुगाल | एसक्यूडो | एसक्यूडो | मिलरेस व टेस्टोन |
| पोर्तुगीज हिंदुस्थान | ४०० रीस = १ रुपया | ... | रुपया |
| रुमानिआ | १०० बानी = १ सोन्याचा ल्यू | ल्यू | लेई व बानी |
| रशिया ... | १०० कोपेक्स = १ सोन्याचा रुबल | रुबल | रुबल व कोपेक्स |
| साल्व्हाडोर | १०० सेंटाव्होस = १ सोन्याचा पेसो | पेसो | पेसो व सेंटाव्होस |
| सर्व्हिया | १०० पारा = दिनार | दिनार | दिनार व पारा |
| सयाम | १०० सटांग्ज = १ टिकल | १० टिकलचा | डॉस टिकल |
| स्पेन | रुप्याचा पेसोटा | पेसेटा | डॉस, पेसेटा व सेंटिमो |
| स्वीडन | १०० ओरे = १ सोन्याचा क्रोन | क्रोन | ओरे |
| स्वित्झर्लंड | १०० सेंटाईम्स = १ फ्रँक | फ्रँक | फ्रँक व सेंटाइम्स |
| तुर्कस्तान | १०० पीआस्टर = १ लिरा | पीआस्टर | पीआस्टर |
| युनायटेड स्टेट्स | १०० सेंट = १ डॉलर | डॉलर | डॉलर व डिमे |
| फिलिपाईन्स | फिलिपिनो = ५० यू. एस्. सेंट | ... | ... |
| युरुग्वे | १०० सेंटिसिमॉस =१सोन्याचा पेसो | पेसो | पेसो व सेंटेसिमॉस |
| व्हेनेझुएला | १०० सेंटेसिमॉस = १ सोन्याचा बालिव्हर | बालिव्हर | बालिव्हर व सेंटाव्होस |
| युगोस्लाव्हिया | | धातूचीं चलनें नाहींत. | |

**नाणें घाट**—पुणें जिल्हा. जुन्नर तालुक्यांतील हा प्रसिद्ध घाट जीवधन किल्लयाजवळ असून ठाणें जिल्ह्यांतील मुरबाडहून जुन्नरला जाणारा रस्ता या घाटांतून जातो. हा घाट फार जुना आहे. येथें बौद्ध लोकांनीं बांधलेलीं लेणीं आहेत. त्यांत आंध्र (भृत्य) शात(लि)वाहन राजांच्या मूर्ती व शिलालेख बरेच आहेत. त्या लेखांत शालिवाहन राजांचीं, त्यांच्या राण्यांचीं, व मोठमोठ्या पुरुषांचीं वर्णनें, आणि जमिनींच्या वगैरे देणग्यांचे उल्लेख आहेत. हे आंध्रभृत्य इ. स. १ ल्या व २ ऱ्या शतकांत राज्य करीत होते. या नाणें घाटांतून एकदम खालीं ठाणें जिल्ह्यांत समुद्रापर्यंत मालवाहतूक करण्यासाठीं रज्जुमार्ग (फ्यूनिक्युलर रेल्वे) तयार करण्यांत येत आहे.

**नाताळ**—(क्रिसमस). येशू ख्रिस्ताच्या जन्मदिवस म्हणून २५ डिसेंबर मानतात. पण त्याची निश्चिति कांहींच नाहीं. कदाचित् ख्रिस्तीतर लोकांतील दक्षिणायनांतील सणांवरून या नाताळाच्या सणाचा परिपाठ ख्रिस्त्यांत पडला असावा. रोमन लोकांतहि ब्रमेलिया नांवाचा या दिवसांतला एक सण होता. इ. स. ४०० पासून ख्रिस्तजन्मदिवस पाळण्यास आरंभ झालेला आहे. या नाताळांत ख्रिस्ती लोक आपल्याकडील दिवाळीप्रमाणें मजा करतात. यामुळेंच प्यूरिटन लोकांना हा सण फारसा मान्य नाहीं. रोमन कॅथॉलिक देवळांतून ख्रिस्ताचा पाळणा पूजतात, तें पाहून आपल्या राम–कृष्ण–जयंतीची आठवण होते.

**नाताळ**—(इं. नेटल). दक्षिण आफ्रिका ब्रिटिश संघ (ब्रिटिश युनियन ऑफ् साउथ आफ्रिका) यांतील एक प्रांत. झूलूलॅंडसह याचें क्षेत्रफळ ३५,२८४ चौरस मैल आहे. याच्या पूर्वेस हिंदी महासागर व पश्चिमेस ड्रेकनबर्ग पर्वत आहेत. दरबान हें महत्त्वाचें बंदर आहे. कोळसा व लोखंड यांच्या मोठाल्या खाणी आहेत. सोनेंहि सांपडतें. संगमरवरी दगड निघतो. लांकूड, कॉफी, साखर, जनावरें, घोडे, वगैरेची पैदास होते. वास्को–द–गामा यानें १४९७ मध्यें नाताळ (क्रिसमस) मध्यें याचा शोध लावला.

दरबान आणि पीटरमारिझबर्ग येथें नाताळ विद्यापीठ व कॉलेजें आहेत. नाताळची लो. सं. १९,४६,६४० असून फक्त १,९०,५५१ युरोपियन आहेत व सव्वादोन लाखांवर आशिया खंडातील लोक आहेत.

**नातू, बाळाजी नारायण** (१७७८–१८५०)—पेशवाईच्या अखेरचा एक राजकारणी पुरुष. बाळाजीपंत हा मूळ साळण (सावंतवाडी सं.) येथील राहणारा. पुण्यास येऊन रास्त्यांच्या पदरीं राहिला (१७९१). दु. बाजीराव व रास्ते यांचा बेबनाव झाल्यामुळें रास्ते पेशव्यांच्या भीतीनें इंग्रजांशीं दोस्तीनें वागत. संगमावर राहणाऱ्या ब्रिटिश रेसिडेंटाकडे रास्त्यांचा गुमास्ता म्हणून बाळाजीपंत जाऊं लागला (१८०३) व इंग्रजाना पेशव्यांकडील बातम्या देऊं लागला. प्रथम सर बॅरी क्लोज, व नंतर एल्फिन्स्टन रेसिडेंट होता. एल्फिन्स्टननें १८१६ सालीं बाळाजीपंतास आपल्या नोकरींत घेतलें. रेसिडेंटचा हुकूम रुजू करण्यास तो पेशव्यांकडे येई; आणि पेशव्यांकडील अंतस्थ बातम्या तो रेसिडेंटास सांगे. पेशव्यांनीं इंग्रज लष्करांत फितुरी आरंभिल्याची बातमी त्यानेंच रेसिडेंटास दिली, आणि पेशवे पुणें सोडून गेल्यावर बाळाजीपंतानेंच शनिवारवाड्यावर इंग्रजांचा बावटा लावला म्हणतात. त्याबद्दल त्याला इंग्रजांनीं पेन्शन चालू ठेवून शिवाय जहागीर दिली. ग्रँट डफच्या सांगण्यावरून त्यानें तत्कालीन हकीगतीची एक बखर लिहिली. तत्कालीन सरदारांचे इंग्रजांशीं तहनामे त्याच्यामार्फत ठरले. बाळाजीपंतानें श्रावणमास दक्षिणा व देवस्थानांच्या नेमणुका इंग्रजांकडून कायम करविल्या, आणि इनामदार व जहागीरदार यांच्या नेमणुका चालू ठेवण्याची खटपट केली. १८३८ ते १८४५ पर्यंत बाळाजीपंत साताऱ्यास कारभारी होता. पुढें तो सहकुटुंब काशीस जाऊन राहिला. त्याचे वंशज पुण्यास आहेत.

**नातेंपुतें**—हा गांव पुणें–सोलापूर सडकेवर माळशिरसच्या पश्चिमेस पांच मैलांवर आहे. हें पूर्वी खेडें असून बहामनी राजांचा दिवाण मलिकसुंदर यानें हें गांव ऊर्जितावस्थेस आणलें. या गांवीं पूर्वी गाणाऱ्या नायकिणींचीं घरें बरींच असत. येथें बुधवारीं मोठा बाजार भरतो. दोन महादेवाचीं देवळें व दोन तळीं आहेत. येथून जवळच गुतालिंग नांवाचें पवित्र क्षेत्र आहे, व त्याजवळच शिखरशिंगणापूर हें महादेवाचें प्रसिद्ध स्थान आहे.

**नाथदास** (सु. १६८०)—या मराठी कवीनें 'मनश्चंद्रबोध' हा ओवीबद्ध ग्रंथ लिहिला. 'विक्रमरास' या ग्रंथाचा कर्ता हरिदास व हा एकच असावेत, असें कांहीं मानतात. या कवीचें 'रामचंद्र नाहीं घरीं काय मी करूं।' हें पद फार प्रसिद्ध आहे.

**नाथद्वार संस्थान**—राजपुताना, उदेपूर संस्थान. नाथद्वार हें उदेपूरपासून ३० मैलांवर आहे. मथुरेस असलेली श्रीकृष्णाची मूर्ति १६७१ च्या सुमारास उदेपूरचा राणा राजसिंग यानें येथें आणून स्थापिली. १८०२ सालीं होळकरांनीं नाथद्वारावर स्वारी केली, त्या वेळीं तेथील मुख्य पुजारी दामोदरजी यानें श्रीनाथजीची मूर्ति हालवून गासीयार नांवाच्या डोंगरावर नेऊन ठेवली, व तेथें संरक्षणार्थ किल्ला बांधला. त्या मूर्तीच्या रक्षणार्थ चारशें स्वारांची तैनात राण्याकडून देण्यांत आली होती; याप्रमाणें हें नाथद्वार एक डोंगरी संस्थान बनलें. दामोदरजीनें ही सर्व व्यवस्था घडवून आणली, व तेथें राहून तो इतर देवळांवर देखरेख ठेवूं लागला.

नाथद्वार हें तटबंदीचें शहर बनास नदीवर असून हें वैष्णवांचें परमपूज्य स्थान आहे. येथें श्रीनाथजी, श्रीनवनीतप्रियजी, श्रीमदनमोहनजी व श्रीविठ्ठलनाथजी हीं मुख्य देवस्थानें आहेत. या देवस्थानांचें आधिपत्य गोसावी महाराज यांच्याकडे असतें. ते वल्लभाचार्य पंथाचे मुख्य होत. शिवाय या गोस्वामीकडे इतर ३० गांवें व बडोदा, भरतपूर, बिकानेर, केरवली, कोटा, प्रतापगड व इतर संस्थानांतील कांहीं भाग आहे. त्यांचें वार्षिक उत्पन्न दोनतीन लाखांचें आहे. व देवापुढचें उत्पन्न सालीना सुमारें पांच लाखांचें येतें तें निराळेंच. संस्कृत कॉलेज, लालबाग व कचवल बाग, हीं पाहण्यासारखीं स्थळें आहेत.

**नाथपंथ**—हा पंथ फार जुना असून आदिनाथ हा या पंथाचा मूळ उत्पादक होय. नंतर उदोनाथ, मत्स्येंद्रनाथ, गोरक्ष, गैनी, निवृत्ति, व ज्ञानेश्वर अशी या पंथाची ज्ञानेश्वरापर्यंत शिष्यपरंपरा आहे (नवनाथ पाहा). या पंथाचा हठयोगावर व मंत्रतंत्रावर विशेष भरंवसा आहे. बंगाल्यांत प्राचीन काळचा एक वटवृक्ष असून त्यावर ६४ कला व तंत्रमंत्र आणि सिद्धि इत्यादिकांच्या देवता असत, व तेथें साधकांना तप करून मंत्रतंत्र साध्य करून घ्यावे लागे. मत्स्येंद्रनाथानें पंजाब, महाराष्ट्र, व मलबार इकडे, आणि जालंदरनाथानें बंगाल्याकडे या पंथाचा प्रसार केला. जालंदरनाथानें बंगालचा राजा गोपीचंद व त्याची आई मैनावती यांना या पंथाचा उपदेश दिला. मत्स्येंद्रनाथ स्त्रीराज्यांत (मल्याळ?) जाऊन तेथेंच राहिला असतां, त्याचा शिष्य गोरक्ष यानें त्याला तेथून बाहेर काढलें.

नाथपंथी लोक वैद्यकी करतात. रसाविद्येंत यांची गति असून त्यांना किमया येते, अशी समजूत आहे. यांच्यांत नऊ प्रख्यात पुरुष होऊन गेले, त्यांचीं चरित्रें 'नवनाथभक्तिसार' या ग्रंथांत आहेत. मेखला, शृंगी, पुंगी, कंथा, कर्णमुद्रा, कौपीन, व्याघ्रांबर, खडावा व झोळी, हीं ह्या पंथाचीं बाह्य निशाणें होत. नाथपंथी लोक कानास भोंकें पाडतात (व म्हणून यांस कानफाटे म्हणतात) व त्यांत मोठालीं वाटोळीं लांकडीं कुंडलें घालतात; त्यांना ते मुद्रा म्हणतात. त्यांच्या शिरस्त्राणांत एक लोखंडाचें चक्र असतें. भिक्षेच्या वेळीं हे कुका नांवाची एकतारी वाजवून गाणीं म्हणतात व 'अलख' (अलक्ष्य) म्हणून भिक्षा मागतात. भोजनाच्या वेळीं हे पुंगी वाजवून मग जेवतात. मुद्रा धारण करते वेळीं त्यास गुरूकडून उपदेश केला जातो.

कै. पांगारकर यांनीं नाथपंथाचा महाराष्ट्राशीं संबंध पुढीलप्रमाणें लाविला आहे : ज्ञानेश्वरांची साक्षात् परंपरा नाथपंथाची आहे. आदिनाथ, मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ, गैनीनाथ, निवृत्तिनाथ व ज्ञाननाथ (किंवा ज्ञानदेव अथवा ज्ञानेश्वर) अशी त्यांची परंपरा आहे. ज्ञानेश्वरांच्या पूर्वी नाथपंथीय सत्पुरुषांनीं धर्मजागृतीचें मोठें कार्य महाराष्ट्रांत केलें होतें, व खुद्द ज्ञानेश्वरांच्या घराण्याशीं नाथपंथीय महात्म्यांचा निकट संबंध होता. ज्ञानेश्वरांचे पणजे त्र्यंबकपंत यांना गोरक्षनाथांचा उपदेश (श. ११२९) असून आजे गोविंदपंत यांनीं गैनीनाथांचा अनुग्रह घेतला होता. मत्स्येंद्रनाथांनीं नाशीक जिल्ह्यांत सप्तशृंगीच्या डोंगरावर हातपाय तुटलेल्या चौरंगीनाथांना पूर्णावयवी केलें ही गोष्ट खुद्द ज्ञानेश्वरांनींच सांगितली आहे [" तो मत्स्येंद्र सप्तशृंगी। भग्नावयवा चौरंगी। भेटला कीं तो सर्वांगीं। संपूर्ण जाला।। " (ज्ञाने. १८-१७५४)]. त्र्यंबकेश्वराच्या पाठीमागें जो प्रसिद्ध ब्रह्मगिरि पर्वत आहे त्यावर गोदावरीच्या उगमाजवळ गोरक्षनाथाची गुहा व गैनीनाथांचा मठ असून त्या पर्वताच्या प्रदक्षिणेच्या वाटेंतच गैनीनाथांनीं निवृत्तिनाथास उपदेश केला व आपल्या संप्रदायांत ओढलें आणि लगेंच निवृत्तिनाथांनीं ज्ञानेश्वरादि भावंडांस तोच उपदेश केला. निवृत्तिनाथांनीं अखेर समाधिहि ब्रह्मगिरीच्या पायथ्याशीं त्र्यंबकेश्वरानजीकच घेतली असून तेथें प्रतिवर्षीं तन्निमित्त पौष महिन्यांत एक लाखावर यात्रा भरत असते. नेवाशाच्या डोंगरांत गोरक्षनाथांची समाधि असून सातारा प्रांतांत मत्स्येंद्रगडावर मत्स्येंद्रनाथांची समाधि आहे व तेथें दरसाल चैत्र वद्य ५ ला मत्स्येंद्राची यात्राहि भरते. या गडावर गोरखचिंच नांवाचा एक वृक्ष दाखविण्यांत येतो. कृष्णातीरीं जोंधळा चांगला पिकतो व तिकडे कऱ्हाडच्या आसपासच्या जोंधळयास 'मत्स्येंदरी शाळू' असें म्हणतात. गोरक्षनाथांचा संचार बंगाल, बिहार व नेपाळ या प्रांतांकडे फार असून त्या बाजूला त्यांनीं योगमार्गाच्या प्रसारासाठीं मोठाल्या चळवळी केल्या व त्यांच्या चळवळीचें केंद्रस्थान गोरखपूर या नांवानें प्रसिद्धहि आहे; तथापि मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ व गैनीनाथ या तीनहि नाथांनीं नाशीक, नगर व सातारा या प्रांतांत म्हणजे महाराष्ट्रांत संचार करून अद्वैतमार्गाची व योगाचीहि दिशा लोकांस दाखवून दिली हें वरील हकीगतीवरून उघड दिसतें. ज्ञानेश्वरांनीं 'योगाब्जिनीसरोवर' व 'विषयविध्वंसैकवीर' ह्या विशेषणांनीं गोरक्षनाथांस संबोधिलें आहे, म्ह. त्यांच्या योगाधिकाराचें व वैराग्याचें वर्णन केलें आहे; व गोरक्षनाथांनीं कलिग्रस्त लोकांच्या उद्धारासाठीं आपलें 'शांभव अद्वयानंदवैभव' म्ह. आदिनाथ शंकरापासून परंपरेनें प्राप्त झालेलें अद्वैतज्ञानाचें महासुख गैनीनाथांस दिलें व त्यांच्यापासून तें निवृत्तिनाथांस प्राप्त होऊन पुढें तें आपणांस मिळालें असें ज्ञानेश्वरांनीं स्पष्ट म्हटलें आहे. यावरून योगविद्या, वैराग्य व अद्वयानंद हीं या नाथपरंपरेचीं प्रधान लक्षणें असून या परंपरेचा शिवसंप्रदाय होता हें निर्विवाद ठरतें. ज्ञानेश्वरांना योग-

विद्या व अद्वयानंद हे नाथांच्या शिवसंप्रदायाच्या द्वारें मिळालें हें सिद्ध होतें.

बाराव्या शतकांत या संप्रदायानें महाराष्ट्रांत धर्मजागृतीची मोठीच कामगिरी बजावली आहे. मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांना या संप्रदायांतील थोर पुरुषांचा उपदेश होता. आदिनाथापासून मुकुंदराज हे चौथे व निराळया परंपरेनें ज्ञानेश्वर हे सहावे पुरुष होत. नाथपंथांतील योगाची व अद्वैतवेदांताची परंपरा या दोघांतहि पूर्णपणें मुरलेली आहे. वेदोपनिषदांनीं प्रकट केलेला व शंकराचार्यांनीं विशद रीतीनें प्रतिपादलेला अद्वैतसिद्धांत नाथसंप्रदायानें स्वीकारलेला असून योगमार्गानें त्याचा अनुभव घेण्यास शिकविलें आहे. ज्ञानेश्वरांनीं नाथपरंपरेनें आलेला योग व अद्वैतसिद्धांत हे दोन्ही घेतले आणि त्यांत भक्तिप्रेमानंदाची भर घालून अद्वैतभक्तीचा म्ह. भागवत धर्माचा पंथ महाराष्ट्रांत निर्माण केला. त्यांनीं आपली योगविद्या सत्यामलनाथासारख्या थोड्या आधिकारी शिष्यास दिली, पण सर्वसामान्य जनतेला योगाचा अधिकार नाहीं हें जाणून अद्वैतभक्तीचाच पुरस्कार केला व तिला नामदेवांच्या संगतींत विशेष बहर येऊन उभयतांच्या सप्रेम एकात्मतेनें पंढरपुरचा भागवतधर्म ऊर्फ वारकरीपंथ भरभराटीस आला. नाथपंथांतील योग आणि अद्वैतविद्या तेवढी घेऊन नाथपंथ महाराष्ट्रापुरता वारकरीपंथानें आपल्यांत जिरवून टाकला ! नाथपंथाचीं शैली, शृंगी, कर्णमुद्रा, इ. बाह्य साधनें सोडून त्यांच्याऐवजीं मृदंग, टाळ, वीणा, दिंड्यापताका इ. बाह्य साधनांचा त्यांनीं अंगीकार केला ! मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांनीं या परंपराप्राप्त अद्वैतब्रह्मविद्येला 'शांभवी विद्या' किंवा 'शांकरी विद्या' म्ह. आदिगुरु शंकरापासून आलेली विद्या असें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरींत याला 'शांभव अद्वयानंदवैभव' असें म्हटलें आहे. (मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १ ला)

**नाथमाधव** (१८८२-१९२८)—एक मराठी कादंबरीकार. हे दैवज्ञ ब्राह्मण जातीचे असून यांचें पूर्ण नांव द्वारकानाथ माधव पितळे असें होतें. मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर लष्करी खात्यांत यांनीं नोकरी धरली. सन १९०५ च्या मे महिन्यांत सिंहगडावर वाघाच्या शिकारीसाठीं गेले असतां कड्यावरून घसरल्यामुळें यांना अपघात झाला व त्यांत कमरेचा भाग लुला पडल्यानें हे कायमचे पंगू झाले. या पंगूपणामुळेंच इंग्रजी व मराठी वाचनाचा यांना नाद लागला व यांनीं लिखाणास सुरवात केली. 'मनोरंजन', 'महाराष्ट्र वाग्विलास' व 'केरळकोकिळ' यांसारख्या मासिकांतून यांचें लिखाण प्रसिद्ध होऊं लागलें. १९०५ सालीं लिहिलेलें 'सायंकाळची करमणूक' हें यांचें पहिलें पुस्तक होय. यानंतर 'सावळया तांडेल,' विहंगवृन्द,' 'विमलेची गृहदशा' व 'डॉक्टर' वगैरे कादंबऱ्या यांनीं लिहिल्या. मराठ्यांच्या इतिहासावर पस्तीस कादंबऱ्या लिहिण्याचा यांचा मानस होता. परंतु दुर्दैवानें बारा कादंबऱ्या लिहून झाल्यावरच यांची आयुर्मर्यादा संपली. पंचवीस सामाजिक व बारा ऐतिहासिक अशा सदतीस कादंबऱ्या, सात नाटकें, तीन प्रहसनें व इतर चार पुस्तकें इतकें लिखाण यांनीं केलें आहे. इतर लेखकांत क्वचितच दिसून येणारें वैचित्र्य, साधी, सुटसुटीत व बहुजनसमाजाच्या मनाची पकड घेणारी लेखनशैली हे यांचे गुणविशेष होत.

**नाथमुनि**—तेलंगणांत प्राचीन काळीं बारा आळवार होऊन गेले; त्यांच्यानंतर साडेतीन शतकांनीं सहा आचार्य झाले. पहिला आचार्य नाथमुनी आणि सातवा आचार्य प्रख्यात रामानुजाचार्य हा होय (१०१७-११३७). त्यावरून नाथमुनींचा काळ ९००-९२० हा असावा असें धरतात. नाथमुनींनें प्राचीन 'तिरुवोयमोळी' (मुखांतील वचनें) या ग्रंथाचा उत्तम अभ्यास करून श्रीरंगम् येथील विद्यापीठांत त्या ग्रंथाचे पाठ देण्यास आरंभ केला. न्यायतत्त्व व योगरहस्य हे दोन ग्रंथ नाथमुनींच्या नांवानें प्रसिद्ध आहेत.

**नांदगांव संस्थान**—हें मध्यप्रांतात असून त्याचें क्षे. फ. ८७२ चौ. मैल व लोकसंख्या २,०२,९७३ आहे. राजधानी राजनांदगांव हें बंगाल-नागपूर रेल्वेचें स्टेशन आहे. यांत सेवनाथ व बागनदी या नद्या आहेत. पाऊस सरासरी ४८ इंच पडतो. मुख्य धंदा शेतकी असून येथें भात, गहू, जवस, हरभरा, कोडन व कुटकी हीं पिकें होतात. येथें घोंगड्या, नवार व देशी विड्या तयार होतात. संस्थानचें सालीना उत्पन्न सुमारें ४५ लाख आहे. पूर्वी हा प्रदेश भोसल्यांच्या अमलाखालीं होता. १८ व्या शतकाच्या अखेरीस प्रल्हाददास नांवाचा पंजाबांतील शाली विकणारा वैरागी व्यापारी येथें येऊन राहिला, व बराच श्रीमंत झाला. त्याच्या शिष्यांनीं सावकारी करून जमिनी मिळवल्या व ते मोठे जमीनदार बनले. १८६५ सालीं ब्रिटिशांनीं घासीदास या तत्कालीन शिष्यास संस्थानिक मानून तशी सनद करून दिली. हें संस्थान आतां मध्यप्रांतांत विलीन झालें आहे.

**नांदगिरी किल्ला**—कल्याणगड. हा मुंबई इलाख्यांत सातारा जिल्ह्यांत सातारा शहरापासून ७ कोसांवर आहे. तो शंभु महादेव टेंकडीच्या एका ३५३७ फूट उंचीच्या शिखरावर आहे. याची चढण फार कठिण व वळणावळणाची आहे. अर्ध्या वाटेवर एक मुबलक पाणी असलेलें तळें आहे. किल्ल्यावर सपाट मैदान व त्यांत चार तळीं आहेत. किल्ल्याला तट असून त्यांत बराकी आहेत. हा किल्ला पन्हाळयाच्या भोजराजानें

बांधला असें म्हणतात. १६७३ मध्यें हा शिवाजीनें घेतला. १७२४ पर्यंत पंतप्रतिनिधींकडे असे व पुढें पेशव्यांकडे आला.

**नादिरशहा** ( १६८८–१७४७ )—इराणचा एक बादशहा.

याचें दुसरें नाव तहमास्पकुली ऊर्फ नादिरकुलीखान. याचा जन्म खोरासान प्रांतांत झाला. याचा बाप धनगर होता. याचा जन्म गरीब कुळांत झाला असून यास विद्या येत नव्हती; तरी हा आपल्या अकलेच्या जोरावर बराच पुढें आला. व अनेक राज्यांची यानें उलथापालथ केली. हा जातीचा इराणी नसून तुर्क होता. लहानपणापासून याचें आयुष्य साहसांत गेलें. याचा स्वभाव क्रूर, विध्वंसक, परहिताविषयीं निष्ठुर व मानवी संस्कृतीला विरोधी असे. हा १७ व्या वर्षी उझबेगच्या कैदेंत होता. पुढें यानें अनेक लढाया करून इराणची हद्द वाढविली. तसेंच तुर्कांपासून आपले प्रांत परत घेतले. यानें पुढें अफगाणिस्तान काबीज केला. हा सुन्नीपंथी होता. यानें इराणमधील सर्व शिया लोकांना आपला पंथ स्वीकारण्यास भाग पाडलें. १७३६ त यानें इराणचें तख्त बळकावलें व १७३९ त हिंदुस्थानवर स्वारी करून दिल्ली ताब्यांत घेतली व क्षुल्लक कारणावरून दिल्लींतील लोकाची कत्तल करण्याचा हुकूम दिला. तेथें असतांना दोन महिनेपर्यंत यानें साडेचौदा कोटी रुपयांची लुटालूट केली व परत जातांना मयूरसिंहासन नेलें. याचें राज्य सिंधु नदीपासून कास्पियनपर्यंत वाढलें. उत्तरोत्तर हा लोकांस अधिक छळीत गेला. अफगाण लोक याच्या छळास फारच कंटाळले होते. तेव्हां याचा पुतण्या अलीकुलीखान यानेंच याचा खून केला.

**नांदी व भरतवाक्य**—नाटकाच्या आरंभीं प्रस्तावाचा जो भाग असे त्याला पाश्चात्य नाटकांत 'प्रोलोग' असें नांव आहे. एलिझाबेथ राणीच्या वेळीं या गोष्टीला फार महत्त्व असे. पण पुढें ती मागें पडली. तथापि गेल्या शतकाच्या मध्यापर्यंत नाटकाच्या नांदीचें अस्तित्व दिसून येतें. अशा प्रास्ताविक भागांत पद्यमय निबंधच सांपडतील. पुष्कळदां एखाद्या प्रसिद्ध कवीकडूनच, मूळ नाटकाशीं कांहीं संबंध नसलेली प्रस्तावना घेण्याची पद्धत पडून गेली होती. उपसंहार( एपिलोग )च्या भागांत एखादा प्रमुख नट श्रोत्यांना उद्देशून कांहीं बोले व निरोप घेई. प्राचीन लॅटिन प्रहसनांतून 'नमस्कार मंडळी, आतां टाळ्या पिटा!' एवढेंच वाक्य उपसंहारादाखल म्हटलें जाई. ड्रायडन कवीच्या नाटकातून प्रस्तावना आणि उपसंहार याना फार महत्त्व दिलेलें आढळून येईल.

आपल्याकडील संस्कृत नाटकांतून प्रारंभीं 'नांदी' असते. सूत्रधार परमेश्वराच्या स्तुतिपर किंवा आशीर्वादपर गद्यपद्यमय भाषण करतो. त्याचे पारिपार्श्वक 'एवमस्तु' म्हणतात. मराठींतील आद्य संगीत नाटककार अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं आपल्या सौभद्र नाटकांत दोन पदांची नांदी घातली आहे. नाटकाचा उपसंहार भरतवाक्यानें करण्याची प्राचीन चाल होती. नाटकाच्या शेवटीं एखादें पात्र 'अतःपरमपि प्रियमस्ति।' असें विचारतें व त्यावर नायक, अमुक एक प्रिय होवो, असें सांगतो. सौभद्रांत गर्गमुनि अर्जुनाला इच्छेप्रमाणें कांहीं मागण्याविषयीं सांगतात तेव्हां अर्जुन, "आपल्या कृपेनें सर्व मनोरथ पूर्ण झाले. आतां काय मागूं ? तथापि भगवंतांच्या मनांतून देण्याचें असेल तर हें भरतवाक्य असो—" असें म्हणून एक श्लोक गातो. त्यानंतर गर्गमुनि 'तथास्तु' म्हणतात. हल्लींच्या नाटकांचें सर्व तंत्र बदलल्यामुळें नांदी व भरतवाक्य हीं नामशेष झालीं आहेत.

**नांदेड**—हा जिल्हा हैद्राबाद संस्थानांत असून क्षेत्रफळ ३७९७ चौ. मै. आणि लो. सं. सुमारें आठ लक्ष आहे. शेंकडा ७० च्या वर मराठी भाषा बोलणारे आहेत. यांत ६ शहरें व १३०२ खेडीं आहेत. यांतून गोदावरी व पैनगंगा या मोठ्या नद्या वाहतात. पाऊस सरासरी ३६ इंच पडतो. पूर्वीं हा प्रदेश चालुक्य व यादव यांच्या राज्यांत होता. येथील जमीन काळीभोर असून ज्वारी, हरभरा, वाटाणा, गहूं, व गळिताचीं धान्यें हीं मुख्य पिकें आहेत. नांदेड शहरीं फारच सुरेख मलमल होते, शिवाय कलाबूत होतो. नांदेड शहर गोदावरीच्या उत्तर तीरावर असून लो. सं. चाळीस हजार आहे. येथें आठवड्याचा बाजार भरतो. येथील मलमल, जरीकांठी उपरणीं व लुगडीं प्रसिद्ध आहेत. येथें काळमच्या राजानें बांधलेला किल्ला आहे. येथें गुरुद्वार म्हणजे शिखांचा दहावा गुरु गुरुगोविंद याची समाधि आहे. ती फार सुंदर बांधली आहे. येथें शीख मुलांसाठीं एक महाविद्यालय आहे. एक मोठी कापडाची गिरणी थोड्या वर्षांपूर्वीं निघाली आहे.

**नांदोसचा किल्ला**—मुंबई, कोंकण, मालवण तालुक्यांतील नांदोस नावाच्या खेड्यांत हा किल्ला मोडतो. क्षेत्रफळ सुमारें पाव एकर आहे.

**नानक** ( १४६९–१५३९ )—हा शीख पंथाचा संस्थापक लाहोरपासून तीस कोसावरील रावी नदीच्या कांठच्या देहरा (तलवंद) या गांवीं जन्मला. त्याच्या बापाचें नाव काळू व आईचें तृप्ता होतें. हा वेदी कुळातील खत्री असून शेतकरी होता. नानक धान्याचा वगैरे व्यापार करीत असे. नानकची बायको

हिंदुस्थानांतील जुनीं नाणीं (पृ. १३०६)

सोलखनी (सुलक्षणी) हिला श्रीचंद व लक्ष्मीदास अशीं दोन मुलें होतीं. नानकाला लहानपणापासून साधुसंतांच्या संगतीची गोडी होती. मोठेपणीं नानकानें वेदांचा अभ्यास केला, व तो कविता करूं लागला. पुढें त्याला वैराग्य प्राप्त झालें व तो कबिराचा शिष्य बनला, आणि लोकांना एकेश्वरमताचा उपदेश करूं लागला. तो सर्व हिंदुस्थानभर फिरला; तसेंच तो मक्का, मदिना येथेंहि गेला होता, असें म्हणतात. धर्माच्या बाबतींत आग्रह नसावा, कोणींहि मनोभावानें केलेली सेवा ईश्वराला सारखीच आवडते, हा त्याचा शिकवणीचा मुख्य मुद्दा होता. मूर्तिपूजेचा त्यानें निषेध केला. बाह्य आचारविचार व विधी यांपेक्षां मोक्षप्राप्तीस इंद्रियदमन हाच उपाय श्रेष्ठ आहे असें त्याचें मत होतें. नानकानें हिंदु धर्माचा त्याग केला नाहीं, व मुसलमानी धर्माचा स्वीकार पण केला नाहीं; मात्र दोहोंतील ग्राह्य तेवढा भाग घेतल्यामुळें हिंदू व मुसलमान दोघेहि त्याचे अनुयायी बनले, व त्यांना 'शीख' (शिष्य) हें नांव मिळालें. नानकाच्या कवितांचा व त्याच्या वचनांचा संग्रह शिखांच्या 'आदिग्रंथ' नांवाच्या धार्मिक ग्रंथांत केला आहे. त्याचीं चरित्रें पंजाबी भाषेंत पुष्कळ असून त्यांत चमत्कार व अद्भुत गोष्टींचाच भरणा फार आहे. त्याचें प्रेत दहन करावयाचें कीं दफन करावयाचें, याबद्दल मोठा वाद होऊन अखेर त्याच्या वस्त्राचे दोन तुकडे करून एकाचें दफन व दुसऱ्याचें दहन करण्यांत आलें.

**नानकिंग**—हें चीन देशांतील क्यांग्सू प्रांताच्या राजधानीचें शहर यांगत्से–किआंग नदीवर असून त्याची लो. सं. सु. दहा लाख आहे. हें शहर वेगवेगळ्या राजांच्या वेळीं वेगवेगळ्या नांवांनीं प्रसिद्ध होतें. पूर्वी हें शहर विद्येचें माहेरघर समजलें जात असे, व पक्का माल तयार करण्याचे कारखाने येथें होते. हल्लीं येथें दारूगोळा करण्याचा कारखाना असून लष्करी व दर्यावर्दी शिक्षणाचीं विद्यालयें आहेत. १८९९ सालीं चिनी सरकारनें हें शहर परराष्ट्रीय व्यापारास खुलें केलें. येथें मोठा व्यापार व उद्योगधंदे चालले आहेत.

येथें एक २६१ फूट उंचीचा अष्टकोणी चिनीमातीचा मनोरा होता. तो १५ व्या शतकांत एका चिनी बादशहानें बांधला असून अत्यंत प्रेक्षणीय होता. पण १८५३ सालीं त्याचा नाश झाला.

**नानसेन, फ्रिडजोफ** (१८६१–१९३०)—एक नॉर्वेजिअन भूप्रदेश–संशोधक. १८८८ सालीं तो ग्रीनलंडच्या उत्तरेस ६४ अक्षांशांपर्यंत गेला व त्याची हकीगत त्यानें आपल्या 'ग्रीनलंडपलीकडे' या पुस्तकांत (१८९०) दिली आहे. नंतर १८९३ मध्यें मुद्दाम भक्कम बांधलेल्या फ्राम नांवाच्या आगबोटींतून तो त्याच बाजूला ८६° १४′ अक्षांशांपर्यंत गेला (१८९५ एप्रिल). त्या वेळेपर्यंत इतक्या दूर ध्रुवप्रदेशाकडे कोणीच गेलेलें नव्हतें. या महत्त्वाच्या प्रवासाचें वर्णन त्यानें आपल्या 'उत्तरेकडे अति दूर' या नांवाच्या पुस्तकांत (१८९७) केलें आहे. तो १९०६–८ सालीं लंडनमध्यें नॉर्वेजिअन मंत्री या अधिकारावर होता. १९०८ सालीं तो ओस्लो विद्यापीठांत समुद्रवर्णनशास्त्र (ओशियानिओग्रॅफी) या विषयाचा प्राध्यापक होता. त्याला १९२२ सालीं शांततेचें 'नोबेल प्राईझ' देण्यांत आलें, आणि १९२५ सालीं त्याला सेन्ट ॲन्ड्र्यूज विद्यापीठाचा रेक्टर नेमण्यांत आलें.

**नाना फडणीस** (१७४२–१८००)—मराठेशाहीच्या उत्तर काळांतील एक थोर मुत्सद्दी. याचें संबंध नांव बाळाजी जनार्दन भानू. याची आई रखमाबाई मेहेंदळ्यांच्या घराण्यांतील होती. याला १४ व्या वर्षी घराण्यांत चालू असलेल्या राज्याच्या फडणिशीचीं वस्त्रें मिळालीं (१७५६). हा पेशव्यांबरोबर हैदराबादच्या स्वारींत होता. पुढें तीन वर्षे पुण्यास राहून भाऊसाहेब पेशव्याबरोबर पानपतच्या स्वारींत तीर्थक्षेत्रें पाहावींत या हेतूनें आईला घेऊन गेला होता; पण तींत मराठ्यांचा पराभव झाल्यामुळें अनेक प्रकारच्या हालअपेष्टा सोशीत, निघाल्यापासून १४ महिन्यांनीं तो १७६१ च्या जुलैंत पुण्यास परत आला. या प्रवासाचें हृदयंगम वर्णन त्यानें आपल्या आत्मवृत्तांत केलें आहे.

नारायणराव पेशव्याच्या पश्चात् पेशवाईची सारी जबाबदारी नानाच्यावर पडली. नारायणरावाचा वध करून रघुनाथराव पेशवा बनला, पण नाना व इतर जबाबदार मुत्सद्दी यांनीं बारभाई कारस्थान रचून आरंभीं गंगाबाईच्या व नंतर सवाई माधवरावाच्या नांवें राज्यकारभार सुरू केला. या साऱ्या घडामोडींत नाना प्रमुखपणें भाग घेत असल्यामुळें राज्यकारभारांत यानंतरच्या काळांत नानासच महत्त्वाचें स्थान लाभलें.

नानानें सवाई माधवरावाच्या नांवानें राज्यकारभार सुरू केल्यामुळें दादासाहेब पेशवा (रघुनाथराव) इंग्रजाकडे गेला व त्यानें पुन्हां पेशवेपद मिळविण्याची खटपट सुरू केली. पण नानानें भडोच, साष्टी, वगैरे सहा लक्षांचा प्रदेश इंग्लिशांना देऊन १७७६ सालीं राघोबाला आपल्या ताब्यांत घेतलें. लगेच कोल्हापूरकर व हैदर यांचाहि १७७७ त बंदोबस्त केला.

याप्रमाणें घरांत व बाहेर व्यवस्था लावल्यामुळें त्याच्याविरुद्ध मंडळींच्या मनांत नानाचें वजन वाढणार म्हणून वैषम्य आलें. त्यांनीं नानाला व बालपेशव्याला कैद करण्याचा घाट घातला; पण तो, आयत्या वेळीं नाना पुरंदरला गेल्यामुळें फसला. नानानें कारभारीपणा सोडून स्वतःच्या हातीं फक्त बालपेशव्याचा कारभारीपणा व पुरंदर किल्ला ठेवला. नंतर नानानें होळकराला फितूर करून १७७८ मध्यें कटाचा म्होरक्या मोरोबा फडणिसाला

क़ैद केलें व स्वतः पुनः कारभारी बनला. सालबाईच्या तहाच्या वेळीं १७८२ मध्यें इंग्रजांकडील साष्टीखेरीज सर्व मुलूख परत घेऊन रघुनाथरावासहि नानानें आपल्या ताब्यात घेतलें.

यापुढील कारभार नानाला सुखावह झाला. महादाजी शिंद्यानें दिल्लीची बादशाही आपल्या कबजांत घेतली. बादशहाला ६५ हजारांचा मासिक तनखा देण्याचें ठरवून वकील–इ–मुतालकीच्या व मीर बक्षीगिरीच्या सनदा १७८४ मध्यें महादजीनें घेतल्या व पेशव्यांनीं त्या १७९२ मध्यें अर्पण केल्या. १७९५ मध्यें खर्ड्याच्या लढाईंत जय मिळाल्यामुळें नानाच्या कारकीर्दींत मराठ्यांच्या सत्तेचा कळस झाला.

यानंतरचा काल मात्र नानास फार कष्टप्रद गेला. महादजी शिंदे व हरिपंत फडके हे नानाचे महत्त्वाचे मदतगार मरण पावले. १७९५ त सवाई माधवरावानें आत्महत्या केली. यामुळे नानाचा वीस वर्षांचा मराठी साम्राज्य राखण्याचा उद्योग निष्फळ झाला.

यशोदाबाईच्या मांडीवर बाजीराव रघुनाथाचा धाकटा भाऊ चिमाजी किंवा दुसरा कोणी यास देऊन त्याच्या नांवानें पेशवाईचा कारभार पुनः चालविण्याचा त्याचा हेतु होता. इकडे बाजीरावानें शिंद्याच्या मदतीनें नानाला कैद करून पेशवेपद मिळविण्याची खटपट सुरू केली. पण नानानें दोन कोट रुपये व २६ लक्षांची जहागीर देण्याचें कबूल करून शिंद्याला फितूर केला व आपणच बाजीरावास पेशवा बनवून १७८६ त त्याचा कारभार नाना पाहूं लागला.

देऊं केलेली रक्कम व जहागीर नानानें न दिल्यामुळें बाजीरावाच्या मसलतीनें शिंद्यानें नानास वानवडी येथें मेजवानीस बोलावून कैद केलें (१७९७) व नगरच्या किल्ल्यांत बंदींत ठेवलें. पुढे शिंद्याला नानानें दोन कोट रु. देऊन आपली मुक्तता करून घेतली (१७९७). या सर्व खटाटोपांत नानाचा लौकिक, मुलूख व पैसाहि नाहींसा झाला. शेवटीं ताप येऊन १८०० मध्यें नाना मरण पावला. तो निपुत्रिक होता. त्याच्यामागें त्याची बायको जिऊबाई हिनें बाजीरावाच्या भीतीनें अखेरीस इंग्रजांचा आश्रय घेऊन निर्वाहाची व स्वसंरक्षणाची व्यवस्था केली आणि पुढें एक दत्तकहि घेतला.

ठिकठिकाणीं नानानें घाट, देवालयें, वगैरे अनेक बांधलीं. त्यांपैकीं पुण्यांतील बेलबाग विशेष प्रसिद्ध आहे. थोरल्या माधवरावानंतर वीस वर्षें त्यानें मराठ्यांचें साम्राज्य टिकविलें, पण त्याच्या मृत्यूनंतर मराठे साम्राज्यांतील शहाणपणा व मुत्सद्दीपणा नाहींसा झाला यांत शंका नाहीं. नाना जिवंत असेतों मराठी राज्याच्या शत्रूंना यश मिळाले नाहीं. इंग्रजांना नानाचा चांगला वचक होता.

**नानालाल दलपतराम** (१८७७–१९४६)—एक गुजराथी कवि व प्रसिद्ध लेखक. श्रीमाळी ब्राह्मण कुळांत अहमदाबादेस यांचा जन्म झाला. हे एम्. ए. होऊन यांनीं शिक्षणखातें व न्यायखातें यांत बरींच वर्षें नोकरी केली. १९२१ सालीं ब्रिटिश सरकारच्या जुलमी कारभाराचा निषेध म्हणून नोकरीचा राजीनामा दिला.

हे अव्वल दर्जाचे साहित्यिक होते. कवि म्हणून यांची विशेष कीर्ति आहे. गुजराथी वाङ्मयांत यांनीं एक स्वतंत्र युग निर्माण केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांची अभिनव लेखनशैली पुढें अनेकांनीं उचलली. कविता, गज्जल, 'कुरुपुत्रा 'सारखीं महाकाव्यें, नाटकें, कादंबऱ्या, निबंध, इ. त्यांचें वाङ्मय बरेंच आहे.

**नानासाहेब पेशवे (दुसरा)** (१८२४–१८५८)—हा दुसऱ्या बाजीराव पेशव्याचा दत्तक मुलगा. याचें संबंध नांव धुंडिराज बाजीराव पेशवे. नानासाहेबाचा जन्म १८२४ च्या ८ डिसेंबरास झाला. याच्यावर बाजारावाची मर्जी बसल्यामुळें यास बाजीरावानें ७ जून १८२७ ला दत्तक घेतलें. व त्यास आपला वारस या नात्यानें कंपनी सरकारची क़बुली असावी म्हणून गव्हर्नर जनरलडे कळविलें. कंपनीनें तुमच्या पश्चात् सहानुभूतिपूर्वक विचार करूं म्हणून कळविलें. यानंतर बाजीराव २८ जानेवारी १८५१ रोजीं मृत्यु पावला.

बाजीरावाच्या मृत्यूनंतर नानासाहेबानें दरसाल मिळणाऱ्या आठ लक्ष नेमणुकीवर आपला वारसाहक्क सांगितला. पण त्याचा हा हक्क इंग्रज सरकारकडून नाकारण्यांत आला व त्याची नेमणूक बंद केली. नाहीं म्हणावयास बाजीरावाचे कंपनीकडे शिल्लक असलेले ३० लाख रु. कंपनीनें दिले व ५०० पायदळ व एक घोडदळाचा रिसाला आणि अवघ्या तीन तोफा नानासाहेबाकडे राहूं दिल्या. याशिवाय बिठूर व त्याच्या आसपासचा प्रदेश, दिवाणी व फौजदारी अधिकार काढून घेऊन वहिवाटीस चालू ठेविला. कंपनीनें आपला वारसाहक्क नाकबूल करून दरसालची नेमणूक बंद केली, ती चालू करावी म्हणून त्यानें पुनः गव्हर्नर जनरलच्या मार्फत कंपनीच्या डायरेक्टरांकडे अपील केलें. हें अपीलहि कंपनीकडून नामंजूर करण्यांत आलें.

नानासाहेबाचे वडील दुसरे बाजीराव यानें इंग्रजांना ब्रह्मावर्तास आल्यावर सैन्याची व पैशाची फार मदत केली होती. स्वतः नानासाहेबानें कित्येक वेळां इंग्रजांना साहाय्य केलें. १८५७ चे बंड कानपूरपर्यंत पसरत आलें. त्या वेळीं कानपूरच्या कलेक्टरानें नानासाहेबाकडे मदतीची याचना करतांच लगेंच जवळचें ३०० पायदळ व दोन तोफा घेऊन तो क़ानपुरास दाखल झाला.

पण इंग्रजांच्या धोरणांत कोठेंहि नानासाहेबाबद्दल सहानुभूति दिसेना. स्वतः प्रतिकार करावा म्हटलें तर इंग्रजांच्या मानानें पैशाचें व लष्कराचें सामर्थ्य कांहींच नाहीं. कोणाची मदत मिळण्याची आशा नव्हती. या कारणानें हा वेळेपावेतों तो स्वस्थ बसला होता; पण बंडवाल्यांकडूनच सैन्याचें धुरीणत्व लाभल्यामुळें त्यानें आपल्या दैवाची परीक्षा पाहण्याचा प्रयत्न केला.

बंडखोर सैन्यामध्यें संघटितपणा व शिस्त नसल्यामुळें व मिळालेल्या संधीचा फायदा न घेतल्यामुळें, कानपूर, काल्पी, ग्वाल्हेर व झांशी या ठिकाणीं बंडवाल्यांचा पराभव झाला व नानासाहेबाला कुटुंबांतील मंडळीसह नेपाळच्या हद्दींत प्राणरक्षणार्थ पळून जाणें भाग पडलें. तेथें कोणी आश्रय देईना, प्रगटण्याची चोरी; अशा स्थितींत अनेक हालअपेष्टा सहन करीत व अज्ञातवास कंठीत असतां नेपाळांत ठाडा गांवापासून सात कोसांवर देवखडी येथें दोपी ज्वर येऊन नानासाहेब मृत्यु पावला.

नानाचे डोळे पाणीदार व वाघासारखे होते. स्वभाव, सात्त्विक, सरळ, मधुरभाषी, परक्यावर एकदम विश्वास ठेवणारा व भोळा होता. हा घोड्यावर बसण्यांत पटाईत व शूर होता.

नानासाहेब जिवंत आहे अशा अनेक अफवा अनेक वेळां उठल्या व चौकशाहि झाल्या. नानासाहेब नेपाळांत निधन पावला नसून गुप्तवेषानें कोठें तरी साधुवृत्तीनें काळ कंठीत आहे असा विश्वास अनेकांचा होता व आजहि यावर विश्वास ठेवणारे आढळतील. पण बाजीरावाची औरस मुलगी कुसुमबाई (बयाबाई आपटे) हिनें पुण्यास इतिहासज्ञ वि. का. राजवाडे यांना बंडानंतरची नानासाहेबाच्या कुटुंबाविषयीं स्वतः पाहिलेली हकीगत जी सांगितली (ती राजवाड्यांनीं प्रसिद्धहि केली आहे) तीवरून नानासाहेब १८५८ तच नेपाळांत वारला याबद्दल शंका उरत नाहीं.

**नाफ्तेल**—(नाप्था). कमी उत्कलनबिंदु (बॉइलिंग पॉइंट) असणाऱ्या द्रव उज्जकर्वी (हायड्रो कार्बन) ना ही संज्ञा लावतात. कोळशाचें डांबर, खडक तेल व पेट्रोलियम यांपासून विभागशः ऊर्ध्वपातन करून हें काढतात. हें आंतरज्वलन इंजिनांत जळण म्हणून वापरतात. तसेंच चरबी, राळ, इंडिया रबर, इ. ना हें विद्रावक आहे. लांकडाच्या ऊर्ध्वपातनानें जें नाफ्तेल काढतात. तें अल्कोहोलांत भेसळ करून मेथिलेटेड स्पिरिट म्हणून विकतात.

**नाफ्थॅलीन**—हा स्फटिकरूप उज्जकर्ब असून याला कोळशाच्या वायूसारखा वास येतो. हा नेहमीं थंड हवेंत वायुनलिकेंत सांचलेला आढळतो. हा कोळशाच्या डांबरांत शेंकडा ४ ते ६ या प्रमाणांत असतो. यापासून बेन्झीनप्रमाणें पुष्कळ द्रव्यें निघतात व त्यांचा रंगाच्या कामीं उपयोग करतात.

**नाभादास** (१६००)—किंवा नाभाजी हा डोम जातीचा हिंदुस्थानी संतकवि असून वल्लभपंथाचा गुरु अग्रदास याचा हा शिष्य होता. हा अंधळा होता. गुरूनें त्याला 'भक्तमाला' ग्रंथ लिहिण्याची आज्ञा केली, व हा ग्रंथ त्यानें १५८५-१६५३ या काळांत लिहिला. या ग्रंथाचें भाषांतर बहुतेक देशी भाषांत आढळतें. भक्तमालेंत फक्त संतांची नामावली आहे; फारसें ऐतिहासिक विवेचन नाहीं किंवा सर्व संतांची पूर्ण यादी नाहीं. आपल्या महाराष्ट्रीय संतांनीं नाभाजीचा गौरवानें उल्लेख केलेला आहे. व त्याच्या ग्रंथांतून माहिती निवडून घेतली आहे.

**नाभानेदिष्ठ**—एक वैदिक ऋषि. पुराणवाङ्मयांत नाभाग, नाभागदिष्ठ, नाभागनेदिष्ठ, अशींहि नांवें असून भिन्न कथा आहेत. हा वैवस्वत मनूच्या नभग पुत्राचा पुत्र. यानें रुद्रास संतुष्ट करून त्याच्यापासून संपत्ति व ब्रह्मविद्या मिळविली. ऐतरेय ब्राह्मण व यजुर्वेद यांतून नाभानेदिष्ठाचे उल्लेख सांपडतात. सत्यनिष्ठ म्हणून याची प्रसिद्धि आहे. याचा पुत्र अंबरीष असून या वंशाची नामावली अनेक पुराणांतून दिलेली आढळते. हें वैशालीचें राजघराणें असावें.

**नाभा संस्थान**—हें पूर्व पंजाबांत असून त्याचें क्षे. फ. ९९६ चौ. मैल व लो. सं. ३,४०,०४४ आहे; व सालिना उत्पन्न सुमारें ३६ लक्ष रु. आहे. हल्लींचे महाराजा प्रतापसिंह बहादूर १९२८ सालीं गादीवर आले, पण ते अज्ञान असल्यामुळें त्यांना राज्यकारभाराचे पूर्ण अधिकार १९४१ सालीं मिळाले. यांचे वडील रिपुदमनसिंह यांना सरकारनें कांहीं अपकृत्याबद्दल पदच्युत केलें होतें. संस्थानिकांना पंधरा तोफांच्या सलामीचा मान आहे. या संस्थानांत ६ शहरें व ४९० खेडीं आहेत. नाभा हें शिखांचें पहिल्या प्रतीचें संस्थान आहे. येथें काल्व्यांनीं बऱ्याच जमिनीला पाणी पुरवितात. मुख्य पिकें गहूं, हरभरा, बाजरी, जवस, ऊंस व कापूस हीं आहेत. येथें सतरंज्या, सोन्याचांदीचे दागिने व पितळेचीं भांडीं होतात. नाभा शहर संस्थानची राजधानी असून त्याची लो. सं. १३,६२० आहे. हें शहर १७५५ सालीं हमीरसिंगानें वसविलें. शहरांत एक दगडी किल्ला व शहराभोंवतीं कोट असून त्याला सहा दरवाजे आहेत. नाभा येथें एक कॉलेज आहे. पूर्वी हा प्रदेश फुलकन संस्थानांचा भाग होता. १७६३ सालीं नाभा स्वतंत्र संस्थान झालें, व १८०९ सालीं तें ब्रिटिशांच्या संरक्षणाखालीं आलें. आतां हें संस्थान पूर्व पंजाब संस्थानी संघांत सामील झालें आहे.

**नामकरण**—सोळा संस्कारांपैकीं हा एक संस्कार आहे. तो सामान्यतः बाराव्या दिवशीं करतात. पूर्वी जन्मतःच नांव ठेवीत. पुढें १०, ११, १२, १६, किंवा ४० वा दिवस युक्त मानला गेला. कांहींच्या मतें १०० व्या दिवशीं किंवा एका वर्षानें एखाद्या शुभ-

दिनीं हा संस्कार करण्यास प्रत्यवाय नाहीं. नांव ठेवावयाचें तें दोन अगर चार अक्षरी नांव असावें. मुलींचीं विषमाक्षरी व मुलांचीं समाक्षरी नांवें असावीं. नाक्षत्र, गुह्य, अभिवादनीय, व्यावहारिक असे नांवांचे प्रकार आहेत. जारणमारणाचा प्रयोग कोणीं करूं नये म्हणून ठेवलेलें नांव गुप्त राखण्यांत येत असे. हेंच गुह्य नांव राज्यावर बसतांना व यज्ञ केल्यावर निराळें धारण करण्याची रूढि असे. एकंदरींत पूर्वीं एकाच माणसाला अनेक नांवें असत असें दिसतें.

**नामजोशी, महादेव वल्लाळ** ( १८५३–१८९६ )— महाराष्ट्रांतील एक विविधकार्यकर्ते. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें 'न्यू इंग्लिश स्कूल', 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी' यांसारख्या संस्थांच्या कार्यांत उत्साहानें लो. टिळकांच्या बरोबरीनें भाग घेऊन त्या त्या संस्थांच्या उन्नतीप्रीत्यर्थ हे झटले. सन १८८९ मध्यें मुंबईस भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनासाठीं टिळकांनीं व यांनीं दहा हजार रुपये जमवून दिले. भांडवलाच्या उभारणीसाठीं भाग ( शेअर्स ) काढण्याची पद्धत इकडे यांनीं अमलांत आणली. औद्योगिक परिषद् सुरू करण्याचें श्रेय यांनाच आहे. १८८७ सालीं यांनीं 'शिल्पकलाविज्ञान' हें मासिक काढलें व तें आयुष्याच्या अखेरपर्यंत चालविलें. मुंढव्याची डेक्कन पेपर मिल, पुणे म्युनिसिपालिटीचें व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल स्कूल, रे इंडस्ट्रिअल म्यूझियम, मांडीं, तार, रेशीम यांसारख्या वस्तूंच्या गिरण्या, वगैरे अनेक सार्वजनिक उद्योगांचे हे प्रवर्तक होत. 'किरण', 'डेक्कन स्टार' व 'मराठा' या आपल्या वृत्तपत्रांतून हे आपले सडेतोड विचार लोकांपुढे मांडीत असत. रशिया व तुर्कस्तान यांमध्यें लढाई चालू असतां शिंदे–होळकर हे रशियाशीं कारस्थान करीत आहेत अशी बातमी प्रसिद्ध झाली होती; या बातमीस झणझणीत उत्तर देणारे हेच होत.

**नामदेव**—एक महाराष्ट्रीय संतकवि. सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाडनजीकच्या नरसिंवामणी या नांवाच्या खेड्यांत याचें घराणे राहत असे. नामदेव शिंपी जातीचा असून प्रथम त्याला त्याच धंद्याचें शिक्षण मिळालें. त्याचा बाप दामाशेट व आई गोणाबाई हीं पंढरपुरास असतां तेथेंच ११९२ सालीं नामदेवाचा जन्म झाला. याच्या जन्माविषयीं कांहीं विचित्र आख्यायिका आहेत. नामदेवाचें लक्ष शिंपीकामांत लागेना, व तो विठ्ठलभक्त झाला. विसोबा खेचर हा नामदेवाचा गुरु होय. ईश्वराच्या वास्तविक स्वरूपाचें ज्ञान त्यास झालें व त्याच ईश्वराची प्राप्ति करून घेण्यास तो अहर्निश झटत होता. नामदेवाचे मराठींतील अभंग फार रसाळ आहेत. कांहीं हिंदी भाषेंतहि आहेत. पण ते याच नामदेवाचे कीं काय याबद्दल संशोधकांना शंका आहे. महाराष्ट्रांतील भक्तिमार्गाचे अध्वर्यु ज्ञानदेव, नामदेव व तुकाराम हे असून नामदेव व तुकाराम यांनीं निरक्षर समाज धार्मिक व सदाचारी बनविला. आणि पंढरपूरची यात्रा दरसाल करणारा असा प्रचंड वारकरी संप्रदाय निर्माण केला. नामदेवाच्या अभंगांची गाथा प्रसिद्ध आहे. नामदेवाच्या सर्व कुटुंबानें एकाच वेळीं पंढरपूरच्या देवद्वारीं समाधि घेतली अशी आख्यायिका असून विठोबाच्या देवळांत नामदेवाच्या समाधीची पायरी दाखविण्यांत येते. नामदेवाच्या अभंगांची भाषा बरीचशी अर्वाचीन आहे, त्यामुळें तो ज्ञानेश्वरकालीन नसावा असें कांहीं संशोधकांचें म्हणणें आहे.

पंजाबांत होऊन गेलेला नामदेव व महाराष्ट्रांतील नामदेव हे एकच काय याविषयीं मोठा वाद आहे. पंजाबांतील नामदेवाचीं हिंदी भाषेंत सुमारें ११० पद्यें आहेत. त्यांपैकीं ६१ तर शिखांच्या ग्रंथसाहेबांत आहेत. त्यांचें मूळ व भाषांतर कै. शं. पु. जोशी यांनीं आपल्या 'पंजाबांतील नामदेव' या पुस्तकांत देऊन हे दोन्ही नामदेव एकच असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पंजाबांत व राजपुतान्यांत नामदेवाचीं मंदिरें आहेत. नामदेव-संप्रदायी पंजाबी शिंपी हिंदु व शीख मिळून सदतीस हजारांवर आहेत. गुरुदासपुर जिल्ह्यांत घोमान गांवीं नामदेवाचें 'गुरुद्वारा बाबा नामदेवजी' नांवाचें जुनें स्मारक आहे. हीच नामदेवाची समाधि मानण्यांत येते. याच्या व्यवस्थेसाठीं एक समिति आहे.

**नाममात्रतावाद**—( नॉमिनॅलिझम ). 'स्कूलमेन' या नांवाच्या तत्त्ववेत्त्यानें हा शब्द प्रचारांत आणला. या सिद्धान्ताचा अर्थ असा कीं, आपल्याला ज्ञात होणाऱ्या ज्या पृथक् पृथक् वस्तू त्यांनाच फक्त खरोखर अस्तित्व आहे, आणि 'सामान्यवाचक' ( युनिव्हर्सल ) जे शब्द आहेत, तीं केवळ नांवें आहेत; तद्दर्शक वस्तू प्रत्यक्ष अस्तित्वांत नाहींत. हा सिद्धान्त प्रथम बोएथियसनें चर्चिला, आणि नंतर ११ व्या शतकांत जॉन रोस्केलिनसनें त्याचा पुन्हां पुरस्कार केला. पण १०९२ सालीं सोइसोन्स येथें हा सिद्धान्त त्याज्य ठरविण्यांत आला, आणि वास्तववादी पंथाच्या तत्त्ववेत्त्यांचा विजय झाला. १४ व्या शतकांत डन्स स्कोटसचा इंग्रज शिष्य फ्रॅन्सिस्कन विल्यम यानें या सिद्धान्ताला पुन्हां चालना दिली.

**नामशूद्र**—या जातीची उत्पत्ति शूद्र पुरुष व ब्राह्मण स्त्री यांच्यापासून झाली, असें मनुस्मृतींत आहे. हे लोक मासे पकडण्याचा व नावाड्याचा धंदा करतात. लो. सं. सुमारें २१ लक्ष असून त्यांपैकीं १९ लक्ष बंगाल प्रांतांत आहेत. कांहीं लोक शेतकी व सुतारकाम करतात. नामशूद्रांना मूळचें 'चांडाळ' हें नांव आवडत नाहीं. आसामांत दीड-पावणेदोन लाख नामशूद्र आहेत.

**नामा पाठक** ( सु. १४व्या शतकाची अखेर )—एक मराठी कवि. भरतभेट व अश्वमेध या ग्रंथाचा कर्ता. ज्ञानेश्वर–समकालीन कान्हो पाठकाचा हा नातू. यानें नव्याणव ओंव्यांचें 'नामरत्नमाला' नांवाचें एक प्राकृत ओवीबद्ध प्रकरण लिहिलें आहे. एकनाथानें आपल्या संतमालिकेंत यास स्थान दिलें आहे.

**नामा विष्णुदास** ( पंधराव्या शतकाची अखेर )— हा एकनाथाच्या समकालीन व मुक्तेश्वराच्या पूर्वी होऊन गेला असावा असें दिसतें. मराठींत अठरा पर्वें असलेलें महाभारत यानें लिहिलें. रायभारती हा याचा गुरु. याचें नामदेवाच्या नांवाशीं जरी नामसादृश्य असलें तरी या दोन्ही व्यक्ती अगदीं भिन्न आहेत.

**नामूर**—बेल्जिअम देशांतील नामूर प्रांताचें हें मुख्य शहर म्यूज व सेंबर या नद्यांच्या संगमावर वसलेलें आहे. १८८८ सालीं या शहराभोंवतीं ९ किल्ले बांधले, त्यामुळें हें शहर फार मजबूत झालें. लो. सं. ( १९४४ ) ३०,७३१ आहे. हें शहर फार सुंदर आहे. येथें चाकू, कात्र्या, कमावलेल्या चामड्याच्या वस्तू फार चांगल्या होतात. येथील पुराणवस्तुसंग्रहालय पाहण्यासारखें असून त्यांत प्राचीन रोमन लोकांच्या बऱ्यास वस्तू आहेत.

**नायक राजे ( मदुरेचे )**—मदुरा ही पाण्डय राजांची राजधानी होती. मदुरा हें शहर प्रथमतः विजयानगरच्या नायक सेनापतींच्या हातीं १५५९ सालीं आलें. त्यांनीं तेथें आपलें निराळेंच घराणें स्थापन करून विजयानगरची सत्ता नाकबूल केली. या घराण्यांतील पहिला राजा विश्वनाथ होय.

विश्वनाथ नायक ( १५५९–१५६३ )— १५५८ पूर्वी चंद्रशेखर पाण्डय हा मदुरेस पाण्डय देशाच्या गादीवर बसला. तंजावरचा चोल राजा वीरशेखर यानें युद्ध करून पाण्डय राज्य जिंकलें. चंद्रशेखर विजयानगर येथें आश्रयार्थ पळून गेला. रामराजानें चोल राजास हांकून देण्याकरितां काट्यिनागम नायक या सेनापतीस पाठविलें. त्यानें चोल राजास हांकून मदुरा घेतलें, परंतु पाण्डय राजास गादीवर न बसवितां तो स्वतःच कारभार पाहूं लागला. यामुळें रामराजानें नागम याच्याच विश्वनाथ नांवाच्या मुलास सैन्य घेऊन बंड मोडण्यास पाठविलें. विश्वनाथानें बापाचा पराभव करून त्यास कैद केलें व स्वतःच कारभार चालविला. विश्वनाथ यानें नांवाला चंद्रशेखर यास गादीवर बसविलें. थोड्याच दिवसांनीं तो मेल्यावर विश्वनाथ स्वतःच राज्यकारभार पाहूं लागला. चंद्रशेखराच्या वंशांत पुढें कोणीच न उरल्यानें विजयानगरकरांनीं विश्वनाथासच मदुरेचा राजा केलें. विश्वनाथाबरोबर आर्यनायक मुदलियार ऊर्फ आर्यनाथ हा होता. यानें विश्वनाथास पुष्कळ मदत केली. विश्वनाथानें आर्यनाथ यास 'दलवाय' ही पदवी देऊन आपला सेनापति व मुख्य प्रधान केलें. विश्वनाथानें फार शहाणपणानें राज्य केलें. तटबंदी केली, देवालयें बांधलीं व कालवे खोदले. विश्वनाथ हा १५६३ सालीं मृत्यु पावला.

कुमार कृष्णप्पा ( १५६३–१५७३ )—आर्यनाथ हा उत्तरेकडे मुसलमानांशीं युद्ध करण्यांत गुंतला असतां दक्षिणेंत दंचिछि नायक यानें बंड केलें, पण तें लवकर मोडलें गेलें. या वेळीं आर्यनाथ हाच खरा राजा होता. यानें पुष्कळ लोकोपयोगी कामें केलीं. याच्यानंतर कुमार कृष्णप्पा यानें सिंहली लोकांचें राज्य घेऊन तेथें आपल्या मेहुण्यास प्रतिनिधि नेमलें. तो स. १५७३ त मरण पावला.

कृष्णप्पा व विश्वनाथ ( दुसरा ) ( १५७३–१५९५ )—हे दोघेहि एकमतानें राज्यकारभार पाहत असत. हे दोघे कुमार कृष्णप्पाचे पुत्र असून त्यांना आर्यनाथ यानें गादीवर बसविलें होतें. विश्वनाथ हा प्रथम मेला असावा. कारण कृष्णप्पाच्या मृत्यूनंतर त्याचेच पुत्र इ. स. १५९५ मध्यें गादीवर बसले.

लिंगय्या व विश्वप्पा ( तिसरा विश्वनाथ ) ( १५९५–१६०२ )—हे दोघे एकमतानें राज्यकारभार पाहत असत. यांच्या कारकीर्दींत देशाची भरभराट पुष्कळ झाली. विश्वनाथ बहुतकरून आपल्या भावाच्या पूर्वी मेला असावा. लिंगय्या हा स. १६०२ मध्यें मरण पावला. पुढें त्याचा चुलता कस्तुरीरंगय्या यानें राज्य बळकाविलें, परंतु एकाच आठवड्यांत त्याचा खून झाला व लिंगय्याचा पुत्र मुत्तुकृष्णप्पा यास गादी मिळाली.

मुत्तुकृष्णप्पा ( १६०२–१६०९ )—यानें रामनद येथील सेतुपति राजांच्या प्राचीन वंशाची पुनः स्थापना केली. हा स. १६०९ मध्यें मरण पावला.

मुत्तुवीरप्पा ( १६०९–१६२३ )—बापाच्या मरणानंतर हा गादीवर आला. याच्या कारकीर्दींत तंजावरकराबरोबर एक लहानसें युद्ध झालें.

तिरुमल ( १६२३–१६५९ )—प्रसिद्ध तिरुमल हाच होय. हा मुत्तुवीरप्पाचा धाकटा भाऊ. यानें त्रिचनापल्ली सोडून मदुरा येथें कायमचें वास्तव्य करून मदुरा येथें मोठमोठीं देवालयें व राजवाडे बांधले.

मुत्तुअरकाद्रि ( राज्य. १६५९–१६६० )— ( मुत्तुवीरप्पा ). यानें त्रिचनापल्ली येथील किल्ल्याची डागडुजी केली. मुसलमानांनीं त्रिचनापल्लीस वेढा दिला. परंतु त्यांचा पराभव झाला. मुत्तुवीरप्पा १६६० सालीं मरण पावला. त्याच्या मागून त्याचा पुत्र गादीवर आला.

चोक्कनाथ ( १६६०–१६८२ )—( चोक्कलिंग ऊर्फ चोकप्पा ). हा राज्यावर आला तेव्हां १६ वर्षांचा होता. कांहीं दुष्ट मंत्र्यांनीं

त्याला पदच्युत करण्याचा घाट घातला होता. परंतु त्यांतून पार पडून त्यानें राज्यकारभार स्वतःच्या हातांत घेतला. इ. स. १६७७ मध्यें म्हैसूरच्या राजानें मदुरेवर स्वारी केली तेव्हां प्रधानमंडळानें चोक्कनाथ यास पदच्युत करून कैद केलें व त्याच्या भावास गादीवर बसविलें.

मुत्तुलिंगप्पा ( १६७७ )—यानें थोडे महिने राज्य केल्यावर त्यास पदच्युत करून पुनः चोक्कनाथ यास गादीवर बसविलें. पुढें चोक्कनाथानें १६८२ पर्यंत राज्य केलें.

रंगकृष्ण मुत्तुवीरप्पा (१६८२-१६८८)—याच्या वेळीं देशभर अराजकता नांदत होती. मदुरा प्रांताचे पांच विभाग होऊन ते पांच राजांनीं वांटून घेतले. पण ही स्थिति सुधारत जाऊन नायक राजानें आपली राजधानी परत घेऊन जिंकलेला प्रांत परत मिळविला. तो देवी येऊन मरण पावला. त्याच्या मरणानंतर त्याच्या विधवा (मुक्तमाळ) राणीस एक पुत्र झाला. पण त्यानंतर तिनें आत्महत्या केली.

संगम्माळ (१६८८-१७०४)—(चोक्कनाथाची विधवा स्त्री). ही उदार होती. परंतु तिला पाप-पुण्याचा विचार नसे. स. १७०४ च्या सुमारास नायक राजा वयांत आल्यावर त्यानें राज्यकारभार हातीं घेतला व संगम्माळ हिच्याविरुद्ध एक पक्ष तयार करून तिला उपाशीं ठेवून जीवें मारलें.

विजयरंग चोक्कनाथ ( १७०४-१७३१ )—हा नायक इ. स. १७३१ मध्यें निपुत्रिक मरण पावला.

मीनाक्षी ( १७३१-१७३६ )—विजयरंग चोक्कनाथ याच्या विधवा राणीनें वंगारु तिरुमल याचा पुत्र दत्तक घेतला. पण तो स्वतःच राज्यावर हक्क सांगूं लागला. त्याच्या पक्षानें त्रिचनापल्ली येथें राणीस ठार मारण्याचा बेत केला, परंतु तो फसला. स. १७३४ मध्यें सफदर अलीखान याच्या आधिपत्याखालीं मुसलमानांनीं हा प्रदेश व त्याप्रमाणेंच तंजावर, त्रावणकोर व सर्व पश्चिम किनारा उध्वस्त करून टाकला. वंगारु तिरुमल यानें सफदरअलीच्या साहाय्यानें आपण राजा म्हणून जाहीर केलें, तेव्हां राणीस भीति वाटून तिनें पुष्कळ द्रव्य देऊन चंदासाहेब यास वश करून घेतलें. तेव्हां वंगारु तिरुमल हा मदुरा येथें निघून गेला. पुढें स. १७३६ मध्यें चंदासाहेब परत आला व राणीहि सर्व प्रकारें त्याच्या तंत्रानें कारभार पाहूं लागली. त्यानें वंगारु तिरुमल याच्याविरुद्ध दिंदिगल व मदुरा येथें सैन्य पाठविलें. त्या सैन्यानें विजय मिळवून मदुरेंत प्रवेश केला. याप्रमाणें मदुरा शहर चंदासाहेब याच्या हातांत आल्यामुळें त्यानें राज्य बळकाविलें व मीनाक्षीनें निराशेनें आत्महत्या केली. याप्रमाणें मदुरा येथील हिंदुराज्याचा शेवट झाला. वंगारु तिरुमल यानें चंदासाहेब याच्याविरुद्ध साताऱ्याहून मराठ्यांची मदत मागितली. तेव्हां इ. स. १७३९ मध्यें रघूजी भोंसले यानें मोठें सैन्य घेऊन मदुरेवर स्वारी केली. त्या वेळीं मुसलमानांची भयंकर कत्तल होऊन त्यांचा पराभव झाला व दोस्तअली हा मारला गेला. नंतर मराठ्यांनीं त्रिचनापल्लीस वेढा देऊन किल्ला सर केला व चंदासाहेबास कैद केलें ( १७४१ ). याप्रमाणें मदुरेचें राज्य अराजकतेस बळी पडलें.

**नायक व नायिका**—नाटकांतील मुख्य पात्रें. रूपकांत वर्णिलेल्या मुख्य फलाचा जो अधिकारी त्यास नायक असें म्हणतात. जसें, शाकुंतल नाटकांत दुष्यंत हा त्या रूपकांत वर्णिलेल्या फलाचा उपभोक्ता आहे म्हणून तो त्या रूपकाचा नायक होय. संस्कृतांत नायकाचे त्याच्या कुलावरून तीन आणि त्याच्या स्वभावावरून चार असे सात भेद केले आहेत.

१. कुलावरून— ( अ ) दिव्य-देवतादिक. जसें, पार्वतीपरिणय नाटकांत शंकर. ( आ ) अदिव्य-मनुष्यादिक. जसें, शाकुंतलांतील दुष्यंत राजा. ( इ ) दिव्यादिव्य-देव असून ज्यांनीं मनुष्यावतार धारण केल्यामुळें ज्यांचें चरित्र मनुष्याप्रमाणें असतें तें. जसें, उत्तररामचरितांतील राम.

२. स्वभावावरून—( १ ) धीरोदात्त; उदा., रामचंद्र, युधिष्ठिर, नलराजा, इ.. ( २ ) धीरोद्धत; उदा., भीमसेन. ( ३ ) धीरललित; उदा., श्रीकृष्ण, वत्सराज, इ.. ( ४ ) धीरप्रशांत; उदा., मालती-माधवांतील माधव.

ह्याशिवाय शृंगाररसांतील स्त्रियांशीं जें नायकाचें वर्तन असतें त्यावरून आणखी नायकाचे चार भेद केले आहेत:

( १ ) दक्षिण— सर्व स्त्रियांवर सारखी प्रीति ठेवणारा. ( २ ) धृष्ट—स्त्रीनें धिक्कार केला तरी लज्जा न बाळगतां समोर येणारा. ( ३ ) अनुकूल— एकाच स्त्रीच्या ठायीं जो आसक्त असतो तो. ( ४ ) शठ—वरून एकाच स्त्रीच्या ठायीं प्रीति दाखवून गुप्त रीतीनें विप्रिय आचरण करणारा.

नायिका— नायकाची जी मुख्य स्त्री ती स किंवा नायकाप्रमाणें जी फलाधिकारिणी असते ती. जसें, शाकुंतलांत शकुंतला.

नायिकेचे मुख्य तीन भेद आहेत— ( १ ) स्वीया; म्हणजे स्वस्त्री. ( २ ) परकीया; म्हणजे परस्त्री. आणि ( ३ ) साधारणी; म्हणजे वेश्या.

ह्यांत आणखी तीन पोटभेद आहेत—

स्वीया हिचे पोटभेद—( अ ) मुग्धा, ( आ ) मध्या, व ( इ ) प्रगल्भा.

ह्याशिवाय शृंगाररसांत अवस्थेनुरूप आणखी स्वीया नायिकेचे आठ भेद केले आहेत—

( १ ) स्वाधीनपतिका— जिच्यावर पति फार आसक्त असतो ती. ( २ ) खंडिता— स्वपति अन्यस्त्रीसंभुक्त पाहून जी ईर्ष्येनें

कुपित होते ती. (३) अभिसारिका— गुप्त रीतीनें रति करण्यास्तव जी कांताकडे संकेतस्थळीं जाते किंवा त्यास बोलाविते ती. (४) कलहांतरिता— कांत अनुनय करीत असतांहि त्याचा अनादर करून मागाहून जी पश्चात्ताप पावते ती. (५) विप्रलब्धा— कांतानें संकेतस्थळीं येण्याचा संकेत केला असतां त्याप्रमाणें तो न आल्यामुळें जी अवमानित होते ती. (६) प्रोषितभर्तृका—जिचा पति परदेशीं गेल्यामुळें कामदुःखानें जी व्याकूळ झालेली असते ती. (७) वासकसज्जा— आज पति येणार अशा इच्छेनें क्रीडागृहांत अलंकारादिक घालून जी वाट पाहत बसते ती. (८) विरहोत्कंठा—पतीच्या संगमाचा निश्चय असतां पति लवकर न आल्यामुळें त्याच्याकरितां जी विरहव्याकुल होऊन उत्कंठित होते ती.

परकीया—हिचे दोन भेद आहेत : (अ) परोटा—दुसऱ्याची स्त्री. (आ) मून्यका.

साधारणी—वेश्या. ही अंतःकरणापासून कोणावरहि अनुरक्त नसते. क्वचित् असली तर मात्र तीस रूपकांत नायिका मानतात. उदा., वसंतसेना (मृच्छकटिक).

**नायकी कानडा**—हा राग काफी थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहांत धैवत स्वर वर्ज्य होतो. म्हणून याची जाति पाडव-पाडव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय मध्यरात्र सर्वसंमत आहे. याच्या पूर्वांगांत सुहा व उत्तरांगांत सारंग हे राग दृष्टीस पडतात. हा आधुनिक राग आहे. हा एक कानड्याचा प्रकार आहे. हा राग गोपाल नायकानें प्रचलित केला अशी समजूत आहे.

**नायगर नदी**—ही नदी पश्चिम आफ्रिकेंत मोठेपणांत तिसऱ्या अनुक्रमाची आहे. ती फ्रेंच गिनी या प्रदेशांत उगम पावून, टिंबक्टूपर्यंत वाहत जाऊन नंतर बुसा येथील तट फोडून पुढें गिनीच्या आखाताला जाऊन मिळते. तिची एकंदर लांबी २,६०० मैल आहे. या नदीचा दलदलीचा प्रदेश समुद्रापासून ८० मैलांवर सुरू होतो आणि तेथून नायगर नदी अनेक मुखांनीं समुद्राला मिळते. समुद्रानजीक या नदीवर बॅरो हें बंदर आहे. पण तें उत्तरोत्तर नाविक वाहतुकीला अडचणीचें होत आहे.

**नायगेरिया**—पश्चिम आफ्रिकेंतील एक ब्रिटिशसंरक्षित राज्य व राजवसाहत (प्रोटेक्टोरेट क्राउन कॉलनी). १७ व्या शतकांत घातलेल्या व्यापारी डेपोच्या काळापासून या संस्थानचा इतिहास सुरू होतो. पुढें पाम तेलाच्या उत्पादनाशींहि याचा संबंध येतो. उत्तर भागांत मुसलमानी जाती असून दक्षिण भागांत मूळचे मूर्तिपूजक लोक (मुसलमान अगर ख्रिश्चन न झालेले) राहतात. या लोकांवर त्यांच्या पुढाऱ्यांच्यामार्फत नियंत्रण ठेवण्यांत येतें. लोक मुख्यतः शेतकरी आहेत व जनावरें, मेंढ्या, वगैरे पाळण्याचा उद्योग करतात. कथील व कोळसा हे खनिज पदार्थ निघतात. या संस्थानांत अद्यापि श्वेतवर्णीयांचा निवास घडला नाहीं. याचें कारण येथील हवा त्यांना मुळींच मानवत नाहीं हेंच होय. क्षेत्रफळ ३,३५,७०० चौरस मैल. लोकसंख्या सु. दोन कोटी आहे. राजधानी लागोस.

**नायडू, सौ. सरोजिनी** (१८७९–१९४९)—एक श्रेष्ठ हिंदी महिला व संयुक्त प्रांताध्यक्ष (गव्हर्नर). या विशेषतः प्रसिद्ध कवयित्री, वक्त्री व राजकारणपटु होत्या. यांचें शिक्षण लंडन येथील किंग्ज कॉलेजमध्यें व केंब्रिज येथील गर्टन कॉलेजमध्यें झालें. यांचे इंग्रजी भाषेंतील तीन काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत आणि

त्यांचें अनेक भाषांत भाषांतरहि झालें आहे. यांनीं सामाजिक, धार्मिक व राजकीय विषयांवर अनेक व्याख्यानें दिलीं. तसेंच स्त्री-समाजाविषयीं यांनीं पुष्कळच कार्य केलें. १९२५ सालीं या हिंदी राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष झाल्या. १९३० मध्यें सत्याग्रह चळवळींत महात्मा गांधी यांच्या बरोबरीनें भाग घेतल्यामुळें यांस तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३२ सालीं या तात्पुरत्या राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष होत्या. त्या वेळींहि त्यांस शिक्षा झाली. या वेळीं कॉंग्रेस वर्किंग कमिटी सरकारनें बेकायदेशीर ठरविली होती. १९३१ मध्यें या गोलमेज परिषदेच्या सभासद होत्या. यांनीं आशिया, युरोप, अमेरिका, आफ्रिका, वगैरे बऱ्याच देशांत प्रवास केला असून हिंदुस्थानविषयक प्रश्नांवर अनेक व्याख्यानें दिलीं. हिंदुस्थानला स्वातंत्र्य लाभल्यानंतर यांना संयुक्त प्रांताचें गव्हर्नरपद देण्यांत आलें. तें त्यांनीं मरेपर्यंत चांगलें भूषित केलें होतें. हा श्रेष्ठ मान कोणाहि महिलेला मिळालेला नाहीं. आशिया खंडांतील राष्ट्रांची जी पहिली परिषद् झाली तिचें अध्यक्षस्थान सरोजिनीदेवींनाच लाभलें होतें व त्या वेळचें त्यांचें भाषणहि मोठें उदात्त, स्फूर्तिदायक व चिरस्मरणीय असेंच झालें.

**नायर जात**—मलबार किनाऱ्यावरील ब्राह्मणेतरांत बहुतेक भरणा नायरांचा असून त्यांची एकंदर लो. सं. अकरा-बारा लाख आहे; पैकीं मद्रास इलाख्यांत चार लाखांवर असून सुमारें पांच लक्ष त्रावणकोर संस्थानांत आणि दीड लक्ष कोचीन संस्थानांत आहे. 'नायर' हें नांव संस्कृत 'नायक' शब्दापासून झालें असावें; पण कोणी 'नायर' हा 'नागर' याचा

अपभ्रंश मानतात. पूर्वी हे क्षत्रिय होते असें वाटतें; कारण त्यांचे खेळ, पदव्या व इतर गोष्टी यांवरून त्यांचें क्षात्रतेज दिग्दर्शित होतें. केरळ माहात्म्यांत नंबुद्री ब्राह्मण व देव, आणि गंधर्वराक्षसांच्या बायका यांच्या संयोगापासून ही जात झाल्याचें सांगितलें आहे. द्राविडी जातीवर आर्य ब्राह्मण संस्कृतीचा पगडा बसून ही जात झाली असावी.

इंग्रजी शिक्षणाचा प्रसार या जातींत बराच झाला असल्यामुळें नायर जात बौद्धिक कामांत मोठ्या प्रमाणांत आढळून येते. नायर जातींत पोटजाती पुष्कळ आहेत. सर्वांत श्रेष्ठ जातीस 'किरियम' म्हणतात. बौद्धिक काम करणारांना मेनन ही पदवी पूर्वी लावीत असत. नायर ही अति सुंदर जातींपैकीं एक जात आहे. नायर स्त्री-पुरुष दोघेहि फार स्वच्छ असतात. या जातींत ओनम हा महत्त्वाचा सण असून त्यांत धनुष्यबाणाचें महत्त्व असतें. नायराचे वारस अनुक्रमें त्याची आई, बहीण व तिचीं मुलें असतात. म्हणजे वारसा स्त्रियांकडे जातो. त्यांच्या चालीरीती ब्राह्मणासारख्या आहेत. शिक्षणाच्या बाबतींत नायर लोक फार पुढें आहेत. त्यांच्यांतल्याइतकें स्त्रीशिक्षण इतर कोठल्याहि प्रांतांत दिसून येणार नाहीं.

**नायर, सर शंकरन्** (१८५७–१९३४)—एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें व लॉ कॉलेजमध्यें झालें. हे पुढें मद्रास येथील हायकोर्टांत वकिली करूं लागले व क्रमाक्रमानें सरकारी वकील व ॲडव्होकेट जनरल झाले. शेवटीं हे मद्रास हायकोर्टाचे न्यायाधीश झाले. मद्रास कायदे मंडळाचे हे अनेक वर्षें सभासद होते. उमरावती येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे हे अध्यक्ष होते. तसेंच मद्रासच्या हिंदी सामाजिक परिषदेचे हे अध्यक्ष होते व तेथील औद्योगिक प्रदर्शनाचे पण अध्यक्ष होते. यांनीं 'मद्रास रिव्ह्यू' व 'मद्रास लॉ जर्नल' या मासिकांची व 'मद्रास स्टॅंडर्ड' या दैनिक पत्राची स्थापना करून कांहीं काळ त्याचें संपादन केलें. १९१५ ते १९१९ या काळांत हे व्हॉइसराय याच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. १९१९ ते १९२१ पर्यंत हे स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलचे सभासद होते. १९२५ मध्यें कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें निवडून गेले. १९२८ मध्यें सायमन-कमिशनबरोबरच्या लेजिस्लेटिव्ह कमिटीचे अध्यक्ष होते. 'गांधी व अराजकता' या नांवाचें इंग्रजी पुस्तक यांनीं लिहिलेलें प्रसिद्ध आहे. हे फार स्वतंत्र वृत्तीचे असत; ते सडेतोड बोलत आणि लिहीत.

**नायगारा**—अमेरिकेंतील न्यूयॉर्क संस्थानांत नायागारा नदीच्या पूर्वकिनाऱ्यावर हें शहर वसलेलें असून धबधब्यामुळें या शहराला महत्त्व आलें आहे. लो. सं. (१९४०) ७८,०२९ आहे. येथें 'नायागारा' विश्वविद्यालय, 'कार्नेजी' वाचनालय, 'पास्पेक्टपार्क' उद्यान, वगैरे ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत. येथें बरेच कारखाने असून त्यांत सालिना सुमारें दोन कोटी डॉलर किंमतीचा माल तयार होतो. नायागारा नदी संयुक्त संस्थानें आणि कानडा यामध्यें आहे.

एरी सरोवराचें पाणी ऑंटॅरिओ सरोवराकडे नेणारी ही नायागारा नदी ३३$\frac{3}{4}$ मैल लांबीची आहे. एरी सरोवरापासून १५ मैल अंतरावर नदी खालीं पडते. या धबधब्याचे दोन भाग पडतात. अमेरिका धबधबा १,१२५ फूट रुंदीचा असून खोली १६२ फूट आहे. नाल (घोड्याचा) धबधबा २,१०० फूट रुंद व १४९ फूट खोल आहे. या धबधब्यापासून विद्युच्छक्ति तयार करतात. एका तासाला या धबधब्यावरून दहा कोटी घनफूट पाणी वाहत जातें असा अंदाज आहे. हा धबधबा जगप्रसिद्ध आहे.

**नायोब**—(नायोबिअम). एक धातु. कोलंबियम असेंहि याचें नांव आहे. १८०१ सालीं त्याचा उत्तर अमेरिकेंत सांपडणाऱ्या कोळंबाइट खनिजांत शोध लागला. थोड्या प्रमाणांत सांपडणाऱ्या धातूंत ह्याचा समावेश असून हा तंतल (टॅंटालम)-च्या साहचर्यानें असतो. याचा परमाणुभारांक ९३·१ आहे.

**नायोबे**—ग्रीक पुराणांत थेबीजचा राजा ॲंफियन याची ही मुलगी असून हिच्या आईचें नांव टॅंटालस होतें. नायोबेला बारा मुलें असून त्यांचा तिला फार अभिमान असे. तेव्हां ज्यांना कमी मुलें होतीं त्या देवतांनीं मत्सरामुळें तिचीं मुलें मारून टाकलीं. तेव्हा नायोबेनें झ्यूस देवाधिपतीकडे गाऱ्हाणें केलें. त्यानें तिची अश्रु गाळणारी पाषाणमूर्ति बनविली. ही कथा अनेक कवी आणि कलावंत यांचा आवडता विषय बनून गेली आहे.

**नार कालवा**—ही मूळ सिंध प्रांतांतील सिंधु नदीची एक नैसर्गिक शाखा असून १८५८–५९ सालीं सरकारनें या प्रवाहाचा १२ मैल लांबीचा कालवा बनविला. नार कालव्यापासून काढलेले कालवे—(१) जामराव (५८८ मैल); (२) मिथरांव (२५५ मैल); थर (७२ मैल); आणि (४) हिरल (४१ मैल) हे होत.

**नारंग, (डॉ.) गोकुळचंद** (१८७८–    )—एक सार्वजनिक कार्यकर्ते. हे एम्. ए., पीएच्. डी. असून बॅरिस्टर आहेत. यांचें शिक्षण पंजाब व कलकत्ता युनिव्हर्सिटी व नंतर ऑक्सफर्ड व बर्लिन युनिव्हर्सिटी यांमध्यें झालें. हे कांहीं काल प्राध्यापक होते व कांहीं वर्षें यांनीं वकिली केली. हे पंजाबमध्यें कांहीं वर्षें मंत्री होते. यांनीं 'वेदांचा संदेश', 'शिखांचें परिवर्तन' व 'खरें हिंदुत्व' हे ग्रंथ लिहिले आहेत. हे पंजाब सरकारचे कांहीं दिवस मंत्रीहि होते. १९४५ सालीं हिंदूंवर होणाऱ्या अन्यायांबद्दल चिडून यांनीं 'सर' पदवीचा त्याग केला. देशविभागणी झाल्यावर हे लाहोराहून दिल्लीस येऊन राहिले.

**नारद**—वैदिक वाङ्मयांत व पुराणांत नारद नांवाच्या अनेक व्यक्तींचा उल्लेख आढळतो; पण त्या सर्व व्यक्ती प्रसिद्ध नसून ज्यास ब्रह्मर्षि व ब्रह्मदेवाचा पुत्र म्हटलें आहे, तोच नारद विशेष प्रसिद्ध आहे. कलहप्रियता व (कदाचित् त्यामुळें) संदेशवाहन या दोन गुणामुळें नारद या व्यक्तीनें पुराणांत आपलें चांगलेंच वैशिष्ट्य उत्पन्न केलें आहे. नारदाचा संजयराजाच्या कन्येशीं विवाह झाल्याचा व त्या बाबतींत पर्वत ऋषीशीं भांडण होऊन "तुझें मुख मर्कटासारखें होईल" असा शाप, दिल्याचा उल्लेख भारतांत (शांतिपर्व २९. ३०) आहे. नारदास स्त्रीरूप प्राप्त होऊन तालध्वजाशीं विवाह झाल्याचा उल्लेख देवीभागवतांत आहे. पुराणांत नारदाच्या गंमतीच्या कथा अनेक आहेत व अनेक लेखकांना विनोदासाठीं नारदाचा उपयोग होत असतो.

नारदपुराण—हें अठरा उपपुराणांपैकीं एक असून त्याचे पूर्व खंड (१२५ अध्याय) व उत्तर खंड (८२ अध्याय) असे दोन भाग आहेत व त्यांत सृष्टिवर्णन, धर्मशास्त्र, तीर्थमाहात्म्य, अध्यात्म, मंत्रशास्त्र, इत्यादि विषय आहेत. हें पुराण पंचवीस हजार श्लोकांचें होतें असें सांगितलें आहे. परंतु सध्यां यांत सुमारें साडेतीन हजार इतकेच श्लोक सांपडतात. नारदपुराण सांगणारा नारदमुनि असें मानतात. यांत बृहत्कल्पाचें वर्णन आहे. या पुराणाचा कल विष्णुभक्ति वाढविण्याकडे आहे. प्रल्हाद, ध्रुव, नारद, रुक्मांगद राजा, वगैरे विष्णुभक्तांच्या कथा या पुराणांत सापडतात.

बृहन्नारदीय पुराण—हा देखील भक्तिमार्गविषयक ग्रंथ आहे. यांत विष्णूची स्तुति केलेली आहे. विष्णूची भक्ति कोणकोणत्या कालीं व कोणत्या पद्धतीनें करावी हें बृहन्नारदीय पुराणांत सांगितलें असून मार्कण्डेय, वामनावतार, सगरपुत्र वगैरेंच्या कथा दिलेल्या आहेत. यास नारदीय पुराण असेंहि नाव आहे.

नारदशिक्षा—हें एक वेदांग असून नारदशिक्षेंत सामगानांतील व लौकिक गानांतील नियमांचें विवेचन आहे.

नारदस्मृति ऊर्फ नारदीय धर्मशास्त्र—हें मनुस्मृतींतील व्यवहाराध्यायाची म्हणजे नवव्या अध्यायाची संक्षिप्त प्रत असून नारदस्मृतींतील न्यायदानासंबंधींचे नियम मनुस्मृतींतल्यापेक्षां श्रेष्ठ आहेत म्हणून ही स्मृति मनुस्मृतीनंतरची असावी. नियोग, द्यूत, पुनर्विवाह, पितृमरणानंतर मातेचा व अविवाहित भगिनीचा वांटणींत हक्क, दंडनीति, वगैरे बाबतींत मनूच्या उलट नारदाची मतें आहेत. दिवाणी व फौजदारी कायद्यासंबंधीं त्याच्याइतका स्वतंत्र ग्रंथ कोणींहि लिहिलेला नाहीं. या प्रमाणावरून नारदस्मृतीचा काल मनुस्मृतीनंतरचा म्हणजे ५ वें व ६ वें शतक हा असावा.

**नारळ**—[कोकॉस न्यूसिफेरा]. माड. याचें झाड ताडाच्या जातीचें असून तें ६० ते १०० फुटांपर्यंत उंच वाढतें. एका झाडापासून वर्षास सुमारें १०० ते ३०० नारळ मिळतात व ७० ते ८० वर्षें एक झाड अशीं फळें देत राहतें. याचें खोड उघडें व सरळ असतें व शेवटीं छत्रीसारखीं पातीदार पानें येतात. फळें झाडाच्या शेंड्याजवळ असतात व त्यांचे बारा किंवा अधिक फळांचे घड असतात. फळाच्या बाहेरची साल वरून गुळगुळीत असते. त्याच्या आंत खूप जाड तंतुमय वेष्टण असतें. पुन्हां याच्या आंत जाड व टणक कवटी असते; तिला तीन काळ्या रेषा असतात व डोक्याशीं तीन डोळे असतात. त्यांपैकीं एकातून पुढें मोड बाहेर येतो. ह्या डोळ्यास टांचणीनें भोंक पाडतां येतें. दुसरे दोन डोळे करवंटीसारखेच टणक असतात. नारळ हें फळ तीन-चार ते सहा-आठ इंच लांबीचें व लांबटसर वाटोळें असतें. याच्या बाहेरच्या बाजूस तंतुमय वेष्टण असतें तर कवटीच्या आंतल्या बाजूस पांढरा जाड गर असतो; त्यास खोबरें म्हणतात. कोंवळ्या नारळांत मधुर पाणी असतें. हेंच पुढें घट्ट होऊन करवंटीच्या आंतल्या बाजूस त्याचा थर जमून त्याचें खोबरें होतें. हें फळ पुष्कळ वेळ समुद्रावर तरंगत राहूं शकतें व त्या नारळांतील पाणी त्यांतून फुटणाऱ्या मोडास अन्न म्हणून उपयोगी पडतें.

याचें मूलस्थान आफ्रिका, पूर्व व पश्चिम हिंदी द्वीपें, व दक्षिण अमेरिका हीं होत. परंतु आतां याची लागवड उष्ण प्रदेशांत सर्वत्र होते. या झाडापासून अन्न, वस्त्र, आश्रय आणि संरक्षण हीं सर्व मिळतात. एकटा माड घर बांधूं शकतो. फळाचे सर्वच भाग उपयुक्त असतात. याचें खोबरें खातात व त्यापासून खोबरेल तेल निघतें. याच्या काथ्यापासून दोर, चटया, बैठकी, पायपुसणी, वगैरे तयार करतां येतात. याच्या फुलांच्या कोंवापासून माडी व दारू तयार होते व गूळहि तयार होतो.

हिंदुस्थानांत नारळाची लागवड पूर्व–पश्चिम समुद्रकिनाऱ्यावर सर्वत्र होते. कारण माडाला जमीन पुळणवट लागते. माडाच्या जाती फार थोड्या आहेत. दर माडास २०० नारळ हें सामान्य प्रमाण आहे. याची लागवड पुढीलप्रमाणें करतात:

पुष्कळ नारळ धरणाऱ्या आणि लवकर लागास येणाऱ्या माडाचें बीं लागवडीस घ्यावें. प्रथम रोप तयार करून कोंब २ फूट वाढला म्हणजे हा रोपा तीन फूट हमचौरस खड्डा खणून त्यांत लावावा. दोन रोप्यांमध्यें अंतर २५ फूट असावें. वाऱ्यापासून माडांचें रक्षण होण्याकरितां त्यांच्याभोंवतीं करंज व भेंड हीं झाडें लावावीं. शेणखत, मीठ व मासळी हीं खतें घालावीं. सातव्या वर्षापासून माडाला नारळ येऊं लागतात व माड ५०-६० वर्षें सतत सारखा वाजतो.

खोबरेल तेलाचा उपयोग खाण्याकडे, मेणबत्त्या व साबण करण्याकडे होतो (खोबरेल पाहा). नारळापासून सुंभ उर्फ काथ्या तयार करतात. माडाची पोय कोवळी कापल्यास तिच्यांतून रस येतो त्याला माडी म्हणतात. पोयींतून २५ ते ४० दिवस रस येतो. पण पोय कापल्यावर माडाला फूल व फळ धरत नाहीं.

**नाराच**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारा, गंधक, कज्जली, जयपाळ, त्रिफळा व त्रिकटु हीं औषधें असतात व लिंबाच्या रसांत खल करतात. ज्या वेळीं रोग्याला तीव्र रेचक द्यावयाची आवश्यकता असेल त्या वेळीं हें औषध वापरण्याचा प्रघात आहे. भूक न लागणें, पोटांत गोळा होणें, जलोदर असणें, इत्यादि विकारांवर या औषधाचा फार चांगला उपयोग होतो. १ ते ३ गुंजा आल्याचा रस, अगर मध यावरोबर देतात.

**नारायण**—हें फार प्राचीन व बहुमानदर्शक नांव असून तें हिंदूंच्या अनेक देवतांना लावलेलें आढळतें. (नरनारायण पाहा). नारायण हें कोणत्याहि स्वतंत्र देवतेचें नांव नाहीं. ऋग्वेद संहितेंतील फार महत्त्वाचें सूक्त (१०.९०) जें पुरुषसूक्त त्याचा कर्ता नारायण, असें सर्वानुक्रमणींत दिलें आहे. 'महानारायण' नांवाचें दशोपनिषदांपैकीं एक उपनिषदहि आहे. सर्व जग पाण्यापासून उत्पन्न झालें व या पाण्यावर प्रथम जी एक व्यक्ति दिसूं लागली तीच 'नारायण' होय (नारा=पाणी; अयन=हालणें, सरणें). जगाचा मूळ कर्ता जो विष्णु तोच नारायण, असें वैष्णव म्हणूं लागले; उलट शिव हा मुख्य देव मानणारे शैव लोक नारायणालाच शिव मानूं लागले. अद्वैतमताचे प्रस्थापक आद्य शंकराचार्य, ब्रह्म किंवा जगाचा जो मूळ कर्ता तोच नारायण असें प्रदिपादूं लागले. जैन लोक नारायण हा आठवा तीर्थंकर आहे, असें मानतात. बौद्धांच्या सद्धर्मपुंडरीक नांवाच्या ग्रंथांत बोधिसत्त्वाच्या देहाची नारायणाच्या देहाशीं तुलना केली आहे. सांप्रत हिंदु लोक नारायण हें विष्णूचें एक नांव आहे, असें सर्वत्र मानतात.

**नारायणगड**—हा पुणें जिल्ह्यांत जुन्नर तालुक्यांतील नारायणगांवापासून पूर्वेस दीड कोसावर स्वतंत्र डोंगरावर किल्ला आहे. हा बाळाजी विश्वनाथ पेशवे यानें बांधला. यावर हटसावाईचें देऊळ, दोन पाण्याचीं टांकीं व पुष्कळ हौद आहेत. मुख्य दरवाजावर नारायणाची मूर्ति व वाद्यांचीं चित्रें आहेत. १८२० सालीं इंग्रजांनीं हा किल्ला बहुतेक पाडून टाकला.

**नारायणगांव**—मुंबई प्रांतांत पुणें जिल्ह्यांतील जुन्नरच्या आग्नेयीस ९ मैलांवर भीमा नदीकांठीं वसलेला हा एक गांव आहे. येथून तीन मैलांवर नारायणगड किल्ला आहे. गांवाच्या पश्चिमेस सु. पाऊण मैलावर मीना नदीवर पेशवाईंत बांधलेलें एक धरण आहे. त्यावर दोन शिलालेख आहेत. कोटानजीक टेहळणीच्या बुरुजालगत हरिबुवा नांवाच्या शिंपी साधु पुरुषाची समाधि आहे. तीवरहि एक लेख आहे. तसेंच शुक्लेश्वराच्या देवळावरहि एक लेख दिसेल. गांवानजीक टेकडीवर गंजपीरचें थडगें असून तेथें चैत्र शु॥ नवमीस मोठी जत्रा भरते. गांवांत शनिवारीं आठवड्याचा बाजार भरतो. गांव चांगलें बागाईत आहे. एक शेतकी-शाळा व हायस्कूल गांवांत आहे. लो. सं. ४,४७३.

**नारायण तेल**—एक औषधी तेल. असगंध, चिकणामूळ, बेलफळ, पहाडमूळ, रिंगणी, मोतरिंगणी, गोखरूं, अतिबला, कडूनिंब, टेंटू, पुनर्नवा, चांदवेल, ऐरण, हीं तेरा औषधें दहा दहा पलें घेऊन तीं थोडीं कुटून त्यांत चार द्रोणप्रमाण पाणी घालावें व चतुर्थांश पाणी राहीपर्यंत काढा करून तो गाळून घ्यावा. त्या काढ्यांत तिळाचें तेल एक आढक (चार आढक=१ द्रोण) घालावें, व शतावरचा अंगरस एक आढक आणि गाईचें दूध चार आढक घालावें. नंतर यांत कोष्ठ, एलची, पांढरा चंदन, मोरवेल, वेखंड, जटामांसी, सैंधव, आसंध, चिकणामूळ, रास्ना, बडीशेप, देवदार, रानगांजा, रानभाल, रानमुगी, रानउडीद, आणि तगर हीं सतरा औषधें दोन पलप्रमाण घेऊन कल्क करून त्या तेलांत घालावीं व मंदाग्नीवर तेल शेष राहीपर्यंत पाक करून तें तेल गाळून घ्यावें. हें तेल अनेक दुष्ट वायूंचा नाश करतें व चांगलें वातहारक म्हणून प्रसिद्ध आहे. शिवाय नाकांत घालण्यास आणि बस्तिकर्मांत वापरतात.

**नारायणदेव**— हा बंगाली कवि 'मनसा-मंगल' या सुप्रसिद्ध ग्रंथाचा कर्ता असून मैमनसिंह जिल्ह्यांतील किशोरगंज प्रांतांतील बोरा गांवचा राहणारा होता. जातीनें हा कायस्थ असून बाप नरसिंहदेव नांवाचा होता. याचे पूर्वज मगध येथें वास्तव्य करून होते. पण यानें मगधाचा त्याग केला. विजयगुप्त व हा एकाच कालांतील होत.

**नारायणपेठ**— हैद्राबाद संस्थान, महबूबनगर जिल्हा, मखतल तालुक्यांतील एक शहर. लो. सं. सु. पंधरा हजार. याला धनवड असेंहि नांव आहे. येथें रेशमी कापड, सुती लुगडीं व रंगीत कातडी जोडे यांचा व्यापार चालतो.

**नारायणभट्ट** (जन्म १५१३)—धर्मशास्त्रावरील एक विख्यात ग्रंथकार. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण अतिशय विद्वान् होता. काशीस यानें महाराष्ट्रीयांची वसाहत केली. हा मोठा मीमांसक असून बंगाल व विहार यांमधील पंडितांना यानें आपल्या विद्वत्तेनें जिंकलें. अकबराच्या दरबारांत यास फार मान असे. राजा टोडरमल्लाचा व याचा चांगला स्नेह होता. मार्तंड या नांवानें यानें बारा ग्रंथ लिहिले. तीर्थविधीबाबत यानें 'त्रिस्थलीसेतु' हा ग्रंथ व वृत्तरत्नाकर यांवर सुंदर टीका लिहिली

आहे. अयननिर्णय, आरामोत्सर्ग-पद्धति, महारुद्रपद्धति, काशी-मरणमुक्तिविवेक, तुलापुरुषदानप्रयोग, वगैरेसारखे सर्वमान्य ग्रंथ यानें लिहिले. रामकृष्णभट्ट व शंकरभट्ट हे याचे दोन मुलगेहि विद्वान् निपजले. ब्रह्मेंद्रसरस्वती व नारायणसरस्वती ही प्रसिद्ध जोडी याच्या शिष्यांपैकींच होय. आपल्या अलौकिक गुणांनीं यानें 'जगद्गुरु' अशी पदवी मिळवली. भट्टांच्या घराण्यांत एकामागून एक विद्वान् पुरुष होऊन गेल्यामुळें काशींत हें घराणें अजून सुप्रसिद्ध आहे.

**नारायणराव बल्लाळ पेशवे** ( स. १७५५-१७७३ )—हा पांचवा पेशवा व नानासाहेबाचा धाकटा मुलगा होय. जन्म श्रावण शु. ३ शके १६७७. याच्या पत्नीचें नांव गंगाबाई होतें. माधवरावाच्या मृत्यूनंतर नारायणराव व त्याचा चुलता राघोबादादा यांनीं एकविचारानें चालण्याचें ठरविलें होतें. पण लवकरच दोघांत बेबनाव झाला. हा पेशवा हलक्या लोकांच्या आहारीं गेलेला असे. याची सखारामबापूवर मर्जी नव्हती. दादासाहेब व आनंदीबाई यांच्या मसलती आपल्याविरुद्ध आहेत असें दिसतांच यानें पुरी चौकशी न करतां दादास सहकुटुंब कैद केलें. पुढें दादानें हैदराच्या वकिलाच्या मदतीनें सुटकेचा अयशस्वी प्रयत्न केला. याच सुमारास चांद्रसेनीय कायस्थांचें एक सामाजिक प्रकरण उपस्थित झालें. त्यांत कायस्थांच्याविरुद्ध यानें निकाल दिला. तेव्हां कायस्थांनीं खवळून नारायणरावास कैदेंत टाकावयाचें व राघोबास गादीवर बसवावयाचें असा कट केला होता म्हणतात. ह्या कटांत लक्ष्मण काशी, व्यंकट काशी, सखाराम हरी, सखाराम बापू, भवानराव प्रतिनिधि, सदाशिव रामचंद्र शेणवी व विठ्ठल रायरीकर हे प्रमुख होते. परंतु पुढें आनंदीबाईच्या संमतीनें नारायणरावास ठार मारावयाचें असा पोटकट झाला. त्याची माहिती मात्र राघोबास नव्हती. पुढें आनंदीबाईनें सुमेरसिंग, खरकसिंग व महंमद युसफ या तीन गारद्यांकरवीं नारायणरावास मारविलें ( भाद्रपद शु॥ १४ शके १६९५ ). गारद्यांस या कामासाठीं साष्टी, नगर व पुरंदर हे तीन किल्ले व पांच लक्ष रुपये देऊं केले होते. पेशव्याचा विश्वासू खिदमतगार चाफाजी टिळेकर हाहि नारायणरावास वांचवीत असतां मारला गेला. नारायणरावाचा स्वभाव तापट व उद्दाम असून तशांत पोरवयामुळें त्याला भारदस्तपणा व सारासारविचार कमी होता. चांगलीं माणसें हाताशीं धरून पोक्त विचारानें राज्यकारभार केला असता तर यादवी माजून साम्राज्य पोखरलें गेलें नसतें व इंग्रजांनाहि ढवळाढवळ करण्यास लवकर फावलें नसतें.

**नारायणी**—हा राग खमाज थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य व अवरोहांत गांधार वर्ज्य, म्हणून याची जाति औडुव-षाडव आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. याचें स्वरूप कांहींसें सारंग रागासारखें भासतें; पण सारंग रागांत धैवत स्वर वर्ज्य असतो आणि या रागांत तो तर महत्त्व पावत असतो. या दोन रागांतील हा भेद स्पष्ट आहे.

**नारिंग**—१. [ वर्ग-रुटासी; सायट्रस ऑरॅंटियम्. इं. ऑरेंज ]. या झाडास व फळासहि नारिंग म्हणतात. याचें मूलस्थान चीन, हिंदुस्थान व इतर आशियांतील देश होत. याची पोर्तुगालमध्यें प्रथम १५२० मध्यें लागवड करण्यांत आली. सध्यां दक्षिण युरोपमध्यें याची लागवड फार मोठ्या प्रमाणांत होते. इतरहि उष्ण देशांत याची पैदास बरीच होते. हें झाड मध्यम आकाराचें, नेहमीं हिरवीं पानें असणारें व हिरवट सालीचें असतें. पानें लांबट व टोंकदार असतात. फुलें पांढरीं असतात. याच्या अनेक जाती आहेत. याच्या सालींपासून, पानांपासून व फुलांपासून एक प्रकारचें सुगंधी तेल करण्यांत येतें. त्याचा सुगंधी द्रव्यांत उपयोग करण्यांत येतो. याचें लांकूड घट्ट व चांगल्या रंगाचें असून त्याला चांगली तकाकी आणतां येते. त्याचा कलाकुसरीच्या कामांत उपयोग करण्यांत येतो. लिंबें व लिंबारें हीं यासारखींच फळें आहेत.

२. [ वर्ग-रुटासी. इं. सायट्रस ]. ही एक महत्त्वाची झाडांची जात आहे. या झाडांचीं पानें लांबट वाटोळसर व टोंकदार असतात. किंवा बारीक बारीक पानासारख्या देठांस लहान लहान पानांनीं जोडल्यासारखीं दिसतात. यांचे पुंकेसर त्यांच्या तंतूमुळें एकत्र येऊन त्यांच्या कांहीं अनियमित आकाराच्या ग्रंथी झालेल्या दिसतात. यांच्या फळांत बराच गर असतो व फळांची साल स्पंजासारखी मृदु, लवचिक व सच्छिद्र अशी असते.

याच्या अनेक जाती आहेत. त्यांत कागदी लिंबू, गधड लिंबू, साखरलिंबू, नारिंग, वगैरे येतात.

मूळ नारिंग हें चीनमध्यें, कागदी लिंबू इराणमध्यें व लिंबारा अरबस्तानांत उत्पन्न झाला असावा. उत्तम लिंबें स्पेन, पोर्तुगाल, कॅनेरी व अझोर बेटें यांत होतात. लिंबू पाहा.

मुसुंबी ( मोझांबिक ) बेटांतून जीं नारिंगें येतात त्यांस मुसुंबीं म्हणत. पण अलीकडे सर्वच नारिंगांना मुसुंबीं म्हणतात.

नारिंग चांगलें औषधी आहे. हें रोग्यांस शक्तीसाठीं देतात.

**नारु**—हा एक सूत्रकृमि ( नेमॅटोडा ) जातीचा परोपजीवी पांढरा कृमि असून याची लांबी सहा इंचांपासून अनेक फुटांपर्यंत असते. हा मनुष्याच्या शरीराच्या चामडीखालील पेशीमध्यें आढळतो व त्यामुळें मोठें गळूं तयार होतें. घाणेरड्या पाण्यापासून हा रोग होतो. विशेषतः खेड्यांतून जेथें विहिरींत उतरून पाणी काढावें लागतें व जेथें पाण्याच्या ठिकाणीं सर्व देहधर्मांचे व्यवहार होतात तेथें पाण्यांत नारुचे कृमी हटकून होतात.

नारूवर देशी औषधें पुष्कळ आहेत, व तुंबड्या लावूनहि नारू बाहेर काढण्यांत येतात.

**नारेस, सर जॉर्ज स्ट्रॅांग** ( १८३१–१९३५ )—उत्तर-ध्रुवप्रदेशाचा एक इंग्रज संशोधक. यानें १८७२–१८७४ सालीं चॅलेंजर या बोटीचा कमांडर होऊन शास्त्रीय संशोधनार्थ सफर केली, आणि १८७५ सालच्या उत्तर ध्रुवाच्या सफरीचाहि तो कमांडर होता.

**नारो आप्पाजी तुळशीबागवाले** ( मृ. १७७५ )— पेशवाईंतील एक सरदार. हा पुणे शहरांतील तुळशीबाग संस्थानचा मूळ संस्थापक साताऱ्यानजीक पाडळी गांवचा वतनदार कुलकर्णी असून त्याचें उपनांव खिरे असें होतें लहानपणींच हा घरांतील कांहीं तंट्याबखेड्यावरून रुसून पुण्यास येऊन खासगीवाले यांच्याकडे राहिला. हल्लींच्या ठिकाणीं त्या वेळीं खरोखरीच तुळशीबाग होती, व तेथून तुळशी आणण्याचें काम हा मुलगा करी. पुढें खासगीवाल्यांनीं तीच तुळशीबाग नारो आप्पाजीला बहाल केली. तेव्हां नारोपंतानें त्र्यंबकेश्वरीं गौतमाश्रमींच्या सत्पुरुषाच्या कृपेनें मिळालेल्या श्रीराम व जानकी या दोन मूर्ती तुळशीबागेंत शके १६८३ मध्यें स्थापन केल्या, व लक्ष्मणाची मूर्ति बखतराम नामक सुप्रसिद्ध कारागिराकडून करवून तीहि स्थापन केली. अण्णाजी दत्तोनंतर जमाबंदीची व्यवस्था चांगल्या प्रकारें नारोपंतानें केली. नारो आप्पाजीस १७५० सालीं पुणें प्रांताचा सुभेदार नेमण्यांत आलें. निजामानें १७६३ सालीं पुणें जाळल्यावर माधवराव पेशव्यानें याच्याकडे पुणें नवीन वसविण्याची कामगिरी सोंपविली. गुरुवार पेठेचा, पुणें शहराचा व पुणें प्रांताचा हा कमाविसदार होता. याच्यानंतर मात्र कोणी कर्तबगार पुरुष याच्या कुळांत निघाला नाहीं. पुण्यांत तुळशीबागेंत याचे वंशज राहतात.

**नारो गणेश शौचे** ( मृत्यु सु. १७९२ )— पेशवाईंतील एक मुत्सद्दी. हा मूळचा रांझाचा देशस्थ ब्राह्मण. गणेश बापूजी हे याचे वडील. याच्या पत्नीचें नांव महेश्वरी. मल्हाररावाच्या वेळेपासून तीस वर्षें हा होळकरशाहींत होता. यास उत्तरेकडील राजकारणाची चांगली माहिती असून होळकरांच्या हितास हा शेवटपर्यंत जागला. अहल्याबाई होळकर हिचा हा कारभारी. परंतु पुढें तिच्याशीं याचा वेबनाव होऊन हा तुकोजीचा कारभारी झाला. यानें होळकरशाहींतील स्त्रियांवर दजन ठेवून बराच पैसा गांठीं बांधला होता. या पैशाचा लोभ तुकोजीस असल्यानें त्यानें यास जवळ केलें होतें. यानें सन १७६६ त कोळ्यांचा दंगा चालू असतांना केलेली खानदेशांवरील स्वारी अयशस्वी ठरली.

**नारो त्र्यंबक हणमंते** ( मृ. १६५३ )—ऊर्फ नारायण त्रिमल. हा शिवकालीन मुत्सद्दी मूळ मलिकंबरच्या हाताखालीं तयार होऊन लखूजी जाधवांच्या पदरीं राहिला, व लखूजीनें आपला विश्वासू माणूस म्हणून त्याला जिजाबाईबरोबर भोसल्यांकडे पाठविलें. शहाजीनें त्याला कर्नाटकांत नेलें ( १६३८ ). नारोपंत जसा राजनिष्ठ व मुत्सद्दी होता, तसाच तो विद्वान् पंडितहि होता. त्याच्यामुळें शहाजीचा कर्नाटकांत अमल स्थिर झाला. पुढें प्रसिद्धीस आलेले रघुनाथपंत व जनार्दनपंत हे त्याचे मुलगे होत.

**नारोपंत चक्रदेव**—पेशवाईंतील एक सेनापति. हा प्रथम कारकून व नंतर लष्करांत अधिकारी झाला. १७९६ सालीं नाना फडणीस पुणें सोडून महाडास राहिला, व तेथून कारस्थान करून पुन्हां पुण्यास कारभाऱ्याचें काम पाहूं लागला; या प्रसिद्ध महाडच्या कारस्थानांत नारोपंताचा नानास फार उपयोग झाला, म्हणून नानानें त्याच्याकडे सैन्याचें आधिपत्य दिलें ( १७९७ ). पण पुन्हां बाजीराव पेशवे व नाना यांचा वेबनाव होऊन नाना व नारोपंत कैदेंत पडले. पेशवे व सातारकर छत्रपती यांची तेढ आल्यामुळें बाजीरावानें नारोपंतास कैदेंतून मुक्त करून सेनापति नेमलें. त्यानें अनेक मसलती करून नानास सोडविलें. नानानें शेवटीं शेवटीं आपला सर्व कारभार नारोपंताच्या हातीं दिला होता. नाना वारल्यावर बाजीरावानें नारोपंतास कैद केलें. पुढें यशवंतराव होळकरानें पुणें जाळलें तेव्हां त्यानें नारोपंताची सुटका केली. याचा वाडा पुण्यास तुळशीबागेजवळ आहे.

**नारो महादेव**—इचलकरंजी संस्थानचा संस्थापक. मूळचा हा रत्नागिरी जिल्ह्यांतील वरवडेकर जोशी घराण्यांतील. याचे वडील महादेवपंत हे सावंतवाडी संस्थानांतील म्हापणचे कुलकर्णी. याच्या लहानपणींच याचे वडील मयत झाल्यानें हा आपल्या आईसह बहिरेवाडीस संताजी घोरपड्याच्या आश्रयास आला व संताजीच्या कृपेनें याचें शिक्षण झालें. यानें संताजीस राजारामाच्या कारकीर्दीत अतिशय मदत केली. त्यामुळें खुष होऊन संताजीनें यास मिरजेची सरदेशमुखी व इचलकरंजी आणि आंजरा हीं गांवें बहाल केलीं. संताजीवरील आदरामुळेंच यानें 'घोरपडे' असें आडनांव घेतलें. बाळाजी विश्वनाथाचा जांवई ( अनुबाईचा पति ) व्यंकटराव तो याचा मुलगा होय.

**नारो राम मंत्री** ( मृ. १८४८ )—मराठेशाहींतील एक मुत्सद्दी. हा सावंतवाडीनजीक कोचरें गांवचा कुलकर्णी, सारस्वत ब्राह्मण होता. त्याला नारबा मंत्री म्हणत. १७०७ च्या सुमारास तो धनाजी जाधवाजवळ राहिला. १७१२ सालीं

राजाज्ञा म्हणून होता. १७१३ सालीं शाहूनें त्याला मंत्रिपदाचा अधिकार दिला, म्हणून तो साताऱ्यांनजीक चांगणी या गांवीं राहिला; तो गांव अद्याप या घराण्याकडे इनाम आहे. नारबा विशेष कर्तृत्ववान् नव्हता, तथापि तो सुस्वभावी असून पेशव्यांशीं उघड विरोध करीत नसे. रंगपंचमीच्या दिवशीं शाहूनें याला थट्टेनें रंगाच्या पिपांत टाकलें, तों अपघात झाला (१७४८). पुढें शाहूनें मंत्रिपद याच घराण्याकडे चालविलें. १८२९ पर्यंत हें मंत्रिपद या घराण्याकडे होतें.

**नारो व्यास**—एक महानुभाव कवि. शके ११८५ मध्यें यानें 'श्रीऋद्धिपूरवर्णन' नांवाचा एक ओंवीबद्ध ग्रंथ लिहिला. महानुभावांच्या सुप्रसिद्ध सात ग्रंथांत याच्या या ग्रंथास स्थान लाभलें आहे. बहाळे नारो (बास) व्यास या नांवानेंहि हा प्रसिद्ध आहे. याचें डंक नांवाचें एक खंडकाव्य आहे व आणखीहि स्फुट पद्यें उपलब्ध झाली आहेत.

**नारो शंकर राजेबहादर** (मृ. १७७४)— मराठेशाहींतील एक सरदार. याचें आडनांव दाणी (सासवडकर). नारोपंत प्रथम उदाजी पवाराच्या हाताखालीं शिलेदार होता (१६२०). नंतर मल्हारराव होळकरानें त्याला इंदूरचा सुभेदार नेमलें. पुढें पेशव्यांच्या सांगण्यावरून बुंदेलखंडांतील ओर्च्छेकरांचा पराभव करून ओर्च्छोचें ३०।३५ लाखांचें राज्य त्यानें खालसा करून स्वराज्यांत मिळविलें. या कामगिरीबद्दल त्याला त्या प्रांताचा सुभेदार नेमलें व त्यानें झांशीस राहून १४ वर्षे तो कारभार केला; त्या वेळीं त्याला जरीपटका व १५ लाखांचा सरंजाम मिळाला होता. पुढें अबदालीच्या स्वारीच्या वेळीं मराठ्यांना रसद पोंचवण्याचें व सुजाउद्दौल्याला अबदालीकडून फोडण्याचें भाऊसाहेबानें सांगितलेलें काम त्याच्याकडून झालें नाहीं; त्यामुळें त्याच्यावर पेशव्यांची इतराजी झाली. पण हैदरअल्ली व निजाम यांच्याविरुद्ध झालेल्या लढायांत त्यानें चांगला पराक्रम करून पेशव्यांना खुप केलें. नारोपंत राघोबादादाचा पक्षपाती असे व त्याच्या सैन्यांत अरबांचा भरणा फार असे.

दिल्लीच्या बादशहानें याला राजेबहादर हा किताब व मालेगांव जहागीर देऊन इतर गांवें सरंजाम दिलीं. १७४० सालीं त्यानें मालेगांवचा किल्ला दिल्लीचे कारागीर आणून लष्करीदृष्ट्या उत्तम बांधला. १८१८ सालीं इंग्रजांनीं हा किल्ला अरब सैन्याशीं लढून घेतला व पाडून टाकला. नारो शंकरनें १७४७ सालीं नाशकास रामेश्वराचें देऊळ १८ लाख रु. खर्च करून बांधलें; व तेथें पोर्तुगीजांचीं (बहुधा वसईकडील) प्रचंड घंटा (सहा फूट घेराची) टांगली व गोदावरीवर घाट ६० हजार रु. खर्च करून बांधला. देवळास, घंटेस व घाटास 'नारो शंकरी' म्हणतात. नाशकास त्यानें आपला वाडा बांधला होता, तो यशवंतराव होळकर व विंचूरकर डेंगळे यांनीं जाळला. पुण्यासहि कबूतरखान्याजवळ वाडा व घाट होता. याचे वंशज मालेगांवीं असतात.

**नारो शंकर सचीव** (१७०७–१७३७)—मराठ्यांचा एक प्रधान. शंकराजी नारायणाचा हा मुलगा. याला शाहूनें बापाच्या मृत्यूनंतर सचिवपद दिलें (१७०७). दमाजी थोराताची बंडाळी मोडण्यासाठीं शाहूनें याला पाठविलें असतां थोरातानेंच याला कैद केलें. तेव्हां बाळाजी विश्वनाथानें जाऊन सोडविलें. याला रामाची मूर्ति मिळाल्यामुळें याच्या वेळेपासून सचिवांचें दैवत राम बनलें.

**नार्डाऊ, मॅक्स सायमॉन** (१८४९–१९२३)— एक जर्मन ग्रंथकार व झिऑनिस्ट पुढारी. ज्यू लोकांनीं पॅलेस्टाइन येथें जाऊन आपली वसाहत करावी अशा मताचा हा असून यानें त्याचा बराच प्रचार केला. त्यानें महत्त्वाचे ग्रंथ लिहिले ते—'दि कन्हेन्शनल लाइफ ऑफ सिव्हिलिझेशन' (संस्कृतीचें पारंपरिक जीवन); 'पॅराडॉक्सेस' (विरोधाभास); 'दि डिसीज ऑफ दि सेंचरी' (या शतकाचा आजार); 'डीजनरेशन' (अधःपात); 'दि ड्रोन्स मस्ट डाय' (आयतखाऊ मेले पाहिजेत); 'ऑन आर्ट अँड आर्टिस्ट' (कला आणि कलावंत); 'झिऑनिझम' आणि 'दि इंटरप्रिटेशन ऑफ हिस्टरी' (इतिहासाचा अर्थबोध).

**नॉर्डेनस्किओल्ड, निल्स अँडोल्फ एरिक** (१८३२–१९०१)—एक स्वीडिश सृष्टिशास्त्रज्ञ आणि भूप्रदेशसंशोधक. त्यानें स्पिट्झबर्जेन बेटांत भूस्तरविषयक बरेच संशोधनकार्य केलें, आणि आर्क्टिक प्रदेशांत भूसंशोधनाकरितां स्वीडिश सरकारनें ज्या सफरी पाठवल्या, त्या सर्व सफरींत त्यानें भाग घेतला. १८७८ च्या जुलै महिन्यांत तो व्हेगा नांवाच्या बोटींतून उत्तरध्रुवप्रदेशांत सफरीला गेला आणि जुन्या जगाच्या अगदीं उत्तरेकडील जमिनीचें टोंक चेल्यूस्किन या भूशिराला वळसा घालून परत आला. याप्रमाणें आग्नेय मार्ग शोधून काढणारा हा पहिला प्रवासी होय. त्याच्यापूर्वी अनेक डच व इंग्रज दर्यावर्दी गेलीं तीन शतकें हा मार्ग शोधून काढण्याचे केलेले प्रयत्न निष्फळ झाले होते.

**नॉर्थक्लिफ, लॉर्ड** (१८६५–१९२४)—एक आंग्ल वृत्तपत्रकार व मुत्सद्दी. याचें मूळ नांव आल्फ्रेड हार्म्सवर्थ असून तो डब्लिन येथें जन्मला. तेथें त्याचा बाप वकील होता. त्याची आई मॅकेट ही एका आयरिश सावकाराची मुलगी अत्यंत बुद्धिमान् होती. आल्फ्रेड लहानपणापासून मोठा तरतरीत व मेहनती होता. १८८१ सालीं केंब्रिजला शिक्षण घेत असतांना त्यानें 'ग्लोब' वगैरे मासिकांत लेख लिहून प्रसिद्ध केले, व १७ व्या

वर्षी युरोपची सफर केली. परत आल्यावर त्याला 'लंडन न्यूज' पत्राच्या उपसंपादकाची जागा मिळाली. १८८८ सालीं त्यानें स्वतः एक साप्ताहिक सुरू केलें, तें लोकप्रिय होऊन त्याला फायदा झाला; त्यावर त्यानें 'आमल्गमेटेड प्रेस' या नांवानें छापखानदारीचा धंदा सुरू केला, त्यांत त्याला दरसाल ५०,००० पौंड फायदा होऊं लागला. १८९० नंतर त्यानें युरोप, आफ्रिका, हिंदुस्थान, अमेरिका, कानडा, इत्यादि देशांत प्रवास केला. १८९४ सालीं त्यानें 'ईव्हिनिंग न्यूज' या पत्राची मालकी घेतली, व त्याचा खप एकदम वाढला. १८९४ सालीं त्यानें उत्तर-ध्रुवप्रदेशांत सफर केली. १८९६ सालीं 'डेली मेल' नांवाचें अर्ध्या पेनीला मिळणारें पत्र सुरू केलें; व वृत्तपत्र-व्यवसायात क्रांति घडवून आणली. बोअर युद्धांत या दैनिकाचा खप सहा लाख होऊं लागला. १९०३ सालीं 'डेली मिरर' पत्र अर्धा पेनी किंमतीचें सुरू केलें, व त्याचाहि खप वाढला. पहिलें महायुद्ध सुरू होण्याच्या सुमारास 'टाइम्स' डेली (दैनिक) व वीकली (साप्ताहिक), 'डेली मेल', 'ओव्हर सी मेल', 'ईव्हिनिंग न्यूज', 'वीकली डिस्पॅच', इतकीं वृत्तपत्रें त्याच्या ताब्यांत होतीं. त्यानें पत्राच्या संपादकांना फक्त आठवड्याचे पांच दिवस काम देऊन धंद्याच्या नफ्यामध्यें भागीदार केलें होतें.

१९०० पासून नॉर्थक्लिफनें चालू राजकारणावर आपली छाप बसविली, व पहिल्या महायुद्धांत अलौकिक कामगिरी बजावली. तो स्वतः निरनिराळ्या रणक्षेत्रांवर जाऊन आला, व जर्मनीचा पूर्ण नक्षा उतरेपर्यंत युद्ध चालवावें, या मताचा त्यानें जोरदार प्रचार केला. १९१७ सालीं त्याला व्हायकौंटची पदवी व विमान-खात्याच्या अध्यक्षाची जागा देण्यांत आली. १९२१ सालीं पुन्हां त्यानें जगाचा प्रवास केला, आणि परत आल्यावर तो थोड्याच दिवसांनीं मरण पावला. स्वतःचीं मतें निर्भीडपणें मांडतां यावीं, म्हणून सरकारी नोकरी पत्करावयाची नाहीं, असा त्याचा बाणा होता. त्याची भाषा सरळ व जोरदार असे. मार्मिक टीका व विनोदी भाषा, तसेंच राजकारणाचा गाढ अभ्यास, यांमुळें तो अत्यंत वजनदार लेखक बनला. त्याच्या पत्रांचा अतोनात खप होत असे. २० व्या शतकांतील जगांत नॉर्थक्लिफ ही एक बडी व्यक्ति होऊन गेली यांत शंका नाहीं.

**नॉर्थब्रुक, लॉर्ड** (१८२६-१९०४)—हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. १८५७ सालीं हा कॉमन्स सभेंत निवडून आला व १८६६ सालीं बाप वारल्यावर लॉर्डांच्या सभेचा सभासद झाला. १८६१-६४ या काळांत तो हिंदुस्थानचा अंडर-सेक्रेटरी होता, आणि १८७२ ते १८७६ पर्यंत हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होता. १८७५ सालीं इंग्लंडचे युवराज व पुढें झालेले बादशहा सातवे एडवर्ड हिंदुस्थानांत आले होते व त्याच सुमारास बडोद्याचे महाराज मल्हारराव यांना राज्यावरून काढून सयाजीराव यांची गादीवर स्थापना झाली होती. रशियाशीं तडजोडीचें धोरण ठेवण्याच्या मताचा नॉर्थब्रुक होता. १८८०-८५ पर्यंत नॉर्थब्रुक फर्स्ट लॉर्ड ऑफ ॲड्मिरॅलिटी या मोठ्या हुद्यावर होता. अखेरीस १०-१२ वर्षे त्यानें राजकारणांतून अंग काढून घेतलें होतें.

**नॉर्थ सी**—(उत्तर समुद्र). हा समुद्र ग्रेट ब्रिटन आणि युरोप खंड यांच्यामध्यें असून याचें क्षे. फ. १,९०,००० चौ. मै. आहे. दक्षिण बाजूस हा समुद्र डोव्हरची खाडी आणि इंग्लिश खाडी यांनीं ॲटलॅंटिक महासागराला जोडलेला आहे. आणि उत्तर बाजूस नॉर्वेजियन समुद्र आणि आर्क्टिक महासागर यांच्यामध्यें हा समुद्र घुसलेला आहे. या समुद्रांत डॉगर, जटलंड, ग्रेट फिशर बॅंक्स, इ. अनेक खडकाळ बेटें आहेत. या समुद्रांत हेरिंग, कॉडलिंग, हॅडॉक, फ्लॅट-फिश, वगैरे जातीचे मासे पकडण्याचा मोठा धंदा चालतो व तो अतिशय किफायतशीर आहे.

**नॉर्फोक**—हें शहर व बंदर अमेरिकन सं. संस्थानांतील व्हर्जिनिया संस्थानांत एलिझाबेथ नदीवर आहे. हें आरमाराचें एक महत्त्वाचें ठाणें आहे आणि येथें १५,००० टनाच्या बोटी येऊं शकतात; आणि येथे जहाजदुरुस्तीच्या व माल चढवण्या-उतरवण्याच्या सर्व सोयी आहेत. येथून पुष्कळ कापूस परदेशीं जातो. लो. सं. १,४४,३३२ आहे.

**नॉर्मंडी**—हा फ्रेंच राज्यक्रान्तीच्या पूर्वकालांतील एक प्रांत फ्रान्स देशाच्या उत्तर भागांत असून हल्लीं त्याचे तीन प्रांत बनवले आहेत. नॉर्मन्स ऊर्फ नॉर्थ मेन यांनीं फ्रॅंक लोकांपासून हा प्रांत जिंकून घेतला, आणि १०६६ सालीं नॉर्मंडीच्या विल्यमनें इंग्लंड देश जिंकला, त्या वेळीं नॉर्मंडी हा इंग्लंडच्या राज्याचा भाग बनला. पुढें विल्यम मरण पावल्यावर पुन्हां नॉर्मंडी प्रांत पृथक् झाला; पण लवकरच इंग्लंडच्या राजांनीं आपली सत्ता या प्रांतावर चालू केली. अखेर तो इंग्लंडच्या जॉन राजाच्या कारकीर्दीत फ्रान्सच्या फिलिप ऑगस्टस राजानें जिंकून फ्रान्सच्या राज्याला १२०३ सालीं जोडला. तथापि पुढेंहि इंग्लंड व फ्रान्स यांचें युद्ध चालू राहून अखेर १४५० सालीं तो प्रांत कायमचा फ्रान्सला मिळाला.

**नॉर्मन शिल्प**—नॉर्मन शिल्पपद्धति ही रोमानेस्क शिल्पाची एक तऱ्हा आहे. या पद्धतीमध्यें वाटोळ्या कमानींची रचना असते. ही फ्रान्समध्यें बाराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत प्रचलित होती. नॉर्मन लोकांनीं ब्रिटन जिंकल्यावर तिचा ब्रिटनमध्यें प्रवेश झाला. डरहॅम येथील ख्रिस्त मंदिराचा कांहीं भाग, तसेंच पीटरबरो, नॉर्विच व कँटरबरी येथील देवळांत या शिल्पाचे नमुने आढळतात.

**नॉर्वे**—युरोपच्या उत्तर भागांतील एक राज्य. स्कँडिनेव्हिअन द्वीपकल्पाचा हा पश्चिम भाग आहे. क्षे. फ. १,२४,५५६ चौ. मैल. लो. सं. तीस लक्ष. याच्या पश्चिमं किनाऱ्यास उत्तर समुद्र व अटलांटिक महासागर हे आहेत. जमीन एकंदरींत उंचवट्यावरचें मैदान (१,६०० फूट) आहे. याच्या उत्तर व पश्चिम किनाऱ्यांवर पुष्कळ खाड्या आहेत. पूर्वेकडच्या भागांत दऱ्या व खोरीं किती तरी आहेत. सर्व देश डोंगराळ असल्यानें शेतकीला लायक जमीन फारच थोडी आहे व ती तळीं, सरोवरें, खाड्या आाणि दऱ्या-खोरीं यांच्या बाजूलाच आहे. ओस्लो हें मुख्य शहर आहे. बर्जेन, स्टॅव्हेंगर व ट्रॉन्ड्‌धीम हीं दुसरीं महत्त्वाचीं शहरें आहेत. कोळशाच्या अभावामुळें पाण्याच्या निसर्गदत्त शक्तीचा उपयोग पुष्कळ करून घेण्यांत आला आहे. हल्लींची राज्यपद्धत १९०५ पासून चालू आहे. त्या वर्षी स्वीडन आणि नॉर्वे वेगवेगळे झाले. १८१४ ते १९०५ पर्यंत ते एकत्र होते.

धान्यें, बटाटे व दूधदुभतें देशांत होत असून कागद, साबण, विद्युद्रासायनिक द्रव्यें, प्राणिज तेलें, कापड, इ. चे धंदे चालतात. मच्छीमारीचा धंदा फार मोठा व महत्त्वाचा आहे. लोखंड, जस्त, रुपें, तांबें, निकल, शिसें, इ. खनिजें काढण्यांत येतात. ओस्लोचें विद्यापीठ इ. स. १८११ त निघालें. देशांत २,५०० मैलांचा आगगाडी रस्ता असून तो बहुतेक सरकारच्या मालकीचाच आहे.

इतिहासपूर्वकाळांत या देशांत जर्मन जाती राहत होत्या. नंतर सर्व युरोपांतील बंदरांत सतावून सोडणारे व्हायकिंग या शूर लोकांनीं हा प्रदेश व्यापला. १०२८ मध्यें डेन्मार्कच्या कॅन्यूट राजानें नॉर्वे जिंकला; तथापि त्याच्या मृत्यूनंतर (१०३५) पहिला देशी राजा गादीवर आला. ४ थ्या हॅकन राजानें ग्रीनलंड आणि आइसलंड बेटें राज्याला जोडलीं. ६ वा मॅग्नस यानें देशांत शांतता प्रस्थापित केली. तो फार शहाणा राजा होऊन गेला. १३९७ त डेन्मार्कशीं हा प्रदेश जोडला गेला; तो १८१४ पर्यंत डॅनिश वर्चस्वाखालीं होता. नंतर स्वीडनकडे याचें आधिपत्य गेलें. स्वातंत्र्यासाठीं झगडे सुरू होऊन १९०५ सालीं तें प्राप्त झालें. पहिल्या महायुद्धांत नॉर्वे तटस्थ राहिलें. पण दुसऱ्या महायुद्धांत १९४० सालीं जर्मनीनें हें जें जिंकलें तें १९४५ त मोकळें झालें. हल्लींचा राजा ७ वा हॅकन हा १९०५ सालीं गादीवर बसला. इंग्लंडच्या ७ व्या एडवर्ड बादशहाची तिसरी मुलगी याला दिली आहे.

स्पिट्‌स्बर्जेन, जॅन मार्येन, बोव्हे व पीटर हीं बेटें नॉर्वेच्या वसाहती आहेत.

**नार्वेकर वैद्य**—या जातीची मूळ वस्ती गोवें प्रांतांतील नार्वे गांवीं व त्याच्या आसपास होती. पण १६ व्या शतकांत पोर्तुगीजांनीं हिंदूंना बाटविण्यास सुरुवात केली, त्या वेळीं आपला धर्म राखण्याकरितां या जातीचे लोक घाटावर बेळगांव व त्याच्या आसपासच्या गांवीं कायम जाऊन राहिले. त्यांची लोकसंख्या सुमारें चार हजार आहे. या जातींत गांवोगांव पंचायत असून मुख्य पंचायत बेळगांवीं आहे. या जातीचीं लहान-मोठीं तीनचार देवळें आहेत. त्यांपैकीं श्रीसमादेवीचें देऊळ बेळगांवांत आहे. या जातींत 'समादेवी फंड' व 'शिक्षण फंड' असे दोन फंड आहेत. यांचें लग्न, मौंजीबंधन, वगैरे १६ संस्कार द्राविड ब्राह्मण जातींतील भिक्षुक करतात. या जातींत पुनर्विवाहाची चाल नाहीं. पोटजाती नाहींत. जातीच्या कुलदेवता मंगेशी, नागेशी, शांतादुर्गा, सप्तकोटेश्वर, कनकादेवी, वगैरे गोव्यांतील सासष्टी प्रांतांत आहेत.

**नार्सिसस**—ग्रीक दंतकथांत वर्णिलेला एक अत्यंत सुंदर तरुण. हा स्वभावानें अतिशय अभिमानी पण पूर्ण विरक्त होता. एको (प्रतिध्वनि) नांवाच्या तरुणीनें त्याला वश करण्याचा प्रयत्न केला, पण तो व्यर्थ गेला. त्यामुळें ती झुरणीस लागली. पुढें मानवांच्या दुष्कर्मांबद्दल पारिपत्य करणाऱ्या नेमेसीस नांवाच्या देवतेनें त्या तरुणाला स्वतःच्या सौंदर्यावरच लुब्ध करून झुरणीस लावलें.

**नाल**—एक वाद्य. सामान्य पखवाजाच्या सव्वा पट लांब असलेल्या पखवाजास 'नाल' म्हणतात. हें वाद्य फार प्राचीन असून गायनाच्या साथींत तें अत्यावश्यक आहे.

**नाल**—घोड्याच्या पायांना ठोकावयाचें धातूचें कडें. झेनोफोन, व्हेगेटिअस, वगैरे ग्रीक ग्रंथकारांना हें माहीत नव्हतेंसें दिसतें; कारण त्यांनीं घोड्याचे खूर बळकट करण्याचे इतर उपाय सांगितले आहेत. युरोपांत दहाव्या शतकापासून नालाचे उल्लेख सांपडतात.

मराठेशाहींत मोहिमेवर जाण्यापूर्वी घोडेस्वार-पथकासाठीं नालबंदीची रक्कम मिळे. जहागिरदारांकडून अशा नांवाची एक खंडणीहि मुसलमान अमलांत घेण्यांत येई. हा कर मराठेशाहींतहि रयतेकडून घेत.

नाल हे यंत्रानें बहुधा तयार करतात. त्याच्या कडा मात्र लोहार खुराच्या आकाराप्रमाणें नीट बनवितात.

**नाल**—व्यायामाचें एक साधन. या नाली दगडाच्या केलेल्या असतात. दगड खोल आकाराचा घडवून त्याच्या मध्यभागीं भोंक पाडतात व त्यांत मूठ ठेवितात. या घडणीस नाल असें म्हणतात. जड वजनाच्या लोखंडी डंबेल्सप्रमाणें या नालीचा उपयोग करतां येतो. नाली लहानमोठ्या वजनाच्या करतात, त्यामुळें मेहनत करणाऱ्यांच्या शक्तीप्रमाणें त्यांचा उपयोग करण्यांत येतो. प्रथम कमी वजनाची नाल घेऊन निरनिराळे हात करण्याची सवय

करावी. व क्रमाक्रमानें जास्त जास्त वजनाच्या नाली वापराव्या. नाली दोन्ही पायांच्या समोर ठेवून सरळ उभें राहावें. नंतर कमरें-तून वाकून एक नाल उजव्या हातांत व दुसरी नाल डाव्या हातांत धरून उभें राहावें. उजवा हात कोपरांतून वांकवून नाल वर उचलून खांद्याजवळ आणावी. नंतर पुन्हां नाल सुरुवातीप्रमाणें खालीं न्यावी. नंतर डावा हात वांकवून वर घ्यावा व नाल डाव्या खांद्यासमोर आणावी व पुनः हात खालीं नेऊन पूर्व-स्थितींत न्यावी. (व्या. शा.)

**नालंदा**—एक प्राचीन विद्यापीठ. बिहारमधील राजगीर (राजगृह)च्या उत्तरेस ७ मैलांवर असलेलें आजचें बरगांव हेंच प्राचीन नालंदा असावें असें संशोधक पंडित कनिंगहॅम म्हणतो. महावीर या ठिकाणीं बराच काळ होता. बुद्धाचेंहि येथें आगमन असे. सारिपुत्ताचें जन्ममृत्यु-स्थान म्हणून त्याच्या चैत्याला देवळाची जोड अशोकानें दिली व विहाराचा आरंभ केला. पण महायान पंथाचा उदय होईपावेतों नालंदाला कांहीं महत्त्व नव्हतें. मात्र इसवी सनाच्या चौथ्या शतकापासून याचा लौकिक पसरत गेला. ह्युएनत्संग येथें राहिला होता व त्यानें नालंदाचें विस्तृत वर्णन दिलें आहे. या स्थळाला अनेकांनीं मोठमोठ्या देणग्या दिल्याचे उल्लेख आहेत. त्यामुळें येथें शिक्षण मोफत मिळत असे. ८,५०० भिक्षु-विद्यार्थी शिकत असत; व १,५०० शिक्षकांची व्यवस्था होती. दररोज शंभर व्याख्यानें तरी होत. बौद्ध धर्माप्रमाणेंच ब्राह्मणी धर्माचेंहि शिक्षण मिळे. धर्मपाल, चंद्रपाल, गुणमति, स्थिरमति, प्रभामित्र, जिनमित्र, ज्ञानचंद्र, शीलभद्र यांसारखे नाणावलेले आचार्य पाठ देण्याला होते, असें ह्युएनत्संग सांगतो. तिबेट, चीन, जावा, सुमात्रा, वगैरे परदेशांहूनहि कित्येक अभ्यासू नालंदाला येत. येथे फार मोठा ग्रंथसंग्रह असे; व तो वाढवून व्यवस्थित ठेवण्यासाठीं बंगालच्या देवपाल राजांसारखे देणग्या देत.

नालंदाचें वर्णन ह्युएनत्संगाप्रमाणेंच दुसरा चिनी प्रवासी जो इत्सिंग यानें आपल्या किउ-फा-को-साग-चुअन नामक ग्रंथांत पुढीलप्रमाणें दिलें आहे: श्रीशक्रादित्यानें बांधलेला नालंद मठ हा एका शहरासारखा चौकोनी आहे. त्याचे तीन तीन मजली असे चार दरवाजे आहेत. प्रत्येक मजल्याची उंची सुमारें १० फूट आहे. सर्व मठ कौलारू आहेत. सभामंडपाच्या पश्चिमे-च्या दरवाजाबाहेर एक मोठा स्तूप आणि बरेच रत्नखचित चैत्य आहेत. मठावरील मुख्य अधिकारी म्हातारा आहे. दुय्यमास विहारस्वामी, विहारपाल किंवा कर्दमन् म्हणतात. त्याला फार मान असतो. येथें एक पाण्याचें घड्याळ असतें. यावरून वेळ कशी समजते, हें विकवेइ चुअनमध्यें चांगलें सांगितलें आहे. रात्रीचा मध्यभाग झोपेकरितां असतो; परंतु पहिल्या व शेवटच्या भागांत पूजापाठ वगैरे असतात. नागानंदाच्या नांवावरून याला श्रीनालंद विहार असें म्हणतात. हें एक मोठें देऊळ आहे. याचा दरवाजा पश्चिमेकडे आहे. आंत सुमारें वीस पावलांवर एक मोठा १०० फूट उंच स्तूप आहे. बुद्ध पावसाळ्याचे तीन महिने येथेंच राहत असे. त्याचें संस्कृत नांव मूलगन्ध कोठी असें आहे. नैर्ऋत्येला दहा फूट उंचीचा एक लहान चैत्य आहे. याच ठिकाणीं ब्राह्मणानें हातांत पक्षी घेऊन प्रश्न विचारले होते. सुलीफाउ-तो या चिनी शब्दसमुच्चयाचा अर्थ हाच आहे.

हर्षाच्या वेळीं नालंदा विद्यापीठ भरभराटींत होतें. नालंदा येथें संशोधकांनीं उत्खनन करून जुने अवशेष बाहेर काढले आहेत. त्यांत अनेक मूर्ती सांपडल्या आहेत. त्यांचें शिल्प जावा बेटांतील शिल्पाप्रमाणें दिसतें.

**नावा-तरींचा कायदा**—(दि फेरीज ॲक्ट). हा कायदा १८७८ सालीं मंजूर होऊन त्यांत १८८३, १८८६, १८९१, १९०१, १९१४, १९२० सालीं दुरुस्त्या करण्यांत आल्या. 'फेरी' या शब्दांत नावाचा पूल तराफा, तरता पूल यांचा आणि दोन्ही बाजूंच्या धक्क्यांचा समावेश होतो. सार्वजनिक नावा कोठें कोठें आहेत तें प्रांतिक सरकार जाहीर करील. अशा नावांची व्यवस्था प्रांतिक सरकारने म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें यांच्या ताब्यांत द्यावी, व त्यांचें उत्पन्न सदर स्थानिक संस्थांनीं घ्यावें (कलमें ७।७ अ). नावा चालवण्याचें काम जाहीर लिलां-वानें कमाल पांच वर्षांच्या करारानें देण्यांत यावें. लिलांवाच्या शर्ती, तारखा, लिलांवांत बोलणारांची लायकी, वाहतुकीचे दर, नावांचा आकार, नावाड्यांची संख्या, नावा चालविण्याची वेळ, उतारूंची, जनावरांची व वाहनांची एका नावेंतून दरखेपीं नेण्याची संख्या व मालाचें वजन व आकार, वगैरे बाबतींत नियम प्रांतिक सरकारच्या कमिशनर या अधिकाऱ्यानें किंवा सरकार नेमील त्या अधिकाऱ्यानें करावे (कलम १२). जेथें सार्वजनिक नाव असेल तेथून दोन मैलांच्या आंत डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटची परवानगी घेतल्याशिवाय खासगी नाव चालू ठेवूं नये. वाहतुकीचे दरांचा जाहीर बोर्ड लिलांवदारानें लावला पाहिजे, व त्याप्रमाणें आकार दिला पाहिजे (कलम १५-१६). जरूर तेथें खासगी नावा चालवण्यास कमिशनरनें वरील नियमानुसार परवानगी द्यावी (कलम १९). या कायद्याचे नियम मोडणारास शिक्षा सांगितल्या आहेत (कलमें २१ ते २६-२८).

**नाशिक**—मुंबई इलाखा, एक मराठी जिल्हा. क्षे. फ. ५,८५० चौ. मैल व लो. सं. ११,१३,९०१ आहे. हा जिल्हा सह्याद्रीच्या माथ्यावर १३०० ते २००० फूट उंचीवर आहे. पाऊस सु. ३५ इंच पडतो. गोदावरी व तिला मिळणाऱ्या

नाहीं. पेशवाईंत गोपिकाबाईनें येथें बरींच देवळें व कुंडें बांधलीं. राघोबादादानें नाशिकनजीकच्या चौडस या गांवाला 'आनंद-वल्ली' असें नांव ठेवून तेथें एक वाडा बांधला. नाशिक शहरा-नजीक बौद्ध व जैन गुहा पाहण्यासारख्या आहेत.

नाशिक हें फार प्राचीन स्थळ असल्यानें निरनिराळ्या काळचे वास्तु-अवशेष दिसून येतात. टेकाच्या भागाचें उत्खनन केल्यास शातवाहन काळांतील वस्तू सांपडण्याचा फार संभव आहे. मुसलमानी अंमल असल्याच्या खुणा मशिदी, कबरी, वाडे, वेशी, इ. दाखवितात. त्या वेळीं याचें नांव गुलशनाबाद होतें. स्टेशनपासून गांव ४ मैल दूर आहे. स्टेशनाजवळ सरकारी नोटा छापण्याचा कारखाना, सरकारी दारूभट्टी व मध्यवर्ती तुरुंग आहे. गांवांत तीनचार हायस्कुलें असून मराठी शाळा नगरपालिकेनें चालविलेल्या बऱ्याच आहेत. शरणपूरच्या बाजूला भोंसला मिलिटरी स्कूल व एक पुणें विद्यापीठाला जोडलेलें कॉलेज आहे. (पेशवे) सरकार वाड्यांत ग्रंथालय आहे तें बरेंच जुनें आहे. नदीच्या पलीकडे पंचवटी आहे. नाशिक हें प्रमुख क्षेत्र असल्यामुळें येथें बारमास यात्रा असते.

**नासत्य**—अश्विनीकुमार पाहा.

**नासाच्छादन**—(रेस्पिरेटर). हें एक श्वासोच्छ्वास करणें किंवा हवा शुद्ध करणे व फुप्फुसास श्वासोच्छ्वासाच्या कामीं मदत करणे याकरितां वापरावयाचें साधन आहे. हवा शुद्ध करण्याकरितां जें नासाच्छादन वापरावयाचें तें एखाद्या जाळीचें किंवा औषधीयुक्त पदार्थानें भरलेल्या गाळणीचें तयार केलेलें असून तोंडावर तें मुखवट्यासारखें वापरण्यांत येतें. श्वासोच्छ्वासास मदत करण्याकरितां वापरावयाचें साधन हें एका नळीचें बन-विलेलें असून ती नळी तोंडाशीं जोडण्यांत येते, व त्यांतून यंत्राच्या साहाय्यानें हवा आंत दाबून सोडण्यांत येते व बाहेर काढण्यांत येते. ड्रिंकर यानें शोधून काढलेला श्वासोच्छ्वासक अथवा लोहफुप्फुस याची क्रिया अगदीं निराळ्या पद्धतीनें होत असते. याच्या योगानें श्वसनेंद्रियावरील दाब कमी होऊन श्वासोछ्वास करण्यास मदत होते. याच्या साहाय्यानें पक्षवायु झालेल्या मनुष्यास अथवा इंद्रियें अशक्त असलेल्या मनुष्यास चांगला श्वासोच्छ्वास करितां येतो.

**नासिर-उद्दीन कुबाचा** (मृ. १२३०)—सिंधचा एक राजा. हा शहाबुद्दीन महंमद घोरीचा एक तुर्की गुलाम असून त्यानें त्याला मुलतान प्रांताचा सुभेदार नेमलें (१२०३); तेव्हां तो स्वतंत्र बनला. दिल्लीचा सुलतान शमसुद्दीन अल्तमश यानें सिंध काबीज करण्याची पुष्कळ खटपट केली. अखेर तो स्वतः त्याच्यावर चालून गेला. त्याला तोंड देण्याची ताकद नाहीं असें पाहून नासिरनें आपला सर्व पैसा व कुटुंब घेऊन राजधानी सोडून जाण्याचा बेत केला, व सिंधु नदींतून होडीमध्यें बसून जात असतां वादळांत होडी सांपडून तो सर्व मुलांमाणसांसह सिंधु नदींत बुडून मेला. यानें सिंधवर २२ वर्षें राज्य केलें.

**नासिर-उद्दीन तूसी, ख्वाजा** (१२०१-१२७४)—एक प्राचीन इराणी पंडित, तत्त्ववेत्ता व ज्योतिषी. चेंगीज-खानाचा नातू हलाकूखान याचा हा नोकर शिया पंथाचा असून त्यानें भूमिति, ज्योतिष, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, वगैरे बहुतेक विषयांवर ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं कांहीं ग्रंथ इराणातील विद्यापीठांतून शिकविले जातात. हा ग्रीकभाषाभिज्ञ होता; त्यानें युक्लिडचें अरबी भाषांतर केलें. अल्लाउद्दिन महंमद नांवाच्या नबाबानें त्याला आपला वझीर नेमलें होतें; तो स्वभावानें क्रूर होता, व त्यानें कैद्यांवर अत्याचार केले होते.

**नासिर खुश्रु** (१००४-१०८८)—अबु मुमुद्दिन नासिर बिन खुश्रु हा इराणचा पहिला कवि सुनी पंथाचा असून तो वैद्यक, गणित व ज्योतिष यांत पूर्ण पारंगत होता, व त्याला अरबी, तुर्की, हिंदुस्थानी व सिंधी या भाषा चांगल्या अवगत होत्या. तो बराच विषयासक्त व मद्यपी असे. पण पुढें त्याला स्वप्नांत ईश्वरी प्रेरणा झाली, व त्यानें सुखोपभोगांचा त्याग करून मक्का व मदिना यांची चार वेळां यात्रा केली. या प्रवासाची सद्यंत हकीगत त्यानें आपल्या 'सफरम्द' नामक ग्रंथांत दिली असून ती विश्वसनीय व ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाची आहे. पुढे त्याला शिया पंथ पसंत पडल्यामुळें त्यानें व त्याचे अनेक अनुयायी यांनीं शिया पंथाचा प्रसार केला.

**नासिरजंग** (मृ. १७५०)—हैद्राबादचा एक निजाम. हा निजामुल्मुक असफजाहचा दुसरा मुलगा. त्यानें बापाच्या विरुद्ध बंड केलें. १७४१ सालीं बाप-लेकांत युद्ध झालें, त्यांत नासिरचा पराभव होऊन त्याला खंदर येथें कैदेंत ठेवण्यांत आलें. तो विषयासक्त होता, म्हणून बापाला आवडत नसे. त्यामुळें असफजाहनें आपल्या मुलीचा मुलगा मुज्फरजंग याला निजामी देण्याचें ठरवून दिल्लीच्या बादशहाची मंजुरीहि मिळविली. नासिरनें बाप वारल्यावर मराठ्यांच्या मदतीनें मुज्फरचा पराभव करून त्याला कैदेंत टाकलें (१७४९). पण फ्रेंचांनीं मुज्फरला मदत करून नासिरचा खून एका नोकराकडून करविला (१७५०), आणि मुज्फरजंगास निजाम केलें. नासिर बापासारखा दूरदर्शी नव्हता, पण शूर आणि उदार होता, व त्याला काव्य व वाङ्मय यांची आवड होती.

**नॉस्ट, थॉमस** (१८४०-१९०२)—एक अमेरिकन विनोदी चित्रकार (कॅरिकेचरिस्ट). हा एका लष्करी बॅंडमधील संगीतज्ञाचा मुलगा जर्मनींत जन्मला; व अमेरिकेंत चित्रकलेचें शिक्षण घेऊन वर्तमानपत्रांत चित्रें काढण्याची नोकरी करूं

लागला. १८६० साली तो 'न्यूयॉर्क इलस्ट्रेटेड न्यूज' या पत्राला चित्रें पाठविण्याकरितां इंग्लंडांत गेला; नंतर 'इलस्ट्रेटेड लंडन न्यूज' पत्राच्या चित्रांकरितां इटलींत गेला. १८६२ सालीं अमेरिकन सिव्हिल वॉरच्या वेळीं 'शांतता' हें त्याचें विनोदी चित्र फार महत्त्वाचें होतें. अमेरिकेंतील रिपब्लिकन पार्टी, डेमॉक्रॅटिक पार्टी, वगैरे राजकीय पक्षांसंबंधींचीं त्याचीं चित्रें फार परिणामकारक असत. डेमोक्रॅटिक पक्षाचें चिन्ह गाढव व रिपब्लिकन पक्षाचें चिन्ह हत्ती त्यानें रूढ केलें होतें. प्रेसिडेंट जॉन्सनवर त्यानें विनोदी चित्रांच्या योगानें तीव्र हल्ला केला. चालू राजकारणावर विनोदात्मक चित्रें म्हणून शेक्सपियरच्या नाटकांतील प्रवेशांचा उपयोग आवश्यक फेरफार करून करण्याचा प्रघात त्यानें रूढ केला.

**नास्मिथ, जेम्स** (१८०८–१८९०)—एक स्कॉटिश इंजिनियर. त्याला प्रथमपासून यंत्रशास्त्राची आवड होती. त्यानें कॉलेजांत रसायनशास्त्र, गणित, वगैरे विषयांचा अभ्यास केला, व लंडन येथील एका कारखान्यांत राहून यांत्रिक कारखान्याची पूर्ण माहिती घेतली, व १८३४ सालीं मँचेस्टर येथें स्वतःचा कारखाना काढून लवकरच तो एका ओतकामाच्या कारखान्याचा चालक बनला. वाफेनें चालणारा घण, रंधायंत्र, फिरकीयंत्र, खांब बसविण्याचें वाफेचें यंत्र व अनेक प्रकारचीं जलशक्तीचीं यंत्रें त्यानें नवीन शोध लावून बनविलीं. या धंद्यांत त्यानें पुष्कळ पैसा मिळवला; व अखेर या धंद्यांतून निवृत्त होऊन ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला, व चंद्र वगैरे विषयांवर पुस्तकें लिहिलीं.

**नाहन संस्थान**—(सिरमूर). पंजाबांतील एक डोंगरी संस्थान. क्षे. फ. ११४१ चौ. मैल व लो. सं. १,५६,०५४ असून त्यांपैकीं शें. ९५ पेक्षां जास्त हिंदू आहेत. जलाल, गिरी व टोन्स या मुख्य नद्या आहेत. चौर नांवाचें शिखर ११,९८२ फूट उंच आहे. पाऊस सरासरी ५९ ते ६५ इंच पडतो. वार्षिक उत्पन्न ५० लक्ष रु. आहे. हल्लींचे अधिपती कॅप्टन हिज हायनेस महाराजा राजेंद्र प्रकाश बहादुर हे शुभांशुप्रकाश या मूळ संस्थापकाचे (इ. स. १०९५) ४८ वे वंशज असून १९३३ सालीं गादीवर आले. त्यांना ११ तोफांच्या सलामीचा मान आहे. येथें गहूं, हरभरा, भात, मका, ऊंस, हळद, तंबाखू हीं मुख्य पिकें आहेत. जंगल पुष्कळ असून त्यांत ओक, देवदार, स्प्रूस, बर्च, यू, वगैरे झाडें होतात; लोखंड, शिसें, तांबें, तुरटी, काव हीं खनिज द्रव्यें सांपडतात. रून, भाटा, वगैरे नद्यांत अत्यंत अल्प प्रमाणांत सोनें सांपडतें. नाहन हेंच राजधानीचें शहर असून तें १६२१ सालीं कर्मप्रकाश राजानें वसविलें. त्याची लो. सं. आठ हजार आहे. हें संस्थान आतां हिमाचल प्रदेश संघांत सामील झालें आहे.

**नाक्षत्रकाल**—हा काल नक्षत्रांच्या दैनिक गतीवरून धरलेला आहे; सूर्याच्या दैनिक गतीवरून धरलेला नाहीं. या दोन कालांमध्यें ३ मिनिटें ५५·९ सेकंदें इतकें अंतर पडतें. पृथ्वी आपल्या आंसाभोंवतीं एक फेरा नेहमींच्या घड्याळाप्रमाणें २४ तासांत करीत नाहीं, तर २३ तास ५६ मिनिटें व ४·१ सेकंदें इतका वेळ एक नक्षत्र याम्योत्तर वृत्त ओलांडून पुन्हां तें तेथें येण्यास लागतो. हा नाक्षत्र दिवस असें ज्योतिषी धरतात. या नाक्षत्र दिवसाचा आरंभ मेषसंपातापासून होतो. याम्योत्तर वृत्तावरून मेषसंपात बिंदु गेला म्हणजे ठराविक वेळेच्या अंतरानें प्रत्येक तारा याम्योत्तर वृत्तावरून जातो. हें अंतर म्हणजेच ताऱ्यांचा विषुवांश होय. यावरून नाक्षत्र घटिकायंत्र तयार होतें. व त्यावरून आकाशांतील ठराविक वेळचीं नक्षत्रस्थानें निश्चित कळतात.

**नियास**—हें सुमात्राच्या पश्चिम किनाऱ्यावरील सर्वांत मोठें बेट. या बेटाची लांबी व रुंदी अनुक्रमें ९५ व २८ मैल आहे. येथें वन्यधर्मीय लोकांची दाट वस्ती आहे. येथील लोकांतील दास्यत्वाची चाल व नरहत्या अद्याप प्रचलित आहे. येथें खोबऱ्याचें तेल काढितात. येथील लोक हातानें कापड विणणें व धातूंचीं भांडीं करणें, शेतकी काम व सडका बांधणें, या गोष्टींत निष्णात आहेत. पूर्व किनाऱ्यावरील गुनांगसिटोली येथें एक डच कमिशनर राहतो.

**निकाराग्वा**—मध्य अमेरिकेंतील एक संस्थान. हें होंडुरासच्या दक्षिणेस असून पश्चिमेस पॅसिफिक महासागर व पूर्वेस कॅरिबिअन समुद्र आहे. क्षेत्रफळ ६०,००० चौरस मैल. लोकसंख्या १०,१३,९४६. मनाग्वा हें मुख्य ठिकाण. नैक्रॅग्येस निकाराग्वा व मनाग्वा हीं दोन मोठीं सरोवरें आहेत. सेगोव्हिआ व ग्रान्द या दोन नद्या आहेत. कॉफी, फळें, साखर, रबर, महागनी लांकूड, सोनें, रुपें, वगैरेंची पैदास होते. मनाग्वा, लिऑन व ग्रानाडा या ठिकाणीं विद्यापीठें आहेत.

प्रथम हा प्रदेश इंडियनांचा होता. १६ व्या शतकांत तो स्पेननें जिंकला. तो १८२१ पर्यंत त्याच्याच ताब्यांत होता. नंतर इटुर्बाईड साम्राज्याचा भाग बनला. १८२३ ते १८३९ पर्यंत मध्य अमेरिकन राष्ट्रसंघाचा सभासद असून पुढें बंड करून हा स्वतंत्र झाला. नंतर देशांतच मोठी यादवी माजली व क्रांत्या झाल्या. त्यामुळें अमेरिकन नागरिक प्रजाजनांच्या हितसंबंधरक्षणाकरितां अमेरिकन सरकारला १९१२ ते १९२५ व १९२६ ते ३३ या दोन कालसीमांत दोन वेळां मध्यें पडावें लागलें. दुसऱ्या महायुद्धांत अक्षराष्ट्रांशीं यानें युद्ध पुकारलें होतें.

**निकेल**—या धातुद्रव्याचा परमाणुभारांक ५८·६८ व द्रवणबिंदु १४५०° व १६६०° शत. (नैस.) यांमध्यें आहे. रंग

चकचकीत रुपेरी असतो. हा मुख्यत्वें अमेरिका (संयुक्त संस्थानें), कानडा, न्यू कॅलेडोनिया व जर्मनी या देशांत सांपडतो. पितळ आणि निकेल यांच्या संयोगानें 'जर्मन सिल्व्हर' बनतें. तांब्याशीं संयोग केल्यास तांबें जास्त बळकट व ताणलें जाईल असें होतें. हेंच 'निकल ब्रॉंझ' म्हणून प्रसिद्ध आहे. विजेच्या साहाय्यानें याचा जिनसांना मुलामा देतात. या धातूचा उपयोग नाणीं पाडण्याकडे होतो.

**निकोबार**—बंगालच्या उपसागरांतील अंदमान-निकोबार नांवाच्या बेटांच्या समूहापैकीं एक समूह. क्षेत्रफळ ६३५ चौरस मैल आहे. यात एकूण १९ बेटें असून त्यांपैकीं ७ बेटांवर वस्ती नाहीं. निकोबार अंदमानाप्रमाणेंच हिंदुस्थान सरकारच्या ताब्यांत असून त्यावर एक कमिशनर असतो. निकोबारला चांगलें स्वच्छ पाणी नाहीं. ननकोवी नांवाचें मोठें बंदर आहे. बोम्पोका ही एकच मोठी ज्वालामुखी टेंकडी आहे. कार निकोबार येथें नारळाचीं झाडें बरींच आहेत. हिरवें गवत बेटांवर मुबलक असून ठिकठिकाणीं जंगलहि आहे. खडकांतून कांहीं कांहीं ठिकाणीं तांबें सांपडतें. फळवृक्ष, नारळीचीं झाडें व सुपारीचीं झाडें चांगलीं फोफावलेलीं असतात व बेल, पोपया, संत्रें, लिंबें, सिताफळें, इत्यादि झाडें लावलीं जात आहेत. मगरी समुद्रकांठीं व नद्यांच्या पात्रांतून बऱ्याचशा दृष्टीस पडतात व मोठें निकोबार, लहान निकोबार व कटचल येथें वानरेंहि आहेत. येथें स्पंज सांपडतो. येथील हवामान फार उष्ण आहे. जोराचे भूकंपाचे धक्के मधून मधून बसतात. येथील एकंदर लोकसंख्या ११,०००. या लोकांत जातिभेद नाहीं. कार निकोबार, चौरा, तेरस्सा या भाषा त्या त्या बेटांत बोलल्या जातात. भुतांखेतांवर तर ह्या लोकांचा फारच विश्वास आहे. मृत मनुष्याचे कपडे व दागदागिने त्याच्याबरोबर पुरतात. निकोबारी लोक अंगानें सुदृढ व धिप्पाड असतात. पालकाच्या व पित्याच्या मरणानंतर इस्टेटीचा वारसा मोठ्या मुलाकडे जातो. नारळीचीं झाडें, फळझाडें व लहानशा प्रमाणावर एखादी बागाईत हीच या लोकांची इस्टेट असते. बापाच्या मरणानंतर मुलीस इस्टेटीचा कांहींच वांटा मिळत नाहीं. हे लोक सुतारकामांत निष्णात आहेत. नाण्याऐवजीं हे लोक नारळाचा उपयोग करतात.

**निकोलस**—या नांवाचे पांच पोप, एक प्रतिस्पर्धी पोप (अँटिपोप) व रशियाचे दोन झार होऊन गेले.

१. पोप, पहिला निकोलस— हा तिसरा बेनेडिक्ट याच्या मागून इ. स. ८५८ मध्यें पोप झाला. याला 'दि ग्रेट' ही पदवी आहे. त्या वेळीं कॉन्स्टांटिनोपल येथील धर्माधिकाऱ्याबरोबर भांडण होऊन पूर्वेकडील व पश्चिमेकडील (ईस्टर्न अँड वेस्टर्न चर्च) अशीं दोन ख्रिस्ती धर्मपीठें निर्माण झालीं. बल्गेरियाच्या नवीन ख्रिस्ती बनलेल्या, बोरिस नांवाच्या राजानें नैतिक व सामाजिक बाबींसंबंधीं १०६ प्रश्न विचारले होते. त्यांचीं उत्तरें निकोलसनें दिलीं. तो लेख उपलब्ध आहे.

दुसरा निकोलस (१०५८-१०६१)—याला व्यक्तिदृष्ट्या मुळींच महत्त्व नव्हतें. पांचवा निकोलस (१४४७-१४५५)—हा चांगला विद्वान् होता. त्या वेळीं पांचवा फेलिक्स नांवाचा एक प्रतिपोप झाला होता, त्याला यानें पोपपदाचा त्याग करण्यास लाविलें व हें एक मोठें भांडण व दुही मिटविली. यानें होमरच्या काव्याचें पद्यमय भाषांतर करवलें व नऊ हजार ग्रंथ असलेलें एक ग्रंथालय स्थापलें. निकोलसनें रोम शहर सुधारून शोभा वाढविण्याच्या मोठाल्या योजना केल्या. बरींच चर्चें दुरुस्त केलीं व सेंटपिटरचें चर्च पुन्हां बांधण्याचा उपक्रम केला.

२. बादशहा, पहिला निकोलस झार (१७९६-१८५५)—हा बादशहा पहिला पॉल बादशहा व त्याची राणी मेरिआ फेओडोरोव्हना यांचें आठवें अपत्य. तो ५ वर्षांचा असतांनाच त्याच्या बापाचा खून होऊन त्याचा भाऊ पहिला अलेक्झांडर हा बादशहा झाला. जनरलचा दर्जा मिळाल्यावर १८१४ मध्यें तो फ्रान्समध्यें लढाईवर गेला. १८१७ सालीं प्रशियाचा राजा तिसरा विल्यम याची राजकन्या शार्लोटी हिच्याशीं त्याचा विवाह झाला. १८२५ सालीं तो बादशहा झाला आणि राज्यांतली अंदाधुंदी नाहींशी करून सर्वत्र शांतता व शिस्त त्यानें स्थापन केली. त्याचा स्वभाव फार संशयी असल्यामुळें त्यानें कोणालाहि स्वतंत्र अधिकार न देतां सर्व अधिकारसूत्रें आपल्या हातांत ठेविलीं. त्यामुळें प्रजेमध्यें असंतोष वाढला. १८२८ सालीं तुर्कस्तानबरोबर त्यानें युद्ध केलें त्यांत त्याला अपयश आलें. पण ग्रीस व ब्रिटन यांनीं त्याची बाजू घेतल्यामुळें त्याला यश येऊन तुर्कस्तान रशियाचा मांडलिक बनला. पुढें तुर्कस्तान रशियाच्या ताब्यांत राहावा हें ब्रिटनला संमत नसल्यामुळें इंग्लंड, फ्रान्स, ऑस्ट्रिया, वगैरे देश तुर्कस्तानच्या बाजूला वळले. त्यामुळें १८५४ सालीं तुर्कस्तानविरुद्ध झालेल्या क्रिमियन युद्धांत रशियाचा पराभव झाला. त्या धक्क्यानें झार निकोलस मरण पावला.

दुसरा निकोलस (१८६८-१९१८)—हा तिसऱ्या अलेक्झांडर झारचा मुलगा. त्याला पुस्तकी व लष्करी शिक्षण मिळाल्यावर १८९४ सालीं तो गादीवर आला, व त्याचा विवाह इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया हिची नात राजकन्या ॲलिक्स हिच्याशीं झाला. त्यानें सर्व सत्ता आपल्या हातीं ठेवल्यामुळें प्रजेंत असंतोष उत्पन्न झाला. जपानशीं झालेल्या युद्धात रशियाचा पराभव झाला. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर तो स्वतः

सरसेनापति होऊन लढाईवर गेला आणि मागें अलेक्झांड्रा राणी राज्यकारभार पाहूं लागली. तिनें जुने लायक मंत्री काढून टाकले. १९१७ सालीं राज्यक्रांति होऊन झार, त्याची राणी, एक मुलगा व चार मुली यांना अटकेंत ठेवण्यांत आलें, आणि १९१८ सालीं कम्युनिस्टांच्या हुकुमानें या सर्व राजकीय कैद्यांना ठार मारण्यांत आलें.

**निंगपो**—चीन देशांतील एक मुख्य बंदर. यांग नदीकांठीं हें हँगचौपासून ९५ मैलांवर आहे. लो. सं. ( १९३१ ) २,१८,७७४. शहरांत टिटन फेंगटा अथवा निंगणे नांवाचें मंदिर आहे. याला चौदा मजले आहेत. रेशीम, कापड, सत्रंज्या, गालिचे, लांकडी सामान, गवती टोप्या येथें तयार होतात. १८४२ पासून परदेशी लोकांशीं व्यापार सुरू झाला.

**निगुडकर, दत्तात्रेय वासुदेवशास्त्री** (शके १७८५–१८४० )—महाराष्ट्रांतील एक अत्यंत व्युत्पन्न शास्त्री. यांचें घराणें सांवतवाडीचें. यांचे वडील चांगले याज्ञिक, ज्योतिषी व वेदान्ती असत. दत्तात्रेयशास्त्र्यांचें प्रारंभीचें शिक्षण वे. मू. बाळकृष्णशास्त्री माइणकर यांच्यापाशीं झाल्यावर पुढील एकंदर शास्त्राध्ययन इंदुरास साठेशास्त्री–पाध्ये–म. म. कऱ्हाडकर यांजजवळ झालें. नंतर राजापुरास संस्कृत शास्त्राध्ययन शाळेवर यांची नेमणूक झाली ( शके १८११ ). तेथें निगुडकरशास्त्री यांनीं जीवमान होतें तोंपर्यंत अनेकांना अनेक शास्त्राचें उत्कृष्ट शिक्षण दिलें. त्यांची शिष्यशाखा मोठी आहे. राजापुरास त्यांनीं संस्कृत पोथ्यांचा मोठा संग्रह करून संशोधकीय अभ्यासाचीहि सोय करून दिली. या संस्कृत ग्रंथालयाचा अनेकांना उपयोग होतो. डॉ. भांडारकर यांच्या शिफारशीवरून महाराष्ट्रांतील ज्या आठ पंडितांना राजदक्षिणा मिळाली त्यांत निगुडकरशास्त्री एक होते. यांनीं कांहीं संस्कृत ग्रंथांवर टीका लिहिल्या आहेत.

**निघंटु**—निघंटु म्हणून जो वैदिक शब्दकोश आहे त्याचा अंतर्भाव निरुक्त या ग्रंथांत होतो. हे दोन्हीं ग्रंथ यास्काचार्यांनीं केले आहेत. वेदांत येणाऱ्या शब्दांचा कोश निघंटूंत दिला आहे. निघंटूचीं तीन कांडें व पांच अध्याय आहेत. पहिल्या कांडास ‘ नैघंटुक ’ कांड म्हणतात. ह्यांत तीन अध्याय आहेत. पहिल्या अध्यायांत पृथ्वी, इत्यादि महाभूतें व दिक्, काल, वगैरे द्रव्यांचीं नांवें सांगितलीं आहेत. दुसऱ्यांत मनुष्य, त्याचे अवयव, इत्यादि द्रव्य विषयांचीं नांवें आहेत. तिसऱ्या अध्यायांत ह्या पृथ्वी, मनुष्य, इत्यादि विषयांच्या गुणधर्मांचीं वाचक अशीं नांवें दिलीं आहेत. दुसऱ्या कांडास ‘ नैगम कांड ’ म्हणतात. या कांडाचा अध्याय एकच आहे. तिसऱ्या कांडास ‘ देवता कांड ’ म्हणतात. ह्यांत एकच अध्याय आहे. या अध्यायांत सर्व देवतांची माहिती आहे.

सु. वि. भा. ३–५१

**निचरा** ( पाण्याचा )—( ड्रेनिंग ). शेती करतांना जमिनीमध्यें जें वाजवीपेक्षां जास्त पाणी सांचलेलें असतें तें चर खणून दवडणें यास निचरा म्हणतात. अगदीं साधी निचरा करण्याची पद्धति म्हणजे दोन उंचवट्यांच्या प्रदेशांच्या मध्यभागीं एक उघडा चर खणून त्या जमिनीवर जें पाणी जमीन पूर्णपणें भिजल्यानंतरहि जमून राहतें तें काढून देणें ही होय. डोंगराळ कुरणांमध्यें अशा तऱ्हेचे चर खणून पाण्याचा निचरा करतां येतो. परंतु शेतामध्यें किंवा लागवड केलेल्या जमिनीमध्यें जें पाणी जमतें तें निचरून जाण्याकरितां सुमारें चार फूट खोलीचे चर खणावे लागतात व झांकावे लागतात. हे चर दगडांनीं किंवा कौलांनीं वगैरे बांधून काढावे लागतात. दगडांनीं बांधावयाच्या चरांमध्यें कांहीं उघडे असतात व कांहीं अशा लहान लहान दगडांनीं बांधलेले असतात कीं, त्यांमधून पाणी झिरपून चरामध्यें येऊं शकतें. कौलाच्या चरामध्यें चरास आवश्यक असे सर्व गुण असतात. त्यांमध्यें पाणी चांगल्या रीतीनें पाझरून येऊं शकतें व माती किंवा किडे किंवा इतर घाण येऊं शकत नाहीं. इमारतींमधें बाहेर पाणी घालवून देण्याकरितां चिनीमातीच्या नळ्या योग्य आकाराच्या व अवश्य तेवढा उतार ठेवून बांधून काढण्यांत येतात. अशा नळ्यांच्या वांकणांवर तपासणीकरितां कुंड्या ठेवण्यांत येतात. कांहीं कामामध्यें ओतीव लोखंडाच्या नळ्याहि बसविण्यांत येतात. या नळ्या सार्वजनिक गटारांना जोडण्यांत येतात.

**निजामअल्ली** (राज्य. १७६१–१८०२ )—हैद्राबादचा एक निजाम. हा निजाम उल्मुल्क असफजाहचा चौथा मुलगा. निजामअल्ली व त्याचे भाऊ यांचे तंटे लागल्यामुळें पेशव्यांनीं विश्वासराव व शिंदे यांस औरंगाबादेवर पाठविलें. साखरखेडें येथें मोठी लढाई होऊन तींत निजामअल्लीचा पराभव झाला व पेशव्यांस २५ लाखांचा प्रांत मिळाला. यानें भाऊ सलाबत याचा खून केला व स्वतः निजाम बनला. यानें सबंध उत्तर पेशवाई पाहिली व मराठ्यांशीं तंटेबखेडे व सलोखेहि वेळोवेळीं केले. यानें पेशव्यांच्या व मराठे सरदारांच्या गृहकलहांचा फायदा घेऊन स्वतःचें आसन स्थिर राखलें. इंग्रजांशींहि तो मतलबासाठीं दोस्तीनें वागे. हैदर-टिपूविरुद्ध यानें इंग्रजांस थोडीफार मदत करून फायदा मात्र बराच लाटला. खर्ड्यांची लढाई यानें अंगावर ओढवून घेतली व शेवटीं मराठ्यांना पुरा शरण गेला. तथापि पेशवाईतील पुढील यादवीमुळें याला तहांतील अटी पुऱ्या कराव्या लागल्या नाहींत. निजाम उल्मुल्कनंतर हाच हैद्राबाद संस्थानचा मोठा राज्यकर्ता होऊन गेला. मराठ्यांच्या इतिहासांत याचा नेहमीं उल्लेख येतो. हिंदुस्थानातील अठराव्या

शतकाच्या उत्तरार्धातील राजकारणांत निजामअल्ली हा प्रामुख्यानें वावरतांना दिसेल.

**निजाम उल्मुल्क** ( मृ. १७४८ )— हैद्राबाद संस्थानचा पहिला निजाम व एक मोंगल सुभेदार. याचें मूळचें नांव कमरुद्दीन. कमरुद्दिनास १३ व्या वर्षी औरंगजेबानें १०० स्वारांचें पथक व चिनकुलीचखान ही पदवी दिली. त्याच्या अखेरच्या काळांत हा विजापूरकडे सुभेदार होता. सय्यदबंधूंना फर्रुकसियर यास गादीवर बसविण्याच्या कामीं यानें मदत केली ( १७१२ ). त्या वेळीं याला गाझीउद्दीन व फिरुजजंग या पदव्या मिळाल्या. झुलफिकरखानाच्या खुनानंतर दख्खनच्या सुभेदारीवर याचीच नेमणूक होऊन यास खानखानान निजाम उल्मुल्क बहादर हा किताब मिळाला ( १७१३ ). तो दख्खनमध्यें आल्यावर त्याला असंतुष्ट मराठे सरदार (चंद्रसेन जाधव, सर्जेराव घाटगे, रंभाजीराव निंबाळकर ) येऊन मिळाले. त्यांना आश्रय देऊन त्यानें कोल्हापूरकर संभाजीचा पक्ष उचलून धरला. मराठ्यांना चौथाई घेऊं द्यावयाची नाहीं ही त्याची प्रथमपासूनची इच्छा होती. परंतु शेवटीं मराठे व निजाम यांच्यांत सलोखा होऊन युद्ध थांबलें ( १७१३ ).

दख्खनची सुभेदारी १७ महिने केल्यावर बादशहानें त्यास उत्तरेकडे मुरादाबादेस नेऊन, दख्खनवर हुसेनअल्लीस नेमिलें ( १७१५ ). १७२० सालीं दिल्ली येथील गडबडीचा फायदा घेऊन, दख्खनमध्यें स्वतंत्र होण्याचें ठरवून निजामानें १२ हजार सैन्यासह माळव्यांतून निघून व नर्मदा उतरून अशीरगड, बऱ्हाणपूर आणि खानदेश हे प्रांत काबीज केले. निजाम उघड उघड आपल्याविरुद्ध बंडखोर झाल्याचें पाहून सय्यदबंधूंनीं आलम (औरंगाबादेचा नायबसुभा) व दिलावर ( माळव्याचा नायबसुभा ) यांना त्याचा नाश करण्यास सांगितलें. परंतु त्या दोघांचाहि निजामानें पराभव केला व दोघेहि युद्धांत ठार झाले. ही बातमी दिल्लीस गेल्यावर तेथे राज्यक्रांति होऊन सय्यदबंधूंचे खून झाले व बादशहा स्वतंत्र झाला. या बनावास मूळ कारण निजामच होता, व बादशहाची त्याला अनुमति होती. म्हणून पुढें बादशहानें त्याचा सन्मान करून त्याला दख्खनचा व माळव्याचा सुभेदार केलें. पुढें वझीर अमीरखान मेल्यावर तर निजामास आसफजाह या किताबासह वझिरीहि मिळाली. परंतु इ. स. १७२२ ( जानेवारी ) पर्यंत तो दिल्लीकडे गेला नाहीं.

मध्यंतरी त्यानें मराठ्यांशीं बचावाचें धोरण ठेविलें होतें. सय्यदांचा निकाल लागण्यापूर्वीं कोल्हापूरकर व सातारकर यांच्याशीं त्याने दोस्ती केली होती व त्यांच्या चौथाईस त्यानें हरकत घेतली नाहीं. पुढें सय्यद गेले. बाळाजी विश्वनाथहि वारला. तेव्हां मात्र यानें गंडबड चालवून सातारकरांच्या चौथाईस हरकत घेतली. इतक्यांत बाजीरावाच्या नेतृत्वाखालीं मराठे गंगथडीवर जमले व महंमदशहानें दिल्लीहून मराठ्यांस नवीन फर्मानहि ( चौथाई-सरदेशमुखीचें ) दिलें; त्यामुळें त्यानें माघार घेतली ( १७२१ ) व चिखलठाणा येथें बाजीरावाची भेट घेऊन सलोखा केला. व दिल्लीस आपलें वजन बसविण्यासाठीं तो तिकडे निघून गेला ( १७२२ ).

दिल्लीस दरबारांतील गोंधळ मोडून औरंगजेबी शिस्त लावण्याचा प्रयत्न निजामानें चालविला, परंतु तो विलासी बादशहास आवडला नाहीं, म्हणून त्यानें याला गुजराथच्या सुभेदारीवर पाठविलें. तेथील बंदोबस्त नीट करून आपला चुलता हमीद यास अहमदाबादेस सुभेदार म्हणून व भाऊ अझीमअल्ली यास माळव्याचा सुभेदार म्हणून नेमून निजाम दिल्लीस परतला ( १७२३ ). परंतु तेथें त्यास कंटाळा येऊन त्यानें वझिरीचा राजीनामा दिला आणि बादशहास न विचारतां शिकारीच्या निमित्तानें दिल्ली सोडून तो दख्खनकडे निघाला.

यामुळें बादशहास राग येऊन त्यानें हैद्राबादच्या मुबारीझ नांवाच्या सुभेदारास निजामास अटकाव करण्याबद्दल गुप्त हुकूम पाठविला. निजामाच्या डोईजडपणास बादशहा कंटाळला होता व सय्यदांसारखाच त्याचाहि नाश करण्यास पाहत होता. पण साखरखेड्याच्या लढाईंत निजामानें मराठ्यांच्या साहाय्यानें मुबारीझला ठार केलें, व गोवळकोंडा, हैद्राबाद, वगैरे ठाणीं घेतलीं ( १७२४ ऑक्टोबर ).

यापुढें मराठ्यांचा व त्याचा हर्षामर्ष सुरू होता. शाहू आणि संभाजी यांचा वाद चाललेला पाहून, निजामानें सरदेशमुखी व मोकासाबाब या बाबी या दोन छत्रपतींच्या वारसा हक्कांचा निकाल लागेपर्यंत आपण कोणासहि देत नाहीं असें जाहीर केलें व शाहूच्या राज्यावर वारंवार स्वाऱ्या सुरू केल्या. तेव्हां शाहूनें बाजीरावास त्याच्यावर पाठविलें. निजामानें चंद्रसेन जाधव व संभाजी यांची मदत घेतली होती; तरी पण पेशव्यानें त्याला हैराण करून व अखेर त्याची उपासमार करून त्याचा सपशेल पराभव केला. त्यामुळें त्यानें तह केला व संभाजीची बाजू सोडून दिली व शाहूचे हक्क मान्य केले.

बाजीरावाविरुद्ध त्रिंबकराव दाभाड्यास निजामानें मदत केली होती ( १७३१ ). पुढें मल्हारबा होळकरानें आग्र्याच्या पलीकडेहि स्वाऱ्या केल्यानें घाबरून महंमदशहानें निजामास दिल्लीस बोलाविलें. परंतु बादशाही जितकी कमकुवत होईल तितकें आपणांस फायदेशीर होईल या उद्देशानें तो तिकडे गेला नाहीं ( १७३५ ). शिवाय मराठ्यांशीं भांडण्याचें सामर्थ्य त्याला या वेळीं नव्हतें. निजाम येत नाहींसें पाहून खानडौरान या वझिरानें मराठ्यांना त्याच्याकडून फोडण्यासाठीं दख्खनच्या

सर्व सुभ्यांत सरदेशपांडेपणाचे हक्क देऊं केले ( १७३६ ). त्यामुळें निजाम दिल्लीस जाण्यास कबूल झाला. बादशहानें त्याला पुनः गुजराथची व माळव्याची सुभेदारी देऊं केली; मात्र मराठ्याना या दोन्ही प्रांतांतून त्यानें हांकलून द्यावें असें बादशहाचें म्हणणें होतें. त्यामुळें त्यानें सैन्य जमवून मराठ्यांना गुजराथेंतून हांकलण्याची तजवीज चालविली. तेव्हां बाजीरावानें त्याला भोपाळजवळ कोंडून तह करावयास भाग पाडलें ( १७३८ ). नादिरशहाच्या स्वारीच्या वेळीं हा दिल्लीस असून महंमदशहातर्फे लढला होता.

निजाम उलमुल्क हा ७७ वर्षांचा होऊन बऱ्हाणपूर येथें मरण पावला ( १७४८ ). त्याला गाझीउद्दीन, नासीरजंग, वगैरे सहा पुत्र व दोन मुली होत्या. हा चांगला कवि होता असें म्हणतात. औरंगजेबानें मराठ्यांचा संपूर्णपणें उत्खात करण्यासाठीं वीस वर्षें घालविलीं; त्या वेळीं त्याच्या तालमींत निजाम हा तयार झाला होता; म्हणून याच्याहि मनात तोच हेतु अखेरपर्यंत होता. पण पेशव्यांच्या बलापुढें त्याची इच्छा सफळ झाली नाहीं. हा बुद्धिमान्, शूर, मुत्सद्दी व दीर्घद्वेषी होता.

**निजामशाही ( अहमदनगरची )** (१४८९–१६३७)— मलिक अहमद हा अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा मूळ पुरुष होता. याचा आजा बहिरंभट नांवाचा ब्राह्मण असून तो गोदेच्या उत्तरेस वऱ्हाडांतील पाथरी नांवाच्या शहराचा देशपांडे होता. दुर्गादेवीच्या दुष्काळात याचा आजा आपल्या तिमाजी नांवाच्या मुलास घेऊन विजयानगरकडे गेला. बहामनी सुलतान अहमदशहा वली याच्या शिपायांनीं विजयानगरच्या स्वारींत तिमाजीस कैद केलें व गुलाम म्हणून सुलतानाकडे आणलें. सुलतानानें त्यास मुसलमान धर्माची दीक्षा दिली व त्याचें मलिकनायन नांव ठेविलें ( १४६० ). पुढें सुलतान महंमद यानें त्यास मोठ्या योग्यतेस चढविलें व त्यास निजाम उलमुल्क ही पदवी देऊन तेलिंगणच्या सुभ्याच्या जागीं त्याची नेमणूक केली ( १४७० ). निजाम उलमुल्कनें मलिक अहमद नांवाच्या आपल्या मुलास नेमणुकीच्या जागीं पाठविलें, व आपण स्वतः सुलतानाच्या दरबारीं राहिला. पुढें त्यानें कांहीं कारस्थान करून कारभाऱ्याचा वध करविला. व आपण स्वतः कारभारी झाला. पुढील सुलतानांच्या कारकीर्दींत निजाम उलमुल्कनें आपल्या जहागिरींत बीड व दुसऱ्या कित्येक जिल्ह्यांची भर टाकली, व आपल्या मुलास तेलिंगणच्या सुभेदारीवरून परत बोलावून त्याची दौलताबाद सुभ्यावर नेमणूक केली. निजाम उल्मुल्कचा वध झाल्यानंतर त्याचा मुलगा मलिक अहमद यानें बंड करून तो स्वतंत्र झाला ( १४८९ ). व स्वतःस निजामशहा ही पदवी त्यानें लावून घेतली. तीच पुढें अहमदनगरच्या सर्व राजानीं लाविली व त्यांच्या राज्यास यामुळेंच निजामशाही असें नांव पडलें. शिवाय मूळ पुरुष बहिरंभट याच्या स्मरणार्थ या वंशांतील प्रत्येक शहा आपल्याला बहिरी अशी पदवी लावून घेत असे. मलिक अहमदनें आपल्या राज्यांत सर्वत्र शांतता केली. त्याच्यावर बहामनी शहानें स्वारी केली असतां उलट त्याचाच पराभव झाला. नंतर अहमदनें अहमदनगर हें शहर वसवून तेथें आपली राजधानी केली ( १४९४ ). पुढें तो १५०८ सालीं मेला. तो सद्गुणी व एकपत्नी होता. यानंतर या घराण्यांत खालील बादशहा झाले :—

२. बुर्हाण १ ला ( स. १५०८–१५५४ ). ३. हुसेन ( स. १५५४–१५६५ ). ४. मुर्तझा १ ला ( स. १५६५–१५८८ )–याचा मुलानें खून केला; चांदबिबी याची बहीण होय. ५. मिरान हुसेन ( स. १५८८–१५८९ ). ६. इस्माइल ( स. १५८९–१५९० ). ७. बुर्हाण २ रा ( स. १५९०–९५ ). ८. इब्राहिम ( स. १५९५ ). ९. बहाद्दर (स. १५९५–१६००). १०. मुर्तझा २ रा ( स. १६०१–०७ ). ११. बुर्हाण ३ रा ( १६०७–३० ). १२. हुसेन २ रा ( स. १६३०–३३ ) व १३ मुर्तझा ३ रा ( स. १६३३–३७ ).

स. १६३७ नंतर अहमदनगरचें राज्य दिल्लीच्या साम्राज्यांत सामील झालें. याप्रमाणें साधारण १५० वर्षें निजामशाही राज्य महाराष्ट्रांत नांदलें. आदिलशाहींत हिंदूंचा जितका छळ झाला अथवा त्यांना जितकें हलकें लेखण्यांत आलें तितकें निजामशाहींत झालें नाहीं. निजामशाहीचा बहुतेक कारभार मराठे सरदाराच्याच हातीं होता म्हटलें तरी चालेल. चांदबिबी, मलिकंबर व शहाजी भोसले या तिघांनीं निजामशाही वांचविण्यासाठीं बरीच मेहनत घेतली. शहाजीची कामगिरी प्रसिद्धच आहे. मध्यकालीन ( ज्ञानेश्वरानंतर व रामदासापूर्वीच्या ) महाराष्ट्र सारस्वताचा उगम बहुधा निजामशाहींत झाला.

**निजामुद्दीन खिस्ती, ख्वाजा** ( मृ. १३२४ )—एक मुसलमान साधु. इ. स. १२३६ मध्यें बुदाऊन येथें याचा जन्म झाला. तो वीस वर्षांचा असतांना त्याला बाबा फरिदचें नांव कळलें व तो अयोध्येस गेला. तेथें तो बाबा फरिदचा शिष्य झाला व त्याला दिल्लीस पाठविण्यांत आलें. जरी तो राजदरबारीं सन्मानपूर्वक भेटी देत नसे, तरीसुद्धा दरबारचे पुष्कळ लोक त्याच्या दर्शनास येत असत. जवळचे व लांबचे शेंकडों लोक त्याचा आशीर्वाद घेण्यासाठीं येत. अशी हकीगत सांगितली जाते कीं, हा साधु एकदां तलाव खणीत होता, तेव्हां बादशहा ग्यासुद्दीन तुघलक यानें तेथील कामकरी लोकांस तुघलकाबाद येथें किल्ला बांधण्यास बोलाविलें. हें ऐकून या साधूनें कामकऱ्यांस रात्रीच्या वेळीं कामावर येण्यास सांगितलें. तेव्हां बादशहानें दिव्याकरितां तेल

विकण्यास बंदी केली असता तलावांतील पाण्याचें तेलामध्यें अद्‌भुत रीतीनें रूपांतर झालें. इ. स. १३२५ मध्यें सुलतान बंगालहून दिल्लीस परत येत असतां त्यानें निजामुद्दिनास दिल्ली सोडून जाण्याबद्दल आज्ञा केली. ती राजाज्ञा ऐकून 'दिल्ली खूप दूर आहे' असें त्या साधूनें उत्तर दिलें. व ती म्हण म्हणून आजहि प्रचारांत आहे. ख्वाजा निजामुद्दीन वयाच्या ९१ व्या वर्षी मरण पावला. दिल्लीस कुतुबमिनारजवळ त्याचा दर्गा आहे. याचें थडगें शुभ्र संगमरवरी दगडाचें असून अठरा चौरस फूट आहे. थडग्यावर मोत्यांनीं मढविलेली अशी छत्री आहे.

**निझामाबाद**—हैद्राबाद संस्थान, एक जिल्हा. ह्यास पूर्वी 'इंदूर जिल्हा' हें नाव होतें. शें. ९१ हिंदू आहेत. क्षे. फ. ३,२८२ चौ. मैल आहे. जिल्ह्यांतील सर्वांत मोठी नदी गोदावरी आहे. कमारड्डी व यल्लारड्डी हे दोन मोठे तलाव आहेत. जिल्हा जंगलमय आहे. यांत सागवान, सिसू, अबनूस, बिजासाल, तरवार, आंबा व चिंच हीं झाडें; व वाघ, चित्ते, कोल्हे, अस्वलें आणि रानडुकरें हीं जनावरें मुख्यत्वेंकरून आढळतात. पाऊस सरासरी ४२ इंच पडतो. लो. सं. सुमारें सात लाख आहे. यांत पांच तालुके, एक पायगार इस्टेट, तीन संस्थानें व सात मोठ्या जहागिरी आहेत. येथें मुख्यत्वें तेलगू भाषा चालते. मुख्य पीक तांदुळाचें आहे. निझामाबाद गांव जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण असून लो. सं. सु. पंचवीस हजार आहे. सुती कापड व घोंगड्या यांसाठीं हें प्रसिद्ध आहे. रघुनाथदासानें बांधलेल्या देवालयाच्या जागीं–गांवाच्या नैर्ऋत्य भागीं–किल्ला आहे.

**निझामी** (११४१–१२०३)—एक इराणी कवि. याचे आई-बाप लहानपणीं वारले, त्यामुळें औदासीन्याचा पगडा याच्या मनावर बसून एकान्त व मनन हीं त्याला सतत आवडूं लागलीं. व त्यानें फकिरी आयुष्यक्रम अंगीकारला. १ मखझनुल आस्तर (यांत ईश्वर व मानव यांबद्दलचे त्याचे विचार आहेत); २ खुश्रू व शिरीन (हें उत्कृष्ट वीररसप्रधान काव्य आहे); ३ लैला व मजनून (ही एक प्रेमकहाणी आहे); ४ इस्कंदरनामा (शिकंदर चरित्र); ५ हफ्त पैकर (यांत सात मजेदार गोष्टी आहेत), असे अनेक ग्रंथ यानें लिहिले.

**नित्शे, फ्रेडरिक** (१८४४–१९००)—एक प्रख्यात जर्मन तत्त्वज्ञानी. प्रशियन सॅक्सनींत याचा जन्म झाला. एका पोलिश धनगराचा हा मुलगा. नूमबर्ग ग्रामर स्कूल, प्रसिद्ध फारी स्कूल व बॉन आणि लायझिग विश्वविद्यालयें यांत याचें शिक्षण झालें. शिक्षणानंतर तोफखान्यांत एक वर्षभर सक्तीची नोकरी करून १८६८ सालीं हा लायझिगला परत आला. वयाच्या पंचविसाव्या वर्षी बेसेल विश्वविद्यालयांत तत्त्वज्ञानाचा प्रोफेसर म्हणून याची नेमणूक झाली. १८७९ पर्यंत या ठिकाणीं हा राहिला व त्या कालांत प्राध्यापक म्हणून चांगलें नांव कमाविलें. १८७९ सालीं आजारीपणामुळें यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. कांहीं थोडें खाजगी उत्पन्न व पेन्शन यांवर आपला उदरनिर्वाह करीत इटली व स्वित्झर्लंड यांमधील कित्येक ठिकाणीं राहून यानें दिवस काढले. १८८८ मध्यें तो अतिसारानें आजारी पडला व शेवटीं वेड लागून हा आपल्या बहिणीच्या घरीं वेमर येथें २५ ऑगस्ट १९०० रोजीं मरण पावला.

नित्शे कवि होता तरी त्यानें स्वतःचें तत्त्वज्ञान असें कोठें व्यवस्थितपणें लिहिलें नाहीं, किंवा आपले विचारहि कधीं त्यानें व्यवस्थितपणें लिहून ठेवले नाहींत.

प्रजासत्ताक राज्यपद्धति व द्विदल राज्यपद्धति या दोन्ही राज्यशासनपद्धतींच्या विरुद्ध तो होता. व्यक्ति-स्वातंत्र्य, युद्ध व मानवी झगडा, मनुष्यजातीचा तिरस्कार यांवरील त्याचीं एकांतिक मतें प्रसिद्ध आहेत. झरथुष्ट्र या त्याच्या पुस्तकांत त्याच्या विचारांच्या एकांतिकपणाचा कडेलोट झाला आहे. तरी पण त्याचा खूप प्रसार झाला व अनेक तरुण जर्मन त्याचे अनुयायी बनले. 'ह्यूमन, ऑल् टु ह्यूमन'; 'दि जॉयस् विज्डम्' (आनंदी शहाणपण); 'दस् स्पेक झरथुष्ट्र' (झरथुष्ट्रोवाच); 'बियाँड गुड अँड ईव्हल' (सुष्ट आणि दुष्ट यांपलीकडे); 'दि जिनिऑलॉजी ऑफ मॉरल्स' (नीतीचा उगम), इ. त्याचीं पुस्तकें प्रख्यात आहेत.

**निद्राजनक औषधें**—(हिप्नॉटिक्स). या औषधांच्या योगानें मनुष्यास निद्रा आणतां येते. बहुतेक अशीं औषधें गुंगी आणणारीं असून त्यांच्या योगानें मेंदूंतील मज्जापेशींची उत्तेजकता कमी होऊन झोंप येऊं लागते. हा परिणाम बधिरतेमुळें किंवा गुंगी आल्यामुळें घडून येतो. औषधानें झोंप आणणें ही संवय घातुक असून वैद्याच्या सल्ल्याशिवाय तिचा अवलंब करण्यांत येऊं नये. अनेक लोकांस औषधें घेण्याची संवय व मधून मधून गुंगी (औषध) घेण्याची संवय जडलेली असल्यानें अशा तऱ्हेनें औषधें घेण्याचें व्यसनच लागतें.

**निद्रानाश**—(इन्सोमानिआ). या रोगामध्यें पूर्णपणें जागृतावस्थेपासून मधून मधून झोंप येऊन ती स्वप्न, वगैरेंनीं मोडणें, अशा तऱ्हेचे निरनिराळे प्रकार असतात. या रोगाचें मुख्य कारण काळजी किंवा चिंता हें असतें. याखेरीज खोलींत पुरेशी खेळती हवा नसणें, अपचन, वगैरेहि कारणें असतात. सायंकाळीं उघड्या हवेंत व्यायाम घेणें, थंड पाण्यानें स्नान करणें, मोहरीच्या पाण्यांत पाय ठेवणें, वगैरे उपाय योजण्यांत येतात. औषध द्यावयाचें असल्यास पालाश ब्रुमिद (पोटॅशियम

ब्रोमाइड) वरैं. तथापि औषधांचा फारसा उपयोग या रोगांत होत नाहीं. रोग्यानेंच आपसुक झोंप कशी येईल याबद्दल स्वतःच प्रयोग केले पाहिजेत. झोंप ही एक प्रकारची संवय आहे; ती लागते व मोडतेहि. औषध थोडेंच घ्यावें, पण तें चांगल्या डॉक्टराला विचारून घेणें इष्ट. चांगली जाड सतरंजी, ऊन पाण्याची पिशवी किंवा बादली, निजतांना गरम पाणी पिणें, उबदार पण फार नव्हेत अशीं पांघरुणें घेणें व खोली चांगली प्रशांत असणें, यांसारख्या सोयी करून घेतल्यास हा रोग नवीनच जडलेला असेल तर नाहींसा होतो.

**निद्राभ्रमण**—(सोम्नॅम्बुलिझम). मनुष्याच्या निद्रित अवस्थेंत होणाऱ्या हालचाली, असा या शब्दाचा अर्थ आहे. वास्तविक झोंप लागली असतांहि एखादा मनुष्य जाग्रत अवस्थेप्रमाणें क्रिया करूं लागतो; उदा., तो आपल्या अंथरुणावरून उठतो, अंगांत कपडे घालतो, दरवाजाबाहेर चालत जातो; इतकेंच नव्हे तर कांहीं अवघड जागांवरून सुरक्षितपणें चालत जातो. या सर्व क्रिया तो आपोआप यंत्राप्रमाणें करीत असतो. निद्रावस्थेंतील या क्रिया अर्थात् मेंदू बिघडून विकृत मन झाल्यामुळें घडतात. अशा मनुष्याला तो सकाळीं जागा झाल्यावर सदर क्रियांबद्दलची बिलकुल आठवण किंवा जाणीव नसते, आणि त्याला कोणीं सदर क्रियांची आठवण करून दिल्यास, अशा प्रकारचें मला स्वप्न पडलें, असें तो म्हणतो. निद्राभ्रमणाची ही व्याधि अत्यंत कोमल, हळव्या मनाच्या आणि भावनाशील व तापट स्वभावाच्या मनुष्याला होते. तसेंच हा रोग आनुवंशिकहि असतो.

*शेक्सपियर कवीनें मॅकबेथ नाटकांत मॅकबेथला असा रोग* जडल्याचें फार सुंदर रीतीनें दाखविलें आहे.

**निद्रारोग**—हा रोग उष्ण कटिबंधांत व विशेषतः मध्य आफ्रिकेमध्यें सर्वत्र आढळून येतो व यापासून हटकून मृत्यु येतो. या रोगामुळें मनुष्यास मानसिक व शारीरिक मांद्य प्राप्त होते आणि त्यास झोंप येण्याची प्रवृत्ति होऊन तिचा प्रतिबंध करतां येत नाहीं. या रोगांत शरीरांतील ग्रंथी वाढतात. शरीर हळूहळू झिजूं लागतें व आंचके येतात. या रोगाचें कारण अलीकडे शोधून काढण्यांत आलें आहे. तें म्हणजे पृष्ठवंशीय मज्जारस आणि त्यामध्यें एका परोपजीवी जंतूंचा उद्भव. या जंतूंचा प्रसार सेतत्से नांवाच्या माशीच्या दंशामुळें मनुष्याच्या शरीरांत होतो. १९०२ सालीं रॉयल सोसायटीनें कमिशन पाठविलें होतें. त्यानें असा शोध लावला कीं, हे परोपजीवी जंतू ज्या प्रदेशांत सेतत्से माशा आढळतात त्याच प्रदेशांतील शिकारी प्राण्यांच्या शरीरांत आढळून येतात. या रोगावर प्रतिबंधक उपाय योजण्यांत आले असून त्यामुळें मृत्यूचें प्रमाण बरेंच कमी झालें आहे.

**निनेव्हे**—प्राचीन ॲसिरियन (असुरी) साम्राज्याची अतिप्राचीन राजधानी. लगारा या प्राचीन बाबिलोन शहराच्या एका भागाचें हेंच नांव होतें. तैग्रीस नदीकांठावर मोसुलच्या समोर हें शहर अडीच मैल पसरलें होतें. या शहरानें एकंदर १८०० एकर जमीन व्यापिली होती. इष्टारचें मंदिर समसीहदाद (शामसी–आदाद)नें बांधिलें. खमुरबी येथेंच होऊन गेला. बाबिलोनची सर्व लूट सेनाचेरिचनें निनेव्हेला आणली. ह्यानेंच निनेव्हे येथील असुराचें देऊळ बांधिलें. याच राजवाड्यांत असुर बनिपालचें प्रसिद्ध ग्रंथसंग्रहालय होतें. त्यांतील कांहीं अवशेष ब्रिटिश म्यूझियममध्यें आज पाहण्यास सांपडतात. मेडीज लोकांनीं खि. पू. ६१२ मध्यें या शहराचा पाडाव केला.

**निनोमीय सोन्टोकू** (१७८७–१८५६)—हा एक जपानी कृषिसुधारक व साधुपुरुष होता. बाप बाराव्या वर्षीं वारल्यामुळें प्रपंचाचा भार त्याच्यावर पडला, त्यामुळें त्याचा विद्याभ्यास झाला नाहीं. तथापि ज्ञानार्जनाची आवड फार असल्यामुळें चिनी तत्त्ववेत्ता कॉन्फ्यूशियस याच्या ग्रंथाचा त्यानें अभ्यास केला. त्यानें मुख्य धंदा शेतकीचा करून ओसाड जमीन लागवडीस आणली व त्या उत्पन्नांतून बापाची गहाण पडलेली मालमत्ता सोडविली. त्यामुळें उत्तम शेतकरी म्हणून हटोरी नांवाच्या कर्जबाजारी जमीनदारानें त्याला आपल्या शेतीचा व्यवस्थापक नेमलें. आणि निनोमीयनें त्याचें सर्व कर्ज पांच वर्षांत फेडलें. ती कीर्ति ऐकून ओडवरच्या जहागीरदारानें त्याला आपली शेतकी सुधारण्याच्या कामावर नेमलें. तेंथील शेतकरी फार आळशी, दारूबाज व जुगारी होते. त्यामुळें दोन वर्षांतहि त्या शेतकीची फारशी सुधारणा झाली नाहीं. म्हणून निनोमीयनें देवालयांत बसून २१ दिवस उपवास व ईश्वरप्रार्थना केली. तें पाहून तो शेतकरी वर्ग एकदम शुद्धीवर आला व निनोमीयच्या सांगण्याबरहुकूम वागूं लागला व त्या शेतीची सुधारणा झाली. १८४२ सालीं लोकूगव सरकारनें त्याला शेतकी–सुधारणेच्या कामावर नेमलें. शेतकरी वर्गाला स्वकर्तव्य, प्रामाणिकपणा, बंधुप्रेम, वगैरे गुणांचा उपदेश करून त्यानें आपलें पुढील सर्व आयुष्य जपानच्या शेतकरी वर्गाची उन्नति करण्यांत खर्च केलें. दरसाल उत्पन्नांतून कांहीं तरी शिल्लक टाकणें ही त्याच्या उपदेशाची मुख्य कल्पना होती.

**निपाणी**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्हा, एक शहर. लोकसंख्या सु. १९,०००. इ. स. १८०० च्या सुमारास आप्पा देसाई या अत्यंत क्रूर इसमाचा अमल या प्रदेशावर होता. त्याला पुत्र नव्हता म्हणून त्यानें आपला पुतण्या मुरारराव यास दत्तक

घेतलें. आप्पाच्या मरणानंतर त्याच्या सहा विधवांत भांडण लागलें व दत्तकाविरुद्ध असलेल्या धाकट्या विधवांनीं अरबां-च्या मदतीनें निपाणी किल्ला घेतला. १८४१ सालीं इंग्रजांनीं हा किल्ला घेतला व अरबांस शिक्षा करण्यांत येऊन किल्ला निकामी करण्यांत आला; व ज्यांचें अंग या कृत्यांत होतें, त्यांचीं पेन्शनें बंद करण्यांत आलीं. हा चांगला व्यापारी गांव आहे. येथें तंबाखूचा मोठा व्यापार चालतो. विड्यांविषयीं गांव प्रसिद्ध आहे. येथें म्युनिसिपालिटी आहे.

**निप्पुर**—सुमेरिया–बाबिलोनियांतील अति प्राचीन शहर. हें बगदादच्या आग्नेयीस दहा मैलांवर आहे. खि. पूर्व चौथ्या सहस्रकांतील कांहीं शिलालेखांतून याचा उल्लेख येतो. हें शहर फार भरभराटीचें असून एनलिल देवामुळें पवित्र समजलें जाई. पुढें हें असीरिया आणि पार्थिया या राज्यांतील एक महत्त्वाचें ठिकाण मानलें गेलें. या भागाचें संशोधनासाठी उत्खनन १८८९–१९०० मध्यें करण्यांत आलें.

**निप्से, जोसेफ निसेफोरे** (१७६५–१८३३)— या फ्रेंच शास्त्रज्ञाचा जन्म फ्रान्स देशांतील शालानूसर साऊन येथें झाला. यानें सैन्यांत सबलेफ्टनंटचें काम केलें. इटलीच्या मोहिमेंत हा होता; परंतु आजार व नेत्रविकार यांमुळें त्याला ती नोकरी सोडावी लागली. पुढें त्यानें शास्त्रांत शोध लावण्याचें काम हातीं घेतलें व रसायनशास्त्रांत आपल्या भावाच्या मदतीनें संशोधन करण्यास सुरुवात केली; व पुढें यानें प्रकाश-लेखन (फोटोग्राफी) विषयांत परिश्रम करून बरेंचसें यश संपादन केलें. एल्. जे. एम्. डाग्वेरे यानें याच दिशेनें प्रयत्न सुरू केले होते. पुढें डाग्वेरे आणि निप्से यांनीं एकत्र होऊन प्रयत्न करण्याचें ठरविलें व या दोघांनीं त्यात बरेंचसें यश मिळाविलें. निप्सेनें फोटोग्राफीवर कित्येक लेख लिहिले आहेत.

**निफाड**—मुंबई इलाखा. नाशिक जिल्ह्याचा एक तालुका. क्षे. फ. ४१२ चौरस मैल. लो. सं. (१९४१) १,०३,४९०. यात ११९ खेडीं असून मोठीं गांवें नाहींत. निफाड हें तालु-क्याचें मुख्य ठिकाण आहे. ह्या तालुक्यांत लोकवस्ती बरीच दाट आहे. जमीन काळी असून तींत गहूं व चणे हीं पिकें निघतात. हवा आरोग्यदायक असून एप्रिल–मे महिन्यांत उष्मा भयंकर असतो. तालुक्याजवळूनच गोदावरी नदी वाहते. पाऊसमान २३ इंच असतें.

निफाड गांव नाशिकच्या ईशान्येस २० मैलांवर असून रेल्वे स्टेशन आहे. येथें तालुका कचेऱ्या आहेत. लो. सं. ५,१०६.

**निंब**—१. कडुनिंब पाहा. २. लिंबें पाहा.

**निंब**—मुंबई इलाखा, सातारा जिल्हा. हा गांव साताऱ्याच्या उत्तरेस ८ मैल अंतरावर असून साताऱ्याच्या राजघराण्याकडे आहे. येथें फळफळावळ (मुख्यतः आंबे व पेरू) व कधीं कधीं द्राक्षेंहि होतात. १७५१ सालीं साताऱ्च्या ताराबाईच्या वतीनें दमाजी गायकवाडानें पेशव्यांच्या फौजेचा या ठिकाणीं पराभव करून त्यांच्याकडून ताराबाईला कांहीं किल्ले देवविले.

**निंबगांव**— मुंबई, पुणें जिल्हा, खेड तालुका. खेडाहून तीन कोसांवर भीमेच्या कांठीं हें गांव आहे. हें सरदार चंद्रचूड यांना इनाम होतें व तेथें त्यांचा मोठा वाडा (आतां पडीत) आहे. देवराव हिंगण्याची येथें समाधि आहे. गांवाच्या उत्तरेस ½ मैलावर दावडी गांवीं प्रसिद्ध खंडोबाचें देऊळ आहे. यावरून निंबगांवला दावडी–निंबगांव म्हणतात. खंडोबा हें गायकवाडांचें दैवत असून त्यांचें गांवाला कांहीं इनाम आहे. देऊळ चांगलें व तटबंदी आहे. यावर एक लेख आहे.

**निबंध**—एकाच विषयाचें विवेचन ज्यांत केलेलें असतें असा लेखनप्रकार. असे लहान–मोठे निबंध आढळतात. सोळाव्या शतकांत फ्रान्समध्यें मॉन्तेन्य नांवाचा मोठा तत्त्वज्ञानी व निबंधकार होऊन गेला. इंग्लंडमध्यें फ्रान्सिस बेकन या वाङ्मय-प्रकारांतच पुढें आला. यांखेरीज ॲडिसन, स्टील, चार्लस लॅम, हॅझ्लिट, डिकिन्से, मेकॉले, कार्लाइल, फ्राउड, मॅथ्यू अर्नोल्ड, स्टीव्हन्सन, वगैरे इंग्रज निबंधकार प्रसिद्ध आहेत. इमर्सन, होल्म्स व लोवेल हे अमेरिकन निबंधकार म्हणून सांगतां येतील.

मराठींतील पहिले निबंध खिस्ती मिशनऱ्यांचे आहेत. नंतर बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन, कानविंदे, का. बा. मराठे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, वगैरे हिंदु लेखकांनीं अनेक विषयांवर निबंध लिहिले. तथापि लोकहितवादींची तळमळ, अभ्यास, शैली, प्रसाद, यांसारखे गुण वरील लेखकांत दिसत नाहींत. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं नवें ज्ञानामृत लोकांना आपल्या निबंधांच्या द्वारें पाजण्याचा प्रयत्न केला, पण तो फारसा साधलेला दिसत नाहीं. १८७५ पर्यंत निबंधलेखन केवळ भाषांतरित व उपदेशप्रधान असे. नंतर विष्णुशास्त्र्यांच्या 'निबंधमाले' पासून नवें मन्वंतर आलें. मेकॉले, जॉन्सन व ॲडिसन यांची लेखन-शैली या मालेंत स्पष्ट दिसते. तिच्या जोडीला देशाभिमान, भाषा-प्रेम व पुराणप्रियता यांची सुंदर साथ आहे. विष्णुशास्त्र्यांपासून स्फूर्ति घेऊन आगरकर आणि टिळक यांनीं वृत्तपत्रांतून उत्कृष्ट निबंध लिहिले. त्यानंतर वि. मो. महाजनी, शि. म. परांजपे, ह. ना. आपटे, ना. गो. चापेकर, कृ. ना. आठल्ये, वि. कों. ओक, वगैरे अनेक विद्वानांनीं फावल्या वेळचें म्हणून निबंध-लेखन केलें आहे. कांहींनीं मतप्रचारासाठीं हें माध्यम वापरलें, तथापि मतप्रचाराला कलेचें प्रभावी स्वरूप जें दिलें तें न. चिं. केळकर, अ. ब. कोल्हटकर व गडकरी या कलावंत निबंध-कारांनीं. केळकरांचें लेखन अनेक वर्षें एकसारखें चालू होतें.

त्यांची भूमिका कलाविलासाची आणि आनंदवादी आहे. अच्युतराव कोल्हटकरांची भूमिका निराळीच. त्यांत कल्पकता, रंजकता आणि आत्यंतिक भावनात्मकता आढळेल. गडकऱ्यांनी नाटकांतून पात्रांच्या तोंडीं स्वगत, सुंदर भावनापर निबंधच घातले आहेत कीं काय असें वाटतें. सावरकर, माटे, आंबेकर, माडखोलकर, ठाकरे, राजवाडे, डॉ. केतकर, वगैरे मंडळींनीं समाजसुधारणेचे प्रश्न उचलून त्यांवर कळकळीनें लिहिलें. घरगुती प्रश्नावर 'गुजगोष्टी' लिहिण्याचा प्रा. फडके यांनीं सपाटा सुरू करून घरमरी लोकांना जागें केलें. फडक्यांप्रमाणेंच वि. स. खांडेकरांनीं लघुनिबंधसंग्रह प्रसिद्ध करून आघाडीचें स्थान मिळविलें. यानंतर लघुनिबंधासाठीं अनंत काणेकरांचें नांव घ्यावें लागेल. र. गो. सरदेसाई, गं. भा. निरंतर, वि. पां. दांडेकर, इ. आणखी अनेक लेखक या क्षेत्रांत पुढें येत आहेत. पूर्वीचे मोठाले निबंध मागें पडून आतां लघुकथांप्रमाणें लघुनिबंधांचाच मोठा भर आहे.

**निंबसाडा**—एक कुलधर्म. साताऱ्याकडे बऱ्याचशा देशस्थ घराण्यांत माघ शुद्ध पौर्णिमेचा कुलाचार असतो. त्या वेळीं देवीची रीतीप्रमाणें पुरुषांनीं पूजा केल्यावर तांब्याचा कलश गव्हावर मांडतात. त्यांत पाणी घालून विड्याचीं पानें ठेवून त्यांत देवीची प्रतिमा ठेवितात. घरांतील सर्वांत वडील जी सुवासिनी स्त्री असते ती निंबाच्या पानांची साडी पहिलें वस्त्र सोडून ठेवून नेसते व हातांत दिवटी घेऊन त्या कलशास तीन प्रदक्षिणा करते. नंतर तिला घरांतील बायका नवें लुगडें व नवी चोळी देतात. नंतर तें लुगडें नेसून ती निंबसाडी सोडून ठेविते. ही निंबसाडी लिंबाच्या पाल्याच्या डिकशांची केलेली असते. ह्याप्रमाणें कलशाची पूजा झाल्यावर ब्राह्मण-सुवासिनींचें भोजन होऊन कुलधर्म पुरा होतो. [ महाराष्ट्र साहित्य-पत्रिका ]

**निंयाम्ल**—( सायट्रिक ॲसिड ). लिंबें आणि इतर फळें यांत हें सांपडतें. सामान्यतः हें लिंबाच्या रसापासून तयार करतात. शुद्ध स्वरूपांत हें पांढरें स्वच्छ स्फटिकमय असतें. हें अतिशय झोंबणारें असून चव आंबट असते. धातूबरोबर संयोग पावून त्याचीं लवणें तयार होतात व त्यांना जंभेत (सायट्रेट) म्हणतात. कापडावर रंगकाम ( कॅलिको छपाई ) करतांना व निरनिराळीं पेयें तयार करतांना ह्या अम्लाचा उपयोग होतो.

**निंवारा**—[ मेलिआ सुपर्बा ? ]. हीं झाडें घाटावर पानमळ्यांत लावतात. झाड फार मोठें वाढत नाहीं. कडूनिंबाप्रमाणेंच याचीं पानें असतात. लांकूड इमारतीस उपयोगी पडतें. याचा रस विषारी असतो. पण खरूज, केंसाची कीड, यांवर गुणकारी आहे.

**निंबार्क** ( सु. स. ११५० )— नीमावत पंथाचा संस्थापक व एक वैष्णवधर्मप्रसारक. प्रख्यात गणिती व ज्योतिषी जो भास्कराचार्य तो हाच असें कोणी म्हणतात. एके दिवशीं संध्याकाळीं सूर्यास्तानंतर अन्नग्रहण न करणारा एक अतिथि याच्या घरीं आला. तेव्हां यानें अतिथीसाठीं सूर्याला निंबाच्या झाडांत अडकवून ठेविलें; म्हणून याला निंबार्क ( निंब + अर्क ) म्हणूं लागले. हा जातीनें ब्राह्मण असून बल्लारी जिल्ह्यांतील निम्ब ( सांप्रतचें निंबापूर ) गांवीं राहत असे. याच्या बापाचें नांव जगन्नाथ असून आईचें नांव सरस्वती होतें.

ब्रह्मसूत्रावर एक लहानसें भाष्य म्हणून 'वेदान्तपारिजातसौरभ' नांवाचा एक ग्रंथ व 'सिद्धान्तरत्न' किंवा 'दशश्लोकी' नांवाचा एक छोटासा ग्रंथ असे दोन ग्रंथ यानें लिहिले. याच्या संप्रदायाचे लोक सर्व हिंदुस्थानभर पसरलेले असून मथुरेच्या आसपासचा मुलूख व बंगाल यांमध्यें तर या लोकांची संख्या मोठी आहे. यांचीं मतें रामानुजपंथाच्या टेंकलई पीठाच्या मतांच्यासारखीं दिसतात.

**निंबाळकर**—फलटण पाहा.

**निबें**—लेखनाच्या कामीं निबें म्हणजे टांक (टांकाचीं टोंकें), वापरतात. तीं तयार करण्याची कृति पुढीलप्रमाणें आहे : निब तयार करतांना टांक तोडणें, भोंकें पाडणें, शिक्का मारणें, बाजू चिरणें, टांक तापविणें, टांक खोलाविणें, पाणी देणें, साफ करणें, पाणी उतरणें, टांक घासणें, टोंक वळविणें, रंग देणें व व्हार्निश करणें, इतक्या क्रिया कराव्या लागतात. टांक तोडण्यास स्क्रू फ्लायप्रेस व पंचिंग मशीन अशीं दोन यंत्रें लागतात. टांक तोडण्यासाठीं प्रथम डाय-पंच करावा लागतो. टांक तोडून झाल्यावर त्यांस भोंकें पंचिंग मशीननें पाडतात. शिक्का मारण्याचें यंत्र तोडण्याच्या स्क्रू फ्लायप्रेसप्रमाणें असतें. टांकाचा कडकपणा कमी व्हावा म्हणून टांक बाजूला चिरतात. चिरण्याची क्रिया भोंकें पाडण्याच्या यंत्राप्रमाणेंच असलेल्या यंत्रावर करतात. टांक नरम करण्याकरितां नंतर तापवितात. टांक खोलवण्याचें यंत्र शिक्के मारण्याच्या यंत्रासारखें असतें. टांक टणक करण्यासाठीं त्याला पाणी द्यावें लागतें. त्याकरितां एका पेटींत सुमारें एक हजार टांक भरून भट्टींत लाल होईपर्यंत तापवितात, व लगेच ते टांक तेलांत ओततात. तेलांतून टांक काढल्यावर ते रॉकेल तेलांत स्वच्छ धुतात. नंतर एकेक टांक घेऊन सहाणेवर टांकाच्या भोंकापर्यंतचा भाग घासतात. टांक घासल्यावर यंत्रावर चिरतात. चिरण्याचें यंत्र दीड फूट उंचीचें स्क्रू फ्लायप्रेससारखेंच असतें. या क्रियांतून पांढऱ्या स्वच्छ निघालेल्या टांकांना पिवळा रंग देतात. याप्रमाणें एकंदर कृति करून टांक किंवा निबें विकण्यास ठेवतात.

**निबेलुन्‌जेन्‌लीड**—हें जर्मन महाकाव्य. मिड्ल हाय जर्मन भाषेंत १२ व्या शतकाच्या सुमारास लिहिलेलें आहे. हें काव्य

६,००० ओळींचें आणि चार ओळींच्या वृत्तांत केलेलें आहे. या महाकाव्याचें कथानक थोडक्यांत असें आहे कीं, नेदरलँडच्या राजाचा मुलगा सीगफ्रीड यानें बर्गंडीचा राजा गुंथर याची बहीण क्रीमहिल्ड हिच्याबरोबर विवाह केला. पुढें गुंथरला आइसलंड-मधील राजकन्या ब्रूनहिल्ड हिच्याशीं विवाह करण्याच्या कामांत सीगफ्रीड यानें मदत केली. पुढें क्रीमहिल्ड राणी ब्रूनहिल्डला असें हिणवून बोलूं लागली कीं, तुझ्या विवाहाला सीगफ्रीडनें मदत केली आहे; त्यांत गुंथरचा पराक्रम कांहींच नव्हता. त्यामुळें चिडून जाऊन ब्रूनहिल्डनें क्रीमहिल्डचा नवरा सीगफ्रीड याला मारेकऱ्याकडून ठार मारलें. पुढें पुष्कळ वर्षांनीं क्रीम-हिल्डनें हूण लोकांचा राजा एटझेल याच्याबरोबर विवाह केला आणि आपल्या दुसऱ्या नवऱ्याकडून बर्गंडियन लोकांची कत्तल करून आपल्या पहिल्या नवऱ्याच्या मृत्यूचा सूड उगवला. पुढें एका हूण शिपायानेंच क्रीमहिल्डला ठार मारलें. या काव्यांत दाखविलेले कांहीं स्वभावविशेष निबेलुंग लोकांचे आहेत.

**निमि**—सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजाचा दुसरा पुत्र. हा गौतमा-श्रमासमीप वैजयंत नामक नगर वसवून तेथें राज्य करीत असे. राजानें आपणाशिवाय यज्ञ सुरू केला हें पाहून एकदां वसिष्ठानें याला 'तुझा देह पतन पावेल' असा शाप दिला. यानेंहि उलट त्यास तोच शाप दिला. तेव्हां दोघांचेहि आत्मे ब्रह्मदेवाकडे गेले. लगेच ब्रह्मदेवाकडून देहधारणेची आज्ञा झाली. परंतु निमीनें ब्रह्मदेवाची प्रार्थना केली कीं, मला आतां देहधारणा नको. तेव्हां प्राणिमात्रांच्या नेत्रांत याची स्थापना करण्यांत आली. यावरून निमिष शब्द बनला आहे. याचाच पुत्र मिथि नांवाचा जनक होय.

**निमुळता खांब**—( ओबेलिस्क ). हा चौकोनी निमुळता होत जाणारा व अखेरीस निमुळत्या मनोऱ्याच्या आकाराची रचना असणारा असा एक मोठ्या स्तंभांचा प्रकार आहे. ईजिप्त-मध्यें पूर्वी असे मनोरे स्मारकासाठीं किंवा देवळाच्या प्रवेश-द्वारीं उभे करीत. कर्णक येथें १०७ फूट उंचीचा व सुमारें ३०० टन वजन असलेला राणी हत्शेपसुतेनें स्थापन केलेला मनोरा आहे. हेलिओपोलिस येथें सेसोस्ट्रिस यानें अशा तऱ्हेचे दोन स्तंभ उभारले होते. त्यांपैकीं एक १८० फूट उंच होता. हे स्तंभ ऑगस्टस बादशहानें रोम येथें नेले होते. दुसऱ्या रामेसिसचा असा एक स्तंभ लक्सॉर येथून पॅरिस येथें सन १८३३ मध्यें आणण्यांत आला. दुसरे दोन अशा प्रकारचे स्तंभ 'क्लिओपाट्राची सुई' या नांवानें प्रसिद्ध असून त्यांपैकीं एक लंडन येथें व दुसरा न्यू यॉर्क येथें आहे.

**नियतिवाद**—( डिटरमिनिझम ). हें तत्त्वज्ञानांतील एका सिद्धान्ताचें नांव आहे. हा सिद्धान्त असा कीं, मानवी इच्छा ही स्वतंत्र नाहीं, तर विधात्या( प्रॉव्हिडेन्स )च्या हेतूप्रमाणें सर्व नियंत्रित रीतीनें चाललेलें आहे. पण अलीकडील या पंथाचे तत्त्ववेत्ते असें म्हणतात कीं, मानवी इच्छा ही आनुवंशिक गुण व प्रवृत्ति यांचा समुच्चय होय. याप्रमाणें इच्छास्वातंत्र्यवादाच्या अगदीं विरुद्ध असा हा वाद आहे. इच्छास्वातंत्र्य पाहा.

**नियामक**—१. (रेग्युलेटर). कोणत्याहि यंत्राची गति विशिष्ट प्रमाणांत राहावी याकरितां अशा नियामकाची योजना करण्यांत येते. हा नियामक सामान्यतः गतिनियमन करण्याकरितां वापरण्यांत येतो. परंतु तापकामध्यें विशिष्ट मर्यादेपर्यंत पाणी सतत भरलेलें राहावें अशाकरितांहि नियामकाची योजना केलेली असते. तसेंच विद्युद्गतियंत्राची गति बदण्याकरितांहि अशा यंत्राचा उपयोग करतात. तसेंच विद्युदुत्पादक जलयंत्रामध्यें चाकावर सतत पाण्याचा प्रवाह विशिष्ट परिमाणाचा पडत राहावा याकरितां पेल्टन याच्या पद्धतीचा भाला व गतिपरिवर्तक ( डिफ्लेक्टर ) असलेला नियामक बसविण्यांत येतो. जेथें एखाद्या यंत्रांत पाण्याची विशिष्ट उंची कायम ठेवावयाची असेल तेव्हां उपयोगांत आणावयाच्या नियामकामध्यें अशा प्रकारची योजना केलेली असते कीं, विशिष्ट रेषेच्या खालीं पाण्याची पातळी जातांच एका पड्यांतून वाफ बाहेर पडून त्या वाफेच्या योगानें एक पंप आपोआप चालूं लागतो, व त्या पंपामुळें यंत्रांत पाणी भरलें जाऊन पाण्याची पातळी वर आली म्हणजे वाफ जाण्याचें बंद होऊन पंप आपोआप बंद पडतो. रंगकामांतील रंगाच्या कढयांतील उष्णमान, तसेंच रबर सांधण्याचा यंत्रांतील उष्णमान कायम ठेवण्याकरितां अशाच तऱ्हेच्या योजना केलेल्या असतात.

२. (गव्हर्नर). हा साधारणपणें गति प्रत्यक्ष उत्पन्न करण्याचीं जीं यंत्रें असतात त्यांवर गति शक्य तों सारखी राखण्यासाठीं बसविलेला असतो. अगदीं जुन्या पद्धतीमध्यें ही क्रिया एका लंबकानें किंवा क्वचित् स्प्रिंगनेंहि होत असे. परंतु हें सर्व मार्ग पडून सर्व नियामक ( गव्हर्नर ) निदान नव्याण्णव टक्के तरी फिरत्या गोळ्यांच्या केन्द्रोत्सारक ( सेंट्रिफ्यूगल ) शक्तीमुळें चालत असतात. हे गोळे बसविण्याच्या पद्धती निरनिराळ्या असूं शकतात. परंतु तत्त्व मात्र एकच असतें. कांहीं गोळे एकदम जोरानें अतिशय बाहेर जाऊं नयेत म्हणून त्यांना स्प्रिंगनें दाबूनहि धरलेलें असतें. या ताब्यांत ठेवलेल्या, जोरानें गति-उत्पन्न करणाऱ्या यंत्राला लागणारें तेल, वाफ किंवा पाणी कमीअधिक मिळण्याची व्यवस्था करून गति सारखी राखतां येते. बहुतेक सर्व

**पोर्टर नियामक**
अ—वाफझडपेचा तरफ
ब—भारनियंत्रक रचना

ग्रामोफोनमधून हा नियामक असतोच. ठरीव वेगापेक्षां अधिक वेगानें मोटारगाड्या जाऊं नयेत म्हणून त्या गाड्यांवरहि नियामक बसविलेले असतात.

**नियोगी, सर मच्छिराज भवानीशंकर** (१८८६- )— एक हिंदी न्यायाधीश. यांचें घराणें मूळ मच्छलिपट्टण येथून येऊन मध्यप्रांतांत स्थायिक झालें व आतां हे पूर्णपणें महाराष्ट्रीय बनले आहेत. यांचे पणजोबा बैरागी नांवाचे प्रथम मध्यप्रांतांत आले. यांचा जन्म ३० ऑगस्ट १८८६ रोजीं झाला. यांचें पालनपोषण यांचे चुलते दुर्गाशंकर यांनीं केलें. व यांचें शिक्षण हिस्लॉप कॉलेजमध्यें झालें. कलकत्ता युनिव्हर्सिटीचे बी. ए. होऊन अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे एम्. ए. व एल्एल्. बी. झाले व मुंबई युनिव्हर्सिटीचे एल्एल्. एम्. झाले. १९०६ ते १९०९ मध्यें हे पटवर्धन हायस्कूलमध्यें शिक्षक होते. १९१५ मध्यें हे नागपूर म्युनिसिपालिटींत निवडून आले व १९२५ मध्यें तिचे अध्यक्ष झाले. नागपुरास टिळक पुतळा बसविण्याच्या कामीं यांनीं पुढाकार घेतला होता. १९१६ मध्यें हे प्रथम वकिली करूं लागले, पण १९२० मध्यें कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें त्यांनीं ती सोडून दिली. या वेळीं ते राष्ट्रीय सभेचे चिटणीस होते. १९२२ मध्यें त्यांनीं पुन्हां वकिली करण्यास सुरुवात केली. हे १९२७ मध्यें आमगांव जमीनदारीच्या खटल्याबाबत इंग्लंडला गेले होते. जून १९३० मध्यें यांस जादा ज्युडिशिअल कमिशनर नेमण्यांत आलें. व पुढें मध्यप्रांतांत हायकोर्ट स्थापन करण्यांत आल्यावर हे हायकोर्ट जज्ज झाले. १९३२ व १९३४ मध्ये हे नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु (व्हाइस चॅन्सेलर) म्हणून निवडून आले. यांनीं या काळांत लक्ष्मीनारायण संस्थेची योजना पूर्ण केली. भारत इन्शुअरन्स कंपनी व आयडियल डेमोक्रॅटिक कंपनी यांच्याशीं चालक म्हणून त्यांचा संबंध होता तो त्यांनीं हायकोर्ट जज्ज झाल्यावर सोडून दिला. हे सामाजिक व धार्मिक सुधारणेचे कट्टे पुरस्कर्ते असून यांनीं पुनर्विवाह केला आहे. यांच्या पत्नी डॉक्टर असून धर्मार्थ कार्य करीत असतात. कांहीं संस्थानांचे सल्लागार म्हणून सेवानिवृत्त झाल्यावर हे काम करीत होते.

**निरंजन माधव**—एक महाराष्ट्रीय कवि. निरंजनाचा जन्म कर्नाटकांत झाला. तो प्रथम थोरल्या बाजीरावाच्या व नंतर नानासाहेब पेशव्याच्या पदरीं होता. व तत्कालीन राजकारणांत बनाजी माधव या नांवानें ओळखला जाई. यानें कर्नाटकांत बरीच राजकीय कामगिरी केलेली आहे. तथापि हा जातिवंत कवि होता. याची कविता वामन व मोरोपंत यांच्या मधल्या काळांत रचली गेली असून त्या दोघांच्या कवितेंतील पुष्कळ गुण ह्याच्या कवितेंत स्पष्ट दिसतात. यांची भाषा सुबोध व ओजस्वी असून कवितेंत वृत्तवैचित्र्य व विषयवैचित्र्य आहे. स्तोत्रसंग्रह, श्रीज्ञानेश्वरविजय, सुभद्राचंपू, वृत्तशास्त्रावर वृत्तावतंस व वृत्तमुक्तावली, इत्यादि याचे ग्रंथ आहेत. ही बहुतेक ग्रंथरचना शके १६८० ते १६९४ च्या दरम्यान झालेली दिसते. या कवीनें रामचरित्रावरहि बरीच काव्यरचना केलेली आहे. यानें सर्व हिंदुस्थानभर प्रवास व यात्रा केल्या होत्या. त्याचा प्रवासवर्णनपर ग्रंथ मोठा मनोरंजक व तत्कालीन परिस्थितीचें ज्ञान करून देणारा आहे.

याच्या नांवावरचा 'सांप्रदायपरिमळ' याचा कीं याचा शिष्य निरंजनदास याचा, याविषयीं वाद आहे. याचे वंशज पुण्यास अमृतेश्वराजवळ पारसनीस या आडनांवाचे आहेत.

**निरंजन, रघुनाथ** (मृ. १८५५)— एक मराठी संतकवि. हा एक सुप्रसिद्ध सिद्धपुरुष होऊन गेला. मूळचा हा धारूर तालुक्यांतील कळंब गांवच्या कौशिक गोत्री अश्वलायन शाखेचा देशस्थ ब्राह्मण, अवधूत श्रीधर श्रोत्री असे याचें समग्र नांव होतें. याचे गुरु नाशिकचे रघुनाथभटजी यांनीं याचें निरंजन असें नांव ठेवलें. नंतर हा स्वतः आपल्या नांवापुढें आपल्या गुरूचें 'रघुनाथ' हें नांव जोडून 'निरंजन रघुनाथ' या नांवानें लोकांपुढें आला. गिरनार पर्वतावर याला सगुण साक्षात्कार झाला असें म्हणतात. (१) अनुभवामृतबोधिनी, (२) स्वात्मप्रचीति, (३) साक्षात्कार, (४) श्रीरघुनाथचरित्र, (५) महावाक्य, वगैरे याचे ग्रंथ आहेत. प्रथम हा गृहस्थाश्रमी होता. शेवटीं यानें चतुर्थाश्रमाचा अवलंब करून कृष्णा नदींत जलसमाधि घेतली.

**निरंजन स्वामी** (१५९१-१६४९)—कऱ्हाड येथें राहणारा एक गणपति-उपासक व समर्थ रामदासस्वामींचा शिष्य. याची गणेशगीता प्रसिद्ध आहे. याचें गद्यचरित्र याचा नातू भगवान पाठक यानें लिहिलें आहे (शके १६८३).

**निराजी रावजी**— शिवाजीच्या प्रथमच्या साह्यकारी मंडळीपैकीं एक. हा आग्र्यास शिवाजीबरोबर गेला होता व कैदेंतहि पडला होता (१६६६). तेथून सुटल्यावर यानें मथुरेस मोरोपंत पेशव्याच्या मेहुण्याकडे संभाजीची व्यवस्था लावून दिली. दक्षिणेंत आल्यावर शिवाजीनें याला मोठें बक्षीस दिलें व औरंगाबादेस मोंगलाकडे वकील म्हणून ठेविलें. नंतर गोवळकोंडेकरांनीं शिवाजीस खंडणी देण्याचें कबूल केल्यावर त्यांच्या दरबारीं निराजीपंतास वकील ठेविलें (१६६९). पुढें याला न्यायाधीश करण्यांत आलें. हा मुत्सद्दी असल्यानें याची नेमणूक पुन्हां कुतबशाही दरबारीं वकिलीच्या कामावर झाली (१६७८). त्यानंतर हा थोडक्याच दिवसांनीं वारला. याचाच मुलगा प्रख्यात मुत्सद्दी प्रल्हादपंत होय.

**निराशावाद**—हा वाद आशावादाच्या अगदीं विरुद्ध आहे. निराशावादी पंडितांचें म्हणणें असें कीं, हें आपलें जग, विशेषतः

मानवाच्या दृष्टीनें पाहिल्यास आमूलाग्र वाईट आहे; कारण या जगांत मानवाला अत्यंत तीव्र यातना व दुःखें भोगावीं लागतात. तत्त्वज्ञानदृष्ट्या मानवी जीवनाचें पृथक्करण केलें, तरीहि जग वाईट आहे, असें ठरतें. या निराशावादी तत्त्वज्ञानाचे प्रतिपादक अलीकडील दोन तत्त्ववेत्ते शोपेनहार व व्हान हार्टमन हे होत. शोपेनहारनें हेगेलच्या सिद्धान्तांपैकीं निराशावादाचा अंगीकार करून आपले तत्त्वज्ञानविषयक सिद्धान्त बनवले, आणि अखेर असें प्रतिपादन केलें कीं, मनुष्याला मृत्यु येतो, ही एकच मनुष्याच्या आयुष्यांत समाधान मानण्यासारखी बाब आहे.

**निराश्रितांसंबंधीं कायदे**—(पुअरलॉज). इंग्लंडांत नॉर्मन राजघराण्याच्या कारकीर्दीपासून फ्यूडॅलिझम किंवा सरंजामी पद्धति सुरू झाली, आणि त्यांतून पुढें निराश्रितांच्या कायद्याचा उगम झाला. सदर सरंजामी पद्धतीमध्यें जमीनदाराच्या शेतजमिनीवर काम करणारा जो शेतकरी (सर्फ) त्याला अन्नवस्त्रादि पुरवून पालनपोषण करण्याची जबाबदारी जमीनदारावर असे. पुढें ही सरंजामी पद्धति नष्ट होऊन शेत—मजूर जमीनदारांबरोबर स्वतंत्र करार करूं लागले. व त्यामुळें वरील प्रकारची पालनपोषणाची जबाबदारी जमीनदारांवर राहिली नाहीं. अशा शेतमजुरांपैकीं कित्येकांना मजुरीनें काम न मिळाल्यामुळें ते बेकार झाले व अशा बेकार इसमांना पोसण्याची जबाबदारी त्या त्या गांवांवर सोंपविण्यांत आली. १६०१ सालीं 'दि पुअर रिलीफ ॲक्ट' किंवा निराश्रितांसंबंधीं कायदा मंजूर झाला, व तो पहिला इंग्लिश 'पुअर लॉ' होय. १६४१ सालीं हा कायमचा लागू करण्यांत आला. या कायद्यांतील योजना येणेंप्रमाणें:—१ ज्या मुलांचें पालनपोषण आईबाप करीत नाहीत अशा निराश्रित मुलांना काम करावयास लावणें, व त्यांना अन्नवस्त्र पुरवणें. २ काम करण्याची शक्ति व इच्छा आहे त्यांना काम देऊन मजुरी देणें. ३ काम करण्यास जे असमर्थ आहेत अशा इसमांच्या पोषणाकरितां गांवकऱ्यांकडून वर्गणी वसूल करणें. आणि ४ भिक्षा मागणाऱ्या मुलांची कामशिकाऊ उमेदवार म्हणून (ॲप्रेंटिस) सोय लावून देणें. ह्याच सुमारास 'दि सेटल्मेंट ॲक्ट' या कायद्यानें शेतकीचें काम करणाऱ्या मजुरांना एक ठिकाण सोडून दुसरीकडे जाण्यावर नियंत्रण घालण्यांत आलें. व्यक्तिस्वातंत्र्याला बाध आणणाऱ्या या कायद्याबद्दल ॲडॅम स्मिथ या सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञानें फार कडक टीका केली. १७९३ ते १८१५ पर्यंत इंग्लंड देश फ्रान्सबरोबर सतत युद्धांत गुंतलेला असल्यामुळें जिनसांच्या किंमती वाढल्या आणि मजुरीचे दर कायम राहिले व कांहीं ठिकाणीं कमी करण्यांतहि आले; तेव्हां बेकारी माजली. हिंदुस्थानांत अशा प्रकारचा कायदा अद्याप झाला नाहीं.

**निरीश्वरवाद**—(अथीइझम). तत्त्वज्ञानांतील हा एक पंथ आहे. ईश्वराचें अस्तित्व किंवा परमोच्च बुद्धिमान् विभूतीचें अस्तित्व याबद्दल अविश्वास असणारांचा हा पंथ ईश्वरवादी (थीइझम) किंवा दैवतवादी (डीइझम) पंथाचा विरोधी पंथ होय. हा शब्द फार व्यापक अर्थानेंहि वापरतात. एकेश्वरवाद, अनेकेश्वरवाद, आत्म्याचें अमरत्व यांपैकीं कोणतीहि बाब न मानणारा 'निरीश्वरवादी' असें मोघमपणें म्हणतात. निरीश्वरवादाचे प्रमुख पुरस्कर्ते ला मेत्री, होलबाश, फेव्हरबाश आणि कार्ल व्होग हे होत. कोम्ट व हेकेल यांनींहि निरीश्वरवादी तत्त्वज्ञानाचेंच प्रतिपादन केलें आहे.

आपल्याकडे न्यायवादी आणि सांख्यवादी हे कांहीं अंशीं निरीश्वरवादी म्हणतां येतील.

**निरीक्षण**—(सर्व्हेइंग–मोजणी). विधात्यानें विश्वकर्म्याकरवीं विश्वरचना करण्यापूर्वीं एक योजनाचित्र (प्लॅन) तयार करण्यासाठीं निरीक्षण (सर्व्हे) केलें होतें कीं नाहीं हा कवि-कल्पनेचा भाग असला तरी मनुष्याला मनुष्यत्व प्राप्त होऊन जेव्हां जडव्यवहार सुखमय व्हावा यामागें तो लागला तेव्हां त्यास या जडसृष्टीचें (पृथ्वीचें) सूक्ष्म निरीक्षण करणें भाग पडलें.

क्रमाक्रमानें पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश यांचें निरीक्षण करणें त्याला अवश्य वाटूं लागलें. पृथ्वीची पाहणी करून शेती, नगररचना, राजमार्ग, लोहमार्ग, इ. निर्माण करतां आले. आपतत्त्वाचें निरीक्षण करून नौकानयन, कालवे, जलमार्ग, विजेचें उत्पादन, वगैरे करणें शक्य झालें. तेजाचें निरीक्षण करून कोणतेहि पदार्थ तापविणें, वितळविणें, छायाचित्रें घेणें, किरणांच्या साहाय्यानें रोग बरे करणें, इत्यादि गोष्टी मानवाच्या आवाक्यांत आल्या. वायूच्या निरीक्षणानें पवनचक्क्या सुरू झाल्या, विमानमार्ग ठरवितां आले, व सुरुवातीस गलबतें हाकारणें सुलभ झालें. आकाशतत्त्वाच्या निरीक्षणानें ध्वनिक्षेप करतां येऊन आधुनिक नादवाहक रेडिओ प्रचारांत येऊं शकली. वर दर्शविलेल्या सर्व निरीक्षणांत कोणतीं तत्त्वें व कोणतीं साधनें उपयोगांत आणतात त्यांचें विवेचन पुढें थोडक्यांत आहे:

१. जमीनपाहणी—याचा श्रीगणेशा शंकू व सांखळी यांच्या साहाय्यानें होऊन जमिनीचे आकार ठरवितां येतात. मानवाची देहधारणा अन्नावर असल्यामुळें शेतीचा धंदा हा त्याचा जीव कीं प्राण आहे व तो यशस्वी रीत्या करण्यासाठीं श्रमविभागाच्या तत्त्वास धरून पेराऊ जमीन कष्टाळू शेतकऱ्यांना वांटून देणें भाग आहे. वांटणी म्हटली कीं तंटा, व तंटा आला कीं मोजणी आली, अशी ही सांखळी आहे. या मोजणींत त्रिपार्श्वकोनमापका (प्रिझ्मॅटिक कॉम्पस)चाहि फार उपयोग होतो.

२. 'प्लेन टेबल' मोजणी—गांवच्या शिवाराच्या बाहेरच्या हद्दी कोनमापका( थिओडोलाइट )च्या साहाय्यानें पक्क्या झाल्यावर आंतील तुकड्यांची मापणी 'प्लेन टेबल'नें फार त्वरित व प्रत्यक्ष जागेवर नकाशा तयार करून करतां येते.

३. दुर्बीण मोजणी—वरील दोन प्रकारांत सांगितल्याप्रमाणें जमिनीचें क्षेत्रफळ म्हणजे लांबीचीं व रुंदीचीं मापें कळतात. परंतु जमिनीचा उंच-सखलपणा पाहण्यास दुर्बीण मोजणीची आवश्यकता असते. याचें साधन म्हणजे दुर्बीण व वेधकाठी ( स्टाफ ). दुर्बिणीच्या साहाय्यानें प्रत्येक ठिकाणीं एक काल्पनिक पातळी निर्माण करतां येते व जरूर त्यां त्या स्थळीं या पातळीखालीं जमीन कशी आहे हें काटीचीं मापें घेऊन काढतां येतें. या पाहणीची मूळ कल्पना लक्षांत ठेवण्यास अत्यंत सोपें उदाहरण म्हणजे एखादें भरलेलें तळें. तळ्यांतील जलपृष्ठभाग हीच काल्पनिक पातळी समजल्यास तळ्याचा तळ हा कमी-अधिक पाण्याच्या खोलीवरून आपणांस ठरवतां येतो. तद्वतच काटीच्या उंचीवरून जमिनीचा चढउतार मापतां येतो.

आधुनिक कोणतेंहि बांधकाम करण्यापूर्वी जमिनीचा चढउतार मापून त्याचा नकाशा तयार करतात व त्यावरूनच प्रत्यक्ष काम आंखून तें पूर्ण करतां येतें.

४. कोनमापक ( थिओडोलाइट ) निरीक्षण—'थिओडोलाइट' या यंत्रानें पृष्ठपातळींतील कोन, तसेंच लंब पातळींतील कोन मोजतां येतात. या मूलभूत कोनमापनानें त्रिकोणमितीच्या साहाय्यानें सर्व जगाचा अति सूक्ष्म नकाशा तयार करणें शक्य झालें आहे.

५. नाविक( नॉटिकल ) निरीक्षण—नौकानयनासाठीं अथवा संग्रामकार्यांत पाणबुडीचा संचार निर्वेध व्हावा म्हणून सागराच्या तळाचें यथातथ्य चित्र ठाऊक असणें जरूर आहे. ज्याप्रमाणें दुर्बिणीच्या साहाय्यानें जमिनीचा उच्चनीचपणा दाखविणारी रूपरेखाकृति ( कांटूर मॅप ) काढतात त्याचप्रमाणें ठाव ( साउंडिंग ) घेऊन सागरतलदर्शक नकाशा तयार करतां येतो. जलपृष्ठावरून जहाजें हाकारून व त्यावरून ठिकठिकाणीं पाण्याची खोली ( तार किंवा सांखळी याच्या शेवटास वजन बांधून ) मापून जलपृष्ठाखालची आकृति ( कांटूर मॅप ) काढतां येते. त्यावरून समुद्र कोठें किती खोल आहे, मध्यंतरीं कोठें अटथळा आहे हें समजतें व नौकानयन सुकर होतें.

६. वैमानिक ( एअरोनॉटिकल ) निरीक्षण—आकाशात वायुलहरी कशा उठतात, त्याचप्रमाणें कमीअधिक उष्णतामान कसें आहे, हें दाखविणारे नकाशे तयार करण्यासाठीं या मोजणीचा उपयोग होतो. ठिकठिकाणीं वेधशाळा उभारून अति सूक्ष्म यंत्राच्या साहाय्यानें वायुमापन करून नकाशे तयार करतां येतात. या मोजणीचा उपयोग पाऊसकाळ अजमावण्यास तसेंच हिमलहरी येऊन पिकाची नासाडी होईल किंवा कसें याचें अनुमान करण्यास होतो. विमानाच्या निर्वेध संचारासाठीं या मोजणीचा अत्यंत उपयोग होतो, हें निराळें सांगणें नको.

७. ज्योतिष निरीक्षण—अति लहान व अति प्रचंड अशा दुर्बिणीच्या उपयोगानें आकाशस्थ तारकांचे व ग्रहांचे वेध घेऊन सारण्या तयार करतां येतात. याचाहि उपयोग नौकानयनास व विमानोड्डाणास होतो.

**निरीक्षणयंत्र**—( थिओडोलाइट ). कोनमापकयंत्र. हें एक क्षेत्रमापन करण्याचें यंत्र असून त्याला अंशभाग पाडलेलीं परस्परांशीं काटकोन करणारीं दोन वर्तुळें बसविलेलीं असतात. या यंत्राच्या साहाय्यानें क्षितिजसमांतर व लंबरूप पातळींतील कोनांचें सूक्ष्म मापन करतां येतें. उभ्या व आडव्या वर्तुळांच्या मध्याशीं जोडून एक दुर्बीण बसविलेली असते व तिला दोन सूक्ष्ममानमापक ( व्हर्निअर ) जोडलेले असतात. हें यंत्र एका खालीं मळसूत्र ( स्क्रू ) असलेल्या बैठकीवर बसविलेलें असून त्या मळसूत्राच्या साहाय्यानें तें समपातळींत ठेवतां येतें. या यंत्रानें विशेषतः क्षितिजसमांतर पातळींतील कोन जास्त बिनचूक रीतीनें मोजतां येतो व त्यावरच जमिनीची मोजणी विशेष अवलंबून असते. या यंत्राचे वाय, एव्हरेस्ट, व चल ( ट्रँन्झिट ) असे तीन प्रकार आहेत. जर्मनी व इतर कांहीं देशांत वक्रीभवनात्मक व चल निरीक्षणयंत्राचा क्षेत्रमापनाकडे उपयोग करतात.

**निरुक्त**—एक वेदांग. निरुक्त ग्रंथाचे बारा अध्याय आहेत. दोन अध्याय अपुरे असल्यामुळें कोणी तेरा आहेत असेंहि मानतात. १ नाम ( नामें व सर्वनामें ), २ आख्यात ( क्रियापदें ), ३ निपात ( अव्यय ), आणि ४ उपसर्ग, असे एकंदर चार भाग सर्व शब्दांचे ( पदजातांचे ) यास्काचार्यांनीं केले आहेत. याप्रमाणें शब्दांचे भेद सांगून, वैदिक मंत्रांतील पदांचा अर्थ व त्यांचा हेतु हीं सांगितलीं आहेत. मंत्रवाक्याचा अर्थ समजून यथाविधि अनुष्ठान होण्यास हें सर्व ज्ञान अवश्य आहे. अनुष्ठानमंत्रांतील पदांचा विशेष अर्थ कसा झाला, हें यास्कांनीं व्याकरणाच्या नियमान्वयें आणि वेदांच्या ब्राह्मणग्रंथवाक्यांच्या आधारानें सिद्ध केलें आहे. वेदांतील शब्दांचें विशेष अर्थांचें निर्वचन या ग्रंथांत केलें आहे, म्हणून यास निरुक्त असें म्हणतात. निघंटु पाहा.

**निरोधन**—( रिस्ट्रेंट ). कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, ( अ ) विवाह, ( आ ) व्यापार, व ( इ ) फिर्याद या तीन बाबतींत कायद्यानें निर्बंधाने व्यक्तीची मोकळीक नसणे. परंतु या तिन्ही बाबतींत कांहीं निर्बंध कायदेशीर व कांहीं

नियंत्रणे बेकायदेशीर असें कायद्यानें ठरविलेलें आहे. उदा., एखाद्यानें आपल्या मृत्युपत्रांत अ या इसमाला एक देणगी अनें विवाह मुळींच केला नाहीं तर त्याला मिळावी अशी शर्त घालून दिली असेल तर ती शर्त बेकायदेशीर आहे आणि सदर देणगी अला त्यानें विवाह केला तरी मिळूं शकते, असा कायदा आहे. उलटपक्षीं एखादी मिळकत किंवा फंड अला त्याच्या हयातीपर्यंत किंवा तो विवाह करीपर्यंत मिळावी अशी शर्त असल्यास ती शर्त कायदेशीर आणि योग्य मानली जाते आणि त्यामुळें अनें विवाह केल्याबरोबर त्याचा त्या मिळकतीवरील हक्क नाहींसा होतो. (आ) व्यापारी लोकांत एखाद्या धंद्याचें नांव (गुडविल) विकतांना किंवा व्यापारी नोकरींत नोकर नेमताना कांहीं शर्ती घालण्यांत येतात. जर अशा शर्तीनीं घातलेलें नियंत्रण मुदतीसंबंधींचें व क्षेत्रासंबंधींचें असून तें सर्वसामान्य रयतेला अपायकारक नसेल आणि न्यायदृष्टीनें योग्य असेल तर ती नियंत्रणविषयक शर्त कायदेशीर आणि कायदेकोर्टांमार्फत अमलांत आणण्यास योग्य मानली जाते.

**निर्गुंडी**—हीं झाडें सर्वत्र होतात. याच्या साधी व कात्री अशा दोन जाती आहेत. कात्री निर्गुंडीचीं फळें निळ्या रंगाचीं व पानें कातरल्यासारखीं असतात. साध्या निर्गुंडीस पांढरीं बारीक फुलें येतात. एक काळी निर्गुंडीहि आहे. रानटी निर्गुंडीस वणई म्हणतात. निर्गुंडी औषधी आहे. पानें कृमिनाशक असतात. फुलेंहि कंडू, सूज, वायु, इ. वर उपयुक्त आहेत. पोटांत वात धरतो त्यावर रस देतात.

**निर्जीव (प्राणि) शरीरमंडन**—(टॅक्सिडर्मी). पेंढा भरणें. मृत प्राण्याचें शरीर तो जिवंत दिसेल अशा रीतीनें त्याच्या कातड्यांत कांहीं वस्तू भरून तयार करणें, त्याचें संरक्षण करणें, या क्रियेस हें नांव आहे. ही एक कला आहे. या कलेची उत्पत्ति अगदीं अर्वाचीन असून गेल्या २०० वर्षांत झालेली आहे. शिकारी लोकांना या गोष्टीची जरूरी भासल्यानें ही कला पुढें आली. अलीकडे मृत प्राण्याच्या शरीरांत प्रत्यक्ष पेंढा वगैरे भरून ठेवीत नाहींत, तर एखाद्या हलक्या पदार्थाची त्या प्राण्याची प्रत्यक्ष आकृतिच तयार करतात व तीवर त्याचें चामडें मोठ्या कौशल्यानें व काळजीपूर्वक बसविण्यांत येतें. त्याचा जबडा एखाद्या शाडूसारख्या नरम पदार्थाचा बनविण्यांत येतो, आणि त्याच्या डोळ्यांत कांचेचे डोळे बसविण्याच्याऐवजीं ते रंगानें हुबेहुब काढण्यांत येतात. अलीकडे प्राणिसंग्रहालयांतून असा संरक्षित प्राणी मांडून ठेवतांना त्याच्याभोंवतीं एक प्रकारची नैसर्गिक सृष्टिरचना करण्यांत येते. त्यामुळें तो प्राणी अधिक खरा व जिवंत आहे असा दिसतो.

**निर्धारक**—(डिटरमिनंट्स). एकपदी समीकरणें सोडवितांना उत्तरें मांडण्यासाठीं उपयोगांत आणली जाणारी एक गणितपद्धति.

$$अ_1 क्ष + ब_1 य + क_1 = 0$$
$$अ_2 क्ष + ब_2 य + क_2 = 0$$

हीं समीकरणें पहिल्यास $ब_2$ नें गुणून व दुसऱ्यास $ब_1$ नें गुणून, नंतर वजाबाकी करून य काढून टाकल्यास खालील समीकरणें येतात—

$$क्ष = \frac{ब_1 क_2 - ब_2 क_1}{अ_1 ब_2 - अ_2 ब_1}$$

त्याप्रमाणेंच

$$य = \frac{क_1 अ_2 - क_2 अ_1}{अ_1 ब_2 - अ_2 ब_1}$$

हे गुणाकार दोन समांतर रेघा व मध्ये रांगा ठेवून मांडण्याची पद्धत आहे; जसें,

$$अ_1 ब_2 - अ_2 ब_1 = \begin{vmatrix} अ_1 & ब_1 \\ अ_2 & ब_2 \end{vmatrix}$$

अ, ब हीं अक्षरें पुढें १, २ प्रत्यय लावून लिहिलीं आहेत. प्रत्ययाचा क्रमभंग १, २ ऐवजीं २, १ आला कीं उणें चिन्ह येतें.

अशा पद्धतशीर मांडणीस निर्धारक म्हणतात.

तिसऱ्या पद्धतीचा निर्धारक—

$$\begin{vmatrix} अ_1 & ब_1 & क_1 \\ अ_2 & ब_2 & क_2 \\ अ_3 & ब_3 & क_3 \end{vmatrix}$$

यांत $अ_1 ब_1 क_1$ ही रांग, व $अ_1$ $अ_2$ $अ_3$ हा स्तंभ

रांगा किंवा स्तंभ यांनीं बनलेली ही मांडणी आहे.

$अ_1 ब_2 क_3$ या गुणाकारांतील अक्षरांचा प्रत्ययांत क्रमभंग करून ६ गुणाकार येतील. एखाद्या गुणाकारांत एक क्रमभंग केला कीं उणें चिन्ह यावयाचें. जसें—

$अ_1 ब_3 क_2$ पदाचें चिन्ह उणें यावयाचें व पहिलीं दोन पदें $अ_1 ब_2 क_3 - अ_1 ब_3 क_2$.

$अ_2 ब_1 क_1$ चें चिन्ह उणें व $अ_3 ब_1 क_2$ चें चिन्ह अधिक.

पुढचीं दोन पदें $अ_3 ब_1 क_2 - अ_3 ब_1 क_2$

त्याप्रमाणेंच पुढचीं दोन $अ_2 ब_3 क_1 - अ_3 ब_2 क_1$.

उच्च बीजगणित, भुज (कोऑर्डिनेट) भूमिति व गणितशास्त्रांतील इतर शाखा यांतून या निर्धारक पद्धतीचा फार उपयोग होतो.

**निर्धूम स्फोटक**—( कॉर्डाइट ). बिनधुराची ही बंदुकीची दारू एका ऑर्डिनन्स कमिटीनें १८९१ त शोधून काढली. नायट्रो ग्लिसरीन ( ५८ टक्के ), गन-कॉटन ( ३७ टक्के ) आणि व्हॅसलीन ( ५ टक्के ) यांपासून हा तयार केलेला असतो. दुसऱ्या एका प्रकारांत नायट्रो-ग्लिसरीनचें प्रमाण ३० च्या खालीं असतें; पण त्याबरोबर गन-कॉटनचें प्रमाण वाढलेलें असतें. कॉर्डाइट भिजलें असलें, तरी त्याचा उपयोग करतां येतो. त्याच्या बाबतींत मुख्य अडचण अशी आहे कीं, त्याचा स्फोट करणें तितकेंसें सोपें नाहीं. त्याला पेटविण्यासाठीं काळ्या दारूची पूड काडतुसांत घालावी लागते. उघड्या हवेवर कॉर्डाइट अगदीं शांतपणानें जळतें.

**निर्बिंदुता**—( ॲस्टिग्मॅटिझम ). या रोगाला दृष्टिवैषम्य, नेत्रावरोध, दृष्टिलोप, वक्रदृष्टि असेंहि म्हणतात. मनुष्याच्या डोळ्याच्या बुबुळास जन्मतःच किंवा त्यानंतर एखाद्या अपघातानें इजा झाल्यामुळें त्याचा आकार बदलून किंवा त्याची वाढ अपूर्ण होऊन त्यामुळें जेव्हां मनुष्यास सर्व वस्तू अस्पष्ट दिसूं लागतात, त्यास निर्बिंदुता म्हणतात. याचें कारण मनुष्याचा पारदर्शक बुबुळ बरोबर गोलाकार नसतो व त्याची वक्रता सर्वत्र सारखी नसून निरनिराळ्या दिशांकडे निरनिराळी असते हें होय. सामान्यतः प्रत्येक मनुष्यामध्यें थोडेंफार दृष्टिवैषम्य असतेंच; परंतु तें अधिक प्रमाणांत असल्यासच मनुष्यास त्याची जाणीव होते. हा दोष दूर करण्याकरितां विशेष प्रकारचीं भिंगें वापरण्यांत येतात. सामान्यतः एका बाजूस सपाट व दुसऱ्या बाजूस अंतर्गोल किंवा बाह्यगोल भिंगें वापरून हा दोष दूर करतां येतो.

**निर्भयस्थानाचा हक्क**— ( राइट ऑफ सँक्चुअरी ). ज्या ठिकाणीं राहिलें असतां गुन्हेगाराविरुद्ध कायद्याची सामान्य अमलबजावणी होऊं शकत नाहीं, त्या ठिकाणांना 'सँक्चुअरी' ( निर्भय आश्रयस्थान ) म्हणतात. ख्रिस्ती धर्मसुधारणा ( रिफॉर्मेशन ) होण्यापूर्वीं इंग्लंडांतील ख्रिस्ती मठांत (मोनेस्टरी) गुन्हेगार इसम राहूं लागला, तर अशा पवित्र ठिकाणीं राहणाऱ्या इसमाला त्यानें गुन्हा केलेला असला तरी कायद्यापासून त्याचा बचाव होत असे. १६९७ सालीं हीं आश्रयस्थानें रद्द करण्यांत आलीं.

**निर्मल पंथ**—निर्मल व अकाली हे दोन्ही शीख धर्मातील उपपंथ गुरु गोविंदसिंग याच्या वेळीं निघाले. हे निर्मल साधू प्रथम शुभ्र वस्त्रें परिधान करीत असत व हिंदु धर्मग्रंथाचाच अभ्यास करीत. त्यामुळें शीख धर्माशीं त्यांचा संबंध कमी झाला. पुढें ते भगवीं वस्त्रें वापरून व भिक्षा मागून निर्वाह करूं लागले. निर्मल साधूंचा पंथ फार व्यवस्थित वागणारा असून पूज्य मानला जातो. त्यांच्या प्रत्येक मठावर मुख्य अधिकारी गुरु असतो. या पंथाचा मुख्य आखाडा हरिद्वार येथें आहे व त्याशिवाय अमृतसरमध्यें व पंजाबांतील इतर ठिकाणींहि निर्मल साधूंचे मठ आहेत.

**निर्मळ**— १. हैद्राबाद संस्थानामधील आदिलाबाद जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ४८० चौरस मैल. लोकसंख्या ( जहागिरी धरून ) सु. साठ हजार. यांत निर्मळ हा एक गांव असून १८८ खेडीं आहेत व १५ जहागिरी आहेत. येथें तांदुळाचें उत्पन्न भरपूर होतें. गोदावरी नदी ह्या तालुक्याच्या दक्षिण सीमेवरून वाहते. निर्मळ गांवाभोंवतीं तट आहे. लोकसंख्या दहा-बारा हजार. याच्या भोंवतालच्या टेंकड्यांवर लहान लहान किल्ले आहेत. मोठा किल्ला शहराच्या मध्यभागीं असून आंत मोडकळीस आलेला राजवाडा आहे.

२. मुंबई इलाखा, ठाणें जिल्हा. हें गांव वसईच्या उत्तरेस ६ मैलांवर आहे. हें पूर्वी बंदर होतें. येथून एक मैलावर सोपारें हें प्राचीन प्रसिद्ध बंदर आहे. निर्मळ हें अत्यंत पुण्यस्थान समजलें जात असून येथें एक लिंग आहे. निर्मल व विमल नांवाच्या राक्षसांस परशुरामाने येथें मारलें असें सांगतात. विमल आणि निर्मल अशीं येथील दोन तीर्थें पोर्तुगीजांनीं भ्रष्ट केलीं होतीं; तीं सुभेदार शंकराजी केशव फडके यानें शुद्ध करून घेऊन येथें घाट व आणखी देवळें बांधिलीं. येथें शंकराचार्यांची समाधि जी दाखवितात ती नुसती प्रतीकात्मक असेल; कारण पहिले शंकराचार्य काश्मीरांत निधन पावले. किंवा दुसऱ्या कोणा शंकराचार्यांचीहि असेल. ही समाधि गांवाजवळ उंच टेंकडीवर आहे. वर जाण्यास पायऱ्या आहेत. येथें कार्तिक वद्य एकादशीस मोठी जत्रा भरते. जत्रेस हिंदू, पारशी, मुसलमान, ख्रिश्चन, इत्यादि सर्व धर्मांचे लोक येतात.

**निर्वाण**—ही बौद्ध धर्मग्रंथांतली संज्ञा असून तिचा अर्थ मोक्ष, मुक्ति असा आहे. शाक्यमुनीच्या उपदेशांतील मुख्य सार 'निर्वाणप्राप्ति' हें आहे. बौद्ध ग्रंथांत निर्वाणासंबंधीं सुबोध विवरण कोठेंच आढळत नाहीं. हिंदुधर्माच्या संस्कृत ग्रंथांत मोक्ष शब्दाचा जन्ममरणापासून सुटका आणि जीवात्म्याचें परमात्म्यांत म्हणजे ब्रह्मांत विलीनीकरण असा अर्थ दिला असून ब्रह्म याची कल्पना अनेक विशेषणें लावून स्पष्ट केली आहे. निर्वाणप्राप्ति हीहि अत्यंत आनंदमय स्थिति असते, असें बौद्ध ग्रंथांत सांगितलें आहे. पण ही निर्वाणप्राप्ति मनुष्याला मृत्यूनंतर होते असें नसून जिवंतपणींच प्राप्त होऊं शकते, असेंच बौद्ध मत असल्यामुळें ब्रह्म व निर्वाण या गोष्टी निराळ्या असाव्यात.

**निर्वात नळी**—निर्वात नलिका ही एक कांचेची नळी असून तिच्यामध्यें दोन विद्युत्ध्रुव बसविलेले असतात आणि ती वाताकर्ष यंत्राशीं जोडतां येईल अशी योजना केलेली असते. जेव्हां अशा एका लांब निर्वात नलिकेंतील विद्युत्ध्रुव एका

विद्युत्प्रवर्तक तारेच्या वेष्ठनाशीं जोडले जातात तेव्हां त्या नळींत सामान्य दाबाची हवा असल्यास ती हळूहळू काढून टाकून ती नळी निर्वात करीत असतां निरनिराळ्या तऱ्हेचे प्रकाश दृष्टीस पडतात. *या नळीमध्यें हवेचा दाब वातावरणाच्या दाबाच्या* $\frac{१}{८}$ पेक्षां अधिक खालीं जात नाहीं तोंपर्यंत विद्युत्स्फुलिंग पडत नाहीं. जेव्हां नळींतील हवेचा दाब पाऱ्याच्या एक सेंटिमीटर इतक्या उंचीचा असतो त्या वेळीं त्यां नळींतील प्रकाश अतिशय दैदीप्यमान असतो. हा दाब जसजसा *अधिकाधिक कमी करण्यांत यावा तसतसा हा प्रकाशाचा स्तंभ* किंवा धन प्रकाश ऋण ध्रुवापासून दूर दूर जाऊं लागतो आणि त्याचे निरनिराळ्या थरांमध्यें विभाग पडतात. हा धनप्रकाशस्तंभ आणि ऋण ध्रुवाशीं दिसणारा निळसर प्रकाश अथवा ऋण प्रकाश या दोहोंच्या दरम्यान कांहीं काळी जागा अथवा अवकाश दिसतो, *यास फॅरडे याचा काळा अवकाश* असें म्हणतात. तसेंच ऋण ध्रुवाच्या सभोंवतीं एक काळ्या प्रकाशाचा थर अथवा काळा अवकाश जमतो यास क्रूक्सचा काळा अवकाश म्हणतात. प्रत्यक्ष ऋण ध्रुवाशीं एक चकचकीत प्रकाशाचा थर असतो. या वेळीं हवेचा दाब एक मिलिमीटर पारदस्तंभाएवढा असतो. यापेक्षां अधिकाधिक दाब कमी करीत गेलें असतां धन प्रकाशस्तंभ अदृश्य होतो व ऋण प्रकाश ऋण ध्रुवाजवळ सर्व नळीभर पसरतो; आणि क्रूक्सचा काळा अवकाश नळीच्या बाजूकडे वाढूं लागतो व नळीच्या कडा फिकट हिरव्या रंगामध्यें चकाकूं लागतात. या वेळीं हवेचा दाब $\frac{१}{१०}$ मिलिमीटर असतो. यापेक्षां अधिक निर्वातता उत्पन्न केल्यावर क्रूक्सचा काळा अवकाश अधिक वाढतो आणि नळीच्या कडा किंवा बाजू अधिकाधिक चकाकूं लागतात. या वेळीं हवेचा दाब $\frac{१}{१०००}$ मिलिमीटर असतो. यानंतर नळींतील वायूची विद्युद्वाहकता कमी कमी होऊं लागते. अखेरीस नळींतील दाब $\frac{१}{२००००}$ मिलिमीटर झाला म्हणजे निर्वात प्रदेशामध्यें विद्युद्वाहकता नाहींशी होते आणि विद्युत्प्रवाह व प्रकाश बंद होतात.

या नळींतील विद्युद्वहन प्रमाणपद्धतीनें होतें. क्रूक्स यानें असें दर्शविलें कीं, जेव्हां क्रूक्सची नळी चकाकत असते तेव्हां विद्युत्प्रवाहाबरोबर ऋण ध्रुवापासून एक उत्सर्जक द्रव्याचा प्रवाह चालू असतो. या उत्सर्जक द्रव्याच्या कणास आतां विद्युत्कण असें म्हणतात. या विद्युत्कणांच्या प्रवाहाबरोबरच धन ध्रुवाकडून धनविद्युद्भारयुक्त वायूच्या कणांचा प्रवाह निघत असतो. यांची गति विद्युत्कणांच्या मानानें फारच अल्प असते. परंतु चुंबकीय आणि स्थिर वैद्युतीय क्षेत्राच्या साहाय्यानें त्यांच्या गतीची दिशा बदलतां येते. यास धनकिरण अथवा कॅनॉलकिरण असें म्हणतात. धनविद्युद्भारयुक्त अणूंचा ऋण ध्रुवावर जो आघात होतो त्याच्या योगानें विद्युत्प्रवाह सुरू होतो असें दिसतें.

**निर्वासित**—निराश्रित. १९१४ ते १९१८ चें पहिलें महायुद्ध *झाल्यापासून आणि कित्येक देशांत राजकीय आणि वांशिक* मतभेदाकरितां छळ करण्याचें धोरण सरकारनें स्वीकारल्यामुळें हा निराश्रितांचा प्रश्न जगांत फारच महत्त्वाचा व वाढत्या प्रमाणावर निर्माण झाला आहे. पहिल्या महायुद्धानंतर तुर्कस्तानांतून बाहेर पडणाऱ्या रशियन, आर्मेनियन आणि ग्रीक निराश्रित लोकांची *पहिली लाट उसळली.* या निराश्रितांत ३० लाख श्वेत रशियन होते. त्यांपैकीं पुष्कळ निराश्रित पोलंडांत आणि चीन देशांत स्थायिक झाले; सुमारें ७०,००० फ्रान्समध्यें स्थायिक झाले आणि बाकीचे जगांतील इतर देशांत पसरले. तीन लाख आर्मेनियन निराश्रित लोक पूर्व युरोपांतील देशांत स्थायिक झाले आणि १९२३ सालीं तुर्कस्तानांतून हद्दपार केलेले ग्रीक निराश्रित ग्रीक देशांत स्थायिक झाले; आणि या उलट राष्ट्रसंघाच्या मध्यस्थीनें ग्रीसमध्यें राहत असलेले तुर्क लोक तुर्कस्तानांत पाठवण्यांत आले. निराश्रितांची दुसरी लाट जर्मनींत नाझी पक्ष १९३३ सालीं अधिकारारूढ झाल्यावर उद्भवली. सुमारें साडेतीन लक्ष निराश्रितांना जर्मनी आणि ऑस्ट्रिया सोडून बाहेर पडावें *लागलें; त्यांपैकीं सुमारें* ३ लाख ज्यू होते; ३०,००० आर्येतर ख्रिस्ती होते; आणि बाकीचे सोशॅलिस्ट, कम्यूनिस्ट, डेमोक्रॅट, मॉनर्किस्ट आणि कॅथॉलिक होते. १९३९ सालीं जर्मनीनें झेकोस्लोव्हाकिया काबीज केला तेव्हां निराश्रितांची आणखी एक लाट उत्पन्न झाली, आणि सुमारें २५,००० निराश्रित तो देश सोडून पश्चिम युरोपांत आणि अमेरिकेंत गेले.

हा निराश्रितांचा प्रश्न अधिक कठिण होण्याचें कारण असें कीं, जर्मनीनें हद्दपार केलेले निराश्रित जर्मनीनें त्यांची सर्व मिळकत लुबाडल्यामुळें अगदीं निर्धन स्थितींत जर्मनींतून बाहेर पडले. मध्य युरोपांतून बाहेर गेलेले निराश्रित मुख्यतः अमेरिकेंत (सं. संस्थानांत) गेले. कारण सदर देशानें दरसाल ३०,००० निराश्रितांना आपल्या देशांत कायमचा आश्रय देण्याचें मान्य केलें होतें. सुमारें १,०८,००० निराश्रित पॅलेस्टाइनमध्यें गेले. ८०,००० निराश्रित ग्रेट ब्रिटनमध्यें समाविष्ट झाले; आणि बाकीचे इतर अनेक देशांत गेले.

या निराश्रितांची व्यवस्था पाहण्याकरितां राष्ट्रसंघानें एक हायकमिशनर नेमला होता; तो लंडनमध्यें राहून निराश्रितांची काळजी घेणाऱ्या संस्थांवर देखरेख करीत असे.

जर्मनीमधून जे निराश्रित बाहेर पडले त्यांनीं निरनिराळ्या देशांत स्थायिक झाल्यावर स्वावलंबनानें पुष्कळ नवे नवे उद्योगधंदे सुरू केले. या कामांत आइनस्टीन, फ्रूड, ब्रुनोवॉल्टर,

बुश, आणि एलिझाबेथ बर्गनर या शास्त्रज्ञांनीं आणि कलावंतांनीं बहुमोल मदत केली.

स्पेनमधील यादवी युद्ध संपल्यानंतर पुन्हां निराश्रितांची आणखी एक लाट उसळली. त्या वेळीं ३,५०,००० निराश्रित स्पेनमधून बाहेर पडले; आणि त्यांपैकीं बहुतेक निराश्रित फ्रान्समध्यें स्थायिक झाले, आणि कांहीं थोडे मेक्सिकोंत जाऊन राहिले. जर्मनीनें पोलंडवर स्वारी केल्यावर ५०,००० निराश्रित रुमानियांत आणि हंगेरींत जाऊन राहिले. १९४० सालीं जर्मन सैन्य हॉलंड, बेल्जम व फ्रान्स या देशांत घुसल्यावर पुष्कळ निराश्रित या तीन देशांतून बाहेर गेले. जपाननें चीनवर स्वारी केल्यावर १ कोटी निराश्रित चीनमधून घरदार सोडून बाहेर पडले.

प्रे. रूझवेल्टच्या सूचनेवरून १९३८ सालीं स्वित्झर्लंडमध्यें एव्हियन या गांवीं एक आंतरराष्ट्रीय परिषद् या निराश्रितांच्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां भरली आणि तेथें एव्हियन कमिटी स्थापन करण्यांत आली. त्या कमिटीनें निराश्रितांना आपली मालमत्ता बरोबर नेण्यास परवानगी असावी असें जर्मन सरकारला कळवलें, पण ती विनंति जर्मनीनें मानली नाहीं. आतां संयुक्तराष्ट्रसंघानें निर्वासितांना साहाय्य देण्यासाठीं एक आंतरराष्ट्रीय निर्वासित मंडळ स्थापन केलें आहे.

हिंदुस्थानांत निर्वासितांचा प्रश्न जो उद्भवला आहे तो महायुद्धामुळें नसून हिंदुस्थानच्या १९४७ सालीं झालेल्या फाळणीमुळें होय. पश्चिम पंजाब, पूर्व बंगाल आणि सिंध या पाकिस्तानच्या मुलखांतून लाखों हिंदू छळाच्या भीतीमुळें व प्रत्यक्ष छळ झाल्यामुळेंहि बहुधा नेसत्या वस्त्रांनिशीं बाहेर पडले व हिंद संघराज्यांत आले. त्यांची राहण्याची व खाण्यापिण्याची व्यवस्था मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांस अतोनात खर्च करून करावी लागली व अद्यापिहि त्यांचा जम बसला नाहीं. पूर्व पंजाब प्रांतांत चाळीस लक्ष हिंदू आणि शीख निर्वासित पश्चिमेकडून आले. त्यांची व्यवस्था अमृतसर, गुरुदासपुर, जालंदर, लुधियाना, इ. ठिकाणीं छावण्या करून कशीबशी करण्यांत आली. दिल्लीला आलेले निर्वासित कुरुक्षेत्राच्या छावणींत ठेवले. आतां दिल्लीजवळ 'राजेंद्रनगर' आणि 'पटेलनगर' अशीं दोन नगरें केलीं आहेत.

मुंबई प्रांतांतच २,५८,००० निर्वासित आहेत. यांपैकीं ३५,००० कुटुंबांना सरकारतर्फे मोफत शिधा इत्यादि सवलती मिळतात. सुमारें १०,००० कुटुंबांना राहण्यास जागा व १५०० लोकांना सरकारनें व्यवसाय मिळवून दिला. या निर्वासितांची पाकिस्तानमध्यें राहिलेली मालमत्ता सुमारें ५० कोटींची असेल. विसापूर, कल्याण (उल्हासनगर), पुणें (पिंपरी), यांसारख्या ठिकाणीं त्यांची व्यवस्था केली आहे. या निर्वासितांची व्यवस्था लावण्यासाठीं स्वतंत्र अधिकारी नेमले आहेत व नोकऱ्यांतून त्यांना प्रथम घेतलें जातें. निर्वासितांच्यावर फार मोठी आपत्ति ओढवली आहेच पण त्यांच्यामुळें त्यांच्या आश्रयदात्या प्रांतांवरहि मोठी जबाबदारी व संकट आलें आहे खरें.

**निवडणूक**—राज्यशास्त्रांत मत देण्याचा हक्क असलेल्या इसमांनीं आपलें मत कळवून एका इसमाला किंवा अनेक इसमांना एखाद्या हुद्यावर किंवा अधिकारावर नेमणें या पद्धतीला निवडणूक म्हणतात. ब्रिटनमध्यें या निवडणुकीचे मुख्य दोन प्रकार असतात: पार्लमेंटची निवडणूक आणि म्युनिसिपालिट्यांची निवडणूक. या दोन्ही निवडणुकींत १८७२ पासून गुप्तमतदानपद्धति योजण्यांत येऊं लागली. १८८३ सालीं व पुढें दरसाल मंजूर होणाऱ्या कायद्यानें निवडणुकींत लबाडी करणें, लांच देणें, तोतयेगिरी करणें, किंवा गैरवाजवी वजन मतदारांवर घालणें, या गुन्ह्यांना सक्त मजुरीची कैद ही शिक्षा आहे. याच कायद्यानें उमेदवारानें आपल्याला मदतगार किती इसम घ्यावे, वाहनाचा किती उपयोग करावा, वगैरेसंबंधीं निर्बंध घालण्यांत आले. १९१८ सालच्या रिफॉर्म ॲक्टानें पार्लमेंटच्या निवडणुकीच्या मोहिमेंत कमाल खर्च परगणा मतदार संघांत प्रत्येक मतदाराला ७ पेन्स, आणि नागर मतदार संघांत प्रत्येक मतदाराला पांच पेन्स ठरविण्यांत आला. निवडणुकीचा खर्च निम्मा स्थानिक करांच्या उत्पन्नांतून, आणि निम्मा सरकारी तिजोरींतून करावा असें ठरलें.

हिंदुस्थानांत लोकांना स्थानिक स्वराज्याचे व राज्यकारभाराचे हक्क मिळाल्यापासून निवडणुकीचा प्रकार सुरू झाला. निवडणुकीचे नियम इंग्लंडांतील नियमांना धरूनच केले गेले. निवडणुकींत दोष राहूं नयेत म्हणून हिंद सरकारनें एक कायदाहि केला.

निवडणुकीबाबत गुन्ह्यांचा कायदा—या कायद्याचा उद्देश हा आहे कीं, कौन्सिलें, लोकल बोर्ड व म्युनसिपालिट्या, तसेंच ज्या संस्थांची सभासदनिवड निवणुकीनें व्हावी असें सरकारी कायद्यांनीं ठरविलें आहे त्या संस्था यांमध्यें सभासद-निवडणुकीच्या बाबतींत जे गुन्हे होतात त्यांना शिक्षा करणें, आणि अशा खटल्यांचें कामकाज चालविण्याचे नियम करणें. या गुन्ह्यांचा तपशील पीनल कोड कलमें १७१ ए ते आय् या कलमांत दिला आहे. निवडणुकींत मत मिळावें म्हणून जो इसम मतदारांना लांच देतो, किंवा जो इसम मत देण्याकरितां लांच घेतो, ते इसम लांचलुचपतीचे गुन्हेगार होत. लांच देण्याघेण्याचा प्रयत्न करणें किंवा कबूल करणें, हाहि गुन्हा आहे (१७१ बी). जो इसम उमेदवाराला किंवा मतदाराला धमकी देतो, किंवा देवतेची अवकृपा होईल किंवा भूतखेताची बाधा होईल असें

सांगून मन वळवतो किंवा प्रयत्न करतो, तो इसम गैरवाजवी वजन घालण्याचा गुन्हा करतो (१७१ सी). जो इसम कोणा जिवंत किंवा मृत इसमाचें नांव किंवा काल्पनिक नांव सांगून मत देतो किंवा मतदानपत्रिका घेतो, किंवा एकदां मत दिलें असून पुन्हां मतपत्रिका मागतो तो इसम तोतयेगिरीच्या गुन्ह्यास पात्र होतो (१७१ डी). वरील तिन्ही गुन्ह्यांना एक वर्ष कैद, किंवा दंड, किंवा शिक्षा आहेत. लांच या गुन्ह्यांत सरबराईचा म्हणजे खाद्यपेय पदार्थ, करमणूक यांचा अन्तर्भाव होतो, व त्या गुन्ह्याला फक्त दंडाची शिक्षा आहे. एखाद्या उमेदवाराच्या चारित्र्याबद्दल किंवा वर्तनाबद्दल खोटी माहिती त्या उमेदवाराच्या निवडणुकीवर वाईट परिणाम व्हावा या हेतूनें जो इसम देतो, तो गुन्हेगार होतो (१७१ जी). जो इसम उमेदवारानें तसा लेखी अधिकार दिल्याशिवायच जाहीर सभा भरविण्याच्या, प्रसिद्धिपत्रक काढण्याच्या, किंवा त्या उमेदवाराच्या निवडणुकीबाबत इतर कोणत्याहि कामांत खर्च करतो, किंवा खर्च करण्याचा अधिकार देतो, तो इसम गुन्हेगार होतो; मात्र असा खर्च दहा रुपयांपर्यंत आगाऊ करून नंतर दहा दिवसांच्या आंत त्या खर्चाला उमेदवाराची लेखी मंजुरी मिळविली तर तो गुन्हा होत नाहीं (१७१ एच्). निवडणुकीचा जमाखर्च लिहून ठेवावा असा कायदा असून तसा लेखी जमाखर्च ठेवीत नाहीं, तो इसम गुन्हेगार होतो (१७१ आय्). वरील १७१ जी गुन्ह्याला फक्त दंडाची शिक्षा आहे; आणि १७१ एच् व १७१ आय् या गुन्ह्यांना ५०० रुपयेपर्यंत दंडाची शिक्षा आहे. सदर कायदा १९२० सालीं मंजूर करण्यांत आला.

याप्रमाणें कायदा केला असला तरी हिंदुस्थानांतील बहुजनसमाज अद्यापि चांगला साक्षर आणि लोकशाही राज्यपद्धतीला रुळला नसल्यानें हिंदुस्थानांतील निवडणुकी खरें लोकमत दर्शवीत नाहींत हें खरें. विद्यापीठांतल्यासारख्या चांगल्या सुशिक्षित वर्गांत देखील निवडणुकीबाबत असावा तितका निर्मळपणा दिसत नाहीं.

**निवडुंग**—[ वर्ग कॅक्टासी. इं. कॅक्टस ]. या वर्गांत अनेक जातींचीं झाडें येतात. यांचीं पानें रसभरीत असतात व त्यांवर सूक्ष्म खवले असतात. तसेंच खोडांवर व पानांवर कांट्यांचे पुंजके असतात. यांचें खोडहि मांसल असतें. यांचें मूलस्थान बहुतेकांचें अमेरिका हें आहे. यांची वाढ बहुतेक रुक्ष प्रदेशांत होते.

निवडुंगाच्या कांहीं (युफोर्बिआ) जातींची माहिती पुढें दिली आहे—१ तिधारी निवडुंग (युफोर्बिआ अँटिकोरम)—कुंपणाकरितां याचा उपयोग करतात. २ निवडुंग (यु. नेरिआयफोलिआ)—ही लहान रानटी जात आहे. याचा चीक त्वचेवर लाली आणणारा असून जुलाब होण्याकरितां घेतात व चामखिळीवर लावतात. ३ दुधी निवडुंग (यु. डुलिफेरा)—हीं लहान झाडें उष्ण प्रदेशांत आढळतात. लहान मुलांचा मलाशय व फुप्फुस यांसंबंधीं विकारावर याचा उपयोग होतो. ४ थोर निवडुंग (यु. रायलिआना)—हीं झाडें हिमालयाच्या पायथ्या-

वर आणि डोंगराळ प्रदेशांत होतात. याच्या फांद्या जोमदार व कांटेरी असून ताजा चाक सुगंधी असतो. ५ शेर निवडुंग (यु. रायलीन्स)—हीं झाडें मूळचीं आफ्रिकेंतील असून हल्लीं हिंदुस्थानांत सर्व रुक्ष जमिनींत होतात. याच्या रसाचा उपयोग जुलाबाकरितां व प्रतिदाहोत्पादक म्हणून करतात. हा चीक मातींत मिसळून त्याचा घराचीं छपरें करण्याकडे उपयोग करतात. ६ नागफणा निवडुंग—याचीं फळें खातात आणि कांटे काढून टाकून गुरांच्या खाण्याकडे उपयोग करतात. या फणींतून जे तंतू निघतात त्यांचा कागद तयार करतां येतो.

**निवतीचा किल्ला**—मुंबई प्रांत, कोंकण, मालवणच्या दक्षिणेस ६॥ मैलांवर व वेंगुर्ल्याच्या उत्तरेस ९ मैलांवर कोचरें नांवाच्या खेड्यांत हा किल्ला मोडतो. हा एका लहानशा खाडीच्या मुखाशीं आहे. ज्या टेंकडीवर किल्ला बांधलेला आहे तिची उंची १५० फूट असून वर झाडी आहे. १७८६ त हा कोल्हापूरकरांनीं वाडीकर सांवतांपासून घेतला, पण पुढें तो त्यांस परत दिला. १८०३ ते १८१० पर्यंत वाडीकर सांवत व कोल्हापूरकर यांच्यामध्यें या किल्ल्याबद्दल सारखा झगडा चालू होता पण अखेरीस तो सांवतांकडेच कायम राहिला. १८१९ त कीरनें तो तोफा डागून सांवतांपासून घेतला.

**निवळीची बी**—[ स्ट्रिक्नस पोटाटोरम. इं. क्लीअरिंग नट्]. कुचल्याच्या जातीच्या एका लहान झाडास निवळी किंवा निर्मळी म्हणतात. हीं झाडें हिंदुस्थानांत सर्वत्र होतात. गढूळ पाण्याच्या भांड्यांत या झाडाच्या बिया आंतून घासल्या तर त्या पाण्यांतील सर्व गाळ खालीं बसून पाणी निवळ होतें. या बियांत असलेला

बलक ( अल्ब्यूमिन ) व घनद्रव्य ( केसीन ) यांमध्यें हा गुण आहे असें समजतात.

निवळीचें मूळ कुष्ठाचा नाश करतें. फळांचें नेत्रांजन करतात. डोळयांच्या रोगांवर चीं उगाळून, कापूर, सैंधव, वगैरे घालून तें अंजन घालतात.

**निवृत्तिनाथ** ( १२७३–१२९९ )—एक संतकवि व ज्ञानदेवाचा वडील भाऊ. ह्याचा जन्म आपेगांव येथें झाला. हा आळंदी येथील विठ्ठलपंत नांवाच्या ब्राह्मणाचा पुत्र; आईचें नांव रखमाबाई. विठ्ठलपंत संसार सोडून संन्यास घेऊन काशीस जाऊन राहिला. पुढें एका सत्पुरुषाच्या उपदेशानें पुन्हां घरीं येऊन संसार करूं लागल्यावर त्यास हा व ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई अशीं चार मुलें झालीं. तेव्हां हीं संन्याशाचीं मुलें म्हणून ग्रामवासी ब्राह्मण आपल्या जातींत घेईनात. मुलांच्या मुंजी न होतां ते तसेच वाढूं लागल्यामुळें रखमाबाईस दुःख होऊं लागलें. इकडे विठ्ठलपंत मुलांची काळजी सोडून पुनरपि काशीस जाऊन राहिला. हीं मुलें अलौकिक बुद्धिमान्, सदाचरणी व ईश्वरभक्तिपरायण होतीं. निवृत्तीनें पुढें गहिनीनाथाचा उपदेश घेऊन नाथपंथ स्वीकारला. निवृत्तीनेंच प्रथम आपल्या भावंडांस अध्यात्मविद्या शिकविली. ज्ञानदेव हा त्याचा शिष्य होता. निवृत्तिनाथानें 'निवृत्तिसार' अथवा निवृत्तेश्वरी ग्रंथ व कांहीं काव्य केलें आहे. 'वृत्तिबोध' म्हणूनहि याचा एक ग्रंथ आहे. याची समाधि त्र्यंबकेश्वरीं असून तेथें पौष वद्य ११ स यात्रा भरत असते. त्यानें सन १२९९ त समाधि घेतली. शिंद्यांच्या घराण्यांतील बायजाबाईनें निवृत्तिनाथाच्या या समाधीचा जीर्णोद्धार केला.

**निवेदित-लेखनयंत्र**—( डिक्टेफोन ). हा एक प्रकारचा ग्रामोफोन आहे. याला तबकड्यांऐवजी पूर्वीच्यासारखीं मेणाचीं पंचपात्रें अथवा नळकांडीं असतात; बोलणाऱ्यानें बोललेले शब्द या मेणाच्या नळकांड्यांवर उठतात, नंतर त्या नळकांड्यांवरून लेखकानें ऐकून ते लिहून ठेवावयाचे असतात, किंवा टंकयंत्रानें मुद्रित करावयाचे असतात.

**निवेदिता, भगिनी** ( १८६७–१९११ )— हिंदी संस्कृतीचें श्रेष्ठत्व सर्व जगाला पटवून देणारी हिंदी संस्कृतीची अभ्यासक अशी एक युरोपियन महिला. आयर्लंडमधील धर्मगुरु रेव्ह. एस्. आर्. नोबल यांच्या या कन्या असून यांचें नांव मिस् मार्गारेट नोबल असें होतें. या लंडनमध्यें आपल्या शाळेच्या मुख्याध्यापिका म्हणून काम करीत असतां यांची व स्वामी विवेकानंद यांची पहिली भेट झाली ( सन १८९५ ). स्वामीजींच्या धार्मिक तत्त्वांचा व विचारांचा यांच्यावर इतका परिणाम झाला कीं, विवेकानंदांनीं इंग्लंडची दुसरी सफर केली त्या वेळीं या त्यांना



जाऊन मिळाल्या व १८९८ सालीं हिंदुस्थानांत आल्या. हिंदी संस्कृतीचें समग्र अवलोकन करण्याच्या दृष्टीनें कलकत्त्याच्या बोसपारा लेन या कर्मठ हिंदूंच्या वस्तींत यांनीं आपला मुक्काम ठेवला व आपल्या गोड स्वभावानें व निष्काम सेवाधर्मानें या लवकरच लोकप्रिय झाल्या. स्वामी विवेकानंदांच्याबरोबर सुमारें एक वर्षभर यांनीं हिंदुस्थानचा प्रवास केला. त्यांच्या विचारांशीं व भावनांशीं या अगदीं थोडक्या कालांत एकरूप झाल्या. यानंतर श्रीरामकृष्ण परमहंसांच्या शिष्यवर्गांत यांना प्रवेश मिळाला. 'काली, दि मदर' ( आई काली ) हें लहानसें पुस्तक लिहून यांनीं हिंदुस्थानांतल्या आपल्या लेखनकार्यास सुरुवात केली. यानंतर (१) 'हिंदी जीवनाचे धागे', (२) 'हिंदु धर्माची बालकथा', (३) 'मीं पाहिलेले गुरुदेव' ( विवेकानंदांचें व्यक्तिचित्र ), वगैरे विषयांचीं इंग्रजी पुस्तकें यांनीं लिहिलीं.

**निश**—युगोस्लाव्हिया, सर्व्हियाच्या निश विभागाच्या राजधानीचें ठिकाण. लोकसंख्या ३५,४६५. व्यापारांत आणि युद्धकलेंत सर्व सर्व्हियांतील शहरवासीयांत येथील लोक जास्त प्रसिद्ध आहेत. हें जिल्हा–धर्माध्यक्षाचें ( प्रिफेक्टचें ) आणि राष्ट्रीय शिबंदीचें राहण्याचें ठिकाण आहे. रशिया व तुर्कस्तान यांमध्यें झालेल्या युद्धांत हें शहर सर्व्हियाच्या ताब्यांत आलें.

**निशाण**—ध्वज पाहा.

**निशाण दाखविणें**—( सिग्नलिंग ). दूर किंवा जवळ असलेल्या अंतरावर खुणेनें कांहीं सांगणें. या खुणा बहुधा बावट्यांनीं दाखविल्या जातात. शिवाय दिवे, धूर, ध्वनी, वगैरेहि उपयोगांत आणतात. आगगाड्या आणि आगबोटी यांसाठीं निशाणाचे खांब ( सेमॅफोर ) असतात. तारायंत्रें, बिनतारी यांसारख्यांच्या द्वारेंहि संदेश दिले जातात. लष्कर आणि नाविक–दल, तसेंच विमान–दल यांतहि निशाणांची गरज लागतेच. सांकेतिक मोर्स भाषेंतून बहुधा खुणा केल्या जातात. रात्रीच्या वेळीं आगगाड्यांचे व वाहतुकीचे रस्ते यांवर रंगांचे दिवे असतात. तांबडा रंग 'थांबा!' व हिरवा रंग 'जा!' असें सांगतो. 'लॉक अँड ब्लॉक' पद्धतींत एका भागांतील यंत्रें आणि उच्चालक यांना आपोआप कुलूप पडतें. पुढच्या केबिनमधील विजेच्या प्रवाहानें 'जा' हा बावटा खालीं पडतो तेव्हांच गाडी या भागांत शिरूं शकते. स्वयंचलित बावटे गाडीला लवकर गति देण्यास उपयोगी असतात. धुकें असतांना रुळावर आवाजानें इशारा देण्यासाठीं फटाक्यांची 'डेटेनेटर' योजना केलेली असते.

**निशापूर**—इराणांतील निशापूर प्रांताच्या राजधानीचें शहर. हें पूर्वी मोठें प्रमुख शहर होतें. पण आतां अगदीं लहान म्हणजे १५ हजार वस्तीचें गांव उरलें आहे. येथें लोंकर, कापूस व सुकीं

फळें ( बदाम, पिस्ते, इ. ) यांचा व्यापार चालतो. या शहराच्या पूर्वेस उमरखय्याम नांवाचा जगप्रसिद्ध ज्योतिषी व कवि याची कबर आहे व जवळच फरिद-उद्दीन-अत्तर याहि प्रख्यात कवीची कबर आहे. १२०८ व १२८० या सालीं या शहराच्या बहुतेक भागाचा भूकंपानें नाश झाला. मोंगलांनींहि याचा दोनदां नाश केला. त्यानंतर त्याला अद्यापि ऊर्जितावस्था आली नाहीं.

**निःशुक्रजोत्पत्ति**—( पार्थेनोजेनेसिस ). वनस्पतींमध्यें क्वचित् अपवादात्मक अशा तऱ्हेचें पुनरुत्पादन झालेलें आढळतें. अशा वेळीं गर्भाशयामध्यें परागांचे आघात झाल्याशिवायहि गर्भधारणा झाल्याचें दिसून येतें. असा प्रकार डँडिलिअन आणि लेडीज् मॅंडल या दोन वनस्पतींच्या बाबतींत दिसून येतो.

प्राण्यांमध्येंहि कौमार्यावस्थेंत स्त्रीजातीच्या प्राण्यांच्या गर्भाशयामध्यें रेतोघात झाल्याशिवाय गर्भधारणा होण्याचे प्रकार दृष्टीस पडतात. याचें मोठें उदाहरण म्हणजे झाडांवर पडणाऱ्या उवांचें होय. दुसरें उदाहरण मधमाश्यांतील राणी माश्यांच्या बाबतींत आढळतें. राणी माशी जीं अंडीं घालते त्यांतील ज्या अंड्यांपासून कामकरी माशा व माद्या तयार होतात, तीं अंडीं नेहमींच्या पद्धतीनें सफल करण्यांत आलेलीं असतात. परंतु ज्या अंड्यांपासून नर माशा तयार होतात तीं फलित ( फर्टिलाइज्ड ) केलेलीं नसतात. इतरत्र कांहीं अपवादात्मक असे प्रकार आढळतात.

**निश्चलपुरी**—हा गोसावी पंथांतील असून (श्रीशिवाजी) 'राज्याभिषेक-कल्पतरु' या ग्रंथाचा कर्ता होय. या ग्रंथांत यानें गागाभट्टकृत शिवराज्याभिषेकांतील दोषस्थळें दाखविलीं आहेत. शिवाजीनें राज्याभिषेकाच्या प्रसंगीं जे मंत्रोक्त विवाह केले ते आपल्या जुन्या बायकांशींच केले, नवीन स्त्रिया आणल्या नव्हत्या, असें यानें आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे. काशीबाई नांवाच्या राजपत्नीचा व प्रतापराव गुजराचा मृत्यु, तसेंच सप्तकोटेश्वराच्या देवळाचा जीर्णोद्धार, वगैरेबाबतची माहिती यांत आली आहे. हा ग्रंथ संस्कृत भाषेंत आहे. निश्चलपुरी हा गागाभट्टाचा प्रतिस्पर्धी दिसतो. राज्याभिषेकाच्या धर्मकृत्यांत गागाभट्टानें आपल्याच वर्तीचे ब्राह्मण घेतले; निश्चलपुरीनें सुचविलेले घेतले नाहींत. या रागावर निश्चलपुरी शिवाजीला १३ व्या, २२ व्या व ५५ व्या दिवशीं संकटें कोसळतील असे बजावून निघून गेला. त्याप्रमाणे १३ व्या दिवशीं जिजाबाई वारली, प्रतापगडला घोडशाळा जळाली, सिंहगडला एक हत्ती मेला; यांसारख्या आपत्ती ओढवल्यावर शिवाजीनें निश्चलपुरीला बोलावून तांत्रिक पद्धतीनें पुन्हां राज्याभिषेक करवून घेतला ( ललितापंचमी शके १५९६ ) व त्याच्या पक्षाचा विरोध दूर केला.

**निश्चितांतर**—( फायनाइट डिफरन्सेस ). बिजगणितांतील गणनेची एक पद्धत. कांहीं बदलणाऱ्या संख्यांचे त्यांच्या अंतरांवरून नियम काढावयाचे असतात. जसें, गणितश्रेढी १, ३, ५, ७, यांत कोणतीहि संख्या घेऊन त्यापूर्वी क्रमानें येणारी संख्या उणी केली असतां अंतर तेंच राहतें. यावरून कोणतीहि संख्या काढण्यास लागणारें सूत्र काढतां येतें. दिलेल्या संख्येच्या बेरजेचेंहि सूत्र काढतां येतें.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | २८, | ५०, | ७८, | ११२, | १५२ ह्या संख्यांचीं |
| पहिलीं अंतरें | २२, | २८, | ३४, | ४० | |
| दुसरीं अंतरें | | ६, | ६, | ६ | |
| तिसरीं अंतरे | | | ० | ० | |

ह्यांत कोणतीहि संख्या व त्यांची बेरीज मांडता येते.

**निषाद**—प्राचीन हिंदुस्थानच्या आग्नेय विभागांतील एक राष्ट्रजात. समाजशास्त्रज्ञ कर्न 'निषाद-राष्ट्राणि'चे भाषांतर 'मूळच्या रहिवाशांचें राज्य' व 'निषादसंघ' याचें 'रानटी लोकांच्या जाती' असें भाषांतर करतो ( बृहत्संहिता १४,१०,३ ). रुद्रदामनच्या जुनागड येथील शिलालेखांत निषाद लोक अथवा देश यांचा उल्लेख केलेला आहे.

ऋग्वेदानंतरच्या तैत्तिरीय व वाजसनेयि संहिता ग्रंथांत व ब्राह्मण ग्रंथांत हा शब्द आला आहे. या शब्दावरून एखाद्या विशिष्ट जातीचा बोध होतो असें नाहीं तर शूद्र लोकांप्रमाणे जे लोक आर्यांच्या अमलाखालीं नव्हते अशा अनार्य लोकांना हे नांव होतें.

निषादाची उत्पत्ति वेन राजाच्या मांडीपासून झाल्याची कथा पुराणांतून आढळते. हे निषाद विंध्य पर्वतांत वस्ती करून आहेत. ब्राह्मण बाप व शूद्र आई यांच्या संततीला निषाद म्हणतात.

**निष्कुळानंद**—एक गुर्जर कवि. हा गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला. हा काठेवाडमधील गढडा गांवचा. यानें हृदयप्रकाश, चौसष्टपदी, चातुर्यगुणग्राहक, स्नेहगीता, भक्त चिंतामणि, वगैरे ग्रंथ गुजराथी भाषेंत लिहिले आहेत.

**निःसंवेदक**—( ॲनेस्थेटिक्स ). रोग्यावर शस्त्रक्रिया करतांना त्याला वेदना कळूं न देण्याचा हा उपाय आहे. बधिरता किंवा गुंगी आणणाऱ्या औषधांचे मुख्यतः दोन प्रकार करण्यांत येतात : १ पूर्ण बेशुद्धि आणणारीं; २ स्थानिक बधिरता उत्पन्न करणारीं. या दुसऱ्या प्रकारामध्यें फक्त शरीराच्या कांहीं विशिष्ट भागांतील मज्जातंतूंवर स्थानिक परिणाम होतो. रोग्यास गुंगी आणणारें औषध देण्याचे प्रयत्न १३ व्या शतकापासून अनेक प्रकारें करण्यांत येत होते. १८४६ मध्यें इंग्लंड

व अमेरिका देशांत याकरितां ईथर देण्यांत येत असे. १८४७ मध्यें सर जेम्स सिम्सन यानें क्लोरोफॉर्म देण्यास सुरुवात केली. तीच पद्धत १९ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत चालू होती. परंतु त्यानंतर पुन्हां ईथर प्रचारांत आला. व त्याचाच अद्यापि गुंगी आणण्याच्या कामीं उपयोग करण्यांत येतो. सामान्यतः ईथर व क्लोरोफॉर्म हे मिसळून उपयोगांत आणतात. दंतवैद्यकामध्यें नत्रस प्राणिद (नायट्रस ऑक्साइड) वायु किंवा हर्ष वायु यांचा उपयोग करण्याचा बराच प्रघात आहे. स्कोपोलॅमेन किंवा आयोसीन आणि मॉर्फिन याचा उपयोग मध्यंतरीं झोंप आणण्याकरितां करण्यांत येतो. किरकोळ शस्त्रक्रियेमध्यें स्थानिक बधिरता उत्पन्न करण्यांत येते व त्याकरितां कोकेन, युकेन आणि नोव्होकेन यांचा उपयोग करण्यांत येतो. पाठीच्या कण्यांत स्टोव्हेन टोंचून घातलें असतां शरीराच्या बऱ्याच मोठ्या भागास बधिरता येते.

**निःसंसर्गता**—(क्वारन्टाइन). जेव्हां एखादें गलबत बंदरांत येतें त्या वेळीं त्या गलबतामध्यें जर कांहीं सांसर्गिक रोगी असले किंवा ज्यांच्यापासून इतरांस कांहीं सांसर्गिक दोष उत्पन्न होईल अशी भीति वाटण्यासारखी परिस्थिति असते तेव्हां त्या गलबतांतील लोकांस कांहीं मुदतीपर्यंत (बहुधा ४० दिवस) किनाऱ्यावरील लोकांशीं संपर्क ठेवण्यास मनाई करण्यात येते. या मुदतीस संपर्कबंदी म्हणतात. अशा तऱ्हेची बंदी अलीकडे फक्त पटकी, पीतज्वर, वगैरे रोगांच्या बाबतींतच कांहीं देशांतून करण्यांत येते. पूर्वी प्लेगासाठीं क्वारंटाइनचे उपाय करीत. हल्लीं सांसर्गिक रोगांचीं प्रतिबंधक औषधें टोंचून घेतल्याचा दाखला दाखविल्यास क्वारंटाइनची शिक्षा होत नाहीं. सर्वमान्य आंतरराष्ट्रीय गोष्टी केल्यास क्वारंटाइनची भीति नसते.

**निसिबस**—उत्तर मेसापोटेमियांतील एक तटबंदीचें शहर. लोकसंख्या चार हजार. त्यात यहुदी लोकाचा विशेष भरणा आहे. सध्यां येथें सेंट जेम्सचें चर्च व कांहीं खांब एवढेच याच्या प्राचीन वैभवाची साक्ष देतात. आर्मेनियाचे राजे खि. पू. १४९ पासून इ. स. १४ पर्यंत येथें राहत असत. ३६४ सालीं हें इराणी लोकांच्या ताब्यांत गेलें. हमदानीद राजांनीं जबर कर बसविल्यामुळें येथील अरब रहिवासी शहर सोडून गेले व शहराचा ऱ्हास झाला.

**निहाल**—वऱ्हाड-मध्यप्रांतांतील एक जात. हे रानटी लोक भिल्ल व कोरकू यांच्या मिश्रणानें झाले आहेत. लो. सं. सुमारें १२,०००. पैकीं ४,००० वऱ्हाडांत आहेत. हे लोक गुरें-चारणीचें व गांवांत जागल्याचें काम करतात. कांहीं लोक मिलावे तोडण्याचा धंदा करतात. या जातींत पाट होतात. चैत्रात हे लोक झाडखंडी नामक वनदेवाची पूजा करतात. प्रेतें पुरण्याची यांच्यांत चाल आहे.

**निळारी**—मुंबई इलाख्यांतील एक जात. लो. सं. सोळा-सतरा हजार. यांतील कांहीं आपणांला रंगारी किंवा शिंपी म्हणवतात. निळारी या शब्दाचा मूळ अर्थ निळीचा रंग देणारा असा आहे. उ. हिंदुस्थानांत क्षत्रिय रंगाऱ्याची एक जात आहे, त्यांपैकींच आपण आहोंत असें यांचें म्हणणें आहे. यांच्यांत हिंदू व लिंगायत असे दोन मुख्य वर्ग आहेत. त्यांच्यांत रोटीबेटी व्यवहार होत नाहींत. यांचा पिढीजात धंदा रंगाऱ्याचा व सूत काढण्याचा आहे. यांतील कांहीं लोक फडक्या व झगे विणतात. यांचे धर्मविधी व आचार मराठे-कुणब्यांच्यासारखे आहेत. यांच्यांत लोखंडे, पतंगे, फुटाणे, भुमकर, पाटसकर, बागडे, वगैरे आडनवें असून कांहीं लोक गोत्रेंहि लावतात. निळारी हे स्मार्त आहेत व कांहीं वारकरी पंथाचे आहेत. बहिरोबा, भवानी, कालकादेवी, खंडोबा या यांच्या कुलदेवता आहेत.

**निळें-हिरवें शेवाळ**—[सियानो फायसी, मायक्सो फायसी अथवा श्विझोफायसी]. रंगीत शेवाळाची रचना फार सूक्ष्म व अत्यंत साधी असते. ही एकपेशीमय असते व तींत निश्चित असें केन्द्र किंवा मध्यपेशी नसते. यांत नर-मादी हा भेद नसतो व केवळ पेशीविभजनामुळें त्यांचा विस्तार होतो. यांमध्यें निळसर हिरव्यापासून तांबड्यापर्यंत निरनिराळे रंग असतात. हें निळें-हिरवें शेवाळ पाण्यावर किंवा दमट जागेवर, किंवा ओलसर खडकांवर आणि भिंतीवर कोठेंहि उगवतें. नवीन जमीन तयार झाली म्हणजे त्या जमिनीवर पहिली वनस्पति म्हणजे ही निळी-हिरवी शेवाळ दिसूं लागते. १८८६ मध्यें जेव्हां क्राकाटोवा बेट भूकंपामुळें भंग पावून उध्वस्त झालें, तेव्हां त्या प्रलयानंतर या जातीचें शेवाळ तेथें प्रथम दिसूं लागलें व यानंतर दुसऱ्या लहानमोठ्या वनस्पतींस मार्ग करून दिला. तळ्याच्या पृष्ठ-भागावर विशिष्ट ऋतूमध्यें यांचे थरच्या थर पसरलेले दिसतात. यांस नीळ म्हणतात. तांबड्या समुद्राचा तांबडा रंग या अशाच तऱ्हेच्या शेवाळाचा एक चमत्कार आहे.

**निळोबा**—एक संतकवि. तुकारामाच्या वैकुंठवासानंतर त्याच्या गादीचा मान त्याच्या या प्रमुख शिष्याकडे आला. हा तुकारामाच्या चौदा टाळकऱ्यांपैकीं एक असून यानें तुकारामाचें चरित्र, पांडुरंगमाहात्म्य व पंढरी-माहात्म्य, वगैरे अभंगात्मक प्रकरणें लिहिलीं आहेत. मूळचा हा कवि पिंपळनेरचा कुलकर्णी; देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. पिंपळगांव यानेंच वसवलें असें महीपति म्हणतो. तुकाराम वैकुंठवासी झाल्यावर यानें बेचाळीस दिवस उपवास केला, इतकी तुकारामावर याची भक्ति होती. तुका-रामाचा यास साक्षात्कार होऊन अनुग्रह मिळाला असें म्हण-तात. पिंपळनेर येथें फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस यानें समाधि घेतली. याच्या अभंगांची गाथा प्रसिद्ध आहे.

**निळो मोरेश्वर** ( मृ. १७०८ )—हा पेशवे मोरोपंत पिंगळे याचा पुत्र. शिवाजीच्या पश्चात् राजारामास गादीवर बसवण्याच्या कटांत हा सामील असावा अशा समजुतीनें संभाजीनें यास कैदेंत ठेवलें होतें. पुढें मोरोपंत वारल्यावर हरजी राजे महाडिक याला मदत करून कर्नाटकांतील प्रदेश औरंगजेबाच्या हातीं गेला होता तो यानें परत मिळविला. राजारामानेंहि याच्याकडे पेशवेपद कायम केलें ( १६९० ). पुढें शाहूनें सातारा घेतला तरी हा त्याला न मिळतां ताराबाईकडेच राहिला; त्यामुळें शाहूनें याच्या भैरव नांवाच्या धाकट्या भावास पेशवेपद दिलें. नंतर लवकरच निळोपंत रांगण्यास मरण पावला.

**निळो सोनदेव** ( मृ. १६७२ )—हा हल्लींच्या बावडेकर अमात्य घराण्याचा मूळ पुरुष. याचा आजा नारोपंत यानें मालोजी भोसले याच्या पदरीं आणि बाप सोनोपंत यानें शहाजीच्या पदरीं नोकरी केली. शिवाजीनें सोनोपंतास तेंच काम सांगितलें. १६४५ सालीं शिवाजीनें निळोपंतास सचिवगिरी दिली. आणि निळोपंताचा भाऊ आबाजी यास कोंकण प्रांताची मुजुमदारी दिली. शिवाजीनें स्वराज्याची नवीन व्यवस्था ठरविली ( १६६१ ), त्यांत निळोपंताला मुलकी कारभारी नेमिलें. त्या वेळची राज्याची हिशेबी पद्धति निळोपंताच्या हातचीच आहे. शहाजी वारला त्या वेळीं जिजाबाई सती जात असतां यानेंच तिची समजूत घालून तिला थांबविलें. त्यानें मराठी राज्याची अखेरपर्यंत चांगली सेवा केली. तो १६७२ सालीं मरण पावला. नंतर त्याचा मुलगा नारोपंत यास शिवाजीनें अमात्य नेमलें. परंतु तो साधु वृत्तीचा असल्यामुळें त्याचा धाकटा भाऊ रामचंद्रपंत हाच तें काम करी. रामचंद्रपंत अमात्य पाहा.

**निक्षेप**—(बेलमेंट). कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या इसमानें जंगममाल दुसऱ्या इसमाजवळ विश्वासानें ( इन् ट्रस्ट ) पुढील शर्तीवर ठेवणें : ती शर्त अशी कीं, त्या मालाचें त्या दुसऱ्या इसमानें नीट जतन करावें, आणि नंतर मूळ मालकाला तो माल परत द्यावा, किंवा तो माल त्या दुसऱ्या इसमाने वापरावा, आणि नंतर मूळ मालकाला तो माल परत द्यावा. असा निक्षेप ठेवण्याची कांहीं विशिष्ट मुदत ठरलेली असते, आणि ती मुदत संपल्यावर तो माल ठरलेल्या शर्तीप्रमाणें मूळ मालकाला परत द्यावा लागतो. तारण देणें, आणि भाड्यानें वापरण्यास कांहीं माल देणें हे निक्षेपाचेच प्रकार आहेत. ( कराराचा कायदा इंडियन कॉन्ट्रॅक्ट ॲक्ट कलम १४८–बेलमेंट तात्पुरत्या ठेवीचा करार; कलम १७२–प्लेज म्हणजे जंगम वस्तूचें गहाण. असें गहाण ठेवणाराला पॉनर आणि गहाण घेणाराला पॉनी म्हणतात. )

**निक्षेपसुरक्षाविवर**— ( सेफ डिपॉझिट व्हॉल्ट ). आपल्याला नित्य न लागणाऱ्या वस्तू बँकेमधील अशा सेफ डिपॉझिट व्हॉल्टमध्यें सुरक्षित ठेवितां येतात. बँक व खातेदार या दोघांच्याहि दृष्टीनें हीं तळघरें सोयीस्कर असतात. खातेदारास पाहिजे तेव्हा व पाहिजे तितक्या वेळां त्याच्या वस्तू परत घेतां येतात किंवा पुन्हां ठेवतां येतात. बँकेसहि वरील प्रकारच्या पेट्यांच्या मानानें जास्त भाडें मिळतें. अलीकडे पुष्कळ बँकांतून अशा प्रकारचीं तळघरें उघडण्यांत आलीं आहेत. याकरितां बँकांतून स्वतंत्र तळघरें बांधून घेतात. या तळघराच्या एका दाराशिवाय त्यास दुसऱ्या प्रकारचें कुठलेंहि दार नसतें. या तळघराच्या भिंती मुद्दाम पोलादी अशा बांधून घेतल्या जातात. या तळघरांत मोठमोठ्या भक्कम तिजोऱ्या बसवून त्यांमध्यें लहानमोठ्या आकाराचे खण बसविण्यांत येतात. हेच खण लोकांना भाड्यानें दिले जातात. या खणाला जीं कुलपें लावतात त्यांत जरी निरनिराळे प्रकार आढळून आले तरी बँकेचा अधिकारी व खातेदार दोघेहि एकत्र आल्याशिवाय तो खण उघडतां येऊं नये, हीच या प्रकारांतील मध्यवर्ती कल्पना होय. सर्वसाधारणपणे या खणाला दोन किल्ल्या असतात व त्या दोन्हीहि एकदम लावल्या म्हणजेच तो खण उघडूं शकतो व त्यांतच त्या खणाची सुरक्षितता आहे. या किल्ल्यांपैकीं एक किल्ली तो खण भाड्यानें ठेवणाऱ्यास दिली जाते व दुसरी किल्ली बँकेजवळ राहते. बँकेजवळ असणारी किल्ली सर्व खणांच्या कुलपांना चालू शकते. या किल्लीस नियंत्रक किल्ली ( कंट्रोल की ) असें म्हणतात. परंतु या एकट्याच किल्लीनें कुठलाहि खण खातेदाराच्या किल्लीशिवाय उघडूं शकत नाहीं. खातेदाराला जी किल्ली दिली जाते ती एकच असते. त्यानें ती फारच काळजीपूर्वक जपून ठेवली पाहिजे. ती हरविल्यास तशी दुसरी किल्ली मिळूं शकत नाहीं. अशा वेळेला तो खण तोडावाच लागतो व त्याचा खर्च खातेदारावर पडतो.

असा खण एकापेक्षां अधिक नांवांनीं सुद्धां घेतां येतो. सहीशिवाय खातेदाराची ओळख पूर्णपणें पटण्याकरितां खातेदाराकडून खातें चालू करतांना एक खुणेचा शब्द घेतला जातो. या खणामध्यें खातेदारानें काय ठेवलें आहे त्यासंबंधींची कोणत्याहि प्रकारची जबाबदारी बँक घेत नाहीं. त्यामध्यें खातेदारानें कांहींहि ठेविलें तरी चालतें. परंतु स्फोटक द्रव्यें, वगैरेसारखे पदार्थ यांत ठेवूं नयेत असा इषारा त्यास दिला जातो.

**नीऑन प्रकाश**—अलीकडे दुकानातून कांचेच्या प्रकाशदायी नळ्या टांगलेल्या फार दिसतात. आज याला 'फ्लुरोसंट' प्रकाश म्हणतात. यापूर्वी त्यास 'नीऑन' हें नांव होतें. वास्तविक हेंहि नांव तितकेंसें बरोबर नव्हतें. कारण एकटा 'नीऑन' वायुच यांत नसून आणखी चार वायू ( अर्गॉन,

हेलिअम, क्रिप्टॉन व क्सेनॉन ) जोडीला आहेत. नीऑन हा वातावरणांतील एक अचेतन वायु असून त्याचा शोध १८९८ त लागला.

वर सांगितलेले पंचवायूसारखेच अचेतन व समपरमाणुभाराचे असून रासायनिक मूलद्रव्यांपासून निराळे असतात. नीऑनपासून तांबडा प्रकाश निघतो. अर्गॉन आणि क्रिप्टॉन यांच्या मिश्रणापासून पारद वायूच्या साहाय्यानें निळा रंग मिळतो. हेलिअमचा पांढरा रंग दिसतो, पण पिवळ्या नळींतून तो सोनेरी प्रकाश देतो. क्सेनॉन वायु सर्वांत जड असून इतर रंगजनक वायूंचा ऊर्जमानकारक ( व्होल्टेज एजंट ) म्हणून याचा उपयोग करतात.

एका नळींत हे पांच वायू भरून त्यांतून विजेचा प्रवाह सोडतात; म्हणजे प्रकाश मिळतो. नळीच्या प्रत्येक टोंकाशीं असलेल्या विद्युदग्रांतून जेव्हां विद्युत्प्रवाह जात असतो तेव्हां वायूंतून विद्युत्परमाणू बाहेर पडतात; व जेव्हां वायूचे परमाणू एकसारखे आयनीभूत ( आयोडाइज्ड ) होत असतात व विद्युत्परमाणू कमालीच्या वेगानें पुढें-मागें जात असतात तेव्हां या विद्युत्परमाणूंच्या जोराच्या हालचालीनें किंवा संघर्षानें प्रकाश उत्पन्न होतो. एक सेकंदांत एका नळींत एक लाख वेळां पूर्ण तेजस्वितेपासून अगदीं अंधारापर्यंत स्थित्यंतरें होत असतात, तरी पण सारखा प्रकाश पडत आहे असा मात्र भास होतो.

**नीगंट नातपुत्त**— एक जैन साधु ( महावीर ? ). हा नाथ ( नात ) नांवाच्या शेतकऱ्याचा पुत्र ( पुत्त ) होता व यानें गांठी तोडल्या म्हणून याचें नांव नीगंठ ( निर्ग्रंथ ) नातपुत्त असें पडलें. थंड पाणी पिणें पाप आहे असें याचें मत होतें. पाण्याचे बारीक कण हे लहान आत्मे व मोठे कण हे मोठे आत्मे होत, असें हा म्हणे. नशिबाप्रमाणें पाप-पुण्य किंवा सुखदुःखें प्राप्त होतात व आपणांस तीं टाळतां येणार नाहींत, असे याचें मत होतें.

हा व महावीर एकच असें कांहीं समजतात. बुद्धाच्या अक्रियावादाच्या उलट क्रियावाद यानें शिकविला. क्रियावाद म्हणजे आत्म्याच्या कार्यशक्तीवर श्रद्धा. काया, वाचा व मन हीं तीन पापाचीं साधनें आहेत. सुख-दुःख, सद्वृत्त-दुर्वृत्त हीं दैवघटित असतात, तेव्हां पंथांच्या नियमांप्रमाणें वागून कांहीं फल नाहीं; कारण दैव टाळतां येत नाहीं, असें याचें प्रतिपादन आहे.

**नीग्रो**—यांची मुख्य व मूळ वस्ती आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर केपव्हर्डेपासून कालाबारपर्यंत पसरलेली असून आंतरभागांत सहारा वाळवंटापर्यंत गेलेली आहे. यांची लो. सं. सु. २१ कोटी भरते. मानवजातीचे गौर, ताम्र, पीत, व कृष्ण अशा चार वर्णांचे चार लोकविभाग पाडले असून कृष्ण मानववंशामध्यें पूर्व गोलार्धांतील उष्ण कटिबंधांतल्या पश्चिम आफ्रिकेच्या सेनिगांबिया देशापासून फिजी बेटापर्यंतच्या मुलुखांत असलेल्या काळ्या कातडीच्या सर्व लोकांचा समावेश होतो. हात लांब, चपटें व शेंडा बसलेलें नाक, कपाळाच्या पुढें आलेली हनुवटी, मोठी व जड कवटी, आणि कमानदार कपाळ, हीं यांचीं वैशिष्ट्यें आहेत. या शारीरिक विशेषावरून पाहतां हे लोक जीवजातींच्या विकाससोपानावर इतर मानवजातींच्या मानानें खालच्या पायरीवर आहेत असें म्हणावें लागतें. या लोकांचें मनुष्यसदृश असलेल्या उच्च वर्गांतील मर्कट जातीशीं अधिक साम्य आहे. मानसिक दृष्ट्या नीग्रो हे गौरवर्णीयांपेक्षां हलक्या दर्जाचे आहेत. तथापि नीग्रोंची बुद्धि अतिशय हीन प्रतीची नाहीं. कारण दृष्टि, कर्णेंद्रियशक्ति, स्थलवर्णनविद्या ( टोपोग्राफी ), दिशानिर्णय, वगैरे बाबतींत नीग्रो लोक गोऱ्या लोकांहून फार अधिक कुशल असतात. नीग्रो लोकांची मनोरचना सुखभावी व आनंदी मुलासारखी असते. अनुभवानें व विशेषतः शिक्षणानें प्राप्त होणारा प्रगल्भपणा त्यांच्यामध्यें नसतो. त्यामुळें जशीं मुलें रागावतात, चिडतात व क्रूरपणाचीं कृत्यें सहजगत्या करतात, तसा प्रकार नीग्रो लोकांत आढळतो. नीग्रो नोकरांत आणीबाणीच्या प्रसंगीं विश्वासूपणाहि दिसून येतो. योग्य प्रकारें शिक्षण दिल्यास सुतारकी, लोहारकी, कातकाम, वगैरे कलाकौशल्याचीं कामें ते करूं शकतात. शेतकी, शिकार, मच्छीमारी, गोपालन हेच अद्याप त्यांचे व्यवसाय आहेत. हे लोक शेतकीप्रधान असल्यामुळें स्वाभाविकच शाकाहारी आहेत. तथापि ते मांसाहार मिळेल तेव्हां करतात. नाइल व कांगो नदीकांठीं राहणाऱ्या नीग्रोंचें मुख्य खाद्य मासे हें आहे. हे लोक नरभक्षकहि आहेत. पाषाणयुगाच्या पुढें नीग्रो टोळ्यांची प्रगति गेलेली असून लोखंड या धातूचे जिन्नस तयार करण्याची कला त्यांना अवगत आहे. शिवाय विणकला, लांकडावरील खोदकाम व मातीचीं भांडीं करण्याचें कसब नीग्रो लोकांत आहे. नीग्रो लोकांत धर्मकल्पना व अतींद्रिय देवतांवर विश्वास आहे. जादूटोणा करणारे पुष्कळ लोक यांच्यांत असतात.

आफ्रिकेंतून गुलाम म्हणून नेलेले नीग्रो युरोपांत आणि अमेरिकेंत आहेत. गुलामगिरी कायद्यानें बंद होण्यापूर्वी या लोकांना पशूंप्रमाणें वागविलें जाई. अद्यापिहि गोरे लोक यांना दूर ठेवतात व कोणी नीग्रो गोऱ्या माणसाशीं जास्त लगट करूं लागल्यास त्यास जिवंत जाळून ( लिंचिंग ) मारतात. वेस्ट इंडीज आणि अमेरिकन संयुक्त संस्थानें यांतून नीग्रोंची मोठी वस्ती आहे. संयुक्त संस्थानांत सु. एक कोटी तीस लक्ष नीग्रो आहेत. १८६३ पूर्वी हे लोक गोऱ्यांचे गुलाम म्हणून घरांतून आणि शेतांतून कामें

करीत. त्याना कांहींहि नागरिक हक्क नसत. १८६३–६९ या सालांत त्यांना संपूर्ण नागरिक हक्क मिळाले. तथापि दक्षिणेंतील संस्थानांतून यांचा स्वतंत्र मानववंश ठरवून यांचे बरेच हक्क काढून घेतले आहेत.

यान्यात बुकर टी. वॉशिंग्टनसारखे कर्तबगार पुरुष निघून त्यांनीं स्वजातीसाठीं अनेक संस्था काढल्या व प्रगतीचे मार्ग सुलभ केले. सर्व क्षेत्रांतून त्यामुळें कांहीं नीग्रो मंडळी पुढें आलेली आहेत. गेल्या महायुद्धानंतर वर्णभेदाला थारा देऊं नये असें अमेरिकन लोकमत तयार होऊं लागलें आहे व हिंदुस्थानांतील हरिजनांप्रमाणेंच अमेरिकेंत नीग्रोंना सरकार समतेनें वागविण्यास जनतेला शिकवूं लागलें आहे.

**नीचोन्नत शिल्प**—(बा-रिलीफ). एखाद्या दगडाच्या पृष्ठ-भागावर एखादें चित्र कोरून त्याचा उठावदार भाग राखून ठेवून तयार केलेल्या चित्रास नीचोन्नत किंवा बाह्यगोल शिल्प असें म्हणतात. या पद्धतींत काढलेलें चित्र दगडाच्या इतर पृष्ठभागा-पेक्षां फारच थोडा वर उठाव दिलेलें दिसतें. उच्चोन्नतपद्धतीमध्यें चित्र पूर्णपणें उठलेलें किंवा जवळजवळ सुटें दिसतें. (उच्चोन्नत पाहा). पूर्वीच्या लेण्यांत अशीं चित्रें कोरलेलीं अनेक ठिकाणीं आढळतात. ग्रीसमध्यें अथेन्स येथील पार्थिनॉनमध्यें अशा पद्धती-चीं चित्रें दिसतात. यांपैकीं कांहीं ब्रिटिश म्यूझियममध्यें आणून ठेवलेलीं आहेत.

**नीचोष्ण कर्बीकरण**—(लो टेंपरेचर कार्बनायझेशन). नेहमींच्या वायु (गॅस) तयार करण्याच्या पद्धतींत दगडी कोळसा १०००° ते १२००° शत (सें) पर्यंत उष्ण करतात. पण त्या पद्धतींत ५००° ते ६००° श. पर्यंतच उष्णतामान असतें. ह्यामुळें मागें राहिलेल्या कोळशांत शें. १० उत्पतनशील (व्होल-टाइल) द्रव्य राहत असलें आणि तयार झालेल्या वायूचें प्रमा-णहि कमी असलें तरी मोटारला लागणारें तेल आणि हलकें तेल (लाइट ऑइल–डामरापासून काढलेलें) हें पुष्कळ प्रमाणांत मिळतें. अजून ही पद्धत पूर्णत्वास आली नाहीं.

**नीतिशास्त्र**—हें एक ध्येयवादी (नॉर्मेटिव्ह) शास्त्र असून मानवांनीं परस्परांशीं कसें वागावें यासंबंधींचा विचार या शास्त्रांत केलेला असतो. मनुष्याचा स्वभाव आणि वर्तन यांत चांगलें कोणतें, वाईट कोणतें, बरोबर कोणतें, चूक कोणतें, हें ठरवणारे नियम किंवा प्रमाण किंवा निकष तयार करणें हें या शास्त्राचें उद्दिष्ट आहे. बरोबर किंवा चूक वर्तन ठरविण्याकरितां नियम तयार केले पाहिजेत, म्हणजे त्या नियमांप्रमाणें जें वर्तन तें सद्वर्तन असें म्हणतां येईल. नियम करावयाचे तर त्या नियमांचें साध्य काय तें ठरवलें पाहिजे. एखादी गोष्ट चांगली आहे म्हणजे आपलें ध्येय किंवा साध्य साधण्यास ती गोष्ट मौल्यवान् साधन आहे, असें असल्यावर ती चांगली गोष्ट हेंच आपलें अंतिम साध्य ठरतें. म्हणून नीतिशास्त्राचा उद्देश, हें अंतिम साध्य किंवा ध्येय (समम बोनम) कोणतें तें निश्चित करणें, हा आहे. म्हणून मानव-जात कोणतें उद्दिष्ट साध्य करण्याचा प्रयत्न करते व कोणत्या प्रकारचें वर्तन करूं इच्छिते, त्याचा विचार नीतिशास्त्र करतें. हें उद्दिष्ट अंतिम म्हणून कधींहि ठरलेलें नाहीं, त्यामुळें निश्चित ध्येय कोणतें तें सांगणें कठिण आहे. तथापि मानवी जीवनाचें कांहीं ध्येय (आयडिअल) असलें पाहिजे व त्या ध्येयाला अनुलक्षून मानवी वर्तनाची परीक्षा करण्याचें प्रमाण किंवा नियम ठरवले पाहिजेत. यावरून पाहतां नीतिशास्त्र हें केवळ कल्पना-मय किंवा विचारात्मक किंवा तर्कनिष्ठ (स्पेक्युलेटिव्ह) शास्त्र आहे. तथापि अलीकडे उपयुक्ततावादी पंथाच्या बेंथाम, मिल, स्पेन्सर, लेस्ली स्टीफन या नीतिशास्त्रज्ञांनीं मानवी जीवनाचें ध्येय, 'पुष्कळांचें पुष्कळ सुख' साध्य करणें हें आहे, असें निश्चितपणें प्रतिपादन केलें आहे. युरोपांत नीतिशास्त्राचे अनेक संप्रदाय आतांपर्यंत झालेले आहेत. त्यांमध्यें प्राचीन तत्त्ववेत्ते सॉक्रेटीस, प्लेटो, आरिस्टॉटल, तसेंच सिनिक पंथीय तत्त्वज्ञानी आणि स्टोईकपंथी तत्त्वज्ञानी हे विशेष प्रमुख होते. ग्रीक तत्त्ववेत्ते नीतिशास्त्राकडे वैयक्तिक दृष्टिकोनांतून पाहणारे होते. राजकीय किंवा सामाजिक दृष्टि त्यांची नव्हती. ख्रिस्ती धर्म स्थापन झाल्यावर नीतिशास्त्राची ईश्वरविज्ञानशास्त्राशीं (थिऑलॉजी) सांगड घालण्यांत आली आणि नीतिमत्ता धर्म-ग्रंथांतील नियमानुसार ठरवली गेली पाहिजे, असें लोकमत बनलें. कांहीं ख्रिस्ती नीतिशास्त्रज्ञांनीं, उदाहरणार्थ, ॲनसेल्म, ऑगस्टाइन, पीटर लोंबार्ड, यांनीं प्राचीन ग्रीकांच्या नीतिशास्त्रीय उपपत्तींचा ख्रिस्ती बायबल ग्रंथांतील धर्ममतांशीं समन्वय करण्याचा प्रयत्न केला. परंतु अलीकडील बहुतेक नीतिशास्त्रविषयक संप्रदायांनीं नीतिशास्त्र ईश्वरविज्ञानशास्त्रा-पासून पृथक् किंवा अलिप्त आहे असें प्रतिपादिलें आहे. आधुनिक नीतिशास्त्रज्ञांचे दोन प्रमुख संप्रदाय आहेत: (१) पहिला संप्रदाय उपयुक्ततावादी नीतिशास्त्रज्ञांचा. त्याचा उल्लेख वर आला आहे. (२) दुसरा संप्रदाय बुद्धिप्रामाण्यवादी शास्त्र-ज्ञांचा. त्यांचें मत असें कीं, नियम किंवा कायदा आणि कर्तव्य (ऑब्लिगेशन) यांचा उगम किंवा उत्पत्ति मनुष्याच्या सदसद्वि-वेक बुद्धींतूनच झाली पाहिजे. या बुद्धिप्रामाण्यवादाचे पुरस्कर्ते क्लार्क, बटलर, रीड, स्टीवर्ट, आणि कँट हे होत. नीतिशास्त्र हा विषय ईश्वरविज्ञान, मानसशास्त्र, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, आणि कायदेशास्त्र इतक्या विषयांशीं निगडित आहे.

भारतीय—पुनर्जन्मावर विश्वास ठेवल्यानें भारतीय नीति-शास्त्राला निराळाच रंग चढला आहे. वेदसूक्तांतून या पुनर्जन्मा-

बद्दल स्पष्ट उल्लेख नाहीं; किंवा त्यांत नैतिक विचारहि फारसे आढळत नाहींत. फक्त स्वर्गीय आनंद व नरकयातना यांचा निर्देश केलेला दिसतो. उलट उपनिषदांतून सद्गुणी माणसें ब्राह्मण जन्माला व दुष्ट माणसें चांडाल जन्माला जातात, असें सांगितलें आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचा उच्चतम हेतु कर्मबंधनापासून मुक्त होण्याचा आहे. गो-ब्राह्मणांची पवित्रता याखेरीज हिंदूंमधील बऱ्यावाईट गोष्टींच्या कल्पना इतर प्राचीन राष्ट्रांतील कल्पनांप्रमाणेंच आहेत. प्रत्येक जातीचीं विशिष्ट कर्में आहेत. तरी क्षमा, सत्यवादित्व, आत्मसंयमन, पावित्र्य, औदार्य, इत्यादि कर्में सर्वांना सारखींच बंधनकारक आहेत. महाभारतात पौरोहित्य धर्मांचा बराच उल्लेख असून हिंदु नीतिशास्त्राचें तें एक 'कोड'च म्हणतां येईल. संस्कृत नैतिक काव्याचा आत्मा म्हणजे दैववाद. हें दैव मागील जन्मीं केलेल्या गोष्टींवर अवलंबून ठेविलेलें असतें. पुनर्जन्माची कल्पना सर्व हिंदूंत नाहीं.

जैन—प्राणिजीविताविषयीं आदरबुद्धि दाखविण्यांत जैन बौद्धांपेक्षां पुढें आहेत. तथापि जैन गृहस्थांनीं पाळावयाचे नियम बरेच सौम्य आहेत. आपल्या धर्माकरितां कसलाहि त्याग आनंदानें करण्याची तयारी असलेले गृहस्थ जैन धर्मांत जास्त आढळतील व हाच त्या धर्माचा विशेष आहे.

बौद्ध—व्यावहारिक गरजांना तात्त्विक ज्ञानाची दिलेली जोड आणि संन्यासधर्मावर दिलेला विशेष भर हाच बौद्ध नीतीचा गाभा म्हणतां येईल. व्यक्तीचा नैतिक व बौद्धिक उत्कर्ष हाच बौद्ध नीतीचा अंतिम हेतु आहे. बौद्धांच्या व्यावहारिक नीतिशास्त्राचा मुख्य विषय सद्गुण व दुर्गुण यांतील विरोध स्पष्ट करणें हा आहे. बौद्ध नीतिशास्त्रांत भिक्षु व गृहस्थ यांना सांगितलेल्या नियमांखेरीज, अहिंसा, अस्तेय, अव्यभिचार, असत्यनिषेध व अमादन (माद न आणणें), हे पांच सार्वत्रिक नियम आढळतात.

मुसलमानी—कुराणांतील नीतिशास्त्र "विश्वास ठेवा व चांगलें असेल तें करा" हें आहे. मुसलमानांत नीतिमत्तेचा प्रश्न धार्मिक स्वरूपाचा आहे. दंतकथा व म्हणी यांतून मुसलमानांचें नैतिक तत्त्वज्ञान आढळून येतें. आपला धर्म वाढविणें हें प्रत्येक मुसलमानाचें कर्तव्य मानिलें जातें. बहुपत्नीत्व शास्त्रसंमत आहे.

पारशी—अवेस्ता व पहलवी ग्रंथांतून दिग्दर्शित होणारा झरथुष्ट्री धर्म हा केवळ नीतिधर्म आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. नीति म्हणजे दुरात्म्यांशीं करावा लागणारा झगडा होय. म्हणून तदनुरोधानें मनुष्याचीं याज्ञिक व विधिविषयक कर्तव्यें आंखण्यांत येतात. आजारीपणानंतर आंथरूण स्वच्छ करणें हें केवळ आरोग्याकरितां नसून अंतास्थित दुरात्म्यांना झाडून टाकण्याकरितां अवश्य असतें, असें पारशी मानतात. पारश्यांत नीति म्हणजे एक सुधारणेची कला आहे. आपल्या स्वतःच्या आयुष्याची व वंशाची काळजी घेण्याखेरीज दुसरीं उच्च व व्यावहारिक कर्तव्यें म्हणजे उद्योगशीलता, मिताहार, काटकसर, प्रातर्जागर, सर्व व्यावहारिक गोष्टींत तत्परता, हीं होत. स्वार्थनिरपेक्षतेच्या भावनांना पारश्यांनीं अजीबात फांटा दिलेला आहे.

जपानी—प्राचीन जपान्यांतील विशिष्ट नैतिक अंगें आजच्या जपान्यांतहि आढळतील. त्यांतील प्रधान अंग म्हणजे राष्ट्रीयत्व. एकाच राजघराण्याकडे गादी चालल्यामुळें या पुरातन व पवित्र गादीला जपानी लोक फार मानतात. शिंतोधर्म हा जपानचा राष्ट्रधर्म आहे, नीतिधर्म नव्हे. चिनी लोक परोपकारिता व पितृभक्ति हे श्रेष्ठ सद्गुण मानतात तर जपानी राजनिष्ठा आणि सदाचार यांना सर्वांत जास्त किंमत देतात. राष्ट्रीय चैतन्यांतील कटोरपणा बौद्ध संप्रदायांतील परोपकारशीलतेच्या शिकवणीनें मृदु पडला व परलोकाची नवी कल्पना जपान्यांमध्यें त्यानें आणून दिली.

चिनी—चिनी लोकांचें नीतिशास्त्र म्हणजे कॉन्फ्यूशियन संप्रदायाचें नीतिशास्त्र होय; कारण इतर धर्मांचें नीतिशास्त्र चीनमध्यें रुजलें नाहीं. मातृपितृभक्ति व आप्तप्रेम हीं कन्फ्यूशियसच्या सामाजिक व नैतिक संप्रदायाचीं मुख्य अंगें होत.

**नीपर नदी**—ही नदी रशियांत असून हिचा उगम व्हालडे टेंकड्यांच्या पायथ्याशीं आहे. १४१० मैल वाहत जाऊन ही नदी अखेर काळ्या समुद्राला मिळते. डोरोगोबुझपर्यंत हिच्यांत जहाजें चालतात. ह्या नदीचे बरेच कालवे असून हिच्या नौकानयनयोग्य अशा बऱ्याच उपनद्या आहेत. या नदीचा बाल्टिक समुद्राशीं संबंध जोडण्यांत आला आहे.

**नीबुहर, कारस्टेन** (१७३३–१८१५)—एक जर्मन भूगोलशास्त्रवेत्ता व संशोधक. त्यानें गणितशास्त्राचा व अरची मापेचा अभ्यास केला. डेन्मार्कच्या पांचव्या फ्रेडरिक राजानें ईजिप्त, अरबस्तान व सीरिया या देशांचें शास्त्रीय संशोधन करण्याकरितां जी मंडळी पाठविली त्यांत नीबुहर होता. ही मंडळी १७६१ सालीं अलेक्झांड्रियाला जाऊन नाइल नदीच्या उगमाकडे गेली. सुएझ, सिनाय पर्वत, जेद्दाला, मोकाला, व एमेनची राजधानी साना, इतक्या ठिकाणीं पाहणी करून नंतर ही मंडळी मुंबईस जात असतां या संशोधकांपैकीं सर्व जण वाटेंत आजारानें मृत्युमुखीं पडले व एकटा नीबुहर उरला. तो मुंबईस १४ महिने राहिला व नंतर मस्कत, बुशायर सिराझ, पर्सेपोलिस, बाबिलोन, बगदाद, मोसल, अलेप्पो, सायप्रस, जेरुसलेम, व कॉन्स्टंटिनोपल हीं शहरें पाहून तो १७६७ सालीं कोपनहेगनला परत गेला. त्यानें या सफरींतील देशांचें भूवर्णन, लोक, पुराणवस्तु, वगैरेसंबंधानें लिहिलेली माहिती प्रमाणभूत मानतात.

**नीमच**—मध्य हिंदुस्थान, ग्वाल्हेर संस्थान, मंदसोर जिल्ह्यांतील एक शहर. हें रेल्वे स्टेशन असून येथें ब्रिटिश लष्करी छावणी असे. नीमच छावणीची व शहराची मिळून लोकसंख्या सु. पंचवीस हजार आहे. येथे पंडिता रमाबाई मिशन आहे. १८१८ सालीं येथें एक किल्ला बांधण्यांत आला. १८५७ सालच्या बंडाची गडबड येथें सुरू झाली होती, पण लवकरच माळवा फील्डफोर्स या पलटणींनी बंडखोरांचा पराभव करून शहर ताब्यांत घेतलें. तेव्हांपासून नीमच हें पोलिटिकल एजंटचें राहण्याचें मुख्य ठिकाण बनलें. येथें एक सरकारी हायस्कूल, इस्पितळें व एक जिमखाना क्लब आहे.

**नीरा**—१. कालवे—मुंबई इलाखा, पुणें जिल्ह्यामध्यें असलेल्या नीरा नदीच्या डाव्या व उजव्या तीरांवरील कालवे. पंढरपूर, भीमथडी व इंदापूर या तालुक्यांत या डाव्या तीरावरील कालव्याचें पाणी पुरविलें जातें. हा कालवा १८८५–८६ सालीं तयार करण्यांत आला. या कालव्याला पाण्याचा पुरवठा 'व्हॉयटिंग' तलावापासून होतो. नदीच्या उजव्या तीरावरील कालव्याचें काम १९२५–२६ त झालें. या कालव्याचा उपयोग शेतकीसाठीं पुरंदर तालुक्याला होतो.

२. नदी—ही जुन्या भोर संस्थानांत सह्याद्रीपासून उगम पावून पुणें जिल्ह्याच्या दक्षिण हद्दीनें वाहत जाऊन नरसिंगपुराजवळ भीमा नदीला मिळते. हें नीरा-नरसिंगपूर संगमस्थान प्रसिद्ध आहे. वीर गांवाजवळ हिला धरण बांधलें आहे.

**नीरो** (इ. स. ३७–६८)— एक रोमन बादशहा. याला क्लॉडियस बादशहानें युवराज म्हणून मान्य करून त्याच्या शिक्षणाची चांगली व्यवस्था केली. इ. स. ५३ मध्यें क्लॉडियसची मुलगी ऑक्टेव्हिया हिच्याशीं नीरोचा विवाह झाला. ५४ सालीं क्लॉडियसला विषप्रयोग करून ठार मारण्यांत आलें व नीरो बादशहा झाला. त्याच्या कारकीर्दीचीं पहिलीं पांच वर्षे चांगल्या प्रकारें जाऊन प्रजा संतुष्ट होती. पण नीरोचा मूळ स्वभाव गर्विष्ठ, उद्दाम व क्रूर असल्यामुळें हळूहळू तो प्रजेला अप्रिय होऊं लागला. ६३ सालीं पॉम्पी शहराचा कांहीं भाग भूकंपानें नष्ट झाला, व ६४ सालीं रोम शहराला आग लागली. याप्रमाणें अनर्थकारक व अनिष्ट गोष्टी घडून आल्यामुळें रोमवर ईश्वरी कोप झाल्याचा संशय पुष्कळांना येऊं लागला, व प्रजेला बादशहा अप्रिय वाटूं लागला. यावर उपाय म्हणून कित्येक धार्मिक विधी करण्यात आले व ख्रिस्ती लोकांना ठार मारण्यांत आल. नीरोनें उत्तम सडका व उत्तम राजवाडे बांधण्याचें काम चालविलें होते. त्याकरितां जो अतोनात पैसा लागला तो प्रजेपासून जुलमानें वसूल केला. कित्येक ग्रीक श्रीमंत गृहस्थांना पैसा मिळविण्याकरितां ठार मारिले व देवालयें लुटलीं. त्यामुळें भयंकर असंतोष वाढून बादशाही सैन्यहि त्याच्याविरुद्ध उठलें. तेव्हां रोम शहर सोडून पळून जाऊन नीरोनें आत्महत्या केली.

**नील**—या नांवाच्या अनेक पौराणिक व्यक्ती आहेत. उदा., १. रामसेनेंतील वानर; यानेंच लंकेला जाण्यासाठीं सेतु बांधला. २. पुरुकुलोत्पन्न अजमीढ यास नीलिनीपासून झालेला पुत्र. याच्यापासून उत्तर पांचालाचें राज्य सुरू झालें. ३. भारतीय युद्धांतील पांडवपक्षीय एक राजा. हा अनूप देशाचा राजा असून अश्वत्थाम्यानें याला मारलें. ४. किष्किंधेच्या दक्षिणेस असणाऱ्या माहिष्मती नगरीचा राजा. यास राजसूय यज्ञकाळीं, सहदेवानें जिंकिलें होतें. पुढें अश्वमेधकाळींहि हा अर्जुनास शरण येऊन साहाय्यक झाला होता. याशिवाय नील म्हणजे कुबेराच्या नवनिधींतील आठवा निधि व आपण राहतों याच्या व्युत्क्रम अंगीं असणारा पर्वत; हा इलावृत्ताच्या उत्तरेस आहे.

**नीलकंठ दीक्षित**—एक संस्कृत कवि. हा नारायण दीक्षिताचा पुत्र, व अप्पय्या दीक्षित याचा नातू किंवा पुतण्या. यास सर्व शास्त्रांतील थोडथोडेंच, परंतु चांगलें ज्ञान होतें. शिवाय यास कविताशक्तिहि होती. कलिविडंबन, गंगावतरण, शांतिविलास हीं काव्यें यानें लिहिलीं आहेत. हा आपल्या बुद्धिचातुर्यानें मदुरा शहराचा राजा तिरुपतिमल्ल नाईक याचा प्रधान झाला. प्रधानकीचें काम चालवीत असतां याच्या कारकीर्दींत प्रजा सुखानें नांदत होती. यानें नीलकंठविजय नांवाचा एक चंपू लिहिला आहे (१६३३) व त्यांत नाना तऱ्हेच्या अनेक देशांचें वर्णन नाटकाच्या पद्धतीवर केलें आहे.

**नीलकंठ धर्मपूरकर**—वऱ्हाडांतील माहूरजवळील गोदातीरच्या धर्मपूरचा प्रसिद्ध ज्योतिषी. याचा आजा चिंतामणि हा साहित्यांत व ज्योतिषांत पारंगत होता. याचा बाप अनंत याचे 'जातकपद्धति' व 'कामधेनुटीका' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. नीलकंठानें 'ताजकनीलकंठी' नांवाचा फलज्योतिषावर एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत फारशी व अरबी शब्द बरेच आहेत. अनंत काशीस गेल्यावर नीलकंठाचा लौकिक फार वाढला व तो अकबराच्या दरबारीं एक मुख्य पंडित बनला. नीलकंठाचा भाऊ राम यानें 'मुहूर्तचिंतामणि' हा ग्रंथ लिहिला आहे. 'रामविनोद' नांवाचा करणग्रंथ रामानें जयपूरच्या एका राजासाठीं तयार केला.

**नीलकंठ मोरेश्वर पिंगळे** (मृत्यु १७०८)—निळो मोरेश्वर पाहा.

**नीलकंठशास्त्री थत्ते**— हा पंडित वांई येथील राहणारा कोंकणस्थ ब्राह्मण. हा पेशवाईच्या अखेरीस होता. याचें अध्ययन काशीस झालें. याचा मुख्य बाणा व्याकरणाचा असे, तरी यानें

न्यायशास्त्रादि विपयांत अनेक विद्यार्थी तयार केले. याच्या विद्यार्थ्यांत मोरूशास्त्री गोडबोले, मोरेश्वरशास्त्री साठे, कुप्पाशास्त्री द्रविड, त्र्यंबकशास्त्री शालिग्राम, विनायकशास्त्री दिवेकर, इत्यादि प्रमुख होते. बाळाजीपंत नातू याची कन्या याच्या मुलाला दिली होती. या नीलकंठशास्त्र्यांचा एक वाडा पुण्यांत नानाच्या हौदाजवळ (जुनें भावे स्कूल येथें) व दुसरा कबुतरखान्याजवळ होता. याची शिष्यपरंपरा गजेंद्रगडकर, अभ्यंकर, वगैरे घराण्यांत दिसून येईल.

**नीलगाय**—रोही. हा एक दाढी असलेल्या सांबराच्या जातीचा प्राणी आहे. याचा आकार मोठ्या सांबराएवढा असून याचीं शिंगें आंखूड व वांकलेलीं असतात. याचे केस निळसर असतात. मादीला शिंगें नसतात. ती थोडीशी करडी तांबूस दिसते, म्हणून तिला 'नीलगाय' हें नांव पडलें आहे. या प्राण्यांची शिकार करतात. हे पिकांस फार उपद्रव देतात.

**नीलगिरि**—मद्रास इलाख्यांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ९८९ चौरस मैल. व लोकसंख्या ३,०९,७०२. यांत उटकमंड, कुन्नूर व गुडलूर हे तीन तालुके व एकंदर खेडीं ५० आहेत. येथील सर्वसाधारण प्रदेश ६५०० ते ८००० फुटांपर्यंत उंच आहे. उटकमंड हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून उन्हाळ्यांत मद्रास सरकारचें व कांहीं संस्थानिकांचें राहण्याचें ठिकाण असे. येथें पंडी, बेगूर, भवानी, वगैरे नद्या आहेत. पाऊस कांहीं ठिकाणीं १६१ इंच पडतो. येथें उदेयारकोट, हुळिकलदुर्ग, व मालीकोटी असे तीन किल्ले आहेत. येथें कॉफीची लागवड बरीच करतात आणि १०,००० एकर जमीन चहाच्या मळ्यांनीं व्यापली आहे व १००० एकरांपेक्षां अधिक जमिनींत सिंकोनाची लागवड आहे. नड्डवत्तम येथें किनाइन तयार करण्याचा कारखाना आहे. वायनाडच्या प्रदेशांत फक्त तांदूळ होतो. सिगूरच्या जंगलांत चंदनाचें लांकूड चांगल्यापैकीं होतें. लोखंड, अभ्रक, सुवर्णरजमिश्रित स्फटिक, वगैरे खनिज पदार्थ येथें सांपडतात. अरवणघाट खोऱ्यांत बिनधुराची बंदुकी दारू तयार करण्याचा सरकारी कारखाना आहे.

**नीलगिरि पर्वत**—दक्षिण हिंदुस्थानांतील ही पर्वतराजि पश्चिमेस सह्याद्रीच्या शाखेला मिळते. याच्या दक्षिणेस पालघाटचें मोठें खोरें आहे व त्यांतून कर्नाटक आणि मलबार यांमधील दळणवळण चालतें. नीलगिरीचा आकार विपमभुज त्रिकोणासारखा असून पाया मलबारच्या बाजूस दक्षिणोत्तर आहे. उत्तर बाजू म्हैसूरच्या समोर असून पूर्व-पश्चिम पसरली आहे. उरलेली बाजू नैर्ऋत्य-ईशान्येस कोइमतूर जिल्ह्याकडे आहे. कोइमतूरपासून जी चढ लागते ती पांचसात हजार फुटांपर्यंत जाते. सर्वांत उंच शिखर दोडबेट्टा ८,७६० फूट उंच आहे. या पर्वतावर दाट झाडी किंवा जंगल एकसारखें दिसणार नाहीं. पर्वतशिखरावर व दऱ्याखोऱ्यांतून झाडीचे पुंजके दिसतील. टेंकड्यांच्या पायथ्याजवळील जंगलांतून पुष्कळ हत्ती आहेत, पठारावर मात्र ते राहत नाहींत. वाघ, चित्ते, आस्वलें, हरण, कोल्हे हे प्राणी व विविध पक्षीहि आहेत. साप मात्र थोडे आहेत. विंचू किंवा गोमी मात्र बिलकुल नाहींत.

नीलगिरीवरील लोक—नीलगिरीवरचे मूळचे लोक बडगा, इरूल, कुरुंबा, कोटा व तोडा या पांच जातींचे आहेत. बडगा जातीचे लोक शैव संप्रदायी आहेत व ते अपभ्रष्ट कानडी भाषा बोलतात. कोटा जातीचे लोक तांबूस रंगाचे पण सुंदर असतात. हे लोक भातशेती करतात व शिवाय सोनारकाम, सुतारकाम, लोहारकाम, कातडी कमाविणें, दोऱ्या वळणे, छत्र्या तयार करणें, वगैरे कामें करतात व बायका कुंभारकाम करतात. यांच्या देवाचें नांव कामतराय असून याचा उत्सव १५ दिवस चालतो. तोडा जातीची संख्या सुमारें ७०० आहे. डोळे पाणीदार, काळेतुळतुळीत केस, सुरेख दांत, मध्यम उंची अशी यांची ठेवण असते. गुरें पाळणें व शेतकी करणें हे यांचे मुख्य धंदे आहेत. तुद पाहा.

**नीलगिरि संस्थान**—ओरिसांतील एक जुनें मांडलिक संस्थान. क्षे. फ. २६३ चौरस मैल. एक-तृतीयांश भाग डोंगराळ असून त्यांत इमारती लांकूड सांपडतें. ज्यापासून दगड्या, वाडगे, वगैरे भांडीं तयार करतात, तो काळा दगड येथें सांपडतो. छोटानागपूरमधून आलेल्या एका शूर पुरुपानें या संस्थानाची स्थापना केली असें सांगतात. संस्थानचें उत्पन्न तीनचार लाख रुपये असून ब्रिटिश सरकारास खंडणी ३९०० रुपये द्यावे लागत. लो. सं. ७३,१०९ असून एकंदर २८४ खेडीं आहेत. नीलगिरि येथें राजा राहत असल्यामुळें या खेड्यास महत्त्व आलें आहे. येथें हिंदूंची लोकसंख्या फार असून खंडैत, भूमिज, ब्राह्मण, गौड, हो, इत्यादि जातींचे लोक आहेत. हे संस्थान १९४८ सालीं ओरिसा प्रांतांत विलीन झालें.

**नीलपांडु**—( सायनॉसिस ). शरीरामध्यें असणाऱ्या रक्तांत प्राणवायूचें प्रमाण कमी झालें असतां त्याचा रंग निळा होऊन कातडी निळी दिसूं लागते, तेव्हां हा विकार होतो. हा विकार

विशेपतः चेहऱ्यावर आणि हाताचीं किंवा पायाचीं बोटें यां-सारख्या शरीराच्या अग्रभागावर विशेषेंकरून दिसूं लागतो. तसेंच ज्या मुलांस जन्मतःच हृद्रोग असतो त्यांच्याहि शरीरावर असाच वर्ण दृष्टीस पडतो. हा विकार फुप्फुसांची श्वसन-क्रिया नियमितपणें होण्याच्या मार्गांत कांहीं प्रतिबंध आला असतां उत्पन्न होतो. त्यामुळें हृदय व फुप्फुसें यांच्या विकारामध्यें हा दिसून येतो. जेव्हां तीव्र प्रकार असतो तेव्हां हा असाध्य असतो. परंतु सामान्यतः हृदयाच्या व फुप्फुसांच्या कायमच्या विकारामध्यें मनुष्य हिंडत फिरत असतांहि थोडासा नीलवर्ण त्याच्या शरीरावर दिसत असतो.

**नीलमणि**—( इं. सॅफायर ). एक रत्न. हें कुरुंदाच्या जातींतील आहे. याला नील, शनि असेंहि म्हणतात. हा बहुधा अस्मानी रंगाचा असून कठिणपणाविषयीं हिरा व लाल यांच्या खालोखाल असतो. फिक्कट निळा व गहिरा निळा यांच्यामधील रंगांचे नीलमणी असतात. उत्तम नील ब्रह्मदेश, सिलोन, बोहेमिया व सायलेशिआ या टापूंत मिळतात. २ रतींहून कमी वजनाच्या दर नीलास ३०–४० पासून १२० रुपये महायुद्धापूर्वीं पडत. उत्तम नील ४ पासून ६ रतींपर्यंत मोठा असला तर त्यास तेवढ्याच वजनाच्या हिऱ्यापेक्षांहि जास्त किंमत पडते. याशिवाय पांढऱ्याशुभ्र रंगाचे, पिवळया व हिरव्या रंगाचेहि नीलमणी आढळतात.

**नीला**—( सायनोजेन ). एक वर्णहीन व अत्यंत विषारी वायु. कोकच्या भट्ट्यांच्या आणि झोतभट्टी( ब्लास्ट फर्नेस ) च्या धुरांत हा वायु थोड्या प्रमाणांत सांपडतो. नीलाचा एखाद्या मूलद्रव्याशीं संयोग होऊन नीलिद (सायनाइड) बनतो. हा नील वायु द्रवरूप करतां येतो. जळतांना याची ज्योत निळी दिसते.

**नीलांबरी**—हा राग काफी थाटांतील जन्यरागांपैकीं एक आहे. याच्या आरोहांत धैवत वर्ज्य होतो व अवरोह सात स्वरांनीं होतो; म्हणून याची जाति पाडव–संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर मानितात. या रागांत आरोहांत तीव्र गांधार स्वर लागलेला केव्हां केव्हां दृष्टीस पडतो. यांत षड्ज व पंचम या स्वरांची संगति आहे. गांधार स्वरावर कंपन असतें. यांत भीमपलाशी व मधुमाद या रागांची छाया दृष्टीस पडते.

**नीलामिद**—(सायनामाइड). खटकर्बिद ( कॅल्शिअम कार्बाइड ) नत्र( नायट्रोजन )च्या वातावरणांत १०००° शतमानाला तापविलें असतां किंवा चुनखडी आणि कोळसा हवेंत २०००° शत. तापवला म्हणजे हा पदार्थ तयार होतो. पाण्यानें त्याचें विघटन होतें, आणि त्याच्यांत नत्र नसल्यामुळें अमोनिया तयार होतो. ह्यामुळें खट–अनामिदा( कॅल्शियम सायनामाइड )चा खत म्हणून उपयोग करतात.

**नीलिदीकरण**—( सायनाडाइंग ). सिंधुनीलिदा( सोडियम सायनाइड )च्या मदतीनें खनिज धातूंतून सोनें काढण्याची पद्धत. प्रथम खनिज धातूंचें पीठ ( १५० ते २०० भोंकांच्या चाळणींतून पडणारें ) करतात व नंतर त्याच्या वजनाच्या $\frac{1}{2}$ वजनाचें नीलिद्द्रव त्यांत घालतात. ह्या विद्रवांत नीलिदाचें प्रमाण शेंकडा ०·१ असतें. खनिज धातु दुसऱ्या वेळेस धुतांना नीलिद ह्यापेक्षां कमी प्रमाणांत घेतात. सोन्याबरोबर चांदी असेल तर नीलिदाचें प्रमाण ह्यापेक्षां जास्त घ्यावें लागतें. नीलिद्द्रवानें धुतल्यानंतर खनिज धातूंतील सोनें विद्रवामध्यें सिंधुसुवर्ण नीलिद( सोडियम ओरोसायनाइड ) म्हणून येतें; त्यांत जस्ताच्या तारांचे तुकडे टाकले म्हणजे विद्रवामधून सोनें बाहेर पडून 'गाळा'च्या रूपानें खालीं बसतें. ह्या गाळांतून पुढें नेहमींच्या पद्धतीनें शुद्ध सोनें तयार करतात. एक तोळा सोनें तयार करण्यासाठीं १४ तोळे नीलिद व ४ ते १२ तोळे जस्त लागतें.

**नीलीन**—( ॲनिलाइन ). ह्या पदार्थापासून अनेक रंग, स्फोटक द्रव्यें आणि निरनिराळीं उपयुक्त औषधें तयार करतां येत असल्यामुळें रासायनिक उद्योगधंद्यांत याचें महत्त्व अतिशय आहे. १८२६ सालीं उनफर्डोबेन ह्यानें निळीपासून हा पदार्थ तयार केला. दगडी कोळशाच्या डांबरांतहि थोड्या प्रमाणांत नीलीन सांपडतें. पण हें तयार करण्याची नेहमींची पद्धत म्हणजे प्रथम बानजावीन( बेंझेन )चा नत्रीकरणा( नायट्रेशन )नें नत्रबानजावीन( नायट्रोबेंझेन ) तयार करणें व नंतर लोखंडाचा चुरा आणि उष्ण हरिकाम्ल ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ) ह्यांच्या साहाय्यानें त्याचें शेवटीं नीलीन करणें. विजेच्या साहाय्यानेंहि नत्रबानजावीन( नायट्रोबेंझेन )पासून नीलीन तयार करतां येतें.

नीलीन हा एक वर्णहीन द्रव पदार्थ असून त्याला एक प्रकारचा वास येतो. १८०° शत. ( सेंटि. )ला तें उकळतें. ताजें उत्पातित( डिस्टिल्ड ) नीलीन पांढरें स्वच्छ असतें, पण कालांतरानें तें काळें, पिंगट काळें पडतें. नीलीन हा क्षार पदार्थ आहे. अम्लांच्या संयोगानें त्याचीं स्फटिकरूप लवणें तयार होतात. हींहि नीलीनप्रमाणें कालांतरानें काळीं पडतात. नीलीनच्या घटनेंत अमिनो( $NH_2$ )समूह आहे. त्यामुळें ०° शत. ला नत्रसाम्लाच्या साहाय्यानें नीलीनपासून द्विअजीव ( डायअझोनियम ) संयुक्तें तयार होतात; व हीं फेनॉल, नॅप्थॉल आणि इतर अमिनो संयुक्त ह्यांच्याबरोबर संयोग पावून निरनिराळ्या रंगांचीं संयुक्तें बनतात. ह्यांपैकीं पुष्कळांचा रंगाच्या कामीं चांगला उपयोग होतो. रोझानीलीन, मॅजेंटा, मिथिलीन ब्ल्यू, अनीलीन ब्ल्यू, इत्यादि रंग नीलीनपासून तयार

करतां येतात. स्फोटक द्रव्यांत त्रिनत्र( टेट्रा नायट्रो )नीलीन आणि त्रिनत्र( टेट्रा नायट्रो )मेथिलानीलीन, 'टेट्रील' ह्यांचा मुख्यत्वें उल्लेख केला पाहिजे. ॲंटीफेब्रिन आणि अटोक्सील हीं नेहमीं उपयोगी पडणारीं औषधें नीलीनपासूनच बनविलेलीं असतात.

**नीस्टर नदी**—हिचा उगम कार्पेथियन पर्वताच्या उत्तरेकडील उतारापासून आहे. पहिल्या ३५० मैलांपर्यंत ही ऑस्ट्रियाच्या ताब्यांत आहे व पुढील ५२० मैल रशियाच्या ताब्यांत आहे. हिच्या पात्रांत बरेच खडक आहेत. वर्षातून दोन वेळां हिला मोठा पूर येतो. या नदीचा व्यापारासाठीं चांगला उपयोग होतो. हिच्यांत आगबोटी चालतात. मुख्य उपनदी सेरेथ ही होय.

**नीळ**—( इंडिगो ). हा एक महत्त्वाचा रंगपदार्थ असून कापड रंगविण्याच्या कामीं याचा फार उपयोग होतो. गुळी ( नीळी ) वनस्पतीपासून हा रंग बनवितात. निळ्या रंगाखेरीज नीळ–जिलेटिन, नीळ-तांबडा, नीळ-करडा हे रंग द्रावकांच्या साहाय्यानें निळीपासून तयार होतात. निळीचें झाड हिंदुस्थान, जावा व नाताळ (आफ्रिका) या ठिकाणीं होतें. निळीचे मोठमोठे मळे असून फार मोठें उत्पन्न येतें. १८७० सालापासून कृत्रिम रीतीनें हा रंग तयार होऊं लागला आहे व जगांतील निळीच्या खपाच्या नव्वद टक्के माल कृत्रिम निळीचा असतो. इंडिगोटाइन ही कृत्रिम नीळ शाई करण्याच्या व रंग देण्याच्या कामीं मोठ्या प्रमाणांत वापरतात.

पूर्वी पश्चिम हिंदुस्थानांत निळीचे कारखाने होते. ते पुढें बंगाल व नंतर तिरहुत आणि संयुक्त प्रांत इकडे गेले. जर्मनांनीं कृत्रिम रंग काढल्यानंतर असे कारखाने बसले. अलीकडे रासायनिक रीत्या नीळ तयार होऊं लागल्यामुळें नैसर्गिक वनस्पतिजन्य निळीचा धंदा संपुष्टांत आला.

भारतीय अभिजात वाङ्मयांत नील शब्द वापरलेला आहे व प्राचीन युरोपियन ग्रंथकारांनीं 'वोड' नामक झाडाचा उल्लेख केला आहे. संस्कृत नील म्हणजे हें वोड झाडच असावें. निळीचा रंग काढण्याकरितां रम, रायअम, नेरियम, जिम्नेमा, तिंगिन्स, स्पिलॅन्थेस, टिक्टोरिया, वगैरे अनेक झाडांचा उपयोग करण्यांत येतो. निळीचें झाड बहुवर्षायु आहे. परंतु तें दोन वर्षांपेक्षां जास्त दिवस ठेवीत नाहींत. या झाडाला चिंचेच्या पानांप्रमाणें बारीक पानें येतात व मठाच्या शेंगेप्रमाणें शेंगा येऊन त्यांत बारीक बींहि येतें. रब्बी पिकें करण्यास योग्य अशा जमिनींत निळीची लागवड चांगली होते. निळीचीं झाडें सकाळीं कापून चुनेगच्ची गोल कुंडींत दगडाखालीं दाबून ठेवतात व त्यांत स्वच्छ पाणी सोडतात. २४ तासांनीं पाल्यांतील रंग पाण्यांत उतरतो. हा निळीचा रंग पक्का असतो.

पूर्वी हिंदुस्थान हें या रंगाचें उत्पत्तिस्थान होतें. फार पुरातन कालापासून येथून जगांतलीं निरनिराळीं राष्ट्रें नीळ नेत असत. सतराव्या शतकाच्या मध्यापर्यंत नीळ स्वर्वस्वीं हिंदुस्थानची होती. इंग्लिश व्यापारी आरंभीं पोर्तुगीजांकडून निळीची खरेदी करीत असत. बिआना, जंबुसर, सारखेज व बडोदा येथें नीळ होत असे. बिआनाच्या निळीला इराण – आर्मेनिआंत अतिशय मागणी असे. इंग्रजांनीं १६३० मध्यें हा व्यापार इतरांच्या हातून बळकावून घेतला व ते स्वतः नीळ बाहेर पाठवूं लागले.

निळीचा व्यापार परक्यांच्या हातीं जाऊं नये अशी अकबराची इच्छा असल्यामुळें त्यानें मनोहर दास नांवाच्या व्यापाऱ्याला साऱ्या निळीचा मक्ता ११ लाखांना विकला. इंग्रज व डच व्यापाऱ्यांचें हा प्रकार पाहून पित्त खवळलें व त्यांनीं ह्या गोष्टीचा धिक्कार करण्याकरितां एक वर्षपर्यंत बिलकुल नीळ खरेदी करावयाची नाहीं असा निश्चय केला. त्यांनीं नंतर बादशहाला पेंचांत धरण्याकरितां भडोच, अहमदाबाद, खंबायत व आग्रा येथील वखारी बंद करण्याचा धाक घातला आणि त्या धाकाचा परिणाम होऊन मनोहर दासाची मक्तेदारी रद्द झाली. यानंतर हा व्यापार कांहीं काळ मंदावला. कारण, वेस्ट इंडीजकडून पुष्कळ नीळ येऊं लागली. पण पुढें लवकरच ही मंदी जाऊन तेजीचा काळ आला. इंग्लंडमध्यें नीळ अतोनात खपूं लागली. पण १८ व्या शतकाअखेर हा व्यापार अगदींच थंडावला असें म्हणावयास हरकत नाहीं.

१९ व्या शतकांत युरोपमधील मळेवाले येथें आले. त्यांनीं निळीचे मळे काढले. एवढेंच नव्हे तर लोकांवर जुलूम करून त्यांना नीळ पेरणें भाग पाडलें. युरोपमधील मळेवाले शेतकऱ्यांना आगाऊ पैसे देत व त्यांच्याकडून अमुक दरानें नीळ देऊं अशी कबुली घेत. मळेवाल्यानें जुलूम केला तर त्याला कोर्टें दाखवितां येत असे; पण या कोर्टांत क्वचितच न्याय मिळे. हा जुलूम बंगालमध्यें विशेषतः होत होता. १८३० च्या सुमारास पुष्कळसे हिंदी लोकहि नीळ करूं लागले; पण त्यांचा माल हलका असें म्हणण्यांत येऊन कोणी घेत नसे. त्या वेळीं सुमारें १,०००

युरोपियन येथें निळीचा धंदा करीत. हे लोक युरोपांतून भांडवल आणीत नसत. येथेंच कोणाजवळून तरी भांडवल काढीत. त्या वेळीं बंगाल्यांत ३००-४०० कारखाने होते व ते जेसोर, कृष्णागड, व तिरहुत येथें होते. येथील नीळ इंग्लंडमध्यें फार मोठ्या प्रमाणावर जाई व त्याचें उत्पन्न ५-५॥ कोट रुपये येई.

फ्रान्सच्या राज्यक्रांतीनंतर सेंट डॅमिंगो बेट तेथील लोकांनीं बंड केल्यामुळें नष्ट करून टाकण्यांत आलें आणि त्याच कारणामुळें इकडील निळीचा व्यापार वाढला. पण हा व्यापार हिंदी लोकांच्या हातून युरोपियन मळेवाल्यांनीं आपल्या हातीं कसा घेतला हें वर आलेंच आहे. १८०० सालीं १२,८११ निळीच्या पेट्या पाठविण्यांत आल्या व १८२७ मध्यें हा आंकडा ३०,००० वर गेला.

हा निळीचा व्यापार अत्यंत जुलमानें केला जाई. मळेवाले गरीब मजुरांना गुराप्रमाणें छळीत. पुष्कळसे मजूर लत्ताप्रहारामुळें प्लीहा, वगैरे फुटून मरत. त्यांना फटके मारणें, कोंडून ठेवणें, वगैरे प्रकार राजरोसपणें चालत असत. हा जाच बंगालनें ५० वर्षें सहन केला. १८५९ मध्यें निळीच्या कामकऱ्यानीं बंड केलें आणि त्या बंडानंतर पुष्कळसे गोरे मळेवाले येथून निघून गेले. हा निळीचा व्यापार पुढें थंडावत गेला.

**नीळल**—हें प्रथमतः सन १८६८ मध्यें बेअर यानें शोधलें. हें प्राणनीळलापासून संयोगीकरणाच्या योगानें तयार करतां येतें. प्राणनीळलाचें जशद-चूर्णाबरोबर ऊर्ध्वपातन केलें असतां हा पदार्थ मिळतो. नीळ सोज्जित केला असतां नीळल मिळतें. आसन्न-नत्र, दालचिनीअम्ल हें पलाश कर्चितार्शी तत केलें असतां आपणांस नीळल मिळतें. ह्याचा वितळण्याचा बिंदु ५२° हा असून हें २४५° वर उकळतें. हें एक कमजोर अनाम्ल आहे. पाइन झाडाच्या लांकडांना हें लावलें असतां त्यांचा रंग तांबूस होतो. ह्यापासून निघणारे बरेच पदार्थ प्रचारांत आहेत.

**नुकसानभरपाई**—(डॅमेजेस्). एका इसमाला दुसऱ्या इसमाच्या अपराधामुळें कांहीं आर्थिक नुकसानी, शारीरिक इजा किंवा किरकोळ स्वरूपाची नुकसानी झाली तर त्याबद्दल पैशाच्या रूपानें नुकसानभरपाई मागण्याचा हक्क कायद्यानें दिलेला आहे. अशा रकमेला कायद्यांत 'डॅमेजेस्' किंवा 'पिक्यूनिअरी कॉपेन्सेशन' (आर्थिक मोबदला) असें म्हणतात. असा अपराध मुद्दाम हेतुपूर्वक कपटलबाडीनें केलेला नसला तरी कायद्यानें नुकसानभरपाई मिळूं शकते. ती प्रत्यक्ष आर्थिक नुकसान झालें असेल, किंवा होण्याचा संभव असेल त्या प्रमाणांत मिळते. पण जर असा अपराध मुद्दाम हेतुपुरस्तर केलेला असेल तर प्रत्यक्ष आर्थिक नुकसानीपेक्षांहि शिक्षेच्या स्वरूपाची जादा नुकसानभरपाई कोर्ट देवविते.

**नू**—हे सांबराच्या जातीचे प्राणी आहेत. यांच्या दक्षिण आफ्रिकेंत तीन जाती आढळतात: १. पांढऱ्या शेपटीचे-हे नऊ

फूट लांब व ४ फूट उंच असतात. हे कळप करून राहतात व सहज माणसाळतात. २. निळ्या रंगाचे-हे जरा मोठे असतात व सर्वत्र आढळतात. ३. हे ब्रिटिश पूर्व आफ्रिकेंत आढळतात. नू हें हॉटेंटाट भाषेंतील नांव आहे. या प्राण्याचे नर आणि माद्या यांना खालीं वळलेलीं निमुळतीं शिंगें असतात. हे प्राणी फार क्रूर व चपळ असतात. पण आतां यांची जात नष्ट होत चालली आहे.

**नूतनतम हिमकाल**—(प्लीस्टोसीन). भूस्तरशास्त्रामध्यें कायनेझोइक वर्गाचा हा सर्वांत मोठा विभाग मानण्यांत येतो. हा भूस्तर अर्वाचीन भूस्तराच्या पूर्वी आढळतो. यामध्यें अखेरचा हिमप्रवाहकाल येतो, आणि याच भूस्तरामध्यें हायडेलबर्ग येथें सांपडलेल्या मनुष्याचे अस्थ्यवशेष होते.

**नून, मलिक सर फिरोजखान** (१८९३- )—एक हिंदी मुसलमान मुत्सद्दी. यांचा जन्म १८९३ मध्यें झाला. यांचें शिक्षण लाहोर येथील चीफ्स कॉलेज व ऑक्सफर्ड येथील वाढाम कॉलेज यांमध्यें झालें. इनरटेंपलमधून हे बॅरिस्टर झाले. लाहोर हायकोर्टाचे हे ॲडव्होकेट आहेत. हे १९२१ पासून पंजाब कायदे मंडळाचे सभासद होते. १९२७ मध्यें यांस स्थानिक स्वराज्य खात्याचे मंत्री नेमण्यांत आलें व १९३० मध्यें हे शिक्षणमंत्री झाले. तेथून त्यांची लंडन येथें हायकमिशनर म्हणून नेमणूक झाली (१९३६-४१). तेथून ते व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाचे सभासद झाले. युद्धकाळांत ते संरक्षणमंत्री होते. १९४४ मध्यें साम्राज्य युद्धसमितींत हिंदुस्थान सरकारतर्फें प्रतिनिधि होते. पाकिस्तान झाल्यावर तिकडील राजकारणांत भाग घेऊं लागले. यांचीं कांहीं पुस्तकें आहेत.

**नूनीया लूनीया**—मीठ तयार करणारांची एक जात. यांची एकंदर संख्या ८ लाखांपर्यंत आहे. पैकीं सं. प्रांतांत ४ लाख व बिहार–ओरिसांत सुमारें ३ लाख नूनीया आहेत. बंगाल्यांत ४२ हजार आहेत. यांच्यांतले जे वर्ग आहेत त्यांच्या नावांवरूनच यांची जात अनेकांच्या मिश्रणानें झाली आहे असें दिसून येईल. सरकारच्या मीठ करण्याच्या नियंत्रणामुळें आतां यांचा धंदा बंद पडला. मध्यप्रांतांत हे लोक बांधकाम व दगडाचें काम करूं लागले आहेत. हे लोक ब्राह्मणांकडून सर्व धार्मिक विधी करवितात.

**नूरजहान** ( १५७३–१६४५ )—मोंगल बादशहा जहांगीर याची आवडती राणी. हिचा बाप खुरासानचा वजीर होता. पण त्याला हालअपेष्टांत इराण सोडावें लागलें. वाटेंत बायको प्रसूत होऊन जी मुलगी झाली ती नूरजहान. पुढें अकबराच्या दरबारीं त्याला लहान मनसबदारी मिळाली. नूरजहानची आई मोठ्या घराण्यांतील व सुसंस्कृत, सुरूप व कलासंपन्न होती. तिचा व मुलीचा राजवाड्यांत राबता होता. जहांगीरची पहिली बायको ( खुश्रूची आई ) वारल्यावर त्याची नूरजहानशीं लग्न करण्याची इच्छा होती. पण अकबरानें तिचें लग्न शेर अफगाणखान या तरुण पठाणाशीं लावून तिला दूर केली; व जहांगीरचें दुसरें लग्न करून दिलें.

जहांगीर गादीवर आल्यानंतर त्यानें नूरजहानला जवळ करण्याचा सूक्ष्मासूक्ष्म प्रयत्न केला. पण खान-नूरजहान हें परस्परासक्त दांपत्य होतें. पण जहांगीरनें कपटानें शेरखानाला मारविलें व कांहीं दिवसांनीं नूरजहानचें मन वळवून तिला पट्टराणी केलें (१६१० ).

नंतर तिनें बादशहावर मोहिनी घालून सर्व कारभार आपल्या हातीं घेतला. इराणी अधिकारी आणून ठेविले. तिनें फार हुषारीनें सर्व गोष्टींकडे लक्ष पुरविलें; व राज्यांत सुधारणा केल्या. पण ती फार महत्त्वाकांक्षी असल्यानें जहांगीरनंतर गादीवर कोण यावा याविषयीं कारस्थानें सुरू झालीं. बादशहाचे चार मुलगे यांची राज्य मिळविण्याविषयीं खटपट सुरू होती. एका मुलाला आपला जांवई (पहिल्या नवऱ्यापासून झालेली मुलगी देऊन ) करून घेण्याचा डाव ती खेळली; पण त्यांत तिला यश आलें नाहीं. याच सुमारास जहांगीर फार आजारी पडला व खुश्रू वारला. शहाजहान फारच गडबड करूं लागला, तेव्हां त्याला दूर पाठविण्याच्या मागें ती लागली. पण तोहि बेत फसला. त्याची व बादशहाची दिल्लीजवळ निकराची लढाई झाली. शहाजहान बापाला शरण गेला, पण पुन्हां बंडाळी करूं लागला. सेनापति महबतखानहि उलटला. आसफखान व नूरजहान एकत्र येऊन त्यांनीं महबतखानाविरुद्ध डाव सुरू केले. तेव्हां महबतखानानें जहांगीरला पकडलें व ताब्यांत ठेविलें; व नूरजहानलाहि कैद केलें. पण तिनें कपटानें सुटका करून घेतली व बादशहाला आपल्या ताब्यांत घेतलें. नंतर रजपूत विरुद्ध मुसलमान असा लढा तिनें सुरू करविला. कारण महबतखान हा रजपुतांच्या बळावर शेर झाला होता. इतक्यांत जहांगीर एकदम मरण पावला व तिच्या हातची सर्व सत्ता गेली. तिला कोणी विचारीना. तिच्या भावानेंच तिला कैदेंत टाकून व मसलत करून शहाजहानास गादीवर बसविलें.

ती उच्च दर्जाची कवयित्री होती. महाराणी असतांना तिला वार्षिक ३७,५०,००० रुपयांची खाजगी नेमणूक होती. जहांगीरनंतर ती १८ वर्षे जिवंत होती, परंतु तिचा बहुतेक काळ कैदेंतच गेला. ती वयाच्या ७२ व्या वर्षी ( १६४५ ) लाहोर येथें वारली. तेथेंच जहांगीरच्या कबरेजवळ रावी नदीकांठीं तिचीहि कबर आहे.

**नूरपूर**—पंजाबांतील कांग्रा जिल्ह्याची एक तहशील. क्षे. फ. ५१९ चौ. मैल व लो. सं. सु. दीड लाख. नूरपूर गांव हें तहशिलीचें मुख्य ठिकाण असून हींत १९१ खेडीं आहेत. नूरपूर हें धरमसालाच्या पश्चिमेस ३७ मैल आहे. लो. सं. आठ हजार. ह्यास पूर्वी ' धामेरी ' म्हणत. येथें इब्राहीम गझनीकरानें बांधलेला किल्ला आहे. रणजितसिंगानें नूरपूर १८१५ सालीं काबीज केलें. मुख्य लोकवस्ती रजपूत काश्मिरी व खत्री लोकांची आहे. काश्मिरी लोक ' पशमिना ' लोंकरीच्या शाली तयार करतात. पूर्वी ह्या गांवास व्यापारीदृष्ट्या चांगलेंच महत्त्व होतें.

**नूरुद्दिन महंमद** ( १११७–११७३ )—ऊर्फ मलिक–उल्–अदील. सीरियाचा आताबक्ष वंशीय एक मुसलमान राजा. नूरच्या बापानें पॅलेस्टाइनमधील लॅटिन ख्रिस्त्यांच्या विरुद्ध जें धर्मयुद्ध ( क्रूसेड ) पुकारलें होतें तेंच नूरनें पुढें चालवलें. त्यानें एडेसा येथें कैद केलेल्या ख्रिस्त्यांची निर्दयपणें कत्तल केली व तें शहर बेचिराख करून टाकलें. ते शहर परत मिळविण्याकरितां युरोपीयन लोकांनीं दुसरें धर्मयुद्ध सुरू केलें ( ११४८ ), पण त्यांत नूरनें व त्याच्या सेलजुक तुर्कांनीं युरोपियनांचा पुरा मोड केला. त्यामुळें नूरची सत्ता वाढली. त्याने दमास्कस ही राजधानी करून पॅलेस्टाइनच्या भोंवतालचा सर्व प्रांत व ईजिप्तच्या फातिमाइत सरहद्दीपर्यंतचा प्रांत हस्तगत केला. राज्यांत सुधारणा करून मशिदींत विद्यालयें, दवाखाने, पाणपोया, वगैरे गोष्टी केल्या. त्यामुळें त्याचें नांव बगदादच्या खलीफासारखें खुतब्यांत व खुद्द मक्का–मदीना येथील प्रार्थनेंत येऊं लागलें.

**नूशेरवान अदल**—प्राचीन इराणचा एक राजा. हा इ. स. ५३१ त गादीवर आला. नूशेरनें सीरिया, ॲंटिऑक, भूमध्य समुद्रकिनारा, आयबेरिया, कॅलकॉस, फासीस, वगैरे प्रांत जिंकले.

हा लष्करी धोरणांत वाकबगार होता. फक्त त्याला तोड म्हणून बेलिसरीअस हा एक निघाला. नूरशेर हा जस्टिनियनला आपल्या मांडलिक राजाप्रमाणें वागवीत असे व त्यानें त्याच्यापासून ३० हजार दिनार खंडणी घेतली व पश्चिम दिशेकडे आपला दरारा बसविला. महमंद पैगंबर याचा जन्म नूशेरच्या कारकीर्दीत झाला.

**नृत्य**—लयदार शारीरिक हालचाली अशी नृत्याची व्याख्या करतां येईल. पण नृत्याला कांहीं हेतु, कांहीं तरी कल्पना व भावना यांची भूमिका असावी लागते. तीशिवाय नृत्यांत आकर्षकता व सभ्यता यावयाची नाहीं. आजच्या वाद्यांची कल्पना निघून तीं वाद्यें प्रचारांत येण्यापूर्वीहि मनुष्य नृत्यप्रसंगीं ताल धरीत होता आणि याचा पुरावा आज रानटी म्हणून मानलेल्या मानवजातींच्या नृत्यांतहि पाहावयास मिळतो. या तालानंतर संगीत किंवा प्रत्यक्ष गायन आणि उठावासाठीं स्वरमेळाची साथ मनुष्य नृत्यप्रसंगीं घेऊं लागला व आज त्यानें त्या बाबतींत पूर्णता मिळविली आहे.

एकव्यक्तिनिष्ठ, अनेकव्यक्तिनिष्ठ किंवा सामुदायिक नृत्यप्रकारांची कल्पना स्थिर झाल्यावर नृत्य कोणासाठीं करावयाचें, केव्हां करावयाचें व त्या प्रसंगाचें वैशिष्ट्य म्हणून काय राखावयाचें, यांसंबंधींचा विचार होत होत कांहीं रूढी प्रचारांत आल्या. धर्मशास्त्रांत, राजनीतिशास्त्रांत नृत्याचा समावेश झाला आणि अर्थातच ती एक कला म्हणून मानली गेली.

खुद्द देवेंद्रानें नृत्यांत भाग घेऊन नृत्याचा मान राखला. इंद्राच्या राजसभेंतील अप्सरांचे ताफे देवांच्या नृत्यप्रीतीची साक्ष देतात. देवाधिदेव शंकर ही तर मूर्तिमंत नृत्यदेवताच. नाट्यकलेचें व नृत्यकलेचें आधिदैवत म्हणून महेशाचा सर्व देवतांनीं गौरव करून त्याला 'नटेश्वर', 'नटराज' ही पदवी दिली. प्रत्यक्ष श्रीकृष्णाच्या 'रास' क्रीडा व कालिया-मर्दनानंतर त्याच्या मस्तकावर केलेलें नृत्य लोकविख्यात आहे. असे अनेक दाखले नृत्य हें एके काळीं सर्वांना आवडतें होतें, हे सिद्ध करण्यासाठीं देतां येतील.

नृत्याचा पहिला हेतु 'आकर्षण' हाच आहे. नृत्य हें भावनाविष्करणाचें एक उत्कृष्ट साधन आहे असें म्हणतां येईल. नृत्यांत एखादी कथा वा प्रसंगहि दाखवितां येतो. काव्याचे जसे अनेक प्रकार आहेत तसेच नृत्याचे आहेत. एकेका राष्ट्राच्या काव्याचें वैशिष्ट्य असतें, व तसेंच कांहीं वैशिष्ट्य नृत्यांतहि दिसून येते. हिंदी लोकांच्या आध्यात्मिक वृत्तीची छाप हिंदी नृत्यावर पडलेली आहे. अरबी किंवा तुर्की लोकांच्या लढाऊ वृत्तीचा परिणाम त्यांच्या नृत्यावरहि झाला आहे. नृत्याचा पण शिस्तवार अभ्यास करून त्यांत सारखी भर घालण्याचें काम पाश्चात्य राष्ट्रें जितक्या उत्साहानें करतात, तितक्या उत्साहानें या विषयाकडे इतर राष्ट्रांतील लोकांचें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांत आज जे नृत्यप्रकार रूढ आहेत ते बहुशीं स्पेनमधील रूढ नृत्यप्रकारांपासून निर्माण झालेले आहेत.

पाश्चात्य आणि पौरस्त्य नृत्यांतील मुख्य भेद असा कीं, पाश्चात्य नृत्यांत शारीरिक कौशल्यावर भर फार. याउलट हिंदी नृत्यांत भावनात्मकतेला महत्त्व फार. वास्तु-मूर्तिशिल्पांतून प्राचीन भारतीय नृत्याचे नमुने किती तरी आढळतात व ते पाहून अर्वाचीन नर्तक आपल्या कलेंत सुधारणा करतात असा अनुभव आहे.

पुत्रजन्म, आदरातिथ्य, राजसभेची सुरुवात, देवपूजा, विजययज्ञ, कोणताहि आनंदाचा प्रसंग, कथाप्रसंग, करमणूक, अनुनय, हे नृत्याला उत्तम प्रसंग होत.

तांडवनृत्य, कालीनृत्य, सर्पनृत्य, पतंगनृत्य, रास, गरबा, सेवानृत्य, पूजानृत्य, वगैरे अनेक हिंदी नृत्याचे प्रकार आहेत. हिंदी नृत्यांत डोळे, उत्तमांग, हात व हातांचीं बोटें हींहि कांहीं एक अर्थ विशद करून दाखवीत असतात. नाजुक मानवी विकार हिंदी नृत्य उत्कटपणें दाखवितें. नर्तकाच्या पायांतील घुंगुर ताल सांभाळीत असतात व प्रसंगीं आपल्या नाजुक आवाजानें नृत्याला मोठी आकर्षकता आणतात. भारतीय संगीत व नृत्य यांचा फार जिव्हाळ्याचा संबंध आहे. संगीतांत अमुक वेळीं अमुक राग आळविला असतां जास्त गोड लागतो; कारण त्या कालास अनुसरून त्याची स्वररचना केलेली असते. या संगीतांतील सूक्ष्म भेदाचा उपयोग हिंदी नृत्यानें भरपूर करून घेतलेला आहे. नृत्याला तालाची जरूरी आहेच व ती मृदंग, तबला, व वाद्यें यांच्या साहाय्यानें भागविली जाते.

हिंदी नृत्यांत अनेक पंथ आहेत. पैकीं गुजराथी, मारवाडी, बंगाली व कथकली हे प्रमुख होत. मात्र हिंदी नृत्य एका विशिष्ट वर्गाकडेच राहिलें आहे. वेश्या व देवदासी यांनीं धंद्याच्या निमित्तानें का होईना पण हिंदी नृत्य टिकविलें आहे. अगदीं अलीकडे उदयशंकर, नटराज वशी, मेनका, अझुरी, इत्यादि नर्तक-नर्तकींनीं सर्व समाजाला गोडी लावण्याचें व हिंदी नृत्याचें पुनरुज्जीवन करण्याचे प्रयत्न चालविले आहेत. हिंदी नृत्यांत थोडा योगाचाहि भाग असून आत्म्याच्या विकासाच्या दृष्टीनेंहि हिंदी नृत्याचें महत्त्व आहे असें कांहीं प्रतिपादतात.

बंगाल्यांत अलीकडे नृत्याची एक उत्कृष्ट कला म्हणून वरच्या वर्गांत चहा होत असून त्याचें शाळांतून व स्वतंत्र रीतीनें शिक्षणहि दिलें जात आहे. आपल्याकडेहि या गोष्टीचें अनुकरण झालेलें दिसून येतें. या कलेचा कौटुंबिक जीवनांत उपयोग कितपत आहे व ती कोठल्या वयांत शिकावी व तिचें सामाजिक

महत्त्व कोठपर्यंत ठेवावें, या बाबींचा विचार अद्यापि समाजसुधारकांनीं किंवा शिक्षणतज्ज्ञांनीं केलेला दिसत नाहीं.

पाश्चात्य देशात अर्वाचीन नृत्याचा आरंभ सामान्यतः १५ व्या शतकामध्यें इटलींत विद्यापुनरुज्जीवनकालामध्यें झाला असावा असें दिसून येतें. परंतु नृत्यकलेस योग्य वळण देऊन तिला अभिजात स्वरूप देण्याचें कार्य फ्रान्समध्यें यानंतर बऱ्याच दीर्घकालानें सुरू झालें असें आढळतें. फ्रान्स देशामध्यें वास्तविक पाहतां राष्ट्रीय असे नृत्याचे प्रकार फारसे नव्हते. परंतु तेथील कलावंतांनीं दुसऱ्या देशांतील निरनिराळ्या नृत्याच्या प्रकारांचा स्वीकार करुन त्यांस पूर्णत्व आणलें. फ्रेंच जानपद नृत्यांचे प्रकार अनभिजात, परंतु खेळकर वृत्तीचे निदर्शक होते. याच्या उलट उच्च वर्गातील व दरबारी नृत्यप्रकार फार गंभीर व अभिजात स्वरूपाचे होते. त्यांपैकीं एक (पॉव्हान) प्रकार तर नृत्यासारखा न दिसतां मिरवणुकीसारखाच वाटत असे. यानंतर 'साराबांद' हा लोकप्रिय नृत्यप्रकार प्रचलित झाला, व 'मिन्युएत' या नृत्यप्रकारापासून 'कुरान्त' या नृत्यप्रकाराची वाढ झाली. यानंतर १७७० च्या सुमारास हल्लींहि अतिशय लोकप्रिय असलेला 'वाल्ट्झ' हा नृत्यप्रकार प्रचलित झाला. इंग्लंडमध्यें मॉरिस नांवाचा एक प्राचीन नृत्यप्रकार तिसऱ्या एडवर्डच्या कारकीर्दींत सुरू झालेला आढळतो. तो बहुधा स्पेनमधील मूर लोकांच्या एखाद्या नृत्यप्रकारावरून घेतलेला असावा. ब्रिटिश राष्ट्रीय नृत्यप्रकारामध्यें स्कॉटलंडमधील 'रील' आणि 'स्ट्रॅथस्पे' हे प्रकार व आयर्लंडमधील 'जिग' हा प्रकार विशेष प्रचलित दिसतो. अगदीं अलीकडे कांहीं अमेरिकन नृत्यप्रकार उदा., 'बार्न' नृत्यें व 'फॉक्स ट्रॉट' व यासारखेच आणखी 'टँगो', 'चार्लस्टन', इत्यादि प्रकार ब्रिटनमध्यें विशेष लोकप्रिय झालेले दिसून येतात.

**नृसिंह**—१. एक भारतीय ज्योतिषी. शके १५४३ मध्यें सिद्धान्तशिरोमणीवर यानें 'वासनावार्तिक' नांवाची टीका लिहिली आहे. हा मोठा मीमांसक होता.

२. एक भारतीय ज्योतिषी. ग्रहलाघवकार गणेश दैवज्ञ याचा बंधु राम व रामाचा पुत्र हा नृसिंह. शके १४८० मध्यें यानें 'मध्यग्रहसिद्धि' नांवाचा ग्रंथ लिहिला व शके १५१० मध्यें 'ग्रहकौमुदी' ग्रंथ लिहिला.

**नृसिंह** ऊर्फ **बापूदेव**—एक भारतीय ज्योतिषगणितज्ञ. १७६० मध्यें सिहूरच्या पोलिटिकल एजंटनें बापूदेवाची नेमणूक काशी येथें केली. तो तेथेंच मुख्य अध्यापक झाला. हा शके १८१२ त मृत्यु पावला. रेखागणित प्रथमाध्याय, त्रिकोणमितीचा कांहीं भाग, सायनवाद, तत्त्वविवेकपरीक्षा, मानमंदिरस्थयंत्रवर्णन, अंकगणित, अष्टादशविचित्र प्रश्नसंग्रह-सोत्तर, इत्यादि याचे संस्कृत ग्रंथ छापलेले आहेत. हिंदी भाषेंत अंकगणित, बीजगणित व फलितविचार हे ग्रंथ छापलेले आहेत. सिद्धान्तशिरोमणीचा गोलाध्याय याचा इंग्रजी अनुवाद यानें तपासला व सूर्यसिद्धांताचा अनुवाद केला. सिद्धान्तशिरोमणीचें गणित आणि गोलाध्याय हीं शके १७८८ त व लीलावती शके १८०५ मध्यें छापली आहे.

**नेकनामी**—(इं. गुड्विल). नांवाची पत. चांगल्या चाललेल्या धंद्यांत एक प्रकारचें नांव होत असतें व त्याचा फायदा धंदा करणाराला पुढें मिळतो. जुने गिऱ्हाईक जुन्याच ठिकाणीं व्यवहारासाठीं येतात, नांवामुळें गिऱ्हाईक ओढले जातात, व व्यापाराचे संबंध आणि लौकिक यांमुळें फायदा मिळतो. अशा तऱ्हेनें या अदृश्य धनाचें विवरण करतां येईल. इमारती, रोकड किंवा रोखे या भौतिक रूपांत हें धन दिसणार नाहीं, पण हें सर्व धनांपेक्षां पुष्कळ वेळां जास्त मौल्यवान् ठरतें. तेव्हां इतर धनाप्रमाणें हेंहि विकतां येतें, किंवा देऊन टाकतां येतें. ही नेकनामी देऊन टाकली म्हणजे धंद्याचें नांव, चिन्ह, जुनी गिऱ्हाइकी हीं सर्व तीबरोबरच द्यावयाचीं असतात. डॉक्टर, वकील, कारागीर, इ. चे धंदे नेकनामी उत्पन्न करीत असतात व ती त्यांना दुसऱ्याला देतां येते.

**नेगापट्टम्**—मद्रास इलाखा, तंजावर जिल्हा, एक तालुका. क्षेत्रफळ २४० चौरस मैल. लोकसंख्या सु. अडीच लाख. नेगापट्टम् व तिरूवल्लूर हीं दोन शहरें आणि १८९ खेडीं आहेत. नेगापट्टमची लोकसंख्या ५२,९३७. पैकीं शेंकडा ६८ हिंदू आहेत. याच्या उत्तरेस नागोर नांवाचा किल्ला आहे. प्राचीन काळीं नाग लोकांचें हें राजधानीचें शहर होतें. चोल राजा राजराज यानें दोन बौद्ध मंदिरें येथें बांधविलीं. येथें एक फार प्राचीन काळचें देऊळ आहे व येथें साधु मिरानसाहेब मखन याचा दरगा आहे. तो तंजावरच्या प्रतापसिंह राण्यानें १७५७ सालीं बांधला.

**नेग्रिटो**—हें स्पॅनिश नांव आशिया खंडाच्या आग्नेयेकडील बेटांत राहणाऱ्या काळ्या आदिवासी लोकांना आहे. या लोकांच्या मुख्य जमाती आहेत त्या—फिलिपाइन बेटांत राहणारे एटा नांवाचे लोक; मलाका बेटांत राहणारे सेमांग जातीचे लोक आणि अंदमान बेटांत राहणारे मिनकोपी जातीचे लोक. टास्मानिया बेटांत राहणारे आदिवासी लोक याच वंशांतले होते, पण ते आतां नामशेष झाले आहेत. या नेग्रिटो लोकांचें मिश्रण मलायामधील आदिवासी लोकांबरोबर होऊन एक मिश्र जात झाली आहे. त्यांना 'मेलानेशियन' लोक हें नांव आहे. यांची उंची ४',११" पेक्षां कधीं जास्त असत नाहीं.

विषुववृत्तीय आफ्रिकेंतील नेग्रिलो ही ठेंगू लोकांची जात नेग्रिटो वर्गांतच पडते. हें नेग्रिलो आणखी ठेंगणे म्हणजे ४',४" पर्यंतच असतात. यांचा रंग पिंगट असतो. बांबुटे, आक्का आणि बाटवा या जातीचे लोक नेग्रिलोंत मोडतात.

**नेचे**— [ वर्ग – प्टेरिडोफायटा: फिलिसेस अथवा फिलिकेल्स. इं. फर्न्स ]. अपुष्पवनस्पतींचा हा एक मोठा वर्ग आहे. पृथ्वीच्या पाठीवर सर्वत्र नेचे आढळतात; पण त्यांची विशेष वाढ दमट, समशीतोष्ण व उष्ण प्रदेशांत होते. उष्ण कटिबंधांत कांहीं नेचांचीं झाडें ताडासारखीं उंच वाढतात. कांहींची उंची ५० ते ६० फूट भरते. नेच्यांचे प्रस्तरावशेष फार मोठ्या प्रमाणांत आढळतात. यांतील प्राचीनतम अवशेष डेव्होनियन खडकांत आढळतात. यांचें निरनिराळ्या पद्धतींनीं वर्गीकरण करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. सध्यां त्यांच्या घडणीवरून व पुनरुत्पादन पद्धतीवरून त्यांचीं बारा कुलें मानण्यांत येतात. कांहीं नेच्यांचा औषधी म्हणून उपयोग करण्यांत येतो व कांहींचा खाद्य म्हणूनहि उपयोग होतो. याची एक जात ( प्टेरिस एस्क्युलेंटा ) न्यूझीलंडमध्यें खाण्यांत आहे.

**नेज्द**—हें राज्य मध्य अरबस्तानांत असून तेथें वाहाबी लोकांची वस्ती आहे. त्यांच्या राजाला सुलतान म्हणतात. हल्लींचा सुलतान इब्न साऊद ( पाहा ) यानें जेबेल शामार हा प्रदेश आपल्या राज्यास जोडला (१९२१). १९२४ सालीं त्यानें मक्का शहर जिंकून घेतलें; व १९२५ मध्यें जिद्दा शहर जिंकलें. त्यामुळें तेथला राजा अल्ली यानें राज्यत्याग केला आणि इब्न साऊद हेज्झाझचा राजा झाला. तेव्हां त्याला ब्रिटननें व इतर राष्ट्रांनीं मान्यता दिली (१९२६). हल्लीं समुद्रकिनाऱ्यावरील संस्थानें वगळून बाकी सर्व अरबस्तान देशावर नेज्दच्या सुलतानाची सत्ता आहे. त्याची राजधानी रियाध शहर आहे; पण सर्वांत मोठें शहर हुफूफ हें आहे. येथें फळफळावळ, खजूर, गहूं, बार्ली, लोंकर, कातडीं, वगैरे तयार होतात. तेथून घोडे मुंबईला आणि उंट सीरिया आणि ईजिप्त यांकडे जातात. येथील लोकसंख्या म्हणजे सौदी अरबस्तानची लो. सं. ३५,००,००० आहे. त्यांपैकीं १,२०,००० मक्का शहराची, ३०,००० मदीनाची व ३०,००० जेद्दाची आहे.

**नेट्रन**—हा शुद्ध सज्जीखार (सोडियम कार्बोनेट–सिंधुकर्बेत) ईजिप्तमध्यें सरोवरांतून पुष्कळ सांपडतो. आफ्रिकेंत नेट्रन नांवाचें एक सरोवरच आहे; तसेंच ब्रिटिश कोलंबियांत हा पाणखारापासून बनतो.

**नेताजी पालकर**—शिवाजीचा एक सेनापति. हा सातारा जिल्ह्यांतील खंडोबाच्या पालीचा राहणारा. शिवाजीनें त्याला सरनोबतीची जागा दिली (१६५७). शिवाजीनें अफजलखानाची भेट घेतली त्या वेळीं नेताजीस सैन्यासह प्रतापगड किल्ल्याच्या झाडींत ठेविलें होतें. खुणेचें शिंग होतांच नेताजीनें अफजलखानाच्या लोकांवर तुटून पडून त्यांची सरेहा कत्तल केली (१६५९). सिद्दी जोहारनें पन्हाळ्यास वेढा दिला तेव्हां नेताजीनें त्याच्या सैन्याची रसद बंद केली व रसद मारण्याचाहि पराक्रम केला. शाहिस्तेखानाच्या पुण्याच्या मुक्कामांत नेताजीनें खानाला सतावून सोडलें. नेताजी दरसाल आठ महिने मोंगलांच्या मुलुखांत यशस्वीपणें लूटालूट करीत असे. शत्रूच्या हालचालीवर लक्ष ठेवणें हें त्याचें मुख्य काम असे. विजापूरकरांवरील मोहिमेंत त्यानें बराच नांवलौकिक संपादिला. जयसिंगानें दक्षिणेच्या मोहिमेंत (१६६५ ते १६६७) नेताजीस कैद करून दिल्लीस औरंगजेबाकडे पाठविलें. तेथें त्यास बाटविण्यांत येऊन त्याला मुर्शिद हा किताब देण्यांत आला व त्याचें नांव महमंद ठेवलें (१६६७ मार्च). नऊ वर्षे मुसलमान राहून पुढें तो शिवाजीकडे परत आला व प्रायश्चित्त घेऊन पुन्हां हिंदुधर्मांत दाखल झाला (१६७६). याला प्रतिशिवाजी म्हणत; इतका तो शूर होता. पण मोंगलांच्या दरबारीं असतांना किंवा नंतर परत हिंदु झाल्यावर त्यानें शिवाजीसारखें नवीन राज्य स्थापण्याचा पराक्रम केला नाहीं.

**नेत्ति**—बौद्ध मतांचें सुसंबद्ध आणि पद्धतशीर विवेचन करणारा ग्रंथ. हा इ. स. च्या १ ल्या शतकांत लिहिलेला असावा. नेत्ति म्हणजे संगतिसूत्र होय. या ग्रंथाची रचना अभिधम्म ग्रंथाप्रमाणें असून सिंहलद्वीपामध्यें त्याला तिपिटक ग्रंथाप्रमाणेंच आधारभूत मानतात. हा ग्रंथ बुद्धाच्या प्रथम शिष्यांपैकींच एक जो महाकच्चायन त्याच्या नांवानें प्रसिद्ध आहे. पिटकोपदेश या ग्रंथामध्यें जरी नेत्ति याचा आधार घेतलेला आहे तरी तोहि फारसा अलीकडील नाहीं; परंतु या ग्रंथालाहि ब्रह्मदेशामध्यें धर्मशास्त्रीय ग्रंथांत स्थान मिळालें असून तोहि महाकच्चायन याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

**नेत्र**—नेत्र हें दृष्टीचें इंद्रिय होय. याचें प्रकाशलेखनाच्या पेटीशीं अथवा कॅमेऱ्याशीं साम्य असतें. याला एक भिंग असून त्याच्या योगानें कनीनिके( रेटीना )वर प्रतिमा केंद्रित होतात. डोळ्याच्या वर्तुळाच्या भिंती मुख्यतः तंतुमय अंतस्त्वचेच्या बनलेल्या असतात. त्यांपैकीं एक ( स्क्लेरोटिक ) पांढरी व अपारदर्शक असून ती नेत्रगोलकाच्या $\frac{5}{6}$ असते. दुसरा भाग पारदर्शक असून तो एखाद्या शृंगमय तबकडीसारखा दिसतो, व त्यास बुबुळ ( कॉर्निया ) असें म्हणतात. नेत्रबाह्यपटल हें एक तंतुमय खरबरीत आवरण असतें, व त्याच्यामध्येंच बुबुळ असतें. त्याचा आकार वाटोळा असून तो खिडकीसारखा असल्यामुळें त्यांतून

आंत पाहतां येतें. नेत्रगोलकाच्या पाठीमागच्या बाजूस एक अंतस्त्वचामय भाग असतो त्यास नेत्रशुक्र ( कंजंक्टिव्हा ) असें म्हणतात. तो भाग डोळा व पापण्या यांचा संयोग करतो, आणि पापण्यांच्या आंतील बाजूस पसरतो. नेत्रबाह्य पटलाच्या आंतल्या पृष्ठभागावर एकपेशीमय अंतस्त्वचा असते. तीस अंत्रावरण ( कोरॉइड ) असें म्हणतात. हें आवरण रक्तगोलकांचें बनलेलें असतें. जेथें नेत्रबाह्य पटल आणि बुबुळ यांचा संयोग होतो तेथें हें अंत्रावरण कनीनिकेचें म्हणजे एका वाटोळ्या पडद्याचें रूप धारण करतें व ही कनीनिका आपणांस बुबुळांतून दृष्टीस पडते व तिचा रंग निरनिराळ्या व्यक्तींमध्यें निरनिराळा

**मिटलेल्या डाव्या डोळ्याचा छेद**

१. उचलता स्नायु. २. वरचा सरळ स्नायु. ३. दृष्टि-नाडी. ४. लष्ठ गादी. ५. खालचा सरळ स्नायु. ६. नेत्रकांचरस. ७. खालचा तिरका स्नायु. ८. खालची पापणी. ९. वरची पापणी. १०. नेत्रस्फटिक.

असतो. या कनीनिकेच्या मध्यभागीं एक वाटोळें छिद्र असतें त्यास बाहुली ( प्युपिल ) असें म्हणतात. ती एखाद्या काळ्या ठिपक्याप्रमाणें दिसते. कनीनिका ही बुबुळाच्या मागें गोलाकार पडद्यासारखी अधांतरीं उभी केल्याप्रमाणें दिसते व तीमध्यें एक स्वच्छ असा द्रव भरलेला असतो; त्यास जलद्रव ( ॲक्विअस ह्यूमर ) असें म्हणतात. बाहुलीमागें एक स्फटिकमय भिंग असतें. हें एखाद्या बृहत्कारी भिंगाप्रमाणें दोन्ही बाजूंस बाह्य-गोल असून पाठीमागील बाजूस ही बाह्यगोलता थोडी अधिक असते. ही बाह्यगोलताहि स्नायुतंतूंच्या साहाय्यानें कमी-अधिक करतां येते व त्यामुळें निरनिराळ्या अंतरांवरील पदार्थांची प्रतिमा बरोबर कनीनिकेवर केंद्रित होते. कनीनिका व भिंग यांच्यामधील अवकाश एक पारदर्शक पाकासारखा द्रव असतो. कनीनिका ही प्रकाशानें संवेदनाक्षम अशा अनेक मूलद्रव्यांची बनलेली असून तिच्यापासून या संवेदना दृग्मज्जातंतूंस प्राप्त होऊन तेथून त्या मेंदूकडे जातात. ही कनीनिका अत्यंत सूक्ष्म अशा शंकाकृति व गोल दंडाकृति अवयवांची बनलेली असून त्यांच्या साहाय्यानें प्रकाशलहरींचें संवेदना-प्रेरणामध्यें रूपांतर होतें. दृग्गोलास सहा स्नायूंच्या साहाय्यानें गति मिळत असते. परंतु सर्व हालचालींमध्यें दृग्गोलाचा मध्य अचल असतो. प्रत्येक डोळ्यास दोन पापण्या असतात व त्यांच्या टोंकास बारीक केंस असतात. या पापण्यांच्या कांठाशीं एक बारीक ग्रंथींची रांग असते. डोळ्यांतून जे अश्रू येतात त्याचें कारण डोळ्यांच्या कमानीमध्यें एक अश्रुग्रंथि असते व तिला अश्रुवाहिनी असतात; त्या वाहिनींतून अश्रू पापण्यांच्या आंतील बाजूस येतात. यानंतर अश्रुप्रवाहामार्फत अश्रू प्रत्यक्ष डोळ्यांत येतात व ते अश्रुबिंदुरूपानें पापण्यांच्या बाजूस दिसूं लागतात. हे अश्रुप्रवाह अश्रुपात्रामध्यें येऊन पोंचलेले असतात व त्यांतून हे अश्रू नासाप्रवाहामध्यें मिळतात. पापणीच्या आंतील भागीं अश्रू उत्पन्न झाल्यामुळें त्या बुळबुळीत होऊन नेत्रगोलकाची आणि पापण्यांची हालचाल अधिक सुलभ होते व ते बाहेर पडून जातात. शारीरिक किंवा मानसिक कारणांमुळें अश्रू उत्पन्न होतात व जेव्हां अश्रुप्रवाहांतून ते वाहून जाऊं शकत नाहींत तेव्हां ते पापण्यांतून बाहेर पडूं लागतात.

दृष्टि—कनीनिकेमुळें नेत्रास प्रकाशाची संवेदना होते. त्यामुळें कनीनिका ही दृष्टीचें मुख्य साधन होय. प्रत्येक पदार्थाचें योग्य दृष्टिज्ञान व्हावें म्हणून दृश्य पदार्थांची स्पष्ट प्रतिमा कनीनिकेवर पडली पाहिजे व याकरितां बाकीच्या सर्व गोष्टी साहाय्य करीत असतात. दृग्मज्जातंतूंच्या साहाय्यानें कनीनिकेवर पडलेल्या प्रतिमांचें व संवेदनांचें ज्ञान मेंदूस पोंचतें. निरनिराळ्या अंतरां-वरच्या वस्तू स्पष्ट दिसाव्या याकरितां डोळ्यांतील भिंगामध्यें सूक्ष्म अशी आकुंचन-प्रसरणाची क्रिया त्वरित होत असते. जेव्हां आपण एखाद्या जवळच्या पदार्थाकडे पाहतों तेव्हां हें भिंग अधिक बाह्यगोल बनतें आणि दूरचा पदार्थ पाहावयाचा असतां अधिक फुगट बनतें. जेव्हां बुबुळ किंवा भिंग किंवा दुसऱ्या एखाद्या द्रव्याची पारदर्शकता अंशतः किंवा पूर्णपणे नाहींशी होते, तेव्हां अंशतः किंवा पूर्णपणें दृष्टिहि नाहींशी होते. कारण कनीनिकेवर प्रतिमाच पडत नाहींशी होते. तथापि इतर सर्व गोष्टी शाबूत असल्या आणि दृग्मज्जातंतूंस किंवा त्यांशीं संबंध असलेल्या भागास इजा झाली तरी अंशतः किंवा पूर्णपणें अंधत्व प्राप्त होतें. भिंगांतून पडणारी प्रतिमा पडद्याच्या अलीकडे पडली तरीहि दृष्टिदोष उत्पन्न होतो. या-करितां अंतर्गोल भिंग मध्यें घालून प्रतिमेचें अंतर वाढवितां येतें आणि प्रतिमा बरोबर कनीनिकेवर पाडवितां येते. भिंग जर अधिक सपाट झालें तर बाह्यगोल कांच वापरून प्रतिमा अधिक जवळ आणतां येते. सामान्यतः ४५ वयाच्यानंतर भिंगाची

स्थितिस्थापकता कमी होते व अशा वेळीं बाह्यगोल भिंग वापरणें अवश्य होतें. अशा स्थितीस चाळिशी अथवा वार्धक्य-दृष्टि म्हणतात.

**नेदर्लंड्स**—('सखल देश'). पूर्वी बेल्जिअम आणि हॉलंड या दोहोंना मिळून ही संज्ञा होती. हल्लीं या नांवानें हॉलंड-मधले विशिष्ट ११ परगणे ओळखले जातात. नेदर्लंड्सचा पूर्वीचा इतिहास बंडाळी आणि शौर्य यांनीं भरलेला आहे. स्पेन-च्या सत्तेविरुद्धचा तो झगडा होता. विल्यम दि सायलेन्ट व त्याच्यामागून गादीवर आलेले राजे व इंग्लंडचा तिसरा विल्यम हे सगळे या झगड्यांत प्रमुख होते. १६ व्या शतकाच्या अखेरीस याच झगड्यांतून डच लोकशाही ( रिपब्लिक ) जन्मास आली आणि पुढें संपूर्ण शतकाहून जास्त काळ तें दर्यावर्दी आणि व्यापारी महत्त्वाचें ( पहिल्या प्रतीचें ) सत्ताधारी संस्थान होऊन बसलें होतें. १८ व्या शतकाच्या अखेरीस तें 'बटेव्हिअन रिपब्लिक' झालें. १८१३ मध्यें हल्लींचें नेदर्लंड फ्रान्सच्या विरोधी स्वरूपांत अस्तित्वांत आलें व १८३१ मध्यें त्यांतून बेल्जिअम स्वतंत्र निघाला. ( हॉलंड पाहा ).

**नेपल्स**—इटली, सिसिलीची राजधानी. ही रोम पासून १५१ मैलांवर आहे. लोकसंख्या ( १९३६ ) ८,६५,९१३ आहे. येथें व्हामेरो नावाच्या टेकडीवर सुंदर सार्वजनिक बगीचे आहेत. येथें रॉबर्ट राजानें ( १३४३ ) बांधलेला सेंट एल्मो नांवाचा किल्ला लष्करी लोकांचा तुरुंग म्हणून उपयोगांत आणला जातो. येथील राजवाड्यांत नेपल्सच्या सर्व नामधारी राजांचे पुतळे उभारले आहेत. हें शहर रोमन कॅथॉलिक पंथाच्या आर्च विशपचें राहण्याचें ठिकाण असून येथें २३७ प्रार्थनामंदिरें आहेत. येथील राष्ट्रीय पदार्थसंग्रहालयांत एक वाचनालय असून त्यांत सुंदर तसबिरी आहेत. येथील विद्यापीठांत गणितशास्त्र, वाङ्मय, वैद्यक आणि सृष्टिशास्त्र अशा चार शाखा आहेत. येथें रॉयल नॅशनल आणि गियाकोमो अशीं दोन वाचनालयें, तसेंच सांकार्लो, बेलीनी, वगैरे पुष्कळ नाटकगृहें आहेत, आणि गोरगरिबांच्या सोयीकरितां धर्मादाय संस्था व रुग्णालयें आहेत. येथें रेशीम, कापूस, ताग, लोंकर यांचे आणि जहाजें बांधण्याचे कारखाने आहेत. येथील विद्यापीठ १२२४ सालीं स्थापन झालेलें आहे. हल्लींची नवी इमारत १९०६ सालीं बांधिलेली आहे. हें शहर ग्रीकांनीं स्थापिलेलें आहे. ८ व्या ते १२ व्या शतकापर्यंत हें स्वतंत्र होतें. नंतर १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत तीनचार घराण्यांचीं राज्यें येथें होतीं. १७१३ त हें ऑस्ट्रियाकडे गेलें. गॅरिबाल्डीनें इटलीला स्वातंत्र्य मिळवून दिल्यानंतर हें सार्डी-नियन राज्याचा एक भाग बनलें.

**नेपाळ**—हिमालयाच्या पायथ्याशीं म्हणजे हिंदुस्थानच्या उत्तर सीमेवर ५२० मैल लांबीचें विस्तृत असें हें एक स्वतंत्र संस्थान आहे. येथें गुरखे लोकांची वस्ती आहे. लोकसंख्या सु. ५६ लाख. पैकीं बहुतेक हिंदू आहेत. क्षेत्रफळ ५६,००० चौरस मैल आहे. या प्रदेशाचे चार विभाग आहेत ते—( १ ) तराई, ( २ ) शिवालिक पर्वत, ( ३ ) हिमालयाचा प्रदेश ऊर्फ खाट-मांडूचें खोरें ( हिमालयाचा १० हजार फूट उंचीचा प्रदेश ), व (४) अज्ञात हिमालयाचा प्रदेश ( यांत एव्हरेस्ट शिखर व इतर बर्फाच्छादित प्रदेशाचा समावेश होतो ). या प्रदेशांत हिमालयाचीं शिखरें आहेत तीं : १ नंदादेवी ( २६,७०० ), धवलगिरि ( २६,८२६ फूट ), गौसंतान ( २५,३०५ फूट ), व कांचनगंगा ( २८,१४६ फूट ). या प्रदेशांतून कौरीआला ( कर्णाली ) किंवा घोग्रा, गंडकी, कोसी, शारदा, काली, बबई व राती या नद्या वाहतात. नेपाळच्या मध्य प्रदेशाला 'सप्त गंडकी' म्हणतात. या प्रदेशांतून त्रिशूळगंगा, सानकोसी, बागमती व विष्णुमती या नद्या वाहतात. येथील वनशोभा फार मनोरम आहे. अर्ध्या-अधिक भागांत जंगल असून साग, शिसव, खैर, साल, ऐन, देवदार, वगैरे झाडें विपुल आहेत. कांहीं दऱ्याखोऱ्यांतून तांदूळ व मका हीं पिकें होतात. तराईच्या दाट जंगलांत सिंहादि सर्व तऱ्हेचे वन्य पशू आढळतात. व रानटी हत्ती पुष्कळ आहेत. माणसाळलेल्या व रानटी हत्तींची झुंज लावून हत्ती पकडण्याची चाल इकडे आहे. उत्तरेस नेपाळच्या खिंडीच्या प्रदेशांत हवा फार उत्तम आहे. पाऊस सरासरी ५६ इंच पडतो. येथें भात, गहूं, उडीद, जव, ओट, आरुआ, मकाई, बटाटा, ज्वारी, ऊंस, सर्व तऱ्हेचा भाजीपाला, उत्तम संत्रीं व ईडलिंबें होतात. येथें तांबें, लोखंड व गंधक विपुल सांपडतें. जाडेंभरडें सुती कापड बहुतेक घायकाच विणतात.

गौतम बुद्धाच्या शाक्य राजघराण्याचें हें राजधानीचें शहर होतें. नेपाळांत अशोकाचे कांहीं लेखस्तंभ आहेत. खाटमांडू येथून जवळच शंभुनाथ व बोधनाथ यांच्या प्रसिद्ध समाधी आहेत. नेपाळांतील सर्व कलाकौशल्याचें काम चीनच्या धर्तीचें आहे.

येथील मूळचे रहिवासी मंगोलियन आहेत व हिंदू लोकांचा येथील मूळच्या रहिवाशांशीं बेटीव्यवहार होऊन नेवार ही प्रजा झालेली आहे. गुरखा लोकांनीं हा देश पादाक्रांत केल्यापासून हे संकरज लोक सर्व देशभर पसरले. गुरखा लोक ठेंगणे पण आडदांड, धिप्पाड व काळे आहेत. नेवार लोक जरा उंच व सडपातळ असतात. नेवार लोकांना शेतकीचें, व्यापाराचें, लांकूड व धातू यांवरील खोदीव कामाचें चांगलें ज्ञान आहे. नेपाळ-ची सर्वसाधारण भाषा पर्वतीया नांवाची आहे. येथील बहुतेक

लोक हिंदु धर्माचे व कांहीं बौद्ध आहेत. येथील हिंदू मांसाहारी असून रक्षी नांवाची दारूहि पितात. मच्छेंद्रजत्रा, इंद्रजत्रा, दसरा, दिवाळी, होळी हे हिंदूंचे सण बौद्ध लोकहि पाळतात. नेवार लोक बहुतेक शेतकीचा धंदा करतात. तराईच्या जंगलांत थारू लोक राहतात. त्यांचे शिकार, शेतकी व गुरें पाळणें हे मुख्य धंदे आहेत. भूतीया लोक लोंकरीचीं कांबळीं तयार करतात. नेवार लोक सोनारी व सुतारी कामांत कुशल आहेत.

सरहद्दीवरून खाटमांडूपर्यंत पक्का रस्ता आहे. भीमफेडीच्या पुढें पायीं हमालांच्या पाठीवर ओझें देऊन जावें लागतें. १९२७ सालीं १८ मैलांचा दोर-रस्ता (रोपवे) करण्यांत आला. या रस्त्याच्या टोंकापासून मोटार पुढें जातें. पशुपतिनाथाच्या यात्रेला हिंदु लोक फार जातात. हिमालयांतील हें क्षेत्र फार प्रसिद्ध आहे. येथें गोवध करणारास देहान्त शासन आहे. नेपाळी लोक मोठे कायदे-निर्बंध मानणारे अशी त्यांची ख्याति असल्यामुळें येथें अन्याय किंवा अपराध थोडे घडतात. नेपाळांत गुलामपद्धति चालू असून गुलामांची संख्या पन्नास हजारांवर आहे.

नेपाळांत राजघराणीं झालीं तीं—(१) मातातीर्थ याचें गोपाळघराणें; हें ५२१ वर्षें टिकलें. (२) अहिर घराणें. (३) किरात घराणें, हें एकंदर १,११८ वर्षें टिकलें. अशोकाच्या चारुमती नामक मुलीचें लग्न या घराण्यांतील देवपाल नामक क्षत्रियाशीं झालें. (४) सोमवंशी घराणें–या घराण्यांतील पशुप्रेक्षदेव यानें पशुपतीचें देवालय पुन्हां दुरुस्त केलें व हिंदुस्थानांतून बऱ्याच लोकांना वसाहती करण्यास नेपाळांत आणलें (खि. पू. १८६७). (५) सूर्यवंशीय घराणें (सुरुवात खि. पू. १७१२)–या घराण्यांतील शंकरदेव यानें पशुपतीच्या त्रिशूळाची स्थापना केली. या घराण्याचा शेवटला राजा विश्वदेववर्मन् यानें आपली कन्या अंशुवर्धन नांवाच्या ठाकुरी वंशजास दिली. (६) ठाकुरी वंश. पहिला राजा अंशुवर्धन हा फार शूर व विद्वान् होता. हा प्रथम श्रीहर्षाचा मांडलिक होता. त्याच्या पश्चात् स्वतंत्र झाला. (७) नवाकोट ठाकुरी घराणें. (८) अंशुवर्धनाचें दुसरें ठाकुरी घराणें. (९) कर्नाटक घराणें. (१०) भाटगांवचें सूर्यवंशीय घराणें. (११) तिसरें ठाकुरी घराणें. (१२) गोरख घराणें. गोरख (गुरखे) हे उदेपूरच्या रजपूत राजांचे वंशज होत अशी दंतकथा आहे. दरीच्या बाहेर पश्चिमेस असलेल्या गोरख राज्यावर पृथ्वीनारायण शाह हा वयाच्या बाराव्या वर्षी गादीवर बसला. त्यानें इ. स. १७६९ मध्यें नेपाळवर स्वारी करून तिन्ही राज्यें जिंकलीं व खाटमांडू ही आपली राजधानी केली. इ. स. १८१४ त नेपाळ सरकार व ब्रिटिश सरकार यांच्यांत तंटा झाला. तेव्हां लॉर्ड हेस्टिंग्ज (हिंदुस्थानचा ग. ज.) यानें नेपाळात सैन्य पाठविलें. पुढील वर्षी तो तंटा मिटला. तेव्हांपासून नेपाळचा राजा व ब्रिटिश सरकार यांची मैत्री झाली.

१९ व्या शतकाच्या मध्यांत जंगबहादुर हा मुख्य प्रधान झाला. त्याची ब्रिटिशांशीं फारच मैत्री होती. तो १८५० त व्हिक्टोरिया राणीच्या भेटीसाठीं इंग्लंडला गेला होता. याला घोड्यांचा फार नाद असे. १८५६ त जंग बहादुरनें भावासाठीं आपली जागा सोडली. नंतर लवकरच नेपाळच्या राजानें जंगबहादुरास 'महाराज' केलें, आणि त्यापुढें जंगबहादुरच्या घराण्यांतील पुरुष नेपाळचा मुख्य प्रधान होईल असें ठरविलें. बामबहादुर १८५७ त मरण पावला तेव्हां राजाच्या इच्छेनुसार जंगबहादुर पुन्हां मुख्य प्रधान झाला. याच सुमारास हिंदुस्थानांत खळबळ उडाली तेव्हां महाराज स्वतः १२ हजार सैन्य घेऊन हिंदुस्थानांत शांतता प्रस्थापित करण्यासाठीं ब्रिटिश सरकारच्या मदतीस धांवला. तो इ. स. १८७७ त मरण पावला.

महाराज सर चंद समशेर जंग बहादुर राणा हे नेपाळचे दुसरे मुख्य प्रधान होत. त्यांनीं नेपाळमधील गुलामगिरीची पद्धत नष्ट करून साठ हजार गुलामांस मुक्त केलें. त्यांनीं इ. स. १९०१ पासून १९२९ पर्यंत कारभार पाहिला. इ. स. १९०८ मध्यें ब्रिटिश सरकारचे पाहुणे म्हणून ते विलायतेस गेले होते. पहिल्या महायुद्धांत त्यांनीं ब्रिटिश सरकारला फार मदत केली.

पहिल्या महायुद्धांत कर्ण बहादुर राणा व कुल्बीर थापा यांना 'व्हिक्टोरिया क्रॉस' मिळाले. दुसऱ्या महायुद्धात चार गुरखा सैनिकांना 'व्हिक्टोरिया क्रॉस' मिळाले.

नेपाळचा राजा किंवा महाराजाधिराज हा नुसता नामधारी राजा असतो. सध्यांच्या महाराजांचें नाव त्रिभुवनवीरविक्रम हें आहे. हे १९११ सालीं गादीवर आले. राज्यकारभार मुख्य प्रधान हिज हायनेस महाराजा सर युद्ध समशेर जंग बहादुर हे पाहतात. इ. स. १९३४ च्या भूकंपानें झालेली नुकसानी भरून काढण्यास त्यांनीं पुष्कळ आर्थिक मदत केली. नासधूस झालेलीं शहरें व गांवें पुन्हां बांधिलीं. महाराजांचा मुकुट अतिशय भव्य आहे. मुकुटास हिरे, मोतीं व पाच बसविलेले आहेत. मुकुटाचे वर असलेला मोराचा पिसारा फारच प्रेक्षणीय दिसतो. खाटमांडू येथें इंग्रज बादशहाचा प्रतिनिधि राहत असे, पण तो नेपाळच्या कारभारात ढवळाढवळ करीत नसे. मुख्य प्रधानाच्या खास परवानगीशिवाय नेपाळांत इतरांस जातां येत नाहीं.

नेपाळांत ब्राह्मण, ठाकूर, चेत्री, किराती, गुरूम मगार व नेवार या मुख्य जाती आहेत व त्यांच्या निरनिराळ्या भाषा आहेत; परंतु दरबारी भाषा नेपाळी आहे. पुष्कळसे लोक सैन्यांत गेलेले आहेत. एके काळीं बौद्ध धर्म हा नेपाळचा प्रमुख धर्म होता, पण अलीकडे बहुतेक लोक हिंदू आहेत. राजदरबारीं हिंदु विधि व समारंभ पाळले जातात. दुर्गापूजा, दिवाळी, वगैरे

सण पाळले जातात. राजधानींत प्रेक्षणीय स्थळें, बुद्धाची समाधि, स्तूप, पशुपतिनाथादि हिंदूंचीं मंदिरें अनेक आहेत.

राजवाडा भव्य व अद्ययावत् आहे. मुख्य प्रधानाचा दरबारहि मोठ्या थाटाचा आहे. भिंतीला मोठमोठे आरसे व पुतळे लावलेले आहेत. जमिनीवर सुंदर संगमरवरी दगड बसविलेले आहेत. खाटमांडू येथें 'तुंडी खेल' नांवाचें भव्य कवायतीचें मैदान (परेड ग्राउंड) आहे. शहरांत साठ हजार सैन्य आहे. तुंडी खेलाच्या उत्तरेस 'रानी पोखरी' किंवा राणीचा तलाव आहे. त्याच्या मध्यभागीं एक देऊळ आहे. शहरांतील रस्त्यावरून जात असतां दरबार चौक, कालभैरव-मंदिर व हनुमान धोका, राजाचा जुना राजवाडा दिसतो. येथें स्वयंभूनाथ व बोधनाथ हीं रमणीय मंदिरें आहेत. छपरापासून निघालेल्या मनोऱ्यावर दोन डोळे काढले आहेत. पाटण येथें १४०८ सालीं बांधलेलें मच्छेंद्रमंदिर आहे. दरसाल तेथें मच्छेंद्रजत्रा भरते. प्राचीन काळीं हिंदुस्थानांत मच्छेंद्र नांवाचा एक साधु होऊन गेला त्याचा शिष्य गोरखनाथ हा नेपाळांत गेला असतां त्याचा योग्य सन्मान झाला नाहीं. तेव्हां तो पाटणबाहेरील एका टेंकडीवर जाऊन बसला. त्यामुळें नेपाळात बराच काळ पाऊस पडला नाहीं. तेव्हा लोक घाबरले व त्यांनीं मच्छेंद्रनाथास नेपाळांत येण्याची विनंति केली. तो नेपाळांत आला तेव्हां गोरखनाथ त्याच्या स्वागतासाठीं आपल्या जागेवरून उठला; तसा नेपाळांत पाऊस सुरू झाला. म्हणून राजानें मच्छेंद्रनाथाचा उत्सव सुरू केला. भटगांव येथें चंगनारायणाचें सुंदर देवालय आहे. व पशुपति येथें नेपाळच्या मुख्य देवतेचें मंदिर आहे.

नेपाळांत मिठावर कर नाहीं. कचेऱ्यांना सुट्टी रविवारची नसून शनिवारीं असते. सरकारचें स्वतःचें अश्रीफा नांवाचें नाणें असून त्यावर राजाच्या नांवाखेरीज श्रीगोरखनाथ व श्रीभवानी हीं देवनामें छापलेलीं असतात. या राष्ट्राचें उत्पन्न सालिना सु. दोन कोटी रुपये आहे.

१८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धानंतर नानासाहेब पेशवा सहकुटुंब नेपाळांत जाऊन राहिला. पण तेथें लवकरच वारला (१८५९). त्याचें कुटुंब थापाथली येथें वाडा बांधून व गांवें खरेदी करून १८९६ पर्यंत होतें. आज एक लक्ष्मीनारायणाचें देऊळ मात्र दिसतें. पेशवे घराण्याचे इतर कांहीं अवशेष नाहींत. थापाथली पाहा.

१९१८ सालीं त्रिभुवनचंद्र कॉलेज स्थापन झालें असून त्यांतून हल्लीं बरेच नेपाळी पदवीधर तयार झाले आहेत. शिवाय कलकत्ता विद्यापीठांत एम्. ए. ची पदवी घेण्याकरितां आणि हिंदुस्थानांतील शेतकी, वैद्यक, कायदा, व्यापार, वगैरे विषयांच्या पदव्या घेण्याकरितां हिंदुस्थानांतील कॉलेजांत अनेक नेपाळी विद्यार्थी शिकतात.

नेपाळ हें पूर्ण स्वतंत्र राष्ट्र आहे. त्याला वाटेल तितका दारूगोळा व हत्यारें हिंदुस्थानांतून घेऊन जाण्याची परवानगी इंग्रजांनीं दिली आहे. नेपाळांत ४५,००० खडें सैन्य आहे. ब्रिटिश सैन्यांत गुरखे लोक असून महायुद्धाच्या वेळीं त्यांची सैन्यांत आणखी भरती फार मोठ्या प्रमाणावर झाली व त्या सैन्यानें १९१७ सालीं हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील युद्धकार्यांत चांगली कामगिरी बजावली. दुसऱ्या महायुद्धांतहि नेपाळनें ब्रिटिश सरकारला सैन्य देऊन चांगली मदत केली. १५ ऑगस्ट १९४७ नंतर हिंदुस्थान सरकारशीं नेपाळचे संबंध दोन स्वतंत्र राष्ट्रांमध्यें असतात त्याप्रमाणें राहिले आहेत. संयुक्त राष्ट्रसंघात नेपाळचा प्रतिनिधि घेतला गेला नाहीं ही गोष्ट हिंदुस्थानला लागून राहिली आहे व तो घेण्याची खटपट चालू आहे. आज कम्यूनिस्टांची भीति तिबेट-नेपाळला आहे. त्यामुळें ब्रिटिश आणि हिंदुस्थान सरकारांचें लक्ष नेपाळकडे विशेष आहे.

**नेपाळी भाषा व वाङ्मय**—भाषा— नेपाळी भाषा संस्कृतोद्भव आहे. लिपि देवनागरी आहे. गुजराथी, हिंदी, पंजाबी, सिंधी, वगैरे भाषांशीं हिचें साम्य आढळतें. भाषेंतील ५,००० शब्द संस्कृतोद्भव आहेत व ३,००० हून अधिक शब्दांचें मराठीशीं साम्य आहे. नेपाळी व नेवारी या भाषा स्वतंत्र दिसतात. एकवचनी नामाला हरु लावून अनेकवचन होतें. द्वितीया व चतुर्थी या विभक्तींचा प्रत्यय लाई असून तृतीयेचा ले आहे. मां प्रत्यय सप्तमीचा आहे. मराठींत ऊन प्रत्यय लावून जशीं धातुसाधितें होतात तशीं नेपाळींत ईर लावून होतात. कांहीं शब्द— आई = येऊन. र = आणि. अघी = पूर्वी. वाट = कडून. सम्म = पर्यंत.

दुसऱ्या बाजीरावाची बायको ही नेपाळांत थापाथली येथें राहत असे. तिनें जें लक्ष्मीनारायणाचें मंदिर बांधलें आहे त्यावरील नेपाळी भाषेंतील शिलालेखाचा पुढील उतारा नमुन्यासाठीं दिला आहे—

"×××× बाजीराव रघुनाथ पन्तप्रधान का श्रीमहाराणी सईबाईसाहेब आफ्ना राज्य पुना सतारा ब्रह्मावर्तक्षेत्र देखी आई नेपालमा विराजमान भै बक्सनु भयाकाले आफ्नु राज गर्नु भयाका वाग्मतीरुद्रमतीका संगम वाग्मतीतीर थापाथली कुरिया स्थापना आफ्नु घरका दक्षिण फुलबारीमा १ का मन्दिर बनाई ×××× पुरोहित गणेश दीक्षित कर्वे ले संकल्प गराई अघि जग्गामा स्थापना भै रह्याका देवदेवता आफुले आघि देखी मानि आयाका देवदेवता र पछी स्थापना हुन्या ×××× महापातक लागन्याछ भन्या बेहेराको संकल्पपत्रको सिलापत्र गरी

नेपाळ — चंगनारायणमंदिर (पृ. १३७२)

नेपाळ — पशुपतिमंदिर (पृ. १३७२)

नेपाळ — स्वयंभुनाथ (पृ. १३७२)

नेपाळ (भातगांव) — लांकडाची जाळीची खिडकी
(पृ. १३७

गस्सौ ॥ " ( ना. गो. चापेकर–हिमालयांत, पृ. ४८–४९ ).

नेपाळी भाषा एक कोटीहून जास्त लोक बोलतात. ग्रो. टर्नर ( लंडन ) यांनीं धरणीधर शर्मा व बोधविक्रम अधिकारी यांच्या मदतीनें नेपाळी भाषेचा एक विस्तृत कोश तयार केला आहे. नेपाळच्या दक्षिणेकडील मैदानांतील इंडो–आर्यन भाषांशीं नेपाळीचें साम्य नाहीं. पश्चिमेकडील कुमाउनी भाषेशीं साम्य आहे. डॉ. ग्रियरसनच्या मतें युक्त प्रांतांतून राजपूत लोक नेपाळच्या पर्वतमय प्रदेशांत राहण्यास गेल्यावर नेपाळी भाषा अस्तित्वांत आली व त्यामुळें राजस्थानी भाषेची नेपाळीवर दाट छाया पडली आहे. नेपाळी भाषेचा उगम प्राकृत भाषेंत झाला आहे. सतराव्या शतकांत प्रतापमल्ल याच्या कारकीर्दीत नेपाळी भाषेस पहिल्यानें महत्त्व आलें. गुरखा राज्याचा संस्थापक महाराजा पृथ्वीनारायण शहा याचें इतिहास-प्रसिद्ध भाषण समग्र देणारे कांहीं कागद अलीकडे उपलब्ध झाले आहेत.

नेपाळी वाङ्मय— सतराव्या शतकांत नेपाळी वाङ्मय फारसें तयार न होण्याचीं तीन कारणें आहेत : ( १ ) देशांतील अस्वस्थता व राजकीय अंदाधुंदी. ( २ ) संस्कृत भाषेचा विद्वानांवरील पगडा. व ( ३ ) मैथिली भाषेच्या प्राबल्यामुळें नेपाळीच्या वाढीस झालेला प्रतिबंध. मिथिलेंतून नेपाळच्या राजघराण्यात आलेल्या स्त्रिया व मैथिल पंडित यांनीं मैथिली भाषेचाच नेपाळांत प्रसार केला. नेपाळी भाषेंत लिहिणारा पहिला कवि गुमानी होय. पहिले तीन चरण संस्कृतमध्यें व चौथा चरण नेपाळीमध्यें अशा याच्या बऱ्याच कविता उपलब्ध आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं पंडित प्रेमनिधि यांनीं स्वतः एक संस्कृत ग्रंथ लिहिला व आपल्या पत्नीला नेपाळीमध्यें त्या ग्रंथावर भाष्य लिहिण्यास सांगितलें. सन १८२३ मध्यें नेपाळी वाङ्मयाचा खरा अरुणोदय झाला. त्या वेळेपासून अध्यात्मरामायण, चाणक्यनीति व हनुमन्नाटक यांचीं भाषांतरें प्रसिद्ध करण्यांत आलीं. कवि वसंताचें 'कृष्णचरित्र' याच वर्षी प्रसिद्ध झालें. परंतु नेपाळी वाङ्मयाचा खरा आरंभ नेपाळी रामायणाचा प्रणेता भानुभक्त याच्या वेळेपासून झाला. हा भानुभक्त नेपाळचा तुळशीदासच होय. त्यानें सबंध नेपाळांत व जेथें जेथें नेपाळी लोकांच्या वसाहती आहेत तेथें तेथें नेपाळी भाषा अत्यंत लोकप्रिय केली. भानुभक्ताचें रामायण हें प्रत्येक गुरख्याचा धर्मग्रंथ आहे. त्याचे समकालीन विरशाली, रघुनाथ, विद्यारण्य केशरी व पतंजली गजुरयाल यांनीं काव्य-रचना केली. परंतु त्यांत भानुभक्ताचा प्रसाद व प्रतिभा नाहीं. आर्य संस्कृतीचीं भांडारें म्हणजे रामायण व महाभारत यांतूनच नेपाळी कवींस स्फूर्ति मिळाली आहे. रघुनाथाचें 'सुंदर काण्ड' दार्जीलिंगच्या नेपाळी साहित्य-संमेलनानें प्रसिद्ध केलें आहे. मोतीराम यानें अज्ञात स्थळीं दडलेली भानुभक्ताची काव्य-संपदा शोधून काढली. एवढेंच नव्हे तर त्यानें भानुभक्ताचें चरित्रहि लिहिलें. नेपाळी वाङ्मयाचें पुनरुज्जीवन करण्याचें श्रेय मोतीरामास आहे. मोतीरामाची 'प्रल्हादभक्तिकथा' व 'उषा-चरित्र' व मरी चिमनचें 'सत्य हरिश्चंद्र कथा' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. साधी भाषा व वर्ण्य विषयाचें हळुवार हातानें केलेलें चित्रण हे या ग्रंथांचे विशेष गुण आहेत. राजगुरु हेमराज यांनीं 'चंद्रिका' नांवाचें नेपाळी भाषेचें शास्त्रीय व्याकरण छापलें आहे. पंडित हरिहर आचार्य यांनीं मुंबईस 'गोरखा ग्रंथमाले'-मध्यें 'रामायण', 'विदुला पुत्रसंवाद', 'अनसूया–सीता–संवाद', इ. ग्रंथ छापले आहेत. नेपाळचे महाराज चंद्रसमशेर यांनीं 'नेपाळी भाषा प्रकाशिनी समिति' स्थापन करून शालोपयोगी ग्रंथ छापविले आहेत. कवि लेखनाथ यांनीं नेपाळी काव्यवाङ्मयांत नवीन युगास प्रारंभ केला आहे. त्यांच्या 'बालक बाबूरो' या काव्याचा तरुण व लहान मुलें यांच्यावर फार परिणाम झाला आहे. 'लक्ष्मीपूजा' नांवाचें नाटक, भगवद्गीतेचें नेपाळी भाषांतर, 'ऋतु–विचार' व 'बुद्धिविनोद' हीं त्यांचीं उल्लेखनीय पुस्तकें आहेत. अशुक विशंभु प्रसाद यांचीं 'शकुंतला' व 'रत्नावली' हीं दोन नाटकें फार लोकप्रिय झालीं आहेत. संस्कृतची फारशी मदत न घेतां शुद्ध नेपाळींत कैसर समशेर यांनीं कालिदासाच्या विक्र-मोर्वशीयचें भाषांतर केलें व 'रूपमती', 'सुमती' व 'चप्प-काजी' या कादंबऱ्या लिहिल्या. बाळकृष्ण समशेर यांनीं निर्य-मक वृत्तामध्यें कांहीं नाटकें लिहिलीं. त्यांमध्यें नेपाळी समाजां-तील व्यसनांवर अति तीव्र आघात केले आहेत. पुष्कर समशेर यांनीं इंग्लिश नेपाळी कोश, बंगली कोश, व नेपाळी वाक्-संप्रदाय कोश प्रसिद्ध करून नेपाळी वाङ्मयाची उत्तम सेवा केली आहे. 'शारदा' मासिक नेपाळांत निघतें व 'उदय' काशीस निघतें. या मासिकांनीं अप्रसिद्ध अशीं पुष्कळ कविरत्नें ( लक्ष्मी-प्रसाद, सिद्धिचरण, मधुधार, माधवप्रसाद, भीमानिधि, प्रेमराजे-श्वरी, इ. ) उजेडांत आणलीं. विजय बहादुर मल्ल, केशवराज पिंडाली, गुरुप्रसाद मैनाली, इ. लघुकथालेखक प्रसिद्ध आहेत. प्रेमराज यांचे 'तपस्वींके अनुभव' व 'मुंडे पंडिताची चिठी' हे गद्यग्रंथ निरुपम आहेत. पराक्रमाचें प्रेम व निसर्गसौंदर्याचें वर्णन, या विषयांत नेपाळी वाङ्मयापासून इतर वाङ्मयांनीं पुष्कळ शिकण्यासारखें आहे. अलीकडेच स्थापन झालेल्या नेपाळी साहित्य परिषदेनें दरसाल प्रसिद्ध होणाऱ्या उत्कृष्ट नेपाळी पुस्तकास 'पद्मपुरस्कार' नांवाचें रु. ६०० चें पारि-तोषिक देण्यास आरंभ केला आहे. या संस्थेनें 'साहित्यस्रोत' नांवाचें मासिकहि चालू केलें आहे.

**नेपियर, जॉन** (१५५०–१६१७)—एक स्कॉटिश गणितशास्त्रज्ञ व लॉगॅरिथम पद्धतीचा शोधक. १५६३ मध्यें मॅट्रिक होऊन अँड्र्यूज व पॅरिस विद्यापीठांत पुढील अध्ययन केलें. १५९४ मध्यें 'प्लेन डिस्कव्हरी' हें धर्मविषयक पुस्तक प्रसिद्ध केलें. १५९६ मध्यें देशरक्षणार्थ योजना केली. तसेंच गणितविषयक अनेक शोध लाविले. १६१७ मध्यें याचा 'रॅब्डोलोजिया' ग्रंथ प्रसिद्ध झाला.

**नेपियर, सर चार्लस जेम्स** (१७८२–१८५३)—एक ब्रिटिश लढवय्या व मुत्सद्दी. १७९७ मध्यें १५ वर्षांचा असतांना लष्करांत शिरला. अनेक लहानमोठ्या जागीं व फ्रान्स वगैरे परदेशांतहि त्यानें नोकरी केली. १८४० मध्यें हिंदुस्थानांत, पुण्यास आला. पुढें त्याला सिंधमध्यें पाठविण्यांत आलें. तेथें तो गव्हर्नर जनरलचा खास प्रतिनिधि व सर्वाधिकारीच होता. त्यानें तेथें दरोडेगिरीच आरंभली असें इतिहासकार मार्शमनहि म्हणतो. त्यानें सिंधच्या अमीरांवरील कांहीं आरोपांची चौकशी करण्याचें निमित्त करून ईजिप्तसारखा सुपीक सिंध प्रांत खालसा केला, अमीरांची संपत्ति लुटली व स्वतः ७ लाख रुपये लांबवले. या कृत्यास बोर्ड ऑफ कंट्रोलचे अध्यक्ष यांनींहि निव्वळ पाजीपणाचें कृत्य म्हणून वर्णिलें आहे. डलहौसीच्या वेळीं त्याचा व याचा तंटा झाला, तेव्हां राजीनामा देऊन हा परत गेला व लवकरच मेला.

**नेपियर, सर विल्यम फ्रॅन्सिस पॅट्रिक** (१७८५—१८६०)—हा ब्रिटिश लढवय्या, व सर चार्लस नेपियरचा भाऊ. यानें द्वीपकल्पीय (पेनिन्शुलर) युद्धामध्यें भाग घेतला, आणि या युद्धाचा इतिहास लिहिला. तो १८२८–४० पर्यंतचा प्रसिद्ध झाला आहे. त्यानें आपल्या भावाचें चरित्र लिहिलें व शिंद्यांच्या संबंधींहि दोन पुस्तकें लिहिलीं.

**नेपोलिअन** (१७६९–१८२१)—युरोपचा अद्वितीय वीर व फ्रेंचांचा बादशहा. याचे आईबाप इटालिअन सरदार घराण्यांतले होते. जिनोव्हा (इटलीचे) संस्थानापासून फ्रान्सनें कार्सिका बेट १७६९च्या प्रारंभींच विकत घेतलें होतें. त्याच बेटांत अजेशिओ गांवीं बोनापार्टचें कुटुंब राहत होतें. याप्रमाणें कार्सिकाच्या सत्तांतरामुळें नेपोलिअन (जन्मतारीख १५–८–१७६९) जन्मतःच फ्रेंच नागरिक झाला.

नेपोलिअनच्या भावी आयुष्यांत त्याला यशस्वी करणारे सर्व गुण त्याच्या आईबापापासून त्याला मिळाले होते. त्याचें कार्सिकामधलें शिक्षण संपल्यावर तो फ्रान्समध्यें गेला. पुढें ब्रीन व पॅरिस येथें त्याचें लष्करी शिक्षण झालें. फ्रेंच भाषेंत जराशी मंदगति व साधारणच हस्ताक्षर यांमुळें त्याला शाळेंत वरचें स्थान मिळालें नाहीं. १७८५ मध्यें त्याचा बाप वारला. यानंतर लवकरच तो ज्यूनिअर लेफ्टनंट या हुद्यापर्यंत येऊन पोंचला. आपली जन्मभूमि कार्सिका बेट स्वतंत्र व्हावें, अशी त्याची फार मनीषा होती. परंतु एकाकी कार्सिकाचें स्वातंत्र्य टिकणार नाहीं व तूर्त कालहि अनुकूल नाहीं असें पाहून त्यानें फ्रान्सविरोधी पेओली व पोझोडी वर्गो यांस त्यांच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नांस पाठिंबा न देतां विरोध केला. त्यांनींहि नेपोलिअनविरुद्ध लोकमत कलुषित केल्यानें नेपोलिअननें आपलें घरदार, चंबुगबाळें आटोपून तो फ्रान्समध्यें गेला आणि रिपब्लिकच्या कार्यास व नोकरीस त्यानें वाहून घेतलें. लवकरच फ्रेंच राज्यक्रांतीचें प्रकरण वाढून त्यांत नेपोलिअनच्या कर्तबगारीनें टूलोन येथें (१७९३ डिसेंबर) युरोपिअन संघटित शत्रूंवर फ्रान्सला जय मिळाला. मध्यंतरीं तात्पुरत्या स्थापन झालेल्या कन्व्हेन्शनचे अधिकारी रोबेस्पिअर वगैरे २१ लोकांच्या खुनामुळें संशयावरून नेपोलिअनहि कैद झाला. पुढें सुटला पण नोकरी गेली.

नेपोलिअनच्या सुदैवानें कन्व्हेन्शनविरुद्धच लोकांचीं मनें कलुषित होऊन बंडाळी सुरू झाली. नेपोलिअनच्या पूर्वकर्तबगारीची जनतेला आठवण येऊन त्यास परत बोलावण्यांत आलें. त्यानें बंडाचा मोड केला (१७९५). १७९६ मध्यें त्याचें लग्न झालें. नव्या राज्यघटनेंत त्याचें वजन वाढलें व त्याच्याकडे इटालियन मोहिमेची कामगिरी दिली गेली. इटलीच्या मोहिमेच्या कल्पनेचा जनक हाच होता व ती त्यानें इतक्या उत्कृष्ट रीतीनें यशस्वी करून दाखवली कीं, त्यामुळें त्याचा आत्मविश्वास व त्याच्यावरील लोकप्रेम हीं वाढीस लागलीं. कन्व्हेन्शनला मात्र तो आतां डोईजड वाटला व त्याला बाहेर ठेवण्याकरितां इंग्लंडची मोहीम योजण्यांत आली. परंतु नेपोलिअनला एकंदर परिस्थिति अनुकूल न वाटल्यानें ती मोहीम तूर्त मागें ठेवून त्यानें ईजिप्तकडे मोर्चा वळवला. परंतु देशांतील अंतर्गत यादवीमुळें तें काम अर्धवट यशस्वी होऊनहि त्याला परत जावें लागलें. तेथें नवी घटना होऊन तो प्रमुख कॉन्सल झाला आणि योग्य मंत्रिमंडळाच्या मदतीनें त्यानें पुढील राज्यकारभार हांकला. १८०४ साली तो फ्रेंचांचा बादशहा बनला व एकतंत्री कारभार करूं लागला. इंग्लंडनें ऑस्ट्रियाला मदत देऊन जें दुसरें युद्ध उभें केलें त्यांत ऑस्ट्रियाचा पुन्हां पराभव झाला. यानंतर इंग्लंडवर स्वारी करण्याचा बेत त्यानें केला. पण तो इंग्रजांच्या युरोपियन संघटनेमुळें मागें टाकावा लागला. ट्राफल्गार येथें १८०५ मध्यें इंग्रजी आरमारानें फ्रेंच आरमाराचा पूर्ण मोड केला. यानंतर युरोपमध्यें नेपोलिअननें

जवळजवळ सर्व राष्ट्रें पादाक्रांत केलीं; परंतु मास्कोमध्यें त्यास रशियन गनिमी काव्यानें चीत केलें व तेथून त्याच्या दैवानें माघार घेतली. दोस्तांनीं फ्रान्सवर स्वारी केली तेव्हां तो राज्य सोडून एल्बाला जाऊन हद्दपारींत राहिला (१८१४). पण पुढील सालीं तो फ्रान्सला परत आला.

यानंतर प्रसिद्ध 'बर्लिन डिक्री' काढून इंग्लंडवर व्यापारी बहिष्कार टाकण्याचा त्यानें प्रयत्न केला होता. पण इंग्लंडच्या प्रयत्नास यश येऊन व फितूर फ्रेंच सरदारांची मदत मिळून सर्वांनीं नेपोलिअनविरुद्ध उठावणी केली. वाटर्लूशिवाय सर्व ठिकाणीं नेपोलिअन सर्वांस पुरून उरला होता; परंतु वाटर्लू येथें त्याला हार खावी लागली. जेत्यांनीं लवकरच नेपोलिअनला कपटानें स्वाधीन करून घेतलें व त्याला सेंट हेलिना येथें कैदेंत ठेवण्यांत आलें. ५ मे १८२१ रोजीं तो कैदेंत मरण पावला. १८४० मध्यें त्याचें शव फ्रान्समध्यें समारंभपूर्वक नेण्यांत येऊन पुरण्यांत आलें.

नेपोलिअनची बुद्धि सर्वगामी होती. या अचाट बुद्धिमत्तेबरोबरच सर्व विषयांचें, अगदी त्या काळापर्यंतचें ज्ञान मिळविलें पाहिजे ही जाणीव नेपोलिअनला पूर्ण होती. राज्यकारभार, समाजनियमन, धर्मकारण, कायदा, युद्धकला व सेनापतित्व, वगैरे विषयांत केवळ तात्त्विक सिद्धांतांनीं नव्हे तर प्रत्यक्ष कार्य करून दाखवून त्यानें राजांना व राजमंत्र्यांना, तसेंच योद्धयांना व सेनापतींना आदर्शभूत व्हावें असें आचरण करून ठेविलें आहे.

नेपोलिअनचे मुख्य दोष त्याचें स्त्रीविषयक अनिर्बंध वर्तन व राक्षसी महत्त्वाकांक्षा हे दोन प्रामुख्यानें दाखविण्यांत येतात. पण नेपोलिअनला या बाबतींत विशेष दोष देतांना पौरस्त्यांच्या विशिष्ट नीतिकल्पना युरोपियन समाजांत कधींच रूढ नव्हत्या व नाहींत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तत्कालीन फ्रान्सचा लुई व इंग्लंडचा जॉर्ज बादशहा यांच्याहून अधिक दुराचरणी नेपोलियन खास नव्हता व यामुळें पाश्चात्य लेखक नेपोलियनच्या या वैगुण्याकडे फारसें लक्ष देत नाहींत.

नेपोलिअनच्या धोरणांतल्या मुख्य चुका दोन दिसतात:— (१) लोकशाहीच्या राज्यपद्धतीकडे तत्कालीन विद्वानांच्या असलेल्या ओढ्याकडे त्यानें केलेलें दुर्लक्ष; आणि (२) युरोपांत साम्राज्य स्थापण्याची अशक्यता या ऐतिहासिक सिद्धांताचें अज्ञान. पहिल्या चुकीमुळें टालेरांड, फूशे, प्रत्यक्ष त्याचा भाऊ लुसँ बोनापार्ट, वगैरे प्रमुख फ्रेंच मुत्सद्दी नेपोलिअनचे विरोधी बनले; आणि टालेरांड व फूशे यानीं तर रशिया व इंग्लंड यांशीं फितुरीनें संगनमत करून नेपोलिअनला रसातळास पोंचाविलें. त्या वेळीं अनेक फ्रेंच मुत्सद्दी व सेनापति फितुर झाले. या सर्वांचें कारण नेपोलियनची अनियंत्रित बादशाही सत्ता फ्रेंच पुढाऱ्यांना नको होती. नेपोलिअननें वॉशिंग्टन प्रमाणें लोकशाहीचा अध्यक्ष होण्याचें ध्येय ठेवलें असतें तर त्याला वॉशिंग्टनप्रमाणें फ्रेंच राष्ट्रानें एकदां सोडून दोनचारदां अध्यक्षपद दिलें असतें; कारण फ्रेंच राष्ट्राच्या सुधारणेच्या गोष्टी त्यानें अल्पावधींत कोणाहि युरोपीय प्रधानापेक्षां किंवा लोकशाहीच्या अध्यक्षापेक्षां अधिक केल्या होत्या. परंतु त्याला विद्वत्तेच्या जोरावर राजकारणी फ्रेंच विद्वानांचा पुढारी बनतांच आलें नाहीं. याचें कारण तो केवळ लष्करी शाळेंत व बहुतेक खाजगी वाचनानें शिकलेला एकांगी विद्वान् बनलेला होता. युनिव्हर्सिटींत पंडितांच्या आखाड्यांत कसून बनलेला विद्वान् नव्हता. त्याची दुसरी चूक साम्राज्य कोठें वाढवावें याबाबतची. नेपोलिअनचे ईजित वगैरे मागासलेले आफ्रिकन व एशियाटिक देश जिंकण्याचे प्रयत्न यशस्वी झाले असते, तर त्याला इंग्लंडेतर युरोपीय देशांचा फारसा विरोधहि झाला नसता. पण ती दिशा सोडून नेपोलियन युरोपीय राजांनाच पदच्युत करूं लागला व मांडलिक बनवूं लागला. तेव्हां सर्वें युरोपनें खुद्द त्याच्याच देशबांधवांच्या मदतीनें त्याला गारद केलें यांत आश्चर्य कांहींच नाहीं.

**नेपोलिअन कायदा**— फ्रेंच दिवाणी कायद्याचें कोड. हें पहिलें कोड १८०४ सालीं लागू करण्यांत आलें आणि त्याला १८०७ सालीं सरकारी रीत्या 'कोड नेपोलिअन' असें नांव देण्यांत आलें. १८७० पासून सदरहू नांव बदलून 'कोड सिव्हिल' हें नांव चालू झालें. हल्लीं बेल्जिअममध्येंहि थोड्या दुरुस्त्यांसह हेंच कोड चालू आहे. शिवाय डच, इटालियन, स्पॅनिश, वगैरे लोकांचे कायदे कोड नेपोलियन हा आदर्श पुढें ठेवून तयार करण्यांत आले आहेत.

**नेपोलिअन (३ रा), चार्लस लुई** (१८०८–१८७३)— हा फ्रेंचांचा बादशहा पहिल्या नेपोलिअनचा पुतण्या होय. याचा बाप लुई बोनापार्ट हा हॉलंडचा राजा झाला होता. चार्लस बोनापार्टनें दोन वेळां (१८३६–१८४०) आपलें नेपोलिअन घराणें राज्यारूढ करण्याचा प्रयत्न केला होता; पण त्याला यश लाभलें नाहीं. १८४८ च्या क्रांतीनंतर तो लोकशाही पक्षास मिळाला व अध्यक्ष झाला. १८५१ मध्यें त्यानें घटनामंडळ बरखास्त केलें व स्वतः बादशहा बनला. त्यानें राज्यांत व पॅरिस शहरांत बऱ्याच सुधारणा केल्या व क्रिमियन युद्धांत भाग घेतला. तथापि त्याचें परराष्ट्रीय राजकारण यशस्वी झालें नाहीं. जर्मनीच्या बिस्मार्कनें त्याला फ्रॅंको–प्रशियन युद्धांत खेंचून त्याचा पराभव केला तेव्हां त्याचें साम्राज्य कोलमडलें. नंतर चार्लस नेपोलिअन निर्वासित होऊन इंग्लंडमध्यें जाऊन राहिला व मरेपर्यंत तेथेंच होता.

**नेबुचॅडनेझर**—या नांवाचे बाबिलोन देशाचे तीन राजे होऊन गेले. त्यांपैकीं दुसरा प्रसिद्ध आहे. त्यानें ख्रि. पू. ६०४–५६१ पर्यंत राज्य केलें. यानें जेरुशलेम प्रदेश जिंकून बरेच ज्यू लोक कैद केले. १२ वर्षांच्या वेढ्यानंतर त्यानें टायर जिंकलें व ईजिप्तवर स्वारी केली. त्यानें बाबिलोन, ऊर व इतर स्थळें या ठिकाणीं मोठीं देवळें व इमारती बांधल्या. पुढें त्याला वेड लागलें व तो जनावराप्रमाणें वागूं लागला.

**नेब्रास्का**—अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतील एक संस्थान. पूर्व हद्दीवरून मिसूरी नदी वाहत जाते. क्षेत्रफळ ७७,२३७ चौरस मैल. पश्चिम भागांत रॉकी पर्वताच्या पायथ्याच्या टेंकड्या आहेत. यांत कांहीं रेताड टेंकड्या आहेत व 'बॅड लँड' हा नापीक प्रदेश रॉकी पर्वताच्या पूर्वेस आहे. हा सर्व प्रदेश अत्यंत रुक्ष आणि उंचसखल व खडबडीत असल्यामुळें याला वाईट देश (बॅड लँड) हें नांव मिळालें आहे.

नेब्रास्कामध्यें तीन मोठ्या नद्या आहेत. त्या मिसुरीला मिळतात. या प्रदेशांतील हवा कोरडी आणि निरोगी आहे. पुष्कळ व मोकळा सूर्यप्रकाश (ऊन) मिळतो. परंतु उन्हाळा व हिंवाळा दोन्ही कडक असतात. लिंकन हें राजधानीचें ठिकाण असून ओमाह हें मोठें शहर आहे.

नेब्रास्कामधली जमीन एकंदरींत चांगली सुपीक असल्यानें संस्थान शेतकीप्रधानच समजलें जातें. गहूं, ओट, बार्ली, राय, बटाटा, बीट (साखरेचा), वगैरे अनेक पिकें निघतात. जनावरांची जोपासना केली जाते; जनावरांचें मांस बंदिस्त डब्यांतून निर्यात होतें. कणकेचे कारखाने (चक्क्या) व दुधेऱ्या (डेअरीज) अनेक आहेत. लिंकन येथें एक विद्यापीठ आहे. लो. सं. १३,१५,८३४.

स्पॅनिश लोकांनीं प्रथम या प्रदेशाचा शोध लावला (१५४१). पुढें सव्वाशें वर्षांनंतर फ्रेंच शोधक आले (१६७३–१७३९) व त्यांनीं संचार केला आणि वसाहती स्थापल्या. अमेरिकेनें लुसिआना संस्थानचा व इतर बराच मुलूख फ्रान्सपासून खरेदी केला (१८०३–१८०५); त्याला 'लुसिआना पर्चेस' असें म्हणतात. या 'पर्चेस'मध्यें नेब्रास्का संस्थानचा प्रदेश येतो. नेब्रास्काचा विस्तार प्रथम मोठा होता, परंतु त्यांतील कांहीं प्रदेश दुसऱ्या संस्थानांत विभागला गेल्यानें तें आतां लहान झालें. युनियनमध्यें तें १८६७ मध्यें दाखल झालें.

**नेमाजी शिंदे**—एक मराठा सरदार. हा प्रथम शिवाजीच्या पदरीं होता. पुढें संभाजीच्या छळाला भिऊन औरंगजेबाकडे गेला; परंतु राजाराम जिंजीस असतांना त्याला परत येऊन मिळाला (१६९०). त्याची रवानगी महाराष्ट्रांत करण्यांत येऊन खानदेशावर त्याला सुभेदार म्हणून नेमण्यांत आलें. मोंगल सरदार हुसेनअलीचा त्यानें पूर्ण मोड केला. १७०७ मध्यें तो शाहूला मिळाला. बहादूरशहानें शाहूकडे मदत मागितल्यावरून नेमाजीलाच ती कामगिरी मिळाली व १७०८ मध्यें कामबक्षाचा त्यानें मोड केला. वऱ्हाणपूरचा दाऊदखान पन्नी व हुसेनखान हा दख्खनचा सुभेदार यांच्यामधील लढाईच्या वेळीं हा तटस्थ परंतु दक्षतेनें तयार होता (१७१५).

**नेमाड**—१. इंदूर संस्थानांतला एक जिल्हा. क्षेत्रफळ ३,८७१ चौ. मैल. लोकसंख्या सु. चार लाख. यांत ४ शहरें व १,२७० खेडीं आहेत. यांतून नर्मदा नदी वाहते. तिच्या कांठची जमीन फार सुपीक आहे. त्यांतील जंगलांत पूर्वी रानटी हत्ती बरेच सांपडत.

२. मध्यप्रांत, नर्मदा विभागाचा जिल्हा. क्षेत्रफळ ४,२२८ चौ. मै. व लोकसंख्या (१९४१) ५,१३,२७६. यांत २ शहरें व १०१९ खेडीं आहेत. लागवडीखालीं येण्याजोगी विपुल जागा पडीत आहे. शेंकडा ८६ हिंदू आहेत. नद्यांच्या कांठच्या जमिनी सुपीक व काळ्या आहेत.

**नेमावर**—हा मध्य हिंदुस्थानांत इंदूर संस्थानांत एक जिल्हा आहे. क्षे. फ. १,०५९ चौ. मैल. पर्जन्यमान २९ इंच. नर्मदा व तिच्या उपनद्या यांनीं सर्व जिल्हा सुपीक व धनधान्य-समृद्ध आहे. लो. सं. सु. एक लाख. एकूण गांवसंख्या ३४३.

प्रसिद्ध पेंढारी पुढारी छट्टू याचा एक मुख्य तळ येथें असे. येथें एक प्राचीन जैन देवालय आहे.

**नेयगी**—हे लोक मुख्यतः म्हैसूर संस्थानांत राहतात. लोकसंख्या सु. पंचाणव हजार. मुख्य धंदा कापड विणणें व रंगवणें. यांच्यांत बिलिमाग्गा, देवांग, खत्री, पटवेगार, साळ, सौराष्ट्र, सेनिगा व टोगाटो असे मुख्य आठ भेद आहेत. सोलापुरात पद्मसाळी आहेत ते महाराष्ट्रीय म्हणून धरण्यास हरकत नाहीं.

**नेलर, सर गॉडफ्रे** (१६४६–१७२३)— एक इंग्रज प्रतिमा-चित्रकार. इंग्लंडचे राजे २ रा चार्लस, २ रा जेम्स, ३ रा विल्यम आणि ॲन् व १ ला जॉर्ज यांच्या कारकीर्दीत हा होता. त्यानें १४ वा लुई व पीटर दि ग्रेट वगैरे दहा राजकर्त्यांचीं चित्रें काढलीं आहेत.

**नेलोर**—मद्रास इलाखा, पूर्व किनाऱ्यावरील एक जिल्हा. क्षेत्रफळ ७,९४२ चौ. मै. कर्नाटकच्या सपाट प्रदेशाचाच हा भाग आहे. जमीन विशेष सुपीक नाहीं. पुष्कळ प्रदेश खडकाळ आहे. यांतील हवा कोरडी व शुद्ध आहे. या जिल्ह्यांत उदयगिरी किल्ला आहे. नेलोर, ओन्गोले, गंतु, कावली, कंदयूर, अडनकी, अल्लूर, वेंकटगिरी व सुलूरपेठ हीं या जिल्ह्यांतील व्यापारी गांवें आहेत. किनाऱ्यावर मिठागरें आहेत. लोकसंख्या (१९४१) १६,१७,०२६. तालुके १३, शहरें ८ व गांवें १५९४. शेंकडा ९०

लोक हिंदू आहेत. परंतु नेलोर तालुका बहुतेक मुसलमान वस्तीचा आहे. पूर्वी हा प्रदेश पांड्य आणि चोल राजांकडे होता. पुढें विजयानगरकडे गेला. इंग्लिशांचा संबंध १६२५ पासून येतो; तथापि १७८१ मध्यें हा इंग्रजांच्या मालकीचा झाला. त्यापूर्वी हा कर्नाटकच्या नबाबांकडे असे. जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण नेलोर शहर पेन्नार नदीच्या किनाऱ्यावर वसलेलें आहे. लोकसंख्या (१९४१) ५६,३१५. पैकीं शेंकडा ७६ हिंदू आहेत.

**नेलसन, व्हायकाउंट होरेशिओ** (१७५८–१८०५)— एक इंग्रज नाविक वीर. याचें शिक्षण फारसें झालें नव्हतें. १७७० मध्यें प्रथम जहाजी नोकरीस लागला. हा एकदां नोकरीसाठीं मुंबईस आला होता; पण ती न मिळाल्यानें परत गेला. १७७७ सालीं लष्करी परीक्षा देऊन लेफ्टनंट झाला. दोन वर्षांतच १७७९ मध्यें त्याला कॅप्टनशिप मिळाली. अमेरिकन

स्वातंत्र्य-युद्धांत हा होताच. १७९३ ते १८०० हा काल त्याचा कोठें ना कोठें युद्धाच्याच कामगिरींत गेला. १७९७चा सेंटविन्सेंटचा जय याच्यामुळेंच मिळाला व त्याबद्दल त्याला नाइटशिप मिळाली. कोपनहेगनच्या महत्त्वाच्या लढाईंत मिळालेला विजय सर्वस्वीं नेल्सनमुळेंच. १८०५ मध्यें ट्राफल्गारच्या लढाईंत त्यानें मिळविलेला विजय इंग्लंडच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा होय. याच्याहि आयुष्यांतील शेवटचा व महत्त्वाचा प्रसंग हाच होय. याच लढाईंत तो ऐन वेळीं कामास आला; पण मरणापूर्वी त्याला आपण विजयी झालों हें पाहण्याचें भाग्य लाभलें होतें.

ब्रिटनच्या नाविक युद्धेतिहासांत नेल्सनला प्रमुख स्थान आहे. त्याला इंग्रज लोक फार मानतात. याचें स्मारक लंडन शहरांत ट्राफल्गार चौकांत पुतळा उभारून केलें आहे.

**नेवती**—नेपती. [(लॅ.) कॅपरीस स्पिनोसा. (सं.) करीर. (गु.) केरडी]. या झाडास खानदेश, मारवाड, उत्तर हिंदुस्थान या बाजूंस करेल असें नांव आहे. हें कांटेरी झाड असून याला पानें नसतात. तांबडीं फुलें व बोराएवढीं फळें येतात. फळें भाजीसाठीं व लोणच्यांत घालण्यास उपयोगी पडतात. दंतशूलावर नेपतीची मुळी चावून खातात.

**नेवार शक**—नेवार (नेपाळ) शक हा नेपाळच्या दुसऱ्या ठाकूर वंशांतील अभयमल्ल राजाचा पुत्र जयदेवमल्ल यानें सुरू केला. नेपाळ शक व शालिवाहन शक यांच्यामधलें श्रावण महिन्यांतील अंतर ८०२ निघतें. डॉ. किलहॉर्न यांनीं नेपाळ शकाच्या शिलालेखांत दिलेले मास, पक्ष, तिथी, वार, नक्षत्रें, इत्यादिकांवरून गणित करून त्या शकाचा आरंभ इ. स. ८७९ च्या ऑक्टोबर महिन्यांतील २० व्या तारखेस म्हणजे चैत्रादि विक्रम संवत् ९३६ च्या कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून होतो असें ठरविलें आहे (इं. ॲ. पु. १७, पा. २४६). ह्या शकाचे महिने अमात होते व वर्ष बहुतकरून गतच देत असत. अर्थात् ह्या शकाच्या वर्षांत कार्तिकारंभापासून डिसेंबरअखेरपर्यंत ८७९ व जानेवारीच्या आरंभापासून आश्विनअखेरपर्यंत ८८० मिळविले असतां इसवी सनाचें साल निघेल. नेपाळांत कांहीं दिवस गुप्त शक, मग हर्ष शक व त्यानंतर हा शक प्रचारांत आला. तेथें गुरख्यांचा अमल होईपर्यंत (इ. स. १७६८) तो तसाच चालू राहिला. परंतु नंतर मात्र सरकारी दप्तरांत त्याच्या जागीं शालिवाहन शक लिहूं लागले. अद्यापहि पोथ्या लिहिणारे आपल्या ग्रंथांत हाच शक देत असतात.

**नेवासें**—मुंबई, अहमदनगर जिल्हा, एक तालुका. क्षेत्रफळ ६२१ चौ. मै., गांवें १४५. तालुक्याची लो. सं. (१९४१) ९५,४७७. खरीपापेक्षां रब्बीचें पीक जास्त होतें. नेवासें हेंच तालुक्याचें मुख्य ठिकाण असून प्रवरेच्या कांठीं आहे. माघ शुद्ध पंचमीस येथें मोठी जत्रा भरते. येथें मोहिनीराजाचें देऊळ आहे. ज्ञानेश्वरानें ज्ञानदेवी ग्रंथ याच गांवीं लिहिला. खुर्द आणि बुद्रुक असे गांवाचे दोन भाग असून लो. सं. अनुक्रमें ४,००७ व २,३१४ आहे.

**नेवाळी**—[लॅ. जॅस्मिनम एलॅगॅटम. सं. वनमालिनी]. हा जुईसारखा एक वेल असून पानें जुईपेक्षां थोडीं मोठीं असतात. फूलहि जुईपेक्षां मोठें असतें. रानांत हे वेल होत असल्यानें यास रानमोगरी किंवा वेलमोगरी असें म्हणतात. ही वेल औषधी आहे. नेत्र-कर्ण-मुख रोगांवर उपयोग करतात. मूत्राघातावर बिया उगाळून देतात.

**नेव्हाडा**—अमेरिकेंतलें संयुक्त संस्थानांतील पश्चिमभागाचें एक डोंगराळ संस्थान. क्षे. फ. १,१०,५४० चौ. मै.. लो. सं. १,१०,२४७. राजधानी कार्सन आहे. रेनो येथें विद्यापीठ आहे. याच्याइतकें विरळ वस्तीचें दुसरें संस्थान अमेरिकेंत नाहीं. हवा शुष्क व रुक्ष. मध्यवर्ती पठार ४,००० फुटांवर आहे. कालवे काढले असल्यानें शेती वाढत्या प्रमाणावर होत आहे. खाणकाम हा महत्त्वाचा उद्योग आहे. सोनें, रुपें, तांबें, शिसें, वगैरे धातू निघतात. १८५९ मध्यें कोमस्टाक लोड या मार्गांत सर्व जगांत महत्त्वाचा अशा सोन्या-रुप्याच्या खाणींचा शोध लागला. जंगलें मोठमोठीं व पुष्कळ आहेत. जगांतील सर्वोच्च धरण जें 'बोल्डर' तें याच संस्थानांत कोलोरॅडो नदीला बांधलें आहे.

मेक्सिकन युद्धानंतर १८४८ मध्यें झालेल्या तहानें हें संस्थान अमेरिकेकडे आलें. १८६१ मध्यें नेव्हाडा टेरिटरी बनविण्यांत आली व १८६४ मध्यें एक संस्थान म्हणून युनिअनमध्यें दाखल करून घेण्यांत आलें.

**नेसरींची लढाई**—कोल्हापूर संस्थानांत गडइंग्लज परगण्यांत नेसरी हें गांव आहे. येथें शिवाजीचा सेनापति प्रतापराव गुजर याची व विजापूरकर सेनापति बहलोल याची लढाई झाली (२४ फेब्रु. १६७४). प्रतापरावानें याच बहलोलास थोड्याच आठवड्यांपूर्वी सोडून दिलें होतें. परंतु त्यानें विश्वासघातानें पुनः प्रतापरावावर हल्ला केला. याच वेळीं शिवाजीनेंहि प्रतापरावास ठपका दिल्यामुळें चिडून जाऊन व उतावळेपणानें त्याने बहलोलास तोंड दिलें. त्यामुळें त्याचे पुष्कळ मराठे गडी पडले व खासा प्रतापराव कामास आला. त्याच्या हाताखालचा सरदार आनंदराव हा नेसरीच्या जवळच मुक्कामास होता, त्याने ही बातमी समजतांच त्वरेनें येऊन, विस्कळित झालेलें प्रतापरावाचें सैन्य एकत्र करून व निकराचा हल्ला चढवून बहलोलचा पराभव केला. तेव्हां बहलोल पळून गेला. याच लढाईत पुढें प्रख्यातीला आलेले संताजी घोरपडे व धनाजी जाधव या शिलेदारांनीं चांगला पराक्रम गाजविला. ही लढाई निवती येथें झाली व हंसाजी मोहिते यानें शेवटीं बाजू राखली, असें कांहीं ठिकाणीं दिलें आहे.

**नेस्टोरिअन पंथ**—इसवी सन ४३० च्या सुमारास ॲंटिओकसजवळच्या युप्रेपिअस मठाचा बिशप कोणी नेस्टोरिअस होता तो या पंथाचा प्रवर्तक होय. त्याच्या मतें ख्रिस्तामध्यें देवत्व व मनुष्यत्व दोन्ही होतीं. ख्रिस्ताची आई मेरी हिला थिओटोकस म्हणजे दैवी गर्भधारण करणारी हें विशेषण लावणें चुकीचें आहे असेंहि त्याचें मत होतें. त्याचें इतर पंथीयांशीं कधीं पटलें नाहीं. इ. स. ४३५ मध्यें तो मयत झाला व त्याच्या मरणानंतरच त्याच्या पंथाचा बराच प्रसार झाला. हिंदुस्थानांतहि मलबारकडे या पंथाचे मठ वगैरे असत. मलबार मध्यें जे सीरियन ख्रिस्ती आढळतात ते नेस्टोरियनच होत.

**नेहरू, पं. जवाहरलाल** (१८८९— )—हिंदी संघराज्याचे पहिले पंतप्रधान व एक श्रेष्ठ भारतीय पुढारी. प्रसिद्ध देशभक्त पुढारी पं. मोतीलाल नेहरू यांचे हे चिरंजीव. यांचें शिक्षण इंग्लंडांत हॅरो स्कूल व ट्रिनिटि कॉलेज (केंब्रिज) मध्यें एम्. ए. पर्यंत झालें व नंतर टेंपलमधून हे बॅरिस्टर झाले. हिंदुस्थानांत परत येऊन अलाहाबाद हायकोर्टाचे हे ॲडव्होकेट झाले. १९१७–१८ मध्यें यांनीं होमरूल लीगच्या चळवळींत प्रथम भाग घेतला व ते लीगचे अलाहाबाद येथील चिटणीस होते. १९२० मध्यें संयुक्त प्रांतांतील किसान चळवळींत यांनीं पुढाकार घेतला व त्याच वर्षी म. गांधीचे एकनिष्ठ अनुयायी बनून कॉंग्रेसच्या असहकारितेच्या चळवळींत ते पडले व वकिली कायमची सोडून दिली. यास राजकीय आरोपांखालीं अनेक वार शिक्षा झाल्या आहेत व तुरुंगवास घडला आहे. १९२३–१९२५ मध्यें हे अलाहाबाद म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष होते. अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीचे हे कित्येक वर्षें प्रधान मंत्री होते व दलित राष्ट्र परिषदेमधील हिंदुस्थानचे प्रतिनिधि व रिपब्लिकन कॉंग्रेसचे अध्यक्ष होते (१९२७). यांनीं १९२८ मध्यें इंडिपेंडन्स लीगची स्थापना केली. १९२९ मध्यें हे अखिल भारतीय ट्रेड युनिअन कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. युवक चळवळीशींहि यांचा निकटचा संबंध होता. पुणें येथील युवक परिषदेचे हे अध्यक्ष होते. १९२९ सालीं लाहोर येथें व १९३६ सालीं लखनौ येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांचे ते अध्यक्ष होते.

यांचें बरेंच आयुष्य तुरुंगामध्यें गेल्यामुळें त्यांनीं तेथेंच कांहीं महत्त्वाची ग्रंथरचना केली आहे. त्यांत 'सोव्हिएट रशिया', 'मुलीस पत्रें', 'जगाचा इतिहास', 'भारताचा शोध', 'आत्मचरित्र', वगैरे प्रमुख आहेत. ८ ऑगस्ट १९४२ या दिवशीं झालेल्या सार्वत्रिक धरपकडीमध्यें यास अटकेंत ठेवण्यांत आलें. १९४५ सालीं सुटका झाल्यावर सुभाषचंद्र बोस यांच्या हिंदी राष्ट्रीय सैन्यांतील अधिकाऱ्यांवर सरकारनें जो खटला भरला त्यांत आरोपींना मदत करण्यासाठीं यांनीं एक चांगली समिति स्थापून आरोपींची बरीच सुटका केली. १९४६ सालीं सिंगापूरला यांनीं भेट दिली. नंतर हंगामी मध्यवर्ती सरकारांत परराष्ट्रमंत्र्याची जागा स्वीकारली.

१९४७ सालीं देशाला स्वातंत्र्य मिळाल्यावर हे हिंदुस्थानचे प्रधान मंत्री झाले व सर्व कारभार यांनीं हातीं घेतला. यांनीं आपले

सहकारी मंत्रीहि देशांतील चांगले कार्यकर्ते असेच निवडले. लगेच आशिया खंडांतील राष्ट्रांची एक परिषद दिल्लीस बोलावून त्या राष्ट्रांचें मित्रत्व संपादिलें. १९४८ च्या ऑक्टोबरांत ब्रिटिश साम्राज्यांतील प्रधान मंत्र्यांची जी लंडनमध्यें बैठक भरली तिला हे उपस्थित होते. यांच्याविषयीं जगांतील इतर राष्ट्रांत फार आदर दिसून येतो व जगांतील थोर मुत्सद्द्यांच्या मालिकेंत यांना वरचें स्थान आहे. पाश्चात्य राष्ट्रांनीं हिंदुस्थानला बरोबरीचें लेखावें याविषयीं यांची खटपट असते. अनेक देशांत यांनीं हिंदी राज्याच्या वकिलाती स्थापून त्यांचें सहकार्य मिळविलें आहे. कांहीं विद्यापीठांनीं यांना बहुमानाच्या पदव्या अर्पण केल्या आहेत. हे महात्मा गांधींचे पट्टशिष्य होते व महात्मा गांधींच्या खालोखाल हिंदुस्थान यांना मानतें. यांनीं आपल्या राष्ट्राचा लौकिक आणि सामर्थ्य वाढविण्याच्या कामीं फार परिश्रम घेतले आहेत यांत शंका नाहीं.

१९४९ सालच्या ऑक्टोबर–नोव्हेंबर महिन्यांत यांनीं अमेरिकेला अमेरिकेच्या अध्यक्षांच्या खास निमंत्रणावरून भेट दिली. तेव्हां त्यांचें सर्वत्र फार मोठें स्वागत आणि आदरातिथ्य झालें. जगांतील विद्यमान श्रेष्ठ पुढाऱ्यांत त्यांना मोठ्या मानाचें स्थान प्राप्त झालें आहे व आज सर्व जगाचे डोळे त्यांच्या कर्तृत्वाकडे लागलेले आहेत.

**नेहरू, पंडित मोतीलाल** (१८६१–१९३१)—हिंदुस्थानांतील राजकारणी मुत्सद्दी, राज्यघटनाशास्त्रज्ञ व सुप्रसिद्ध कायदेपंडित. हे काश्मिरी ब्राह्मण असून अलाहाबादेस यांचें वास्तव्य असे. हायकोर्ट वकिलीची परीक्षा देऊन यांनीं वकिली सुरू केली व आपल्या कर्तबगारीवर यांनीं अगदीं थोडक्या अवधींत भरपूर पैसा मिळवून लोकप्रियताहि कमावली. प्रथम प्रागतिकांच्या राजकारणाकडे यांचा ओढा होता. परंतु महात्मा गांधींचें नेतृत्व पटून यांनीं चढाईच्या राजकारणाचा अंगीकार केला. सन १९१९ मध्यें अमृतसरला भरलेल्या राष्ट्रसभेच्या अध्यक्षपदाचा मान यांना मिळाला. त्यापूर्वी पंजाब-प्रकरणाबाबत चौकशी करण्याकरितां राष्ट्रसभेनें नेमलेल्या कमिटीवर यांनीं काम केलें होतें.

असहकारितेच्या चळवळींत यांनीं भाग घेतला होता व या चळवळीचा पहिला पूर ओसरतांच यांनीं स्वराज्य पक्षाची स्थापना केली. बॅ. चित्तरंजन दास व हे या दोघांनीं मिळून निवडणुका लढवल्या व आपल्या पक्षाचे प्रतिनिधी मध्यप्रांत व बंगाल या प्रांतांमध्यें निवडून आणले. दिल्लीच्या मध्यवर्ती कायदेमंडळांत आपल्या वादविवादकौशल्यानें यांनीं सर्वांना चकित करून सोडलें होतें.

साम्राज्यान्तर्गत स्वराज्याची योजना 'नेहरू–रिपोर्ट' नांवानें प्रसिद्ध असून तिला राष्ट्रसभेनें मान्यता दिली होती. परंतु तिला मुसलमानांनीं विरोध दर्शविला. यानंतर पुन्हां असहकारितेच्या चळवळींत पडल्यानें यांना तुरुंगवास घडला. तेथें यांचा दमा वाढल्यानें यांना मुक्त करण्यात आलें. यानंतर अलाहाबादला येऊन हे कालवश झाले. पं. जवाहरलाल व श्री. विजयालक्ष्मी पंडित यांच्यासारखे अद्वितीय कर्तबगार पुत्र व कन्या यांनीं राष्ट्राला दिले हें विसरून चालणार नाहीं.

एक वादविवादपटु म्हणूनहि यांची योग्यता मोठी आहे. जाहीर व्याख्यानापेक्षां कायद्याच्या चौकटींत बसणाऱ्या वादविवादांत यांचें वक्तृत्व विशेष खुलून येई. पब्लिक सेफ्टी बिल व सायमन–कमिशन–बहिष्कार या वेळीं यांनीं केलेलें वक्तृत्व लोकांच्या स्मरणांत कायमचें राहिलेलें आहे. म. गांधींच्या व यांच्या मतांत जरी मूलतः भेद असले तरी राष्ट्रहिताला प्राधान्य देऊन आपल्या स्वभावांतील राष्ट्राला पोषक असणाऱ्या गुणांचा फायदा यांनीं राष्ट्राला करून दिला.

**नैनीताल**—संयुक्त प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,६५७ चौ. मैल. लो. सं. २,९१,८६१. हा हिमालयाच्या भगरनामक अगदीं बाहेरच्या ओळीवर आहे. येथील टेंकड्यांवर सर्व जंगल आहे. तराई हा एक दलदलीचा प्रदेश आहे, व पायथ्याशीं असलेली भाबर भागाची जमीन विशेषशी पिकाऊ नाहीं. यांत तलाव बरेच आहेत. उष्णतामान २६° ते ९३° व पर्जन्यमान ४३ ते ९५ इंच. महाभारतांत यांतील कांहीं टेंकड्यांचा वगैरे उल्लेख सांपडतो. १५ व्या ते १९ व्या शतकांपर्यंत यावर चंदराजे राज्य करीत होते. पुढें गुरख्यांकडे हा प्रदेश गेला. नंतर नेपाळकडून हा ब्रिटिशांकडे आला. जिल्ह्यांत १५२० गांवें व ७ शहरें आहेत. मुख्य भाषा हिंदी व तीखालोखाल मध्य पहाडी. रोहिलखंड कुमाऊन रेल्वे यांतूनच आहे. बरेली–अल्मोरा व मुरादाबाद–राणीखेत हे दोन बैलगाड्यांचे मोठे रस्ते आहेत.

नैनीताल गांव हेंच जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. संयुक्त प्रांत सरकारची ही उन्हाळ्यांतील राजधानी आहे. समुद्रसपाटीपासून उंची ६,४०० फूट आहे. दूरवरच्या बर्फाच्छादित अल्मोरा आणि गढवाल पर्वतराजींचें येथील दृश्य सुंदर दिसतें. हिमालयाचें निसर्गसौंदर्य येथून पाहतां येतें. युरोपियनांना हें ठिकाण फार मानवतें व त्यामुळें त्यांची वस्ती फार असे. येथील तळ्यांत नौकाविहार करतां येतो. येथें बरींच कॉलेजें व शाळा आहेत.

**नैमिषारण्य**—पौराणिक काळांतलें नर्मदेच्या उत्तरेस व कुरु देशाच्या पश्चिमेस असलेलें गोमती नदीजवळील वन. ब्रह्मदेवनिर्मित चक्राची नेमी जेथें शीर्ण झाली व तपश्चर्येस

योग्य स्थान दाखवती झाली ती जागा म्हणजे नैमिषारण्य. एका निमिषांत विष्णूनें दैत्यसंहार केला तें नैमिषारण्य. अशा दोन्ही उपपत्त्या आहेत.

**नोगी, काउंट मारेसुके** ( १८४९–१९१२ )—एक जपानी सेनापति. रूसो-जपानी युद्धांत यानें पोर्ट ऑर्थरला वेढा देऊन विजय मिळविला व नांव कमावलें.

**नोगुची हिदेयो** ( १८७६–१९२८ )—एक जपानी सूक्ष्म-जंतुशास्त्रज्ञ आणि वैद्य. यानें पेन्सिल्व्हॅनिया विद्यापीठांतील रॉकफेलर संस्थेमध्यें संशोधनांचें कार्य केलें. उपदंशजनक जंतूंबद्दल यानें केलेलें कार्य व यानें बनविलेली देवीची लस यामुळें हा प्रसिद्ध आहे. देवीच्या रोगाच्या कारणांचा तपास करीत असतां हा पीतज्वरामुळें मृत्यु पावला.

**नैरोबी**—ब्रिटिश पूर्व आफ्रिकेंतील ईस्ट आफ्रिकन प्रोटेक्टोरेटचें व केनिया प्रांताचें हें राजधानीचें शहर आहे. हे मोंबासाहून रेल्वेनें ३२७ मैल दूर आहे. लोकसंख्या सुमारें २५,००० आहे. तींत युरोपियन व हिंदीहि आहेत. किकुयु टेंकडीच्या पायथ्याजवळच्या अॅथी मैदानात समुद्रसपाटीपासून ५,४५० फूट उंचीवर हे वसलें आहे. येथून किलिमांजारो व केनिया पर्वताचे सुंदर देखावे दिसतात. हें युगांडा रेल्वे, वसाहत संघ व सैन्य यांचें मुख्य ठाणें आहे. येथें शाळा व रुग्णालयें आहेत. १३ मैलांवरून पाणी आणलें आहे. हें १९०७ मध्यें राजधानी बनलें.

**नोंदणी, जन्ममृत्यूची आणि विवाहाची**—इंग्लंडांत १८३६ पर्यंत वरील बाबतींत नोंदणी करण्याची पद्धत सुव्यवस्थित झालेली नव्हती. सदर सालीं नोंदणी-कायदा (रजिस्ट्रेशन अॅक्ट) मंजूर करण्यात आला, व त्या कायद्यांत पुढें दुरुस्ती करणारे कायदे मंजूर करण्यांत आले. हल्लींचा कायदा असा आहे कीं, ( १ ) बालकाचा जन्म झाला म्हणजे त्याच्या आईबापांनीं किंवा ज्या घरांत त्या बालकाचा जन्म झाला त्या घराचा ताबा असणारानें बेचाळीस दिवसांच्या आंत त्या जन्माबद्दलची माहिती रजिस्ट्रारला दिली पाहिजे. जन्म नोंदण्यास मूल्य पडत नाहीं. पण वरील मुदतीनंतर दंड भरावा लागतो. ( २ ) विवाह नोंदण्याच्या बाबतींत असा कायदा आहे कीं, ज्या 'संस्थापित' (एस्टॅब्लिश्ड) चर्चमध्यें ठराविक विवाहविधि झाला असेल तेथील क्लर्जिमननें ठराविक स्वरूपाच्या रजिस्टर बुकांत त्या विवाहाची माहिती लिहिली पाहिजे. इतर चर्चमध्यें झालेले विवाहहि वरीलप्रमाणें नोंदणी-बुकांत नोंदवावे लागतात. ( ३ ) मृत्यु नोंदण्याची पद्धत जन्म नोंदण्याबद्दलच्या पद्धतीसारखीच आहे. मृत्यु झाल्यानंतर पांच दिवसांच्या आंत मयताच्या अगदीं नजीकच्या नातलगानें किंवा मृत्युसमयीं हजर असलेल्या दुसऱ्या कोणत्याहि इसमानें रजिस्ट्रारला मृत्यूसंबंधाची सर्व आवश्यक माहिती कळविली पाहिजे.

जन्म व मृत्यु सक्तीनें नोंदण्याबद्दलचा कायदा हिंदुस्थानांतहि आहे, आणि गांवचा पाटील-कुलकर्णी यांना जन्म-मृत्यु रजिस्टर भरण्याचें काम करावें लागतें. विवाह सक्तीनें नोंदण्याबद्दलचा कायदा मात्र हिंदुस्थानांत नाहीं. तथापि ख्रिस्ती व पारशी समाजाच्या विवाहासंबंधींच्या कायद्यांत विवाह नोंदण्याची सक्ती आहे.

**नोंदणी यंत्र**— ( रेकॉर्डिंग इन्स्ट्रुमेंट ). या यंत्राच्या साहाय्यानें केवळ गणना केली जाते एवढेंच नव्हे तर एका आंखलेल्या कागदावर त्या गणनेमध्यें कमीजास्त फरक कसा होत जातो त्याची रेखाकृति काढली जाते. अनेक यंत्रांना चक्राच्या साहाय्यानें अशीं गणना यंत्रें जोडलेलीं असतात. उदा., भारमापक यंत्राला एक भारदर्शक गणना यंत्र किंवा लेखक-यंत्र जोडलेलें असतें. त्यामुळें वायूचा भार कसकसा बदलत जातो त्याचें रेखांकित चित्र एका आंखलेल्या कागदावर काढलें जातें. या यंत्रांत एका उभ्या पंचपात्राभोंवतीं एक कागद डकविलेला असतो व त्यावर विशिष्ट प्रमाणात रेखा आंखलेल्या असतात. त्यावरून दर तासास कसाकसा फरक होत गेला हें पाहतां येतें.

**नोंदणी विवाहाचा कायदा**—( दि स्पेशल मॅरेज अॅक्ट ). हा कायदा १८७२ सालीं मान्य होऊन त्यांत १९२३ सालीं फार महत्त्वाची सुधारणा झाली. या कायद्याचा मूळ उद्देश कायद्याच्या प्रस्तावांत असा सांगितला आहे कीं, जे इसम ख्रिस्ती, ज्यू, हिंदू, मुसलमान, पारशी, बौद्ध, शीख, जैन, यांपैकीं कोणत्याच धर्माचे नाहींत त्यांच्याकरितां विवाहविधि कायद्यानें ठरविणें जरूर असल्यामुळें सदर कायदा मान्य करण्यांत येत आहे. हिंदुधर्मशास्त्रांत व प्रचलित हिंदु-लॉमध्यें भिन्नजातीय व भिन्न धर्मीय विवाह कायदेशीर मानला जात नाहीं. हिंदु इसमांचा अनुलोम विवाह तेवढा हायकोर्टांनीं कायदेशीर मानला आहे. पण प्रतिलोम हिंदु विवाह किंवा भिन्न धर्मी विवाह बेकायदा असल्यामुळें, आणि उच्च सुशिक्षित वर्गांत भिन्न जातीय व भिन्न धर्मीय विवाह करण्याची प्रवृत्ति उद्भवल्यामुळें कांहीं हिंदु पुढाऱ्यांच्या मागणीवरून ब्रिटिश सरकारनें हा कायदा केला; पण मूळ १८७२ च्या कायद्यात एक शर्त विलक्षण घालण्यांत आली; ती ही कीं, वर व वधू यांनीं आम्ही वरील आठ प्रमुख धर्मांपैकीं कोणत्याच धर्माचे नाहीं, म्हणजे बिनधर्मी आहों, अशी लेखी प्रतिज्ञा रजिस्ट्रारपुढें केली पाहिजे. वधू-वरांना ही शर्त जाचक म्हणजे सदसद्विवेकबुद्धीला न पटणारी असल्यामुळें या शर्तीबद्दल फार

नैनीताल — तलाव (पृ. १३७९)

न्यू झीलंड — नक्षीची माओरी झोंपडी (पृ. १३९२)

न्यू यॉर्क बंदरांतील स्वातंत्र्यपुतळा (पृ. १३९४)

गवगवा झाला; म्हणून १९२३ सालीं कायद्याच्या प्रस्तावांत सुधारणा करून पुढील मजकूर अधिक घालण्यांत आला तो— "आणि जे इसम हिंदु, बौद्ध, शीख किंवा जैन धर्माचे आहेत त्यांच्याकरिता विवाहविधि या कायद्यांतला लागू आहे." अशी महत्त्वाची दुरुस्ती या कायद्यात करण्यांत आली; व तीमुळें हिंदु-बौद्ध-शीख-जैन यांचा आपसांतील भिन्न धर्मी विवाह, आपापल्या धर्माचा त्याग न करतां, लावण्याचा कायदेशीर मार्ग मोकळा झाला. तथापि कोणा हिंदु वराला किंवा वधूला ख्रिस्ती, मुसलमानी, पारशी धर्मांच्या इसमाशीं विवाह करणें झाल्यास 'आपण कोणत्याच धर्माचे नाहीं' अशी प्रतिज्ञा करणें अद्यापहि भाग आहे. त्या अडचणींतून बाहेर पडण्याचा मार्ग म्हणजे धर्मांतर करणें हा एकच आहे; आणि ख्रिस्ती व इस्लामी धर्म हिंदुधर्मीयांना आपल्या धर्मांत घेण्यास उत्सुक व तत्पर असल्यामुळें हिंदु वधूला किंवा वराला ख्रिस्ती किंवा मुसलमान होण्याचा मार्ग अवलंबावा लागतो. ही आपत्ति लक्षांत घेऊन हिंदु पुढाऱ्यांनीं 'शुद्धिकरणा'चा म्हणजे ख्रिस्ती, मुसलमान, पारशी, यांना हिंदु करून घेण्याचा धार्मिक विधि तयार केला; तेव्हां तशीं शुद्धीकरणें व तदुत्तर विवाह होऊं लागले. इतका महत्त्वाचा परिणाम कायद्यांतील व प्रस्तावांतील विलक्षण शर्तीनें घडवून आणला.

या कायद्याचीं २६ कलमें असून त्यांपैकीं महत्त्वाचीं कलमें येणेंप्रमाणें—कलम २ मध्यें वर धर्माबद्दलची शर्त दिलेली असून शिवाय (१) वर-वधू अविवाहित असलीं पाहिजेत; (२) वधूचें किमान वय १४ वर्षें पूर्ण असलें पाहिजे; (३) वराचें किंवा वधूचें २१ वर्षें वय पूर्ण झालेलें नसेल तर, त्यांच्या पालकांची लेखी संमति सदर विवाहाला असली पाहिजे; आणि (४) कायद्यानें निषिद्ध ठरवलेला नजीकचा आप्तसंबंध वधूवरांत असतां कामा नये. या शर्ती पाळून हा नोंदणी-विवाह लावतां येतो. त्याकरितां सरकारनें नेमलेल्या रजिस्ट्रारला ठराविक शुल्क द्यावें लागतें. या कायद्यांतलीं आणखी महत्त्वाचीं कलमें आहेत तीं—हिंदु कायद्यांत घटस्फोट नसल्यामुळें नोंदणी-विवाह करणाऱ्या हिंदूंना 'इंडियन डायव्होर्स ॲक्ट' लागू आहे असें १७ वें कलम आहे. म्हणजे अशा वधू-वरांना घटस्फोट करतां येतो. नोंदणी-विवाह करणाऱ्या इसमाचा एकत्र हिंदु कुटुंबांतील सहभागीदार हा हक्क नष्ट होतो (कलम २२). पण 'दि कास्ट डिसॅबिलिटीज् रिमूव्हल ॲक्ट' (१८५०) प्रमाणें हा नोंदणी-विवाह करणारांचे वडिलार्जित इस्टेटींतले वारसा हक्क नष्ट होत नाहींत म्हणजे भिन्न जातीय, किंवा विनधर्मी, किंवा धर्मांतर करून नोंदणी-विवाह केला तरी अशा वधूवरांचे वारसा हक्क कायम राहतात. म्हणजे एकत्र कुटुंबांतील वडिलोपार्जित इस्टेटीपैकीं त्यांचे हिस्से त्यांना मिळतात (कलम २३). दत्तक घेण्याचा हिंदु धर्मांतला हक्क नोंदणी-विवाहाच्या दांपत्याला नाहीं (कलम २४). हिंदु, जैन, बौद्ध, किंवा शीख धर्मांच्या इसमानें नोंदणी-विवाह केला, तर त्याच्या बापाला दत्तक घेण्याचा हक्क प्राप्त होतो (कलम २६). विनधर्मी किंवा धर्मांतर करून नोंदणी-विवाह करणाऱ्या इसमाच्या बापाला दत्तक घेतां येतो.

**नोंदवही**—(लॉग बुक). इंग्लंडांत असा सरकारी नियम आहे कीं, प्रत्येक बोटीवर बोर्ड ऑफ ट्रेडनें मंजूर केलेल्या प्रकारचें 'लॉग बुक' असलें पाहिजे आणि त्या बुकांत त्या बोटीवर घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीची नोंद केली पाहिजे. नोंद करण्यासंबंधींच्या बाबी येणेंप्रमाणें—बोटीवरील कामगारांची ड्रिल; खलाशी इसमांत होणारा फेरबदल; खलाश्यांना अपराधाबद्दल झालेल्या शिक्षा; बोटीला झालेले अपघात, वगैरे. या नोंदबुकांत नोंद व सही बोटीवरील मास्टर किंवा मेट किंवा एखादा अधिकारी यानें केली पाहिजे; अशा प्रकारें नोंद न करण्याच्या अपराधाला दंडाची शिक्षा आहे. तसेंच लॉग बुकांत खोडाखोड करणें, त्यांतील पानें फाडणें, किंवा तें बुक नष्ट करणें या अपराधांनाहि दंडाची शिक्षा आहे. परदेशचा प्रवास करून बोट बंदरांत आली म्हणजे ४८ तासांच्या आंत हें लॉग बुक मरकन्टाइल मरीनच्या सुपरिंटेंडेंटकडे हजर केलें पाहिजे.

**नोबिली, रॉबर्ट डी**—एक जेसुइट ख्रिश्चन मिशनरी. हा १६०६ मध्यें धर्मप्रचाराकरितां द. हिंदुस्थानांत आला. हा भगवीं वस्त्रें नेसून ब्राह्मणी राहणीनें राही. गंधहि धारण करी. भोळ्या लोकांस फसवून नादीं लावणें व त्यांस ख्रिस्ती करणें हीं सुलभ जावींत म्हणून हें ढोंग होतें. मिशनऱ्यांच्या एकंदर कार्यास याच्या वर्तनामुळें धक्का बसला असे जेसुइट म्हणतात.

**नोबिली, लिओपोल्डो** (१७८४–१८३५)—एक इटालिअन शास्त्रज्ञ. लोहचुंबकसूचींत सुधारणा करून (चलचुंबकसूचीऐवजीं आसक्तचुंबकसूची वापरून) तींत जास्त सूक्ष्मत्व आणलें. विद्युच्छास्त्रांतहि याचे शोध व लिखाण आहे.

**नोबेल, ऑल्फ्रेड बर्नहार्ड** (१८३३–१८९६)—एक स्वीडिश रसायनशास्त्रज्ञ व यंत्रकलाभिज्ञ. हा प्रसिद्ध नोबेल पारितोषिकाचा संस्थापक होय. याचा जन्म स्टॉकहोम येथें झाला. याचा बाप पाणतीर (टॉर्पेडो) करणारा कारखानदार होता. नोबेलनें स्फोटक द्रव्यांबाबत बरेच शोध लावले व कांहींचें त्यानें पेटंटहि घेतलें होतें. त्यांत त्याला अफाट संपत्ति मिळाली. सदरहू संपत्तींतून त्यानें एक मोठा भाग दरसाल पदार्थविज्ञान, वैद्यक व रसायन, हीं शास्त्रें, तसेंच लेखनकौशल्य आणि शांततारक्षण या पांच क्षेत्रांत पांच बक्षिसें देण्याकरितां कायमचा वेगळा काढून ठेवला तोच नोबेल पारितोषिक निधि होय. नोबेल १८९६ मध्यें

निःसंशय दिसून येते. मार्कण्डेय, वराह, वगैरे पुराणांतून तर याविषयीं अनेक वर्णनें व गोष्टी आहेत.

वेद, महाकाव्यें, सूत्रें व पुराणें या धार्मिक ग्रंथांखेरीजहि संस्कृत कवींच्या कृतींतून व्यापार, प्रवास व युद्ध यांच्या कामीं समुद्राचा होत असलेला उपयोग अनेक स्थळीं दिसून येतो.

जहाजें बांधण्याचा धंदा त्या वेळीं मोठ्या भरभराटींत असून नदी व समुद्र यातून मोठ्या प्रमाणांत चालत असलेल्या व्यापारामुळें या धंद्याच्या वाढीला चांगलें उत्तेजन मिळे. अलेक्झांडरला या देशी जहाजांची मोठीच मदत झाली. सैन्य वाहून नेण्यास अशीं २००० पर्यंत जहाजें त्याच्या दिमतीस असत. हा धंदा त्या वेळच्या मौर्य सरकारच्या हातांत असे. कलाभिज्ञ. लोकांत जहाजें बांधणाऱ्यांचा स्वतंत्र वर्ग असून तो सरकारी नोकरींत असे, असे मेग्यास्थिनीजनें लिहिले आहे. सिंहलद्वीपाच्या वर्णनांत प्लिनीनें असें म्हटले आहे कीं, हिंदुस्थान व लंका यांमधील समुद्रांत चालणारी जहाजें विशिष्ट प्रकारचीं बांधलेलीं असत; खलाशी ताऱ्यांकडे पाहून आपला मार्ग काढीत नसून जवळ पक्षी बाळगीत व ते मधून मधून सोडून देऊन त्या गत्यनुरोधानें जमिनीची दिशा ठरवीत. या जुन्या जहाजांची वहनशक्ति साधारणपणें ७५ टन असे, असेंहि तो लिहितो.

मौर्यकालानंतर दक्षिणेतील आंध्रांचा आणि उत्तरेकडील कुशानांचा काळ येतो. या काळांतहि मागीलप्रमाणेच हिंदुस्थानचा व्यापार वाढला होता, हें ग्रीक, रोमन व इतर परकीय ग्रंथकारांच्या लेखनावरून दिसून येतें. इतकेंच नव्हे तर खुद्द हिंदुस्थानांतच याबद्दल नाण्यांचे पुरावे सांपडतात.

या वेळच्या तामिळ वाङ्मयांत दक्षिण हिंदुस्थानांतील कांहीं बंदरांविषयीं सविस्तर व विश्वसनीय अशी माहिती मिळते. यांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे या चोल राज्यांतील बंदरांतून चुना व विटा यांनीं बांधलेलीं दीपगृहे असत. या काळांत हिंदुस्थानचा रोमशीं व्यापारी संबंध जसा होता त्याप्रमाणें राजकीय संबंधहि होता हें तत्कालीन ग्रंथांवरून उघड होतें. हिंदु राजे रोमला वकिलाती पाठवीत अशाबद्दलचे पुरावे आहेत.

ख्रिस्ती शकाच्या पहिल्या दोन शतकांत कारोमांडल किनाऱ्यावरील बंदरांतून पौरस्त्य व पाश्चात्य देशांशीं मोठ्या प्रमाणावर व्यापार चाले, अशाविषयींचे पुरावे प्राचीन तामिळी वाङ्मयांत व ग्रीक आणि रोमन ग्रंथकारांच्या लेखांत जागोजागीं आहेत. चोल आरमारांनीं बंगालचा उपसागर आणि हिंदी महासागर पालथा घालून गंगा, इरावती या नद्यांच्या मुखांजवळील प्रदेश, मलयी द्वीपसमूह हे आपल्या कक्षेंत आणिले होते. तेलगू राज्यांतील कांहीं लोक पेगूमध्यें येऊन त्यांनीं तो प्रांत बळकाविला व या कारणानें तेथील लोकांना ब्रह्मी व इतर परकीय लोक पुष्कळ दिवसांपासून तलैंग या नांवानें ओळखीत आहेत.

तामिळी लोकांच्या खालोखाल दर्यावर्दी चळवळींत भाग घेणारे दुसरे लोक म्हणजे कलिंग देशांतील होत. प्रथम यांचें सिंहलद्वीपाशीं दळणवळण असे, पण पुढें त्यांनीं ब्रह्मदेशाशीं वळण बांधलें.

भारतीयांच्या पूर्वेकडील दर्यावर्दी चळवळीत विशेष महत्त्वाची आणि अभिमानाची गोष्ट म्हणजे त्यांनीं जावांत केलेल्या वसाहती होत. या वसाहत-चळवळीला आणि हिंदुस्थानच्या अभिवृद्धीला प्रथम चेतना कलिंग देशांत मिळाली. कलिंग देशांतून इ. स. ७५ त हिंदूंची एक मोठी टोळी निघून ती जावांत उतरली. तिनें तेथील रहिवाशांत सुधारणा केली व तेथे आपला शक सुरू केला.

गुजराथेतील बंदरांतून श्रीहर्ष आणि त्याचा पिता प्रभाकरवर्धन यांच्या तडाक्यांतून सुटून जाऊं इच्छिणारे अनेक शरणार्थी लोक जावाची समृद्धि ऐकून तिकडे नौकानयन करूं लागले. गुजराथ व इतर देश आणि जावा यांच्यांत बराच व्यापार चाले, अशाविषयीं जावांतील बखरींतून बरेच उल्लेख आढळतात. वरील कारणांखेरीज अरब व तुर्क यांच्या सातव्या शतकांतील स्वाऱ्या, मगधपासून बामियनपर्यंत चिनी सैन्याची विजयी मोहीम (इ. स. ६४५–६५०), बौद्ध राजघराण्याचा ब्राह्मण प्रधानाकडून झालेला नाश, यांसारख्या गोष्टींमुळेंहि हिंदुस्थानांतील लोक सिंध आणि गुजराथ यांमधील बंदरांतून दक्षिणेकडे एकामागून एक जाऊं लागले असावेत. जावाच्या समृद्धीमुळेंहि हे शक, हूण व गुर्जर लोक तिकडे आकर्षिले गेले असले पाहिजेत. सोनें व जवाहीर यांबद्दलची जावाची प्रसिद्धि त्या वेळीं हिंदुस्थानांत बरीच होती.

बंगालमधील त्या काळचीं मोठमोठीं व्यापारी स्थळें म्हणजे सातगांव, सोनारगांव, चांप किंवा भागलपूर हीं होत. ताम्रलिप्त हें बंदर फार महत्त्वाचें असून पेरिप्लसमध्येंहि त्याचा निर्देश असावा असें वाटतें. हें ठिकाण फार प्राचीन म्हणजे अशोकाच्याहि पूर्वीचें आहे. चिनी प्रवाशांनीं हे ठिकाण पाहून याचें वर्णन लिहून ठेवलें आहे. हें स्थळ बौद्ध धर्माचें एक केंद्र असून येथें दहा बौद्ध मठ होते.

चीन-जपानशीं दळणवळण— हिंदुस्थान व चीन यांच्यामधील जलमार्गानें दळणवळण निदान ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून झालें असावें. प्रो. लाकुपेरीच्या मतें या गोष्टीला ख्रिस्तपूर्व ६८० त सुरवात झाली. इ. स. ५ व्या ६-व्या शतकापर्यंत हा व्यापार

हिंदूकडेच होता. हिंदुस्थान आणि चीन यांच्या संबंधाबरोबर जपानशींहि संबंध येऊं लागला. हिंदुधर्मोपदेशक जपानलाहि जाऊन तेथें धर्म व संस्कृत भापेचा प्रसार करीत असल्याचें जपानी ग्रंथांत दिसून येतें. भारतीयांनीं जपानच्या धर्माची जशी वाढ केली तशी त्याच्या उद्योगधंद्याचीहि केली आहे. अकराव्या शतकापूर्वी दोघा भारतीयांनीं जपानांत कपाशीची कशी माहिती करून दिली याची हकीकत जपानच्या सरकारी बखरींतून दिली आहे.

पश्चिम किनाऱ्यावरील दर्यावर्दी चळवळी—गुप्त साम्राज्याच्या अखेरच्या दिवसांत म्हणजे ५ व्या आणि ६ व्या शतकांत पश्चिमेकडेहि भारतीयांच्या समुद्रावरील चळवळी इतर ठिकाणांप्रमाणेंच उघड दिसून येत होत्या. सिंध आणि गुजराथ यांमधील बंदरें आरमारी झटापटींच्या केंद्रांपैकीं होतीं असें दिसतें.

श्रीहर्षाच्या कारकीर्दीत सुराष्ट्रांतील लोक व्यापार आणि मालाची देवघेव करून समुद्रावर आपला उदरनिर्वाह करीत असत, असें इ. स. ६३० त ह्यूएनत्संगानें लिहून ठेवलें आहे.

दहाव्या शतकाच्या अखेरीस व अकराव्या शतकाच्या प्रारंभीं चोल राजांच्या अमदानींत, दक्षिण हिंदुस्थानांत दर्यावर्दी चळवळींना ऊत आला होता.

सिंधच्या इतिहासांत—त्यांतल्या त्यांत हा प्रदेश अरबांनीं पादाक्रांत केल्याच्या इतिहासांत—भारतीयांच्या नाविक चळवळींचीं व पराक्रमांचीं अनेक उदाहरणें सांपडतात. निझामुद्दीन अहमदच्या ' तबकत–इ–अकबरी ' ग्रंथावरून पाहतां अकराव्या शतकांत सुलतान महंमदनें जाट लोकांवर स्वारी केली व त्यांचा नाश केला. या चकमकींत सुलतानच्या बाजूस मोठीं बलिष्ठ १४०० जहाजें व जाटांकडे ४००० जहाजें होतीं असें वर्णन आहे. ११ व्या शतकांतील भारतीयांच्या दर्यावरील चळवळींचें मजेदार वर्णन अल्बेरुणीनें दिलेलें आहे.

कारोमांडल किनाऱ्यावर मोतीं काढण्याचा मोठा व्यापार होता व गुजराथच्या किनाऱ्यावर मोठी धाडसाची चांचेगिरी चालू असे, असें मार्को पोलो यास इ. स. १२९२ मध्यें आढळलें. सोकोत्रा हिंदु चांचांच्या स्वाधीन झालें तेव्हां त्यांच्याजवळचा लुबाडलेला माल तेथें विक्रीला येई. कैल (तिनेवेल्ली जिल्ह्यामधील कायल), कोइलम, ठाणा, खंबायत, एडन या बंदरांचा मार्को पोलो नामनिर्देश करून त्यांच्या व्यापारांचें वर्णन करतो. यानें भारतीय नौकांविपयीं मजेदार व महत्त्वाचें वर्णन लिहून ठेविलें आहे.

चौदाव्या शतकांत फ्रायर ओडोरिक (इसवी सन १३२१) यानें हिंदी महासागरांतील आपल्या प्रवासाचें जें वृत्त लिहिलें आहे त्यावरून गुजराथच्या रजपूत खलाशांच्या अंगीं असणारें नाविक कौशल्य चांगलें दृष्टोत्पत्तीस येतें. सोमनाथ आणि चीन यांमध्यें प्रवास करणाऱ्या रजपूत जहाजांचा याहूनहि प्राचीन उल्लेख यूलच्या कॅथेमध्यें आहे.

मार्को पोलोनंतर हिंदुस्थानसंबंधीं परकीयांनीं लिहिलेली महत्त्वाची माहिती म्हणजे महुयत या मुसलमानी चिनी मनुष्यानें लिहून ठेवलेली होय. १५ व्या शतकाच्या आरंभीं यानें हिंदुस्थान व इतर प्रदेश यांच्या सफरी केल्या. कालिकत (इ. स. १४०९) ही मोठी व्यापारी पेठ असलेली त्याला आढळून आली.

कालिकत बंदराविपयीं अब्‌–अर रझाकनें फारच मजेदार व विस्तृत माहिती दिली आहे (इ. स. १४४२). हें बंदर जगांतील नौकानयनाच्या केंद्रांपैकीं एक होतें. येथून मक्केला मिरीं भरून नेहमीं जहाजें जात. १५ व्या शतकाच्या पूर्वार्धातील दुसरा प्रवासी निकोली कॉंटी यानें भारतीय नौकानयन व व्यापार यांसंबंधीं चांगली माहिती दिली आहे. हिंदुस्थानवासी लोक आमच्यापेक्षां मोठीं जहाजें बांधतात अशी त्यानें कबुली दिली आहे.

याखेरीज १५ व्या आणि १६ व्या शतकांतील दुसऱ्या अशा गोष्टी आहेत कीं, भारतीयांच्या दर्यावरील चळवळींपैकीं बहुतेक पश्चिम किनाऱ्यावरच्या आहेत असें त्यावरून दिसून येईल. पोर्तुगीजांच्या आगमनापर्यंत (इ. स. १५००–१५०८) अहमदाबादचे सुलतान सागर-सम्राट् होते.

वास्को द गामाला इ. स. १४९८ मध्यें पूर्व आफ्रिकेंत, खंबायत व हिंदुस्थानांतील दुसरे प्रांत येथून आलेले खलाशी आढळले. ते दक्षिणोत्तरेकडील ताऱ्यांच्या मदतीनें व नाविक यंत्रांचा उपयोग करून सुरक्षित प्रवास करीत. इ. स. १५०८ मध्यें चोल बंदरापासून कांहीं अंतरावर पोर्तुगीजांचा नाश करण्याकरितां गुजराथचें आरमार ईजिप्तच्या आरमाराला मिळालें आणि १५२१ त गुजराथच्या राजाच्या आरमाराधिपतीनें पोर्तुगीजांचा चौलजवळ पराभव करून एक जहाज बुडविलें. त्यानंतर पोर्तुगीजांशीं बऱ्याच आरमारी लढाया झाल्या. या काळांत पश्चिम किनाऱ्यावरील मोठ्या व्यापारी पेठा म्हणजे चौल व दामोळ. इराणच्या व तांबड्या समुद्राच्या मार्गानें आशिया-युरोप यांच्याशीं येथून मोठा व्यापार चालत असे. वसईहून लांकूड मक्केला जाई. आगाशी येथें लांकडाचा मोठा व्यापार होता असें पोर्तुगीज बखरकारांनीं लिहिलें आहे.

अकबराच्या कारकीर्दीत भारतीय नौकानयनाला व नौकाबंधनाला—विशेपतः बंगाल्यांत—चांगला पाठिंबा मिळाला. ऐनेइ–अकबरींत यासंबंधीं भरपूर माहिती आहे. अकबराच्या साम्राज्यांतील प्रत्येक भाग नौकांनीं गजबजलेला असे; नौकाबंधनाचीं प्रमुख केंद्रें म्हणजे बंगाल, काश्मीर आणि ठट्टा हीं होत. बंगालमधील नौकानयनाच्या वाढीची साग्र माहिती ' औसिल

हिंदूंकडेच होता. हिंदुस्थान आणि चीन यांच्या संबंधाबरोबर जपानशींहि संबंध येऊं लागला. हिंदुधर्मोपदेशक जपानलाहि जाऊन तेथें धर्म व संस्कृत भाषेचा प्रसार करीत असल्याचें जपानी ग्रंथांत दिसून येतें. भारतीयांनीं जपानच्या धर्माची जशी वाढ केली तशी त्याच्या उद्योगधंद्याचीहि केली आहे. अकराव्या शतकापूर्वी दोघा भारतीयांनीं जपानांत कपाशीची कशी माहिती करून दिली याची हकीकत जपानच्या सरकारी बखरींतून दिली आहे.

पश्चिम किनाऱ्यावरील दर्यावर्दी चळवळी—गुप्त साम्राज्याच्या अखेरच्या दिवसांत म्हणजे ५ व्या आणि ६ व्या शतकांत पश्चिमेकडेहि भारतीयांच्या समुद्रावरील चळवळी इतर ठिकाणांप्रमाणेंच उघड दिसून येत होत्या. सिंध आणि गुजराथ यांमधील बंदरें आरमारी झटापटींच्या केंद्रांपैकीं होतीं असें दिसतें.

श्रीहर्षाच्या कारकीर्दींत सुराष्ट्रांतील लोक व्यापार आणि मालाची देवघेव करून समुद्रावर आपला उदरनिर्वाह करीत असत, असें इ. स. ६३० त ह्यूएनत्संगानें लिहून ठेवलें आहे.

दहाव्या शतकाच्या अखेरीस व अकराव्या शतकाच्या प्रारंभीं चोल राजांच्या अमदानींत, दक्षिण हिंदुस्थानांत दर्यावर्दी चळवळींना ऊत आला होता.

सिंधच्या इतिहासांत—त्यांतल्या त्यांत हा प्रदेश अरबांनीं पादाक्रांत केल्याच्या इतिहासांत—भारतीयांच्या नाविक चळवळींचीं व पराक्रमांचीं अनेक उदाहरणें सांपडतात. निझामुद्दीन अहमदच्या 'तबकत–इ–अकबरी' ग्रंथावरून पाहतां अकराव्या शतकांत सुलतान महंमदनें जाट लोकांवर स्वारी केली व त्यांचा नाश केला. या चकमकींत सुलतानच्या बाजूस मोठीं बलिष्ठ १४०० जहाजें व जाटांकडे ४००० जहाजें होतीं असें वर्णन आहे. ११ व्या शतकांतील भारतीयांच्या दर्यावरील चळवळींचें मजेदार वर्णन अल्बेरुणीनें दिलेलें आहे.

कारोमांडल किनाऱ्यावर मोतीं काढण्याचा मोठा व्यापार होता व गुजराथच्या किनाऱ्यावर मोठी धाडसाची चांचेगिरी चालू असे, असें मार्को पोलो यास इ. स. १२९२ मध्यें आढळलें. सोकोत्रा हिंदु चांचांच्या स्वाधीन झालें तेव्हां त्यांच्याजवळचा लुबाडलेला माल तेथें विक्रीला येई. कैल (तिनेवेल्ली जिल्ह्यामधील कायल), कोइलम, ठाणा, खंबायत, एडन या बंदरांचा मार्को पोलो नामनिर्देश करून त्यांच्या व्यापारांचें वर्णन करतो. यानें भारतीय नौकांविषयीं मजेदार व महत्त्वाचें वर्णन लिहून ठेविलें आहे.

चौदाव्या शतकांत फ्रायर ओडोरिक (इसवी सन १३२१) यानें हिंदी महासागरांतील आपल्या प्रवासाचें जें वृत्त लिहिलें आहे त्यावरून गुजराथच्या रजपूत खलाशांच्या अंगीं असणारें नाविक कौशल्य चांगलें दृष्टोत्पत्तीस येतें. सोमनाथ आणि चीन यांमध्यें प्रवास करणाऱ्या रजपूत जहाजांचा याहूनहि प्राचीन उल्लेख यूलच्या कॅथेमध्यें आहे.

मार्को पोलोनंतर हिंदुस्थानसंबंधीं परकीयांनीं लिहिलेली महत्त्वाची माहिती म्हणजे महुयत या मुसलमानी चिनी मनुष्यानें लिहून ठेवलेली होय. १५ व्या शतकाच्या आरंभीं यानें हिंदुस्थान व इतर प्रदेश यांच्या सफरी केल्या. कालिकत (इ. स. १४०९) ही मोठी व्यापारी पेठ असलेली त्याला आढळून आली.

कालिकत बंदराविषयीं अब्र्–अर रझाक्नें फारच मजेदार व विस्तृत माहिती दिली आहे (इ. स. १४४२). हें बंदर जगांतील नौकानयनाच्या केंद्रांपैकीं एक होतें. येथून मक्केला मिरीं भरून नेहमीं जहाजें जात. १५ व्या शतकाच्या पूर्वार्धांतील दुसरा प्रवासी निकोली कॉंटी यानें भारतीय नौकानयन व व्यापार यांसंबंधीं चांगली माहिती दिली आहे. हिंदुस्थानवासी लोक आमच्यापेक्षां मोठीं जहाजें बांधतात अशी त्यानें कबुली दिली आहे.

याखेरीज १५ व्या आणि १६ व्या शतकांतील दुसऱ्या अशा गोष्टी आहेत कीं, भारतीयांच्या दर्यावरील चळवळींपैकीं बहुतेक पश्चिम किनाऱ्यावरच्या आहेत असें त्यावरून दिसून येईल. पोर्तुगीजांच्या आगमनापर्यंत (इ. स. १५००–१५०८) अहमदाबादचे सुलतान सागर-सम्राट् होते.

वास्को द गामाला इ. स. १४९८ मध्यें पूर्व आफ्रिकेंत, खंबायत व हिंदुस्थानांतील दुसरे प्रांत येथून आलेले खलाशी आढळले. ते दक्षिणोत्तरेकडील ताऱ्यांच्या मदतीनें व नाविक यंत्रांचा उपयोग करून सुरक्षित प्रवास करीत. इ. स. १५०८ मध्यें चोल बंदरापासून कांहीं अंतरावर पोर्तुगीजांचा नाश करण्याकरितां गुजराथचें आरमार ईजिप्तच्या आरमाराला मिळालें आणि १५२१ त गुजराथच्या राजाच्या आरमाराधिपतीनें पोर्तुगीजांचा चौलजवळ पराभव करून एक जहाज बुडविलें. त्यानंतर पोर्तुगीजांशीं बऱ्याच आरमारी लढाया झाल्या. या काळांत पश्चिम किनाऱ्यावरील मोठ्या व्यापारी पेठा म्हणजे चौल व दाभोळ. इराणच्या व तांबड्या समुद्राच्या मार्गानें आशिया-युरोप यांच्याशीं येथून मोठा व्यापार चालत असे. वसईहून लांकूड मक्केला जाई. आगाशी येथें लांकडाचा मोठा व्यापार होता असें पोर्तुगीज बखरकारांनीं लिहिलें आहे.

अकबराच्या कारकीर्दींत भारतीय नौकानयनाला व नौकाबंधनाला—विशेषतः बंगाल्यांत—चांगला पाठिंबा मिळाला. ऐनेइ–अकबरींत यासंबंधीं भरपूर माहिती आहे. अकबराच्या साम्राज्यांतील प्रत्येक भाग नौकांनीं गजबजलेला असे; नौकाबंधनाचीं प्रमुख केंद्रें म्हणजे बंगाल, काश्मीर आणि ठठ्ठा हीं होत. बंगालमधील नौकानयनाच्या वाढीची साग्र माहिती 'औसिल

तूमर जुम्मा' नांवाच्या इ. स. १५८२ त राजा तोडरमलानें केलेल्या बंगालच्या जमाबंदीच्या ठोकताळ्यावरून मिळेल.

सेसरी डी फेड्रिसी नांवाचा व्हेनेशियन प्रवासी १५६५ सालीं आपल्या लेखांत असें विधान करतो कीं, हिंदुस्थानच्या या भागांत नौकाबंधनाची सामुग्री इतकी मोठी होती कीं, कॉन्स्टॅ-टिनोपलच्या सुलतानास आपलीं जहाजें अलेक्झांड्रिया येथून बांधवून आणण्यापेक्षां या ठिकाणाहूनच आणाविणें स्वस्त पडत असे.

बंगालच्या जोडीला सिंध प्रांतहि भारत नौकानयनाचें एक प्रमुख केंद्र होतें. अबुल फजलच्या माहितीवरून एकट्या ठठा सरकारांत ४०,००० जहाजें भाड्यानें देण्यासारखीं होतीं. सिंधु नदीच्या कांठीं लहोरी बंदर अतिशय महत्त्वाचें असे व तेथील बंदर-नियमांचें विस्तृत वर्णन तारीख-इ-ताहिरीमध्यें दिलें आहे.

१६ व्या शतकांत बंगाल पाहून गेलेल्या परदेशी लेखकांनीं व प्रवाशांनीं दर्याव्यापारामुळें या प्रांतांत वाहून येणारी अलोट संपत्ति व येथील बंदरांचें माहात्म्य, विपुल धान्य, सर्व प्रकारचें मांस, खंडोगणती साखर, आणि कापडाचे गठ्ठेच्या गठ्ठे असलेले प्रत्यक्ष पाहिले आहेत. हिंदुस्थानांत सर्वांत श्रेष्ठ प्रतीचें कापड सोनारगांव येथें तयार होई. द. हिंदुस्थान, सिलोन, पेगू, मलाक्का, सुमात्रा आणि दुसरे देश येथून कापड व तांदूळ नेत. सातगांव हें बंगालमधील दुसरें मोठें वाणिज्यस्थान होतें. बंगाल मिठाच्या व्यापाराकरतांहि प्रसिद्ध होतें. संद्वीप येथून प्रतिवर्षी मिठानें भरलेल्या ३०० नौका बाहेर जात. बंगाल-मधील या काळाचें अतिशय महत्त्वाचें व्यापारी केंद्र म्हणजे गौर शहर होय. याचें वर्णन अनेक परदेशी प्रवाशांनीं केलें आहे.

औरंगजेबाच्या काळीं बंगालखेरीज हिंदुस्थानच्या दुसऱ्या भागांतहि भारतीय नौकानयनाची व दर्याव्यापाराची वाढ झालेली स्पष्ट दिसून येते. कारोमांडल किनाऱ्यावरचें मोठें व्यापारी बंदर म्हणजे मच्छलीपट्टण होतें. तेथील व्यापाराचा व बड्या बड्या व्यापाऱ्यांचा उल्लेख थॉमस बौरेसारख्या प्रवाशांनीं केलेला आहे. येथून खाजगी जहाजें माल भरून आराकान, पेगू, तेनसेरीम, केटा, मलाक्का, मोका, इराण व मालदीव बेटें या ठिकाणीं जात असत, असें त्यांनीं लिहिलें आहे.

औरंगजेबाच्या काळीं पश्चिम किनाऱ्यावरहि महत्त्वाचीं व्यापारी ठिकाणें होतीं. सुरतेस औरंगजेबाचीं चार जहाजें यात्रे-करूंस मक्केला मोफत नेण्यासाठीं म्हणून नेहमीं तयार असत, असें डॉ. फ्रायर लिहितो.

मराठे अमदानी— याच काळांत शिवाजीनें नौकाबंधनाच्या धंद्याला उदार आश्रय दिल्यानें भारतीय नौकानयन व दर्या-व्यापार यांना मोठें प्रोत्साहन मिळालें. मराठी सत्तेच्या वाढी-बरोबर त्याच्या प्रचंड आरमाराचीहि वाढ होत होती. विजयदुर्ग, कुलाबा, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, अंजनवेल आणि इतर बंदरें यांतून गोद्या बांधण्यांत आल्या. या ठिकाणीं लढाऊ जहाजेंहि बांधिलीं जात. इ. स. १६९८ मध्यें कान्होजी आंग्रे याला आरमाराधि-कारी करण्यांत आलें. आंग्र्यांच्या कारकीर्दीसारखी मोठ्या पराक्रमाची व कर्तबगारीची कारकीर्द भारतीयांच्या दर्यावरील चळवळींच्या इतिहासांत क्वचित् एखादी दुसरीच दृष्टीस पडेल. यांच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांची आरमारी सत्ता शिखरास पोंचली. मुंबई सरकारास आंग्र्यांचा पाडाव करण्यास अर्धशतक झगडावें लागलें होतें. यांचा वचक इंग्रजांवर व इतर फिरंग्यांवर असे. कान्होजी आंग्रे १७२९ मध्यें वारल्यावर त्याचा पुत्र संभाजी यानें बापासारखाच पराक्रम करून फिरंग्यांना जेरीस आणलें. याच्यानंतर तुळोजीनें वडील व भाऊ यांचा कित्ता गिरविला. कच्छपासून कोचीनपर्यंत याचीं जहाजें फिरत व लूट मिळवीत. याचें पेशव्यांशीं वैमनस्य आल्याकारणानें पेशवे व इंग्रज एकत्र होऊन इ. स. १७५५ त त्यांनीं विजयदुर्गावर हल्ला केला व आंग्र्यांचें बलिष्ठ आरमार व त्यांची समुद्रावरील सत्ता नाहींशी करून टाकिली. पण आंग्र्यांच्या नाशाबरोबर मराठ्यांची दर्यावरील सत्ताहि लोप पावली. आंग्रे पाहा.

शत्रूंच्या लढाऊ किंवा व्यापारी जहाजांवर हल्ला करणारें आंग्र्यांचें मुख्य आरमार म्हणजे आठ किंवा दहा गराब आणि चाळीस किंवा पन्नास गालिबात यांचा समूह होय. गराबांना दोन शिडांपेक्षां जास्त शिडें नसत. हीं लांबीपेक्षां रुंदच जास्त असत. यांवर नऊ किंवा बारा पौंड गोळे फेंकणाऱ्या तोफा असत. गालिबात वल्हवून नेण्याच्या मोठ्या होड्या असत. यांचें वजन सत्तर पौंडांपर्यंत असे. यांत चाळीस किंवा पन्नास वल्हीं असत व त्यांचा वेग ताशीं चार मैलांपर्यंत असे. यांवर दोन किंवा चार पौंड गोळा फेंकणाऱ्या सहा किंवा आठ तोफा असत.

मोंगल साम्राज्याच्या ऱ्हासानंतर भारतीय नौकानयनाला इंग्रजांकडून प्रोत्साहन मिळालें. अजमासें दोन-अडीच शतकां-पर्यंत ब्रिटिश हिंदुस्थानानें चांगल्या प्रतिष्ठित आकाराचें व विलक्षण सामर्थ्यवान् असें आरमार आपल्या पदरीं ठेवलें होतें.

विख्यात पारशी जहाज बांधणाऱ्यांचा ( नौकाशिल्पज्ञांचा ) भारतीय वरिष्ठ आरमारी खात्याशीं संबंध येतो. लौजी नासरंजी नांवाचा सुरतेच्या जहाजांच्या कारखान्यांतील फोरमन हा कारखान्याबरोबर सुरतेहून मुंबईस गेला. या कारखान्याचा इतिहास म्हणजे एका बुद्धिमान् पारशी कुळाच्या उदयाचा इतिहासच होईल. १७५७ त लौजीनें हा कारखाना वाढविला. १७७१ मध्यें त्यानें आपले फ्रामजी मतशेरजी व जमशेटजी बोमनजी नांवाचे दोन नातू या कारखान्यांत नोकरीस ठेवले.

न्यायालयें असत. ... थावर त्याचे नातू उदयास आले. त्यांनीं मुंबई आरमार व बादशाही आरमार यांकरितां आपल्या देखरेखीखालीं चांगलीं जहाजें बांधविलीं. इ. स. १८०२ मध्यें राजाच्या आरमारी खात्यास कांहीं लढाऊ जहाजें बांधवावयाचीं होतीं व त्याकरितां एका युरोपियन शिल्पज्ञाची नेमणूक करण्याचा विचार होता. पण नावाध्यक्षांना जमशेटजीची कीर्ति माहीत असल्यानें त्याच्याकडेच हें काम सोंपविण्यांत आलें. हीं जहाजें सर्वोत्कृष्ट ठरल्यावर त्याची कीर्ति इंग्लंडभर पसरली. इ. स. १७३६ पासून १८३७ पर्यंत खालील पारशी गृहस्थ एकामागून एक मुंबई सरकारी डॉकयार्ड (गोदी) मध्यें वरिष्ठ जहाजबांधणी-अमलदार होते :—लौजी (१७३६–१७७४), मनशेरजी व बोमनजी (१७७४–१७८३), फ्रामजी व जमशेटजी (१७९३–१८०५), जमशेटजी आणि रतनजी (१८०५–१८११), जमशेटजी व नौरोजी (१८११–१८२१), नौरोजी व कर्सेटजी (१८२१–१८३७). या पारशी नौकाशिल्पज्ञांच्या अमलाखालीं या डॉकयार्डची कार्यक्षमता इतकी वाढली कीं, अशा तऱ्हेचें डॉकयार्ड युरोपखंडांत कोठेंहि आढळणार नाहीं असें लेफ्टनंट लो आपल्या ग्रंथांत स्पष्ट म्हणतो. मुंबईस नौकाबंधनाला बऱ्याच नैसर्गिक साधनांची अनुकूलता असे. जहाज बांधणें पाहा.

ईस्ट इंडिया कंपनीनें बंगाली आरमार बांधण्यालाहि चांगली मदत केली होती. याप्रमाणें ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रयत्नांनीं निर्माण झालेलें व बांधिलें गेलेलें हें भारतीय आरमार पहिल्या व दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत आणि पहिल्या चिनी युद्धांत चांगलें उपयोगी पडलें. इराणी आखात, तांबडा समुद्र आणि पूर्व आफ्रिकेचा किनारा यांसारख्या परकीय समुद्रांतहि यानें कामगिरी केली आहे. भारतीय व्यापाऱ्यांनीं दूरच्या देशांशीं चालविलेल्या धंद्यांस याचें बरेंच संरक्षण व मदत होती. १८४० च्या नंतर भारतीय आरमाराला उतरती कळा लागली. या सालच्या पुढें एकहि मोठें जहाज बांधिलें गेलें नाहीं. १८६३ च्या एप्रिल महिन्यांत हिंदुस्थानचा कारभार ब्रिटिश सरकारच्या हातीं गेल्यावर या आरमाराला कायमची रजा देण्यांत आली. आरमार पाहा.

युरोपांतील नौकानयन— पाश्चात्य देशांत प्रथम भूमध्यसमुद्रांत लांकडी पोखरलेल्या ओंड्यांतून जा-ये सुरू झाली असावी. विशेषतः समुद्रकांठच्या लोकांमध्यें समुद्रमार्गेंच वल्ह्यांच्या नावांनीं दुसऱ्या देशांस जाणें सोयीचें असे यांत शंका नाहीं. पुढें अशा नावा नेणाऱ्यांचा एक वर्गच तयार झाला व नावाहि लहान-मोठ्या बांधण्यांत प्रगति होऊं लागली. असे इतिहासकाळांतील पहिले लोक म्हणजे फिनिशियन होत. ते दर्यावर्दीपणांत फार प्रवीण असत. व्यापारी मार्गीहि समुद्रावरून सर्वत्र असत. यांचें अनुकरण ऱ्होडेशियनांनीं केलें; नंतर इटलींतील लोक पुढें सरसावले. नोर्स, डच, पोर्तुगीज या दर्यावर्दी लोकांनीं भू-गोलसंशोधनास आरंभ करून आपल्या देशांना वसाहती मिळवून दिल्या. इंग्रज लोकांनीं साम्राज्य कसें स्थापलें याचा इतिहास नौकानयनाशीं संबद्ध आहे (आरमार पाहा). १७०१ मध्यें इंग्लंडचीं ३,२८१ जहाजें एकंदर अडीच लक्ष टनांवर भरताडीचीं होतीं. लवकरच रेखांश समजण्याचें क्रोनोमीटर यंत्र तयार झालें. १८ व्या शतकाच्या अखेरीस वाफेचीं जहाजें सुरू झालीं व नौकानयनांत मोठी क्रांति घडून आली. अमेरिकेनें जलद जाणाऱ्या बोटी बांधल्या व लांकडाऐवजीं लोखंडी जहाजें बनविलीं व वहनशक्ति वाढविली. अलीकडे जर्मनी आणि जपान यांनींहि नौकानयनांत जोरानें उडी घेऊन लष्करी बोटी तयार करण्यांत कसें प्रावीण्य संपादन केलें, हें गेल्या दोन महायुद्धांवरून दिसून आलेंच. युरोपांतील सर्व राष्ट्रें याप्रमाणें नौकानयन-बंधन या धंद्यांत पडल्यामुळें साहजिक स्पर्धा सुरू झाली. समुद्र कोणाच्या ताब्यांत नसला तरी कांहीं बंदरें स्वतःचीं म्हणून प्रत्येकाला ठेवतां येतात. एखाद्या देशाचें सामर्थ्य त्याच्या जहाजांच्या व दर्यावर्दी व्यापाराच्या प्रमाणावरून अजमावतात.

आज नौकानयन हें एक शास्त्र बनलें आहे. जहाजाचा मार्ग बरोबर आहे कीं नाहीं हें समजण्यासाठीं होकायंत्रादि पुष्कळ साधनें नाविकांजवळ असतात. आकाशांतील ग्रह–ताऱ्यांवरूनहि स्थलाचें अचूक ज्ञान होत असतें. शिडें, सुकाणूं, इंजिनें, इ. यांत्रिक साधनें लागतातच. पण यांखेरीज नकाशे, आराखडे, कोनमापकयंत्र (सेक्सटंट), गतिमापक (लॉग) व विविध गणितयंत्रें यांचें पूर्ण साहाय्य लागत असतें. जहाजावर नक्की वेळ समजण्यासाठीं रेखांश काढतां आले पाहिजेत व तेंच कठिण आहे. ध्रुव ताऱ्यावरून अक्षांश कळतें. पण सूक्ष्मकालमापक प्रमाणघड्याळावरून (क्रोनोमीटर) नक्की वेळ कळूं लागली. या घड्याळाची जागा आज बिनतारीनें घेतली. या बिनतारीचा जहाजाच्या मार्गांत फार उपयोग आहे. तावडतोब मदतीचे संदेश पाठविण्याचें याखेरीज दुसरें साधन नाहीं.

**नौकास्थिरोग**— (नॅव्हिक्युलर डिसीझ). हा घोड्यास होणारा एक रोग असून या रोगामुळें घोडे लंगडूं लागतात. याचें कारण त्या घोड्याच्या नौकास्थीस अथवा घोट्यासारख्या हाडास रोग होतो हें होय. या रोगामुळें बहुधा पुढच्या पायास विकार होतो. यावर उपचार करणें फार कठिण आहे व या रोगाची वाढ झाली असतां संवेदनातंतूंचें विच्छेदन करण्याची शस्त्रक्रिया पशुवैद्याकडून करून घेणें हाच उपाय असतो. ह्यामुळें दुःखाची संवेदना घोड्यास होत नाहीं.

**नौखाली**—पाकिस्तान, पूर्व बंगाल, चितगांव विभाग. क्षे. फ. १,६५८ चौ. मैल. लो. सं. (१९४१) २२,१७,४०२. तागाच्या लागवडीमुळें लोकसंख्येंत बरीच वाढ झाली आहे. भाषा 'चातगेया'. यात हिंदू मु. चार लाख आहेत. मुसलमान शेख जातीचे आहेत. १९४७ साली अल्पसंख्य मुसलमानांनी या भागांतील हिंदूंची मोठी कत्तल केली. सुधाराम हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. १७६५ मध्यें हा भाग कंपनी सरकारकडे आला. १८२२ मध्यें स्वतंत्र जिल्हा झाला. १८६० साली स्वतंत्र कलेक्टर नेमण्यात आला. मुख्य पीक तांदुळाचें आहे.

**नौगतिमापक यंत्र**—(लॉग). समुद्रावर प्रवास करीत असलेल्या जहाजाची गति मोजण्याचें यंत्र. या प्रकारचें हातांनीं चालविण्याचें यंत्र म्हणजे एक सपाट लांकडी फळा असतो व त्याला शिशाचें वजन लावलेलें असतें व तो जहाजाच्या मागील बाजूस समुद्रात सोडलेला असतो. त्याला जी एक दोरी बांधलेली असते ती दोरी विशिष्ट वेळांत जितकी भरेल तितकी त्या जहाजाची त्या वेळांतील गति होय. अशा तऱ्हेच्या कांहीं यंत्रांस एक फिरकी बसविलेली असते व तिला एक दोरी व एक गणक यंत्र बसविलेलें असतें. ही फिरकी दोरीच्या एका टोंकास जोडून समुद्रांत सोडलेली असते व ती एका विजेच्या यंत्रास जोडलेली असते. त्यानें दर मैलाचा दहावा भाग मोजला जाऊन खूण केली जाते.

**नौगांव**—आसाम, एक जिल्हा. जिल्ह्याचा कांहीं भाग सपाट आहे. बऱ्याच भागांत टेंकड्या आहेत. ब्रह्मपुत्रा यांतूनच वाहते. जंगलचा भाग बराच आहे. कापिली खोऱ्यांत पाऊस ४० इंच. इतरत्र ७० ते ८० इंच. क्षे. फ. ३,८९८ चौरस मैल. लो. सं. ७,१०,८००. १४९५ गांवें आहेत. शेंकडा ६४ हिंदू असून शेंकडा ६६ लोक आसामी भाषा बोलतात. बहुतेक लोक शेतीच करतात. कापूस पहाडांत पिकवतात. १८५४ मध्यें चहाची प्रथम लागवड झाली. संरक्षित जंगल बरेंच आहे. त्यात इमारती लाकूड मिळतें. रबराचीहि थोडी-फार लागवड होते. आसाम-बंगाल रेल्वेचा फांटा यांतूनच जातो. बराचसा व्यापार नद्यांच्या पात्रांतून चालतो. व्यापारी बहुतेक मारवाडी आहेत.

**न्यायदर्शन**—षड्दर्शनांतलें सहावें दर्शन. हें सर्वांत उत्तर-कालीन आहे. अनुमान कसें काढावें हाच प्रतिपादनाचा मुख्य विषय आहे. वैशेषिक दर्शनाचाहि विषय हाच. पण न्यायामध्यें विशेष म्हणजे तत्त्वज्ञानाचाहि ऊहापोह आहे. न्यायाचा कर्ता अक्षपाद ऊर्फ गौतम. यानें खि. पू. १५० च्या सुमारास न्याय-सूत्रें रचिलीं. त्यानें न्यायांत यथार्थज्ञानप्राप्तीचीं साधनें सांगून मीमांसा केली आहे. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द या चार साधनांत अनुमान हेंच श्रेष्ठ. त्याचे प्रकार तीन: (१) पूर्ववत्, (२) शेषवत्, व (३) सामान्यतोदृष्ट होतीं. विजयदुर्ग, अध्यात्म व मानसशास्त्राचें विकासन न्यायांत झालेलें आहे. वैशेषिक व न्याय या दोहोंचा एकत्र विचार उदयनाचार्यांनीं आपल्या 'कुसुमांजलि' या ग्रंथांत (इ. स. १२०० चा सुमार) केला आहे. ईश्वर एक विशिष्ट आत्माच आहे; पण सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् आहे असें यांत प्रतिपादन करण्यांत आलें आहे.

या दर्शनाला आन्विक्षिकी धर्म किंवा अक्षपाददर्शन असेंहि म्हणतात. न्यायदर्शनांत वैशेषिकांचा परमाणुवाद मान्य केलेला आहे. न्यायदर्शन हें तर्कशास्त्र आहे. यांत तर्कविचार फार चांगल्या रीतीनें केला आहे. न्यायदर्शनांत संसार दुःखमय मानला असून जी थोडीबहुत सुखाची प्रतीति येते ती देखील दुःखमय आहे असें प्रतिपादिलें आहे.

**न्यायपद्धति**—प्राचीन न्यायपद्धतीबद्दल सविस्तर माहिती थोड्याबहुत फरकानें मनु, याज्ञवल्क्य, नारद, कात्यायन, बृहस्पति, वगैरे स्मृतिकारांनीं आपापल्या स्मृतींत दिलेली आहे. विद्वानांच्या साहाय्यानें राजानें न्याय द्यावा. न्यायनिवाडा करणें राजसत्तेचें आद्य कर्तव्य होय. त्याकरितां निरनिराळीं न्यायाधीश मंडळें नेमावींत. न्यायाधीश वेद, मीमांसा, व्याकरण व धर्मशास्त्र यांत पूर्ण पारंगत असावेत. पुग, श्रेणी, कुल, वगैरे विशिष्ट न्याय देणारीं मंडळें असावींत. खटल्याचें काम चालण्याच्या बाबतहि नियम व पद्धति असे. प्रचलित न्यायपद्धतींतील बऱ्याच गोष्टी पूर्वींच्या काळींहि होत्याच. परंतु कांहीं भेद लक्षांत घेण्यासारखे आहेत. एक तर न्यायाधीशपद्धतीस पूर्वीं वाव नव्हता. फिर्याद व कैफियत हीं दोन्ही न्यायगृहांत उभयपक्षांनीं एकमेकांच्या समोर लिहावीं लागत. आजच्या वकीलवर्गासारखा पक्षकार व न्यायाधीश या उभयतांस साहाय्यक मध्यस्थ कोणी नसे. उलट हल्लींप्रमाणें पूर्वीं मुद्दे काढण्याची योजना नसे.

मुसलमानी अमदानींत धारापद्धति व सरंजामी पद्धति यांशीं जुळती अशी न्यायपद्धति असे. मोंगल बादशहांपैकीं कांहीं न्यायदानाच्या कामीं जबाबदारीची जाणीव ठेवून लक्ष देत असत. शहाजहान यानें न्यायाच्या कामाकरितां बुधवार राखून ठेवला होता. सुभ्यासुभ्याला काजीचें कोर्ट असे आणि जुन्या परंपरेंतील श्रेणीकुलादि स्थानिक कोर्टें गांवोगांवीं असत.

मराठी अमलांत शिवाजीनें अगदीं पहिल्यापासून या बाजूकडे लक्ष दिलें होतें. राज्याभिषेकाच्या पूर्वींच १०।१५ वर्षें त्यानें न्यायखातें व न्यायाधीश यांची योजना केली होती. पुढें अष्टप्रधानांत सरन्यायाधीश याचा समावेश करण्यांत आला. स्थानिक निवाड्यांकरितां गांवोगांव लवाद अगर पंचायती असत. मुख्य किंवा वरिष्ठ न्यायालय राजधानी-च्या ठिकाणीं असे. याच्या अधिकाराखालीं कमाविसदारांची

न्यायालयें असत. कमाविसदारांना दिवाणी व फौजदारी दोन्ही प्रकारचे खटले चालविण्याचा अधिकार असे. जिंकणाराकडून 'हरकी' व अपराध्याकडून 'गुन्हेगारी' सरकार घेत असे. दिवाणी दाव्यांत बहुतेक वतनें, दत्तक, वांटण्या, शेतजमिनीच्या हद्दी, वगैरेंचे दावे असत. खटले न्यायाधीश जुन्या स्मृतींप्रमाणें चालवीत. शिवाजीच्या वेळीं बाळाजी पंडित (१६७४), नंतर निराजी रावजी (१६९२), होनाजी अनंत (१७१३), काशी अनंत (१७३९), खंडेराव काशी (१७५०) यांप्रमाणें प्रसिद्ध न्यायधीश रामशास्त्री प्रभुणे येण्यापूर्वी होऊन गेले. रामशास्त्र्यां-नंतर अय्याशास्त्री, नंतर बाळशास्त्री टोकेकर या जागेवर होते.

हिंदु राजवटींत निर्णय गांवसभेमार्फत होई. मुसलमानींत तर्फ व परगणा-सभा (मजलसी) पुढें आल्या. मराठी साम्राज्यांत प्रथम 'धर्मसभा' श्रेष्ठ न्याय-सभा म्हणून होती, पण पुढें पंचायतपद्धति रूढ झाली. ब्रिटिश अमदानींत पाश्चात्य पद्धति सुरू झाली, पण अद्यापि ती भिन्न संस्कृतीच्या हिंदी लोकांस मानवलेली नाहीं. (न्यायालयें पाहा).

इंग्लंडांत असा कायदा आहे कीं, वरिष्ठ कोर्टाच्या न्याया-धिशांची नेमणूक राजानें करावी. मात्र त्यांनीं आपलें न्यायदानाचें काम स्वतंत्रपणें करावें. असे न्यायधीश त्यांच्या अधिकारांवर हयातीपर्यंत किंवा त्यांचें वर्तन उत्तम असेपर्यंत राहतात आणि त्यांना पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांच्या संमतीनें बडतर्फ करता येतें. खालच्या कोर्टांतील न्यायाधीश लॉर्ड चॅन्सेलर हा मंत्री नेमतो, आणि न्यायाधिशानें गैरवर्तन केल्यास तो अशा न्याया-धिशाला बडतर्फ करूं शकतो. हायकोर्टांतले न्यायाधीश ज्या वकि-लांनीं दहा वर्षें वकिलीचा धंदा केला आहे अशा वकिलांना नेम-तात; आणि अपील कोर्टाचे न्यायधीश ज्यांनीं पंधरा वर्षें वकि-लीचा धंदा केला आहे अशा बॅरिस्टरांना किंवा एक वर्ष हायकोर्ट जज्जाचे काम केलें आहे अशा जज्जाला नेमतात. अगदीं कनिष्ठ कोर्टाचे न्यायाधीश ज्यांनीं किमान सात वर्षें वकिली केली आहे अशा बॅरिस्टरांना नेमतात. कोणताहि जज्ज कॉमन्स सभेचा सभासद होऊं शकत नाहीं. (न्यायालयें पाहा).

**न्यायव्यास ब्राइंदेकर** (१४ वें शतक)— एक महा-नुभावी ग्रंथकार. हा उपाध्याय आम्नायप्रवर्तक कमळाउसेचा शिष्य असून लीळाचरित्रावर हेतुस्थळ नांवाचा ग्रंथ यानें तयार केला. त्यांत चक्रधराचीं सूत्रें कोणत्या प्रसंगीं काय हेतूनें सांगितलीं आहेत याचें विवरण आहे. स्मृतिवृद्धाचार, लीला-प्रयुक्ति, सिद्धान्तस्थळ, इ. याचे अनेक संस्कृत व मराठी ग्रंथ आहेत. यानेच वज्र लिपि व सुंदरी लिपि या दोन लिपी प्रचारांत आणल्या.

**न्यायालयें**—इंग्लंडात न्यायदानाकरिता अनेक प्रतीचीं कोर्टें आहेत. त्यांत 'मध्यवर्ती' (सेंट्रल) आणि 'स्थानिक' (लोकल) हे दोन मुख्य वर्ग आहेत.

सेंट्रल कोर्टें—प्रथम नॉर्मन राजांच्या वेळीं क्युरिया रेजिस ऊर्फ 'किंग्ज कोर्ट' स्थापन झालें; व तेथून सुधारणा होत होत हल्लींचीं 'मध्यवर्ती कोर्टें' स्थापन झालीं. (१) कोर्ट ऑफ एक्सचेकर, (२) कोर्ट ऑफ कॉमन प्लीज, आणि (३) कोर्ट ऑफ किंग्ज बेंच अशीं तीन मध्यवर्ती कोर्टें होतीं. तीं १८७३ सालच्या ज्युडिकेचर ॲक्टनें रद्द करण्यांत आलीं आणि 'सुप्रीम कोर्ट ऑफ ज्युडिकेचर' हें वरिष्ठ कोर्ट स्थापन करण्यांत आलें. या कोर्टाचे दोन भाग आहेत : (१) 'हायकोर्ट ऑफ जस्टिस'—या कोर्टांत अव्वल दावे चालतात आणि खालच्या कोर्टांतील निकालावरचीं अपीलेंहि चालतात. (२) 'कोर्ट ऑफ अपील'—या कोर्टांत पहिलें अपील चालतें आणि त्यावर शेवटलें अपील 'हौस ऑफ लॉर्ड्स'कडे करतात. हायकोर्ट ऑफ जस्टीस याचे तीन पोटविभाग आहेत : (१) किंग्ज बेंच डिव्हिजन—या कोर्टांत 'लॉर्ड चीफ जस्टिस' हा मुख्य न्याया-धीश असतो. (२) चॅन्सरी डिव्हिजन—या कोर्टांत 'लॉर्ड चॅन्सलर' हा मुख्य असतो. (३) दि प्रोबेट, डायव्होर्स, ॲड ॲडमिरॅल्टी डिव्हिजन.

लोकल कोर्टें : (१) काउंटी कोर्टें, (२) मॅजिस्ट्रेट्स्, (३) क्वॉर्टर सेशन्स.

*हिंदुस्थान*— *इंग्लंडातील ब्रिटिश साम्राज्य सरकारनें केलेल्या* कायद्याप्रमाणे १८६५ सालीं बॉंबे लेटर्स पेटंट नांवाच्या हुकुमानें व्हिक्टोरिया महाराणीनें मुंबई इलाख्यांत हायकोर्ट स्थापन केलें आणि कमाल पंधरा हायकोर्ट जज्ज नेमण्यांत येतील असें जाहीर केले. या हायकोर्टाला दिवाणी, फौजदारी, नाविक (ॲडमिरॅल्टी ॲड व्हाइस ॲड्मिरॅल्टी), व्यवस्थापत्रविषयक (टेस्टॅमेंटरी), अकृतव्यवस्थापत्रविषयक (इन्टेस्टेट), वैवाहिक सत्ता, अव्वल, विवादीय (ॲपेलेट) या सर्व प्रकारचे अव्वल दावे व अपिलें चालविण्याचा अधिकार देण्यांत आला; आणि प्रथम एक चीफ जस्टिस आणि सहा हायकोर्ट जज्ज नेमण्यांत आले. या प्रत्येक जज्जाला नेमणूक होतांच प्रथम 'मी प्रामाणिकपणानें माझ्या शक्त्य-नुसार काम बजावीन' अशा आशयाची शपथ घ्यावी लागते (कलमें १–६). या हायकोर्टाला ॲड्व्होकेट, वकील व ॲटर्नी यांना सनदा देण्याचा व तत्संबंधीं नियम करण्याचा अधिकार आहे (कलमें ९–१०). मुंबई हायकोर्टाला अव्वल दावे चाल-विण्याचा अधिकार मुंबई शहरापुरताच आहे; आणि अपिलें चालवण्याचा अधिकार सर्व मुंबई इलाख्याचा आहे (कलमें ११ ते १८). सदर हायकोर्टाच्या निकालाविरुद्ध अपील लंडन येथील

प्रिव्ही कौन्सिलकडे चालतें व तो निकाल शेवटचा समजला जातो (कलम ३९). आतां स्वतंत्र हिंदुस्थानची राज्यघटना तयार झाली आहे, व सदर प्रिव्ही कौन्सिलचा अधिकार नष्ट होऊन सदर अधिकार हिंदुस्थानच्या फेडरल कोर्टाकडे आला आहे.

फौजदारी कोर्टें— मुंबई हायकोर्टाच्या ताब्यांतील फौजदारी कोर्टांची व्यवस्था 'क्रिमिनल-प्रोसीजर कोड' या कायद्यांत केलेली आहे. फौजदारी कोर्टें आहेत तीं—(१) सेशन कोर्ट प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणीं; (२) प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट कोर्टें मुंबई शहरांत; (३) १ ला वर्ग मॅजिस्ट्रेट–प्रत्येक जिल्ह्याचा कलेक्टर व तालुक्याचा मामलेदार यांना पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटचा अधिकार म्हणजे कमाल दोन वर्षें कैद, व कमाल एक हजार रुपये दंड, आणि फटके या शिक्षा देण्याचा अधिकार असतो. (४) २ रा वर्ग मॅजिस्ट्रेट–याला सहा महिने कैद व दोनशें रुपयांपर्यंत दंड करण्याचा अधिकार. (५) ३ रा वर्ग मॅजिस्ट्रेट– याला एक महिना कैद व पन्नास रुपये दंड करण्याचा अधिकार. (६) बेंच मॅजिस्ट्रेट कोर्टें. इतक्या प्रकारचीं कोर्टें आहेत. या निरनिराळ्या कोर्टांना पीनल कोडांतील कोणत्या गुन्ह्यांचे खटले चालविण्याचा अधिकार या मॅजिस्ट्रेटांना आहे, त्यासंबंधीं सविस्तर माहितीचा तक्ता क्रिमिनल प्रोसीजर कोड या कायद्यांत शेवटीं जोडला आहे (कलमें ६ ते ३२). शिवाय जरूर त्या गुन्ह्यांचे खटले चालविण्याकरितां स्पेशल मॅजिस्ट्रेट नेमण्याचा प्रांतिक सरकारला अधिकार आहे (कलम १४). तसेंच जस्टिस ऑफ पीस म्हणजे जे. पी. प्रांतिक सरकार नेमतें (कलम २२).

दिवाणी कोर्टें–वर लिहिलेल्या 'लेटर्स पेटंट बॉम्बे' या हुकुमानें मुंबई हायकोर्टाला मुंबई शहरांतील सर्व अव्वल दिवाणी दावे चालवण्याचा आणि मुंबई इलाख्यांतील इतर दिवाणी कोर्टांच्या निकालावरील अपिलें चालविण्याचा अधिकार दिलेला आहे. हायकोर्टानें केलेल्या अपिलांच्या निकालावर अपिलें चालवण्याचा अधिकार प्रिव्ही कौन्सिलला आहे. हा प्रिव्ही कौन्सिलचा अधिकार वर लिहिल्याप्रमाणें लवकरच स्वतंत्र हिंदुस्थानच्या फेडरल कोर्टाकडे येणार आहे.

मुंबई हायकोर्टाच्या अधिकाराखालीं जिल्ह्यांना डिस्ट्रिक्ट कोर्टें आणि मोठाल्या तालुक्यांच्या ठिकाणीं फर्स्ट क्लास सबजज्ज कोर्टें आहेत व लहान तालुक्यांच्या ठिकाणीं सेकंडक्लास सबजज्ज (म्हणजे कमाल ५,००० पांच हजार रु. पर्यंत किंमतीचे दावे चालवण्याचा अधिकार असलेलें सबजज्ज) कोर्टें आहेत. दिवाणी काम कमी असल्यास दोन तालुक्यांना मिळून एक सबजज्ज आळीपाळीनें दोन्ही ठिकाणीं काम करणारा नेमतात. शिवाय केवळ पैक्याचे दावे चालवण्याकरितां मुंबई–पुणें, वगैरे मोठ्या शहरांत स्मॉल कॉज कोर्टें आहेत. हीं सर्व दिवाणी कोर्टें 'सिव्हिल प्रोसीजर कोड' व 'प्रेसिडेन्सी स्मॉल कॉज कोर्टस् ॲक्ट' (१८८२) व 'प्रॉव्हिन्शियल स्मॉल कॉज कोर्टस् ॲक्ट' (१८८७) या कायद्यांनीं स्थापन झालीं आहेत. शिवाय दिवाणी स्वरूपाचे दावे म्हणजे मदत दावे, चालू वहिवाटीचे दावे चालविण्याकरितां 'लॅंड रेव्हेन्यू कोड' व 'मामलेदार कोर्ट ॲक्ट' प्रमाणें मामलेदारांना अधिकार आहे.

**न्यासा**— मध्य आफ्रिकेंतील तिसऱ्या प्रतीचें मोठें सरोवर. महत्तम लांबी ३५० मै. व रुंदी ४५ मैल. क्षेत्रफळ ११,००० चौ. मै.. समुद्रसपाटीपासून उंची १,६५० फूट. याची महत्तम खोली १,१५८ फूट आहे. या तलावाचा किनारा इंग्रज–पोर्तुगीज यांच्या ताब्यांत आहे.

**न्यासालॅंड**— मध्य आफ्रिकेतील एक ब्रिटिश प्रोटेक्टरेट, म्हणजे ब्रिटिश संरक्षणाखालील प्रदेश. याच्याभोंवतीं न्यासा सरोवर, टॅंगानिका, ऱ्होडेशिया व पोर्तुगीज पूर्व आफ्रिका हीं आहेत. हवा सामान्यतः उष्णकटिबंधाप्रमाणेंच, परंतु शिरे हायलंड या भागांत जरा थंड आहे. जमीन अत्यंत सुपीक असून कॉफी, चहा, तंबाखू, कापूस, इत्यादिकांचे मळे व शेतें जागजागीं आहेत. ल्यॅन्टायर ही अशाचपैकीं एक वसाहत आहे. झोम्बा हे राजकारभाराचें मुख्य ठिकाण आहे. क्षेत्रफळ ३७,३७४ चौरस मैल. लोकसंख्या (१९४१)— युरोपियन १,७३८, आशियाटिक १,८५१, व स्थानिक १६,८२,४५६.

या प्रदेशांत प्रथम १८५९ सालीं डेव्हिड लिव्हिंगस्टोन हा इंग्रज प्रवासी न्यासा सरोवरानजीक आला व त्या सरोवराला त्यानें सदर नांव दिलें. १८७४ सालीं लिव्हिंगस्टोनिया मिशन आणि १८७६ सालीं स्कॉटलंड चर्च मिशन या प्रदेशांत स्थापन झालें. शिवाय आफ्रिकन लेक्स कार्पोरेशनने येथें व्यापार सुरू केला. १८९३ सालीं या प्रदेशाला ब्रिटिश सेंट्रल आफ्रिका प्रोटेक्टरेट हें नांव देण्यांत आलें. पण १९०७ सालीं तें नांव बदलून हल्लींचें नांव देण्यांत आलें. १९१४ सालीं जर्मन सैन्यानें या प्रांतावर स्वारी केली, परंतु ब्रिटिश सैन्यानें जर्मनांचा पराभव केला. या प्रांताचा कारभार गव्हर्नर आणि कमांडर–इन–चीफ हा सरकारनियुक्त कायदे मंडळाच्या मदतीनें चालवतो. या देशांत तीन प्रांत आणि १४ जिल्हे आहेत. येथें मिशन सोसायट्यांच्या शाळा पुष्कळ आहेत व एक सरकारी शाळा आहे. या देशाचें सरकारी उत्पन्न (१९४५) ७,७९,१६० पौंड आणि खर्च ७,६९,३६६ पौंड आहे. येथें रेल्वे व मोटार-रोड हे वाहतुकीचे मार्ग असून कित्येक वैमानिक तळ आहेत. या प्रदेशांत न्यासा हें मोठें सरोवर असून त्याच्या दक्षिणेकडील प्रदेश उंचवट्याचा आहे व तेथेंच युरोपियन लोकांची वस्ती आहे. न्यासा सरोवराच्या पश्चिम बाजूला प्रदेश डोंगराळ आहे.

आणि त्या बाजूच्या सरोवराच्या कांठालगत तद्देशियांची वस्ती आहे.

**न्युबिआ**—ईशान्य आफ्रिकेंतील एक प्रदेश. न्युबि हा अरबी शब्द नीग्रोवाचक आहे. त्यावरून न्युबिआ ही संज्ञा निघाली. तांबडा समुद्र आणि लिबिआची मध्यभूमि यांमध्यें हा भाग आहे. अरब व बोस्निअन लोक या भागांत येऊन राहिले. हा भाग निर्जन, रुक्ष व खडकाळ आहे. हा प्रदेश आतां ईजिप्शियन सुडान प्रांतांत समाविष्ट आहे. मोठें शहर खार्टूम आहे.

**न्युमिडिआ**—आफ्रिकेंतील पश्चिम उत्तरार्धांत असलेला एक प्राचीन प्रांत. हल्लींचा अल्जीरिया ह्यांतलाच आहे. हा भूमध्यसमुद्राच्या कांठीं असून रोमन–कार्थेजिअन लढाईच्या वेळीं मुलया नदीपासून कार्थेजिअन प्रांतापर्यंत पसरला होता. रोमन साम्राज्यांतहि तो एक वेळ समाविष्ट झाला होता.

**न्यूआर्क**—अमेरिकन संयुक्त संस्थानें, न्यू जर्सी संस्थानामधील एक मोठें शहर व बंदर. हे न्यू यॉर्क शहराच्या पश्चिमेस आठ मैलांवर आहे. उद्योगधंद्याबद्दल हें फार प्रसिद्ध आहे. 'न्यूआर्क ॲकॅडमी' व इतर शिक्षणसंस्था आहेत. कापड, कातडी काम, साखर, लोखंडी काम, रासायनिक द्रव्यें, फेल्ट टोप्या, लांकडी काम, धातूकाम, वगैरेचे अवाढव्य असे कारखाने आहेत. या कारखान्यांतून सालिना १५।१६ कोटी डॉलर किंमतीचा माल निघतो. येथें अनेक नामांकित विमा कंपन्यांच्या मुख्य कचेऱ्या आहेत. प्रेक्षणीय इमारती किती तरी आहेत. लोकसंख्या ४,२९,७६०. येथें एक विमानतळ आहे.

**न्यू ऑर्लिन्स**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील लुइसियाना संस्थानांत मिसिसिपी नदीच्या डाव्या तीरावर हें शहर वसलेलें आहे. येथील हवा समशीतोष्ण असून हे आरमाराचें ठाणें आहे. या शहरांत जर्मन, इटालियन, आयरिश, फ्रेंच, वगैरे अनेक जातींचे लोक राहतात. हें १७१८ मध्यें ज़ीनबॅप्टिस्ट लेगाइन यानें वसविलें. याची वस्ती सुमारें पांच लाख आहे. येथें बऱ्याच शाळा व रुग्णालयें आहेत व एक गोऱ्या लोकांकरितां विश्वविद्यालय आहे. येथें कांहीं इमारती व देवळें प्रेक्षणीय आहेत. लो. सं. ४,९४,५३७. येथें टुलेन विद्यापीठ व रोमन कॅथोलिक लोयोला विद्यापीठ आहे.

**न्यू इंग्लंड**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील ईशान्य भागाचीं सहा संस्थानें मिळून न्यू इंग्लंडचा गट होतो. मेन, न्यू हॅम्पशायर, व्हरमॉंट, मॅसॅच्युसेट्स, कनेक्टिकट व -होड द्वीप हीं तीं ६ संस्थानें होत.

**न्यू कॅलेडोनिया**—हें बेट ओशियानिया खंडांत मेलोनेशिया भागांत असून तेथें फ्रेंचांची सत्ता आहे. याचें क्षे. फ. ६,२७५ चौ. मैल आहे व या बेटांत दोन पर्वतांच्या रांगा आहेत. न्यूमिया हें शहर या बेटाची राजधानी व मुख्य बंदर आहे. ५०० चौ. मैल प्रदेश अरण्यमय आहे. त्यांत बहुतेक पाइन जातीचीं झाडें आहेत. येथील दऱ्यांचा प्रदेश फार सुपीक आहे. तेथें कॉफी, नारळ, कापूस, मका, तमाखू आणि पाइन ॲपल हीं पिकें होतात. शिवाय गुरें व मेंढ्या पाळण्याचा धंदा मोठ्या प्रमाणांत चालतो. येथें खनिज द्रव्यें आतिशय विपुल आहेत तीं : लोखंड, सोनें, रुपें, मँगॅनीझ, क्रोम व कोबाल्ट हीं होत. येथील लो. सं. ५३,२४५ असून तीपैकीं १६,७९४ गोरे लोक व बाकीचे जाव्हानी, मलायी, जपानी, वगैरे आशियाटिक लोक आहेत. या बेटाचा राज्यकारभार एक फ्रेंच गव्हर्नर आणि १५ लोकनियुक्त सभासदांचें कौन्सिल चालवतात.

**न्यू कॅसल**—इंग्लंडांतील नॉर्दम्बरलॅंड परगण्याचें मुख्य ठिकाण, बंदर व शहर. येथे १२ व्या शतकाच्या अखेरीस बांधलेला एक किल्ला आहे. कोळशाच्या खाणीबद्दल हें प्रसिद्ध आहे. जहाजें बांधण्याचे, धातुकामाचे, वगैरे अनेक कारखाने व उद्योगधंदे आहेत. लो. सं. २,६४,३७०.

**न्यू गिनी**—पूर्व द्वीपसमूहामधलें एक बेट. ऑस्ट्रेलिया व

शिंपांचे अलंकार घातलेला आदिवासी

ग्रीनलंड यांच्याखालोखाल तिसऱ्या अनुक्रमानें जगांतलें हें मोठें बेट आहे. क्षेत्रफळ ९३,००० चौ. मै.. जंगल पुष्कळ असून

अप्रवेशित भागहि बराच आहे. कोको, कॉफी यांची लागवड व व्यापार आहे. रबर, लांकूड, मोतीं, खोबरें व इतर शेतीचे पदार्थ हा माल बाहेर पाठविला जातो. सोनें, तांबें, वगैरेंच्या खाणी आहेत. कांहीं रानटी लोक जंगलांतून अद्याप नरमांस-भक्षक असल्याचें आढळलें आहे. पहिल्या महायुद्धानंतर हा प्रदेश ब्रिटिशांकडे राष्ट्रसंघानें दिला व याचा कारभार ऑस्ट्रेलिया पाहतो. आदिवासी नसलेले लोक ६,४९८ आहेत. पैकीं ३,३४५ ब्रिटिश व २,०६१ चिनी आहेत. देश्य आदिवासी लोक ६,६८,८७१ आहेत. राबौल हें राजधानीचें ठिकाण आहे.

**न्यू ग्रानाडा**— हल्लीं ज्याला कोलंबियाचें प्रजासत्ताक राज्य म्हणतात त्यासच पूर्वी स्पेनच्या अमलाखालीं असतांना न्यू ग्रानाडा म्हणत. त्या वेळीं यांत कोलंबियाशिवाय व्हेनेझुएला व इक्वेडोर यांचाहि समावेश होत असे. त्या वेळीं ही स्पॅनिश वसाहत होती व तींत पनामाचा प्रदेश, माराकाइबो, कराकस, कुमाना, ग्वायना, वगैरे अनेक स्पॅनिश वसाहतींचा समावेश होत असे. आतां यांतील कांहींचा अन्तर्भाव व्हेनेझुएला व इक्वेडोर यांमध्यें होतो. प्रथम १५३७ मध्यें बोगोटा पठाराला 'लिओरेनो डी ग्रानाडा' असें नांव पडलें व पुढें १५५० त तो भाग पेरूस जोडण्यांत आला; पण १७१८ मध्यें 'नेव्हा ग्रानाडा' अथवा 'न्यू ग्रानाडा' या नांवानें पृथक् करण्यांत आला आणि आतां यास कोलंबिया म्हणतात. कोलंबिया पाहा.

**न्यू जर्सी**—अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतील पहिल्या १३ संस्थानांतलें एक. याच्या पूर्वेस अटलांटिक महासागर आहे. क्षेत्रफळ ७,८३६ चौरस मैल. लोकसंख्या ४१,६०,१६५. दक्षिण व पूर्व भागांत हें संस्थान सखल व सपाट आहे. उत्तरेकडील भाग डोंगराळ आहे. या संस्थानच्या ईशान्य भागाचा न्यू यॉर्क शहराशीं घनिष्ठ संबंध आहे. ट्रेन्टन हें कारभाराचें मुख्य ठिकाण आहे. न्यूआर्क (न्यू यॉर्क नव्हे) हें एक मोठें शहर आहे. अटलांटिक शहर हें हवा खाण्याचें ठिकाण आहे. बहुतेक वस्ती गोरे लोकांची असून सुमारें एक लाख नीग्रो आहेत. न्यू जर्सीमध्यें उद्योग-धंद्यांची फारच वाढ झालेली आहे व मालाच्या वाहतुकीचीं विपुल साधनें आहेत. न्यू यॉर्ककडे जाण्याकरितां भूमिगत, भूमीवरची व जलमार्गांची, आगगाड्या-बोटी वगैरेंची सोय आहे. १६०९ मध्यें यांत बाहेरच्या लोकांचा प्रथम प्रवेश झाला. स्वीडिश, डच व इंग्रज या अनुक्रमानें याचें हस्तांतर होऊन शेवटीं हें इंग्रजांकडे आलें. १७७७ मध्यें न्यू जर्सी हें स्वतंत्र संस्थान झालें.

**न्यू झीलंड**—ब्रिटिश साम्राज्यांतील एक वसाहत. ऑस्ट्रेलियाच्या पूर्वेस १,२०० मैलांवर दोन बेटें आहेत. एक उत्तर द्वीप व एक दक्षिण द्वीप व आणखी कांहीं लहान लहान बेटें मिळून हें न्यू झीलंड झालें आहे. क्षेत्रफळ १,१३,३१५ चौरस मैल. लोकसंख्या १६,३१,४१४. १६४२ मध्यें टास्मान यानें याचा शोध लावला. १७६९ मध्यें कॅप्टन कुक यानें किनारा-भागाचें संशोधन केलें. १८४० मध्यें स्थानिक 'माओरी' लोकांकडून इंग्लंडनें हा प्रदेश मिळवला व वसाहत केली. १९०७ मध्यें 'डोमिनिअन' म्हणून गणण्यांत आलें. वेलिंग्टन हें मुख्य ठिकाण आहे.

हा मुलूख सामान्यतः डोंगराळ आहे. यांत पुष्कळ सरोवरें व नद्या आहेत. उष्णोदकाचे झरे आणि निसर्गनिर्मित पाण्याचीं कारंजीं अनेक ठिकाणीं आढळतात. सोनें आणि कोळसा खाणीं-तून व जंगलांतून लांकूड काढणें हे महत्त्वाचे धंदे आहेत. शेती व जनावरें पाळणें हे येथील लोकांचे प्राथमिक व मुख्य व्यवसाय आहेत.

येथील आदिवासी माओरी असून त्यांच्यापैकीं बरेचसे बाटून ख्रिस्ती झाले आहेत. यांना शिक्षण देण्याचे बरेच प्रयत्न चालले आहेत. न्यू झीलंडमध्यें एक विद्यापीठ व कांहीं कॉलेजें आहेत. प्राथमिक शिक्षण सक्तीचें आहे.

**न्यूटन, सर ऐझाक** (१६४२-१७२७)—एक जगद्विख्यात ब्रिटिश सृष्टिशास्त्रज्ञ. १६६१ मध्यें मॅट्रिक, १६६५ मध्यें बी. ए., व १६६८ मध्यें एम्. ए. झाला. शाळेमध्यें शिकत असल्यापासूनच यांत्रिक विद्येची आवड होती. शास्त्रीय बाबींत बुद्धीची प्रगति असे. हा श्रेष्ठ दर्जाचा गणितज्ञ होता. बी. ए. होण्यापूर्वींच त्यानें अनेक शास्त्रीय विषयांवर निबंध लिहिले. गुरुत्वाकर्षणाचा

शोध लावून त्यावर एक ग्रंथ लिहिला. (गुरुत्वाकर्षण पाहा). ज्योतिषविषयक शोधहि त्यानें लावले. ग्रहांच्या कक्षा वर्तुलावर आहेत व सूर्य हा त्यांच्या मध्यबिंदूशीं असतो, वगैरे सिद्धान्त त्यानें प्रस्थापित केले. त्यानें धर्मशास्त्रावरहि एक-दोन ग्रंथ लिहिले आहेत. त्याचा 'प्रिन्सिपिया' ग्रंथ प्रख्यात आहे. हा पार्लमेंटांत विश्वविद्यालयाचा प्रतिनिधि म्हणून निवडून येई. पांढरा प्रकाश, कलनशास्त्र, आणि गुरुत्वाकर्षण हे त्याचे शोध त्याला अजरामर करतील. हा रॉयल सोसायटीचा अध्यक्ष होता. १७०५ सालीं त्याला 'सर' करण्यांत आलें.

**न्यू फाउंडलंड**—उत्तर अमेरिकेंतील एक ब्रिटिश प्रांत. हा लॉरेन्सच्या आखाताच्या पूर्वेस आहे. लाब्राडोर धरून याचें क्षे.फ. ४२,७३४ चौ. मै. व लो. सं. ३,००,००० आहे. पंधराव्या शतकाच्या अखेरीस जॉन केबॉट यानें याचा शोध लावला व पुढें शंभर वर्षांनीं १५८३ मध्यें हा ब्रिटिश मुलुखास जोडण्यांत आला. त्यामुळें अगदीं जुन्यांत जुनी अशी ही ब्रिटिश वसाहत

आहे. कॉड मासे, हेरिंग मासे व इतर मासे धरण्याचा धंदा मोठा आहे. खनिज संपत्तिहि विपुल आहे. लोखंड, तांबें, रुपें व सोनें हीं सांपडतात.

**न्यू ब्रन्सविक**— हा प्रांत कानडा देशांत समुद्रकिनाऱ्याला असून त्याचें क्षे.फ. २७,९८५ चौ. मैल आहे. हा किनाऱ्यानजीक सपाट असून मध्यमार्गी डोंगराळ आहे. तेथून अनेक नद्या निघतात. या प्रांताची राजधानी फ्रेडरिक्टन आणि सर्वांत मोठें बंदर सेंट जॉन हें आहे. त्याशिवाय मॉंक्टन, कॅंपबेल्टन, बॅथर्स्ट व चॅथॅम हीं बंदरें आहेत. येथें नद्या पुष्कळ असल्यामुळें जलशक्तीचा पुरवठा स्वस्त दरांत विपुल मिळतो. येथें १,००,००,००० एकर जमीन सुपीक आहे, पण त्यापैकीं निम्म्या जमिनींत लागवड केलेली आहे. येथें ओट, गहूं, बटाटे व गाजरें हीं पिकें होतात. शिवाय मेंढ्या, गुरें, कोंबड्या आणि बदकें पाळण्याचा धंदा व दुधाचा धंदा हे फार महत्त्वाचे धंदे आहेत. प्रांताचा ३/४ भाग अरण्यमय असून तेथील लांकडापासून कागदाचा लगदा (पेपर पल्प–फर व सिडार या जातींच्या झाडापासून) तयार होतो. खनिज द्रव्यें दगडी कोळसा, लोखंड, जिप्सम व खनिज तेलें हीं सांपडतात. न्यू ब्रन्सविक हें मच्छीमारीच्या धंद्याचें जगांतील एक सर्वांत मोठें केंद्र आहे. येथें कॉड, हॅडॉल, लॉबस्टर, हेरिंग, गॅस्पेरो, सालमन, वगैरे जातींचे मासे सांपडतात. येथें कागदाच्या गिरण्या, साखरेच्या गिरण्या, जहाजें बांधण्याचे कारखाने हे उद्योगधंदे आहेत. येथें शिक्षण मोफत मिळतें. फ्रेडरिक्टन येथें एक विद्यापीठ आहे (स्था. १८००) व सॅकव्हिल येथें माउंट ॲलिसन विद्यापीठ आहे. येथील लो. सं. ४,५७,४०१ असून, बहुतेक सर्व ब्रिटिश लोक आहेत. किनाऱ्यानजीक थोडे ॲकेडियन लोक राहतात. हा प्रदेश प्रथम कार्टीयरनें शोधून काढला (१५६४); आणि नंतर इंग्रज लोकांनीं येथें वसाहत केली (१७६१). १८६७ सालीं हा प्रांत कानडाच्या संयुक्त राज्यांत सामील झाला. या प्रांताचा कारभार एक कायदेमंडळ आणि ले. गव्हर्नर हे चालवतात.

**न्यू ब्रिटन**—हें बेट पॅसिफिक महासागरांत न्यू गिनी बेटाजवळ आहे. पूर्वी या बेटावर जर्मनीची सत्ता होती. हल्लीं ऑस्ट्रेलियाची सत्ता आहे. या बेटाची राजधानी राबौल आणि मुख्य बंदर सिंपसन हें आहे. येथें युरोपियन लोकांनीं नारळाच्या मोठमोठ्या बागा केल्या आहेत. या बेटाचा बराच भाग डोंगराळ आहे व कांहीं जिवंत ज्वालामुखी त्यांत आहेत. १९३७ च्या मे महिन्यांत असा एक ज्वालामुखी उद्भवून राबौलला त्यानें राखेनें आच्छादून टाकलें होतें. तद्देशियांची संख्या १९४० सालीं ९०,३४९ भरली.

सु. वि. भा. ३–५८

**न्यूमन, कार्डिनल** (१८०१–१८९०)— एक आंग्ल धर्मोपदेशक. यानें दाक्षिण युरोपमध्यें प्रवास केला होता. याच्या लहान लहान कविता आहेत. ॲंग्लिकन चर्चमध्ये कॅथॉलिक संस्कारांचें पुनरुज्जीवन करणें आपलें कर्तव्य होय, असें तो मानीत असे. याची बुद्धि सूक्ष्मगामी होती. लेखन जोरदार व उत्कृष्ट भाषेंत असे. याचे पांच–सहा ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**न्यू मेक्सिको**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील एक दक्षिणेकडील संस्थान. क्षे. फ. १,२१,६६६ चौ. मैल. रॉकी पर्वताची ओळ संस्थानच्या मध्यांतून दक्षिणोत्तर जाते. पूर्व बाजूचा प्रदेश सपाट मैदान आहे व दक्षिणेला रुक्ष ओसाड प्रदेश आहे. मैदानांची उंची ३ ते ६ हजार फूट आहे. पर्वतशिखरें १२ ते १४ हजार फूट उंच आहेत. सांता फे हे राजधानीचें ठिकाण आहे. शेतीकरितां कालव्याची सोय केली आहे. गहूं, ओट, मका, बटाटे, फळझाडें, थोडासा कापूस, वगैरे शेतीचें उत्पन्न आहे. अल्बुकर्क येथें संस्थानचें विद्यापीठ आहे. जगांतील सर्वांत उंच गोल्फचें मैदान (समुद्रसपाटीपासून ९,००० फूट) येथें आहे. स्पॅनिश वसाहती १७ व्या शतकांत झाल्या. अद्यापहि स्थानिक इंडियन लोक बरेच आहेत. १८२१ मध्यें मेक्सिकोबरोबरच हें संस्थान स्पेनपासून स्वतंत्र झालें व पुढें १८४६ मध्यें अमेरिकेच्या ताब्यांत आलें. १९१२ मध्यें संयुक्त संस्थानांतलेंच एक हा दर्जा मिळाला. लो. सं. ५,३१,८१८.

**न्यू यॉर्क**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील आद्य तेरांपैकीं एक. आकार साधारण त्रिकोणी आहे. लॉंग आयलंड व स्टेटन आयलंड यांचा समावेश राज्यकारभाराकरितां याच संस्थानांत केला गेला आहे. संस्थानचें क्षेत्रफळ ४९,५७६ चौ. मै. आहे. पाऊस सरासरी ४० ते ४५ इंच पडतो. हवा ऋतुमानाप्रमाणें उष्ण व अति थंड आहे. गाई व पाळीव जनावरें पुष्कळ आहेत. मासेमारीचाहि उद्योग चालतो. खनिज संपत्ति विपुल असून रॉकेलच्या खाणी आहेत. रासायनिक कारखाने बरेच असून इतर उद्योगधंदेहि बरेच आहेत. रेल्वे व कालवे यांचीहि वाढ होत आहे.

प्रत्येक सज्ञान (२१ वर्षांच्या) माणसाला मतदानाचा अधिकार आहे. सीनेटमध्यें ५१ लोक असतात. असेंब्ली १५० सभासदांची आहे. शिक्षण सक्तीचें आहे. १६२४ त प्रथम डच, नंतर फ्रेंच व शेवटीं इंग्रज (१७६३) या संस्थानाचे मालक झाले. १७७८ त हें मूळ तेरा संस्थानांपैकीं एक बनलें. लो. सं. १,३४,७९,१४२.

शहर— न्यू यॉर्क हें या ( न्यू यॉर्क ) संस्थानांतलें सर्वांत मोठें व बंदरी शहर आहे. अमेरिका देशाचें आर्थिक आणि व्यापारी केंद्र हेंच आहे. याची दक्षिणोत्तर लांबी ३२ मैल व पूर्व-पश्चिम रुंदी १६ मैल. न्यू यॉर्क हें जगांतील उत्कृष्ट बंदरांतलें एक आहे. अत्युच्च इमारती, जमिनीखालून रस्ते व पूल यांविषयीं जगांत हें प्रसिद्ध आहे. तसेंच नाट्य, संगीत, आकाशवाणी, ग्रंथ व नियतकालिकें यांचें प्रकाशन, या बाबतींत अमेरिकेचें हें मध्यवर्ती ठिकाण आहे. बंदराच्या तोंडाशीं स्वातंत्र्य-मूर्ति बसविली आहे. या शहरांत कोलंबिया नांवाचें विद्यापीठ आहे. लो. सं. पाऊण कोटी आहे.

**न्यूरेंबर्ग**—हें बव्हेरियन शहर म्यूनिकच्याजवळ वायव्येस १२ मैलांवर आहे. लो. सं. (१९३०)४,३०,८५१. जर्मनींत आकारमानानें दुसरें असलें तरी सर्व बव्हेरियांत व्यापारांत पहिल्या प्रतीचें शहर हेंच आहे. प्राचीन काळीं हें फार सधन व महत्त्वाचें शहर होतें. सध्यांहि या शहराचें मध्ययुगीन स्वरूप प्रयत्नपूर्वक राखण्यांत आलें आहे व याकरितां नव्या इमारतीसुद्धां जुन्या पद्धतीवर बांधल्या गेल्या आहेत. शहराच्या उत्तरेस एक जुना किल्ला ११ व्या शतकांतला आहे. येथें जर्मन राष्ट्रीय पदार्थ-संग्रहालय आहे. आगगाड्यांचें केंद्र व कालव्याची सोय ( डॅन्यूब व मेन नद्या जोडून ) यांमुळें व्यापारांत उद्योगधंद्यांत हें प्रमुख आहे.

**न्यू साउथ वेल्स**—हें ऑस्ट्रेलिया संघराज्यांतलें सर्वांत जुनें संस्थान आहे. याचें क्षे. फ. ३,०९,४३२ चौ. मैल असून यांतील गोरे लोकांची संख्या २८,८५,५९४ आहे. शिवाय कांहीं आदिवासी लोक येथें राहतात. १७७० सालीं ब्रिटिशांनीं या प्रदेशाचा ताबा घेतला आणि १७८८ मध्यें ब्रिटिशांची पहिली वसाहत झाली. १८४२ मध्यें येथें लोकनियुक्त कायदेमंडळ स्थापन होऊन १८५६ सालीं जबाबदार राज्यपद्धति सुरू झाली. १९०१ सालीं हा प्रांत ऑस्ट्रेलियाच्या कॉमनवेल्थ या संयुक्त राज्यांत सामील झाला. या प्रांताचा राज्यकारभार दोन सभागृहें असलेलें पार्लमेंट चालवतें व येथें निवडणुकींत मतदान सक्तीचें आहे. कायदेमंडळाच्या सभासदाला वार्षिक पगार ८७५ पौंड आणि मुख्य प्रधानाचा वार्षिक पगार २४४५ पौंड आहे. ६–१५ वर्षांपर्यंत शिक्षण सक्तीचें आहे. सिडने येथें विद्यापीठ (१८५०) आणि अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत व स्त्रियांकरितांहि स्वतंत्र कॉलेज आहे. येथें वृद्धांना व रोगी लोकांना तसेंच विधवांना पेन्शन, मुलांना मदत आणि प्रसूतीच्या कालांत स्त्रियांना भत्ता देण्याची योजना केली आहे. बेकार लोकांना सरकार रोख मदत दर पंधरवड्यास करतें. प्रत्येक प्रौढ इसमास ३४ शिलिंग, विवाहित जोडप्यास ५८ शिलिंग, एक मूल असलेल्या जोडप्यास ७१ शिलिंग, २ मुलें असल्यास ७४ शिलिंग, ३ मुलें असल्यास ८३ शिलिंग, ४ मुलें असल्यास ९२ शिलिंग, व पुढें दर मुलाला १० शिलिंग अधिक देण्यात येतात. येथें ५–६ मोठाल्या नद्या आणि लहान लहान सरोवरें पुष्कळ आहेत. येथें गहूं, मका, बार्ली, ओट, बटाटे, तमाखू हीं पिकें आणि नारिंगें, लिंबें, केळीं, द्राक्षें आणि ऊंसहि होतात. येथें गुरें, मेंढ्या, व घोडे पाळण्याचा धंदा चालतो. खनिज द्रव्यें : दगडी कोळसा, सोनें, रुपें, जस्त, शिसें, लोखंड व तेलें वगैरे सांपडतात. येथें अनेक प्रकारचे कारखाने आहेत.

**न्यू हॅंपशायर**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील उत्तरेकडचें एक संस्थान. न्यू इंग्लंड गटांतलें व मूळच्या १३ संस्थानांतलें एक. उत्तर सरहद्द कानडाला लागून आहे. ॲटलांटिक महासागरावर थोडासा किनाराहि आहे. क्षेत्रफळ ९,३०४ चौ. मैल. लो. सं. ४,९१,५२४. उत्तर भाग डोंगराळ आहे व माउंट वॉशिंगटन हें शिखर ६,२९३ फूट उंच आहे. कनेक्टिकट, मेरिमॅक, अँड्रोस्कॉगिन व सॅको ह्या नद्या मुख्य आहेत. लहान-मोठीं ६०० वर तळीं व सरोवरें आहेत. कॉंकार्ड मुख्य ठिकाण आहे. हवा समशीतोष्ण आहे, पण उन्हाळे व हिंवाळे कडकच असतात. गवत, धान्य, बटाटे, ओट, वगैरे पिकें व फळफळावळ यांचें चांगलें उत्पन्न असून जनावरें बाळगणें व दुधेऱ्या ( डेअरी ) हे धंदे चांगले चालतात. विणकाम, जोडे, कागद, वगैरेंचे यांत्रिक कारखाने अनेक आहेत. यांत मोठमोठीं अरण्यें आहेत. १६१८ मध्यें जॉन स्मिथ हा प्रवासी प्रथम या भागांत आला. कांहीं काळ हें संस्थान मेनमध्येंच समाविष्ट होतें. १६२९ मध्यें न्यू हॅंपशायर अलग झालें. अठराव्या शतकांत सरहद्दीबाबत वरचेवर झगडे होत. क्रांतियुद्धांत ह्या संस्थानानें महत्त्वाचा भाग घेतला होता. १७८८ मध्यें हें नव्या घटनेनुसार संयुक्त संस्थानांतलें एक झाले.

**न्यू हेब्रिडीज**—हा द्वीपसमूह ओशियानिया खंडांत फिझी बेटाच्या पश्चिमेस ५०० मैलांवर असून यांतील बेटांपैकीं ३० बेटांवर लोकवस्ती आहे. त्यांत प्रसिद्ध बेटे आहेत तीं—एस्पिरीटू-सॅंन्टो, मालेकूला, एपि, आमब्रिम्, सॅन्डविच, एरोमागा, टॅन्ना, व आनीपूम. येथें तीन जिवंत ज्वालामुखी आहेत. व्हिला हें मुख्य व राजधानीचें शहर आहे. या सर्व बेटांचें एकंदर क्षे. फ. ५,७०० चौ. मैल असून लो. सं. ६०,००० आहे. पैकीं २७५ ब्रिटिश, ७०९ फ्रेंच, ८०० आशियाटिक व बाकीचे आदिवासी मेलानेशियन लोक आहेत. या बेटांवर १९०६ पासून इंग्रज व फ्रेंच यांची संयुक्त सत्ता असून या बेटांचा राज्यकारभार हायकमिशनर चालवतो. येथें मिशनरी लोकांच्या पुष्कळ शाळा आहेत. येथील जमीन फार सुपीक असून नारळ, फळफळावळ, मका, कॉफी, कोको, कापूस, चंदनाचीं झाडें व पाइन येथें होतात.

**न्यू हेवन**—अमेरिकन संयुक्त संस्थानांपैकीं कनेक्टिकट संस्थानांतील सर्वांत मोठें शहर. लो. सं. १,६०,६०६. न्यू यॉर्क व न्यू हेवन यांच्या दरम्यान आगगाडीचे बरेच फांटे आहेत. न्यू हेवन येथें प्रथम थोडी वस्ती होती. १७८४ मध्यें तें शहर झालें. येथें सर्व प्रकारच्या शिक्षणाच्या सोयी आहेत. येल नांवाचें विद्यापीठ येथें आहे. कारखानेहि बरेच आहेत.

**न्हावी**—दाढी करणें व डोक्यावरील केंस कापणें किंवा काढून टाकणें हें काम करणाऱ्या मनुष्यास न्हावी म्हणतात. ही एक जात मानण्यांत येते, पण अलीकडे हा केवळ धंदा झाला आहे. पूर्वी अनेक देशांतल्याप्रमाणें इंग्लंडमध्यें न्हावी लोकांकडेच शस्त्रक्रिया करण्याचें काम असे. याकरितां इंग्लंडमध्यें आठव्या हेन्रीच्या कारकीर्दीत शस्त्रवैद्यांबरोबरच न्हाव्यांच्या मंडळींचीहि नोंद करण्यांत आली. या मंडळीस न्हावी शस्त्रवैद्य म्हणत. मात्र शस्त्रवैद्याचा धंदा करणाऱ्या न्हाव्यांनीं हजामतीचें काम करावयाचें नाहीं व अशा न्हावी शस्त्रवैद्यांनीं फक्त रक्त काढणें व दांत उपटणें यांखेरीज अन्य शस्त्रक्रिया करावयाची नाहीं, असे निर्बंध घालण्यांत आले होते. ही प्रथा दुसऱ्या जॉर्ज राजाच्या कारकीर्दीपर्यंत चालली. या धंद्याचें चिन्ह एक काठी ( तिला टेकून उभा असलेला रोगी ), तिला गुंडाळलेली सर्पाकार कापडाची जखमेस बांधावयाची पट्टी व रक्त सांडण्याकरितां भांडें हें अद्यापि कोठें कोठें दिसतें.

न्हावी जात—हिंदुस्थानांत यांची लो. सं. तीस लाखांवर आहे. सर्व देशभर हे लोक हिंदु-मुसलमान या दोन्ही जातींत आहेत. प्रांताप्रांतांत यांना भापापरत्वें अनेक नांवें आहेत व यांचे अनेक स्थानिक पोटभेद आहेत. शंकराच्या नाभीपासून हे उत्पन्न झाले अशी दंतकथा आहे. तेव्हां कांहीं आपणांस नामिक म्हणवितात. विश्वनाथ नामक न्हाव्यानें अलीकडे नाभिक पुराणहि रचलें आहे. पूर्वी कांहीं ठिकाणीं न्हावी मशालजीचा व वाजंत्र्याचाहि धंदा करीत. मराठी नापितांचीं देवकें व चालीरीती मराठ्यांप्रमाणेंच आहेत. तेव्हां पूर्वीं हे एकच असावेत. न्हावी हा गांवगाड्यांतील एक बलुतेदार आहे. कित्येक जातींत व प्रांतांत लग्नाच्या संधानांत न्हावी हाच मध्यस्थ असतो. पूर्वी हे लोक शस्त्रक्रिया करण्याचें व तुंबड्या लावण्याचें काम करीत व यांच्या बायका सुइणीचें काम करीत. मध्यप्रांतांतील न्हाव्यांच्या चालीरीती कुणब्यांप्रमाणें आहेत. म्हैसूरकडे हे लोक शेती करतात. कानडी न्हाव्यांत गोत्रें आहेत व मुलींच्या लग्नास वयोमर्यादा नाहीं. आसामांतील न्हाव्यांची राहणी चांगली असल्यानें त्यांच्या हातचें पाणी तिकडील ब्राह्मणांस चालतें. गुजराथी न्हाव्यांत लिंबाचिया न्हावी श्रेष्ठ समजतात. यांच्यांत दिराशीं पुनर्विवाह लावतात.

शिवाजीचा अंगरक्षक जिऊ महाले हा न्हावी होता. प्रसिद्ध संत सेना हा न्हावीच होता. अलीकडे या जातींत शिक्षणप्रसार होत आहे व कित्येक न्हावी इंजिनीअर, कंत्राटदार, वकील, वगैरे झाले आहेत.

**न्हीव**—हीं झाडें दक्षिण कोकणांत फार होतात. हीं मोठीं वाढतात व यांना वाटोळीं फळें येतात. त्यांवर बारीक कांटे असतात व खाण्याला तीं गुळचट लागतात. स्वच्छ धुण्यासाठीं व्रणावर न्हीवच्या सालीचा उपयोग करतात. अतिसारावर तीं वांटून देतात.

# मोठ्या कामांना मोठेंच भांडवल लागतें !

पण तें भांडवल जवळ नाहीं म्हणून मोठीं कामें कधींच अडून राहत नाहींत !

आतांपर्यंत जवळ काहींच भांडवल नसतांना

वाद-विवेचनमाला, काळांतील निवडक निबंध

इत्यादि प्रकाशनें केलीं. आतां

सारखें मोठें काम हातीं घेतलें आहे. सहा भागांतील 'सुलभ विश्वकोश' संपूर्ण होण्याकरित एक लाख रुपये खर्च येतो.

त्यांपैकीं तीन भाग छापून तयार झाले आहेत. अजून तीन भाग पूर्ण व्हावयाचे आहेत. आणि सुलभ विश्वकोशाइतकींच महत्त्वाचीं आणखी दोन–तीन प्रकाशनें [ कै. गो. कृ. मोडक यांचा 'व्युत्पत्तिकोश', कै. वामन शिवराम आपटे यांचे संस्कृत-इंग्लिश, इंग्लिश-संस्कृत शब्दकोश ] हातीं घेणार आहे. त्याकरितां रकमेची जरूरी आहे. त्याकरितां प्रसाद-प्रकाशनानें वाङ्मयप्रेमी सद्गृहस्थांकडून ठेवी घेण्याचें ठरविलें आहे.

ठेवीच्या रूपानें कोणासहि या वाङ्मय-प्रकाशनास साहाय्य करतां यावें म्हणून

## शंभर रुपयांपासून ठेवी घेण्याचें ठरविलें आहे.

ठेव शंभर रुपयांपासून पुढें कितीहि रकमेची स्वीकारली जाईल.

★ मुदत तीन वर्षें. ★ व्याज दरसाल दरशेंकडा ६ टक्केप्रमाणें मिळेल.

★ व्याज दर सहा महिन्यांनीं दिलें जाईल.

**यशवंत गोपाळ जोशी,**

'प्रसाद-प्रकाशन', ६२३।१५ सदाशिव, पुणें २.